मनोहर ग्रंथमाला प्रकाशन ७ वें

# समग्र केळकर वाङ्मय

## ११ संस्कृति खंड








सन १९३८

# प्रकाशकाचें निवेदन

संकल्पाप्रमाणें ' समग्र केळकर-वाङ्मया ' चे हे बारा खंड छापून आज वाचकांच्या हातीं देतां येत आहेत याविषयीं फार आनंद होतो. हें छपाईचें काम अपेक्षेपेक्षां पुष्कळच लवकर पूर्ण करतां आलें याचें श्रेय पुणें शहरांतील अनेक छापखान्यांनीं केलेल्या सहकारितेलाच दिलें पाहिजे.

हें समग्र केळकर-वाङ्मय प्रसिद्ध करण्याची मूळ कल्पना स्वतः केळकरांची नाहीं त्याप्रमाणें ती प्रस्तुत प्रकाशकाचीहि नाहीं. केळकर वाङ्मयाचा अभ्यास आज सुमारें वीस वर्षें सतत करणाऱ्या एका गुणग्राही वाचकाच्या सहृदय अंतःकरणांत त्या कल्पनेचा उगम झाला. आणि त्याच्याच सक्रीय प्रोत्साहनामुळें त्या कल्पनेला हें दृश्य स्वरूप प्राप्त झालें हें सांगणें आम्हीं आमचें कर्तव्य समजतों.

वास्तविक केळकरांचे ' **समग्र** ' वाङ्मय प्रसिद्ध करण्याची वेळ अजून आलेलीच नाहीं ! कारण त्यांची लेखणी अजून थांबलेली नाहीं. आणि त्यांची प्रकृति चांगली राहिली तर यापुढें त्यांनीं निर्माण केलेलें आणखीहि वाङ्मय वाचकांना वाचावयास मिळेल अशी आशा करण्यास जागा आहे. तथापि बारा हजार पृष्ठें भरतील इतकें वाङ्मय आजच सिद्ध असल्यामुळें हा पहिला मोठा हप्ता छापून मोकळें व्हावें ही गोष्ट सर्वच दृष्टींनीं इष्ट होती. पण यांत आणखी एक सोय विशेष होती ती अशी कीं, केळकरांच्या छापील ग्रंथांशिवाय त्यांनीं वर्तमानपत्रें मासिक पुस्तकें यांत लिहिलेले लेख, इतर ग्रंथकारांच्या ग्रंथांना लिहिलेल्या प्रस्तावना, प्रसंगविशेषीं त्यांनीं दिलेल्या व्याख्यानांचे लेखी सारांश इत्यादि जें अवांतर वाङ्मयहि बरेंच आहे तें आठवून, मिळवून, जुळवून, युक्तायुक्त पाहून तपासून देणें हें काम इतरांच्या हातून कसें होणार ? तें त्यांचें त्यांनींच करणें शक्य. म्हणून त्यांना श्रम देऊनहि पण ते त्यांच्या हातून होण्यासारखें आहे तोंपर्यंत करवून घेण्याशिवाय गत्यंतर नव्हतें.

या ग्रंथांतल्या ' वाङ्मय ' शब्दाचा अर्थ नेहमीं आपण समजतों त्याहून किंचित् अधिक व्यापक केला पाहिजे. कारण केळकरांच्या लेखांप्रमाणें त्यांनीं दिलेल्या तोंडी व्याख्यानां-भाषणांचाहि समावेश त्यांत केला आहे. पण त्यांपैकीं बरीच, तोंडी बोलून झाल्यावर, स्वतः त्यांची त्यांनीं लिहून दिलेलीं आहेत. इतर वार्ताहरांनीं लिहून घेतलेलीं अशीं थोडीं आहेत.

दुसरीहि एक गोष्ट सांगणें अवश्य आहे ती ही कीं, या बारांपैकीं एखाद-दुसऱ्या खंडांत केळकरांनीं स्वतः लिहिलें नाहीं किंवा ते बोलले नाहींत असेंहि कांहीं ' वाङ्मय ' पुरवणी कागदपत्रांच्या रूपानें समाविष्ट केलें आहे. उदाहरणार्थ, टिळकांचीं मृत्युपत्रें, केसरीवरील खटल्यांतील न्यायमूर्तींचे निर्णय, एखाद्या सभेच्या हकीकतींतील प्रास्ताविक किंवा समारोपाचा असा कांहीं त्रोटक मजकूर इत्यादि. पण त्या ठिकाणीं केवळ तो प्रसंग किंवा विषय यांची समजूत पटण्याला तो मजकूर साधनभूत असल्यामुळें घालावा लागला आहे. उलट कांहीं वाङ्मय केळकरांनीं लिहिलेलें असेंहि खंडपृष्ठांच्या मर्यादेमुळें वगळावें लागलें.

हें प्रचंड व विविध वाङ्मय जवळ जवळ सारख्या पृष्ठ संख्येच्या बारा खंडांत बसवून देणें हें काम सहजच जरासें अडचणीचें झालें. तथापि शक्य तोंवर विषयानुसंधान साधण्याचा प्रयत्न करण्यांत आला आहे.

—प्रकाशक.

---

# अनुक्रमणिका

## शिक्षण, समाज आणि संस्कृति



पंडित मालवीय, श्री. न. चिं. केळकर

हिंदुमहासभेचें अधिवेशन, पुणें ( १९३५ )

# समाज आणि संस्कृति

## संस्कृत विद्येचें पुनरुज्जीवन

### विषयोपन्यास

'मन' बदलतें म्हणा किंवा 'मनु' बदलतो म्हणा, कांहीं तरी बदलतें खरें. एरवीं मानवी विचारसृष्टीमध्यें अल्पावकाशांत प्रचंड फेरबदल होतात तसे झाले नसते. गंगा, सिंधु वगैरे नद्यांच्या कांठीं राहणाऱ्या लोकांना असा नेहमीं अनुभव येतो कीं, यंदा ज्या ठिकाणीं रेतीचें विस्तीर्ण मैदान तुडवीत जावें लागतें, तेथेंच पुढच्या वर्षी पहावें तों भालाभर पाणी होऊन खुशाल नावा खेळूं लागतात. लोकगंगेचा प्रवाहहि असाच कांहींसा लहरी आहे. आज जें निंद्य म्हणून तिच्या धारेपुढें जोरानें वाहून नेलें जातें व क्वचित् नाशहि पावतें, तेंच उद्यां वंद्य बनून स्वतः सुस्थिर व दुसऱ्यास आश्रयस्थान होऊन राहतें. हा नियम मनुष्याच्या पोषाखासारख्या व चाली-रीतीसारख्या अगदींच अशाश्वत किंवा चलस्वभाव गोष्टींना लागू आहे असें नव्हे; तर विद्या, ज्ञान, संस्कृति अशा समाजाच्या काळजाशीं भिनलेल्या गोष्टींनाही तो लागू पडतो. नीतीच्या आणि धर्मबुद्धीच्या अगदीं अंतिम कल्पनाखेरीज करून बाकी सर्व कांहीं युगांतराबरोबर—म्हणजे प्रतिमन्वंतरा-बरोबर— बदलत असतें. उदाहरणार्थ, श्रीरामचंद्र, धर्मराज, अशोक, सीझर, शार्लमेन किंवा पंचम जॉर्ज यांच्या राज्यारोहणाच्या प्रसंगीं मस्तकावर घाल-ण्याच्या मुगुटांचा आकार व स्वरूप हीं खरोखर वेगवेगळींच असतील. पण त्रेतायुगांतील 'रामराज्य' व कलियुगांतलें ब्रिटिश अमलाखालचें 'आराम—राज्य' या दोहोंमध्यें सत्य, न्याय, परोपकार, अशा मूलभूत व शुद्ध सद्गुणांचें स्वरूप एकच आढळणार. कित्येक गोष्टी या दोन टोंकांच्या दरम्यान येतात. त्यांच्या कल्पना नीतितत्त्वांइतक्या अढळ ध्रुवपदारूढ नसतात; किंवा दुसऱ्या पक्षीं भाषा, पोषाख किंवा चालीरीती यांच्याइतक्या बारा बारा कोसांवर

किंवा एकेका पिढीस बदलत नाहींत. पण, म्हणून त्या अस्थिर आहेत असें नाहीं. अमुक इतकीं वर्षें किंवा अमुक इतक्या पिढ्या म्हणजे एक मन्वंतर असें कालमानाचें कोष्टक कोठें ठरविलेलें आढळत नाहीं. पण विद्या, ज्ञान, कला व संस्कृति यांच्या बऱ्यावाईटपणाच्या कल्पना मन्वंतरानुरूप बदलत जातात ही गोष्ट निर्विवाद आहे. मग वर्षमानाचें गणित कांहीं होवो!

संस्कृत विद्या–अर्थात् आर्य संस्कृति–इच्या बरेवाईटपणाच्या कल्पनेंत अशा प्रकारचीं मन्वंतरें पूर्वी होत आलीं आहेतच. पण विशेष सांगावयाची गोष्ट ही कीं, आजच्या घटकेसहि ती अशा एका मन्वंतरांतून जात असून आमची संक्रमणक्रिया आमच्या स्वतःच्या डोळ्यांस दिसण्याइतकी उघड व जलद घडून येत आहे. ब्रिटिश राज्य हिंदुस्थानांत सुरू होण्यापूर्वी संस्कृत विद्या हीच निर्विवादपणें सिंहासनारूढ होती. इंग्रजशाही झाल्यावर सन १८३५ सालीं लॉर्ड मेकॉले यांनीं तिला आपल्या लेखणीच्या एका फटक्यासरशी पदच्युत केलें, व तिचें सिंहासन आंग्लविद्येस देऊन टाकलें. पण १९३५ साल अवतरण्यापूर्वी, विद्येच्या पोटराज्यांत एक लहानशी राज्यक्रांति होऊन आर्यविद्या आंग्लविद्येच्या बरोबरीनें तें सिंहासन फिरून अडवून बसेल व समाईक अम्मल गाजवूं लागेल, यांत आम्हांस मुळींच शंका वाटत नाहीं. आर्य व आंग्ल या दोन विद्यांचें तरी संयुक्त स्वराज्य त्या अवधींत नांदूं लागून, भावी राष्ट्रीय सूर्योदयाचा तो शुभसूचक व उल्हासजनक असा अरुणागम ठरेल असें आमचें मन आम्हांस साक्ष देत आहे.

इंग्रज लोक हे स्वतः मोठे विद्याप्रिय असल्यामुळें त्यांचा पाय या देशांत रुजल्यावर इकडील लोकांस शिक्षण द्यावें अशी त्यांस सहजच इच्छा उत्पन्न झाली. पण तें शिक्षण कशाचें व कोणत्या रीतीनें द्यावें याविषयीं त्यांना थोडासा विचार पडला. याचें खरें कारण असें कीं आर्य संस्कृतिसंबंधानें त्या वेळच्या इंग्रज लोकांच्या मनांत फारसा आदर नव्हता. आधीं संस्कृत भाषा ही मृत भाषा असून लोक हल्लीं ती बोलत नाहींत; हल्लीं बोलत असणाऱ्या भाषेंत चांगलासा ग्रंथसंग्रह नाहीं; व फार जुन्या अशा एका काळीं हिंदी लोक चांगले शिकले सुधारलेले असले तरी आज हातीं लागणाऱ्या संस्कृत ग्रंथांत व्यवहारोपयोगी असें वाङ्मय अथवा शास्त्रीय ज्ञान मुळींच नाहीं; आहे तें वेड्या धर्मसमजुती व बाष्कळ

लोकभ्रम यांनीं दूषित असेंच आहे; अशी त्या काळच्या इंग्रज पंडितांची व मुत्सद्यांची समजूत होती. पेशवाई नष्ट झाल्यापासून पंधरा वर्षांच्या आंतच जुन्या व नव्या विद्येच्या वादास रूप आलें. लॉर्ड बेंटिंक यांच्या अमदानींत या वादाचा निकाल लावण्याचें काम एका स्वतंत्र कमिटीकडे सोंपविण्यांत आलें. प्रथम प्रथम तिजमध्यें आर्यविद्येच्या पुरस्कर्त्यांचा पक्ष वरचढ होणार असें दिसत होतें. पण पुढें लवकरच आंग्ल भाषा व पाश्चात्य विद्या यांच्या पुरस्कर्त्यांचा जोर झाला. या मतभेदांतून काय तोड निघते हें कांहीं वेळ कोणासच सांगतां येण्यासारखें नव्हतें. पण याच सुमारास सदर कमिटीवर लॉर्ड मेकॉले यांची नेमणूक होऊन त्यांनीं जें जोरदार मिनिट लिहिलें त्यानें पारडें फिरलें; अखेर १८३५ सालीं हिंदुस्थान सरकारनें लॉर्ड मेकॉले यांच्या मिनिटाच्या आधारेंच ठराव लिहून प्रसिद्ध केला; आणि आज सुमारें ७५ वर्षें जिचा अंमल अबाधित चालत आला आहे, त्या पाश्चात्य शिक्षणपद्धतीचा मूळ पाया भरला गेला. आर्यविद्येच्या पुरस्कर्त्यांनीं फिरून एक नेटाचा प्रयत्न करून सदर ठराव हाणून पडतो का पाहिलें; पण त्यांचा हा प्रयत्न सिद्धीस गेला नाहीं. लॉर्ड ऑकलंड यांनीं सन १८३९ सालीं एक नवीन ठराव लिहून पूर्वींचाच ठराव कायम केला. त्या ठरावाचा मथितार्थ असा होता कीं, "युरोपियन वाङ्मय, तत्त्वज्ञान व शास्त्रें, यांचें वरिष्ठ प्रतीचें शिक्षण देणें तें इंग्रजी भाषेच्या द्वारें दिलें जावें; तथापि विद्यमान पौर्वात्य शिक्षणसंस्थांचें कामहि पूर्णपणें जोरांत चालू ठेवावें; आणि इंग्रजी शिक्षण-संस्थांत शिक्षण मिळविणाऱ्या विद्यार्थ्यांस उत्तेजन देण्यांत येईल तितकेंच पौर्वात्य शिक्षणसंस्थांतून शिक्षण मिळविणाऱ्या विद्यार्थ्यांना देण्यांत यावें. देशभाषा व इंग्रजी भाषा यांच्या शिक्षणाचा मिलाफ करण्यांत यावा; पण आपणास पाहिजे त्या प्रकारचें देशी किंवा इंग्रजी शिक्षण घेण्याची प्रत्येक व्यक्तिमात्रास स्वतंत्रता ठेवण्यांत यावी." लॉर्ड मेकॉले यांच्या एकतर्फी दिसणाऱ्या मताचा तोल संभाळण्याचा प्रयत्न करण्याचा सदर ठरावाचा हेतु उघड दिसून येतो. परंतु पुढील अनुभवावरून पहातां हा समतोलपणा बिलकुल टिकला नाहीं असेंच म्हणावें लागतें. पण याला कारणेंहि तशींच होतीं. आर्यविद्येलाहि उत्तेजन द्यावें असें सरकारनें म्हटलें खरें; पण सर-कारच्या मनांत त्या विद्येबद्दल जर मुळीं आदरबुद्धीच नव्हती तर केवळ

आपला शद्व खरा करण्याकरितां म्हणून त्यांच्या हातून त्या विद्येस भरपूर द्रव्यसहाय्य कसें होणार ? मेकॉलेनें आपल्या मिनिटांत जे शद्व लिहिले त्यांचाच प्रतिध्वनि प्रत्येक इंग्रजाच्या मनांतून निघत होता. मेकॉलेसाहेब आपल्या मिनिटांत लिहितात:—" आपण ज्ञान-प्रसारक मंडळी असा मोठा किताब धारण केला आहे खरा. पण वस्तुतः पहातां तो घेण्यास आपणांस बिलकुल अधिकार नाहीं. आपली कृति पाहिली तर खऱ्या ज्ञानाचा प्रसार आपण मुळींच करीत नसून, खोटें ज्ञान नाहींसें होत चाललें आहे त्यास मात्र आडवें येत आहों. ज्या पुस्तकांतील ( संस्कृत ) मजकुराची किंमत त्यांतील कागदाच्या किंमतीइतकीहि व्हावयाची नाहीं असलीं—म्हणजे बाष्कळ इतिहास, बाष्कळ पदार्थविज्ञान, बाष्कळ ईश्वरज्ञान वगैरे विषयांवरील—पुस्तकें आपण छापून प्रसिद्ध करीत आहों ... आपणांपुढें आज प्रश्न हाच आहे कीं, युरोपियन विद्येसारखी विद्या व वाङ्मय इंग्रजीसारख्या संपन्न व श्रीमान भाषेच्या द्वारें हिंदी लोकांस देण्याचें हातीं असतां, ज्या भाषेंत आमच्या ( इंग्रजी ) ग्रंथासारखे ग्रंथ नाहींत, व परस्पर विरोध आला असतां ज्या भाषेंतील ग्रंथ इंग्रजी ग्रंथांपुढें कुच-कामाचे ठरतात, त्या भाषेंतील ग्रंथ सरकारनें शिकवावे काय ? आमच्या ( इंग्रजी ) सारखें गहन तत्त्वज्ञान व सत्यपूर्ण इतिहास शिकवण्यासारखा असतां, तो टाकून द्यावा काय ? आर्यवैद्यकशास्त्र घ्या; एखादा इंग्रज नाल-बंदहि त्याहून अधिक चांगलें वैद्यक जाणतो ! आर्य ज्योतिष पहा; आमच्या (इंग्रजी ) शाळेंतील परकर नेसणाऱ्या पोरीहि या ज्योतिषशास्त्राचे सिद्धांत ऐकून फिदी फिदी हंसतील ! इतिहासग्रंथ घ्या; त्यांत वीस वीस हात उंचीच्या व तीस तीस हजार वर्षें राज्य करणाऱ्या राजांचीं वर्णनें भरलेलीं ! आणि भूगोलाविषयीं तर बोलावयासच नको ! कारण त्यांतल्या दुधातुपाच्या—पंचा-मृताच्या—समुद्रांतच वाचक गटंगळ्या खावयाला लागावयाचा ! असली ही बाष्कळ विद्या मुलांना पढविण्याला जर आम्हीं सरकारी पैसा खर्च केला तर धिक्कार असो आमच्या ज्ञानाला, सुधारणेला व विद्याप्रियतेला ! " लॉर्ड ऑक-लंड यांच्या १८३९ च्या ठरावानें या जळजळीत शब्दांगारांवर थोडीशी राख पसरण्याचा प्रयत्न केला खरा; पण त्यांची उष्णता कशी कमी होणार ? या उष्णतेनें थोडक्याच काळांत आर्यविद्येचा वृक्ष होरपळून गेला.

पण या बाबतींत लॉर्ड मेकॉले यांसहि फारसा दोष देण्यास आम्ही तयार नाहीं. त्यांनीं आपल्या ' मिनिटां ' त इंग्रजी भाषा व वाङ्मय यांचें जें महत्त्व वर्णिलें आहे तें कोणीहि नाकबूल करणार नाहीं. आणि केवळ संस्कृत भाषेचेंच अध्ययन व तेंहि पूर्वपरंपरेप्रमाणें चालू ठेवावयाचें ? अथवा इंग्रजी भाषारूप नदीच्या द्वारें युरोपियन ज्ञान व संस्कृति यांच्या समुद्रांत हिंदी लोकांचा प्रवेश करून घ्यावयाचा ? असे दोनच पक्ष पुढें आले असतां या दुसऱ्या पक्षास कोणी अनुकूल अभिप्राय देणार नाहीं असें सहसा व्हावयाचें नाहीं. फार काय पण त्या वेळचा अग्रगण्य समाज-सुधारक राजा राममोहन रॉय हा स्वतः चांगला संस्कृत पंडित असतांहि त्यानें इंग्रजी शिक्षणाचीच तरफदारी करून कंपनीसरकारकडे अर्ज धाडला होता, ही गोष्ट सुप्रसिद्धच आहे. राममोहन रॉय यांची संस्कृताची आवड व आर्यविद्येचा अभिमान मेकॉलेहून पुष्कळच अधिक होता यांत शंका नाहीं. परंतु इंग्रजी भाषेच्या द्वारें युरोपिअन विद्या शिकविण्याच्या बाबतींत त्या दोघांचें ऐकमत्य होतें ही गोष्ट ध्यानांत ठेवण्यासारखी आहे. मेकॉलेच्या मनांत आर्यविद्येविषयीं तिरस्कार होता म्हणून इंग्रजी शिकवावें असें त्याचें धोरण होतें; राममोहन रॉय यांच्या मनांत आर्यविद्येच। यथार्थ अभिमान असतांहि, ती विद्या निःसंशय अपूर्ण आहे व तिच्या पूर्णतेस भरतीदाखल घालण्यासारखें इंग्रजी वाङ्मयांत पुष्कळच आहे, हें तो जाणत होता म्हणून इंग्रजी शिक्षणास त्याची अनुकूलता होती. मेकॉलेचें ज्ञान एकांगीं होतें व राममोहन रॉय यांचें ज्ञान उभयांगी होतें. तथापि, दोहोंनीं दिलेला अभिप्राय एकच होता. याचें कारण आमच्या तरी नजरेस असें दिसतें कीं, भौतिक शास्त्र व इतिहास यांच्या ज्ञानाची या दोघांनाहि विशेष किंमत वाटत होती; व हें ज्ञान देणारे ग्रंथ संस्कृत भाषेंत फारसे नाहींत अशी दोघांचीहि खात्री असावी. धर्म, नीति, मानसशास्त्र वगैरेसंबंधानेंच वाद असता तर, मेकॉलेसारख्याचे तिरस्कार-युक्त आक्षेप खोडून काढणें कोणासहि सहज शक्य झालें असतें. आणि राजा राममोहन रॉयासारख्या सुधारक व स्वदेशाभिमानी विद्वानास मेकॉलेच्या पदरांत त्याच्या चुकीचें माप घालतां आलें असतें. पण त्या वेळीं विद्येचा विचार झाला तो भौतिकशास्त्रविषयक ग्रंथांच्या गुणांवगुणांवरच झाला हें निर्विवाद आहे.

# सिमला-कॉन्फरन्सच्या सूचना

इंग्रजी भाषा व पाश्चात्य विद्या यांना संस्कृत विद्येचें सिंहासन मिळण्याचें एक प्रमुख कारण कोणचें होतें याचा विचार मागील लेखांत झालाच आहे. पण इंग्रजी भाषेचें प्रवर्तन होण्यास याहूनहि बलवत्तर असें एक कारण होतें; तें हें कीं, हिंदुस्थानांतील राज्यकारभार चालावयाचा होता व तो चालण्यास इंग्रजी भाषा शिकून तयार झालेले लोक सरकारास हवे होते. या देशांत शिक्षणाचा प्रसार करण्याच्या अनेक सद्धेतूंपैकीं एक हेतु मूळपासून राज्यकारभार चालविण्यास लायक व उपयोगी असे नोकर तयार करण्याचा होता. अर्थात् केवळ संस्कृत पढलेले लोक कारकुनी पेशास कसे उपयोगी पडणार ? अव्वल इंग्रजी भाषा ही ब्राह्मणाच्या मुखास अपवित्र करणारी वस्तु आहे अशी समाजाची कल्पना असतांहि आपली धर्मबुद्धि व इंग्रजी विद्या यांचा मेळ घालण्यास पहिल्या पिढींतले लोक तयार झाले. सरकारास नोकर हवे होते म्हणून व लोकांस नोकऱ्या हव्या होत्या म्हणून इंग्रजी शिक्षणाची सुरुवात झाली. उर्दू भाषा ही इंग्रजी-इतकीच देशबाह्य; "न वदेत् यावनीं भाषां प्राणैः कंठगतैरपि" हें वचन बहुधा मुसलमानी भाषेसंबंधाचेंच आहे. असें असतां राज्यकर्त्यांच्या भाषेचा अंमल अधिकाराच्या स्वाभाविक गुणांमुळें प्रजेवर किती बसतो हें १६।१७ व्या शतकांत निदर्शनास आलें. खुद्द शिवाजीच्या वेळच्या कागदपत्रांत उर्दू लिपी प्रचारानें मोडीच्या जवळ जवळ होती व केवळ खासगी पत्रव्यवहारांतहि पत्रांतील निम्याहून अधिक शब्द उर्दू असत असें दिसतें. श्रीशिवाजीमहाराजांना स्वराज्य स्थापल्यावर या वस्तुस्थितीचा चमत्कारिकपणा भासून 'राज्यव्यवहारकोश' सारखा ग्रंथ करवून परकी शब्दांचा निःपात करण्याचा त्यांनीं उद्योग केला. पण तो जावा तितका सिद्धीस गेला नाहीं; व खुद्द ऐन पेशवाईच्या काळांतील कागदपत्रांच्या सोंगट्यांच्या पटांत उर्दू वगैरे परकी शब्दांनीं सर्व 'कटी' पकडून नाकेबंदी केलेली आढळून येईल. मोंगलांच्या कृपेनें स्वराज्य परत मिळविलेले शाहूमहाराज व पेशव्यांच्या तेजानें लोपलेले त्यांचे वंशज हे नामशेष होऊन, महादजी शिंद्यानें मोंगल सत्तेचा शह काढून उलट दिल्लीवर आपला काटशह चढविला असतां

दरबारी व राजमान्य कागदपत्रांवर मुसलमानी तारीख बरेच दिवस झळकत होती; म्हणजे अर्धवट धार्मिक स्वरूप असलेल्या कालगणनेच्या बाबतींत स्वराज्य स्थापन झाल्यावरही, एक वेळ विशिष्ट परिस्थितीमुळें आपणावर लादल्या गेलेल्या परंपरेचें पेंकाट आम्हांस पुरें मोडतां आलें नाहीं, ही गोष्ट सहसा विसरतां येत नाहीं. अर्थात् पेशवाई लोपल्यावर व हिंदुस्तानांत चहूंकडे ब्रिटिश राजसत्ता स्थापित झाल्यावर राज्यकारभाराची दृष्टि प्रमुख ठरली; राज्यकर्त्यांची भाषाच शिकविण्याचा इंग्रजांनीं हट्ट धरला; व नोकरीच्याच काय पण कांहीं अंशीं ज्ञानाच्याहि दृष्टीनें आम्हीं तो पुरविला. प्रथम कांहीं दिवस नवी विद्या व जुनी विद्या या दोन्हीही समसमान चालू होत्या; किंबहुना लॉर्ड ॲमहर्स्ट यांच्या ठरावानंतर कांहीं दिवसपर्यंत इकडे संस्कृत कॉलेजाला जें महत्त्व होतें तें इंग्रजी शाळेला नव्हतें. पण इंग्रजी शिक्षण मिळविलेली पिढी जसजशी उदयास येऊं लागली तसतशी संस्कृत विद्येची पीछेहाट होऊं लागली. उभय विद्यांच्या मिश्रणानें नव्या पिढींतील विद्वानांस प्राप्त झालेलें तेज मोहक होतेंच. परंतु दिव्याच्या मागें ‘ रिफ्लेक्टर ’ किंवा प्रतिबिंबक लाविला असतां त्याचें तेज जसें दुर्धर होतें त्याप्रमाणें या नव्या पिढीच्या विद्वत्तेच्या तेजास सरकारी नोकरी, मोठा पगार, अधिक राजमान्यता यांचें जोरदार पाठबळ मिळाल्यामुळें तीच विद्वत्ता दुर्धर झाली. या जुन्या व नव्या विद्यांचे प्रवाह कांहीं काळपर्यंत समांतर वहात होतें हें वर सांगितलेंच आहे. पण एक लहान व एक मोठी अशा दोन नद्या कितीहि दूरवर समांतर वहात असल्या तरी जरासें लवण येतांच मोठ्या नदींत लहान नदी मिसळून जाऊन त्यांचा एकच प्रवाह पुढें चालतो व त्या प्रवाहाला या मोठ्या नदीचें नामरूप प्राप्त होतें. अशाच रीतीनें प्रथम कांहीं दिवस दक्षिणा वगैरेंनीं जगविलेली संस्कृत विद्या लवकरच नामशेष झाली, व इंग्रजी विद्येचा प्रवाह मात्र एकटाच जोरानें पुढें वाढत चालला; म्हणजे पूर्वी केवळ संस्कृत विद्येचा उत्कर्ष तर आतां केवळ इंग्रजी विद्येचा उत्कर्ष अशी स्थिति येऊन पोंचली !

पण मागील लेखाच्या प्रारंभीं सांगितल्याप्रमाणें हा मनु हल्लीं पालटून फिरून संस्कृत विद्येचें पुनरुज्जीवन होण्याचा रंग दिसत आहे. संस्कृत विद्येपुरती ही प्रतिक्रिया होय. तथापि, इंग्रजी भाषा व युरोपियन विद्या

यांचें योग्य महत्त्व कोणत्याही प्रकारें कमी न होतां संस्कृत विद्या जी विनाकारण मागासली आहे, तिचें योग्य महत्त्व मात्र तिला फिरून प्राप्त व्हावें, हेंच या नवीन मन्वंतराचें विशेष लक्षण होय; व हें मन्वंतर कसें काय घडून येत आहे हें आपण पाहूं. या मन्वंतराचा इतिहास अर्थातच मनोरंजक आहे; पण त्याचें सिंहावलोकन करण्यापूर्वी आजची स्थिति प्रथम एकदम थोडक्यांत सांगून टाकणें बरें.

वर वर्णन केलेली निराशाजनक स्थिति हल्लीं पालटून आर्यविद्येच्या पुनरुज्जीवनास उत्तेजन मिळण्याचीं चिन्हें दिसत आहेत. मद्रास व लाहोर या युनिव्हर्सिट्यांमध्यें आर्यविद्येची शाखा जोडण्यांत आली असून त्या शाखेचे पदवीधर परीक्षा देऊन निर्माण होतात; व युनिव्हर्सिट्या या प्राय: अजून सरकारी संस्था असल्यामुळें आर्यविद्येस मिळालेलें हें उत्तेजन सरकारच्या खातीं जमा करण्यास कांहीं हरकत नाहीं. पण याहून अधिक आशाजनक अशी प्रमाणेंही या बाबतींत दृष्टीस पडत आहेत. हिंदुस्थानच्या विद्याखात्याचे अधिकारी ना. सर हारकोर्ट बटलर हे आर्यविद्येच्या पुनरुज्जीवनास अनुकूल असून त्यांच्याच उद्योगानें गेल्या जुलै महिन्यांत सिमला येथें आर्यविद्येच्या सरकारी व खासगी पुरस्कर्त्यांचें एक संमेलन भरलें होतें. सदर संमेलनास डॉ. थिबू, मि० व्हेनिस, डॉ० हॉरोविडस, डॉ० रॉस, वगैरे युरोपियन संस्कृतज्ञ लोक; डॉ० रामकृष्ण गोपाळ भांडारकर, प्रो. श्रीधरपंत भांडारकर, रा. ब. शरश्चंद्रदास, डॉ० गंगानाथ झा; महामहोपाध्याय हरप्रसादशास्त्री, प्रो० रंगाचार्य वगैरे हिंदु संस्कृतज्ञ लोक; आणि प्रो० इस्पहानि, मौलवी कमालुद्दिन अहमद, शमस–उल्–उलेमा शिबली नोमानी वगैरे पर्शियन व आरबी पंडित गृहस्थ हजर होते. संमेलनांत मुख्य विषय पौर्वात्य–म्हणजे संस्कृत, फार्शी व आरबी या–भाषांच्या द्वारें मिळणाऱ्या विद्येस उत्तेजन कोणत्या प्रकारें द्यावें हा होता. या विषयाचा अनेकांगांनीं विचार होऊन जे ठराव मंजूर झाले त्यांचा गोषवारा खालीं दिल्याप्रमाणें आहे. जुन्या तऱ्हेनें शिक्षण मिळविलेले पंडित प्रवीण असतात व त्यांचा उपयोग फार होतो. त्यांचें शिक्षण एकांगीं असतें खरें; पण तें घालवितांना त्यांच्या जुन्या पद्धतींतले गुण नष्ट होऊं देतां कामा नये. पंडित व मौलवी लोकांस त्यांचें अध्ययन

पुरे झाल्यावर जरूर तितकी इंग्रजी भाषा शिकवून युरोपियन विद्येच्या संस्कृतीचाही फायदा घेतां येईल अशी कांहीं सोय करावी; व संशोधनाची पद्धति आणि चिकित्सक बुद्धि यांचें ज्ञान आणि रीति हीं त्यांस प्राप्त करून देऊन त्यांच्या ज्ञानास अनेकांगित्व मिळवून द्यावें. इंग्रजी शिकणें हें केवळ भाषेच्या दृष्टीनें असून ऐच्छिक आहे असें समजावें, व केव्हांहि मौलवी–पंडितांचें जुन्या पद्धतीचें अध्ययन बरेंचसें झाल्याशिवाय त्यांस इंग्रजी शिकवूं नये. नव्या पद्धतीचें ज्ञान इंग्रजी भाषेशिवाय देतां येणारच नाहीं असें नसल्यामुळें, देशी भाषेंत व्याख्यानें देऊनही शक्य तर तें ज्ञान देण्याचा प्रयत्न करावा.

या सर्व गोष्टी इष्ट आहेत. पण त्या प्रत्यक्ष अमलांत कशा आणाव्या यासंबंधानें खालील सूचना पसंत करण्यांत आल्या. पौर्वात्य विद्येस उत्तेजन देण्याचे कामास तळापासून म्हणजे खासगी शाळा–पाठशाळा यांपासून सुरवात करावी. हल्लीं कलकत्ता, बनारस येथें संस्कृत कॉलेजें आहेत, व कलकत्त्यास मुसलमानी ‘ मद्रेसा ’ आहे. तशा प्रकारच्या सरकारी व खासगी जुन्या संस्था कायम ठेवून नवीन घालाव्या. डॉ. भांडारकर यांचें तर असें म्हणणें आहे कीं, इतर इलाख्यांच्या-विशेषतः बंगाल्याच्या मानानें-मुंबई इलाख्यांत सरकार जुन्या विद्येस द्यावें तितकें उत्तेजन व पैशाची मदत देत नाहीं; सबब जुन्या संस्कृत कॉलेजासारखी संस्था पुण्यास स्थापावी व इतर पाठशाळा वगैरेंना अधिक मदत द्यावी. जुन्या विद्येस उत्तेजन देण्याचें काम नीट रीतसर होतें किंवा नाहीं हें पाहण्यास इन्स्पेक्टर नेमण्यांत यावे हल्लींच्या इंग्रजी कॉलेजांतून ठेवलेल्या पंडित–मौलवींच्या जागांचें पगार वाढवावे. खासगी रीतीनें शिकणाऱ्या विद्यार्थ्यांना शिष्यवृत्ति वगैरे देऊन त्यांच्या जेवणाखाण्याच्या विद्यमान सोईसवलतीस मदत करावी. जुन्या विद्येंत प्रावीण्य दाखविणाऱ्या लोकांस सर्टिफिकिटें द्यावीं. महामहोपाध्याय व शमस–उल–उलेमा या पदव्यांबरोबरच त्यांना कांहीं तनखा देण्याची पद्धत सुरू करावी. महामहोपाध्याय वगैरे मोठ्या पदव्यांपेक्षां कांहीं खालच्या दर्जाच्या पदव्याहि निर्माण कराव्या. जुन्या ग्रंथांचें संग्रह करण्याचें काम पूर्वीपासून सुरू आहेच तें चालू ठेवून, त्यांच्या रीतसर याद्या वगैरे तयार कराव्या.

पौर्वात्य विद्येला उत्तेजन द्यावयाचें तर हल्लीं चालू असलेल्या प्रयत्नांवर न थांबतां निरनिराळ्या युनिव्हर्सिट्यांच्या द्वारें कांहीं विशेष योजना कराव्या, किंवा सर्व हिंदुस्थानास मिळून एक नवीनच मध्यवर्ति संस्था कलकत्ता अगर मुंबई येथें स्थापावी, हाहि प्रश्न कॉन्फरन्सनें विचारांत घेतला. या बाबतींत बहुतेक सर्व सभासदांचें असें मत पडलें कीं, देशी विद्येला उत्तेजन देण्याच्या कामीं युनिव्हर्सिट्या या म्हणण्यासारखें कांहीं-एक करीत नाहींत; म्हणून केवळ याच उद्योगास वाहिलेली अशी एखादी मध्यवर्ती संस्था निर्माण करणें जरूर आहे. युनिव्हर्सिट्यांनीं कितीहि केलें तरी तें फारच थोडें असणार; कारण इतर सर्व विषय—विशेषतः आधुनिक युरोपियन विद्या—यासंबंधानें मुख्य जबाबदारी त्यांचेवर पडते. शिवाय युनिव्हर्सिटींत प्रवेश होण्यास इंग्रजी भाषा येणें अद्यापि अवश्य असल्यामुळें पंडित व मौलवी यांना युनिव्हर्सिट्यांनीं या दिशेनें केलेल्या वाढत्या सोईचा फायदा घेतां येणें कठिण आहे. तरी पण मध्यवर्ती संस्था निघाली म्हणून प्रांतानिहाय याच दिशेनें ज्या ज्या काय गोष्टी करितां येतील त्या नकोत असें मात्र नाहीं. दरएक प्रांतांत वेगळें वेगळें असें जें करितां येणार नाहीं तेंच ही मध्यवर्ती संस्था करील. पण जुन्या शाळा व पाठशाळा यांस मदत देणें, नव्या काढविणें, शिष्यवृत्ति, सर्टिफिकीटें वगैरे देणें या गोष्टी प्रांतानिहाय निरनिराळ्या करितां येतील व कराव्या. कोणत्याहि प्रांतांतील शाळाखातें व युनिव्हर्सिटी यांच्याही आंवाक्याबाहेर असणाऱ्या गोष्टी मध्यवर्ती संस्थेनें करावयाच्या आहेत; किंबहुना पौर्वात्य विद्येच्या बाबतींत वरिष्ठ प्रतीची जी जी सल्लामसलत द्यावयाची ती शिक्षणाचीं खातीं व युनिव्हर्सिट्या यांना याच संस्थेकडून मिळतील इतक्या तोलाची ती असली पाहिजे. सदर संस्था कोठें स्थापन व्हावी—म्हणजे ती कलकत्त्यास असावी अगर मुंबईस असावी—याविषयीं मतभेद असून अद्यापि निर्णय झालेला नाहीं. तथापि ती कोठेंही निघाली तरी, निरनिराळ्या युनिव्हर्सिट्या, एशिआटिक सोसायटीसारख्या ग्रंथसंग्राहक संस्था, पुराणवस्तु संग्रहालयें, जुनीं नाणीं, ताम्रपट, शिलालेख, मूर्ती, कागदपत्र व वास्तु-कौशल्य इत्यादिकांचा शोध लावून जुनीं स्मरणचिन्हें कायम ठेवून त्यांपासून नवीन प्रमेयें काढण्यास मदत करणारें म्हणजे आर्किऑलजीचें सरकारी

खातें या सर्वांनीं मिळून या भावी मध्यवर्ती संस्थेशीं हातांत हात घालून काम करण्यास हरकत नाहीं, असें सर्व सभासदांचें मत पडलें. ही संस्था मुख्यत: एतद्देशीय लोकांच्याच उपयोगाकरितां म्हणून काढावी, पण युरोपांतील लोकांस या संस्थेचा फायदा घेण्याची इच्छा असल्यास त्यांनीं आपला खर्च करून शिक्षण मिळवावें असें कित्येक सभासदांचें मत होतें; व तें सर्वांस पसंत होऊन असें ठरलें कीं, सदर संस्थेंत प्रोफेसरच म्हणून कोणी युरोपियन आणल्यास गोष्ट निराळी, एरवीं या संस्थेच्या नांवानें खर्च पडणाऱ्या हिंदुस्थानच्या तिजोरींतील पैशानें केवळ युरोपियन लोकांची म्हणून कांहीं स्वतंत्र सोय करूं नये.

सदर सभेंतील पोटकमिटीनें ही संस्था कशा स्वरूपाची असावी याचा विचार करून रिपोर्ट केला आहे. त्यांत संस्थेच्या नियमांचा एक मसुदा दिला आहे. त्यावरून पाहतां संस्थेचें स्वरूप खालीं दिल्याप्रमाणें असावें असें त्यांचें मत दिसतें. संस्थेचा मुख्य उद्देश जुन्या हिंदी विद्येच्या अनेक शाखांविषयीं शोध करवावे व शोध करण्यास शिकवावे असा आहे. आर्यन म्हणजे संस्कृत, पाली, प्राकृत, इराणी, अरेबिक व इतर सेमेटिक, द्रविडी, तिबेटी, ब्रह्मदेशी वगैरे भाषा व त्यांतील तत्त्वज्ञान आणि वाङ्मय यांचा परामर्श सदर संस्थेनें घ्यावा. वैदिक काल व वैदिकोत्तर काल यांतील हिंदुस्थानचा इतिहास, मुसलमानी रियासतीचा इतिहास, इतर देशांतील मुसलमानी धर्माचा इतिहास, बौद्ध धर्माचा इतिहास हाहि एक विषय ठेवावा. याशिवाय पुराणवस्तुसंशोधनाचे जे जे प्रचलित प्रकार आहेत, त्यांचा अभ्यास आणि शरीररचना व भाषा यांजवरून मानववंशासंबंधीं निघणारें अनुमानाचें शास्त्र हे विषयहि शिकविले जावे. सदर संस्थेंत शिक्षण इंग्रजी भाषेच्या द्वारें द्यावयाचें ठरलें असून तितक्यापुरती इंग्रजी भाषा ज्यांस येते अशांसच सदर संस्थेंत घेतलें जाईल. पण ज्यांना घेतलें जाईल त्यांना शिक्षणाबद्दल फी मुळींच पडणार नाहीं. सदर संस्थेंत आर्यन भाषा, बौद्ध धर्म व सेमेटिक भाषा वगैरे विषय शिकविण्याकरितां सुमारें सहा प्रोफेसर व आठ दहा ‘ रीडर ’ च्या जागा ठेवाव्या आणि संशोधनाच्या कामीं उत्तेजन देण्याकरितां कांहीं ‘ फेलोशिप्स् ’ व ‘ स्कॉलरशिप्स् ’ निर्माण कराव्या. विद्यार्थ्यांस साधारणत: प्रपंचाविषयीं निष्काळजी राहून अभ्यास करितां येईल इतकी त्यांची रक्कम असावी. सदर

संस्थेंतील नियमित शिक्षणक्रमाशिवाय इंग्लिशखेरीज इतर भाषांतूनही वेळो वेळीं व्याख्यानें व्हावीं. संस्थेंतील अंतर्व्यवस्था, प्रोफेसरांचें कौन्सिल व त्यांनीं निवडलेला अध्यक्ष, यांनीं चालवावी, अशी योजना सिमला–कॉन्फरन्सनें सुचविली आहे. हिंदुस्थानांत येणाऱ्या युरोपियन अधिकाऱ्यांना जुन्या व नव्या देशी भाषा याव्या या हेतूनें परीक्षा ठेवून विशेष प्राविण्य संपादणाऱ्या लोकांस बक्षिसेंहि हल्लीं दिलीं जातात. या परीक्षांस काय काय अभ्यास असावे याचाही विचार कॉन्फरन्सनें केल्याचें दिसतें. याशिवाय हल्लीं असलेल्या ' पुराणवस्तुसंशोधक ' खात्याचें काम कसें चालतें व कसें चालावें, पदार्थ-संग्रहालयाचा उपयोग कसा वाढवावा व तें अधिक लोकप्रिय कसें करावें, हिंदुस्थानांत जुनीं इतिहासप्रसिद्ध स्थानें आहेत, तेथें जमिनींत कालांतरानें गाडून गेलेलीं स्मृतिचिन्हें वर येण्यास खोदकाम कोठेंकोठें व कसकसें करावें, वगैरे गोष्टींची चर्चाहि कॉन्फरन्सनें केली.

वरील सर्व गोष्टींवरून हल्लीं वारा कोणत्या दिशेनें वाहत आहे, हें सहजच लक्षांत येईल. नवीन होणाऱ्या संस्थेचें वर वर्णन केलेलें स्वरूपच अखेर कायम होईल किंवा नाहीं हें आज निश्चयानें सांगतां येत नाहीं. तसेंच या नवीन योजनेवर हिंदुस्थान सरकार सालीना किती रुपये खर्च करणार याचाहि अद्यापि अंदाज लागत नाहीं. सिमला–कॉन्फरन्सच्या रिपोर्टावर हिंदुस्थानसरकारचा संपूर्ण ठराव अद्यापि प्रसिद्ध व्हावयाचा असल्यानें, संस्कृत विद्येच्या पुनरुज्जीवनाच्या संकल्पाचें फळ प्रत्यक्ष हातीं किती पडेल हें पहावयाचें आहे. फ्रान्सच्या ताब्यांतील इंडो–चायना नामक एशिॲटिक प्रांतांत फ्रेंच सरकारनें ' पौर्वात्य–विद्यासंशोधक–संस्था ' १८९८ सालीं स्थापिली; त्या संस्थेच्या उदाहरणावरून सदर संस्थेची कल्पना सुचलेली दिसते. संस्थेचें नांव ' ईकोल फ्रॅन्सेस् डी एक्स्ट्रीम ओरिएन्ट ' असें आहे. ही संस्था इंडो–चायनाचे गव्हर्नर एम्. डूमर यानें प्रथम आपल्या जबाबदारीवर काढली; व १९०१ सालापासून फ्रेंच सरकारानें तिला आपला आश्रय देऊन ती सनाथ केली. फ्रेंच इंडोचायना हा अडीचशें लक्ष मैलांचा व दीड कोटी लोकसंख्येचा लहानसा प्रांत असतां तेथें बारा वर्षांपूर्वींच असली संस्था निघाली; व तिच्या नमुन्याबरहुकूम संस्था हिंदुस्थानांत काढण्याची बुद्धि हिंदुस्थानसरकारास हल्लीं झाली आहे. यावरून





इंग्रजांचें लक्ष आर्यविद्येकडे वाजवीहून कमी आहे, किंवा फ्रेंच लोकांचें लक्ष या बाबतींत अपेक्षेहूनहि अधिक आहे, हें सांगतां येणें कठिण आहे. पण आज मित्तीस हॅनोई येथील संस्थेचा कित्ता इंग्रजसरकार इकडे गिरवूं पहात आहे, ही गोष्ट मात्र अत्यंत अभिनंदनीय होय.

# जुने व नवे पंडित

इंग्रजी भाषा व पाश्चात्य विद्या यांचें महत्त्व खरोखर कमी न होतां संस्कृत विद्येचें योग्य महत्त्व ओळखलें जाण्याचा काळ हल्लीं आपोआप कसा आला आहे हें मागील विवेचनावरून दिसून आलेंच असेल. परंतु या विद्येचें अधिष्ठान जे जुने पंडित त्यांच्याविषयीं नव्या विद्वानांच्या मनांतहि आदरबुद्धि किती वसत आहे, हें खुद्द सिमला-कॉन्फरन्सचा रिपोर्ट वाचल्याशिवाय कोणासहि कळणार नाहीं. त्या रिपोर्टांत सामील केलेलीं पाश्चात्य विद्वानांचीं 'मिनिटें' वाचणारांस, जुन्या संस्कृत पंडितांविषयीं त्यांना सप्रेम आदर वाटतो आणि या पंडितगिरीची परंपरा नष्ट झाल्यास फार मोठी हानी होईल अशी त्यांना भीति वाटते, याविषयीं संशय राहात नाहीं. खुद्द आपल्या समाजांत पंडितांचें जुनें ऐश्वर्य अस्तंगत झाल्यासारखें दिसत असतां, पाश्चात्य पंडितांच्या मनांत त्यांच्याविषयीं आदरबुद्धि कशी रहावी हें सकृद्दर्शनीं आश्चर्यकारक वाटण्यासारखें आहे. परंतु हें कोडें उलगडणें फारसें कठीण नाहीं. आधीं खुद्द आमच्या समाजाच्या मनांत जुन्या पंडितांविषयीं आदरबुद्धि सर्वस्वीच नाहींशी झाली आहे असें नाहीं. पंडितवर्गाचें जुनें ऐश्वर्य गेलें यामुळें आमची आदरबुद्धिहि सर्वस्वी लोपली असा भास होतो, पण तो खरा नाहीं. आमच्या समाजांतील विद्वानांना नव्या पाश्चात्य पंडितगिरीचें वळण जरी लागलें आहे तरी, त्यांनाहि जुन्या पंडितांची किंमत चांगली कळते, हेंही सिमला कॉन्फरन्सच्या रिपोर्टावरून दिसून येतें; व पाश्चात्य पंडितांसंबंधानें तर विशेष गोष्ट अशी आहे कीं, त्यांना संस्कृत विद्या ही सर्वच नवी, अर्थात् तिजमध्यें असलेलें ज्ञानभांडार व तें जतन करून ठेवणारा पंडितवर्ग या दोन्ही गोष्टी त्यांच्या अपेक्षेबाहेरच्या असल्यामुळें त्यांना आश्चर्य वाटणें व आश्च-

यांनें आदर द्विगुणित होणें हें साहजिक आहे. पण या आश्चर्यापेक्षांहि वेगळें असें दुसरें एक कारण आहे, तें हें कीं, ज्या पद्धतीनें संस्कृत पंडित तयार होतात तिजमध्यें विद्येच्या खऱ्या भक्तास पटण्यासारखें असेच विशेष कांहीं गुण आहेत. ही पद्धत म्हणजे एकांगी शिक्षणाची पद्धत होय. सबब एकांगी शिक्षणपद्धति व अनेकांगी शिक्षणपद्धति यांच्या सापेक्ष गुणांसंबंधानें प्रथम थोडेसें विवेचन केल्यास तें अस्थानीं होणार नाहीं असें वाटतें.

निवळ एकांगी शिक्षणापेक्षां खरें अनेकांगी शिक्षण अधिक चांगलें हें कोणीही कबूल करील. पण एकांगी शिक्षणाचेही कांहीं फायदे असतात; व गेल्या शतकांतील शिक्षणपद्धतीच्या तुलनेनें त्यांतील कांहीं कांहीं फायदे पाश्चात्यांच्या नजरेस आले आहेत. एकाग्रता ही शरसंधानाप्रमाणें विद्याभ्यासासहि उपयोगी आहे. द्रोणाचार्य हे बालकौरव वीरांस धनुर्विद्या शिकवीत असतां, त्यांनीं प्रत्येक विद्यार्थ्याला धनुष्यास बाण जोडल्यावर व नेम धरल्यावर "तुला काय दिसतें तें सांग" म्हणून विचारलें; आणि एकट्या अर्जुनास मात्र बाणाचें टोंक व वेध करण्याची वस्तु यांशिवाय दुसरें तिसरें कांहीं दिसत नाहीं असें त्याजकडून उत्तर आल्यावर 'हाच खरा धनुर्धर होईल' असें त्यांनीं मनाशीं ठरविलें. या गोष्टीचें तात्पर्य उघडच आहे. मानवी मनाच्या समीकरणांत, एका गोष्टीला जें लक्ष दिलें तें दुसऱ्या गोष्टीवरून कमी झालें हें व्हावयाचेंच. मानवी शक्तीस मर्यादा आहे; व 'पूर्णस्य पूर्णमादाय पूर्णमेवावशिष्यते' असला अमर्याद वस्तूंचा गणितशास्त्रांतील सिद्धांत त्यास लागू पडत नाहीं. जुन्या पद्धतीच्या शिक्षणांत ही एकाग्रता असे आणि यामुळें त्या पद्धतीनें शिकणारा विद्यार्थी आपल्या विषयांत खरा निष्णात होत असे. जुन्या काळचा उत्तम वैय्याकरण किंवा नैय्यायिक घेतला तर, व्याकरण किंवा न्याय या विषयांत त्याला अगोचर असा कोणताही ग्रंथ–उपग्रंथ किंवा वादाचा मुद्दा सहसा रहात नसे. आतां या एकांगी अध्ययनामुळें त्या विषयाबाहेरचा कांहीं मुद्दा निघाल्यास, जुन्या पंडितास पाण्यांतून बाहेर काढलेल्या माशाप्रमाणें चुकल्या चुकल्यासारखें होणें स्वाभाविक असे. पण तो जोंपर्यंत पाण्यांत राही तोंपर्यंत त्याची शक्ति इतकी अचाट असे कीं, त्याला विद्यासमुद्राच्या थेट तळापर्यंत बुडी मारून तेथील गूढ मुक्ताफळें वर आणतां येत असत. जुन्या पद्धतीचा दुसरा एक

विशेष गुण म्हटला म्हणजे स्मृतिसामर्थ्य. हातांत पुस्तक धरून अध्यापन करणें हा पूर्वी एक प्रकारें कमीपणा मानला जाई; व अध्ययन करण्याच्या वेळीं विद्यार्थ्यांस जरी ग्रंथांचा आश्रय करावा लागे, तरी अध्ययन संपून तो स्वतः अध्यापकाच्या पदवीस येण्याच्या सुमारास त्याचे सर्व अध्ययनग्रंथ प्रायः तोंडपाठ होऊन जात; आणि केवळ या अर्थानेंच पण तो पुस्तकास सोडचिठ्ठी देत असे. शिष्यांकडून अध्ययन करवितांना गुरुजीच्या हातास चाळा हवाच असला तरी तो ग्रंथांचीं पानें चाळण्याचा नसे; तर पत्रावळी लावणें, तपकीर ओढणें, सुपारी कातरणें असला. डेक्कन कॉलेजांतील जुने प्रसिद्ध पंडित अनंतशास्त्री पेंढारकर यांना विद्यार्थ्यांस पाठ सांगतांना, लहान मुलाच्या हातीं खेळण्याकरितां देण्याच्या चाबकाच्या दोऱ्या वळीत बसण्याचा चाळा असे असें सांगतात. असो. अशा रीतीनें जुने पंडित हे खरोखरच चालते बोलते ग्रंथ असत. त्यांचे विषयनिष्णातत्व व पाठांतर हीं पाहून अलीकडच्या कालांतील मनुष्य थक्कच होऊन जावयाचा! पण या एकांगी शिक्षणामुळें जुन्या पंडितांच्या बुद्धीस एककल्लीपणा येत असे. व्यवहारचातुर्य अंगीं नसल्यामुळें त्यांची क्वचित् थट्टाहि होई. समाजांतील अष्टपैलू व्यवहारांत शहाणपणाच्या चलनी नाण्याची मोड पुष्कळशी लागते; तेथें चवल्या–पावल्याच काय पण पैसा, पै व कवड्याहि लागावयाच्या. जसा पदार्थ भेटेल तशा योग्यतेचें नाणें दुकानदाराच्या अंगावर टाकावला लागतें. जुन्या एकदेशीय पंडितांच्या पदरीं शहाणपण पुष्कळ असे खरें, पण तें सगळें मोहोरापुतळ्या किंवा बंदे रुपये यांच्या रूपानें; त्याच्याजवळ परचुरण नाहीं; आणि दुकानदारास तर त्यांची मोहोर घेऊन खपायची नाहीं; व पचायची नाहीं. यामुळें पदरीं द्रव्य व व्यवहाराच्या बाजारांत पदार्थ मांडलेले असतां भाजीहि घेतल्याशिवाय त्यांना हात हलवीत परत यावें लागणार! बरें भाजी मिळालीच तर अंगापासून केव्हांहि दूर न होणाऱ्या जरीकांठी शालजोडीच्या पदरांत बांधून शास्त्रीबुवा ती घरीं आणणार!

अनेकांगी अशी जी आधुनिक शिक्षणपद्धति तिचेही नफे–तोटे असेच आहेत. नव्या युगांत ग्रंथसंग्रह विपुल. कोणताहि विषय घेतला तरी त्याच्यावर प्रत्यंतराच्या तोफखान्याचा सडकून मारा करितां येईल, इतकी चोहोंकडे ऐसपैस मोकळी जागा, व उंचवटयाचीं ठिकाणें. तसेंच त्या

त्या विषयाच्या अभिमान्यांनीं वेशीचीं कवाडें लावून घेतलीं तरी आंत प्रवेश करण्यास शेंकडों गुप्त मार्ग. यामुळें हल्लींच्या काळांत कोणताहि विषय कोणालाहि सुलभ. गुरुमुखाच्या गंगोत्रीचा प्रवास जुन्या काळा-इतका हल्लीं दुःखद नाहीं. किंबहुना कोणालाहि स्वावलंबनानें व गुरुमुखा-शिवाय एखादी विद्या सांगोपांग शिकणें कठीण नाहीं. उद्योग मात्र हवा; साधनांची कमतरता नसते. पूर्वकाळीं नैय्यायिक, वैय्याकरण, मीमांसक अथवा द्वैतवादी, अद्वैतवादी अशीं विशेष गुणदर्शक—पण त्याच कारणामुळें अल्पमर्यादासूचक—विशेषणें पंडितांस लागत; पण हल्लीं अशा विशे-षणांचें कारण उरलें नाहीं. कां कीं, साधारणतः उद्योगशील असा विद्यार्थी घेतला तर त्याला अमुक एक विषयांतलें थोडें बहुत तरी माहीत नाहीं असें सहसा व्हावयाचें नाहीं. गुलाबदाणीच्या कारंजांतून निघाल्या-प्रमाणें, आधुनिक विद्वानांच्या मुखांतून प्रसंगोपात्त विद्येच्या सहस्र धारा एकाच वेळेस स्रवत असून, शिवाय प्रत्येक धारेस निरनिराळ्या शास्त्राचा निरनिराळाच सुगंध येत आहे, हा अजब चमत्कार पाहून जुन्या काळचा पंडित आज आश्चर्यानें थक्कच होऊन जावयाचा ! आणि विद्येचें हें असलें सुवर्णयुग अवतरलें असतांहि जुन्या विद्यापीठांचें काम अजून चालू आहे व आणखी नवीं विद्यापीठें काढण्याचा हव्यास सुरूच आहे याचें त्यास गूढ वाटेल. दुष्यंतराजा मारीच ऋषीच्या आश्रमांत आला तेव्हां चहूंकडे कल्पतरूच कल्पतरू उगवलेले असतांहि हे ऋषि अजून तपश्चर्या कां करीत बसले आहेत याचें त्याला क्षणभर आश्चर्य वाटलें ! "यत्कांक्षंति तपोभिरन्यमुनयः तस्मिंस्तपस्यंत्यमी !" त्याच-प्रमाणें सर्व विद्या सकृद्दर्शनीं हातीं आल्या असतांहि आधुनिक विद्वान् लोक शिक्षणपद्धति सदोषच आहे म्हणून दुःखीकष्टी होत आहेत, याचें जुन्या विद्वानांस कोडेंच पडेल. पण या अनेकांगी शिक्षणाचा मोहकपणा कांहीं अंशीं केवळ दिखाऊ आहे हें त्या बिचाऱ्यांस काय माहीत ? आधुनिक विद्वानाच्या ज्ञानाची लांबीरुंदी फार विस्तृत; पण त्याची खोली फार थोडी असते. वादाचा विषय बदलला असतां जुन्या पंडिताप्रमाणें त्याला पाण्याबाहेर काढून टाकलेल्या मत्स्यासारखें चुकल्या–चुकल्यासारखें होऊन तो तडफडणार नाहीं, कारण तो जलचर व स्थलचर म्हणजे उभय-

चर आहे खरा. बकाप्रमाणें तो जमीन असेल तेथपर्यंत चालेल व पाणी भेटतांच पोहूं लागेल. पण त्याची गति खोल पाण्यांत मात्र होणार नाहीं. यामुळें विद्यासमुद्राच्या तळाशीं बुडी मारून मोतीं वर आणणें हें त्याला दुष्कर होय. फार तर त्यानें सरस्वतीदेवीच्या क्रीडासरोवरांतील कमळांबरोबर उथळ पाण्यांत खेळावें, कोणताहि विषय तळहातावरील आवळ्याप्रमाणें त्याला चोहोंकडून दिसेल; पण आवळ्याच्या पोटांतल्या बीची कल्पना मात्र त्याला होणार नाहीं !

नव्या शिक्षणपद्धतींत पाठांतरास महत्त्व नसतें. यामुळें विद्यार्थ्यांची स्मरणशक्ति कमकुवत राहते. डोक्यांत ज्ञान असतांहि डोळ्यांपुढें पुस्तक असेल तेव्हांच त्याची जीभ किंवा हात चालावयाचा. जुन्या पंडिताच्या स्मरणशक्तीचा ' अक्षय भाता ' नेहमीं भरलेला असे. यामुळें झोंपेंतून जागें केलें तरी तो वादास सिद्ध व्हावयाचा. नव्या पंडिताचा भाता वरचे-वर दुसऱ्यानें भरून द्यावा लागतो. पुस्तकें हातीं येईपर्यंत त्याला धर्म-युद्धाच्या नियमांचा आश्रय करून मुदत मागून घ्यावी लागते; व सुदै-वानें आधुनिक काळचे वाद लेखद्वारा होत असल्यामुळें ती मुदत त्यास मिळतेहि ! जुन्या काळच्या युद्धाप्रमाणेंच जुन्या काळचे वाद. म्हणजे प्रतिपक्षाची गांठ समक्ष पडून तरवारीनें युद्ध व्हावयाचें; तरवार फिर-विण्यास लागेल इतकाच स्थलावकाश, व तरवार उगारून मारण्यास लागेल इतकाच कालावकाश. जुन्या सभेंतील वाद तोंडानें व्हावयाचा; तेथें ग्रंथ उघडून दाखविण्याची व पाहाण्याची अपेक्षा नसे. प्रतिपक्षास व न्यायाधिशांस प्रायः ग्रंथ पाठच असावयाचे. कोट्या व प्रति-कोट्या, उत्तरें-प्रत्युत्तरें सर्व जिभेवर असावयाचीं; व केवळ बुद्धीच्या तरळपणावर व तत्परतेवर विजय मिळावयाचा. प्रतिपक्षी-क्षणभर कां होईना-निरुत्तर झाला म्हणजे वाद जिंकला गेला असें ठरे. शंकराचार्य व मंडनमिश्र यांचा वाद चाळीस दिवस चालला होता; पण वादाचा निकाल लागला तो मंडनमिश्राचे गळ्यांतील पुष्पहार कोमजल्यावरून सिद्ध झाला ! जुन्या पंडित लोकांच्या वादाची गोष्टहि एकंदरीनें अशीच होती. एखाद्या कोटीवर त्यांचा निर्णय अवलंबून असावयाचा व निरुत्तर केलेल्या किंवा गोंधळलेल्या

प्रतिपक्षाच्या म्लान झालेल्या मुखश्रीवरून तो सिद्ध व्हावयाचा! आधुनिक विद्वानांच्या वादाची गोष्ट बरीच निराळी आहे. ज्या प्रतिपक्षांनीं एकमेकांचीं तोंडें कधींहि पाहिलीं नाहींत अशांचे वाद निरनिराळ्या खंडांतूनहि चालू असतात. यास्तव क्षणभर निरुत्तर झाल्यामुळें मुखश्री म्लान होऊन फड जिंकला अगर हरला जाण्याचा संभव नाहीं. वादांतील युक्तिवाद व फारच तर कांहीं अंशीं भाषेची ओजस्विता यावरूनच जग निकाल लावतें. या आधुनिक वादांना कालाचाहि निर्बंध नसतो. एका देशांत पूर्वपक्षकार व दुसऱ्या देशांत सिद्धांती हें जसें चालतें, तसेंच यंदाच्या पावसाळ्यांत पूर्वपक्ष होऊन भिजत पडलेल्या वादास पुढल्या वर्षीच्या उन्हाळ्यांतहि पालवी फुटण्यास हरकत नाहीं! वादाचीं साधनेंहि तशींच निराळीं. आधुनिक युद्धाच्या सरंजामाप्रमाणें आधुनिक वादाचा सरंजामहि निराळा. आधुनिक पंडितांना मोठमोठ्या ग्रंथसंग्रहालयाच्या पहाडी 'बातेऱ्या' बांधतां येतात व त्यांच्या सहाय्यानें त्यांचा मारा चालावयाचा. शत्रुपक्षाच्या किल्ल्यांतील मर्में सांगण्यास सूचिपत्ररूपी गुप्त हेर शेंकडों तयार असतातच! प्रमाणांतर रूपी स्नेही, सल्लागार व योद्धे यांची कुमक दोन्ही पक्षांस मुबलक; व अखेर जय व्हावयाचा तो शक्याशक्यतेच्या सूक्ष्म विचारावर अवलंबून असल्यामुळें कालांतरानें विवक्षित मतांची परंपरा जेव्हां सर्रास चालू होईल तेव्हांच वादाचा अखेर निर्णय झाल्याची खबर यावयाची. सांगण्याचें तात्पर्य इतकेंच कीं, जुन्या व नव्या पंडितांचें उद्दिष्ट, साधनें व परिस्थिति हीं बहुतेक वेगवेगळीं आहेत. जुन्या पंडितांच्या शिक्षणाचें एकांगित्व व नव्या पंडितांच्या शिक्षणाचें अनेकांगित्व हें सर्वस्वी त्यांच्या निरनिराळ्या परिस्थितीचेच परिणाम होत.

वर दिलेलें वर्णन हें एकांगी व अनेकांगी शिक्षणाच्या अतिरेकाचेंच वर्णन अर्थात् होय. कारण जुन्या काळींहि एकांगी शिक्षणाचाच प्रकार मुख्यत्वें करून असतां अनेकांगी शिक्षण मिळविलेले पंडित मुळींच नसत असें मात्र नाहीं. बुद्धिवान् पुरुषाला कोणत्याच काळांत अध्ययनाचें विषय मुद्दाम मर्यादित करून घेण्याचें कारण असत नाहीं. बेकनसंबंधानें त्याचे अभिमानी असें म्हणतात कीं, 'तत्कालीन ज्ञान–विज्ञानाचे सर्व विषयरूपी प्रांत त्यानें खालसा करून आपल्या मनाच्या राज्यास जोडले होते.' ( Bacon had taken all knowledge for his Province. )

आपल्या इकडेहि अध्ययनाचा कोणताहि विषय म्हणून न सोडणाऱ्या अनेकांगी पंडितांचीं उदाहरणें नाहींत असें नाहीं. सायणाचार्य, माधवाचार्य, क्षेमेंद्र वगैरे पंडितांचीं उदाहरणें असख्या प्रकारचीं होत. तसेंच जे जे प्रसिद्ध टीका-ग्रंथकार म्हणून होऊन गेले त्यांच्या टीकांकडे पाहिलें तर प्राय: असें दिसून येतें कीं, जेथें जेथें म्हणून दुसऱ्या शास्त्राचा मुद्दा आला तेथें तेथें त्यांनीं त्या त्या शास्त्रांत निष्णात असणाऱ्या पंडितांप्रमाणें विवेचन केलेलें आहे. म्हणजे एकांगी शिक्षणाच्या कालांतही अनेकांगी शिक्षणाची किंमत लोकांस कळत नव्हती असें नाहीं. त्याच्याच उलट हल्लींची स्थिति आहे. कारण हल्लीं अनेकांगी शिक्षण हा नियम व एकांगी शिक्षण हा अपवाद होऊन बसला आहे. व यामुळें एकांगी शिक्षणापासून होणारे तोटे-म्हणजे विशेषतः ज्ञानाचा उथळपणा-नजरेस आल्यामुळें एकांगी शिक्षण हवें असें लोकांस वाटूं लागलें आहे.

सिमला-कॉन्फरन्सच्या रिपोर्टांत मोठमोठ्या जाड्या आधुनिक विद्वानांनीं जुन्या पंडितांची स्तुति करून तो वर्ग लोपत चालला असे दु:खोद्गार काढले आहेत त्याचें कारण हेंच होय. कोणत्याहि एका पद्धतीची अतिशयोक्ति झाली म्हणजे तिजविरुद्ध प्रतिक्रिया होणें स्वाभाविक आहे. त्याप्रमाणें, जुन्या पंडितांचा एक वेळीं अनादर होऊन हल्लीं मात्र त्यांजविषयीं आदर उत्पन्न झाला आहे. अतिशयोक्तीचीं दोन्हीं टोंकें चुकवून कोणत्याहि गोष्टीच्या बरोबर मध्याबिंदूचा वेध होणें हें कठिण असतें; शिवाय मध्यवेधाची स्थिति आली तरी ती फार वेळ टिकत नाहीं. मनूंची गति ही घड्याळांतील लंबकाच्या आंदोलनासारखी असते. चालत्या घड्याळाचा लंबक प्रत्येक आंदोलनांत मध्यबिंदूस स्पर्श करून जातो; पण मध्यबिंदूवर तो कधींहि स्थिर राहत नाहीं. चालत्या म्हणजे सजीव समाजांतील मतमतांतराचा मनूहि इष्ट मध्यबिंदूवर स्थिर असा राहूं शकत नाहीं; व तो आंदोलनें घेत एकदां या टोंकास तर एकदां त्या टोंकास जात असतो. यामुळें ज्या काळांत जें आहे तें तर हवेंच असतें; पण जें नाहीं त्याचे गुण आठआठवून त्याची इच्छा मनुष्य करूं लागतो. इंग्रजींत 'Something of every-thing and everything of something' असें जें वाक्य आहे त्यांतच ज्ञानविज्ञानाच्या इष्ट मर्यादेचा मध्यबिंदु आहे. एखादा विषय

सर्वस्वीं माहीत असणें हें हवेंच. पण तेवढाच माहीत असणें हें जसें अपूर्णत्वाचें लक्षण आहे, तसेंच सर्वच विषय थोडथोडे माहीत असणें हें इष्ट खरें तथापि एखादाहि विषय सर्वस्वीं अवगत नसणें हेंहि अपूर्णत्वाचेंच लक्षण होय. अर्थात् एकांगित्व व अनेकांगित्व यांचा जर मेळ पडेल, म्हणजे प्रत्येक विषयाचें थोडथोडें ज्ञान असून शिवाय एखाद्या विषयाचें तरी सांगोपांग उत्कृष्ट ज्ञान असावें ही स्थिति सर्वांत उत्तम. त्याच्या अभावीं जुन्या पंडितांनीं नव्यांना उथळ म्हणून हंसावें; व नव्यांनीं जुन्यांना एककल्ली म्हणून हंसावें, असेंच होणार. पण कोणत्याहि समाजांत एकांगी व अनेकांगी शिक्षण पावलेले लोक एकसमयावच्छेदेंकरून असतील तर, व्यक्तीचें जें अपूर्णत्व व दूषण तेंच, सर्व समाज म्हणून एक पुरुष धरला तर त्या पुरुषाचें पूर्णत्व व भूषण होईल हें उघड आहे. व या दृष्टीनें अनेकांगी–शिक्षण–प्रधान अशा हल्लींच्या काळांत जुन्या पंडितपरंपरेचें युरोपियन लोकांसहि कौतुक वाटावें आणि पंडितवर्गाला उत्तेजन मिळून त्याची परंपरा पुढेंहि चालावी अशी इच्छा उत्पन्न होऊन तत्प्रीत्यर्थ उद्योग व्हावा हें योग्यच आहे.

## जुन्या व नव्या पद्धतींचें साहचर्य

एकांगी व अनेकांगी शिक्षणाचे गुण परस्पर कांहीं अंशीं विरोधी असल्यामुळें त्या दोन शिक्षणपद्धतींचा मिलाफ करितां येईल किंवा नाहीं हा एक विचाराचाच प्रश्न आहे. दोन्ही पद्धति आपापल्या परीनें उपयोगीच आहेत; व त्यांतील अमुक एक हटकून चांगली व अमुक एक सर्वथा त्याज्य असें म्हणतां यावयाचें नाहीं. दोन्हीहि पाहिजे आहेत. पण त्या साध्य व्हाव्या कशा? मनुष्यमात्रांत जसे स्वभाव भिन्न असतात–एकाचा स्वभाव दुसऱ्यास येत नाहीं, व एकाच व्यक्तींत दोन परस्पर विरोधी स्वभावधर्म कायमचे नांदूं शकत नाहींतच नाहींत–तसेंच या दोन शिक्षणपद्धतींचें आहे. एकींत स्मरणशक्तीची मेहनत व करामत, तर दुसरींत चौकसपणा अधिक; एकींत शब्दप्रामाण्यावर भिस्त जास्त तर दुसरींत आत्मप्रत्ययाचा व विचारस्वातंत्र्याचा जोर जास्त; एकींत गहनावगाहनशीलता, तर दुसरींत बुद्धीचा व्याप-

कपणा व विस्तार विशेष. अशा निरनिराळ्या गुणांच्या पद्धतींचा मिलाफ व्हावा कसा? एकाच मनुष्याला जसें धूर्त व प्रांजल, धाडसी व सावध, प्रेमळ व विवेकी, न्यायी व उदार असें एकाच काळीं होतां येत नाहीं, तसेंच एकांगी व अनेकांगी शिक्षणपद्धतीनें मिळविलेल्या विद्येचे गुण एकाच व्यक्तींत एकवटतां येणें शक्य नाहीं. एकाच लेखकास दोन निरनिराळ्या वळणांचीं अक्षरें काढतां येणें कठीण, किंवा एकाच ग्रंथकारास अनेक निरनिराळ्या भाषा पद्धति लिहितां येणें कठीण; त्याचप्रमाणें कांहीं अंशीं जुन्या पढिक पंडितास नव्या पद्धतीचा शोधक व बहुश्रुत पंडित होणें, किंवा नव्या पद्धतीच्या शोधक व बहुश्रुत पंडितास जुन्या पद्धतीचा पढिक व उपस्थितिवश पंडित होणें कठीण आहे. पण परस्परविरोधी असे मनुष्यस्वभावगुण एकाच व्यक्तींत जरी एकाच वेळीं सांपडणें शक्य नसलें तरी, ते निरनिराळे गुण अंगीं असलेल्या निरनिराळ्या व्यक्ती एकाच काळीं एकाच समाजांत सांपडणें मुळींच कठीण नाहीं. जगांत इतर बाबींत आजवर कितीहि फरक झाले असले तरी समष्टिरूप मनुष्यस्वभाववैचित्र्य हें मात्र सनातन—जें हजारों वर्षांपूर्वीचें तेंच आज—आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. मनुष्यस्वभावाची गोष्ट व शिक्षणपद्धतीची गोष्ट थोडीशी वेगवेगळी आहे खरी. प्रकृतिपिंडाची वैचित्र्यशीलता निसर्गनिर्मित असून मानवी प्रयत्नांपेक्षां बलवत्तर आहे. पण शिक्षणपद्धति ही मनुष्यनिर्मित असून बहुधा अनुकरणात्मक असते. यामुळें एकाच काळीं एकाच समाजांत शिक्षणपद्धतीचें वळण एकच असतें; निदान एकमेकांस फारसें सोडून नसतें असेंच आढळेल. स्वभावांत अनुकरण शक्य नाहीं; शिक्षणपद्धतींत तें अनिर्वाह्य आहे. एवढेंच नव्हे तर स्वभावांत समान स्वरूप असणें हें जितकें कठीण, तितकेंच शिक्षणपद्धतींत वैचित्र्य आणणें कठीण आहे. पण प्रयत्न केला असतां तें असाध्य आहे असें मात्र नाहीं. पाठशाळा, तोल, मद्रेसा या शिक्षणसंस्था जुन्या शिक्षणपद्धतींच्या निदर्शक आहेत खऱ्या; पण त्या अद्यापि सर्वस्वी बुडाल्या नाहींत. अगदीं नव्यांतल्या नव्या पद्धतीचें युनिव्हर्सिटीचें शिक्षण इकडे दिलें जात असतां, दुसरीकडे आमच्या पाठशाळांमधून पूर्वपीठिकानुरूप पठणपाठणाचा ध्वनि निघतच आहे; तो कांहीं सर्वस्वी थांबला असें नाहीं. आंग्लसरस्वतीच्या सांप्रदायाच्या निदर्शक अशा रंगी बेरंगी फिती व काळ्या विदेशी झुली आज देशांत दिसूं लागल्या आहेत खऱ्या; तथापि,

आर्यसरस्वतीच्या निशाणादाखल मानल्या जाणाऱ्या जरीकांठी शालजोड्या खांद्यावर घेणारे, फार काय पण डोकीस बांधणारे लोकहि सर्वस्वीं दिसेनासे झाले आहेत असें नाहीं !

या गोष्टीचा अर्थ असा आहे कीं, परिस्थितीमुळें निरनिराळ्या व्यक्तींच्या अधिष्ठानानें निरनिराळ्या शिक्षणपद्धति एकाच समाजांत एकाच वेळीं आढळणें अगदींच अशक्य आहे असें नाहीं. नदीच्या पात्रांत मुख्य प्रवाह एकाच दिशेनें वाहत असतां एखादा उपप्रवाह दुसऱ्या दिशेनें वाहत आहे असा चमत्कार सकृत्‌दर्शनीं दिसणें कल्पनातीत नाहीं; पात्रांतील उच्चनीच स्थळांमुळें तें सर्वथा संभवनीयच्च आहे. याच रीतीनें, शिक्षणाचा मुख्य प्रवाह आधुनिक कल्पनांनीं आंखलेल्या पात्रांतून वाहत असतां प्राचीन परंपरेनुसार मद्रेसा–पाठशाळांच्या पात्रांतून फार्शी–संस्कृत विद्येचा लहानसा प्रवाह दुसऱ्या दिशेनें वाहत आहे; त्याचीहि उपयुक्तता आहे असें आधुनिक पंडितांस वाटूं लागलें आहे; आणि तो कायम वाहता रहावा, आटून जाऊं नये, अशा हेतूनें ते उद्युक्त झालेले आहेत–ही गोष्ट सिमला-कॉन्फरन्सच्या पुराव्यानें शाबीत होत आहे. मात्र हा हेतु कायमचा सिद्ध होण्यास एकच गोष्ट करणें जरूर आहे ती ही कीं, कॉलेजांच्या शिक्षणक्रमाप्रमाणेंच पाठशाळांचाहि शिक्षणक्रम स्वतंत्र चालू राहिला पाहिजे; व तसें झालें असतां पाठशाळांतून शिकून पंडितगिरीची परंपरा चालू ठेवण्यास लोकांस अडचण पडणार नाहीं. कॉलेजें व पाठशाळा एकाच स्थळमर्यादेंत असल्या तरी एकामुळें दुसरें ओस पडलें आहे असें पूर्वीं झालेलें नाहीं व यापुढेंहि सहसा घडून येणार नाहीं असें आम्हांस वाटतें. पुष्कळसे विद्यार्थी कॉलेजांत जातील खरे; पण पाठशाळांचे भक्तहि सांपडणार नाहींत असें नाहीं; थोडे तरी सांपडतीलच. कॉलेजांत कोण जाईल व पाठशाळेंत कोण जाईल ही गोष्ट यदृच्छेनें ठरणारी आहे. अमुकच अमकीकडे जाईल हें कोणी निश्चयानें सांगूं शकणार नाहीं. हे सर्व परिस्थितीचे खेळ आहेत.

या गोष्टीचीं एक दोन उदाहरणेंहि मनावर ठसण्यासारखीं देतां येतील. इंग्रजी शिकून पदवी मिळवून प्रोफेसरीचें काम करणाऱ्या गृहस्थाचें मोडी अक्षर किता घालण्यासारखें वळणदार व थेट जुन्या डौलाचें सांपडणें सहसा कठीण, हें कोणीहि कबूल करील कीं नाहीं ? असें असतां कै. प्रो. काथवटे

यांचें मोडी हस्ताक्षर अगदीं वर वर्णिलेल्या नमुन्याचें होतें हें पुष्कळ लोकांस माहीत असेलच. या गोष्टीचें कारण प्रस्तुत लेखकानें खुद्द प्रो. काथवटे यांस एकदां सहज विचारलें असतां ते म्हणाले कीं, "बंडाच्या सालीं मी इंग्रजी शिकत होतों; पण बंडवाले लोक विजयी होणार आणि फिरून पेशवाई स्थापिली जाणार असा त्या वेळीं आमचा दृढ भरंवसा होता; व यामुळें इंग्रजी विद्येचा उपयोग होणें नाहीं असें समजून आम्हीं जुन्या शिक्षणपद्धतीप्रमाणें अक्षर व गणित हेंच फिरून हातीं घेतलें. पण पुढें पाहतों तों बंडवाल्यांचा मोड होऊन इंग्रजी राज्यसत्ताच पुनः स्थापित झाली; तेव्हां फिरून नव्या पद्धतीप्रमाणें आम्ही इंग्रजी शिकूं लागलों! अशा रीतीनें जुन्या व नव्या शिक्षणपद्धतींचे दोन्ही फायदे आमच्या पदरांत पडले." अर्थात् हा यदृच्छेचा परिणाम. दुसरें उदाहरण आपले रँगलर प्रि. रघुनाथ पुरुषोत्तम परांजपे यांचें. यांचें घराणें वैदिकांचें असून खुद्द त्यांचे वडील कोंकणपट्टींतील उत्कृष्ट दशग्रंथी ब्राह्मणांत मोडत असत; आणि या चिरंजीवांची अल्प वयांत दिसून येणारी बुद्धिमत्ता पाहून त्यांनींही दशग्रंथी ब्राह्मण व्हावें अशी त्यांच्या वडिलांची इच्छा होती असें म्हणतात. पण दैवाचा संकल्प कांहीं वेगळाच होता. कोंकणांत राहून वेदाभ्यासाकडेच ते लागते—त्यांच्या पायांना देशाची वाट न सांपडती किंवा त्यांना हातीं धरण्यास धोंडोपंत कर्व्यांसारखा आधुनिक विद्वान् न मिळता—तर 'रघुनाथा'स पंत ही पदवी न लाभतां भट्ट ही पदवी लाभली असती; इंग्लंडांत कॅम नदीकांठच्या कॉलेजच्या बोर्डिंगांत 'साईन थीटा, कॉस थीटा' या शब्दांचा पाठ तोंडांतून निघण्याऐवजीं, मुर्डी गांवांमधील एका लहानशा घराच्या परसांतील आवारांत नारळी—पोफळींना रहाटगाडग्याचें पाणी लावीत लावीत वेदांतील ऋचांच्या जटा—पाठांचीं व घन—पाठांचीं त्यांचीं आवर्तनें चालतीं; लुसलुशीत सुगंधी पिअर्स सोपाऐवजीं, नित्य समिध शेकलेल्या अग्निकुंडांतील भरड भस्मच ते अंगास चर्चित बसते; केंब्रिजच्या पदवीधराच्या काळ्यानिळ्या शिपतरी टोपीऐवजीं हिरवी फीत लावलेली तांबड्या बनातीची टोपीच त्यांच्या डोक्यावर राहती; लॉर्ड कर्झन यांनीं प्रौढीनें वर्णिलेल्या 'ब्ल्यू रिबन' ऐवजीं, दगडी चातीनें कातलेल्या व बोजड ब्रह्मगांठ मारलेल्या गळ्यांतील यज्ञोपवीताचाच अभिमान ते बाळगते; किंबहुना फक्त कोंकणांतच विपुल

असलेल्या भुताखेतांचें दर्शन झालें असतां, फक्त कोंकणांतच लागू पडणाऱ्या समजुतीप्रमाणें जानव्याची ब्रह्मगांठ दाखवून त्या महद्भयाचें त्यांनीं निवारण केलें असतें. घनपाठी दशग्रंथी वैदिक 'रघुनाथभट्ट' परांजपे व धर्मशिक्षणाविरुद्ध कसून लिहिणारे 'रँगलर' परांजपे यांच्यांतील भेद खरोखर जमीनअस्मानचाच नव्हे काय? आणि हा फरकहि दोन विषम शिक्षणपद्धती समानसुलभ असतां, एखाद्या व्यक्तीला लीलेनें अमुक एका पद्धतीस मुकवून दुसऱ्या एका पद्धतीच्या कक्षेंत नेऊन सोडणाऱ्या यदृच्छेचेंच फळ नव्हे काय?

बाह्य परिस्थितीप्रमाणेंच मानसिक स्थितीमुळेंहि निरनिराळ्या व्यक्ति निरनिराळ्या शिक्षणपद्धतींचें अवलंबन करणार हें उघड आहे. वेदनिंदक चार्वाक हा कांहीं विसाव्या शतकांतील एखाद्या अस्सल मिशनरी कॉलेजांत शिकलेला नव्हता. उलटपक्षीं, अस्सल मिशनरी कॉलेजांत शिकून तयार झालेल्या बी. ए., एम्. ए. मध्यें, वेद ही अक्षरशः प्रत्यक्ष ईश्वराचीच वाणी आहे असें म्हणणारे व मानणारे श्रद्धाळू लोक आज सांपडणार नाहींत असें नाहीं. चार्वाकाच्या वेळीं एखादें मिशनरी कॉलेज असतें तर त्याला जसा निदान एक तरी योग्य विद्यार्थी मिळता, तसेंच आज हिंदुस्तानांत, जुन्या पद्धतीच्या पाठशाळा शिल्लक राहतील तर, त्यांनाहि योग्य असे विद्यार्थी मिळतील. तात्पर्य, जी चूक आहे ती इतकीच कीं स्वभावभेद, परिस्थितिमूलक विपरीतत्व व यदृच्छाविलास कायम असतां निरनिराळ्या पद्धतींचें शिक्षण देणाऱ्या संस्था मात्र असाव्या तितक्या आज या देशांत नाहींत. एकांगी शिक्षण व अनेकांगी शिक्षण हीं एकाच व्यक्तीमध्यें संभवनीय नसलीं तरी, एका समाजांत एकत्र सहज संभवतात; त्यांच्या योगानें प्रत्येक व्यक्तिपिंडाला यथायोग्य शिक्षण मिळतें; व सर्व समाजाला श्रमविभागाचा फायदा मिळतो. इंग्लंडांत एकराष्ट्रीयत्व सर्वस्वीं सिद्ध झालें असल्यामुळें तेथें सर्व शिक्षण एकाच नमुन्याचें असणें ठीक असेल; पण हिंदुस्थानांतील स्थिति तशी नाहीं. येथें जुन्या व नव्या परंपरेचा विरोध चांगला जागृत आहे. व कदाचित् पुढेंहि कधीं तो सर्वस्वीं मिटणार नाहीं. याकरितां हिंदुस्थानांत शिक्षणाचे नमुने उपराष्ट्रानुरूप वेगवेगळे असणें अगदीं जरूर आहे. ही गोष्ट कितीहि जोरानें आम्हीं पुनः पुनः सांगितली तरी ती थोडीच होणार आहे.

वरील विवेचनावरून, या देशांत आजच्या स्थितींतहि पाठशाळा चालविण्याची गरज आहे हें दिसून येईल व जी गोष्ट इकडील पाठशाळांची तीच बंगाल्याकडील 'तोळां'ची. मुसलमानी विद्येचीहि अशीच गोष्ट आहे. सुदैवानें या जुन्या विद्येच्या भांड्याला नव्या विद्येची कल्हई देणें इष्ट व शक्य आहे असें म्हणणारा नवीन वर्ग आज निर्माण होत आहे व या वर्गाच्या विचारसरणींत संस्कृत विद्येच्या पुनरुज्जीवनास पोषक असें बरेंच द्रव्य सांपडतें. हें उभयविध शिक्षण देऊन संस्कृत विद्येच्या पुनरुज्जीवनास मदत कशी करावी या गोष्टीचा सिमला–कॉन्फरन्समध्यें विचार झाला. पण 'ओरिएंटल इन्स्टिटयूट' या नांवाची नवीन संस्था काढण्यापलीकडे या गोष्टीच्या विचाराची तपशीलवार मांडणी कोठें झालेली त्या रिपोर्टांत दिसून येत नाहीं. आणि मुख्य हेतु इष्ट असतां साधनें सुचविण्याच्या बाबतींत बरेच सभासद गोंधळून गेले, असें त्यांनीं पाठविलेल्या लेखी मिनिटांवरून दिसून येतें.

जुन्या परंपरेचें जें शिक्षण आज देशांत चालू आहे तें पाठशाळा, तोळ, मद्रेसा वगैरे जुन्या पद्धतीच्या शाळांतून चालू आहे. संस्कृत, पर्शियन, आरबी वगैरे भाषांत संग्रहित असलेल्या विद्येचें जुन्या पद्धतीचें असें शिक्षण याच संस्थांतून मिळण्याचें असल्यामुळें, अशा शाळा व त्यांत शिकणारे विद्यार्थी यांचें अल्प प्रमाण पाहून कोणासहि बरें वाटणार नाहीं व हें प्रमाण किती अल्प आहे हें खालीं लिहिलेल्या आंकड्यांचे माहितीवरून कोणाचेहि लक्षांत येईल. वरिष्ठ शिक्षणाच्या दृष्टीनें पाहतां सर्व हिंदुस्थानांत मिळून १४ शाळांमधून सुमारें १३०० विद्यार्थी संस्कृत, फारशी व आरबी विद्या जुन्या पद्धतीनें आज शिकत आहेत. सन १९०० सालीं या संस्थांची संख्या अवघी पांच असून त्यांत सुमारें ५५० विद्यार्थी शिकत होते. गेल्या दहा-बारा वर्षांत संस्था व विद्यार्थी यांच्या संख्येंत वाढ झालेली आहे. तथापि, सर्व हिंदुस्थानांत मिळून युनिव्हर्सिटीशीं संबंध असलेल्या वरिष्ठ इंग्रजी शिक्षणाच्या संस्थांची संख्या १८५ व त्यांत शिकणाऱ्या विद्यार्थ्यांची संख्या सुमारें ३० हजार असतां, जुन्या पौर्वात्य पद्धतीनें उच्च शिक्षण देणाऱ्या संस्थांची संख्या अवघी १४।१५ असावी, यावरून जुनी विद्या किती मागासलेली आहे हें दिसून येईल. इंग्रजी विद्या देणारीं नुसतीं 'आर्ट्स् कॉलेजें'च हिंदुस्थानांत १२५ आहेत. असें असतां पौर्वात्य इतकीं थोडीं कां असावीं ? कायदा,

वैद्यक, शिल्प, वास्तुविज्ञान, कृषिकर्म वगैरे बाबतींत तर जुन्या विद्येचा सर्वस्वी लोपच झाला आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. कारण वरिष्ठ प्रतीच्या शिक्षणसंस्थांतून पौर्वात्य तत्त्वज्ञान व काव्य यांच्या पलीकडे सहसा कांहीं शिकविलें जात नाहीं. जुनी विद्या शिकविणाऱ्या प्राथमिक पाठशाळा वगैरे आहेत; परंतु त्यांची वाढ होण्याऐवजीं ऱ्हासच झालेला आढळतो. उदाहरणार्थ, आरबी व फारशी शिक्षण देणाऱ्या पाठशाळा सन १९०० ते १९१० या सालांत २४३८ वरून १५०५ वर आल्या. व त्यांतील विद्यार्थ्यांची संख्या ३७॥ हजारांवरून ३० हजारांवर आली ! तसेंच संस्कृत पाठशाळा वगैरेंची संख्या १९२९ वरून १४२९ वर आली; म्हणजे दहा वर्षांत पांचशें पाठशाळा कमी झाल्या. विद्यार्थ्यांची संख्याहि २३ हजारांवरून २२ हजारांवर आली. पाठशाळांच्या संख्येच्या मानानें विद्यार्थ्यांची संख्या कमी झालेली दिसत नाहीं याचें कारण असें असावें कीं, जुन्यापद्धतीनें विद्या संपादन करण्याची लोकांची इच्छा विशेष कमी होत नसतां, ती विद्या देणारे शिक्षक व त्या शिक्षकांचा स्वतंत्र रीतीनें चरितार्थ चालण्याचें साधन हीं दिवसेंदिवस कमी होत चाललीं आहेत. सिमला-कॉन्फरन्सनें ' ओरिएंटल इन्स्टिटयूट 'सारखी संस्था काढण्याचें ठरविलें आहे हें तर ठीकच आहे; परंतु जुन्या पंडितगिरीची परंपरा कायम राहावी व वाढावी अशी सरकारची इच्छा असेल तर संस्कृत पाठशाळा अधिक स्थापन व्हाव्या अशी खटपट करून त्या संस्थांना योग्य तें द्रव्यसहाय्य करण्यासही सरकारानें कंबर बांधली पाहिजे.

# थोडी प्राचीन माहिती

जुन्या व नव्या पद्धतीच्या शिक्षणाचें साहचर्य हल्लींहि कां असावें, याचें विवेचन या विषयावरील मागच्या प्रकरणांत करण्यांत आलेंच आहे. हें साहचर्य असण्याचें मुख्य कारण म्हटलें म्हणजे पूर्वीच्या पद्धतीप्रमाणें शिक्षण मिळविलेल्या लोकांत जशी जाडी विद्वान् मंडळी निर्माण झाली तशी कदाचित् यापुढेंही होईल अशी आशा वाटते हेंच होय. जुन्या पद्ध-तीच्या शिक्षणास नव्या पद्धतीचे कांहीं कांहीं संस्कार दिल्यानें

'अधिकस्य अधिकं फलं' या न्यायानें विशेष फायदाच होणार आहे. ते संस्कार कशा रीतीनें द्यावे हा एक स्वतंत्र प्रश्नच आहे. परंतु जुन्या पद्धतीनें बनलेल्या—म्हणजे विसाव्या शतकांत मिळणाऱ्या नवीन संस्कारानें वियुक्त असें शिक्षण पावलेल्याहि-पंडितगिरीचें तेज पूर्वीच्या काळांत कसें होतें, आणि एकंदरीनें जुन्या पंडितगिरीची परंपरा व तिचे सांप्रदाय हिंदुस्थानांत कसकसे होते याचें अगदीं होईल तितकें संक्षिप्त विवेचन करून, नंतर गेल्या शेंपन्नास वर्षांत संस्कृत विद्येच्या पुनरुज्जीवनास देशी व विदेशीहि लोकांचे कोणकोणते प्रयत्न कसकसे फलद्रूप झाले आहेत, याचें आम्ही थोडक्यांत निरीक्षण करणार आहों.

संस्कृत वाङ्मयाचा सांगोपांग अगर त्रोटकहि इतिहास आपणाकडे कोणी लिहून ठेविलेला नाहीं. त्याचप्रमाणें जुनीं विश्वविद्यालयें, पाठशाळा, पंडित-संघ, त्यांचे वादविवाद, त्यांच्या सभा, त्यांचे ग्रंथ व त्यांची गुरुशिष्यपरंपरा यांचीहि माहिती कोणी फारशी लिहून ठेविलेली आढळत नाहीं. कित्येक ग्रंथकारांनीं आपलें नांव, गांव, गोत्र, आश्रय देणारा राजा असल्यास त्याचें नांव व यशोवर्णन, आणि आपल्या गुरुघराण्याची परंपरा दिलेली असते. परंतु आश्रयदात्या राजाच्या वर्णनांत देखील काल्पनिक गोष्टींचा थोडाबहुत समावेश केलेला आढळतो. निदान गुरुपरंपरा देण्यामध्यें तर भाविकपणाचा कित्येक वेळां इतका कळस झालेला दृष्टीस पडतो कीं, प्रत्यक्ष ब्रह्मदेवापासून तों स्वतः ग्रंथकाराच्या पूज्यगुरुपादांपर्यंतच्या अनंतप्राय कालोदधीचें आक्रमण फक्त दहापांच कमानींच्या पुलावरून करितां येतें ! अर्थात् परंपरेच्या असल्या उल्लेखांत इतिहासदृष्ट्या विश्वसनीय अशी माहिती फारशी मिळूं शकत नाहीं. ऐतिहासिक दृष्टी ही जरी सर्वस्वी आधुनिक नसली तरी, कालगणनेची दृष्टी व वस्तूंचें पूर्वापरत्व ठरविण्याची दृष्टी ही तरी निःसंशय आधुनिक आहे. शिवाय कोणी स्वतः एखाद्या विशिष्ट शास्त्राचें अध्ययन केलें असतां इतर शास्त्रांचें विहंगमदृष्टीनें समालोचन करण्याची, व त्यांत ग्राह्य व त्याज्य काय याची चौकशी करण्याची, जी बुद्धि आधुनिक विद्वानांस असते, ती पूर्वकालीन पंडितांना फारशी असावी असें दिसत नाहीं. याचें एक कारण आम्हांस असें वाटतें कीं, विद्येला आजकाल प्रायः ऐहिक महत्त्वच असतें; परंतु जिचें पर्यवसान परमार्थांत होत नाहीं अशी कोणचीहि विद्या आहे असें पूर्वकालीं मानलेंच

जात नसे. विद्या व मोक्षमार्ग हे शब्द पूर्वकालीं बहुधा समानार्थकच होते. हिंदुधर्म जरी तात्त्विक दृष्टया मतभेदसहिष्णु असला, व 'साधनानामनेकता' हें जरी हिंदुधर्माचें एक असाधारण लक्षणहि मानण्यास योग्य असलें, तरी प्रत्यक्ष व्यवहारांत स्वतः अंगिकारिलेल्या मोक्षमार्गाविषयींची अभिमानबुद्धि तीव्र नसणें हें कठीणच होतें. यामुळें अनेक शास्त्रांचें सारख्याच आवडीनें अध्ययन करणारा मनुष्य पूर्वी विरळा, व सर्व शास्त्रांना–अर्थात् सर्व प्रकारच्या वाङ्मयांना सहिष्णुतेनें व आदरबुद्धीनें वागवून त्यांच्या विषयींची माहिती एकत्र करून ठेवून त्यांना चिरस्थाई करण्यास मदत करणारा मनुष्य त्याहूनहि विरळा. यामुळें ज्याला 'संस्कृत वाङ्मयाचा इतिहास' असें कोणत्याहि अर्थानें म्हणतां येईल असा ग्रंथ संस्कृतांत आजपर्यंत झालेला आढळत नाहीं. नाहीं म्हणावयाला यासंबंधांत एकच लहानसा ग्रंथ सुचण्यासारखा आहे, व तो मधुसूदन–सरस्वतीचा 'प्रस्थानभेद' नांवाचा ग्रंथ होय. यांत वेद–वेदांगें व शट्शास्त्रें यांचें वर्गीकरण व व्याख्या फार चांगल्या पद्धतीनें दिलेल्या आहेत. पण या ग्रंथांतील विषय हा आधुनिक पद्धतीनें लिहिलेल्या अशा विस्तृत संस्कृत वाङ्मयाच्या इतिहासरूप ग्रंथांतील केवळ एक लहानसें उपांग म्हणून शोभेल. असो; वरील कारणांमुळें जुन्या पंडितपरंपरेसंबंधानें असावी तशी माहिती अद्यापि कोठें संग्रहित झालेली नाहीं. तथापि केवळ उदाहरणा-दाखल थोडीशी माहिती आम्हांस उपलब्ध असलेली देऊन नंतर प्रस्तुत विषयाच्या इतर अंगांकडे आम्ही वळणार आहों.

कोणी प्रयत्नच केल्यास या बाबतींत त्याला हजार पांचशें वर्षांच्या अलीकडची तरी माहिती त्रोटक रीतीनें मिळण्याचा संभव आहे. प्रथम आपण पंजाब म्हणजे आर्य लोकांचा हिंदुस्थानांतील प्रवेशमार्ग घेऊं. आपणाला माहीत असलेलें संस्कृत पंडितगिरीचें आदिपीठच नसलें तरी, एक मोठें संस्कृत विद्यालय तक्षशिला येथें होतें ही गोष्ट प्रसिद्ध आहे. तक्षशिला ही नगरी हल्लींच्या रावळपिंडी शहराच्या आसपास होती. विद्यापीठाच्या बाबतींत तक्ष-शिलेची कीर्ति काशीच्या बरोबरीची आहे. तक्षशिला ही प्राचीन भारतीय सम्राट अशोक याच्या एका 'गव्हर्नरा'ची राजधानी होती. ब्राह्मण पंडित-गिरीचें तें एक आगर होतें. वेद-वेदांगांसुद्धां अठरा शास्त्रें व सर्व तऱ्हेच्या कला यांचें शिक्षण देणारे विद्वान् लोक या विद्यापीठांत 'प्रोफेसर' असत. प्राचीन

संस्कृत व्याकरणकार पाणिनी, चंद्रगुप्ताच्या हातून नंदांचा संहार करवून मगध देशाचें राज्य स्थापणारा मुत्सद्दी भिक्षुक आर्यचाणक्य, हे तक्षशिला येथील विद्यापीठांतील विद्यार्थी होते. आयुर्वेदाचा एक आचार्य आत्रेय हा या विद्यापीठांत एका वेळीं वैद्यकाचा प्रोफेसर होता. खुद्द गौतमबुद्धाचा शिष्य व स्नेही जीवक–जो मगध देशाच्या बिंबिसार नामक राजाच्या पदरीं वैद्यराज म्हणून होता–तोहि तेथेंच वैद्यकी शिकला होता. प्रारंभीं तक्षशिला येथील विद्यापीठ ब्राह्मणधर्मीय होतें. पुढें बौद्ध धर्माची स्थापना झाली. तथापि, तक्षशिला येथील विद्यापीठांतील पंडितपरंपरा तशीच चालू राहिली; व पुढें कुमारलब्धासारखे प्रचंड बौद्ध पंडित याच विद्यापीठामध्यें निर्माण झाले. चिनी प्रवासी हुअेनत्सँग यानें कुमारलब्धाविषयीं असें लिहून ठेविलें आहे कीं, पूर्वेस अश्वघोष, दक्षिणेस देव, पश्चिमेस नागार्जुन व उत्तरेस कुमारलब्ध असे चार जाडे विद्वान् हिंदुस्थानांत समकालीन होते. परंतु त्यांमध्यें कुमारलब्ध हाच सर्वांत श्रेष्ठ मानला जाई. तो दरदिवशीं कमींत कमी ३२ हजार अक्षरें लिहीत असे! यानें अनेक शास्त्रांवर ग्रंथ लिहिले होते, व हिंदुस्थानांतील चारहि दिशांचे लोक त्याच्या दर्शनास येत, अशी त्या वेळची दंतकथा म्हणून सदर चिनी प्रवाशानें लिहून ठेविली आहे. तक्षशिलेचा ऱ्हास झाल्यानंतर पंडितगिरीचा प्रवाह पूर्वेकडे वाहूं लागला. तक्षशिला येथील विद्यापीठांत गुरु व शिष्य यांची परंपरा गृहस्थाश्रमी होती. बौद्धधर्माचा प्रसार झाल्यावर संन्यासी व भिक्षू यांच्याकडे पंडितगिरीचें व विद्यापीठाचें चालकत्व गेलें. हे भिक्षु लोक होतां होईतों वस्तीचें गांव सोडून बागा, मठ व विहार यांतून रहात, आणि अध्ययनाध्यापनाचें काम चालवीत. ग्रीक देशामध्यें खिस्तापूर्वी तिसऱ्या शतकांत ॲकेडेमॉस नामक एका विद्येच्या पुरस्कर्त्यानें विद्यापीठाकरितां म्हणून एक मोठी बाग करून दिली होती. तिजमध्यें प्रसिद्ध ग्रीक तत्त्ववेत्ता प्लेटो हा आपल्या अनेक शिष्यांस पढवीत असे ही ऐतिहासिक गोष्ट प्रसिद्ध आहे; व या गोष्टीवरूनच म्हणजे ॲकेडेमॉस याच्या नांवावरून, विद्यापीठाचा दर्शक असा जो 'ॲकेडमी' हा शब्द तो निघाला आहे. त्याचप्रमाणें कांहीं अंशीं बौद्धकालांतील विद्यापीठेंहि रानांवनांतून पसरलेलीं असत.

बंगाल इलाख्यासंबंधानें पहातां तिकडील परंपरेची माहिती साधारणतः

सहाव्या शतकापासून मिळते. या काळाच्या सुमारास बंगाली लोक मोठे धाडशी, हिम्मती व उद्योगी असून, एका अंगानें हिमालयाच्या बर्फाच्छादित प्रदेशांत व दुसऱ्या अंगानें पूर्वसमुद्राकडील प्रदेशांत त्यांनीं वसाहती केल्याचा पुरावा मिळतो. दीपंकर श्रीज्ञान नांवाचा बंगाली ब्राह्मण हिमालय चढून तिबेटांत गेला होता व तेथें त्यानें बौद्ध धर्माचा प्रसार केला. दुसरा एक बंगाली ब्राह्मण रामचंद्र कविभारती हा सिंहलद्वीपांत गेला असून पराक्रमबाहु नांवाच्या राजाच्या कारकीर्दींत सिंहलद्वीपांतील सर्व बौद्ध मठ व विहार त्याच्या व्यवस्थेखालीं होते. नलंद येथील विद्यापीठाचा सुप्रसिद्ध अध्यक्ष शीलभद्र हाहि पूर्वबंगालचा ब्राह्मण पंडित होता. समतट नांवाच्या राजधानींत राज्य करणाऱ्या ब्राह्मण राजांच्या वंशांत शीलभद्र हा जन्मलेला असून पूर्वींच्या 'दंतदेव' या नांवानेंहि तो प्रसिद्ध आहे. शीलभद्रानें आपल्या वयाच्या सोळाव्या वर्षाच्या आंत त्या वेळीं माहीत असलेल्या सर्व शास्त्रांचें अध्ययन पूर्ण केलें होतें. नलंद येथील विद्यापीठाचा त्या वेळचा मुख्याध्यापक धर्मपाल याचा तो पट्टशिष्य असून इ. स. ५५४ सालीं यानें एका जाड्या विद्वान् दक्षिणी पंडितावर वादांत जय मिळविल्यामुळें, त्याच्या गुरूच्या निर्वाणोत्तर त्याला विद्यालयाचा मुख्याध्यापक नेमण्यांत आलें. शीलभद्र ही कोणी काल्पनिक व्यक्ति नसून चिनी प्रवासी ह्यूएनत्संग यानें शीलभद्राची समक्ष गांठ घेतल्याचा वृत्तांत प्रसिद्ध आहे. याच्या वेळीं नलंद विद्यापीठांत दहा हजार विद्यार्थी व १५१० शिक्षक होते अशी आख्यायिका आहे! या विद्यापीठाची परंपरा एवढी मोठी होती कीं, सुमारें शंभर वर्षांच्या अवधींत ती दुसऱ्या कोणालाहि हार गेली नाहीं; व माध्यमिक नांवाचा बौद्ध मार्गाचा प्रवर्तक नागार्जुन, मेनोस्ट्रेस नांवाच्या ग्रीक राजाला विज्ञान शिकविलेला नागसेन, सांख्यशास्त्रावर हल्ला करून बौद्ध तत्त्वज्ञानाचें ध्वजारोपण करणारा गुणवति बोधिसत्व, चिनांत जाऊन बौद्ध धर्मचक्राची संस्थापना करणारा प्रभामित्र, तिबेटी राजाच्या निमंत्रणावरून तिकडे धर्मोपदेश करणारा जिनमित्र, तसेंच चंद्रपाल, स्थिरमति, ज्ञानचंद्र व शीघ्रबुद्ध वगैरे प्राचीन बंगाली पंडितांचा संबंध याच विद्यापीठाशीं होता.

नलंद येथील विद्यापीठानंतर पुढील पांचशें वर्षांत उदंतपुरी व विक्रमशिला येथील विद्यालयें प्रसिद्ध होतीं. हीं दोन्हीं स्थानें हल्लींच्या बहार

प्रांतांत आहेत. उदंतपुरी येथील विद्यालयांत १ हजार भिक्षू हीनयान नामक बौद्धमार्गाचे अनुयायी, व ५ हजार भिक्षू महायान मार्गाचे अनुयायी होते; व हे दोन्ही मिळून सहा हजार शिक्षकच होते असें म्हटलें तरी चालेल. उदंतपुरी येथें एक ब्राह्मणी व बौद्ध ग्रंथांचा फार मोठा संग्रह होता. विक्रमशिला हें विद्यापीठ बहार म्हणजे मागध देशाच्या पाल राजांनीं स्थापिलें व अनेक देणग्या देऊन चालविलें. या विद्यापीठांत सहा कॉलेजें व १०८ पंडित प्रोफेसर होते असें म्हणतात. इ. स. ७५० सालीं हल्लींच्या भागलपूर जिल्ह्यांत गंगा किनाऱ्यावर धर्मपाल नांवाच्या राजानें मठ व देवस्थानें बांधिलीं व त्यांना मोठमोठीं वर्षासनें चालवून दिलीं. त्यांतून या विद्यापीठांचा बराच मोठा खर्च चालत असे. मागें सांगितलेला दीपंकर, तसेंच प्रसिद्ध आचार्य श्रीबुद्धज्ञानपद हे विक्रमशिलेच्या विद्यापीठाचे प्रिन्सिपाल होते. या विद्यापीठांत व्याकरण, दर्शन, अभिधर्म, वैद्यक वगैरे शास्त्रें विशेषेंकरून शिकवीत. सदर विद्यापीठांतून तयार झालेल्या विद्वान् पंडितांना ‘ द्वारपंडित ’ अशी पदवी राजांकडून मिळत असे. विक्रमशिला येथील द्वारपंडितांच्या यादींत काश्मीर, सिंहलद्वीप, गौड, बनारस वगैरे निरनिराळ्या प्रांतांतील लोकांचीं नांवें आढळतात. तिबेटांतील लामा लोक संस्कृत ग्रंथांचीं तिबेटी भाषेंत भाषांतरें करण्याकरितां पंडितांची मदत घेण्यास विक्रमशिला येथें येत असत. विक्रमशिला येथील विद्यापीठाचा नाश सन १२०३ सालीं मुसलमान सरदार बखत्यार खिलजी यानें केला.

विक्रमशिला येथील विद्यापीठ बौद्धमताचें होतें; परंतु ब्राह्मणमताचें असें दुसरें एक विद्यापीठ पूर्वकाळीं मिथिला येथें चवदाव्या शतकांत होतें. विक्रमशिलेप्रमाणें मिथिला येथील विद्यापीठाचा नाश मुसलमान सेनानायकांच्या हातून झाला नाहीं; पण नडिया म्हणजे नवद्वीप येथें स्थापन झालेल्या नव्या विद्यापीठाच्या तेजानें मैथिलविद्यापीठाचें तेज लोपून गेलें. मिथिला–विद्यापीठ हें न्यायशास्त्राचें एक मुख्य आगर होतें, व तेथील शिक्षणाची कीर्ति ऐकून हिंदुस्थानांतील निरनिराळ्या भागांतून विद्यार्थी तेथें जात. परंतु विद्यापीठांतील प्रोफेसर लोक आपलें ज्ञान एकाद्या मौल्यवान् वस्तूप्रमाणें गुप्त ठेवण्याचा प्रयत्न करीत. विद्यार्थ्यांस शिक्षण मिळे, त्यांच्या

परीक्षा घेतल्या जात व त्यांना ' डिप्लोमा ' ऊर्फ प्राविण्याच्या सनदा दिल्या जात. परंतु कोणाहि विद्यार्थ्यानें कोणत्याहि न्यायग्रंथाची प्रत उतरून घेऊं नये, किंबहुना शिक्षक लोकांनीं व्याख्यानांत दिलेलीं टिपणें विद्यापीठाबाहेर नेऊं नयेत, असा कडक निर्बंध असे. अखेर नवद्वीप येथील तरुण पंडित वासुदेव यानें या गुप्त मिथिल विद्याधनावर घाला घातला. एवढेंच नव्हे तर नवद्वीप येथें नवें प्रतिस्पर्धी विद्यापीठ स्थापन करून त्यानें मिथिल-विद्यापीठाचें महत्त्व बुडविलें. वासुदेव पंडित हा मिथिलविद्यापीठांत विद्यार्थी म्हणून गेला, त्या वेळीं पक्षधरमिश्र नांवाचा प्रसिद्ध नैय्यायिक मुख्या-ध्यापकाचे जागीं होता. त्यानें या तरुण विद्यार्थ्याची हुषारी पाहून त्यास ' सार्व-भौम ' अशी पदवी दिली. पण केवळ या पदवीनें संतुष्ट न होतां वासुदेव पंडितानें कोणास कळूं न देतां मैथिल न्यायविद्येचे आकर–ग्रंथ सर्व तोंडपाठ केले ! व नंतर काशी येथें वेदांताचें अध्ययन करून नवद्वीप येथें परत जाऊन, पंधराव्या शतकाच्या अखेरीस त्यानें स्वतंत्र विद्यापीठ स्थापन केलें ! वासुदेव पंडिताचे चार नामांकित शिष्य होते. ( १ ) रघुनाथ शिरोमणी; हा आधुनिक नव्या न्यायशास्त्राचा श्रेष्ठ ग्रंथकर्ता असें अद्यापि मानलें जातें. ( २ ) रघुनंदन; हा बंगाल्यांतील हिंदुधर्मशास्त्रावरील प्रमुख ग्रंथकार आहे. ( ३ ) कृष्णानंद आगमवागीश; यानें बंगाल्यामध्यें तंत्रशास्त्राचा प्रथम प्रसार केला आणि ( ४ ) चैतन्य, म्हणजे बंगाल्यांतील वैष्णव धर्माचा मूल संस्थापक. चैतन्यानें आपला गुरु वासुदेव सार्वभौम याजकडून वैष्णव मताचा स्वीकार करविला असें सांगतात. वासुदेव सार्वभौम हा ओरिसा देशाचा राजा गजपति प्रतापरुद्र याच्या आश्रयास असतां सन १५२० सालीं निवर्तला.

नवद्वीप येथें स्थापन झालेल्या विद्यापीठांत शेंकडों विद्यार्थी येऊन शिकून जात. परंतु मैथिलविद्यापीठाप्रमाणें, नवद्वीप येथील विद्यापीठास परीक्षा उत्तीर्ण झालेल्या विद्यार्थ्यांना पदव्या देण्याचा अधिकार बराच काळपर्यंत प्राप्त झाला नव्हता, तो मिळविण्याची खटपट रघुनाथ शिरोमणी यानें केली. पदव्या देण्याचा अधिकार त्या वेळीं राजाच्या एखाद्या सनदेनें मिळावयाचा नसून तो सर्वस्वी लोकमतावर अवलंबून होता; आणि मैथिलपंडितांना वादांत परा-भूत केल्याशिवाय लोकमत पाहिजे तसें अनुकूल होण्यासारखें नव्हतें. म्हणून

रघुनाथानें वासुदेव सार्वभौमाच्या परवानगीनें मिथिलेस जाऊन तेथील विद्यापीठांत गुप्तपणें प्रवेश करून घेऊन व खुद्द पक्षधरामिश्राचा वादांत पराभव करून नवद्वीप येथें पदव्या देण्याचा अधिकार सन १५३० सालीं मिळविला आणि परत नवद्वीप येथें येऊन त्यानें एक मोठी पाठशाळा काढली. नवद्वीप येथील विद्यापीठाचा लौकिक तेव्हांपासून जो सुरू झाला तो अद्यापहि जागृत आहे, व सर्व बंगाल्यांत नवद्वीपासारखें संस्कृत विद्येच्या दृष्टीनें दुसरें महत्त्वाचें स्थानच नाहीं असें म्हटलें असतां चालेल.

# दक्षिणी पंडित

वर बंगालप्रांतांतील पंडितगिरीसंबंधानें जशी थोडीशी माहिती दिली आहे तशीच दक्षिणी पंडितांविषयींहि प्रस्तुत लेखांत थोडीशी माहिती देण्याचा आमचा विचार आहे. दक्षिणी पंडितवर्गाची जी थोडीबहुत माहिती मिळते तिजवरून पहातां, इतर प्रांतांतील पंडितपरंपरेची अशीच माहिती मिळाल्यास ती फारच मनोरंजक होईल असें वाटतें. दक्षिणी पंडितांचें वजन व महत्त्व इकडेच होतें असें नाहीं; तर उत्तरहिंदुस्थानांतही तें पुष्कळच होतें. ज्या त्या प्रांताला आपापल्या पंडितपरंपरेचा अभिमान विशेष असणें स्वाभाविक आहे. असें असतांहि कलकत्ता संस्कृत कॉलेजांतील विद्यमान पंडित महामहोपाध्याय हरप्रसाद शास्त्री, एम. ए., सी. आय. ई. यांनीं 'इंडियन अँटिक्वेरी' नामक मासिक पुस्तकाच्या अलीकडच्या एका अंकांत प्रांजलपणानें अशी कबुली दिलेली आहे कीं, विद्यापीठांचें आगर व पवित्र क्षेत्रांतील अत्यंत श्रेष्ठ अशी जी काशी ( बनारस ) ती उत्तरहिंदुस्थानांत असतां, तेथें दक्षिणी पंडितांचें जें वजन व जी मान्यता आहे ती खुद्द त्या प्रांतांतील पंडितांना मुळींच नाहीं हें महत्त्व आजकालचेंच आहे असें नाहीं, तर कित्येक शतकांपासून चालत आलेलें आहे. धर्म आणि विद्या यांच्या बाबतींत तद्देशीय, कनौजी व शार्वरीय ब्राह्मण हे केव्हांहि पहावें तों दक्षिणी पंडितांपुढें अगदीं दिपून गेलेले दिसतात. बनारस येथें हुडकणारास हजारों हस्तलिखित ग्रंथरूप पोथ्या सांप-

डतात. आणि त्याजबरोबर त्याला हेंहि आढळून येतें कीं, यांतील बरेच ग्रंथ खुद्द काशी येथें वास्तव्य करून राहिलेल्या कित्येक दक्षिणी पंडितांच्या घराण्यांतील विद्वान् व बुद्धिवान् लोकांनीं लिहून ठेविलेले आहेत. बनारस येथील महाराष्ट्र पंडितकुळांचा इतिहास हाच गेल्या चार शतकांतील हिंदुस्थानांतील बहुतेक प्रांतांच्या संस्कृतविद्येचा इतिहास होय अशी हरप्रसाद शास्त्री यांची समजूत आहे. बंगाल्यांत नवद्वीप वगैरे ठिकाणीं पंडितपरंपरा या कालावधींत चांगलीच जाग्रत होती; पण तिचें वजन बंगाल्यापुरतें होतें. असें असतां त्याच्या उलटपक्षीं नारायणभट्टासारख्या महाराष्ट्रीय पंडिताच्या विद्वत्तेचा अधिकार, खुद्द काशी, कनोज व मिथिला येथेंच काय, पण बंगाल्यांतही मानला जात असे. पंडित नारायणभट्टानें सर्व हिंदुस्थानभर प्रवास केला होता व त्यानें अनेक संस्कृत ग्रंथ लिहून ठेविले असून जगांतील अनुभवांत प्रायः घडून न येणारी अशी एक गोष्ट त्याच्या संबंधांत ईश्वरकृपेनें घडून आली होती व ती ही कीं, त्याच्या पश्चात् त्याच्या घराण्यांत अनेक पिढ्यांपर्यंत जवळ जवळ त्याच्या तोडीचे लोकोत्तर पंडित होऊन गेले. महाराष्ट्रीय पंडितांची वसाहत काशीक्षेत्रांत व आसपास जी आढळते तिचा बराच भाग नारायणभट्टामुळें वसलेला आहे.

याच कुळांतील एका पंडितानें गाधिजवंशानुचरितनामक जो एक ग्रंथ लिहिला आहे, त्यावरून या घराण्याचा बराच इतिहास कळतो. या घराण्याचें गोत्र विश्वामित्र असून हे आश्वलायनशाखीय ऋग्वेदी ब्राह्मण होत. यांचा मूळ पुरुष गोविंदभट्ट हा पंधराव्या शतकांत दक्षिणेंत पंडित म्हणून प्रसिद्ध होता. त्याचा नातु प्रस्तुतचा नारायणभट्ट होय. नारायणभट्टाच्या बापाच्या तरुणपणीं दक्षिणेंतील बहामनी राज्य फुटून त्याचे तुकडे झाले. नारायणभट्टाचा बाप रामेश्वरभट्ट याच्या वेळेपासून या घराण्याची शिष्यपरंपरा फैलावली. तो स्वतः मीमांसा, व्याकरण, न्याय व वेदांत या चारहि शास्त्रांत निष्णात होता व गोदावरीच्या कांठीं पैठण येथें रामेश्वरभट्टाचें विद्यापीठ इतकें गजबजून गेलें होतें कीं, वरील गाधिजवंशानुचरित ग्रंथांत त्याला ‘ श्रीरामचंद्राच्या सैन्याच्या छावणी ’ ची उपमा अतिशयोक्तीनें दिलेली आहे. रामेश्वरभट्ट हा चमत्कार करून दाखवी असेंही मानीत. निदान या त्याच्या कीर्तीमुळें निजामशाहीच्या बादशहानें रामेश्वरभट्टाला सुवर्णमुद्रांकित निमंत्रणपत्रिका पाठवून आपल्या दर-

बारीं बोलावून घेतलें व त्याचा बहुमान केला, असा उल्लेख आढळतो. यानंतर रामेश्वरभट्ट हा विद्यानगर येथें कृष्णरायनामक राजा राज्य करीत असतां गेला, व तेथून द्वारकेच्या यात्रेस जात असतां वाटेंत त्याचा नारायणभट्ट हा मुलगा शके १४३५ च्या चैत्रमासांत ( मार्च सन १५१४ ) जन्मला. द्वारकेस अनेक शिष्यांकडून त्यानें महाभाष्य व सुरेश्वरवार्तिक यांचें अध्ययन करविलें. नंतर पैठणास परत येऊन चार वर्षांनीं काशीस गेला, तो मग तेथेंच कायमचा राहिला. तेथेंच त्याला बाकीचे मुलगे झाले. त्यांचीं लग्नें सोयरीकीहि तिकडच्या तिकडेच झाल्या व ही वसाहत हळूं हळूं तेथेंच फैलावली. रामेश्वरभट्टाच्या शिष्यांमध्यें अनंतभट्ट चितळे, दामोदरसरस्वति, माधवसरस्वति, गुजराथ येथील गोविंद द्विवेदी, दक्षिणेंतील वेदांताचे अध्यापक आचार्यभट्ट व विश्वनाथ तुलसी, गीतगोविंदाचा टीकाकार, कनोज येथील शंकर मिश्रशर्मा वगैरे होते. वरील माधवसरस्वति हा मधुसूदनसरस्वतीचा गुरु होय; हल्लींच्या दर्भंगा राज्याचा मूळ संस्थापक व ‘ तत्त्वचिंतामण्यालोकदर्पण ’ या ग्रंथाचा कर्ता मिथिला येथील रहिवाशी महेश ठक्कर हाहि रामेश्वरभट्टाचाच शिष्य होय. याशिवाय त्याच्या शिष्यवर्गांत द्रविड, गुर्जर, कान्यकुब्ज, माल्व, व्रज, हिमालय, कर्नाट, उत्कल, कोंकण, गौड, आंध्र, मथुरा, कामरूप, वगैरे प्रांतांतील लोकहि होते असा सदर ग्रंथांत उल्लेख आहे. परंतु वर्णनाच्या ऐन बहारींत आलेल्या ग्रंथकर्त्याच्या कल्पनामय अतिशयोक्तीच्या ओघाचा भाग यांत किती आहे व वस्तुस्थितिवर्णन किती आहे, याची निवड करणें जरासें कठीणच जाईल.

नारायणभट्ट हा आपल्या बापापेक्षांहि विद्वान् निघाला. श्रुति, स्मृति व षड्दर्शनें या सर्वांचें त्यानें अध्ययन केलें. पूर्वेकडील पंडितांशीं मोठमोठे वाद करून धार्मिक बाबतींत त्यानें दाक्षिणात्य कल्पनांचा श्रेष्ठपणा त्यांच्या मनावर बिंबविण्याचा प्रयत्न केला. गया, काशी, प्रयाग या तीन क्षेत्रांत यात्रेकरूनें पूजाअर्चा व विधि कसे करावे यासंबंधींचा ‘ त्रिस्थलीसेतु ’ नामक ग्रंथ यानेंच लिहिला असें म्हणतात. नारायणभट्ट हा अकबराचा प्रसिद्ध प्रधान तोडरमल्ल याशीं समकालीन होता. तोडरमल्ल हा विद्येचा मोठा भोक्ता व आश्रयदाता असे. त्यानें स्मृति, ज्योतिष व वैद्यक यासंबंधानें संग्रहग्रंथ लिहविले होते. तो बरेच दिवस बंगालचा सुभेदार होता; यामुळें बंगाली पंडितांशींहि त्याचा परि-

चय असे. दिल्ली येथें असतांना तोडरमल्ल यानें एके प्रसंगीं श्राद्धकर्मास बंगाली पंडित बोलाविले होते व त्या प्रसंगीं नारायणभट्ट यासही निमंत्रण केलेलें असून, त्या वेळीं नवद्वीप येथील प्रख्यात पंडित विद्यानिवास बॅनर्जी व त्याच्या बाजूचे गौड आणि मैथिल पंडित यांच्याशीं नारायणभट्टानें मोठा वाद करून जय मिळविला, असेंहि या ग्रंथांत लिहिलें आहे. श्रीरामचंद्राच्या यशाची कल्पना येण्यास रावणाच्या ऐश्वर्याची कल्पना आधीं येणें जरूर आहे असें म्हणतात तें कांहीं खोटें नाहीं. त्याचप्रमाणें नारायणभट्टाची विद्वत्ता लक्षांत येण्यास पंडित विद्यानिवास यांची थोडी माहिती सांगणें जरूर आहे. विद्यानिवास बॅनर्जी यांचेंही घराणें विद्वत्तेच्या कारणामुळें फार नामांकित होतें. विद्यानिवासाचा बाप विद्यावाचस्पति बॅनर्जी हें एवढें प्रचंड धेंड होतें कीं, 'त्याच्या पायांवर तद्देशीय राजे लोकांचे रत्नजडित मुकुट लोळत असत!' अर्थात् या कविवर्णनांतील ग्राह्यांश तेवढाच आपण घेऊं. पण दुसरी एक गोष्ट निर्विवाद आहे कीं, निदान विद्यानिवास बॅनर्जी हे प्रसिद्ध पंडित होते. सर्व हिंदुस्थानभर मान्य असलेला न्यायग्रंथ—भाषापरिच्छेद—हा त्यांच्या दुसऱ्या मुलानें लिहिलेला आहे, व त्यांचा तिसरा मुलगा अंबर येथील मानसिंहाचा मुलगा राणा भावसिंह याच्या दरबारीं पंडित होता. वरील गोष्टींवरून विद्यानिवास बॅनर्जी यांच्या घराण्याचा लौकिक कळून येतो. परंतु प्रस्तुत मुद्दा इतकाच कीं, या विद्यानिवास बॅनर्जीचा नारायणभट्ट यानें वादांत पराजय केला होता. वादाचा मुद्दा ग्रंथांत वर्णन केला आहे, तो विशेष उदात्त आहे असें म्हणवत नाहीं; तो बराच गौण होता. म्हणजे श्राद्धविधीमध्यें सजीव ब्राह्मणरूप पितरांना पितृस्थानीं बसवून भोजन घालावें किंवा त्यांच्या ऐवजीं दर्भाचे पितर मांडून चटश्राद्ध करावें ? हा होता. वादाचें कारण असें दिसतें कीं, बंगाली पंडितांच्या मतें कलियुगांत भोजन घालण्यास योग्य असे सत्पात्र ब्राह्मण मिळणें अशक्य आहे; सबब प्रत्यक्ष ब्राह्मणभोजन घालण्याविषयीं पुराण ऋषींची आज्ञा असली तरी, ती कलियुगांत शब्दशः पाळूं नये. नारायणभट्टाचें मत याविरुद्ध होतें; व चटमूर्तीपेक्षां कलियुगांतील असत्पात्र ब्राह्मण झाला तरी तोच श्रेष्ठ असें दाक्षिणात्य पंडितांचें मत असून तेंच नारायणभट्टानें बंगाली पंडितांकडून अखेर कबूल करावयास लावलें असें दिसतें.

नारायणभट्ट यांची शिष्यपरंपरा मोठी होती. पैकीं ब्रह्मेंद्रसरस्वति व

नारायणसरस्वति ही जोडी बरीच प्रसिद्ध आहे. या नारायणसरस्वतीनें सोळाव्या शतकाच्या अखेरीस बरेच वेदांतग्रंथ लिहिले. स्वतः नारायण–भट्टाच्या ग्रंथांपैकीं दक्षिणेकडे चालू असलेला 'धर्मप्रवृत्ति' व उत्तरहिंदुस्थानांत चालू असलेला 'प्रयोगरत्न' हे दोन ग्रंथ स्मृतिसंबंधानें आहेत. वृत्तरत्नाकरावर त्यानें एक टीका लिहिलेली असून 'वृत्तरत्नावली' हा स्वतंत्र ग्रंथ त्यानें लिहिला आहे. ऑफ्रेट यानें आपल्या संस्कृत ग्रंथांच्या यादींत नारायणभट्टाचे अनेक ग्रंथ नमूद केलेले आहेत; त्यांत कांहीं मीमांसाग्रंथ, शास्त्रदीपिकेवरील टीका आणि माधवाचार्यांच्या कालनिर्णयासंबंधाच्या कारिका आहेत. नारायणभट्ट हा मोठा गृहस्थाश्रमी असून संन्यासाश्रमाच्या विरुद्ध असे. वेदांत विषयांवर अनेक संन्याशांशीं त्यानें वाद केले होते. वाद करून त्यानें पराभूत केलेल्या संन्याशांपैकीं नृसिंहाश्रम, उपेंद्राश्रम व मधुसूदन-सरस्वति हे होत. नारायणभट्टाची मोंगलदरबारांतहि ख्याती होती. मोंगल सुभेदाराच्या विनंतीवरून एके वेळीं 'चोवीस तासांत पाऊस पाडवून त्यानें अवर्षणाची आपत्ति नाहींशी केली' असें म्हणतात ! व या त्याच्या कामगिरीबद्दल काशी येथील, शंभर वर्षांपूर्वी मुसलमानांनीं उध्वस्त केल्या-मुळें पडीक झालेल्या, श्रीविश्वेश्वराच्या देवालयाचा जीर्णोद्धार करण्याची परवानगी त्यास देण्यांत आली ! निदान, हल्लीं अर्धी मशीद व अर्धें देऊळ अशी जी इमारत बनारस येथें विश्वेश्वराचें मंदीर म्हणून दृष्टीस पडते, तिच्यांतील देवळाचा भाग नारायणभट्टानें बांधलेला होय हें निर्विवाद आहे. नारायणभट्टानें आपल्या मागें स्वकर्तृक ग्रंथांशिवाय, ग्रंथसंरक्षणाच्या दृष्टीनें लेखकांकडून उतरवून घेतलेले असे बरेच ग्रंथ ठेविले. नारायणभट्टाचा वडील मुलगा रामकृष्णभट्ट हाहि विद्वान् असून 'जीवत्पितृकनिर्णय,' 'कोटिहोमादिपद्धति', 'ज्योतिष्ठोमपद्धति', 'मासिकश्राद्धनिर्णय', 'वास्तुशांति-प्रयोग', 'रुद्रस्नानपद्धति' वगैरे ग्रंथ त्याच्या नांवावर मोडतात. त्याचा दुसरा मुलगा जो शंकरभट्ट याच्या शिष्यवर्गांत मल्लारीभट्ट व भट्टोजी दीक्षित–सिद्धांत कौमुदीचा कर्ता–हे होते. याच शंकरभट्टानें 'धर्मद्वैत-निर्णयचंद्रिका', 'मीमांसबालप्रकाशव्रतमयूख', 'शास्त्रदीपिकाप्रकाश', 'सर्वधर्मप्रकाश' वगैरे ग्रंथ लिहिले.

नारायणभट्टाच्या घराण्यांतील पंडितांप्रमाणें दुसरेहि अनेक पंडित काशी-

क्षेत्रीं प्रख्यातीस आले. त्यांपैकीं विद्यानिधिकवींद्र या नांवाचा संन्यासी हा प्रमुख होता. सर्व पंडितांचा तो पुढारी असून शहाजहान बादशहानें त्याला ' सर्वविद्यानिधान ' अशी पदवी दिली होती. यानेंहि प्रचंड ग्रंथसंग्रह केला होता. ' विद्यानिधान कवींद्र सरस्वति ' अशा ठळक व सुंदर अक्षरांवरून, काशीबाहेर पसरलेले त्याच्या संग्रहांतील ग्रंथ अद्यापि हुडकून काढितां येतात. विद्यानिधानकवींद्र हा नुसता पंडित नव्हता, तर मोठा कर्ता पुरुषहि असे. त्याच्यावेळीं काशी व प्रयाग येथें जाणाऱ्या यात्रेकरूंकडून कर वसूल केला जाई, व त्यामुळें त्यांस त्रास होत असे. यात्रेकरूंचें हें दुःख पाहून विद्यानिधिस्वामी बरोबर अनेक पंडित वगैरे घेऊन काशीहून आग्रा येथें गेला. आग्र्यास शहाजहान बादशहा त्यावेळीं राहत असे. बादशहाची दिवाणी—आममध्यें गांठ घेऊन हिंदु यात्रेकरूंची वकिली त्यानें इतक्या उत्कृष्ट रीतीनें केली कीं, एका वर्णनपटु लेखकानें वर्णिल्याप्रमाणें ' बादशहाच्या दरबारांत बसलेले इराख, इराणा बदकशन, बल्क, काबूल, कंदाहार, काश्मीर, पंजाब, सिंध वगैरे देशचे अमीरउमराव विद्यानिधीचें वक्तृत्व व त्याचें वकिलीचातुर्य पाहून गार होऊन गेले ! आणि अखेर शहाजहान व राजपुत्र दाराशेखो यांना दया येऊन त्यांनीं हिंदू यात्रेकरूंवरील कर माफ केल्याचा हुकूम दिला. निवृत्ति व प्रवृत्ति यांचा स्वतःच्या चारित्र्यांत सुंदर मेळ घातलेल्या विद्यानिधिस्वामीनें ज्या दिवशीं बादशहाकडून कर माफ करवून यात्रेकरूंचें दुःख निवारण केलें तो दिवस सर्व हिंदुस्थानांतील लोकांस आनंदकारक झाला ! याच प्रसंगीं बादशहानें स्वामीस ' सर्वविद्यानिधि ' हा किताब दिला. अशा रीतीनें यश मिळवून आल्याबद्दल सर्व हिंदुस्थानांतून त्याजवर मानपत्रांचा वर्षाव झाला. यांपैकीं शंभर मानपत्रांचा एकानें संग्रह केलेला असून तो कलकत्त्याच्या एशियाटिक सोसायटीच्या ग्रंथसंग्रहालयांत अद्यापि पहावयास सांपडतो.

नारायणभट्ट व विद्यानिधि यांच्यानंतर काशी येथें प्रख्यातीस आलेले दक्षिणी पंडित म्हटले म्हणजे गागाभट्ट हे होत. यांना विश्वेश्वरभट्ट असेंहि नांव होतें. गागाभट्ट हे नारायणभट्टाचेच वंशज होत. त्यांचा बाप, चुलते व चुलत भाऊ, हे सर्व ग्रंथकार होते. परंतु गागाभट्टाची पायरी या सर्वांवरची होती. गागाभट्टांनीं मीमांसा, अलंकार व वेदांत यांवर ग्रंथ लिहिले. जैमिनीय सूत्रांवर त्यांनीं टीका लिहिली. तसेंच कुमारिलभट्टानें शाबरभाष्याची टीका जेथें

सोडून दिली होती तेथून ती पुढें सर्व गागाभट्टानें पुरी केली. पण ग्रंथकार या नात्यापेक्षां श्रीशिवाजी महाराजांचा अभिषेककार या नात्यानें गागाभट्टाची कीर्ति अधिक दुमदुमत आहे. शिवाजीमहाराज उदयास येण्याच्या पूर्वीच्या निराशामय काळांत राजाश्रय फारसा नसतांहि, दक्षिणी पंडितांनीं आपल्या विद्येचें तेज सर्व हिंदुस्थानभर पसरविलें होतें. त्या तेजाला, शिवाजी महाराजांनीं स्वराज्य स्थापून महाराष्ट्रीयांचा माथा उजळ केल्यावर, अधिकच लकाकी यावी हें अगदीं स्वाभाविक आहे. शिवाजीमहाराजांनीं अभिषेकाला गागाभट्टास बोलाविलें तें केवळ तो विद्वान् ब्राह्मण होता, व काशीच्या पंडितांत अग्रगण्य होता म्हणून नव्हे; तर विशेषतः तो दक्षिणी—महाराष्ट्रीय होता म्हणून. नैर्ऋत्येकडील राजैश्वर्यमंडित वीर्यशाली मराठे आणि ईशान्येकडील क्षेत्रांतील विद्यैश्वर्यमंडित तेजस्वी ब्राह्मण, या उभयतांनीं सतराव्या शतकांत जोडलेलें कीर्तिमंडळ हें भारत—पुरुषाच्या शरीरावरील पवित्र यज्ञोपवीतच होतें, अशीहि उत्प्रेक्षा शोभेल.

गागाभट्टानंतर उदयास आलेला दक्षिणी पंडित नागोजीभट्ट हाहि सर्वशास्त्रपारंगत होता. टीकाकार या नात्यानें नागोजीभट्टानें सनाथ केलें नाहीं, असें एकहि शास्त्र सांपडावयाचें नाहीं. तीर्थ, तिथि, योग, मीमांसा, रामायण, सांख्य, वेदांत वगैरे विषयांवर याचे ग्रंथ आहेत. तथापि, पाणिनीय व्याकरणावर टीकारूप लिहिलेले ग्रंथ विशेष श्रेष्ठ व सर्वमान्य आहेत. नागोजीभट्टानें शेंकडों विद्यार्थ्यांस विद्येच्या मार्गास लावून नांवारूपास आणलें; व यासंबंधाच्या दंतकथा काशीस लोक अद्यापि सांगतात. सन १७७५ च्या सुमारास, म्हणजे बनारसचें देशी राज्य जाऊन तें शहर कंपनी सरकारच्या हातीं जाण्याच्या सुमारास, नागोजीभट्ट हा वारला. औंध-प्रतापगडच्या राजानें नागोजीभट्टाचा योगक्षेम अखेरपर्यंत चालविला होता. त्याचाच शिष्य वैद्यनाथ पायगुंडे अथवा अन्नंभट यानें व्याकरण व स्मृति या विषयांवर अनेक ग्रंथ लिहिले आहेत. मिताक्षरेच्या व्यवहारखंडावरील त्याची टीका हा तिकडील स्मृतिग्रंथ लावण्याच्या कामीं मूर्धाभिषिक्त अधिकारी ग्रंथ या नात्यानें ब्रिटिश न्यायकोर्टांतून मानला जातो. सन १७९१ सालीं बनारस कॉलेजाची स्थापना झाली, त्या वेळीं त्यांतील प्रोफेसर दक्षिणी पंडितच होते व अजूनहि त्या कॉलेजच्या शिक्षकवर्गामध्यें दक्षिणी पंडितांचें प्रस्थ बरेंच आहे.

काशी येथें प्रसिद्धीस आलेल्या वरील दक्षिणी पंडितांखेरीज आणखीहि कांहीं दक्षिणी घराणीं होतीं. शेषाचार्यांचें घराणें हें वास्तविक मूळचें तैलंगी ब्राह्मणाचें. तथापि सर्व बाजूंनीं तें दक्षिणी ब्राह्मणासारखेंच होतें असें म्हणण्यास हरकत नाहीं. दुसरें घराणें धर्माधिकारी यांचें. या घराण्याचा संस्थापक नारायणभट्टांच्या घराण्याच्या मूळ पुरुषाच्या आगेंमागें म्हणजे सन १५२२ च्या सुमारास काशीस जाऊन राहिला असावा. तिसरें घराणें भारद्वाज यांचें. या भारद्वाज घराण्याचा मूळ पुरुष महादेवभट्ट. हा नारायणभट्टाच्याच एका वंशजाचा जांवई होता. यानेंच सिद्धांतमुक्तावलीवरील दिनकरी नांवांची टीका लिहिली. या घराण्यांतील एक वंशज महामहोपाध्याय दामोदरशास्त्री हे बनारस येथील कॉलेजांत आणि महामहोपाध्याय गोविंदशास्त्री हे कलकत्ता येथील संस्कृत शाळेंत अध्यापक होते. चवथें घराणें पायगुंडे यांचें वर सांगितलेलें. पांचवें घराणें चौधरी ऊर्फ चतुर्धर यांचें. याच घराण्यांतील नीळकंठ चतुर्धर याची भारतावरील टीका प्रसिद्ध आहे. सहावें घराणें पुणतांबेकर यांचें. यांतील महादेव शास्त्री यांनीं दीधितीवरील भावानंद सिद्धांतवागीश यांच्या टीकेवर उपटीका केली आहे.

हीं सर्व घराणीं व त्यांतील विद्वान् पंडितांनीं लिहिलेले ग्रंथ हा महाराष्ट्रीयांस निरंतर अभिमानाचा विषय होऊन राहील यांत शंका नाहींच. पण पंडित हरप्रसादशास्त्री हे स्वतः बंगाली असून त्यांनीं महाराष्ट्रीय पंडितांच्या कीर्तीची थोरवी अशा प्रांजलपणानें गाइली, ही गोष्ट त्यांच्या विद्वत्तेस अत्यंत भूषणास्पद होय.

# महाराष्ट्रांतील कांहीं पंडित-घराणीं

मागील लेखांत बनारसेकडील दक्षिणी पंडितांची परंपरा आम्हीं नागोजीभट्टापर्यंत आणून सोडली आहे. नागोजीभट्टानंतरहि ज्यांची योग्यता नागोजीभट्टापेक्षां फारशी न्यून नाहीं असे अनेक विद्वान् झाले आहेत. नागोजीचा प्रसिद्ध खण्डनकार नाना पाठक हा एक गुजराथी पंडित असून त्याचीहि योग्यता फार मोठी आहे. पायगुंडे या नागोजीच्या पट्टशिष्याचे जामात देव,

व विद्यार्थी भैरवमिश्र हेही फार मोठे पंडित होते. किंबहुना या शेवटील काळांत महाराष्ट्रांत उदयास आलेले सर्व पंडित पायगुंडे यांच्या शिष्यवर्गामध्यें मोडतात. पुण्याचे प्रसिद्ध निळकंठशास्त्री थत्ते हे ज्या अहोबल शास्त्र्यांचे विद्यार्थी होत त्या अहोबलांचें अध्ययन ' पायगुंडे यांचे जामाताजवळ जाहलें ' अशी प्रसिद्धी आहे. आज काशीस जीं विद्वद्रत्नें आहेत तीं व कै० महामहोपाध्याय भारद्वाज दामोदरशास्त्री हे सुद्धां, प्रसिद्ध महाराष्ट्र पंडित, एके काळीं पुण्याच्या संस्कृत विद्यालयाचे मुख्य अध्यापक, व महामहोपाध्याय गोपाळाचार्य कऱ्हाडकरांसारख्या विद्वानांचे गुरु जे गोविंदाचार्य अष्टपुत्रे यांचेच शिष्यशाखेंत तयार झाले आहेत. काशीचे प्रसिद्ध पंडित बाळशास्त्री रानडे हे गोविंदाचार्यांचे पुत्र काशिनाथशास्त्री यांचे विद्यार्थी होत; व आज काशीस भूषण असलेले प्रायः सर्व विद्वान् या बालेंद्रसरस्वति ऊर्फ बाळशास्त्री रानडे यांचेच विद्यार्थी होत. तात्पर्य, आज चार पांचशें वर्षें काशीस तयार झालेले जे मोठमोठे पंडित त्यांची परंपरा दक्षिणी पंडितांपासूनच आहे.

नागोजीनंतर नागोजीच्या ग्रंथांचें सयुक्तिक व विद्वन्मान्य असें विवेचन करणारे राघवेंद्राचार्य गजेंद्रगडकर हेहि नागोजीच्या तोडीचेच विद्वान् होते. हे प्रसिद्ध नीलकंठशास्त्र्यांचे विद्यार्थी असून, व्याकरणशास्त्रामध्यें विषमी, त्रिपथगा, प्रभा, वगैरे त्यांचे ग्रंथ फार प्रसिद्ध आहेत. किंबहुना काशीकर मंडळी आज त्रिपथगेस फार मान देतात, व परिभाषेंदुशेखरानंतर त्रिपथगेचें अध्ययन मुद्दाम करवितात. भट्टांच्या घराण्याप्रमाणें या राघवाचार्यांच्या घराण्यांत एकापेक्षां एक जास्त अशीं अनेक विद्वद्रत्नें निर्माण झालीं असून अद्यापहि त्या घराण्यांत संस्कृत विद्याभ्यास चालू आहे. राघवाचार्यांचे पुत्र नारायणाचार्य यांचे वेदान्त व न्याय या विषयांवर फार मार्मिक ग्रंथ आहेत. त्यांचे महावाक्यार्थखण्डन व ब्रह्मानंदीखण्डन हे ग्रंथ फार मोठ्या योग्यतेचे आहेत. यांचेच बंधु रामाचार्य यांनीं प्रसिद्ध भट्ट विष्णुशास्त्री यांनीं केलेल्या त्रिपथगा—खण्डनाचा उद्धार रदोद्भेदिनीनामक टीकेनें केला आहे. मद्रासच्या पुनर्विवाहाच्या वादामुळें सर्वांस परिचित झालेले अनंताचार्य यांचीहि शब्देंदुशेखर या नागोजीचे ग्रंथावर टीका आहे. प्रसिद्ध राघवाचार्यांच्या मनांतून महाभाष्यावर कैय्यटाच्या मंडनार्थ व नागोजीच्या खण्डनासाठीं प्रदीपोद्योतप्रभा नांवाचा ग्रंथ करावयाचा होता व तसा उल्लेख त्यांचे शब्दरत्नावरील टीके-

मध्यें " इदं करिष्यमाणभाष्यप्रदीपोद्यतटीकायां स्पष्टं भविष्यति " हा आहे परंतु त्यांचे कनिष्ठ पुत्र व विद्वत्तेंत वडिलांसहि दिपविणारे वामनाचार्य एका-एकीं वारल्यामुळें तो ग्रंथ जाहला नाहीं, हें संस्कृत विद्येचें दुर्दैव होय. या राघवाचार्यांच्या गीतेवर एक भाष्य असून सर्व उपनिषदें व विष्णुसहस्रनाम यांवर यांच्या टीका आहेत. हा सर्व ग्रंथसंग्रह सदर आचार्यांचे पुस्तक-संग्रहालयांत साताऱ्यास आहे. या काळीं महाराष्ट्रांतील दुसरे प्रसिद्ध विद्वान् विठ्ठलोपाध्याय, हे धर्मसिंधुकारांचे बंधु असून गदाधरीचे प्रसिद्ध टीकाकार कृष्णंभट्ट अर्डे यांचे विद्यार्थी होत. यांचीहि शिष्यपरंपरा फार मोठी असून " माझें हाड व्याकरण सांगेल " असें म्हणणारे, व पुण्याच्या सभेंत " वैय्या-करणकेसरी " असा किताब मिळविलेले कृष्णाचार्य पंढरपूरकर हे त्यांचे शिष्यवर्गांत प्रमुख होत. प्रसिद्ध मेरुशास्त्री गोडबोले व मोरशास्त्री साठे हेहि निळकंठशास्त्र्यांचेच विद्यार्थी असल्यामुळें आज महाराष्ट्रांत आपणास शास्त्री-बुवांचे अनुयायी म्हणविणारा सर्व विद्वद्वर्ग परंपरेनें नागोजीचे शिष्य-शाखेंत मोडतो.

महाराष्ट्रांत पूर्वकाळीं केवळ मोठमोठे पंडित होऊन गेले एवढेंच नव्हे तर त्यांनीं शास्त्राचा प्रसार होण्याकरितां आपणाकडे शिकावयास येणाऱ्या विद्या-र्थ्यांस अहर्निश अध्ययनक्रम सुरू ठेविला होता. यामुळें दूरदूरचे बरेच विद्यार्थी या पंडितांकडे येऊन विद्यार्जन करीत असत; व येथील अध्ययन संपल्यावर आपापल्या देशांत जाऊन गुरूच्या पद्धतीप्रमाणें आपणहि अध्यापन चालवीत असत. प्राचीन पंडितांची विद्वत्ता केवळ त्यांनीं सर्व ग्रंथांचें अध्य-यन केलें, अथवा सभेंत वक्तृत्व, समयसूचकता किंवा पांडित्य दाखविलें एवढ्याच गोष्टींनीं मापली जात नसून, त्यांनीं तयार केलेल्या विद्यार्थ्यांची योग्यता, प्रवीणता व संख्या यांवरून ती ठरवीत असत. या दृष्टीनें आधुनिक विद्वानांपेक्षां त्यांस बराच श्रेष्ठ मान द्यावा लागतो. तेव्हां हीं पंडितांचीं घराणीं म्हणजे कमीजास्त प्रमाणानें पाठशाळाच होत. अशा तऱ्हेच्या पाठशाळेचा वरच्या दर्जाचा मान जगद्गुरूंच्या मठाकडे आहे. शंकराचार्य यांच्या मठांकडे पाहिलें अथवा वैष्णव मठांकडे दृष्टी दिली तर आम्ही म्हणतों याचा प्रत्यय येईल. या मठांत रोज प्रातःकाळीं पूजाअर्चा झाली म्हणजे अद्वैतवेदांत अथवा द्वैतवेदांत यांचे पाठ चालत असतात व इतर शास्त्रांचेंही पाठ सुरू असतात.

मठांत पदारूढ असलेले आचार्य हे त्या त्या कालाच्या परिस्थितीप्रमाणें कमी अधिक विद्वान् असून त्यांचे पाठ व प्रवचन हें मुख्य कर्तव्य मानलें जात असे. या पाठ–प्रवचनांच्या वेळीं जो हुषार विद्यार्थी म्हणून नांवाजला जात असे व जो सुनीत धर्मशील म्हणून सर्वांस पटलेला असे, त्यालाच पुढें पूर्वगुरूच्या अंतसमयीं दीक्षा देऊन पदाधिष्ठित करीत असत. याप्रमाणें या मठांतून योग्य पंडितपरंपरा कायम राहून तेथें अध्ययन-अध्यापन उत्तम रीतीनें चालत असे. मठांतील विद्यार्थ्यांची उत्तम तयारी होत असे यास एक विशेष कारण आहे तें हें कीं, मठांत रोज सायंकाळीं आराध्यदेवतेची पंचोपचार पूजा झाली म्हणजे मंत्रपुष्पाचे वेळीं 'ऋग्वेदसेवामवधारय। सामवेदसेवामवधारय। व्याकरणसेवामवधारय। न्यायसेवामवधारय। वेदांतसेवामवधारय।' इ. इ. अशा रीतीनें सुवर्णदंडधारी अधिकृत पुरुषानें त्या त्या विद्वानांस सेवा करण्यास आव्हान केलें कीं, ते ते पंडित येऊन पूर्वपक्ष उत्तरपक्ष होत. श्रींच्या दर्शनास दूरदूरचे जे पंडित येत असत त्यांची परीक्षेची हीच वेळ असे. तेव्हां त्यांचा व मठांतील विद्वानांचा याप्रमाणें प्रत्यहीं सायंकाळीं वाद होत असे, व त्यांत सरस–निरसाची तेव्हांच पारख होत असे. तसेंच प्रत्यहीं बाहेरच्या पंडितांबरोबर झगडण्याचा प्रसंग येत असल्यामुळें मठांतील विद्यार्थी व गुरु यांची शास्त्रग्रंथाची उपस्थिति सतेज राहत असे. शिवाय श्रींच्या पदरीं उत्तम उत्तम पंडित आश्रय देऊन मुद्दाम ठेवलेले असत. कारण हिंदूंच्या धर्मबाबींसंबंधानें निकालाचें हें 'प्रिव्ही कौन्सिल' असल्यामुळें धर्मशास्त्राच्या निर्णयाकरतां श्रीस असे पंडित जवळ ठेवावेच लागत. तेव्हां ही आचार्यांचीं पीठें म्हणजे विद्यादेवीचीं आद्यमंदिरेंच होत. या घराण्यांत प्राचीन काळीं विद्यारण्य, जयतीर्थ वगैरे पंडित होऊन गेले. प्रस्तुतकालींहि नुकतेच समाधिस्त झालेले शृंगेरीच्या मठाचे व वैष्णव मठाचे स्वामी हे दोघेहि उत्तम विद्वान् होते.

आतां आपण महाराष्ट्रांतील पंडितघराण्यांकडे वळूं. हीं पंडितघराणीं महाराष्ट्रांत 'विनाश्रया न शोभन्ते' या सुभाषिताप्रमाणें राजधानीच्या शहरांतच विशेष आढळून येत. कोल्हापूर, सातारा, पुणें या ठिकाणीं जशीं पंडितांचीं नांवें ऐकूं येतात, त्याप्रमाणें मुंबई, सोलापूर, वगैरे ठिकाणीं ऐकूं येत नाहींत. तसेंच तीर्थांचीं ठिकाणें जीं क्षेत्रें तेथेंही

विद्वानांचा बराच भरणा असे. या दृष्टीनें वाई, नाशिक वगैरे पुराण क्षेत्रांत पंडितांची विशेष संख्या दृष्टीस पडत असे तेंही बरोबरच आहे. कोल्हापूर येथें पंडितराव यांचें घराणें चांगलें प्रसिद्ध असे. या घराण्याची व्याकरण-शास्त्राकडे विशेष दृष्टी होती. सातारा येथें गजेंद्रगडकर, अभ्यंकर, माटे यांची घराणीं फार प्रसिद्ध होतीं. गजेंद्रगडकर यांच्या घराण्यांत राघवेंद्राचार्य यांच्या विद्वत्तेसंबंधानें व बुद्धिमत्तेसंबंधानें लोकांत फार आदर असे. यांची व्याकरण, न्याय, वेदांत व मीमांसा या चारी शास्त्रांत प्रवीणतेसंबंधानें मोठी कीर्ति होती. रघुनाथशास्त्री पर्वते, अनंतशास्त्री पेंढारकर, विष्णुशास्त्री भट इ. इ. विद्यार्थी यांच्याचपाशीं त्या त्या शास्त्रांत प्रवीण झाले होते. आचार्यांचे व्याकरण, वेदांत वगैरे शास्त्रांत सर्वमान्य असे ग्रंथ आहेत. सभेंत वक्तृत्वासंबंधानें यांचा मोठा लौकिक होता. या घराण्याची दुसरी प्रशंसनीय गोष्ट म्हणजे आचार्यांच्या मागें त्यांचे सर्व पुत्र विद्वान् व कीर्तिमान् निघाले. विद्वान् बापाच्या पोटीं अविद्वान् मुलगा निपजावयाचा हा जो सृष्टिकर्त्याचा नियम त्यास हें घराणें अपवाद आहे असें म्हटलें असतां चालेल. आतां या घराण्यांत राघवेंद्राचार्यासारखे सगळेच मोठे पंडित होते असें नाहीं. तथापि वडिलांची कीर्ति घालविणारा मूर्ख असा कोणी झाला नाहीं एवढें खास. गजेंद्रगडकरांच्या घराण्यांत विद्यमान प्रतिनिधि बाळाचार्य हे आहेत व डॉ. भांडारकर सुद्धां यांच्या विद्वत्तेचें कौतुक करतात. अभ्यंकरांचे घराण्यांतहि भास्करशास्त्री यांचा व्याकरणांत लौकिक चांगला असे. भास्करशास्त्री हे निळकंठशास्त्र्यांचे शिष्य असून त्यांची शेखरावर एक टीका आहे. रामशास्त्री गोडबोले, नारायणशास्त्री गोडबोले वगैरे मंडळी भास्करशास्त्र्यांचे विद्वान् विद्यार्थी म्हणून प्रसिद्ध आहेत. त्यांचे नातू वासुदेवशास्त्रीबुवा, फर्ग्युसन कॉलेजांतील शास्त्री व पुण्याच्या पाठशाळांतील मुख्य गुरु, यांचा महाराष्ट्रांत विद्वान् म्हणून आज चांगला लौकिक आहे. त्यांच्या तोडीचा विद्वान् आज महाराष्ट्रांत दुर्मिळ आहे. भाट्यांचें घराणें व्याकरण-शास्त्रांत प्रवीण असे. वाई येथें अष्टपुत्रे, गोडबोले, आगाशे, रड्डी, ऐनापुरे, वळे वगैरे घराणीं पंडितांचीं म्हणून प्रसिद्ध आहेत. अष्टपुत्रे यांच्या घराण्यांत गोविंदाचार्य अष्टपुत्रे हे उत्तम पंडित असत. त्यांचे व्याकरणशास्त्रांत ग्रंथ आहेत. त्यांचे चिरंजीव काशीनाथशास्त्री हेही मोठे पंडित झाले. ते

काशींत जाऊन राहिले. त्यांनीं आपल्या पांडित्यानें तेथील लोकांस जेरीस आणल्यामुळें त्यांस तेथें पंक्तींत पहिलें गंध लावण्याचा मान मिळाला ! तो अद्याप त्यांच्या घराण्यांत चालू आहे. यांचे विद्यार्थी मोठमोठाले पंडित होऊन गेले. गोडबोले यांच्या घराण्यांत मेरूशास्त्री म्हणून उत्तम नैय्यायिक झाले. भिकूशास्त्रीबोवा हेही उत्तम नैय्यायिक होते. हे सांगलीच्या पाठशाळेवर गुरु म्हणून होते. महाराष्ट्रांत जें कांहीं थोडेसें न्यायशास्त्र प्रचलित आहे त्याचें सर्व श्रेय या गोडबोल्यांच्या घराण्याकडे आहे. आगाशे यांच्या घराण्यांत गोपीनाथशास्त्री आगाशे हे उत्तम पंडित होते. रट्टींचें घराणें मूळचें कर्नाटकांतील, परंतु त्यांच्यांतील नरहराचार्य म्हणून एक व्याकरणशास्त्रांत उत्तम पंडित होते त्यांस शाहू छत्रपतींनीं आश्रय देऊन वाई क्षेत्रांत आणलें; व तेव्हांपासून ते सर्व बाजूंनीं दक्षिणी बनले. या घराण्यांत व्याकरणशास्त्राचें अध्ययन, अध्यापन परवापर्यंत चालू होतें. ऐनापुरे, वळे वगैरे घराणीं अगदीं अलीकडचीं आहेत. परंतु यांच्या घराण्यांत भिकाचार्य ऐनापुरे व जनार्दनाचार्य वळे हे उत्तम वैय्याकरण होते.

पुणें शहरीं थत्ते यांचें घराणें फार नामांकित असे. सदाशिवशास्त्री थत्ते यांचें पांडित्य कांहीं अद्वितीय होतें. यांचे विद्यार्थी राघवेंद्राचार्य गजेंद्रगडकर, कुप्पाशास्त्रीबोवा द्रवीड, मोरुशास्त्री साठे इ. इ. मोठमोठीं नामांकित विद्वद्रत्नें होऊन गेलीं. थत्तेशास्त्रीबोवांच्या तोडीचे विद्वान् महाराष्ट्रांत कोणी नव्हतेच म्हटलें तरी चालेल. व्याकरणांतील प्रसिद्ध पंडित नागोजीभट्ट यांचे ग्रंथ याच शास्त्रीबोवांनीं महाराष्ट्रांत प्रचलित केले व ते अद्याप चालू आहेत. महाराष्ट्रांत व्याकरणविद्येचें जें ऊर्जित स्वरूप आहे त्यास हे शास्त्रीबोवाच मुख्य कारण आहेत. हे सर्व शास्त्रांत प्रवीण असत, परंतु यांचा भर व्याकरणावर विशेष असे. पुण्यांतील भटांचें घराणेंही व्याकरणशास्त्रांत प्रवीण म्हणून प्रसिद्ध असे. यांचें व्याकरणशास्त्रांत ग्रंथ आहेत. यांच्या घराण्यांतील पुढची मंडळी ग्वाल्हेर, इंदूर वगैरेकडे गेली व तेथें त्यांनीं लौकिक मिळविला. पंढरपूर क्षेत्रांत कृष्णाचार्य पंढरपूरकर विठ्ठलोपाध्ये हे उत्तम पंडित असून सर्वमान्य असत. विठ्ठलोपाध्यांचे बंधु बाबापाध्ये यांनीं धर्मशास्त्रांत ' धर्मसिंधु ' म्हणून आपल्या बंधूच्या साहाय्यानें ग्रंथ लिहिला. तो हल्लीं सर्वमान्य असा झालेला आहे. नाशिक क्षेत्रांत मोडक,

फडके, गर्गे हीं घराणीं विद्वानांचीं म्हणून प्रसिद्ध आहेत. यांत मोडक हे साहित्यशास्त्रांत प्रवीण असून पुढील दोन्ही घराणीं व्याकरणशास्त्राविषयीं प्रसिद्ध आहेत. विशेषतः मोडक हे साहित्यशास्त्रावरील ग्रंथकार म्हणून प्रसिद्ध आहेत. नागपुरांत सदाशिवशास्त्री घुले, भट्टजीशास्त्री घाटे वगैरे मंडळी व्याकरणशास्त्रांत प्रतिभासंपन्न असत. सदाशिवशास्त्री घुले यांसही वैय्याकरण-केसरी म्हणत असत. यांची परिभाषेंदुशेखरावर उत्तम टीका आहे.

श्रीक्षेत्र कऱ्हाड येथें शास्त्रीपंडितांचा जरी विशेष भरणा दिसून येत नाहीं, तथापि तेथें सरस कवि म्हणून नांवाजलेले विठोबा अण्णा दप्तरदार उदयास आले. अण्णांची संस्कृत व प्राकृत पद्यें हीं महाराष्ट्रांतील हरिदासांना, कथेंत चमत्कृति उत्पन्न करून श्रोतृवर्गास प्रमुदित करण्याचीं साधनेंच झालीं आहेत. यांचा सुश्लोकलाघव ग्रंथ प्रसिद्ध आहे. अण्णांचें वक्तृत्वहि चांगलें असे असें म्हणतात. गोपाळाचार्य अण्णा कऱ्हाडकर हेही कऱ्हाडचेच राहणारे. यांचा विद्याभ्यास इतर ठिकाणीं झाला व यांचें आयुष्यहि सर्व ग्वाल्हेरीस शिंद्यांचे आश्रित म्हणून गेलें. तथापि हे मूळचे कऱ्हाडचे राहणारे म्हणून या क्षेत्रास मान आहे. हे आधुनिक मंडळींत प्राचीन रीतीचे पंडित म्हणून नांवाजलेले होते. यांची व्याकरणशास्त्रांत उपस्थिति फार तीव्र असे, पण इतर शास्त्रांतील प्रमेयेंही यांस अवगत होतीं. श्रीक्षेत्र माहुली येथें कुंभारे, गोडबोले वगैरे घराणीं विद्वान् म्हणून प्रसिद्ध आहेत. परंतु प्रस्तुत काळीं रामशास्त्रीबोवा गोड-बोले याशिवाय कोणी पंडित म्हणून प्रसिद्ध नाहीं. येथील प्रभुणे यांच्या घरा-ण्यास मोठा मान आहे. पेशव्यांच्या दरबारचे रामशास्त्रीबोवा प्रभुणे हे येथील राहणारे होते. यांची विद्वत्ता व लौकिक इतिहासज्ञांस अवगत आहेच. या-शिवाय सुरतचे भट्ट यज्ञेश्वर दीक्षित, मुंबई येथील प्रसिद्ध विद्वान् राजारामशास्त्री बोडस झळकीकर वगैरे कांहीं मंडळी प्रसिद्धच आहेत. प्राचीन तऱ्हेनें विद्या संपादन करून आपल्या बुद्धिमत्तेनें अर्वाचीन विद्येंत ज्यांनीं लौकिक संपादन केला अशा मंडळींत प्रमुखत्वानें कृष्णशास्त्री चिपळूणकरांची गणना होते. यांनीं मोरशास्त्री साठे यांजपाशीं न्यायशास्त्राचें अध्ययन करून नंतर पुढें इंग्रजी विद्येचा व्यासंग केला. आधुनिक विद्वानांस शास्त्रीबोवांच्या पांडित्याची ओळख करून देण्यास आमची अपेक्षा नाहीं. त्यांचे ग्रंथ, त्यांची योग्यता सर्वांच्या प्रत्ययास आणून देत आहेत.

असो; हें विद्वत्तर्पण संपवितांना एक गोष्ट सांगितली पाहिजे ती ही कीं, हिंदुस्थानच्या सर्वच भागांत सर्वच शास्त्रांचें सारखेंच अध्ययन होत आलें आहे असें नाहीं. अनेक कारणांमुळें दरएक प्रांतांत विशिष्ट शास्त्राचीच परंपरा मुख्यतः प्रचलित असलेली आढळून येते. इतर शास्त्रांचा सर्वस्वीं लोपच असतो असा प्रकार नाहीं. पण त्यांतल्यात्यांत आवड–निवड, आदर–अनादर, मुख्य–गौण असा विवेक दिसून आल्या-शिवाय रहात नाहीं. या दृष्टीनें पाहतां असें आढळेल कीं, बंगाल्याकडे न्यायशास्त्राच्या अध्ययनाला प्राधान्य असे. महाराष्ट्राला व्याकरणशास्त्र फार प्रिय आहे, पण त्याजबरोबर वेदांताचेंही अध्ययन असतें. कर्नाटकांत न्याय व द्वैत-वेदांत विशेष भक्तीनें पढला जातो; मद्रासेकडे श्रौत व अद्वैत वेदांत विशेष प्रचलित आहे. तैलंगणाकडे श्रौत व वेदपठण यांजवर फार भर असतो. आणि जयपूर, काश्मीर वगैरेकडे साहित्यशास्त्राचें अध्ययन जितकें होतें तितकें दुसऱ्या कोणत्याहि प्रांतांत होत नसे. खुद्‌ काशीस मात्र सर्व शास्त्रांचें अध्ययन-अध्यापन होत असे; आणि या ठिकाणीं मात्र प्रत्येक शास्त्रांतील पंडितांच्या परंपरेचा सुगावा लागतो. असो; अशा रीतीनें या दोन लेखांत पंडितपरंपरेचें जें थोडेंसें दिग्दर्शन केलें आहे, त्याच्या योगानें जुन्या पंडितगिरींतील नमुने-दार पंडितरत्नांची आपणांस आठवण होऊन त्यांचें तेज व त्यांची कीर्ति हीं आधुनिक पद्धतीनें शिकलेल्या विद्वानांच्या बरोबरीची होतीं हें लक्षांत येईल. आजच्या काळीं राममोहन रॉय, भांडारकर, तेलंग, टिळक अशा नांवांना विद्वत्तेच्या दृष्टीनें जो मान आहे, तोच मान पूर्वकाळीं आम्ही वर दिलेल्या कांहीं कांहीं नांवांना होता; एवढेंच नव्हे तर आपल्या ग्रंथकर्तृत्वाच्या योगानें त्यांनीं आपली मान्यता केवळ दंतकथामिश्रित कीर्तीवर अवलंबून न ठेवतां, वाटेल त्या काळीं वाटेल त्यानें आपल्या कृतींचें परीक्षण करून ती कसास लावून पहावी अशा अढळपदावर ती बसविली आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं.

# संस्कृत विद्या व राजाश्रय

जुन्या संस्कृत पंडितगिरीच्या परंपरेसंबंधानें जी माहिती आम्ही पूर्वी एक दोन लेखांत दिली ती पुष्कळ लोकांस पसंत पडली, असें आम्हांस आलेल्या अनेक पत्रांवरून दिसून आलें. आम्हीं दिलेल्या माहितींत भर टाकण्याच्या हेतूनें कित्येक सद्गृहस्थांनीं या विषयावर आम्हांस पत्रें लिहिलीं. आम्हीं स्वतः दिलेली माहिती अगर वरील पत्रांतून आलेली माहिती एवढ्यानें या विषयास पूर्णता आली असें आम्हांस वाटत नाहीं. तथापि, या लेखांनीं जुन्या पंडितगिरीच्या संबंधानें माहिती कां व कशी गोळा करावी याची दिशा वाचकांस समजल्यास आमचा हेतु एका दृष्टीनें तरी पूर्ण झाल्याचें आम्हांस समाधान वाटेल. पण ही माहिती कितीही मनोरंजक व उपयुक्त असली तरी प्रस्तुत लेखमालेंतील विषयाचें तें केवळ एक अंग होय, हें विसरतां कामा नये. मुख्य विषय म्हटला म्हणजे असा कीं, संस्कृत विद्या सर्वस्वीं बुडण्याच्या बेतांत एक वेळ आली होती, परंतु लवकरच तद्विरुद्ध प्रतिक्रिया होऊन हल्लीं अनेक अंगांनीं तिचें पुनरुज्जीवन होऊं लागलें आहे; सुदैवानें खुद्द सरकारासहि हें पुनरुज्जीवन व्हावें असें वाटूं लागून, गतवर्षी सिमला येथें कॉन्फरन्स भरवून या इष्ट गोष्टीचा सरकारनें उपक्रमहि केला आहे. तरी हा सरकारचा प्रयत्न व लोकांचा इष्ट हेतु कोणत्या मार्गानें अधिक सिद्ध होईल याचा विचार केला पाहिजे. जुन्या विद्येचें पुनरुज्जीवन होण्यास मुख्य दोन मार्ग दिसतात. एक सरकार व धनिक लोक यांनीं द्रव्यद्वारा उत्तेजन देणें; आणि दुसरा म्हटला म्हणजे, विद्येच्याच अभिरुचीनें स्वतः लोकांनीं उद्योग करणें. यांपैकीं जुनी विद्या व राजाश्रय यांच्या संबंधाचा थोडक्यांत विचार करून, नंतर खाजगी रीतीनें झालेल्या व होणाऱ्या प्रयत्नांचा विचार करण्याकडे आम्हीं वळणार आहों.

संस्कृत विद्येचा व जुन्या पंडितगिरीचा ऱ्हास झाला या गोष्टीविषयीं खेद प्रदर्शित करणें सोपें आहे. पण तिच्या पुनरुज्जीवनास लागणारी खरी मदत करणें हें कोणाही खाजगी व्यक्तीस फारसें शक्य नाहीं. आतां कोणतीही विद्या जागृत राहण्यास केवळ विद्येकरितां म्हणून निरपेक्ष विद्याभ्यास करणारे विद्यार्थी—आजन्म ‘ विद्यार्थी ’ राहणारे विद्यार्थी—हवेतच; आणि तसे

लोक नसतील तर केवळ पैशाच्या जोरावर कोणतीहि विद्या जिवंत ठेवतां येणें शक्य नाहीं. पण मनानें विद्यार्जन करणें हाच जीविताचा मुख्य हेतु मानणाऱ्या लोकांतहि केवळ संन्यासवृत्तीनें जन्म घालविणारे मठवासी ब्रह्मचारी कोणत्याहि समाजांत फारसे मिळणें कठीण. अर्थात् विद्याविषयक असा मुख्य व्यवसाय करणारासहि संसार चालण्यास कांहीं तरी साधन लागतें, व हें साधन धनिक लोक—विशेषतः राजे लोक—जितकें देऊं शकतात तितकें साधारण जनसमाज कसा देणार ? हल्लीं ग्रंथकारांचे ग्रंथ विकत घेऊन लोक विद्येस आश्रय देतात, तसा पूर्वी दक्षिणा देऊन व शिष्टसंभावना करून देण्यांत येई. पण राजाश्रयाची गोष्ट म्हणून कांहीं वेगळीच आहे. " वाणीतुष्टो पिष्टमुष्टिं ददाति। राजा तुष्टो ग्राममेकं ददाति ॥ " अशी जी अर्धखेडवळ म्हण आहे ती अगदीं खरा. खाजगी व्यक्ति देऊन किती देणार? तें एका तळहातानें दिलें आणि दुसऱ्या तळहातानें खर्चलें. तो कांहीं जिवंत झरा नव्हे. राजे लोकांच्या देणग्या मात्र जिवंत झऱ्यासारख्या असतात; व एकाच कुळांत पिढ्यानुपिढ्यापर्यंत पंडितगिरीची परंपरा जुन्या काळीं जी दिसून येत असे, तिचें कांहीं अंशीं कारण हेंच होय. भोजराजाच्या दरबारीं येणारे कवि व पंडित प्रत्येक अक्षरागणीक एक एक लक्ष रुपये देणगीदाखल घेऊन जात हें वर्णन निखालस अतिशयोक्तीचें हें तर उघडच आहे. पण जुने राजे गांवेंचीं गांवें इनाम देत असत, व त्या इनामांच्या जिवावर विद्वान् लोक पिढ्यानुपिढ्या पोसले जाऊन एकाच घराण्यांत विद्येची परंपरा चालण्यास मदत होई हें निर्विवाद आहे. त्या मानानें पाहतां हल्लीं पौर्वात्य विद्येला ' राजाश्रय ' म्हणून काडीचाहि नाहीं.

हिंदुस्थानाला हल्लीं राजा आहे पण राजदरबार नाहीं. गव्हर्नर जनरल हे राजप्रतिनिधि खरे; पण त्यांना स्वतःला तनखा असतो तोच फार मर्यादित. त्यांनाहि राजचिन्हें म्हणून असतात, पण तीं जवळ जवळ बेगडी. राजदरबाराचा म्हणून प्रजेला जो एकप्रकारचा ओलावा मिळावयाचा तो नाहीं. राजदरबारी म्हणून राजप्रतिनिधींचा व लोकांचा जो काय लेव्हीच्या—धूळभेटीच्या—दिवशीं हस्तस्पर्श होईल तेवढाच; व ' गार्डन पार्टी ' सारख्या एखाद्या प्रसंगीं दरबारभूमीच्या चतुष्कोनांत

चहाबिस्किटें किंवा केळयापेरूंच्या डेखांचें काय उच्छिष्ट सांडेल तेवढेंच. फार काय, असेंहि म्हणतां येईल कीं, गव्हर्नर जनरल यांचे भालदार-चोपदार व शिपाई हे लोकांकडून ' पोस्त व बक्षीस ' यांच्या रूपानें सरसालांत जितके रुपये मिळवितात तितके रुपये पौर्वात्य मौलवी, पंडित किंवा विद्यार्थी, भिक्षुक, फकीरफुकरा यांस खुद्द गव्हर्नमेंट हाऊसमधून मिळत नसतील ! खरें म्हटलें तर दरबारी रीतीला शोभण्याला सरकारानें अनेक धर्मानुसार दिवस वगैरे ठरवून दरबारांतून मधून मधून दक्षिणा व देणग्या द्यावयास पाहिजेत. राजा देवाचा अंश व गव्हर्नर–गव्हर्नर जनरल हे राजांश, अशा परंपरेनें हिंदुस्थानांतल्या वरिष्ठ अधिकाऱ्यांच्या अंगीं हिंदुस्थानांतल्या देवता अवतरलेल्या असतात; आणि दरबारसारख्या व लेव्हीच्या प्रसंगीं हे राजांश जेव्हां आपापलीं बहुमानाचीं वस्त्रें परिधान करून येतात, तेव्हां हिंदी लोक निदान भाविक लोक–त्यांच्या ठिकाणीं आपापल्या आराध्य देवतेचें रूप कल्पित असतील अशी उत्प्रेक्षा केल्यास ती सरकारास आजकाल नापसंत होईल असें म्हणवत नाहीं. आतां राजा व प्रजा यांचे धर्म विसंगत आहेत, व खुद्द प्रजाजनांतहि एकच धर्म नाहीं, अनेक आहेत हें खरें. तथापि, ' नाविष्णु: पृथिवीपतिः ' या वचनाची आठवण व ध्यास हल्लींच्या स्थितींतहि हिंदुस्थानांतील लोकांनीं करावा, अशी सरकारची इच्छा दिसते. आणि एकाच शरिरांत कोणा हिंदूला गणपतीच्या शुंडेचा अंगुष्ठ, तर कोणास खिस्ताच्या क्रूसाचें टोंक, तर कोणास अर्धचंद्राची कोर दिसल्यास, या काल्पनिक स्वरूपभेदाचा आरोप आपणांवर झाल्यास तो सोसण्याला अधिकारी आनंदानें तयार होतील. पण एवढ्यानें भागत नाहीं. पूर्वपद्धतीप्रमाणें त्यांनीं प्रजाजनांतील विद्येचा व धार्मिकपणाचा सत्कारहि केला पाहिजे. तीन चार धर्मांच्या प्रजा अमलाखालीं असल्याचा जर अभिमान वाटतो, तर तीन चार धर्मांतील लोकांसंबंधानें त्यांच्या त्यांच्या धर्मरिवाजाप्रमाणें दानधर्म, सत्कार, संभावना सरकारानें करावयास नको काय ? मुसलमान पातशहा वेळीं देवळें व मूर्ति फोडीत; पण वेळीं गांवचे गांव नवीन इनामहि देत. इंग्रज सरकार देवळांचा विध्वंस करीत नाहींत हा त्यांच्या मनाचा थोरपणा आहेच. पण निःपक्षपातीपणाच्या थोर वैभवास प्रत्यक्ष हात–भिजल्या औदार्याची जोड मिळणें

जरूर आहे. जुन्या राजधान्या सजीव करण्यांत मुत्सद्दीगिरी आहे असें सरकारास वाटतें, तर जुन्या विद्या सजीव व सतेज करण्यासहि तशीच मुत्सद्दीगिरी आहे असें कां वाटूं नये? पौर्वात्य विद्या व ख्रिस्तबाह्य धर्म यांची गुंतागुंत आहे, सबब जुन्या विद्येस जें उत्तेजन दिलें तेंच ख्रिस्तबाह्य धर्मास दिलें असें सकृत्दर्शनीं वाटण्यासारखें आहे खरें. पण हिंदी प्रजेच्या दृष्टीनें राजेसाहेबांच्या व तत्प्रतिनिधींच्या ठिकाणीं विष्णुत्व येण्यास त्यांनीं प्रजेच्या दृष्टीनेंच धर्माकडे पाहिलें पाहिजे. "आम्हीं धर्मानें ख्रिस्ताभिमानी असलों तरी तुम्हीं मात्र आम्हांस विष्णूचा अवतार मानलें पाहिजे; प्रजावात्सल्याच्या पायीं आम्ही ख्रिस्ती धर्म सोडून देण्यास तयार नाहीं," असें सरकारचें म्हणणें असेल तर तें आम्हांस मान्य आहे. त्यांनीं आपला स्वतःचा व प्रजाजनांचा धर्म यांना फक्त समसमान लेखावयास तयार असावें इतकेंहि आम्हांस चालेल. गव्हर्नर, गव्हर्नर जनरल हे सरकारी देवळांतून अधिकृत धर्मोपदेशकांच्या प्रार्थनेस व उपासनेस जातात, त्याप्रमाणें त्यांना हिंदी देवालयें व मशिदी यांतून प्रार्थनेस जातां येणार नाहीं हें खरें. तथापि, रविवारीं ख्रिस्ती देवळांतून भिक्षा घातली जाते त्याप्रमाणें हिंदु व मुसलमानी धर्मांच्या विशिष्ट सणावारीं सरकारानें आपले प्रतिनिधि पाठवून धर्मभिक्षा वाढविली तर त्यांचा स्वतःचा धर्म न बुडतां प्रजाधर्मसंगोपनाचें श्रेय खचित मिळेल! गव्हर्नर, गव्हर्नर जनरल यांनीं नित्य प्रातःकाळीं गव्हर्नमेंट हौसमध्यें हातांत पळीपंचपात्रीं घेऊन गोप्रदान सोडून मग चहा पिण्यास किंवा छोट्या हजिरीस बसावें, असें आमचें म्हणणें नाहीं. कारण तें असें करूं लागतील तर बकर–ईदच्या दिवशीं गोप्रदान केल्याबरोबर लगेच कुरबानीचा गोवधहि त्याच हातानें त्यांना करावा लागेल, हें आम्हांस उघड उघड दिसतें! सरकार धर्माकरितां गोरक्षण करण्यास किंवा धर्माकरितां गोवधहि करण्यास तयार नाहीं; व त्यांच्या धर्मनिःपक्षपातित्वाची किंवा धर्मताटस्थ्याची साक्ष देण्यास ही गोष्ट फारच उपयोगी आहे यांत शंका नाहीं. पण खुद्द गव्हर्नरसाहेबांनीं रोज आपल्या हातानें गोप्रदान सोडलें नाहीं तरी त्यांच्या 'आज्ञे'नें एखाद्या राजमान्य हिंदु धर्ममंदिरांत किंवा देवळांत हिंदु अधिकाऱ्यांच्या हातून हिंदु शास्त्री–पंडितांस दक्षिणा किंवा शालजोडी देण्यांत यावी अशी अपेक्षा करण्यांत वावगें काय? जें हिंदुधर्मासंबंधानें तेंच मुसलमानी धर्मासंबंधानें. हिंद

देवळांत ख्रिस्ती लोकांचा प्रवेश होण्यास अडचण तरी पडेल. मुसलमानांच्या मशिदींत ख्रिस्ती लोकांस जाण्यास तितकी अडचणहि पडणार नाहीं, असें आम्हांस वाटतें. पण त्या कामीं सरकारच्या मनांतच असेल तर सवलतीचा दुसराहि एक मार्ग आहे. हिंदु व मुसलमानी धर्माला म्हणून जी मदत सरकारास प्रत्यक्ष करतां येणार नाहीं, ती संस्कृत व मुसलमानी विद्येस म्हणून त्यांना अप्रत्यक्ष करितां येण्यासारखी आहे;. व ख्रिस्ती धर्मानुयायांच्या हातून भिजलेली दक्षिणा हातावर घेण्यास जरी एखादा ब्राह्मण माघार घेईल, तरी कोरडी दक्षिणा, शालजोडी, किंवा ग्रंथछपाईच्या बिलाबद्दल बक्षिसें देण्याकरितां व लायब्ऱ्यांकरितां सरकारांत विकत घेतलेल्या पुस्तकांच्या किंमतीबद्दल एखादा कागदी चेक किंवा तेल–कागदाच्या नोटांचे तुकडे दिल्यास तो ते टाकून देईल असें नाहीं !

धार्मिक बाबतींत सरकार तात्त्विकदृष्ट्या निःपक्षपाती असतांहि निरनिराळ्या धर्मांस हस्तें परहस्तें सरकारकडून काय मदत हल्लीं पोहोंचत आहे हें जातां जातां लक्षांत ठेवण्यासारखें आहे. मुंबई इलाख्यापुरतें पाहिलें तर असें दिसून येतें कीं, १९११–१२ सालीं Ecclesiastical म्हणजे ख्रिस्ती धर्मखातीं सरकारचा खर्च सुमारें ३॥ लक्ष रुपये होणार होता. या ३॥ लक्षांत प्रत्यक्ष धार्मिक विधीकरितां अशी जरी एक पैहि नाहीं तरी बिशप, आर्चडीकन चॅपलेन, क्लर्जिमेन, वगैरे भटजी–मंडळाच्या पगाराकरितां सुमारें तीन लक्ष रुपये खर्च पडतात व अदमासें पन्नास हजार रुपये, ख्रिस्ती देवळें, अधिकारी बिशपचा दौरा, वगैरेसंबंधीं खर्च पडतात. इंग्रज सरकारचा खास असा एक धर्मपंथ आहे व त्यासच राजमान्यता आहे. या पंथाच्या धर्ममंडळावर सर्वांत जास्त पगार खर्च पडतो. पण चर्च ऑफ स्कॉटलंड, रोमन क्याथॉलिक चर्च वगैरे अराजमान्य ख्रिस्तीधर्ममंडळांवरहि पन्नास साठ हजार रुपये खर्च होतात, हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे ! दुसरे पक्षीं हिंदु धर्मांगभूत देवस्थानें, वर्षासनें, दानधर्म व ग्रंथोत्तेजन वगैरे गोष्टींवर त्या सालीं फार तर ३। लक्ष रुपये खर्च होणार होता. यांपैकीं देवस्थानांच्या खातींच बहुतेक म्हणजे २॥ लक्ष रुपये खर्ची पडतात. पर्वती संस्थान १७॥ हजार रु., त्र्यंबकेश्वर ११॥ हजार रु. हीं मोठीं देवस्थानें व पांच हजारांखालचीं किरकोळ देवस्थानें व मशिदी सुमारें २–२। लक्षांचीं अशीं आहेत. पण हीं सर्व देव-

स्थानें जुनीं म्हणजे पेशव्यांच्या वेळेपासूनचीं आहेत. नवीन देवस्थान असें इंग्रज सरकारानें निर्माण केलेलें आढळत नाहीं. वर्षासनें हींच काय तीं जुन्या विद्येच्या प्रसारार्थ अशीं समजावयाचीं. यांचा एकंदर सालिना आकार सुमारें सत्तर हजार रुपये आहे. पैकीं १६।१७ हजार रु. दक्षिणाफंडांतून ठेवलेल्या निरनिराळ्या कॉलेजांतील "फेलोशिप्स" ला जातात. पण ही रक्कम जुन्या विद्येच्या उत्तेजनार्थ असें थोडेंच म्हणतां येईल! ज्योतिर्वेधशाळेस खर्च पड-णारेहि तीन हजार रुपये याच सदराखालीं येतात! पण या वेधशाळेंत जुन्या ज्योतिषशास्त्राच्या ग्रंथांचें एखादें फाटकें पानहि सांपडावयाचें नाहीं! कै. शंकर बाळकृष्ण दीक्षितांसारखा गणिती व ज्योतिर्विद-आर्य ज्योतिषशास्त्राचा इतिहासकार-पण सरकारी ट्रेनिंग कॉलेजांत पोरें पढवितां पढवितां त्याचा जन्म गेला व ७५ रुपयांवर त्याचा पगार वाढला नाहीं! हें जुन्या पंडित-गिरीस उत्तेजन! डायरेक्टर ऑफ पब्लिक इन्स्ट्रक्शन यांच्या मार्फत ग्रंथो-त्तेजनावर खर्चिल्या जाणाऱ्या १३॥ शें रुपयांच्या रकमेचा यांतच अंतर्भाव होतो. पण हे ग्रंथ प्रायः मराठी असतात आणि त्यांतील विषयहि आधुनिक व केवळ शालोपयोगी असेच असतात. जुन्या विद्येस उत्तेजन असें त्यांपासून क्वचितच मिळतें. ब्राह्मणांस दक्षिणा या विशिष्ट सदराखालीं त्या सालच्या मुंबईच्या बजेटांत फक्त चाळीस रुपयांची नोंद आहे! याशिवाय नाहीं म्हणा-वयास 'शास्त्रीय शोध' वगैरेंच्या १०॥ लक्ष रु. खर्चाच्या खात्यांत जुने कागदपत्र वगैरे विकत घेऊन सुरक्षित ठेवण्याच्या कामाकरितां ३ हजार रुप-यांची एक रक्कम आढळते. सर्व हिंदुस्थानाकरितां म्हणून असणाऱ्या पुराण-वस्तुसंशोधनाच्या खात्याकडेहि सालिना कांहीं हजार रुपये खर्च असतो, व त्यांतला कांहीं भाग मुंबई इलाख्याकडे येतो. पण हा खर्च बहुतेक पुराण-वस्तुसंशोधनाकडे होतो; जुन्या पंडितगिरीकडे म्हणजे विद्येचें परंपरानुसार संर-क्षण करणाऱ्या विद्वान् लोकांस उत्तेजन देण्याकडे होतो, असें नाहीं. सारांश, पैशाच्या दृष्टीनें पौर्वात्य विद्येस उत्तेजन देऊन ती जागृत ठेवण्याचा विद्यमान प्रकार हा असा आहे. आतां सिमला कॉन्फरन्सनें सुचविलेल्या योजनेनें ही स्थिति कितपत सुधारेल याचा विचार करूं.

# पुनरुज्जीवनाचा एक मार्ग.

सिमला कॉन्फरन्समध्यें जमलेल्या बहुतेक लोकांस जुन्या पंडितांविषयीं आदरबुद्धि होती हें स्पष्ट दिसून येतें. परंतु जुनी पंडितपरंपरा कायम ठेवण्या-विषयीं योग्य उपाय असे फार थोडे सुचविण्यांत आले असें आम्हांस वाटतें. निदान पंडितांस उत्तेजन येण्याकरितां द्रव्यदृष्ट्या ज्या मार्गांचें अवलंबन करणें जरूर आहे ते कोणीं फारसे सुचविले नाहींत. 'ओरिएंटल इन्स्टिटयूट' स्थापण्यानें संस्कृत विद्येच्या संशोधनास मदत होईल, नाहीं असें नाहीं. परंतु त्या संस्थेंतील शिक्षणाचा सर्व क्रम पाश्चात्य विद्यापद्धतीच्या धोरणावरच बहुधा राहील. हें धोरण डॉ. भांडारकर यांच्या आधींच लक्षांत येऊन त्यांनीं "होतां होईतों सदर संस्था हिंदी विद्यार्थ्यांकरितांच अस्तित्वांत आहे असें समजावें व परदेशीय विद्यार्थ्यांना तींत बिनखर्चीं शिक्षण मिळूं नये" असा आग्रह धरला तो बरोबर होता. पण या संस्थेंत बहुतेक मुख्य प्रोफेसर इंग्रज किंवा युरोपियनच नेमिले जातील अशी भीति वाटते; व मुख्याध्यापका-संबंधानें तर तो युरोपियनच असावा, असें डॉ. भांडारकर यांनीं जें आपलें मत दिलें आहे तें आम्हांस पसंत नाहीं. युरोपियन संशोधनपद्धति आमच्या पद्धतीहून अधिक चांगली असेल, त्याबद्दल आमचें कांहीं एक म्हणणें नाहीं. पण ती पद्धति शिकून तयार झालेला व 'ओरिएंटल इन्स्टिटयूट'चा अध्यक्ष होण्यास लायक असा हिंदी गृहस्थ मिळणारच नाहीं, असें मात्र आम्हांस वाटत नाहीं. जरुरीपुरता युरोपियन शिक्षक आणून त्याजपासून जी काय पद्धत असेल ती शिकून, पुढें त्या युरोपियन शिक्षकाच्या शिकव-णीचें काम नाहीं, म्हणून त्यास परत पाठविल्याचीं उदाहरणें जपानच्या विद्येच्या पुनरुज्जीवनाच्या इतिहासांत आढळतात; व तीच गोष्ट आम्हीं मनांत आणल्यास आम्हांस इकडेहि कांहीं अशक्य नाहीं. पण सिमल्यास झालेल्या ओरिएंटल इन्स्टिटयूट'च्या रचनेंत मुख्य अध्यक्ष व प्रोफेसर हे युरोपियनच असावे व उपशिक्षक हे मात्र देशी लोक असावे असा लेखी निर्बंध घातल्यासारखा दिसतो, तो पाहून स्वाभिमानी वाचकांस कसेसेंच वाटेल; किंबहुना हिंदी लोकांवर अशा रीतीनें मारलेला कायमचा नालाय-कीचा छाप पाहून वाईटहि वाटल्याशिवाय रहात नाहीं. युरोपियन प्रोफेसर

म्हटला म्हणजे त्याचा पगार हिंदी प्रोफेसराच्या पांचपट सहापट असावयाचा हें ठरलेलें! सरकारी शाळाखात्यांत, म्हणजे जेथें राजकीय धोरण प्रभावी असतें, तेथें अशा गोष्टी—असले पंक्तिप्रपंच—असावे हें ठीकच आहे. पण ज्या संस्थेची मूळ कल्पना केवळ विद्येच्या पुनरुज्जीवनासंबंधाची आहे, म्हणजे जेथें केवळ विद्येलाच मान मिळावा—जातिभेद लक्षांत येऊं नये—तेथेंहि सरकारी शिक्षणखात्याचेंच धोरण प्रभावी झाल्यास तें एक नवेंच विषादकारण उत्पन्न होईल असें आम्हांस वाटतें. लायकीप्रमाणें जो इसम मिळेल त्यास जागेचा ठराविक पगारहि मिळावा, आणि युरोपियन व देशी असा भेद त्यांत होऊं नये, हेंच सरळ व न्यायाचें आहे.

युरोपियन संस्कृतज्ञांबद्दल आम्हांला आदरबुद्धि वाटत नाहीं असें मुळींच नाहीं. उलट आम्हांस त्यांजबद्दल विशेष आदर वाटतो; पण युरोपियन म्हटला कीं तो महापंडितच असणार व त्याला देशी संस्कृतज्ञापेक्षां अधिक पगार दिलाच पाहिजे असें मात्र नाहीं. फरक आहे तो इतकाच आहे. पण सरकारी मापानें मोजतांना हा फरक लक्षांत घेतला जात नाहीं. ही दुःखाची गोष्ट होय. या मापानें मोजण्याची वेळ आली कीं, मॅक्समुल्लर व पीटरसन दोघेहि एकाच योग्यतेचे भरणार व दोघांना पगार सारखाच मिळणार! निदान कोणाहि देशी संस्कृतज्ञापेक्षां त्या दोघांनाहि अधिक पगार मिळणार, येवढें त्यांच्यातलें साधर्म्य केव्हांहि रहाणारच! जुन्या पंडितांची महति वर्णन करितांना युरोपियन लोकांनाहि केव्हां केव्हां उदारपणाची उकळी येते हें आम्हांस माहीत आहे. पण आपणा स्वतःपेक्षां एकाद्या जुन्या देशी विद्वान् पंडितास अधिक पगार द्यावा, अशी कोणाहि उदार युरोपियन संस्कृतज्ञानें आजवर शिफारस केल्याचें आमच्या ऐकिवांत नाहीं, हा चमत्कार नव्हे काय? आमचे सेल्बीसाहेब—माजी डायरेक्टर ऑफ पब्लिक इन्स्ट्रक्शन—हे मोठे तत्त्ववेत्ते होते; व केवळ "निर्विकार युक्तिवाद" म्हणून एकाद्या तत्त्ववेत्त्याच्या ऐटीनें ते उघड प्रतिपादन करीत कीं, नेटिवांची राहणीच थोड्या खर्चाची; सबब नेटिवांना युरोपियनाच्या जागेवर नेमून त्याजकडून युरोपियन प्रोफेसराचें काम घेतां येत असलें तरीहि त्याला युरोपियनाच्या दोनतृतीयांश पगार देण्यांत कांहींच अन्याय नाहीं. पण हा युक्तिवाद आम्हांस मुळींच पटत नाहीं. अमुक एका जागेचा पगार इतका असावा असें ठरल्यावर तो कमी खर्च कर-

णाऱ्या नेटिवाला मिळाला तरी सरकारचें त्यांत काय गेलें? युरोपियन प्रोफेसर अधिक पगार घेऊन अधिक खर्च करणार, आणि नेटिवास पगार कमी पण त्याचा खर्चहि कमी असतो; मिळून दोघांची शिल्लक बचत सारखीच पडणार; या युक्तिवादांत कांहीं अर्थ नाहीं. कोणाची शिल्लक किती पडेल या दृष्टीनें सरकार जागांचे पगार ठरवीत नाहीं; तर अमुक एका जाग्याचें काम किती महत्त्वाचें व तें काम करणाऱ्या माणसास किती पगार द्यावा लागेल किंवा देणें बरें दिसेल या दृष्टीनेंच तें तें ठरवितें. असें आहे तर नेटिवानें जास्त पगार मिळवून त्यानें जास्त शिल्लक टाकल्यास त्यांत कोणाचें काय गेलें? अमुक एका दर्जाच्या अधिकाऱ्यानें अमुक एका पद्धतीनें राहणी ठेवली पाहिजे, इतका निर्बंध फार तर सार्वजनिक युक्तायुक्ततेच्या दृष्टीनें सरकारानें घालावा, त्यास हरकत नाहीं. कचेरींत सभ्यपणाचा व ठाकठीक पोषाख करून येणाऱ्या नेटिव गृहस्थाच्या घरींहि प्रत्येक मनुष्याला एक एक नोकर लागत नाहीं; तो घरीं कुत्रीं, घोडीं व कोंबड्यांचीं खुराडीं ठेवीत नाहीं; किंबहुना आपल्या हातानें आपलीं धोतरें स्वच्छ धुतो; मंडईतून आपल्या आवडीची भाजी आपल्या हातानें घेऊन येतो; म्हणून त्याला पगार कमी द्यावा हा न्याय कोठचा? खर्चिक व बिनखर्चिक अशा या दोन पद्धतींत अमुकच चांगलें व अमुकच वाईट असें म्हणण्याचा अधिकार सरकारास आहे, असें आम्हांस वाटत नाहीं.

तूर्त प्रस्तुत विषयापुरतेंच आपण पाहूं. सारख्या सारख्या योग्यतेचे युरोपियन संस्कृतज्ञ व नेटिव पंडित यांच्या पगारांत असा मोठा फरक राहण्याचें कारण नाहीं एवढेंच नव्हे, तर याच्याहि पुढें जाऊन आम्ही असें म्हणतों कीं, पुष्कळ वेळां या दोघांची विद्वत्ता सारखी नसून देशी पंडिताचीच योग्यता निःसंशय अधिक असतांहि त्या बिचाऱ्यास मात्र अत्यल्प पगार असल्याचीं उदाहरणें इकडे कांहीं थोडथोडकीं घडून आलेलीं नाहींत. मुंबई-इलाख्यांत मार्टिन हौ, कीलहार्न, बुल्हर, पीटर्सन वगैरे युरोपियन गृहस्थ संस्कृताचे प्रोफेसर होऊन गेले, यांपैकीं संस्कृताच्या दृष्टीनें पाहतां एकहि गृहस्थ त्याच्या मदतीस असलेल्या पंडितापेक्षां श्रेष्ठ नव्हता! असें असतां या पंडितवर्गासच काय पण डॉ. भांडारकरांसारख्या उभय-भाषाकोविद जाड्या विद्वानासही संस्कृत प्रोफेसरीचा भर पगार मिळणें अशक्य झालें होतें. युरोप-

खंडांत भांडारकरांची कीर्ति पसरलेली असो; पण इकडे तिचा काय उपयोग ? सन १८८१ सालीं हा वाद वर्तमानपत्रांतून उघड रीतीनें झाला होता, व त्या वेळीं कै० न्यायमूर्ति तेलंग यांनीं ' टाइम्स ऑफ इंडिया ' पत्रांत निर्भयपणानें जी टीका केली होती तिची या प्रसंगीं आम्हांस आठवण होते. त्या प्रसंगीं तेलंगांनीं खालीलप्रमाणें उद्गार काढले होते:–" कीलहॉर्न, बुल्हर व मार्टिन हौ यांची विद्वत्ता जरी बरीच होती तरी त्यांच्या संस्कृतज्ञतेसंबंधानें उगाच फाजील स्तोम माजविण्यांत येत आहे. कॉलेजांतून काव्य, नाटक वगैरे जे ग्रंथ विद्यार्थ्यांस शिकविण्यांत येतात त्यांमध्यें, नेटिव्ह विद्यार्थ्यांइतकीहि–ते ग्रंथ मार्मिक व रसिक रीतीनें लावण्याची–पात्रता युरोपियन प्रोफेसरांच्या अंगीं असत नाहीं. महावीरचरित व विक्रमोर्वशीय नाटकांचीं इंग्रजी भाषांतरें किती तरी सदोष आढळतील ! ही नुसत्या काव्य–नाटकादि ग्रंथांची गोष्ट. मग वेदांतभाष्य, सिद्धांतमुक्तावलि, कौमुदी वगैरे गहन शास्त्रीय ग्रंथांविषयीं तर बोलावयासच नको. हे ग्रंथ ते नेटिव्ह पंडितांजवळ न शिकते तर वरील युरोपियन प्रोफेसरांस ते कॉलेजांतील विद्यार्थ्यांस शिकवितां आलेच नसते. पण त्या ग्रंथांत त्यांची स्वतःची परीक्षा जरी घेतली असती तरी तींत ते उत्तीर्ण झाले नसते, असें आम्ही पैज मारून सांगूं शकतों. बहुतेक युरोपियन प्रोफेसरांचा संस्कृताचा अभ्यास इकडे नेमणूक होऊन हिंदुस्थानांत आल्यावर देशी पंडितांजवळ पढूनच झालेला होता. डॉक्टर बुल्हर यांना धर्मशास्त्र कै. विनायकशास्त्री दिवेकर यांनींच विद्यार्थ्यांसारखें पढविलें. तसेंच अनंतशास्त्री पेंढारकरांनीं डॉ. कीलहॉर्न यांस व्याकरण शिकवीपर्यंत तें त्यांस येत नव्हतें. डॉ. पीटरसन यांची विद्वत्ता तर प्रसिद्धच आहे ! त्यांचे विद्यार्थी त्यांच्या चुका वर्गांत काढीत; मात्र त्यांचा स्वभाव गोड असल्यामुळें त्यांच्यासंबंधानें तक्रार वगैरे फारशी होत नसे. पण ध्यानांत धरण्यासारखी गोष्ट ही कीं, पीटरसनसाहेबांच्या हाताखालीं राजारामशास्त्री बोडसांसारखे जाडे शास्त्री होते; व शास्त्रीबुवा प्रोफेसरसाहेबांपेक्षां दसपट विद्वान् असतां त्यांना पगार मात्र प्रोफेसरसाहेबांच्या एकदशांश ! तीच गोष्ट भीमाचार्य झळकीकरांची ! बरें युरोपियन पंडितांच्या अंगीं जो विशेष गुण असतो तो म्हणजे मार्मिक व शोधक बुद्धि. हा गुण कीलहॉर्न व बुल्हर यांच्या अंगीं ते प्रोफेसर होऊन हिंदुस्थानांत येण्याच्या पूर्वीं नव्हता. फार काय पण प्रोफेसरीचें काम करीत असेपर्यंत तो फारसा दिसूनहि आला

नाहीं. इकडे मोठ्या पगाराच्या स्कॉलरशिपवजा मिळालेल्या प्रोफेसरीच्या जागा भोगून, व प्रोफेसरीच्या जागांवर असतांच विद्यार्थ्यांप्रमाणें हाताखालच्या पंडितांच्या हाताखालीं शिकून, युरोपांत परत गेल्यावर त्यांच्या विद्वत्तेचा खरा विकास झाला. म्हणजे ज्या गुणांच्या आरोपावरून युरोपियन प्रोफेसरांनीं इकडे हजारों रुपयांचे पगार खाल्ले ते गुण खरोखर त्यांच्या अंगीं तेव्हां नव्हते व या गुणांचा उपयोग त्यांच्या इकडील विद्यार्थ्यांस मुळींच झाला नाहीं. डॉ. भांडारकर यांनीं सिमला कॉन्फरन्ससंबंधानें लिहिलेल्या एका लहानशा लेखांत असेंच मत दिलें आहे. ( Europeans hitherto appointed in India have not succeeded in instilling the critical and comparative spirit of inquiry among their pupils. ) उलटपक्षीं पंडितांसंबंधानें पहावें तर त्यांच्याविषयीं खुद्द युरोपियन संस्कृतज्ञांच्या मनांतहि फार आदर आहे, असें सिमला कॉन्फरन्सच्या वेळीं अगदीं उघड दिसून आलें. तेथें जमलेल्या सर्वांनीं जुना पंडितवर्ग हा फार उपयुक्त असून हरप्रयत्नानें त्याचें संरक्षण झालें पाहिजे असेंच कबूल केलें. डॉ. थिबू, मि. वेनिस यांनीं तर असें स्वच्छ सांगितलें कीं, ज्या म्हणून युरोपियन विद्यार्थ्याला मूळ संकृत ग्रंथांवरून संस्कृताचा अभ्यास करावयाचा असेल त्याचें पंडितांच्या मदतीशिवाय चालणारच नाहीं. डॉ. भांडारकर, प्रो. गंगानाथ जहा वगैरेंनींहि असाच अभिप्राय दिला आहे व यांत आश्चर्य नाहीं. कारण पंडितांच्या विद्वत्तेची किंमत त्यांना चांगलीच माहीत आहे.

अशी जर स्थिति आहे तर मग पंडितांस पगार पुष्कळ द्यावा अशी सूचना कोणीं कां करूं नये ? पंडिताला इंग्रजी येत नाहीं या त्याच्या अपराधाकरितां पगाराच्या दृष्टीनें त्याला पाताळांत कां लोटावें हें आम्हांस तरी समजत नाहीं. जी गोष्ट कॉलेजांतील शास्त्र्यांची तीच कांहीं अशीं हायस्कूलांतील शास्त्र्यांचीहि आहे. नुक्ताच मुंबई कायदे-कौन्सिलाच्या बैटकींत ना. दादासाहेब करंदीकर यांनीं हायस्कुलांतील शास्त्रीमंडळींच्या पगारासंबंधानें एक प्रश्न विचारला होता. त्यास मुंबई सरकारनें जें उत्तर दिलें होतें, त्यावरून असें दिसतें कीं, या शास्त्री लोकांचे पगार जास्तींत जास्ती साठ रुपयांपर्यंत वाढूं शकतात! व तेहि पंचवीस वर्षांची नोकरी भरण्याच्या वेळीं ! शाळाखात्यांत त्यांच्याहून कमी दर्जाचे जे ड्रॉइंग व पर्शियन भाषा वगैरेंचे

शिक्षक असतात त्यांना जास्तींत जास्त पगार पंचाहत्तरपर्यंत मिळूं शकतो ! व पंचाहत्तर रुपये पगाराच्या असिस्टंट डेप्युटी इन्स्पेक्टरच्या जागांवर त्यांची नेमणूक होऊं शकते. पण संस्कृत शास्त्री लोकांना हा मान आजवर मिळालेला नाहीं व पुढेंहि मिळण्याचा संभव नाहीं, असें सरकारतर्फे दिलेल्या उत्तरावरुन उघड होतें. संस्कृत शास्त्री विद्वत्तेनें पर्शियन टीचर व ड्रॉइंग मास्तर यांच्यापेक्षां बहुधा अधिक विद्वान् असतो हें कोणीहि सांगूं शकेल. तथापि, शास्त्री लोकांस इंग्रजी येत नाहीं आणि ते फक्त जुन्या पद्धतीनें पाठशाळेंत शिकलेले असतात, या सबबीवर त्यांच्या पगाराची मजल साठ रुपयांवर जाऊं न देणें हें न्यायाचें दिसत नाहीं.

शाळांतील व कॉलेजांतील शास्त्री लोकांचे पगार थोडेसे वाढविल्यानें संस्कृत विद्येचें पुनरुज्जीवन पूर्ण झालें, असें कोणीच म्हणूं शकत नाहीं. परंतु कोणत्याहि गोष्टीचें पुनरुज्जीवन व्हावयाचें तें सर्व अंगांनीं व्हावें लागतें; आणि शास्त्री लोकांना मिळणारें वेतन हें संस्कृत विद्येच्या पुनरुज्जीवनाचें एक अंग असल्यामुळें आम्हीं त्याचा या लेखांत विशेष उल्लेख केला आहे. तथापि वर सांगितल्याप्रमाणें संस्कृत भाषेचा अभ्यास केलेल्या युरोपियन पंडितांविषयीं आम्हीं आदरबुद्धि बाळगली पाहिजे यांत संशय नाहीं व असें म्हणण्याचीं कारणें काय याचा आंता विचार करूं.

## संस्कृत विद्या आणि युरोपियन पंडित

संस्कृत विद्येच्या पुनरुज्जीवनाचा सर्व बाजूंनीं विचार करितांना एक महत्त्वाची गोष्ट विसरतां कामा नये. ही गोष्ट म्हटली म्हणजे युरोपियन पंडितांनीं संस्कृत भाषेचा अभ्यास व संस्कृत विद्येचें संशोधन होण्यास केलेली मदत ही होय. या मुद्याचा विचार करितांना कोणीहि आपलें मन प्रथम निर्विकार केलें पाहिजे; म्हणजे केवळ गुणग्राहक बुद्धीनेंच या गोष्टीचा विचार केला पाहिजे. प्रो. मॅकडॉनेलसारखे नाकानें वांगीं सोलणारे व हिंदी पंडितांची निंदा करणारे युरोपियन गृहस्थ भेटले असतां त्यांचें खंडन समर्पक केलेंच पाहिजे, व तें आपण करितोंहि. परंतु अशा तऱ्हेनें आपल्या

बचावासाठीं उत्तरास प्रत्युतर देण्यास आपली तयारी असली तरी, केवळ विद्येच्या हव्यासानें आणि ज्ञानार्जनाच्या गोडीनें आर्यभाषा व आर्यविद्या यांचा अभ्यास करून त्यांजविषयीं आमच्याहि डोळ्यांस न दिसणाऱ्या अशा कित्येक गोष्टी ज्यांनीं दाखविल्या, आणि त्यांच्या संरक्षणार्थ म्हणा किंवा फैलावाकरितां म्हणा अत्यंत परिश्रमानें आम्हीं स्वतः आजवर निर्माण न केलेलीं अशीं साधनेंहि ज्यांनीं निर्माण करून ठेविलीं, त्यांचे गुण—केवळ गुण घेण्याच्या वेळींहि—सढळ मनानें न घेणें हा कृतघ्नपणाचा कळसच होय असें आम्ही मानतों. आम्हांला जशी इंग्रजी भाषा परकी; तशी युरोपियनांना संस्कृत भाषा परकी; आणि परकी भाषेंत कोणी कितीहि निष्णात झाला तरी ज्याच्या हातून एकादी साधारण ढोबळ चूक वेळेस होणार नाहीं असा कोणीहि पंडित—हिंदी किंवा युरोपियन—आढळणार नाहीं ही गोष्ट निश्चित आहे. तथापि, अशी एकादी चूक काढून त्यास निरुत्तर करणें निराळें आणि त्याच्या एकंदर परिश्रमावर व कमाईवर तेवढ्या चुकीच्या आधारावर बोळा फासून त्याला नादान ठरविणें निराळें! असो; संस्कृत विद्येच्या अध्ययनाचा जुना व नवा असे दोन प्रकार प्रसिद्ध आहेत. पैकीं दुसऱ्या प्रकाराचें आचार्यत्व बरेंचसें युरोपियन पंडितांकडे देणें जरूर आहे. हा दुसरा प्रकार म्हणजे चिकित्सक बुद्धीचा व संशोधकपणाचा. आर्यविद्येची विचिकित्सा युरोपियन पंडितांकडूनच विशेष कां व्हावी, व त्यांनाच ती आमच्याहून कांहींशी अधिक कां साधावी, याला अनेक कारणें आहेत. ऐतिहासिक दृष्टीनें कोणत्याहि गोष्टीकडे पाहाणें व तारतम्य भावानें कोणचीहि वाङ्मयात्मक वस्तु तोलून मापून घेणें याचें वळण आमच्यापेक्षां युरोपियन पंडितांस आमच्या आधींपासूनचें आहे. या कारणाचीं कारणें कांहींहि असोत, पण त्याचें कार्य उघड दिसून येतें; व तें हें कीं, संस्कृत भाषेंतील वाङ्मय तपासून तोलून तावून सुलाखून घेतांना युरोपियन पंडित आमच्यापेक्षां निदान कांहीं बाबतींत तरी अधिक निर्विकार दृष्टि राखूं शकतात.

फार जुन्या काळीं युरोपियन विद्वानांना हिंदुस्थानची जी माहिती होती ती फक्त बाह्यांगापुरतीच. हिंदुस्थान म्हणजे एक फार समृद्ध, संपन्न, श्रीमान् देश आहे, इतकीच माहिती प्लिनी, स्ट्राबो, टॉलेमी वगैरे ग्रीक लेखकांना होती. मध्ययुगांत एरियन, इलियन, डियोक्रिसोटोमस् वगैरे लेखकांच्या लेखांतून

हिंदुस्थानांतील आर्य लोकांच्या अंतरंगासंबंधाची माहिती प्रथम दृग्गोचर होऊं लागली. पण " या आर्य लोकांना स्वतःचें वाङ्मय फारसें नसून ते ग्रीक वाङ्मयाच्या आलवालांतून ओंजळीओंजळीनें पाणी घेऊन आपली तहान भागवीत असावे " अशी त्यांची कल्पना असे. या विद्वानांना वाल्मिकि–रामायण माहीत असतें, तर " ईलियडवरून रामायण तयार झालें " या कल्पनेची पहिली आवृत्ति त्याच वेळीं निघाली असती! असो; पोर्तुगीज लोकांनीं हिंदुस्थानास जाण्याचा रस्ता हुडकून काढीपर्यंत युरोपियन लोकांना पौर्वात्य लोकांची कांहींच माहिती नव्हती अशी सर्वसाधारण समजूत आहे; पण ती बरोबर नाहीं. पोर्तुगीजांनंतर डच, डचानंतर इंग्रज अशी परंपरा आहे. पोर्तुगीज लोक जलमार्गानें प्रथम हिंदुस्थानांत आले खरे. तथापि, स्थलमार्गानें इराण व हिंदुस्थान यांचा संबंध युरोपशीं त्यापूर्वींहि येत असे. रोम व हिंदुस्थान यांच्या दरम्यान पहिल्या सहा सात शतकांत अलेक्झांड्रियाच्या द्वारानें दळणवळण होतें; आणि इटालीच्या पलीकडे युरोपच्या वाटेवर फ्रान्स व जर्मनी हे देश असल्यामुळें, पोर्तुगालपेक्षां आधीं या दोन देशांत हिंदुस्थान व इराण यांची माहिती पसरली होती. फ्रान्स व जर्मनी यांना प्रथम पौर्वात्य देशांची केवळ अंधुक अशीच कल्पना होती; तथापि, या देशांविषयीं त्यांना कांहीं विशेष आदर व अद्भुत–रम्यता वाटत असावी; कारण जुन्या फ्रेंच व जर्मन ग्रंथांतून या देशांचें अशाच अर्थाचें वर्णन आढळतें. फ्रेंच आणि जर्मन कविता व गोष्टी यांतील काल्पनिक स्थळें व पात्रें इराण व हिंदुस्थान यांतून केव्हां केव्हां घेतलेलीं दिसतात. बुद्धाच्या गोष्टीवरून ' बर्लोम व जोसाफेट ' ही कथा रचली असावी असें म्हणतात. इसवी सनाच्या सहाव्या शतकापासून युरोपियन प्रवाशांनीं हिंदुस्तानांत प्रत्यक्ष येऊन इकडील माहिती तिकडे प्रसिद्ध करण्याचा क्रम सुरू झाला. या शतकांत आलेल्या प्रवाशाचें नांव कॉसमस ऊर्फ ईंडिको प्ल्यूसटस असें होतें. बेंजामिन टयूडेला हा ११६० च्या सुमारास व त्यामागून मार्कोपोलो हा १२७०–९५ यांच्या दरम्यान इकडे आला हें प्रसिद्धच आहे. त्यानंतर आलेले बरेच प्रवासी इटालियन होते. या प्रवाशांच्या कांहीं खऱ्या व कांहीं काल्पनिक व अद्भुत वर्णनावरून हिंदुस्थानास Mirabilia Mundi 'आश्चर्यभूमि' असें नांव पडलें होतें.

आज जसें वाटेल त्या अद्‌भुत वस्तूला आपण ‘ विलायती ’ हें नांव देतों, त्याप्रमाणें सर्व तऱ्हेचे अद्‌भुत पशुपक्षी, रानमाणसें, दाढीवाल्या बाया, अग्निभक्षक व अग्न्युद्गारक वनस्पति, भविष्योत्तर सांगणारीं व कौल देणारीं पवित्र झाडें—तात्पर्य भोळवट समजुतीनें निर्माण केलेल्या हरएक अद्‌भुत वस्तूचें स्थान म्हणजे हिंदुस्थान व इराण हें होय, अशी युरोपांत कांहीं काळ समजूत होऊन गेली होती. यानंतर पौर्वात्य गोष्टी, दंतकथा वगैरे त्या त्या युरोपियन नामरूपानें सजवून सांगण्यास सुरुवात झाली. बोकेशिओ, स्ट्रॅपेरोला व लाफॉटेन यांच्या ग्रंथांत हें रूपांतर व संक्रमण दिसून येतें. हिंदुस्थानांत व इराणांत—म्हणजे त्या काळीं माहीत असलेल्या अत्यंताद्‌भुत अशा भूमींत—जर्मन कथापुराणांचे धीरवीर नायक जाऊन त्यांनीं तेथें सिंदबाद दर्यावर्दी-प्रमाणें विचित्र साहसें केलीं व संकटें सोसलीं असें वर्णन करणारीं पुस्तकें जर्मन भाषेंत १४ व १५ व्या शतकांत होत असत. याच्या उलट, हिंदु-स्थानांतील राजपुत्र व राजकन्या वेषांतर करून जर्मनींत फिरत असल्याच्या काल्पनिक कथाहि या सुमारास तिकडे आढळतात. सोळाव्या शतकापासून युरोपियन प्रवाशांची संख्या अर्थातच वाढूं लागली. सतराव्या शतकापासून हिंदुस्थानांतील व इराणांतील प्रत्यक्ष ग्रंथ युरोपांत जाण्यास सुरुवात झाली. युरोपखंडाला इराण हें हिंदुस्थानाहून अधिक निकट असल्यामुळें प्रत्यक्ष ग्रंथ असे इराणी कवि सादी याचेच युरोपांत प्रथम गेले. युरोपांत सर्वांच्या आधीं प्रवेश झालेला संस्कृत ग्रंथ म्हणजे भर्तृहरीचीं शतकें. पद्मनाभ नांवाच्या ब्राह्मण पंडिताकडून डच लोकांनीं मिळविलेल्या एका प्रतीवरून सन १६५१ सालीं भर्तृहरीच्या दोनशें श्लोकांचें डच भाषांतर लीडन या शहरीं प्रसिद्ध झालें; व १६६३ सालीं आर्नोल्ड नांवाच्या गृहस्थानें त्याचें जर्मन भाषांतर करून न्यूरेनबर्ग येथें छापलें. जर्मन भाषेंत संस्कृत ग्रंथाच्या प्रसिद्धीचा हाच पहिला प्रयत्न होय; व जर्मनीच्या प्रयत्नासंबंधानेंच विशेष जोर देऊन सांग-ण्याचें कारण हें कीं, संस्कृत विद्येसंबंधानें युरोपांत जर्मन लोकांनीं जितकी जागृति केली तितकी हिंदुस्थानांत राज्य स्थापलेल्या इंग्रज लोकांच्याहि हातून झालेली नाहीं. संस्कृत भाषेचे खरे भोक्ते जर्मन! व संस्कृत भाषेच्या अभ्यासा-वर खरे परिश्रम केले असे जर्मन लोकांनींच!

जर्मनीमध्यें पर्शियन भाषेचा अभ्यास अर्थातच संस्कृत भाषेच्या अभ्या-

साच्या आधीं सुरू झाला होता. पण पुढें पुढें संस्कृत भाषेचीच गोडी जर्मन लोकांना अधिक वाटूं लागली. प्रसिद्ध विद्वान् इंग्रज सर विलियम जोन्स यानें सन १७८४ सालीं एशियाटिक सोसायटीची स्थापना केली. पण जर्मन पंडित हर्डर याचा संस्कृताचा अभ्यास १७७१ पूर्वींपासून सुरू होता. हर्डर यानें हितोपदेश, नीतिशतक व भगवद्गीता यांतील निवडक भागांचें भाषांतर छापलें होतें. १७९१ सालीं सर विल्यम जोन्स याच्या इंग्रजी भाषांतरावरून शाकुंतल नाटकाचें जर्मन भाषांतर फॉरस्टर यानें प्रसिद्ध केलें. हें होईपर्यंत पर्शियन काव्यांचीं उत्कृष्ट यमकें, त्यांतील सुंदर स्त्रिया, सुवासिक पद्यें, गुलाब फुलांच्या बागा व ऐहिक विलासांच्या वर्णनांतून मधून मधून गोवून दिलेले व एखाद्या रंगेल दैववादी तत्त्ववेत्त्यास सुचणारे दुःखमिश्र विचार या सर्वांमुळें जर्मन वाचकांना पर्शियन कवितेचा प्रथम प्रथम बराच मोह पडला. पण शाकुंतलाचें भाषांतर प्रसिद्ध झाल्यापासून संस्कृत काव्य-ग्रंथांचा श्रेष्ठपणा त्यांच्या लक्षांत भरला. प्रख्यात जर्मन कवि ग्युएटी हा पौर्वात्य वाङ्मयाचा नादी असून, रामायणांतील रामरावणाच्या युद्धांतील राक्षसांच्या व विशेषतः वानरसेनेच्या चेष्टांचीं वर्णनें आपल्या स्नेही मंडळीस तो वाचून दाखवीत असे. पण या गोष्टींनीं त्याचें जें समाधान होत नसे तें १७९१ सालीं कालिदासाच्या शाकुंतलाचें भाषांतर वाचून झालें.

पांच वर्षांनंतर ग्युएटी यानें फॉस्ट नामक काव्य लिहिलें त्यांतील कांहीं कांहीं प्रवेशांची प्रेरणा कालिदासाच्या प्रतिभेनेंच झाली असें अमेरिकन भाषा-पंडित डॉ. आर्थर रेमी यांचें म्हणणें आहे. Paria नामक ग्युएटीच्या ग्रंथांत मातुःश्रीचा शिरच्छेद करणाऱ्या जामदग्न्याची गोष्ट आणि स्वतःच्या हातानें शिरच्छेद करून घेतलेल्या आणि आपल्या पतीला देवीच्या वरप्रसादानें पुनः जिवंत करणाऱ्या मदनसुंदरीची–वेताळपंचविशींतील–गोष्ट घेतलेली आहे. ग्युएटीला पर्शियन कवि सादी व हाफीज यांचीहि बरीच गोडी होती; आणि 'दिवाणी' नामक त्याच्या काव्यांत हरप्रकारच्या उमद्या व विलासी पर्शियन कविकल्पनांची लयलूट झालेली दिसते. ग्युएटीप्रमाणें प्रसिद्ध जर्मन कवी शिलर यालाहि पौर्वात्य वाङ्मयाची गोडी लागली होती. ग्युएटीनें शिफारस केल्यावरून शिलरनें गीतगोविंदाचें भाषांतर वाचलें होतें; आणि शाकुंतल नाटकाचें रूपांतर करून त्यावरून प्रयोगाकरितां एक जर्मन नाटक करावें

असाहि त्याचा विचार होता. पण शिलरचीं वीररसप्रधान नाटकें ज्यानें वाचलीं असतील त्याला, शाकुंतल हें केवळ शृंगारिक व म्हणून मवाळ असें वाटून त्यानें त्या गोष्टीचा नाद कसा सोडला असेल, याची चांगली कल्पना येईल. जर्मनींत आर्यविद्येच्या अभ्यासाची परंपरा स्थापित होण्यापूर्वीच शिलर हा मरण पावला.

संस्कृतांत झालें तरी काव्य व नाटक हें वाङ्मयांतील गौण असेंच अंग आहे; व कोणत्याहि परकीय लोकांवर काव्यनाटकांच्या योगानें आर्य लोकांच्या बुद्धिमत्तेचा, विद्वत्तेचा व सुसंस्कृतीचा कायमचा ठसा पडणें अर्थातच शक्य नव्हतें. धार्मिक व तात्त्विक वाङ्मय हाच आर्यसंस्कृतीचा खरा गड्डा असें आपण तर म्हणूंच; पण कालांतरानें जर्मन पंडितांचें मतहि तसेंच बनून त्यांनीं काव्यनाटकांस दूर लोटून आर्यसंस्कृतीच्या या गड्डयास हात घातल्यास त्यांत नवल नाहीं. अठराव्या शतकाच्या अखेरीस तुलनात्मक भाषाशास्त्राच्या अभ्यासास युरोपखंडांतील विद्वानांनीं सुरुवात केली होती, आणि या संवायक भावनेनें संस्कृत व युरोपियन विद्यांचें व विद्वानांच्या मनाचें जें एका वेळीं एकीकरण झालें तें आजवर कायम असून दिवसेंदिवस वाढतच आहे. अठराव्या शतकाच्या अखेरीस इंग्रजांनीं हिंदुस्थानावर आपलें राजकीय वर्चस्व निःसंशय स्थापलें; पण त्याच वेळीं जर्मनीच्या लोकांनीं या देशावर आध्यात्मिक व विद्याविषयक वर्चस्व स्थापण्यास सुरुवात केली. या उद्योगाचे खरे पुढारी फ्रेडरिक श्लेजेल व ऑगस्ट विल्यम श्लेजेल हे होत. फ्रेडरिक यानें सन १८०८ सालीं Die Weisheit der Indier नामक ग्रंथ प्रसिद्ध केला. त्यांत महाभारत, रामायण, मनुस्मृति, संस्कृत छंदःशास्त्र, व्याकरण वगैरे गोष्टींचें साधारण स्वरूप सांगून त्यानें संस्कृत वृत्तांत जर्मन श्लोकहि रचले, आणि तुलनात्मक भाषापद्धतीनें संस्कृत व युरोपियन भाषा यांचा निकट संबंध कसा आहे हें दाखविलें. या दोघां बंधूंनीं मिळून हितोपदेश, नीतिशतक, पुराणें यांचे मासलेहि भाषांतराच्या द्वारें जर्मन लोकांपुढें मांडले. ऑगस्ट श्लेजेल याचा एक भाऊ ईस्ट इंडिया कंपनीच्या नोकरींत होता व दुसरा मद्रासेस नोकरींत असतांच मेला. पहिल्याच्या स्मरणार्थ त्यानें Die Bestattung des Braminen ही कविता रचिली. श्लेजेल बंधूंच्यानंतर पौर्वात्य व पाश्चात्य वाङ्मयांचें एकीकरण करणारा असा रूकर्ट हा जर्मन

पंडित होऊन गेला. याला जर्मन ब्राह्मण अशी संज्ञा देतात; व त्यानें संस्कृत वाङ्मय जर्मन भाषेंत ओतण्याचा प्रयत्न जन्मभर केला. त्याच्या ग्रंथांत भारत, रामायण, हितोपदेश, पंचतंत्र, कथासरित्सागर, रघुवंश, कुमारसंभव, उपनिषदें, पुराणें, भागवत वगैरेंतील अनेक उतारे आढळतात. याशिवाय, चांद्रायण-व्रत, पंचतपःप्रयोग, चिंतामणीचा सर्वार्थसिद्धकता हा गुण, चंद्रकमल व सूर्य-कमल यांचे धर्म वगैरे अनेक संस्कृत कल्पनांचा उपयोग त्याच्या स्वतंत्र ग्रंथांतून केलेला सांपडतो; व एकंदरीनें त्याच्या मनावर संस्कृत विद्येची पुष्कळच छाप पडली होती ही गोष्ट निर्विवाद आहे. रूकर्टच्या ग्रंथांत हिंदु-स्थानच्या इतिहासांतील अनेक प्रसंगहि आढळतात; उदाहरणार्थ–प्रतापसिंह व अकबर यांजमधील चितोडसंबंधाचें युद्ध, चांदबिबीचें शौर्य वगैरे. इतकेंच नव्हे तर पाद ( पाय किंवा किरण ), बक ( बगळा किंवा भोंदू ), द्विज ( ब्राह्मण, पक्षी किंवा दांत ) या अनेकार्थी शब्दांवरच्या कोट्या त्यानें जर्मन भाषेंत उतरविल्या आहेत. तसेंच संस्कृत हिमालय पर्वत व जर्मन हिमेल Himmel, संस्कृत हिमवत् व जर्मन Heimat, संस्कृत माया व जर्मन Megie या शब्दांवर श्लेष करण्याचेंहि धाडस त्यानें केलें ! संस्कृत कवि-कल्पनांत खरा गढून गेलेला जर्मन कवि म्हणजे हेनरिक हाईन हा होय. हा श्लेजेलचा शिष्य होता. चंद्रकमळांवर तर त्यानें एक स्वतंत्र काव्यच लिहिलें आहे. गंगातीर, चंद्रकिरणप्रकाशित उद्यानें, सरोवरें, मृगांचे कळप, ताल व तमालराजी, मयूर, कोकिळा, काम, वसंत, गंधर्व वगैरे कविमनरंजक समयपुनीत सुंदर वस्तुकलापांचा त्यानें आश्रय केला होता; अनेक कवितांच्या द्वारें संस्कृत कवींच्या अंतःकरणाच्या गाभ्यांत तो शिरला होता; आणि हिंदु-स्थानांतील उत्कृष्ट अशा निसर्गनिर्मित देखाव्यांचें मानसिक दृष्टिसुख घेण्यांत तो अगदीं गढून गेलेला असे. विश्वामित्र व वसिष्ठ यांच्या पुराणप्रसिद्ध भांडणाची उपमा त्यानें एका काव्यांत योजली आहे. आणि "भगीरथानें ज्याप्रमाणें स्वर्गांतून गंगा आणली, त्याप्रमाणें आपली प्रियतमा एमा इचा प्रणयानुनय करण्याचा मीं प्रयत्न केला" असेंहि तो सांगतो. हे जर्मन ग्रंथ-कार पूर्वींच्या काळांतले झाले; पण अलीकडच्या काळांतहि ही परंपरा चालूच आहे. १८८७ सालीं बोडेन स्टेट नामक जर्मन ग्रंथकारानें शाकुंतलाच्या

आधारें एक जर्मन नाटक लिहिलें आहे; त्यांत महाभारतांतील शकुंतलाख्यान, कालिदासाचें शाकुंतल व अनेक स्वकपोलकल्पित रचना यांची खिचडी केली आहे. व्हॉन शॅक Von Shack या आधुनिक जर्मन ग्रंथकारानें फर्दू-सीच्या काव्याप्रमाणें Stimmen Vom Ganges या नांवाच्या ग्रंथांत अनेक पौर्वात्य कथा गोंवल्या आहेत.

पण पूर्वी सांगितल्याप्रमाणें केवळ काव्यनाटकांच्या योगानें युरोपियन पंडितांच्या मनांत पौर्वात्य वाङ्मय वाचण्याची प्रेरणा झाली तरी तें वाचन अर्थातच तेथें थांबणें शक्य नव्हतें. गुलिस्तान, बोस्तान, गजल वगैरे पर्शियन काव्यें; आणि नीतिशतक, हितोपदेश, गीतगोविंद, शाकुंतल वगैरे संस्कृत वाङ्मयाचे नमुने वाचायला चांगले खरे, तथापि खऱ्या विद्याप्रिय युरोपियन पंडितांना वेद व उपनिषदें वाचावयास मिळूं लागल्यावर काव्य-नाटकांकडे त्यांची प्रवृत्ति होणें अशक्य होतें; आणि काव्यनाटकें वाचून त्यांचें मन जरी रमलें असेल, तरी संस्कृत विद्येच्या पुनरुज्जीवनाच्या कामीं युरोपियन पंडितांकडून जी मदत झाली ती ते लोक वेद व उपनिषदें वाचूं लागल्यापासूनच झाली.

## देशी भाषांच्याद्वारें झालेले प्रयत्न

इंग्रजी भाषेच्या अभ्यासास प्राधान्य येऊन संस्कृत व मराठी दोनहि भाषा मागासल्या अशा काळाचें वर्णन पूर्वी आलेंच आहे. सुदैवानें हा कालावधि फार थोडा होता. यापुढचें स्थित्यंतर म्हणजे ज्या काळांत मराठीस व मराठीच्या द्वारें संस्कृताच्या अभ्यासास उत्तेजन आलें तो. मराठी व संस्कृत यांचा संबंध असाच कांहीं निकट आहे कीं, संस्कृताचा परिश्रमपूर्वक अभ्यास केल्या-शिवाय मराठी वाङ्मय वाढावयाचेंच नाहीं. मराठी भाषेच्या अभिमान्यांना अमुक एका वेळेस मराठी ही स्वतंत्र भाषा होऊं लागली असें दाखवितां येईल, किंवा अमुक एक शब्द अथवा अमुक एक प्रकारचा प्रत्यय हा मराठीच्या स्वत्वाचा किंवा व्यक्तित्वाचा द्योतक आहे असेंहि सिद्ध करितां येईल. पण संस्कृताची भूमिका काढून घेतल्यास मराठीचें स्वतःचें म्हणून कांहीं अभि-

मानास्पद वाङ्मय उरेल असें म्हणतां येणार नाहीं. मराठी ही जिवंत देश-भाषा व संस्कृत ही मृत देश-भाषा असें आपण म्हणतों खरें. परंतु लोक प्रत्यक्ष व्यवहारांत बोलतात ती जिवंत व जी ते प्रत्यक्ष बोलत नाहींत ती मृत एवढ्यापुरतेंच, व केवळ या अर्थानेंच वरील म्हणणें खरें आहे. एरवीं जिवंत-पणाच्या गुणधर्मांच्या दृष्टीनें पहातां उलटापालट होते. प्रो. मॅक्समुल्लर यांनीं एके ठिकाणीं असें म्हटलें आहे कीं, संस्कृत भाषा ही हल्लीं आहे ह्याहून आणखीहि अधिक 'मृत' भाषा असती तरी, हिंदुस्थानभर ज्या भाषा सजीव म्हणून स्वतःस म्हणवीत आहेत त्या सर्व आर्य—व द्राविडी वगैरे अनार्य भाषाहि—आपल्या प्राणांच्या प्राणासंबंधानें संस्कृताच्याच सर्वस्वीं ऋणी आहेत ही गोष्ट कांहीं खोटी नाहीं.

कोणच्याहि देशी भाषेंतील उच्च दर्जाचें वाङ्मय घेतलें तर असें दिसून येईल कीं, त्यांतल्या रम्य कल्पना, उदाहरणें, दाखले, न्याय, सिद्धांत, अलंकार वगैरे प्रायः संस्कृतांतूनच घेतलेले असतात. फार काय पण अशा वाङ्मयांतील शेंकडा ७५ शब्द सर्वांस साधारण असतात. कारण सर्वांचें जें मायपोट किंवा समान अधिष्ठान म्हणजे संस्कृत, त्यांतून ते घेतलेले असतात. संस्कृताच्या उपकारकत्वाचा याहून अन्य पुरावा कोणता असणार ? संस्कृत ही आज 'बोलती' भाषा नाहीं असें असलें तरी तेवढ्यावरून कांहींच सिद्ध होत नाहीं; कां कीं ती आज शेंकडों वर्षें तशीच आहे. दरम्यान देशभाषेंत—प्राकृतांत—झालेले ग्रंथ असे फार थोडे; ग्रंथरचना प्रायः संस्कृतांतच होई. संस्कृत ही बोलती भाषा नाहींशी होऊन आज कमींत कमी तीन हजार वर्षें झालीं असावीं, व आज सर्व हिंदुस्थानच्या खानेसुमारींत संस्कृत ही आपली 'घरीं बोलण्याची' भाषा आहे असें लिहून देणारे लोक पांचपन्नासहि सांपडावयाचे नाहींत. तथापि, संस्कृत भाषेचें स्वामित्व अद्यापि आहे तसें अढळ व निर्विवाद आहे; आणि या तीनसाडेतीन हजार वर्षांच्या अवधींत जेव्हां जेव्हां विद्येचें पुनरुज्जीवन झालें, जेव्हां जेव्हां राष्ट्राच्या शरिरांत नवीन रक्त खेळावयास लागून विचारस्फुरण होऊं लागलें तेव्हां तेव्हां, संस्कृत भाषेवरील भस्म फुंकलें जाऊन, आंतून संस्कृत विद्येचें तेज प्रचलित देशी भाषेच्या द्वारें राष्ट्राच्या तोंडावर पडलेलें असे, असेंच बहुधा आढळून येईल.

युरोपांत १५ व्या १६ व्या शतकांत जेव्हां विद्येचें पुनरुज्जीवन झालें तेव्हां ग्रीक व लॅटिन या मृत भाषांच्या उद्धारानेंच तें कार्य सिद्ध झालें. पण अँग्लो सॅक्सन भाषा लॅटिन व ग्रीकला जितकी जवळ आहे त्यापेक्षां मराठी, गुजराथी, बंगाली व हिंदी या संस्कृतला अधिक जवळ आहेत. आणि गेल्या शतकांत इंग्रजीच्या उद्दीपनानें हिंदुस्थानांत विद्येच्या पुनरुज्जीवनाची वेळ आली तेव्हां संस्कृताच्या अभ्यासाकडे हिंदी लोकांचें फिरून लक्ष वेधलें यांत आश्चर्य नाहीं. या काळापासून संस्कृत वाङ्मयाचें परिशीलन युरोपियन व हिंदी लोक या दोघांनीं दोन तऱ्हांनीं केलें. पैकीं युरोपियन लोकांनीं केलेलें परिशीलन आमच्या परिशीलनाहूनहि अधिक उपयुक्त व स्फूर्तिकारक कसें झालें आहे याचा विचार आज करण्याचें कारण नाहीं. आज देशी भाषांच्या द्वारें अथवा देशी भाषांस उपकारक होईल अशा रीतीनें संस्कृत विद्येच्या पुनरुज्जीवनाचा प्रयत्न इकडे कसकसा झाला आहे याचें थोडक्यांत निरीक्षण करूं.

बंगाल प्रांतांत संस्कृताचा अभ्यास नवीन पद्धतीनें करण्याचा प्रयत्न राजा राममोहनराय यांनीं प्रथम केला. राममोहनराय यांनीं इंग्रजी भाषेचें शिक्षण हिंदुस्थानांत द्यावें अशाविषयीं जरी चळवळ केली तरी स्वतः त्यांचें संस्कृत भाषेचें अध्ययन चांगलें होतें. व ते नव्या पद्धतीचे विद्वान् झाले नसते तर त्यांचें नांव 'पंडित' नात्यानें खास ऐकूं आलें असतें. राजा राजेंद्रलाल मित्र यांनीं बिब्लिओथेका इंडिका या मासिक पुस्तकाच्या द्वारें बऱ्याच संस्कृत ग्रंथांचें संशोधन करून ते छापले हें प्रसिद्धच आहे. तसेंच शब्दकल्पद्रुमाचे कर्ते राजा सर राधाकांत देव, पंडित ईश्वरचंद्र विद्यासागर, तारानाथ तर्कवाचस्पति, पंडित जीवानंद विद्यासागर, बाबू भुवनमोहन वैशाख, महेशचंद्र पाल, रमेशचंद्र दत्त, प्रतापचंद्र राय, मन्मथनाथ दत्त वगैरे विद्वानांनीं संस्कृत ग्रंथ छापणें, संपादणें, टीका व भाषांतरें करणें या बाबतींत केलेले परिश्रम नमूद करून ठेवण्यासारखे आहेत. बाबू जीवानंद विद्यासागर यांनीं तर जवळ जवळ दोनशें संस्कृत ग्रंथ छापून प्रसिद्ध केले असतील. हे ग्रंथ असावे तितके शुद्ध नाहींत. तथापि, केवळ विद्वानांची दृष्टि बाजूस ठेवली तर या कांहींशा सदोषपाठमिश्रित पण चालचलाऊ ग्रंथांनीं हजारों संस्कृत अध्ययनेच्छु लोकांचें फार मोठें काम झालें आहे. बंगाल्यांतील

रॉयल एशिआटिक सोसायटीनें संस्कृत ग्रंथ संशोधनास बरेच दिवसांपासून सुरुवात केलेली आहे व हल्लीं महामहोपाध्याय हरप्रसादशास्त्री, रॉय शरच्चंद्र दास बहादूर वगैरेंनीं शोधक दृष्टीनें पुष्कळ नव्या संस्कृत पोथ्यांची भर घालून आजचा हस्तलिखित संग्रह बराच समृद्ध केला आहे.

संयुक्त प्रांतांत काशी हें तर संस्कृत विद्येचें आगर आहेच. पण काशी येथील संस्कृत कॉलेजच्या अध्यक्षाच्या जागीं आलेल्या युरोपियन विद्वानांच्या परिश्रमानें चाललेलें ' पंडित ' नांवाचें संस्कृत मासिक पुस्तक संस्कृत ग्रंथ छापून प्रसिद्ध करण्याच्या कामीं बरेंच सहायभूत झालें आहे. त्याचप्रमाणें काशी येथें बाबू पी. एल्. मित्र व हरिदास गुप्त यांच्या परिश्रमानें निघालेल्या चौखांबा संस्कृत ग्रंथमालेमध्यें अनेक उपयुक्त संस्कृत ग्रंथ प्रसिद्ध झालेले आहेत. अलाहाबादेस कांहीं थोडे दिवसांपासून डॉ. बी. डी. बसू-प्रभृति कित्येक संस्कृताभिमानी गृहस्थांनीं 'पाणिनि-ऑफिस' नांवाची संस्था काढलेली असून तिच्या द्वारें आजपर्यंत अनेक संस्कृत ग्रंथ प्रसिद्ध झाले आहेत. पाणिनि-ऑफिसच्या द्वारें प्रसिद्ध झालेल्या अष्टाध्यायीच्या सभाषांतर आवृत्तीवर प्रो. मॅक्समुल्लर हे अत्यंत खुष होऊन त्यांनीं ग्रंथकर्त्यास असें लिहिलें कीं, " चाळीस वर्षांपूर्वीं मी जेव्हां पाणिनीची अष्टाध्यायी शिकत होतों, आणि त्यांतील तीं बिकट सूत्रें व त्यांवरचीं त्याहूनहि बिकट वार्तिकें वाचतां वाचतां डोक्यावर हात देऊन वेडा होऊन जात असे, त्यावेळीं हल्लींसारखी पाणिनीची आवृत्ति हातीं पडती तर तिच्याकरितां मीं काय वाटेल ती किंमत दिली असती. "

नवीन तऱ्हेचा संस्कृतचा अभ्यास बंगाल्यांत आधीं सुरू झाला परंतु ' खरी मार्मिक व शोधक विद्वत्ता मुंबई इलाख्यांतच सांपडते, अन्यत्र सांपडत नाहीं, ' असें राय शरच्चंद्रदास बहादूर या विद्वान् बंगाली ग्रंथकारानें आपल्या एका लेखांत म्हटलें आहे, व तें कांहीं अंशीं खरेंहि आहे. मुंबई इलाख्यांत संस्कृत ग्रंथ पुष्कळ प्रसिद्ध झाले असून शिवाय त्यांचें संपादनकृत्यहि शोधक विद्वानांच्या हातून झालेलें आहे. संस्कृत-ग्रंथ–प्रसिद्धीच्या कामीं प्रमुख नांवें म्हटलीं म्हणजे मुंबईचे श्रीव्यंकटेश व निर्णयसागर छापखाने व पुण्याचा आनंदाश्रम छापखाना हे होत. आणि या बाबतींत पंडित खेमराज श्रीकृष्णदास, शेट जावजी दादाजी आणि

महादेव चिमणाजी आपटे यांचे उपकार अगणित आहेत. व्यंकटेश-समाचार छापखान्यांत प्रसिद्ध झालेले धर्मग्रंथ, निर्णयसागर छापखान्यांतून प्रसिद्ध झालेले—विशेषतः काव्यमाला मासिक पुस्तकांतून छापलेले—काव्यग्रंथ, व आनंदाश्रम छापखान्यांतून प्रसिद्ध झालेलीं पुराणें व तत्त्वज्ञानाचे ग्रंथ हे सर्व एकत्र केले तर तो एक बिनमोल ग्रंथसंग्रहच होईल. तसेंच मुंबईचे प्रसिद्ध थिऑसफिस्ट तुकाराम तात्या यांनीं तत्त्वविवेचक छापखान्यांतून प्रसिद्ध केलेले वेदविद्येचे ग्रंथहि फार उपयुक्त आहेत. शोधक व संपादक या नात्यानें पंडित भगवानलाल इंद्राजी, भाऊ दाजी, भांडारकर, तेलंग, मंडलीक, पाठक, त्रिवेदी वगैरेंनीं बरेंच काम केलेलें आहे. मद्रासेकडे संस्कृत भाषेचें अध्ययन पुष्कळच आहे, व तिकडेहि मध्वविलास, वाणीविलास वगैरे छापखान्यांतून प्रसिद्ध झालेले मूळ ग्रंथ म्हैसुराकडील बिब्लिओथिका संस्कृतिकानामक ग्रंथमालेंतील ग्रंथ, त्रावणकोर संस्थानांत प्रसिद्ध झालेले ग्रंथ, तसेंच हल्लीं निघालेली शंकराचार्यांच्या समग्र ग्रंथांची आवृत्ति वगैरेंनीं संस्कृतअध्ययनास दिलेलें उत्तेजन फारच उपयोगी पडलेलें आहे.

संस्कृत ग्रंथांचें मराठींत ज्ञान करून देण्यानें संस्कृत पुस्तकांच्या अध्ययनास या इलाख्यांत आजपर्यंत पुष्कळ मदत झाली आहे. कै. शंकर पांडुरंग पंडित, कै. माधवराव कुंटे, काशिनाथशास्त्री लेले, घुले, द्रवीड, भानु, आप्पाशास्त्री राशिवडेकर, अभ्यंकर, गर्दे, ऐनापुरे, गोडबोले, चिपळूणकर, बापटशास्त्री, वैद्य, मोडक, लिमये यांच्या परिश्रमानें वेद, उपनिषदें, भारत, भागवत, रामायण, पुराणें, वेदांत, वगैरेंच्या अध्ययनास निवळ मराठी वाचकांना झालेली मदत बिनमोल होय. संस्कृत वाङ्मयांतील उत्तमोत्तम ग्रंथांचें मराठींत भाषांतर करून, मराठी भाषेची अभिवृद्धि व संस्कृताध्ययन या दोहोंसहि एकदम साहाय्य करण्याची प्रवृत्ति अद्यापहि अव्याहत चालली आहे. या प्रवृत्तीचे दर्शक असे प्रस्तुतचे ठळक प्रयत्न म्हटले म्हणजे शेट दामोदर सावळाराम यांचा उपनिषत्प्रकाश व पुराणग्रंथमाला, वे. शा. सं. बापटशास्त्री यांची ब्रह्मविद्याग्रंथरत्नमाला, आणि चार भाषांत प्रसिद्ध होणारा श्रुतिबोध हे होत. दरएक पुराणाचा त्रोटक पण सुसंबद्ध सारांश मराठींत देण्याचा उपक्रम पुराणग्रंथमाला करीत असून

उपनिषत्प्रकाशाचे दर अंकांत एक मुख्य उपनिषद् व त्यावर आचार्यभाष्य हीं मराठींत भाषांतरासह देण्याचें कार्य चालू आहे. ब्रह्मविद्याग्रंथ-रत्नमालेंत आरंभीं विद्यारण्याचा अनुभूतिप्रकाश, अन्वय, अर्थ व विवरण यांसह प्रसिद्ध होत असतो. पण चौथ्या अंकापासून संपादकांनीं त्यांत अशी सुधारणा केली आहे कीं, प्रत्येक उपनिषदाचें मूळ आणि त्यावरील शंकराचार्य यांचें भाष्य आणि शंकरानंद व विद्यारण्य यांचें आत्मपुराण व अनुभूतिप्रकाश हीं तिन्ही एकदम सान्वयार्थविवरण अशीं द्यावयाचीं. तिसरा प्रयत्न म्हणजे चार भाषांत निघणाऱ्या श्रुतिबोधाचा होय. संस्कृत वाङ्मयांत व सनातनधर्मांत श्रुतीचें स्थान आद्य एवढेंच नव्हे तर अत्युच्च व पहिल्या प्रतीचें असल्यामुळें एका दृष्टीनें हा प्रयत्न विशेषच महत्त्वाचा मानला पाहिजे. वेदार्थप्रसिद्धीचे यत्न आजपर्यंत अनेक झाले; पण ते बहुतेक अर्धवटच राहिले आहेत. हें काम असें आहे की तें जितकें त्वरित व परि-पूर्णतेनें वाचकांच्या हातीं पडेल तितके सर्व दृष्टींनीं इष्ट व जरूरीचें आहे. पूर्वीचे यासंबंधाचे प्रयत्न फार व्यापक कार्य हातीं घेतल्यामुळें किंवा मासिक पुस्तकाची पृष्ठसंख्या थोडी धरल्यामुळें अर्धवट राहिलेले आहेत. असल्या फुटकळ व अर्ध-वट प्रयत्नांचा भाषाभिवृद्धि किंवा वाङ्मयवृद्धि या दृष्टीनें फारसा उपयोग नसतो, ही गोष्ट लक्षांत आणून, आधीं आंखून हातांत घेतलेलें कार्य त्वरित पुरें होऊन समग्र ग्रंथ वाचकांच्या हातीं लवकर पडण्याची तजवीज श्रुतिबोधकार करतील, तर तें मराठी भाषेची उन्नति व वाढ आणि संस्कृत विद्येचें पुनरुज्जीवन या दोनहि दृष्टींनीं इष्टच होईल असें आम्हांस वाटतें.

---

# २. हिंदु ‘ विश्वविद्यालय ’

( केसरी, तारीख १३ जून १९११ इसवी. )

सन १९०५ सालीं बनारस येथें राष्ट्रीय सभा भरली त्या प्रसंगीं ना० मदनमोहन मालवीय यांच्या खटपटीमुळें हिंदु ‘विश्वविद्यालया’ची योजना तेथें जमलेल्या सर्व मंडळींपुढें मांडण्यांत आली होती हें प्रसिद्धच आहे. हिंदु युनिव्हर्सिटीसंबंधानें त्या वेळीं समाजांत किती उत्साह उत्पन्न झाला होता हें, केसरीच्या २ जानेवारी १९०६ रोजच्या अंकांत बनारसहून आलेली जी तार छापण्यांत आली होती तिचाच उतारा खालीं दिला आहे, त्याजवरून वाचकांस चांगलें कळून येईल.

“ रविवारीं सकाळीं ‘टाउन हॉल’मध्यें निरनिराळ्या प्रांतांतील प्रमुख प्रतिनिधींची सभा भरली होती. त्या वेळीं अकोल्याचे रा० ब० विष्णु मोरेश्वर महाजनी यांना अध्यक्षस्थान देण्यांत आलें होतें. अलाहाबादचे प्रसिद्ध पुढारी पंडित मदनमोहन मालवीय यांनीं हिंदु युनिव्हर्सिटीची आपली कल्पना सभेपुढें मांडली. त्यावर निरनिराळ्या प्रांतांतील पुढाऱ्यांनीं बराच वादविवाद केला. ना० सुरेंद्रनाथ बॅनर्जी यांनीं बनारसयुनिव्हर्सिटीला आपलें पूर्ण अनुमोदन दिलें व कलकत्त्यास निघणाऱ्या राष्ट्रीय युनिव्हर्सिटींचें व या युनिव्हर्सिटीचें एकीकरण व्हावें, असें त्यांनीं सांगितलें. यासंबंधानें बोलतांना रा. टिळक यांनीं सांगितलें कीं, युनिव्हर्सिटीकरितां काम करणारे लोक प्रथमतः पुढें आले पाहिजेत, म्हणजे कामास लागणारे पैसे आपोआप मिळतात. स्वदेशी युनिव्हर्सिटीच्या कामाकरितां इलाख्याच्या वतीनें एक लायक मनुष्य देण्याची जबाबदारी रा० टिळक यांनीं आपल्या अंगावर घेतली. रा० टिळक यांच्या भाषणानें लोकांतील उत्साह दुणावला. प्रो० विजापूरकर व प्रो० भानु यांनीं या युनिव्हर्सिटीचें काम करण्यास आपण तयार आहों असें सांगितलें. पंडित मदनमोहन हे आपला वकिलीचा धंदा सोडून देऊन, या कामास स्वतःस वाहून घेण्यास तयार आहेत, असें जाहीर करण्यांत आलें. ना० सुरेंद्रनाथ बॅनर्जी यांनीं आपलें बाकी राहिलेलें आयुष्य या कामीं खर्च करण्याचें कबूल केलें.

रा० टिळक यांनींहि स्वत: तीन वर्षें या कामास देण्याचें वचन दिलें. मद्रासचे मि० सुब्रह्मण्य आय्यर यांनींहि सदरप्रमाणेंच वचन दिलें. सातारचे वकील रा० करंदीकर यांनीं प्रो० विजापूरकर यांच्या तीन वर्षांच्या खर्चाची हमी घेतली. रा० माधवराव बोडस यांनींहि अशाच तऱ्हेची मदत करण्याचें वचन दिलें. मुनशी माधवलाल यांनीं या युनिव्हर्सिटीस तीन लाख रुपये देण्याचें अभिवचन दिलें. इतर लोकांनींहि याचप्रमाणें वचनें दिलीं असून आतांपर्यंत नऊ लाख रुपये जमले आहेत. कलकत्त्यास जुळलेला व हा फंड एक करण्याचें ठरलें. या युनिव्हर्सिटीची काय व्यवस्था करावयाची हें ठरविण्याकरितां निरनिराळ्या प्रांतांतील प्रमुख लोकांची कमिटी नेमण्यांत आली आहे. सायंकाळीं राष्ट्रीय सभेच्या मंडपांत या गोष्टीचा विचार करण्यासाठीं पुन्हा सभा भरली. त्या वेळीं मुनशी माधवलाल यांनीं अध्यक्ष-स्थान स्वीकारलें होतें. ना० सुरेंद्रनाथ बॅनर्जी यांचें भाषण होऊन बनारसच्या युनिव्हर्सिटीची स्थापना झाली असें त्यांनीं जाहीर केलें. ही युनिव्हर्सिटी विशेषत: हिंदु असली तरी मुसलमान, ख्रिस्ती आदिकरून इतर धर्मांच्याहि विद्यार्थ्यांना युनिव्हर्सिटींत बंदी ठेविलेली नाहीं. परंतु सर्व व्यवस्था व धोरण हिंदु लोकांच्याच हातीं राहील."

दुर्दैवानें हिंदु विश्वविद्यालयाच्या या योजनेला पुढें आजतागायत परिणत असें स्वरूप आलें नाहीं. आरंभशूरत्वाचा दोष असलाच तर तो केवळ आम्हां 'दाक्षिणात्यां'मध्येंच नाहीं, हें वरील उताऱ्यांत जीं अनेक नांवें आलीं आहेत त्यांजवरून दिसून येईलच. पण या दोषाचे अंशभागी अनेक असले तरी विश्वविद्यालयाची योजना अमलांत आणण्याचें काम मागें पडलें, ही गोष्ट मात्र दु:खानें नमूद करणें जरूर आहे. आतां या बाबतींतले श्रम शिथिल होण्यास इतरहि कारणें नव्हतीं असें नाहीं. बनारस येथें ना. गोखले यांनीं वसाहतीच्या स्वराज्याहून आमचें राजकीय ध्येय कमी नाहीं हें स्पष्ट म्हणून दाखविलें व पुढील सालीं कलकत्त्यास दादाभाई नौरोजी यांनीं स्वराज्याच्या कल्पनेस रंगरूप आणलें, तेव्हांपासून पुढें तीन वर्षेंपर्यंत स्वदेशी, स्वराज्य, बहिष्कार व राष्ट्रीयशिक्षण या चार अंगांनीं राष्ट्रीयसभांतर्गत राष्ट्रीय चळवळीस जोर आला. पैकीं राष्ट्रीय शिक्षणाची योजना बंगाल, वऱ्हाड व मुंबई या प्रांतांत सुरूहि झाली. तथापि हिंदी

युनिव्हर्सिटीची कल्पना मागें पडण्यास १९०८ सालापासून झालेले अत्याचार आणि अत्याचारांच्या पावलांवर पाऊल टाकीत येणारी दडपशाही हीच विशेषतः कारणीभूत झाली, असें म्हणण्यास हरकत नाहीं. अस्वस्थतेबद्दल खरी जबाबदारी कोणाचीहि असो, परंतु राष्ट्रांत अस्वस्थता उत्पन्न झाली होती खरी; व या अस्वस्थतेमुळें राष्ट्रीय शिक्षणाचे जे थोडेसे प्रयत्न झाले, तेहि बहुतेक सरकारकडून हाणून पाडण्यांत आले. बंगालमधील राष्ट्रीय शिक्षणाचें मंडळ अद्यापि जिवंत आहे हें खरें; तथापि, त्याच्या कामाच्या मूळच्या स्वरूपांत बराच फरक पडला आहे. वऱ्हाड प्रांतांतील राष्ट्रीय शिक्षणाच्या शाळा निव्वळ तंबी मिळाल्याबरोबर बंद पडल्या; व मुंबई इलाख्यांतील तळेगांवची शाळा अराजक समितींचा कायदा लावून सरकारकडून सक्तीनें बंद करण्यांत आली.

परंतु संस्था मेल्या तरी कल्पना मरत नाहींत, असें जें म्हणतात तेंच राष्ट्रीय शिक्षणासंबंधानेंहि घडून आलें आहे, असें म्हणण्यास हरकत नाहीं. राष्ट्रीय शिक्षणाचे व्यक्तिशः कांहीं पुरस्कर्ते व सरकार या दोघांच्याहि चुकीमुळें त्या शिक्षणाला नसतें राजकीय महत्त्व देण्यांत आलें होतें तें बाजूस ठेवून, निर्विकार मनानें विचार करणारास असें दिसून येईल कीं, केवळ 'शिक्षण'विषयक सुधारणेचा असा बराच भाग राष्ट्रीय शिक्षणाच्या मुळाशीं आहे; व राष्ट्रीय शिक्षणाच्या कांहीं शाळा जरी सरकारानें बुडविल्या तरी निवळ शिक्षणविषयक अशी जी सुधारणा ती या ना त्या रीतीनें घडून आल्यावांचून राहाणारच नाहीं. याचें एकच उदाहरण पुरें होईल. विद्यार्थ्यांना शिक्षण द्यावयाचें तें देशी भाषांतून दिलें जावें, हें राष्ट्रीय शिक्षणापैकीं एक मुख्य तत्त्व आहे हें प्रसिद्धच आहे. तळेगांवास या तत्त्वाचा अंमल जारी होता; व न्यू इंग्लिशस्कूलसारख्या शाळांतून म्हणजे सरकारी ग्रँट घेणाऱ्या शाळांतूनहि या तत्त्वाची परीक्षा पाहाण्याकरितां प्रयोग चालू होते. परंतु गेल्या महिन्यांत हायस्कुलांचा जो नवीन शिक्षणक्रम सरकारनें प्रसिद्ध केला आहे त्यामध्यें एक इंग्रजीखेरीजकरून बाकी बहुतेक विषयांचें शिक्षण देशी भाषेंतूनच देण्याची शिफारस करण्यांत आली असून हायस्कूलच्या अखेरच्या परीक्षापर्यंत प्रश्नोत्तरें देशी भाषेंतून व्हावीं, अशीहि योजना झाल्याचें अनुमान निघतें. तात्पर्य राष्ट्रीय शिक्षणाच्या या एका अंगाच्या सिद्धीला

आतां खुद्द सरकारनेंच मदत केली आहे. इतर अंगांसहि सरकारास अशीच मदत करणें पुढें मागें भाग पडेल, यांत आम्हांस तर शंका वाटत नाहीं. पण हें होईपर्यंत नमुनेदार शाळा किंवा संस्था काढून त्यांच्या हातून राष्ट्रीय शिक्षणाचे विषय केवळ शिक्षणविषयक सुधारणेच्या दृष्टीनें साध्य करीत बसणें जरूर आहे. देशांतील सर्वच शिक्षण आम्ही आमच्या हातीं घेऊं, हा 'राष्ट्रीय शिक्षण' या शब्दाचा अर्थ नाहीं. तसें करण्यास सांपत्तिक व राजकीय अडचणी दुर्धर आहेत. पण राष्ट्रहिताच्या दृष्टीनें पाहतां शिक्षण कसें असावें लागतें हें सरकार परकें असल्यामुळें अगर इतर कारणामुळें त्याच्या डोक्यांत भरत नसलें तर तें नमुनेदार संस्थांतून केलेल्या प्रयोगांच्या द्वारें आम्ही त्यास दाखवूं व कालांतरानें तरी लोकमताच्या जोरावर त्या सुधारणा त्यांजकडून अमलांत आणवूं, हाच राष्ट्रीय शिक्षणाच्या सर्व समंजस पुरस्कर्त्यांचा हेतु आहे व तो सिद्धीस गेलाच पाहिजे.

देशी भाषेंतून शिक्षण देण्याप्रमाणें धर्म व नीति यांचें शिक्षण देणें हेंहि राष्ट्रीय शिक्षणाचें एक अंग आहे. पैकीं धर्मशिक्षण सरकारास प्रत्यक्ष देतां येत नसलें तरी ज्यांचें त्यांनीं तें देण्याची योजना केल्यास सरकारास त्या कामीं मदत करणें जरूर आहे. नैतिक शिक्षणाचा प्रश्न सरकारनें स्वतंत्र रीतीनें हातीं घेतला आहे; व खऱ्या लोकमताच्या निदर्शकांचें सहकारित्व व पाठबळ मिळविण्याचा प्रयत्न सरकार करील, तर ज्या प्रकारचें नैतिक शिक्षण मुलांस देणें योग्य आहे, तें देण्याची योजना होणें अवघड नाहीं; पण अशा रीतीनें किरकोळ बाबींची व्यवस्था लागत जात असली तरी विश्वविद्यालयाची जरूरी नाहींशी होत नाहीं; किंबहुना ती वाढतच जाते; व आज पांच वर्षांनंतर हिंदु विश्वविद्यालयासंबंधाची कल्पना पुनः लोकांपुढें आली आहे, यावरून राष्ट्रीय शिक्षणाच्या कल्पनेची प्रगतीच दिसून येईल. आतां दरम्यान राजकीय हक्कासंबंधानें आमच्या मुसलमानबंधूंची चळवळ होऊन त्या चळवळीबरोबर मुसलमानी विश्वविद्यालयाचीहि तळी उचलली गेली आहे; व या चळवळीस प्रत्युत्तर म्हणून हिंदुसभेच्या स्थापनेबरोबरच हिंदु विश्वविद्यालयाची योजनाहि तितक्याच बाह्यशक्तीच्या जोरानें पुढें झाली आहे हें खरें; तथापि राष्ट्रीय शिक्षण व हिंदु राष्ट्राची प्रगति या दोन गोष्टी परस्परपोषक व उपोद्बलक अशाच असल्यामुळें, एकीचा दुसरीस दुजोरा मिळणें स्वाभा-

विकच आहे. पांच वर्षांपूर्वीच जें व्हावयाचें होतें तेंच आज झालें तर त्यांत कांहीं विशेष नाहीं; व केवळ हिंदु विश्वविद्यालयाच्या योजनेविषयीं पसंतीदर्शक असा लेख आज केसरीस मुद्दाम लिहिण्याचें कारणहि नव्हतें. पण पंडित मदनमोहन यांनीं मिसेस बेझंट यांजबरोबर विद्यालयाच्या खटपटींत मिळून वागावें कीं नाहीं, हा एक गौण प्रश्न पुढें आला असून–त्यावर बरेच तर्क, वितर्क चालू आहेत. सबब त्यासंबंधानें मात्र दोन शब्द लिहिणें जरूर आहे, असें आम्हांस वाटतें.

सन १९०५ सालीं पंडित मदनमोहन यांची योजना पुढें आली त्यावेळीं मिसेस बेझंट यांच्याशीं सहकारित्व करून विश्वविद्यालय स्थापावयाची कल्पना कोणाच्या मनांत नव्हती ही गोष्ट खरी. तथापि, हिंदु विश्वविद्यालय स्थापण्याची बेझंटबाईची कल्पना अगदींच नवी नाहीं; पंडितजींच्या कल्पनेहून ती जुनी आहे, असें म्हणण्यास हरकत नाहीं. पण थिऑसफिस्ट काय किंवा सनातनवादी काय, कोणालाहि चुटक्यांचा मांडव घालून विश्वविद्यालयें उभारतां येत नाहींत. संस्था हें मुख्यतः पैशाचें काम असतें. काम करण्यास मनुष्य स्वतःस वाहून घेऊन निघाला म्हणजे पैशास वाण पडत नाहीं हें सर्वसामान्य तत्त्व बरोबर आहे; पण अशी स्वतःस वाहून घेणारीं मनुष्येंच कमी म्हणून का म्हणाना, मोठमोठ्या रकमा हुकमी जमण्यास फार पंचाईत पडते. हवा तेवढा पैसा जमत नाहीं एवढें खरें, मग कारण कांहींहि असो. यःकश्चित् एखादें हायस्कूल स्वतंत्र रीतीनें चालवावयाचें म्हटलें तर हवा तितका पैसा एकदम जमत नाहीं. मग विश्वविद्यालयाची गोष्ट दूरच! मुसलमानी विश्वविद्यालयाच्या चालकांस सरकाराकडून असें सांगण्यांत आल्याचें समजतें कीं, तुम्ही प्रथम पंचवीस लक्ष रुपये जमवाल तर मग स्वतंत्र विद्यालयास सनद देण्याच्या प्रश्नाचा विचार करतां येईल. हिंदु विद्यालय काढावयाचें झालें तर त्याच्या चालकांसहि हाच जबाब मिळणार! अर्थात् अशा अडचणींमुळें काशी येथील सेंट्रल हिंदु कॉलेज हा मूलाधार घेऊन त्यावरच हिंदु विश्वविद्यालयाची रचना करावी अशी कल्पना सुचली; व खरोखरच ती कांहीं वावगी नाहीं. शक्य असेल तर विलायतेप्रमाणें किंवा यूरोप–अमेरिकेप्रमाणें हिंदुस्थानासहि प्रांतानिहाय स्वतंत्र विश्वविद्यालयें हवीं आहेत; पण तीं मिळणार कशीं? तिकडे

द्रव्य अलोट व विद्यावृद्धीकडे तें खर्च करण्याची बुद्धि विशेष. यामुळें कोट्यवधि रुपये खासगतचे देऊन धनिक विद्याप्रिय गृहस्थांनीं निरनिराळ्या युनिव्हर्सिट्या स्थापण्यास मदत केली आहे. पण दरिद्री हिंदुस्थानांत तें कसें घडून येणार? निदान आपल्या समाजांतील दानधर्माचा ओघ केवळ उपयुक्त विद्यावृद्धीकडे वळेपर्यंत तरी हें होणें अशक्य आहे. बेझंटबाईनीं हिंदी शिक्षणास स्वतःस वाहून घेतलें; पण लोकांचा थिऑसफीविषयीं अनादर म्हणून त्यांस पंचवीस लक्ष रुपये मिळत नाहींत; आणि पंडित मदनमोहन यांच्याविषयीं लोकांत आदर आहे खरा, पण विश्वविद्यालयाच्या कार्याकडे स्वतःस सर्वस्वीं वाहून घेण्यास त्यांना ईश्वर बुद्धि देत नाहीं! मिळून भट आहे तर तीथ नाहीं आणि तीथ आहे तर भट नाहीं हीच रड!

हिंदुस्थानच्या परिस्थितीमुळें उत्पन्न होणारें हें वैगुण्य घालविण्यास एकच उपाय आहे; व तो, जवळ जवळ एकाच दिशेस जाणाऱ्या अनेक शक्तींचा उपयोग करून संघ बनविणें हा होय. यंत्रशास्त्रांतील दांत्यांच्या चाकांसारखा हा उपयोग होय. हीं दंतमय चक्रें आपले दांत परस्परांवर घासतील तर त्यापासून घातक ठिणग्या मात्र पडतील; पण तेंच एकाद्या योजकानें दांत्यांत दांते बसून जातील अशी चक्रांची रचना केल्यास त्यांपासून उपयुक्त शक्ति उत्पन्न होईल. हिंदुधर्मांत आज शेंकडों पंथ आहेत व पुढेंहि शेंकडों पंथ राहतील. प्रत्येक पंथास आपापल्या विशिष्ट मतांचें धर्मशिक्षण देणारें 'विश्वविद्यालय' हवें, असें वाटणें स्वाभाविक आहे, पण मिळणें मात्र अशक्य आहे. पण तेंच या सर्वांनीं मिळून आपापल्यामध्यें सर्वसाधारण असें हिंदुधर्मतत्त्व काय आहे याचा विचार करून, त्या तत्त्वाचें शिक्षण ज्यांत दिलें जाईल असें हिंदु विश्वविद्यालय काढावयाचें मनांत आणलें, तर तें मात्र सर्वथा शक्य आहे. सनातनधर्मी व थिऑसफिस्ट यांच्यामध्यें सहकारिता होण्यास ज्या अडचणी दिसतात त्यांहीपेक्षां हिंदुधर्मांतर्गत निरनिराळ्या पंथांची एकवाक्यता होण्यास अडचणी अधिक दुर्धर आहेत. कारण थिऑसफी हा कोणच्याच धर्मास किंवा धर्मपंथास विरोधी असा नाहीं. थिऑसफी हा धर्मच नव्हे, तें एक तत्त्वज्ञान आहे; प्रत्येक धर्मपंथांतलें रहस्य त्याच्या अनुयायांस सांगून त्या पंथावर प्रेम वाढविण्यास सांगणारें व शिकविणारें असें तें ज्ञान आहे. वास्तव सनातन-

वाद्यांची आणि थिऑसफिस्ट लोकांची एकवाक्यता होण्यास कांहीं हरकत नाहीं, असें आम्हांस तरी वाटतें.

थिऑसफीचीं तत्त्वें व थिऑसफिकल सोसायटीच्या राज्याचा कारभार या दोन गोष्टी वास्तविक पृथक् आहेत. पैकीं दुसरी गोष्ट कोणास नापसंत असल्यास त्यास पहिलीहि नापसंत झालीच पाहिजे असें नाहीं. बेझंटबाईमध्यें बुद्धिमत्ता, वक्तृत्व, करारीपणा व परिश्रमशीलता या गुणांचा उत्कर्ष असल्यामुळें, या गुणांचा आश्रय करून असणारे कांहीं दुर्गुणहि आहेत. त्यांचा स्वभाव हट्टी आहे; आपलें वर्चस्व सर्व गोष्टींत असावें असा त्यांचा अट्टाहास असतो; थिऑसफिकल सोसायटीच्या कारभारांत आपलें वर्चस्व राहण्याकरितां क्षुद्रमनाच्या राजकारणी पुरुषांनाच सुचतील अशा युक्त्या, कल्पना व क्लृप्त्याहि त्यांनीं वेळोवेळीं योजल्या आहेत; पाश्चिमात्य लोकांच्या श्रेष्ठत्वाविषयीं त्यांच्या कल्पना अँग्लोइंडियन लोकांस साजतील अशाच आहेत; आणि हिंदी राजकारणांत, थिऑसफीचा व तिच्या संस्थांचा बचाव करण्याकरितां म्हणा किंवा कसेंहि म्हणा, त्यांचा झोंक सरकारचें पक्षपातित्व करण्याकडे असतो, या सर्व गोष्टी उघड आहेत. तथापि व्यक्ति व संस्था यांच्यांतील भेद कोणीहि विसरतां कामा नये. थिऑसफी म्हणजे केवळ ॲनि बेझंट नव्हे—विशेषत: बनारसचें सेंट्रल हिंदु कॉलेज म्हणजे निव्वळ थिऑसफी नव्हे—हें प्रस्तुत वादांत लक्षांत ठेवण्यासारखें आहे. शिवाय पंडित मदनमोहन व ॲनि बेझंट या व्यक्ति एकत्र आल्या असतां पंडितजी म्हणजे बाईस सर्वस्वीं हार जाऊन त्यांच्या पचनीं पडतील असें आमचें मन सांगत नाहीं. सनातनवाद्यांमध्येंहि नेट व करारीपणा आहेच; आणि कदाचित् या दोन शक्तींच्या एकत्र संचारानें मधलीच एखादी दिशा सर्वमान्य होण्यासारखी निघेल, हेंच अधिक संभवनीय दिसतें. मनुष्य जसजसा मोठमोठ्या संस्थांचीं उपाधि आपल्यामागें लावून घेऊं लागतो, तसतशी त्याच्या अंगची वक्रता, खांचाखोंचा व विक्षिप्तपणाचे अवगुण घासून निघतात. संस्थेविषयीं पत्करलेल्या मोठ्या अहंकारबुद्धींत व्यक्तिविषयक छोटा अहंकार निमीलन पावतो, असाच जगांतील अनुभव आहे. या दृष्टीनें पाहतां पंडितजी व बेझंटबाई यांनीं एकजुटीनें वागावें असें आम्हांस वाटतें. एवढेंच काय, पण कलकत्याच्या कौन्सिल ऑफ एज्युकेशननें (राष्ट्रीय–शिक्षण–मंडळानें)हि या दोघांस घेऊन

मिळावें व सर्वांनीं मिळून हिंदु युनिव्हर्सिटीची कल्पना सिद्ध करावी, असेंहि आम्ही म्हणतों. कारण हिंदी राष्ट्राच्या प्रगतीस योग्य असें शिक्षण देणें हें ध्येयसेंच काय, पण तिघांचे प्रत्यक्ष साधनमार्गीहि जवळजवळ एकच आहेत. द्वैतांतून अद्वैत सिद्ध करणें हें जें आपल्या वेदांताचें मर्म आहे तेंच आपण आपल्या व्यवहाराला लावून वागूं लागलों तर किती तरी कल्याण होणार आहे!

## ३. हिंदु युनिव्हर्सिटी

(केसरी, तारीख ८ एप्रिल सन १९१३ इसवी.)

एक महिन्यापूर्वी हिंदु युनिव्हर्सिटीच्या स्वागतार्थ मुंबईस भरलेल्या सभेची हकीकत व तीन आठवड्यांपूर्वी पंडित मदनमोहन मालवीय यांच्याशीं झालेल्या आमच्या प्रतिनिधीच्या मुलाखतीची हकीकत केसरीच्या वाचकांनीं वाचली असल्यामुळें, त्यांना हिंदु युनिव्हर्सिटीच्या योजनेची बरीच कल्पना आली असेल. तथापि, या योजनेसंबंधानें आमचें स्वत:चें म्हणणें काय आहे हें सांगण्याची सवड पाहतां पाहतां आज मिळाल्यामुळें तें थोडक्यांत सांगण्याचा आमचा विचार आहे. सुमारें एक वर्षापूर्वी या विषयावर लिहितांना प्रस्तुत योजनेस आम्हीं सर्वसाधारणपणें आपली संमति दर्शविली होती; व तेंच आमचें मत अद्यापि कायम आहे. येवढेंच नव्हे तर नामदार पंडित मदन-मोहन मालवीय यांनीं नेट धरून आपल्या कल्पनेला इतकें परिणत स्वरूप आणलें याबद्दल त्यांचें अभिनंदन करावें तेवढें थोडेंच होणार आहे असें आम्हांस वाटतें. कारण सन १९०५ सालीं बनारस येथील राष्ट्रीयसभेच्या प्रसंगीं पंडितजींनीं सर्व प्रांतांच्या पुढाऱ्यांची सभा भरवून त्यांच्यापुढें आपली योजना मांडली, ना० बाबू सुरेंद्रनाथ बानर्जी यांनीं नेहमींप्रमाणें वक्तृत्वपूर्ण असें भाषण केलें, व इतर प्रांतांतील पुढाऱ्यांपैकीं कित्येकांनीं आपण अमुक अमुक मदत करूं असें जाहीर केलें; परंतु खरें बोलावयाचें म्हणजे त्या वेळीं या कल्पनेस मूर्त स्वरूप येईल अशी आम्हांस फारशी आशा वाटलीच नाहीं.

पण याचें कारणहि आम्ही सांगूं शकतों, व तें असें कीं, कोणतीहि योजना ही मूळ एखाद्या कोणत्या तरी मनुष्याची खास कल्पना असते,

व तिला मूर्त स्वरूप येण्याला जो उत्साहपूर्वक उद्योग अवश्य असतो तो तोच मनुष्य करूं शकतो. एकाची कल्पना व दुसऱ्याचा उद्योग हें सहसा शक्य नसतें; कां कीं, ममत्वबुद्धि हीच सर्व उद्योगाची जननी आहे. ममत्व हें अहंकारमिश्रित असो किंवा निरहंकारयुक्त असो, पण ममत्व पाहिजे; नाहींतर हातून उद्योग होणारच नाहीं. 'पैसा असला म्हणजे राजाची राणीसुद्धां मिळते' अशी एक ग्राम्य म्हण आहे. पण कितीहि पैसा देऊं केला तरी दुसऱ्याचें मूल दाखवून कोणच्याहि स्त्रीला पान्हा फोडणें अशक्य आहे! तसेंच राजाच्या राणीलाहि जर पुत्रमुख पहावें अशी इच्छा असली तर गर्भारपण व बाळंतपण यांचे क्लेश व कष्ट सोसले पाहिजेत. त्याकरितां भाडोत्री 'नर्स' ठेवून काम भागण्याची युक्ति आधुनिक शास्त्रनिष्णातांनाहि अद्यापि साधलेली नाहीं. सार्वजनिक कामाचीहि गोष्ट अशीच आहे. ज्याच्या बुद्धींत एखाद्या कल्पनेची गर्भधारणा होईल तोच तिच्याकरितां खटपट करील व झीज सोशील; आणि हिंदु युनिव्हर्सिटीची कल्पना पंडितजींची होती या गोष्टीचा मुख्य पुरावाहि हाच कीं, ते आपल्या वकिलीच्या दप्तराला गांठ मारून महिन्याची कांहीं नाहीं तरी हजार दोन हजार रुपयांची प्राप्ति बुडवून, युनिव्हर्सिटीकरितां वर्गणी मिळवावयाला बाहेर पडले; व जोंपर्यंत हा उद्योग स्वार्थत्यागपूर्वक करण्यास ते बाहेर हिंडतील, तोंपर्यंत हिंदु-युनिव्हर्सिटीची कल्पना फळाला येणार याविषयीं आम्हांला केव्हांहि शंका वाटणार नाहीं.

हिंदु युनिव्हर्सिटीची मूळ कल्पना १९०५ सालीं पुढें आली, तेव्हां-पासून अवघ्या सात वर्षांत तिला अनेक बाजूंनीं बरेंच स्वरूप आलें आहे. युनिव्हर्सिटीच्या फंडाची रक्कम आतांपर्यंत सुमारें पंचवीस लक्ष रोख जमली आहे, व ही रक्कम कमींत कमी एक कोटीपर्यंत नेण्याचा तिच्या पुरस्कर्त्यांचा इरादा आहे. एवढेंच काय, पण आपणांस निदान तीन कोटि रुपये मिळाले पाहिजेत अशी महत्त्वाकांक्षा मदनमोहन यांनीं बाळगल्याचें दिसतें. अल्पसंतुष्टता हा ब्राह्मणाचा धर्म खरा; पण तो केवळ त्याच्या स्वार्थाचा संबंध येतो तेथपर्यंतच समजावयाचा. परार्थ काय किंवा परमार्थ काय, यासंबंधानें ब्राह्मणानें अल्पसंतुष्ट असण्याचें कारण नाहीं; व त्रिवेणी क्षेत्रांतल्या या ब्राह्मण पंडितानें हिंदु विद्यालयाकरितां सामान्य मनुष्याच्या

कल्पनेला अतीत अशी वर्गणीची रक्कम जमविण्याची ईर्षा धरली, ही गोष्ट त्याच्या परार्थपरायणतेस शोभणारीच आहे. देशांतील मनुष्यांची दृष्टि मोठी होणें ही देशाच्या उत्कर्षाची एक खूणच आहे. १८९७ सालीं टिळकांच्या बचावाकरितां उभारलेली रक्कम ७०।८० हजारांपर्यंत गेली, तेव्हां सर्व आश्चर्यानें थक्क झाले. पण समर्थविद्यालयाला किंवा पैसाफंडाला पाऊण पाऊण लाख रुपये वर्गणी जमली तेव्हां तितकें आश्चर्य वाटलें नाहीं; कारण दृष्टि मोठी होत चालली होती. ना० गोखल्यांच्या स्नेह्यांनीं व 'सर्व्हन्टस् ऑफ इंडिया' च्या हितचिंतकांनीं बिनबोभाट व या कानाची बातमी या कानाला न कळतां गेल्या ७।८ वर्षांत जी रक्कम गोखल्यांच्या स्वाधीन केली ती सुमारें दोन लाखपर्यंत तरी असावी! परलोकवासी जमशेटजी टाटा यांनीं शास्त्रीय शोधांच्या शाळेकरितां ३२ लक्ष रुपये दिले, तेव्हां ती आधुनिक दानपद्धतींत एक क्रांतीच घडून आल्यासारखी वाटली. पण आज पहावें तों पंडित मदनमोहन हिंदु युनिव्हर्सिटीच्या कार्याकरितां तीन कोटी रुपये जमविण्याच्या गोष्टी बोलत आहेत!

आणि भावनेच्या मानानें थोडें तरी फळ आल्यावांचून राहावयाचें नाहीं. जगामध्यें इतर देशांत जेथें शिक्षणाचा फैलाव झालेला आहे, तेथेंहि अशाच गोष्टी घडत असतात. अमेरिकेंत १८७१ ते १९०१ या तीस वर्षांत मिळून खासगी लोकांनीं साठ कोटि रुपये युनिव्हर्सिट्या काढण्याकरितां खर्च केले; म्हणजे दरसाल सुमारें दोन कोट रुपये खासगी वर्गणी देण्यांत आली. इंग्लंडांतहि या तीस सालांत साडेसात कोटि रुपये इतकी खासगी वर्गणी युनिव्हर्सिटयांप्रीत्यर्थ देण्यांत आली. हिंदुस्थान, अमेरिका व इंग्लंड यांच्या-पेक्षां गरीब आहे खरें, पण हिंदु युनिव्हर्सिटीसारखी संस्था स्थापण्यास लागणारे दोन किंवा तीन कोट रुपये देण्याला कांहीं हिंदुस्थान गरीब नाहीं! सरकारनें उदारपणें शिक्षणावर किती पैसा खर्च करावा व ते खरोखर किती खर्च करतात, या प्रश्नाचा विचार या बाबतींत करण्याचें कारण नाहीं. त्यांचा बरेवाईटपणा त्यांचा त्यांना. पण हिंदु युनिव्हर्सिटीसारख्या विशिष्ट धर्माच्या संस्थेला सरकार पैशाची मदत करील किंवा त्यांनीं ती करावी अशी आमची अपेक्षा नाहीं. किंबहुना या बाबतींत नुसतें गप्प बसायला काय घ्याल असेंच

सरकारास विचारण्याची पाळी आहे. अशा वेळीं हिंदु युनिव्हर्सिटी ही आम्हां हिंदुलोकांची आवडती संस्था, व तिच्याकरितां आम्ही हिंदु लोक काय करीत आहों, इतक्यापुरताच कोणीहि विचार करणार. सरकारनें करावें तें केलें नाहीं, म्हणून आम्हीं करावें तें न करणें हें केव्हांहि ठीक नव्हे. शिवाय हिंदु युनिव्हर्सिटीची ही योजना अशा प्रकारची आहे कीं, शंभरन्-शंभर वर्षें गेलीं तरी अशा योजनेस हात घालावा असें सरकारच्या कधींहि मनांत येणार नाहीं. पण आम्हीं हिंदु युनिव्हर्सिटी स्थापण्यासारखें महत्कृत्य करून दाखविलें तर आपलें कर्तव्य न केल्याबद्दल सरकारास ईर्षा वाटून तें करण्यास तें उद्युक्त तरी होतील.

सुदैवानें विद्यादानाची प्राचीन परंपरा आम्ही अद्यापि विसरलों नाहीं. तक्षशिला, नालंद या ठिकाणीं असलेलीं प्रचंड प्राचीन विद्यापीठें, पदरीं दहा दहा हजार विद्यार्थी बाळगून, त्यांना अन्नवस्त्र फुकट देऊन शिकविणारे वशिष्ठ, शौनक यांसारखे प्राचीन कुलपति यांची स्मृति नष्ट होण्यापूर्वींच आधुनिक कालानुरोधानें शिक्षण देण्याचा धर्मादाय करण्यास आपण हिंदु लोकांनीं सुरवात केली आहे. संस्कृत ही मृतभाषा; पण तिला सरकारदरबारीं कोणी फारसें विचारीत नाहीं. अशी स्थिति असतां आम्ही किती तरी संस्कृत पाठशाळा अद्यापि खाजगी रीतीनें चालवीत आहों! इतर प्रकारच्या खासगी शिक्षणसंस्थाहि कांहीं थोड्या नाहींत. मद्रासचें पाछापाचें कॉलेज व शाळा, पुण्याचें डेक्कन एज्युकेशन सोसायटीचें कॉलेज व शाळा, तळेगांवचें माजी समर्थविद्यालय, मुंबईची गोकुळदास तेजपाळची संस्था, अहमदाबादची रणछोडलाल छोटालाल टेक्निकल इन्स्टिटयूट, चिनुभाई माधवलाल यांची शास्त्रीय शिक्षणाची शाळा, सिंधमधील दयाराम जेठमल कॉलेज, कलकत्त्यास व मुंबईस प्रेमचंद रायचंद यांनीं युनिव्हर्सिटीस देणग्या देऊन केलेलें आपलें स्मारक, लाहोर येथील आर्यसमाजाचें दयानंद अँग्लोवेदिक कॉलेज, हरिद्वारचें गुरुकुल व शीखांचें सरदार दयाळसिंग मिजिथा कॉलेज, अमृतसर येथील खालसा कॉलेज, मीरत येथील नानकचंद ट्रस्टच्या शाळा, दिल्ली येथील हिंदु कॉलेज, अलाहाबाद येथील कायस्थ पाठशाळा, बनारस येथील सेंट्रल हिंदु कॉलेज, बांकीपूर येथील बहार नॅशनल कॉलेज, भागलपूर येथील तेजनारायण जुबिली कॉलेज, मुझफरपूर

येथील भूमिहर कॉलेज, कलकत्ता येथील सिटी कॉलेज, रिपन कॉलेज व मेट्रॉपॉलिटन इन्स्टिटयूशन, तसेंच कलकत्त्याचें नॅशनल कॉलेज, कौन्सिल ऑफ एज्युकेशन आणि नॅशनल मेडिकल कॉलेज, बारिसाल येथील ब्रजमोहन इन्स्टिटयूशन, महाराजा कासिमबझार यांचें कृष्णनाथ कॉलेज, आग्रा येथील बळवंत रजपूत हायस्कूल वगैरे अनेक खाजगी शिक्षणसंस्था हिंदु लोकांच्या शिक्षणविषयक धर्मबुद्धीची साक्ष आज देत आहेत. असें असल्यामुळें या सर्वांहून श्रेष्ठ व सर्व हिंदूंना साधारण असें हिंदु लोकांचें एकादें खास विद्यापीठ असावें असें वाटणें साहजिकच आहे.

हिंदु युनिव्हर्सिटीमध्यें किती निरनिराळ्या कॉलेजांचा समावेश व्हावा हें अर्थात् पैशाच्या मदतीवर अवलंबून राहील; पण प्रसिद्ध झालेल्या योजनेवरून पाहातां खालील सात कॉलेजें काढण्याचा चालकांचा हेतु दिसतो. ( १ ) संस्कृत कॉलेज; यांतच धर्मशिक्षणाची व्यवस्था केली जाईल. ( २ ) भाषा व वाङ्मय यांचें कॉलेज; ( ३ ) शास्त्रें व उद्योगधंदे यांचें कॉलेज; ( ४ ) शेतकी कॉलेज; ( ५ ) व्यापारी शिक्षणाचें कॉलेज; ( ६ ) वैद्यक कॉलेज; ( ७ ) संगीत व ललितकला यांचें कॉलेज. इतकीं निरनिराळीं कॉलेजें उत्तम रीतीनें चालण्याला सालिना दोन कोटी रुपयांचें व्याज लागेल असें घेऊन चालण्यास हरकत नाहीं. एकटा मुंबई इलाखाच घेतला व त्यांतील सरकारी कॉलेजें तेवढीं लक्षांत घेतलीं तरी त्या सर्वांवर मिळून सालिना सुमारें ८।९ लक्ष रुपये खर्च होतो, व इतकें कायमचें उत्पन्न येण्याला अडीच तीन कोट रुपये व्याजीं लावून ठेवावे लागतील! बनारस येथील हिंदु युनिव्हर्सिटींत सर्व हिंदुस्थानांतील लोक येणार, अर्थात् विद्यार्थ्यांचा भरणा तेथें बराच होईल. वास्तव एकंदर युनिव्हर्सिटीवर खर्च सालिना पांच सहा लक्ष रुपये आल्यास नवल नाहीं; पण या बाबतींत आंथरूण पाहूनच हातपाय पसरणें जरूर आहे; व आमचें स्वतःचें तरी मत असें आहे कीं, वर निर्दिष्ट केलेलीं सातहि कॉलेजें सुरवातीस काढलींच पाहिजेत असें नाहीं. उदाहरणार्थ, वरील यादीपैकीं शेतकी कॉलेज, व्यापारी शिक्षणाचें कॉलेज आणि ललितकलांचें कॉलेज हीं सुरवातीस नसलीं तरी चालतील. संस्कृत विद्येचें व धर्मशिक्षणाचें कॉलेज, भौतिक शास्त्रें व उद्योगधंद्यांचें कॉलेज आणि वैद्यक कॉलेज हीं मात्र प्रारंभींहि अवश्य

आहेत; व ऐहिक आणि पारमार्थिक या दोनहि प्रकारच्या साधनांच्या दृष्टीनें सुरवातीस एवढी व्यवस्था झाली तरी पुरे. याशिवाय प्राचीन विद्यासंशोधनाचें एक खातें हिंदु युनिव्हर्सिटीस जोडलें तर शिक्षणाच्या हरएक बाबतींत जुन्या नव्याचा मेळ घालण्यास तें उपयोगी पडेल. हिंदु युनिव्हर्सिटीचा मुख्य उद्देश सरकारी संस्थांत जें व ज्या प्रकारचें शिक्षण आज मिळण्यासारखें नाहीं तें व त्या प्रकारचें शिक्षण मिळवून देणें हाच मुख्यतः असला पाहिजे. उदाहरणार्थ, हिंदुधर्माचें शिक्षण आज कोणत्याहि सरकारी संस्थेंत मिळणें शक्य नाहीं. अर्थात् हें शिक्षण देणें हें हिंदु युनिव्हर्सिटीचें पहिलें काम आहे. शास्त्रीय शिक्षण सरकारी संस्थांत मिळतें पण तें फार थोडें आहे. वैद्यक शिक्षण देणारीं कॉलेजें हिंदुस्थानांत कांहीं आहेत; पण आमच्या लोकांनीं स्वतंत्र रीतीनें चालविलेलें व इस्पितळांची जोड असलेलें वैद्यक कॉलेज हिंदुस्थानांत नाहीं तें बनारस युनिव्हर्सिटीनें उपलब्ध करून द्यावें.

हिंदु युनिव्हर्सिटीच्या चालकांच्या योजनेप्रमाणें हीं सर्व सातहि कॉलेजें निघोत किंवा पैशाच्या कमतरतेमुळें त्यांतील थोडीं निघोत. कसेंहि असलें तरी एवढी गोष्ट निर्विवाद आहे कीं, हिंदु लोकांची अशी स्वतंत्र युनिव्हर्सिटी झाल्यानें सरकारी नोकरींत प्रवेश झालेला नसतांहि विद्वान् म्हणून खरी मान्यता पावणें, व विशेष अधिकारयुक्त वाणीनें आपल्या ज्ञानाचा फायदा लोकांस मिळवून देणें, या गोष्टी साध्य होतील. 'प्रोफेसर' या नांवांतच कांहीं विशेष जादु आहे असें नाहीं. पण ज्ञान किंवा विद्वत्ता मोजण्याचें तें एक सर्वमान्य व सर्वसाधारण असें माप असतें. विलायतेंत व युरोपांत 'प्रोफेसर' या शब्दाला जो अर्थ आहे, त्यावरून पाहतां कोणताहि एखादा सिद्धांत किंवा मत एखाद्या युरोपियन प्रोफेसरानें काढलेलें किंवा प्रतिपादलेलें आहे असें कळलें म्हणजे त्या सिद्धांताविषयीं किंवा मताविषयीं आपल्या मनांत, ती व्यक्ति माहीत नसतांहि, बऱ्याच उच्च दर्जाचा आदर उत्पन्न होतो. युरोपखंडांतल्याइतके विद्वान् व निष्णात खासगी लोक हिंदुस्थानांत आज पुष्कळच आहेत असें आमचें म्हणणें नाहीं; तरी पण जे थोडे आहेत त्यांच्या मान्यतेला प्रतिष्ठित असें खासगी अधिष्ठान आज मिळत नाहीं. इकडील कॉलेजांतील प्रोफेसरीच्या जागाचशा काय पण पदव्यासुद्धां फारच

थोड्या; व त्याहि सरकार किंवा तत्प्रेरित युनिव्हर्सिट्या यांच्याच हातीं असल्यामुळें, त्या फारच थोड्या नेटिव लोकांच्या हातीं येतात. इकडील युनिव्हर्सिट्यांत बहुतेक भरणा युरोपियन प्रोफेसरांचा ! आणि इकडील एखाद्या नेटिव्हाची विद्वत्ता स्वतंत्रपणें मापणें झाल्यास युरोपकडे धांव घेतल्या-शिवाय गत्यंतर नाहीं. हिंदु युनिव्हर्सिटी झाली असतां ही स्थिति थोडी-बहुत तरी पालटेल.

हिंदु युनिव्हर्सिटींत अमुक शिक्षक असूं नये असें म्हणण्यापर्यंत सरकारचा प्रवेश या संस्थेंत होणार आहे ही गोष्ट अर्थात् चांगलीशी नाहीं. पण हिंदुधर्मांत ज्याप्रमाणें कोणच्याहि श्रौतस्मार्त कर्मांच्या प्रारंभीं श्रीगणपतीचें आवाहन व पूजन हीं अवश्य आहेत, त्याप्रमाणें कोणचीहि सार्वजनिक स्वरूपाची शिक्षणसंस्था हल्लीं स्थापावयाची झाल्यास संकल्पित कर्म तडीस जाण्याकरितां व ' अविघ्नमस्तु ' असा आशीर्वाद मागून घेण्याकरितां सर-कारचें आवाहन व पूजन करणें अवश्य होऊन राहिलें आहे. ज्या शिक्षण-संस्था सरकारची मदत घेणार नाहींत, त्या जिवंत राहण्यास पात्रच नाहींत हें, कांहीं वर्षांपूर्वीं सरकारानें लिहून ठेविलेलें महावाक्य, आपल्या डोळ्या-पुढें आहेच. शिवाय, स्वतंत्र कायद्याचा मंत्र जपल्याशिवाय हिंदु युनिव्ह-र्सिटीची प्राणप्रतिष्ठा होणें शक्य नाहीं असें तिच्या चालकांस वाटून त्यांनीं त्या अर्थाची खटपट पूर्वीपासून सुरू केली असल्यामुळें, हिंदु युनिव्हर्सिटीचा कायदा करून देण्याबद्दल सरकार काय घालील त्या अटी कमीच म्हटल्या पाहिजेत ! पण तें असो; हिंदु युनिव्हर्सिटींत शिक्षण द्यावयाचें तें एकदम देशी भाषेंतून दिलें जाणार नाहीं, असें जें चालकांनीं ठरविलेलें दिसतें तें मात्र आम्हांस पसंत नाहीं. ' वाघाच्या शिकारीची तयारी करावी तेव्हां कोल्ह्याची शिकार होते ' या न्यायानें देशी भाषेंतूनच शिक्षण देऊं असा चालकांनीं मूळपासून संकल्प करावा तेव्हां कोठें निम्मेशिमें देशी भाषेंतून व निम्मेशिमें इंग्रजी भाषेंतून शिक्षण दिलें जाईल अशी व्यवस्था पदरांत पडेल. हिंदी भाषा ही हिंदुस्थानांतील सर्व लोकांस समजते व या भाषेच्या द्वारें जितकें होईल तितकें युनिव्हर्सिटीचें कामकाज करावयाचें, असा चालकांनीं निश्चय केला तर देशी भाषेचा बस बसण्यास खचित मदत होईल. हिंदु-स्थानांतून जर्मनींत व जपानांत शिकण्यास जाणाऱ्या विद्यार्थ्यांना सुरवातीस

जर्मन व जपानी भाषा चांगल्या न आल्यामुळें त्यांचें जर अडत नाहीं तर हिंदुस्थानांतील कोणत्याहि भागांतून नवीन युनिव्हर्सिटींत गेलेल्या विद्यार्थ्यांस किंवा शिक्षकांस कामचलाऊ हिंदी लवकरच येऊं लागण्यास फारशी अडचण पडेल, असें आम्हांस वाटत नाहीं.

हिंदु युनिव्हर्सिटींत बिझांटबाईचा समावेश केल्यानें तिजवर थिऑसफीचा पगडा पडेल, असाहि एक आक्षेप या बाबतींत आहे. पण तो मात्र आम्हांस महत्त्वाचा वाटत नाहीं. कोणत्याहि गोष्टीची अतिशयोक्ति झाली म्हणजे ती हास्यास्पद होते व थिऑसफीच्या कांहीं अंगांचेंहि असेंच झालेलें आहे. तथापि, थिऑसफीचे चालक परकी व परधर्मी असतां, त्यांनीं हिंदुधर्माचा पक्षपात धरून आपलें सर्व बुद्धिवैभव हिंदुधर्माचें महत्त्व व वैभव खुलवून दाखविण्याकडेच खर्च केलें आहे, ही गोष्ट विसरतां येत नाहीं. थिऑसफीबाह्य अशा व्यावहारिक हिंदुधर्मांत गुरूंचें थोतांड आणि शिष्यांची अंधश्रद्धा हीं काय थोडीं दिसून येतात? या प्रकरणांत जर गुरु-शिष्यांचें 'हिंदुत्व' अमान्य होत नाहीं तर थिऑसफीस्टांचें 'हिंदुत्व' तरी कां अमान्य व्हावें? निदान ज्या उद्योगी, उत्साही व कार्यनिष्ठ स्त्रीनें आपल्या हिमतीवर सेंट्रल हिंदु कॉलेजसारखी संस्था निर्माण केली, तिचा हिंदु युनिव्हर्सिटीच्या चालकांत समावेश झाला म्हणून आम्ही नाराज आहों, असें म्हणणारांनीं 'न करत्याचा वार शनिवार' या म्हणीस पुष्टि देण्याशिवाय दुसरें कांहीं केलें नाहीं असें आम्ही तरी म्हणूं. शेंपन्नास सनातनी प्रमुख गृहस्थांमध्यें एकस्याएक ॲनि बिझांटबाईस घेतल्यानें हिंदु युनिव्हर्सिटीचा किल्ला थिऑसफिस्ट शत्रूंच्या हस्तगत होईल हें म्हणणें आक्षेपकांच्या न्यायबुद्धीस न शोभणारें आहे एवढेंच नव्हे तर हिंदु युनिव्हर्सिटीच्या चालकांत सामील होणाऱ्या प्रमुख गृहस्थांस नादान ठरविणारं आहे! तात्पर्य, जगांतील कोणचीहि गोष्ट सर्वांना हवी तशी सोळा आणे असत नाहीं, हा सिद्धांत खरा असला तरी 'अधिक चांगलें' मिळेल या निरुद्योगी आशेवर चालत हातीं आलेलें 'चांगलें' गमावणें हें कांहीं समंजसपणाचें लक्षण नव्हे. वास्तव ज्यांना हिंदु युनिव्हर्सिटीस द्रव्याची अगर इतर मदत करण्याची खरी इच्छा असेल त्यांनीं निदान असल्या भ्रामक आक्षेपांना भिऊन तरी हात आंखडून धरण्याचें कारण नाहीं, असें आमचें म्हणणें आहे.

# ४. बनारस हिंदु कॉलेजांतील फूट.

( केसरी, तारीख ६ मे १९१३ इसवी )

एखाद्या समुदायांत किंवा संस्थेंत मतभेदाचा पूर लोटला म्हणजे तो कोणत्या ना कोणत्या तरी मार्गानें वाहून जावा लागतो; आणि परस्पर दोषारोप व फूट या मार्गानें तें कार्य प्रायः घडून येतें असें आढळतें. हिंदुस्थानांतील थिऑसफिकल सोसायटींत आज दोन तीन वर्षें जो मतभेद माजून राहिला होता, त्याला बिझांटबाईवर मद्रास हायकोर्टांत झालेल्या दिवाणी दाव्यानें एक तोंड लागलें होतेंच; पण गेल्या आठवड्यांत बनारस हिंदु कॉलेजांतील प्रिन्सिपाल अरंडेल, प्रो० वुडहाऊस, प्रो०तेलंग, प्रो०गुर्टु वगैरे दहावीस शिक्षकांनीं राजीनामे दिल्यानें या मतभेदास आणखी एक तोंड लागून थिऑसफिकल सोसायटीच्या पोटांत रक्त नासून मतभेदाची कालवाकालव किती होऊन राहिली होती हें आतां लोकांना उघड पहावयास मिळत आहे. बिझांटबाईच्या अवतारकृत्याच्या पोरखेळावर टीका करितांना आम्हीं म्हटलेलें वाचकांस आठवत असेलच कीं, बाईच्या विरुद्ध बोलणें म्हणजे कांहीं थिऑसफीच्या विरुद्ध बोलणें नव्हे, याचें एक प्रत्यंतर, बाईवरील दाव्याचे कामीं उभयपक्षांत थिऑसफिस्ट लोक असल्यानें मिळालेंच होतें, व प्रस्तुतच्या बनारस कॉलेजांतील फुटीनें त्याच गोष्टीचें आणखी विशेष प्रत्यंतर येत आहे. सदर राजीनाम्यांच्या मुळाशीं अवतारकृत्याचा पोरखेळ हाच आहे. राजीनामे देणाऱ्या शिक्षकांचें म्हणणें असें आहे कीं, कॉलेजच्या मॅनेजिंग कमिटींतील बहुमत बिझांटबाईविरुद्ध असून त्यांनीं तिचा छळ चालविला आहे. या दोषारोपांतील 'छळ' खरा असो वा खोटा असो; इतकें मात्र खास कीं, ज्यांच्या हातीं बनारस हिंदु कॉलेजाचीं सूत्रें आहेत त्यांतील निम्याहून अधिक लोकांना बिझांटबाईची अवतारक्रीडा नापसंत आहे. या बहुमतवाल्यांत कॉलेजचे एक ट्रस्टी भगवानदास हे आहेत. हे गृहस्थ स्वतः बडे थिऑसाफिस्ट असून आजवर बाईचा उजवा हात असें त्यांना मानण्यांत येत असे. पण कृष्णमूर्तीच्या शरिरांत मैत्रेयमुनी परकायाप्रवेश करून जगास ज्ञान शिकविण्याकरितां अवतार घेणार, या शुभवर्तमानाची घोषणा बाई करूं लागल्यामुळें त्यांचें व बाईचें बनेनासें झालें. तेव्हांपासून बाईंना

जर्मन व जपानी भाषा चांगल्या न आल्यामुळें त्यांचें जर अडत नाहीं तर हिंदुस्थानांतील कोणत्याहि भागांतून नवीन युनिव्हर्सिटींत गेलेल्या विद्यार्थ्यांस किंवा शिक्षकांस कामचलाऊ हिंदी लवकरच येऊं लागण्यास फारशी अडचण पडेल, असें आम्हांस वाटत नाहीं.

हिंदु युनिव्हर्सिटींत बिझांटबाईचा समावेश केल्यानें तिजवर थिऑसफीचा पगडा पडेल, असाहि एक आक्षेप या बाबतींत आहे. पण तो मात्र आम्हांस महत्त्वाचा वाटत नाहीं. कोणत्याहि गोष्टीची अतिशयोक्ति झाली म्हणजे ती हास्यास्पद होते व थिऑसफीच्या कांहीं अंगांचेंहि असेंच झालेलें आहे. तथापि, थिऑसफीचे चालक परकी व परधर्मी असतां, त्यांनीं हिंदुधर्माचा पक्षपात धरून आपलें सर्व बुद्धिवैभव हिंदुधर्माचें महत्त्व व वैभव खुलवून दाखविण्याकडेच खर्च केलें आहे, ही गोष्ट विसरतां येत नाहीं. थिऑसफीबाह्य अशा व्यावहारिक हिंदुधर्मांत गुरूंचें थोतांड आणि शिष्यांची अंधश्रद्धा हीं काय थोडीं दिसून येतात? या प्रकरणांत जर गुरुशिष्यांचें 'हिंदुत्व' अमान्य होत नाहीं तर थिऑसफीस्टांचें 'हिंदुत्व' तरी कां अमान्य व्हावें? निदान ज्या उद्योगी, उत्साही व कार्यनिष्ठ स्त्रीनें आपल्या हिमतीवर सेंट्रल हिंदु कॉलेजसारखी संस्था निर्माण केली, तिचा हिंदु युनिव्हर्सिटीच्या चालकांत समावेश झाला म्हणून आम्ही नाराज आहों, असें म्हणणारांनीं 'न करत्याचा वार शनिवार' या म्हणीस पुष्टि देण्याशिवाय दुसरें कांहीं केलें नाहीं असें आम्ही तरी म्हणूं. शेंपन्नास सनातनी प्रमुख गृहस्थांमध्यें एकल्याएक ॲनि बिझांटबाईस घेतल्यानें हिंदु युनिव्हर्सिटीचा किल्ला थिऑसफिस्ट शत्रूंच्या हस्तगत होईल हें म्हणणें आक्षेपकांच्या न्यायबुद्धीस न शोभणारें आहे एवढेंच नव्हे तर हिंदु युनिव्हर्सिटीच्या चालकांत सामील होणाऱ्या प्रमुख गृहस्थांस नादान ठरविणार आहे! तात्पर्य, जगांतील कोणचीहि गोष्ट सर्वांना हवी तशी सोळा आणे असत नाहीं, हा सिद्धांत खरा असला तरी 'अधिक चांगलें' मिळेल या निरुद्योगी आशेवर चालत हातीं आलेलें 'चांगलें' गमावणें हें कांहीं समंजसपणाचें लक्षण नव्हे. यास्तव ज्यांना हिंदु युनिव्हर्सिटीस द्रव्याची अगर इतर मदत करण्याची खरी इच्छा असेल त्यांनीं निदान असल्या भ्रामक आक्षेपांना भिऊन तरी हात आंखडून धरण्याचें कारण नाहीं, असें आमचें म्हणणें आहे.

## ४. बनारस हिंदु कॉलेजांतील फूट.

( केसरी, तारीख ६ मे १९१३ इसवी )

एखाद्या समुदायांत किंवा संस्थेंत मतभेदाचा पूर लोटला म्हणजे तो कोणत्या ना कोणत्या तरी मार्गानें वाहून जावा लागतो; आणि परस्पर दोषारोप व फूट या मार्गानें तें कार्य प्रायः घडून येतें असें आढळतें. हिंदुस्थानांतील थिऑसफिकल सोसायटींत आज दोन तीन वर्षें जो मतभेद माजून राहिला होता, त्याला बिझांटबाईवर मद्रास हायकोर्टांत झालेल्या दिवाणी दाव्यानें एक तोंड लागलें होतेंच; पण गेल्या आठवड्यांत बनारस हिंदु कॉलेजांतील प्रिन्सिपाल अरंडेल, प्रो० वुडहाऊस, प्रो०तेलंग, प्रो०गुर्तु वगैरे दहावीस शिक्षकांनीं राजीनामे दिल्यानें या मतभेदास आणखी एक तोंड लागून थिऑसफिकल सोसायटीच्या पोटांत रक्त नासून मतभेदाची कालवाकालव किती होऊन राहिली होती हें आतां लोकांना उघड पहावयास मिळत आहे. बिझांटबाईच्या अवतारकृत्याच्या पोरखेळावर टीका करितांना आम्हीं म्हटलेलें वाचकांस आठवत असेलच कीं, बाईच्या विरुद्ध बोलणें म्हणजे कांहीं थिऑसफीच्या विरुद्ध बोलणें नव्हे, याचें एक प्रत्यंतर, बाईवरील दाव्याचे कामीं उभयपक्षांत थिऑसफिस्ट लोक असल्यानें मिळालेंच होतें, व प्रस्तुतच्या बनारस कॉलेजांतील फुटीनें त्याच गोष्टीचें आणखी विशेष प्रत्यंतर येत आहे. सदर राजीनाम्यांच्या मुळाशीं अवतारकृत्याचा पोरखेळ हाच आहे. राजीनामे देणाऱ्या शिक्षकांचें म्हणणें असें आहे कीं, कॉलेजच्या मॅनेजिंग कमिटींतील बहुमत बिझांटबाईविरुद्ध असून त्यांनीं तिचा छळ चालविला आहे. या दोषारोपांतील 'छळ' खरा असो वा खोटा असो; इतकें मात्र खास कीं, ज्यांच्या हातीं बनारस हिंदु कॉलेजाचीं सूत्रें आहेत त्यांतील निम्याहून अधिक लोकांना बिझांटबाईची अवतारक्रीडा नापसंत आहे. या बहुमतवाल्यांत कॉलेजचे एक ट्रस्टी भगवानदास हे आहेत. हे गृहस्थ स्वतः बडे थिऑसफिस्ट असून आजवर बाईचा उजवा हात असें त्यांना मानण्यांत येत असे. पण कृष्णमूर्तीच्या शरिरांत मैत्रेयमुनी परकायाप्रवेश करून जगास ज्ञान शिकविण्याकरितां अवतार घेणार, या शुभवर्तमानाची घोषणा बाई करूं लागल्यामुळें त्यांचें व बाईचें बनेनासें झालें. तेव्हांपासून बाईना

आपला हा उजवा हात डाव्या हातासारखा भासूं लागला; व पुढें पुढें तर तो गळून पडेल तरी बरें असेंहि वाटूं लागलें. बनारस कॉलेज थिऑसफिस्ट लोकांनीं मूळ काढलें तरी त्याला 'थिऑसफिकल कॉलेज' हें नांव न देतां 'हिंदु कॉलेज' हें व्यापक नांव ज्याअर्थी देण्यांत आलें, त्याअर्थी तें थिऑसफीच्या निरुंद तत्त्वाच्या अनुरोधानें न चालविलें जातां, हिंदु-धर्माच्या प्रशस्त व व्यापक तत्त्वांच्या अनुरोधानें चालविलें जावें अशीच अपेक्षा कोणीहि समंजस मनुष्य करणार. पण खुद्द कॉलेजच्या संस्थापक बाई, कॉलेजचे प्रिन्सिपाल व इतर शिक्षक यांनीं सर्व सनातन हिंदुधर्माभिमान्यां-नाच काय, पण कित्येक प्रमुख थिऑसफिस्टांनाहि मान्य न होणारा असा विशिष्टांतला विशिष्ट पंथ काढून एकंदर थिऑसफिकल सोसायटीच्या नांवाला बट्टा लावण्याची पाळी आणली, त्यामुळें कॉलेजच्या व्यवस्थापक मंडळांत सहजच मतभेद माजला! बाईंना मित्र शत्रुसारखे भासूं लागले; विरोधी मत प्रतिपादन करणें हा त्यांना छळ वाटूं लागला; व अखेर प्रति-कूल मतवाद्यांचें बहुमत झाल्यानें बाईंच्या थोडयाशा कट्टया अनुयायांचे राजीनामे मंजूर होऊन बल्लारी येथें स्वतंत्र थिऑसफिकल कॉलेज काढ-ण्याच्या गोष्टी आतां ऐकूं येऊं लागल्या आहेत! बाईंनीं अशा रीतीनें सवता सुभा स्थापून त्यांत काय वाटेल तें केल्यास आम्हाला त्यांत मन घालण्याचें मुळींच कारण नाहीं. पण 'हिंदु' या नांवानें चालणारें बनारसचें कॉलेज ही त्यांची खासगी मत्ता नसल्यानें, त्यांतील बखेडा मोडून बिझांटबाईंच्या व्यक्तीस देवाप्रमाणें मानणारी मंडळी त्यांतून निघाली हें फार चांगलें झालें असेंच म्हटलें पाहिजे 'हिंदु युनिव्हर्सिटी' निघाल्यास बनारस हिंदु कॉलेज हें त्या संस्थेस जोडलें जावें अशी योजना ठरलेली आहेच. पण पुढें कांहीं दिवसांनीं होणारी ही गोष्ट आजच अशा रीतीनें घडून येईल अशी अटकळ नव्हती. "माझें या कॉलेजांतील काम संपलें होतें" असें स्वतः बाईच म्हणतात, त्याअर्थी त्यांच्या उपद्यापी आत्म्यानें या कॉलेजच्या कुडीचा त्याग करावा, व परकायाप्रवेश-विद्येच्या साहाय्यानें दुसऱ्या एखाद्या संस्थेंत शिरावें अशी त्यांना त्यांच्या महात्म्या गुरूंकडून आज्ञा झाली असण्याचाहि संभव आहे. कसेंहि असो, झालें तें एका अर्थी बरें झालें असेंच म्हटलें पाहिजे. अलाहाबाद व बनारस येथील सनातनी

हिंदु व थिऑसफिस्ट बाई यांची गांठ पडली असतां, कोण कुणास खाईल व पचनीं पाडील याविषयीं पुष्कळांस शंका होती. पण आम्ही अंदाज केल्याप्रमाणें बिझांटबाईच्या पक्षालाच हार खावी लागली आहे.

बनारस हिंदु कॉलेजांत झालेल्या या फाटाफुटीपासून बराच बोध घेतां येण्यासारखा आहे. कोणत्याहि शिक्षणसंस्थेंत शिक्षणबाह्य अशा विषयांचा कितपत प्रवेश करितां येईल किंवा यावा हा एक वादग्रस्त प्रश्नच आहे; व फक्त खास सरकारी खेरीजकरून इतर सर्व शिक्षणसंस्थांना त्या वादग्रस्ततेचा अनुभव केव्हां ना केव्हां थोडा ना थोडा तरी येतोच. बनारस हिंदु कॉलेज ही केवळ खासगी संस्था; राजकारणाशीं तिचा संबंध मुळींच नव्हता; व जो होता तो सरकारास सर्वस्वीं मानवेल असाच होता; कारण बिझांटबाई तरुण मुलांनीं राजकारणांत पडूं नये असें जीव तोडतोडून उघड प्रतिपादन करीत असत हें प्रसिद्धच आहे. पण राजकारण शिक्षण—बाह्य हें जसें त्या मानीत, तशा इतर कित्येक गोष्टी त्या मानीत नसत. उदाहरणार्थ, मुलांस थिऑसफीचें म्हणजे विशिष्ट धर्ममतपंथाचें शिक्षण देणें हें शिक्षणाला सोडून नाहीं असें त्या समजत; येवढेंच नव्हे तर मुलांनीं बाईच्या अवतारकृत्याच्या पोरखेळांत सामील व्हावें, 'पूर्वेकडील ताऱ्या'चें म्हणजे नव्या अवताराचें चक्राकार निशाण त्यांनीं आपल्या छातीवर लटकवावें व स्वतः बाईंना देव मानून तिची पूजा करावी, या गोष्टी शिक्षणाला सोडून नाहींत असें त्या मानीत हें उघड आहे. हिंदुधर्मशिक्षण देणें हा जरी सदरहू कॉलेज काढण्याचा एक मूळ हेतु असला तरी, हिंदुधर्मशिक्षण म्हणजे काय आणि थिऑसफीच्या अंतरंगांतल्या अंतरंगांत बनावट पावलेली व्यक्तिविषयक सजीव मूर्तिपूजा म्हणजे काय, यांतील विवेक बाईंनीं केव्हां केला होता असें दिसत नाहीं. हिंदुधर्मांत मूर्तिपूजा, अवतार, गुरुभक्ति वगैरे गोष्टी आहेत, नाहीं असें नाहीं. पण या तीनहि बाबतींत बिझांटसांप्रदायाची मजल इतकी पुढें गेली आहे कीं, सुशिक्षित हिंदू-समाजास त्या मुळींच आवडणें शक्य नाहीं. मद्रास-मेल पत्राच्या एका प्रतिनिधीनें बाईची मुलाखत या बाबतींत घेतली तेव्हां त्या असें म्हणाल्या कीं, माझ्या हातीं कॉलेज होतें तोंपर्यंत तेथें उदारमतवादी असा हिन्दुधर्म शिकविला जात होता; पण आतां यापुढें फार कोत्या धर्मतत्त्वांचा असा

हिंदुधर्म तेथें शिकविला जाईल. आम्हांला तर हें वर्णन ऐकून हंसूंच येतें. रुंद आणि निरुंद, व्यापक व कोता, उदार व अनुदार या शब्दांच्या अर्थांची बाईंनीं अगदीं उलटापालटच केलेली दिसते ! सनातनी हिंदुधर्मांत जातिभेदासारख्या गोष्टी आहेत; पण कितीहि झालें तरी एकल्या एक मर्त्य व्यक्तीस ईश्वरपदावर अधिरूढ करूं पाहणें ही खास कोत्या मनाची किंवा अनुदारपणाची कमाल आहे असेंच कोणीहि म्हणेल.

बनारस कॉलेजांतील शिक्षकांनीं राजीनामे देण्याचें एक तात्कालिक कारण असें दिसतें कीं, कॉलेजचे प्रिन्सिपाल मि० अरुंडेल यांनीं कॉलेजांतील बिझांटबाईंच्या भगत मंडळीस गेल्या आक्टोबरांत एक पत्र लिहिलें होतें, तें कोणी एकानें मिळवून अलाहाबादच्या 'लीडर' पत्रांत प्रसिद्ध केलें; आणि या पत्रावरून व्यक्तिपूजेचें बंड कॉलेजांत किती माजलें होतें, हें उघड दिसून येतें. या पत्रांत सर्व भगत मंडळींनीं बिझांटबाईला चिकटून राहावें, कांहीं केल्या सोडून देऊं नये, असा उपदेश केलेला असून त्याच्या समर्थनार्थ खालील विधान केलेलें होतें. "She (Mrs. Besant) will one day become one of the greatest rulers of the world of Gods and men." बिझांटबाई या पुढेंमागें देव व माणूस यांच्या जगावर—यांच्या राज्यावर—राज्य करणाऱ्या श्रेष्ठ विभूतींपैकीं एक श्रेष्ठतम विभूति होतील ! खुद्द कॉलेजच्या प्रिन्सिपालची मजल येथपर्यंत गेल्यावर बिचाऱ्या विद्यार्थ्यांना बिझांटबाईसंबंधानें पूज्यबुद्धि व्यक्त करावयाला शब्दच शिल्लक उरत नाहींत हें उघड होत नाहीं काय ? पण विद्यार्थ्यांना शब्द शिल्लक उरोत वा न उरोत, असल्या प्रकारचा भोळेपणा व श्रद्धाळूपणा कॉलेजांतील मुलांत पसरूं देणें हें उदार शिक्षणाच्या आद्यतत्त्वावर घाला घालूं देण्यासारखें नाहीं काय ? या खुळेपणाच्या प्रसारास आळा घालणें जरूर आहे असें कॉलेजच्या व्यवस्थापक मंडळास वाटल्यास त्यांत नवल तें काय?

अलीकडे आमच्या शिक्षणसंस्थांतून धर्मशिक्षण दिलें जात नाहीं यामुळें शिक्षणाला एकांगीपणा येतो ही गोष्ट जरी खरी असली तरी, बनारस कॉलेजमध्यें जें विशिष्ट शिक्षण दिलें जात होतें तशा प्रकारचें धर्मशिक्षण दिल्यानें आमच्या तरुण पिढीचें मोठें कल्याण होईल असें आम्हांस वाटत नाहीं. भौतिकशास्त्राच्या शिक्षणानें मन नास्तिकपणाकडे झुकतेंच हें आधीं

खरें नाहीं; त्यामुळें जें काय होतें तें इतकेंच कीं, कोणतीहि गोष्ट निरनिराळ्या प्रमाणांच्या भट्टींत तावून सुलाखून घेण्याची इच्छा होऊं लागते, व मन असतें त्याहूनहि अधिक साशंक दिसतें. पण भौतिकशास्त्रांच्या शिक्षणानें मनाचे बंध तुटतात आणि तें नास्तिक बनतें असेंहि क्षणभर घेऊन चाललें तरी, बनारस कॉलेजांत अंधश्रद्धेनें जो धुमाकूळ घातलेला आढळतो तो खचित त्याहूनहि वाईट. कॉलेजच्या संस्थापक या नात्यानें बिझांटबाईविषयीं कॉलेजच्या विद्यार्थ्यांच्या मनांत आदरबुद्धि असणें हें रीतीचें आहे पण त्या ईश्वरपदावर अधिरूढ आहेत असाच जवळ जवळ ग्रह प्रिन्सिपाल व विद्यार्थी यांनीं करून घ्यावा याहून मनाच्या दुर्बलतेचें आणखी लक्षण तें कोणतें ? जें खासगी पत्र प्रसिद्ध केल्याबद्दल कॉलेजांतील कित्येक शिक्षक रागावले आहेत, तें प्रि० अरुंडेल यांचें पत्र वाचलें म्हणजे त्यांच्या श्रद्धाळूपणाचा किळस आल्यावांचून रहात नाहीं. बिझांटबाई व त्यांचें खास शिष्यमंडळ यांपैकीं बाईनीं सर्वज्ञत्वाचा मक्ता आणि शिष्यमंडळानें श्रद्धेचा मक्ताच जसा काय घेऊन टाकला आहे! ज्ञानाच्या कामांत बाईचें स्वावलंबन जितकें धाडसाचें, तितकेंच त्यांच्या शिष्यमंडळाचें परावलंबन हास्यास्पद होय. हें परावलंबन कोठवर जातें हें दाखविण्याकरितां गेल्या आठवड्यांत येथील थिऑसफिकल लॉजमध्यें रा० गजानन भास्कर वैद्य यांच्या झालेल्या व्याख्यानाचा सारांश आम्हीं गेल्या केसरींत मुद्दाम दिला होता. त्यावरून वाचकांस हें दिसून आलें असेल कीं, 'ऑर्डर ऑफ धि स्टार ऑफ धि ईस्ट' या कळपांतील मेंढरांच्या श्रद्धाळूपणापलीकडे जगांत अंधश्रद्धेची मजल जाणेंच शक्य नाहीं. सर्व कांहीं अमूक असें आहे; तें कां ? तर बाई सांगतात, आणि बाई कधींहि खोटें बोलत नाहीं म्हणून ! पण, या बाई हेतुपुरःसर खोटें सांगत नाहींत येवढ्यावरच जर त्या म्हणतात तें सर्व खरें असें घेऊन चालावयाचें तर पूर्वाश्रमीं बाईनीं नास्तिक ज्ञानप्रवर्तन केलें तें तरी खरें कां मानूं नये ? तेव्हां कांहीं त्या खोटें बोलत नव्हत्या ! पण एकाच जन्मांत दोन निरनिराळ्या व विरोधी कृति करणाऱ्या बाईचें समर्थन त्या केवळ खोटें बोलत नाहींत असल्या पोकळ युक्तिवादानें होणें अशक्य आहे. खुद्द वेदांनाहि जितकें स्वतः प्रामाण्य नाहीं तितकें बिझांटबाईना आहे असें म्हणणाऱ्यांची कीव करण्यापलीकडे कोण काय करणार ?

असल्या कमकुवत मनाचें प्रदर्शन खासगी मनुष्यानें आपल्यापुरतें आपल्या घरीं केलें तर त्यास कोण विचारावयास जाईल ! पण हिंदुधर्म-शिक्षण देणें हेंच ज्याचें वैशिष्ट्य म्हणून सांगण्यांत येतें त्या कॉलेजांत प्रिन्सिपालपासून मुलापर्यंत जर असली अंधश्रद्धा बोकाळलेली दिसूं लागली तर अशा कॉलेजापासून सार्वजनिक हित न होतां उलट नुकसान होईल असें कोणासहि वाटेल; आणि कॉलेजच्या व्यवस्थापक मंडळास तें तसें वाटलें, ही आनंदाची गोष्ट होय ! थिऑसफीच्या शरिरांतील दूषित रक्त हल्लीं ठिकठिकाणीं बाहेर पडूं लागलेंच आहे; या सर्वांचा निचर होऊन ही आगंतुक विकृति लवकर नाहींशी होईल आणि थिऑसफीच्या मूलभूत शुद्ध तात्त्विक विचारसरणीला फिरून आपलें काम पूर्ववत् चालविण्याची संधि मिळेल तर त्याच्या योगानें, केवळ थिऑसफीच्या पटांत ज्याचें नांव नोंदलेलें नाहीं अशा विचारी मनुष्यासहि बरें वाटेल !

# ५. काशी येथील नवीन विद्यापीठ

( केसरी, ता. ८ फेब्रुवारी १९१६ )

बनारस हिंदु-युनिव्हर्सिटीची मुहूर्त–मंगल–शिला स्थापण्याचा जो समारंभ गेल्या शुक्रवारीं घडून आला त्याचा त्रोटक वृत्तांत आज दुसरीकडे दिलाच आहे. हा समारंभ खरोखरीच अपूर्व होय; व लॉर्ड हार्डिंज यांनीं आपल्या भाषणांत त्याच्या अपूर्वतेचें जें रसभरित वर्णन केलें तें सर्वांशीं यथार्थ असेंच आहे. लोकप्रिय व सत्कार्योत्तेजक अशा प्रस्तुतच्या व्हाइसरॉयसाहेबांना 'पायाचे दगड बसविण्या'चे प्रसंग आपल्या पांच वर्षांच्या कारकीर्दींत इतके आले कीं, आपला धंदा सरकारी नोकरी हा आहे असें सांगण्याऐवजीं फुकटया गवंड्याचा आहे असें सांगण्याची जर त्यांना एखादे वेळीं विनोदी लहर आली, तर तें त्यांचें उत्तर, ते स्वतः 'फ्रीमेसन' नसले तरी, कोर्टांतील शपथेपुरतें खरें ठरण्याचा संभव आहे. लॉर्ड हार्डिंज यांनीं काशीस परवां बसविलेला पायाचा दगड त्या अनेक दगडांच्या खाणींतूनच निघालेला असेल, त्यांच्या हातांतील करणीचें सोनें किंवा त्या करणीनें त्या दगडाला

लावलेला चुना यांतहि या प्रसंगीं कांहीं विशेष गुण होता असें नाहीं; पण पुरुषभाग्यापेक्षांहि दगडाचें भाग्य गहन असतें; म्हणूनच एकाला घराच्या मागीलदारीं व दुसऱ्याला देवघरांत अभिषेक करून घेण्याचें नशिबीं येतें. “ अखिलभरतखंडांतील प्रमुख आर्यजनांचा हा प्रचंड मेळा आज जो या साध्या संगमरवरी पाडथऱ्यानें या ठिकाणीं एखाद्या लोहचुंबकाप्रमाणें आकर्षण करून आणला आहे याचें कारण काय असेल बरें ?” असा जो नवल-प्रश्न टाकून लॉर्ड हार्डिंज यांनीं आपल्या भाषणास सुरुवात केली, व त्या प्रश्नाचें त्यांनीं स्वतःच जें उत्तर दिलें, तीं दोनहि त्यांच्या सहृदयतेस शोभण्यासारखींच होतीं. त्यांनीं बसविलेल्या दुसऱ्या अनेक दगडांनीं ब्रिटिश सरकारच्या या नाहीं तर त्या खात्यांचा पाया रचण्यास प्रारंभ केला असेल. पण काशीस बसविलेल्या या दगडानें हिंदूंच्या राष्ट्रीय शिक्षणाच्या नवयुगाचाच पाया घातला असें लॉर्ड हार्डिंज यांनीं म्हटलें व तें बऱ्याच अंशानें खरेंहि आहे. आतां राष्ट्रीय शिक्षणाच्या अनेक लक्षणगुणांपैकीं अधिकारस्वातंत्र्य हें एक प्रमुख आहे; व हिंदु युनिव्हर्सिटीचा कायदा बनवितांना कांहीं कांहीं महत्त्वाचे अधिकार आपल्या हातीं ठेवण्याचा सरकारनें जो आग्रह धरिला त्यामुळें या नवीन शिक्षणसंस्थेला थोडासा कमीपणा आला आहे ही गोष्ट खोटी नाहीं; इतकेंच नव्हे, तर प्रस्तुतसारख्या आनंदभराच्या प्रसंगींहि आमच्या मनाला ती दुःख दिल्याशिवाय राहात नाहीं. तथापि तिच्या विकलांगत्वावर विशेष भर न देतां, आहे अशा अपूर्ण-गुणसंस्थे-कडून का होईना, पण हिंदु राष्ट्राचा कोणता, किती व कसा फायदा होण्याचा संभव आहे, याचाच विचार आमच्या किंवा इतर कोणाहि हित-चिंतकाच्या मनांत आज मुख्यतः आल्यास त्यांत नवल नाहीं.

काशी येथील ‘नवीन’ विद्यापीठ असें जें बनारस हिंदु युनिव्हर्सिटीला आम्हीं विशेषण दिलें तें साभिप्राय आहे; कारण काशीची एकंदर पुरातन परंपरा एका दृष्टीनें विद्यापीठांनींच रचिलेली आहे. गंगेचें सांनिध्य व श्रीविश्वेश्वराचा निवास यामुळें काशीला पुण्यक्षेत्राचें अपूर्व महत्त्व आलें आहे खरें. तथापि सर्व ऐहिक, पारमार्थिक कृत्यांची परिसमाप्ति ज्ञानांतच होते, या दृष्टीनें पाहतां ज्ञान म्हणजे परा-अपराविद्या तिचा लाभ करून देण्याची जी उज्ज्वल परंपरा काशीस आज शेकडों वर्षें अखंड चालू राहिली आहे

तिच्या योगानें या क्षेत्राचें महत्त्व विशेष मानलें जात आहे. काशी हें क्षेत्र म्हणूनच पंडित लोक तेथें पूर्वापार जाऊन राहिले असतील, किंवा तेथें पाठशाला स्थापन झाल्या असतील; पण काशीचे साधु व काशीचे पंडित यांपैकीं अधिक ख्याति कोणाची आहे हें आम्ही सांगण्याचें कारणच नाहीं. काशीक्षेत्राच्या पुण्याईनें मिळणारें मोक्षवैभव खरें पण अदृश्य आहे. पण तेथील विद्यापीठाच्या लौकिकाचें वैभव खरें असून शिवाय दृश्यहि आहे. वसिष्ठगौतमादिकांचीं विद्यापीठें पौराणिक काळचीं; त्यांची कची माहिती फारशी उपलब्ध नाहीं. तक्षशिला, नालंद वगैरे ठिकाणचीं विद्यापीठें ऐतिहासिक काळांतलीं असलीं तरी त्यांची माहिती फक्त अंधुकच मिळते. पण श्रीक्षेत्र काशी येथील विद्यापीठें प्राचीन या सदराखालीं पडण्यासारखीं जुनीं असलीं तरी त्यांची माहिती इतकी मिळते कीं, विद्यापीठांतर्गत सांप्रदायांचा अनेक शतकांपर्यंतचा वंशवृक्ष रेखाटतां येतो. तक्षशिला नालंद वगैरे विद्यापीठांप्रमाणें काशीचीं जुनीं विद्यापीठें 'नष्ट' या सदराखालीं न येतां अजून चालूच आहेत. उत्तरहिंदुस्थानांत हिंदु राजांची सत्ता नाहींशी होऊन त्यांच्या जागीं मुसलमान आले, व मुसलमानांचा पांचसहाशें वर्षांचा अंमल नाहींसा होऊन त्यांच्या जागीं इंग्रज आले; तरी काशीच्या विद्यापीठांचें काम अबाधितपणें चालूच आहे; व या करारीपणाचें बक्षीस म्हणूनच कीं काय, जुन्या विद्यापीठांची परंपरा नाहींशी होऊं लागण्यापूर्वींच ईश्वरकृपेनें हिंदु-युनिव्हर्सिटीसारखी संस्था स्थापन होऊन फिरून एका नव्या सांप्रदायाचा पाया त्याच क्षेत्रीं रचिला गेला. अशा रीतीनें नव्या जुन्यांचा सांधा दोनहि परंपरांच्या सजीवावस्थेंत झाल्यामुळें त्यापासून एक नवीनच पण जातिवंत असें विद्यावृक्षाचें कलम निर्माण होऊन त्याला पुढें मधुर फळें येतील अशी आशा करण्यास जागा आहे; आणि ही आशा सफळ होवो असें आशीर्वचन हिंदु-युनिव्हर्सिटीचे सर्व हितचिंतक आजच्या प्रसंगीं ईश्वराजवळ मागतील.

काशी येथील नवीन विद्यापीठ पुढें काय काय कामगिरी करील हें आज सांगणें कठीण आहे. तथापि हिंदु विद्यापीठाची कल्पना इतक्या थोड्या काळांत इतक्या मूर्त स्वरूपाला आली एवढीच नुसती गोष्ट विचारांत घेतली तरी ती हिंदुसमाजाच्या कर्तृत्वाची साक्ष देत आहे असें म्हणण्यास हरकत

नाहीं. सन १९०५ सालीं बनारस येथील राष्ट्रीय सभेच्या प्रसंगीं या युनिव्हर्सिटीच्या कल्पनेचें बीजारोपणच नसलें तरी तिचा उघड उच्चार झाला. त्यानंतर सुमारें चार पांच वर्षेंपर्यंत त्या कल्पनांकुराला फारशी पालवी फुटलेली दिसली नाहीं. पण गेल्या चार वर्षांत ना० पंडित मदनमोहन व दरभंग्याचे महाराज यांच्या परिश्रमामुळें संस्थेकरितां सुमारें एक कोटि रुपयांचा फंड जमला, आणि वरिष्ठ कौन्सिलांत तिच्या घटनेचा कायदा मंजूर होऊन चालू आठवड्यांत इमारतीच्या पायाचा दगडहि बसविला गेला या गोष्टींचें पुष्कळसें श्रेय त्यांतल्या त्यांत पंडित मदनमोहन यांनाच आहे; कारण त्यांनीं वकिलीचा धंदा सोडून सर्व काळ या कामीं घालविला. नाहींतर इतर वकील मंडळी पहा ! वकिलींतून उरल्या फावल्या वेळीं, दारीं पक्षकार हातीं पैशांची थैली घेऊन उभा राहून खुणावीत नसेल तेव्हां, सार्वजनिक कामाकडे फक्त उद्योगवैचित्र्यप्रियतेनें डुंकून पाहाणाऱ्या, केवळ तुरगब्रह्मचर्याप्रमाणें लोकहितव्रत पाळणाऱ्या व येवढ्याशा मोबदल्याच्या आधारावर नामदारीसारखा मोठा मान व लोकविश्वास मिळवूं पाहणाऱ्या आमच्या वकीलमंडळीनें पंडित मदनमोहन यांचें उदाहरण खरोखरच डोळ्यापुढें ठेवून गिरविण्यासारखें आहे. आमच्यांतील कित्येक नामांकित वकिलांपेक्षां पंडितजी कमी वयोवृद्ध आहेत; त्यांच्या संग्रहीं असलेला पैसा यांच्यापेक्षां पुष्कळ कमी आहे; आणि ते निपुत्रिकहि नाहींत. असें असतां ते अंगीकृत कार्य यशस्वी करण्याकरितां वकिलीचा धंदा सोडतात, आणि वाढती सिद्धि व वाढता द्रव्यलाभ यांच्या योगानें आमच्या बुड्ढया वकीलमंडळींच्या धंदा करण्याच्या बुद्धीला दिवसानुदिवस नवीन तारुण्याचा भर येतो ! हिंदु युनिव्हर्सिटीचें महत्त्व तिला एक कोटि रुपया मिळाला येवढ्यावर नाहीं. कारण ती यशस्वी व्हावयाची तर आणखीहि कोट दोन कोट रुपयांची अपेक्षा आहे. पण केवळ खाजगी प्रयत्नानें पंडित मदनमोहन यांनीं हिंदु विद्यापीठाकरितां अल्पावधींत एवढा मोठा फंड जमविला हें त्यास केवढें भूषणास्पद आहे ! आमच्या जुन्या धर्मादायपद्धतीप्रमाणें आमच्या राजेमहाराजांच्या संपत्तीला जें एकांगी वळण पूर्वी लागलें होतें तें पंडितजींच्या परिश्रमानें बदललें; व १९०५ सालीं कोणास कल्पनाहि आली नसेल इतका मोठा फंड त्यांनीं आज जुळविला. असो; व्यक्तीच्या कर्तृत्वाप्रमाणें हिंदुसमाजाच्या स्वाभि-

मानाचाहि पुरावा या वर्गणींत मिळतो. हिंदु लोकांची राजकीय प्रवृत्ति त्याच्या धर्मप्रवृत्तीइतकी उत्साही व जोरदार नाहीं ही गोष्ट पहावी त्या दृष्टीनें कोणी चांगली किंवा वाईट म्हणेल. पण हिंदुत्वबुद्धि ही हिंदु राष्ट्रीयत्वाचें प्रधान अंग असल्यामुळें ती तरी अद्यापि त्यांच्यांतून नष्ट झालेली नाहीं, इतकेंच नव्हे, तर पूर्णपणें जागृत आहे हें बनारस युनिव्हर्सिटीच्या उदाहरणावरून सिद्ध होतें याबद्दल आनंद वाटतो.

हिंदु युनिव्हर्सिटीची प्रत्यक्ष कामगिरी अद्यापि घडून यावयाची आहे. तथापि कोणती कामगिरी या संस्थेपासून होण्यासारखी आहे याचा स्थूलमानानें कयास आज केल्यास तो फारसा चुकण्याचा संभव नाहीं. हिंदु-यु. चा पहिला फायदा म्हटला म्हणजे संस्कृत विद्येच्या पुनरुज्जीवनाला चालन मिळणार, हा होय. ब्रिटिश अमलाखालीं यापूर्वी स्थापन झालेल्या विद्यापीठांतून संस्कृत भाषेच्या अभ्यासाची थोडीबहुत व्यवस्था झालेली आहे. तथापि तो अभ्यास केवळ संस्कृतविद्यामंदिराच्या अंगणांत प्रवेश होय. हिंदु यु. मध्यें संस्कृत भाषेचा अभ्यास तर विशेष होईलच; पण संस्कृतभाषाकरंडकांत सांठवून ठेवलेल्या विद्यारत्नाचा परामर्ष इतर म्हणजे पाश्चात्य विद्याभिमानी विद्यापीठांकडून जितक्या आदरबुद्धीनें घेतला जात असे त्याहून अधिक आदरबुद्धीनें व यथाप्रमाण अधिक उल्हासाचा शिक्षणोपक्रम या नवीन विद्यापीठांत होईल. दुसरी गोष्ट ही कीं, इतर विद्यमान विद्यापीठें बहुधा परीक्षा घेऊनच आपलें काम संपवितात. या नवीन विद्यापीठांत परीक्षांप्रमाणें प्रत्यक्ष शिक्षणाची सोयहि केली जाईल. केवळ परीक्ष्य-परीक्षक या भावनेनें उत्पन्न होणारा संबंध गुरुशिष्यांच्या संबंधाइतका निकट नसतो. व जुन्या वसिष्ठ-गौतमांच्या गुरुकुलांचें हृदयंगम कल्पनाचित्र जरी काशी येथील नव्या विद्यापीठांत तंतोतंत रेखाटलेलें किंवा रंगविलेलें समकालीन लोकांच्या दृष्टीला दिसलें नाहीं, तरी आधुनिक विद्यापीठांतील हा मुख्य दोष या नव्या विद्यापीठांत निघून जाऊन तेवढ्यापुरता तरी गुरुकुलपरंपरेचा उद्धार होईल असें वाटतें. तिसरी गोष्ट म्हणजे धर्मशिक्षणाची होय. जुन्या युनिव्हर्सिट्यांतून शिक्षणच मुळीं दिलें जात नव्हतें, तर मग धर्मशिक्षण कोठून दिलें जाणार हें दिसतच आहे. पण राज्यकर्ते विधर्मी व त्यांची प्रजा विविधधर्मी यामुळें कॉलेजांतूनदेखील धर्मशिक्षण न देण्यास सरकारास

आयतीच सबब सांपडत होती. पण काशी येथील नवें विद्यापीठ हें बोलून-चालून उघडाउघडीं प्रत्यक्ष नांवानेंहि 'हिंदु' असल्यामुळें तेथें चालकांच्या मनाप्रमाणें धर्मशिक्षण देण्यास पूर्ण मोकळीक आपोआप मिळेल. लॉर्ड हार्डिंज यांनीं परवांच्या आपल्या भाषणांत धर्मशिक्षणाची महती प्रांजलपणानें गायली, पण धर्मशिक्षणाची आवश्यकता मान्य असतांहि त्यांना सरकारी युनिव्हर्सिट्यांतून तें देण्याची व्यवस्था करतां आली नाहीं, यावरूनच स्वतंत्र युनिव्हर्सिटीची आवश्यकता किती होती हें उघड दिसून येतें. चौथा फायदा असा आहे कीं, सर्व हिंदुस्थानच्या हिंदूंना मनानें एकत्र करणारी अशी ही विद्यापीठाची संस्था होईल. काशीक्षेत्र हें जसें धर्मदृष्ट्या त्यांचें आज मुख्य केंद्र आहे तसें हिंदु-युनिव्हर्सिटी हें धर्मशिक्षणदृष्ट्या यापुढें त्यांचें मुख्य केंद्र होण्याचा संभव आहे. सन १८९८ सालीं मिसेस बिझांट यांनीं बनारस सेंट्रल हिंदु कॉलेज काढलें; त्याचा हेतु धर्मशिक्षणाचा प्रारंभ करण्याचा होता, व तो प्रारंभ झालाहि. पण कॉलेजांत युनिव्हर्सिटीप्रमाणें शिक्षणसीमा पोंचवितां येत नाहीं हें एक, व शिवाय थिऑसफी ही वास्तविक व्यापक असतां लोकमतानें तिला विशिष्ट पंथाचें स्वरूप आलें आहे, यामुळें थिऑसफिस्ट चालकांकडून चालविलेल्या या कॉलेजास देशांतील हिंदु समाजाकडून मिळावें तितकें पाठबळ मिळालें नाहीं. पण तेंच सेंट्रल हिंदु कॉलेज हें हिंदु-युनिव्हर्सिटीचें मुख्य मध्यवर्ती कॉलेज झालेलें पाहून मिसेस बिझांट यांना कृतार्थता वाटेल व ती सकारण आहे असें आम्हीहि प्रांजलपणानें म्हणतों.

असो. सर्व हिंदूंना मनानें एकीकृत करणारें हें नवें विद्यापीठ म्हणजे आमच्या भावी राष्ट्रीय इमारतीचा एक मुख्य स्तंभच उभारला गेला आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. या एका विद्यापीठांत संस्कृतभाषेला विशेष मान मिळाला तरी इंग्रजी भाषेला कमी मान मिळेल असें मुळींच नाहीं. व अभ्यासविषयांच्या दृष्टीनें पाहिलें तर पाश्चात्य ज्ञानास व सुधारणेसच अग्रपूजेचा मान मिळेल असेंच म्हणावें लागतें. केवळ ज्ञानाला देश, धर्म, जाति किंवा भाषा यांचा विटाळ कधींहि होऊं शकत नाहीं. व खरें विश्वबंधुत्व जर कोणत्या एका पायावर रचलें जाईल तर तें शुद्ध ज्ञानाच्या पायावर. या ज्ञानाच्या प्रगतींत गेल्या कांहीं शतकांत पाश्चात्य राष्ट्रांनीं वर जागा मिळविली आहे,

व ती जागा जरी आम्हांस हिसकावून घ्यावयाची नाहीं तरी स्वतः आम्हांला त्या जागेपर्यंत जाण्याची आकांक्षा आहे. याकरितां हिंदु-युनिव्हर्सिटींत पाश्चात्य ज्ञानाचा, त्याच्या योग्यतेनुरूप आदरपूर्वक जरूर परामर्ष घेतला जाईल. हिंदु-युनिव्हर्सिटी म्हणजे तींत जुन्या संस्कृत ग्रंथांविषयीं दुसरें कांहीं शिकवूं नये किंवा शिकविलें जाणार नाहीं अशी वेडी समजूत बहुधा कोणाची नसेल असें आम्हांस वाटतें, व असल्यास ती निखालस चूक आहे असेंच आम्ही म्हणूं. पण ज्ञान हें मुख्य व भाषा ही गौण असल्यामुळें पाश्चात्य ज्ञानच पण तें देशी भाषेंतून शिकविल्यास अधिक सुलभरीतीनें शिकतां येतें व अधिक सुखानें पचनीं पडतें; याकरितां नवीन युनिव्हर्सिटींत देशीभाषेच्या द्वारें शिक्षण देण्याचा प्रयोग प्रशस्तपणें केला जाईल व हा फायदा लहानसहान नव्हे; इतकेंच नाहीं, तर तो प्रयोग यशस्वी झाल्यास शिक्षणपद्धतींत क्रांति होऊन सरकारी युनिव्हर्सिट्यांनाहि ही सुधारणा अंगीकारण्याशिवाय गत्यंतर नाहींसें होईल.हा बिनमोल फायदाहि होण्याचा संभव बराच आहे. याशिवाय राष्ट्रीय दृष्टीनें शिक्षणाच्या इतर कांहीं सोयीहि करण्याचें नवीन विद्यापीठाच्या चालकांच्या मनांत आहे. उदाहरणार्थ, सिव्हिल सर्व्हिस परीक्षा देण्याला विलायतेस जावें लागलें तरी त्या परीक्षेचा अभ्यास करण्याची सोय हिंदुस्थानांत होऊं नये असें नाहीं, व ही सोय काशीस आम्ही पुढेंमागें करूं असें पंडित मदनमोहन यांनीं मुंबईच्या एका भाषणांत सांगितल्याचें आमच्या वाचकांस स्मरत असेलच. पण शिक्षणविषयांप्रमाणें शिक्षणगुणालाहि महत्त्व असतें. ही युनिव्हर्सिटी बोलूनचालून खासगी,तेव्हां तिच्या परीक्षा सोप्या होऊन तिजकडून मिळणाऱ्या पदव्या पोकळ किंवा 'बोगस' ठरण्याचा संभव आहे, अशी शंका काढलेली आमच्या ऐकिवांत आहे. परंतु लायकीच्या दृष्टीनें हिंदु-युनिव्हर्सिटीचे पदवीधर इतर पदवीधरांच्या तोडीचे निपजतील, किंबहुना या विद्यापीठाच्या परीक्षा सरकारी परीक्षांहून आम्ही अधिक सकस ठेवूं अशी चालकांची उमेद असल्याचें व्हाइसरॉय यांनीं आपल्या भाषणांत बोलून दाखविलेंच आहे.आणि पदवीधरांची लायकी कायम राहणें हेंच केव्हांहि विद्यापीठाविषयीं आदराला कारणीभूत होत असल्यानें या बाबतींत हिंदु युनिव्हर्सिटीचे विद्यमान व भावी चालक विशेष खबरदारी घेतील असा आम्हांस भरंवसा वाटतो.

# ६. समर्थ विद्यालयावर गदा !

( केसरी, तारीख १४ जून १९१०. )

दडपशाहीच्या बकासुराची पाळी गेल्या आठवड्यांत 'समर्थ विद्यालया'-वर येऊन पडली आहे ! १९०८ सालीं बेकायदेशीर अत्याचारांना प्रतिबंध करण्याकरितां कायदेशीर अत्याचाराच्या स्वरूपाचे जे नवीन प्रबंध निर्माण झाले त्यांमध्यें फौजदारी कायद्याच्या दुरुस्तीचा कायदा ( Criminal Law Amendment Act ) या नांवाचा एक होता. या कायद्याच्या १६ व्या कलमानें 'बेकायदा समित्या-सभा' वगैरे बंद करण्याचा अधिकार सरकारनें स्वतःस घेऊन ठेवलेला आहे. हा कायदा लावून बंगाल्यांत यापूर्वी 'अनुशीलन समिति' वगैरे संस्था बंद करण्यांत आल्याचें प्रसिद्धच आहे. शिक्षण देणाऱ्या शाळांना सुदैवानें आजपर्यंत तो लावण्यांत आलेला नव्हता. परंतु गेल्या शुक्रवारीं सिमला येथें हिंदुस्थानच्या सरकारी ग्याझिटाचा जादा अंक निघून, त्याच्या द्वारें वरील कायद्याच्या १६ व्या कलमाखालीं तळेगांव येथील 'समर्थ विद्यालय' ही संस्था बेकायदेशीर ठरविण्यांत आली, असें जाहीर करण्यांत आलें आहे. कोणत्याहि सरकारी ठरावास एक कारण म्हणून लागत असतें; व प्रस्तुत प्रकरणीं खुद्द कायद्याच्याच शब्दांनीं, जें कारण म्हणून सांगण्यांत आलें आहे तें असें कीं, 'समर्थ विद्यालयाचा हेतु कायदेशीर सुव्यवस्था राखण्याच्या कामीं अडथळा करणें असा असून सार्वजनिक शांततेस हें विद्यालय विघातक आहे.' हें कारण खरें आहे अगर नाहीं यावरच प्रस्तुतच्या ठरावाची न्याय्यान्याय्यता सर्वस्वीं अवलंबून राहील.

समर्थ विद्यालयाचा हेतु 'महाराष्ट्र विद्याप्रसारक मंडळा'च्या व खुद्द विद्यालयाच्या हस्तपत्रकांत स्पष्ट करून सांगितलेला आहे. १९०६ सालीं ऑगस्ट महिन्यामध्यें महाराष्ट्र विद्याप्रसारक मंडळानें जें हस्तपत्रक प्रसिद्ध केलें त्यांत समर्थ विद्यालयाचा व त्याच्या धर्तीवर निघणाऱ्या इतर विद्यालयांचा हेतु खालीलप्रमाणें दिलेला होता:—" राष्ट्रहिताच्या सर्व उद्योगांचा पाया राष्ट्रीय शिक्षणावर आहे, हें आजकाल कोणास सिद्ध करून दाख-

विण्याचें कारण उरलें नाहीं. राष्ट्रीय बुद्धिशिक्षणाबरोबर कलाकौशल्य व उदीमधंद्याचें शिक्षण दिल्याशिवाय हिंदुस्थानची सांपत्तिक स्थिति सुधारण्याची आशा नाहीं. सरकारदरबारीं, तसेंच लोकांच्या वतीनें राष्ट्रसेवा करणारे लोक शुद्धशील, सामर्थ्यवान् व प्रगतिप्रिय असेच पाहिजे आहेत. पुढील पिढीस असें वळण लावण्यासाठीं, शारीरिक व नैतिक सामर्थ्यानें साऱ्या जगांतील कोणत्याहि सन्मान्य राष्ट्रांतील लोकांची बरोबरी करतील असे त्या पिढींतील तरुण निपजावेत, यासाठीं आज जोरानें प्रयत्न करणें हें राष्ट्रांतील प्रत्येक समंजस माणसास इष्ट वाटत आहेच. परंतु विचार करण्यांत काल घालविण्यापेक्षां एकदम कार्यास प्रारंभ करणें हेंच योग्य असें जाणून श्रीक्षेत्र करवीर येथें स्थापन झालेल्या **'समर्थ विद्यालय'** नांवाच्या शाळेचा फायदा घेऊन आम्ही खालीं सही करणारे अशा प्रकारच्या शाळा सर्व महाराष्ट्रांत स्थापल्या जाव्या म्हणून हें विनंतिपत्र प्रसिद्ध करीत आहों. या प्रकारच्या शाळांमध्यें हातकाम पुष्कळ व्हावयाचें आहे; शास्त्रीय शिक्षणहि द्यावयाचें आहे. तेव्हां हें मोठ्या खर्चाचें काम आहे. ***असे विचार मनांत आणून ज्या कोणाचा खालीं सही करणारांवर विश्वास असेल त्यांनीं आपल्या हातून होईल तेवढें द्रव्यसाहाय्य या महाराष्ट्र-विद्याप्रसारक-मंडळास द्यावें. सर्व प्रकारचा शिक्षणक्रम देशांतल्या देशांत पुरा होऊन अवलोकनानें प्राप्त होणारा अनुभव मिळविण्यास विश्वपर्यटण करणारे शोधकहि कांहीं निपजावेत, अशासाठीं सर्व शिष्यवर्ग कडकडीत ब्रह्मचर्याच्या व स्वधर्माचरणाच्या शिस्तींतून बाहेर पडला पाहिजे." परंतु याहूनहि ताजा पुरावा हवा असल्यास मिळण्यासारखा आहे. १९०९ सालच्या सप्टेंबर महिन्यामध्यें महाराष्ट्र-विद्याप्रसारक-मंडळानें नवीन हस्तपत्रक काढलें; त्यांत खालील मजकूर आहे.

"देशांतील तरुण पिढीस व्यापक आणि सर्वांगपूर्ण अशा प्रकारचें शिक्षण सर्वसंमत पद्धतीनें देणें, उच्च पूर्वपरंपरा आणि राष्ट्राच्या सांप्रतच्या व भविष्यकालीन श्रेष्ठ गरजा यांस अनुरूप अशा प्रकारचें योग्य शिस्त ठेवून–त्यांच्या मनास वळण देणें व त्यांचें शील बनविणें आणि तद्द्वारा राष्ट्रकार्यांतील आपापला योग्य वांटा उचलण्याची त्यांच्या अंगीं पात्रता आणणें, राष्ट्रानें ठरविलेले सदाचाराचे नियम कायम ठेवून त्यांस वरच्या

पायरीस नेणें, हाच राष्ट्रीय शिक्षणाच्या कोणत्याहि निर्दोष योजनेचा मुख्य व नियामक हेतु असला पाहिजे. अशा प्रकारें जें शिक्षण द्यावयाचें तें जसें औपपात्तिक तसेंच व्यावहारिक आणि वाङ्मयात्मक,शास्त्रीय व औद्योगिकहि असलें पाहिजे. याच शिक्षणाच्या अभ्यासक्रमांत धार्मिक व नैतिक शिक्षणाचाहि अंतर्भाव अवश्य केला पाहिजे. शारीरिक शिक्षणाकडेहि काळजीपूर्वक लक्ष देऊन सर्वच शिक्षणसंस्थांस मूलभूत असलेल्या अशा योग्य शिस्तीकडेहि पूर्ण लक्ष दिलें पाहिजे. शिवाय हें सर्व शिक्षण विद्यार्थ्यांस त्यांच्या मातृभाषेच्या द्वारें देणें अगत्याचें आहे. " याच वेळेस समर्थविद्यालयाच्या चिटणिसांनीं माहितीपत्रक प्रसिद्ध केलें. त्यांत विद्यालयांतील शिक्षणपद्धति कशी काय आहे याविषयीं खालीलप्रमाणें माहिती दिली आहे.

" प्रत्येक विषय शिकवितांना व्यावहारिक दृष्टि ठेवून अनवश्यक भाग गाळलेला आहे. शक्य तितकें मूर्त वस्तूंच्या द्वारें व निरनिराळीं उदाहरणें देऊन स्पष्ट ज्ञान देण्याची योजना केली आहे. परीक्षांचा जाच नाहींसा करून घोकंपट्टीला अजीबात फाटा दिला आहे. शास्त्रीय विषय शिकवितांना वरील इयत्तेंतील विद्यार्थ्यांनीं स्वतः प्रयोग करावे अशी तजवीज केली आहे व हस्तकौशल्य, बिनचुकपणा व कल्पनाशक्ति यांची वाढ व्हावी म्हणून शिल्पशाळेंत त्यांच्याकडून हातकाम करून घेतलें जातें. इंग्रजींमध्यें प्रवेश करून देतांना व पुढेंहि संभाषणपद्धतीचा उपयोग केला जातो. संस्कृत व्याकरणाचा निरर्थक बोजा कमी करून वाङ्मयाची ओळख सुलभ रीतीनें करून दिली जाते. भूगोलांतील नुसत्या याद्या पाठ करणें नीरस व निरुपयोगी आहे. म्हणून कोणत्याहि देशाचा भूगोल त्या देशाचा इतिहास शिकवितांना तयार करून घेण्यांत येतो. एकंदरीनें शिक्षणशास्त्रांतील नवीन नवीन सर्वमान्य पद्धतींच्या साहाय्यानें शिक्षण देण्याचें धोरण ठेवलें आहे."

या पत्रकांतील शब्दांमधून हल्लींच्या टरावाचें कारण, वाच्यार्थानें तर राहोच, परंतु सरळ बुद्धीच्या कोणत्याहि मनुष्यास लक्षणेनें अगर व्यंजनेनेंहि सप्रमाण सिद्ध करून देतां येईल, असें आम्हांस वाटत नाहीं. यास असेंहि एक प्रत्यंतर आहे कीं, याच हेतुपत्रकाच्या आधारावर विद्यालयास शेंकडों सद्गृहस्थांनीं प्रथमपासून लहानमोठ्या देणग्या दिल्या; व या देणग्यांची रक्कम आज सुमारें पाऊण लाख रुपयांवर गेलेली आहे ! देणगी देणारांमध्यें

सर्व तऱ्हेच्या मतांचे, सर्व दर्जांचे व अनेक जातींचे लोक आहेत, ही गोष्ट महाराष्ट्र-विद्याप्रसारक-मंडळाच्या वर्गणीची जी नांवनिशीवार पांच केसरीमध्यें वेळोवेळीं प्रसिद्ध झाली आहे तिजवरून कोणाच्याहि लक्षांत येण्यासारखी आहे. समर्थ विद्यालयाच्या चालकांचा हेतु क्षणभर सरकार आरोप करितें तसाच होता असें घेऊन चाललें तरी वर्गणी देणारे हे शेंकडों अगर हजारों लोक सरकारच्या सत्तेशीं विरोध करण्यास तयार झालेले होते, व कायदेशीर सुव्यवस्थेचा त्यांना वीट आल्यामुळें तिला अडथळा करण्यास समर्थ विद्यालयाच्या द्वारें त्यांनीं एक प्रकारें उपक्रमच केला होता, असें मानणें ही भोळेपणाची अगर आपमतलबी कल्पनाशक्तीची कमाल झाली असेंच म्हटलें पाहिजे. बरें, दाखवावयाचा हेतु एक व खरा हेतु एक असें असावें, अशी कल्पना केली तर या कल्पनेस समर्थनपर असा कोणता पुरावा सरकाराजवळ होता हें आम्हांस कळत नाहीं. 'कायदेशीर सुव्यवस्थेचे शत्रु' अशा प्रकारचा जो दुलौंकिक आज समर्थ विद्यालयाच्या पदरीं नाहक बांधण्यांत येत आहे त्यास अनुसरून विद्यालयांतील शिक्षक अगर विद्यार्थी यांचें कोणतें वर्तन कोठें घडलें हें बहुजनसमाजास कळेल तर फार चांगलें होईल. आमची अशी समजूत आहे कीं, विद्यालयांतील एकाहि शिक्षकावर अगर विद्यार्थ्यावर कायदा मोडल्याचा अगर शांततेचा भंग केल्याचा खटला झालेला नाहीं; मग तो शाबीद होऊन शिक्षा होणें तर दूरच ! ज्यांनीं शांतता व व्यवस्था मोडण्याचा विडाच उचललेला होता असें सरकार म्हणतें, ते विद्यालयाच्या स्थापनेपासून तीनचार वर्षेंपर्यंत हेतुसदृश कांहींतरी कृति केल्याशिवाय स्तब्ध बसतील, हें मनुष्यस्वभावाविरुद्ध—विशेषत: तरुणांच्या स्वभावाविरुद्ध—आहे असें आम्हांस वाटतें. समर्थ विद्यालयाच्या स्थापनेपासून अलीकडे गेलेला काळ शांततेचा खचित नव्हता. या धामधुमीच्या काळांत सरकारी व निमसरकारी शाळांतील कित्येक विद्यार्थी बेकायदेशीर कृत्यें करून तुरुंगांत पडले असतां, समर्थ विद्यालयांतील एकहि विद्यार्थी कोणत्याहि प्रकारच्या खटल्यांत सांपडला नाहीं व शिक्षेस पात्र झाला नाहीं ! तसेंच पोलिसांनीं विद्यालयाचे अनेक वेळां अवचित झाडे घेतले असतांहि त्यांना तेथें नांव ठेवण्यासारखें केव्हां कांहींहि सांपडलें नाहीं; यावरून काय अनुमान काढावयाचें हें उघडच आहे. सार्वजनिक शांततेचा भंग करण्यासारखें तरी विद्या-

लयांतील विद्यार्थ्यांच्या हातून काय घडलेलें आहे ? गेल्या तीन वर्षांत सुटीच्या निरनिराळ्या प्रसंगीं, विद्यालयाच्या चालकांनीं विद्यार्थ्यांस बरोबर घेऊन प्रसिद्ध स्थळें व क्षेत्रें पाहून येण्याची पद्धति ठेवली होती. परंतु यांपैकीं कोणत्याहि प्रसंगीं या विद्यार्थ्यांनीं कोणाची कुरापत काढली, कोणास मारहाण केली, असा बोभाटा कधींहि आला नाहीं. इतकेंच नव्हे तर विद्यालयांतील विद्यार्थ्यांची जूट, त्यांचे एक पद्धतीचे व टापटिपीचे पोशाख, त्यांच्या तोंडावरील तेज, शारीरिक श्रम करण्याची त्यांची हौस व तयारी, आणि सर्वांत मुख्य म्हटलें म्हणजे त्यांची शिस्त, विनयशीलता व कोणाच्या अध्यांत अगर मध्यांत न पडतां नाकापुढें पाहून चालण्याची त्यांची तऱ्हा या गोष्टींनीं ते जेथें जेथें गेले तेथें तेथें प्रेक्षकांच्या मनावर अनुकूल असाच ग्रह झाल्याचें आमच्या कानावर आलें आहे. तसेंच या विद्यालयाच्या खुद्द तळेगांव येथील व्यवस्थेंत व कामकाजांत गुप्त असें कांहींहि नव्हतें. वाटेल त्यास वाटेल तेथें जाऊन विद्यालयाचें वाटेल तें काम पाहाण्याची पूर्ण मोकळीक होती; व वस्तुतः शेंकडों लोकांनीं तेथें जाऊन हें काम वेळीं अवेळीं पाहिलेंहि आहे. तात्पर्य, ' सार्वजनिक शांततेस हें विद्यालय मोठा धोका उत्पन्न करणारें आहे ' अशा प्रकारचा भयंकर आरोप विद्यालयावर ठेवलेला पाहून महाराष्ट्रांतील लोकसमूहास खचित अत्यंत उद्वेग वाटल्यावांचून राहाणार नाहीं.

आतां लोकांस कधींहि कळत नाहींत अशा ज्या कित्येक गोष्टी सरकारास केव्हां केव्हां कळतात असें सरकारतर्फे पुष्कळ वेळां सांगण्यांत येतें, व हें कांहीं अंशीं खरेंहि आहे. लोकांना माहिती मिळलेल्या मार्गांनीं येऊन कळते; माहिती मिळण्याचे सरकारचे मार्ग याहून वेगळे व गुप्त असतात ही गोष्ट आम्हांस कबूल आहे. परंतु त्याच्याबरोबर हेंहि लक्षांत घेतलें पाहिजे कीं, या गुप्त मार्गांनी मिळणारी माहिती पुष्कळ वेळां खोटी, बनावट, निदान भ्रामक व एकतर्फी असते; आणि कोणाहि व्यक्तीस अगर संस्थेस अशा माहितीच्या आधारावर शिक्षा करण्याचे पूर्वी त्यास अगर तीस ही माहिती सांगून तिजविषयीं आरोपिताचें काय म्हणणें–काय खुलासा–आहे हें विचारणें, हें तत्व न्यायबुद्धीच्या अगदीं मुळाशीं आहे हें कोणीहि कबूल करील. १९०८ च्या कायद्यानें सरकारास एखादी संस्था बेकायदे-

शीर ठरविण्याचा अधिकार दिला असला तरी तिला बेकायदेशीर ठरविण्या-पूर्वी आपलें म्हणणें कळविण्यास सवड देऊं नये, असें सदर कायद्यांत कोठेंहि सांगितलेलें नाहीं; व विशेष परिस्थितींत सरकारनें आपणास हवे ते अधिकार कायद्यानें घ्यावे हें तत्त्व कबूल करणारासदेखील त्या अधिकारांचा उपयोग अन्यायानें झालेला पाहून राग आल्याशिवाय राहणार नाहीं, अशी आमची समजूत आहे. आम्हांस जी माहिती आहे तिजप्रमाणें समर्थ विद्यालयाच्या शिक्षणपद्धतींत सरकारास अपवादास्पद असें अमुक एक वाटत आहे, अगर अमुक अमुक दुरुस्ती न केली तर त्याचे अमुक अमुक परिणाम होतील, असें विद्यालयाच्या चालकांस सरकारी अधिकाऱ्यां-कडून कधीं स्पष्ट कळविण्यांत आलें होतें असें वाटत नाहीं. उलट विद्या-लयाच्या चालकांनीं सरकारास विद्यालय पसंत नसावें असें कळतांच, सरकाराचा गैरसमज दूर करण्याची आपल्याकडून खटपट केली होती असें आम्हांस माहीत आहे. १९०७ च्या नोव्हेंबर महिन्यांत समर्थविद्यालय तळेगांवास आलें. त्यानंतर पुढील आक्टोबर महिन्यांत प्रो० विजापूरकर यांनीं नामदार गव्हर्नरसाहेब यांस पत्र पाठवून विद्यालयासंबंधीं कांहीं खुलासा समक्ष नामदारांच्या कानावर घालण्याची परवानगी मागितली होती; परंतु या सुमारास विश्ववृत्तावरील खटल्यास सुरवात झालेली असल्यामुळें खटल्याचें काम चालू असतां आरोपीला आपणास भेटूं देण्यापासून गैरसमज उत्पन्न होण्याचा संभव आहे, या सबबीवर विजापूरकर यांनीं मागितलेली परवानगी नाकारण्यांत आली. १९०९ च्या जानेवारींत प्रो० विजापूरकर यांजला शिक्षा झाली. त्या नंतर दोन महिन्यांचे आंत त्यांच्या जागीं आलेले महाराष्ट्र-विद्याप्रसारक मंड-ळीचे चिटणीस व समर्थविद्यालयाचे मुख्याध्यापक रा.ज.वि.ओक यांनीं विजा-पूरकरांनीं उपक्रम केलेल्या कामाकरितांच ना० गव्हर्नरसाहेबांची गांठ पड-ण्याची परवानगी मागितली. "विद्यालयांत राजद्रोही असें कांहीं शिकविलें जात नाहीं, अशा प्रकारची तुमच्याकडून आगाऊ खातरजमा होत असेल तर भेटीची परवानगी मिळेल" असें नामदारसाहेबांच्या प्रायव्हेट सेक्रेटरी-कडून उत्तर आलें; व रा० ओक यांनीं तशी खातरजमा केल्यानंतर ती पटून मुलाखतीची परवानगीहि मिळाली. सदरहू मुलाखत खासगी असल्यामुळें तींत काय घडलें हें कळणें जरी अशक्य आहे, तरी पण आम्हांस असें

वाटतें कीं, ना० गव्हर्नरसाहेब व रा० ओक यांचें बोलणें चालणें होऊन साहेबांचा गैरसमज घालविण्याचा रा० ओक यांनीं शक्य तो प्रयत्न केला असावा. पुढें सप्टेंबर महिन्यांत विद्यालयाचें नवीन हस्तपत्रक निघालें, तेव्हां त्याची एक प्रत रा. ओक यांनीं नामदारसाहेबांकडे अवलोकनार्थ पाठविली; परंतु सरकारचें समाधान झालें अगर न झालें, अथवा सरकारास आणखी कांहीं माहिती अगर खुलासा पाहिजे, याविषयीं विद्यालयाच्या चालकांकडे विचारपूस करण्यांत आली नाहीं. परंतु 'सामोपचारा'नें वागविण्याच्या अनुग्रहास विद्यालय पात्र नाहीं, असें सरकारास वाटलें असें घेऊन चाललें तरी, प्रत्यक्ष 'दंड' करण्यापूर्वीं ' अमुक अमुक गोष्टी करा, नाहीं तर अमुक अमुकरीतीनें सरकार तजवीज करील' असा एखादा निर्वाणीचा रोखठोक इषारा तरी सरकारनें देणें जरूर होतें. शीलवंत शूर शिकारी लोक दुष्ट श्वापदासहि गोळी घालण्यापूर्वीं आपला जीव बचावण्याची संधि त्यास देतात असें म्हणतात.राष्ट्रांच्या युद्धाला कोणताच कायदा लागू नाहीं, तथापि हत्यार चालविण्यापूर्वीं परस्परांनीं असा निर्वाणीचा इषारा (Ultimatum) देणें हेंच शिष्टसंमत आहे असें गणिलें जातें. लष्करी कायद्यापेक्षां अधिक तडकाफडकी निकाल करण्याचें दुसरें कायदेशीर साधन नाहीं, असें असतांहि, लष्करी शिक्षा होण्यापूर्वीं लष्करी कोर्ट भरून आरोपितास जाब विचारावा लागतो. परंतु १९०८ च्या या कायद्याच्या अमलाचे कामीं सरकारनें लष्करी न्यायमनसुब्यावरहि ताण केली असें म्हणण्यास हरकत नाहीं !

समर्थविद्यालय अशा रीतीनें तडकाफडकी बंद झाल्याबद्दल लोकांस जी हळहळ वाटत आहे, तिचें मुख्य कारण असें आहे कीं, या विद्यालयाच्या योगानें महाराष्ट्रांत इष्ट असा एक शिक्षणविषयक नवीन प्रयोग करून पाहण्यांत येणार होता. राष्ट्रीयत्वाच्या पोषणास जीं अनेक अंगें लागतात, त्यांच्यापैकीं कित्येक अंगांच्या दृष्टीनें पाहतां सदर विद्यालयांतील शिक्षण विद्यमान इतर संस्थांपेक्षां अधिक पूर्णत्वानें मिळण्याचा संभव होता. विद्यार्थ्यांचें ब्रह्मचर्य, शारीरिक मेहनत,घरदार सोडून राहण्याची व थोड्या पैशांत काटकसरीनें निर्वाह करून जाडेंभरडें अन्न खाऊनहि शरीरसंपत्ति सुदृढ ठेवण्याची संवय, देशी भाषा आणि शिक्षणक्रम व पुस्तकें यांची

सुधारणा यांच्या साहाय्यानें अल्पकाळांत बरेंच ज्ञानार्जन होण्याचा संभव, परीक्षांचा व घोकंपट्टीचा त्रास चुकवून विद्यार्थ्यांच्या मनावरील ताण कमी करण्याची संधि, साक्षर शिक्षणाबरोबरच हस्तकौशल्य व धंदेशिक्षण यांची योजना, आणि केवळ सरकारी नोकरीवर भिस्त न ठेवतां व पदवीची लालसा न धरून स्वावलंबनाच्या तत्त्वावर भावी आयुर्यात्रा सफल करण्याची महत्त्वाकांक्षा–इत्यादि गोष्टींच्या दृष्टीनें पाहतां समर्थविद्यालयाच्या प्रयोग-शाळेंत होणारा प्रयोग महाराष्ट्रास मननीय वाटत असून प्रियहि होता, ही गोष्ट केवळ किरकोळ चिल्लर देणग्यांच्या योगानें विद्यालयाच्या वर्गणीची जी प्रचंड रक्कम अवघ्या दोनतीन वर्षांत जमा झाली तिजवरून उघड होत आहे. उघडी हवा, शिस्त, नियमितपणा, व्यायाम वगैरेंच्या योगानें या विद्यालयांतील विद्यार्थ्यांच्या तोंडावर जो रसरशीतपणा दिसूं लागला होता त्यामुळें या प्रयोगांतील प्रमेयभूत एक कार्य तरी एव्हांच सिद्ध झालेलें दिसत होतें. तसेंच देशी भाषेंतून शिक्षण देणें, शिक्षणोपयोगी नवीन ग्रंथमाला निर्माण होणें, या गोष्टींच्या बाजूनें चाललेला प्रयत्नहि यशस्वी होण्याचा रंग आला होता. यामुळें इतर बाबतींतील यश दिसण्यास हें विद्यालय जिवंत राहिलें नाहीं याबद्दल विद्यालयाच्या चालकांस व त्याच्या आश्रयदात्यांस वाईट वाटणें अगदीं स्वाभाविक आहे.

आतां दुसरे पक्षीं, समाजांतलि कित्येक लोकांस व सरकारास विद्या-लयासंबंधीं सर्वच गोष्टी पसंत पडण्याचा संभव नव्हता, हेंहि आम्ही जाणून आहों. कोणतीहि नवीन संस्था त्या विषयांतील जुन्या संस्थांना आपल्या वरील अप्रत्यक्ष दोषारोपाचें किंवा निंदेचें एक चिन्हच आहे, असें वाटणें स्वाभाविक आहे; व महाराष्ट्र-विद्याप्रसारक मंडळाच्या हस्तपत्रकांतून अगर तत्समर्थनपर अशा इतरत्र प्रसिद्ध झालेल्या लेखांतून जुनी शिक्षणपद्धति व जुन्या शिक्षणसंस्था यांच्या दोषदर्शनाचा ध्वनि निघण्यासारखा होता, हें नाकबूल करण्यांत फारसा अर्थ नाहीं. तथापि असला ध्वनि केवळ अपरि-हार्य आहे हें विसरतां कामा नये. आपल्या इलाख्यांतील शिक्षणाचा इतिहास लक्षपूर्वक पाहाणारांस असें दिसून येईल कीं, प्रथम सर्वस्वीं सरकारी शाळा, त्यानंतर खासगी परंतु सरकारी ग्रँट घेणाऱ्या निमसरकारी शाळा, त्यानंतर ग्रँट घेणाऱ्या परंतु त्यांतल्या त्यांत स्वतंत्र अशा शाळा,

त्यानंतर ग्रँट बिलकूल न घेणाऱ्या व सर्वस्वी स्वतंत्र परंतु सरकारी विश्व-विद्यालयास जोडलेल्या अशा शाळा, अशा परंपरेनें हा इतिहास निर्माण झालेला होता, व समर्थ विद्यालय हें याच परंपरेंतील फक्त पुढची एक पायरी होय. या परंपरेंतील प्रत्येक पुढची रक्कम ही तिच्या मागच्या रकमे-ची अप्रत्यक्ष निंदक होय अशी त्या त्या वेळीं समजूत होती. पण वस्तुतः पुणें-न्यू स्कूल जन्मास आल्यामुळें सरकारी हायस्कुलानें त्याचा हेवा अगर द्वेष करण्यास जितकें सबळ कारण होतें त्याहीपेक्षां आज न्यू स्कूलसारख्या संस्थांनीं समर्थ विद्यालयासारख्या संस्थेचा द्वेष करण्यास कारण कमी सबळ आहे. सरकारच्या दृष्टीनेंहि पाहतां, विद्यालयांत शिकविलीं जाणारीं कित्येक पुस्तकें अगर दिले जाणारे कित्येक पाठ नापसंत असतील; तथापि एवढ्या-मुळें तें अशा रीतीनें वज्राघातानें रसातळास पोंचावयास पाहिजे होतें, असें आम्हांस वाटत नाहीं. शिक्षणसंस्थांनीं होतां होईतों इतर व्यवसायांत, विशेषतः उलढालीच्या राजकीय चळवळींत तरी होतां होईतों न पडणें बरें, व हें तत्त्व विसरून विद्यालयाच्या चालकांच्या हातून प्रथम प्रथम कदाचित् वर्तन घडलें असण्याचा संभव आहे. तथापि, विद्यार्थी काय व शिक्षक काय यांचें गेल्या सालांतील वर्तन पाहिलें असतां तें वरील तत्त्वास सहसा सोडून गेलें नव्हतें, अशीच कबुली कोणासहि द्यावी लागेल विद्यालयांत शिकविलीं जाणारीं विशिष्ट पुस्तकें सरकारास अप्रिय असल्यास नवीन कायद्यानें त्यांस तीं सरकारजमा करतां आलीं असतीं, व विद्यालयांतील शिक्षण जर खरोखर बेकायदेशीर असतें तर नेहमींचा फौज-दारी कायदा लावून खटले वगैरे करून व अद्दल घडवून तें त्यांस बंद पाडतां आलें असतें. परंतु कोणच्याहि प्रकारचा स्पष्ट दोषारोप न करतां, खुलासा न मागतां, पुरावा न घेतां, चौकशी न चालवितां एकदम समर्थ विद्यालय कायमचें बंद करण्यांत आलें हें भावी पिढ्या 'आस्मानी सुलतानी' या म्हणीपैकीं दुसऱ्या आपत्तीचें समर्पक उदाहरण म्हणून देऊं लागतील यांत संशय नाहीं. ग्रँट न घेतां किंबहुना विद्यमान विश्वविद्यालयाशीं संबंध न ठेवतां स्वतंत्र रीतीनें चालण्याची महत्त्वाकांक्षा बाळगणाऱ्या शिक्षण संस्थेबद्दल सरकारास थोडासा संशय येणें हें जरी स्वाभाविक असलें तरी तो संशय एकदम असा दारुणपरिणामी करणें हें खचित न्याय्य नाहीं.

विद्यालयाच्या चालकांवर रोष झाला असला तरी त्यांस तडजोड करण्याची संधि देणें हेंच सरकारचें कर्तव्य होतें; व तें त्यांनीं केल्यावर जर विद्यालयाचे चालक आपला हट्टच चालविते तर मग या वज्राघाताबद्दल सरकारास कोणाला फारशीं नांवें ठेवतां आलीं नसतीं. परंतु झाला हा प्रकार मात्र सर्वस्वीं अन्यायाचा झाला, असें म्हटल्याशिवाय गत्यंतर नाहीं.

---

# ७. राष्ट्रीय शिक्षणाचें पुढें काय ?

( केसरी तारीख ८ नोव्हेंबर १९१०. )

समर्थ विद्यालयासंबंधानें सरकारचा अखेरचा हुकूम प्रसिद्ध झाल्यापासून 'राष्ट्रीय शिक्षणाचें पुढें काय!' हा प्रश्न त्या शिक्षणाच्या सर्व हितचिंतकांपुढें येऊन उभा राहिला आहे. खुद्द समर्थ विद्यालयासंबंधानें नांव ठेवण्यासारख्या विवक्षित गोष्टी कोणत्या होत्या हें सरकार दाखवून देईल अशी जी आशा कांहीं थोड्या श्रद्धाळू लोकांस वाटत होती ती निष्फळ झाली. दुसऱ्या बाजूनें समर्थ विद्यालयाचें शिक्षकमंडळ व विद्यालयांत ठेविलेल्या मुलांचा पालकवर्ग यांनीं सरकारच्या मुक्या आक्षेपांस देतां येईल तितकें उत्तर देऊन ते यापुरत्या आपल्या कर्तव्यांतून मोकळे झाले आहेत. 'महाराष्ट्र विद्याप्रसारक मंडळा'च्या हातीं समर्थ विद्यालय बंद झाल्यानें जी जमीन, इमारत वगैरे मिळकत व अल्पशी रोकड रक्कम शिल्लक असेल, तिचें काय करावयाचें हा प्रश्न मुळींच बिकट नाहीं. कारण योग्य उपयोग करितां येईपर्यंत ही मिळकत व हा पैसा जागच्या जागीं पडून राहण्यास फारशी हरकत नाहीं. दुसरा एक बराचसा बिकट प्रश्न होता, तो समर्थविद्यालयांतील विद्यार्थ्यांचें पुढें काय होणार हा होय. विद्यालयांतील मुलें आपापल्या घरीं गेलीं असून सुदैवानें त्यांतील बहुतेकांचे पालक कमीअधिक संपन्न व सुखवस्तु असल्यामुळें, विद्यमान इतर कोणत्याहि शिक्षणसंस्थेंत त्यांचा समावेश न झाला तरी त्यांच्या पुढील आयुष्यक्रमाचा कांहीं एखादा भला मार्ग बहुधा निघेल यांत शंका नाहीं. तथापि, शिक्षणक्रम अपुरा राहिलेलीं व इतर शाळांत समावेश न पावलेलीं हीं मुलें एकदम धंदा तरी काय करणार ?

यास्तव त्यांस पोटाचा धंदा शिकून होईपर्यंत शिक्षण देण्याची कांहीं तरी व्यवस्था महाराष्ट्रानें करणें जरूर आहे असें आम्हांस वाटतें.

परंतु मुख्य प्रश्न वर सांगितल्याप्रमाणें राष्ट्रीय शिक्षणाच्या भावी आयुष्यक्रमासंबंधानें उपस्थित होतो. सन १९०६ सालीं जेव्हां प्रथम राष्ट्रीय शिक्षणाची कल्पना जोरानें मूर्तस्वरूपानें पुढें आली तेव्हांच्या व हल्लींच्या स्थितींत जमीनअस्मानचें अंतर पडलें आहे, हें कोणीहि कबूल करील. या चार वर्षांत सरकारानें पिच्छेहाट करणारे दडपशाहीचे कायदे व त्यांहूनहि अधिक घातक असा कायद्यांचा अंमल करून जवळ जवळ एक पिढी पालथी घातली. अजूनहि हें सत्र सुरू आहे; व तें केव्हां थांबेल हें सांगवत नाहीं. देशांत कृत्रिम कां होईना परंतु बरीचशी शांतता उत्पन्न झाल्यामुळें या कायद्यांचा अंमल प्रत्यक्ष पुढें चालू राहण्याचें कारण उरणार नाहीं; तरी पण पटावर आलेले दडपशाहीचे कायदे रद्द न होतां ते तसेच राहणार यांत शंका नाहीं. अशा प्रकारचे कायदे अस्तित्वांत येतील, व दडपशाहीचें असें हें सत्र सुरू होईल या गोष्टीचें आकलन ऊर्फ भविष्य १९०६ सालीं राष्ट्रीय शिक्षणाच्या चळवळीस उपक्रम करणाऱ्या पुढाऱ्यांना करितां येणें शक्य होतें किंवा कसे हा वादग्रस्त प्रश्न आहे; व अशा प्रकारचें भविष्य करितां येण्यासारखें असतें. तरीहि त्यांनीं मूळ अंगिकारलेला मार्ग सोडून दिलाच पाहिजे होता कीं काय, याबद्दलहि वाद असूं शकेल. परंतु हल्लीं तरी गेल्या तीन सालांत मिळालेल्या मौल्यवान् अनुभवाचा फायदा राष्ट्रीयशिक्षणाच्या पुरस्कर्त्यांनीं करून घेतला पाहिजे,ही गोष्ट निर्विवाद आहे.

सदरहू अनुभवांतील मुख्य दोन गोष्टी आमच्या मतें या होत. पहिली गोष्ट पैशासंबंधानें. एक तर टिळक,देशमुख,वैद्य, विजापूरकर वगैरे मंडळी पुढारी असून त्यांनीं खटपट जातीनें केली व सरकारची विद्यालयासंबंधाची प्रतिकूलताहि अद्यापि जगजाहीर व्हावयाची होती; अशी स्थिति असल्यानें राष्ट्रीयशिक्षणाच्या या कार्यास तीन वर्षांत साठ पांसष्ट हजार रुपये मिळाले. ह्या सालांत कित्येक पुढारी जाग्यावर नव्हते हें खरें; परंतु सरकारची प्रतिकूलता व्यक्त झाल्यानें हे पुढारी जाग्यावर असतां ज्या देणग्या व वार्षिक वर्गण्या लोकांनीं कबूल केल्या होत्या त्या पूर्वीइतक्या त्वरित वसूल होईनाशा झाल्या.या गोष्टीवरून अनुमान निघतें तें हेंच आहे कीं,महाराष्ट्रांत

स्वार्थत्यागाचें बीं जरी उत्कृष्ट रुजलें आहे, तरी महाराष्ट्रीयांची स्वाभाविक गरिबी म्हणजे द्रव्याची कमतरता, व देण्याची इच्छा असतांहि सरकारच्या प्रतिकूलतेमुळें दात्यांस वाटणारी भीति, यांच्यामुळें राष्ट्रीय शिक्षणाच्या कार्यास मिळूं शकणाऱ्या द्रव्याची मर्यादा किती संकुचित आहे, हें उघड दिसून येत आहे. 'डेक्कन एज्युकेशन सोसायटी'च्या गेल्या पंचवीस वर्षांच्या इतिहासांत लोकांनीं दिलेल्या देणगीची रक्कम सुमारें चारपांच लक्ष रुपये झाली हें खरें. तथापि या पंचवीस वर्षांत, तिच्या उत्तम लोकप्रियतचे दिवस, तिच्यांतील कित्येक खटपटी सभासदांनीं वर्गण्या मिळविण्याकरितां केलेल्या अविश्रांत श्रमाचे दिवस, आणि गेल्या दोन वर्षांत सरकारास अप्रिय असलेलें समर्थ विद्यालय पुढें आल्यामुळें सोसायटीस पैसे देणें हें एकप्रकारें सरकारच्या मताशीं आपलें मत जुळतें असें दाखविण्याच्या इच्छेनें उत्पन्न झालेल्या कृत्रिम औदार्यबुद्धीचे दिवस, हे सर्व या पंचवीस सालांत येतात, ही गोष्ट विसरतां कामा नये.पण सर्व महाराष्ट्रानें पंचवीस वर्षांत लोकांना प्रिय, सरकारास प्रिय व उभयप्रिय अशा सर्व शिक्षणसंस्थांस मिळून दिलेल्या रकमेहून अधिक रक्कम बंगाल्यांतील एका जमीनदारास एकट्या संस्थेस देतां आली,हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे.

परंतु दुसरी गोष्ट म्हटली म्हणजे सरकार व राष्ट्रीय शिक्षणाची यापुढें निघणारी कोणतीहि संस्था यांच्या दरम्यानच्या संबंधाविषयींची होय. पैशाची अडचण मोठी असते, नाहीं असें नाहीं. तथापि, समर्थ विद्यालय हें बेकायदा आहे असें ठरून तें बंद झालें नसतें तर द्रव्याच्या अभावामुळें बंद पडण्याची पाळी त्यास खचित आली नसती. नदीच्या ओघाप्रमाणें समाजाच्या औदार्याचाहि ओघ वाढत्या प्रमाणावर राहिला असता असें विद्यालयाच्या चालकांनीं धेऊन चालण्यास फारशी हरकत नव्हती. पण सरकारची प्रतिकूलता हा जो रोग विद्यालयास जडला तोच शेवटीं असाध्य ठरला, हें आतां उघड आहे. तेव्हां शिक्षणाच्या कामाला देणाऱ्या देण्याची महाराष्ट्रीयांची बुद्धि पूर्ववत् कायम आहे असें मानून बेकायदा ठरण्याच्या गंडांतरांतून समर्थ विद्यालयासारख्या किंवा राष्ट्रीय शिक्षणाच्या दुसऱ्या कोणत्याहि शाळा यापुढें कशा वांचवितां येतील, व वांचवितां आल्याच तर खरें राष्ट्रीय शिक्षण देण्याचें त्यांचें अंग शाबूत ठेवून त्या वांचवितां

येतील कीं नाहीं, हा प्रश्न पुढें येतो. राष्ट्रीय शिक्षणाचा प्रश्न खुद्द राष्ट्राच्या इतिहासाशींच गुंतलेला असल्यामुळें, एखाद्या विवक्षित प्रयत्नाच्या यशापयशावर राष्ट्रीय शिक्षणाच्या सर्व भावी आशा अवलंबून राहणें शक्य नाहीं. तळेगांवचें समर्थ विद्यालय शाबूद राहून व सुधारून अपेक्षेप्रमाणें वृद्धि पावलें असतें, तरी त्या एका संस्थेनें सर्व महाराष्ट्राचें काम भागण्यासारखें होतें, असें मानतां येत नाहीं. उलटपक्षीं एक समर्थ विद्यालय बुडालें म्हणून 'जग बुडालें' असेंहि म्हणतां येणार नाहीं. प्रत्येक पिढीस आपापल्या काळीं हा प्रश्न आपापल्या रीतीनें सोडवावा लागतच असतो; व समर्थ विद्यालय अवघ्या तीन वर्षांत बुडाल्यामुळें आजच्या पिढीस राष्ट्रीय शिक्षणाचा प्रश्न दुसऱ्यांदा हातीं घ्यावा लागणार आहे, तरी तो तिनें घेतलाच पाहिजे. "कां न सदन बांधावें कीं त्यांत पुढें बिळें करिल घूस ?" या पंतांच्या उक्तीप्रमाणें राष्ट्रीय शिक्षणाचें घर फिरून बांधण्यास सुरवात झाली पाहिजे. कोळ्याचें जाळें कितीहि वेळ फाटलें तरी तो तें फिरून विणतोच. मोडलेलें घरटें पक्षी इतक्या निश्चयानें पुनः पुनः बांधतात कीं, एकदां बांधलेलें घरटें मोडल्याचें जणूं काय त्यांना दुःखच होत नाहीं ! व असें जर आहे तर एकदां बिघडलेली गोष्ट फिरून घडवून आणण्याची हाव मनुष्यानें धरल्यास त्यांत नवल करण्यासारखें कांहींच नाहीं.

परंतु मनुष्यें व पशुपक्षी यांच्या पुनर्रचनेच्या प्रयत्नांत एक महत्त्वाचा फरक असतो, व तो हा कीं, पशुपक्षी यांना आपल्या उपजत बुद्धीस अनुसरून फक्त एकाच ठराविक पद्धतीनें घर बांधतां येतें. दूरदृष्टि किंवा अनुभवजन्य ज्ञानानें सुधारण्याची पात्रता त्यांच्या अंगीं नसते. हे दोनहि गुण ईश्वरानें मनुष्याला दिले आहेत; व त्यामुळ कोणत्याहि एका घटनेचा बिघाड झाला असतां तिच्या जागीं दुसरी घटना करावयाची झाली तर, पूर्वींच्या प्रयत्नांत आपल्या हातून कोणते दोष झाले होते, व नवीन प्रयत्नांत ते आपणांस कसे टाळतां येतील बाहेरून अनपेक्षित अशीं कोणतीं विघ्नें कशीं येतात व तीं टाळणें कसें शक्य आहे-यांचा विचार व विचाराचा अंमल मनुष्यमात्रास करितां येतो. समर्थ विद्यालय काढतांना, तें पुढें ज्या कारणांनीं बुडालें त्या कारणांची अटकळ कदाचित् करतां येण्यासारखी नसेल; पण तो अनिष्ट परिणाम प्रत्यक्ष घडून आल्यावर

तरी त्याची मीमांसा करून, तसाच परिणाम फिरून घडूं नये याविषयींची खबरदारी राष्ट्रीय शिक्षणाच्या जुन्या व नव्या पुरस्कर्त्यांस घेतां येण्यासारखी आहे, असें आम्हांस वाटतें. बागेंत एखादें नवीन झाड लावलें असतां त्याची वाढ कितपत झाली आहे हें पाहण्यास त्याचीं मुळेंच वरचेवर उपटून पाहणें हा शाहाणपणाचा मार्ग नव्हे; हें पाहण्याचें खरे इतर मार्ग आहेत. पण दुर्दैवानें कांहीं अकल्पित कारणांनीं तें झाड उपटलें गेलेंच तर त्याच्या मुळांकडे नीट पाहिलें असतां त्याच्या वाढीची कल्पना विशेष समर्पक रीतीनें करितां येईल यांत मात्र शंका नाहीं. तात्पर्य, राष्ट्रीय शिक्षणाची एक शाळा बुडाली तरी हताश न होतां, जरूर तर निराळ्या प्रकारची–दुरुस्त केलेली व सुधारलेली–राष्ट्रीय शाळा काढतां येणें शक्य आहे कीं नांहीं? असल्यास तें कोणत्या धोरणानें शक्य आहे? सरकारची हरकत न येईल अशा प्रकारानें पण ज्यास राष्ट्रीय हें नांव देतां येईल असें शिक्षण देणें अशक्यच आहे कीं काय? वगैरे गोष्टींसंबंधानें फिरून एकवार चर्चा करण्याची वेळ आलेली आहे. 'राष्ट्रीय' शिक्षणाच्या अंगांचा व उपांगांचा ज्यांत सर्व बाजूंनीं साधकबाधक विचार केला आहे, अशी एक लेखमाला केसरींतून सवडीप्रमाणें खंडशः देण्याचें आम्हीं योजिलें आहे; व राष्ट्रीय शिक्षणाचे अभिमानी लोक या चर्चेस प्रश्नोत्तर, सूचना, टीका वगैरेंनीं मदत करतील अशी आम्हांस आशा आहे.

---

# ८. स्त्रियांची युनिव्हर्सिटी

( केसरी, तारीख २२ फेब्रवारी १९१६. )

गेल्या डिसेंबरांत मुंबईस भरलेल्या सामाजिक परिषदेचे अध्यक्ष या नात्यानें प्रो० कर्वे यांनीं जें प्रास्ताविक भाषण केलें त्यावरून आमच्या महाराष्ट्र देशांत तरी उपयुक्त व उच्च प्रतीच्या स्त्रीशिक्षणाची सोय होण्यासाठीं एखादें व्यापक व सर्वांगसुंदर खासगी विद्यापीठ लवकरच निघेल अशी आम्हांस आशा वाटत होती. प्रो० कर्वे यांनीं या कामीं आजपर्यंत जे परिश्रम केले आहेत व जी झीज सोसलेली आहे त्यावरून, आणि विशेषतः जपानचें उदाहरण घेऊन त्यांनीं राष्ट्रीय व व्यापक स्त्री शिक्षणाची जी दिशा आपल्या भाषणांत वाचकांपुढें मांडली त्याजवरून, स्त्रियांची ही भावी युनिव्हर्सिटी निवळ एकदेशी नव्हे तर राष्ट्रीयदृष्ट्या व्यापक होईल असें वाटत होतें. पुणें येथील फीमेल हायस्कूल स्थापन झालें तेव्हांहि स्त्रीशिक्षणासंबंधाच्या अशाच प्रकारच्या व्यापक कल्पना कांहीं लोकांच्या मनांत आलेल्या होत्या; पण या हायस्कूलची देखरेख बऱ्याच अंशीं सरकारी धोरणानें चालत असून, शिक्षकांत विधर्मी लोकांचें निदान प्रथमतः तरी, अधिक प्राबल्य असल्यामुळें या शाळेंतून कांहीं मुली मॅट्रिक्युलेशनपर्यंत शिकून जरी तयार झाल्या आहेत तरी तेवढ्यानें राष्ट्रीय दृष्ट्या स्त्रीशिक्षण ज्या तऱ्हेचें असावें तशी व्यवस्था या शाळेकडून झालेली नाहीं. सामान्यतः पाहिलें तर कोणासहि जें शिक्षण द्यावयाचें तें त्याच्या पुढील आयुष्यक्रमाला उपयुक्त व सहाय्यकारी होईल असेंच दिलें पाहिजे; किंबहुना जें शिक्षण विद्यार्थ्यास त्याच्या "पुढील आयुष्यक्रमांत नालायक बनवील" त्याला "शिक्षण हें नांव देणेंच चूक होय" असें म्हटलें तरी चालेल. सामान्यतः लेखन वाचन व हिशेब हें शिक्षण सर्वांसच पाहिजे; आणि ज्याची खुषी व योग्यता असेल त्यास विद्यादेवीच्या मंदिरांतील उच्च पायरीपर्यंत जाण्याची सवड आणि मोकळीकहि असली पाहिजे, हीं तत्त्वें आम्हांस पूर्णपणें मान्य आहेत. पण शिक्षणाची व्यवस्था करतांना एवढीं दोनच सामान्य तत्त्वें लक्षांत ठेवून चालत नाहीं. प्रचलित

समाजव्यवस्थेप्रमाणें विद्यार्थ्यास पुढें आयुष्यांत काय करावयाचें आहे त्याप्रमाणें, म्हणजे त्याला अनुकूल होईल असें शिक्षण त्यास देणें जरूर असतें. हिंदुस्थानांतील हल्लींच्या शिक्षणपद्धतींत जो मोठा दोष आहे तो हा कीं, सर्व विद्यार्थ्यांस त्यांच्या त्यांच्या लायकीप्रमाणें किंवा आवडीप्रमाणें पुढें जो आयुष्यक्रम किंवा धंदा स्वीकारावयाचा असेल त्याला अनुकूल असें शिक्षण आमच्या शाळांतून त्यांस मिळत नाहीं. याचा परिणाम असा होतो कीं, एखाद्या मारवाड्याचा किंवा सुताराचा मुलगा एकदां इंग्रजी शाळेंत शिकून तयार झाला म्हणजे तो पुढें आपला मूळचा धंदा विसरून नोकरीकडे धांव घेऊं लागतो; आणि मोठा नोकरी न मिळाली तर त्याचें आयुष्य बहुतेक फुकट गेल्यासारखें होतें. हल्लींचें स्त्रीशिक्षणहि अशाच प्रकारचें आहे; पण याखेरीज हल्लींच्या स्त्रीशिक्षणाची दुसरी उणीव ही कीं, तें सर्व सरकारच्याच ताब्यांत असल्यामुळें त्यांत इंग्रजी भाषेला विशेष महत्त्व देण्यांत येतें, आणि धर्मशिक्षणाच्या नांवानें तर तेथें बहुतेक भोंपळ्याएवढें पूज्य असतें. प्रस्तुत शिक्षणपद्धतींतील हे दोष आम्ही आज नवीन सांगतों असें नाहीं. ते लोकांच्या लक्षांत येऊन आज पुष्कळ वर्षें झालेलीं आहेत; आणि परवां काशी येथें हिंदु विश्वविद्यालयाची जी स्थापना झाली ती बऱ्याच अंशीं वर लिहिलेले दोष लक्षांत येऊन झालेली आहे, हें वाचकांस माहीत असेलच. या सर्व गोष्टी लक्षांत आणल्या म्हणजे स्त्रियांस जें शिक्षण मिळावयाचें त्याची दिशा काय असली पाहिजे या गोष्टीचा सहजच निर्णय करितां येतो. स्त्रीवर्गापैकीं कांहीं एम्. ए., कांहीं बॅरिस्टर व कांहीं डॉक्टर झाल्या तरी तो अपवाद असून सामान्य स्त्रीवर्गाचें प्रमुख ध्येय मनूनें म्हटल्याप्रमाणें 'उत्पादनमपत्यस्य जातस्य परिपालनम् । प्रत्यहं लोकयात्रायां एतत्स्यात्स्त्रीनिबंधनम् ॥' हेंच राहणार हें निर्विवाद आहे. स्त्रीशिक्षणासाठीं नांवाजलेल्या मोठमोठ्या प्राच्य किंवा पाश्चात्य देशांत हीच स्थिति आहे, आणि हिंदुस्थानांतहि त्याहून भिन्न असूं शकणार नाहीं हें उघड आहे. पुरुषवर्गांत शिक्षणाचा ज्या ज्या मानानें अधिक प्रसार होईल त्या त्या मानानें त्यांच्या सहधर्मचारिणीहि अधिक सुशिक्षित पाहिजेत हें कोणासहि नाकबूल करतां येणार नाहीं. पण सुशिक्षित म्हणजे काय याचा विचार केला तर त्यांस मिळणारें शिक्षण अनादिकालापासून चालत आलेल्या त्यांच्या गार्हस्थ्य आयुष्यक्रमास

लायक असेंच असलें पाहिजे असें म्हणावें लागतें; आणि हें तत्त्व लक्षांत आणणें म्हणजे स्त्रियांचें शिक्षण देशी भाषेंत व्हावें, त्यांत योग्य प्रतीच्या धर्मशिक्षणाचा समावेश झालेला असावा आणि आमच्याकडील कुटुंबव्यवस्थेला तें अनुसरून असावें असें म्हणणें प्राप्त होतें. या बाबतींत किरकोळ मतभेद असले तरी सामान्यतः या गोष्टी सर्वांसच मान्य होतील व आहेत असें म्हणण्यास हरकत नाहीं.

आतां या पुढला प्रश्न म्हटला म्हणजे स्त्रियांच्या शिक्षणाकरितां जी युनिव्हर्सिटी काढावयाची तिची रचना स्त्रीशिक्षणाच्या या सर्व उद्देशांत अनुकूल अशी कशी राखावी हा होय. प्रो० कर्वे यांनीं सामाजिक परिषदेपुढें केलेल्या आपल्या भाषणांत यासंबंधाचा फारसा उहापोह केलेला नव्हता. पण गेल्या केसरींत त्यांनीं हातीं घेतलेल्या स्त्रियांच्या युनिव्हर्सिटीसंबंधानें घटनेचे जे नियम प्रसिद्ध केले आहेत ते पाहिले म्हणजे या युनिव्हर्सिटीचें स्वरूप असावें तितकें राष्ट्रीय व व्यापक नाहीं असें दिसून येतें. पहिल्यानें " हिंदी (Indian) स्त्रियांची युनिव्हर्सिटी " हें नांवच घ्या. हिंदी हा शब्द आम्ही अलीकडे हिंदुस्थानांतले रहिवासी–मग ते खिस्ती असोत, पार्शी असोत, मुसलमान असोत, वा जैन किंवा बौद्ध असोत–या अर्थानें वापरतों; आणि स्त्रियांच्या युनिव्हर्सिटीच्या नांवांत हा शब्द केवळ औपचारिक असेल तर या युनिव्हर्सिटींत स्त्रियांस जें शिक्षण मिळणार तें कोणत्या धर्माचें, अगर कोणत्या धर्माच्या विशिष्ट गृहस्थितीचें किंवा सर्व धार्मिक गृहव्यवस्था सोडून नुसतें बौद्धिक असणार ! आणि तेंहि कोणत्या देशी भाषेच्या द्वारां असणार इत्यादि अनेक प्रश्न उपस्थित होतात. प्रो० कर्वे यांनीं सामाजिक परिषदेपुढें जें भाषण केलें त्यावरून स्त्रियांस या युनिव्हर्सिटींत जें शिक्षण द्यावयाचें तें देशी भाषेच्या द्वारें द्यावें असें त्यांचें मत असल्याचें दिसून येतें. अर्थात्, महाराष्ट्रांत जी स्त्रियांची युनिव्हर्सिटी निघावयाची तींत जें शिक्षण मिळणार तें मराठी भाषेच्या द्वारें मिळालें पाहिजे हें उघड आहे; आणि तसें असेल तर ही युनिव्हर्सिटी मुख्यत्वें महाराष्ट्राकरितांच आहे असें म्हणावें लागतें. महाराष्ट्रांतील या संस्थेचें इतर प्रांतांत अनुकरण होईल, नाहीं असें नाहीं. आणि दरएक प्रांतीं तत्रस्थसमाजस्थितीस अनुकूल अशा प्रांतिक संस्था एकाच नियामक

मंडळीच्या ताब्यांत आल्यास त्या संघास भारतवर्षीयत्व येईल. पण त्यामुळें महाराष्ट्रांत निघणारी संस्था आजच हिंदी झाली असें होत नाहीं. असो, पण नुसत्या नांवाकरितां भांडत बसण्यांत कांहीं हंशील नाहीं. हेतु व उद्देश काय ते पाहिले पाहिजेत. आणि ते पाहिले म्हणजे त्यांत धार्मिक शिक्षणाचा कोठेंच उल्लेख केलेला आढळून येत नाहीं. ही उणीव आमच्या मतें महत्त्वाची होय. कारण पुरुषांच्याहि शिक्षणक्रमांत धार्मिक शिक्षणाची आवश्यकता आम्हांस आतां जर अधिकाधिक भासूं लागली आहे, व हिंदु युनिव्हर्सिटीची स्थापनाहि त्याचसाठीं आहे, तर स्त्रियांच्या शिक्षण-क्रमांत याची उपेक्षा करून कसें चालणार ? नियमांमध्यें दाखल केलेल्या उद्देशांहून इतर उद्देश ठरविण्याचें काम मुख्य म्हणजे सेनेटसभेकडे ठेवलेलें आहे खरें; पण आमच्या मतें धर्मशिक्षणाच्या उद्देशाबद्दल अशी टाळाटाळी करणें इष्ट नाहीं, तो मूळ उद्देशांतच घातला पाहिजे. आणि त्याच-बरोबर या संस्थांचें नियामकत्व सर्वस्वीं लोकांच्याच ताब्यांत राहील असाहि एक कायमचा नियम पाहिजे. स्त्रियांची युनिव्हर्सिटी सरकारच्या ताब्यांत जाऊं नये अशी प्रो० कर्वे यांची इच्छा असल्याचें जाहीर झालें आहे; पण अशा प्रकारच्या सदिच्छा नियमांत कायमपणें नमूद झाल्या नसल्या तर कालमानाप्रमाणें किंवा ग्रँट–इन्–एडच्या लालचीनें त्यांत पुढें विपर्यास होतो असें आढळून आलें आहे. फार काय सांगावें, पण आमच्या कायदेकौन्सिलांत कायदे करणारे सरकारी सभासद बोलण्यांत एक इच्छा प्रतिपादन करतात आणि पुढें कायद्याच्या शब्दाचा अर्थ निराळा होतो असा अनुभव आहे. म्हणून ज्या संस्थेचें नियामकत्व केवळ लोकांच्या ताब्यांत असावयाचें तिच्या घटनेच्या नियमांत ती गोष्ट स्पष्टपणें नमूद असली पाहिजे. एरवीं पुढें नियामक मंडळींत अनेक प्रकारच्या कल्पना निघण्याचा संभव आहे. धर्मशिक्षण हेतूमध्यें घातलें म्हणजे हिंदुधर्म का मुसलमानी धर्म, पार्शी धर्म का खिस्ती धर्म असा पुढें सहजच प्रश्न निघतो; पण त्याचें उत्तर हिंदु-धर्म, असेंच प्रकृत स्थलीं द्यावें लागेल असें आम्हांस वाटतें. स्त्रियांच्या या विद्यापीठांत इतर धर्मांच्या स्त्रिया आल्या तर त्यांस घेऊं नये असें आम्ही म्हणत नाहीं; पण त्याचा मुख्य उद्देश हिंदुधर्मांतील स्त्रियांस महाराष्ट्रभाषेच्या द्वारा धार्मिक आणि इतर

शिक्षण देण्याचा असला पाहिजे;किंबहुना हिंदु-युनिव्हर्सिटीचेंच या बाबतींत स्त्रियांच्या युनिव्हर्सिटीनेंहि अनुकरण केलें पाहिजे असें आम्हांस वाटतें.

शेवटचा प्रश्न नियामक मंडळाच्या रचनेसंबंधाचा होय. सभापति, सभेचे उपपति वगैरे संज्ञा आणि विद्यापीठांतील घटनेचीं कलमें प्रस्तुतच्या सरकारी युनिव्हर्सिटी–नियमांतूनच घेतलेलीं असल्यामुळें त्यांबद्दल कांहीं मत-भेद होण्याचा संभव नाहीं; पण साधारण सदस्य ( Ordinary Fellow ) कोणीं निवडावे याबद्दल जो नियम आहे त्यानें स्त्रियांच्या युनिव्हर्सिटीस संकुचित,वैयक्तिक व एकदेशीय स्वरूप येतें असें थोड्या विचारांतीं कोणाच्याहि लक्षांत येईल.गेल्या पंचवीस तीस वर्षांत महाराष्ट्रांत स्त्रीशिक्षणाची जी वाढ झालेली आहे ती कांहीं केवळ हिंगण्याच्या आश्रमांतच झाली आहे असें नाहीं. पुणें आणि मुंबई येथें स्त्रियांकरितां हायस्कूलें व सेवासदनें निघालीं आहेत इतकेंच नव्हे, तर विवाहित स्त्रियांस सोईवार पडतील अशा तऱ्हेच्याहि स्त्रियांच्या कांहीं शाळा ( होम क्लासेस ) निघाल्या आहेत. या सर्व एका बाजूस ठेऊन केवळ एका अनाथबालिकाश्रमाच्या मंडळीच्या सभासदांनीं या युनिव्हर्सिटींतील ६० फेलोंपैकीं ३० म्हणजे निम्मे फेलो कां निवडावे हें आम्हास समजत नाहीं. युनिव्हर्सिटी ही संस्था व्यापक असून तिच्यांत स्त्रीशिक्षण पाहिजे म्हणणाऱ्या सर्व प्रकारच्या मतांच्या व आचाराच्या लोकांचा योग्य प्रमाणांत समावेश झालेला असला पाहिजे. प्रो०कर्वे यांनीं अनाथ-बालिकाश्रम स्थापन करून तो नांवारूपास आणला ही गोष्ट कोणासहि नाकबूल नाहीं व कित्येकांस असेंहि वाटण्याचा संभव आहे कीं, तेच जर स्त्रियांची युनिव्हर्सिटी स्थापन करण्यासाठीं उद्योग करणार तर या युनिव्हर्सिटीचें पुढील धोरण ठरविण्याचें काम अनाथ बालिकाश्रमाच्या मंडळीच्या ताब्यांत त्यांनीं कां ठेवूं नये ! डेक्कन एज्युकेशन सोसायटीची पहिली रचना अशीच नव्हती काय ! पण आमच्या मतें हा कोटिक्रम बरोबर नाहीं. हिंगण्यांतील 'अनाथ-बालिकाश्रमा'च्या प्रस्तुतच्या पाट्या बदलून तेथेंच त्याऐवजीं जर 'हिंदी स्त्रियांची युनिव्हर्सिटी' अशी नवी पाटी लावावयाची असेल–म्हणजे अनाथ बालिकाश्रमाच्या धोरणावरच जर भावी युनिव्हर्सिटी व्हावयाची असेल तर स्त्रियांच्या हिंदी युनिव्हर्सिटीची रचना हल्लींच्या नियमांत आहे त्याप्रमाणें ठेवण्यास हरकत नाहीं. पण

अनाथ बालिकाश्रमाचें धोरण न स्वीकारतांहि स्त्रीशिक्षणास जे अनुकूल आहेत त्या सर्वांचा या युनिव्हर्सिटींत समावेश होणें जर इष्ट आहे तर साधारण सदस्य (Ordinary Fellows) यांच्या निवडणुकीचा हल्लींचा जो नियम आहे तो अवश्य बदलला पाहिजे असें आमचें मत आहे. कोणाहि मनुष्यास एखाद्या गोष्टीचा स्वयंस्फूर्तीनें उपक्रम करितांना आपल्या धोरणावरच पुढें तिची सर्व व्यवस्था व्हावी असें म्हणण्याचा हक्क आहे ही गोष्ट आम्हांस मान्य आहे. पण अशा उद्योगास सार्वजनिक स्वरूप न येतां संकुचित व एकदेशीय व वैयक्तिक स्वरूप येत असतें हें मात्र विसरतां कामा नये. स्त्रियांच्या युनिव्हर्सिटीस असें वैयक्तिक स्वरूप येऊं नये अगर असूं नये असाच प्रोफेसर कर्वे यांच्या सामाजिक परिषदेपुढल्या भाषणाचा रोख आहे; पण आतां प्रसिद्ध झालेली स्त्रियांच्या हिंदी युनिव्हर्सिटीची घटना पाहिली तरी ती या रोखांच्या अगदीं विरुद्ध आहे. अशा प्रकारच्या एकदेशीय घटनेसहि रुचिवैचित्र्यामुळें मदत करणारे कांहीं लोक असतील, नाहीं असें नाहीं; पण सार्वजनिकदृष्ट्या विचार केला तर अनाथ-बालिकाश्रम ही संस्था स्त्रियांच्या युनिव्हर्सिटीची एक शाळा असावी. आश्रमानें सर्व युनिव्हर्सिटीस गवसणी घालण्याचा प्रयत्न करूं नये, युनिव्हर्सिटी अधिक व्यापक व मोकळी ठेवावी, असें आम्हास वाटतें. सामान्य जनसमूहाची मदत व सहानुभूति स्त्रियांच्या या युनिव्हर्सिटीस नको असेल तर गोष्ट निराळी. तसें असेल तर नांव 'हिंदी-युनिव्हर्सिटी' असलें तरी वस्तुत:-हिंगणें युनिव्हर्सिटीच होईल; आणि मग अर्थातच लोकांतली त्याबद्दलची सहानुभूति त्या मानानें मर्यादित राहील. पण स्त्रियांची ही युनिव्हर्सिटी अशी मर्यादित असूं नये अशी आमची मनापासून इच्छा आहे; आणि प्रो० कर्वे यांसहि ती अमान्य असल्याचें दिसत नाहीं. स्त्री-शिक्षण हा विषय मोठा व्यापक आहे आणि हिंदुधर्म व महाराष्ट्र भाषा यांनीं जरी त्याची व्याप्ति मर्यादित केली तरी त्यांतहा अनेक प्रकारच्या आचारांच्या व विचारांच्या लोकांचा समावेश होण्यास पुष्कळ जागा आहे. या लोकांचा समावेश जर या युनिव्हर्सिटींत खरोखरच करावयाचा नसेल तर तसें लोकांस प्रथमच उघड सांगावें हें चांगलें. सध्यां जे नियम प्रसिद्ध झाले आहेत, त्यांत उघडपणें तसें सांगितलेलें नाहीं; पण पोटनियमांच्या

रचनेवरून ही गोष्ट व्यक्त होत आहे. करितां हे नियम एक तर बदलले पाहिजेत किंवा युनिव्हर्सिटी या मोहक नांवाखालीं हिंगण्यांतील अनाथ-बालिकाश्रमाचेंच धोरण आम्हांस पुढें चालवावयाचें आहे ही गोष्ट लोकांपुढें स्पष्ट मांडली पाहिजे. हिंगणें येथील आश्रमाचीच युनिव्हर्सिटी झाली तर त्यांत कोणासहि कांहीं एक वाईट वाटण्यासारखें नाहीं; मग मात्र त्यास महाराष्ट्रांतील स्त्रियांच्या युनिव्हर्सिटींचें व्यापक स्वरूप देणें योग्य होणार नाहीं. तदर्थ निराळेच प्रयत्न करावे लागतील. प्रो० कर्वे यांचें अनाथबालिकाश्रमावरचें ममत्व प्रसिद्ध आहे; पण हें ममत्व क्षणभर बाजूला ठेवून व्यापक दृष्टीनें स्त्रीशिक्षणाच्या संस्था स्थापन करण्याचा त्यांनीं प्रयत्न केल्यास ते हल्लींच्यापेक्षांहि अधिक प्रशंसेस पात्र होतील इतकें सुचवून, आणि वर दाखविलेल्या प्रकारचे दोष लवकर काढून टाकण्याचा ते प्रयत्न करतील अशी आशा प्रदर्शित करून हिंदी स्त्रियांच्या युनिव्हर्सिटीच्या घटनेबद्दलचा हा लेख येथें संपवितों.

---

# ९. पुणें फीमेल ट्रेनिंग कॉलेज

(केसरी, तारीख १३ मे १९१६.)

शिक्षणाच्या सवलती आपल्या इकडे आधींच फार कमी आहेत ही गोष्ट आतां खुद्द सरकारासहि पटून त्या सोयी वाढविण्याचा उपक्रम करणें लोकमतामुळें त्यांना प्राप्त झालें आहे. या नवीन सोयी केव्हां होतील तेव्हां होवोत; पण हल्लीं ज्या थोड्या सोयी आहेत त्याच नाहींशा होऊन उलट त्यांचे जागीं ज्या गैरसोयी होत आहेत त्या दूर करण्याचा प्रयत्न सरकार प्रथम करील तर बरें होईल. विद्याखात्याचें धोरण अरेरावीचें असून होतां होईतों प्रत्येक शिक्षणसंस्थेचें चालकत्व युरोपियन लोकांच्याच हातीं ठेवावें असा त्याचा कटाक्ष प्रसिद्धच आहे. अलीकडे हायस्कूलच्या हेडमास्तरांच्या कांहीं जागांचे पगार वाढविण्यांत आले त्याचा हेतु 'नेटिव्ह' शिक्षकांना जास्ती पगार द्यावा हा नसून जागा मोठ्या करून त्यांवर युरोपियन आणावे हा होता. पण युरोपियन लोक मोठे तालेवार

असल्यामुळें त्यांना या मोठ्या पगाराच्या जागाहि अपुऱ्याच पडतात, आणि अशा रीतीनें युरोपियन शिक्षक न मिळाल्यामुळें त्या जागा शेवटीं नेटिव्हांच्याच गळीं पडतात ही गोष्ट वेगळी. असो; शिक्षणसंस्थांचें चालकत्व विजातीय व विधर्मीय लोकांच्या हातीं देण्याचें धोरण सदोष असलें तरी मुलांच्या शाळासंबंधानें त्याचे अनिष्ट परिणाम तितके भासत नाहींत. पण स्त्रीविद्यार्थ्यांच्या सोयीकरितां काढलेल्या शाळांचें चालकत्व तरी अशांच्या हातीं जाणें अत्यंत अनिष्ट आहे ही गोष्ट सरकारास कल्पनेनें आकलन करतां येण्यासारखी नसेल तर लोकांनीं तरी ती त्यांच्या मनावर ठसविण्याचा प्रयत्न केला पाहिजे. कारण स्त्रीशिक्षणाची बाब अधिक नाजूक असून तिच्यांत जर चालकांच्या अपात्रतेमुळें कृत्रिम भर पडली तर स्त्रीशिक्षणाचा पाय पुढें पडावयाचा त्याऐवजीं मागेंच पडेल. पुणें येथील 'फीमेल ट्रेनिंग कॉलेज'चें जें हल्लीं स्थित्यंतर होऊं घातलें आहे तो प्रकार अशापैकींच असून त्याविषयीं वेळींच गवगवा न होईल तर फार अनिष्ट परिणाम होईल.

पुणें येथील 'फीमेल ट्रेनिंग कॉलेज' ही या इलाख्यांत नेटिव्ह स्त्रियांना शिक्षकिणींचा धंदा शिकविण्याची एवढी एकच शाळा आहे. हें कॉलेज व 'फीमेल हायस्कूल' या दोनहि संस्था आजवर एकाच इमारतींत म्हणजे बुधवार पेठेंतील हुजूरपागेंत असत. पैकीं 'फीमेल हायस्कूल' ही संस्था खासगी सोसायटीच्या ताब्यांत आहे. सरकार जरी सर्व शिक्षक आपल्या खर्चानें हायस्कूलला पुरवितें तरी शाळा स्थापन करण्याच्या वेळीं लोकांनीं पैसे दिले होते हें एक आणि नेटिव्ह स्त्रीविद्यार्थ्यांच्या सोयी गैरसोयी नेटिव्ह लोकांसच अधिक कळूं शकतात–त्यांच्या बोर्डिंग वगैरेवर देखरेख ठेवणें ती नेटिव्ह लोकांच्याच तर्फे ठेविली जाणें अधिक सोयीचें आहे–या दोनहि कारणांकरितां सरकारनें फीमेल हायस्कूलची सर्व व्यवस्था 'फीमेल–एज्युकेशन–सोसायटी'कडे ठेविलेली आहे. फीमेल ट्रेनिंग कॉलेज ही संस्था सर्वस्वी सरकारी खर्चानें स्थापलेली व चालविलेली आहे; ही गोष्ट खरी. तथापि ती हुजूरपागेंतच फीमेल हायस्कूलच्याशेजारीं असून दोनहि शाळांतील विद्यार्थिनींची राहण्याची वगैरे जागा एकच असल्यामुळें, फीमेल ट्रेनिंग कॉलेजची देखरेखहि स्वाभाविकपणें सदर सोसायटीकडेच

सोंपविण्यांत आली होती. पण फीमेल ट्रेनिंग कॉलेजचें चालकत्व हल्लीं एका युरोपियन बाईकडे असल्यामुळें, व त्यांतूनहि या बाईचा स्वभाव कोणतीहि गोष्ट मिळती घेण्याचा नसल्यामुळें, फीमेल ट्रेनिंग कॉलेजला उठवळ आली आहे. सोसायटी व सदर बाई यांच्या दरम्यान मतभेद झाला असतां सोसायटीच्या चालकांचेंच डायरेक्टरसाहेब यांनीं वास्तविक ऐकावयास पाहिजे. कारण सोसायटींत शहरांतील कित्येक सुजाण पुढारी असून त्यांच्या मताला मान देणें अधिक समंजसपणाचें झालें असतें. पण बाई युरोपियन असल्यामुळें तिचा वशिला थेट इन्स्पेक्टर व डायरेक्टर यांजकडे पडला;व सोसायटीलाहि हें मोतीं नाकापेक्षां जड झाल्यामुळें फीमेल ट्रेनिंग कॉलेजची ही पीडा हुजूरपागेबाहेर गेल्यास आपल्याला सुख लागेल असें वाटून सोसायटीनेंहि ट्रेनिंग कॉलेज बाहेर घालविण्यास संमति दिली असावी. पण असें झाल्यानें स्त्रीविद्यार्थिनींची गैरसोय एकंदरीनें किती झाली ही गोष्ट त्यांनीं लक्षांत घेतली असती, तर डायरेक्टर यांजकडे जाऊन त्यांजपुढें आपली तक्रार रीतसर मांडल्याशिवाय सोसायटीनें कॉलेज बाहेर नेण्यास सहसा संमति दिली असती असें आम्हांस वाटत नाहीं. सोसायटीकडे फक्त फीमेल हायस्कूलची देखरेखच कायदेशीरपणें येतें आणि सरकार आपण होऊन ट्रेनिंग कॉलेज बाहेर नेईल तर त्याचा हात सोसायटीस धरतां येणार नाहीं ही गोष्ट आम्हास कबूल आहे. तरी पण फीमेल ट्रेनिंग कॉलेजमधील विद्यार्थिनींचें हिताहित पाहाण्याची जबाबदारी सदर सोसायटीकडेच आहे असें मानण्याची संवय लोकांना आजवर पडलेली असल्यामुळें ते या सोसायटीस, अज्ञानानें कां होईना, पण दोष दिल्याशिवाय राहाणार नाहींत.

फीमेल ट्रेनिंग कॉलेज हें हुजूरपागेंतून बाहेर पडणार एवढेंच नव्हे तर गांवाबाहेर जाणार ही गोष्ट किती गैरसोयीची आहे हें खालील थोड्याशा हकीगतीवरून लक्षांत येईल. फीमेल ट्रे. कॉ.मध्यें जागा नाहीं या सबबीवर अलीकडे विद्यार्थिनी घेण्याचें बंद करण्यांत आलें होतें. तथापि हल्लीं विद्यार्थिनींची वटसंख्या १०२ आहे. यांपैकीं वर्गवारी लावतां ५० विद्यार्थिनी ब्राह्मण, ४० ब्राह्मणेतर मिळून ९० विद्यार्थिनी हिंदु आहेत; बाकीच्या बारापैकीं ४ खिस्ती, ४ज्यू व ४मुसलमान आहेत. दुसऱ्या दृष्टीनें

पाहतां या १०२पैकीं ७५मुली बोर्डिंगांत राहाणाऱ्या व २७ बाहेरून शाळे-च्या वेळेपुरत्या येणाऱ्या आहेत; पण २७ पैकीं २३ मुली हुजूरपागेजवळच्या पेठांतून येणाऱ्या असून ४ मुली रास्ते वगैरे पेठांतून येणाऱ्या आहेत. फीमेल ट्रेनिंग कॉलेजांतील मुलींच्या अभ्यासक्रमांत शिकविण्याचें शिक्षण घेणें हा एक भाग असल्यामुळें फीमेल ट्रेनिंग कॉलेजला जोडून प्रॅक्टिसिंग स्कूलहि असावें लागतें. आजवर हें प्रॅक्टिसिंग स्कूलहि हुजूरपागेंतच असल्यामुळें निदान ७५ मुलींना हुजूरपागा सोडून बाहेर जाण्याचा प्रसंग मुळींच येत नव्हता; व २३ मुली जवळच्या पेठांतल्या असल्यामुळें त्यांना आपल्या पालकांच्या घरीं राहून जवळच्याजवळ शाळेंत जातां येत असे. म्हणजे १०२ मुलींपैकीं ९८ मुलींची सोय चांगल्या रीतीनें होत असे. पण सोसायटीचें व आपलें बनत नाहीं या सबबीवर कॉलेजवरच्या युरो-पियन बाईनें आज कित्येक दिवसांपासून कॉलेज हुजुरपागेंतून हल-विण्याचा एकप्रकारें निश्चय केला होता असें म्हणण्यास हरकत नाहीं. कॉलेज हुजूरपागेंतून बाहेर जावयाचें तर भाडें वगैरेचा खर्च वाढणार. तेव्हां त्याची कोणीकडून तरी तरतूद आहे असें दाखविण्याकरितां, कांहीं दिवसा-पूर्वीं हिंदुस्तानसरकारकडून मिळालेल्या विशेष देणगींतून मुंबईसरकारनें ट्रेनिंग कॉलेजांतलि विद्यार्थीनींकरितां ज्या नवीन ५०स्कॉलरशिपा ठेवल्या होत्या त्यापैकीं अवघ्या २१ खर्ची घालून २९ स्कॉलरशिपा बाई दरवर्षी शिलकी टाकीत आल्या आहेत. या तजविजीनें कॉलेज बाहेर नेण्याचा सर्वच खर्च भागण्यासारखा आहे किंवा काय याची नक्की माहिती आम्हांस नाहीं. तथापि, म्युनिसिपालिटयांच्या मुलींच्या शाळांतून शिक्षकिणी मिळत नाहींत अशी ओरड चोहोंकडे होत असतां,बाईनीं आपण होऊन अधिक स्कॉलर-शिपा मागावयाच्या तें बाजूसच राहून सरकारनें दिलेल्या स्कॉलरशिपांतून त्यांना सेव्हिंग करणें हें अत्यंत गैर होय, एवढें मात्र आम्हास समजतें.बाहेर उठून गेलेल्या ट्रेनिंग स्कॉलजचा खर्च शिलकी स्कॉलरशिपांतून भागो वा न भागो,कॉलेज गांवांतून उठून बाहेर जाणें याच गोष्टीस आमची पहिली मुख्य हरकत आहे; विद्यार्थिनीकरितां ट्रेनिंग कॉलेज आहे, ट्रेनिंग कॉलेजकरितां कांहीं विद्यार्थिनी नाहींत. निदान या युरोपियन बाईकरितां तरी कॉलेज किंवा विद्यार्थिनी यांपैकीं कोणीच नाहीं, तर या दोहोंकरितां बाईला सरकारनें

पगारी नोकरी ठेविली आहे ही जर गोष्ट खरी, तर केवळ बाईच्या सोयी-करितां ट्रेनिंग कॉलेज उठवून बाहेर नेणें व विद्यार्थिनींची गैरसोय करणें हें अत्यंत गैर होय, हें डायरेक्टरसाहेबहि थोड्याशा विचारांती कबूल करतील असें आम्हांस वाटतें.

१०२ पैकीं ९० विद्यार्थिनी हिंदू असून या सर्व तर गांवांत राहणाऱ्या आहेतच; पण उरलेल्या १२ पैकींहि कांहीं गांवांतच राहणाऱ्या आहेत. ट्रेनिंग कॉलेज बाहेर दूर आगाखानाच्या बंगल्यावर नेल्यानें या सर्वांची गैरसोय किती होईल याची कल्पना कोणासहि सहज करितां येईल. १०२ विद्यार्थिनींपैकीं ७५ विद्यार्थिनी खुद्द बोर्डिंगांत राहणाऱ्या आहेत, व कॉलेजाबरोबर बोर्डिंगहि बाहेर जाणार आहे या गोष्टीनें ही गैरसोय यत्किंचितहि कमी होत नाहीं. कारण आई-बापांच्या घरून शाळेंत जाणाऱ्या २७ विद्यार्थिनींना आज जी फार तर १०।१५ मिनिटें शाळेंत जाण्याला लागत असतील त्याऐवजीं यापुढें त्यांना सुमारें पाऊण तास किंवा तासहि लागेल. इतकी मजल रोज चालून जाणें हें मुलींना कष्टाचें आहेच; शिवाय या कष्टांत उन्हाळ्याच्या दिवसांत उन्हाचा व पावसाळ्याच्या दिवसांत पावसाचा त्रास यांची भर पडणार आहे. बाहेर नेलेल्या बोर्डिंगांतील मुलींचे शिकण्याचे कांहीं तास कदाचित् बोर्डिंगच्या जागेंतच जातील. परंतु प्रॅक्टिसिंग स्कूलमध्येंहि त्यांचे कांहीं तास जावयाचे असतात, व हें स्कूल बोर्डिंगच्या बंगाल्यांत जागा नसल्यामुळें रास्त्यांच्या वाड्यांत ठेवणार असल्याचें समजतें! अर्थात् तसें झाल्यास बोर्डिंगांतील ७५ विद्यार्थिनींनाहि रोज २०।२५ मिनिटांच्या रस्त्यावर एक खेप नित्य करावी लागेल. अशा रीतीनें नवीन व्यवस्थेंत दिवसा शाळेपुरत्या जाणाऱ्या व बोर्डिंगमध्यें राहणाऱ्या मिळून सर्वच विद्यार्थिनींच्या मागें रोजची पायपिटी लागणार आहे. सदर युरोपियन बाईला स्वतः तांगा ठेवतां येत असल्यामुळें तिला स्वतःला पायपिटी करावी लागणार नाहीं हें खरें; पण आपल्या विद्यार्थिनींना या पायपिटीचें श्रम किती होतील याची कल्पना जर बाईस करतां येणार नाहीं तर त्या आपल्या जागेस नालायक आहेत; आणि कल्पना होत असूनहि जर त्या नवीन व्यवस्था अमलांत आणीत असतील तर त्या त्याहूनहि अधिक नालायक आहेत असेंच आम्ही म्हणूं.

पण या व्यवस्थेस पायपिटीच्या श्रमापेक्षां दुसराहि एक मोठा आक्षेप आहे, तो हा कीं, पूर्वी बोर्डिंग गांवाच्या मध्यभागीं व घरंदाज लोकांच्या वस्तींत होते, तें यापुढें लष्करांत म्हणजे बकाली वस्तींत जाणार! या १०२ विद्यार्थिनींपैकीं निम्या म्हणजे ५० विद्यार्थिनी ब्राह्मण जातीच्या आहेत याकरितां त्यांच्या दृष्टीनें नवीन व्यवस्थेस जोराची हरकत घेण्याचा आम्हांला हक्क आहेच; पण ४० विद्यार्थिनी ब्राह्मणेतर असल्या तरी हिंदूच आहेत. अर्थात त्यांच्याहि पालकांना त्यांनीं बकाली वस्तींत राहणें आवडेल; किंवा घरंदाज वस्तींत राहणें आवडणार नाहीं असें आम्हांस मुळींच वाटत नाहीं. ख्रिश्चन; ज्यु व मुसलमान मिळून ज्या १२ विद्यार्थिनी उरतात त्यांचें वकीलपत्र घेण्यास आम्हास अधिकार नाहीं असें कोणी म्हटल्यास तें आम्ही मान्य करूं. परंतु बकाली वस्तींत राहणें हें त्यांनाहि प्रिय व हितकर असेल असें आमच्यानें म्हणवत नाहीं. बोर्डिंगच्या इमारतींतील व्यवस्था नव्या इमारतींत कदाचित् जुन्या इमारतींतल्याप्रमाणेंच असणें शक्य आहे. तथापि भरवस्तींत असणाऱ्या शिक्षणसंस्थेवर आसपासच्या समाजाचा जो दाब किंवा जी देखरेख सहजासहजीं राहते तिला नवीन व्यवस्थेंतील बोर्डिंग मुकेल हें निश्चित आहे. लष्करच्या हद्दींत घरंदाज कुटुंबें कांहीं रहात असली तरी ती दुरदुर राहतात. आणि सोल्जर व उडाणटप्पू, बदफैली वगैरे लोकांचा सुळसुळाट गांवापेक्षां लष्करांत अधिक असणार हें डायरेक्टरसाहेबांस नाकबूल करतां यावयाचें नाहीं. शिवाय बोर्डिंगापासून रास्त्यांच्या वाड्यापर्यंत रोज मुलींची जी परेड निघणार तिचें जाहीर प्रदर्शन सर्वथा अनिष्ट आहे. शिकणाऱ्या मुली झाल्या तरी त्यांना थोड्याबहुत पडदपोशीची अपेक्षा नसते असें नाहीं. बोर्डिंगांत राहणाऱ्या मुलींपैकीं बऱ्याच मुली परगांवांहून स्कॉलरशिपा घेऊन येथें राहण्यास आलेल्या असतात; व आजपर्यंत शहरच्या मध्यभागीं हुजूरपागेसारख्या बंदिस्त ठिकाणीं बोर्डिंग असल्यामुळें त्यांना व त्यांच्या दूरगांवच्या पालकांना जो निर्धास्तपणा वाटत असे तो यापुढें वाटणार नाहीं. तात्पर्य, कोणत्याहि दृष्टीनें पाहिलें तरी फीमेल ट्रेनिंग कॉलेजची ही नवी व्यवस्था एका गोऱ्या मास्तरीणबाईखेरीजकरून इतर सर्वांसच अत्यंत गैरसोयीची आहे. एकट्या बाईच्या

हौसेकरितां किंवा तिच्या लाडाकरितां इतक्या मुलींची गैरसोय करणें हा अन्याय होय असें म्हणण्याचा हक्क लोकांना खास आहे. लोकांच्या या दृष्टीनें डायरेक्टरसाहेबांनीं या प्रश्नाकडे पूर्वी पाहिलें आहे कीं नाहीं हें आम्हास माहीत नाहीं. गांवांतील हल्लींची जागा बरीचशी संकुचित आहे म्हणून नवीन व्यवस्था बरी असें कदाचित् त्यांस भासविण्यांत आलें असेल; पण नवीन व्यवस्थेंत; आमच्या माहितीप्रमाणें, बोर्डिंगांतील जागा वाढल्या किंवा स्कॉलरशिपा वाढून पूर्वीपेक्षां अधिक मुलींच्या शिकण्याची सोय करण्यांत आली अशी गोष्ट मुळींच नाहीं; तर केवळ सोसायटी व बाई यांची कुरकूर मिटविण्याच्या पायीं ही सर्वस्वी गैरसोयीची नवी व्यवस्था डायरेक्टरसाहेबांनीं खुशाल मंजूर केलेली असावी. हुजूरपागेंतील जागा संकुचित असली तर सरकारास पुढेंमागें गांवांतच दुसरी एखादी जागा मिळाली असती, किंवा सक्तीनें घेतां आली असती. उलटपक्षीं लष्करांत आज मिळालेला बंगला किंवा उद्यां मिळणारी जागा ही तरी मोफत मिळणार असें थोडेंच आहे! पण इतका सर्व बाजूंनीं विचार करण्याचें डायरेक्टरसाहेबांचें काय अडलें आहे! आम्हास तर हा सर्व जुलमी व बिनमुर्वतखोरपणाचा प्रकार चीड आणण्यासारखा वाटतो; व नवीन व्यवस्थेंत डायरेक्टरसाहेबांनीं लोकांची काय सोय पाहिली याचा जाब जाहीर रीतीनें देणें त्यांना प्राप्त आहे.

---

# १०. नार्थीबाई कन्याशाळेचें संमेलन

( केसरी, ता. २६ एप्रिल १९२३. )

ही शाळा स्थापन होऊन चार वर्षें झालीं. ता. २२ एप्रिल रोजीं दुपारीं साडेचार वाजतां फडतरे यांचे वाड्यांत न. चिं. केळकर यांचे अध्यक्षतेखालीं या शाळेचा बक्षिससमारंभ मुलींचें संमेलन ह्या दोन गोष्टी थाटानें साजऱ्या झाल्या. समारंभास मुलींचे पालक व इतर प्रमुख स्त्री-पुरुष मिळून सुमारें ७०० मंडळी हजर होती. मुलींचीं संभाषणें व गाणीं

झाल्यानंतर शाळेच्या लेडी सुपरिंटेंडेंट श्री० वारुबाई शेवडे यांनीं रिपोर्ट वाचून दाखविला व शाळेची आर्थिक स्थिति जरी सुधारली आहे तरी या शाळेंत मिळणाऱ्या शिक्षणाला सरकारी मान्यता नसल्यामुळें वरच्या वर्गांतून मुली फारच कमी आहेत. लोकांच्या मनांत स्वाभिमानाची ज्योत उत्पन्न झाल्याशिवाय स्त्रियांचे राष्ट्रीय शिक्षणासंबंधीं केले जाणारे प्रयत्न यशस्वी होणार नाहींत. असें सांगितलें. त्यानंतर बक्षिससमारंभ आटोपल्यावर अध्यक्ष न. चिं. केळकर यांचें भाषण झालें. ते म्हणाले:—

प्रो० कर्वे ह्यांची अल्पावधींतील स्त्रीशिक्षणविषयक कामगिरी खरोखरच चिकाटीची व अत्यंत प्रशंसनीय आहे. या ठिकाणीं आज आपण जी शाळा पाहात आहों तें त्यांच्याच परिश्रमाचें फल होय. ही शाळा चिरायु होऊन प्रो० कर्वे यांच्या स्त्रीशिक्षणविषयक कळकळीची साक्ष देत राहील, असा मला पूर्ण भरंवसा आहे.

गेल्या दोनतीन वर्षांत एक नवीन संस्था नवीन दिशेनें चालवून दाखविण्यापलीकडे आम्हांला विशेष कांहीं करून दाखवितां आलें नाहीं असें रिपोर्टांत सांगण्यांत आलें आहे. पण माझ्या मतें हेंच त्यांनीं विशेष करून दाखविलें आहे. या शाळेला सरकारी मान्यता नसल्यामुळें तिच्यांत देण्यांत येणाऱ्या शिक्षणावर लोकांची श्रद्धा बसत नाहीं ही तक्रार खरी आहे. इमारती मोठ्या, शिक्षक मोठ्या पगाराचे, हा थाट असला कीं, शिक्षण शंभर नंबरी झालें असा रूढ समज झालेला दिसतो. मुंबई युनिव्हर्सिटीच्या सीनेटचे सभासद व स्त्रियांच्या युनिव्हर्सिटीच्या सीनेटचे सभासद यांची निःपक्षपातानें तुलना केली तर कोणालाही स्त्रियांच्या युनिव्हर्सिटीला मानच द्यावा लागेल. पण जनतेच्या डोळ्यांवर या बाबतींत भुरळ पडलेली असल्यामुळें मुंबई युनिव्हर्सिटीनें ठरविलेला अभ्यासक्रम कितीही सदोष असला तरी तो चांगलाच असला पाहिजे असा समज अजूनही शिल्लक आहे.

स्त्रियांच्या शिक्षणाच्या बाबतींत इंग्रजीचें फाजील स्तोम माजविणें केव्हांही रास्त होणार नाहीं. आज मुलांच्या बाबतींतहि कांहीं नवीन युनिव्हर्सिटयांनीं शिक्षणाचें व परीक्षेचें माध्यम मातृभाषा हीच कबूल केली आहे. मुंबई युनिव्हर्सिटींत देखील पुढेंमागें ही सुधारणा होईल. आज सुशिक्षित पुरुषांत स्वतःच्या अभ्यासानें व परिश्रमानेंच इंग्रजी वाङ्मयांत

प्राविण्य मिळविलेलीं माणसें सांपडतात. अशा रीतीनें सुशिक्षित स्त्रियांना देखील स्वतःच्या परिश्रमानें प्राविण्य मिळवितां येणार नाहीं कशावरून ? सर्व स्त्रियांना पुरुषांप्रमाणें व पुरुषांबरोबरच शिक्षण देण्याचा आग्रह धरल्यामुळें स्त्री-शिक्षणाचा सार्वत्रिक प्रसार होणें शक्य दिसत नाहीं.

कन्याशाळेच्या पूर्वींच्या रिपोर्टांत फीमेल हायस्कुलांत शिकणाऱ्या मुलींना कन्याशाळेंत आणण्याचा प्रयत्न केला जात नाहीं असें म्हटलें आहे. पण माझ्या मतें नवीन दिशेनें सुरू केलेल्या स्त्रीशिक्षणाच्या अभिमानी मंडळींनीं पुण्यांतील पालकांचीं मनें वळवून सरकारी हायस्कुलांतील मुलींना कन्याशाळेंत आणण्याचा प्रयत्न केल्यास त्यांत मला मुळींच वावगें वाटणार नाहीं. आपल्या स्वाभिमानास व प्रामाणिक मतास जीं तत्त्वें पटतात त्यांचा प्रसार अवश्य केला पाहिजे. पुणें शहरांत इंग्रजी उच्च शिक्षण देणाऱ्या अशा दोनच शाळा आहेत व हें शिक्षण घेणाऱ्या मुलींची संख्या नियमित आहे. ही स्थिति वाळूच्या घड्याळाप्रमाणें आहे. आणि यामुळें एका भांड्यांत वाळू कमी होऊन ती दुसऱ्या भांड्यांत खात्रीनें वाढली तर त्याबद्दल कोणी विषाद बाळगण्याचें कारण नाहीं. नाटकांत जशीं मुलें पळवून नेतात तसें एका शाळेंतील मुली दुसऱ्या शाळेंत नेण्याचे प्रयत्न केले जात नाहींत. असें आहे तर याविषयीं कोणालाहि वाईट वाटण्याचें कारण काय ? फीमेल हायस्कुलांत दिल्या जाणाऱ्या शिक्षणासंबंधीं व तेथील बकाली (कॉस्मापालिटन) स्त्रीशिक्षकासंबंधीं अनेक तक्रारी ऐकूं येत होत्या व अजूनहि मधून मधून ऐकूं येतात. पूर्वीं गांवांत दुसरी शाळाच नसल्यामुळें ह्या गोष्टी अपरिहार्य म्हणून सहन कराव्या लागत. पण सध्यां या नवीन निघालेल्या शाळेनें ही स्थिति पूर्णपणें पालटलेली आहे. आमच्या समाजांतील मुलींपुढें आमच्या परंपरेस शोभतील व आमच्या चालीरीतींचा ज्यांना अभिमान असेल अशाच स्त्री-शिक्षकिणींचीं उदाहरणें पाहिजेत व अशा उदाहरणांमुळेंच आमच्या मुलींना वळण लागेल. स्त्रीशिक्षणास जुन्या लोकमताचा असलेला विरोध दूर करण्यांत मागील दोन तपें गेलीं. ह्याच्या पुढील कार्य म्हणजे देशकालवर्तमान याचा विचार करून स्त्रियांच्या प्रचलित शिक्षणपद्धतींत फरक करणें व त्या शिक्षणावर लोकमताचें नियंत्रण ठेवणें हें होय. त्या तत्त्वाचाच शेवटीं विजय होणार याबद्दल मला पूर्ण खात्री

आहे. सध्यां आपल्या स्त्रियांना मुंबई युनिव्हर्सिटीच्या पदव्या जितक्या अभिमानास्पद वाटतात तितक्या हिंगण्याच्या युनिव्हर्सिटीच्या पदव्या अभिमानास्पद वाटत नाहींत, ही गोष्ट आपल्यामध्यें स्वाभिमान कमी झाला आहे ह्याचीच द्योतक होय.

यानंतर प्रो० कर्वे ह्यांनीं केळकर यांचे शेवटीं आभार मानतांना केळकर यांनीं आपल्या कन्येचें मुद्दाम स्त्रियांच्या युनिव्हर्सिटीचाच अभ्यास करण्या-संबंधीं मन वळविलें व आपला राष्ट्रीय शिक्षणाविषयीं आदर व्यवहारांत आणून दाखविला म्हणून त्यांचा गौरवपर उल्लेख केला. शेवटीं हारतुरे पानसुपारी झाल्यावर राष्ट्रगीत म्हणण्यांत येऊन समारंभ पुरा झाला.

---

## ११. खोडसाळ टीकेस उत्तर

(केसरी, ता. ४ मे १९२३.)

पुणें येथील कन्याशाळेच्या वार्षिक समारंभासंबंधानें 'ज्ञानप्रकाश'कारांनीं ता. २७ एप्रिल व ता. १ मेच्या अंकांत जी हलकटपणाची व्यक्ति-विषयक टीका केली आहे, तिजवरून 'ज्ञानप्रकाश'कारांचा सहजच मत्सर व्यक्त होतो. पुणें शहरांतील समारंभांना अध्यक्ष नेमण्याची पात्रता स्वतः ज्ञानप्रकाशकार अगर त्यांच्या कंपूंतले इष्टमित्र यांच्या अंगीं नसल्यास, त्यांना बेकारपणामुळें लाभलेली अखंड फुरसत तरी काय उपयोगी पडणार ! एखाद्या गाढवाला देखील आपणाला कोणी कोतवाली घोडा म्हणून सजवील का, अशी आकांक्षा मनांतून उत्पन्न होत असेल, पण तिचा काय उपयोग ? ण्यांत कोणीं कोणत्या प्रसंगीं कोण अध्यक्ष नेमावे याचाहि उपदेश लोकांना ज्ञानप्रकाशकार करूं लागलेले पाहून मत्सरानें त्यांचा मेंदू बिघडला, याविषयीं कोणासहि शंका उरणार नाहीं. मात्र स्वतः केळकरांनाच ज्ञान-प्रकाशकारांची कींव येऊन, चार ठिकाणीं अध्यक्षस्थान स्वीकारण्याची विनंति झाली असतां प्रकाशकारांच्या मत्सराची आग पेटते म्हणूनच मी तें स्वीकारीत नाहीं, असें त्यांनीं जाहीर केल्यास बिघाडलेल्या प्रकाशकारांच्या

मेंदूला किंचित् विश्रांति मिळण्याचा संभव आहे. केळकरांना निमंत्रणें करणारांनींहि ही गोष्ट लक्षांत ठेवून कांहीं प्रसंगीं गय खाल्ली तर ज्ञानप्रकाशकारांवर ती दयाच होईल; पहावें, ज्ञानप्रकाशकारांच्या या दोन लेखांतील करुणालापाचा कांहीं तरी उपयोग होतो का !

येथील हुजूरपागेंतील शिक्षण असावें तितकें लोकसंमत नाहीं, व त्याला कॉस्मॉपॉलिटन म्हणजे बकाली स्वरूप आहे, अशीं विधानें केळकर यांनीं कन्याशाळेच्या बक्षिससमारंभाचे दिवशीं अध्यक्ष या नात्यानें केलीं. म्हणून ज्ञानप्रकाशकारांनीं केळकरांवर आग पाखडली आहे. या बाबतींत केळकरांच्या भाषणाचा रोख विद्यमान स्थितीपेक्षांहि फीमेल हायस्कूलच्या पूर्व इतिहासावर विशेष होता ही गोष्ट खुद्द ज्ञानप्रकाशांतच केळकरांच्या भाषणाचा जो रिपोर्ट आला आहे त्यावरून उघड दिसून येणारी आहे. हायस्कूलच्या व्यवस्थेसंबंधाचा वाद नवा नसून तीसपस्तीस वर्षांपासूनच तो चालत आलेला आहे. नांवाला सेक्रेटरी म्हणून पुण्यांतील कोणी कोणी खासगी गृहस्थ या संस्थेचे ऋणानुबंदी वेळोवेळीं असले तरी, मुख्य अध्यापिकाबाई या कोणी खास युरोपियन किंवा तत्सम किंवा तद्भव असतात, व त्यांच्या देखरेखीखालीं चालणारें शिक्षण हिंदुधर्मांच्या दृष्टीनें बकाली स्वरूपाचें असावें यांत आश्चर्य नाहीं. कोणीहि मुख्याध्यापक झाला तरी तो आपणाला प्रिय अशा संस्कृतीचेंच घोडें पुढें दामटणार, पण उलट लोकांचेंहि पाहणें असेंच असणार कीं, स्त्रीशिक्षणाला झालें तरी राष्ट्रीय म्हणून कांहीं दिशा आहे, व या दिशेनें आंखलें गेलेलें शिक्षण इतर शिक्षणापेक्षां अधिक चांगलें. खुद्द मुंबई युनिव्हर्सिटींतील शिक्षण घेतलें तरी त्यांतहि हा बकालीपणा दिसून येतो. परकी भाषेला फाजील महत्त्व व विदेशी संस्कृतीच्या ध्येयाचा जुलूम या गोष्टींनीं मुंबई युनिव्हर्सिटीचें शिक्षण पूर्वीं तर दूषित होतेंच; पण अद्यापिहि तें पुष्कळ तसेंच आहे. न्या. रानडे, कै० मोडक प्रभृतींपासून परवां प्रो० हरिभाऊ लिमयांपर्यंत मातृभाषेच्या प्रगतीच्या प्रयत्नास मुंबई युनिव्हर्सिटीच्या सेनेटमध्यें जो अडथळा झाला त्याचें कारण सेनेटमधील बकालीपणा हें तर आहेच, पण शिवाय त्याच्या जोडीला युनिव्हर्सिटीची शेंडी मुंबईसरकारच्या हातीं

असणें हेंहि एक कारण आहे. अशा परतंत्र व बकाली युनिव्हर्सिटीच्या परीक्षांना मुली तयार करण्याचें काम हुजूरपागेंतील शाळा करते. म्हणून निदान ज्या अंशानें मुंबई युनिव्हर्सिटी लोकमतानुवर्ती नाहीं. त्याच अंशानें हुजूरपागेंतील शाळाहि लोकमतानुवर्ती नाहीं हें म्हणावयास चोरी कसली ! शिवाय स्त्रियांकरितां म्हणून काहीं वेगळ्या प्रकारचें शिक्षण असावें ही गोष्ट मुंबई युनिव्हर्सिटीच्या डोक्यांतहि अद्यापि येत नाहीं.

मौज ही कीं, खुद्द विलायतेंत स्त्रीशिक्षणाचा इतका प्रसार असतां तेथें देखील शाळांतून स्त्रिया व पुरुष यांचें शिक्षण एकत्र होऊं नये व उभयतांचा अभ्यासक्रमहि वेगवेगळा असावा ही गोष्ट मान्य होऊन चुकलेली आहे. केवळ सरकारी नंबरी विटांशिवाय स्त्रीशिक्षणाची इमारत इतर कशानेंहि बांधली जाऊं नये हेंच मत खरें व सर्वमान्य असतें तर, एका इंग्लड–स्कॉटलंडांत स्त्रीशिक्षणाची अठरा वेगवेगळीं युनिव्हर्सिटीवजा कॉलेजें, वेगळ्या पदव्या, वेगळे डिप्लोमे, वेगळीं सर्टिफिकिटें अमलांत आलीं नसतीं. पण आमच्या इकडे पाहावें तों विलायतेवरहि:ताण ! आमच्यापैकीं कांहीं स्त्रीशिक्षणेच्छु लोकांना पाहावें तों स्त्रीविद्यार्थ्यांना अगदीं शंभर नंबरी इंग्रजी भाषा आली पाहिजे, त्याशिवाय चालत नाहीं. आणि जीं पुस्तकें, जो अभ्यासक्रम, पुरुषांना तोच स्त्रियांनाहि लागू करावा असा त्यांचा आग्रह असतो. कां तर त्यांत यत्किंचित् फेरबदल केला तर स्त्रियांना कमीपणा देऊन त्यांचा उपमर्द केल्याचा गुन्हा घडेल! पुण्यांतील लोक अद्यापि आपल्या मुली हुजूरपागेंतील शाळेंत पाठवितात, एवढ्यावरून तेथील शिस्त व शिक्षण पूर्णपणें लोकसंमत आहे, त्यांत सुधारण्यास जागा नाहीं असें त्याच्या कोणा कट्ट्या भगतास म्हणावयाचें असेल तर त्यानें खुशाल म्हणावें; पण राष्ट्रीय शिक्षणाच्या एका विशिष्ट नमुन्यावर रचलेल्या, हिंगणें युनिव्हर्सिटीला जोडलेल्या, कन्याशाळेच्या समारंभप्रसंगीं त्या संस्थेतील विद्यार्थिनींची संख्या वाढवावी, व ही वाढ होण्याला हुजूरपागेंतील विद्यार्थिनींची संख्या कमी व्हावी लागली तरी त्यांत विषाद मानण्याचें कारण नाहीं, असले उद्गार कोणीं काढल्यास त्यानें औचित्याचा भंग न होतां औचित्यांत भरच पडली, असें कोणासहि म्हणावें लागेल. मग मत्सरानें वेडावलेले ज्ञानप्रकाशकार कांहींहि म्हणोत.

याच समारंभांत बोलतांना केळकरांनीं सर विठ्ठलदास ठाकरसी यांची टवाळी केली असा एक आरोप ज्ञानप्रकाशकारांनीं केला आहे. परंतु तो सर्वस्वी खोटा व द्वेषमूलक आहे. केळकर यांनीं इतकेंच दर्शविलें होतें कीं, ठाकरसी यांनीं भारतमहिला—विद्यापीठाला पंधरा लाख रुपयांची देणगी देऊं करतांना अशी एक अट घातली आहे कीं, सदर विद्यापीठानें स्वतःचे निराळे पंधरा लक्ष रुपये तरी जमवावे किंवा विद्यापीठाला सरकाराकडून मान्यता तरी मिळवावी, म्हणजे पंधरा लाखांवरचें नुसतें व्याज देत न बसतां ऐनजिनसी देणगीचे पंधरा लाख रुपये आपण विद्यापीठाच्या स्वाधीन एकदमच करूं. यावरून सरकारच्या मान्यतेच्या एका नुसत्या शब्दाला आज पंधरा लाख रुपयांची किंमत आहे असें समीकरण सिद्ध होत नाहीं काय ? व तीच नक्की गोष्ट, सरकारी मान्यतेच्या जुलमाविषयीं तक्रार करतांना, मुद्याची म्हणून केळकरांनीं सांगितली, यांत ठाकरसी यांच्याविषयीं अवमान्यतेचा ध्वनि देखील नाहीं. पण केळकरांना कोणीकडून तरी नांवें ठेवण्याच्या भरांत ज्ञानप्रकाशकारांच्या डोळ्यांना हें कसें दिसावें ? खुद्द ठाकरसी यांनाहि सरकारी मान्यतेचा उपयोग दिसत असला तरी हुजूरपागेंतील शिक्षण व भारत महिला-विद्यापीठांतील शिक्षण यांपैकीं त्यांना मनांतून कोणतें अधिक मान्य होतें, हें त्यांच्या देणगीवरुनच सिद्ध होतें. पण एक वेळ ठाकरसीसारखा गुजराथी गृहस्थ महिलाविद्यापीठाच्या सेनेट सभेवर विश्वास टाकील, पण मुंबई युनिव्हर्सिटीच्या व सरकारी मान्यतेच्या मोहास बळी पडणारे आमचे कित्येक महाराष्ट्रीयच या राष्ट्रीय स्त्रीशिक्षणाला नाराज होतात हें दुर्भाग्य होय. लोकमताच्या गोष्टी केळकरांनीं कशाला बोलाव्या अशीहि एक खोंच ज्ञानप्रकाशकारांनीं मारली आहे. पण त्यांनीं हें ध्यानांत ठेवावें कीं, लोकमताशीं एकदोन बाबतींत केळकरांना आज झगडावें लागत असलें तरी ते पायावर खडे उभे आहेत, व एकदोन बाबतींत प्रतिकूल असलेलें लोकमत फिरून खेंचून आपल्याकडे आणूं अशी त्यांना उमेद आहे. बिचारे ज्ञानप्रकाशकार व तत्पक्षीय मवाळ यांची व लोकमताची फारकत कधींच होऊन त्यांना हल्लींच्या मार्गानें डोकें वर काढण्याचा मुळींच संभव नाहीं !

---

# १२. प्रो० कर्वे व राष्ट्रीय स्त्रीशिक्षण

( केसरी, तारीख २१ एप्रिल १९२४)

तारीख १८ एप्रिल रोजीं हिंगणें-आश्रमातर्फे प्रो० कर्वे यांचा वाढदिवस साजरा करण्यांत आला. मुख्य वक्ते प्रो० वामनराव जोशी यांचें भाषण झाल्यावर न. चिं. केळकर यांस बोलण्यास विनंति करण्यांत आल्यावरून ते म्हणाले, " प्रो० कर्वे हे संस्थेंतील लहान मुलींचे आजोबा होत. त्यांना आजोबांचा वाढदिवस ही बहुधा न ऐकलेली गंमत अशी वाटेल. पण आपले आजोबा आपल्या भावी शिक्षणाकरितां किती खटपट करीत असत हें त्यांना थोरपणीं समजूं लागल्यावर लहानपणीं पाहिलेल्या या वाढदिवसाची किंमत कळून येईल. प्रौढ स्त्रियांना तर कर्वे यांच्या कामगिरीचें महत्त्व सांगावयास नको व लहान गोष्टींना मोठ्यांची उपमा देऊन जर त्यांच्यापैकीं कोणी असें म्हणतील कीं, कर्वे यांनीं स्त्रीशिक्षणाच्या बाबतींत नवीन राज्य स्थापलें तर तें अयथार्थ होणार नाहीं.

नवीन राज्य स्थापण्याला प्रथम जुन्या राज्याची सत्ता नष्ट करावी लागते. स्त्रीशिक्षणाच्या बाबतींत महाराष्ट्रांतील जुन्या मताचे किंवा दूषित पूर्वग्रहांचें स्वामित्व नष्ट करण्यास कर्वे हे प्रामुख्यानें कारणीभूत आहेत. तीस वर्षांपूर्वी महाराष्ट्रांत स्त्रीशिक्षणाविषयीं लोकमत काय होतें व तें आज काय आहे हें पहाणारास लाक्षणिक अर्थानें कर्व्यांनीं एक नवें राज्य स्थापलें हे म्हणणें पटल्याशिवाय राहावयाचें नाहीं. विष्णुशास्त्री हे स्वतःकडे स्वराज्यसंस्थापक शिवाजीची उपमा मराठी भाषेच्या बाबतींत घेत होते. ती जितकी खरी तितकीच स्त्रीशिक्षणाच्या बाबतींत कर्व्यांनीं नवें राज्य स्थापलें ही उपमा खरी ठरेल. स्वराज्य स्थापणें म्हणजे प्रथम—सत्तेच्या क्षेत्रांत क्रांति घडवून आणून तेथें नवी सत्ता व नवी परंपरा स्थापित करणें. नवीन राज्य स्थापणें म्हणजे द्रव्यनिधि, क्षेत्रमर्यादा, अधिकारी मंडळ, कारभाराची व्यवस्था वगैरे गोष्टी निर्माण कराव्या लागतात. कर्वे यांनीं शहरापासून पांच मैलांवर लहानशा झोंपडींत विधवा—साहाय्यक—आश्रम निर्माण केला. त्याची आतां इंडियन वुइमेन्स युनिव्हर्सिटी बनून अनेक एकर जमीन,

लाखो रुपयांच्या इमारती, प्राथमिकापासून पदवीग्रहणापर्यंत आंखीव शिक्षणक्रम, लोकनियुक्त सल्लागार मंडळ, नियमबद्ध परीक्षा, योग्य अधिकारी मंडळ व स्वतःप्रमाण पदव्या निर्माण केल्या आहेत. या सर्वांचा फायदा घ्यावा तितका लोक घेत नसतील तर तो कर्व्यांचा दोष नव्हे. मागणीनंतर पुरवठा हा अर्थशास्त्रांतील सिद्धान्त बदलून टाकून मागणीच्या आधीं पुरवठा सिद्ध केला. राष्ट्रीय शिक्षणाची अशी सर्वांगीण सिद्धता म्हणजे स्त्रियांकरितां वेगळें शिक्षण, वेगळी योजना, मराठी भाषेचा शिक्षणांत सार्वत्रिक उपयोग वगैरे गोष्टी असतांना केवळ सरकारी मान्यता नाहीं म्हणून पुरुषांच्या कॉलेजांत पुरुषी-शिक्षण घेण्याला लोक आपल्या मुली अद्यापि पाठवितात ! हा कर्व्यांच्या कर्तृत्वाला कमीपणा नसून लोकांच्या सरकारविषयक परवशतेचा तो पुरावा आहे. हल्लीं सर्व गोष्टींत प्रगति असल्यानें महिलाविद्यापीठाच्या चालकांनीं कांहीं दिवस नेट धरल्यास पुढेंमागें सरकार आपण होऊन या संस्थेला मान्यता देईल. जेथें रशियन सोव्हिएटला मान्यता मिळते तेथें असल्या शिक्षण विषयक प्रश्नास कालांतरानें मान्यता मिळेल यांत काय संशय! सालिना साठ-पाऊणशें हजार रुपयांचें उत्पन्न, भरपूर इमारती, योग्य शिक्षकवर्ग व श्रेष्ठ पदवीदानापर्यंत शिक्षणाची सोय इतक्या गोष्टी असतांहि हें विद्यापीठ अजून लोकांच्या डोळ्यांत भरत नाहीं म्हणतात. आपण दुसऱ्याच्या डोळ्यांत न खुपण्याची खबरदारी कर्वे घेऊं शकतील, परंतु त्यांची कामगिरी दुसऱ्यांच्या डोळ्यांत भरत नसली तर त्यांनीं तरी काय करावें ! ती भरण्याला लोकमताचें अंजन पाहणाराचे डोळ्यांत वरचेवर घातलें पाहिजे. महिला विद्यापीठ किंवा टिळक-विद्यापीठ अशा राष्ट्रीय शिक्षणाच्या संस्थांना सरकारकडून मान्यता मिळण्यास खुद्द सरकार हें अधिक लोकतंत्र झालें पाहिजे. आम्ही कौन्सिलांत झगडतों तें याच हेतूनें. उपयुक्त लोकमतानुवर्ती संस्थांना सरकारी मान्यता व सरकारी करांचा पैसा यांचा लाभ होणें हा स्वराज्याच्या चळवळींतील एक अंगभूत हेतु असतो. या दृष्टीनें आमची कौन्सिलांतील चळवळ ही आज कोणीं विध्वंसक म्हटली तरी राष्ट्रीय शिक्षणाचे विधायक म्हणविले जाणारे जे प्रयत्न सुरू आहेत त्यांना ती उपकारकच होईल. परवां दिल्लीस दिल्ली युनिव्हर्सिटीचें कॉन्व्होकेशन मीं पाहिलें. तेथें मुळांत कांहीं एक नसून केवळ दिल्ली—

सरकारच्या दिमाखाचें हेंहि अंग सजावें म्हणून त्याला शेणामेणाचे अवयव लिंपण्याचा प्रयत्न सुरू असल्याचा हास्यास्पद देखावा दिसला ! मुळांत जेथें कांहीं नाहीं, तेथें सरकारी मान्यता, व स्वावलंबनानें जेथें इतकी सिद्धता त्याला मान्यता नाहीं असलें थेर यापुढें न चालू देणें हा स्वराज्याच्या चळवळीचा या पुढील क्रम आहे. बनारस हिंदु युनिव्हर्सिटीचे पंडित मालवीय यांचें कार्य ज्या महत्त्वाचें त्याच महत्त्वाचें कार्य व्यक्तिशः कर्वे यांचेंहि होय. पण सरकारी कायदा व सरकारी देणगी यांच्यामुळेंच तेथें शेंकडों विद्यार्थी बी. ए. च्या वर्गात आणि येथें यंदा एकहि मुलगी नाहीं असा फरक दृष्टीस पडतो. पण अखेर असला फरक काढून टाकणें हेंच राष्ट्रीय शिक्षणाच्या प्रयत्नाचें खरें यश होय. ”

---

# १३. जुन्या विद्यापीठांची आरती !

(केसरी, तारीख २३ फेब्रुवारी, १९०४)

गेल्याचे मागील शनिवारीं कलकत्ता येथील वार्षिक पदवीदानसमारंभाच्या वेळीं लॉर्ड कर्झन यांनीं हल्लींच्या विद्यापीठांची आरती केली ! आजपर्यंत कधीं कोणास न मिळालेला, म्हणजे विद्यापीठाचे चॉन्सलर किंवा अध्यक्ष या नात्यानें एकसारखीं सहा वर्षेपर्यंत नवीन पदवीधर लोकांस उद्देशून भाषण करण्याचा मान लॉर्ड कर्झन यांस मिळाला, तेव्हां अशा चिरपरिचित संस्थेसंबंधानें त्यांच्या मनांत कृतज्ञता व सहानुभूति वसत असावी अशी कल्पना करणें स्वाभाविक होतें. परंतु वस्तुतः तसा प्रकार मुळींच नाहीं. गेली पांच वर्षें लॉर्ड कर्झन यांनीं कलकत्ता येथील व इतर विद्यापीठांचा पाडाव कोणच्या रीतीनें होईल, त्यांस थोडेंबहुत असलेलेंहि स्वातंत्र्य नष्ट होऊन तीं सरकारच्या खात्यांपैकींच खातीं कशीं होऊन राहतील, याच गोष्टीचा विचार करण्यांत घालवून अखेरीस त्यांनीं आपला कारस्थानी हेतु यंदा सफलतेस नेला म्हणण्यास हरकत नाहीं. या हेतूसिद्धीस त्यांना थोडींथोडकीं कुलंगडीं करावीं लागलीं नाहींत. परंतु आपल्या दीर्घनिश्चयी स्वभावाप्रमाणें त्यांनीं आपला हट्ट पुरविला व एखाद्या

चक्रवर्ती शककर्त्या राजास शोभेल अशा दिमाखानें "हिंदुस्थानांतील उच्च शिक्षणाचा जुन्या मनुचा अवतार आज समाप्त झाला व त्याच्या ठिकाणीं लवकरच नव्या मनूचा अवतार सुरू होणार ! अशी द्वाही त्यांनीं आपल्या भाषणानें फिरविली. "हें मन्वंतर, ही क्रांति घडवून आणण्याच्या कामीं आम्ही उच्च शिक्षणाचा घात केला असा आम्हांवर जो लोकापवाद आहे तो व्यर्थ होय; उलट मृतसंजीवनी वीर्यवल्लीच्या रसचिंतनानें विद्यापीठें व त्यांत शिक्षण पावणारे तरुण लोक यांजमध्यें आम्हीं नवीन आयुष्य घालून त्यांस सतेज व सत्त्वसंपन्न केलें, यास्तव आम्हांस शिरच्छेद करणाऱ्या चांडाळाची उपमा न देतां दिव्य अश्विनीकुमारांचीच उपमा दिली पाहिजे असा लॉर्ड कर्झन यांनीं हक्क सांगितला. आज चाळीस वर्षें अस्तित्वांत असणाऱ्या या विद्यापीठांनीं विद्यार्थ्यांस केवळ परीक्षार्थी बनविलें, त्यांच्याकडून त्यांस खरें शिक्षण असें मिळालें नाहीं, मात्र खऱ्या शिक्षणाची त्यांनीं लालसा उत्पन्न केली व ही लालसा पूर्ण करण्याकरितांच युनिव्हर्सिटी बिलाचा अवतार असून त्याचा अंमल झाल्याबरोबर सर्व कांहीं जुनें व वाईट तेवढें जाऊन ( घटोत्कचाच्या मायावी बाजाराप्रमाणें?) त्याच्या जागीं नवें व चांगलें येऊन बसणार ! या घडामोडीस लोकपक्षानें अनुकूल व्हावें म्हणून आम्हीं आपली शिकस्त करून पाहिली, परंतु लोक आपला हेका सोडीनात तेव्हां निरुपायास्तव आम्हांस आमच्या धोरणाप्रमाणें चालून लोक नको नको म्हणत असतां, हें अमृतमय औषध त्यांच्या तोंडांत बोंडल्यानें आम्हांला घालावें लागत आहे. हिंदुस्थानांतील विद्यापीठें विलायतेंतील विद्यापीठांसारखीं होण्यास लागणारीं सर्व साधनें इकडे नाहींत; परंतु या कामीं लागणारें मुख्य द्रव्य म्हणजे सुबुद्ध व तरुण विद्यार्थीगण तो हिंदुस्थानांत आहे. देशाच्या तरुण पिढीनें देशाचा बचाव करणें हें तर पवित्र कृत्य आहेच; परंतु खुद्द तरुण पिढीचाच बचाव करणें हें त्याहूनहि अधिक पवित्र आहे; व तें करण्याचा युनिव्हर्सिटी बिलाच्या योगानें आम्हीं उपक्रम केला आहे. अज्ञान हेंच असंतोषाचें मूळ होय, जितकें शिक्षण अधिक अस्सल तितकी राजनिष्ठा अधिक चोख अशी सरकारची व इंग्रज लोकांची खातरी असल्यानें ते या कामीं कंबर बांधून नेटिव लोकांस मदत करण्यास तयार झाले आहेत." इत्यादि मुख्य मुद्दे लॉर्ड कर्झन यांच्या

भाषणांत होते. या सर्व मुद्यांचें खंडन करीत बसण्यांत कांहीं हंशील नाहीं; फक्त इतकेंच सांगितलें असतां पुरें होईल कीं, बोलणाराच्या तोंडास हात कोणीं लावावा, अशी एक म्हण आहे ! व प्रस्तुत प्रसंगीं बोलणारा हा सर्वाधिकारसंपन्न व मनस्वी असल्यामुळें त्याच्या तोंडास हात लावणें तर अशक्यच होय. परंतु अधिकार हीच काय ती शहाणपणाची खूण असें जों-पर्यंत कोणी मानीत नाहीं; स्वार्थसाधु लोक वाग्जाल पसरण्यांत कसे प्रवीण असतात, आणि शिक्षण व विशेषतः वक्तृत्वकला यांची मदत स्वार्थसाधु मनुष्यास मिळाली असतां तो तें वाग्जाल किती विस्तृत, तलम व सफाई-दार बनवूं शकतो याचा जोंपर्यंत लोकांस अनुभव आहे; लॉर्ड कर्झन यांच्यांमध्यें आंवाक्यापेक्षां उपक्रम व खाण्यापेक्षां मचमच किती अधिक असते हें जोंपर्यंत लोक जाणून आहेत; तोंपर्यंत त्यांच्या ह्या वाग्जालांत कोणीहि बंधन पावेल अशी भीति बाळगावयास नको. लाटसाहेबांनीं आपण उच्च शिक्षणाचे व हिंदुस्थानच्या तरुण पिढीचे मित्र असें भास-विण्याचा कितीहि प्रयत्न केला तरी एके पक्षीं हें मिष्ठास भाषण आणि दुसरे पक्षीं युनिव्हर्सिटी बिल व मि० टाटा यांची उदार देणगी विफल करण्यास कारणीभूत झालेली त्यांची राजनीति, हीं ध्यानांत आणिलीं असतां वृद्ध चाणक्याच्या

" परोक्षे कार्यहंतारं प्रत्यक्षे प्रियवादिनं ।
वर्जयेत् तादृशं मित्रं विषकुंभं पयोमुखम् " ।

या वचनाची आठवण झाल्याशिवाय राहणार नाहीं.

बरें, हा जो नवा मनु प्रवर्तित केल्याचें श्रेय लॉर्ड कर्झनसाहेब मागतात त्यांत व पूर्वीच्या मनूंत फरक तरी असा कोणता पडला आहे कीं, ज्याबद्दल साहेबबहादुरांनीं आपली आपण टिमकी वाजवावी ! जुन्या विद्यापीठावर जे मुख्य आक्षेप आणिले जातात ते येणेंप्रमाणें:— १ या विद्यापीठांतून शिकविण्याची वगैरे सोय केलेली नाहीं व त्याचें काम केवळ परीक्षा घेण्याचें असल्यामुळें विद्यार्थी हे निवळ परीक्षार्थी बनतात. २ विलायतेंतील विद्या-पीठाप्रमाणें इकडे कॉलेजांतील मुलांस राहण्याच्या सोई, मोठमोठीं पुस्तकालयें, रसायनशाळा व विद्यारुचि उत्पन्न करून लालसा शमविणारी

अन्य साधनसामुग्री नसते. ३ विद्यार्थ्यांस आपापल्या संस्थांचा व संस्थांच्या परंपरेचा किंवा सांप्रदायाचा वाटावा तितका अभिमान वाटत नाहीं. ४ त्यांच्या आंगीं विद्याव्यासंगप्रियता, स्वावलंबन, सत्यप्रीति व स्वातंत्र्यप्रीति, कर्तव्यतत्परता, इत्यादि गुण येत नाहींत. इ. इ. आणि वरील सर्व दोष ज्यांत समूळ नाहींसे होणार असें मन्वंतर या बिलानें आपण प्रवर्तिक करीत आहों असें लॉर्ड कर्झन यांचें म्हणणें आहे. परंतु या दोन गोष्टींचा मेळ कसा पडतो या दृष्टीनें पाहाणारास या बिलामध्यें तसें कांहीं सांपडेल असें आम्हांस वाटत नाहीं. कारण सिलेक्ट कमिटीनें जो मसुदा तयार करून कौन्सिलापुढें मांडला आहे, व जो बहुधा आणखी एक महिन्यानें आहे असाच कौन्सिलांत पास होणार, त्या मसुद्यांत ग्रथित झालेल्या एकंदर कलमांचा सारांश थोडक्यांत खालीं दिल्याप्रमाणें आहे.

विद्यापीठांची आजपर्यंतची रचना होती तींत फेरफार केला आहे तो असा कीं, पूर्वीच्या सेनेट ( मुख्य ) सभेंतील सभासदांची संख्या कमी करून हल्लीं असें ठरविण्यांत आलें आहे कीं, मुंबई,कलकत्ता व मद्रास येथील विद्यापीठांत या सभेच्या सभासदांची संख्या फक्त शंभरपर्यंत व इतर विद्यापीठांत ही संख्या पाउणशेंपर्यंत असावी. या संख्येपैकीं फक्त दहा सभासद पदवीधरांनीं निवडावे, सुमारें दहा सभासद कांहीं विवक्षित अधिकारांवर असलेले लोक असावेत; व बाकीचे चान्सलर म्हणजे स्थानपरत्वें गव्हर्नर जनरल किंवा गव्हर्नर यांनीं नेमावे. विद्यापीठांतील धाकटी म्हणजे कार्यकारी सभा असते तींत विद्याखात्याच्या मुख्य अधिकाऱ्यास कायमचें स्थान असावें. व्हाईस चान्सलर हा चेअरमन असावा; व गव्हर्नरसाहेब फर्मावतील त्याप्रमाणानें परंतु निमेहून कमी नाहींत इतके कार्यकारी सभेचे सभासद कॉलेजांचे अध्यक्ष किंवा प्रोफेसर या वर्गापैकीं असावे. मुख्य सभेचे सभासद फक्त पांचच वर्षें अधिकारारूढ असावेत व त्यानंतर त्यांनीं वाटेल तर फिरून निवडणुकीस उभें राहून सभेंत प्रवेश करून घ्यावा. या सर्व बाबतींत ज्यास लॉर्ड कर्झन यांनीं महत्त्वाची सुधारणा म्हणून म्हटलें आहे, किंबहुना नवीन मन्वंतराचा ज्या सुधारणेवर पाया रचला गेला आहे ती ही कीं, हल्लीं विद्यापीठांच्या मुख्य सभांमधून दोन अडीचशें सभासद असतात त्यांच्या ऐवजीं फार तर शंभर ठेवा-

वयाचे, व केवळ अधिकारगुणानें ज्यांस सभासदत्व मिळालें आहे अशां-खेरीज बाकीचे सर्व सभासद पांच वर्षांनीं स्थानभ्रष्ट होण्यास पात्र व्हावयाचे. कार्यकारीसभेच्या रचनेंत मुख्य सुधारणा म्हटली म्हणजे शिक्षकवर्गास तींत दिलेलें अढळ बहुमत ही होय; व या सर्वांचा निष्कर्ष एवढाच कीं, विद्यापीठांतील सभासद प्रथमतः शेंकडा ७० याप्रमाणानें सरकारचे हस्तक नेमतां यावे, मुख्य सभेंतून कार्यकारीसभेंत निवडून जाणाऱ्या सभासदांचें प्रमाणहि सरकारनेंच ठरवावें, व कार्यकारी सभेमध्यें होणाऱ्या सर्व गोष्टी सरकारी अधिकारी व कॉलेजचे प्रोफेसर यांनीं आपल्या मताप्रमाणें कराव्या. अशा रीतीनें सरकारी बारीक चाळणींतून बाहेर पडलेल्या सभासदांस तरी स्वतंत्र व भरपूर अधिकार असावे अशी कोणीहि अटकळ करील; परंतु दुर्दैवानें वस्तुस्थिति तशी नाहीं. सरकारच्या हस्तकांनीं बहुमताच्या जोरावर केलेल्या नियमांत अगर व्यवस्थेंतहि ( सरकारच्या दृष्टीनें ) उच्च शिक्षणास विघातक असा थोडाबहुत अंश कदाचित् राहण्याचा संभव आहे. या शंकेनें, विद्यापीठा-बाबद नियम करणें, नवीन कॉलेजें स्थापण्यास परवानगी देणें, अगर पूर्वी ज्यांस परवानगी मिळाली आहे त्यांची काढून घेणें इत्यादि बाबतींत अखेर निकाल देण्याचा व त्याजवर 'सरकारास मंजूर' असा छाप मारण्याचा अधिकार, गव्हर्नराच्या नांवानें सर्व हुकमत चालविणारा, असा सेक्रेटरीएटमध्यें जो कोणी 'गोमागणेश पितळी दरवाजा' त्यावेळीं अधि-कारारूढ असेल त्यास या बिलानें देण्यांत आलेला आहे. विद्यापीठांचे मुख्य घटक जीं कॉलेजें त्यांच्या बाबतींत जी सुधारणा म्हणून करण्यांत आलेली आहे ती एवढीच कीं, मुलांना रहाण्याच्या जागा, फंड, शिक्षक-वर्ग, रसायनशाळा, पुस्तकालयें वगैरेसंबंधानें पूर्ण लक्ष पोंचवून म्हणजे या सर्वांची यथास्थित तजवीज झालेली आहे असें पाहून नंतर नवीन कॉलेजें उघडण्यास परवानगी देण्यांत यावी अशी या बिलांत सूचना आहे. परंतु तरुण विद्यार्थीवर्ग केवळ परीक्षार्थी न बनावा एवढ्याकरितां जी काय तजवीज या बिलांत केलेली आहे ती एवढीच कीं, शिक्षणाचे वर्ग काढण्यास व त्यांत शिक्षक नेमण्यास विद्यापीठास आजपर्यंत स्पष्ट शब्दांनीं अधिकार नव्हता तो देण्यांत आला आहे.

परंतु या सर्वांमुळें शिक्षणक्रमाची खरी सुधारणा कशी होणार? म्हणजे वर सांगितलेले दोष नाहींसे होऊन हल्लीं असलेलीं विद्यालयें आहेत याहून अधिक संपन्न व सधन कशीं व्हावीं व एकदम सधन-संपन्न अशीं होऊन नवीन विद्यालयें कशीं अस्तित्वांत यावीं; विद्यार्थ्यांची परीक्षेची गोडी कमी होऊन खऱ्या विद्येचीच गोडी त्यांस कशी लागावी; व त्यांचे आंगीं करारीपणा, स्वाभिमान, स्वावलंबन वगैरे राष्ट्रीयत्वास पोषक असे गुण कसे यावे; हें आम्हांस तरी समजत नाहीं. सदरहु बिलानें हे सर्व दोष घालवून या सर्व सुधारणा जर कोणी करून दाखवील, तर त्यास खरोखर विसाव्या शतकांतला बडा किमयागार म्हटला पाहिजे. परंतु लॉर्ड कर्झन यांची जिव्हा जरी बहुभाष आहे व तिजमध्यें लपंडावाची करामत जरी बरीच दिसून येते, तरी त्यांचेजवळहि किमया आहे असें आम्हांस वाटत नाहीं. आणि प्रोफेसर गोखले यांनीं आपल्या असंमतिदर्शक मिनिटांत म्हटल्याप्रमाणें हल्लींच्या बिलाच्या योगानें विद्यापीठें हीं सरकारचीं खातीं बनतील, सरकारच्या तावडींतून उरेल तो विद्यापीठासंबंधीं अधिकार युरोपियन सभासद आणि सरकारी व मिशनरी कॉलेजांतील युरोपियन प्रोफेसर यांचे हातीं जाईल, व नेटिव सभासदांचे हातीं काडीचाहि अधिकार न राहतां अमुक एक सुधारणा आपण केली आहे असा अभिमान किंवा करूं अशी आशा त्यास यापुढें बाळगतां येणार नाहीं. इतक्या गोष्टी मात्र या बिलाचे निश्चित परिणाम म्हणून आज सांगतां येतील. याहून अधिक म्हणजे लॉर्ड कर्झन म्हणतात तें, संशयग्रस्त किंबहुना दुरापास्तच आहे असें म्हटलें तरी चालेल. या बिलाचे सर्वस्वीं भयंकर परिणाम शिक्षणक्रमावर झाल्याशिवाय राहणार नाहींत व त्यांतील मुख्य परिणाम हा कीं, सरकारचे कदरेमुळें यापुढें खाजगी कॉलेजें निघणें बहुधा असंभाव्य होईल. कारण एकेवेळीं लोकशिक्षण खासगी लोकांच्या हातीं द्यावें असा सरकारचा जाणूनबुजून प्रयत्न होता व खाजगी कॉलेजांची भरभराट होण्यास अवश्य अशी जी स्वतंत्रता व लोकाश्रय हीं मुबलक मिळण्यासारखीं होतीं; खासगी शिक्षकाचा धंदा बहुमानाचा असें लोकांस वाटत असून खाजगी प्रयत्नानें उभारल्या जाणाऱ्या शिक्षणाच्या भव्य इमारतींचा उज्वल देखावा कल्पनादृष्टीपुढें उभा राहण्यासारखा होता; व इतक्या सर्व गोष्टींमुळें

विद्यापीठांत ज्यांनीं कीर्ति मिळविली आहे असे तरुण लोक स्वार्थत्याग करून पुढें येण्यास तयार होते; अशा वेळींहि फारच थोडीं कॉलेजें स्थापित झालीं व जीं झालीं त्यांस परिपक्वता येण्यास बराच काल व बरेच श्रम लागले. हें जर आपण पाहतों, तर हल्लींच्या या बदललेल्या मनूंत, म्हणजे ज्या वेळीं सरकार व लोक यांना परस्पर हेतूंसंबंधानें अधिकाधिक संशय उत्पन्न होऊं लागले आहेत व सर्व शिक्षणाच्या दोऱ्या होतां होईतों आपल्या हातीं ठेवाव्या अशी सरकारास अनिवार इच्छा झाली आहे, अशा वेळीं नवीन कॉलेज निघणें हें किती दुर्घट काम आहे याची कल्पना सहजच होणार आहे, व शिक्षणक्रम सर्वथा सरकारच्या हातीं गेला म्हणजे त्याचे परिणाम आपल्या राष्ट्रीयत्वास किती घातक होतील हें निराळें सांगावयास नको. तात्पर्य, युनिव्हर्सिटी बिलाचें खरें स्वरूप हें अशा प्रकारचें असतां त्याचे गुणानुवाद लॉर्ड कर्झन यांनीं आपल्या भाषणांत जे गाइले आहेत ते ऐकून लॉर्ड कर्झन हे स्वतः तरी बुद्धिमंद असावे किंवा हिंदुस्थानच्या लोकांस तरी ते बुद्धिमंद मानीत असावे, याहून तिसरी गोष्ट संभवत नाहींसें वाटतें. पण त्यांतल्यात्यांत पहातां लॉर्ड कर्झन यांस बुद्धिमंद म्हणण्याचें धाडस आमच्या हातून होणार नाहीं. दोहोंत दोन मिळविले असतां चार होतात ही गोष्ट समजणें जितकें सोपें आहे तितकेंच, एखाद्या देशांत परकीय सरकाराच्या हातीं शिक्षण जाणें म्हणजे त्या देशांतील राष्ट्रीयत्वाचा नाश होणें, ही गोष्ट समजणें सोपें आहे. परंतु लॉर्ड कर्झन हे परकीय व राज्यकर्ते असल्यामुळें त्यांना आपल्या ज्ञानापेक्षां आपल्या कर्तव्यतत्परतेची बूज राखणेंच अधिक जरूर आहे. तेव्हां त्यांनीं कलकत्ता येथील आपल्या भाषणांतील उद्गारांप्रमाणें असंबद्ध, अतिशयोक्तिप्रचुर व भ्रामक असे उद्गार काढावे यांत कांहीं नवल नाहीं. या बिलासंबंधानें लोकमताच्या सर्व पक्षांचें मत अगदीं एक असून तें बिलास सर्वथा प्रतिकूल आहे, ही गोष्ट ध्यानांत ठेवण्यासारखी आहे. न्या. चंदावरकर यांनीं सुद्धां मागें युनिव्हर्सिटींत झालेल्या वादविवादांत या बिलाच्या उपयुक्ततेविषयीं आपलें शंकानिरसन झालें नाहीं असें उद्गार काढले व अधिकारीवर्गाच्या अप्रियतेस पात्र होण्याचें थोडेंसें साहस केलें. यापेक्षां हें बिल खरोखरच घातक आहे असें

ठरविण्यास दुसरा पुरावा कोणता पाहिजे ? किंवा दुसरे पक्षीं पाहतां डॉ० भांडारकर यांच्या सारख्या स्वदेशविद्वेषी गृहस्थांना कलकत्त्यास जाऊन सिलेक्ट कमिटीमध्यें ना० गोखले यांच्याविरुद्ध मत देऊन युरोपियन सभासदांच्या बहुमतास पुष्टि आणणें जरूर वाटलें याहून हें बिल देशास घातक आहे हें सिद्ध करण्यास निराळा पुरावा आणखी कोणता पाहिजे ?

---

# १४. देशी भाषेंतून शिक्षण

(केसरी, तारीख १३ एप्रिल १९१५.)

दिल्ली येथील वरिष्ठ कायदे कौन्सिलांत देशी भाषेंतून शिक्षण देण्याबद्दल ना० राम रायनिंगार यांनीं जो ठराव कौन्सिलपुढें आणला होता त्याबद्दलचा उल्लेख पूर्वीं आम्हीं केलाच आहे. परंतु त्याची जास्त चर्चा तेव्हां केली नसल्यामुळें आज त्यासंबंधानें विचार करीत आहोंत. कायदे कौन्सिलांत ना०दादाभाई, ना० गझनवी, ना० बानर्जी, महमुदाबादचे राजे, ना० सर फाजलभाई, ना० इब्राहिम रहिमतुल्ला व सीतानाथ राय यांचीं या ठरावावर थोडींबहुत विरुद्ध भाषणें होऊन ना० कुशल पालसिंग व मदन मोहन मालवीय या दोघांनींच काय तो ना० राम रायनिंगार यांच्या ठरावास दुजोरा दिला होता. वरिष्ठ कायदे कौन्सिलांत आम्ही जे कौन्सिलर निवडून देतों त्यांच्यामध्यें इतके लोक देशी शिक्षणाच्या थोडेंबहुत तरी विरुद्ध बोलणारे निघाले ही आश्चर्याची गोष्ट आहे; व त्यावरून कायदेकौन्सिलांत निवडून जाणाऱ्या लोकांसहि या विषयाचीं तत्त्वें अद्याप पुरीं कळलीं नाहींत असें म्हणणें भाग पडतें. परंतु त्यांतले त्यांतच समाधानाची गोष्ट ही कीं, कायदेकौन्सिलांतील नेटिव्ह सभासद नेहमीं एकमेकांचे पाठराखे असतात असा जो त्यांच्यावर कित्येकदां सरकारतर्फे आक्षेप घेण्यांत येतो तो खरा नसून या मेंबरांपैकीं बहुतेक किंवा सर्वच आपापलें मत निर्भयपणें प्रतिपादन करणारे आहेत असें या विषयावरील वादविवादावरून पुरें सिद्ध झालें आहे. ना०राम रायनिंगार यांच्या ठरावाविरुद्ध चार पांच मुसलमान सभासदांचीं भाषणें व्हावींत यांत कांहीं विशेष आश्चर्य नाहीं. पण ना०दादाभाई

किंवा कलकत्त्याचे ना० सुरेंद्रनाथ बानर्जी यांच्या सारख्यांनींहि कांहीं पोकळ शंका काढून या ठरावाविरुद्ध बोलावें हें खरोखरच विचित्र होय. या सभासदांची अशी समजूत झालेली दिसते, कीं देशी भाषेंत शिक्षण देणें म्हणजे इंग्रजी विद्येचें शिक्षण बुडविणें होय; आणि इंग्रजी विद्या, इंग्रजी इतिहास, इंग्रजी नीतिशास्त्र व इंग्रजी आधिभौतिकशास्त्रें यांच्या अभ्यासाखेरीज देशोन्नति होणें ज्याअर्थी अशक्य आहे, त्याअर्थी देशी भाषेंत शिक्षण दिल्यानें हिंदुस्थानचें पाऊल मागें पडत जाऊन अखेरीस शास्त्र्यांचा आणि पुराणिकांचाच सर्व देशभर सुळसुळाट होईल ! कित्येकांच्या मनांत अशीहि शंका आलेली दिसते कीं, हल्लीं जी राजकीय चळवळ चालू आहे ती इंग्रजी शिक्षणाचें फल असून ही ज्याअर्थी इकडील इंग्रजसरकारास प्रिय नाहीं त्याअर्थी देशी भाषेंतून शिक्षण देण्याचा उपक्रम सुरू झाल्यास त्या निमित्तानें अखेर इंग्रजी शिक्षणाचा प्रसारहि सरकारमार्फत कमी कमी होत जाईल. पण आमच्या मतें या सर्व शंका निर्मूल आहेत. देशी भाषेंत शिक्षण देणें याचा अर्थ शिक्षणाचे विषय बदलणें असा समजावयाचा नाहीं, हें प्रथमतः लक्षांत ठेविलें पाहिजे. तसेंच हल्लीं आमच्यावर राज्य आहे ते इंग्रज लोकांचें असल्यामुळें आमच्यापैकीं कांहीं लोकांना इंग्रजी भाषेंत चांगले तरबेज झालें पाहिजे, आणि आफिसांतून नोकरी धरणाऱ्या दुसऱ्या लोकांस इंग्रजी भाषेचें बरेंचसें ज्ञान असलें पाहिजे; ही गोष्ट निर्विवाद आहे. केवळ राजकर्त्यांची भाषा म्हणूनच इंग्रजीस हें महत्त्व आहे असें नाहीं; तर प्राचीन काळीं संस्कृत आणि मध्यंतरी हिंदी या भाषांप्रमाणें सध्यांच्या काळीं प्रांताप्रांतांतील दळणवळण चालण्यास इंग्रजी भाषा हें एक साधन झालें असून रेल्वे तारायंत्राप्रमाणें इंग्रजी भाषाहि देशाचें एकीकरण करण्यास कारणीभूत झाली आहे. पण या सर्व गोष्टी जरी खऱ्या असल्या तरी हिंदुस्थानांतील तीस कोट लोक सुशिक्षित कसे बनतील या प्रश्नाचा जेव्हां विचार करावयाचा तेव्हां देशी भाषांकडे लक्ष गेल्याखेरीज रहात नाहीं. किंबहुना देशी भाषेंतून शिक्षण द्या, असे म्हणणारे जे लोक आहेत त्यांचा मुख्य मुद्दाहि हाच आहे असें म्हटलें तरी चालेल. हिंदुस्थानांत देशी भाषा किती आहेत हें पाहूं गेल्यास त्यांची संख्या सुमारें तीनशेंपेक्षांहि अधिक आहे असें आढळून येतें ! आणि हें जर खरें तर

या तीनशें देशी भाषांतून शिक्षण सुरू करावयाचें कीं काय, आणि करावयाचें म्हटल्यास तें प्रायः अशक्य आहे असें कित्येकांचें म्हणणें आहे. पण वर ज्या दुसऱ्या कांहीं गैरसमजुती सांगितल्या त्याप्रमाणें हीहि आमच्या मतें एक गैरसमजूतच आहे. देशी भाषांचा ज्या वेळेस विचार करावयाचा, त्या वेळेस एकाच भाषेच्या अनेक पोटभेदांचा विचार करावयाचा नाहीं. उदाहरणार्थ, मराठी भाषा घ्या. कोंकणची मराठी निराळी, गोंव्याची मराठी निराळी, देशस्थी मराठी निराळी आणि मोगलाईंतील मराठी निराळी इ० मराठी भाषेचेहि पुष्कळ प्रकार आहेत. किंबहुना इंग्रजी भाषेचे याच मासल्याचे प्रकार अद्याप इंग्लंडमध्यें आढळून येतात. पण इंग्लंड देशाची भाषा इंग्रजी आहे या सिद्धांतास जसा बाध त्यानें येत नाहीं, तद्वतच महाराष्ट्र भाषेचे अनेक प्रकार असले तरी महाराष्ट्रांत किंवा दक्षिणेंत ( वऱ्हाड, नागपूर व मोगलाई धरून ) १५।२० जिल्ह्यांची भाषा मराठी आहे असें म्हणण्यास कांहींच बाध येत नाहीं; आणि हाच न्याय गुजराथी, कानडी, बंगाली, हिंदी वगैरे भाषांसहि लागू पडतो. भाषाभेदाची दृष्टि व्यापक करून अशा रीतीनें हिंदुस्थानचे विभाग केले तर आठ-दहापेक्षां ते अधिक होणार नाहींत. हिंदुस्थानसारख्या मोठ्या देशाचे अशा रीतीनें आठ-दहा निरनिराळे प्रांत झाल्यास त्यांत कांहीं अपूर्व प्रकार अगर कांहीं घोंटाळा होण्यासारखाहि नाहीं. अशा दृष्टीनें विचार केला म्हणजे देशी भाषेंतून शिक्षण देण्याच्या प्रश्नास जें रूप येतें तें इतकें उज्ज्वल, उपयुक्त व शुद्ध आहे कीं, त्याविरुद्ध तक्रार करण्यास आमच्या मतें कांहींच जागा रहात नाहीं. देशांतील लाखों-किंबहुना कोट्यावधि लोकांस इंग्रजी भाषा आंगवळणीं पडेल ही गोष्ट असंभवनीय होय. त्यांना जें शिक्षण द्यावयाचें तें त्यांच्या त्यांच्या भाषेच्या द्वारेंच पाहिजे; आणि हें शिक्षण नुसत्या प्राथमिक शिक्षणानें ज्याअर्थी पुरें होत नाहीं, त्याअर्थी दुय्यम प्रतीच्या शिक्षणाच्या शाळांतहि शिक्षणासाठीं देशी भाषेचाच उपयोग केला पाहिजे याबद्दल शंका रहात नाहीं. सध्यां असलेल्या मध्यम प्रतीच्या शाळा म्हणजे हायस्कुलें वगैरे यांतून जे विद्यार्थी पढविले जातात त्यांचीं पांच सात वर्षें फक्त इंग्रजी भाषेचे शब्द, त्यांचे अनियमित स्पेलिंग व उच्चार, आणि देशी भाषांहून भिन्न अशी वाक्यरचना शिकण्यांतच जात

असतात. आमच्या मतें कालाचा हा शुद्ध अपव्यय होय. यापैकीं शेंकडा पंचाण्णव विद्यार्थ्यांस साधारण लिहिण्याबोलण्यापलीकडे इंग्रजी भाषेच्या ज्ञानाची उभ्या जन्मांत आवश्यकता घडत नाहीं. अर्थात् या साधारण इंग्रजी लिहिण्या-बोलण्यासाठीं त्यांच्या आयुष्याची महत्त्वाची पांच सात वर्षें खर्चीं पडावीं हें व्यक्तिदृष्ट्याच नव्हे तर राष्ट्रीय शिक्षणदृष्ट्याहि मोठेंच दुर्दैव होय. आणि याला उपाय आहे कीं नाहीं, हा प्रश्न पुष्कळांच्या मनांत घोळं लागला आहे. बरें इंग्रजी भाषेची याप्रमाणें पांच सात वर्षें घोकंपट्टी करूनहि ती भाषा चांगली येते काय ? नाहीं. मॅट्रिक झालेल्या लोकांस कॉलेजांतील प्रोफेसरांचें इंग्रजी व्याख्यान समजत नाहीं अशी प्रोफेसरांची व इंग्रजींतील साधीं पत्रेंहि लिहितां येत नाहींत अशी इंग्रजी अंमलदारांची कूरकुर आहे; आणि उलटपक्षीं इंग्रजी उच्चार आणि स्पेलिंग घोकण्यांत पांच सात वर्षें घातल्यामुळें गणित, पदार्थविज्ञान, इतिहास, रसायनशास्त्र वगैरे महत्त्वाचे शास्त्रीय विषयहि त्यांस यावे तितके येत नाहींत असें राष्ट्रीय शिक्षणाच्या पुरस्कर्त्यांचें म्हणणें आहे. तात्पर्य,इंग्रजी अमलदारहि खूष नाहींत आणि राष्ट्रीय शिक्षणाचे पुरस्कर्तेहि खूष नाहींत अशी स्थिति झालेली आहे. ही स्थिति सुधारणें हें सरकारी विद्याखात्याचें पहिलें कर्तव्य होय. पण तिकडे लक्ष न देतां अलीकडे कांहीं वर्षें सरकारी शाळांतून व कॉलेजांतून राजद्रोहाचीं कोळिष्टकें कोणत्या कोपऱ्यांत लागलेलीं आहेत, हें पाहून किंवा कल्पून तींच केरसुणीनें दूर करण्याचा शाळाखात्यांतील अधिकाऱ्यांस उद्योग लागला आहे. शाळाखात्याचे मुख्य प्रधान ना० बटलर यांनीं ना०राम रायनिंगार यांनीं पुढें आणलेल्या ठरावाचा अशा प्रकारें विपर्यास केला नाहीं ही मोठ्या सुदैवाची गोष्ट होय. देशी भाषांतून शिक्षण देणें म्हणजे शिक्षणाचे विषय बदलणें नसून तेच विषय थोड्या परिश्रमानें सर्वांस कसे समजून देतां येतील, हा या वादांतील मुख्य मुद्दा आहे, असें जें ना. बटलरसाहेबांनीं म्हटलें आहे तें यथार्थ आहे. ज्या भाषेंत शिक्षण दिलें जातें ती भाषा देशी असेल तर विषय अधिक सुगम होतील, इतकेंच नव्हे तर, ज्ञानाचाहि जास्त प्रसार होऊन तें या देशांत स्थिरावेल, व त्याबरोबरच देशी भाषांचा उत्कर्ष होऊन प्रांतोप्रांतीं एक प्रकारचें विशिष्ट ज्ञानसामर्थ्य उत्पन्न होईल हें निर्विवाद आहे. सरकारास ही गोष्ट इष्ट नाहीं असें नाहीं.

उलट, प्राच्य विद्येऐवजीं पाश्चिमात्य विद्येचें शिक्षण देण्याचा सरकारनें जेव्हां निश्चय केला, तेव्हां त्यांनीं आपल्या डोळ्यांपुढें हेंच धोरण ठेवलेलें होतें. पाश्चिमात्य विद्यांचें शिक्षण देशी भाषेंत दिल्यानें हें धोरण अधिकाधिक सिद्धीस जाईल हें सांगावयास नकोच. सध्यां लढाई सुरू असल्यामुळें या प्रश्नाचा सरकारांत जितका ऊहापोह व्हावयास पाहिजे तितका होण्यास सवड नाहीं हें आम्ही जाणून आहों. पण ना० बटलरसाहेबांनीं म्हटल्याप्रमाणें लढाईनंतर तरी या प्रश्नाच्या विचारास अग्रस्थान मिळेल, व त्याचा निःपक्षपातबुद्धीनें विचार होऊन शाळांतील व कॉलेजांतील अभ्यासक्रमांत देशाला हितकारक असें इंग्रजीचें व देशी भाषांचें प्रमाण ठेविलें जाईल अशी आम्हांस उमेद आहे. देशांतील तरुण पिढी विनाकारण परकी भाषा शिकण्यासाठीं मारायची किंवा त्यांस उपयुक्त शिक्षण देऊन शक्य तितकें अधिक सुशिक्षित करावयाचें हा मुख्य मुद्दा आहे; आणि किरकोळ बाबतींत कितीहि मतभेद असला तरी या मुख्य प्रश्नाचा लवकर समाधानकारक निकाल लावणें अत्यंत जरूर आहे, हें कोणीहि नाकबूल करणार नाहीं.

---

# १५ मातृभाषा हाच स्वराज्याचा पाया

( केसरी, तारीख १० जुलै १९१७.)

'No scheme of self--Government, however, benevolently or generously it may be bestowed upon us, will ever make us a self—governing nation if we have no respect for the languages our mothers speak.' —M. K. GANDHI.

'कोणी कितीहि परोपकार बुद्धीनें किंवा औदार्यबुद्धीनें कशाहि उत्तम घटनेचें स्वराज्य आम्हांस दिलें तरी आमच्या माता जी भाषा बोलतात तिजविषयीं आमच्या मनांत आदरबुद्धि नसल्यास आम्ही खरे स्वराज्यभोगी होणार नाहीं.' —महात्मा गांधी.

मुंबई येथें गेल्या आठवड्यांत भरलेली प्रांतिक शिक्षणपरिषद बऱ्याच अंशांनीं यशस्वी झाली असें म्हणतां येईल. ती सरकारनें किंवा मुंबई

युनिव्हर्सिटीनें भरविलेली नव्हती ही गोष्ट खरी; तथापि तिचें अध्यक्षस्थान मुंबई हायकोर्टाचे एक वेळचे ॲक्टिंग चीफ जस्टिस व मुंबई-युनिव्ह-र्सिटीचें सरकारकडून दोनदां नेमणूक झालेले व्हाइस चॅन्सेलर सर नारायण चंदावरकर यांनीं स्वीकारलें होतें; आणि इलाख्यांतील दुय्यम प्रतीच्या व उच्च शिक्षण संस्थांतून अगर अशा संस्थांबाहेर राहूनहि शिक्षणाकडे मोठ्या आंवडीनें लक्ष पुरविणारे असे अनेक नामांकित गृहस्थ व स्त्रियाहि हजर होत्या. परिषदेंत सरकारी विद्याखात्याचे अधिकारी किंवा नोकर आले नव्हते ती गोष्ट खरी; परंतु ते हजर न राहण्याला मुख्यतः दोन कारणें होतीं. एक असें कीं, सरकारी विद्याखात्याला शिक्षणाच्या कामीं खासगी रीतीनें झालेला कोणताहि प्रयत्न—मग तो केवळ चर्चात्मक कां असेना—फारसा आवडत नाहीं. लोककल्याणाच्या विचाराचा सर्व मक्ता आपणाकडे आहे अशी सरकारानें आपली भावना करून घेतलेली असते, तेव्हां सरकाररूपी शरीराचे अवयवभूत असे जे विद्याधिकारी तेहि अशा भावनेचे अंशभागी झाले असल्यास त्यांत नवल नाहीं. पण त्यांतूनहि कांहीं विद्याधिकारी अशा भावनेपासून मुक्त असले तरी आपल्या नोकरपेशाची सरकारी शिस्त त्यांना आड येते, व सदर शिक्षणपरिषदेसारख्या सभांना त्यांना हजर राहतां येत नाहीं. सरकारी अधिकारी किंवा नोकर हजर नसल्यामुळें या परिषदेस एकांगीपणाचें स्वरूप सकृद्दर्शनीं येण्यासारखें होतें. परंतु कित्येक बाबींवर परिषदेंत जो कसून व कडाक्याचा वादविवाद झाला, त्यावरून पाहतां तेथें कोणतेंहि एककल्लीपणाचें मत प्रभावी झालें नसून, परिषदेनें मंजूर केलेल्या ठरावांना संकीर्ण विचाराचें स्वरूप सहजच आलेलें आहे. हे ठराव लोकमतनिदर्शक असले तरी सरकारावर ते कोणत्याहि रीतीनें बंधक होऊं शकत नाहींत. फार काय, पण या बाबतींत मुंबई-युनि-व्हर्सिटी देखील सर्वस्वीं स्वतंत्र असल्यानें परिषदेचे ठराव मानणें अगर न मानणें हें सेनेटच्या मर्जीवर अवलंबून आहे. पण हे ठराव म्हणजे हुकूम नसले तरी विचारपूर्वक केलेल्या शिफारशा या नात्यानें त्यांना बरीच किंमत आहे. एवढेंच नव्हे तर, सरकारनें किंवा युनिव्हर्सिटीनें त्या आज ताबडतोब धुडकावून लावल्या तरी पुढेंमागें केव्हां तरी या शिफारशींतील सूचना अमलांत आल्यावांचून राहणार नाहींत, अशी आशा बाळगण्यास हरकत

नाहीं. एरवीं लोकमत जें सर्वत्र विखुरलेलें असतें तें अशा परिषदांनीं एकीकृत होतें, आणि सरकारी विद्याखातें किंवा निमसरकारी युनिव्हर्सिटी यांच्यावर हल्ला चढविण्यापूर्वीं लोकमताच्या सेनेची तयारी बाहेर कशी काय आहे याचा पुढाऱ्यांना अंदाज घेतां येतो.

शिक्षणपरिषदेचें काम आटपण्यापूर्वींच गेल्या अंकीं आम्हीं आशा प्रदर्शित केल्याप्रमाणें देशी भाषांसंबंधानें दोन महत्त्वाचे ठराव परिषदेनें बहुमतानें का होईना; पण मंजूर केले. पैकीं एक ठराव मॅट्रिक्युलेशन परीक्षेंत प्रश्नांचीं उत्तरें आपल्या देशी भाषेंतून देण्यास विद्यार्थ्यांना मोकळीक असावी, असा होता. या विषयावर दुमत झालें. तथापि बहुमतानें मंजूर केलेला ठराव अध्यक्षांनीं आढेवेढे न घेतां परिषदेचा निकाल म्हणून ग्राह्य मानला; दुसरा महत्त्वाचा ठराव भाषावार युनिव्हर्सिट्या स्थापण्यासंबंधाचा होता तोहि बहुमतानें मंजूर झाला असता; तथापि अध्यक्षांना शिक्षणव्यवस्थेंतील ही राज्यक्रांतीच होय असें वाटल्यावरून त्यांनीं या प्रश्नाचा निकाल निदान लांबणीवर पडावा या हेतूनें त्याच्या विचाराकरितां पोटकमिटी नेमणें अधिक प्रशस्त असें ठरविलें व मूळ सूचना करणारांनींहि तोडजोडीदाखल ही उपसूचना मान्य केली. तथापि परभाषेच्या मरणाला फार तर पोटकमिटीची ही एक रात्र आडवी येईल, याहून अधिक कांहीं होणार नाहीं असें आम्हांस वाटतें. कारण मातृभाषेला एकंदर शिक्षणाच्या कार्यांत कोणतें स्थान असावें याविषयीं एकंदर लोकमताचे तोंडचे आतां फिरल्यासारखें झालेलें असून भाषावार युनिव्हर्सिट्या स्थापणें ही जी या विषयांतील अंतिम सुधारणा ती केव्हांना केव्हां तरी अमलांत आलीच पाहिजे असा तज्ज्ञांचा समज झालेला आहे, व तो यथार्थ आहे असें आम्हासहि वाटतें. कर्मधर्मसंयोगानें मुंबईच्या 'टाइम्स'पत्रानें सदर शिक्षणपरिषदेवर लेख लिहितांना इतर गोष्टींची उपेक्षा करून आम्ही ज्या दोन गोष्टींस इष्ट म्हणून मागील लेखांत उल्लेखिल्या होत्या त्याच दोन गोष्टींस 'टाइम्स'पत्रानें नेमका आक्षेप घेतला आहे. ज्या दोन गोष्टी आम्हांस इष्ट वाटाव्या त्याच नेमक्या 'टाइम्स'ला अनिष्ट वाटाव्या याचा अर्थ 'टाइम्स'ला हिंदी लोकांचें शिक्षणदृष्ट्या अहित व्हावेसें वाटतें असा आम्हीं करीत नाहीं, तर एकाच विषयाकडे स्वकीय व परकीय हे पाहात असतां त्यांच्या दृष्टीमध्यें स्वभावतःच

इतका मोठा फरक पडत असतो, इतकाच त्याचा आम्ही अर्थ करितों. देशी भाषांसंबंधानें आमची जी दृष्टि तीच उद्यां इंग्लंडमध्यें कोणत्या भाषेच्या द्वारें शिक्षण द्यावें असा प्रश्न निघाला असतां 'टाइम्स' काराचीहि होईल. म्हणजे उदाहरणार्थ आम्ही जसें महाराष्ट्रांतील मुलांना मराठीच्या द्वारें शिक्षण मिळालेंच पाहिजे असें म्हणतो, तसेंच 'टाइम्स'कारहि इंग्रज मुलांना इंग्रजीच्या द्वारें शिक्षण मिळालें पाहिजे असेंच म्हणतील, फ्रेंच किंवा जर्मन भाषेतून मिळावें असें केव्हांहि म्हणणार नाहींत. फार काय पण एखाद्या विषयावर जर्मन किंवा फ्रेंच भाषेंतील ग्रंथ उत्तम आहेत असें ठरलें तरी 'टाइम्स'कार इंग्रजी भाषेचा आग्रह सोडणार नाहींत. पण हिंदुस्थानविषयीं बोलणें निघालें म्हणजे मात्र हिंदुस्थानांत मातृभाषा म्हणून कांहींएक चीज आहे किंवा नाहीं अशी माहिती नसल्याप्रमाणेंच ते बरळूं लागतात. हिंदुस्थानांत आज इंग्रजांचें राज्य आहे व उद्यांहि राहील अशी दृढ समजूत असली तरी राज्यकर्त्यांची भाषा झाली म्हणून शिक्षणांत तिला किती महत्त्व किंवा कोणतें स्थान द्यावयाचें या विषयीं 'टाइम्स'कारासारख्या लोकांना सामान्य तारतम्यहि रहात नाहीं; म्हणूनच त्यांच्या बोलण्याला बोलणें असें न म्हणतां बरळणें असेंच नाईलाजानें म्हणावें लागतें. भाषेसारख्या गोष्टीचा इतका अभिमान धरून तिच्या द्वाराशिवाय इतर द्वारानें हिंदी लोकांचें शिक्षण होऊं नये किंवा होणारच नाहीं असा जेव्हां ते आग्रह धरतात तेव्हां त्यांचें हें गाढ बुद्धिमांद्य पाहून हंसूं आल्याशिवाय राहातच नाहीं. या लोकांची एकंदर विचारसरणी पाहिली तर ती अशी दिसते कीं, हिंदी मुलांना शक्य तर पाळण्यांतलीं गाणींसुद्धां त्यांच्या आयांनीं इंग्रजी भाषेंतून म्हणावीं, व धूळपाटीवर अक्षरें घालून द्यावयाचीं तीं 'अ, आ, इ, ई' हीं न घालून देतां 'ए, बी, सी, डी,' हीच जर घालून देतां आलीं तर फार बहार होईल, व हिंदुस्थानांतील शिक्षणाचा सर्व प्रश्न अत्यंत समाधानकारक रीतीनें कायमचा सुटेल! दुर्दैव इंग्रजांचें कीं, हिंदी आया व दाया या अद्यापि घरांत इंग्रजी बोलूं लागल्या नाहींत व गांवठी तात्या पंतोजी इंग्रजीशिवाय दुसरें कांहीं जाणत नाहींसे झाले नाहींत. पण हें दुर्दैव कायमचें टिकेल अशी भीति त्यांना असेलसें वाटत नाहीं. आज प्राथमिक शिक्षणांत देशी भाषांना जो थारा मिळालेला आहे तो त्यांनीं

केवळ नाइलाजानें म्हणून दिलेला आहे. प्राथमिक शिक्षणहि इंग्रजी भाषेंतून देण्याची तरफदारी करण्यास ते कचरले नसते. पण प्राथमिक शिक्षण इंग्रजींतून देण्याइतकें इंग्रजी शिकलेले शिक्षक त्यांना आज मिळूं शकत नाहींत म्हणूनच नाइलाज. पण पांचपन्नास वर्षांनीं ही अडचण दूर होऊन धूळपाटीवर इंग्रजी अक्षरें दिसणार नाहींत अशी त्यांची निराशा झालेली नाहीं, हें त्यांच्या मनोभूमींत किंचित् खोल प्रवेश करून पाहणारास तेव्हांच दिसून येईल. प्राथमिक शिक्षण देशी भाषेंतून दिलें जातें तें; ती पद्धति स्वाभाविक म्हणून नव्हे तर ती पद्धति नाहींशी करण्यास शिक्षकांचें वैपुल्य नाहीं म्हणूनच होय, अशी त्यांची विचारसरणी उघड उघड दिसते !

अशी विचारसरणी असल्याबद्दल आम्ही इंग्रजांस दोष देत नाहीं; पण त्यांना दोष न दिला तरी राष्ट्राच्या दृष्टीनें आमचें म्हणून कांहीं पाहणें आहेच कीं नाहीं ! हिंदुस्थानांत इंग्रजी राज्य झालें म्हणून हिंदी लोकांना जसें डोक्यावर उभे राहून चालतां येणार नाहीं तसेंच परकी भाषेंतून प्राथमिक काय, दुय्यम काय, पण उच्च शिक्षणहि निरंतर देऊन चालणार नाहीं हीच आमची दृष्टि असली पाहिजे. मात्र ती आमच्यांतील कित्येक सुजाण म्हणविणारांनाहि अद्याप लाभलेली नाहीं एवढ्याचेंच राहून राहून वाईट वाटत शिक्षकांच्या अभावामुळें प्राथमिक शिक्षण आज इंग्रजींतून न देणें हें जसें इंग्रजांना अपरिहार्य वांटतें तितकेंच अत्युच्च शिक्षण देशी भाषांतील ग्रंथाभावामुळें आज इंग्रजींतून देणें अपरिवार्य आहे असें आम्हांस वाटतें. तरी पण इंग्रजी शिक्षण फैलावून प्राथमिक शिक्षणहि देणारे शिक्षक इंग्रजी पढलेल मिळावे हा जसा इंग्रजांचा प्रयत्न मनांतून सुरू आहे तसाच उच्चतम शिक्षण देण्याचे ग्रंथहि देशी भाषांतच पैदा व्हावे असा आमचाहि प्रयत्न आहे. अर्थात् हे दोन प्रयत्न सवस्वीं परस्परविरोधी अशा दिशांनीं चाललेलें असून त्यांची एकवाक्यता होणें मुळींच संभवनीय नाहीं. एक पश्चिमेकडे तोंड करून चाललेला तर दुसरा पूर्वेकडे तोंड करून चाललेला अशी वास्तविक स्थिति असतां जणूं काय हे दोघेहि एकाच दिशेनें चाललेले आहेत असा आजवर कित्येकांना खराखुरा भ्रम झाला व कित्येकांनीं तो तसा करून घेतला. पण हा आंधळ्या कोशिंबिरीचा खेळ असाच

निरंतर चालणें अशक्य होतें; व मुंबईच्या शिक्षण-परिषदेंत देशी भाषाभिमान्यांनीं आपलें मनोगत स्पष्ट शब्दांनीं बोलून दाखविल्यामुळें या विरोधी विचारसरणीची धडक किंवा टक्कर होऊन, आजवर झोपेंत चालणारे हे लोक खाडकन् जागे झाले व हिंदी लोकांची शिक्षणाच्या बाबतींतील खरी राष्ट्रीय आकांक्षा काय आहे हें या झोपाळूंना आतां पुरें स्पष्ट दिसून आलें, हा या शिक्षण-परिषदेचा आमच्या मतें सर्वांत मोठा फायदा झालेला आहे. प्रस्तुत अग्रलेखाच्या शिरोभागीं महात्मा गांधी यांच्या उद्गारांचें जें अवतरण आम्हीं घेतलें आहे, तें वाचकांनीं या ठिकाणीं फिरून एक वेळ वाचल्यास ही आकांक्षा कशा प्रकारची आहे हें त्यांना कळून येईल. थोड्या दिवसांपूर्वी रंगून येथील एक बॅरिस्टर पी. जे. मेहता, एम्. डी. यांनीं ' व्हर्न्याक्युलर्स ॲज मिडिया ऑफ इन्स्ट्रक्शन इन् इंडियन स्कूल्स ॲंड कॉलेजेस् ' या नांवाचें एक लहानसें पुस्तक लिहिलेलें आहे, व त्या पुस्तकाला गांधी यांनीं जी प्रस्तावना जोडली आहे, तींतील तें शेवटचें वाक्य आहे. सदरहू इंग्रजी पुस्तक देशी भाषाभिमानी लोकांनीं मिळवून अवश्य वाचावें अशी आमची त्यांस शिफारस आहे.

सदर प्रस्तावनेंत गांधी यांनीं फार थोडक्यांत पण अतिशय उत्कृष्ट तऱ्हेनें देशी भाषाभिमान्यांचें म्हणणें मांडलेलें आहे. त्यांत त्यांनीं दोनच पण अत्यंत समर्पक अशीं उदाहरणें दिलीं आहेत. त्यांवरून हिंदुस्थानांत इंग्रजी भाषेच्या द्वारें शिक्षण द्यावें असें म्हणणारे लोक अद्वितीय अशा अजागळ कोटींत पडतात हें दिसून येईल. पहिलें उदाहरण ज्यू लोकांचें. ज्यू लोकांना स्वतःचा असा देश नाहीं. जगाच्या अनेक व दूरदूरच्या भागांत आज शेंकडों वर्षें ते कायमची वसाहत करून राहिलेले आहेत; व त्या त्या देशांचे नागरिक बनलेले आहेत आणि फिरून ज्यू लोकांचा म्हणून एखादा स्वतंत्र देश होईल, अशी अशाहि त्यांना करणें शक्य नाहीं. अर्थात् ज्या देशांत ते कायम राहिले त्या देशांत प्रचलित असलेली भाषाच त्यांनीं मातृभाषा मानली असती तरीहि नवल वाटलें नसतें. परंतु हिंदुस्थानांत हिंदी लोकांचा जो परस्पर नित्यसंबंध येतो, तसा संबंध येण्याचा संभवहि नसतां केवळ सर्व जगभर पसरलेल्या ज्यू लोकांना परस्पर नैमित्तिक व्यवहार करतां यावा म्हणून त्यांनीं आपल्या ' यिडिश ' नामक मातृभाषेस

सर्व भाषांत उच्चस्थान देऊन तिच्यांतूनच ते मुलांना शिक्षण देतात. ज्या देशांत ते राहतात त्या देशाची भाषा त्यांना येत नाहीं असें नाहीं, उत्तम येते. तथापि परभाषेंतील ग्रंथ वाचून त्यांच्या आत्म्याचें खरें खरें समाधान होत नाहीं. म्हणून इतर लोकांनीं गोधडीवजा ठरवलेल्या व अवमानलेल्या पण ज्यू लोकांना मातृस्थानीं असलेल्या 'यिडिश' भाषेस त्यांनीं संस्कार देऊन व ग्रंथसमृद्ध करून एक दोन पिढ्यांतच नांवारूपास आणलें आहे. जगभर पसरलेल्या व म्हणून कायमचा वियोग पावलेल्या ज्यू लोकांची ही स्थिति, तर हजारों वर्षें एकत्र राहून, हजारों बंधनांनीं एक गठ्ठा बनलेल्या हिंदी, बंगाली, मराठी, कानडी, गुजराथी, तामील, तेलगू वगैरे प्राचीन व परिणत भाषा बोलणाऱ्या लोकांनीं आपापल्या भाषांच्या द्वारेंच शिक्षण –मग तें कितीहि उच्च कोटींतलें असो–मिळविण्याची आकांक्षा धरल्यास त्यांस नांव कसें ठेवतां येईल ?

दुसरें उदाहरण दक्षिण आफ्रिकेचें. तेथील डच लोकांची 'टाल' नामक भाषा व इंग्रजांची इंग्रजी भाषा यांचें द्वंद्व आज कित्येक वर्षें चालू आहे; व तेथेंहि बोअर लोकांच्या मातृभाषाभिमानाचा विजय होऊन इंग्रजीलाच हार खावी लागली. हीं उदाहरणें देऊन गांधी यांनीं असें म्हटलें आहे कीं, "देशी भाषांवरून ज्यांचा विश्वास उडाला त्यांचा स्वतः आपल्यावरूनच विश्वास उडाला असें म्हटलें पाहिजे. देशी भाषेवरील अप्रीति हें राष्ट्रीय अधोगतीचें लक्षण होय." पण सुदैवानें ही अधोगति हिंदी लोकांना येण्याची पूर्वी केव्हां भीति असली तरी आज तरी ती खास नाहीं. तिनें निश्चयानें उलट खाल्ली आहे, असें मुंबई येथील शिक्षण–परिषदेवरून आम्हांला म्हणण्यास हरकत नाहीं. देशी भाषावार युनिव्हर्सिट्या स्थापल्या जाव्या या तत्त्वाचा सदर परिषदेंत मान्यतेनें व स्पष्टतेनें उघड उच्चार झाल्यामुळें देशी भाषांच्या स्वराज्याचें निशाणच या परिषदेंत रोवलें गेलें असें आम्ही म्हणतों. अर्थात् या निशाणाभोंवतीं यापुढें अनेक युद्धें होतील; तथापि अखेर देशी भाषांचाच विजय होणार, हें सांगण्याला कोणी ज्योतिषी किंवा भविष्यवादी नको.

---

[ २ ]

( केसरी, तारीख १७ जुलै १९१७. )

सदरहू विषयावर गेल्या अंकीं आम्हीं जे विचार प्रदर्शित केले होते, त्यांचा आणखीहि कांहीं दृष्टींनीं विचार करणें अवश्य आहे. मुंबई येथें भरलेल्या शिक्षण-परिषदेंत देशी भाषांचा विषय चर्चेस निघून भाषावार युनिव्हर्सिटया स्थापल्या जाव्या अशी सूचना पुढें येऊन ती बहुमतानें मंजूर होण्याचा रंग दिसला, तेव्हां परिषदेचे तात्पुरते अध्यक्ष मि० भाभा ह्यांनीं "ही तर शिक्षणांतील राज्यक्रांतीच म्हणावयाची" अशा अर्थाचे उद्गार काढले असें म्हणतात. याच विषयासंबंधानें नंतर मुंबईच्या 'टाइम्स' पत्रानें अशाच अर्थाची टीका करून वरती असेंहि म्हटलें कीं, ह्या विषयाच्या चर्चेंत देशी भाषांच्या अभिमान्यांनीं म्हणजे पर्यायतः मराठीच्या अभिमान्यांनीं हुल्लड किंवा दंगल करून गर्दी—मारामारींत आपलें काम साधून घेतलें. शिक्षण-परिषदेचा हा ठराव युनिव्हर्सिटीच्या सेनेटमध्यें मंजूर होऊन त्याला सरकारची मान्यता मिळून भाषावार युनिव्हर्सिटया स्थापन होईपर्यंत डोळे पांढरे होतील; आजच्या परतंत्रतेमुळें राष्ट्राची अशी स्थिति असतां शंभर वर्षांपूर्वींची मराठा कान्फिडरसी—अर्थात्—महत्त्वाकांक्षी मराठे सरदारांचा संघ—फिरून निर्माण झाली असून तिनें आपल्या जुन्या लुटारूपणाच्या स्वाऱ्यांना जणुं काय फिरून प्रारंभ केलाच अशा तऱ्हेचे उद्गार एकदम मनांत उत्पन्न झालेल्या भीतीमुळें कां होईना, पण शहाण्यासुर्त्या लोकांनीं काढलेले ऐकून कोणास हंसूं आल्यावांचून राहणार नाहीं? राजकीय सुधारणांप्रमाणें शिक्षणविषयक सुधारणाहि हल्लींच्या परतंत्र स्थितींत मंद पावलांनींच चालत जाणार व ती अखेर पुरी अमलांत येईपर्यंत तिच्या उपयुक्ततेचें शिक्षण तिला आज विरोध करणारांनाहि अखेर मिळणार याविषयीं आम्हांस शंका नाहीं. पण एखाद्या यक्षिणीच्या कांडीनें चमत्कार घडून आल्याप्रमाणें ही सुधारणा आज ताबडतोब घडून आली असें घेऊन चाललें तरी त्यांत वावगें तें काय आहे, याचा विचार प्रतिपक्षीयांनीं शांत मनानें करावा अशी आमची त्यांस विनंति आहे.

या बाबतींत प्रथम एक गोष्ट लक्षांत घेतली पाहिजे ती ही कीं, देशी भाषांना स्वराज्य पाहिजे आहे ह्याचा अर्थ त्यांना फक्त आपल्यापुरती

स्वतंत्रता पाहिजे आहे. एका देशी भाषेनें दुसऱ्या देशी भाषेच्या प्रांतावर स्वारी करून परकीयांचा मुलूख आपल्या हस्तगत करावा, अशी कोणत्याहि देशी भाषेची इच्छा आज नाहीं व तशी इच्छा जर खरोखर कोणा देशी भाषेची असेल तर इतर भाषाभिमान्यांनीं तिला विरोध करावा हें स्वाभाविक आहे. पण एका देशी भाषेनें दुसरीवर स्वारी करण्याचा हा प्रश्न नसून, सर्व देशी भाषांनीं मिळून एका परकी भाषेविरुद्ध संघ करून, आपापलें अंतःस्वातंत्र्य मिळविण्याचाच हा प्रयत्न आहे. मुंबई इलाख्यांत मुख्य देशी भाषा मराठी असल्यामुळें, इतर भाषांचा अभिमान बाळगणाऱ्या लोकांना सहजच अशी शंका येते कीं, देशी भाषांच्या स्वराज्याच्या नांवाखालीं मराठे लोक सर्व इलाखाभर आपल्याच भाषेचें स्तोम माजवूं पहात आहेत व वर्चस्व स्थापूं पहात आहेत; पण अशा लोकांना आम्ही प्रांजलपणें व प्रामाणिकपणें असें आश्वासन देतों कीं, भाषावर युनिव्हर्सिटया स्थापणें किंवा देशी भाषांतून शिक्षण देणें ह्या सुधारणांची तरफदारी करितांना ज्याची मातृभाषा मराठी नाहीं अशा एकाहि मनुष्यावर मराठी शिकण्याची अप्रत्यक्ष कां होईना पण सक्ति व्हावी अशी आमची बिलकुल इच्छा नाहीं. किंबहुना, आम्ही जेव्हां मराठीची बाजू पुढें मांडतों, तेव्हां उपलक्षणानें कानडी, गुजराथी, सिंधी वगैरे भाषांचीहि बाजू गर्भित रीतीनें पुढें मांडीत असतों. मराठीचे पुरस्कर्ते युनिव्हर्सिटींत किंवा लोकमतप्रदर्शक वर्तमानपत्रांच्या मुलखांत प्रमुख आहेत, ह्या गोष्टीचा आमच्या कानडी, गुजराथी, सिंधी वगैरे बंधूंनीं विषाद न मानतां उलट आनंदच मानला पाहिजे; कारण ह्या इतर भाषा बोलणाऱ्या लोकांची संख्या लहान असल्यामुळें त्यांच्याकडूनच ह्या मोठ्या सुधारणांची तरफदारी होण्यास सुरवात झाली असती तर युनिव्हर्सिटीनें किंवा सरकारनें या प्रश्नाची उपेक्षा किंबहुना उपहासहि केला असता. पण मराठी भाषा बोलणाऱ्या दोन कोटी लोकांच्यातर्फें हा प्रश्न मांडण्यांत आला असतां त्याचीहि वासलात वरीलप्रमाणें लावण्याची सरकारची छाती होणार नाहीं अशी आमची पक्की खात्री आहे. मराठ्यांकडे म्हणजे मराठीच्या अभिमान्यांकडे या चळवळीचें पुढारीपणत्व येत असलें तरी तिचा हेतु इतर सर्व देशी भाषांचा आपल्या बरोबरीनें हक्क सांगण्याचा आहे व या चळवळीस फळ मिळाल्यास मराठी-

प्रमाणें इतर भाषांनाहि तें मिळाल्याखेरीज रहाणार नाहीं. ‘मातृभाषा हाच स्वराज्याचा पाया’ अशी आमची समजूत असल्यामुळेंच कर्नाटक कॉलेजसारख्या कर्नाटकाकरितां स्वतंत्र संस्था निघाल्यास आम्ही त्यांचें अभिनंदन करितों व राजकीय स्वराज्याच्या चळवळींत सर्वस्वीं एक असतां, कानडी वाङ्मयाचा अभ्यास व प्रसार करणाऱ्या साहित्यसंस्था निघाल्यास या त्यांच्या स्वतंत्रपणाच्या बाण्याचें आम्हांस केव्हांहि कौतुकच वाटतें. अशाच दृष्टीनें बडोदें, ग्वाल्हेर व इंदूर या संस्थानचे राज्यकर्ते मराठे असले तरी संस्थानांतील प्रजा मुख्यतः इतर भाषा बोलणारी असल्यामुळें त्यांनीं सरकारी दप्तराची भाषा गुजराथी किंवा हिंदी केल्यास आम्हांला मनांतून त्यांचें बिलकूल वाईट वाटत नाहीं. मराठी मुलखाच्या सरहद्दीला लागलेल्या व एकवार मराठीच्या अमलाखालीं असलेल्या मुलखांतील आमच्या बंधुवर्गाविषयीं आमची मनःस्थिति अशाप्रकारें निर्मळ असल्यामुळें, सिंध वगैरे प्रांतांतील आमच्या बांधवांना आमच्या देशी भाषेच्या पुरस्काराच्या हेतूविषयीं यत्किंचितहि अंदेशा येण्याचें कारण नाहीं हें सांगणें नकोच.

पण देशी भाषांच्या या वादांत ज्यांना स्वतःची म्हणून भाषा आहे अशांचें समाधान वरील विचारसरणीनें थोडेंबहुत करतां येईल. पण हल्लीं सरकारदरबारीं किंवा युनिव्हर्सिटींत दुर्दैवानें अशा लोकांचें वर्चस्व आहे कीं, त्यांना हिंदुस्थानांतील कोणत्याहि देशी भाषेचा अभिमान नाहीं; व ज्यांना आगंतुक कारणांनीं इंग्रजीसारख्या परभाषेचा भलताच अभिमान उत्पन्न झालेला आहे. आजपर्यंत ज्या कारणाकरितां राजकीय चळवळीच्या प्रगतीस मुंबई शहराचा जाच आम्हाला भासत होता, तींच कारणें या देशी भाषेच्या सुधारणेच्या प्रगतीस अद्यापि आड येत आहेत, असें कष्टानें म्हणावें लागतें. यांत दोष असला तर माणसापेक्षां परिस्थितीचाच अधिक आहे हें आम्ही जाणत नाहीं असें नाहीं. पण दोष कोणाचाहि असला तरी असला जाच दूर व्हावा याविषयीं आम्हास झगडणें सारखेंच प्राप्त आहे, व केवळ हाच झगडा करण्याकरितां शिक्षण–परिषदेंत मराठी भाषेच्या अभिमान्यांनीं पुढाकार घेतलेला होता. मुंबई शहर हें मुंबई इलाख्याच्याच नव्हे तर एका अर्थानें सर्व हिंदुस्थानच्या राजधानीचें शहर आहे व तेथील कारखानदारी, श्रीमंती, व्यापार वगैरे गोष्टी या राजधानीस

अनुरूप अशा व सर्व हिंदुस्थानांत पहिल्या प्रतीच्या आहेत ही गोष्ट आम्ही आनंदानें कबूल करितों. पण एवंगुणविशिष्ट अशा या शहरास राष्ट्रीय भावनेच्या दृष्टीनें शुद्ध बकाली असें कंगाल नांव देण्याशिवाय गत्यंतर नाहीं याचें आम्हांस वाईट वाटतें. मुंबईतील सत्ता ही मुंबईतील लोकसंख्येच्या मानानें पहातां सर्वस्वीं व्यस्त प्रमाणांत असलेली आढळून येईल. मुंबईतील शेंकडा सत्तर इतकी लोकवस्ती मराठ्यांची आहे. त्याच्या खालोखाल नंबर गुजराथी व हिंदुस्थानी भाषा बोलणारांचा लागेल, व एका अर्थानें मुंबईच्या वातावरणांत दगडी कोळशाच्या धुराच्या बरोबरीनें इंग्रजी भाषा मिसळ-ल्याचा भास होत असला तरी ज्यांची मातृभाषा खरोखरी इंग्रजी आहे अशा लोकवस्तीचा नंबर सर्वांत खालीं लागेल यांत शंका नाहीं. असें असतां मुंबई शहरांत पहावें तों अभिमान सर्व इंग्रजी भाषेविषयीं ! मातृभाषा म्हणून कांहीं पदार्थ आहे किंवा मुंबई शहराबाहेर मुंबई इलाखा म्हणून कांहीं आहे, अशी कल्पनाहि येथील प्रस्थप्राय बनलेल्या लोकांच्या स्वप्नांतहि कधीं येत नाहीं; व त्यामुळेंच सर्व शिक्षणविषयक सुधारणांची या शहरीं गळचेपी होते. पण त्यांतल्या त्यांत विशेष दुःखाची गोष्ट ही कीं, आपल्या धंद्याच्या निमित्तानें मुंबई शहरीं वास्तव्य घडलेल्या मराठी, गुजराथी, कानडी वगैरे लोकांनाहि इंग्रजी भाषेचा अंमल कोणत्या बाबतींत किती चालवा याचा विवेक रहात नाहीं. व्यापार व राज्यकारभार या बाबीपुरती इंग्रजी भाषा अवश्य असली तरी शिक्षणाच्या कामीं किंवा घरींदारींहि इंग्रजीचें वर्चस्व असण्याचें कारण नाहीं. हा सूक्ष्म विचार केवळ धंदेवाईक लोकांना आपल्या धंद्याच्या गर्दींत दिसून न आला तरी शिक्षकवर्ग व राष्ट्रीय भावनेच्या दृष्टीनें विचार करणारे लोक यांना अशी डोळेझांक करतां येणें शक्य नाहीं, म्हणून मुंबई शहरीं मातृभाषांच्या स्वराज्यांचें निशाण रोंवण्याचें काम अत्यंत अवघड असलें तरी त्या कामास खरा प्रारंभ तेथेंच झाला पाहिजे, व तसा प्रारंभ शिक्षण-परिषदेंत झाला, याबद्दल आम्हास समाधान वाटतें. मुंबई शहराची परिस्थिति विशेष प्रकारची असल्यामुळें फार तर इतकें म्हणतां येईल कीं, मुंबई इलाख्यांत महाराष्ट्र, गुजराथ, कर्नाटक, सिंध हे जसे भाषेच्या दृष्टीनें स्वतंत्र पोटप्रांत होतात तसाच मुंबई शहर हाहि एक स्वतंत्र पोटप्रांत असावा व वर सांगितल्याप्रमाणें मुंबई शहरीं इंग्रजी मातृभाषा असणारांची संख्या

सर्वांत थोडी असली तरी इंग्रजीच्या अभिमान्यांचे सर्व चोचले पुरविण्याला किंवा इंग्रजीला मनसोक्त धुडगूस घालण्याला मुंबई शहर हें मोकळेंच सोडून देण्यास सर्व लोकांनीं तयार व्हावें. पण सर्व इलाखा म्हणजे कांहीं मुंबई शहर नव्हे. ह्या दृष्टीनें, विद्येचें आदिपीठ जी युनिव्हर्सिटी तिचें संस्थान मुंबई शहरीं असलें तरी तिचें धोरण व तिचा कारभार मुंबई शहराच्या तंत्रानें न चालतां, इलाख्याच्या तंत्रानेंच चालला पाहिजे, हा हक्क किंवा तो बजावण्याचा आग्रह आम्ही केव्हांहि सोडणार नाहीं.

मातृभाषाविषयक सुधारणासंबंधानें लिहितांना, मुंबईच्या एका प्रमुख इंग्रजी पत्रानें असें ध्वनित केलें आहे कीं, देशी भाषांतून शिक्षण देणें, परीक्षा घेणें व भाषावार युनिव्हर्सिट्या स्थापन करणें, या कल्पना दिसण्यांत जरी मोहक दिसल्या तरी त्या अव्यवहार्य म्हणून तरी त्याज्य होत. या बाबतींत या पत्राकडून इतकी सौम्य भाषा वापरली गेली याचेंहि कारण झालें तरी शिक्षण–परिषदेंत मातृभाषाभिमान्यांनीं विशेष जोर धरून या अंध आक्षेपकांच्या डोळ्यांवर सत्य तत्त्वाचा प्रकाश बराचसा पाडला हेंच होय. पण टीकेची भाषा सौम्य असली म्हणून विरोधाची अढी मोडलेली आहे असें घेऊन चालणें, शहाणपणाचें होणार नाहीं व मातृभाषांच्या प्रगतीच्या मार्गांत अव्यवहार्य असें अगडबंब नांव देऊन जे किल्लेकोट उभारण्यांत येतात, त्यांच्यावर कसून हल्ला करून ते वेळींच जमीनदोस्त करून टाकले पाहिजेत. स्वराज्याच्या मागणीच्या मार्गांतहि संभावितपणानें विरोध करूं इच्छिणारे लोक हाच अव्यवहार्यतेचा अडथळा आणीत असतात ही गोष्ट आतां प्रसिद्धच आहे. पण कोणतीहि सुधारणा व्यवहार्य किंवा अव्यवहार्य हें ठरणें तिच्या पुरस्कर्त्यांच्या उद्योगावर व जोरकसपणावरच अखेर अवलंबून असतें; हें जसें स्वराज्याच्या चळवळींत आतां बरेंचसें प्रत्ययास आलें आहे, तसेंच या शिक्षणविषयक सुधारणेच्या कामींहि तें आपणांस प्रत्ययास आणून देतां येईल. मात्र देशभाषांची ही चळवळ कांहीं प्रमुख लोकांनीं स्वतःच तिला वाहून घेऊन नेटानें करीत राहिलें पाहिजे. मुंबई युनिव्हर्सिटी ही इलाख्यांतील लोकांकरितां आहे, लोक कांहीं या युनिव्हर्सिटीकरितां नाहींत हें जें या विषयांतील आद्यतत्त्व तें युनिव्हर्सिटीच्या दारावर लिहून ठेविलें पाहिजे व तें तेथें सुवर्णाक्षरांनीं लिहिण्यास सोयीनें परवानगी न मिळेल तर पूर्वीं युरोपांत

ल्यूथरनें पोपला धाब्यावर बसवून आपल्या धर्मविषयक सुधारणांचीं अक्षरें वेशीवर जशीं खिळे ठोकून चढविलीं तशींच आमच्या शिक्षणसुधारकांनींहि तीं मुंबई युनिव्हर्सिटीच्या दारावर निश्चयाचे खिळे ठोकून चढविलीं पाहिजेत. मातृभाषेच्या द्वारें सर्व प्रकारचा शिक्षणव्यवहार करणें ही गोष्ट कदाचित् थोड्याबहुत खर्चाची असेल किंवा या सुधारणेमुळें युनिव्हर्सिटीच्या कचेरीचा कारभार थोडाबहुत वाढेल ही गोष्ट आम्हास कबूल आहे. पण सर्व राष्ट्रीयत्वाच्या मुळाशीं असलेल्या अशा हिंदी भाषांचा विचार करीत असतां ५।५० हजार रुपये खर्च अधिक लागेल किंवा युनिव्हर्सिटीच्या कचेरींत १०।५ कारकुन अधिक ठेवावे लागतील, किंवा १०।२० परीक्षक आणि १००।५० शिक्षक अधिक नेवावे लागतील अशा पोरकट सबबींवर ही सुधारणा आम्हीं मागें पडूं दिली तर त्यांत सरकारच्या शहाणपणापेक्षां आमच्या पुरुषार्थाचीच परीक्षा अधिक होणार आहे. असले प्रश्न जगांत आज पहिल्यानें हिंदुस्थानांत उत्पन्न झाले आहेत असें नाहीं. राजाची भाषा एक व प्रजेची भाषा दुसरीच अशा प्रकारची भानगड यापूर्वी कमींतकमी १०।५ देशांत तरी उपस्थित झालेली होती व त्या प्रत्येक ठिकाणीं अखेर मातृभाषांच्या पुरस्काराचाच जय झाला ही गोष्ट मुंबईतील धेंडांनीं व सरकारानेंहि लक्षांत वागविली पाहिजे. येथील फर्ग्युसन कॉलेजांतील एक प्रोफेसर व शिक्षाविचारमंडळाचे अध्यक्ष रा० विश्वनाथ बळवंत नाईक, एम्. ए. ह्यांनीं ह्या विषयावर एक निबंध लिहून नुकताच प्रसिद्ध केला आहे. त्यांत या वादग्रस्त प्रश्नाचा निकाल इतर देशांतून लोकांनीं कसा लावून घेतला ह्याची साधार माहिती दिलेली आहे. ती या प्रश्नाचा विचार करणारांनीं एकवार अवश्य वाचावी अशी आमची शिफारस आहे. जी स्थिति आज इंग्रजी अंमलामुळें हिंदुस्थानांत उत्पन्न झाली आहे तीच पूर्वी रशियन अमलाखालीं फिन्लंडांत, ऑस्ट्रियन अमलाखालीं हंगेरींत व ब्रिटिश अमलाखालीं कानडा व दक्षिण आफ्रिका यांमध्यें उत्पन्न झाली होती. पण त्या त्या ठिकाणीं प्राथमिक शिक्षणापासून वरिष्ठ शिक्षणापर्यंत सर्व व्यवहार प्रजाजनांच्या मातृभाषेंतूनच झाला पाहिजे असा निकाल होऊन तो अमलांतहि आलेला आहे. दक्षिण आफ्रिकेंत या प्रश्नावर रण माजून त्या वादाला राजकीय स्वरूप प्राप्त झालें होतें. पण १८८२ सालापासून पुढें १०।५

# १६. देशी भाषांतूनच परीक्षा घ्या

( केसरी, तारीख २२ ऑगस्ट १९१६. )

एका वर्षांत मुंबई युनिव्हर्सिटीचे दोन पदवीदानसमारंभ अलीकडे होऊं लागले आहेत. या गोष्टीचे इतर फायदे काय होत असतील ते असोत; परंतु समारंभाचे अध्यक्ष म्हणजे चॅन्सेलर किंवा व्हाइस-चॅन्सेलर यांना शिक्षणसंबंधीं भाषण करण्याचा पूर्वी वर्षांतून एकच प्रसंग येत असे ते आतां दोन येऊं लागले आहेत हा एक फायदाच म्हणावयास हरकत नाहीं. गेल्या मंगळवारीं युनिव्हर्सिटीचा जो सहामाही पदवीदानसमारंभ झाला यांत सुदैवानें व्हाइस-चॅन्सेलर डॉ० मॅकिकन यांनीं एक अत्यंत महत्त्वाचा विषय चर्चेसाठीं घेतला होता. तो विषय म्हटला म्हणजे हायस्कुलांतून शिक्षण कोणत्या भाषेच्या द्वारें दिलें जावें हा होय. शाळांतून घोकंपट्टी फारच होत असते या मुद्याला अनुलक्षून बोलतांना 'घोकंपट्टी टाळण्यास उपाय काय ?' हा प्रश्न सहजच त्यांच्यापुढें आला ! व त्याचें उत्तर देतांना त्यांना ही गोष्ट मुख्यतः कबूल करावी लागली कीं, घोकंपट्टी कांहीं अंशीं टाळावयाची तर विद्यार्थ्यांना शिक्षण द्यावयाचें तें मातृभाषेंतूनच दिलें पाहिजे; एरवीं त्यांना कोणत्याहि विषयांतील मूळ कल्पना व सिद्धांत नीट समजणार नाहींत. व हाच मुद्दा पुढें चालू करून ते म्हणाले:—"याकरितांच शिक्षणखात्यानें शहाणपणानें शिक्षणाच्या व परीक्षा घेण्याच्या कामीं मातृभाषांचा उपयोग करण्याला उत्तेजन दिलें आहे. परंतु या सवलतीचा फायदा बराचसा घेतला जात नाहीं; आणि अगदीं लहान मुलांनाहि कांहीं कांहीं विषय प्रारंभापासून परक्या भाषेच्या द्वारें शिकावे लागतात. एकी भाषा त्यांना समजत नाहीं व तिच्या द्वारें आपला अर्थ स्पष्ट करून कसा सांगावा हेंहि कळत नाहीं. याचा परिणाम असा होतो कीं, केवळ आपल्या स्मरणशक्तीवर भार टाकून त्यांना घोकंपट्टी करावी लागते; व लहानपणीं लागलेली ही संवय विद्यार्थ्यांच्या प्रौढ दशेंतहि कायम राहते. माझें स्वतःचें तर असें मत आहे कीं, शिक्षणाचें द्वार या नात्यानें इंग्रजी भाषेचा आमच्या सर्व शाळांतून फाजील उपयोग केला जातो; व त्याचा प्रारंभहि विद्यार्थ्यांच्या फार लहानपणापासून होतो. वरील गोष्टीनें

इंग्रजी भाषेला यथाप्रमाण मदत होते, असें मात्र नाहीं; किंबहुना इंग्रजीचा उपयोग अधिक बेताचा पण यथायोग्य कालीं सुरू केल्यास त्यापासूनच इंग्रजी भाषेचा अभ्यास व तिचें ज्ञान अधिक चांगलें होईल."

डॉ० मॅकिकन यांचे वरील उद्गार ऐकून कोणासहि समाधानच होईल. परंतु देशी भाषांस आपण असें उचलून धरलें तर पुढेंमागें सर्वस्वीं त्यांचें प्रस्थच बोकाळेल कीं काय, अशी चोरटी भीति वाटून त्यांनीं पुढें लगेच आपला हात थोडासा आंखडता घेतला व ते म्हणाले, "मीं वर जी मातृभाषांची तरफदारी केली आहे तिचा अर्थ असा मात्र घ्यावयाचा नाहीं, कीं युनिव्हर्सिटीच्या मॅट्रिक्युलेशन परीक्षेंतील प्रश्नोत्तरांचे कागदहि विद्यार्थ्यांच्या मातृभाषेंतून लिहिण्याची परवानगी द्यावी. ही परवानगी द्यावी असें म्हणणारे फाजील उत्साही असे कित्येक लोक आहेत; परंतु त्यांच्या हें लक्षांत येत नाहीं कीं, ही परीक्षा मातृभाषेच्या द्वारें घेऊं लागल्यास अतिशय गोंधळ होईल; एवढेंच नव्हे, तर ही त्यांची मागणी मान्य झाल्यास विद्यार्थ्यांचें भावी यशहि धोक्यांत सांपडेल. युनिव्हर्सिटींत परीक्षे-करितां हल्लीं एकच भाषा चालू आहे व पुढेंहि ती एकच चालू ठेवली पाहिजे. अर्थात् इंग्रजी हीच ती भाषा होय. हायस्कुलांतच, म्हणजे युनिव्हर्सिटींत प्रवेश होण्यापूर्वीच, इंग्रजी भाषेच्या द्वारें विषय कसा शिकावा व मांडावा हें विद्यार्थ्यांस चांगलें येऊं लागलें पाहिजे. इंग्रजी भाषा या विषयावरील प्रश्नोत्तरें विद्यार्थ्यांस इंग्रजींतून देतां येतील असें मानलें, तर त्या भाषेंतून त्यास इतर विषयांवरील प्रश्नोत्तरेंहि देण्याइतकी इंग्रजी भाषेची ओळख त्याला झाली आहे असेंहि मानण्यास काय हरकत? उलट विषय मूळ देशी भाषेंत शिकल्यामुळें त्यांची समजूत त्याला अधिक झालेली असणार, व यामुळें इंग्रजी भाषेंतून त्यांची मांडणीहि अधिक चांगली करतां येईल."

डॉ० मॅकिकन यांना प्रस्तुत भाषणांत देशी भाषांची तरफदारी कर-ण्याची इच्छा कां झाली याचें नक्की कारण आम्हास सांगतां येत नाहीं. पण ज्या फाजील उत्साही मातृभाषाभक्तांचा डॉ० साहेबांनीं निषेध केल्याचें वर सांगितलें आहे, त्यांनीं या बाबतींत डॉ० साहेबांस लिहिलेलें पत्र कदाचित् कारणीभूत झालें असावें. या फाजील उत्साही मातृभाषाभक्तांचें

नांव ' शिक्षाविचारमंडळ ' असें असून त्यानें शिक्षणासंबंधीं हातीं घेतलेल्या अनेक विषयांपैकीं मातृभाषेच्या द्वारें शिक्षण देणें हा एक आहे. सदरहू मंडळ पुणें येथें अलीकडे नुकतेंच स्थापन करण्यांत आलेलें असून, त्यामध्यें केवळ शिक्षण हाच ज्यांचा व्यवसाय असे पुण्यांतील अनेक गृहस्थ आहेत. सदर मंडळाचे अध्यक्ष प्रोफेसर नाईक यांनीं नुकतेंच एक जाहीर पत्र बऱ्याच देशी व विदेशी पुढाऱ्यांना पाठविलें असून, मातृभाषेच्या प्रश्नासंबंधानें अभिप्राय जमविण्याचें त्यांचें काम सुरू आहे. याच जाहीरपत्राची एक प्रत डॉ० मॅकिकन यांजकडे गेली होती, व पदवीदानसमारंभाच्या वेळच्या आपल्या भाषणांत मातृभाषेच्या विषयाचा उल्लेख त्यांना यावरूनच सुचला असण्याचा संभव आहे. तसेंच असेल तर ' शिक्षाविचारमंडळा ' ला सुदैवानें आपल्या मोहिमेच्या पहिल्या तोंडींच सामन्याला महारथी भेटला म्हणावयाचा ! असो. डॉ० मॅकिकन यांना भाषणविषयाची सूचना कशानेंहि होवो, त्यांच्या भाषणांतील वर दर्शविल्याप्रमाणें निम्मा भाग मातृभाषांना अनुकूल असाच आहे व याबद्दल त्यांचे आभार मानणें जरूर आहे. पण अशा प्रकारची अनुकूलता अशा लोकांकडून आजच प्रथम मिळाली आहे असें नाहीं. मातृभाषांवर बहिष्कार घालण्याचा पहिला कठीण काळ निघून जाऊन बरेच दिवस झाले. युनिव्हर्सिटींत व खालीं हायस्कुलांत अर्थात् निरनिराळ्या प्रकारानें का होईना, मातृभाषेचा परामर्ष घेण्याची चळवळ होऊन लोकमताचा विजय झाला; आणि युनिव्हर्सिटींत एम्. ए. या परीक्षेस देशी भाषा या विषयाची निदान ऐच्छिक म्हणून तरी गणना करण्यांत आली. तसेंच खालीं हायस्कुलांतून देशी भाषांतून शिक्षण द्यावें व परीक्षाहि घेण्यास परवानगी असावी असा सरकारनें कांहीं दिवसांपूर्वी हुकूम सोडला. पण दिसण्यांत जरी या गोष्टींनीं मातृभाषेच्या मार्गांतील अडचण नाहींशी झाल्यासारखी दिसली, तरी वस्तुतः ती नाहींशी झाली नाहीं. कारण बालेकिल्ला सर झाला नाहीं तोंपर्यंत किल्ल्याचा इतर भाग सर करण्यापासून फारसा लाभ होत नाहीं. तोच न्याय प्रस्तुत प्रकरणींहि लागू पडल्याचें दिसून येतें.

हायस्कुलांतील शिक्षण पूर्ण झाल्याचा दाखला मिळण्यास किंवा युनि-

बदलेल असें नाहीं. शिवाय एकाच भाषेंत, म्हणजे इंग्रजींतच, आज प्रश्नो-त्तरें दिलीं जातात तेव्हां झालें तरी एकच परीक्षक सर्व कागद स्वतः तपा-सतो असें नाहीं. अर्थात् आजहि तारतम्याचें धोरण एकाच मापानें आंखलें जाऊं शकत नाहीं. असें असतांहि बक्षिस व स्कॉलर्शिप शेवटीं कोणास द्यावी हें निश्चित करण्यास कांहीं मार्ग सांपडतोच, राहत नाहीं; व आजहि जी गोष्ट होते तीच उद्यां निरनिराळया भाषांतून उत्तरें देण्याची परवानगी दिल्यासहि घडून येईल. तात्पर्य, इच्छा असेल तर मार्गहि सांपडेल; पण ही इच्छा होणें युनिव्हर्सिटीच्या अधिकाऱ्यांना कसें भाग पाडावें हीच काय ती मुख्य अडचण आहे. आतां ही गोष्ट आम्ही जाणून आहों कीं, मातृभाषेचा प्रवेश अभ्यासांत किंवा परीक्षेंत होण्यास आमच्यापैकीं कित्येक लोक अद्यापि अज्ञानामुळें प्रतिकूल आहेत; व कित्येक पार्शी वगैरे लोक मातृभाषेचा अभि-मान नसल्यामुळें प्रतिकूल आहेत. अर्थात् अशा लोकांची समजूत घालणें हेंच 'शिक्षाविचारमंडळा'सारख्या लोकांचें पहिलें कर्तव्य आहे. तें त्यांनीं झटून केल्यास युनिव्हर्सिटीच्या सेनेटसभेंतील हिंदु, मुसलमान व पार्शी इतके सर्व एका बाजूस येतील; व तसें झाल्यास युरोपियन सभासदहि आपला विरोध सोडून देतील किंवा मग त्यांनीं तो न सोडला तरीहि अडणार नाहीं. कारण, युरोपियन सभासद वजनदार असले तरी सुदैवानें बहुमत तरी त्यांचें नाहीं. मातृभाषेंतून परीक्षा होण्यासंबधानें आणखीहि थोडेंसें विवेचन आम्हास करावयाचें आहे; पण त्यास आज स्थलावकाश नाहीं.

---

## १७. युनिव्हर्सिट्या व देशी भाषा

( केसरी, तारीख २३ जानेवारी १९१७ )

मुंबई युनिव्हर्सिटीच्या गेल्या पदवीदानसमारंभाच्या वेळीं व्हाइस चान्सेलर डॉ० मॅकिकन यांनीं देशी भाषांतून शिक्षण देण्याच्या सुधारणेस अनुकूल असे उद्गार काढले होते हें 'केसरी' च्या वाचकांस स्मरत असेलच. कलकत्ता युनिव्हर्सिटीचा पदवीदानसमारंभ दोन आठवड्यांपूर्वीं झाला, त्याहि प्रसंगीं व्हाइस चान्सेलर डॉ०सर्वाधिकारी यांनीं अशाच प्रकारचे उद्गार काढले. हिंदी विश्वविद्यालयाच्या अत्युच्च पीठांवरून देशी भाषांचा अशा रितीनें पुरस्कार

होऊं लागला आहे त्याअर्थी या भाषांच्या दैन्याचे दिवस संपून नशीब उघडण्याची वेळ आतां जवळ येत चालली असें मानण्यास फारशी हरकत नाहीं. ' देशी भाषांतून शिक्षण देणें आज सोईचें नाहीं, कारण त्या भाषा जितक्या ग्रंथसमृद्ध असाव्या तितक्या अद्याप झाल्या नाहींत, ' ही एक मुख्य तक्रार असते; व दुसरी तक्रार अशी असते कीं, ' शिक्षणाच्या कामीं देशी भाषांचा विशेष उपयोग होऊं लागल्यास, विद्यार्थ्यांचा इंग्रजी भाषेशीं परिचय त्याप्रमाणानें कमी होत जाऊन, त्यांचें इंग्रजी भाषेचें ज्ञान जें आधींच कमकुवत असतें तें आणखीहि कमकुवत होईल. ' डॉ० सर्वाधिकारी यांनीं आपल्या भाषणांत या दोनहि आक्षेपांना योग्य उत्तर दिलें आहे. बंगाली भाषेसंबंधानें त्यांनीं असें सांगितलें कीं, चॉसर किंवा ब्रीड या जुन्या इंग्रजी ग्रंथकारांच्या वेळेच्या पूर्वींच इकडे बंगाली वाङ्मयानें स्वदेश समृद्ध करून आपल्या संपत्तीचा फायदा दुसऱ्या देशांना देण्यास सुरवात केली होती; हल्लींहि मोठमोठे विद्वान् लोक बंगाली वाङ्मयाचें कौतुकच करतात; व कोणत्याहि विषयावरील संशोधनात्मक चर्चेस बंगाली भाषा पुरी पडत असल्याचा अनुभव येत आहे. बंगाल्यांतच काय पण कोणत्याहि सजीव राष्ट्रांत अशीच गोष्ट असणार. जपानमध्यें शास्त्रीय अभ्यास व शास्त्रीय संशोधन हीं ज्ञपान्यानें चालू आहेत आणि एका दृष्टीनें जपान हा इंग्रजी राष्ट्राचा पूर्ण पक्षपातीहि आहे. पण इंग्रजी भाषा अधिक समृद्ध म्हणून जपानानें कांहीं तिचें दास्य पतकरलेलें नाहीं, तर बऱ्या वाईट रीतीनें स्वदेशी भाषेवरच निर्वाह करून घेतला आहे.

मुंबई विद्याखात्याचे माजी डायरेक्टर मि० शार्प यांनीं जपानच्या शिक्षणपद्धतीसंबंधानें जो एक ग्रंथ लिहिलेला आहे त्यांत त्यांनीं खालील आशयाचे उद्गार काढलेले आहेत. " पन्नास वर्षांपूर्वीं पाश्चात्य शिक्षणाच्या भोक्त्यांना वरच्या वर्गास इंग्रजी शिक्षण मिळालें म्हणजे तेंच हळूहळू झिरपत खालच्या लोकांपर्यंत जाईल असें वाटत होतें. ही आशा जी हिंदुस्थानांत फारशी सफळ झाली नाहीं ती जपानांत मात्र पुष्कळशी सफळ झाली. त्याचें कारण जनतेला जें शिक्षण मिळालें तें सर्व देशी भाषेंतून, हें होय. जपानी भाषा ही शिक्षणविषयक व्याख्यानांना निरुपयोगी ठरेल असें कित्येक जपानी लोकांनाहि वाटत होतें; पण फुकुसावा वगैरे प्रसिद्ध

प्रोफेसरांनीं ही समजूत चुकीची असल्याचें स्वतःच्या उदाहरणानें सिद्ध करून दिलें, आणि मुलांचें शिक्षण जपानी भाषेंतून झाल्यास ते परभाषेपेक्षां निम्या किंवा तिजाई वेळांत होतें असें अनुभवास आल्यामुळें परदेशी मिशनरी लोकांनाहि आपल्या शाळांतून स्वभाषा वर्ज करून जपानींतूनच शिक्षण द्यावें लागलें.''

भाषेची अडचण असली तरी ती मनुष्याच्या इच्छेपुढें कितीशी टिकणार ? धन्यानें म्हणजे मनुष्याच्या इच्छेनें सांगितलेलें काम भाषेला एखाद्या आज्ञाधारक दासीप्रमाणें केलेंच पाहिजे. करून करूनच तिच्या कामाला सौष्ठव व सौकर्य येत असतें. नवीन शब्द हाताशीं तयार नसल्यामुळें प्रथम थोडी अडचण वाटणें स्वभाविक आहे. पण थोड्याशा प्रयत्नानें ही अडचण दूर होते; व ती सर्वस्वी दूर नच झाल्यास फार तर जरूरी पुरते परभाषेंतील शब्द घेतल्यानें काम भागतें. एखाद्या रोगावर हटकून गुणकारी असें स्वदेशी औषध न मिळाल्यास आपण परदेशी औषध घेऊन गरज भागवितों. औषध स्वदेशी नाहीं म्हणून अडून बसून प्रकृति बिघडवून घेत नाहीं. 'पण औषध परदेशी घ्यावयाचेंच तर मग आधीं धर्मांतर करून बाटतहि कां नाहीं ? कारण तुम्हांस परदेशी औषध घ्यावयाचेंच आहे.' असें जर कोणी सांगूं लागला तर तें जितकें हास्यास्पद होईल तितकेंच, गरजेखातर एखादा शब्द परदेशी घ्यावा लागला किंवा परभाषेंतील पुस्तकें वाचावीं लागलीं तर तेवढ्यामुळें सर्व शिक्षणव्यवहारच अजीबात परभाषेंतून करा हें सांगणेंहि हास्यास्पद होईल. आज असे पुष्कळ विषय आहेत कीं, ज्यांचा अभ्यास इतर युरोपियन भाषांतूनच विशेष झालेला असून त्यावर इंग्रजी भाषेंत फारसे ग्रंथ नाहींत. हे विषय शिकण्याचा उत्तम मार्ग म्हटला म्हणजे इंग्रज विद्यार्थ्यांनीं त्या त्या देशांतील विद्यापीठांत राहून अभ्यास करणें हाच होय. पण तें शक्य नसल्यानें इंग्लंडांतील विद्यालयांतच जर त्यांचा अभ्यास करावयाचा झाला तर, त्या त्या परकी भाषेंतून शिक्षण न देतां इंग्रजी भाषेंतूनच शिक्षण देण्यांत येतें हें लक्षांत ठेवलें पाहिजे. हिंदुस्थानासहि हाच न्याय लागू व्हावा एवढेंच देशी भाषांच्या पुरस्कर्त्यांचें म्हणणें आहे.

इंग्रजी भाषेच्या कोत्या ज्ञानासंबंधाच्या आक्षेपाला डॉ० सर्वाधिकारी

यांनीं जें उत्तर दिलें तें समर्पक तर आहेच, पण कित्येकांस तें विरोधाभासात्मकहि वाटण्याचा संभव आहे. ते म्हणतात, 'देशी भाषांच्या द्वारें शिक्षण दिल्यानें इंग्रजीचें ज्ञान कच्चें राहील हें खरें नसून उलट आज विद्यार्थ्यांचें इंग्रजीचें ज्ञान कच्चें आढळतें; त्याचें कारण बहुतेक शिक्षण परदेशी भाषेच्या द्वारें होतें हेंच होय.' आधीं एक तर केवळ इंग्रजी भाषेच्या ज्ञानाला फार फाजील महत्त्व देण्यांत येतें. इंग्रजी ही ज्यांची मातृभाषा ते लोक ती भाषा जितकी चांगली बोलतात तितकीच ती विजातीय लोकांनाहि चांगली बोलतां आली पाहिजे असा आग्रह कोणी काय म्हणून धरावा ? भाषा आणि केवळ विषयज्ञान या दोन गोष्टी अगदीं वेगवेगळ्या व स्वतंत्र आहेत. डॉ० जॉर्ज ॲडम् स्मिथ यांनीं असें स्पष्ट मत दिलें आहे कीं, ऑक्सफर्ड, केंब्रिज वगैरे इंग्रजी युनिव्हर्सिट्या किंवा एडिंबरो वगैरे स्कॉटिश युनिव्हर्सिट्या यांच्यांतील विद्यार्थ्यांशीं, केवळ बुद्धिसंपत्तीच्या दृष्टीनेंच तुलना करूं गेल्यास, हिंदी विद्यार्थी कांहीं कमी भरणार नाहींत. अर्थात् हिंदी विद्यार्थ्यांचा कमकुवतपणा असेल तर तो विषयज्ञानाच्या भरण्यांतच मुख्यतः असतो; पण त्याचें कारण मात्र ते विषय त्याला स्वदेशी भाषेंतून शिकतां येत नाहींत, परदेशी भाषेंतून शिकावे लागतात हेंच होय. म्हणून देशी भाषांतून शिक्षण देण्यास सुरुवात केल्यानें शिक्षणाचें कार्य शंभर वर्षें मागें ढकलल्यासारखें होईल असें कित्येकांना भय वाटतें तें खरें नसून उलट तें पुढेंच ढकलल्यासारखें होईल.

भाषा हा केवळ विचारांचा पोषाख होय. आचारांतील काय किंवा विचारांतील काय, पोषाख हा किती मर्यादेपर्यंत परकी स्वीकारावा हें समंजस मनुष्यास सांगावें लागत नाहीं. परकी पोषाखाच्या या निषेधाला " आम्हीं आज आमचा जुना पोषाख तरी सर्वस्वीं कोठें ठेवला आहे ? " हें कांहीं उत्तर होऊं शकत नाहीं. कोणत्याहि देशांत कालानुरोधानें नवीन नवीन प्रकार पाहून जुन्या पोषाखांत हळुहळू फरक पडत जाणारच. पण उदाहरणार्थ, आजचा आंगरखा जाऊन लाँग कोट त्याचे जागीं आला, एवढ्याकरितां मुद्दाम रुमाल किंवा पागोटेंहि टाकून साहेबी टोपीच कां घालीत नाहीं ? असें कांहीं कोणीहि समंजस मनुष्य विचारीत नाहीं. हिंदी विचारांच्या पोषाखांतहि इंग्रजीच्या अनुकरणानें बराच फरक पडलेला आहे.

केवळ कल्पनाच इंग्रजी नव्हेत तर भाषेची रचना, ठेवण, मांडणी हीसुद्धां थोडीशीं इंग्रजीच्या वळणावर गेलीं आहेत व जात आहेत हें आम्हास कबूल आहे. पण तेवढ्यामुळें देशी भाषा अजीबात टाकून व्यवहाराला इंग्रजी भाषाच घ्या असें कोणास कसें म्हणतां येईल? बचनागाचीं झाडें जेथें पुष्कळशीं आहेत अशा रानांत वस्ती करावी लागल्यास नित्य पिण्याच्या पाण्याबरोबर बचनागाचा थोडथोडा अंश पोटांत गेल्याशिवाय राहणार नाहीं हें खरें. पण हें कारण देऊन भात–भाकरीच्या ऐवजीं नित्य बचनागाची पूडच कां खात नाहीं असें कोणीं विचारलें तर शोभेल काय? मनुष्याची प्रकृति प्रसंगोपात्त विषहि पचनी पाडूं शकते. पण विषापासून मृत्यु न येतां तें केवळ पचनीं पडण्यास त्याचें सेवन फारच स्वल्पांशानें व्हावें लागतें ही गोष्ट विसरून चालावयाचें नाहीं.

पण इंग्रजीच्या फाजील भोक्त्यांना देशी भाषांकडे पाहाण्याची ही दृष्टीच नाहीं त्याला त्यांनीं काय करावें? हे लोक हिंदी मुलांचें प्राथमिक शिक्षण पहिलीं तीन चार वर्षें देशी भाषांतून व्हावें एवढी तरी सवलत मेहेरबानगी करून देतात; पण नोएल्स म्हणून एक इतके परोपकारी इंग्रज गृहस्थ आढळण्यांत आले आहेत कीं, त्यांनीं शिक्षणांतून हिंदी लिपीच्या लिपी वर्ज करून टाकावी व प्राथमिक शिक्षण देणें तेंच मुळीं रोमन म्हणजे इंग्रजी मुळाक्षरांच्या द्वारें देण्यास सुरुवात करावी असें टाइम्स ऑफ इंडियांतून अनेक वेळां प्रतिपादिलेलें आमच्या वाचण्यांत आलें आहे. हिंदी लोकांच्या कल्याणाची कोण ही घाई! परोपकारित्वाचा कोण हा उतावळेपणा! इंग्रज लोक हिंदुस्थानांत आम्हांस सुधारणेचें शिक्षण देण्याकरितां गुरू म्हणूनच अवतरले तेव्हां "आपणासारिखे करिती तात्काळ, नाहीं काळ वेळ तयालागीं" या सद्‌गुरुलक्षणाचा अंगिकार त्यांनीं केल्यास काय नवल? पण असल्या सद्‌गुरूंच्या उपदेशाला यश येण्याला सुदैवानें शिष्यहि तसाच उतावळा व वैराग्यसंपन्न असावा लागतो. पण आम्ही हिंदी लोक तशा प्रकारचे शिष्य नाहीं. फार काय, पण या गुरूचें शिक्षणहि आम्ही डोळे मिटून स्वीकारावयास तयार नाहीं. इंग्रजांच्या शिकवणींत आम्हांस जें चांगलेसें दिसेल तें आम्ही घेणार नाहीं असें नाहीं; पण तें आम्ही इंग्रजांच्या सोईनें न घेतां आमच्या सोईनें घेऊं ही गोष्ट आमच्या

परोपकारी गुरूंनीं जितकी लक्षांत ठेवावयास पाहिजे तितकी त्यांनीं लक्षांत ठेवलेली दिसत नाहीं. चांगलें किंवा अनुकरणीय खरें; पण तें रूपानें, पोषाखपेहरावानें, व शक्य तितकें गुणानेंहि आम्हांस आमचें असें वाटूं शकेल तरच, व तेंहि त्यावर आमचा शिक्का मारूनच आम्ही घेऊं. विजातीय आचारविचार प्रकृतीस मानवण्यास व गुणकारी होण्यास ते हिंदी राष्ट्रीय जठराच्या द्वारें पिचून, पचून व आमच्या पिंडासारखे बनून राष्ट्रीय शरीरांत भिनले पाहिजेत. नाहीं तर काच किंवा हिरा सुंदर दिसला म्हणून खाल्ला तर तो शरीराचे तेज न वाढवितां उलट आंतडीं कापूनच बाहेर पडणार. एखादें रसायन वीर्यवान् म्हणून कच्चें खाल्लें तर तें अंगावर फुटल्याशिवाय राहत नाहीं. तसेंच इंग्रजी वाङ्मयांतील कांहीं विचारांच्या हव्यासामुळें आपण अधीर होऊन स्वभाषा टाकून परभाषेचा जर सर्वस्वीं अंगिकार केला तर राष्ट्राच्या सर्व संस्कृतीच्या परंपरेचाच समूळ उच्छेद होतो ही गोष्ट इंग्रजी भाषेचा फाजील पक्षपात करणारे लोक अगदींच विसरून जातात.

सुदैवानें परभाषेच्या समर्थनाचा हा अतिरेक फक्त कांहीं माथेफिरू किंवा वेडया व्यक्तींपुरताच असतो; व वर दर्शविल्याप्रमाणें आमच्या युनिव्हर्सिट्यांचे देशी व विदेशी व्हाइस–चॉन्सेलरहि आतां देशी भाषांचें समर्थन करूं लागले आहेत. पण देशी–विदेशी भाषांच्या या युद्धांत निकराच्या हल्ल्याचें व निकराच्या बचावाचें जें एक ठिकाण आहे तेथपर्यंत अद्यापि मजल पोंचावयाची आहे. हें ठिकाण म्हणजे केवळ शिक्षणच नव्हे तर परीक्षाहि देशी भाषांतून घेतल्या जाव्या हा सिद्धांत होय. डॉ. मॅक्किकन यांनीं ही मारामार या ठिकाणापर्यंत केव्हां तरी जाऊन पोंचणार असें चाणाक्षपणानें हेरून, 'शिक्षण देशी भाषांतून दिलें तरी परीक्षा मात्र इंग्रजींतून घेतल्या जाव्या,' असें आपल्या भाषणांत प्रतिपादन करून ठेवलें आहे, हें वाचकांस आठवत असेलच. पण ही अट वास्तविक अव्यवहार्य आहे. परीक्षा जोंपर्यंत देशी भाषांतून घेतल्या जाणार नाहींत तोंपर्यंत देशी भाषांतून दिलेल्या शिक्षणाचा पुरा फायदा आमच्या पदरांत केव्हांहि पडणार नाहीं. शिक्षण व अभ्यास यांचें पर्यवसान जोंपर्यंत परीक्षांच्या द्वारेंच व्हावयाचें आहे, तोंपर्यंत अभ्यासापेक्षां व शिक्षणापेक्षां परीक्षांनाच विद्यार्थ्यांनीं अधिक महत्त्व दिल्यास त्यांत आश्चर्य नाहीं. पण या तार-

तम्यभावाचा प्रत्यक्ष परिणाम एकदम असा होतो कीं, देशी भाषेंतून शिक्षण मिळण्याची सोय असली तरी ती टाकून देऊन इंग्रजी भाषेंतून मिळणाऱ्या शिक्षणाच्या सोयीचाच ते एकांगी फायदा घेऊं इच्छितात. उघडच आहे, ज्या गांवाला जावयाचें नाहीं त्याची वाट कोण पुसणार ? बरें; शिक्षण देशी भाषेंतून द्यावयाचें पण परीक्षा मात्र इंग्रजींतून घ्यावयाची हा आग्रह तरी विपरीतच नव्हे काय ? पचायला चांगली व रुचीला स्वादिष्ट म्हणून खीर केली, पण ती वाडग्यांत न देतां ताटांत ओतली आणि चमचाहि न देतां विलायती त्रिशूळी कांट्यानें खावी असा आग्रह धरला तर ती पोटांत कशी जाणार ? कांट्यानेंच खावयाचें तर जाडाभरडा पावाचा तुकडा तरी बरा. सारांश, शिक्षणक्रमाचें मैदान देशी भाषांना मोकळें सोडलें तरी चालेल, पण परीक्षेची खिंड तेवढी इंग्रजी भाषेच्या हातीं राहिली पाहिजे, असा ज्या कारणाकरितां परभाषाभिमान्यांचा आग्रह त्याच कारणाकरितां उलट देशी भाषाभिमान्यांचा आग्रहहि देशी भाषांतूनच परीक्षा व्हाव्या असा असणार. ज्याच्या हातीं खिंड किंवा किल्ला त्याच्याच हातीं केव्हांहि भोंवतालचें सर्व मैदान राहणार हें उघड आहे.

मॅट्रिक्युलेशनची परीक्षा इंग्रजींतूनच घेतली जावी असा आग्रह धरणारांचा हेतु पुढें कॉलेजांतील सर्व शिक्षणक्रमहि इंग्रजींतूनच निरंतर व्हावा असा असतो हें उघड आहे. पण देशी व विदेशी भाषांचा खरोखरच जर विरोध आहे असें मानलें तर तो हायस्कूलच्या शिक्षणापर्यंतच आहे अशी तरी कोणी आपली समजूत काय म्हणून करून घ्यावयाची ? कॉलेजांतील शिक्षण झालें तरी तें देशी भाषांतून देणें अशक्य कां मानलें जावें ? पण कोणी तसें मानितात का ? तळमजला पडला म्हणजे त्याच्या वरचा मजला जसा न पाडतां आपोआप पडतो तशीच भाषा व शिक्षण यांची स्थिति आहे. वरिष्ठ शिक्षणांत प्रवेशच देशी भाषांच्या द्वारें झाला म्हणजे वरिष्ठ शिक्षणहि देशी भाषांच्याच द्वारें दिलें जावें हें आपोआपच स्वाभाविकसें दिसूं लागतें. तसेंच सर्व वरिष्ठ शिक्षण देशी भाषांतून द्यावयाचें तर मग युनिव्हर्सिटीच्या युनिव्हर्सिटीच देशभाषामय होण्यास काय हरकत ? ही गोष्ट कोणी आज उच्चारण्याची देखील सोय नाहीं, कारण या विचार-सरणीला एकदम जहाल हेंच काय पण अराजक असें सुद्धां नांव मिळा-

वयाचें! पण वरील नांवांनीं डागलेल्या कित्येक इतर सत्य सिद्धांतांप्रमाणें हा सिद्धांतहि पुढें मागें व्यवहार्य ठरल्याशिवाय राहणार नाहीं असा आम्हास तरी भरंवसा आहे. इंग्रजीचें महत्त्व विशेष म्हणून अभ्यासक्रमांत त्याला इतरांच्या मानानें वाटेल तर थोडें अधिक महत्त्व द्या; पण महाराष्ट्रांतलि युनिव्हर्सिटी मराठी, बंगाल्यांतली बंगाली, हिंदुस्थानांतील हिंदी, गुजराथेंतील गुजराथी, कर्नाटकांतील कानडी, आंध्रांतील तेलगू व दक्षिण हिंदुस्थानांतील तामीळ हवी; असें म्हणण्यांत कांहीं अपराध घडतो किंवा पाप होतें असें आम्हास वाटत नाहीं. जे आज मॅट्रिक्युलेशनची परीक्षा सुद्धां देशी भाषांतून होऊं नये असा आग्रह धरतात त्यांच्या गळ्यांतून सर्व युनिव्हर्सिटीच देशभाषामय व्हावी हा घांस सुखानें खालीं कसा उतरणार? पण त्यांच्या गळ्यांतून तो उतरो वा न उतरो, आमच्या तरी गळ्यांतून तो खालीं सुखानें उतरूं शकतो. लॉर्ड सिडेनहॅम यांनीं पौर्वात्य देशाकरितां ज्या प्रांजल विचारसरणीची 'स्पेशल' शिफारस केली आहे तिचाच आश्रय करून आम्हीहि असें म्हणतो कीं, "हा घांस इंग्रजांच्या गळ्यांतून न उतरला तरी आम्हाला चालेल. आमच्या लोकांच्या गळ्यांतून उतरला म्हणजे पुरे. कारण हिंदी युनिव्हर्सिटींत विद्यामृत प्राशन केल्यानें आमच्या राष्ट्राचें पोट भरावयाचें आहे. इंग्रजी राष्ट्राचें नव्हे. मग वरिष्ठ शिक्षण झालें तरी तें देशी भाषेंतून आम्हांला मिळावें असें म्हणण्यास चोरी किंवा भीड कां?" इंग्रज लोकांची कल्पनाशक्ति फार आकुंचित असतें हें खुद्द चिरोलसाहेबांनींहि कबूल केलेलें आहे. केवळ त्या दोषामुळेंच, हिंदुस्थानांत भाषावार युनिव्हर्सिटया स्थापल्या जातील या भावी गोष्टीचा उजेड त्यांच्या डोक्यांत अद्यापि पडत नाहीं. पण उज्ज्वल कल्पनाशक्तीची त्यांची वाण आपण हिंदी लोक आपल्या स्पष्टोक्तीनें भरून काढूं या म्हणजे झालें. उज्ज्वल कल्पनेचा उपयोग कोणतीहि गोष्ट कोणीं सांगितल्याशिवाय आपोआप समजणें हा असतो. पण स्पष्टपणें वरचेवर सांगितलेली गोष्टहि न समजण्याइतके कांहीं मंदबुद्धि इंग्रज लोक खास नाहींत.

---

# १८. सक्तीचें शिक्षण व त्याचा खर्च

(केसरी, तारीख ११ जुलै १९११)

ना. गोखले यांनीं वरिष्ठ कायदेकौन्सिलापुढें सक्तीच्या शिक्षणासंबंधानें जें बिल आणलें आहे तें सरकारमार्फत बहुतेक म्युनिसिपालिट्या व लोकलबोर्डें यांच्याकडे अभिप्रायासाठीं पाठविण्यांत आलें होतें; आणि गेल्या महिनाअखेर त्यांपैकीं बऱ्याच संस्थांकडून सदर बिलास अनुकूल असे अभिप्राय लिहून गेल्याचें समजतें. शाळेंत जाण्याचें ज्यांचें वय आहे अशा खेड्यापाड्यांतल्या मुलांनीं शाळेंत जावें, घरीं राहून उनाडूं नये, याविषयीं आईबाप व इतर पालनकर्ते यांजवर कायदेशीर सक्ति करितां यावी, हेंच कायतें मुख्य तत्त्व सदर बिलाच्या मुळाशीं आहे. पण या तत्त्वांतून अनुषंगभूत असे दोन प्रश्न सहजच उद्भवतात. पैकीं एक असा कीं, मुलें शाळेंत न जाण्यास त्यांची स्वतःची उनाडकी हौस किंवा त्यांच्या पालनकर्त्यांची हयगय हें जसें एक कारण असतें, तसेंच मुलें शाळेंत घातलीं असतां त्यांना द्यावी लागणारी फी देण्यास पालकांना ऐपत नसणें हेहि एक असतें, नाहीं असें नाहीं. शहरांत राहणाऱ्या आम्हां लोकांना मुलांस शाळेंत पडणाऱ्या फीच्या अड-चणीची चांगलीशी कल्पना कदाचित् येणार नाहीं. परंतु खेडेगांवांतून-म्हणजे एकंदरीनें शाळेंत जाण्यास योग्य अशा वयाच्या मुलांचा जेथें भरणा, तेथें ही अडचण पुष्कळ पालकांना चांगलीच भासत असेल यांत शंका नाहीं. शेतकरी व कामगारवर्गाच्या कुटुंबांत होतां होईतों प्रत्येक मुलामाणसानेंहि कांहींतरी पोटास मिळविण्याची आवश्यकता असते. शिवाय खेडेगांवांतून रोकड पैशाची टंचाई फार. यामुळें साधारण गरीब कुटुंबांत शाळेंत जाण्यासारखीं चार मुलें असलीं तर त्यांनीं मोलमजुरी करून महिन्याचेकाठीं आठ बारा आणे मिळवून आणण्याची जेथें अपेक्षा असणार, तेथें उलट त्यांच्या पोटास घालून वरती त्यांच्या विद्येकरितां महिना आठबारा आणे खर्च करणें हें ज्यांना उरावर दगड ठेवल्यासारखें होणार असेच आईबाप खेडेगांवांत पुष्कळ. अर्थात् आईबापांचीं मुलें शाळेंत न जातां घरीं राहिलीं, तर त्यांस त्यांची हयगय हेंच केवळ कारण नसून दारिद्र्य हेंहि कारण असणें शक्य आहे; आणि शिक्षणाची सक्ति करणें हें पाप नसून पुण्यच आहे, असें जरी

कोणास वाटलें तरी दारिद्र्याचा हा प्रश्न त्यानें विसरतां कामा नये. पण याचा अर्थ शिक्षणाची सक्ति कोठेंहि करूंच नये असा नव्हे, तर ही सक्ति करावयाची झाल्यास बिनऐपतदार आईबापांच्या मुलांस तरी अगदीं फुकट शिक्षण मिळण्याची व्यवस्था झाली पाहिजे, हाच होय. वरील दोहोंतून मिळून निघणारा तिसरा प्रश्न असा कीं, शिक्षणाची सक्ति करावयाची म्हणून इकडे शिक्षण मोफत दिलें पाहिजे आणि दुसरीकडे सक्ति केल्याच्या योगानें शाळेंत जाणाऱ्या मुलांची संख्या पुष्कळच वाढणार, तेव्हां इतक्या मोठ्या संख्येस फुकट शिक्षण द्यावयाचें म्हणजे शिक्षणावरचा खर्चहि पुष्कळ वाढणार, मग तो कोणीही करो. अशा रीतीनें शिक्षणाच्या चांगल्या कामींहि का होईना; पण कायद्याची सक्ति करणारच, तर शिक्षण फुकट मागण्याचा पालकाचा हक्क आणि वाढत्या व सक्तीच्या शिक्षणास लागणाऱ्या पैशाची तरतूद, या तीन बाबी ना० गोखले यांच्या बिलासंबंधानें विचार करितांना आपोआप पुढें येतात. या तिन्ही बाबींची व्यवस्था सर्वमान्य अशा रीतीनें करण्याचा प्रयत्न ना० गोखले यांनीं आपल्याकडून शक्य तितका केला आहे. तथापि, हा प्रयत्न कोणत्या बाबीसंबंधानें साधला आहे व कोणत्या बाबीसंबंधानें साधला नाहीं, याचा आपण थोडासा विचार करूं.

सक्तीचा प्रश्न वास्तविक मुळींच अवघड नाहीं. कारण, एक तर कायद्याची सक्ति ही आम्हां हिंदुस्थानांतील लोकांच्या पांचवीलाच पुजलेली असते असें म्हणावयास हरकत नाहीं. सर्वसाधारणतः जो कायदा घडण्याच्या कामीं लोकांस बहुमताचा हक्क नसतो त्या प्रत्येक कायद्याचा अंमल तत्त्वतः कितीहि कायदेशीर म्हणजे 'कॉन्स्टिटयूशनल' असला तरी त्या लोकांवर तो एक प्रकारचा 'कॉन्स्टिटयूशनल' जुलूमच म्हणण्यास हरकत नाहीं. अशा स्थितींत ज्यांची सक्ति होते अशा वाईट कायद्यांबरोबर कांहीं चांगले कायदेहि होऊं शकतात; व लोकांचें कायदेकौन्सिलांत बहुमत नसतांहि त्यांनीं स्वतः बहुमतानें केल्याप्रमाणेंच तें त्यांस मान्य होणें संभवनीय असतें. उदाहरणार्थ अमुक एक वयाच्या आंत मुलाच्या देवी काढल्याच पाहिजेत, अमुक एक कालावधींत जन्ममरणाची वर्दी दिलीच पाहिजे. खानेसुमारीचा कारकून घरीं आला असतां त्यांस कुटुंबांतील माणसांची माहिती पुरविलीच पाहिजे, अथवा कोर्टांतील साक्षीदाराच्या

पिंजऱ्यांत चढलें असतां शपथ घेतल्यावर सांगावयाचें तें सांगितलेंच पाहिजे, वगैरे गोष्टी सर्वमान्य, सर्वसंमत अशा कायदेशीर सक्तीचीं उदाहरणेंच होत. ना० गोखले यांच्या बिलानें शिक्षणाच्या कामीं कांहीं आईबापांवर सक्ति होणार हें जरी सकृद्दर्शनीं खरें असलें तरी तिचा समावेश वरील 'सर्वमान्य' सक्तीच्या उदाहरणांतच करण्यास हरकत नाहीं. वर सांगितल्याप्रमाणें कायद्याच्या सक्तीनें हिंदुस्थानांतील समाजाच्या अंगास आजवर जीं अनेक भोंकें पडलेलीं आहेत त्यांत शिक्षणविषयक सक्तीनें पडणारें भोंक दिसून येईल किंवा शरीरास जाणवेल असें मुळींच नाहीं. कायद्याची सक्ति आली म्हणजे तिजबरोबर योग्य सवलतीहि याव्या लागतात व ना० गोखले यांच्या बिलांत या बाबतींतल्या सवलती भरपूर ठेविल्या आहेत, हें मागें तारीख २१ मार्चच्या केसरींत या विषयावर लिहितांना आम्ही स्पष्ट करून दाखविलेंच होतें. तात्पर्य धार्मिक पुण्य व सामाजिक हित साधावयाचें तर व्यक्तिमात्रास थोडीबहुत तरी यमनियमांचीं बंधनें सोसल्याशिवाय गत्यंतरच नसतें; आणि आजारांत पथ्य करण्याप्रमाणें व औषध घेण्याप्रमाणें हीं बंधनें सोसण्यास मनुष्य बहुधा आपखुषीनेंच तयार असतो. शिक्षणासारख्या विषयांत आणि ना० गोखले यांच्या बिलांत योजलेल्या सवलती पाहिल्यावरहि आम्ही या सक्तीच्या विरुद्ध आहों असें म्हणणारे जे लोक निघतील त्यांत तत्त्वप्रिय बाणेदार लोकांपेक्षां वावदूक कांगावखोरांचाच भरणा अधिक असणार हें अगदीं उघड आहे. शिक्षणापासून आधींच झालेल्या एवढ्या लोकजागृतीस भिऊन प्राथमिक शिक्षण मोफत व सक्तीचें करणें म्हणजे वेड्याच्या हातीं कोलीत देण्याप्रमाणेंच घातक आहे असें म्हणणारे कांहीं थोडे सद्भावी अधिकारी व अधिकारी म्हणतात तेंच वेदवाक्य असें मानून त्यांच्या निषेधास री ओढणारे त्यांचे कांहीं हिंदी बगलबच्चे आहेत; यांचा समावेश वर सांगितलेल्या वावदूकांतच आम्ही करितों हें सांगावयास नकोच.

ज्यांना शिक्षणाची सक्ति मान्य आहे त्यांना शिक्षण फुकट दिलें जावें हें सहजच मान्य होतें. आतां सक्ति केली म्हणून आपल्या मुलांस शिक्षण फुकट मिळावें असें सर्वच आईबाप म्हणूं लागतील तर तेंहि बरोबर होणार नाहीं! कारण लक्ष्मी आणि सरस्वती यांचें विसंवादित्व बहुधा सनातन

किंवा अनादिसिद्धच आहे; आणि द्रव्यांत लोळत असतां विद्येकडे पाठ फिरविणारे लोक कांहीं थोडे नसतात. श्रीमंत आईबापांचीं मुलें मूर्ख, खुळीं व अचरट असावयाचीं असा जो कांहीं अंशीं नियम बनून गेला आहे त्याचें कारण झालें तरी हेंच होय. अर्थात् अशा आईबापांवर–मोफत शिक्षणाची सवलत न ठेवितांहि–मुलांस शाळेंत पाठविण्याबद्दल सक्ति करणें यांत कांहींच वावगें नाहीं! आणि ना० गोखले यांच्या बिलांत झालें तरी शिक्षणविषयक सक्तीच्या भरीस पडून गरिबांबरोबर श्रीमंतांसहि मोफत शिक्षणाची खैरात त्यांनीं वांटली असा अप्रयोजकपणा त्यांच्या पदरीं बांधतां येईल असें कांहींएक नाहीं. मुलांस शाळेंत पाठविण्यासंबंधानें सक्ति करावयाची ती कोणी, कोणावर, केव्हां, कशा रीतीनें करावी, योग्य कारणाकरितां माफी कितपत मिळावी, आणि गुन्हेगारासहि झालें तरी शासन कोणचें व कितपत व्हावें, यासंबंधांतील नियमाप्रमाणेंच, फीची सूट देणें झाल्यास ती कोणास किती मिळावी, याविषयींचे नियमहि ना० गोखले यांच्या बिलांत बीजरूपानें आहेत; व ते थोड्याबहुत फरकानें सर्वमान्य होतील असें आम्हांस वाटतें. तथापि तिसरी बाब म्हणजे मोफत व सक्तीच्या खर्चाच्या योजनेविषयींची. ही मात्र वरील दोन्हीहून अधिक वादग्रस्त आहे, यांत शंका नाहीं. प्राथमिक शिक्षण देण्याची जबाबदारी खरोखर मुख्यतः कोणाची आहे? आज या शिक्षणावर लोक व सरकार यांजकडून होत असलेल्या खर्चाचें परस्पर प्रमाण काय पडतें व याच दिशेनें आणखी एक पाऊल पुढें टाकावयाचें तर त्याचा खर्च कोणी व किती सोसावा, हे प्रश्न उपस्थित होतात.

तत्त्वत: राजनीतींत झालें तरी वेदांताप्रमाणें अद्वैतच आहे. म्हणजे राजा व प्रजा यांत भेदभाव नाहीं. प्रजेचे हक्क आणि राज्यकर्त्यांचे अधिकार यांची मांडणी निराळी असली तरी त्यांचा हेतु एकच आहे; आणि प्रजाजन आपखुषीनें स्वत:वर कर लादून घेत असल्यामुळें सरकारी खजिन्यांतील पैसा हा आपलाच आहे, या उदात्त कल्पनेची प्रतीति त्यांस होऊं शकते. इंग्लंड, फ्रान्स, अमेरिका, ऑस्ट्रेलिया या स्वतंत्र प्रजासत्ताक राष्ट्रांत हें राजकीय अद्वैत प्रत्यक्ष सिद्ध होतें. पण हिंदुस्थानसारख्या देशांत म्हणजे जेथें प्रजेची काडीवरहि व्यवच्छिन्न व संपूर्ण अशी सत्ता नाहीं त्या ठिकाणीं सरकार व

प्रजा या दोन आत्म्यांचें द्वैत भासमान झाल्यास व त्यांच्या परस्पर हक्कांमध्यें खराखुरा विरोध दिसल्यास त्यांत नवल नाहीं. अर्थात् हिंदुस्थानांत प्राथमिक शिक्षण देण्याची जबाबदारी सरकारची कीं लोकांची व त्याला लागणारा खर्च कोणीं करावा ? सरकारनें कीं लोकांनीं ? असा हा विरोधमूलकवाद हिंदुस्थानांत उत्पन्न होणारच. आज खरोखर पाहूं गेलें असतां प्राथमिक शिक्षणावरचा ताबा सर्वस्वीं सरकारच्या हातांत आहे. त्याची प्रत्यक्ष व्यवस्था बऱ्याच ठिकाणीं म्युनिसिपालिट्या व क्वचित् लोकलबोर्डें यांच्या हातीं आहे; आणि या शिक्षणाचा खर्च कांहीं ठिकाणीं सरकार सर्व स्वतः करीत असून, म्युनिसिपालिट्या व लोकलबोर्डें यांना कांहीं ठराविक प्रमाणावर त्या खर्चास सरकार मदत देत आहे. अशा स्थितींत सक्तीचें व मोफत शिक्षण देण्याचें ठरलें तर लागणारा अधिक खर्च 'सर्वस्वीं सरकारनेंच सोसावा' अथवा 'सर्वस्वीं लोकांनींच सोसावा' हें म्हणणें युक्तिविरुद्ध नसलें तरी परंपरेविरुद्ध खास आहे. ज्याचा ताबा त्याचा खर्च हें म्हणणें वास्तविक सरळ आहे आणि वास्तविक चाललेंहि पाहिजे. पण एक तर सरकाराकडे सर्व ताबा म्हणून सरकारानेंच सर्व खर्च सोसावा हें तत्त्व शिक्षणाप्रमाणें इतर ठिकाणीं आपण लागूं करूं लागलों असतां आज बहुधा अनवस्था प्रसंग येणार. कारण कोणत्याहि राज्यांत सरकारचा पैसा म्हणजे प्रजेपासून कराच्या योगानेंच वसूल केलेला असणार. अर्थात् सरकारानें पैसा खर्च करावा याचा अर्थ इतकाच होतो कीं, एक तर तिजोरींत उतरणाऱ्या सर्वसाधारण शिल्केंतून तो व्हावा; अथवा आज शिल्लक नसेल तर चालू खर्चांत काटकसर करून शिल्लक उरवावी व तींतून करावा. दुसऱ्या शब्दांनीं बोलावयाचें तर असें म्हणूं कीं, प्रजेवर आहे ह्याहून प्रत्यक्ष अगर अप्रत्यक्ष कराचें ओझें न वाढतां, आणि ज्या खात्यांवर व कामांवर होणारा खर्च आपल्या हिताकरितांच आहे असें प्रजेस वाटतें त्या खात्यांकडे व कामांकडे आजमितीस तोडून दिलेला तनखा कमी न होतां, अधिक लागणाऱ्या खर्चाची व्यवस्था परस्पर व्हावी. नवीन कराची बाब वगळली म्हणजे बाकी उरलेलें हें भांडण केवळ खात्यांखात्यांचेंच आहे व अशा तऱ्हेचीं खात्याखात्यांतील भांडणें इकडेच काय पण स्वतंत्र व प्रजासत्ताक राज्यांतहि असतातच. उदाहरणार्थ, लष्करी खातें व सिव्हिल सर्व्हिस यांवरील खर्च कमी करावा

आणि तो पैसा लोकशिक्षणाकडे द्यावा असें आज आमचें आग्रहाचें भांडण आहे. आणि तसें झाल्यास प्राथमिक शिक्षणावर होणारा अधिक खर्च सरकारनें सोसला असें म्हणण्यास आम्ही तयार होऊं—मग हल्लींचा आमच्यावरील करभार एक पैनेंहि कमी न झाला तरी चालेल ! पण वर दर्शविल्याप्रमाणें वरील अर्थानें वाढत्या प्राथमिक शिक्षणाचा खर्च सर्व सरकारानेंच सोसावा हें म्हणणें बरोबर नाहीं. उलटपक्षीं हा सर्व खर्च लोकांचा लोकांनींच सोसावा—त्यांना शिक्षण मोफत व सक्तीचें पाहिजे असेल तर आपला आपण कर बसवून तो खर्च त्यांचा त्यांनींच भागवावा, हेंहि म्हणणें बरोबर नाहीं. इंग्रजी अंमल सुरू झाल्यावर शिक्षणास प्रथम सुरवात सरकारच्या स्वतःच्या इच्छेनेंच झाली—तेव्हां कोणीं बिल आणलें नव्हतें—तरी शिक्षणाचा खर्च इंग्रज सरकारनें विलायतेंतून पैसा आणून केला नव्हता, लोकांवरील करांतूनच तो देण्यांत आला होता व आज इंग्रज सरकारच्याहि इच्छेच्या पुढें जाऊन शिक्षण सक्तीचें करा असें जरी लोक म्हणत आहेत, तरी हा जादा खर्च करण्याच्या कामीं सरकारनेंहि आपला भाग उचललाच पाहिजे. राज्यकारभारास लागणारा सर्व पैसा प्रजाच कराच्या रूपानें पुरविते या दृष्टीनें पहातां तिजोरींतला सर्व पैसा लोकांचा, आणि करानें जमविलेल्या पैशावर सरकारची खरी अनियंत्रित सत्ता आहे या दृष्टीनें तोच पैसा सरकारचा म्हणतां येईल. शिक्षणावर लागणारा खर्च लोकांनीं करावा, असें सरकार जेव्हां म्हणतें तेव्हां त्याचा अर्थ लोकांनीं अधिक कर देऊन करावा असाच होईल. पण तोच खर्च सरकारनें करावा असें जेव्हां लोक म्हणतात तेव्हां तो पैसा आपणच दिलेला असतो—सरकार विलायतेंतून पैसे आणीत नाहीं—हें त्यांस माहीत नसतें असें नाहीं. पण एकदां बसलेली करपट्टी माफ किंवा कमी होण्याची जर आशा नाहीं, तर त्या करपट्टीच्या पैशांतून शिक्षणासारख्या सत्कार्याला खर्च झालेला पैसा आपल्याच खिशांत परत आला, असें समाधान मानण्याची लोकांची तयारी असते इतकेंच.

पण सरकार व लोक एवढेच जे दोन राजकीय समाजाचे भाग पूर्वी होते त्यांत म्युनिसिपालिट्या आणि लोकलबोर्डें अस्तित्वांत आल्यापासून एका तिसऱ्या भागाची भर पडली आहे. १८८२ सालीं स्थानिक स्वराज्य देण्यांत

आलें त्यावेळीं सरकार व स्थानिक स्वराज्याच्या संस्था यांच्या दरम्यान् कामाची, उत्पन्नाची व खर्चाची वांटणी करण्यांत आली. पैकीं प्राथमिक शिक्षण हें म्युनिसिपालिट्या व लोकलबोर्डें यांजकडे देण्यांत आलें. विवक्षित कर बसविण्यास त्यांना परवानगी देण्यांत येऊन या उत्पन्नापैकीं कांहीं भाग त्यांनीं शिक्षणाकडे खर्चावा व त्यांस या कामीं मदत म्हणून सरकारनेंहि कांहीं रक्कम देत जावी, असें ठरलें. लोकलबोर्डास लोकलफंड, टोलदस्तुरी वगैरे करांचें उत्पन्न तोडून दिलेलें असतें, आणि शिक्षणावर बोर्डें जो खर्च करतील त्याच्या एकद्वितीयांशाइतकी रक्कम मदतीदाखल सरकार देतें. म्युनिसिपालिटयांना घरपट्टी, जकात वगैरे सर्वसाधारण स्वरूपाचे कर बसविण्याचा अधिकार दिलेला असतो; आणि शहरांतून प्राथमिक शाळा चालविण्याचें काम त्यांजकडे देऊन त्यावर आपल्या उत्पनांतून त्यांनीं जरूर तो खर्च करावा आणि त्यांनाहि या खर्चाच्या एकद्वितीयांशाइतकी मदत सरकारनें दरसाल द्यावी अशी पद्धत आज अमलांत आहे. ना० गोखले यांचें बिल पास झालें तरी सरकार व स्थानिक कमिटया यांनीं मिळून वाढता खर्च सोसावा हेंच अनुमान परंपरेवरून निघणार. कारण बिलापूर्वी जेथें थोडीं मुलें शिकत होतीं तेथें तीं कांहींशीं जास्त शिकूं लागणार इतकेंच. पण यामुळें आज जी शिक्षणपद्धति व दोघांनीं मिळून खर्च करण्याची व्यवस्था रूढ झाली आहे तिच्यांत एकदम कांहीं विलक्षण फेरफार होण्यास कारण आहे असें नाहीं.

तथापि, हा खर्च दोघांनीं मिळून करावयाचा झाला तरी प्रत्येकानें किती हिस्सा सोसावा हा प्रश्न राहतोच. आज सरकार लोकलबोर्डामार्फत होणाऱ्या प्राथमिक शिक्षणावरील खर्चास एकद्वितीयांशापासून दोन तृतीयांशापर्यंतहि खर्च सोसतें; व म्युनिसिपालिटयांमार्फत होणाऱ्या प्राथमिक शिक्षणावरील खर्चास सरकार एकतृतीयांशापासून एकद्वितीयांशापर्यंत मदत देतें. पण ना० गोखले यांच्या बिलाप्रमाणें शिक्षण सक्तीचें झाल्यास सरकारच्या मदतीचीं हीं दोन्हीं प्रमाणें वाढल्याशिवाय गत्यंतर नाहीं. आज म्युनिसिपालिटयांस लोकलबोर्डापेक्षां कमी मदत सरकार देतें. पण शहरांतील लोकांस शिक्षणासंबंधीं एकप्रकारची हौस वाटते. म्युनिसिपालिटयांमधून लोकलबोर्डापेक्षां सुशिक्षित लोकांचा भरणा जास्त असतो, व शहरांतील

प्राथमिक शाळांची व्यवस्था सर्वस्वीं म्युनिसिपालिट्यांच्याच हातीं असते, इत्यादि गोष्टींमुळें सरकाराकडून मिळावी तितकी मदत मिळाली अगर न मिळाली तरी आपल्या एकंदर उत्पन्नांतून शाळाखात्याकडे म्युनिसिपालिट्या बराच खर्च करितात, शिवाय शिक्षणाची सक्ति झाली तरी शाळेंत जाणाऱ्या मुलांची संख्या जी शहरांतून वाढेल ती म्युनिसिपालिट्यांच्या आवांक्याबाहेर जाईलच असें नाहीं. तात्पर्य, आज म्युनिसिपालिट्यांस शिक्षण-विषयक खर्चाच्या जवळ जवळ निम्या रकमेइतकी मदत सरकाराकडून हातीं पडते. तिचें प्रमाण वाढवून तें दोनतृतीयांश सरकारची मदत व एकतृतीयांश म्युनिसिपालिट्यांचा खर्च असें प्रमाण कायमचें ठरून गेल्यास शिक्षणाच्या सक्तीचा अम्मल करणें म्युनिसिपालिट्यांस परवडेल. लोकलबोर्डांस आज निम्याहून थोडी अधिक मदत सरकाराकडून मिळत आहे तिचेंहि प्रमाण वाढलें पाहिजे. म्हणजे कमींत कमी दोन हिस्से सरकारी मदत व एक हिस्सा लोकलबोर्डांचा खर्च असें हें प्रमाण—शिक्षणाच्या सक्तीचा प्रश्न असो वा नसो—आजच ठरणें जरूर आहे. कारण लोकलबोर्डांच्या शाळांची म्युनिसिपल शाळांच्या मानानें फारच दैन्यावस्था आहे. शिक्षण सक्तीचें झाल्यास लोकलबोर्डांच्या शाळेंतील मुलांची संख्या हल्लींहून बरीच वाढेल खरी पण सक्तीच्या शिक्षणाचा कायदा एखाद्या क्षेत्रास लागू करावा किंवा नाहीं, ही गोष्ट बिलानें केवळ ऐच्छिक म्हणून ठरविली असल्यानें फारशीं लोकलबोर्डें आपली सांपत्तिक स्थिति सुधारेपर्यंत कायदा लागू करून घेण्यास कबुली देणार नाहींत हें उघड आहे.

प्रस्तुत बिलांत खर्चाच्या हिस्सेरशीचा हा प्रश्न अजीबात वगळलेला आहे, व उलटपक्षीं बिलांतील आठव्या कलमांत, जी म्युनिसिपालिटी अगर जें लोकलबोर्ड हा कायदा आपल्यास लागू करून घेईल त्यास, सरकारची मंजुरी मिळवून, केवळ प्राथमिक शिक्षणाकरितां म्हणून मुद्दाम निराळा कर लोकांवर बसवितां यावा—व असा कर बसविल्यास त्या कराचें सर्व उत्पन्न मात्र केवळ प्राथमिक शिक्षणाकडेच खर्च व्हावें अशी परवानगी ठेवली आहे. या दोन गोष्टी एकत्र घेतल्या असतां सक्तीनें दिलेल्या शिक्षणाचा वाढता खर्च सर्वस्वीं लोकांनींच आपला आपण सोसावा अशी बिल पुढें आणणाराची अपेक्षा आहे असें दिसेल; पण वस्तुस्थिति तशी

नाहीं. कारण सदरहू बिल पुढें आणतांना ना. गोखले यांनीं जें भाषण केलें त्यांत खर्चाच्या वांटणीचें विवेचन त्यांनीं केलें आहे; व प्राथमिक शिक्षणाचा यापुढील खर्च दोन हिस्से सरकारनें सोसावा व एक हिस्सा लोकांनीं म्हणजे स्थानिक कमिटीनें सोसावा असें म्हटलें आहे. "स्थानिक सरकार व स्थानिक कमिट्या यांनीं सक्तीच्या शिक्षणाचा खर्च परस्पर किती सोसावा, याविषयीं बिलाच्या अठराव्या कलमामध्यें हिंदुस्थान-सरकारनें स्पष्ट नियम ठरवून द्यावा असें लिहिलेलें आहे; अर्थात् मी असें गृहीत घेऊन चाललों आहे कीं, प्रांतिक सरकारास शिक्षणाच्या कामीं अधिक खर्च करतां यावा म्हणून कांहीं जास्त रक्कम अथवा उत्पन्नाच्या बाबी हिंदुस्थानसरकार आपल्या स्वतःच्या तनख्यापैकीं तोडून देईल; आणि अशा रीतीनें प्रांतिक सरकार अधिक खर्च करण्यास तयार होईल तर शिक्षणाच्या सक्तीच्या तत्त्वाचा लाभ आपणांस होतो म्हणून वाढत्या खर्चास मदत करण्याकरितां जरूर तर स्थानिक कमिट्याहि मोठ्या खुशीनें आपणां स्वतःवर शिक्षणापुरता लहानसा कर बसवून घेतील. पण ज्या ज्या ठिकाणीं प्रस्तुत बिलाचा अंमल करण्याचा प्रसंग येईल त्या त्या ठिकाणीं तो अंमल यशस्वी व फलद्रूप होणें हें खुद्द सरकार वाढत्या शिक्षणावर किती खर्च करण्यास तयार आहे यावरच सर्वस्वीं अवलंबून राहील. मला वाटतें कीं, प्राथमिक शिक्षणाच्या बाबतींत कमींतकमी दोनतृतीयांश इतका खर्च सरकारनेंच सोसला पाहिजे असें म्हणण्याचा हक्क प्रजेस आहे." या उल्लेखावरून लोकांनीं स्वतः-वर शिक्षण-विषयक कर बसवून घ्यावा यावर ना० गोखले यांचा जितका रोंख आहे तितकाच, किंबहुना त्याहूनहि अधिक सरकारनें ग्रॅन्टच्या रकमा वाढवाव्या व खर्चाचा बोजा अधिक संभाळावा यावर आहे हें उघड दिसून येतें. तथापि नवीन कराची योजना प्रत्यक्ष बिलांत झाली, पण सरकारानें अधिक खर्च करण्याविषयींची शिफारस फक्त ना० गोखले यांच्या भाषणांतच राहिली; यामुळें बिलाच्या एकंदर स्वरूपाविषयीं गैरसमज होण्यास पुष्कळ लोकांच्या मतें योग्य कारण घडलें आहे. पुष्कळ लोकांचा असा समज झालेला आहे कीं, हें बिल पास झालेंच तर नवीन कर बसविण्याच्या कलमास मात्र कायद्याचें स्वरूप येईल. सरकारनें अधिक खर्च करण्याची शिफारस ही पुराणांतील वांग्यांप्रमाणें नामदारांच्या भाषणांतच राहून जाईल, नवीन

कराच्या कलमाचा फायदा घेऊन ठिकठिकाणीं कर बसविण्याचें सुरू होईल, व हळुहळू सरकार मात्र खर्चाच्या कामीं अखेर आपलें अंग काढून घेईल. तात्पर्य, बिलाचा अंमल होईल, मुलांवरील शाळेंत जाण्याची व आईबापां-वरील कर देण्याची सक्ति पदरांत पडेल, आणि सरकारावर खर्चाची सक्ति करण्याचें साधन कायद्यांत नसल्यामुळें सरकार मात्र सुटून जाईल! वरील प्रकारची विचारसरणी अगदींच असमंजसपणाची आहे असें नाहीं. कारण कायद्यांतील शब्दांचा अंमल व्हावा आणि त्या शब्दांचें अनुपान ज्या भाषणां-तून सांगितलेलें असतें त्यांतील आश्वासनें व वचनें खुद्द सरकारतर्फे दिलीं गेलीं असलीं तरी तीं विसरलीं जावीं हा अनुभव ज्यांच्या मनांत पक्का बिंबला आहे त्यांना प्रस्तुत बिलांतील ही धरसोड संशयास्पद व भीतिप्रदच वाटणार. प्रत्यक्ष बिलांत नवीन कर बसविण्याचें कलम जसें घालतां येतें त्याचप्रमाणें खर्चाच्या वांटणीचें कलमहि घालतां कां येऊं नये हा कोणाचाहि प्रश्न झाला तरी अगदीं सरळच आहे. आठवें व अठरावें कलम एकत्र करून लोकांनीं स्वतःवर बसविण्याचा कर आणि सरकारानें संभाळण्याचा खर्चाचा बोजा, यांविषयीं एकाच प्रकारची कायदेशीर व्यवस्था असावी अशी लोकांची अपेक्षा असणें स्वाभाविक आहे. प्रस्तुत बिल पास झालें तरी, अमुक एखाद्या क्षेत्रास तें लावावयाचें कीं नाहीं हें सरकार व स्थानिक संस्था या उभयतांच्या विचारें व्हावें असें कायद्यांत ठरविलें आहे तें बरोबर आहे; पण उभयतांच्या विचारें बिलाचा अंमल व्हावा असें ठरल्यास, सरकारानें व स्थानिक कमिट्यांनीं खर्च किती किती सोसावा याविषयीं शंका किंवा मतभेद होण्याचें राहूंच नये हें बरें. निदान सरकारी खर्चाच्या हिश्शाचीं कनिष्ठ प्रमाणें तरी कायद्यांत स्पष्ट ठरवून द्यावीं; या मागणींत वावगें असें कांहींच नाहीं. आतां कदाचित् हें बिल पुढें आणतांना, प्रथमच सरकारी खर्चाच्या प्रमाणाचें कलम त्यांत समाविष्ट कां केलें नाहीं? व सरकारानें खर्चाचा बोजा हल्लींहून अधिक सोसलाच पाहिजे ही जाणीव ना० गोखले यांस असतां तो भाग त्यांनीं आपल्या भाषणांतच कां आणिला? बिलांत कां घातला नाहीं? याला कांहीं विशिष्ट कारणें असल्यास तीं आम्हांस तरी माहीत नाहींत. परंतु हा प्रश्न केवळ ना० गोखले यांच्या योजनेबद्दल गैरसमज होण्याचाच नसून, इतर रीतींनीं लोकांस इष्ट असलेल्या या बिलास

लोकमताचा पाठिंबा कसा मिळेल याविषयींचा आहे. शिक्षण मोफत दिलें जावें व शिक्षणाच्या कामीं सक्तीहि करण्यांत यावी याबद्दल फारसा मत-भेद नाहीं; लोकांस तें हवेंच आहे. नवीन योजनेमुळें खर्च वाढणार तो मात्र बऱ्याच प्रमाणानें सरकारानें सोसावा असें लोकांचें आग्रहपूर्वक म्हणणें असून, सरकार तसें करण्यास तयार होईल तर स्वतःहि खर्चाचा थोडाबहुत अंश सोसण्यास लोक आज नाकबूल नाहींत. पण सरकार अमुक एक खर्च करण्यास तयार आहे हें स्पष्ट शब्दांनीं कायद्यांत ग्रथित व्हावयाचें नसेल तर प्रस्तुतचें बिल नामंजूर झालें तरी लोकांस चालेल! शिक्षणाची जर लोकांस इतकी कळकळ वाटते तर त्याकरितां त्यांनीं थोडीशी झीज सोसण्यास आपण तयार आहों असेंहि दाखविलें पाहिजे, हें म्हणणें सयुक्तिक आहे; पण शिक्षण हें इतक्या प्रचंड खर्चाचें काम आहे कीं, समाजाच्या मनांत स्वार्थत्यागाची नुसती खाई पेटली तरीहि तो खर्च समाजाच्या हातून कधींहि सोसवणार नाहीं. शिवाय तो त्यांनीं सोसावा तरी कां? फ्रान्सचें सरकार जर प्राथमिक शिक्षणावर शेंकडा सत्तर इतका खर्च सोसतें आणि आयर्लंडांत खुद्द ब्रिटिश सरकारच शेंकडा साडेएक्याण्णव खर्च सोसतें तर हिंदुस्थानानेंच असें काय पाप केलें आहे, कीं येथें मात्र शेंकडा पन्नास हीच सरकारी खर्चाची मर्यादा झाली, असें लोकांनीं मान्य करावें? तात्पर्य, सरकारवर खर्चाची जबाबदारी किती पडावी याचा उल्लेख प्रस्तुत बिलांत तें पुढें येतांनाच व्हावयास पाहिजे होता. निदान सरकारास बंधक असा या बाबतींतील उल्लेख पुढें सिलेक्ट कमिटीच्या प्रसंगीं तरी त्यांत आला पाहिजे. तसा तो न येईल तर खर्चाचें प्रमाण ठरविण्यास हिंदुस्थानसरकारनें नियम करावे या पोकळ आशीर्वादावर लोकांचा कधींहि भरंवसा बसणार नाहीं, अगर सरकारनें दोनतृतीयांश खर्च करावा या ना० गोखले यांच्या भाषणांतील उल्लेखानेंहि त्यांचें समाधान होणार नाहीं. खर्चाच्या बाबींत सरकार जोंपर्यंत कायद्यानें स्वतःस बांधून घेण्यास तयार नाहीं, तोंपर्यंत स्थानिक कमिट्यांनीं स्वतःवर कर बसविण्याची सूचना ही घरांत शिरणाऱ्या उंटाच्या पिल्लाप्रमाणें लोकांस भीतिप्रदच वाटेल यांत शंका नाहीं.

———

# [ २ ]

( केसरी, तारीख १८ जुलै १९११ )

प्राथमिक शिक्षण वाढविण्याच्या कामीं आपणास अधिक खर्च करावा लागेल, यामुळें सरकार ना० गोखले यांच्या बिलास प्रतिकूल असण्याचा संभव आहे; आणि याच गोष्टीस अनुसरून ' सरकार जर स्वत: दोनतृतीयांश खर्च सोसण्यास कायद्यानें बांधून घेण्यास तयार असेल तरच प्राथमिक शिक्षण मोफत करतां येईल व सक्तीचें करण्यास परवडेल, आणि तसें होईल तरच लोकहि स्वत: थोडा अधिक खर्च करण्यास तयार होऊन क्वचित् ठिकाणीं आपला आपणावर शिक्षणविषयक करहि बसवून घेतील '–असें मागील लेखांत आम्हीं दर्शविलेंच होतें. हल्लीं सरकार प्राथमिक शिक्षणावर जो खर्च करितें तो आंकडा स्वत: प्रमाणानें मोठासा दिसतो, आणि मधूनमधून हिंदुस्थान सरकारकडून ' स्पेशल ग्रँटस् ' म्हणून खैराती-वजा ज्या रकमा देण्यांत येतात त्यांच्या योगानें अतज्ज्ञ मनुष्याचे डोळे दिपल्या-सारखे होतात खरे; परंतु हिंदुस्थानचा विस्तार, लोकसंख्या, सालिना प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष करांच्या रूपानें होणारें उत्पन्न, या सर्व गोष्टी लक्षांत घेतल्या असतां सरकारकडून प्राथमिक शिक्षणावर सालोसाल व कायम होणारा खर्च असावा तितका नाहीं,–या कामीं सरकारची अद्यापि कुच-राई होत आहे–असेंच म्हणावें लागेल. अशी स्थिति असल्यामुळें शिक्षण सक्तीचें केल्यानें यापुढें तें वाटेल तितकें फैलावलें तरी त्याचा दोन-तृतीयांश खर्च आम्ही सोसूं, असें बांधून घेण्यास सरकार नाखूष असेल तरच नवल ! आणि वस्तुत: सरकार या गोष्टीस नाखुष असल्यामुळें ना० गोखले यांच्या बिलास तें शक्य तितका प्रतिबंध करणार, हेंहि आपण आज समजूनच चालण्यास हरकत नाहीं. युनिव्हर्सिटींत, बोर्डांत अगर कोठेंहि हा प्रश्न निघाला तरी सरकारी अधिकारी शिक्षणविषयक सक्तीच्या तत्त्वास प्रतिकूल मत देत आहेत, याचा अर्थ काय हें कोणास सांगावयास गाहिजे असें नाहीं.

सरकारनें या बिलावर जिल्हाधिकाऱ्यांमार्फत सर्व स्थानिक कमिट्यांचीं मतें मागविलीं असून त्यांपैकीं बहुतेक बिलास अनुकूल आहेत हें मागें आम्हीं

सांगितलेंच आहे. या कमिट्यांना शिक्षण सक्तीचें होऊन फैलावल्यास आपल्यावर पडणारा खर्चाचा बोजा वाढेल हें माहीत नसेल असें संभवत नाहीं. किंबहुना कित्येक म्युनिसिपालिटयांनीं बिलावर मत देतांना सक्तीच्या शिक्षणाच्या कायद्याचा अंमल आपल्या अधिकारक्षेत्रांत पुढेंमागें झाला असतां खर्च अधिक किती होईल व तो कशा रितीनें पुरवितां येणें शक्य आहे, वगैरे मुद्यांचा विचारहि केलेला आढळून येतो. अर्थात् अशा कमिटयांचें अनुकूल मत हें केवळ निर्विकल्पक किंवा अविचाराचें असें न म्हणतां सविकल्पक व सुविवेकशीलपणाचें आहे असेंच मानावें लागेल. लोकल-बोर्डांमधून अद्यापि सरकारी अधिकाऱ्यांचेंच मतप्राबल्य असल्यामुळें तेथें ना० गोखले यांच्या बिलास पूर्ण संमति मिळणें अर्थातच शक्य नव्हतें. पण या बोर्डांमधूनहि जे खासगी व लोकनियुक्त सभासद आहेत त्यांचें मत स्वतंत्र घेतां आलें असतें तर त्यांचेंहि मत बिलास अनुकूल असेंच पडलें असतें, याविषयीं आम्हांस शंका नाहीं. तात्पर्य, प्राथमिक शिक्षणासंबंधानें स्वतःला थोडाबहुत अधिक कर द्यावा लागला तरी तो देऊन शाळा व शिक्षण फैलावण्याची जनतेची आज मोठ्या हौसेची तयारी आहे, असें असतां योग्य हिस्सेरशीनें आपणावर पडणाऱ्या खर्चास भिऊन सरकार मात्र मागें घेणार हें उघड होण्याचा प्रसंग आहे. स्थानिक स्वराज्य होण्या-पूर्वी म्युनिसिपालिटया प्राथमिक शिक्षणावर करावा तितका खर्च करीत नाहींत, अशी चोहोंकडे तक्रार होती, आणि ही तक्रार योग्य आहे अशा-विषयींचा पुरावा १८८२ सालच्या ‘ एज्युकेशन कमिशन–’ पुढें भरपूर मांडण्यांत आला होता. त्याच वेळीं सरकारचा प्राथमिक शिक्षणावरील खर्च फार थोडा आहे, तो अधिक व्हावयास पाहिजे, अशीहि तक्रार सरकारविरुद्ध त्याच कमिशनपुढें मांडण्यांत आली होती. दोन्ही तक्रारी बरोबर आहेत असा अभिप्राय कमिशननें दिला; तेव्हांपासून अलीकडे दोघांचाहि शिक्षणा-वरील खर्च वाढला आहे खरा; पण एकंदरीनें पाहातां म्युनिसिपालिटयां-कडून झालेल्या वाढीच्या प्रमाणानें सरकारचा खर्च वाढला आहे असें म्हणतां येत नाहीं.

आपण पुणें म्युनिसिपालिटीचेंच उदाहरण घेऊं. सन १८८४ सालीं पोलीस खर्चाची सूट देऊन शिक्षणाचा खर्च सरकारनें पुणें म्युनिसिपालिटीवर

घातला. तेव्हां हा खर्च सुमारें पांच हजार होता. तोच आजमितीस जवळ-जवळ ३३।३४ हजारपर्यंत गेला आहे. या खर्चापैकीं सरकारनें निम्मा खर्च ग्रँटच्या रूपानें सोसावा, असा करार १८८४ सालानंतर लवकरच करावा लागला; कारण म्युनिसिपालिटयांस सर्व खर्च एकटयानें सोसणें शक्य नव्हतें. पण निम्मी ग्रँट देण्याचें हें आश्वासन पाळण्यांत सरकारकडून आज-पर्यंत विलक्षण ढिलाई दाखविण्यांत आलेली आहे. म्युनिसिपालिटीकडे शाळांची प्रत्यक्ष व्यवस्था असल्यामुळें, मुलांच्या वाढत्या संख्येस अनुसरून शाळा, शाळामास्तर व शाळांचा खर्च वाढविणें, हें म्युनिसिपालिटीचें कर्तव्य होतें व तें तिनें केलें. पण सरकारची ग्रँट मात्र दरसाल निम्मेनिम तिच्या पदरांत केव्हांच पडली नाहीं. शाळांची प्रत्यक्ष व्यवस्था म्युनिसिपालिटीकडे होती हें जरी खरें आहे, तरी खर्च वाढत होता हें सरकारास कळत नव्हतें. असें नाहीं. कारण म्युनिसिपालिटीच्या एकंदर जमाखर्चाचें बजेट तर दरसाल सरकाराकडे जातेंच, परंतु शिक्षणसंबंधीं कमिटीनें मंजूर केलेलें स्कूलबोर्डाचें बजेट तर शाळाखात्यामार्फत मुद्दाम मागविण्यांत येत असतें. पण ग्रँट काय द्यावयाची याचा ठराव मात्र साल दरसाल न होतां तो पांच पांच वर्षांनींच करावा, असें ठरविण्यांत आल्यामुळें, या पांचांपैकीं चार वर्षपर्यंत कमिटीचा खर्च वाढावा पण ग्रँट मात्र निम्यापेक्षां कमी पदरांत पडावी, असें होत असतें ! उलटपक्षीं, म्युनिसिपालिटीचा खर्च एखादे वर्षी कमी झालाच तरी ग्रँटची रक्कम कमी होऊं नये, असें मात्र होत नाहीं. कारण ग्रँटचा आंकडा प्रत्यक्ष खर्चावरून ठरविलेला असतो.

पण ही ढिलाई येवढ्यानेंहि संपली नाहीं. कारण वरचेवर ग्रँटचा आंकडा ठरविण्याचा करार असतां १९०२ सालापासून आजपर्यंत नऊ वर्षांत ग्रँटचा नवीन हिशेब करण्याची पर्वणीच सरकारनें आणूं दिली नाहीं ! यामुळें कमिटीचा शिक्षणावरील खर्च मात्र साल दरसाल वाढत गेला पण सरकारी ग्रँटचा आंकडा मात्र पूर्वीचाच कायमचाच राहिला आहे. हल्लीं ग्रँट वाढविण्याचें प्रकरण सुरू असून फिरून ग्रँट वाढेल असा अदमासहि आहे. तथापि, नवीन व्यवस्था झाल्याशिवाय ही ढिलाई पुढें अशीच चालेल हें उघड आहे. आमचा तर अदमास असा आहे कीं, १८८४ साला-पासूनचे पुणें म्युनिसिपालिटीच्या शाळाखात्याचे हिशेब पाहिल्यास मूळच्या

पोलिस-खर्चाच्या कितीतरी पटीनें कमिटीचा शिक्षणावरील खर्च वाढला आहे; आणि निम्मी सरकारी ग्रँट मिळावी असा करार झाला असतांहि त्याचा योग्य अंमल साल दरसाल वक्तशीर न झाल्यामुळें खुद्द पुणें म्युनिसिपालिटीचे असे लाख सवालाख रुपये तरी आजपर्यंत शिक्षणावर करारा-बाहेर अधिक खर्च झाले असले पाहिजेत. ठराविक रकमेबाहेर शिक्षणाचा खर्च कमिटीनें जाऊं दिला नसता तर तिला नको कोण म्हणणार होतें ? पण असें करावयाचें तर कमिटीच्या शाळांतून अमुक एक संख्येहून अधिक मुलें आलीं तर त्यांना मज्जाव करावा, आम्ही घेत नाहीं म्हणावें, हीच गोष्ट कमिटीच्या कपाळीं आली असती. हायस्कुलें, सायन्सकॉलेज यांसारख्या वरिष्ठ प्रतीच्या शिक्षणसंस्था यांजमध्यें अशा रीतीनें सरकार विद्यार्थ्यांस खुशाल मज्जाव करितें. पण नुसतें साधारण लिहिणेंवाचणें संपादन करण्यास येणाऱ्या मुलांस "आमच्या शाळेंत सोय नाहीं, तुम्ही अशिक्षित राहिलां तरी आम्हांस चालेल" असें म्हणणें कोणत्याहि म्युनिसिपालिटीस लांछना-स्पदच झालें असतें. पुण्याच्या कमिटिनें ती गोष्ट न करतां स्वतः झीज सोसली हें तिला भूषणास्पदच आहे. पण अशा रीतीनें म्युनिसिपालिटया शिक्षणाच्या हौसेखातर अधिक खर्च करतात, म्हणून सरकारची भरपूर ग्रँट देण्याची जबाबदारी कोणत्याहि रीतीनें कमी होत नाहीं. स्थानिक कमिटयांकडे शिक्षण सोंपविण्यांत आलें त्या वेळीं अमुक एका मर्यादेपलीकडे त्यांनीं शिक्षणाचा प्रसार अगर त्यावर खर्च करूं नये, अशी शर्तहि लादण्यांत आलेली नव्हती. असें असतां कमिटयांनीं हा वाढता खर्च एकटयांनींच कां सोसावा ?

लोकलबोर्डाच्या शाळांसंबंधानेंहि कदाचित् अशा प्रकारचीच तफावत दिसून आली असती. परंतु एक तर त्यांच्या अधिकारक्षेत्रांतील शाळांची व्यवस्था त्यांच्या स्वतःच्या हातीं नसते, यामुळें त्यांना शाळांचा तितका अभिमानहि वाटत नाहीं. दुसरें असें कीं, लोकलबोर्डाचा कारभार बहुधा जिल्हाधिकाऱ्यांच्या मताप्रमाणेंच चालतो; स्वतंत्र लोकमताची छाप त्याजमध्यें फारशी पडत नाहीं. यामुळें जिल्ह्यांतील शाळांची संख्या वाढविणें अगर न वाढविणें हें प्रायः सरकारच्या मनाप्रमाणेंच होतें. ग्रँटची टंचाई वाटल्यास, लोकलबोर्डें अधिक शाळाच काढीत नाहींत म्हणजे झालें.

अथवा काढावयाच्या झाल्या तरी खुद्द कलेक्टर हे जिल्हाबोर्डांचे प्रेसिडेन्ट असल्यामुळें त्यांना वेळोवेळीं अधिक ग्रँट मिळण्यास पंचाईत पडत नाहीं. तथापि, जिल्हाबोर्डांतील लोकांसहि शिक्षणाचा फैलाव व्हावयास नको असें वाटतें, असें म्हणतां येणार नाहीं. कांहीं दिवसांपूर्वी ज्या लोकल-बोर्डांना शिक्षण वाढवावयाचें असेल त्यांनीं आपल्या इच्छेप्रमाणें स्वतंत्र सेस म्हणजे कर बसवून शिक्षण वाढवावें अशा अर्थाचें बिल एका विवक्षित लोकलबोर्डाच्या सूचनेवरून सरकारास पुढें आणण्याचें सुचलें होतें. परंतु त्यावर चोहोंकडे प्रतिकूल मत पडल्यानें तें मागें घेण्यांत आलें असें म्हणतात. या बाबतींत जिल्हाबोर्डांनीं प्रतिकूल मतें दिलीं असलीं तरी त्याचें कारण त्यांना शिक्षणाचा फैलाव व्हावयास नको किंवा या फैलाव्याचा खर्च तीं यथाशक्ति सोसण्यास तयार नव्हतीं हें नव्हे, तर अशा प्रकारचें बिल मंजूर करून वाढत्या शिक्षणाच्या सर्व खर्चाची जबाबदारी बोर्डावर लादून, व स्वतःवर नवीन कर बसवून घेण्याची लोकांना उदार मनानें परवानगी देऊन, स्वतः धोतर झाडून बाजूस सरण्याचा सरकारचा हेतु—निदान तशी प्रवृत्ति तरी—सदर बिलांत दिसत होती, हें होय. तात्पर्य, लोकलबोर्डें काय किंवा म्युनिसिपालिट्या काय आपणांवर पडणारा वाढत्या शिक्षणाचा बोजा यथाशक्ति व यथाप्रमाण सोसण्यास त्या केव्हांहि तयार होत्या व पुढेंहि तयार राहातील. पण वाढत्या शिक्षणाच्या खर्चाचा गाडा सर्वस्वीं लोकांच्याच आंगावर कलंडण्याचा जर संभव दिसेल तर अर्थातच लोक भिऊन पाय मागें घेतील यांत नवल नाहीं. अशा रीतीनें त्यांनीं आपलें पाऊल मागें घेतल्यानें शिक्षणाचें पाऊल पडावें तितकें पुढें पडणार नाहीं ही गोष्ट खरी; तथापि त्यास इलाज काय? कर बसविण्याची व ते खर्चण्याची सर्व सत्ता जोंपर्यंत त्यांच्या हातीं नाहीं तोंपर्यंत ही असमाधान-कारक स्थिति अशीच टिकणार!

अधिक कर न बसवितां आहे त्यांतल्या त्यांत प्राथमिक शिक्षण फैला-वण्याचे दुसरेहि एक दोन मार्ग आहेत. एक मार्ग अगदीं सरळ असून, प्राथमिक शिक्षणावर खर्चण्यास जो पैसा हातीं असेल, तो सर्वस्वीं शाळा-खात्यानें चालविलेल्या शाळांकडेच न लावितां खासगी शाळांस मदत देऊन होता होईतों अशा शाळांची संख्या वाढविणें, हा होय. अशा

शाळांपासून मुख्य फायदा हा असतो कीं, शाळामास्तरास आपल्या शाळांचा अभिमान अधिक वाटतो. गांवच्या लोकांचा ताबा सरकारी शाळांपेक्षां त्यांवर अधिक चालतो. लोकांनाहि स्वावलंबनानें शाळा चालविल्याबद्दल समाधान वाटून त्यांवर जरूर तर खर्च करण्यास ते तयार होतात; व असा खर्च करूनहि त्यांना प्रत्यक्ष कर दिल्यासारखें वाटत नाहीं. दुसरे पक्षीं अशा शाळांमध्यें कांहीं वैगुण्यहि असतें; व तें असें कीं, ट्रेनिंग कॉलेजांत शिकून तयार झालेले शिक्षक हवे तितके मिळत नाहींत, आणि शाळेंतील शिस्त व व्यवस्था कांहीं अंशीं सरकारी शाळांप्रमाणें राहूं शकत नाहीं. तथापि, या गुणावगुणांचा हिशेब केला असतां अशा शाळांपासून होणारे फायदेच अधिक भरतील असें आम्हांस वाटतें; व याच कारणाकरितां, गेल्या आठवड्यांत खासगी प्राथमिक शाळांस उत्तेजन देण्यासंबंधानें जो सरकारी ठराव प्रसिद्ध झाला आहे तो आम्हांस पसंत वाटतो. सदर ठरावांत असें म्हटलें आहे कीं, यापुढें ज्या ज्या ठिकाणीं खाजगी स्वरूपाच्या गांवठी शाळा आढळतील त्या त्या ठिकाणीं त्यांना सरकारी पटावर नोंदून सालिना दीडशें रुपयेपावेतों ग्रँट द्यावी; अशा शाळांस आसपासच्या लोकल-बोर्डांच्या अगर म्युनिसिपालिटीच्या मास्तर वगैरेंनीं सर्व प्रकारची मदत द्यावी; पेन्शनदार मास्तर अगर कांहीं तरी नोकरी मागावयास येणारे साक्षर पण निरुद्योगी लोक यांना खेडेगांवांतून शाळा काढण्यास सुचवावें व उत्तेजन द्यावें; खासगी शाळा चांगल्या चालविणाऱ्या शिक्षकांस विशेष प्रकारचें कांहीं बक्षीस द्यावें; ग्रँटची रक्कम सालांतून एकदां मिळावयाची ती खासगी शाळांच्या खर्चास उपयोगी पडेल अशा रीतीनें थोडीथोडी मधून-मधून द्यावी. तात्पर्य, अशा रीतीनें ज्या गांवांमध्यें म्युनिसिपालिट्या नाहींत अगर लोकलबोर्डांच्या शाळा होण्याचा लवकर संभव नाहीं, अशा लहानसहान खेडेगांवांतून खासगी शाळा निघतील तितक्या काढाव्या; आणि प्राथमिक शिक्षणाचे जे अभ्यास सर्व शाळांस सारख्या रीतीनें आज लागूं करण्यांत येतात ते तसे न करितां, अशा खेडेगांवांतील शाळांकरितां वेगळ्या प्रकारचे म्हणजे अधिक सोपे अभ्यास ठेवावे.

आमच्या मतें ही सर्व योजना चांगली आहे. कारण शिक्षणाच्या सक्तीचा कायदा जरी आज न झाला तरी, शाळेंत जाऊं इच्छिणारीं परंतु

कोणच्याहि प्रकारची शाळा गांवांत नसल्यामुळें ज्यांना शिक्षणास आज मुकावें लागत आहे, अशा मुलांची थोडीबहुत तरी सोय वरील प्रकारच्या खासगी शाळा निघाल्या असतां होईल. लोकलबोर्डाची नवीन शाळा निघणें म्हणजे शाळेची कल्पना निघून ती प्रत्यक्ष अमलांत येईपर्यंत बराच खटाटोप असतो. शाळेंत मुलें किती येतील, शाळा कायम टिकेल कीं नाहीं, शाळेस चांगली इमारत कशी मिळेल, शाळेंत ट्रेनिंग कॉलेजांत शिकलेल्या शिक्षकांचा पुरवठा होईल कीं नाहीं, वगैरे गोष्टींच्या विचारानें बराच काळ जातो. व केव्हां केव्हां तर, कांहीं दिवसांपूर्वी शाळाखात्याचे मुख्य अधिकारी ना० मि० शार्प यांनीं भर कौन्सिलांत सांगितल्याप्रमाणें, शाळा काढण्याकरितां हातांत पैसे असूनहि शाळा कशा निघतील अशी अडचण येऊन पडते ! ना० शार्प यांनीं दाखविलेली पैसे खर्च करण्याची अडचण हल्लींच्या पद्धतीप्रमाणें खरी असली तरी, खासगी शाळांस उत्तेजन देण्याच्या या नवीन ठरावाचा अंमल व्हावा तसा झाल्यास ती अडचणहि निघून जाईल. प्राथमिक शिक्षणाच्या शाळेस झालें तरी शक्य असल्यास चांगली सुंदर हवाशीर इमारत असावी, शास्त्रीय पद्धतीनें शिकलेले शिक्षक असावे, किंडरगार्टन वगैरे नव्या रीतींनीं मुलांस शिकविण्यास साधनसामुग्री असावी, हें सर्व इष्ट आहे खरें. तसेंच एखाद्या नमुनेदार शाळेंत जो विद्याभ्यास मुलें थोड्या काळांत अनायासानें करतील तो गांवठी किंवा खासगी शाळेंत होण्यास अधिक काळ लागेल व आयास होतील, हेंहि सर्व खरें, तरी पण हें सर्व साधेल तरच शाळा काढूं असें म्हणणें हें ‘ खाईन तर तुपाशीं नाहीं तर उपाशी ’ या म्हणींतील अज्ञानी मनुष्याच्या हट्टासारखेंच असमंजसपणाचें आहे.

ज्याला आपण नमुनेदार शाळा म्हणतों त्या सर्व देशभर खेड्यापाड्यांतूनहि पसरूं असें म्हणण्याइतका पैशाचा किंवा उत्तम शिक्षकांचा पुरवठा हिंदुस्थानांतच काय पण कोणत्याहि देशांत भरपूर होणें बहुधा अशक्य आहे. मोठमोठ्या गांवांतूनच अशा नमुनेदार शाळा घालणें शक्य आहे; व ज्यांना अशा शाळांचा फायदा घेण्याची अनुकूलता असेल ते तो घेतीलच. शहरांतील व मोठ्या गांवांतील लोकांस हा फायदा सहज मिळतो, व खेडेगांवांतील सधन व विद्याप्रिय आईबाप आपलीं मुलें पैसे खर्चून शहरांत शिक-

ण्यास ठेवितात; अर्थात् अशा मुलांना हा फायदा मिळण्यास थोडासा अभ्यास पडत असला तरी तो त्यांस मिळणें अगदींच अशक्य नाहीं. पण शहरांत व गांवांत ज्यांचे आईबाप रहात आहेत, किंवा वर सांगितल्याप्रमाणें खेडेगांवांत रहात असतांहि शिक्षणाकरितां त्यांस शहरांत ठेवण्यास खर्च करण्याची ज्यांच्या आईबापांस शक्ति असते, अशीं मुलें वगळलीं असतां बाकीच्या मुलांनीं काय करावें ? चांगलें शिक्षण मिळणें शक्य नाहीं म्हणून त्यांनीं मुळींच अशिक्षित रहावें कीं काय ? शिक्षणांत सरसनिरस हा भेद जरी असला तरी निरस शिक्षण हें सर्वस्वीं अशिक्षणापेक्षां पुष्कळ बरें ! साक्षरतेचें साम्राज्य अमर्याद आहे; शिक्षण हें जन्मभरहि सुटत नाहीं; या दृष्टीनें पाहातां चांगला सुशिक्षित मनुष्यहि कांहीं बाबींत अर्धशिक्षित तर कांहीं बाबतींत अशिक्षितच असतो. तथापि या अशिक्षितपणाचा दाखला देऊन ज्याला साधारण लिहितां वाचतांहि येत नाहीं अशा शिक्षणेच्छु अशिक्षिताचें समाधान कसें करितां येईल ? प्राथमिक शिक्षणाविषयीं जें आज भांडण आहे तें झालें तरी, खेड्यापाड्यांतून मुलांस 'शास्त्रीय पद्धतीचें प्राथमिक शिक्षण' मिळत नाहीं म्हणून नव्हे. तर, खाणींतील मौल्यवान् पदार्थांप्रमाणें अंगीं अनेक उत्कृष्ट गुण बीजरूपानें वसत असतां, केवळ लिहितां वाचतां न आल्यानें ज्यांचा सर्व जन्म व्यर्थ जातो व ज्यांच्या गुणांच्या उपयोगास राष्ट्र मुकतें अशा मुलांकरितां शिक्षणाची कांहीं एक सोय केली जात नाहीं, हेंच तें भांडण आहे. बाळबोध, मोडी लेखनवाचन आणि गणिताचीं मूलतत्त्वें हीं ज्यांस एकदां आलीं त्यांस साक्षरतेच्या समुद्रांत बिनभोपळ्यानें पोहतां येऊं लागलें असें म्हणण्यास हरकत नाहीं. यापुढील त्यांची सर्व कर्तबगारी, त्यांचा उद्योग, ऐपत, धाडस व अखेर नशीब, इत्यादि गोष्टींवर अवलंबून राहील. आणि पोहावयास शिकलेल्या मनुष्यानें त्या कलेचा कांहींएक उपयोग न केल्यास त्याचा अपराध त्याजकडेच येईल. परंतु अज्ञान मुलांस जगविण्याप्रमाणेंच जगविलेल्या मुलांस लिहिणें वाचणें शिकविण्याची जबाबदारी प्रत्यक्ष त्याच्या पालकांवर व अप्रत्यक्ष रीतीनें सरकारवर असते, हेंच काय तें सर्व शिक्षणविषयक चळवळीचें बीज आहे. मुलांस शिक्षण देण्यासंबंधानें समाजाचें व सरकारचें हें जें कमींत कमी कर्तव्य म्हणून सांगितलें, तें घडून येण्यास खासगी शाळांचा बराच उपयोग होईल. ना० गोखले यांच्या बिलांत झालें तरी

मुलांस शाळेंत पाठविण्याची सक्ति करावयाची म्हणून म्हटलें आहे ती लोकल-बोर्डांच्या किंवा म्युनिसिपल शाळेंतच पाठविण्याची आहे असें नाहीं; कोण-च्याहि शाळेंत का येईना, परंतु मुलाच्या प्राथमिक शिक्षणाकडे त्याच्या योग्य वयांत लक्ष पुरविलें म्हणजे झालें. मग मुलगा सरकारी शाळेंत जावो, बोर्डाच्या शाळेंत जावो, म्युनिसिपल शाळेंत जावो, खाजगी शाळेंत जावो अगर घरीं शिको, त्यास हरकत नाहीं. हेंच सदर बिलाचें तात्पर्य आहे व याच दृष्टीनें खाजगी शाळांस उत्तेजन देण्याविषयीं जो सरकारी ठराव प्रसिद्ध झाला आहे, त्याचें आम्ही अभिनंदन करितों.

असो, नवीन कर न बसवितां आहे या करांतच वाढत्या शिक्षणास लाग-णाऱ्या खर्चाचा पुरवठा होऊं शकेल कीं नाहीं, हाहि एक प्रश्न असून त्याचाहि विचार होणें जरूर आहे. तथापि, या प्रश्नाचा निकाल फिरून स्वतंत्र रीतीनें करण्यांत येईल.

---

## १९. सोन्यासारखी संधि दवडली !

( केसरी, तारीख १२ डिसेंबर १९१६ )

शिक्षणाचा सार्वत्रिक प्रसार झाल्याशिवाय देशाची सर्वांगसुधारणा होऊन तो उन्नतीच्या पंथास लागणार नाहीं, या दृढ भावनेनें ना० गोखले यांनीं वरिष्ठ कायदेकौन्सिलांत दोन वेळां, शिक्षण सक्तीचें व मोफत करावें याविषयीं प्रयत्न केला; परंतु त्यास सरकारच्या विरोधामुळें यश आलें नाहीं हें प्रसिद्धच आहे. हिंदुस्थान देशाचा विस्तार अफाट असून त्यांत कित्येक प्रांत अत्यंत मागासलेले असल्यामुळें, सर्व प्रांतांकडून सारखेंच पाठबळ मिळणें शक्य नाहीं हें ना० गोखले यांस आलेल्या अपयशावरून ओळखून, ना० पटेल यांनीं आपल्या मुंबई इलाख्यापुरता तरी हा प्रयत्न करून पाहावा अशी उमेद बाळगून सक्तीच्या मोफत शिक्षणाचा ठराव परवांच्या कौन्सिलपुढें मांडला. या कामांत कोणासहि आक्षेप काढण्यास जागा राहूं नये आणि आपला ठराव वादग्रस्त ठरूं नये या हेतूनें त्यांनीं

आपल्या ठरावाच्या व्याप्तीचें क्षेत्र अगदीं संकुचित केलें; व सर्व खेड्या-पाड्यांतून नव्हे तर फक्त ज्या गांवांत म्युनिसिपालिटी स्थापन झाली आहे, अशा गांवांतून प्राथमिक शिक्षण सक्तीचें व मोफत करावें एवढीच त्यांनीं मागणी केली. परंतु एवढी मर्यादित मागणी देखील मुंबईसरकारनें मान्य केली नाहीं ही अत्यंत खेदाची गोष्ट होय. जगाच्या आधुनिक परिस्थितींत आणि देशांच्या चढाओढींत कोणत्याहि देशाचा टिकाव लागण्यास शिक्षण-प्रसाराची किती आवश्यकता आहे, आणि तो प्रसार प्रारंभीं थोडी बहुत सक्ति केल्याशिवाय होणें कसें अशक्य आहे याचें विवेचन आतां करण्याची जरूरी राहिलेली नाहीं. हे सामान्य सिद्धांत सर्वमान्य झालेले आहेत; आणि ना० गोखले यांचें बिल फेटाळून लावणारें हिंदुस्थानसरकार, अथवा ना० पटेल यांच्या ठरावास अर्धचंद्र देणारें मुंबईसरकार, या उभयतांसहि हें तत्त्व मान्य नाहीं असें नाहीं. यास्तव त्या सामान्य तत्त्वाच्या विवेचनांत न पडतां मुख्यतः ज्या मुद्यांवर मुंबईसरकारनें या ठरावास आक्षेप घेतला त्या मुद्यांचेंच परीक्षण करूं.

ना० पटेल यांच्या ठरावावर शरसंधान करतांना ना० चौबळ यांनीं शिक्षणखात्याचीं सूत्रें वरिष्ठ सरकारच्या हातीं असल्यानें वरच्या धोरणानें आपण बांधले गेलों आहों या कोटिक्रमावरच सारी भिस्त ठेविली, आणि ना० गव्हर्नरसाहेबांनीं तर शिक्षणखातें हें वरिष्ठ सरकारच्या ताब्यांतलें खातें आहे असेंच ठासून सांगितलें. परंतु वस्तुस्थिति तशी नाहीं. जकात, अफू, मीठ, पोस्ट, रेल्वे इत्यादि खात्यांप्रमाणें शिक्षणखातें जर सर्वस्वीं वरिष्ठ सरकारच्या स्वाधीन असतें तर कोणाहि नामदारानें प्रस्तुतचा ठराव या कौन्सिलापुढें मांडला नसता, आणि तशी चूक कोणीं केली असती तर सरकारनें त्या ठरावास मुळांतच थारा दिला नसता हें उघड आहे. पण गव्हर्नरसाहेब म्हणतात कीं, या ठरावांतील तत्त्वाशीं आपली सहानुभूति असून असल्या महत्त्वाच्या विषयावरील उपयुक्त वाद-विवाद मुळांतच खुडून टाकण्याचें पाप करूं नये म्हणून आपण या वादविवादास परवानगी दिली. मद्राससरकारनें पंचायत बिलास जसा कौन्सिलच्या दरवाजांतच मज्जाव केला तसा या ठरावास नामदारांनीं केला नाहीं या त्यांच्या सौजन्याबद्दल आम्हीहि त्यांचें अंतःकरणपूर्वक आभारी

आहों. परंतु आपल्या अधिकाराबाहेरच्या प्रश्नावर केवळ जिज्ञासाबुद्धीनें किंवा कौतुकानें त्यांनीं हा वाद होऊं दिला असा प्रारंभापासून तर कांहीं रंग दिसला नाहीं. तशी वस्तुस्थिति असती तर प्रथमारंभींच त्यांनीं या गोष्टीचा खुलासा केला असता आणि सर्व नामदारांस कळविलें असतें कीं, 'या विषयावर पूर्वपक्ष-उत्तरपक्ष कसा काय होतो हें पाहाण्याकरितां या ठरावावर भवति-न-भवति करावयाची आहे, परंतु ठरावाची बजावणी करणें आमच्या अधिकारकक्षेच्या बाहेरचें असल्यानें या ठरावावर मतेंदेखील घेण्यांत येणार नाहींत.' परंतु प्रथम तसा बिलकुल रोंख नसतां अखेरीस हा वादविवाद ऐनरंगांत आल्यावर आतां हें घोंगडें आपल्या गळ्यांत येतें अशी धास्ती पडून नामदार सभासदांनीं आपणांस या संकटांतून मुक्त करावें अशी ते गयावया करूं लागले. यावरूनच अधिकारातिक्रमाची सबब लंगडी आहे हें उघड सिद्ध होतें. ना० चौबळ यांनीं विद्याखातें हें वरिष्ठ सरकारच्या कक्षें-तलें खातें आहे असें गैरवाजवी विधान करण्याचें धाडस केलें नाहीं; परंतु त्यांनीं या अडचणींतून पळवाट काढण्याकरितां अशी शक्कल लढविली कीं, जेव्हांपासून हिंदुस्थानसरकारनें शिक्षणखातें पृथक् करून त्यावर स्वतंत्र अधि-काऱ्याची योजना केली त्या वेळेपासून प्रांतिक सरकारला वरच्या धोरणानें व तंत्रानें वागावें लागतें. ही गोष्ट सामान्यतः खरी असेल; परंतु ना० पटेल यांनीं जी मर्यादित व विशिष्ट मागणी केली होती ती मान्य करण्याला वरील अडचण मुळींच लागू पडत नाहीं; आणि हें विधान आम्ही दुसऱ्या कशाच्या आधारें करीत नसून, खुद्द ना० गव्हर्नर व त्यांचे शिक्षणमंत्री ना० चौबळ यांनींच या ठरावाविषयीं बोलतांना जें अभिवचन दिलें त्याच्या आधारें करितों. कारण ना० चौबळ यांनीं तर स्पष्टपणें असें सांगितलें कीं, ग्रँट वाढविण्याची मागणी न करतां कोणत्याहि म्युनिसिपालिटीनें शिक्षण मोफत केलें तर त्यास आमची आडकाठी नाहीं; आणि ना० गव्हर्नर-साहेबांनीं तर असें आश्वासन दिलें कीं, या कामासाठीं सरकारी कमिटी न मागतां जर तुम्ही एखादी खाजगी कमिटी नेमाल तर आम्ही त्या कमिटीस सर्व प्रकारें मदत करूं ! जी गोष्ट स्वतःच्या अधिकाराबाहेरची व वरिष्ठांच्या धोरणाला विरोधात्मक म्हणून त्याज्य ठरली, त्या गोष्टीला

खासगी रीतीनें तरी सरकार कशी मदत करूं शकेल? समजा, खाजगी रीतीनें कांहीं नामदारांची कमिटी नेमली गेली तर तिनें पुढें सरकारच्या साहाय्यावांचून करावयाचें तरी काय? याचा खुलासा नामदारद्वयांनीं केला असता तर त्यांच्या अभिवचनाला कांहीं महत्त्व आलें असतें. 'तुम्ही खासगी कमिटी नेमा आणि खासगी शाळा स्थापन करून शक्य असल्यास मोफत शिक्षण द्या; पण आमच्याकडे ग्रँट मात्र मागूं नका,' एवढाच जर या आश्वासनाचा अर्थ असेल तर याला गव्हर्नरसाहेबांची तरी परवानगी कशाला पाहिजे?

'वरिष्ठ सरकार सक्तीच्या व मोफत शिक्षणाला प्रतिकूल आहे म्हणून नाइलाजास्तव आम्हाला हा ना० पटेल यांचा ठराव सरकारी रीतीनें मान्य करतां येत नाहीं, बाकी आमची कांहीं त्यास हरकत नाहीं,' असा जो वारंवार कांगावा करण्यांत येतो त्यांत तरी तथ्यांश किती आहे याचें स्पष्टीकरण करणें जरूर आहे. हिंदुस्थानसरकारनें तरी ना० गोखल्यांचें बिल हाणून कां पाडलें? वरिष्ठ सरकारनें हें कृत्य केवळ आपल्या लहरीनें केलें का त्याला दुसऱ्या कोणाचा आधार होता? वस्तुस्थिति अशी आहे कीं, त्या वेळीं हिंदुस्थानसरकारनें सर्व प्रांतिक सरकारांचीं मतें मागविलीं होतीं, आणि त्यांत बहुमत विरुद्ध पडल्यावरूनच ना० गोखल्यांचें बिल बुडालें. सक्तीच्या व मोफत शिक्षणाला विरोध करणाऱ्या या सर्वच शिष्टांची नामावळी देण्याचें आज प्रयोजन नाहीं. परंतु प्रस्तुत प्रकरणीं मुद्याची व खेदाची गोष्ट ही कीं, मुंबईसरकारानें त्या वेळीं या तत्त्वास जोराचा विरोधच केला होता, आणि अशाच इतर कांहीं प्रांतिक सरकारांच्या मतामुळें विरोधी पक्षाचें बहुमत झालें व शिक्षणप्रसाराचें गाडें अडकून पडलें! अर्थातच वरिष्ठ सरकारनें आपल्यावरची जबाबदारी त्या वेळीं प्रांतिक सरकारांवर टाकली आणि आतां प्रांतिक सरकार वरिष्ठ सरकाराकडे बोट दाखवून स्वतः नामानिराळें होऊं पहात आहे. वरिष्ठ सरकारनें म्हणावें प्रांतिक सरकार अनुकूल नाहीं आणि प्रांतिक सरकारनें सांगावें कीं, वरिष्ठ सरकारच्या तत्त्वाविरुद्ध आम्हांस वागतां येत नाहीं. अशा रीतीनें ही टोलवाटोलवी चालली असून, 'गडसास्वडयोर्मध्ये द्राविडो लडबडाम्यहम्' अशी आमच्या शिक्षणाची अनुकंपनीय स्थिति झाली आहे!

या इलाख्यांतील शाळाखात्याचे अधिकारी ना० शार्प यांनीं प्रस्तुतच्या ठरावास विरोध करतांना अनधिकारित्वाची सबब पुढें आणली नाहीं हें लक्षांत ठेवण्याजोगें आहे. या विद्याधिकाऱ्यांची मनोरचना कांहीं अपूर्व आहे. यांच्याकडे कोणतीहि एखादी नवी सूचना घेऊन जा, कीं त्यांनीं एवढा खर्च कोठून करावयाचा असें रडगाणें गाण्यास सुरवात केलीच ! परंतु मौज ही कीं, प्रांतिक सरकारनें आपल्या जमाखर्चाची कशीबशी तोंडमिळवणी करून शाळाखात्याकडे मोटी रक्कम दिलीच तर एवढी रक्कम खर्च कशी करावी हेंच यांस कोडें पडतें ! कै० रा० व० जोशी यांनीं एका प्रसंगीं जमाखर्चाच्या अंदाजपत्रकावर वादविवाद करतांना प्राथमिक शिक्षणाकडे ७० हजारांची रक्कम अधिक मंजूर करावी अशी सूचना केली असतां याच राजश्रींनीं उठून सांगितलें कीं, 'तुम्ही रक्कम द्यायला तयार असाल, परंतु ती घेऊन मी खर्च कशी करूं ?' अशा अधिकाऱ्यांच्या कारकीर्दींत वरिष्ठ सरकारनें प्रांतिक शिक्षणाकरितां देणगीदाखल दिलेल्या लाखों रुपयांच्या रकमा खर्च न होतां सालोसाल पडून राहाव्या यांत आश्चर्य तें काय ? परंतु चमत्कार हाच कीं, प्रस्तुतच्या ठरावास विरोध करतांना यांनीं ना. पटेल यांच्या खर्चाचा अंदाज चुकला असून १५ लक्षांऐवजीं ३० लक्ष रुपये अधिक खर्च येईल असें सांगितलें. ना. शार्पसाहेबांचा हा आंकडा तरी विनाकारण फुगविलेला नसेल कशावरून ? परंतु तो यथार्थ आहे असें जरी घटकाभर मानलें तरी त्यांत बिनसलें काय ? सातआठ कोटी उत्पन्नाच्या मुंबई इलाख्याला प्राथमिक शिक्षणासारख्या उपयुक्त कार्याकडे एवढी खर्चाची वाढ कांहीं विशेष नाहीं. शिवाय या ठरावाची बजावणी कशी करावी हें ठरविण्याकरितां कमिटी नेमा अशी सूचना होती आणि त्या कमिटीनें या खर्चाचा बोजा कोणकोणावर किती अंशानें बसवावा याचा निर्णय केला असता; आणि ती विभागणी मान्य करणें न करणें हें अखेर सरकारच्या स्वाधीनच होतें. पण असल्या भावी अडचणींच्या भीतीनें कमिटी नेमण्याचा ठरावदेखील फेटाळून लावावा हा कोठला शहाणपणा ?

आयुर्वेदाची आणि देशी वैद्यांची भरकौन्सिलांत टर उडवून प्रसिद्धी पावलेले ले. कर्नल जॅक्सन यांना शिक्षणाच्या बाबींत सक्ति अमलांत कशी आणावी हेंच मोठें कोडें पडलें आहे. ते म्हणतात कीं, या कामीं जर

पोलिसांची योजना करावी तर आधींच लोकांचें त्यांच्यासंबंधीं जें वाईट मत आहे त्यांत भर पडेल व पोलिसांचें नांव अधिकच अप्रिय होईल. पण जॅक्सनसाहेबांची ही भीति अगदीं अनाठायी आहे. पोलिसांनीं आपल्या स्वतःच्या आजपर्यंतच्या अगम्य व अतर्क्य लीलांनीं आपलें स्वतःचें नांव इतकें बद्दू करून घेतलेलें आहे कीं, आतां शिक्षणाच्या पायीं थोडीबहुत सक्ति करण्यानें त्या बदनामींत अधिक भर तर पडणार नाहींच, पण उलट त्यांच्या अधिकाराचा या सत्कार्यास थोडाबहुत हात लागला तर त्यांच्या पापाचें पारडें थोडें तरी हलकें होईल. सन्माननीय गृहस्थांचा आदर करण्याकरितां प्रेमानें जमलेल्या समाजास दंडुक्याच्या धाकानें हांकून लावण्यांत ज्या पोलिसांना क्षिति वाटत नाहीं, त्यांना लहान मुलांना उचलून शाळेंत नेण्याचें काम जुलुमाचें वाटेल किंवा त्यामुळें लोकांत त्यांच्याविषयीं अप्रीति उत्पन्न होईल ही कल्पना जॅक्सनसाहेबांखेरीज दुसरा कोणी शक्य मानील असें वाटत नाहीं. मुलें शाळेंत पाठविण्याबद्दल सक्ति करावी लागल्यास पोलिसांची संख्या वाढवावी लागेल, अशीहि दीर्घशंका या शहाण्यांनीं प्रदर्शित केली आहे. परंतु बडोदें, म्हैसूर अगर इतर ज्या कोणत्या संस्थानांनीं अशी सक्ति सुरू केली आहे, त्या संस्थानांतून या कायद्यामुळें पोलिसांच्या संख्येची वाढ करावी लागली असा दाखला नाहीं. शिवाय हे टीकाकार दुसरी एक गोष्ट अजीबात विसरतात ती ही कीं, बडोदें संस्थानांत अत्यंत मागासलेल्या व डोंगराळ प्रांतांतल्या वस्तींतहि ही सक्ति लागू करण्यांत आली आहे; परंतु ना. पटेल यांचा ठराव केवळ म्युनिसिपालिटी असलेल्या गांवांपुरताच मर्यादित होता आणि असल्या गांवांतील समाज साधारणतः समजूतदार असून त्यास स्वाभाविकपणेंच शिक्षणाची आवश्यकता भासूं लागली आहे. अशा स्थितींत पोलिसांच्या जुलुमाचें व त्याच्या परिणामाचें भेसूर चित्र काढून भाबड्या सभासदांस भेडसावण्याचें प्रयोजन काय ?

आतां राहिलेल्या ना. चौबळ यांच्या एका आक्षेपाचें निरसन करूं. 'शिक्षण मोफत करण्याचें प्रयोजन काय ? ज्या सुखवस्तु गृहस्थांना किंवा लक्षाधीशांना शाळेची फी देण्याची ऐपत आहे त्यांच्या मुलांनीं मोफत शिक्षण कां घ्यावें ? ' या मनोभावनेंत ना. चौबळांचा जो सात्त्विक रोषाचा

व्हाणा आहे तेवढ्यापुरती ती भावना अभिनंदनीय आहे. गृहस्थाश्रमीयांस अन्नछत्रांत जेवणें केव्हांहि वर्ज्यच आहे; परंतु तेवढ्यानें सक्तीचें शिक्षण मोफत करूं नये असें मात्र सिद्ध होत नाहीं. मोफत शिक्षणाविरुद्ध आक्षेप या दृष्टीनें वरील कोटीक्रम अगदीं भ्रामक आहे. तथापि तो गुप्त हेत्वाभासमूलक असल्यानें मोठमोठ्या वावदूकांसहि तो चकवितो, सबब त्याचें खंडन करणें जरूर आहे. सक्तीचें शिक्षण मोफत दिलेंच पाहिजे असा आमचा आग्रह आहे, परंतु प्रत्येकानें शिक्षण मोफतच घ्यावें अशी सक्ति करावी असें आम्हीं कधींहि प्रतिपादन केलें नाहीं. यास्तव ज्यांस ऐपत असेल त्यांनीं आपल्या मुलांसाठीं खुशाल शेंपन्नास रुपये पगार देऊन स्वतंत्र शिक्षक ठेवावा. त्यास कायद्यानें प्रतिबंध होऊं शकणार नाहीं. परंतु सामान्य जनांकरितां सक्तीनें द्यावयाचें शिक्षण विनमोबदलाच दिलें पाहिजे, याला पहिलें मुख्य कारण हेंच कीं, सक्ति आणि मोबदला हे दोनहि शब्दच अत्यंत परस्परविरोधी आहेत. एकाद्यास एखादी वस्तु घ्यावयास भाग पाडणें आणि त्याच वेळीं त्याच्यावर त्या वस्तूची किंमत लादणें हा दुहेरी अन्याय होय. तो कोणीहि मान्य करणार नाहीं. बरें, जेवढीं मुलें सक्ति केल्यामुळेंच शाळेंत आलीं, तेवढ्यांस फी माफ व आपखुषीनें आलेल्या मुलांकडून मात्र फी वसूल करावयाची असें म्हटल्यास प्रत्येक शाळेनजीक साक्षीपुराव्याचें कोर्ट भरवावें लागेल. ज्याला ऐपत असेल त्याजकडून फी घ्यावी आणि अगदींच नादान असेल त्यास मात्र नादार घ्यावें म्हटलें तरी साक्षीपुराव्याचा कांहीं खटाटोप कमी व्हावयाचा नाहीं, यास्तव सक्तीच्या शिक्षणांत फी माफच केली पाहिजे.

वर दर्शविलेल्या कारणांखेरीज तिसरें एक बलवत्तर कारण हें कीं, शिक्षण मोफत केलें तरी ऐपतदार गृहस्थांकडून पर्यायानें शाळेचा खर्च वसूल करून घ्यावयाचाच असतो. शिक्षण मोफत केलें म्हणून शालागृहें कांहीं गंधर्वनगराप्रमाणें आकाशांतून आपोआप उत्पन्न होत नाहींत, किंवा त्या शाळेंतील शिक्षक वायुभक्षण करून विनपगारी काम करूं शकत नाहींत. अर्थातच हा खर्च समाजांतील संपन्न स्थितींतील लोकांकडून प्रत्यक्ष नाहीं तर अप्रत्यक्ष वसूल होत असतो; आणि शाळेंत येणाऱ्या प्रत्येक मुलाकडून डोईपट्टीप्रमाणें तो वसूल न करितां अप्रत्यक्ष कराच्या रूपानेंच वसूल करणें

चांगलें; कारण अप्रत्यक्ष करपद्धतींत जुलूम कमी होतो आणि कोणावरहि त्याच्या ऐपतीच्या व इच्छेच्या बाहेर बोजा बसत नाहीं. शिक्षण सक्तीचें व मोफत करावयाचें ठरल्यास, सुस्थितींतील म्युनिसिपालिटी आपल्या चालू करपट्टींतून तो खर्च भागवूं शकेल, आणि भिकार म्युनिसिपालिटीला त्याकरितां निराळ्या कराची तरतूद करावी लागेल. परंतु केव्हांहि या कराचा बोजा संपन्न स्थितींतील लोकांवरच पडणार असल्यानें, त्यांच्या मुलांस अन्नछत्रांत जेवल्याचें पाप तर लागणार नाहींच, पण उलट आपल्या पालकांनीं भरलेल्या कराच्या रकमेंतून भिकाऱ्यांच्या मुलांस फुकट विद्यादान दिलें जात आहे, असें त्यांस अभिमानानें म्हणतां येईल.

सक्तीच्या व मोफत शिक्षणाचें महत्त्व लोकांच्या मनावर आतां इतकें बिंबलें आहे कीं, ते याकरितां जादा करहि देण्यास तयार आहेत. सिंधमधून अशी सूचना पूर्वींच आली होती. मिठासारख्या आवश्यक पदार्थांवरील करदेखील थोडासा वाढवा, पण शिक्षण मोफत व सक्तीचें करा, असें ना० गोखले यांनींहि उद्गार काढले होते. ना० बसू यांनीं औद्योगिक कमिशनपुढील साक्षींत नुकतें हेंच सांगितलें. अशा परिस्थितींत मुंबईसरकारनें या गोष्टीचा शांतपणें सहानुभूतिपूर्वक विचार करावयास पाहिजे होता. खर्चाचा अंदाज ना० पटेल यांच्या हिशोबाप्रमाणें पंधरा लक्ष रुपये होईल, किंवा ना० शार्प यांचा कमाल अंदाज खरा धरला तरी फार तर तीस लक्ष रुपये होईल. परंतु कमिटी नेमून प्रत्यक्ष योजना तयार केल्याशिवाय या गोष्टीचा निर्णय कसा व्हावयाचा ? हा ठराव मान्य करून सरकारनें कमिटी नेमिली असती तर तिनें नक्की अंदाज ठरविला असता, त्यांतील कितवा हिस्सा म्युनिसिपालिट्यांनीं सोसावा, कितवा भाग प्रांतिक सरकारनें आपल्या शिरावर घ्यावा आणि वरिष्ठ सरकारच्या देणग्यांतून किती मदत मिळावी याची चर्चा झाली असती आणि या गोष्टीची शक्यता व सुलभता तेव्हांच प्रत्ययास आली असती. परंतु इतकी कळकळ व उत्सुकता न दाखवितां उलट खर्चाचा मोठा बाऊ करून आणि वरिष्ठ सरकारच्या धोरणास विरोध येईल ही काल्पनिक भीति पुढें करून, मुंबईसरकारनें या सुधारणेच्या कामीं अग्रस्थान पटकावण्याची आणि इतर प्रांतांना उदाहरण घालून देण्याची सोन्यासारखी संधि हातची दवडली

याबद्दल आम्हांस खेद वाटतो. कारण आतां ही मागणी एकट्या मुंबई इलाख्यांतच पुढें आली नसून, मद्रासच्या महाजनसभेनें शिक्षणमंत्री सर शंकरन् नायर यांजकडे हीच मागणी केली आहे. संयुक्त प्रांतांतल्या काँग्रेस-कमिट्याहि हीच विनंती करीत आहेत. फार तर काय, पण मागासलेल्या मुसलमानांच्या लीगनेंदेखील आपल्या सुधारणांच्या मसुद्यांत हिचा समावेश केला आहे. तात्पर्य काय कीं, ही गोष्ट कांहीं आतां फार दिवस टाळतां येत नाहीं. कोठेंना कोठें तरी याचा उपक्रम लौकरच होणार मग विनाकारण विलंब करून हातचें यश कां गमावता?

---

## २०. मुलांच्या शिक्षणांतील 'षड्रिपु'

( केसरी, तारीख १७ फेब्रुवारी १९२० )

पुणें शहरांत मुलांस आणि मुलींस मोफत व सक्तीचें प्राथमिक शिक्षण एकदमच द्यावें कीं काय या वादग्रस्त प्रश्नाचा निकाल फिरून एकवार गेल्या शनिवारीं भरलेल्या म्युनिसिपालिटीच्या सभेंत लागला. हें शिक्षण एकदमच द्यावें असें म्हणणारे लोकनियुक्त सभासद अवघे सहा निघाले! त्यांची तळी उचलून धरण्यास जरी सरकारनियुक्त असे दहा सभासद सरसावले तरी त्यानेंहि कार्यभाग झाला नाहीं. म्युनिसिपालिटींतील लोकनियुक्त सभासदांची संख्या सव्वीस आहे हें लक्षांत घेतलें म्हणजे या प्रश्नावर शहरांत खरें लोकमत काय आहे याचा तेव्हांच अंदाज होतो. वरील ठरावास प्रतिस्पर्धि सूचना म्हटली म्हणजे हें सक्तीचें शिक्षण मुलांस प्रथम लागूं करावें व नंतर मुलींस लागूं करावें ही होय. पण म्युनिसिपालिटींतील मवाळांच्या जिकीरीस कंटाळून सभासदांनीं अखेर या सूचनेचा विचार पुढील महिन्यापर्यंत तहकूब ठेवला. पुढील महिन्यांत झालें तरी याहि सूचनेचा निकाल पहिलीप्रमाणेंच लागणार हें उघड दिसतें. कारण सक्तीच्या शिक्षणाचा कायदा अंशतः तरी लागूं करून पुण्यानें आपलें शिक्षण-विषयक प्रगतिपर कर्तव्य केलें हें श्रेय राष्ट्रीय पक्षाच्या पदरांत पडणार या भीतीनें

गांगरलेले मत्सरग्रस्त मवाळ आपला सूड उगविणार, आणि निदान मुलांना तरी जें मिळालें असतें त्या सक्तीच्या शिक्षणास अपशकून करणार, हें पुण्यांतलें एखादें पोरहि आज सांगूं शकेल. तसें झाल्यास या हेवेखोर व हेके-खोर घातकी वर्तनाची जबाबदारी सर्वस्वीं मवाळपक्षावरच राहील, आपणांवर उरणार नाहीं, इतकें तरी समाधान मानण्यास राष्ट्रीयांना जागा आहे.

पण हें समाधान कांहीं खरें किंवा टिकाऊ नव्हे. कारण सक्तीचें शिक्षण शहरांत लागू करण्याची तळमळ राष्ट्रीय पक्षास आज दीड वर्ष लागून राहिलेली असून, केवळ या षड्रिपूंच्या असमंजस विरोधामुळें ती निष्फळ झाली आहे व अद्यापि होत आहे, हें पाहून त्या सभासदांप्रमाणें आम्हांसहि अत्यंत खेद वाटतो. पण राष्ट्रीयांची मोफत शिक्षणाची योजना उलथून पाडून वरती त्यांनाच अप्रामाणिक म्हटलेलें पाहिलें म्हणजे मात्र जख-मेंत मीठ भरल्याप्रमाणें आमच्या खेदांत संतापाची भर पडते. " शहरच्या सांपत्तिक स्थितीचा विचार न करतां, वाटेल तितका कर बसवा, मुलांस व मुलींस दोघांसहि सक्तीचें शिक्षण एकदमच द्या, आणि संभाळा, तसें न कराल तर आम्हांस मुलांनाहि तें शिक्षण द्यावयाचें नाहीं, " असा आततायीपणा करणारे लोक मात्र सच्चे प्रामाणिक ! आणि " आज मुलांपुरतां हा उप-क्रम करूं या, लवकरच अधिक खर्च करण्याची तयारी करूं व मग मुलीं-नाहि या सक्तीचा फायदा देऊं " असें म्हणणारे राष्ट्रीय मात्र अप्रामाणिक ! खासा न्याय ! पण हा 'न्याय' असें जनता कधींहि म्हणणार नाहीं. कारण उघड्या डोळ्याला धडधडीत दिसणारा सत्यासत्याचा निर्णय न पाहण्या-इतकी जनता आंधळी झाली नाहीं. आपण सर्वगुणसंपन्न आहों, विशेषतः त्या गुणांत प्रामाणिकपणा हा आपला फारच ठळक सद्गुण आहे, असें मवाळांना आत्मप्रेमामुळें वाटणें स्वाभाविक आहे. पण जगानें तसें म्हणावें लागतें येवढेंच काय तें त्यांत कठीण !

पण आम्ही म्हणतों त्याप्रमाणें मवाळांची ही टवाळी आहे, कीं त्यांचें हें खरोखर स्त्रीशिक्षणविषयक प्रेमच आहे, याचा थोडासा खुलासेवार विचार आज करूं. प्रथम ही गोष्ट सांगितली पाहिजे कीं, शिक्षण ही वस्तु अत्यंत मौल्यवान् व उपयुक्त असून, पुरुषांप्रमाणें स्त्रियांनाहि ती अवश्य हवी या-विषयीं कोणाचाच मतभेद नाहीं. राष्ट्रीयपक्ष हा स्त्रीशिक्षणाचा द्वेष्टा आहे

असें म्हणणें म्हणजे ती त्या पक्षाची शुद्ध बदनामी होय. राष्ट्रीयपक्षानें आपलें शक्तिसर्वस्व व बुद्धिसर्वस्व आजवर राजकीय चळवळीवर खर्चलें याचें कारण, आजच्या स्थितींत राजकीय चळवळ—निर्भीड राजकीय चळवळ—तीव्र राजकीय चळवळ—हेंच पारतंत्र्याच्या रोगास लागू पडणारें असें सर्वांत अधिक गुणकारी औषध आहे असा राष्ट्रीयपक्षाचा विश्वास आहे. आज जरी सुधारणांचा कायदा होऊन या रोगाचें एखाद-दुसरें लक्षण लोपण्याची आशा दिसत असली, तरी हा कष्टसाध्य रोग समूळ नाहींसा होण्यास हें औषध आणखी किती तरी वर्षें एकसारखें घेत राहिलें पाहिजे हें उघड आहे. शिवाय दुर्दैवानें तें औषध देण्याची जबाबदारी पुढेंहि राष्ट्रीयपक्षावरच पडणार असेंहि दिसतें. कारण सुधारणांच्या कायद्यानें आपले हात स्वर्गाला टेकले, राजकीय मोक्ष पदरांत पडला, अशी खोटी भावना करून घेऊन राजकीय चळवळ थांबवा, चळवळ थांबवा, असा उपदेश मवाळ आजच करीत सुटले आहेत. कसेंहि असो; राष्ट्रीयपक्षानें राजकीय चळवळीची धुरी उचलली म्हणून त्याला योग्य अशा सामाजिक सुधारणांचें महत्त्व कळत नाहीं, किंवा त्या अमलांत आणण्यास तो प्रतिकूलच राहतो, हें म्हणणें खोटें आहे. आज प्रत्येक प्रांताकडे पाहिलें असतां राष्ट्रीय पक्षांत समाजसुधारणावादी लोक वाटेल तितके सांपडतील, व हे लोकहि केवळ तोंडानें बोलणारे नसून प्रत्यक्ष कृति करणारे आहेत. योग्य त्या मर्यादेंत योग्य त्या प्रकारचें स्त्री—शिक्षण ही सुधारणा त्यांना सम्मत असलेल्या सुधारणांपैकींच आहे.

पण स्त्रीशिक्षणाचें महत्त्व कोणीं कितीहि वर्णिलें तरी त्यामुळें पुरुष व स्त्रिया यांची समाजांतील स्थानांची अदलाबदल तर राहोच पण सर्वस्वीं बरोबरीहि तूर्त तरी होऊं शकत नाहीं. पुरुषांनीं मिळवावें व स्त्रियांनीं रक्षावें आणि सद्व्यय करावा हा क्रम जगांत अनादिकालापासून चालत आला असून, सुधारणेच्या बाबतींत अग्रगण्य असणाऱ्या पाश्चात्य राष्ट्रांतहि तोच आज जारी आहे. स्त्रिया या पूजनार्ह देवता आहेत असें मनूनें म्हटलें आहे; पण संसाराकरितां लागणाऱ्या द्रव्याचें अर्जन स्त्रियांनीं करावें आणि पुरुषांनीं त्यांचे पोशिंदे होऊन राहावें असें मनूनें सांगितलें नाहीं. तात्पर्य, संसारांतील आर्थिक जबाबदारी पुरुषाची पुरुषानेंच प्रथम निस्तरली पाहिजे, व ही

जबाबदारी त्याच्या हातून पार पाडण्यास लागणारें शिक्षण तो आपखुशीनें न घेईल तर तें त्याला सक्तीनेंहि प्रथम दिलें पाहिजे. हें शिक्षण पुरुषां-बरोबर स्त्रियांनाहि देतां आलें तर तें हरप्रयत्नानें जरूर द्यावें. पण तें जर कोणत्याहि योग्य कारणानें दोघांना एकसमयावच्छेदेंकरून देतां येण्या-सारखें नसलेच, तर त्या शिक्षणाचा मान म्हणा, फायदा म्हणा किंवा त्याचा जाच म्हणा, पुरुषांनाच प्रथम होणें अपरिहार्य आहे. एकच वस्तु दोघांना सारखी मिळण्याइतकी मुबलक असली म्हणजे ती कोणास द्यावी हा प्रश्नच उद्भवत नाहीं. पण ती तशी नसून कोणा एकालाच देतां येते, किंवा दोघांना सारखी वांटून दिल्यास कोणासहि धड उपयोगीं पडण्या-इतकी ती लाभत नाहीं, असा बिनतोड प्रसंग आल्यास आधीं कोण व मग कोण हा प्रश्न मात्र टळत नाहीं. आणि आर्थिक तत्त्वांवर रचलेल्या व चाललेल्या समाजाच्या आजच्या स्थितींत सक्तीचें शिक्षण खर्चाच्या ओझ्या-मुळें आधीं कोणास द्यावें व मग कोणास द्यावें, असा प्रश्न दुर्दैवानें उत्पन्न झाल्यास त्याचेंहि स्पष्ट उत्तर उघड आहे.

हें स्पष्ट उत्तर देण्यास कोणाहि समंजस मनुष्यानें भिण्याचें किंवा माघार घेण्याचें कारण नाहीं. सुधारणावादी म्हणवून घेणें याचा अर्थ सुधारणेच्या नांवाखालीं वाटतील त्या एकांतिक सूचना कोणीं केल्यास त्यांनाहि सक्तीनें संमति देणें असाच असेल, किंवा त्यांचे दोष दाखविण्याची चोरी होईल, तर तें सुधारणावादित्व आम्हांस नको. प्रस्तुत वादांतहि अशा एकांतिक सूचनाच करण्यांत येत आहेत. या कामीं ज्या पाश्चात्य देशांचा आचार कांहीं सुधारकांना स्मृतिग्रंथाइतका प्रमाण वाटतो, त्यांचीच साक्ष देतां येईल; फार काय पुण्यांतील मवाळांचे गुरु ना० गोखले यांचीहि साक्ष त्यांच्या विरुद्ध जाईल. मुलांच्या सक्तीच्या शिक्षणांत मुलगे व मुली यांचा समावेश एकदमच झाला पाहिजे कीं काय, किंवा सक्तीच्या शिक्षणाच्या कामीं स्थानिक संस्थांनीं खर्चाचा बोजा किती सोसावा, सरकारानें किती सोसावा यांविषयीं गोखल्यांनीं ज्या कबुल्या पूर्वीं दिल्या आहेत त्या झुगारून देऊन, त्यांचे चेले केवळ स्त्रीशिक्षणाच्या नांवावर पुण्यांतील लोकांना झुलवूं पाहत आहेत. आठ वर्षांपूर्वीं गोखल्यांनीं वरिष्ठ कायदेकौन्सिलांत सक्तीच्या शिक्षणाचें बिल आणलें त्या वेळीं त्यावर जो वादविवाद झाला त्यांत गोखल्यांनीं दिलेल्या

तीन कबुल्या या वादांत विचारांत घेण्यासारख्या आहेत. ‘मुलांचें शिक्षण व मुलींचें शिक्षण एकदमच झालें पाहिजे व तसें न बनेल तर मुलांचेंहि शिक्षण मागें टाकावें,’ असें गोखल्याचें मत नव्हतें. शक्य असेल तर तें एकदम झाल्यास बरें, असें गोखल्यांप्रमाणें आम्हांसहि वाटतें; पण तें शक्य नसल्यास वेगवेगळ्या वेळीं म्हणजे थोडें आगेमागें झाल्यास चालेल; त्यांत मोठासा घातपात किंवा सुधारणेविरुद्ध गुन्हा घडत नाहीं—असें आमच्याप्रमाणेंच गोखल्यांनींहि पण मत दिलें होतें.

कोणत्याहि समाजांत मुलगे व मुली शेंकडा अमुक एका प्रमाणांत आपखुषीनें शाळेंत जाऊं लागतील, तेव्हां मग सक्तीचें शिक्षण त्यांच्यावर सुरू करण्यास योग्य होतें असें गोखल्यांनीं कबूल केलें होतें. या कबुलीचा अवश्य परिणामच असा आहे कीं, मुलांचें हें प्रमाण केव्हांहि व कोठेंहि मुलींच्या आधीं इष्ट मर्यादेंत येणार म्हणून शिक्षणाची सक्तीहि मुलींच्या आधीं मुलांवरच करण्याची पाळी येणार! हा बिनतोड प्रसंग लक्षांत घेऊनच गोखल्यांना मुलांमुलींवर शिक्षणाची सक्ति आगेमागें झाल्यास चालेल अशी कबुली त्यांच्या विचारीपणामुळें द्यावी लागली. पुण्यांतील मुलांमुलींची खानेसुमारी लक्षांत घेतां काय दिसतें? हेंच कीं शाळेंत आपखुषीनें पाठविल्या जाणाऱ्या मुलांचें शेंकडा प्रमाण साठावर असावें; म्हणून मुलांवर सक्ति करण्यास योग्य ती वेळ आली आहे. याच्या उलट आपखुषीनें शाळेंत जाणाऱ्या मुलींचें प्रमाण शेंकडा वीस इतकेंहि पडतें कीं नाहीं, याची शंकाच आहे; म्हणून त्यांच्यावर शिक्षणाची सक्ति करण्याची वेळ अद्यापि आली नाहीं हें उघड आहे. गोखल्यांनीं अशी कबुली दिली होती कीं, हें प्रमाण शेंकडा तेतीसपर्यंत न पडेल तर शिक्षणाची सक्ति न केल्यास चालेल. हा मुद्दा सांगण्याचें कारण इतकेंच कीं, मुलींना सक्तीनें शिक्षण देण्याच्या मोहक कल्पनेनें भुरळलेले असे पुण्यांतील कित्येक ‘रोमान्सबहाद्दर’ असेंहि म्हणूं लागले आहेत कीं, मुलांमुलींचें शिक्षण सक्तीचें एकदम करतां येत नसेल तर तें मुलींनाच प्रथम लागूं करावें! एवढेंच नव्हे, तर ज्या मागासलेल्या वर्गांत आपखुषीनें शाळेंत जाणाऱ्या मुलींची संख्या शेंकडा पांचसहाहि भरत नाहीं त्या वर्गावरच ही सक्ति आधीं करावी! याचें नांव वितंडवाद; याचें नांव करणेकऱ्याचा वसा!

ना० गोखले यांनीं सक्तीच्या शिक्षणाच्या खर्चाचा विचार करितांना या खर्चाचा दोनतृतीयांश–मुलींच्याच काय पण मुलांच्याहि शिक्षणाच्या खर्चाचा दोनतृतीयांश–सरकारनें सोसला पाहिजे असा आग्रह धरला होता. शिक्षणाचें बिल मुंबई–कौन्सिलापुढें आलें त्याहि वेळीं खर्चाच्या या प्रमाणावरच जोर दिला गेला होता. अर्थात् कोणत्याहि म्युनिसिपालिटीनें सक्तीच्या शिक्षणाची योजना करावयाची तर सरकारी हिस्सा दोन–तृतीयांश धरूनच करावयास पाहिजे. पुणें म्युनिसिपालिटीच्या स्कूलबोर्डानें हा हिस्सा निमा धरला ही त्याची चूक होय; व मुलींच्या शिक्षणाप्रीत्यर्थ सरकारनें दोनतृतीयांशच काय, पण तीनचतुर्थांशहि खर्च सोसावा असें सयुक्तिकपणें म्हणतां येण्यासारखें आहे; तें सोडून मवाळपक्षानें तो हिस्सा निमाच धरला ही त्याचीहि चूक होय. पण या चुकीमुळें पुण्याच्या लोकांवर खर्चाचा नवा बोजा किती बसणार याचा विचार त्यांत झाला नाहीं! जर सर्व शिक्षणाचा खर्च दोनतृतीयांश गोखल्यांच्या म्हणण्याप्रमाणें सरकार सोशील, व मुलींच्या शिक्षणाप्रीत्यर्थ याहून जादा देणगी देईल, तर पुण्यास हें सक्तीचें शिक्षण दोघांना एकदम देण्याला परवडेल; अथवा सर्वसंमत अशा एखाद्या नव्या करारानें ही रक्कम जुळण्याचा संभव असेल तर गोष्ट निराळी. तसें झालें तरी सक्तीच्या तत्त्वाचे सामान्य आक्षेप उरतात ते वेगळेच. पण तें असो. "खर्चाचा हिशेब करतांना म्युनिसिपालिटी हल्लीं खर्च करते आहे तो लक्षांत घेऊं नये, यापुढें नवीन येणारा खर्च तेवढाच लक्षांत घ्यावा," असेंहि कित्येकांकडून सुचविण्यांत आलें आहे. पण ही चूक आहे. लहान मुलाला भात अधिक झाला म्हणजे 'त्यांतला तुला जो नको तो आधीं खा व हवा तो मागाहून खा' असें सांगण्यासारखाच वरील युक्तिवाद पोरकट आहे. कारण जुना खर्च झाला काय वा नवा काय, दोनहि देणारे लोक एकच आहेत हें ध्यानांत ठेवलें पाहिजे.

समाजाची सांपत्तिक स्थिति, कर देण्याची पात्रता वगैरे सामान्य पण अपरिहार्य गोष्टी लक्षांत न घेतां, आपण कांहीं तरी एक नवी गोष्ट करणार आहों या कल्पनेनें नुसतें हुरळून जावयाचें असेल व कोंकर–उड्याच मारावयाच्या असतील तर गोष्ट वेगळी. पण प्राथमिक शिक्षणाच्या खर्चाचा हिस्सा सरकारनें किती सोसावा हा मुद्दा महत्त्वाचा असून त्यावर वेळींच

जरूर तो जोर दिला पाहिजे. या बाबतींत तत्त्वाचा हातचा बाण घालवून मग ची ची करीत बसण्यांत अर्थ नाहीं. सक्तीचें शिक्षण देऊं इच्छिणाऱ्या सर्व म्युनिसिपालिट्यांनीं वेळींच हा आग्रह धरला तर सरकारास त्या प्रश्नाचा विचार करावा लागेल. नाहीं तर एका श्रीमंत किंवा हौशी म्युनिसिपालिटीचें उदाहरण परस्पर दुसऱ्यास दाखवून स्वतः सरकार नामानिराळें होण्याचा संभव आहे. या दृष्टीनें पाहतां सक्तीचें शिक्षण अमलांत येण्यास एखादें अधिक वर्ष लागलें तरी चालेल पण खर्चाच्या वांटणीचें तत्त्व उत्साहाच्या आवेशांत आपण गमवतां कामा नये. ही मोठी जबाबदारी आहे. हा प्रश्न केवळ व्यक्तिविषयक हौसेचा नाहीं. व्यक्तिविषयक औदार्यानें किंवा स्वार्थत्यागानें सुटण्यासारखा हा प्रश्न असता तर गोष्ट वेगळी, पण दुर्दैवानें तसा तो नाहीं. पुणें म्युनिसिपालिटीच्या कराचें प्रमाण दरमाणशीं आजच इतकें भारी आहे कीं, मुंबईसारख्या श्रीमंत, धनाढ्य शहराच्या मनुष्यासहि त्याच्या उत्पन्नाच्या मानानें पुण्याच्या माणसापेक्षां कमी कर पडतो. असें असतां मुंबईचें उदाहरण पुण्यास विचारांत कां घेऊं नये ? मुंबई म्युनिसिपालिटीनें पूर्वी ना० मेथा यांच्या सल्ल्यानें सक्तीच्या प्राथमिक शिक्षणाचा सर्व खर्च सरकारनेंच सोसला पाहिजे अशी मागणी केली होती; व खुद्द मुंबईनें आणखी दहा वर्षेपर्यंत सक्तीचें शिक्षण मुलींस काय पण मुलांसहि लागू करावयाचें नाहीं असें ठरविलें आहे. अशा स्थितींत पुण्यानें जर पुढें होऊन मुलांपुरतें सक्तीचें शिक्षण आजच सुरू केलें तर तें काय थोडें झालें ? मुंबईवर ताण करण्याचीच ज्याला तामस हांव असेल त्याच्याहि दृष्टीनें येवढ्यांत ती भागावी.

या बाबतींत ना० गोखले यांनीं ता. १६ मार्च १९११ रोजीं वरिष्ठ कौन्सिलांत केलेल्या भाषणांतील पुढील उतारा पुणें म्युनिसिपालिटींतील मवाळांनीं नीट लक्षांत घ्यावा. "It is obvious that the whole working of this bill must depend in the first instance upon the share, which the Government is prepared to bear of the cost of compulsory education wherever it is introduced. I find that in England the Parliamentary grant covers about $\frac{2}{3}$ of the total expenditure on elementary schools. In Scotland it amounts to more than that proportion, whereas in Ireland it meets practi-

cally the whole cost. I think we are entitled to ask that in India at least $\frac{2}{3}$ of the new expenditure should be borne by the state."

( सक्तीच्या शिक्षणाच्या बिलाची अंमलबजावणी सर्वस्वीं एका गोष्टीवर अवलंबून राहते हें उघड आहे. ती गोष्ट म्हणजे ज्या ठिकाणीं ती अंमलबजावणी होईल त्या ठिकाणीं लागणाऱ्या खर्चाचा कितवा हिस्सा सरकार सोसणार ही होय; किंबहुना सरकार किती हिस्सा सोडणार हीच गोष्ट सर्वांत आधीं ठरली पाहिजे. इंग्लंडमध्यें प्राथमिक शिक्षणाच्या खर्चाचा सुमारें $\frac{२}{३}$ हिस्सा पार्लमेंट म्हणजे खुद्द सरकार देतें. स्कॉटलंडमध्यें हें प्रमाण $\frac{२}{३}$ हून अधिक पडतें; व आयर्लंडांत तर बहुतेक हा सर्व खर्च स्वतः सरकारच सोसतें. तात्पर्य, या शिक्षणाचा निदान $\frac{२}{३}$ इतका खर्च सरकारनें सोसावा अशी मागणी करण्याचा हक्क आम्हांस आहे. )

खुद्द विलायतेंतच जर ही स्थिति, तर आम्ही हिंदुस्थानांत काय कुबेराचे बाप लागून गेलों आहों म्हणून सक्तीच्या शिक्षणाचा निम्याहून अधिक खर्च आम्हीं सरकारास मागूं नये ? यावर कोणी असें म्हणेल कीं, आज तुम्ही जास्ती पडेल तो खर्च करून सुरुवात तरी करा म्हणजे पुढें मागें सरकार तुम्हांस तो देईल. पण चालत्या मुलाला उचलून कडेवर घेण्याइतकें सरकार कांहीं वेडें नाहीं. लॉर्ड रिपन यांच्या वेळेपासून—प्राथमिक शिक्षण म्युनिसिपालिटयांच्या स्वाधीन झाल्यापासून—सरकारनें शिक्षणखर्च सोसण्यांत जो कृपणपणा दाखविला त्याचा इतिहास ज्यांना माहीत आहे ते तरी हा नवा खर्च डोळे मिटून अंगावर घेण्याचा उपदेश म्युनिसिपालिटयांना करणार नाहींत. यावर कोणी असें म्हणेल कीं, वर्ष दीड वर्षांत शिक्षणखातें दिवाणाच्या हातीं जाऊन लोकमतवादी कौन्सिलें निर्माण होणार आहेत, तेव्हां खर्चाचा हा प्रश्न पुढें सोडवून घ्यावा. पण त्यावर असें उत्तर देतां येईल कीं, आधीं हें खातें ज्याच्या हातीं जाईल तो खरा मुत्सद्दी 'दिवाण' असेल किंवा 'दिवाणा' असेल कोणीं सांगावें ? शिवाय खर्चाचा प्रश्न जसा वर्ष दीड वर्षानें सुटला तरी चालेल तसेंच सक्तीच्या शिक्षणाची योजनाहि हा निकाल लागल्यावर म्हणजे वर्ष दीड वर्षानें अमलांत आली तर कां चालूं नये ? आज आपखुषीच्या तत्त्वावर जितके मुलगे किंवा मुली शाळेंत येतात तितक्या सर्वांची सोय पुणें म्युनिसिपालिटीनें केलेली आहे व जरूर

तीं अधिक व्यवस्था ती करीलहि. मुलांच्या शिक्षणास फी आहे ती फीहि मुलींस आज माफ आहे. अशा स्थितींत उभयतांना एकदम सक्तीचें शिक्षण सुरू करून खर्चाचा मोठा बोजा कमिटीनें पतकरावा, लोकांवर भारी कर बसवावे, हातचें तत्त्व गमवावें आणि मग सरकारच्या तोंडाकडे पाहात बसावें ही गोष्ट आम्हास पसंत नाहीं. शिक्षणाच्या सरळ स्वाभाविक वाढीनें पुणें स्कूलबोर्डाचें बजेट सालोसाल रीतसर फुगत जाईल त्यास कोणीच ना म्हणणार नाहीं. किंबहुना सक्ति न करतां शिक्षणास उत्तेजन द्यावें म्हणून थोडीशी रक्कम लागल्यास ती मुद्दाम द्यावी. पण जुन्या किंवा नव्या सरकारशीं भांडून सरकारच्या गळ्यांत खर्चाचा योग्य हिस्सा घालीपर्यंत ना० गोखले यांनीं दर्शविलेलें तत्त्व सोडूं नयें.

अवघ्या दोन वर्षांपूर्वी सक्तीच्या शिक्षणाचें बिल मुंबई-कौन्सिलांत पास झालें तेव्हां मुलामुलींच्या शिक्षणासंबंधानें कोणाचें काय मत होतें हेंहि पाहण्यासारखें आहे. ता. २६ जुलै १९१७ रोजींच्या वादविवादांत ना. काव्हर्नटन यांच्या टीकेस उत्तर देतांना खुद्द ना. पटेल यांनीं स्वतःच असें बोलून दाखविलें कीं, " बिलाला कायद्याचें स्वरूप आलें असतां प्रथम त्याची अंमलबजावणी मुलग्यांपुरतीच व्हावयाची आहे, कालांतरानेंच तो कायदा मुलींना लागू होईल. किंबहुना या कायद्याची सरास अंमलबजावणी करवयाची झाल्यास फक्त मुलांच्या शिक्षणाबाबद जो अधिक खर्च येईल तोच तेवढा लक्षांत घेतला पाहिजे. " मुलींच्या शिक्षणाकरितां अधिक खर्च लक्षांत घ्यावयासच नको असें त्यांनीं स्पष्ट सांगितलें. " We have only to consider the cost of the boys to start with." फार काय पण जे ना. परांजपे आज मुलांमुलींना सक्ति एकदमच झाली पाहिजे, नाहीं तर सगळें गांठोडें बुडेल असा कांगावा करीत आहेत त्यांचें स्वतःचेंहि मत तेव्हां तसें नव्हतें. ता. ३ डिसेंबर १९१७ रोजीं हें बिल दुसऱ्या वाचनाकरितां कौन्सिलापुढें आलें तेव्हां ना. खानबहादूर पीरबक्ष यांनीं सुचविलेल्या एका उपसूचनेस उत्तर देतांना ना. परांजपे असें म्हणाले आहेत कीं, हें बिल क्वचित् कोणी म्युनिसिपालिटी मुलींनाहि लावील असा संभव मानला तरी त्यांत फारसें बिघडेल असें नाहीं; पण तसें प्रथमच घडेल—म्हणजे बिल मुलींना तावडतोब लागू कोणी करील—अशी आमची मुळीं अपेक्षाच नाहीं.

"Of course we do not expect that the bill will be immediately applied to girls." जी गोष्ट दोन वर्षांपूर्वी नामदार परांजप्यांच्या अपेक्षेच्याहि कक्षेबाहेर होती तीच आज इतक्या महत्त्वाची व निर्विवाद होऊन बसते कीं, ती न घडेल तर जग बुडेल! या मतांतरावरून पुण्याच्या मवाळपक्षांत प्रामाणिकपणाचे इरसाल कांदे कसकसे आहेत हें वाचकांनींच पहावें!

पाश्चात्य देशांतील दाखले किंवा खुद्द आपल्या गुरुजींचीं मतें यांची ओळख पुणें म्युनिसिपालिटींतील मवाळांना नसेल असें संभवत नाहीं. पण ना० गोखले हे एक शहाणे तर आपण सवाई शहाणे अशी ज्यांस घमेंड वाटत आहे त्यांना त्या ओळखीचें काय? 'काय हो, गोखले यांच्या मताचा आधार केसरीनें कां घ्यावा? केसरीनें त्यांचीं मतें कधीं कोणत्या बाबतींत मानलीं होतीं?' असा प्रश्न यावर आम्हांस कोणी करील हे आम्ही जाणून आहों, पण त्याला आमचें उत्तरहि तयार आहे. ना० गोखले यांचें एखादें मत चांगलें असल्यास तें चांगलें म्हणण्यास केसरीनें कधीं माघार घेतलीं नाहीं पण तसेंहि न मानलें तरी गोखल्यांचीं मतें केसरीवर बंधनकारक होण्याचा हा प्रश्न नाहीं. तीं त्यांच्या अनुयायांनीं बंधनकारक मानावीं कीं नाहीं हा प्रश्न आहे; व त्यांचें उत्तर हेंच कीं, पुराव्याच्या कायद्याप्रमाणें किंवा सामान्य व्यवहाराप्रमाणें पाहिलें तरी त्या मताचें बंधन त्यांना वादांत मान्य केलेंच पाहिजे. गोखले हे नेमस्त होते, पण त्यांचा नेमस्तपणा सुसंगत तरी होता. म्हणूनच वर दर्शविलेल्या मर्यादा सक्तीच्या शिक्षणांत त्यांनीं मान्य केल्या. पण आज त्यांच्या अनुयायांना घरच्या म्हातारीभोंवतीं तेवढा जहालपणा करावयास हवा आहे. सुधारणांचा पहिला हता मिळावा म्हणून कांहीं तरी करून दाखवायला पाहिजे, म्हणून कांहीं करूं या, असें म्हणून मुलांमुलींचें शिक्षण एकदम हातीं घेतलेंच पाहिजे अशी ओरड करीत सुटलेले व स्वतःस जबाबदार म्हणविणारे मवाळ स्वतःचें हंसें मात्र करून घेत आहेत. आम्ही तर स्वच्छ असें म्हणतो कीं, त्यांच्या या नाचरेपणाच्या मुळाशीं स्त्रीशिक्षणाची कळकळ ही खरी नसून कांहीं तरी करून लब्धप्रतिष्ठित बनण्याची हांव हीच आहे. जबाबदारीच्या भावनेला भुलून नसत्या बाजू अंगावर घेत घेत असेच हे जाणार असतील तर त्यांची

'जबाबदारी' लोकांना फारच भोंवणार हें भविष्य करण्यास फारशी हरकत नाहीं. सुधारणेच्या जो नवा बाजार भरणार त्यांत 'उचलेगिरी' करून कांहीं हातीं लागतें का पहावें अशा भावनेनें आरंभिलेल्या उद्योगाचीं हीं कच्चीं फळें आहेत म्हणून मवाळांना त्यांचे स्त्रीशिक्षणासारखे जुने चोचलेच काय पण ज्यांची त्यांनीं आजपर्यंत "तेली, तांबोळी व गुंड" या शब्दांनीं संभावना केली त्यांना बगलेंत मारण्याचे नवे चाळेहि सुचूं लागले आहेत. टिळकांनीं पूर्वीं ज्यांचें हित पाहिलें व ज्यांनीं टिळकांना मदत केली अशा सामान्य जनतेला जे मवाळ पूर्वीं 'ब्रूटफोर्स' किंवा 'पशु' असें म्हणत असत त्यांनाच आतां 'पशुपति' ही पदवी देऊन मवाळांनीं त्यांची आराधना आरंभिली आहे. पण पशुपति हें दैवत थोडेंसें भोळें असलें, त्याला तांडव नृत्य व अर्धनरनारीनटेश्वरत्व प्रिय असलें तरी सच्चा उपासक कोण व लुच्चा उपासक कोण हें थोडेंबहुत जाणण्याचें ज्ञान त्याला आहे हें मात्र मवाळांनीं विसरूं नये.

---

# २१. देशी राजकुमारांचें शिक्षण

(केसरी, तारीख ६ जून १९०४)

गेल्या आठवड्यांत कलकत्ता येथें ना० लॉर्ड कर्झन यांनीं राजकुमारांच्या शिक्षणाच्या बाबतींत विचार करण्याकरितां एक कॉन्फरन्स भरविलें होतें. याप्रसंगीं हिंदुस्थानांतील विद्यमान लहानथोर कुमार-विद्यालयांचे अधिपति जमले होते. कार्यक्रम सुरू करितांना व्हाइसरॉयसाहेबांनीं अध्यक्षाचे नात्यानें नेहमींप्रमाणें विस्तृत व अर्थप्रचुर असें प्रास्तविक भाषण करून, त्यामध्यें देशी राजकुमारांच्या शिक्षणाची प्रस्तुतची स्थिति व तत्संबंधीं अवश्य सुधारणा वगैरे गोष्टींचें समग्र पर्यालोचन केलें. नंतर दोन तीन दिवसपर्यंत जमलेल्या कुमार-विद्यालयाधिपतींनीं याच विषयासंबंधीं पोटमुद्द्यांचा सूक्ष्म विचार केला व कॉन्फरन्स बरखास्त झालें. या वाटाघाटींत अखेर निकाल काय ठरला हें अद्यापि निश्चयात्मक कळलें नाहीं. तथापि एवढी गोष्ट

निर्विवाद आहे कीं, हल्लींच्या राजकुमारांच्या शिक्षणक्रमांत व्यवहारोपयोगी असा बराच फेरबदल करण्यांत येईल; व कुमारांच्या शाळा किंवा कॉलेजें ह्यांची संख्या कांहींतरी वाढेल. लॉर्ड कर्झन यांचें मन उदार असो अगर नसो; एवढें खरें कीं, त्यांच्या मुत्सद्दीगिरीला सर्व विषय सारखेच प्रिय असावे असें दिसतें; आणि त्यांची बुद्धि अकुंठित व कल्पनाशक्ति प्रबल असल्यामुळें एका विषयावरून दुसऱ्या विषयावर व दुसऱ्या विषयावरून तिसऱ्यावर ते मोठ्या लीलेनें उड्या मारूं शकतात. हिंदुस्थानांतील राज्यकारभाराची त्यांची मुदत अवघी पांच वर्षांची असल्यामुळें व तेवढ्यांत मी कांहींना कांहीं तरी करून दाखवीन अशी त्यांना ईर्षा असल्यामुळें ललिताच्या एका रात्रींत अठरा सोंगें आणून दाखविणाऱ्या नटाप्रमाणें त्यांनीं मुत्सद्दीगिरीचे अनेकविध चमत्कार करून, किंवा राज्यकारभाराचे दहावीस प्रश्न एखाद्या सर्कसमधील पात्राच्या हातावर नाचणाऱ्या चेंडूप्रमाणें खेळवून दाखवावे हें साहजिकच आहे.

देशी राजकुमारांचें शिक्षण हा विषय राज्यकारभारांतील महत्त्वाचा एक प्रश्न अशा रीतीनें इंग्रज सरकारापूर्वी येथें असणाऱ्या राज्यकर्त्यांस कधींहि भासलेला दिसत नाहीं. याचें कारण असें वाटतें कीं, हल्लींप्रमाणें प्रजा व मुख्य राज्यकर्ते यांमध्यें हक्कांच्या दृष्टीनें पाहतां स्वतंत्र परंतु वस्तुस्थितीनें पाहतां प्रजेहूनहि अधिक परतंत्र असा राजेरजवाड्यांचा वर्ग, हा देश परकीयांच्या एकछत्राखालीं येण्यापूर्वी, कधींहि उत्पन्न झालेला नव्हता. देशी राजेरजवाड्यांच्या मुलांस पूर्वी जें शिक्षण मिळत असे तें घरच्या घरीं व राज्यकारभाराच्या धंद्यांतच मिळत असे. एखाद्या डोंबाऱ्याच्या मुलास खरें ‘व्यवहारोपयोगी’ शिक्षण मिळण्यास त्याला कधीं कोणत्या शाळेंत घालावा लागत नाहीं हें आपण नेहमीं पाहातों, त्याचप्रमाणें पूर्वींच्या राजेरजवाड्यांच्या मुलांस लष्करी शिक्षण खुद्द रणांगणांत व राजनीतीचें शिक्षण दुर्दैवानें वडिलांच्या गादीवर बसण्याचा प्रसंग आलेला नसल्यास गादीजवळ बसून पण राजदरबारांतच मिळत असे. यामुळें अर्थातच कर्झनसाहेबांना, आमच्या कुमारांचें शिक्षण व्यवहारोपयोगी पण थोडेंसें लष्करी, परंतु एकंदरीनें निरुपद्रवी असें कसें करावें, हा जो बिकट प्रश्न येऊन पडला आहे; तो पूर्वी पडण्याचें कारण नव्हतें. दुसरें असें कीं, पूर्वी होऊन गेलेल्या मोठमोठ्या

खुद्द राजांसच मिळालेलें शिक्षण जर लिहिण्यावाचण्यापलीकडे गेलेलें नव्हतें, तर राजकुमारांस तरी दुसरें शिक्षण कोठून मिळणार ? व नुसत्या लिहिण्या-वाचण्याचें शिक्षण देण्यास शाळा किंवा कॉलेजें काय करावयाचीं ? खरोखरच, पूर्वी एकवेळ हिंदुस्थानांत प्रख्यात व पराक्रमी असे होऊन गेलेले राजे व इतिहासावरून पाहतां त्यांस जें शिक्षण मिळालें होतें तें शिक्षण या दोन गोष्टींचा विचार केला असतां लॉर्ड कर्झन यांस देशी राजकुमारांच्या शिक्षणाबद्दल पडलेली चिंता पाहून आम्हांस आश्चर्य वाटतें व हंसूंहि येतें. जमीनअस्मानचें अंतर असणाऱ्या लहानमोठ्या गोष्टींची तुलना करणें हा एक दोषच आहे. तथापि प्रस्तुतचा मुद्दा स्पष्ट करून सांगण्याकरितां सदरहू दोषाचेंहि क्षणभर अवलंबन करण्यास आम्ही तयार आहों. राम व युधिष्ठिर यांच्या सत्कीर्तीचा दुंदुभि अजूनहि लोकांच्या कर्णरंध्रांत दुमदुमत आहे, परंतु हे राजे कुमारावस्थेत असतांना त्यांस किती विषय शिकविलें जात होते, त्यांस कोणत्या शाळेंत घातलें होतें किंवा त्यांस वार्षिक परीक्षेत किती मार्क मिळाले होते याचा कांहीं कोठें उल्लेख सांपडत नाहीं. अशोक व विक्रम यांपैकीं एकाच्या हृदयांत झालेला धर्मोदय व दुसऱ्याच्या आंगचा पराक्रम हे जगविख्यात आहेत. परंतु यांना बाळपणीं शिकविल्या गेलेल्या क्रमिक पुस्तकांची याद कोठें मिळत नाहीं. भोजराजा हा बहुधा सर्व देशी राजांत अधिक विद्याव्यसनी व विद्वद्गुणग्राही असा मानला गेला आहे; परंतु त्याच्या बालपणीं काव्या-लंकारावरचीं कोणतीं संक्षिप्त पुस्तकें त्याचा शिक्षक त्यास शिकवीत होता हें कोणी सांगेल तर आमची ऐकण्याची इच्छा आहे. आधुनिक काळीं जणूं केवळ 'असतापासून सतच' निघावें त्याप्रमाणें मुसलमानी राज्याच्या योगानें विध्वंस पावलेल्या स्वराज्याचे रक्षेमधून सर्वांगपूर्ण अशी हिंदुपदपातशाही स्थापित करणाऱ्या शिवाजी महाराजांस लिहितांवाचतां मुळीं येत होतें किंवा नाहीं याविषयीं इतिहाससंशोधक अद्यापहि वादविवाद करीत आहेत. तिकडे पश्चिमेकडे पाहिलें तरी हीच स्थिति दिसून येईल. आलेक्झांडराला लष्करी शिक्षण देण्यास एखादें सँडर्स्ट त्यावेळीं नव्हतें हें खास आहे. इंग्लंडचा सर्वांत लोकप्रिय व सन्मान्य राजा आल्फ्रेड याच्या चरित्रांत कोठेंहि तो घोकंपट्टी करीत असलेल्या बुकांचा किंवा त्याला समजून दिल्या जाणाऱ्या

एखाद्या नीतिबोधाचा ( Moral Text-Book ) उल्लेख सांपडत नाहीं. उल्लेख सांपडतो तो याच गोष्टीचा कीं, आल्फ्रेड राजानें केवळ बाल्यावस्थेंत असतांच स्वदेशाचे शत्रु जे डेन्स लोक त्यांच्या विरुद्ध लढण्याच्या कामीं आपल्या भावास मदत करण्यास एकदम धांव घेतली! रशियाच्या पीटर धी ग्रेट राजानें आपल्या अमदानींत जितक्या सुधारणा एकदम केल्या, तितक्या दुसऱ्या कोणत्याहि राजानें क्वचितच केल्या असतील. परंतु त्याच्या बालपणीं त्यास शिक्षणाचा आनंद अनुभविण्यास सांपडल्याचें दिसत नसून लहानपणापासूनच राज्योपाधीच्या दगदगींत त्याचा काळ गेला असें दिसतें. जर्मनीचा प्रख्यात बादशहा फ्रेडरिक धि ग्रेट याचीहि गोष्ट अशीच आहे. पुढें एवढ्या पराक्रमी होणाऱ्या राजाला बालपणीं घरकोंबडेपणाचा छंद लागावा, लष्करी परेडीनें कपाळशूळ उठावा, शिकारीचें भय वाटावें व फक्त आनंद काय तो येऊन जाऊन एखाद्या गवयाच्या पोराप्रमाणें अलगूज वाजवीत बसण्यांतच वाटावा, व या सर्वांकरितां बापाच्या हातचे चाबूक खाण्याच्या भीतीनें आईच्या पाठीशीं दडणें हाच काय तो त्याच्या बालपणाच्या शिक्षणाचा मासला असावा ही आश्चर्याची गोष्ट नव्हे काय? बालपणचें शिक्षण व तरुणपणचें कर्तृत्व यांमध्यें, निदान राज्यकर्त्यासंबंधीं तरी पाहातां, विशेष संबंध आहे असें मानणाऱ्यांस वरील प्रश्न सोडविणें थोडेंसें बिकट जाणार नाहीं काय? तात्पर्य, कर्तृत्वसंपन्न राजा निपजण्यास हल्लीं ज्यास आपण सुशिक्षण असें मानतों तें मिळणें आवश्यकच आहे असें आम्हांस तरी निदान वाटत नाहीं.

यास उलट प्रत्यंतर पाहणें झाल्यास असें दिसून येईल कीं, गेल्या तीस वर्षांत हिंदुस्थानांत राजकुमार कॉलेजें स्थापित होऊन सुशिक्षणाचे ढीगच्या ढीग पडले असतांहि नव्या पिढीच्या राजेरजवाड्यांमध्यें असा कोणता सद्‌गुणी अगर सुसंस्कृत मनाचा पुतळा निर्माण झाला आहे कीं, ज्याकडे बोट दाखवून या कॉलेजांची किंवा तीं स्थापन करणाऱ्या राज्यकर्त्यांची आपणांस धन्यता वाटेल? एवढेंच नव्हे तर, उलट हल्लींच्या शिक्षणाच्या छापांतून बाहेर पडलेल्या राजकुमारांपैकीं कित्येक असे दाखवितां येतील कीं, ज्यांच्यावर शिक्षण हें पालथ्या घागरीवर ओतलेल्या पाण्याप्रमाणें वाहून गेलें व ते पूर्वींच्या शुद्ध व स्वयंभू मठ्ठपणामुळें किंवा दुर्गुणामुळें

सरकारच्या व लोकांच्या केवळ तिरस्कारास मात्र पात्र झाले. दुसरे कित्येक असे दिसत आहेत कीं, त्यांस इंग्रजी शिक्षणानें म्हणजे साहेबांच्या सहवासानें फक्त औपचारिक व गोड गोड असें बोलतां मात्र येऊं लागलें, परंतु त्यांच्या आंगांतील रानदांडगेपणा खरोखर जसाचा तसा राहून हें मिश्रण तिऱ्हाइताचे फसवणुकीस मात्र कारण झालें. दुसरे कित्येक स्वदेशप्रियतेचा डौल घालण्यास शिकले मात्र; परंतु नखशिखांत अंतर्बाह्य विदेशी बनले; व ब्रिटिश राज्याच्या धोरणाचें अनुकरण करण्याची चटक लागल्यानें, परंतु हातीं सत्ता किंवा अंतःकरणांत उदारता नसल्यानें त्यांचें थोतांड लोकांस व सरकारास कळून ते हास्यास्पद होत आहेत. दुसरे कित्येक अधिक साधेभोळे असल्यामुळें त्यांना लपवाछपवीचा प्रकार माहीत नाहीं खरें, परंतु आपल्या इंग्लिश गुरूनें शिकविलेल्या मंत्राच्या अहर्निश पाठामुळें स्वदेश हें नांव मुळीं त्यांस माहीत नाहींसें झालें आहे. राज्यांतील सर्व मुख्याधिकारी इंग्रजच पाहिजेत असें त्यांस वाटतें, व हिंदुस्थानची आणि विलायतेची तिजोरी यांमध्यें अभेद उत्पन्न झाल्यामुळें त्यांना आपल्या रयतेचे लाखों रुपये इंग्रजांच्या कार्यास चुटकीसरशी देऊन टाकले तरी त्यायोगें आपण स्वदेशाचें कल्याणच करीत आहों असा त्यांस भास उत्पन्न होतो. अशांव्यतिरिक्त एखादा कोणी संस्थानिक शिक्षणाच्या साहाय्यानें स्वावलंबी, महत्त्वाकांक्षी, स्वपरहितविवेकी व परतेजासहिष्णु असा निपजला असलाच तर उच्छृंखल खोडयाच्या बरगड्यांत टोंचणाऱ्या लोखंडी चक्राप्रमाणें व बाहेर न दिसतां तोंडाचें रक्त काढणाऱ्या कांटेलगामाप्रमाणें दुःसह अशा पोलिटिकल एजंटाच्या कैचीमुळें हताश व दुःखी होऊन तो एखाद्या कोपऱ्यांत झुरत पडलेला असेल. ही सर्व स्थिति लक्षांत आणतां गेल्या तीस वर्षांत राजकुमारांना जें शिक्षण देण्यांत आलें त्यानें राजकुमारांचा किंवा लोकांचा विशेष फायदा झाला असें आम्हांस वाटत नाहीं; व लॉर्ड कर्झन यांनीं हें शिक्षण कितीहि अधिक "व्यवहारोपयोगी" केलें तरी त्यापासूनहि कांहीं फायद होण्याची आशा नाहीं. आमच्या म्हणण्याचा मुद्दा हाच कीं, खरें व्यवहारोपयोगी शिक्षण जबाबदारी आंगावर पडल्याशिवाय येत नाहीं, मग तें शिक्षण राज्यकारभारासंबंधीं अगर युद्धकलेसंबंधीं असो. पैकीं युद्धकलेचें तर इंग्रजबहादरांच्या आश्रयछत्रामुळें नांवच काढण्याचें कारण उरलें नाहीं; व खरा

राज्यकारभारहि संपुष्टांत येऊन त्याचें सूत्रचालकत्व सर्व पोलिटिकल खात्याच्या अधिकाऱ्यांकडे गेलें आहे.

शिक्षणाचे मुख्य दोन नमुने मांडतां येतील; व हे दोन्ही नमुने उद्देश-भिन्नत्वामुळें पृथक् स्वरूपाचे आहेत. पैकीं पहिल्या नमुन्याचा उद्देश आत्म-विकास किंवा व्यक्तीची सुधारणा हा होय; व दुसऱ्या नमुन्याचा उद्देश समाजविकास किंवा एकंदर समाजाची अगर देशाची सुधारणा हा होय. पहिला नमुना स्वीकारला असतां त्यापासून स्वतः व्यक्ति रूपसंपन्न व चपल होऊन तिचे मनोविकार तीव्र होतील व मनुष्याची प्रवृत्ति टापटीप, सुख-सेवन वगैरे गोष्टींकडे होईल. मात्र कर्तव्यबुद्धि त्याजमध्यें पुरी विकास पावणार नाहीं. या नमुन्याप्रमाणें शिक्षण पावलेल्या मनुष्यास स्वतः ज्ञान मिळविण्याची इच्छा होईल. परंतु मिळविलेल्या ज्ञानापासून समाजास फायदा करा देतां येईल याकडे त्याचें विशेष लक्ष लागणार नाहीं. अशा शिक्षणाचा मनुष्य तत्त्वज्ञानी होण्यास लायक असतो. व ज्याला आपण दिव्यदृष्टि म्हणतों ती अशाच मनुष्यास एखाद्या वेळीं येते. दुसऱ्या नमुन्याचें स्वरूप व परिणाम याच्या उलट आहेत. या नमुन्याच्या शिक्षणानें मनुष्य उद्योगी, व्यवहार-चतुर, बोलका होतो. परंतु तो विद्येचा दास बनत नाहीं. स्वतःच्या हक्कांचें रक्षण करण्याविषयीं तो दक्ष असतो व समाजघटना किंवा राजनीति वगैरे विषय त्यास अधिक प्रिय होतात. यांपैकीं शिक्षणाचा पहिला नमुना पूर्वी ग्रीस देशांत दिसून आला व दुसरा रोमन लोकांनीं अंगिकारिला होता व किंचित् विचार करून पाहिलें असतां असें दिसून येईल कीं, आपल्या राजेरजवाड्यांस जें शिक्षण द्यावयाचें तें दुसऱ्या नमुन्या-चेंच असलें पाहिजे. म्हणजे ते समाजनेते किंवा समाजघटक अशा दृष्टीनें त्यांस शिक्षण दिलें पाहिजे. केवळ व्यक्तिशः त्यांचाच विकास होण्या-सारखें शिक्षण त्यांस देऊन उपयोगी नाहीं. मनुस्मृतींत असें सांगितलें आहे कीं, "बालोऽपि नावमन्तव्यो मनुष्य इति भूमीपः। महती देवतां ह्येषा नररूपेण तिष्ठति ॥" अल्पवयी राजकुमार व भावी राजा हे दोन्ही-सारखेच मानले पाहिजेत; व श्लोकांतील दैविकस्वरूप जरी क्षणभर बाजूस ठेविलें तरी राजकुमारांच्या बाळपणचें सर्व शिक्षण सर्वांशीं राज्यव्यवहारोपयोगी असेंच असलें पाहिजे असें म्हणण्यास हरकत नाहीं. परंतु हल्लींचें शिक्षण

पाहतां तें लॉर्ड कर्झन यांनींच सांगितल्याप्रमाणें बिलकूल राज्यव्यवहारोपयोगी नाहीं. ज्यांना पुढें राज्यकारभार करावयाचा त्यांना भूमितींतलि गर्दभ-सिद्धान्त ( ass proposition ) किंवा संशयखोर साहेबांच्या चरकांतून सत्य व सत्त्व दोन्हीहि ज्यांतून पिळून निघालीं आहेत असा हिंदुस्थानचा इतिहास, किंवा पूर्वीच्या कथापुराणांतील उदार व महानुभव विभूतींचें नांवहि ऐकूं येत नाहीं असा एखादा नीतिबोध, किंवा काथ्याच्या गादीवर घसरून पडणें हेंच ज्यांतील साहस व गौरकाय तालिममास्तराचा कृपाकटाक्ष हेंच ज्यांचें बक्षीस, असे तालीमखान्यांतील लटुपटीच्या मर्दुमकीचे खेळ हे सर्व देशी राजकुमारांस शिकवून काय फायदा? जर त्यांनीं आपल्या पूर्वजांच्यासारखें नांव मिळवावें अशी सरकारची खरी इच्छा असेल तर त्यांनीं त्यांस भरपूर लष्करी शिक्षण देऊन व रणांगणावर त्यांस नेऊन इंग्लिश सरदारांच्या बरोबरीनें खांदा लावून भिडण्यास परवानगी दिली पाहिजे. ते खरे मुत्सद्दी व्हावे असा हेतु असेल तर त्यांस आपले सर्व अधिकार स्वतंत्रपणानें बजावण्याची परवानगी द्यावी. त्यांचा स्वदेशीपणा कायम रहावा असें असेल तर युरोपियन शिक्षकांचें बंड मोडून जुन्या चालीचे शास्त्रीपंडित व नव्या पद्धतीनें शिकून विद्वान् झालेले उत्तम नेटिव शिक्षक यांच्या स्वाधीन त्यांस करावें, म्हणजे ते शिक्षणाचे सर्व विषय देशी पद्धतीनें शिकून स्वाभिमानी होतील, व असें झालें तरच ते समाजाचे खरे कल्याणकर्ते होतील. हें जोंपर्यंत होत नाहीं व शिक्षणाच्या बाबतींतहि आपला "हाचा" गमावण्यास इंग्रज सरकार तयार नाहीं तोंपर्यंत कुमारांच्या शिक्षणाच्या सुधारणेबद्दल कितीहि लांब लांब गप्पा मारिल्या तरी त्या व्यर्थच आहेत असें आम्हीं समजतों. त्यापासून राजकुमारवर्गाचें खरें हित कांहीं एक न होतां इतर प्रजाजनांप्रमाणें त्यांचीहि अवस्था दिवसेंदिवस निकृष्टच होत जाणार.

---

# २२. "प्रासादशिखरस्थोऽपि काको न गरुडायते"

( केसरी, तारीख १३ मे १९०४ )

येथील फर्ग्युसन कॉलेजचे प्रिन्सिपाल प्रो० रघुनाथ पुरुषोत्तम परांजपे हे दोन वर्षांपूर्वी विलायतेंत विद्याभ्यासाचे कामीं उत्तम यश मिळवून स्वदेशास परत आले. ज्या संस्थेच्या अभिमानामुळें नांवाजण्यासारखा स्वार्थत्याग करून आजन्म शिक्षकाचें काम करण्याचें पत्करलें, त्या संस्थेच्या धुरीणत्वाचा म्हणजे मुख्य अध्यापकत्वाचा बोजा त्यांनीं आंगावर घेतला; त्यावेळीं इतर पुष्कळ लोकांबरोबर आम्हांसहि अशी आशा वाटत होती कीं, प्रि० परांजपे यांस विद्याव्यासंगाची जी गोडी विलायतेंत लागली, तीच इकडे आल्यावरहि कायम ठेवून त्यांनीं ज्या विषयांत विशेष प्रावीण्य मिळविलें, त्यांतच अभ्यासाचा क्रम चालवून एखादा सुरेखसा नवीन शोध, एखादें नवें चटकदार प्रमेय, अगर गणितशास्त्रांतील विस्तृत ज्ञानाच्या एकीकरणास साधनीभूत असा एखादा ग्रंथ अगर प्राच्य व पाश्चात्य गणितग्रंथांचें तुलनादृष्टीनें परिशीलन करून त्यावर ते एखादा निबंध लिहितील; परंतु कॉलेजांतील विद्यार्थ्यांस नित्यक्रमांत दैनिक पाठ शिकविण्यापलीकडे त्यांच्या विशिष्ट विद्यापरिशीलनाचा प्रत्यय लोकांस कोणत्याहि तऱ्हेनें अद्याप आलेला नाहीं अगर येईल असें त्यांच्या नित्यक्रमाच्या हकीकतीवरून दिसत नाहीं. येथेंच मजल खुंटली तरी बरें होतें; परंतु विशिष्ट गोष्ट ही कीं, प्रोफेसरमजकूर हे विलायतेस जाऊन आल्याची प्रतीति विद्यार्थ्यांस अगर त्यांच्या पालकांस जी आलेली आहे ती त्यांच्या विद्वत्तेपेक्षां इतर गोष्टींनींच अधिक आलेली आहे. उरलेल्या हिंदु सणाच्या सुट्या जशाच्या तशा न देणें, परंपरागत चालत आलेल्या हिंदु-रिवाजांची विनाकारण थट्टा करून विद्यार्थ्यांचीं मनें कलुषित करणें, स्वाभिमान अगर स्वदेशाभिमान कोणीं विद्यार्थ्यांनीं दाखविला असतां नाक मुरडून त्यांची अवहेलना करणें, इत्यादि गोष्टींनीं प्रो० परांजपे यांनीं आपले अपक्व धार्मिक व राजकीय विचार कॉलेजांतील विद्यार्थ्यांवर केवळ अधिकारबलानें लादण्याचा प्रयत्न केल्याचें आमच्या कानीं यापूर्वींच आलें असून त्याबद्दल प्रसिद्धपणें गवगवाहि झालेला होता. परंतु 'ईस्ट अँड

वेस्ट ' या नांवाच्या मासिक पुस्तकाच्या मे महिन्याच्या अंकांत प्रोफेसर-मजकुरांनीं ' हिंदुस्थानांत धार्मिक शिक्षणाची आवश्यकता आहे काय ? ' अशा अर्थसूचक प्रश्नाच्या मथळ्याखालीं जो एक निबंध लिहिलेला आहे त्यामुळें त्यांची अविचारपरंपरा संपली नसून अद्यापि तिची वाढ होण्याचा संभव आहे हें पाहून आम्हांस खेद होतो. अलीकडे कांहीं विशिष्ट कारणामुळें फर्ग्युसन कॉलेजच्या शिक्षकवर्गानें या इलाख्यांतील वरिष्ठ विद्याधिकाऱ्यांच्या इच्छेस मान देऊन सार्वजनिक विषयासंबंधीं मौनव्रत स्वीकारलें होतें हें फर्ग्युसन कॉलेजच्या मूळ उत्पादकांच्या हेतूंस कितपत धरून आहे याचा विचार आज आम्हांस कर्तव्य नाहीं. तथापि एका अर्थी हें मौनव्रत बरें असें प्रोफेसर परांजपे यांच्या हल्लींच्या लेखावरून म्हणावें लागतें. कारण, एकतर सार्वजनिक प्रश्नांच्या वाटाघाटींत फारसा न पडणाऱ्या प्रोफेसरास आपलें काम चांगलें न करण्यास वेळेची तरी सबब राहूं शकत नाहीं व भर्तृहरीनें ' स्वायत्तमेकांतगुणं विधात्रा विनिर्मितं छादनमज्ञतायाः ' या श्लोकार्धांत म्हटल्याप्रमाणें मौनव्रत हें अज्ञतेवर छाया धरणारें एक छत्रच असतें. प्रो० परांजपे हे तरुण आहेत, बुद्धिवान् आहेत व गणितविषयांत त्यांनीं प्रावीण्य संपादन केलें आहे; या गोष्टी आम्हास सर्वांशीं कबूल असून त्याबद्दल आम्ही सर्वथा त्यांचें अभिनंदनच करतों. परंतु वरील तिन्हींपैकीं एका किंवा सर्वहि गोष्टींमुळें धर्मविषयावर किंवा धर्म-शिक्षण या विषयावरहि त्यांनीं ठाम मतें ठोकून द्यावीं अशा प्रकारची पात्रता त्यांच्या ठिकाणीं आलेली नाहीं व येणें शक्यहि नाहीं. त्यास निराळ्या प्रकारचे संस्कार लागत असतात. प्रो० परांजपे यांचें अल्पवय असून बुद्धिसंस्कारास अनुकूल अशीं त्यांतलीं शेवटलीं वर्षें परदेशांत व परकीय आचारविचारांच्या निकट परिचयांत गेलेलीं आहेत व इकडे आल्यावरहि लोकसमाजांत जितके ते मिसळावयास पाहिजेत तितके ते कधीं मिसळले नाहींत. विद्याध्ययन पूर्ण झालें तरी त्यांनीं संसारयात्रेंतील प्रथमाश्रमहि ओलांडला नाहीं, म्हणजे अर्थात् संसाराचीं सुखदुःखें व समाजाचें हितानहित यांचा त्यांस सूक्ष्मानुभवहि झालेला नाहीं; व ज्या विषयावर त्यांनीं हल्लींचा लेख लिहिण्याचें धाडस केलें आहे, त्यावर आर्यवाङ्मयांतील तर राहूं द्याच, परंतु इंग्रजी वाङ्मयां-तीलहि एखादा सर्वमान्य ग्रंथ वाचला असेल किंवा नाहीं याविषयीं शंकाच

आहे. अशा स्थितींत आमच्या शाळांतून व विद्यापीठांतून किंबहुना त्यांतील विद्यार्थ्यांस कोणत्याहि रीतीनें धर्मशिक्षण देण्याची आवश्यकता नाहीं असें बेधडक विधान करणें यासारखें धाडस दुसरें कोणतेंहि नसेल. वास्तविक जबाबदारी न ओळखून व आपली अपात्रता ध्यानांत न आणतां केलेल्या विधानाची तिरस्कारपूर्वक अवहेलना हाच योग्य परामर्ष होय; परंतु प्रस्तुत प्रसंगीं फर्ग्युसन कॉलेजचे प्रिन्सिपाल या नात्यानें प्रो० परांजपे यांस स्थान-माहात्म्याचा जो फायदा मिळत आहे तो लक्षांत घेतला असतां त्यांच्या सदोष विचारपद्धतीचें योग्य वेळींच खंडण करून फर्ग्युसन कॉलेजांत जाणाऱ्या विद्यार्थ्यांच्या पालकांस सावधगिरीचा इषारा देणें हें आमचें कर्तव्य आहे असें आम्ही समजतों.

प्रो० परांजपे यांच्या लेखांतील विधानें इतकीं असंबद्ध आहेत कीं, त्यांची एकवाक्यता करणें कठिण आहे; परंतु खालीं दिलेल्या कांहीं कांहीं विधानांवरून त्यांची विचारसरणी लक्षांत येईल. प्रोफेसर मजकूर असें म्हणतात कीं, 'धार्मिक शिक्षणाची आवश्यकता हें हल्लीं राष्ट्रीय स्वाभिमानाच्या रडगाण्याचें एक पालुपदच होऊन बसलें आहे. कॅांग्रेस घ्या किंवा कॉन्फरन्स घ्या, सर्वांचें म्हणणें एकच व तें हें कीं, मुलांना धार्मिक शिक्षण द्यावें.' धार्मिक शिक्षणाचा हा विषय प्रोफेसरमजकूर म्हणतात त्याप्रमाणें आज-काल सार्वजनिक चर्चेचा होऊन बसला आहे हें खरें आहे. एवढेंच नव्हे तर प्रोफेसरमजकुरांस कदाचित् माहीत नाहीं अशीहि एक गोष्ट या बाब-तींत आम्हांस सांगतां येईल, व ती ही कीं, १८५४ सालीं शिक्षण या विषयावर हिंदुस्थानचे स्टेट सेक्रेटरी सर चार्लस वुड यांनीं लिहिलेल्या मिनिटापासून आजतागायत सरकारचा असा कोणताहि ठराव अगर हुकूम नाहीं कीं, ज्यामध्यें धार्मिक शिक्षणास प्रत्यक्ष प्रतिबंध केलेला आहे, अगर अप्रत्यक्ष रीतीनें तसें शिक्षण देणारांचा उत्साहभंग केलेला आहे. एवढेंच नव्हे तर, आम्हीं ऐकलें हें खरें असेल, तर प्राथमिक शाळांमधून तरी सामान्य धर्म व नीति यांसंबंधीं मुलांस दिवसांतून थोडेंबहुत शिक्षण देण्यांत यावें अशाविषयींची कांहींतरी योजना करण्याचा उपक्रम चालू आहे. बनारस येथें काढलेल्या सेंट्रल हिंदु कॉलेजास व मुंबईस चाललेल्या आर्यन् एज्युकेशन सोसायटीच्या शाळांस लोकाश्रय बराच आहे, व दुसरेपक्षीं

ज्या शाळांतून धर्मशिक्षण दिलें जातें, त्यांस धर्मशिक्षणाच्या सबबीवर ग्रँट देण्याचें नाकारण्याची विद्याखात्याची छाती नाहीं. या गोष्टी प्रसिद्ध असून प्रो० परांजपे यांसहि त्या माहीत असाव्या. तेव्हां अशा रीतीनें सर्वमान्य असलेली गोष्ट, ती सर्वमान्य आहे अशी प्रोफेसरमजकुरांची कबुली असतांहि ती त्यांसच तेवढी नापसंत कशी पडते हा प्रश्न सहजच उपस्थित होतो. यावर प्रोफेसरमजकुरांनीं दिलेलें उत्तर लक्षांत घेतां धार्मिक शिक्षणाची लोकमान्यता हीच त्यांच्या तिजविषयींच्या प्रतिकूल अभिप्रायाचें कारण होय असें म्हणावें लागतें. प्रोफेसर मजकुरांचें म्हणणें असें कीं, जी गोष्ट सर्वमान्य किंवा अत्यंत लोकप्रिय आहे तिजबद्दल प्रतिकूल अभिप्राय प्रगट करण्यास मनुष्यास धैर्य असावें लागतें. गोष्ट खरी आहे; पण असलें धैर्य किंवा एक-कल्लीपणा दाखविणाऱ्या गृहस्थांचीं मतें नेहमीं खरींच असतात असें नाहीं. कारण, केवळ गतानुगतिकत्व हा जसा दोष आहे तसाच लोकप्रिय गोष्टीचा विनाकारण तिरस्कार करणें हाहि पण तितकाच मोठा दोष होय. एका आधुनिक नाटककारानें आपल्या एका पात्राच्या तोंडून असें वदविलें आहे कीं, 'सर्व मनुष्यें सुलट्या पायानें चालतात व भुतांनीं मात्र उलट्या पायांनीं चालून ही परंपरा मोडली आहे; एवढ्याकरितांच मनुष्यांपेक्षां भुतें मला अधिक प्रिय आहेत.' प्रो० परांजपे यांचें गतानुगतिकत्वाबद्दलचें वैर जर विक्षिप्त पात्राच्यासारखेंच असेल तर धर्मशिक्षणाच्या विरुद्ध त्यांनीं केलेल्या ओरडीस कोणीच महत्त्व देणार नाहीं. दुसरी गोष्ट अशी कीं, लोकप्रिय असलेली गोष्ट जर खरोखरच सदोष व त्याज्य असेल तरच, तिची निंदा करणाऱ्याच्या धैर्याला कांहींतरी किंमत येईल. एरवीं नैतिक धैर्य व निखालस चारगटपणा हे दोन्ही शब्द समानार्थक झाल्याचें व्यवहारांत आपण पुष्कळ वेळां पाहतों. ' आपणांस कोणी नांवें ठेवो, समाजविद्वेशी म्हणो किंवा देशद्रोही असेंहि म्हणो, त्याबद्दल आपणांस मुळींच पर्वा नाहीं व या बाबतींत आपण हर्बर्ट स्पेन्सर यांचेंच वळण गिरवीत आहों' असें प्रोफेसर-मजकुरांनीं आपल्या लेखांत स्पष्ट म्हटलें आहे ! वळण अलौकिक खास आहे; परंतु कोणतेंहि वळण साधलें तर बरें, नाहींतर केवळ थोरामोठ्यांचें नांव सांगितल्यानें बचाव न होतां लिहिणारा हास्यास्पद मात्र होतो, ही गोष्ट प्रोफेसरमजकुरांनीं लक्षांत ठेवावयास पाहिजे होती. भाग्य पुण्याचें

कीं, हर्बर्ट स्पेन्सररूपी सूर्याचा पश्चिमेस अस्त होऊन तो पुण्याच्या पश्चिम दिशेस धैर्यमेरूवर निर्भेळ तात्त्विक विचाराचा शोध करण्याकरितां पुनः उगवला ! त्यांतूनहि फर्ग्युसन कॉलेज विशेष धन्य, कीं ज्यास तात्त्विक विचाराच्या सरणीनें हर्बर्ट स्पेन्सर यांशीं तुल्य विनयमिश्रित नैतिक धैर्यानें त्याहूनहि कांकणभर सरस असा महानुभव तरुण पुरुष प्रिन्सिपाल होण्यास मिळाला. अशा प्रकारच्या अध्यक्षाच्या अमदानींत विद्याधिकाऱ्याच्या इच्छे-प्रमाणें कॉलेजांतील स्वदेशाभिमानावरून लवकरच बोळा फिरल्यास त्यांत विशेष आश्चर्य वाटण्यासारखें कांहीं नाहीं हें उघड आहे. असो; धार्मिक शिक्षणाचा विषय आजकाल सर्वमान्य व लोकप्रिय आहे व तत्प्रतिकूल मत व्यक्त करणारा माणूस देशद्रोही मानला जाण्याचाहि संभव आहे. अशी स्थिति प्रो. परांजपे यांस कबूल असतां, हें प्रतिकूल मत जितक्या सावधगिरीनें त्यांनीं लोकांपुढें मांडावयास पाहिजे होतें तितक्या सावध-गिरीनें तें मांडलें नाहीं याबद्दल आम्हांस खेद वाटतो. त्यांनींच दिलेलीं उदाहरणें घेतां फ्रान्समध्यें जर्मनीची उघड स्तुति करणारास किंवा दक्षिण आफ्रिकेंत काळे गोरे सर्व लोकांस सारखे हक्क असावे असें म्हणणारांस किंवा चीनमध्यें परकीय (Foreign devils) देशांतून हाकून लावूं इच्छिणाऱ्या बाक्सर बंडवाल्यांची निंदा करणाऱ्यांस जें प्रायश्चित्त मिळेल तसें प्रायश्चित्त प्रोफेसर परांजपे यांस आपणांस मिळणार नाहीं अशी खात्री आहे; व म्हणून एकवेळ देशद्रोही म्हणवून घेण्यांतहि त्यांस भूषण वाटत आहे असें दिसतें; परंतु वरील मताविरुद्ध बोलणारे जे कोणी थोडे लोक त्या त्या देशांत असतील ते आपल्या मतांचें समर्थन जितक्या शांतपणें करतात किंवा त्यांना त्या विषयांची जितकी माहिती असते तितकी मनाची समता किंवा माहिती प्रोफेसरमजकुरांनीं आपलीशी करून घेतलेली आहे काय ? असा त्यांस आमचा एक प्रश्न आहे. ज्या देशांतील लोकांचें अनुकरण करण्याची अनावर इच्छा प्रोफेसरमजकूर यांस झालेली दिसते, त्यांपैकीं इंग्लंडचेंच उदाहरण घेतलें तरी त्यांच्याच कबुलीवरून असें दिसतें कीं, केंब्रिज व ऑक्सफर्ड येथील विद्यालयांत प्रॉटेस्टंट मताच्या विद्यार्थ्यांवर कॉलेजांतील ईश्वरोपासनेच्या मंदिरांत जाऊन उपासना करण्याबद्दलची सक्ति कॉलेजच्या नियमावरून केली जाते. खरोखरच धर्मशिक्षणांत ग्राह्यांश

मुळींच नसेल, तर इंग्लंडसारख्या सुधारलेल्या देशांत अशी सक्ति या विसाव्या शतकांत कां केली जावी, हें प्रोफेसरमजकूर सांगूं शकतील काय? ईश्वरोपासना हा जर एक निरर्थक—बाष्कळपणाचा—प्रकार मानला तर ऑक्सफर्ड व केंब्रिज येथील विद्यार्थ्यांचा जो प्रत्यहीं इतका वेळ व्यर्थ जातो त्याबद्दल विद्याधिकारी अगर पालकवर्ग अगदींच दुर्लक्ष करतात व ते आपली जबाबदारी मुळींच ओळखत नाहींत असें म्हटलें पाहिजे; व दुसरे-पक्षीं जर धर्मोपासनेंत जाणाऱ्या वेळाचा योग्य व्यय होतो असें म्हटलें, तर मग तितक्या वेळापुरतें तरी धर्मशिक्षण आमच्या इकडील शाळांतून व कॉलेजांतून देण्यास कोणती हरकत आहे याचेंहि उत्तर मिळावयास पाहिजे. प्रोफेसर परांजपे यांनीं काढलेला मुख्य आक्षेप असा आहे कीं, हल्लीं आपल्या राष्ट्रीयत्वाच्या सीमेंत हिंदु, मुसलमान, पारशी, ख्रिस्ती वगैरे सर्व जातींचा समावेश होत असल्यामुळें अमुक एक धर्मशिक्षण देणें हें अगदीं अशक्य होय; व खऱ्या राष्ट्रीयत्वाचा अभ्युदय होण्यास धर्मशिक्षण हें सहाय्यभूत न होतां विघातक होईल. परंतु हें नुसतें विधान असून त्याचें समर्पक समाधान प्रोफेसर परांजपे यांच्या लेखांत मुळींच नाहीं. मुळांत एक चूक प्रोफेसरमजकुरांच्या विचारांत झालेली दिसते व ती ही कीं, त्यांच्या मतें शाळांतून वगैरे धर्मशिक्षण द्यावयाचें म्हणजे एकाच विवक्षित धर्माचें शिक्षण सर्व धर्मीयांस जणुं काय द्यावयाचें. परंतु असें मानण्यास बिलकूल आधार नाहीं. दुसरेपक्षीं पाहातानां प्रत्येक धर्माच्या विद्यार्थ्यास त्या त्या धर्माचें शिक्षण दिलें असतां जातिविरोध वाढून राष्ट्रीयत्वाच्या कल्पनेच्या वाढीस धक्का बसेल हें म्हणणें व राष्ट्रांतील प्रत्येक मनुष्यानें आपण सधन होण्याची इच्छा केली असतां एकंदर राष्ट्र तितक्या प्रमाणानें सधन न होतां व्यक्तिविषयक स्वार्थबुद्धीच्या विरोधामुळें एकंदर राष्ट्र निर्धन होईल हें म्हणणें, हीं दोन्हीहि सारखींच समंजसपणाचीं होत. एकाच शाळेंत अनेक धर्मांचीं मुलें असूं शकतील व तितक्यांच्या धर्मशिक्षणाची निराळी व्यवस्था करणें हें त्रासाचें म्हणा अगर खर्चाचें म्हणा, कसेंहि म्हटलें तरी गैरसोयीचें आहे. असला किरकोळ मुद्दा प्रो० परांजपे यांनीं काढलेला नाहीं व त्यांनीं तो काढला असता तरी प्रत्येक शाळांतून-कॉलेजांतून संस्कृताप्रमाणें पर्शियन, लॅटिन, फ्रेंच वगैरे भाषा शिकवण्याची व्यवस्था केली जाते, हें ज्यांस

माहीत आहे त्यांस वरील प्रश्नाचें उत्तर देणें अवघड जाणार नाहीं. परंतु मुख्य प्रश्न एवढाच आहे कीं, ज्या त्या धर्माचें शिक्षण तद्धर्मीयांस दिल्यानें राष्ट्रीयत्वास हानि येईल किंवा कसें ? व यासंबंधीं एवढें सांगितलें असतां पुरें होईल कीं, धर्मशिक्षण म्हणजे जातिविरोधाचें शिक्षण नव्हे. अलीगड येथें मुसलमान लोकांनीं मुसलमानी धर्माच्या पायावर शिक्षणाची रचना केली आहे व उलटपक्षीं बनारस येथील सेंट्रल हिंदु कॉलेजांतील शिक्षण हिंदु-धर्मतत्त्वावर रचलें आहे. एवढ्यावरून उद्यां अलीगड कॉलेजचा ग्रॅज्युएट व सेंट्रल हिंदु कॉलेजचा ग्रॅज्युएट यांची आगगाडींत गांठ पडली असतां ते एकमेकांच्या उरावर बसतीलच असें प्रो० परांजपे यांचें म्हणणें असेल तर मग धर्मशिक्षणाविषयीं वाद न करतां प्रोफेसरमजकुरांच्या अज्ञानाची व अदूरदर्शित्वाची कींव करावी लागेल; निदान एवढें तरी म्हणावें लागतें कीं, कॉंग्रेसच्या मंडपांत किंवा उंच पीठावर शेजारींशेजारीं बसणाऱ्या सभासदांत जातीनें व धर्मानें अस्सल व अभिमानी असणारे हिंदु असूं शकतात, ही गोष्ट या मजकुरांस अवगत नसावी हें अत्यंत आश्चर्य होय.

प्रो० परांजपे यांच्या लेखांत दुसरेहि एक दोन महत्त्वाचे मुद्दे विचार करण्यासारखे आहेत. धर्मशिक्षणाची आवश्यकता आज नाहीं एवढेंच म्हणून ते राहिले नाहींत; तर खुद्द धर्मावरच त्यांनीं आपली गदा उगारलेली आहे, व हिंदुस्थानांत धर्मतत्त्वावर नीतीचा पाया रचलेला आहे, ही गोष्ट अगदीं घातक झालेली असून नीतीच्या पायावर धर्माची रचना झाली पाहिजे असें त्यांनीं प्रतिपादन केलें आहे ! परंतु धर्माहून नीति श्रेष्ठ व अर्थात् सर्वधर्मीयांस ती समान असें झालें तरी शाळांतून ती शिकविण्याचें कारण नाहीं असेंहि त्यांनीं मत दिलें आहे. या सर्व मुद्द्यांचा विचार करण्यास आज स्थलावकाश नाहीं. परंतु प्रोफेसरमजकुरांचा लेख वाचून त्यांची शिक्षकाच्या जबाबदारीची कल्पना अत्यंत संकुचित आहे; किंबहुना तिची व्याप्ति ठराविक धडा शिकवून धोतर झाडून मोकळें होण्यापलीकडे जात नाहीं एवढें सांगितल्यावांचून व त्याबद्दल अत्यंत खेद प्रदर्शित केल्यावांचून आजचा लेख पुरा करवत नाहीं.

---

# २३. शील सुधारणारें शिक्षण

( केसरी, तारीख १२ एप्रिल १९१० )

हिंदुस्थानांतील तरुणपिढीचें शील सुधारण्यास काय उपाय योजावे, यासंबंधानें अलीकडे सर्वत्र वाटाघाट सुरू आहे. मुंबईसरकारनें तर या बाबतींत विशेष लक्ष घातलें आहे. गेल्या आठवड्यांत मुंबई मुक्कामीं शिक्षक लोकांची परिषद भरविण्यांत आली होती. त्या प्रसंगीं याच विषयावर कित्येक गृहस्थांनीं निबंध वाचले व खुद्द नामदार गव्हर्नर-साहेबांनींहि नीतिशिक्षणावर आपले विचार विस्तृतपणें बोलून दाखविले. धार्मिक व नैतिक शिक्षण देण्याकरितां नवीन शिक्षक, नवीन पुस्तकें, वगैरे साधनांचा उपयोग करण्याची पद्धति सरकार कदाचित शाळाखात्याकडून अमलांत आणवील असाहि संभव आहे, धर्मशिक्षणाच्या आवश्यकते-विषयीं केसरीमध्यें सुमारें दोन महिन्यांपूर्वी आम्हीं लिहिलेंच होतें. तथापि या प्रसंगीं तोच विषय आणखी एक मजल पुढें नेऊन, त्याचा आपण विचार करूं.

वर सांगितलेल्या परिषदेंत निश्चयात्मक असा कोणताच ठराव मंजूर झाला नाहीं; व एक दोन तास वादविवाद करून ठराव करण्यासारखा हा विषयहि पण नाहीं. परिषदेंत धर्म, नीति, नागरिकत्व, राजकाज व आरोग्यशास्त्र इत्यादि विषयांच्या शिक्षणासंबंधानें चर्चा झाली. आतां शील बनविण्याच्या दृष्टीनें म्हटलें तर एका धार्मिक शिक्षणाचा विचारहि पुरे आहे, व म्हटलें तर राजकाज व आरोग्यशास्त्र हेंचसें काय, पण आणखीहि अनेक बाबींचा समावेश त्या शिक्षणांत करावा लागेल. पण वास्तविक आपल्या एकंदर तरुण पिढीस आज कांहीं एक मोठाच नैतिक रोग झालेला आहे असें आम्हांस वाटत नाहीं. कांहीं थोडीं मुलें अत्याचारी निघालीं, एवढ्यानें सर्वच तरुण पिढीच्या डोक्यांतील मेंदू बिघडला असें म्हणणें म्हणजे, मुलांच्यापेक्षां आपल्या स्वतःच्या वेडेपणाचाच पुरावा अधिक पटविण्यासारखें आहे. तरुण पिढीस जर खरोखरच वाचा फुटण्याचा मार्ग असता तर तिनेंहि यावेळीं एका आवाजानें निषेधपूर्वक हीच गोष्ट सांगितली असती असें आम्हांस वाटतें. तसेंच शाळेंत दिसून येणारी

मुलांची वर्तणूक व तीं अत्याचारी बनणें अगर न बनणें यांच्यामध्यें कांहीं दृढ व निकट संबंध असतो असेंहि आम्हांस वाटत नाहीं. परवां नाशिक येथील खुनाच्या खटल्यांत एका शिक्षकानें साक्ष दिली, तींत दोघां आरोपीं-बद्दल बोलतांना, त्यांची शाळेंतील वर्तणूक नांव ठेवण्यासारखी नव्हती— नांव घेण्यासारखी होती—असें सांगितल्याचें आम्हांस स्मरतें. नाशिकचा खटला सोडून इतर कित्येक खटल्यांतील तरुण आरोपींचें पूर्ववृत्त पाहिलें असतांहि असाच प्रकार असल्याचें आढळून येईल, असें आम्हांस वाटतें. तथापि नामदार गव्हर्नरसाहेबांनीं परिषदेपुढें सांगितल्याप्रमाणें, धर्मबुद्धि व ज्ञान यांची फारकत झाल्यामुळेंच हिंदुस्थानांतील हल्लींची तरुण पिढी युरोपियन देशांतील तरुण पिढीपेक्षां अधिक नादान बनत चालली आहे, हें खरें आहे असें जर क्षणभर मानून चाललें तर ही फारकत रद्द कशी करितां येईल, याचा विचार करणें अगत्याचें ठरतें.

परिषदेंत धर्मशिक्षण व नीतिशिक्षण यांच्यामध्यें भेद मानण्यांत येऊन त्यासंबंधानें परस्परविरुद्ध अशीं अनेक मतें प्रतिपादन करण्यांत आलीं. उदाहरणार्थ,मुंबईचे लॉर्ड बिशप यांनीं शाळांतून धर्मशिक्षणच द्यावें असें सांगितलें, फर्ग्युसन कॉलेजचे प्रिन्सिपाल प्रो० र. पु. परांजपे यांनीं धर्मशिक्षण देऊंच नये असें प्रतिपादन केलें; व ना० गव्हर्नरसाहेब व ना० शार्प,वगैरेंनीं धर्मशिक्षण देणें गैरसोईचें असल्यामुळें फक्त नीतिशिक्षण द्यावें असें मत प्रदर्शित केलें. आमच्या मतें धर्मशिक्षण व नीतिशिक्षण यांच्यामध्यें बिनतोड विरोध आहे असें मानण्याची जी प्रवृत्ति दिसून येते ती बरोबर नाहीं. विशिष्ट धर्मतत्त्वांवरच अवलंबून नाहींत अशीं अनेक सार्वदेशीय व सार्वकालीन नीतितत्त्वें आहेत ही गोष्ट जरी खरी आहे, तरी धर्मांच्या आश्रयानें हीं तत्त्वें अधिक खुलतात—एवढेंच नव्हे तर, त्या योगानें त्यांना बळकटीहि अधिक येते. मिल, स्पेन्सर, ब्रॅडलॉ, यांच्यासारख्या अलौकिक मनुष्यांस धर्मव्यतिरिक्त नीतितत्त्वें मानवतील; परंतु साधारण प्रतीच्या मनुष्यास स्वतःच्या धर्माशीं संलग्न असलेलीं नीतितत्त्वेंच जास्त उपयोगी पडतील. नीति ही केवळ आपल्या आंगच्या गुणांनींहि औषधाप्रमाणें परिणामकारक होण्यासारखी असली, तरी प्रकृतीच्या मानानें औषधास जसें अनुपान म्हणून लागतें, तसेंच नीतीस विशिष्ट धर्मविचाराचें अनुपान अवश्य आहे.

समाजाची परंपरा राहण्यास धर्मपरंपरा राखावी लागते; व धर्मपरंपरा तुच्छ करून निव्वळ नीतितत्त्वें पुढें ढकलण्याच्या प्रयत्नास फारसें यश येण्याचा संभव नसतो. किंबहुना, नीतितत्त्वांस धर्माचा पाठिंबा पाहिजे यास दुसरें असेंहि कारण आहे कीं, कोणत्याहि नियमान्वयें आचार होण्यास आचार-प्रवर्तक असा एखादा शास्ता लागतो; व अशा प्रकारच्या शास्त्याची कल्पना मनांत जागृत नसेल तर आचारप्रवर्तन व्हावें तसें होणार नाहीं अगदीं अखेरच्या स्थितींत धर्मविरहित नीतितत्त्वांना मनाशिवाय—सदसद्-विवेकबुद्धीशिवाय—दुसरा शास्ता राहत नाहीं; तथापि बहुजनसमाज कोणत्याहि कृत्याची स्वतःच्या मनावरच सर्व जबाबदारी घेण्यास तयार असतांहि, त्या मनाला विशिष्ट मार्गानें प्रत्यक्ष ईश्वरी प्रसादाचा आधार मिळेल तर फार चांगलें असें त्यास वाटत असतें. या दृष्टीनें पाहातां नीति-शिक्षणाबरोबरच धर्मशिक्षणहि देतां आलें तर फार चांगलें असें दिसून येईल.

आतां धर्मशिक्षण द्यावयाचें तर तें कसें द्यावयाचें, हा प्रश्न राहतो. हा प्रश्न सकृद्दर्शनीं दिसतो तितका खरोखर अवघड नाहीं. ज्या धर्मांना फाटे फुटले नाहींत असे धर्म थोडे; बहुधा प्रत्येक धर्माला पंथांचें स्वरूप येऊन राहिलेलें आहे ही गोष्ट खरी. तथापि सर्वच विद्यार्थ्यांस एकाच पंथाचें अगर मताचें शिक्षण सक्तीनें द्यावयाचें असें म्हटलें तरच धर्मशिक्षणाची व्यावहारिक अडचण खरी वाटण्याचा संभव आहे. धर्मशिक्षणाची सोय करावयाची म्हणजे मुख्य धर्मांच्या व मुख्य धर्मपंथांच्या शिक्षणाची सोय करावयाची असाच अर्थ करावयाचा. व या व्यवस्थेस जरी थोडेबहुत पैसे लागतील, तरी भावी तरुणपिढ्यांचें सर्व हितच जर या शिक्षणावर अव-लंबून आहे—जर हें शिक्षण दिल्याशिवाय तरुणपिढीचें शील खात्रीनें नाहींसें झालेंच पाहिजे अशी भीति कोणास खरोखरच वाटत असेल—तर त्यांनीं ते पैसे खर्च करण्यास तयार झालें पाहिजे ! हिंदुधर्मांत अनेक पंथ आहेत खरे; तथापि, खिस्ती धर्मांत मुळींच पंथ नाहींत असें नाहीं. खिस्ती धर्मांत क्याथॉलिक, एपिस्कोपेलियन, प्रेस्बिटेरेनियन, मेथॉडिस्ट, बॅपटिस्ट, वगैरे अनेक पंथ असतांहि आजपर्यंत शाळांतून खिस्तीधर्मशिक्षण देणें हें इंग्लंडांत शक्य झालें होतें; जर्मनींत तर, भौतिकशास्त्रें (Sciences) शिकवितांना

एकाच पंथाचें शिक्षण द्यावें, पण धर्मशिक्षण देतांना पंथापंथाचें शिक्षण द्यावें, हा सिद्धांतच ठरून गेला आहे. हिंदुस्थानांतहि अशीच पद्धति अमलांत आणण्यास सरकारास पंचाईत पडूं नये. कॉलेजमध्यें ज्याप्रमाणें पदवीच्या परीक्षेस अनेक ऐच्छिक विषय असतात, व त्यांपैकीं प्रत्येक विषयाच्या शिक्षणाची वेगवेगळी व्यवस्था केलेली असते, त्याप्रमाणें धर्म-शिक्षणाची व्यवस्था करतां येणें अशक्य नाहीं.

आतां ही व्यवस्था कशी करतां येईल हें तारतम्यानेंच जाणलें पाहिजे त्यांत हटवादानें कीसच काढीत बसल्यास अनवस्था होईल हें उघड आहे. हिंदुस्थानांत पांच चार मुख्य धर्म आहेत व प्रत्येक धर्मांत पांच चार पंथ असतात, यास्तव 'प्रत्येक शाळेंत व प्रत्येक कॉलेजांत इतर शिक्षक कितीहि थोडे असले तरी धर्मशिक्षक मात्र वीस पंचवीस असलेच पाहिजेत' हें बोलणें हटवादाचें झालें. परंतु तारतम्यानें व समंजसपणानें बोलावयाचें झालें तर असें म्हणतां येईल कीं, 'शहराच्या मानानें व कॉलेजें किंवा शाळा यांच्या मानानें निरनिराळ्या धर्मांच्या मूलभूत ग्रंथांचें शिक्षण देण्याची व्यवस्था करितां आली म्हणजे पुरे आहे.' आज मुंबईच्या विश्व-विद्यालयांत दहा पंधरा देशी व परदेशी भाषा 'दुसऱ्या भाषा' म्हणून परीक्षांस ठेवलेल्या आहेत हें प्रसिद्धच आहे. तथापि कोणत्याहि कॉलेजांत इंग्रजी-खेरीज करून फार तर दोन भाषांचें शिक्षण दिलें जातें. पण तेवढ्यावरून कॉलेजें भाषाशिक्षणाचें आपलें काम करीत नाहींत असें कोणीहि म्हणत नाहीं. भलत्या कॉलेजांत भलती भाषा शिकणारा विद्यार्थी आल्यास त्याला 'विशिष्ट भाषेचा अभ्यास तूं आपला आपण कर, अगर दुसऱ्या कॉलेजांत जा' असें सांगण्यांत येतें. पण असें सांगितल्यानें त्या विद्यार्थ्यांच्या हक्काकडे दुर्लक्ष केलें असें मानण्यांत येत नाहीं. पण भाषांचीच गोष्ट कशाला? अभ्यास क्रमांतील इतर विषयांचीहि गोष्ट अशीच आहे. बी. ए. ला वनस्पतिशास्त्र, इंद्रिय-विज्ञानशास्त्र, प्राणिशास्त्र वगैरे ऐच्छिक विषय असतात. परंतु अशी पुष्कळ कॉलेजें आहेत कीं, त्यांमध्यें पैशाची सोय नसल्यामुळें या विषयांचे वर्गच नसतात. एम्. ए. च्या परीक्षेला पांच सात ऐच्छिक विषय असतात, परंतु कोणच्याहि कॉलेजांत फार तर एखाददुसऱ्या विषयाचाच वर्ग असतो. अशीच गोष्ट फार तर धर्मशिक्षणाची होईल. उदाहरणार्थ, पुण्याच्या फर्ग्युसन कॉलेजांत

उद्यां धर्मशिक्षणाची सोय करावयाचीच झाली व हिंदुधर्माचे एक दोन प्रोफेसर ठेवले तर कॉलेजनें विद्यार्थ्यांच्या धर्मशिक्षणासंबंधीं आपलें काम केलें असें म्हणतां येईल. आणि सदर कॉलेजांत पांच चार खिस्ती पांच चार पार्शी व पांच चार मुसलमान विद्यार्थी असले तरी, बायबल, झेंदा-वेस्ता किंवा कुराण शिकविण्यास शिक्षक नाहीं म्हणून या कॉलेजनें धर्म-शिक्षणाचें आपलें काम केलें नाहीं, असें म्हणतां येणार नाहीं. जी गोष्ट धर्मांना तीच धर्मपंथांना लागू आहे; वास्तविक हिंदुधर्माचीं मूलतत्त्वें शिकविण्याची जर सोय झाली तर धर्मपंथाच्या शिक्षणाची सोय करतां आली नाहीं याबद्दल कोणाची कुरकुरहि चालणार नाहीं. तसेंच एकाच शाळेंत असलेले खिस्ती, पार्शी, मुसलमान व हिंदु हे जर एकमेकांच्या उरावर बसत नाहींत, तर हिंदु धर्माच्या पोटपंथांचें शिक्षण दिलें जातें असें गृहीत धेऊन चाललें तरी त्यामुळें हे पंथवाले एकमेकांच्या उरावर बसतील हेंहि संभवनीय नाहीं. शिवाय धर्मशिक्षणाची सोय करणें म्हणजे धर्म-शिक्षणाची सक्ति करणें असें होत नाहीं.

मुख्य मुद्दा इतकाच आहे कीं, तरुण विद्यार्थी इतर ज्ञान संपादन करीत असतां—त्यांच्या बुद्धीचा व अंत:करणाचा विकास होत असतां—धर्मासंबंधीं तात्त्विक विचारांचें शिक्षण मिळण्याची मात्र हल्लीं सोय नसते ती व्हावी, व इतर ज्ञानाला धर्मशिक्षणाची जोड मिळून, तरुण विद्या-र्थ्यांच्या मनाला समतोलपणा यावा व हा हेतु आम्हीं वर दर्शविल्याप्रमाणें धर्मशिक्षणाची व्यवस्था केली असतां साधण्यासारखा आहे. शाळांतून व कॉलेजांतून ही व्यवस्था करणें क्वचित् अवघड वाटल्यास शहराशहरांतून तरी ही व्यवस्था होण्यास कांहींच हरकत नाहीं. उदाहरणार्थ-पुण्यासारख्या शहरांत एखादें स्वतंत्र धर्मशिक्षणाचें पीठ स्थापन करावें, त्यावर जुन्या व नव्या पद्धतीनें 'धर्मशिक्षण' देणारे दोन तीन अध्यापक नेमावे, या अध्यापकांनीं आठवड्यांतून ठराविक दिवशीं दोन तीन व्याख्यानें द्यावीं, हीं व्याख्यानें शाळा व कॉलेजें यांच्या वेळेखेरीज इतर वेळेंत आणि देवळांसारख्या पवित्र व विस्तृत जागेंत व्हावीं, आणि दर सहामाहींत विद्यार्थ्यानें हीं व्याख्यानें अमुक एक ऐकल्याचा दाखला आणल्या-खेरीज त्यास परीक्षेचा दाखला देण्यांत येऊं नये अशा प्रकारचा नियम करण्यांत

यावा. धर्मव्यतिरिक्त इतर विषयांच्या शिक्षणाची योजना विलायतेंत याच तत्त्वांवर केली जाते, व तेंच तत्त्व इकडे धर्मशिक्षणास लावण्यांत आलें असतां काम भागेल. एका विलायतेंत डझन दोन डझन युनिव्हर्सिट्या आहेत. परंतु या सर्व युनिव्हर्सिट्यांतून सर्वच विषय शिकविले जातात असें मात्र नाहीं. शिवाय एखाद्या कॉलेजांतला एखादा प्रोफेसर एखाद्या विषयांत अत्यंत प्रवीण असला, किंवा त्याची शिक्षण देण्याची हातोटी उत्तम असल्याची प्रसिद्धि असली, तर इतर कॉलेजांतील विद्यार्थी फी देऊन त्याचीं व्याख्यानें ऐकण्यास त्या कॉलेजांत जातात ही गोष्ट प्रसिद्धच आहे. अशाच तारतम्यानें धर्मशिक्षणाची सोय करतां येणें शक्य आहे असें आम्हांस वाटतें. धर्म शिकवितांना निश्चयात्मक असें कांहीं शिकवितां येणार नाहीं, कुशाग्रबुद्धीच्या विद्यार्थ्यांस शिक्षकास पावलोपावलीं अडवितां येईल वगैरे आक्षेपहि निर्मूल आहेत. सामान्य धर्मतत्त्वें त्रिकालाबाधित असतात, तेव्हां त्यांचें शिक्षण देणें मुळींच अवघड नाहीं. शिवाय नवीन पद्धतीनें तुलनात्मक धर्मविचारांचेंहि थोडेंसें शिक्षण दिलें असतां धर्मविचारांमधील एककल्लीपणाचा दोष टाळून धर्मशिक्षणाचा गुण तेवढा तरुण मुलांस प्राप्त करून देणें शक्य आहे. मतवैचित्र्य हें धर्मांतच असतें असें नाहीं. इतिहास, नीतिशास्त्र व अर्थशास्त्र या विषयांत काय थोडें मतवैचित्र्य ( Schools of Opinion ) असतें ? व तें शिकवितांना नेमलेल्या ग्रंथांच्या कर्त्यांचीं मतें, शिक्षकांचीं मतें व परीक्षकांचीं मतें हीं सर्व निरनिराळीं असल्यानें, विद्यार्थ्यांचें मन तिरबाकडे होऊन जातें हा रोजचा अनुभव आहे. तेव्हां धर्मविषयांतील मतवैचित्र्य तेवढेंच दुस्तर होईल, आणि त्यांत मात्र गुरु व शिष्य गटांगळ्या खाऊन बुडतील, असें मानण्याचें कारण नाहीं. आजच्या स्थितींत, इतिहास शिकवून समता व दूरदृष्टि आणि अर्थशास्त्र शिकवून धनोत्पादकता व व्यावहारिक शहाणपण, हीं जितकीं विद्यार्थ्यांस प्राप्त करून देतां येत असतील, तितकीं तरी धर्मशिक्षण दिल्यानें विद्यार्थ्यांस परमार्थाची चाड उत्पन्न करून देण्यास खास हरकत पडणार नाहीं,

धर्मशिक्षणाच्या शक्याशक्यतेचा व्यावहारिक विचार हा असा आहे. तथापि, तरुणपिढीस खरोखरच परमार्थबुद्धीचा लवलेशहि नसल्यामुळेंच आजचा हा सर्व घोटाळा होत आहे, व कोणच्याना कोणच्या रीतीनें

त्यांस धर्मशिक्षण दिलें म्हणजे त्यांचें आज बिघडल्यासारखें झालेलें शील सुधारेल—असा जो सरकारचा ग्रह झालेला दिसत आहे तो कितपत खरा आहे, धर्मशिक्षणाबरोबरच आणखीहि कित्येक राजकीय गोष्टी सुधारण्यास हव्यात कीं नको, हा विचार स्वतंत्र आहे; व त्याचा विचार स्वतंत्रपणेंच पुढें एखादेवेळेस करण्याचें आश्वासन आम्ही वाचकांस देतों.

---

## २४. हीनजाति व शिक्षण

( केसरी, तारीख ६ सप्टेंबर १९१० )

हीनजातींच्या उन्नतीच्या प्रश्नासंबंधानें निवळ तात्त्विक विवेचनाचा फारसा उपयोग होत नाहीं, हें पूर्वी एकवार आम्हीं दर्शविलेंच आहे. तात्त्विक विवेचनास आम्ही कमी किंमत देतों असें नाहीं; परंतु आज तात्त्विक वाद निघाला असतां पुष्कळ लोक या भेदभावाचें समर्थनच करूं इच्छितील; व कित्येक थोड्या लोकांनीं हा भेदभाव समर्थनार्ह नाहीं असें उत्तर दिलें तरी त्या नुसत्या उत्तराचा फारसा व्यावहारिक उपयोग नाहीं. रणांगणांतील युद्धाप्रमाणें वादांतहि धर्मसमजुतींवर तोंडासमोरून हल्ला करणें कधींहि श्रेयस्कर होत नाहीं; बाजूनें हल्ला चढवून प्रतिपक्षाला तोंड फिरवावें लागेल असें केल्यानें यश मिळण्याचा अधिक संभव असतो. धर्मशरिराचे पाय म्हटले म्हणजे रूढ आचार हेच होत, आणि पायच फितूर झाले म्हणजे ते नेतील तिकडे देहास जावें लागतें. अर्थात् स्पृश्यास्पृश्यविचार करतांना या बाबतींतील धर्मसमजूत पालटण्याचा वाद माजवीत न बसतां हा भेदभाव आचारांत नाहींसा होण्याची रूढि कशी पडेल, याचाच विचार अधिक अगत्याचा आहे. रूढि हा लोकसंमत व्यवहाराच्या पुनःपुनरुक्तीचा परिणाम आहे. अस्पृश्य मानलेल्या जातींस स्पृश्य करण्यास त्या दोहोंमधील व्यवहार वाढला पाहिजे व व्यवहारसंबंध वाढण्यास अनुयोगीप्रतियोगीभूत ज्या व्यक्ति त्यांची परस्पर आकर्षणशक्ति वाढली पाहिजे. अर्थात् ही 'आकर्षण-शक्ति' कशी वाढेल या प्रश्नाचें जें उत्तर तेंच, हा स्पृश्यास्पृश्यभेद नाहींसा कसा होईल या प्रश्नाचेंहि आहे असें समजावें.

हीं आकर्षणकारणें अमुक एकाच प्रकारचीं असतात असें नाहीं, हें निरनिराळीं उदाहरणें देऊन दाखवितां येण्यासारखें आहे. सौंदर्य, स्वच्छता, बुद्धिमत्ता, सत्ता, संपत्ति, सच्छील, धार्मिकपणा, मान्यता व व्यावहारिक उपयुक्तता हीं या आकर्षक कारणांचीं उपलक्षणात्मक उदाहरणें म्हणून देण्यास हरकत नाहीं. शरीरसौंदर्य हें आकर्षकतेचें कारण होऊन कृत्रिम भेदभावाच्या मर्यादा नाहींशा करण्यास कारणीभूत कसें होतें, याचें उदाहरण पुराणांतरीं मत्स्यगंधेचें होय. मत्स्यगंधा ही मासे मारणाऱ्या व मासे खाणाऱ्या कोळ्याची कन्या; परंतु ती अप्रतिम लावण्यवती असल्यामुळें क्षत्रिय राजाच्या राज्ञीपदास योग्य झाली. दुसरें एक चमत्कारिक उदाहरण रावबहादुर चिंतामणराव वैद्य यांनीं प्रसिद्ध केलेल्या 'बंडाच्या इतिहासा'च्या पुस्तकांत दिलेलें वाचकांस आढळून येईल. झांशी येथील एका दशग्रंथी विद्वान् ब्राह्मणास अत्यंत नीच मानलेल्या पद्मिनीगुणविशिष्ट स्त्रीसंबंधानें अनिवार मोह उत्पन्न होऊन त्यानें तिला स्त्रीप्रमाणें घरांत वागविल्याबद्दल हकीकत सदरहू पुस्तकांत दिलेली आहे. हीं उदाहरणें देण्यांत एखाद्या अलौकिक शरीरगुणाच्या अंगींहि धर्मबंधनांहून अधिक बळ कसें येऊं शकतें, व त्यामुळें स्पृश्यास्पृश्य भेद कसा नाहींसा होऊं शकतो, हें फक्त तात्त्विक-रीत्या सुचविण्याहून दुसरा हेतु नाहीं. राजसत्तेच्या अंगीं स्पृश्यास्पृश्य भेद समूळ नष्ट करण्याचें नसलें तरी तो पुष्कळसा शिथिल करण्याचें सामर्थ्य आहे, यांत शंका नाहीं. महाराचा स्पर्श झाला असतां स्नान करणारे सर्वच कर्मठ लोक गव्हर्नरसाहेबांचा हस्तस्पर्श झाल्यावर स्नान करतील असें नाहीं. संपत्ति ही वाटेल तें करूं शकते; व अस्पृश्य मान-लेल्या जातींतील एखाद्या मनुष्यावर लक्ष्मीची जर कृपा भरपूर झाली तर त्याला सामाजिक अपमानाचें दुःख फारसें सांगावें लागत नाहीं. धार्मिक-पणा अंगीं असल्यास अस्पृश्य मानलेल्या व्यक्तीचा आपल्यास स्पर्श होणें हा एक आपल्यावर उलट अनुग्रहच आहे, असेंहि उच्च वर्णांतील लोकांस वाटणें संभाव्य आहे, हें चोखामेळा व रोहिदास या दोन संतांच्या उदा-हरणांवरून कबूल करावें लागेल. मनुष्याच्या अंगीं मान्यता इतर अनेक प्रकारांनींहि येऊं शकते. समजा, एखादा अंत्यज उद्यां मोठा कवि निर्माण झाला, अगर त्याच्या अंगीं कल्पकतेचा विकास होऊन इकडील सृष्टि तिकडे

करण्यासारखा त्यानें एकादा शोध लाविला किंवा यंत्र निर्माण केलें तर त्याजवरील निव्वळ अस्पृश्यतेचें लांछन फार दिवस टिकणार नाहीं, हें म्हणणें कोणासहि संमत होईल. एवढा मोठा अलौकिक गुण बाजूस राहो, पण साधारण सुशिक्षणाच्या अंगींहि मान्यता उत्पन्न करून देण्याची शक्ति पुष्कळच आहे. याचा अनुभव आपणांस नेहमीं येतो. एखादा अशिक्षित अंत्यज दाराशीं आला असतां त्यास आपण दाराशींच उभा करितों; परंतु तोच सुशिक्षित अंत्यज असला तर त्यास आपण घरांत घेऊन खुर्ची देतों.

सुशिक्षणाचा असाच कांहीं विलक्षण प्रभाव असतो कीं, त्याच्या योगानें उच्चनीच व लहानथोर हे सर्व कृत्रिम भाव लोपून जातात, व मनुष्या-मनुष्यांमध्यें एकप्रकारचा बंधुभाव उत्पन्न होतो. शिवाय सुशिक्षित मनुष्य सहसा अस्वच्छ राहात नाहीं; त्याजमध्यें बुद्धीचा विकास व विद्येचें तेज निर्माण होतें व त्याची उपयुक्तताहि वाढते. अर्थात् एका सुशिक्षणानें इतकीं सर्व आकर्षण—कारणें उत्पन्न होतात. यास्तव अयोग्य स्पृश्यास्पृश्यभेद नाहींसा करावयाचा असेल तर अंत्यज जातींचें सुशिक्षण वाढणें हाच मुख्य व खरा उपाय आहे. अस्पृश्यता जाऊन स्पृश्यता येण्यासचसें काय, पण अन्य रीतीनेंहि त्यांची सामाजिक व सांपत्तिक स्थिति सुधारण्यास विद्या हीच उपयोगी पडणारी आहे; म्हणून अस्पृश्य मानलेल्या जातींनीं व त्यांच्या पुरस्कर्त्यांनीं शिक्षणावरच मुख्य भिस्त टाकली पाहिजे. कारण शिक्षण, सत्ता, संपत्ति अगर इतर कोणताहि विशेष गुण अंगीं नसतां अस्पृश्य जातींस जवळ घ्या असें म्हणणें यांत जरी मोठासा गुन्हा नसला तरी तें फारसें शक्य नाहीं. कारण हा प्रश्न किरकोळ एक दोन किंवा थोड्याशा व्यक्तींचा नसून सर्व समाजाचा आहे. केवळ दांडगाईनें स्पृश्यास्पृश्यभेद मोडून दाखविणें हें समाजांतील फक्त दहा पांच तत्त्वज्ञानी अगर पांच पंचवीस बाडग्या लोकांस शक्य आहे; परंतु एकंदर समाजांतील बहु-मतानें जोंपर्यंत कोणतीहि सुधारणा स्वीकृत केली जात नाहीं, तोंपर्यंत ती रूढ होत नाहीं. तोंपर्यंत या दहापांच तत्त्वज्ञान्यांनीं हा भेद मोडला व त्यांस लोकांनीं विशेष नांवें ठेविलीं नाहींत तरी त्यांस समाजबाह्य होऊन राहावें लागतें.ज्यांस आम्हीं बाडगे हें नांव दिलें आहे, त्यांच्या उपद्व्यापानें

तर तत्त्वज्ञान्यांच्या खटपटीपेक्षां केव्हांहि कमीच फलप्राप्ति होणार. कारण समाज त्यांस बाडगे मानणार, एवढेंच नव्हे तर त्यांनीं केलेल्या कृत्यांचें समर्थन करण्याचें धैर्य त्यांच्या स्वतःच्या अंगीं नसल्यामुळें ते आपलें कृत्य उघडपणें कबूल करण्यास कचरणार; व त्यांच्या कृत्याबद्दल गवगवा झाला असतां तें आपल्यास प्रायश्चित्त वगैरे घेऊन आपल्या कृतीचें आपणच खंडण करणार; व सर्वांत वाईट गोष्ट असते ती ही कीं, ज्यांना आम्हीं बाडगे ही संज्ञा दिली आहे, त्यांच्या कृत्यास उदात्त असा कोणताहि मूळ हेतु नसून केवळ सुखाची लालसा हाच त्यांचा हेतु असतो. स्पृश्यास्पृश्यभेद हा अयुक्तिक आहे, हें सिद्ध करण्याकरितां केवळ जो तो भेद मोडून दाखवितो, त्याची गोष्ट वेगळी; त्याला तत्त्ववेत्ता म्हणण्यास तरी हरकत नाहीं. परंतु केवळ सौख्याच्या लालुचीनें जे तसें करितात त्यांनीं तत्त्वज्ञानाचा कितीहि आव आणला तरी तो व्यर्थ होय.

तात्पर्य, बहुजनसमाजानें स्पृश्यास्पृश्य भेद नाहींसा करावा अशी जर इच्छा असेल तर अस्पृश्य मानिलेल्या जातींमध्यें वर वर्णन केलेले गुण आले पाहिजेत. ते गुण येईपर्यंत, हा भेदभाव मोडत नाहीं, असा गवगवा करणें फुकट आहे. विशेषतः तोंपर्यंत अस्पृश्य मानिलेल्या जातींनीं स्वतः स्पृश्यास्पृश्यतेचा वाद काढणें श्रेयस्कर नाहीं. हा भेदभाव आजकालचा नाहीं, तर शेंकडों वर्षांच्या संस्कारपरंपरेनें तो दृढ झालेला आहे; व तो नाहींसा होण्यासहि कदाचित् शेंकडों वर्षेंहि लागतील, असें म्हणणें वावगें नाहीं. लाट उठण्यास जितका वेळ लागतो तितकाच ती लाट उठल्यावर खालीं बसण्यास लागतो. भांडें तापण्यास जितका उशीर लागतो, तितकाच तापलेलें भांडें निवण्यास लागतो, हीहि अनुभवसिद्ध गोष्ट आहे. शिवाय दुसरें असें कीं, अस्पृश्य मानलेल्या जातीसुद्धां अशा प्रकारच्या भेदभावापासून स्वतः सर्वस्वीं अलिप्त असतात, असेंहि नाहीं. ज्यांना कोणतीच गोष्ट अस्पृश्य अशी नाहीं, त्या लोकांनीं सर्वच गोष्टींसंबंधानें स्पृश्यास्पृश्यभेदभाव नाहींसा करून टाकावा असें म्हणण्यांत फारसा अर्थ नाहीं. वरच्यास हात व खालच्यास लाथ हा प्रकार मध्यम जातींमध्यें दिसून येतो. ज्यांना वरची म्हणून एखादी जात अगर वर्ग असतो, त्यांस आपला समावेश त्या वरिष्ठ वर्गात होण्याविषयीं जितकी उत्कंठा असते तितकी आपल्या

खालच्या वर्गास आपणांमध्यें समाविष्ट करून घेण्याबद्दल असते काय, याचा ज्याचा त्यानें आपल्या मनामध्यें विचार करून पाहावा. सर्व मजले मोडून एकच मजला व्हावा, असें प्रतिपादन करण्याची व त्या प्रतिपादनाप्रमाणें आचरण करण्याची जोंपर्यंत आपल्या स्वतःच्या मनाची तयारी झालेली नाहीं, तोंपर्यंत विश्वबंधुत्वाच्या गोष्टी दुसऱ्यांशीं वायफळ बोलण्यांत व वरिष्ठ वर्गास ते आपमतलबी म्हणून नांवें ठेवण्यांत अर्थ तो कोणता? मराठे लोक ब्राह्मणांस नांवें ठेवतील, परंतु अंत्यजांचे पंक्तीस बसण्याची स्वतः मराठ्यांची तयारी नसते. महार लोक ब्राह्मण व मराठे या दोघांसहि नांवें ठेवतील; परंतु ते स्वतः धेड वगैरे लोकांच्या हातचें पाणीहि घेत नाहींत, असें म्हणतात! धेडांना अस्पृश्य अशी जात कोणतीच नसेल तर त्यांना मात्र वरील आक्षेप न लागतां आपल्याहून वरच्या सर्व जातींस नांवें ठेवितां येतील! परंतु केवळ विश्वकुटुंबित्वाच्या उदार बुद्धीनें ते तसें करितात, असें कोणीहि म्हणणार नाहीं.

स्पृश्यास्पृश्यतेचा विचार करतांना अंत्यज जातींचे लोक कोणते धंदे करतात, हेंहि साधारणतः पाहणें जरूर आहे. विश्वकुटुंबित्वाच्या कितीहि गोष्टी सांगितल्या तरी गंध्याचा धंदा व खाटकाचा धंदा, हे दोन्हीहि सारखेच मानावे अगर दोन्ही धंदे करणाराच्या अंगीं समाजाकर्षक शक्ति सारखीच आहे, असें कोणीहि समंजस मनुष्य म्हणणार नाहीं. कित्येक लोक असा युक्तिवाद करितात कीं, अंत्यज लोक जे धंदा करतात ते जर कोणीतरी केलेच पाहिजेत, तर अंत्यजांनींच ते केले तर काय वावगें? व ते तसे करीत असतांहि त्यांना स्पृश्य मानण्यास काय हरकत आहे? आमच्या समजुतीनें हा युक्तिवाद बरोबर नाहीं. कृतज्ञतेनें स्वच्छतेची जागा भरून येऊं शकत नाहीं. व केवळ आपल्या पोटाकरितां अस्वच्छ धंदा करणारांबद्दल कृतज्ञताहि पण वाटत नाहीं. तसेंच हे अस्वच्छ धंदे केवळ सांपत्तिक अडचणीमुळें ते करितात, असेंहि म्हणणें बरोबर नाहीं. कारण इतर म्हणजे असले धंदे न करणारे लोक उपाशी मरतात असें थोडेंच आहे? अंत्यज लोकांइतकेच अशिक्षित असून त्यांच्याहून अधिक स्वच्छ धंदे करून पोटास मिळविणारे लोक किती तरी आहेत! वरिष्ठ वर्गानीं धर्म या नांवाखालीं मोडणाऱ्या कोत्या समजुती व मिथ्या अहंकारबुद्धि

सोडून देऊन अस्पृश्य मानिलेल्या वर्गाबद्दल सहानुभूति व प्रेम बाळगलें पाहिजे, यांत तर शंका नाहींच; परंतु अंत्यज वर्गानेंहि वरिष्ठ वर्गास आपल्या पदवीस ओढूं अशी हांव धरण्यापेक्षां, स्वच्छता, शिक्षण वगैरे गुणांनीं आपण त्यांच्या बरोबरीचे होऊं अशी महत्त्वाकांक्षा बाळगणें अधिक श्रेयस्कर होईल. अशा तऱ्हेची महत्त्वाकांक्षा बाळगून त्याप्रमाणें जेव्हां त्यांच्या हातून वर्तन घडून येऊं लागेल त्या वेळीं वरिष्ठ वर्गाच्या कोत्या समजुतीबद्दल त्यांस नांवें ठेवण्याचा हक्क आपोआपच त्यांस प्राप्त होईल.

दुसरीहि एक गोष्ट अस्पृश्य मानलेल्या जातींच्या पुढाऱ्यांनीं आमच्या मतें लक्षांत ठेवावयास पाहिजे. ती ही कीं, आजच्या स्थितींत हजारों अंत्यज लोक ख्रिस्ती धर्म स्वीकारतात, ही गोष्ट हिंदु पुढाऱ्यांच्या डोक्यावर हाणून 'तुम्ही यापुढेंहि आमची उपेक्षा कराल तर आणखीहि हजारों लोक हिंदुधर्म सोडून जातील,' असें दटावतात; परंतु हें बरोबर नाहीं. धर्मांतरामुळें हिंदुसमाजाची हानि फार होत आहे यांत शंका नाहीं; व हिंदुसमाजाच्या पुढाऱ्यांचे अद्यापीहि डोळे न उघडतील तर ती हानि अशीच होत जाईल, हीहि गोष्ट निर्विवाद आहे. तथापि, ज्यांना शिक्षण नाहीं अशा लोकांच्या हातून ऐहिक फायद्याच्या हेतूनें धर्मांतर झालें तर त्यांना फारसें नांव ठेवतां ठेणार नाहीं; परंतु अस्पृश्य जातींचे पुढारी या नात्यानें जे बोलूं इच्छितात, त्यांना तरी ऐहिक फायद्याकरितां धर्मांतर करण्यामध्यें कमीपणा किती आहे हें कळावें, अशी लोकांची अपेक्षा असते. अंत्यज लोकांनीं धर्मांतर करणें हें हिंदुसमाजावर आपल्या दुःस्थितीबद्दल सूड घेण्याचा उत्तम उपाय या दृष्टीनें कदाचित् समर्थनीय होईल; परंतु जर ते हिंदुसमाजांतील अवयव असें स्वतःस म्हणवून घेतात व हिंदुधर्माचा आपणास अभिमान आहे असें म्हणतात, तर केवळ ऐहिक फायद्याकरितां धर्मांतर करणें हें लांछनास्पद आहे, असें त्यांस कबूल करावें लागेल. शिवाय हेंहि लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, केवळ धर्मांतर केल्यानें ख्रिस्ती समाजांत अंत्यज लोकांस विशेष मान मिळतो असें नाहीं. धर्मांतर केल्याबरोबर धर्मदीक्षा देणारा पाद्री अंत्यजास आपली मुलगी विवाहास देण्यास तयार होईल तर कदाचित् गोष्ट वेगळी; परंतु तशी वस्तुस्थिति नाहीं. ख्रिस्ती समाजांतहि खरी मान्यता मिळण्यास सुशिक्षण किंवा मान्यतेचीं वर सांगितलेलीं इतर कारणें

असल्याशिवाय चालावयाचें नाहीं. उलटपक्षीं, हें सुशिक्षण अंगीं आल्यास ती मान्यता त्यांस हिंदुसमाजांत आजहि मिळण्यास कांहीं प्रत्यवाय आहे, असें आम्हांस वाटत नाहीं. अकोला येथें एका सुशिक्षित अंत्यजानें शाळा काढली आहे. तेथें रा० टिळक हे तीन वर्षांपूर्वी मोठ्या खुषीनें पान-सुपारीस गेले होते. तसेंच थोड्या दिवसांपूर्वी वऱ्हाडांतील मोहप्पा गांवचे एक सुशिक्षित महार गृहस्थ पुण्यास आले, त्यावेळीं त्यांचें व्याख्यान सार्वजनिक सभेनें आपल्यामार्फत, आपल्या दिवाणखान्यांत करविलें असून तें अगर इतर वक्ते यांजमध्यें कोणत्याहि बाबतींत यत्किंचितहि फरक करण्यांत आलेला नव्हता व सदरहू प्रसंगीं कित्येक महार लोक श्रोतृवृंदांत येऊन नेहमींच्या श्रोतृवृंदांच्या जागीं बसलेले होते; व व्याख्यानानंतर एक दोघां महार गृहस्थांचीं भाषणेंहि झालीं ! सन १९०८ च्या मे महिन्यांत पुणें शहरांत मद्यपाननिषेधाची चळवळ झाली; त्या वेळीं पिकेटिंगच्या खटल्यानंतर सरकारी अधिकाऱ्यांच्या धोरणाचा निषेध करण्याकरितां रेमार्केटांत जी जाहीरसभा भरली, तिजमध्यें लष्करच्या एका महार गृहस्थाची वक्ता या नात्यानें योजना करण्यांत आली होती. शिवाय सर्वसाधारणपणें असेंहि म्हणतां येईल कीं, सुशिक्षित असा कोणताहि अंत्यज आजकाल कोणाहि समंजस हिंदु गृहस्थाचें घरीं गेला असतां त्यास घरच्या बैठकीवर बसवून घेऊन अगर खुर्ची देऊन संभाषण करण्यास तो माघार घेणार नाहीं.

वास्तविक काल हा सर्व जातींना व वर्गांना समान पदवीस आणून पोंचविण्यास समर्थ आहेच. कारण गेल्या पन्नास वर्षांत सामाजिक व धार्मिक चालीरीतींत आपोआप बराच फरक पडलेला आहे. वास्तविक ह्या अवधींत कोणी नवीन स्मृतिकार उत्पन्न होऊन त्यानें स्पर्शास्पर्शाचीं बंधनें जीं आज इतकीं शिथिल झालीं आहेत, तीं तशीं करण्यास अनुज्ञा दिली आहे, असें मुळींच नाहीं. तथापि फरक मात्र पुष्कळच पडलेला आहे यांत शंका नाहीं. परंतु हें सांगून सर्व हवाला कालावरच द्यावा, असें म्हणण्याचा आमचा मुळींच हेतु नाहीं. आम्ही असेंच म्हणतों कीं, हरतऱ्हेच्या सुधारणा प्रत्येक व्यक्तीनें आपली जबाबदारी ओळखून घडवून आणून काळास आपल्या कृतीनें कलाटणी दिली पाहिजे. समाजांतील 'व्यक्ति-स्वातंत्र्य' व 'व्यक्तिकर्तृत्व' हीं दोन्हीं वगळलीं असतां, 'काल' म्हणून बहुधा

कांहींच राहत नाहीं. कालास कोणतीहि गोष्ट करणें इष्ट असलें तरी व्यक्ति-सत्तेच्या आधीन तो सर्वस्वीं आहे. काल येतो हें खरें; परंतु व्यक्तींनीं आणल्याशिवाय तो येऊं शकत नाहीं. पण वरिष्ठ जातींच्या लोकांस स्पृश्यास्पृश्य-भेदाच्या कामीं त्यांच्या कर्तव्याची आठवण करून देणें हें जितकें जरूर आहे, तितकेंच अंत्यज जातींनाहि त्यांच्या उन्नतिमार्गाची खरी दिशा कोणती व ती दिशा लावण्यास वरिष्ठ वर्गाच्या प्रेमबुद्धीची अपेक्षा न धरतांहि त्यांनीं काय केलें पाहिजे, याविषयीं त्यांना उपदेश करणें जरूर आहे.

---

# २५. राष्ट्र व शिक्षण

( केसरी, तारीख २० डिसेंबर १९१० )

समाजाच्या किंवा राष्ट्राच्या प्रगतीला शिक्षणाची आवश्यकता किती आहे यावर, पुनरुक्तीचा दोष पदरीं घेतल्याशिवाय, विशेष कांहीं लिहिणें आजच्या मितीला बहुधा अशक्यच आहे; परंतु प्रत्येक पिढीलाचशी काय, पण प्रत्येक पिढीच्या दरम्यानहि वारंवार या विषयाची उजळणी होणें जरूर असतें. राष्ट्र व शिक्षण या दोन वस्तूंचा संबंध जरी नित्य व निश्चल असतो, तरी शिक्षण या वस्तूचें स्वरूप अनेक कारणांमुळें चलनशील राहतें; आणि राष्ट्राचा व शिक्षणाचा बऱ्याच अंशीं कार्यकारणभाव असल्या-मुळें शिक्षणाच्या स्वरूपानुरोधानें राष्ट्रस्वरूपहि बदलत जातें. नदीच्या प्रवाहांत आपण उभें राहिलों असतां पायांखालची वाळू कणशः सरत असलेली शरीरास कळते. त्याचप्रमाणें सूक्ष्म अवलोकन करणाराला, समाजनदीच्या प्रवाहांतील वाळू हळुहळू सरत असून वेळोवेळीं समाजविषयक विचार बदलत असतात हें अनुभवास आल्यावांचून राहात नाहीं. गति हेंच चित्‌शक्तीचें मुख्य द्योतक आहे. आणि प्रवासांत असतां मार्गावर ठिकठिकाणीं मुद्दाम उभें राहून मागें वळून पहाणारास ज्याप्रमाणें नवीन नवीन देखावे दृष्टीस पडतात, त्याप्रमाणें राष्ट्र व शिक्षण यांचा सतत प्रवास सुरू असतां मार्गावर मधूनमधून विश्रांति घेऊन, तोंपर्यंत गांठलेल्या मजलेपासून दिसणाऱ्या भूरचनेचें आकलन करूं इच्छिणारास थोड्याशा

अपरिहार्य अशा पुनरुक्तीबरोबर नवीन अशाहि कांहीं गोष्टी सांगतां येतील, असा भरंवसा आहे.

शिक्षणाचे स्थलपरत्वें साधारणतः दोन विभाग करितात. एक पौर्वात्य पद्धतीचें व दुसरें पाश्चात्य पद्धतीचें. पौर्वात्य पद्धति ही अद्यापि ठरावयाची आहे. परंतु नुसती पाश्चात्य पद्धतीच घेतली तरी निरनिराळ्या पाश्चात्य देशांत अगदीं एकाच तत्त्वावर अगर पद्धतीवर शिक्षणाची रचना झाली आहे असें नाहीं. युरोपांत 'राष्ट्रीयशिक्षण' या शब्दाचा अर्थ निरनिराळ्या राष्ट्रांत निरनिराळा करितात; याचें कारण प्रत्येक राष्ट्राचें उद्दिष्ट एकच असलें तरी त्यांची मनोरचना भिन्न असते हें होय. उदाहरणार्थ, इंग्लंड व अमेरिका यांची शिक्षणपद्धति फ्रान्स व जर्मनी यांच्या शिक्षणपद्धतीहून भिन्न आहे. पहिल्या जोडींतील राष्ट्रांत व्यक्तिगुणावर फार भिस्त आहे. व व्यक्तिस्वातंत्र्याचा परिपोष मुख्यतः जेणेंकरून होईल असेंच शिक्षण दिलें जातें. उलट पक्षीं, फ्रान्स व जर्मनी या राष्ट्रांमध्यें सर्व भिस्त समष्टीरूप समाजाच्या गुणावर असल्यामुळें, केवळ समाजहितास व्यक्ति मदत कशी करूं शकेल, या दृष्टीनें विचार होऊन जरूर त्या बाबतींत व्यक्तिस्वातंत्र्यास आळाहि घालण्याची तयारी असल्यामुळें शिक्षणपद्धतीहि त्याच बेतानें रचली गेली आहे. पण या चारहि राष्ट्रांत राजकीय सत्ता व समाज यांचें सामानाधिकरण्य किंवा पूर्ण तादात्म्य असल्यामुळें सरकार शिक्षणाच्या बाबतींत सर्व सत्ता व अधिकार आपल्या हातीं ठेवितें तरी, राज्यकारभारांत अगदीं वरपर्यंत समाजाच्या हाताचा शिरकाव झालेला असल्यामुळें, सरकारच्या शिक्षणविषयक धोरणाबद्दल व कृत्याबद्दल समाजास ममत्व व आपलेपणा वाटतो; आणि शास्त्रशोध व अनुभव यांच्या योगानें राष्ट्रीय शिक्षणपद्धतींत जे फेरबदल करणें इष्ट आहे असें वाटतें ते सरकारच्या द्वारानें समाजास वेळोवेळीं घडवून आणतां येतात. हिंदुस्थानची स्थिति मात्र याहून बरीच भिन्न आहे. एक तर हिंदी समाजाची मनोरचना पाश्चात्य समाजाच्या मनोरचनेहून कांहींशीं भिन्न आहे; व दुसरी गोष्ट अशी कीं, समाज व सरकार यांच्यामध्यें वर दर्शविलेलें सामानाधिकरण्य व तादात्म्य नाहीं. यामुळें भावी पिढीस कोणत्या प्रकारचें शिक्षण देणें जरूर व इष्ट आहे, याविषयीं सरकार व समाज यांची सर्वांशीं एकवाक्यता होण्याची केव्हांच फारशी आशा नाहीं. पदार्थ व छाया यांच्या-

प्रमाणें या दोहोंच्या मतांत कायमचें थोडेंबहुत अंतर राहणार. पण हें अंतर होतांहोईल तितकें नाहींसें व्हावें, व शिक्षणाच्या प्रश्नाकडे हिंदी समाजाच्या दृष्टीनें सरकारास पाहाण्यास भाग पाडावें अशा प्रकारची चळवळ, हाच राष्ट्रीय शिक्षणाच्या चळवळीचा खरा अर्थ आहे.

शिक्षणासंबंधानें सरकारची दृष्टि व समाजाची दृष्टि या एक नाहींत, या म्हणण्यापासून सरकारावर एक तऱ्हेचा दोषारोप केला जातो, असें कदाचित् सरकारतर्फे कोणी म्हणेल. परंतु हा दोषारोप मानलाच तरी तो कांहीं अंशीं अपरिहार्य आहे. त्याचा परिहार व्हावा अशी सरकारची जर खरोखरच उत्कट इच्छा असेल तर त्यांनीं आपलें शिक्षणविषयक धोरण हल्लींहून पुष्कळ बदललें पाहिजे यांत शंका नाहीं. कसें तें पहा, कोणत्याहि दोन सालीं सरकारकडून शिक्षणावर होणारा खर्च पाहिला, तर त्यांत आजच्याहून उद्यां खास प्रगति आहे असें म्हणावें लागेल, हें आम्हांस कबूल आहे. तरी पण इतर राष्ट्रांच्या मानानें पाहातां, आजमितीस म्हणजे शिक्षणाच्या कामास सुरवात होऊन पन्नास वर्षें झालीं तरी, सरकारकडून व्हावा तितका खर्च शिक्षणावर होत नाहीं. सर्व हिंदुस्थानांत म्हणजे सुमारें तीस कोट लोकसंख्येवर शिक्षणाकरितां सरकारी असा सुमारें तीनशें लक्ष व इतर सुमारें दोनशें साठ लक्ष रुपये म्हणजे लोकसंख्येच्या दरडोईस सालिना सुमारें अडीच आणे खर्च होतो. पण इंग्लंडांतील सव्वातीन कोटि लोकसंख्येवर सव्वावीस कोट रुपये म्हणजे दरमाणशीं सहा सव्वासहा रुपये खर्च होतो ! शिक्षणाच्या बाबतींत सरकारचें धोरण सुरवातीस कितीहि उदार असलें तरी अलीकडे त्या धोरणांत मनानें पुष्कळ बदल पडला आहे. पूर्वी शिक्षणाचा जो प्रसार सरकार हौसेनें करीत असे तो, तें हल्लीं मोठ्या जुलुमानें म्हणजे मुष्किलीनें व नाखुषीनें करतें. वरिष्ठ शिक्षणाच्या बाबतींत त्यांनीं हात आंखडला आहे. दुय्यम प्रतीचें शिक्षण देण्याचें काम होतां होईतों, लोकांनीं खासगी रीतीनें व जरूर तर मदत घेऊन करावें, असा प्रघात १८८२च्या कमिशनपासून पडला आहे, तो निराळ्या कारणाकरितां पण तसाच आजवर चालू आहे. प्राथमिक शिक्षण म्युनिसिपालिट्या व लोकलबोर्डें यांच्या अंगावर पडलेलें असून तें त्याच संस्थांनीं होतांहोईतों संभाळावें, व अधिक खर्च दिवसेंदिवस लागल्यास

प्रमाणें या दोहोंच्या मतांत कायमचें थोडेंबहुत अंतर राहणार. पण हें अंतर होतांहोईल तितकें नाहींसें व्हावें, व शिक्षणाच्या प्रश्नाकडे हिंदी समाजाच्या दृष्टीनें सरकारास पाहाण्यास भाग पाडावें अशा प्रकारची चळवळ, हाच राष्ट्रीय शिक्षणाच्या चळवळीचा खरा अर्थ आहे.

शिक्षणासंबंधानें सरकारची दृष्टि व समाजाची दृष्टि या एक नाहींत, या म्हणण्यापासून सरकारावर एक तऱ्हेचा दोषारोप केला जातो, असें कदाचित् सरकारतर्फें कोणी म्हणेल. परंतु हा दोषारोप मानलाच तरी तो कांहीं अंशीं अपरिहार्य आहे. त्याचा परिहार व्हावा अशी सरकारची जर खरोखरच उत्कट इच्छा असेल तर त्यांनीं आपलें शिक्षणविषयक धोरण हल्लींहून पुष्कळ बदललें पाहिजे यांत शंका नाहीं. कसें तें पहा, कोणत्याहि दोन सालीं सरकारकडून शिक्षणावर होणारा खर्च पाहिला, तर त्यांत आजच्याहून उद्यां खास प्रगति आहे असें म्हणावें लागेल, हें आम्हांस कबूल आहे. तरी पण इतर राष्ट्रांच्या मानानें पाहातां, आजमितीस म्हणजे शिक्षणाच्या कामास सुरवात होऊन पन्नास वर्षें झालीं तरी, सरकारकडून व्हावा तितका खर्च शिक्षणावर होत नाहीं. सर्व हिंदुस्थानांत म्हणजे सुमारें तीस कोट लोकसंख्येवर शिक्षणाकरितां सरकारी असा सुमारें तीनशें लक्ष व इतर सुमारें दोनशें साठ लक्ष रुपये म्हणजे लोकसंख्येच्या दरडोईस सालिना सुमारें अडीच आणे खर्च होतो. पण इंग्लंडांतील सव्वातीन कोटि लोकसंख्येवर सव्वावीस कोट रुपये म्हणजे दरमाणशीं सहा सव्वासहा रुपये खर्च होतो ! शिक्षणाच्या बाबतींत सरकारचें धोरण सुरवातीस कितीहि उदार असलें तरी अलीकडे त्या धोरणांत मनानें पुष्कळ बदल पडला आहे. पूर्वीं शिक्षणाचा जो प्रसार सरकार हौसेनें करीत असे तो, तें हल्लीं मोठ्या जुलमानें म्हणजे मुष्किलीनें व नाखुषीनें करतें. वरिष्ठ शिक्षणाच्या बाबतींत त्यांनीं हात आंखडला आहे. दुय्यम प्रतीचें शिक्षण देण्याचें काम होतां होईतों, लोकांनीं खासगी रीतीनें व जरूर तर मदत घेऊन करावें, असा प्रघात १८८२च्या कमिशनपासून पडला आहे, तो निराळ्या कारणाकरितां पण तसाच आजवर चालू आहे. प्राथमिक शिक्षण म्युनिसिपालिट्या व लोकलबोर्डें यांच्या अंगावर पडलेलें असून तें त्याच संस्थांनीं होतांहोईतों संभाळावें, व अधिक खर्च दिवसेंदिवस लागल्यास

त्याकरितां बोर्डांनीं आपखुषीनें नवीन कर वगैरे बसवून तो आपला आपण संभाळावा, असा प्रघात हळुहळू पडूं पहात आहे. प्राथमिक शिक्षणाची फी अजीबात काढून टाकण्याच्या धोरणाला सरकारनें कांहीं योग्य व कांहीं अयोग्य कारणांकरितां वाटाण्याच्या अक्षता लावल्या असून, सक्तीनें शिक्षण देण्याचें तर तें नांवहि काढूं देत नाहींत. बरें, खर्चाचा पैसा मर्यादित असल्यामुळें, वाङ्मयविषयक शिक्षणाकडून कमी करून सरकार तोच पैसा धंदेशिक्षणाकडे देत आहे, असें म्हणावें तर तसेंहि दिसून येत नाहीं. सर्व हिंदुस्थानांत व्यापारी शिक्षणाचें उदाहरण घालून देण्याकरितां सरकारनें काढलेली एकहि शाळा नाहीं. धंदेशिक्षणाची शाळा एकहि नाहीं असें म्हणतां येत नाहीं; पण आहेत त्या फार तुजबी व अपुऱ्या आहेत.

हें सर्व धोरण खचित राष्ट्रीय नव्हे. राष्ट्राचें शिक्षणांतर्गत हित थोडेंबहुत सरकारच्या मनांत आहेच, तरी पण हिंदुस्थानसरकारसारखें श्रीमान्, खर्चिक व सुधारलेले सरकार शिक्षणासंबंधानें जें धोरण पत्करून बसलें आहे तेवढ्यावर त्याच स्थितींतल्या स्वसत्ताक अशा राष्ट्रांतील सरकार कधींहि संतुष्ट होऊन राहिलें नसतें. सर्वच पौर्वात्य देशांत शिक्षणासंबंधानें म्हणजे अशीच अनास्था आहे असें नाहीं. आपण जपानचें उदाहरण घेतलें तर असें दिसून येईल कीं, ज्या राष्ट्रांत सन १८६८ सालापर्यंत शिक्षणाच्या बाबतींत सरकार व लोक झोंप घेत स्वस्थ पडले होते, त्याच राष्ट्रांत अवघ्या चाळीस वर्षांच्या अवधींत त्याच बाबतींत इकडची सृष्टि तिकडे होऊन गेलेली दृष्टीस पडते. शिक्षणखातें स्थापन झाल्याबरोबर तीनच वर्षांत जपानी सरकारनें असें जाहीर केलें कीं, यापुढें ज्यांतील घरांमध्यें शिक्षणाचा प्रवेश झालेला नाहीं असें एकहि खेडें असतां कामा नये, व ज्याला लिहितां–वाचतां येत नाहीं, असा एखादा मनुष्य मिळेल असें एकहि घर उपयोगी नाहीं, असा बादशहांचा हेतु आहे. (It is intended that henceforth universally in a village there shall be no house without learning and in a house no individual without learning.) हें घडवून आणण्यास शिक्षणाच्या कामीं सक्ति करावयास पाहिजे होती, व ती जपानसरकारनें केलीहि. जपानप्रमाणें हिंदुस्थानांतहि शिक्षणावर सर्व सत्ता सरकारची असावी हें तत्त्व प्रतिपादिलें

जातें व तें अमलांतहि आणण्यांत आलें आहे. पण जपानाप्रमाणें हिंदुस्थानांत शिक्षण फैलावण्यासंबंधानें व राष्ट्रोपयोगी असें करण्यासंबंधानें सरकारची दृष्टि पूर्ण राष्ट्रीय नाहीं. हिंदुस्थानांत शिक्षणावर सरकार जपानी सरकारइतकीच सत्ता गाजवितें, पण हिंदुस्थानांत जपानाप्रमाणें दर शंभरापैकीं निदान ऐशीं नव्वद मुलें साक्षर निपजतील अशी खबरदारी घेतली जात नाहीं; जपानप्रमाणें हिंदुस्थानांत साडेचार हजार सरकारी धंदे-शिक्षणाच्या लहानमोठ्या शाळा नाहींत; जपानप्रमाणें हिंदुस्थानांत वरिष्ठ शिक्षणाचें काम आपलें आपण करूं शकतील असे स्वदेशी प्रोफेसर तयार होऊन युरोपियन प्रोफेसर येण्याचें बहुतेक बंद झालेलें नाहीं ( जपानांत १८७७ सालीं बहुतेक प्रोफेसर युरोपियन होते ते कमी होत होत आज फक्त दहाच युरोपियन प्रोफेसर टोकिओ युनिव्हर्सिटींत आहेत ); जपानाप्रमाणें सरकारी खर्चानें पाठविलेले ऐशीं नव्वद विद्यार्थी परदेशांत जाऊन शिक्षण मिळवीत राहिलेले आहेत असें हिंदुस्थानांत दिसून येत नाहीं.

अमेरिकेंतील व युरोपांतील बहुधा सर्व प्रमुख देशांत लोकसंख्यांपैकीं शेंकडा पंधरापासून वीस इतकीं मुलें शिकत असतात. ग्रीस, स्पेन व रशिया या तीन देशांत हें प्रमाण त्या मानानें फार कमी, तरी शेंकडा पांच सात-पर्यंत असतेंच. जपानांत राष्ट्रशिक्षणास सुरवात नुकतीच झाली आहे, तरी तेथें हें प्रमाण सातवर आहे. हिंदुस्थानांत मात्र हें अद्यापि चाराच्यावर गेलेलें नाहीं. प्राथमिक शिक्षणावर होणाऱ्या खर्चाचें प्रमाणहि अशाच बेताचें आहे; म्हणजे सरासरीनें दरएक मनुष्याच्या मागें अमेरिकेंत व इतर वसाहतींत दरसाल दहा शिलिंग (सात साडेसात रुपये), युरोपांतील प्रमुख देशांत सात–आठ शिलिंग व कमींत कमी इटलींत दोनतृतीयांश शिलिंग व रशियांत दोन शिलिंग असें पडतें. पण हिंदुस्थानांत हें प्रमाण सुमारें एक तृतीयांश शिलिंग आहे ; वरिष्ठ शिक्षणावर होणाऱ्या खर्चाची तुलनाहि अशीच असमाधानकारक आहे. अमेरिका व युरोप यांतील मुख्य राष्ट्रांत हा खर्च दरसाल दरमाणशीं सहापासून अकरा पेन्स इतका होतो. ग्रीस, इटली, रशिया वगैरे मागसलेल्या देशांत मात्र तो दोनपासून चार पेन्स असतो. पण हिंदुस्थानांत पाहावें तों हा खर्च दरमाणशीं अवघा अर्धा पेनी आहे ! कोणी म्हणेल कीं, हिंदुस्थान हा देशच गरीब आहे म्हणून किंवा

त्यांत लोकवस्तीच फाजील आहे म्हणून दर माणशीं निघणारीं हीं प्रमाणें विपरीत दिसत असतील; पण तसें नव्हे. कोणत्याहि राष्ट्रांत करपट्टीच्या योगानें वसूल होणारा पैसा व त्या पैशांतून शिक्षणावर होणारा खर्च यांचेंच प्रमाण घेतलें तर लोकसंख्येचा कांहींएक संबंध राहात नाहीं व दारिद्र्याचा प्रश्नहि त्यांत येत नाहीं. राष्ट्र कराच्या रूपानें सरकारास पैसा देतें किती, व त्यांपैकीं शिक्षणावरील खर्चाच्या रूपानें सरकार राष्ट्रास पैसा परत देतें किती, या विचारांत शिक्षणावर खर्च करण्याची सरकारची इच्छा किती, इतकीच गोष्ट निश्चित ठरते; व या दृष्टीनें पाहतां असें दिसतें कीं, खुद्द इंग्लंड व वसाहती यांमध्यें कराच्या वसुलापैकीं शेंकडा दहापासून पंचवीस-पर्यंत इतका पैसा शिक्षणावर खर्च होतो; सीलोनसारख्या देशांत शेंकडा पांच-सहा इतका खर्च होतो; पण हिंदुस्थानांत मात्र हें प्रमाण शेंकडा दोनच्या पुढें जात नाहीं, याचा अर्थ काय होईल ?

पण शिक्षणावर एखाद्या राष्ट्रांत किती खर्च होतो, हा महत्त्वाचा मुद्दा असला तरी त्याहूनीहि महत्त्वाचा असा दुसरा एक मुद्दा आहे व तो शिक्षणाच्या स्वरूपासंबंधाचा होय. राष्ट्राच्या व समाजाच्या मनोरचनेनुरूप शिक्षणाचीहि रचना असावी लागते, हें वर सांगितलेंच आहे. शिक्षण उत्कृष्ट कोणतें तर राष्ट्राच्या गरजा भागविण्यास सर्वांत अधिक उपयोगी पडेल तें. व हें ठरविण्यास शिक्षणावर ज्यांची सत्ता आहे त्यांच्या मनांत राष्ट्रीय गरजा व आकांक्षा काय आहेत याचें उत्तम प्रतिबिंब पडलें पाहिजे. परंतु हिंदुस्थानांत ही गोष्ट आज आपणांस लाभत नाहीं. याचा दोष सर्वस्वीं सरकाराकडेच आहे असें नाहीं; व शिक्षणाच्या कामीं हिंदुस्थानांत लोक व सरकार यांची दृष्टि स्वाभाविकपणेंच तिरळी कशी राहते-एकाच्या डोळ्यानें दुसऱ्यास कां पाहतां येत नाहीं–याचा विचार पुढें एखाद्या प्रसंगीं एकेक मुद्दा घेऊन आपण करूं; परंतु वस्तुस्थिति आहे ती समाधानकारक नाहीं येवढें म्हटल्याशिवाय मात्र गत्यंतर नाहीं. शिक्षणापैकीं वरिष्ठ शिक्षणाचा भाग विश्वविद्यालयाच्या ताब्यांत आहे; परंतु तेथें लोकमत प्रबळ नाहीं. शिक्षणापैकीं कनिष्ठ व दुय्यम प्रतीचें शिक्षण सर्वस्वीं शिक्षणखात्याच्या ताब्यांत आहे तेथें तर लोकमताचा नुसता प्रवेश होणेंहि दुरापास्त आहे.

यामुळें विश्वविद्यालय व शिक्षणखातें यांचे अधिकारी समाजाच्या मनोरचनेस योग्य असें शिक्षण देण्याचा आपल्याकडून शक्य तितका प्रामाणिकपणाचा प्रयत्न करीत असतांहि त्याचा परिणाम, तें जनतेस पटत नाहीं अशा होतो, ही दुर्दैवाची गोष्ट आहे; परंतु केवळ अशी गोष्ट असल्यामुळें खासगी शिक्षणास होईल तितकें स्वातंत्र्य देण्याचा, आणि शक्य तर सरकारी मदत घेऊन व ती न मिळेल तेथें आपल्या पायांवर उभे राहून लोकांनीं आपलें आपण राष्ट्राचें शिक्षण सुधारण्याचा उपक्रम कसा करावा हा प्रश्न उत्पन्न होतो. राष्ट्रीय शिक्षणामध्यें शिक्षणाचा राष्ट्रभर प्रसार कसा होईल व राष्ट्रास अत्यंत उपयुक्त अशा रीतीनें तें कसें देतां येईल, हेच दोन मुद्दे मुख्य आहेत. आणि विश्वविद्यालय किंवा सरकारी शिक्षणखातें यांत लोकमताचा व्हावा तितका प्रवेश होत नाहीं, अशा स्थितींत शिक्षणाच्या बाबतींत निरनिराळे प्रयोग करून व निरनिराळ्या संस्था काढून लोकांनीं हें काम आपलें आपण किती व कसें करावें याचाच विचार ह्यापुढें आपणांस कर्तव्य आहे.

---

## २६. सरकार व शिक्षण

( केसरी, तारीख २१ मार्च १९११ )

नवीन कायदेकौन्सिलें झाल्यापासून त्यांजमध्यें शिक्षणासंबंधानें जितका वादविवाद झाला तितका दुसऱ्या कोणत्याहि विषयासंबंधानें झाला नसेल. तसेंच या विषयावरील वादविवादास इतरांपेक्षां अधिक फळ येण्याचाहि संभव दिसतो. असें होणें केवळ स्वाभाविकच नव्हे तर अपरिहार्यहि आहे. कोणत्याहि प्रगमनशील राष्ट्राच्या प्रगतीचा मूळ पाया शिक्षण हाच असतो, ही गोष्ट इतिहासप्रसिद्ध आहे. हरएक प्रकारच्या शेतीला–मग जिराईत असो वा बागाइती असो–जमिनीची साधारण नांगरणी, कोळपणी हीं प्रथम झालींच पाहिजेत. जमीन नांगरून कोळपून झाली म्हणजे मग पुढें कोणचें पीक पेरायचें व किती उत्पन्न येईल याचा विचार. शिक्षण

हा कांहीं चैनीचा पदार्थ नव्हे. कित्येक श्रीमंत लोक आपल्या ख्याली-खुशालींत दंग होऊन विद्येला विसरून जातात, किंबहुना तिची अवहेलना करतात, असें पाहून कित्येक वेळां 'शिकून शिकून तरी काय करायचें ? पोटच भरायचें कीं नाहीं ?" असा उद्गार तोंडून निघण्याचा संभव असतो; पण तो विव्वळ अविचाराचा उद्गार असतो हें लवकरच आपोआप आपल्या लक्षांत येतें. एक तर श्रीमंतांच्या श्रीमंतीलाहि मूळ कारण शिक्षण—बुद्धिविकास—हेंच असतें; व दुसरें असें कीं, श्रीमंत लोकांना झालें तरी विद्येविषयीं खरा आदर वाटत नसतो असें नाहीं. आळसामुळें त्यांना स्वतःला विद्यार्जनाचे श्रम करवत नाहींत ही गोष्ट निराळी; परंतु विद्या हा टाकाऊ पदार्थ आहे असें म्हणणारा श्रीमंत विरळा. एवढेंच नव्हे तर अंगीं विद्या नसल्यास लक्ष्मीपुत्रांच्याहि मनाला एकप्रकारची हुरहूर किंवा तळमळ लागलेली असते. श्रीमंतीनें आंगचे इतर दुर्गुण एकवेळ झांकून जातील; पण निर्विद्येच्या कुरूपतेवर कशानेंहि पांघरूण पडणें शक्य नाहीं. सरस्वतीदेवीच्या अवकृपारूप गर्तेंत पडलेल्या अभाग्याला प्रत्यक्ष लक्ष्मीचा वरदहस्तहि वर काढण्यास समर्थ होत नाहीं; व हें मनांत येऊन, चोरीचा माल जवळ बाळगणाऱ्या अपराध्याप्रमाणें श्रीमंत मनुष्याचें मन साशंक व भित्रें असतें आणि त्याला आंतून तोडीत राहातें. विद्यारूप साध्य आणि शिक्षण-रूप साधन या दोहोंना व्यक्तीपेक्षांहि राष्ट्रें अधिक मान देतात असें दृष्टो-त्पत्तीस येतें. मागासलेल्या राष्ट्रास शिक्षणाशिवाय तरणोपाय नाहीं हें तर झालेंच; पण भरभराटीस आलेल्या राष्ट्रासहि शिक्षणाची किंमत अत्यंत वाटते हें ध्यानांत ठेवण्यासारखें आहे. संपन्न राष्ट्राला खासगी व्यक्ती-प्रमाणेंच द्रव्यमद चढतो व ऐषआरामाकडे त्याची प्रवृत्ति होते खरी; पण व्यक्ति व राष्ट्र यांमध्यें एक फरक असा पडतो कीं, आपल्या ऐषआरामांतहि व्यक्तीप्रमाणें राष्ट्राचें शिक्षणाकडे दुर्लक्ष होत नाहीं. संपन्न राष्ट्रें कालांतरानें नामशेष होतात याचें कारण त्यांजमध्यें शिक्षण थांबतें म्हणून नव्हे; तर शिक्षणानें अंगीं येणाऱ्या गुणांपेक्षां बलवत्तर असे दुर्गुण राष्ट्रास जडतात, किंवा जगाच्या धडामोडींत शेरास सव्वाशेर या न्यायानें दुसऱ्या एखाद्या राष्ट्राचा आत्मा परिणतदशेस येत असतो व वृद्ध राष्ट्रास मागें सारून पुढें जाणें हें त्या तरुण राष्ट्राच्या परिणतीस अवश्य असतें म्हणून.

इंग्रज सरकार परकें आहे, हिंदुस्थानासंबंधीं राष्ट्रीयत्वाची भावना त्यांना असावी तितकी नाहीं, हिंदी लोकांच्या हितापेक्षां साम्राज्याच्या हिताकडेच त्यांच्या सुराज्यनौकेची नाळ अधिक झुकलेली असते; या सर्व गोष्टी जरी खऱ्या असल्या तरी दुसरीहि एक गोष्ट तितकीच खरी आहे ती ही कीं, इंग्रज सरकारास शिक्षणाचें महत्त्व पुरें कळतें आणि हिंदुस्थान सुशिक्षित करून सोडावा, अशी बुद्धि त्यांच्या मनांत निरंतर वास करीत असते. वरिष्ठ शिक्षणासंबंधानें त्यांनीं मनाची चलबिचल दाखविली आहे; आणि धंदेशिक्षणाकडे तर त्यांचें अक्षम्य दुर्लक्षच झालें आहे. पण प्राथमिक शिक्षणाविषयीं १८५४ सालीं जें धोरण एकदां त्यांनीं जाहीर केलें आहे, त्याचा अंमल आपणांवरून त्यांनीं आजवर ढळूं दिला नाहीं ही गोष्ट कबूल करणें भाग आहे. असें असतांहि शिक्षणासंबंधानें कायदे-कौन्सिला-मध्यें इतका वादविवाद कां होतो ? मग या गवगव्याचें कारण काय ? या प्रश्नाचें उत्तर असें आहे कीं, प्राथमिक शिक्षणासंबंधानें सरकारचें धोरण जरी ठाम आहे, त्या धोरणाचा त्यांच्या मनावरचा अंमल जरी कायम आहे, तरी हातानें प्रत्यक्ष कृतींत उतरण्यास तें धोरण अद्यापि फार जाचतें ही गोष्ट लोकपक्षीय पुढाऱ्यांस पटत नाहीं. सरकारनें पाय अधिक लवकर उचलून टाकावा, इतर कार्यांत–विशेषतः दडपशाहीच्या कामीं–दिसून येणारा त्यांचा हव्यास, त्यांचा जोर, त्यांची दिलदारी, हीं शिक्षणाच्या वांट्यास हल्लींहून अधिक यावी असें त्यांचें म्हणणें आहे; व केवळ या-मुळेंच हा वादविवाद व हा गवगवा होत आहे. वरिष्ठ कौन्सिलांत ना॰ गोखले व मुंबई कौन्सिलांत ना॰ जोशी यांनीं बिलें व ठराव यांच्या योगानें जो उद्योग चालविला आहे त्याचा हेतु तरी सरकारचें पाऊल अधिक जोरानें व जलद पडावें हाच आहे. सभाबंदीच्या कायद्याप्रमाणें राजकीय विरोधाची अगर गिरण्यांवरील जकातीप्रमाणें व्यापार-विषयक स्पर्धेची ती बाब नाहीं. ना॰ गोखले यांनीं शिक्षण सक्तीचें करण्याबद्दल जें बिल पुढें आणलें आहे, रा॰ ब॰ जोशी यांनीं मुंबई इलाख्यांत प्राथमिक शिक्षणाच्या शाळा दरसाल पांचशेंनीं वाढवाव्या असा जो ठराव मांडिला होता त्या सर्वांचा हेतु सरकारच्या हेतूशीं मिळूनच आहे. फरक काय तो साधनांचा. सरकारास वाटतें कीं, हल्लीं चालू असलेल्या गतीनेंच मजल गांठतां येईल.

ना. गोखले व जोशी यांचें म्हणणें कीं, हल्लींच्या चालीनें चालल्यास सरकारला हिंदी लोक व इतर राष्ट्रें हंसतील आणि मजल केव्हांच गांठली जाणार नाहीं. सरकार म्हणतें कीं, लोकांना प्राथमिक शिक्षणाची फारशी हौस नाहीं; मग आम्हीं तें त्यांजवर बळेंच लादण्याची व त्याकरितां जरूर तितक्या नव्या शाळा काढण्याची जबाबदारी विनाकारण अंगावर कां घ्यावी ? पण ना० मेथा यांनीं रा० ब० जोशी यांच्या सूचनेस अनुमोदन देतांना सांगितल्याप्रमाणें शिक्षणाच्या बाबतींत केवळ लोकांच्या प्रवृत्तीवरच विसंबून चालावयाचें नाहीं. शिक्षणासारखें राष्ट्रसुधारणेस दुसरें गुणकारी साधन नाहीं. बरें, सरकारास लोकांवर सक्ति करण्याचें मुळीं माहितच नसतें तर गोष्ट वेगळी. पण सरकारच्या सक्तीची मजल कोठवर जाऊं शकते हें उदाहरणें देऊनच आम्हीं सांगितलें पाहिजे असें नाहीं. प्रजेस अप्रिय अशाहि गोष्टी केवळ आपल्या हिंमतीवर व करारीपणावर अमलांत आणण्याची इंग्रज सरकारची कीर्ति हिंदुस्थानांत चहूंकडे लोक गातच आहेत. अर्थात् शिक्षणासारख्या पवित्र कामीं जर सरकारनें सक्तीचा उपयोग केला तर त्यांस कोणी फारसें नांव ठेवील अशी भीति नको. सक्ति करणें ही चूक आहे असें मानलें तरी शिक्षणासारख्या कामीं ती केली गेल्यास इतर चुकांपेक्षां ती चूक पुष्कळ बरी. सरकारास कधीं नव्हे ती शिक्षणाच्या बाबतीपुरतीच सावधगिरी कोठून आठवते हें लोकांस सहसा समजत नाहीं. रशियासारख्या देशांत शेंकडा सव्वीस लोकांस लिहितां वाचतां येतें, असें असतां हिंदुस्थानांत मात्र ही मर्यादा शेंकडा सहाच्या पुढें अद्याप गेली नाहीं, हें लक्षांत घेणारास ही सावधगिरी थोडी फाजीलच वाटेल असें म्हणण्यास हरकत नाहीं. ही सक्ति कांहीं लोकांस नकोशी वाटते असेंहि घेऊन चाललें तरी त्या नापसंतीचे परिणाम इतर कित्येक बाबतींतल्या नापसंतीच्या परिणामाइतके दारुण कधींहि होणार नाहींत. बडोद्यासारख्या राज्यांत या सक्तीचा प्रयोग करण्यांत आलेला आहे; आणि तेथें प्रजा या कारणामुळें नाखूष झाली आहे अगर बिथरून उठली आहे, असें कोणाच्या ऐकिवांत नाहीं. असें असतां इंग्रज सरकारनें मात्र या कामीं माघार घेतली असतां तिचा परिणाम लोकांच्या मनावर अनिष्ट होईल, हें आम्हीं सांगावयास पाहिजे असें नाहीं.

ना० गोखले यांनीं या बाबतींत वरिष्ठ कायदेकौन्सिलापुढें जें बिल हल्लीं आणलें आहे त्यावरून सक्तीच्या शिक्षणांत किंवा शिक्षणाच्या सक्तींत भय वाटण्यासारखें कांहीं नसतें, हें कोणासहि दिसून येईल. सदर बिलांत खालीं दिल्याप्रमाणें योजना सुचविण्यांत आली आहे. सरकार ठरवील त्या इलाख्यांत सरकार ठरवील त्याप्रमाणें खर्चाची तरतूद करणाऱ्या म्युनिसिपालिटीस अगर डि० लोकलबोर्डास आपल्या अमलाखालच्या आईबापांवर व इतर पालकांवर आपलीं मुलें शाळेंत शिकण्यास पाठविण्याची सक्ति करितां येईल. ही सक्ति म्हणजे इतकीच कीं, सहा ते दहा या दरम्यानच्या वयांतील मुलांस शाळेंत पाठविणें त्यांस भाग आहे. शाळाखातें ठरवील तितके दिवस अशा मुलांची हजेरी शाळेंत लागलीच पाहिजे; तसें न झाल्यास आईबापांवर अगर पालकांवर खटला भरतां येईल आणि त्यांनीं आपलीं मुलें योग्य कारण नसतां शाळेंत पाठविलीं नाहींत असें शाबीत झाल्यास पहिल्या अपराधाकरितां जास्तींत जास्त दोन रुपये व पुढील अपराधाकरितां जास्तींत जास्त दहा रुपयेपर्यंत दंड करण्याचा अधिकार मॅजिस्ट्रेट लोकांस दिला जाईल. हा दंड जास्त आहे असें कोणीहि म्हणणार नाहींच. परंतु गायकवाडी राज्यांत—म्हणजे जेथें असे खटले करण्यांत येतात तेथें—मुलाच्या शिक्षणाची हेळसांड करण्याचा गुन्हा करणाऱ्या आईबापांस जबर असा दंड कधींहि करण्यांत येत नाहीं. थोड्याशा दंडाच्या चुणुकेनें कायद्याचा हेतु सिद्धीस जातो असें आढळून आलें आहे; व ब्रिटिश मुलुखांतहि अशा कायद्याचा अंमल अशा बेतानेंच होईल हें सांगावयास नको. सक्तीचा मुख्य भाग हा काय तो एवढाच आहे. परंतु ना० गोखले यांच्या बिलांत इतक्या सवलती ठेवल्या आहेत कीं, त्या जमेस धरल्या असतां अशा कायद्याचा अंमल कडक अगर त्रासदायक होईल असें मानण्यास मुळींच कारण नाहीं. या सवलती अशा आहेत कीं, नवीन कायद्याचा अंमल फक्त सहा ते दहा वर्षांच्या मुलांपुरताच होण्याचा आहे. शाळेंत जाण्याची सक्ति सामान्यतः मुलींवर करण्यांत येणार नाहीं; एखाद्या भागांत लोक मागासलेले नाहींत अशी सरकारची खात्री होऊन सरकारनें आधीं परवानगी दिली तरच त्या ठिकाणीं मुलींनाहि हा कायदा लागू करण्यांत येईल. तसेंच जी एकंदर जात मागासलेली आहे,

असें सरकारास वाटेल व जिला हा कायदा लावून फारसा उपयोग होणार नाहीं अशी सरकारची खात्री पटेल, अशा जातींवर या कायद्याप्रमाणें शिक्षणाची सक्ति करूं नये, अशीहि सवलत ठेवण्यांत आली आहे. लहान मुलानें शाळेंत गेलेंच पाहिजे हें खरें; पण शाळा तरी घरापासून अमुक एका लांबीपेक्षां अधिक लांब नसाव्या कीं, शाळा वाटेल तितक्या लांब असल्या तरी मुलांना गेलेंच पाहिजे ? या प्रश्नाविषयीं नामदार गोखले यांच्या बिलांत असा नियम घालण्यांत आला आहे कीं, मुलाच्या घरापासून एक मैलाच्या आंत जर शाळा नसेल तर शाळेंत जाण्याची त्यांजवर सक्ति होणार नाहीं. तसेंच शाळा एक मैलाच्या आंत असूनहि जर ती धर्मदृष्ट्या अग्राह्य वाटेल तरीहि पालकावर मुलास अशा शाळेंत पाठविण्याची सक्ति केली जाणार नाहीं शाळा जवळ असूनदेखील मुलगा आजारी, पंगू, व्यंग असा असेल तर त्यास शाळेंत न पाठविण्यास तें योग्य कारण आहे असेंच मानण्यांत येईल. बरें, शाळा जवळ आहे, धर्माची अडचण नाहीं आणि मुलगाहि रोगी किंवा अशक्त नाहीं असें असतांहि आईबाप गरीब असल्यामुळें मुलगा घरींच राहावा अशी जर त्यांस जरूर असेल, किंवा शेतकाम वगैरे करणाऱ्या आईबापांस सुगीहंगामाच्या दिवसांत मुलगा घरच्या कामधंद्याकडे लावणें हें विशेष सोईचें होईल, तर अशाहि ठिकाणीं आईबापांवर मुलास शाळेंत पाठविण्याची सक्ति केली जाणार नाहीं. वर नमूद केल्यापैकीं कोणतीहि अडचण नाहीं, पण मुलास शाळेंत पाठविण्यापेक्षां त्यास घरीं राहून घेऊन स्वतंत्र शिक्षक ठेवून स्वतः-च्या देखरेखीखालीं त्याचें शिक्षण करणें हेंच संपन्न अशा आईबापांस अधिक इष्ट वाटणें शक्य आहे. अशा स्थितींतहि मुलें शाळेंत पाठविण्याची सक्ति आईबापांवर होणार नाहीं, असेंहि या नवीन बिलांत एक कलम घालण्यांत आलें आहे. सक्तीचें शिक्षण हें वास्तविक फुकटच दिलें जावें, निदान ज्यांच्यावर अशी सक्ति कायद्यानें करावी लागते त्यांना आपल्या मुलांस शाळेंत शिक्षण फुकट मिळेल ही जाणीव तरी समाधानकारक व उत्तेजनपर होईल. तथापि सरकारचा रोख फी काढून टाकण्याऐवजीं वाढविण्याकडेच हल्लीं आहे, ही गोष्ट लक्षांत घेऊनच कीं काय ना० गोखले यांच्या बिलांत अशी योजना केली आहे कीं, ज्या पालकाचें उत्पन्न महिना दहा रुपयांपेक्षां अधिक आहे, अशाकडूनच मात्र ठराविक

फी घ्यावी; महिना दहा रुपयांहून कमी उत्पन्न असणाऱ्या आईबापांकडून फी घेण्यात येऊं नये; आणि दहा रुपयांवर उत्पन्न असलें तरी पालकाकडून फी घ्यावी अगर माफ करावी हें ठरविण्याचा अधिकार स्थानिक स्कूलकमिट्यांस असावा.

वरील सर्व गोष्टी लक्षांत घेतल्या असतां आईबापांस खरोखर जाचक होईल अशी सक्ति या बिलांत फार थोडी आहे हें कोणासहि कबूल करावें लागेल. अल्पवयी मुलांनीं शाळेंत न जाण्यास जीं जीं म्हणून योग्य कारणें मनांत आणणें शक्य आहेत, त्या सर्वांचा समावेश ना० गोखले यांनीं आपल्या बिलांत केलेलाच आहे. अर्थात् वरीलपैकीं कोणतेंहि कारण नसतां आईबापांनीं अल्पवयी मुलांस शाळेंत न घालणें व जरूर तर त्यांच्या शिक्षणावर थोडाबहुत खर्च न करणें हा गुन्हा मानण्यास कोणीहि समंजस मनुष्य हरकत घेणार नाहीं. आणि त्याजवर खटला करून रुपया दोन रुपयांचें प्रायश्चित्त घेणें त्याला कोणी भाग पाडल्यास ती गोष्ट परमेश्वराच्या घरीं पूर्णपणें रुजू होईल यांत शंका नाहीं. या बिलांतलि शिक्षेच्या स्वरूपा वरूनच या गुन्ह्याची खरी कल्पना येईल. वास्तविक तो खरा गुन्हाहि नाहीं व ती खरी शिक्षाहि नाहीं.आपल्या कर्तव्याचें ज्यांस विस्मरण पडलें आहे अशांना किंचित् हलवून जागें करावें, व अशा रीतीनें एकदां जागे झाले असतां त्या गोष्टीचें पालकांस पुन्हा विस्मरण होणार नाहीं एवढाच या बिलाचा उद्देश आहे. अशा सोज्ज्वळ आणि पवित्र कामीं लोक स्वत:वर कायदेशीर सक्ति करून घेण्यास आणि जरूर तर नवीन पिढीच्या शिक्षणाप्रीत्यर्थ आपखुषीनें थोडीशी करपट्टी स्वतःवर लादून घेण्यास तयार असतां या कामींहि लोकपक्षास मदत देण्याची सरकारास इच्छा न होईल तर फक्त परमेश्वरालाच त्यांचें मन ओळखतां येतें, आम्हीं त्या कामीं हात टेकले असें म्हणणें भाग होईल.

---

# २७. शास्त्रीय शिक्षणाचा उत्कर्ष

( केसरी, तारीख ११ एप्रिल १९१४ ).

हिंदुस्थानांत राज्य करण्यास गव्हर्नर व गव्हर्नरजनरल विलायतेंतून थोड्या मुदतीनें आणण्याची जी चाल पडलेली आहे, तिजपासून कांहीं तोटे आहेत; पण तसेच कांहीं फायदेहि आहेत. खुद्द हिंदी लोकांना गव्हर्नर नेमण्याची वेळ येण्यास तर अद्यापि अवकाश आहेच; कारण हिंदी प्रजा काय बोलूनचालून मनुष्य कोटींतली. पण सिव्हिल सर्व्हिस परीक्षा दिल्याच्या योगानें ज्यांना अतिमनुष्यकोटीचा दर्जा प्राप्त झाल्याचें मानण्यांत येतें, अशा ॲंग्लोइंडियन यक्ष-किन्नर-गंधर्वादिकांनाहि गव्हर्नरीचा मान दुर्मिळ आहे–'मनसोऽप्यभूमिः' अशांतला तो लाभ आहे. व या निराशा–सामान्यामुळें तरी हिंदी प्रजा आणि त्यांचे सिव्हिलियन राज्यकर्ते हे एका माळेला बसूं शकतात ही एक त्यांतल्यात्यांत समाधानाची गोष्ट होय. विलायतेंतून आलेल्या ताज्या, अलिप्त मनाच्या मुत्सद्द्याच्या शहाणपणाची सर हिंदुस्थानांत तपेंच्या तपें घालवलेल्या ॲंग्लो–इंडियन सिव्हिलियनास येणार नाहीं, अशीच अप्रत्यक्ष कबुली, दर पांच वर्षांनीं विलायतेंतून गव्हर्नर आणण्याचा प्रघात पाडून, सरकारनें स्वतःच दिली आहे. आणि या धोरणामुळें प्रांतानिहाय मधूनमधून जे थोडे उत्कृष्ट गव्हर्नर आम्हांला लाभतात त्यांच्या योगानें तें धोरण खरोखरच शहाणपणाचें ठरतें यांत शंका नाहीं. विलायतेंतून आणलेल्या गव्हर्नरांमध्यें 'बडे बापके बेटे पण कपाळकरंटे' असेहि पुष्कळ असतात. पण अशा गृहस्थांमध्यें कधीं कधीं इतर विशेष गुण नसले तरी ॲंग्लो-इंडियनांत सहसा नसणारें दाक्षिण्य व संभावितपणा हा तरी हटकून असतो.

पण येवढ्यानें झालें नाहीं; कारण लॉर्ड रे व सर जॉर्ज क्लार्क यांची योग्यता वरील प्रतीच्या गृहस्थांहूनहि फार अधिक आहे. त्यांच्याप्रमाणें यांच्याहि अंगीं सौजन्य व दाक्षिण्य असून शिवाय कर्तृत्व, विद्वत्ता आणि सुधारणावादित्व हे गुण त्यांजमध्यें विशेष प्रमुख होत. शिक्षणाच्या दृष्टीनें

पाहिलें तर लॉर्ड रे व सर जॉर्ज क्लार्क यांच्यासारख्या उदात्त विचाराचे व दूरदर्शी गव्हर्नर मुंबई इलाख्यास पूर्वी क्वचितच लाभले असतील. या जोडीपैकींहि त्यांतल्यात्यांत ना० सर जॉर्ज क्लार्क हे अधिक नशीबवान् आहेत. लॉर्ड रे यांच्या कारकीर्दींत शिक्षणाच्या बाबतींत सुधारणेचा नुसता अरुणोदय झालेला होता; यामुळें शिक्षणास मोठमोठ्या देणग्या देण्याची बुद्धि धनिक लोकांस फारशी होऊं लागली नव्हती. प्रांतिक सरकारचें उत्पन्नहि तेव्हां बेताबाताचें असे; आणि हिंदुस्थानसरकारकडून विशिष्ट कामाकरितां प्रांतिक सरकारास मोठमोठ्या रकमा जशा गेल्या दहापांच सालांत मिळाल्या तशा तेव्हां मिळत नसत. सर जॉर्ज क्लार्क हे इकडे येण्याच्या पूर्वी या सर्व अडचणी दूर होऊन नवीन विचाराची भरती भरण्यास सुरुवात झाली होती; त्यांतच स्वतः सर जॉर्ज क्लार्क यांच्या अनुभवाची आणि उत्साहाची भर पडली, यामुळें गुण द्विगुणित झाला आणि गेल्या बुधवारीं मुंबईस ना० गव्हर्नरसाहेबांनीं पायाचा दगड बसविण्याचा जो समारंभ केला तो एखाद्या इमारतीच्या पायाचाच नसून मुंबई इलाख्यांतील शास्त्रीय शिक्षणाच्या उत्कर्षाच्या पायाचाच होय असें आम्ही तर म्हणतों.

सर जॉर्ज क्लार्क यांची शिक्षणविषयक हौस केवळ स्थानिक नसून ती त्यांनीं, लॉर्ड रे यांच्याप्रमाणेंच, येतांना विलायतेहून आणली होती. लॉर्ड रे यांचा कटाक्ष सर्वसाधारण शिक्षणावर होता. तथापि धंदेशिक्षणाचा पाया त्यांनींच इकडे घातला. सर जॉर्ज क्लार्क हे हुशार इंजिनियर व शास्त्रज्ञ असून स्वतः त्यांनीं प्रोफेसराचें कामहि कांहीं दिवस केलेलें आहे. विलायतेंत शिक्षणक्रमांत झालेल्या सर्व सुधारणा त्यांच्या डोळ्यांपुढें होत्या; आणि यामुळें हिंदुस्थानांत येतांच इकडील शिक्षणक्रमांत कोणते फेरबदल करणें जरूर आहे, हें त्यांनीं आपल्या चौकस मनानें पाहून कुशाग्रबुद्धीनें तात्काळ ठरविलें. ना० गव्हर्नरसाहेब इकडे आल्यानंतर थोड्याच दिवसांत मुंबई विश्वविद्यालयाचे चान्सेलर या नात्यानें त्यांना भाषण करण्याचा प्रसंग आला. त्या भाषणांत शिक्षणविषयक परिस्थितीवर त्यांनीं नवीन प्रकाश पाडला. पाश्चात्य देशांतील आधुनिक पद्धतीप्रमाणें इकडेहि शास्त्रीय शिक्षण फैलावणें जरूर आहे, पण हें काम पैशाचें असल्यामुळें धनिक लोकांनीं

पुढें सरसावावें आणि त्यांनीं उदार देणग्या द्याव्या, अशी आशा नामदारांनीं प्रगट केली.

अवघ्या तीन वर्षांत या आशावृक्षास फळ आलें. विश्वविद्यालयामध्यें नव्या सेनेटच्या द्वारें गव्हर्नरसाहेबांनीं वरिष्ठ शिक्षणक्रम दुरुस्त करून घेतला, व निवळ पुस्तकी विद्येच्या मानानें शास्त्रीय ज्ञान हें जें मागासलें होतें त्याला हात देऊन वरती काढलें. विश्वविद्यालयाचें आजवरचें काम शिक्षणक्रम ठरवून परीक्षा घेण्याचें; पण शिक्षण देण्याची व्यवस्था झाल्यावांचून शिक्षणक्रम बदलून व परीक्षा घेऊन काय उपयोग? कॉलेजांची स्थिति पहावी तर शास्त्रीय शिक्षणास लागणारी सर्व उपकरणसामुग्री सिद्ध करण्यास त्यांना ऐपत नाहीं. खासगी कॉलेजें बोलूनचालून गरीब! त्यांतील शिक्षक फार तर पोट बांधून काम करतील. पण शास्त्रीय शिक्षणाचीं उपकरणें व साधनसामुग्री पैशाशिवाय कशी मिळणार? खासगी कॉलेजें एक सोडली; पण सरकारी कॉलेजांत तरी ही सर्व सिद्धता असावी कीं नाहीं; पण पुणें-मुंबईची सरकारचीं कॉलेजें पहावीं तर तींच मुळीं या बाबतींत खासगी कॉलेजांहून नादान. लॉर्ड कर्झन यांनीं युनिव्हर्सिटी कमिशनच्या तोंडून खासगी कॉलेजांना जवळ जवळ 'टिनपॉट—म्हणजे नादान—दरिद्री—म्हणून तोंडसुख घेतलें. पण कोटयाधीश सरकारनें तरी आपल्या कॉलेजांच्या अब्रूची कितपत लाज राखली होती याचा विचार त्यांनीं केला नाहीं. असो; विश्वविद्यालयानें परीक्षा घेण्याप्रमाणेंच शिक्षण देण्याचीहि व्यवस्था करावी, असें सदर कमिशनानें ठरविल्यापासून नव्या मनूचा उदय झाला; सरकारनें शिक्षणाच्या कामीं खासगी कॉलेजांस गेल्या पांच सहा सालांत विशेष देणग्या दिल्या; व सदर कॉलेजांनीं आपल्या स्वतंत्र स्फूर्तीनेंहि शास्त्रीय शिक्षणाची अधिक सोय केली. पण शास्त्रीय शिक्षण चांगलें द्यावयाचें तर त्याला अतोनात खर्च येतो; व यामुळें व्यक्तिशः प्रत्येक कॉलेजाला—मग तें खासगी असो वा सरकारी असो—तें आपापल्यापुरतें देणें अशक्य असतें. अर्थात् हें शिक्षण इलाख्यांत फक्त एक दोन ठिकाणींच द्यावें व सर्व द्रव्यशक्ति एकवटून त्या एक दोन संस्थाच चांगल्या संपन्न कराव्या अशी ना० गव्हर्नरसाहेबांची कल्पना होती व ती सर्वस्वीं सयुक्तिक होती.

सुदैवानें ना० गव्हर्नरसाहेबांच्या आकांक्षेनुरूप त्यांना मुंबई व अहमदाबाद येथील धनिक नागरिकांची मदत मिळाली. वास्तविक जगांत द्रव्य हवें तितकें पसरलेलें असतें पण तें एकत्र होण्यास कोणीतरी समर्थ किंवा कल्पक व्यक्ति लागते. लोहचुंबकाच्या साहाय्यानें खाणींतल्या लोहमिश्रित मातींतून लोखंड काढतां येतें; हिंदुस्थानांतहि श्रीमंत लोकांच्या खिशांतून पैसे बाहेर काढण्यास एखाद्या तांबड्या डगलेवाल्याच्या हातांतली सोनेरी मुलाम्याची भालदारी काठी सुवर्णचुंबकाचें काम फार चांगलें करूं शकतें, असा अनेक वेळां अनुभव आलेला आहे. अधिकारी लोक हे राजाचा अंश असल्यामुळें त्यांच्या शद्वास मान देऊन वर्गण्या देणें हें सर्वच बाजूंनीं चांगलें ठरतें. अगदीं व्यावहारिक अर्थ घेतला व उपकार–प्रत्युपकार या तत्त्वावर श्रीमंत लोक अधिकारी लोकांस देणग्या देतात असें म्हटलें तरी तेंहि ठीकच आहे. जगांत अगदीं निरपेक्ष अशीं खरीं गुप्त दानें कितीशीं असतात ? भगवद्गीतेंत यज्ञाची स्तुति करितांना सांगितल्याप्रमाणें—

देवान् भावयतानेन ते देवा भावयंतु वः ।
परस्परं भावयंतः श्रेयः परमवाप्स्यथ ॥

परस्परसंभावनेचा हा प्रकार सनातनच आहे. परंतु दान निरपेक्ष असलें किंवा नसलें तरीहि तें करण्याच्या रीतींत औचित्य व अनौचित्य असा भेद होऊं शकतोच, असा पुष्कळांचा समज असतो व तो सयुक्तिकहि असतो. यज्ञकुंडांत आज्य ओतावयाचें तें अल्युमिनमच्या चहादाणीच्या तोटीनें ओतलें तर कसेंसेंच वाटेल; त्या कामीं स्रुक्– स्रुवांची योजनाच प्रशस्त. त्याचप्रमाणें, आमच्या धनिक लोकांना स्वार्थयज्ञ करतांना मोठमोठ्या रकमांचे उदक सोडावयाचें तें गव्हर्नरसाहेबासारख्यांच्या हातून सोडलें म्हणजेच खरें समाधान होतें ! मोठ्यांना मोठ्यांच्या सहकारितेची इच्छा असणें स्वाभाविकच आहे. पण प्रस्तुत प्रसंगीं दुसरेंहि एक विशेष कारण होतें; व तें कारण म्हटलें म्हणजे स्वतः ना० गव्हर्नरसाहेबांची कुशल योजकता हें होय. सत्कार्याकडे वाहिलेल्या पैशाचा उपयोग नीट झाला तर बरा. नाहीं तर त्यासारखी हानि नाहीं. पण ना० सर जॉर्ज क्लार्क यांच्यासारखा अनुभवी शास्त्रज्ञ मार्गदर्शक मिळाल्यामुळें आपल्या देणगीचा चांगलाच

उपयोग होईल, असा योग्य भरंवसाहि मुंबईच्या व अहमदाबादच्या धनिक लोकांस वाटला असेल असें दिसतें.

कसेंहि असलें तरी ना० गव्हर्नरसाहेबांच्या भाषणानंतर लवकरच शास्त्रीय शिक्षणावर देणग्यांचा वर्षाव झाला. सर कावसजी जहांगीर यांनीं ४ लक्ष, सर जेकब सासून यांनीं १० लक्ष, सर करीमभाई इब्राहीम यांनीं ४½ लक्ष, सर चुनीभाई माधवलाल यांनीं ६ लक्ष रुपये दिले. सर करीमभाई यांनीं कांहीं स्कॉलर्शिपा—शिष्यवृत्तीहि—देऊं केल्या; व अशा रीतीनें मुंबईस व अहमदाबादेस मिळून सुमारें पांचसातशें विद्यार्थ्यांना शास्त्रीय शिक्षण यापुढें दरसाल मिळवितां येईल अशी योजना झाली. वर सांगितलेल्या २४॥ लक्षांत सरकारनें स्वतः ५ लक्षांची भर घातली आहे. परंतु सरकारच्या ऐपतीच्या मानानें ही देणगी जरा थोडीच झाली, असें म्हणावें लागतें. असो; एवढी थोर कल्पना मनांत येतांच इतक्या लवकर ती सफळ झाल्याचें गव्हर्नरासारख्या अधिकाऱ्यांच्याहि अनुभवांत हें पहिलेंच उदाहरण असेल असें म्हणण्यास हरकत नाहीं. वरील दानशूर मंडळींत हिंदु-मुसलमान-पार्शी-यहुदी-खिस्ती अशा सर्व मुख्य धर्मांचा समावेश झालेला आहे; आणि आजच्या स्थितींत या सर्व जातींनीं मिळून असेंच राष्ट्राचें काम करणें जरूर आहे. या पंचमुखी मारुतीनें पराक्रम केला तरच हिंदुस्थानचा तरणोपाय आहे या गोष्टीचें निदर्शक मुंबईची ही नवी शास्त्रशाळा होय, अशी कल्पना खचित शोभेल.

शास्त्र-शिक्षणाचे फायदे कोणास आज नव्यानें सांगितले पाहिजेत असें नाहीं. असें असतां शिक्षणाची ही बाजू आजपर्यंत कां मागासलेली राहावी? या गोष्टीला अनेक कारणें आहेत. एक तर हिंदुस्थानांत भौतिक शास्त्रांकडे पूर्वीपासून लक्ष कमी, ही गोष्ट ना० गव्हर्नरसाहेबांनीं म्हटल्याप्रमाणें खरीच आहे. पौर्वात्यांची दृष्टि अध्यात्मविद्येकडे अधिक. एवढेंच नव्हे, तर ना० गव्हर्नरसाहेबांनीं उपनिषदांतला जो उतारा आधारादाखल घेऊन उपनिषदांतहि स्पेन्सरप्रमाणें ' सायन्स ' चें म्हणजे भौतिकशास्त्राचेंच महत्त्व वर्णिलेलें आहे. ' शास्त्रा 'ध्ययनानेंच मनुष्य उत्तमोत्तम अशा देवलोकाप्रत जातो—असें सांगितलें, त्याचा अर्थ मात्र तसा नाहीं. सदर उताऱ्यांत ' शास्त्र ' या शब्दाचा अर्थ भौतिकशास्त्र नव्हे तर अध्यात्मविद्याच होय,

असें आम्हांस वाटतें. सांगण्याचें तात्पर्य इतकेंच कीं, ज्या तऱ्हेचें व्यावहारिक शिक्षण पाश्चात्य विद्यालयांतून देतात, त्या प्रकारचें शिक्षण पाठशाळांतून देण्याची आमची परंपरा मुळींच नव्हती. पूर्वी धंदेशिक्षण काय किंवा कलांचें शिक्षण काय हें सर्व जातींतल्या जातींत आनुवंशिक परंपरेनें किंवा शिष्यत्व करून म्हणजे हल्लींच्या ' अप्रेंटिस ' पद्धतीनें मिळत असे. तो काळहि गेला व ती पद्धतीहि गेली. हल्लीं वर्णाश्रमधर्म–व्यवस्थेची बहुतेक अव्यवस्थाच झाली असून, व्यावहारिक शिक्षणाची पाश्चात्यांची नवीन पद्धति अंगिकारण्याखेरीज आम्हांस गत्यंतर नाहीं.

ही गोष्ट लॉर्ड मेकॉले यांस कळत नव्हती असें मात्र नाहीं. पण लॉर्ड मेकॉले याच्या वेळीं खुद्द इंग्लंडांत तरी भौतिकशास्त्राच्या शिक्षणाचें पाऊल कोठें पुढें पडलें होतें ? व विलायती विहिरींत जें नव्हतें तें अँग्लो-इंडियनी पोहऱ्यांत त्यावेळीं कोठून येणार ? मेकॉले यांच्या वेळीं जो वाद होता तो पुस्तकी ज्ञान व व्यावहारिक ज्ञान यांच्यामधील विरोधाचा नव्हता; तर इंग्रजी भाषा, वाङ्मय व तद्द्वारा मिळणारें पुस्तकी ज्ञान आणि पौर्वात्य किंबहुना संस्कृत भाषा, वाङ्मय व तद्द्वारा मिळणारें पुस्तकी ज्ञान–अशा दोन प्रकारच्या पुस्तकी ज्ञानांतील विरोधाचाच होता. नांवें ठेवावयाचींच तर मेकॉलेला ठेवून काय उपयोग ? या नव्या युगांत जुनी परंपरा बुडवून नव्या पद्धतीचें शिक्षण देण्याची जबाबदारी पत्करणाऱ्या सरकारासच तीं ठेवलीं पाहिजेत. मेकॉलेच्या वेळीं पाश्चात्य विद्यालयांतूनहि व्यावहारिक शास्त्रशिक्षणाचा अंधारच होता. प्रकाश पडला तो गेल्या पन्नास वर्षांतच पडलेला आहे. पण या पन्नास वर्षांत स्वराज्यसुख भोगणाऱ्या सर्व राष्ट्रांनीं या प्रकाशापासून आपआपला फायदा करून घेतला–मग तीं राष्ट्रें पाश्चात्य असोत वा पौर्वात्य असोत. अर्थात् जी गोष्ट इंग्लंड व जपान यांस शक्य झाली तीच हिंदुस्थानास कां होऊं नये ? ना० गव्हर्नरसाहेब म्हणतात त्याप्रमाणें हिंदी लोकांपेक्षां जपानी लोकांच्या मनाची रचना अधिक व्यवहारप्रिय असेल. पण हेंच जर खरें कारण तर आज तरी हिंदी लोकांचा स्वभावगुण बदलला आहे कशावरून ? आणि तो बदलला नसतांहि शास्त्रशिक्षण देण्याचा आज जो प्रयत्न करावयाचा तोच पूर्वी करण्यांत आला असता तर आम्ही हिंदी लोक काय आडवे पडत होतों ?

तेव्हां काय व आतां काय मार्गदर्शकपणाचें व शिक्षकाचें काम सरकाराकडे. आमच्याकडे होतें काय व आहे काय ! जुन्या व नव्या विश्वविद्यालयांत सेनेटें हीं नेहमीं सरकारच्याच हातचीं; त्यांचेंच त्यांत बहुमत. या सरकारमतप्रदर्शक विश्वविद्यालयांनीं ठरविलें असतें तर जें आम्ही आज शिकणार तेंच पूर्वींहि शिकलों असतों. पण हा सर्व दोष लॉर्ड मेकॉले यांचा नव्हे, आमच्या देशांतील विशिष्ट राज्यपद्धतीचा. गेल्या चाळीस वर्षांत सरकारनें जमेच्या खात्याचा कारभार जसा कसला व कमावला तसा कित्येक खर्चाच्या खात्यांचा कारभार कसला व कमावला नाहीं. आमच्या दृष्टीनें पाहाणार कोण ? परतंत्र स्थितींत तरी उत्कृष्ट राज्यकर्त्यांची परंपरा कोठें टिकते आहे ? लॉर्ड रे नंतर सर जॉर्ज क्लार्क हे वीस वर्षांनीं आले, दरम्यान सर्व अंधकारच. दरम्यानच्या कोण्या गव्हर्नराचा क्रिकेट खेळणें हा, तर कोणाचा शांतिब्रह्मपद पावणें हा मुख्य गुण. आणि सर जॉर्ज क्लार्क यांच्या मागून वीस वर्षें कशीं जातात हें तरी कोणास ठाऊक ! तात्पर्य, हिंदुस्थानांतली प्रगति म्हणजे 'नरहर देवाची' पालखी. कोणी भक्त यदृच्छेनें भेटल्यास त्यानें हातभार लावावा; जाईल तितकी जाईल, थांबेल तेथें थांबेल. स्वतः आमचे आम्ही खपून खर्चून शिक्षणाची प्रगति करूं म्हटलें तर, ना० गोखल्यांच्या शिक्षणविषयक बिलाची गत पुढील वर्षीं काय होते तें पहा आणि मग बोला. असो; तथापि मतवादाचे हे मुद्दे बाजूस ठेवून आजच्यापुरतें आज पाहूं. या दृष्टीनें शास्त्रशिक्षणाच्या कामास मनोभावानें मदत करून शिक्षणास निराळी दिशा दिल्याबद्दल ना० सर जॉर्ज क्लार्क यांचे मनःपूर्वक आभार मानणें जरूर आहे. हिंदी प्रजेचें पाऊल उद्योगधंद्यांत पुढें पडावें या हेतूनें म्हणा किंवा स्वतः त्यांनींच बोलून दाखविल्याप्रमाणें उज्ज्वल अशा राजकीय ध्येयांचें आतुरतेनें ध्यान करणाऱ्या तरुणांच्या मनास विरजण पडण्याकरितां म्हणा—व्यावहारिक शिक्षणाचा जो उपक्रम त्यांनीं केला तो आम्हांस सर्वस्वीं ग्राह्य व मान्य आहे. या व्यावहारिक शिक्षणाच्या योगानें राष्ट्रीय व राजकीय विचार बोथटणार किंवा खरोखर अधिक तीक्ष्ण होणार याचा वाद आज कशाला ? या गोष्टी भविष्यकाळाच्या पोटांत सांठविल्या आहेत, त्या त्याचा तोच पाहून घेईल.

---

# २८. शेतकी–शिक्षण व सुधारणा

( केसरी, तारीख ४ आक्टोबर १९१०. )

कोणत्याहि गोष्टीला ज्याप्रमाणें दिशा आणि काळ हीं अपरिहार्य आहेत, त्याचप्रमाणें भूमीहि अवश्य आहे. मनुष्य हा भूमीवर जन्माला येतो; भूमीपासून उत्पन्न झालेल्या पदार्थांवरच त्याची उपजीविका व आयुर्यात्रा होते; उद्भिज्ज वनस्पतींप्रमाणें मनुष्यप्राणी हाहि एका अर्थानें भूमिज होय असें म्हणण्यास हरकत नाहीं; व तो मृत्यु पावल्यावर, त्याचें दहन झालें किंवा दफन झालें तरी, त्यानें भूमीपासून पूर्वी आपल्या फायद्याकरितां जें ऋण घेतलें तें त्याच भूमीला आपल्या अस्थींच्या रूपानें पुढच्या पिढ्यांच्या फायद्याकरितां तो परत देऊन टाकतो. भूमि ही अधिष्ठान–सामान्य या नात्यानें मनुष्याला उपयोगी आहेच; पण इतर पंचमहाभूतांकडून मिळ-णाऱ्या देणग्यांचा उपयोगहि भूमीशिवाय मनुष्यास करितां येत नाहीं. भारतांत म्हटल्याप्रमाणें भूमि ही 'सर्व भूतांची प्रकृति' आहे.

अचला ह्यक्षया भूमिः दोग्ध्री कामानिहोत्तमान् ।
दोग्ध्री वासांसि, रत्नानि, पशून् व्रीहियवांस्तथा ॥

भूमि हेंच सर्व संपत्तीचें आद्य व सनातन उत्पत्तिकारण होय. मानवी सुधारणेच्या इतिहासांत जीं अनेक स्थित्यंतरें दिसून येतात त्यांपैकीं पुष्कळांचें जमिनीची मालकी हेंच कारण होतें असें सूक्ष्म पाहणारास दिसून येईल. राजे लोकांची गजांतलक्ष्मी व त्यांचें छत्रचामरांकित ऐश्वर्य आणि अभि-जात वर्ग वगैरेंची सत्ता यांचें मूळ कारण जमिनीची मालकी म्हणजे जमिनीचा उपयोग करण्याची स्वतंत्रता हेंच आहे.

एखाद्या राष्ट्राची पुष्कळ सुधारणा झाली तरी भूमि व भूमिगत वस्तूं-वरील त्याचें अवलंबन कधींहि कमी होऊं शकत नाहीं; उलट या सुधारणे-मुळें जमिनीची किंमत कमी न होतां वाढते. कलाकौशल्य व उद्योगधंदे यांपासून मिळणाऱ्या नफ्याचें प्रमाण जमिनीच्या लागवडीपासून मिळणाऱ्या नफ्याहून अधिक असतें हें खरें; तथापि, उद्योगधंद्याचे बाबतींत नांवाज-लेल्या व पुढें आलेल्या राष्ट्रांतहि जमिनीमध्यें गुंतलेलें भांडवल द्रव्यो-

त्पादक उद्योगधंद्यांत गुंतलेल्या भांडवलाहून कितीतरी पट अधिक असतें. आपण इंग्लंडचेंच उदाहरण घेऊं. सर्व इंग्लंडांत मिळून ( अर्थात् वसाहत वगैरे सोडून देऊन ) आज जें राष्ट्रीय भांडवल म्हणून गुंतून राहिलें आहे तें अदमासें ६½ हजार कोटि रुपये आहे. पण उद्योगधंद्यांच्या दृष्टीनें इंग्लंडची भरभराट असतां व शेतकी त्या प्रमाणानें मागसलेली असतांहि या भांडवलाच्या रकमेपैकीं सुमारें पांच हजार कोट म्हणजे पाऊणपट खुद्द शेतकी, शेतकीशीं संबंध असलेले इतर धंदे यांत म्हणजे जमिनींतच गुंतलेलें आहे. शेतकीमध्यें मिळणारा नफा उद्योगधंद्यांत मिळणाऱ्या नफ्याहून फार थोडा असतो. वर सांगितलेल्या पांच हजार कोटि भांडवलावर सालिना उत्पन्न ( निवळ नफा नव्हे ) सोळा टक्के सुटतें; तर उद्योगधंद्यांत गुंतलेल्या भांडवलावर सालिना वट नफा १२० टक्के सुटतो. नफ्याच्या उत्पन्नाचें प्रमाण इतकें कमीजास्त असतांहि राष्ट्रांतील भांडवल शेतींतच अधिक गुंतून पडलेलें असतें, ही गोष्ट विशेष लक्षांत ठेवण्यासारखी आहे. एकाच देशांत शेतकी व उद्योगधंदे एकत्र नांदूं लागले तर अर्थातच शेतकीस या उद्योगधंद्यांचा पुष्कळ उपयोग होतो हें खरें. तथापि, हे दोन्ही एकत्र नांदत असतांहि त्यांचें परस्पर प्रमाण कसें असतें हें पाहाणारास जमिनीचें महत्व कळून येईल. हिंदुस्थानांत शेतकीचें महत्व किती आहे याविषयीं तर वादच नाहीं. हिंदुस्थानांतील एकंदर लोकसंख्येपैकीं शेंकडा सत्तर इतके लोक शेतकीवर अप्रत्यक्ष रीतीनें अवलंबून आहेत. हिंदुस्थान देश दरिद्री असल्यामुळें २५।३० कोट लोक मिळून सरकारी आंकडेच प्रमाण मानले तरी, सालिना ४-४॥ शें कोटि रुपयांइतकीच म्हणजे जर माणशीं १५।२० रुपये संपत्ति निर्माण करितात हें खरें; पण या संपत्तीपैकीं बहुतेक संपत्ति शेतीपासूनच उत्पन्न झालेली असते. मुंबई इलाख्यांत शेतीपासूनच होणारें लोकांचें दरसालचें उत्पन्न सरकारी आंकड्यांप्रमाणें सुमारें ३५कोट रुपये आहे. या सर्व गोष्टी लक्षांत घेतल्या म्हणजे हिंदुस्थानांतील लोकांचें व सरकारचें लक्ष शेतकीच्या सुधारणेकडे लागल्याशिवाय देशास ऊर्जितदशा येणें शक्य नाहीं, अशी कोणाचीहि खात्री होईल.

गेल्या दहा-पांच सालांत सरकारचें लक्ष शेतकी-शिक्षणाकडे व शेतकी-सुधारणेकडे लागलें आहे ही अभिनंदनीय गोष्ट होय. वास्तविक शेतकीच्या महत्त्वाच्या मानानें हें लक्ष फारच थोडें आहे असें म्हणावें लागेल. शेतकीपासून सरकारास प्रत्यक्ष पैशाचा फायदा कितीतरी आहे! निवळ शेतसाऱ्याचें हिंदुस्थानसरकारचें उत्पन्न सुमारें तीस कोट रुपये आहे; म्हणजे आगगाड्यांचें उत्पन्न वगळलें असतां बाकी उरणाऱ्या उत्पन्नाचा निम्मा अधिक भाग निवळ शेतकीपासून मिळतो. मुंबई इलाखाच शेतसाऱ्याच्या रूपानें सरकारास दरसाल सुमारें सहा कोट रुपये पुरवितो; आणि त्यांतले निम्मे रुपये जरी हिंदुस्थानसरकारकडे त्यांची वाटणी किंवा हिस्सा म्हणून जातात तरी या उत्पन्नापैकीं निदान तीन कोट रुपये तरी मुंबई सरकारास सालिना स्वतः खर्च करण्यास मिळतात. मुंबईसरकारच्या वांटणीस खर्चण्याकरितां जो एकंदर उत्पन्नाचा भाग दरसाल येतो, त्यापैकीं जवळ जवळ निम्मा भाग शेतसाऱ्याच्या उत्पन्नाचा आहे. असें असतां शेतकीखात्यावर-एकंदर मुलकी कारभार नव्हे—व शेतकीच्या शिक्षणावर होणारा सरकारी खर्च फारच थोडा आहे असें कबूल करावें लागेल. शेतसारा वसूल करण्यास लागणाऱ्या अधिकाऱ्यांना व नोकरांना जो पगार देण्यांत येतो तो अर्थात् शेतकीच्या सुधारणेकडे किंवा शिक्षणाकडे खर्च होतो असें म्हणतां येणार नाहीं. अशा कामाकडे मुंबई इलाख्यांत सुमारें ८०।८५ लक्ष रुपये सालिना खर्च होतात; व या खर्चांत मुलकी, सर्व्हे सेटलमेंट, लँड रेकॉर्ड, वगैरे जमीनबाबीच्या खात्यांच्या खर्चाचा समावेश होतो. तगाईच्या रूपानें दरसाल कित्येक लक्ष रुपये खर्ची पडतात पण ते निव्वळ कर्ज होय. शेतकऱ्यांची स्थिति सुधारावी, लोकांस शेतकीचें शिक्षण मिळावें, या हेतूनें खर्च होणारी रक्कम फारच थोडी आहे. शेतकीचें शिक्षण देणाऱ्या शाळा गेल्या सालापर्यंत या इलाख्यांत मुळींच नव्हत्या; हें शिक्षण देणारें एक कॉलेज मात्र आज कांहीं वर्षांपासून सुरू असून त्याला हल्लीं चांगलें स्वरूप येत आहे. या कॉलेजावर सालिना सुमारें ५० हजार रुपये खर्च होतो. तसेंच शेतकीच्या सुधारणेकडे म्हणून--म्हणजे इमारती, शिष्यवृत्ति (स्कॉलरशिपा), नमुन्याचीं शेतें, प्रयोग, यंत्रें वगैरेवर अलीकडे सालिना चारपांच लक्ष रुपये खर्च होतात. अशा रीतीनें, शेतकीसंबंधानें- लोकोपयोगार्थ म्हणून—

सुमारें सहा लक्ष रुपये खर्च होतो. पण वर सांगितल्याप्रमाणें शेतसाऱ्याचें सहा कोट रुपयांचें उत्पन्न लक्षांत घेतलें म्हणजे हा खर्च शेंकडा एक रुपाया याप्रमाणानें पडतो; फारसा अधिक पडत नाहीं हें लक्षांत येईल. आतां 'प्रत्येक बाबीचें उत्पन्न त्याच बाबीवर सरकारनें खर्चावें, प्रत्येक खात्याच्या दोन्ही तोंडांची अशा रीतीनें मिळवणी व्हावी' असें कोणासहि म्हणतां येणार नाहीं, व तसें कोणी म्हणतहि नाहीं. कारण ज्या खात्यांपासून उत्पन्न मुळींच नसतें व असलें तरी फार थोडें असतें, अशी शिक्षण, पोलीस वगैरेसारखीं खातीं सरकारास सुराज्य व्यवस्थेप्रीत्यर्थ राखावीं लागतात व त्यांवर पदरमोड करून त्यांस खर्चहि करावा लागतो. तथापि, शेतकीच्या वर दर्शविलेल्या महत्त्वाच्या मानानें शेतकीखात्याच्या लोकोपयोगी बाबींवर हल्लीं होणारा खर्च फारच थोडा आहे हें कोणासहि नाकबूल करतां येणार नाहीं.

हल्लीं होणारा हा खर्च मात्र कायम टिकणाराच आहे, व आज सरकारचें या विषयाकडे ज्या रीतीनें लक्ष लागल्यासारखें दिसत आहे, त्या रीतीनें पाहतां तो पुढें कधींहि कमी होणारा नाहीं, उलटा वाढणाराच आहे. सरकारचें हें लक्ष अलीकडे दोन तीन मुख्य गोष्टींवरून दिसून येतें. १ शेतकीचें पद्धतशीर शिक्षण देण्यास सुरवात झाली आहे; २ पुसा शेतकी संस्थेसारख्या निव्वळ शास्त्रीय संस्था शोधाकरितां स्थापण्यांत आल्या आहेत; आणि ३ शेतकीचीं आउतें, उपकरणें, बीं, खतें, पिकें वगैरे गोष्टींसंबंधानें सरकारी व खासगी रीतीनें प्रयोग व प्रदर्शनें करण्यांत येऊं लागलीं आहेत. या सर्व गोष्टी दिवसेंदिवस वाढतच जाणार—कमी होण्याचा संभव नाहीं. या कामीं सरकारास लोकांची व लोकांस सरकारची मदत घेण्याची अपेक्षा व इच्छा दिवसेंदिवस वृद्धिंगतच होत चालली आहे. थोड्या दिवसांपूर्वीं पर्यंत शेतकीसंबंधाच्या सभा म्हणजे अपूर्वच होत्या. राष्ट्रीयसभेच्या कार्यक्रमांत शेतकीचा केवळ अर्थशास्त्र व राजकारण यांच्या मिश्रस्वरूपांत विचार होई—अलीकडे राष्ट्रीयसभेच्या अनुषंगानें प्रदर्शनें भरण्याची चाल पडली होती पण त्यांत शेतकीच्या वस्तु ठेवल्या तरी केवळ खोगीरभरती करितां ठेवण्यांत येत. सरकारी व निमसरकारी अशा मिश्र सभा क्वचितच होत, पण त्यांत शेतकीसंबंधाच्या सभा तर फारच क्वचित असत. पण

अलीकडे पाहावें तर शेतकीपरिषदा व सभा वारंवार भरूं लागल्या असून त्यांत फार उपयुक्त अशा विषयांची चर्चा होऊं लागली आहे; व सर्वांत मौज ही कीं ज्यांच्यापर्यंत पोंचण्यास अनेक अभेद्य कोश अगर कवचें भेदावीं लागत असल्यामुळें ज्या थोर थोर अधिकाऱ्यांचें तोंडहि शेतकरी लोकांस दिसणें पूर्वी प्रायः मुष्किलीचें होतें ते अधिकारी आतां शेतकी-सभांचे अध्यक्ष होतात, स्वतः भाषणें करतात, रयतवर्गापैकीं अर्धवट ज्ञानाच्या लोकांनीं केलेलीं भाषणें ऐकून घेतात व सभांपुढें आलेल्या सूचनांचा शांतपणें विचार करितात. अशा सभांचें महत्त्व व जरूरी सर-कारास कोणत्याहि कारणानें का पटलेली असेना; पण ती पटलेली आहे याबद्दल वाद नाहीं.

हिंदुस्थानांतील शेतकीच्या सुधारणेसंबंधानें सरकार व लोक उभयतांनीं मिळून विचार करण्यासारख्या पुष्कळ गोष्टी आहेत. पहिली गोष्ट ही कीं, देशांत शेतकीस उपयोगी असें क्षेत्र आजमितीस किती आहे? पड म्हणून फुकट सरकारजमा होऊन पडलेली कांहीं जमीन शेतकीच्या उपयोगी आणतां येण्यासारखी आहे कीं नाहीं? फॉरेस्ट या नांवाखालीं जी जमीन आज दाखल झालेली आहे, तिचा उपयोग रान ठेवण्यापासून अधिक आहे किंवा तिच्यापैकीं कांहीं शेतीच्या कामाकडे दिल्यास तिचा उपयोग अधिक होईल? वरील प्रश्नांचा निर्णय झाला तरी, अशा रीतीनें शेतकीचें आणखी एकंदर क्षेत्र फार तर किती वाढवितां येईल? आज शेतकीवर उपजीविका अवलंबून असणाऱ्या लोकांच्या मानानें हें क्षेत्र पुरें आहे काय? आज हें पुरें आहे असें घेऊन चाललें तरी लोकसंख्येची जी वाढ दिवसेंदिवस होत जाणार तिच्या मानानें हें क्षेत्र पुरें पडेल काय? एकंदर क्षेत्र आणखी फार तर किती वाढवितां येईल? क्षेत्र पुरें न पडेल तर शेतकीच्या उत्पन्नाचें प्रमाण हल्लींहून वाढवितां येईल कीं नाहीं? व वाढवितां येईल तर तें कोणत्या उपायांनीं? शेतकीच्या क्षेत्राच्या वाढीला मर्यादा असणारच, पण उत्पन्नाला ही मर्यादा नाहीं. एक बिघा जमिनींत कोणत्याहि उपायांनीं जास्तींत जास्त किती धान्य उत्पन्न करितां येईल, याला एखादी अंतिम सीमा म्हणून जरी असली, तरी ती कोणत्याहि देशांत अद्यापि येऊन पोंचली आहे असें दिसत नाहीं; कारण ज्या देशांत शेतकीला भौतिकशास्त्राची जोड

मिळाली आहे त्या देशांत दर बिघ्यामागें होणारें शेतकीचें उत्पन्न अद्यापि वाढतच आहे, व तें आणखी किती वाढेल हें कोणीं सांगावें ? हिंदुस्थानांत तर ही अंतिम मर्यादा अद्यापि फारच दूर आहे, यांत शंका नाहीं. उदाहरणार्थ, हिंदुस्थानांत - मुंबई इलाख्यांत - गहूं हा कोरडवाहू जमिनींत सरासरीनें ८ बुशेल पिकतो. पण इंग्लंडमध्यें हें उत्पन्न दर एकरीं ३२ बुशेलपर्यंत येतें. अमेरिका व बेलजियम या देशांत हें उत्पन्न याहूनहि अधिक येतें. अर्थात् आहे या क्षेत्रांतच जरी उत्पन्नाची शक्य ती वाढ झाली तरी शेतीचें एकंदर उत्पन्न आजच्याहून दुप्पट तिप्पट वाढण्याचा संभव आहे. हें उत्पन्न वाढण्यास पाण्याचा व खताचा पुरवठा पाहिजे तो कसा मिळणार ? उत्तम जातिवंत बीबियाण्यांची पैदास कशी होईल ? पाटबंधारे आणखी होण्यासारखे आहेत किंवा नाहींत ? व्यर्थ दवडूं न दिल्यामुळें किती खत देशांतल्या आजच्या स्थितींतहि वांचवितां येईल, व शिवाय रसायनशास्त्राच्या मदतीनें नवीं कृत्रिम खतें बनवितां येतील किंवा नाहींत ? शेतीच्या आउतांत व इतर उपकरणांमध्यें काय सुधारणा करितां येईल ? शेतीची पद्धत जुनी चांगली कोणती व नव्या पद्धतीची मदत तिला कशी होईल ? शेताच्या पिकांस रोगराई कशी होते व तिच्या निवारणाचे मार्ग कोणते ? गुरें व ढोरें यांची हलाखी कशी नाहींशी करितां येईल ? उत्पन्नाच्या दृष्टीनें किंवा जमिनीस विश्रांति देण्याच्या दृष्टीनें फायदेशीर अशीं कोणतीं नवीं पिकें लावतां येतील ? पीक पिकलें तरी त्याची कांडणी–मळणी करण्याचे फायदेशीर मार्ग कोणते ? चांगली किंमत येईपर्यंत धान्य ठेवावें लागलें तर तें कसें ठेवावें ? शेतकीला लागणारें भांडवल वेळेवर व थोड्या व्याजानें मिळण्यास काय उपाय योजावे ? शेतकरी लोकांना परस्पर साहाय्य करण्यास व परस्पर साहाय्यानें शेतकीच्या प्रत्येक कामांत स्वतःचा फायदा करून घेण्यास कसें शिकवावें ? तात्पर्य, अशा प्रकारचे शेंकडों प्रश्न सरकार व लोक या उभयतांनीं मिळून सोडविण्याचे आहेत. विदेशी सरकार व प्रजा यांच्या दरम्यान निवळ राजकारणाच्या बाबींत जो बिनतोड खडा विरोध कित्येक वेळां उत्पन्न होतो तसला विरोध सुदैवानें शेतकीसारख्या विषयांत उत्पन्न होत नाहीं. हिंदुस्थानांतले लोक आपणांतलाच एखादा मनुष्य इंग्रजांच्या बरोबरीनें गव्हर्नर नेमा असें म्हणू लागतील तर हिंदुस्थानांतल्या

व इंग्लंडांतल्या इंग्रजांना ती मागणी भीतिप्रद वाटण्याचा संभव आहे. पण हिंदुस्थानच्या एक एकर जमिनींतल्या गव्हाचें कमाल उत्पन्न इंग्लंडांतील खुद्द जॉर्ज बादशहांच्या शेरी जमिनीच्या एका एकरांतील कमाल उत्पन्नाइतकें झालेंच पाहिजे व या दोन उत्पन्नांत आज असणारें अंतर नाहींसें झालें पाहिजे, अशी महत्त्वाकांक्षा हिंदुस्थानच्या यःकश्चित् शेतकऱ्यानेंहि धरली तर तिची भीति इंग्रज राज्यकर्त्यांस वाटण्याचें कारण नाहीं. उलटपक्षीं, हें अंतर तोडण्याचा गुण एखाद्या कृत्रिम व रासायनिक खतांत असेल तर तें खत विलायतेहून विकत आणून आपल्या जमिनींत घालण्यास स्वदेशीचा पराकाष्ठेचा अभिमानी असलेला मनुष्यहि माघार घेणार नाहीं. राज्यकर्ते व प्रजाजन यांच्यांत स्वराज्याबद्दलचें वाग्युद्ध जोरांत सुरू असतांहि ज्या कित्येक गोष्टींसंबंधानें बिलकूल मतभेद न राहतां एक विचार व एक जूट होण्यासारखी आहे, त्यांपैकीं शेतीची सुधारणा ही एक होय, हें उघड आहे. तथापि शेतकीचें शिक्षण व सुधारणा यांच्यासंबंधानें सरकार व लोक यांनीं स्वतंत्र रीतीनें केलें पाहिजे, असेंहि बरेंच आहे; व या दृष्टीनें या प्रश्नाचा पुढील खेपेस विचार करूं.

---

## २९. पुण्याचें शेतकी कॉलेज

( केसरी, तारीख २५ जुलै १९११ )

पुणें येथें स्थापन झालेल्या शेतकी कॉलेजाची नवीन भव्य इमारत उघडण्याचा समारंभ गेल्या मंगळवारीं ना० सर जॉर्ज क्लार्क यांच्या हस्तें करण्यांत आला. सदर प्रसंगीं कॉलेजचे अध्यक्ष डॉ० हॅरोल्ड मॅन व ना० गव्हर्नरसाहेब यांनीं केलेल्या भाषणांवरून शेतकीसारखा विषय शिकविण्यास स्वतंत्र कॉलेज कां हवें हें चांगलें कळून येण्यासारखें आहे. सदरहू कॉलेजाची स्थापना होण्याच्या पूर्वी शेतकीचें असें स्वतंत्र सरकारी खातें नव्हतें असें नाहीं; परंतु सरकारच्या दृष्टीनें व सरकारच्या तर्फेनें शेतकीसंबंधाची माहिती संग्रहित करणें, जमिनीची नोंद ठेवणें, प्रतबंदी व सेटलमेंट

करणें हाच त्या खात्याकडील कामाचा मुख्य भाग होता. लॉर्ड मेयो यांच्या कारकीर्दींत शेतकीखातें जेव्हां प्रथम निघालें तेव्हां खुद्द मेयोसाहेबांची या खात्याची कल्पना इतकी संकुचित नव्हती, हें त्या वेळच्या कागदपत्रांवरून उघड दिसून येतें. तथापि कोणतेंहि खातें परिणत स्वरूपास नेण्याला सहज बराच कालावधि लागतो. हें खातें जन्मून आज चाळीस वर्षें झाल्यानंतर, लोकोपयोगी व सरकारोपयोगी अशीं जीं या खात्याचीं मुख्य दोन अंगें तीं पृथक् होऊन सर्व्हे सेटलमेंट शाखा वेगळी; जमीननोंदणी, पीकपाण्याची पहाणी वगैरे शाखा वेगळी; व निवळ शेतकी शिक्षणाची शाखा वेगळी असे भाग झाले आहेत. शिक्षणशाखेचा जन्म इतक्या उशीरां व्हावा हें हिंदुस्थानांतील राजकीय परिस्थितीचें एक दर्शक आहे. १८७७ सालचा दुष्काळ पडला नसता तर शिक्षणखात्याकडे सरकारचें लक्ष इतकें लवकर गेलें असतें किंवा नाहीं याची शंकाच आहे. एवढा मोठा दुष्काळ पडून गेल्यावरहि या शाखेची वाढ व्हावी तितक्या जलद व सुसंगत रीतीनें झाली नाहीं. डॉ० मॅन यांनीं आपल्या प्रास्ताविक भाषणांत सांगितल्याप्रमाणें १८७७ च्या दुष्काळानंतर सरकारनें केलेला शेतकी शिक्षणाचा उपक्रम लवकरच थांबला. १८९१ च्या सुमारास शिक्षणाच्या कल्पनेस फिरून अंकुर फुटले; पण सरकारी मदतीचें खतपाणी मुळांत पुरेसें न पडल्यामुळें ते अंकुरहि लवकरच जळून गेले. परंतु १८९६ ते १९०१ या पांच-सहा सालांत फिरून एकसारखे दुष्काळावर दुष्काळ पडून शेतकीच्या सुधारणेचें महत्त्व सरकार अगर रयत पुनः कधींहि विसरणार नाहीं, अशा कडक व दुःखद रीतीनें त्यांचा ठसा त्यांच्या मनावर पडला; आणि गेल्या मंगळवारीं ज्या इमारतीचा प्रवेशसमारंभ झाला त्याजकडे पाहिलें म्हणजे हल्लीं सरकारानें हातीं घेतलेली शेतकीच्या सुधारणेची चळवळ बरीच टिकाऊ आहे, ती पुष्कळ दिवस तग धरील, यांत शंका वाटत नाहीं.

सरकारी शेतकीखात्यावर मुख्य अधिकारी नेमावयाचा तो होतां होईल तों शेतकीचें शिक्षण मिळालेला असावा असा एक साधारण नियम ठरून गेल्यामुळें, गेल्या दहा-पंधरा वर्षांत या खात्यावर जे मुख्य अधिकारी आले त्यांना स्वतःला शेतकी शिक्षणाचें महत्त्व कळत होतें; अशा शिक्षणाची व्यवस्था ज्यांत नाहीं, त्या शेतकीखात्याचा फोलपणा त्यांच्या

लक्षांत आला; व त्यांच्याच उत्साहपूर्ण अशा शिफारशीमुळें शेतकी कॉलेजाची स्थापना झाली. अशा अधिकाऱ्यांपैकीं माजी कौन्सिलर सर जॉन मूर मॅकेन्झी हे एक होत; व हल्लींचें कॉलेज या स्थितीला आणण्याचें बरेंच श्रेय त्यांजकडे आहे. केवळ त्यांच्याच मेहनतीमुळें शेतकी शिक्षणास महत्त्व येऊन युनिव्हर्सिटीकडून त्यांचा गौरव झाला; रेव्हेन्यू वगैरे खात्यांत त्यांस विशेष मान मिळाला; ठिकठिकाणीं प्रयोगाकरितां सरकारी शेतवाड्या स्थापण्यांत आल्या; आणि डॉ० मॅनसारख्या तज्ज्ञ मनुष्याची कॉलेजच्या मुख्य अध्यापकाच्या जागीं योजना होऊन कॉलेजच्या केवळ इमारतीकरितां आठ-दहा लाख रुपये मंजूर करण्यांत आले. परवां उघडलेली शेतकी कॉलेजची भव्य इमारत पाहिली म्हणजे सरकारच्या औदार्याचा या ठिकाणीं कांहींसा अतिरेक झाला असेंहि कित्येकांस वाटण्याचा संभव आहे. पंधरा वर्षांपूर्वीं शेतकीशिक्षणाचें म्हणण्यासारखें नांवगांवहि नव्हतें; व आज पहावें तों कॉलेजांत अवघे शेंसव्वाशें विद्यार्थीहि नसतां त्यांच्याकरितां आठ-दहा लक्षांचा राजवाडा ! हें लक्षांत आलें म्हणजे सरकारी व्यवस्थेंत झालें तरी काय—जाईल तेथें हत्ती जाईल,नाहीं तेथें मुंगीहि जाणार नाहीं—हीच म्हण प्रत्ययास येते.परंतु सकृद्दर्शनीं दिसणारी ही अव्यवस्था आम्हांस एका अर्थानें इष्टापत्तीच आहे. कारण या मोठ्या इमारती म्हणजे शेतकी शिक्षणाच्या कामीं सरकारचें पाऊल मागें पडणार नाहीं याविषयींचा जनतेस तो एक जामीनच पटला आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं.

नामदार गव्हर्नरसाहेब यांनींहि आपल्या भाषणांत असलेंच गोड भाविष्य वर्तविलें आहे. शिवाय ते म्हणाले कीं,"मी जर हिंदुस्थानांतल्या राजकीय चळवळ करणाऱ्यांपैकीं एक असतों तर वेळीं अवेळीं सरकारच्या बोडक्याशीं तगादा करून शेतकीशिक्षणावर व शेतकीसुधारणेवर सरकारनें अधिकाधिक पैसा खर्च केला पाहिजे असें त्यांच्यामागें एकसारखें टुमणें लाविलें असतें." सर जॉर्ज क्लार्क यांच्यासारख्या हुषार, करारी, आग्रही, अप्रिय गोष्टीहि करण्याचें भरपूर धैर्य अंगीं असणाऱ्या व्यक्ति हिंदुस्थानांतील राजकीय चळवळ करणाऱ्या लोकांत दुर्दैवानें थोड्या आहेत. सर जॉर्ज क्लार्क हे गणेशखिंडींत अथवा कौन्सिल हॉलांत मुख्य स्थानीं बसून राजकीय चळवळ्या लोकांची विल्हेवाट लावणाऱ्या अधिकारावर जे आज

आहेत, तेच त्यांच्याऐवजीं, एखाद्या यक्षिणीच्या प्रसादानें, स्वत: हिंदी बनून त्या मुख्यासनाच्या पायरीशीं हातांत विनंतिअर्ज घेऊन, तोंडावर आशा आणि निराशा यांची मिश्र छटा पोक्तपणानें संभाळून, राजनिष्ठापूर्ण अशा तीव्र रागानें आपलीं दु:खें गव्हर्नरसाहेबांपुढें मांडण्यास आमचे पुढारी म्हणून आम्हांस लाभले तर खरोखरच कितीतरी मौज होईल ! राजाचा रंक आणि रंकाचा राव बनविणाऱ्या या यक्षिणीचे आम्ही कृतज्ञतेनें कितीतरी गोडवे गाऊं ! पण अशा स्थितींत 'हिंदी सर जॉर्ज क्लार्क' यांच्या ओरडीची व हाकाटीची वासलात त्यांच्या गव्हर्नरानें कशी काय लाविली असती याचें खात्रीपूर्वक वर्णन मात्र 'इंग्रज सर जॉर्ज क्लार्क' यांच्या भाषणांत आढळत नाहीं. पण कदाचित्, हिंदी मागणारानें मागावें काय एवढेंच सांगण्याचा ना० गव्हर्नरसाहेबांचा हेतु असावा; देणाऱ्यानें काय द्यावें हें स्पष्ट करून सांगण्याचा त्यांचा इरादा नव्हता, असेंच मानलें पाहिजे. एखादा वर मागण्याला सुद्धां शहाणपण लागतें हें आम्हांस माहीत आहे. 'वरहि वरायास पाहिजे समज' असें पंतांनीं म्हटलेंच आहे. पण कोणच्याहि कालांत व कोणच्याहि लोकांत वर मागणाऱ्या भिक्षुकाच्या शहाणपणापेक्षां वर देणाऱ्या देवतेच्या औदार्याचेंच कौतुक अधिक करितात, असें नाहीं काय ? हिंदी राजकीय चळवळ्यांनीं ना० गव्हर्नरसाहेबांचा उपदेश इतर बाबतींत आजवर काय थोडा पाळला आहे ? भिक्षा मागण्याची, रडकथा गाण्याची व वेळीं अवेळीं खरखरमुंडेपणा करण्याचा त्यांनीं बाकी ठेविली आहे असें नाहीं; पण त्या मानानें त्यांना काय मिळालें ? बरें, शेतकीच्या सुधारणेकरितां तरी लोकांनीं मनसोक्त मागावें व सरकारनें आकंठ द्यावें, असा विलक्षण योग जमून येण्यासारखा आहे असें ना० गव्हर्नरसाहेबांच्या भाषणावरून कदाचित् वाटेल; परंतु याहि बाबतींत झालें तरी आजवर केवळ याचकाचाच कृपणपणा बाधला आहे असें म्हणतां येणार नाहीं. कर्झनशाहीच्या अखेर सन १९०४ सालीं वरिष्ठ कायदेकौन्सिलांत शेतकी सुधारण्याचा प्रश्न निघाला होता, त्यावेळीं बिनसरकारी युरोपियन सभासद ना० मि० हॅमिल्टन यांनीं शेतकीसुधारणेवर होणारा खर्च फार थोडा आहे तो आणखी निदान तीस लक्षांनीं तरी वाढला पाहिजे अशी तोंडभर मागणी केली होती. परंतु ती

देण्यांत आल्याचें आम्हांस माहीत नाहीं. मग लोकांनीं मागावयाचें तितकें मागावेंच, परंतु सरकारनें द्यावयाचें तितकेंच द्यावें, असा केवळ अर्थवादात्मकच उपदेश ना० गव्हर्नरसाहेबांस करावयाचा होता कीं काय नकळे ! लोकांची मागणी व सरकारची देणगी यांचा हुकमी मेळ सहसा पडलेला आपण पहात नाहीं. कारण लोकांनीं मागितलें तेंच, तितकें व त्यावेळीं दिलें तर सरकारच्या इभ्रतीस कमीपणा येतो, अशीच सरकारची भ्रामक समजूत झाल्याचें दिसतें. अर्थात् वेळींच हुकुमी मागितलेलें अवेळीं स्वेच्छेनें दिलें गेल्यास त्याचें चीज व्हावें तितकें होऊं नये हें स्वाभाविकच आहे.

ना० गव्हर्नरसाहेबांनीं दुसऱ्याहि एका वादग्रस्त विषयाचा उल्लेख केला होता. हिंदुस्थानांत आज धान्याच्या बाबतींत 'मनसोप्यभूमिः' अशी स्थिति झाली आहे असें म्हणतां येत नाहीं. तरी पण धान्याचा हा तुटवडा हल्लीं बहुधा सर्व सुधारलेल्या देशांस भासतोच. अर्थात् धान्याचा तुटवडा हें प्रजेच्या दारिद्र्याचें द्योतक नव्हे. हिंदुस्थानांत पूर्वीं धान्याची सुबत्ता होती, खाण्यापिण्याच्या बाबतींत हिंदुस्थानांत पूर्वीं एक वेळ सुवर्णयुग अवतरलें होतें, अशा हिंदी लोक गप्पा मारतात; पण पूर्वीं हिंदुस्थानांत धान्य पुष्कळ होतें म्हणजे काय तर लोकसंख्या थोडी होती. हल्लीं एकतीस कोट लोकांना धान्य पुरतें; आणि एखादे वेळीं दुष्काळसा वाटला तरी अगदींच धान्य मिळत नाहीं असें न होतां धारण मात्र वाढते, इतकेंच काय तें. तथापि आहे याहून धान्य अधिक पिकवितां यावें हें सर्वांसच इष्ट आहे, अशा अर्थाचें ना० गव्हर्नरसाहेबांचें भाषण होतें. हिंदुस्थानांत शेतीचें उत्पन्न फार मोठें आहे. विशेषतः हिंदुस्थानांतून परदेशास बराच शेतीचा माल जातो व यामुळें देशांतील शेतकऱ्यांस पुष्कळच फायदा होतो. याहि गोष्टीवर ना० गव्हर्नरसाहेबांनीं बराच जोर दिलेला होता. या दोन्ही गोष्टी नामदारसाहेबांनीं ज्या अर्थानें पुढें मांडल्या त्या अर्थानें त्या बऱ्याच वादग्रस्त आहेत. हिंदुस्थानांत मुख्यतः शेतकीचा धंदा चालतो, यामुळें ज्या देशांत कारागिरीवर मुख्य लक्ष असतें त्यांच्या मानानें शेतीचें उत्पन्न एकंदरीनें बरेंच झालेलें दिसतें खरें; परंतु देशांतील एकंदर लोकसंख्येस खरोखरच भरपूर पुरून उरेल तेवढेंच पीक परदेशास विक्रीस पाठविण्यांत येतें, किंवा शेतकऱ्यांचा नाइलाज म्हणून पोट बांधूनहि त्यांना आपलें धान्य बाजारांत

न्यावें लागतें. या गोष्टीचा नीट विचार झाला पाहिजे. शिवाय देशांतून परदेशास जो शेतीचा माल रवाना होतो त्याची येणारी किंमतहि सर्वच नफ्यादाखल धरावयाची कीं काय ? देशांतून ८० कोटी रुपये किंमतीचा माल परदेशास गेला तर हे सर्व ८० कोटी केवळ नफ्यादाखलच समजावयाचे कीं काय ? हा माल तयार करण्यास कांहीं खर्च लागतो कीं नाहीं ? लागत असेल तर तो किती ? व तो खर्च वजा घातला असतां शेतकऱ्यांस निवळ नफ्यादाखल उरणारी रकम किती ? कारण ना० गव्हर्नरसाहेबांनीं सांगितल्याप्रमाणें शेतीच्या नफ्यावर तग धरून दुष्काळांतून शेतकऱ्यांस निभवून जातां येतें हें जर खरें असेल तर तो नफा किती याचा अंदाज कळलाच पाहिजे. नामदारसाहेबांनीं केलेल्या या मुग्ध विधानांच्या योगानें एका युरोपियन गृहस्थासहि शंका उत्पन्न होऊन त्यानें गेल्या शनवारच्या 'टाईम्स' च्या अंकांत एक पत्र प्रसिद्ध केलें आहे. तो म्हणतो, '८० कोट रुपये घेऊन हिंदुस्थानानें आपला सर्व निर्गत माल परक्यांच्या पदरीं घातला खरा; पण या ८० कोटींतून त्याच्या खर्चाचे पैसे किती निघाले व निवळ नफा राहिला किती ? कारण हा सर्वच नफा म्हणावयाचा तर पीक पिकवावयाला त्याला मुळींच खर्च पडला नाहीं, असें समजावयाचें कीं काय ? शिवाय, हिंदुस्थानांत शेती मोठ्या प्रमाणावर आहे व शेतींत नफाहि बराच होतो, असें घेऊन चाललें तरी वाढत्या लोकसंख्येच्या प्रमाणानें शेतीचा विस्तार किंवा नफ्याचें प्रमाण वर्षानुवर्ष टिकेल काय ? हाहि एक प्रश्नच आहे. शेतीला कारागिरीची जोड असल्याशिवाय कोणत्याहि राष्ट्राचा निभाव लागत नाहीं. अर्थात् हिंदुस्थानांत कारागिरी वाढविल्याशिवाय निवळ शेतीवर भिस्त टाकून राहणें धोक्याचें आहे, असाहि इशारा ना० गव्हर्नरसाहेबांनीं द्यावयास पाहिजे होता.

आतां विषयमाहात्म्यामुळें व स्थलमाहात्म्यामुळें कारागिरीसंबंधानें त्यांनीं उल्लेख केला नाहीं हें कदाचित् ठीक म्हणतां येईल; परंतु शेतकीच्या उत्पन्नासंबंधाचा, जुन्या काळच्या अन्नाच्या पुरवठ्याचा, सुवर्णयुग वगैरेचा विषयच नामदारसाहेबांनीं या भाषणांत काढला नसता तर फार चांगलें झालें असतें. गव्हर्नरसाहेबांसारख्यांच्या भाषणास प्रेसअॅक्ट लागू नाहीं; तेव्हां त्यांच्या भाषणाच्या योग्यायोग्यतेचा प्रश्नच नसतो. पण आम्हांस त्या

वादांत पडतां येत नाहीं; व पडतां येत असलें तरी आजच्या लेखांत आम्हांस पडावयाचें नाहीं. कारण शेतकी शिक्षणावर खर्च करण्याचा व शेतकीसुधारणेचा जो उपक्रम सरकारनें केला आहे तो आम्हांस मनापासून चांगला वाटतो, व तो चांगला आहे असें स्पष्टपणें म्हणून आम्हांस सरकारचें या बाबतींत प्रामाणिकपणानें अभिनंदनच करावयाचें आहे. अर्थात् खिरींत मिठाचा खडा कां? नामदारसाहेबांनीं केलेल्या पूर्वपक्षास उत्तर देण्यासारखें आहे व तें देण्याची वेळहि केव्हांतरी येईलच. आज आम्हांस म्हणावयाचें तें इतकेंच कीं, शेतकी शिक्षणाचें महत्त्व, शेतकीची सुधारणा व त्याजविषयीं चाललेला हल्लींचा उद्योग हा आजमितीस अपुरा असला तरी आहे तेवढा लोकांस सर्वस्वीं मान्य आहे. लोक व सरकार यांनीं परस्पर अभिनंदन करण्याचीच ती एक बाब आहे. प्राथमिक व उच्च प्रकारच्या शिक्षणांत लोकांची धांव पुढें असतां सरकारचा पाय मागें आहे; पण शेतकीच्या शिक्षणांत तरी त्याच्या अगदीं उलट स्थिति आहे, ही गोष्ट आम्ही आनंदानें कबूल करितों. शिक्षणाचा फायदा घेणाऱ्या विद्यार्थ्यांची थोडी संख्या आणि त्यांच्या शिक्षणावर होणारा पुष्कळ खर्च यांचें हें व्यस्त प्रमाण शेतकीशिवाय इतर विषयांत कोठेंहि दिसून येत नाहीं, ही गोष्ट निर्विवाद आहे. शेतकी कॉलेजावर होणारा खर्च आणि डॉ० मॅन-प्रभृति प्रोफेसरांचा उत्साह यांना साजेल अशी शेती शिक्षणाची आमच्या मुलांत अद्यापि हौस आलेली नाहीं, व शिक्षण मिळवून खासगी शेतीच्या सुधारणेकडे त्याचा उपयोग करण्याची बुद्धि त्यांच्यामध्यें व्हावी तितकी उत्पन्न झालेली नाहीं, ही गोष्ट निर्विवाद आहे; पण ही स्थिति थोड्याच काळांत बदलून जाईल असा आम्हांस भरंवसा वाटतो.

---

# ३०. शिक्षण व राजकारण

( केसरी, तारीख ५ ऑगस्ट १९१३ )

शिक्षण व राजकारण यांची पुरी फारकत व ताटातूट करण्याच्या हेतूनें दिल्लीसरकारनें कलकत्ता युनिव्हर्सिटीवर हल्लीं जी स्वारी केली आहे तिला कलकत्तेकरांकडून जोराचा प्रतिकारहि सुरू आहे. गेल्याच्या मागील सोमवारीं कलकत्ता येथील टॉऊनहॉलांत युनिव्हर्सिटी-प्रकरणासंबंधानें लोकमत व्यक्त करण्याकरितां जाहीर सभा भरली होती. तिला हजारों लोक आले असून सर्व प्रांतांतले निवडक प्रतिनिधीहि हजर होते बंगालच्या पुढाऱ्यांमध्यें अलीकडे कित्येक वर्षें राजकारणाच्या बाबतींत जें लोकोत्तर ऐक्य दिसून आलें आहे तेंच सुदैवानें अजूनहि कायम असून, अशा भरीव लोकमताच्या दगडावर आपलें डोकें आपटून घेण्यास दिल्लीसरकारची राजनीति तयार होते कीं काय हें पाहणें आहे. पूर्वीं बंगालच्या फाळणीच्या वेळीं बंगाल्यांत जशा प्रकारचा असंतोष माजला होता तसला असंतोष कलकत्ता-युनिव्हर्सिटीच्या प्रस्तुतच्या अपमानामुळें माजण्याचा संभव उघड दिसतो. " पूर्वींचे ते भोंगळपणाचे दिवस म्हणावे आतां विसरा,सरकारची बादशाहीचीं शस्त्रास्त्रें आतां पूर्वींपेक्षां अधिक साफसूफ व सज्ज असून कोणत्याहि चळवळीला त्यांना तेव्हांच लगाम घालतां येईल" अशी गर्वोक्ति जरी 'इंग्लिशमन' सारख्या वर्तमानपत्रांनीं काढली आहे, तरी अशी सर्व राष्ट्रीय-चळवळ कोणासहि सुखकर होत नाहीं हें 'इंग्लिशमन्'ला झालें तरी माहीत नसेल असें नाहीं. कोणचीहि चळवळ लोक उगीच सुखासुखी करीत नाहींत; चळवळीमुळें त्यांना त्रासच सोसावा लागतो; व स्वार्थत्यागाच्या दिव्यांतून त्यांना पार पडावें लागतें; अर्थात् चळवळ करणें ती केवळ निरुपायानें करावी लागते याचेंच हें प्रस्तुतचें एक उदाहरण आहे. बंगाल्यांत आज सर्वप्रकारें शांतता नांदत होती. लॉर्ड हॉर्डिजसारखे व्हाइसरॉय व लॉर्ड कारमायकेल-सारखे गव्हर्नर लाभल्यानें पूर्वींचीं बरीचशीं शल्यें बंगाली राष्ट्राच्या हृदयांतून निघालीं होतीं. पूर्वींच्या चळवळीच्या युद्धांत उभयपक्षीं झालेल्या बहुतेक जखमा भरून आल्या होत्या. अशा स्थितींत असलें हें नवें प्रकरण नसतें

उपस्थित करण्यापासून सरकारास तरी कोणता मोठा लाभ होणार होता ? कित्येक विद्वान् आज दीड दोन वर्षें युनिव्हर्सिटींत आपलें काम बिनबोभाट करीत असणाऱ्या व्याख्यात्यांना, ते अलीकडे राजकारणांत पडल्याचा नसता आरोप उकरून काढून, बंगालसरकारच्या मनाविरुद्ध व कलकत्ता–युनिव्हर्सिटीसारख्या संस्थेचा उपमर्द करून कामावरून दूर करण्याचा आग्रह धरण्यानें दिल्लीसरकारला कोणतें सार्वजनिक हित साधावयाचें होतें हें त्यांचें त्यांनाच माहीत ! आधीं हे तिघेहि व्याख्याते राजकारणांत पडले होते हें खरें नाहीं; पडले असले तरी तें राजकारण म्हणजे कांहीं गुन्हेगारी उत्पन्न करण्यासारखें असल्याचें दिसत नाहीं; व यदाकदाचित् तें तसें असलें असें गृहीत घेऊन चाललें तरी झाल्या गेल्या गोष्टी विसरून जाणें हें शहाणपणाचें ? कीं त्या गोष्टी कोणाला ठाऊक नसतां मुद्दाम उकरून काढून वेशीवर बांधणें हें अधिक शहाणपणाचें ? हे व्याख्याते आज पूर्वीसारखीं आपलीं व्याख्यानें देत राहते तर असा काय मोठासा घातपात होणार होता, कीं तो वांचविण्याकरितां सरकारनें हा एवढा उपद्व्याप करावा ? आणि सार्वजनिक असंतोष माजवावा ? कदाचित् हा प्रश्न जेव्हांचा तेव्हां निघता तर त्याचें कोणास कांहीं फारसें वाटलें नसतें. पण तो तसाच मनांत ठेवून भलत्या वेळीं तो बाहेर काढण्याच्या सरकारच्या या प्रयत्नानें त्यांच्या मनाच्या क्षमाशीलतेविषयीं लोक साशंक झाल्यास नवल काय ?

बरें, कारण नसतां उकरून काढलेली ही बाबहि कांहीं लहानसान आहे असें नाहीं. हल्लींच्या राज्यपद्धतींत लोकांना राजकीय कामकाजांत जें काय थोडेंसें स्वातंत्र्य उरलें आहे त्याच्या काळजालाच हा हात घातल्यासारखा होतो. शिक्षणाचें काम करणाऱ्या कोणाहि मनुष्यानें राजकारणांत पडूं नये हें तत्त्व दिसतांना साळसूदपणाचें व गोजिरवाणें दिसतें खरें; पण त्याच्या पोटांतले पाय मोठे घातक आहेत. शिक्षण आणि राजकारण हे शब्दच इतके व्यापक आहेत कीं, त्यांनीं कोणत्याहि राष्ट्राचें एकंदर जीवित व्यापून टाकलेलें असतें असें म्हणण्यास हरकत नाहीं. अर्थात् अशा दोन गोष्टींची पुरी आणि कायमची ताटातूट करण्याचा प्रयत्न करणें म्हणजे त्या राष्ट्ररूपी शरीरांतला प्राण काढून घेण्याचा प्रयत्न करण्यासारखेंच आहे. हा प्रयत्न सरकार आज दहा-वीस वर्षें

कसा करीत आहे व जो जो प्रसंग सांपडेल त्या त्या प्रसंगीं आपल्या धोरणाचें एक एक पाऊल सरकार कसें युक्तिबाजपणानें पुढें टाकीत आहे हें पाहिलें म्हणजे त्यांच्या पाताळयंत्रीपणाचें कौतुक वाटतें १८९७-९८ सालीं मुंबई इलाख्यांत शिक्षकांच्या मतस्वातंत्र्याचा प्रश्न निघालेला होता; पण तेव्हां तो तितका नेटाला लागला नाहीं. बंगालच्या फाळणीच्या प्रसंगीं हा प्रश्न थोडासा निघाला होता; पण विद्यार्थ्यांनीं सभांना जावें कीं नाहीं, त्यांनीं चळवळींत पडावें कीं नाहीं, हाच मुद्दा त्यांतल्या त्यांत विशेष प्रमुखपणानें त्यावेळीं पुढें आला होता; व प्रख्यात ' रिसले-सर्क्युलर ' निघून बंगाल्यापुरता तो प्रश्न त्यावेळीं निकालालाहि लागला. रिसले-सर्क्युलर हें वास्तविक सर्व हिंदुस्थानावर उगारलेलें शस्त्र होतें, पण त्याचा प्रत्यक्ष अंमल बंगाल्यापुरताच झाला. इतर प्रांतांत म्हणजे मुलांना राजकारणांत पडावयास आज मुक्तद्वार आहे असें नाहीं; पण सदर सर्क्युलरास प्रांतिक सरकाराकडून सर्वस्वीं संमति मिळाली नव्हती व दडपशाहीच्या श्रुतिसंग्रहांस त्यास सर्वत्र कायमचें असें स्थान मिळालें नव्हतें. शिवाय अलीकडे राजकीय चळवळ थांबल्यामुळें या गोष्टी कोणाच्या लक्षांत फारशा येत नव्हत्या. पण हातीं घेतलेलें काम पुरें करावयाचा सरकारचा कृतनिश्चय असल्यानें वेळ अवेळ न पाहतां त्यांनीं विद्यार्थ्यांच्या स्वातंत्र्यनाशापुढची मजल मारून दडपशाहीच्या दोरीचा फांस आतां शिक्षकांच्या गळ्याशीं आणून भिडविला आहे ! सबब याच वेळीं काय धडपड होईल ती उपयोगी ! नाहीं तर एकदां का हें घातक तत्त्व रुजून त्यानें मूळ धरलें म्हणजे मग काय, निराशाच !

विद्यार्थ्यांनीं राजकीय कामकाजांत पडूं नये हें तत्त्व व शिक्षकांनीं राजकीय कामकाजांत पडूं नये हें तत्त्व या दोहोंत नुसती जमीनअस्मानाची तफावत आहे ! पहिलें तत्व झालें तरी सर्वस्वीं कोणास मान्य होईल असें नाहींच; कारण विद्यार्थी झाले म्हणून काय झालें ? समाजांतील ते एक घटकच आहेत. विद्याभ्यास करणें हें त्यांचें आद्य कर्तव्य असलें तरी तें कर्तव्य नीट केल्यावर व त्या कर्तव्यास बाध न येईल अशाच रीतीनें त्यांनीं सार्वजनिक कामांत लक्ष घातल्यास त्यांत वावगें तें काय ? ते केवळ "विद्यार्थी" म्हणून जगाकडे डोळे उघडून पाहाण्याचा त्यांचा हक्क कसा नष्ट होतो ?

विद्यार्थीविद्यार्थ्यांमध्येंहि फरक आहेच कीं नाहीं ? प्राथमिक शाळेंतील अल्पवयी विद्यार्थी व कॉलेजांतील प्रौढ विद्यार्थी यांच्यामध्यें कांहींच विवेक करण्यासारखा नाहीं कीं काय ? ज्यांना ' उदयोन्मुख तरुण पिढी' असें उल्हासकारक नांव मिळतें, ' राष्ट्राची भावी आशा ' अशा प्रौढ शब्दांनीं ज्यांचा गौरव होतो, त्यांनीं केवळ अज्ञातवासांत राहिलेल्या प्रमाणें आपल्या भावना व आपलें कर्तव्य हीं, कुणी हुडकावयास गेलें तरी त्यास दिसणार नाहींत अशा गुप्त रीतीनें दडवून ठेवावीं असा जुलूम त्यांच्यावर काय म्हणून ? राष्ट्राच्या तरुण पिढीचें यौवराज्य कडीकुलपांतच जावें असा आग्रह कां ? बरें, ' राजकारणा 'चा त्यांना संपर्कहि लागूं नये हें जर सर्वतोपरी इष्ट, तर सरकारला प्रिय अशा राजकारणाच्या समारंभांत त्यांचा उपयोग कां करितां यावा ? सरकारला आवडीचें असलें तरी राजकारण तें राजकारणच ना ? सरकारची बाजू सजत असेल त्या ठिकाणीं टाळ्या वाजवावयाला मुलें असलीं तरी चालतील, पण लोकांना किंवा मुलांना स्वतःला आवडणाऱ्या मनुष्याविषयीं त्यांनीं चुकूनसुद्धां प्रेम किंवा आदर व्यक्त करूं नये, या एकतर्फी सक्तीस न्याय कोण म्हणेल ? राजकारण वगळावयाचें तर तें अजीबात व दोन्ही अंगांनीं तरी वगळावें ! मुलांचीं मनें अपक्व असल्यामुळें त्यांच्या मनाला वादग्रस्त गोष्टींचा संपर्क होऊं नये हें जर इष्ट असेल, व या तत्त्वाचा जर प्रामाणिकपणानें अंमल व्हावयाचा असेल, तर एखादी गोष्ट सरकारास प्रिय असली म्हणून काय झालें; ती 'वादग्रस्त' असल्यास तिजपासून मुलांना सरकारानेंहि दूरच ठेवलें पाहिजे. हिंदुस्थान देश अलीकडे श्रीमंत होत आहे कीं नाहीं ? पौर्वात्य देशांना प्रजासत्ताक पद्धतीचें वावडेंच आहे कीं काय ? वगैरे उघड उघड वादग्रस्त गोष्टींवर होणाऱ्या लोकमतनिदर्शक अशा व्याख्यानांस विद्यार्थ्यांना जाण्याची जर मनाई होते, तर गव्हर्नर-उपगव्हर्नर झाले म्हणून काय झाले ? त्यांनीं तरी असल्या विषयांवर विद्यार्थ्यांस उद्देशून भाषणें कां करावीं ? वरिष्ठ सरकारी अधिकाऱ्यांचें मत झालें तरी तें एकतर्फीच कीं नाहीं ? शुद्ध ज्ञानार्जनाच्या क्षेत्रांत लोकमतास मज्जाव व्हावा व एकतर्फी सरकारी मतांनीं मात्र हवा तसा प्रवेश करावा आणि राखून ठेवलेल्या खास कुरणांतल्या लष्करी घोड्याप्रमाणें त्या मतांनीं मात्र

यथेच्छ धिंगाणा घालावा यांस सरकार झालें तरी कसें समर्थन करणार, हें आम्हांस कळत नाहीं !

पण ही विद्यार्थ्यांची गोष्ट झाली; व आपण क्षणभर असें घेऊन चालूं कीं, विद्याभ्यास करीत असतां विद्यार्थी राजकारणाच्या प्रत्यक्ष चळवळींत जितके कमी पडतील तितकें बरें. तरी पण विद्यार्थ्यांना जो निर्बंध घालावयाचा तोच शिक्षक, प्रोफेसर व व्याख्याते यांनाहि घालण्याची सरकारची इच्छा आहे हें दिल्लीसरकारच्या पत्रावरून आतां उघड उघड दिसत नाहीं काय ? राजकीय चळवळ करणाऱ्या मनुष्यास विद्यालयाशीं संबंध ठेवूं द्यावयाचा नाहीं, व विद्यार्थीवर्गास आपल्या कक्षेबाहेर जाऊन अशा लोकांच्या वाऱ्यासहि उभे राहूं द्यावयाचें नाहीं; याच्यानंतर खुद्द शिक्षकांनींहि कोणत्याहि चळवळ्या लोकांशीं व चळवळीशीं संबंध ठेवावयाचा नाहीं ही गोष्ट ओघानेंच प्राप्त होते. या तीन निर्बंधांचें अभेद्य किल्लेकोट बांधून त्यांच्या आंत विद्यार्थिवर्गाला सरकार सुरक्षित ठेवणार ! 'रसद' पोंचवावयाचीच झाली तर ती फक्त सरकारमार्फत ! व आंत कोणास संचार करावयास मिळालाच तर तो खुद्द सरकारी अधिकाऱ्यांस ! पण हा प्रयत्न अप्रयोजकपणाचा आहे हें सरकारच्या लक्षांत यावयास पाहिजे होतें. कारण एक तर मनुष्य राखून किती राखणार ? ख्रिस्त पुराणांत वर्णिल्याप्रमाणें स्वर्गीय उद्यानभूमींत अशाच रीतीनें रक्षण करून ठेवलेल्या आद्य-मातापितरांनीं ज्ञानवृक्षाचें फळ तोडून शेवटीं खाल्लेंच कीं नाहीं ? बुद्धचरित्रांतलाहि दाखला या कामीं घेण्यासारखा आहे. गौतमबुद्ध हा आपला बाप राजा शुद्धोदन याचा अत्यंत प्रिय असा मुलगा असल्यामुळें मुलाच्या दृष्टीला जगांतील दुःख म्हणून कसें असतें तें पडूंच नये अशी त्यानें योजना केली होती; पण केवळ चुकून घडलेल्या एका वृद्धाच्या दर्शनानें शुद्धोदनाचे सर्व बेत फुकट जाऊन, राजपुत्राच्या अंगीं वैराग्य बाणून तो आईबापांस सोडून गेलाच कीं नाहीं ? हिंदी विद्यार्थ्यांना राजकारण म्हणजे काय असतें याची कल्पनाहि येऊं नये अशी सरकारची इच्छा खरी; पण ती अशा उपायांनीं सर्वांशीं कशी सफल होणार ? राज-

कीय पुढाऱ्यांचें विद्यागृहांत दर्शनहि न होऊं देणें हा एक मार्ग आहे खरा, पण तो वास्तविक पहातां अगदीं अपुरा आहे.

समजा, कीं सरकारी व खाजगी सर्व शाळांतील विद्यार्थी बोर्डिंगहौसच्या कडी-कुलुपांत व पहाऱ्यांत ठेविलेले आहेत, व फक्त शिक्षणाच्या वेळीं आणि फक्त शिक्षकांचेंच दर्शन त्यांना होतें; आणि अभ्यासाचीं पुस्तकें किंवा तोंडपाठ करण्याचीं शिक्षकांनीं दिलेलीं टिपणें एवढेंच त्यांस वाचावयास मिळतें. अशा स्थिति जर विद्यार्थिदशेच्या अंतापर्यंत एकसारखी टिकणारी असती तर गोष्ट वेगळी. फोटोग्राफ घेणाऱ्या कॅमेराच्या अंतरंगांत आधीं सर्व अंधार करून ठेवलेला असतो, म्हणून फक्त ज्या एका लहानशा द्वारानें आंत प्रकाश येणार त्याच्या तोंडीं प्रकाश-निरोधक 'डायफ्रॅम' लहान बसवावा कीं मोठा बसवावा ही चिकित्सा शोभेल. पण शेंकडा नव्वद किंवा पंच्चाण्णव विद्यार्थी बोर्डिंगहौसच्या कैदखान्याबाहेर असतात; ते समाजांत इतर रीतीनें पूर्णपणें मिसळतात व वावरतात; समाजाची सुखदुःखें त्यांच्या प्रत्यक्ष नजरेस पडतात; आपले आईबाप, आप्तइष्टमित्र व तिऱ्हाईत लोकहि सार्वजनिक विषयांची जी चर्चा-जो वादविवाद-करतात तो सर्व त्यांच्या कानीं जातो; लायब्ररींत नसलीं तरी घरीं किंवा बाहेर त्यांना सर्व प्रकारचीं वर्तमानपत्रें वाचावयास सांपडतात; या सर्व गोष्टी अगदीं उघड व खऱ्या आहेत. त्या सरकारनें आपणांस माहीत नाहींत असें म्हणण्यांत किंवा आम्ही त्या नाकबूल करण्यांत अर्थ कोणता? पण त्याचबरोबर हेंहि लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, हे सर्व अगदींच स्वाभाविक आहे; आणि इतर कोणत्याहि देशांत काय किंवा हिंदुस्थानांत काय तें तसेंच असणार—किंबहुना तें तसें असलेंहि पाहिजे. त्यांत वावगें असें कांहीं नाहीं! शाळेंतील शिक्षणाचें प्रत्यक्ष काम सरकारकडे असलें किंवा त्यावर त्यांची देखरेख असली म्हणून विद्यार्थी हे कैदी या नात्यानें सरकारच्या स्वाधीन करण्याचा आईबापांचा केव्हांहि इरादा नसतो. अर्थात् शाळेंत गेले म्हणजे तेथें सहा तास सांखळ्या—वाळे घातलेले कैदी आणि बाकी घरीं व बाहेर अठरा तास 'पॅरोल'वर खुले केलेले 'नजरकैदी' अशा तऱ्हेची विद्यार्थ्यांची उपपत्ति प्रतिपादन करण्याची सरकारची इच्छा असेल, किंवा त्यांची इच्छा असली तरी ती जगमान्य होईल असें आम्हांस वाटत नाहीं.

शाळेपुरती सर्वस्वीं व शाळेबाहेर थोडीशी विद्यार्थ्यांना शिस्त म्हणून राहिली पाहिजे ही सामान्य गोष्ट आहे. पण शाळेंत केवळ पुस्तकी ज्ञानाखेरीज विद्यार्थ्यांना विशेष कांहीं देतां येत नाहीं–धार्मिक, नैतिक, सामाजिक वगैरे विषयांचें ज्ञान देण्याचें काम सरकारास विद्यार्थ्यांचे आईबाप व त्यांचा समाज यांजवरच जसें सोंपवावें लागतें, तसें राजकारणाचें ज्ञानहि याच मार्गानें त्यांना मिळाल्याशिवाय राहणार नाहीं, हीं अनिर्वाह्य गोष्ट सरकारच्या लक्षांत यावयास पाहिजे. सांगण्याचें तात्पर्य इतकेंच कीं, राजकीय शिक्षणाचे विद्यार्थ्यांचे ज्ञानमार्ग इतके प्रशस्त व विविध असल्यामुळें केवळ राजकारणांत ते मन घालतात म्हणून विद्वान् लोकांना विद्यामंदिराच्या द्वारीं मज्जाव करणें हें, मैदानांत उभें राहिलें असतां आपला लहानसा तळहात पुढें करून सर्व सूर्यप्रकाश अडवून धरण्याच्या महत्त्वाकांक्षेसारखें हास्यास्पद आहे ! त्यामुळें दुसरें तिसरें तर कांहीं साधत नाहींच, पण सर्वशक्तिसंपन्न प्रभूच्या मनाची अनुदारता मात्र दिसून येते ! राजकारणांत पडणाऱ्या विद्वान् लोकांविषयीं सरकारची ही असहिष्णुता त्यांना खचित भूषणास्पद नाहीं. आतां प्रत्यक्ष शिक्षणाचें काम करीत असतां कोणत्याहि शिक्षकानें आपल्या परिस्थितीचा फायदा घेऊन सरकाराविषयीं अप्रीति उत्पन्न करण्यासारखा राजकारणाचा उपदेश विद्यार्थ्यांना करूं नये हें अगदीं रास्त आहे, व देशकार्याकरितांहि असला विश्वासघात कोणी करणार नाहीं व करूं नये. पण या विश्वाससंबंधाच्या मर्यादा कोणत्या आहेत हें मात्र विसरतां कामा नये. कारण 'शिक्षणाचें काम अंगिकारणाऱ्या मनुष्यानें इतर वेळींहि आपली सदसद्विवेकबुद्धि सरकारास विकून टाकल्याप्रमाणें जन्मभर वागलें पाहिजे किंवा पूर्वीं केव्हांहि राजकारणांत पडलेला मनुष्य विद्यामंदिरांत पुढें केव्हांहि अस्पृश्यच मानला गेला पाहिजे' असा सरकारचा आग्रह असल्यास त्याचें समर्थन साक्षात् ब्रह्मदेवहि करूं शकणार नाहीं !

शिवाय, केवळ राजकारणाचा स्पर्श झाल्यामुळें पतित किंवा बहिष्कृत होऊन सुशिक्षित लोक विद्यादेवीच्या प्रासादांगणाच्या कोंपऱ्यांतहि उभें राहण्यास अपात्र ठरले, ही गोष्ट हिंदुस्थानाखेरीज इतर कोणत्याहि देशांत कधीं कोणास पहावयास किंवा ऐकावयासहि सांपडणार नाहीं. इंग्लंडचेंच उदाहरण का घ्याना, इंग्लंडची व हिंदुस्थानची राजकीय परिस्थिति कांहीं

कांहीं बाबतींत वेगळी असेल; पण तेवढ्यामुळें इंग्लंडचा दाखला या कामीं मुळींच घेतां घेणार नाहीं असें नाहीं; आणि इंग्लंडांत पहावें तर राजकारणांत अगदीं पुढारीपणानें पडणारे जे लोक त्यांना युनिव्हर्सिट्यांतून मज्जाव नसतो इतकेंच नव्हे, तर केवळ विद्याविषयक व्यवसाय करीत रहाणाऱ्या प्रोफेसरांहूनहि त्यांना अधिक मान मिळतो. इंग्लंडांतील युनिव्हर्सिट्यांच्या रेक्टरच्या जागा प्रायः विद्यमान् किंवा पूर्वकालीन प्रधान-मंडळांतील लोकांकरितांच राखून ठेवलेल्या असतात असेंहि म्हणतां येईल. कॉन्झर्वेटिव्ह झाले किंवा लिबरल झाले तरी इंग्रजच, ही गोष्ट खरी असली तरी, या दोन पक्षांतील मतभेदाची तीव्रता व त्यामुळें उत्पन्न होणारी विकारवशता इच्यापेक्षां, हिंदुस्थानांत राजकीय मतभेदामुळें उत्पन्न होणारी तीव्रता किंवा विकारवशता ही कांहीं विशेष आहे असें म्हणतां येणार नाहीं. इंग्लंडांत झालें तरी राजकीय चळवळीची मजल कोठवर जाते हें प्रसिद्धच आहे. कॉन्झर्वेटिव्ह व लिबरल पुढारी किंवा पक्षपाति हे परस्परांवर जितकी कडक टीका करतात, एकमेकांस जितके अपशब्द बोलतात किंवा जसा अनुदार हेतूंचा आरोप करतात, तशी टीका, अपशब्द किंवा आरोप यांचा हिंदुस्थानांतील राजकारणांत कधीं उपयोग झालेला आढळत नाहीं. हें जर खरें, तर इंग्लंडांत राजकारणाच्या स्पर्शामुळें शिक्षणाला जी अपवित्रता येत नाहीं ती हिंदुस्थानांतच कां यावी? इंग्लंडांत प्रधानमंडळ उलथून पाडण्याचा प्रयत्न तरी असतो; हिंदुस्थानांत ती कल्पनाहि नाहीं. केवळ लोकांच्या तक्रारीची दाद लावून घेणें किंवा राज्यकारभाराच्या एखाद्या खात्याच्या धोरणावर टीका करणें इतकें सौम्य स्वरूप हिंदुस्थानांतील राजकारणास असतां त्याचा नुसता स्पर्शहि शिक्षणाला इतका दुःसह कां वाटावा? राजकीय पुढाऱ्यांच्या तोंडच्या उच्छ्वासानें आपल्या प्रशांत पुष्करणींत वादळ होण्याची भीति जर आंग्लविद्यादेवीला वाटत नाहीं, तर हिंद-विद्यादेवीला तरी ती भीति कां वाटावी? हिंदी व इंग्रजी राजकारणांत कसाहि फरक असो; पण विद्यार्थ्यांचें मन कोठेंहि झालें तरी तेंच. मग शुद्ध ज्ञानार्जनाच्या योगसमाधीचा भंग राजकारणाचा शब्द विद्यार्थ्यांच्या कानांवर पडल्यानें हिंदुस्थानांत होतो, आणि विलायतेंत मात्र होत नाहीं हें कसें?

---

# ३१. अमेरिकेंतील हिंदी विद्यार्थी-संघ

( केसरी, तारीख २१ आक्टोबर १९१३ )

देशत्याग हा ज्या वेळीं सक्तीमुळें करावा लागतो त्या वेळीं त्यासारखें दुसरें दुःख नसतें; पण तोच स्वेच्छेनें करणें यासारखी उत्साहकारक गोष्ट दुसरी क्वचितच असेल. आज हिंदुस्थानांतील जितके म्हणून विद्यार्थी परदेशीं गेले आहेत तितके सर्व प्रायः स्वेच्छेनें गेले आहेत. म्हणून सुखा-सुखी केलेल्या या सहेतुक देशत्यागामुळें त्यांना दुःख न होतां आनंद व उत्साहच वाटत असला पाहिजे, व तो राष्ट्रकार्यास फार फायदेशीरहि आहे. वडिलार्जित घरांत राहून तें राखणें यांत भूषण नाहीं असें नाहीं; पण आपल्या हिंमतीवर व पराक्रमावर एखादें नवीन घर संपादन करणें हें त्या-हूनहि अधिक भूषणास्पद आहे. देशांतल्या देशांत राहून काय होईल ती विद्या करावी अशा विचारानें चालणाऱ्या मनुष्याचें व्यक्तिशः रीतीप्रमाणें हित होईलच. पण परदेशीं जाऊन विद्यासंपादन करणारा मनुष्य स्वदेशांत न मिळणारी विद्या स्वतःपुरती तर मिळवितोच; पण दुसऱ्या विद्यार्थी-बांधवांसहि या बाबतींत तो मार्गदर्शक होतो. शिक्षणाच्या जाति व पद्धति अनेक आहेत; पण कोणत्याहि एका देशांत बहुधा एकाच जातीचें व पद्धतीचें शिक्षण मिळूं शकतें, त्यांत विविधता येऊं शकत नाहीं. हा हिंदु-स्थानचा नव्हे तर सर्वच देशांचा अनुभव आहे. हिंदुस्थानांत उत्तम सरकारी नोकर निपजतो; इंग्लंडांत शास्त्रीय शिक्षणापेक्षां भाषाविषय अधिक चांगले शिकविले जातात; उत्तम शास्त्रीय शिक्षण देण्याचा जर्मनीचा हातखंडा आहे; व व्यावहारिक धंदेशिक्षण पाहिजे असेल तर कोणासहि अमेरिकेंतच गेलें पाहिजे, हें आज ठरल्यासारखेंच आहे. म्हणून, विद्यार्थ्यांची बुद्धिमत्ता कमीजास्त कशीहि असो, त्याला ज्या प्रकारचें शिक्षण हवें असेल त्यास अनुसरून त्यानें देशाची निवड केली पाहिजे. यामुळें एका देशांतील विद्यार्थी दुसऱ्या देशांत शिक्षण मिळविण्याकरितां जातात असा प्रकार हरहमेषा दिसून येतो. इंग्लंडांत एवढाल्या युनिव्हर्सिट्या आहेत तरी कांहीं थोडे इंग्रज विद्यार्थी जर्मनींत, व उलट कांहीं जर्मन विद्यार्थी इंग्लंडांत

शिकण्यास दरवर्षी जातात. जपानचे विद्यार्थी इंग्लंड, जर्मनी व अमेरिका या तीनहि ठिकाणीं जातात. चिनी विद्यार्थी अमेरिका व जपान येथें जातात. रशियन विद्यार्थी स्वित्सर्लंडमध्यें जातात. हिंदुस्थानांत मात्र कोणत्याच देशाचे विद्यार्थी येत नाहींत. कारण त्यांना देण्यासारखें हिंदुस्थानच्या शिक्षणपद्धतींत विशेष असें कांहींच नाहीं. उलटपक्षीं, हिंदुस्थानांतील विद्यार्थ्यांना इंग्लंड, जर्मनी, जपान व अमेरिका यांपैकीं साधेल त्या देशांत जाऊन शिकण्यासारखें पुष्कळच आहे.

पण केवळ शिक्षण मिळविण्यापेक्षांहि दुसऱ्या अनेक गोष्टी आज हिंदुस्थानांतील विद्यार्थ्यांना परदेशीं जाऊन शिकावयाच्या आहेत; व इकडील शिक्षणाची जाति व पद्धति ही उद्यां बदलली तरीहि त्या अनिर्वाह्यच ठरतील. स्वावलंबन ही अशांपैकीं एक गोष्ट होय. शिक्षण हें साध्य असून स्वावलंबन हें एक निवळ साधन आहे. तथापि, स्वावलंबन हेंच स्वतः साध्य होण्या इतकें महत्त्वाचें असल्यामुळें तें शिकण्याकरितांदेखील परदेशीं जाणें जरूर पडलें तर जावें. देशांतल्या देशांतले मार्ग इतके ठराविक व मळलेले असतात कीं, सर्व जन्म अशा आयत्या मार्गावरून फिरण्यांत गेल्यामुळें एक टीचभरहि नवा मार्ग शोधून काढण्याची पात्रता मनुष्याच्या अंगांतून नाहींशी होते. छातीइतक्या पाण्यांत मनुष्यानें जन्म घालविला तरी त्याला पोहतां म्हणून कधीं यावयाचें नाहीं; पण पुरुषभरापेक्षां अधिक पाण्यांत जाण्याचा प्रसंग जरी फक्त दोन चार वेळां त्याला आला तरी तेवढ्यांत तो पोहायला शिकेल. परदेशरूप खोल पाण्यांत शिरणारास दगा होण्याची भीति नसते असें नाहीं; कारण पोहावयाचा प्रयत्न करताना पाण्याचा जोर न आंवरून कोणी बुडूनहि जावयाचे ! पण दग्यांतून बांचून जो पोहावयास शिकेल त्याचा पाण्यांत डुंबण्याचा आनंद, वाटेल तेव्हां पाय टेंकतां येतील अशा उथळ पाण्यांत डुंबणाराच्या आनंदापेक्षां खचित अधिक असेल यांत शंका नाहीं. ‘ केल्यानें देशाटन...मनुजा चातुर्य येतसे फार ’ हें जर खरें असेल तर परदेशीं जाऊन विद्या शिकणाराला विद्या यावयाची ती येऊन शिवाय चातुर्यहि येईल हें उघड आहे. निवळ पुस्तकी विद्येपेक्षां व्यावहारिक चातुर्य किंवा शहाणपण यांचा उपयोग व्यक्तीला काय किंवा राष्ट्राला काय पुष्कळ अधिक आहे हें जर्व जग कबूल करतें. हिंदु-

स्थानांतून परदेशीं विद्या शिकण्याला जाणाऱ्या विद्यार्थ्यांची परंपरा फार तर चाळीस वर्षांच्या अलीकडची आहे. या बाबतींत पहिला मान इंग्लंडला मिळाला, व हिंदुस्थानांतील शिक्षणपद्धतीला अनुसरून वरिष्ठ सरकारी नोकऱ्या मिळण्याला लागणारें जें शिक्षण इकडे मिळण्यासारखें नव्हतें तें मिळविण्याकरितांच या पिढीचे पुढारी विलायतेस गेले. त्यांपैकीं सत्येंद्रनाथ टागोर, सुरेंद्रनाथ बॅनर्जी वगैरे लोक अद्यापि विद्यमान आहेत; म्हणजे ही परंपरा इतकी नूतन आहे. सिव्हिल सर्व्हिसपेक्षां बॅरिस्टर होण्याकरितां बरेच हिंदी विद्यार्थी इंग्लंडला जाऊं लागले; व तो ओघ पुढें इतका वाढला कीं, कोणत्या का कारणाकरितां होईना, पण खुद्द सरकारास इकडे लक्ष घालून तो थांबवावा लागला. विलायतेहून बॅरिस्टर होऊन आलेल्या हिंदी लोकांत नामांकित असे कांहीं थोडे निघाले; तरी पण प्रांतानिहायच्या कायद्याच्या परीक्षा दिलेल्यांतच अधिक नामांकित लोक निघाले. यामुळें बॅरिस्टरीच्या परीक्षेला गेलेल्या विद्यार्थ्यांनीं राष्ट्रीयदृष्ट्या कांहीं विशेष संपादन केलें असें म्हणतां येत नाहीं. उलट अशांतल्या बऱ्याच लोकांनीं घरच्या पैशाचा चुराडा केला एवढेंच नव्हे, तर देशी परंपरेला विसरून किंवा पायाखालीं तुडवून, बॅरिस्टर म्हणजे इस्तरीच्या कपड्यांनीं ताठलेला पण मनानें लिबलिबीत, तोंडानें मृदु पण स्वभावानें उद्दाम, वेषानें सुशिक्षित पण करणीनें अडाणी व राष्ट्रीयत्वाच्या बुद्धीला सर्वस्वीं आंचवलेला अजागळ प्राणी, अशा वर्णनास कित्येकांनीं आपल्या वर्गाला पात्र केलें. आजकाल बॅरिस्टर या नांवाला निःसंशय भूषणास्पद अर्थ आहे असें म्हणण्याचें धाडस कोणीहि करणार नाहीं. असो; खरें उपयुक्त असें शिक्षण मिळविण्याकरितां इंग्लंडला जाणाऱ्या विद्यार्थ्यांची परंपरा बॅरिस्टरांच्या अलीकडची आहे, आणि जपान व अमेरिका इकडे जाणाऱ्या विद्यार्थ्यांची तर त्याहून अलीकडची. पण एका बाजूनें इंग्लंडला जाणाऱ्या विद्यार्थ्यांच्या संख्येला आळा पडूं लागून जपान व अमेरिका इकडे जाणाऱ्या विद्यार्थ्यांची संख्या हळुहळू वाढत आहे.

परदेशीं जाणाऱ्या विद्यार्थ्यांपैकीं तिकडे कायमचे रहिवाशी होऊन राहणारे फार थोडे. बहुतेक थोड्याबहुत मुदतीनंतर स्वदेशीं परत येतात, व जे थोडे तिकडे कायमचे रहातात त्यांनाहि म्हणजे मातृभूमीचें विस्मरण

पडतें असें नाहीं. आयरिश इतिहास वाचणारांच्या हें ध्यानांत असेलच कीं, केवळ विद्यार्थी म्हणून नव्हे तर कायमचा देशत्याग करून अमेरिकेंत जाऊन राहिलेल्या आयरिश लोकांच्या तिकडे पिढ्यानुपिढ्या झाल्या तरी मातृभूमीला ते कधींहि विसरले नाहींत. किंबहुना 'होमरूल' मिळविण्याच्या ज्या खटपटी आयरिश लोकांनीं गेल्या चाळीस वर्षांत केल्या, त्यांना सहानुभूति व रोकड पैशाची मदत अमेरिकन आयरिश लोकांकडून भरपूर झाली. परदेशांत राहून मातृभूमीचें नित्य स्मरण करणाऱ्या या आयरिश लोकांच्या मदतीशिवाय—विशेषतः त्यांनीं परदेशांत जगभर बनविलेल्या अनुकूल लोकमताशिवाय—'होमरूल'ची चळवळ या स्वरूपाला आली नसती असेंहि कित्येकांचें म्हणणें आहे. हिंदुस्थान सोडून परदेशीं जाऊन रहाणें ही गोष्ट सर्वस्वी अप्रिय; तथापि विद्यार्जनाकरितां म्हणा, उद्योगधंद्याकरितां म्हणा, फार काय पण कोणत्याहि कारणानें हिंदुस्थानांतील स्वस्थितीस कंटाळून व वैतागून का म्हणाना, परदेशीं जाऊन राहिलेल्या हिंदी लोकांच्या हातून या देशास पुष्कळ मदत होण्याचा संभव आहे.

हिंदुस्थानांतून आजवर किती विद्यार्थी परदेशीं गेले किंवा आजमितीस किती विद्यार्थी परदेशांत आहेत, याची नोंद कोठें नसल्यामुळें नक्की आंकडे सांगतां येणें शक्य नाहीं. पण विलायतेंत सुमारें सहाशें, जपानांत दहापांच व अमेरिकेंत सुमारें दीडशें असावे असा अदमास आहे. इंग्लंडांतील विद्यार्थ्यांना मदत व्हावी किंवा त्यांचेवर देखरेख रहावी या हेतूनें सरकारतर्फे काय व्यवस्था झाली आणि ती तेथील विद्यार्थ्यांना कितपत आवडली अगर न आवडली हें केसरीच्या वाचकांना माहीत आहेच. पण सरकारी मदत असो अगर नसो, कोणत्याहि परदेशांत गेलेल्या विद्यार्थ्यांना स्वावलंबन सुचतें व हिंदुस्तानांत असतां त्यांना एकमेकांपासून जितकी मदत कधीं झाली नसती तितकी परदेशांत ते एकमेकांस करतात, ही आनंदाची गोष्ट होय. हल्लीं अमेरिकेंत असणाऱ्या हिंदी विद्यार्थ्यांच्या संघामार्फत जें एक 'बुलेटिन' ऊर्फ माहितीपत्रक आम्हांकडे आलें आहे, त्यावरून असें दिसतें कीं, हे विद्यार्थी उद्योगी व उत्साही असे असून संघशक्तीनें त्यांना परस्परांचा फायदा करण्याची इच्छा आहे व हिंदुस्थानांतून आणखी विद्यार्थी अमेरिकेंत यावे असेंहि त्यांना वाटतें. सदर माहितीपत्रकांत हिंदुस्थान—असोसिएशनचे

सेक्रेटरी सुरेंद्र मोहन बोस हे लिहितातः—"या दूरच्या देशांत दिवसें-दिवस अधिकाधिक शिरणाऱ्या हिंदी विद्यार्थ्यांच्या सैन्याच्या बिनींचे शिपाई आम्ही आहोंत. या नात्यानें आमच्यावर जबाबदारीचें फार मोठें ओझें आहे. आम्ही अमेरिकेंत आहों तोंपर्यंत आमचा उद्योग, आमची विद्यार्जनपात्रता, आमचें आचरण व आमची नियत या सर्व बाजूंनीं आमच्या मातृभूमीस शोभेल असेंच आम्हांस वागलें पाहिजे व पुढें आम्ही हिंदुस्थानास परत जाऊं तेव्हां अमेरिकेसारख्या नामांकित देशांत मिळविलेल्या शिक्षणाचें आम्ही चीज करून दाखविलें पाहिजे. यापैकीं पहिलें जोखमीचें काम आम्ही यथाशक्ति येथें करीत आहों, व त्यांत आम्हांस यशहि आलें आहे असें वाटतें. अमेरिकेसारख्या देशांत येऊन स्वावलंबनानें म्हणजे स्वतःच्या उद्योगानें पोटास मिळवून शिक्षण संपादणें हें काम बरेंच अवघड आहे; तथापि, तें आमच्यापैकीं पुष्कळांनीं पार पाडलें आहे. आम्ही हिंदुस्थानांत असतों तर बहुधा मध्यम प्रतीच्या विद्यार्थ्यांतच मोडलों असतों. पण येथील बऱ्या विद्यार्थ्यांच्या बरोबरीनें आम्हांस आपला दर्जा राखतां आला आहे. इकडे येणारे विद्यार्थी सर्वच चांगले निभावतात असें नाहीं; व कांहींच्या अपयशामुळें इतरांस कित्येक वेळां मान खालीं घालावी लागली आहे. तसेंच इकडून परत गेलेल्या कांहीं विद्यार्थ्यांनीं आपल्या हातून घडलेल्या व न घडलेल्याहि किरकोळ व क्षुद्र गोष्टींची बडेजाव केली व गवगवा माजविला; आणि नसलेल्या पदव्या नांवापुढें लावणें किंवा केवळ पैसे भरून मिळणाऱ्या दिखाऊ पदव्या पैसे भरून विकत घेणें, अशा हीन वृत्तीच्या गोष्टी करणारे विद्यार्थीहि कांहीं निघाले; परंतु अशीं उदाहरणें थोडीं. आणि या वृत्तीस आळा बसावा याकरितां हिंदुस्थान असोसिएशनचे कोण सभासद कोठें आहेत, काय शिकतात, काय करितात इत्यादि विश्वसनीय माहिती वेळोवेळीं प्रसिद्ध करून उपरिनिर्दिष्ट वृत्तीला आळा घालण्याचा आमच्या असोसिएशनचा हेतु आहे."

हिंदुस्थानांतून अमेरिकेस जाणाऱ्या विद्यार्थ्यांना उपयोगी पडेल व त्यांच्यामध्यें उत्साह उत्पन्न करील अशीहि कांहीं माहिती सदर माहिती-पत्रांत दिली आहे. तिजवरून असें दिसतें कीं, जगांत कोठेंहि मिळणाऱ्या शिक्षणाच्या तोडीचें शिक्षण देणाऱ्या अशा सुमारें वीस संस्था अमेरिकेंत

आहेत. विद्येच्या अमुक एका विषयांत अमेरिकेंत शिक्षण मिळूं शकत नाहीं असें नाहीं. शिवाय उपपत्तीइतकाच व्यवहार व शास्त्राच्या बरोबरीनें कला शिकविण्यांत अमेरिका इतर देशांच्या पुढें आहे. भौतिक शास्त्रें व इंजिनियरिंग या विषयांतील व्यावहारिक शिक्षण थोड्या खर्चांत मिळविण्याला हिंदी विद्यार्थ्यांना अमेरिकेसारखी दुसरी सोय नाहीं. हेंच शिक्षण मिळविण्यास त्यांना युरोपांत फार अधिक खर्च येतो. अमेरिकेंतील रसायनशाला समृद्ध असतात, व हिंदुस्थानांत भौतिकशास्त्रांतील पदव्या मिळविलेल्या लोकांना या रसायनशालांचा फार उपयोग होण्यासारखा आहे. शिवाय प्रयोगशालांतील असिस्टंट कारखान्यांतील इंजिनियर, रसायनशालांतील मदतनीस या नात्यानें हिंदी विद्यार्थ्यांना बराचसा पगार व त्याहून मौल्यवान् असा अनुभव मिळण्यासारखा आहे. प्रोफेसरीचीहि जागा कोठें मिळणार नाहीं असें नाहीं. मात्र अमेरिकेंत जाणाऱ्या विद्यार्थ्यांचें बरेंचसें शिक्षण हिंदुस्थानांत पुरें झालेलें असावें. एरवींच्या वेळीं पोटाला मिळविण्याचा धंदा करावा व कॉलेजच्या वेळीं कॉलेजांत जाऊन शिकावें ही जोड शक्य आहे. या द्वंद्वांत कित्येक चिरडूनहि जातात; पण जे विजयी होतात त्यांचा आनंद त्यांनाच विचारावा. केवळ हिंदी विद्यार्थ्यांकरितांच नव्हे, पण सामान्यरीत्या स्वतःचें पोट भरून किती विद्यार्थी अमेरिकन युनिव्हर्सिट्यांतून शिक्षण मिळवूं शकतात याची माहिती तिकडील युनिव्हर्सिट्यांत ठेविलेली असते. तीवरून अशा लोकांची संख्या बरीच असावी असें दिसतें. हार्वर्ड–युनिव्हर्सिटी ही साधारणपणें श्रीमंत विद्यार्थ्यांच्या लागी आहे. तथापि तिचे अध्यक्ष डॉ. लॉरेन्स लोवेल यांच्या मतें तेथील एकतृतीयांशपासून एक द्वितीयांशपर्यंत विद्यार्थी सर्वस्वीं किंवा अंशतः स्वतःच्या पोटाला मिळविणारे आहे. स्टॅनफर्ड युनिव्हर्सिटीमधील बरेच विद्यार्थी स्वावलंबी आहेत. येल युनिव्हर्सिटीतील विद्यार्थ्यांनीं स्वतः शिकत असतां सुमारें १ लक्ष ९० हजार डॉलर उद्योगधंदा करून मिळविले, म्हणजे सालिना दरमाणशी ५०० डॉलर याप्रमाणें ३८० विद्यार्थ्यांचा सर्व खर्च निघण्याइतके पैसे मिळविले. कोलंबिया व हार्वर्ड या युनिव्हर्सिट्यांचे हे आंकडे १ लक्ष ६६ हजार डॉलर व १ लक्ष ३८ हजार डॉलर असे आहेत. कॉर्नेल युनिव्हर्सिटींतील १०६९ स्वावलंबी विद्यार्थ्यांनीं मिळून

१ लक्ष ८४ हजार डॉलर मिळविले. प्रत्येकाला सरासरीनें सालिना १७३ डॉलर मिळवितां आले व आपल्या खर्चापैकीं एकतृतीयांश खर्च परस्पर काढतां आला. बऱ्याच विद्यार्थ्यांचा जेवणखाण व घरभाडें यांचा खर्च निघाला व १२४ विद्यार्थ्यांना तर याहून अधिक मिळालें. विद्यार्थ्यांना काम पुष्कळ तऱ्हेचें मिळूं शकतें, पण पडेल तें काम आंग मोडून करण्याची तयारी पाहिजे. अगदीं साधें व कोणालाहि करितां येण्याजोगें काम म्हटलें म्हणजे खानावळींत तीन तास काम करून तीन वेळां फुकट जेवावें. एखाद्या गृहस्थाच्या घरीं शेकशेगडीची व्यवस्था ठेवावयाची व त्याबद्दल घरच्या एका खोलींत फुकट राहून सामानसुमान वापरावयाचें. आतां कोणापाशीं घरचे पैसे असले तर तें बरेंच; पण खरें म्हटलें तर घरचे अगदीं भरपूर पैसे नसले तर अधिक बरें. कारण त्यायोगानें विद्यार्थी चैनी व आयदी बनण्याचा संभव असतो. अगदीं जीव जाईल व रक्तशोष होईल इतकी आपत्ति नसावी. कारण अशा अपत्तीच्या अग्नींत गुणी व्यक्तिहि पिचून जातात. पण पैशाची थोडीशी तरी वाण विद्यार्थ्याला असावी, म्हणजे जगाचा थोडासा अनुभव मिळण्यास त्यांना मदत होते. एका विद्यार्थ्यानें धर्मोपदेशक, कारकून, लायब्रेरियन, स्टेजमास्तर, कोचमन व खिडक्या रंगविणार इतकीं निरनिराळीं कामें केलीं ! एका विद्यार्थ्याजवळ पश्चिम अमेरिकेहून पूर्व अमेरिकेला जावयास पैसे नव्हते; पण एका प्रेताची रवानगी त्याच्या मुक्कामापर्यंत व्हावयाची होती, व तें संभाळून न्यावयाचें काम करण्यामुळें त्याला आपला प्रवास बिनखर्चीकरतां आला ! अर्थात् स्वावलंबन हें कांहीं अंशीं एकप्रकारचें दिव्य आहे. त्यांतून पार पडण्याला अंगीं विशेष गुण लागतात हें खरें; तरी पण साहस व आपत्ति यांच्या योगानें जगाचा जो अनुभव मिळतो तो सुखावलेल्या लोकांना मिळत नाहीं हें कांहीं खोटें नाहीं. स्वावलंबनाचें हें वर्णन करण्याचें कारण इतकेंच कीं, ज्याला अनुकूलता आहे अशांनीं तर अमेरिकेस जावेंच; पण ज्यांना तितकी अनुकूलता नाहीं, फक्त प्रवासखर्च व थोडीशी पोटगी इतकीच ज्यांच्याजवळ सामुग्री आहे, अशांनींहि जाण्याचा विचार केल्यास त्यांत कांहीं फारसें वावगें होणार नाहीं.

असो; अमेरिकेंतील हिंदी विद्यार्थीसंघाचा अगदीं उघडपणें व केवळ

शिक्षण मिळविण्याच हेतु आहे, आणि अमेरिकन प्रेसिडेंट डॉ० वुइल्सन यांनीं पाठविलेल्या सहानुभूतीच्या स्वदस्तूरच्या पत्रावरून पाहतां अमेरिकेंतील हिंदी असोसिएशनला म्हणजे हिंदी विद्यार्थीसंघाला राजमान्यतेचेंहि अधिष्ठान आहे. हे विद्यार्थी मातृभूमीला स्मरतात, ही गोष्ट प्रस्तुतच्या माहितीपत्रकावरून उघड होते; पण आईवरील मुलांच्या प्रेमापेक्षां मुलांवरील—विशेषतः परदेशांत गेलेल्या मुलांवरील—आईचें प्रेम अधिक असावें. अर्थात् या हिंदुस्थान-असोसिएशनला हिंदुस्थानांतील लोकांनीं शक्य तितकी मदत केली पाहिजे. हिंदुस्थानांतील हिंदी विद्यार्थी व अमेरिकेंतील हिंदी विद्यार्थी यांपैकीं अधिक सरस व महत्त्वाचा कोण हें निराळें सांगावयास नकोच.

---

## ३२. मोडी कीं बाळबोध ?

( केसरी, तारीख १४ एप्रिल १९१४)

सदरहू वादग्रस्त प्रश्नासंबंधानें लोकमत व्यक्त करण्याकरितां पूर्वीं कायदेकौन्सिलच्या बैठकींत ना० उपासनी यांनीं एक ठराव पुढें आणला होता. परंतु वेळाच्या अभावामुळें आणि कित्येक प्रमुख लोकनियुक्त प्रतिनिधींच्या उतावळेपणामुळें ना० उपासनी यांस आपला हा ठराव परत घ्यावा लागला. कौन्सिलच्या मार्च महिन्यांतील सभेपुढें तरी तो ठराव फिरून खास येईल अशी आम्हांस आशा होती, पण तो योगहि घडून आला नाहीं. या विषयासंबंधानें आम्हीं पूर्वी अनेक वेळां चर्चा केलेलीच आहे. तथापि पुढें मागें या प्रश्नावर कौन्सिलांत होणाऱ्या वादविवादाचें स्वरूप आगाऊ वाचकांच्या लक्षांत थोडेंबहुत आलेलें असावें, याकरितां वादांतील साधकबाधक गोष्टी संक्षेपानें आज त्यांच्यापुढें मांडण्याचा आम्हीं विचार केला आहे.

या वादांतील सर्वांत आधीं सुचणारा मुद्दा असा आहे कीं, सरकार-दरबारीं आजवर मोडी लिपीचा प्रसार सर्व मराठी जिल्ह्यांतून असतां तिच्या ऐवजीं बाळबोध लिपी चालू करण्याची नवीन कल्पना निघण्याचें कारण काय ? याचें उत्तर इतकेंच कीं, कित्येक आळशी सिव्हिलियन

लोकांना मोडी लिपी वाचण्यास शिकण्याचा कंटाळा असून, केवळ आपल्या सोयीकरितां लिपी बदलावी असा त्यांचा आग्रह आहे; याहून दुसरें तिसरें कारण कांहीं नाहीं. इंग्रजी राज्य सुरू होण्यापूर्वी सरकारदरबारीं मोडी लिपीच सर्रास चालत असे यांत आश्चर्य नाहींच. पण इंग्रजी राज्य सुरू झाल्यानंतरहि, गेल्या तीन चार वर्षांपूर्वीपावेतों, मोडी लिपीविरुद्ध युरोपियन अधिकाऱ्यांनीं फारशी तक्रार केल्याचें कोठें नमूद नाहीं. असें असतां आजच मोडी लिपीची गैरसोय कित्येक युरोपियन अधिकाऱ्यांना भासूं लागावी, एवढेंच नव्हे तर केवळ त्यांच्या आग्रहामुळें मोडी लिपीचें अजीबात उच्चाटन होण्याचाच प्रसंग यावा, हें हल्लींच्या विपरीत काळाचेंच एक लक्षण म्हटलें पाहिजे ! सरकारदरबारीं मोडीस मज्जाव झाला म्हणजे खासगी रीतीनेंहि कोणीं मोडी लिहूं नये असा प्रतिबंध होत नाहीं हें आम्ही जाणतों; परंतु मोडी लिपीचा राजाश्रय मुळीं जावाच कां ? असला प्रश्न विचारण्याचा महाराष्ट्रीयांना हक्क आहे.

मोडी अक्षराचें वळण अलीकडे पूर्वीसारखें राहिलें नाहीं, व पेशवाईतील मोडी लिपीपेक्षां हल्लींची मोडी लिपी दिसण्यांत कमी ढबदार दिसते या गोष्टी कदाचित् खऱ्या असतील. पण मोडी लिपी कितीहि वाईट असली तरी ती वाचतांच येत नाहीं इतकी वाईट कोठेंहि नसते. प्राथमिक शाळांतून लहानपणीं मुलांकडून मोडी हस्तलिखितें जीं काय वाचण्यांत येत असतील तितकींच हें खरें; परंतु मोडी लिपी ही घरचीच पडल्यामुळें जन्मभर प्रत्येकाला तिचा थोडा ना थोडा तरी परिचय राहतोच. यामुळें कोणाहि नेटिव्ह अधिकाऱ्यास मोडींत लिहिलेलें प्रकरण वाचावयास अडचण पडली असें कधीं होत नाहीं. युरोपियन अधिकाऱ्यांना मोडी वाचण्यास थोडें कठीण जात असेल ही गोष्ट खरी; पण बाळबोध झालें तरी तें कांहीं त्यांच्या घरचें नव्हे ! अर्थात् त्यांना जसें बाळबोध शिकावयाचें तसेंच मोडीहि शिकावयाचेंच मग तें त्यांनीं नीट शिकून कां घेऊं नये ? आळस कां करावा ? सिव्हिलियन लोक हिंदुस्थानांतील लोकांवर राज्य करावयास येतात; व राज्य करून त्यांत यश मिळविणें हें राज्यकर्त्यांना प्रजेचें हृद्गत कळण्यावर अवलंबून असतें. अर्थात् प्रजेचें हृद्गत आपलेसें करण्याची ज्यांची महत्त्वाकांक्षा असावी, किंवा निदान तें ज्यांचें कर्तव्य

असतें, त्यांना प्रजेची भाषा व लिपी यांचा पुरता परिचय करून घेण्याचा इतका जाच वाटावा हें खास शोभत नाहीं. अशा प्रश्नाकडे केवळ अधिकाऱ्यांच्या सोईच्या दृष्टीनेंच पहावयाचें, तर मग मोडी तर राहोच, पण बाळबोध तरी कां चालूं द्यावें ? सर्व कामकाज इंग्रजींतच कां चालवूं नये ? हायकोर्ट किंवा प्रिव्ही कौन्सिल हें जसें बिनछापलेला कागद सहसा हातांत धरीत नाहीं, त्याचप्रमाणें युरोपियन अधिकाऱ्यापुढें जाणारा कागद इंग्रजींतच असला पाहिजे असें सरकार ठरवील तर त्यांना तसेंहि करतां येईल; कारण त्यांजवळ लोकांचा पैसा मुबलक आहे.

पण सर्वोहून मुद्द्याची गोष्ट आहे ती पुढेंच आहे; व ती अशी कीं, युरोपियन अधिकाऱ्यांच्या सोयीकरितां मोडी बुडवून आज बाळबोध चालूं करावयाचें; पण बाळबोध चालूं झालें म्हणून तरी हे अधिकारी कामकाजाचे कागदपत्र स्वतःच्या डोळ्यांनीं कितीसे वाचून पहाणार हें दिसतेंच आहे ! बहुधा सर्व काम चिटणीस, शिरस्तेदार, हेड क्लार्क हेच करतात. या त्रिवर्गांच्यावर साहेब लोकांचा असणारा विश्वास किंवा त्या अधिकाऱ्यांचें स्वतःचें इमान हाच सर्व कागदी राज्यकारभाराचा आधारस्तंभ म्हणण्यास हरकत नाहीं. बरें, या नेटिव्ह अधिकाऱ्यांचा युरोपियन अधिकाऱ्यांस एखादे वेळीं संशय आलाच, तर एकाचें काम दुसऱ्याकडून तात्पुरतें करून घेतां येण्यासारखें असतें व प्रसंगविशेषीं तसें करून घेतलें जातेंहि. स्वतः साहेबबहादूर अस्सल मराठी कागद आपल्या डोळ्यांनीं वाचणार व स्वारीच्या या वाचनावर न्यायमनसुब्याचें किंवा राज्यकारभाराच्या धोरणाचें पारडें फिरणार, असा प्रसंग म्हणजे तो एक कपिलाषष्ठीचा योगच म्हणावयाचा ! पण दुर्दैव हें कीं, असल्या या कपिलाषष्ठीच्या योगाकरितां महाराष्ट्रांतली जुनीपुराणी आणि रोजच्या व्यवहारांतली लिपी खुशाल बुडवावी असा सल्ला देणारे अधिकारी सरकारास मिळतात व त्यांचा सल्ला ऐकण्याची त्यांनाहि बुद्धि होते. एकाच्या सोईकरितां हजारों लाखों लोकांची गैरसोय करणें यांत कांहीं विशेष वाईटपणा आहे असें अधिकाऱ्यांना वाटूंहि नये, याहून त्यांच्या मनस्वितेचा आणखी पुरावा तो कोणता हवा ? कित्येक युरोपियन अधिकाऱ्यांना प्रजेशीं वागतांना आत्मौपम्य हें कशाशीं खातात हें देखील माहित नसावेंसें वाटतें, नाहीं तर आम्हीं त्यांस असा

उघड उघड सवाल विचारला असता कीं, " महाराज सत्तेची गोष्ट सोडून द्या. पण एखाददुसऱ्या, कारकुनाचें मोडी अक्षर वाईट असतें याकरितां मोडी जर रद्द करावयाची तर कित्येक साहेब लोक इंग्रजी अक्षर फार वाईट लिहितात, एवढ्याकरितां त्यांना त्यांची प्रचलित लिपी टाकून देऊन कॉपीबॉडांतील अक्षराप्रमाणें किंवा रोमन लिपीप्रमाणें इंग्रजी वर्ण लिहावयास सांगितलें तर तें कसें काय आवडेल ? " पण असा प्रश्न विचारून तो सक्तीनें त्यांजवर अमलांत आणण्याची सत्ता जर आमच्यापाशीं नाहीं, तर तो विचारण्यापासून फायदा काय हें आम्हांस दिसतेंच आहे.

सन १९०८ सालीं मोडी लिपीचा प्रश्न मुंबईसरकारपुढें आला होता; पण तेव्हां तो मोडीचें उच्चाटन करून तिच्या जागीं बाळबोधीची स्थापना करण्याविषयीं नव्हता; तर मोडी लिपीच पण ती अधिक सुबोध व सुवाच्य कशी करितां येईल याविषयीं होता. म्हणजे कागदोपत्रीं मोडी आहे तशी ठेवावयाची हें सरकारनें एखाद्या गृहीतकृत्याप्रमाणें मान्य केलेंच होतें. मात्र कित्येकांनीं सुचविल्याप्रमाणें, मोडी लिहितांना विराम-चिन्हें द्यावीं कीं नाहीं, शब्द तोडून लिहावे कीं नाहीं, आणि ऱ्हस्व-दीर्घाचा भेद हल्लीं जो मोडींत नाहीं तो कित्येक नवीन चिन्हांच्या योगानें अमलांत आणावा कीं काय ? इतक्यापुरताच त्या वेळीं प्रश्न होता. ही सूचना हल्लीं न्यायखात्यांत असलेले एक मुनसफ रा० अत्रे, बी. ए. एल्‌एल्. बी. यांनीं त्या वेळचे शाळाखात्याचे अधिकारी मि. सेल्बी यांच्यामार्फत सरकारापुढें मांडली होती; आणि तिजवरून निघालेल्या सरकारी ठरावांत सामील असलेल्या कागदपत्रांवरून कोणालाहि असेंच दिसून येईल कीं, मोडी नाहींशी करून तिच्या जागीं बाळबोध आणणें ही विलक्षण कल्पना फारच थोडया युरोपियन लोकांच्याहि डोक्यांत तेव्हां आलेली होती. या कल्पनेचा उगम बराचसा पुण्याचे माजी व साताऱ्याचे वर्तमान जज्ज मि० किंकेड यांजपासून झालेला आहे. पण मि० किंकेडसाहेबां-च्या योग्यतेच्या किंवा त्यांच्याहून अधिक योग्यतेच्या युरोपियन व नेटिव्ह अधिकाऱ्यांचे अभिप्राय जे सदर कागदपत्रांत आहेत त्यांवरून सरकारदरबारीं मोडी बंद पडून बाळबोध सुरू व्हावें असें त्यांपैकीं कोणीहि आपलें मत दिलेलें दिसत नाहीं. मि० सेल्बी यांनीं रा० अत्रे यांचा सूचना–अर्ज मुंबईसरकारकडे

पाठविला हें वर दर्शविलेंच आहे; व तो पाठवितांना मि॰ सेल्बी साहेबांनीं असें मत दिलें आहे कीं, " मोडी लिपी ही सरकारी पत्रव्यवहार वगैरे कामकाजाला विशेष सोयीची आहे, इतकेंच नव्हे तर रा॰ अत्रे यांनीं सुचविल्याप्रमाणें ऱ्हस्व-दीर्घांच्या खुणा देत बसलें तर जलद लिहितां येणें हा जो त्या लिपीचा सर्वमान्य गुण त्यास कमीपणा येईल. हल्लींची मोडी लिपी वाचतां येण्यास जर कोणास क्वचित् पंचाईत पडत असेल तर एखाद्या लेखकाचें हस्ताक्षरच वाईट असतें म्हणून ! पण लिहिणारा अडाणी किंवा वाईट म्हणून लिपी दुर्बोध होणें हा प्रकार खुद्द इंग्रजी लिपींतहि दृष्टीस पडतोच. तात्पर्य, दोष असेल तर तो एखाद्या लेखकाचा, लिपीचा नव्हे. " मि॰ सेल्बी यांचा युक्तिवाद बरोबर व त्यांचा दाखलाहि समर्पक आहे. इंग्रजी लिपी-देखील सुबोध व दुर्बोध अशा दोन्ही प्रकारांनीं लिहितां येते. उदाहरणार्थ, क्रॉफर्ड, आलिव्हंट, किंकेड, हिल्ल वगैरे गृहस्थांचें उत्कृष्ट हस्ताक्षर पाहिलें म्हणजे मोत्यांच्या सरांची आठवण व्हावी, आणि सेल्बी, कर्टिस, वगैरे गृहस्थांचें हस्ताक्षर पाहून धुळींत कोंबडीं नाचल्यासारखीं वाटावीं हें जें जमीन-अस्मानाचें अंतर त्याचें कारण केवळ व्यक्तिदोष, लिपीचा दोष नव्हे. पण अक्षर वाईट म्हणून मि॰ सेल्बीसाहेबांस 'तुमचें हस्ताक्षर आम्ही हातांत धरीत नाहीं' असें कोणी कधीं बोलला नाहीं, किंवा 'तुम्हाला अधिक चांगलें लिहितां येत नसेल तर हातचें लिहिणें सोडून द्या व सर्व काम टाइपरायटरवर करा' असेंहि कर्टिस साहेबास कोणी सांगणार नाहीं. असो.

रा॰ अत्रे यांची सूचना मि॰ किंकेडसाहेबांप्रमाणें मि॰ जॅक्सनसाहेबां-कडेहि पाठविण्यांत आली होती; पण त्यांनींहि मोडी खोडून टाकावी असें मत दिलें नाहीं. उलट त्यांनीं असें मत दिलें कीं, " शाळांतून हल्लीं मोडी जितकें शिकवितात त्याहून अधिक शिकविलें जावें. बाळबोध फार तर अशा रीतीनें थोडें कमी होईल, पण तें निर्मूल करण्याचें कारण नाहीं ! " अर्थात् मुख्य भर मोडीवरच राहील येवढेंच नव्हे तर ऱ्हस्व दीर्घ वगैरेंच्या खुणा नसल्या तरी मोडी समजण्यास पंचाईत पडणार नाहीं. रा॰ अत्रे यांची सूचना सुमारें दोन सवादोनशें गृहस्थांकडे पाठविण्यांत आली होती. त्यांपैकीं सुमारें सव्वाशें लोकांनीं त्यांना लेखी अभिप्राय दिले व या सव्वाशें-मध्यें कित्येक युरोपियन गृहस्थहि होते. पण नेटिव्ह काय व युरोपियन

य, त्यांच्यांत मतभेद झाला तो, अत्रे यांच्या म्हणण्याप्रमाणें फक्त मोडींत
स्व–दीर्घाच्या खुणा असाव्या किंवा नसाव्या एवढ्यापुरताच; मोडी
हींशी करून तिच्या जागीं बाळबोधीची स्थापना करावी, असें सुचविणारे
स्थ किंकेडसाहेबांच्या जोडीला दुसरे फारसे आढळले नाहींत. उलट
सेट, वेल्स, फिट्स्गिबन, बेथ्याम, फेअरबँक वगैरे युरोपियन गृहस्थांनीं
० अत्रे यांच्या सूचनेप्रमाणें प्राथमिक शाळांतून बहुतेक लिहिण्याचें काम
डींतूनच करावें असा अभिप्राय दिला होता. अर्थात् मोडीचा जर उपयोग
ऊं नये अशीच कल्पना असेल तर लहानपणीं मोडीची इतकी काळजी
वी व तिच्यावर इतका भर टाकावा असें कोणास वाटेल ? असो.

यापूर्वी तीन वर्षें व्हर्न्यॉक्युलर टेक्स्टबुक रिव्हिजन कमिटीपुढें हाच प्रश्न
ळ्या रूपानें निघाला होता. त्या वेळींहि कमिटीचे प्रेसिडेंट मि०
व्हर्नेटन यांनीं असा अभिप्राय दिला होता कीं, "मोडी लिपींत दोष
ले तरी नवीन खुणा वगैरेंनीं नाहींसे होण्यापेक्षां मोडीचें वळण व पद्धति
ारल्यानेंच ते दोष निघून जातील. हल्लीं परीक्षांतून वगैरे बाळबोधींत
हेलें जातें त्याऐवजीं मोडींत लिहिण्याचाच प्रघात अधिक पाडावा म्हणजे
म भागेल." विद्याखात्याचे दुसरे अधिकारी मि० प्रायर यांनींहि १९०७
ीं असा अभिप्राय दिला होता कीं, "मोडींत ऱ्हस्व–दीर्घाच्या खुणा
ींत यामुळें मोडीचा अर्थ कोणाला कळला नाहीं किंवा त्याबद्दल कोणाला
ा आली, असें एकहि उदाहरण माझ्या आठवणींत नाहीं. कोणत्याहि
ींत फेरबदल व्हावयाचे ते लोकांचे लोकांनींच केले पाहिजेत. त्यांच्या-
ते लादणें चुकीचें आहे." मि० प्रायर असें म्हणतात, पण मि० किंकेड
ं मत असें दिसतें कीं, एखाद्या लिपींतील कांहीं थोड्या खुणाच काय
सर्व लिपीच्या लिपीच सरकारदरबारीं अधिकाराच्या जोरावर बुड-
यास हरकत नाहीं ! हे सर्व युरोपियन अभिप्राय झाले. युरोपियन
कान्यांत किंकेडसाहेबांसारखे एक गृहस्थ तरी भेटले. पण या सर्व
ादपत्रांवरून पाहतां मोडी बुडवून बाळबोध चालू करावी, असें म्हणणारा
हि नेटिव अधिकारी आढळला नाहीं हें ध्यानांत ठेवण्यासारखें आहे.

रा० अत्रे यांनीं सुचविलेला प्रश्न मोडी लिपी 'दुरुस्त' करण्याचा होता;

मोडी लिपी 'बुडविण्या'चा नव्हता. पण मि० किंकेड यांनीं मात्र एक वेगळाच पंथ उपस्थित केला तो असा कीं, रा० अत्रे यांच्या सूचनेप्रमाणें शाळांतून मोडीकडे अधिक लक्ष देण्याचें कारण नाहीं, इतकेंच नव्हे तर सरकारी कागदपत्रांतूनहि यापुढें मोडी न लिहितां बाळबोधच लिहावी. किंकेडसाहेबांचा युक्तिवाद खालील प्रकारचा आहे. 'मोडींत सुधारणा करण्याचें कारण नाहीं, कारण मुळीं मोडीच नको. सार्वत्रिक प्रचार करतां येण्यासारखी एखादी लिपी असेल तर ती बाळबोधच होय. वायव्यप्रांत व मध्यप्रांत यांमध्यें अलीकडे बाळबोध ( देवनागरी ) लिपीच सुरू करण्यांत आली आहे. गुजराथ, सिंध व कानडा जिल्हा यांतहि बाळबोध सुरू करतां येण्यासारखें आहे. मोडी लिहावयास सोपी आहे; ती एकदोन आठवड्यांत लिहावयास शिकतां येते; पण मोडीवाचन मात्र लवकर येत नाहीं. पुस्तकें, वर्तमानपत्रें, छापखाने यासंबंधाचें सर्व काम बाळबोधींतच होतें. कॉलेजांतील बरेचसे विद्यार्थी बालबोधींतच पत्रें लिहितात. हल्लीं फर्ग्युसन कॉलेजांतले २१६ विद्यार्थी, सायन्स कॉलेजांतले २४ व डेक्कन कॉलेजांतले ६५ विद्यार्थी मोडींत पत्रें लिहितात, पण त्याच कॉलेजां-तील अनुक्रमें ११३, १६, व ३४ विद्यार्थी बाळबोधींत पत्रें लिहिणारे आहेत. बालबोधींत माझ्याशीं पत्रव्यवहार करणारे पुष्कळ गृहस्थ आहेत. माझ्या अनुभवावरून असें वाटतें कीं, बाळबोध लिपी दिवसेंदिवस वाईट होत जात आहे हें खरें नाहीं. कोर्टांतील कामकाजांत माझ्यासमोर बाल-बोध पत्रें पुष्कळ येतात, त्यांवरूनहि हेंच दिसतें. मोडीपेक्षां बालबोध लिहि-ण्यास थोडा वेळ अधिक लागतो, पण मोडी शब्द तोडून कोणी लिहील तर मोडीलाहि बाळबोधीइतकाच वेळ लागेल. मी हल्लीं कांहीं प्रयोग करून पाहात आहे, त्यांजवरून बाळबोध मोडीइतकीच जलद लिहितां येतें असें मला वाटतें. म्हणून बाळबोध प्रथम महाराष्ट्रांत सुरू करून मग तिचा फैलाव उत्तर-दक्षिणेकडे करावा. बाळबोध लिपीचे फायदे फार आहेत. हल्लीं शेंकडा पांच इतक्या युरोपियन अधिकाऱ्यांनाहि आपल्या हपिसच्या कामकाजाचे कागद वाचतां येत नाहींत! यामुळें न वांचतां शेकडों कागदांवर त्यांना सह्या कराव्या लागत आहेत. मला मोडी साधारण बरें वाचतां येतें आणि तें शिकण्याला मला तीन वर्षें लागलीं. अर्थात् प्रत्येक

गांतली नवी लिपी वाचावयास शिकावयाचें तर मला दहा वर्षें लागतील. करितां मोडीची तर सुधारणा करूंच नये पण बाळबोधीचा प्रसार मात्र ऽ करावा. ”

मि० किंकेड यांच्या या युक्तिवादास द्यावयाचें तें उत्तर देऊन या वादां-ल आणखी कित्येक किरकोळ गोष्टींचा विचार आम्हांस करावयाचा आहे; ा तें काम पुढील खेपेवर टाकणें भाग आहे.

---

[ २ ]

( केसरी, तारीख २१ एप्रिल १९१४ )

मोडी काढून तिच्या जागीं बाळबोध कां घुसडावें याविषयींचा किंकेड-हेबांचा युक्तिवाद मागील खेपेस आम्हीं दिलाच आहे; त्यावरून णासहि हें दिसून येईल कीं, त्यांनीं दाखविलेलीं कित्येक कारणें लटकीं, कित्येक कारणें पोकळ व कित्येक निवळ भ्रामक अशीं आहेत. या व्रतींतली त्यांची सर्व स्फूर्ति स्वतःच्या अनुभवापासूनच निघालेली दिसते. मी एवढा उद्योगी व मराठीचा भोक्ता, असें असतां माझ्यासारख्याला डी जलद वाचावयास शिकण्याला जर तीन वर्षें लागतात, तर माझ्याहून ळशी सिव्हिलियनांचें कसें काय होत असेल ?” अशा विचारानें साहेबांच्या ावर कांटा आल्यासारखा दिसतो. पण ज्याला बाळबोध चांगलें वतां येतें त्याला मोडी चांगलें वाचतां येण्यास तीन वर्षें कां लागावीं आम्हांस समजत नाहीं. बरें त्यांतूनहि लागलीं तरी त्यांत वावगें तें य झालें ? बाळबोध, कानडी व गुजराथी अशा तीनहि लिपी शिकण्यास येकीं तीन–तीनप्रमाणें फार तर नऊ वर्षांचा अवधि लागेल, असें पण घेऊन चालूं. पण सिव्हिलियनची एकंदर नोकरी पंचवीस वर्षें ां. त्यांतल्या पहिल्या नऊ वर्षांतील थोडासा खासगी वेळ आपल्या ताखालच्या प्रजेची लिपी शिकण्यास व तद्द्वारा तिचें हृद्गत ओळ-यास खर्चीं पडलीं तर त्यांत काय चुकलें ? किंकेडसाहेब मोडी व गुज-ी शिकले ते झालें तरी तीन तीन वर्षें रोज दोन दोन, चार चार तास खतें घेऊन वाचीत होते, असें थोडेंच आहे ! सहज फावल्या

वेळीं थोडेंसें वाचावयाचें; पण मुख्यत: सरकारी कामकाज करीत असतांच थोडीशी हौस बाळगून शिरस्तेदाराकडून कागद वाचविण्याऐवजीं स्वत: हातांत घेऊन थोडथोडें वाचीत गेलें असतां सहज काम भागण्याजोगें आहे. पण केवळ तसें न झालें आणि अवांतर थोडासा वेळ घालवावा लागला म्हणून त्याचा एवढा उपकार कसला? सरकारी कागदपत्रांची आजवर लिपीच जर मोडी होती तर तीसुद्धां साहेबांनीं शिकूं नये कीं काय? मराठी लोक–मामलेदार निदान डेप्युटी कलेक्टर–केव्हां कर्नाटकांत तर केव्हां गुजराथेंत नेमले जातात. त्यांना नसेल का कांहीं अडचण येत? व येत असली तर ते कशी भागवीत असतील? मराठी डेप्युटी कलेक्टराला व युरोपियन असिस्टंट कलेक्टरला किंवा जज्जाला कानडी लिपीची अडचण सारखीच. पण लिपीची तक्रार सांगणारे किंकेडसाहेब जसे एकच, तसे आपल्या जिल्ह्यांतील लिपी वाचण्याची मनापासून खरी हौस बाळगणारेहि किंकेड एकच. बाकीच्यांची हकीकत किंकेडसाहेबांनीं सांगितली तीच खरी; म्हणजे शेंकडा पांचच युरोपियन अधिकारी मोडी कागदपत्र वाचूं शकतात. पण याचा अर्थ बाकीचे पंचाण्णव सर्वच दगड असतात असा नाहीं; किंवा या देवदूतांना कधींहि हस्तगत न होणारी अशी मोडी लिपी ही एक राक्षसी विद्या आहे असेंहि नव्हे. तर याचा अर्थ इतकाच कीं, शेंकडा पंचाण्णव युरोपियन अधिकारी स्वत: मोडी कागद वाचण्याचा मुळीं प्रयत्नच करीत नाहींत. फार काय, पण अक्षर अगदीं सुवाच्य असलें किंवा छापील बाळबोध अर्ज असला तरी किती साहेबलोक आपले कागद हातांत घेऊन स्वत: वाचण्याचा खऱ्या मनानें प्रयत्न करीत असतील हें किंकेडसाहेबांनींच सांगावें! मोडीच्या ऐवजीं बाळबोध सुरू करावयाचाच अवकाश, कीं प्रत्येक साहेब निदान महत्त्वाचे तरी सर्व कागद आपले आपण घेऊन वाचील, अशी जर आम्हांस खात्री पटेल तर आम्ही मोडीचा आग्रह कदाचित् सोडून देऊं! पण तें मुळीं शक्यच नाहीं. म्हणजे चिटणीस किंवा शिरस्तेदार यांना तितकेंच काम पडणार किंवा यांचें तितकेंच प्रस्थ राहणार, आणि बिचाऱ्या कारकुनाला व अर्जदाराला मात्र एकाच्या जागीं दीड तास खर्डे घांसावे लागून आमची जुनीपुराणी मोडी लिपी नष्ट होणार ती होणारच!

माझ्याशीं पत्रव्यवहार करणारे मित्र सुवाच्य बाळबोध लिहितात, असें एक कारण किंकेडसाहेब दाखवितात. पण तें या मित्रांस मोडी नको म्हणून नाहीं तर किंकेडसाहेबांस मोडी येत नाहीं अशाच समजुतीनें होय. हैशी साहेबास बाळबोधींत लिहिलेलें पत्र सुवाच्य असल्यास नवल काय ? कॉलेजांतील अमुक इतकीं मुलें बाळबोध पत्रें लिहितात यावरून कांहींच ठरत नाहीं; कारण एक तर बहुसंख्या मोडी पत्रें लिहिणारांची व अल्पसंख्या बाळबोध लिहिणारांची, हें किंकेडसाहेबांनीं दिलेल्या आंकड्यांवरून सिद्ध होतें. शिवाय विद्यार्थ्यांनीं बाळबोधींत लिहिलेलीं पत्रें बरींचशीं आपल्या अशिक्षित आप्त स्त्रियांना किंवा अर्धशिक्षित भावंडांना लिहिलेलीं असतात. कोर्टांत आपल्यापुढें आलेलीं पंधरा वर्षांच्या उमरीच्या एका मुलीचीं बरींचशीं प्रणयपत्रें बाळबोधींत लिहिलीं होतीं व तीं सुवाच्य होतीं असेंहि एक प्रमाण किंकेडसाहेबांनीं दिलें आहे; तें वाचून तर हंसूंच येतें. कारण एक तर सुशिक्षित मुलींनाहि मोडी फारसें येत नाहीं. शिवाय हीं प्रणयपत्रें काळजीनें अथवा कोरून लिहिलीं असल्यास त्यांत नवल काय ? त्यांवरून फार तर त्या मुलीचें शिक्षण किंवा प्रेम यांविषयीं एखाद्या कोर्टानें अनुमान काढणें बरोबर होईल; पण त्यावरून एकंदर बाळबोधलिपीच्या स्थितीविषयीं अनुमान काढणें बरोबर होणार नाहीं. वायव्यप्रांत व मध्यप्रांत यांचा दाखला किंकेडसाहेबांनीं दिला खरा, पण ते त्या बाबतींत सर्वस्वीं घसरले असें आम्हांस वाटतें. वायव्य ( आग्रा व औध ) प्रांतांत देवनागरी लिपी सुरू केली आहे असें साहेब म्हणतात, पण आपण काय म्हणतों याचा अर्थच त्यांस कळला नसावा. कारण वायव्यप्रांतांत देवनागरी लिपी सुरू केली खरी; पण ती बाळबोध म्हणून नव्हे तर हिंदी म्हणून ! वायव्यप्रांतांत पूर्वीं मोडी होती ती काढून बाळबोध केली असें नाहीं, तर तेथें पूर्वीं उर्दू लिपी चालू होती, पण हिंदी ( नागर ) लिपीवाल्यांवर उर्दू ( मुसलमानी ) लिपी लादणें हा फार दिवसांचा अन्याय होत होता तो दुरुस्त झाला इतकेंच काय तें. किंकेडसाहेबांनीं हिंदी-बाळबोध पाहिली आहे; पण हिंदी–मोडी अशी एखादी लिपी असावी असा त्यांचा समज दिसतो, तो मात्र निवळ भ्रम आहे. मध्यप्रांताचें त्यांनीं उदाहरण दिलें, तें मात्र या बाबतींत लागू आहे. पण मोडी काढून बाळबोध सुरू केलें याचा परि-

णाम तिकडे चांगला झाला नाहीं, ही गोष्ट त्यांनीं लक्षांत घेतली नाहीं. सन १९०७ सालीं डॉ० भांडारकर यांनीं बाळबोध–मोडीवर जो लेखी अभिप्राय नमूद केला आहे त्यांत त्यांनीं या गोष्टीचा स्पष्ट उल्लेख केला आहे. ते म्हणतात, " कागदपत्रांच्या लिहिण्याला बाळबोध उपयोगी नाहीं, मोडीच हवी. बाळबोध लिहूं लागलें असतां तें हळूहळू दुर्वाच्य होतें. पूर्वी भटभिक्षुकांशिवाय बाळबोध कोणीच लिहीत नव्हते. अलीकडे नागपूर प्रांतांतील सरकारी कचेऱ्यांतून मोडी काढून बाळबोध सुरू केलें आहे; पण त्याविषयीं तिकडील शाळाखात्यांतील एका पदवीधर मित्रानें मला असें कळविलें आहे कीं, सरकारी कागदपत्रांतलें बाळबोध गिजबिड व हेंगाडें होऊं लागून त्याची सुवाच्यता जात चालली आहे." छापखान्या-संबंधीं सर्व कागदपत्र बाळबोधींत तयार होतात, असें किंकेडसाहेब म्हणतात पण तें सर्वाशीं खरें नाहीं. कारण मोडी कॉपी चालविणारे कंपॉझिटर लोक कोठेंहि थोडेबहुत असतातच, पण कंपॉझिटरवर्ग हा प्रायः अशिक्षित असतो; त्याची साक्षरता खरोखरीच अक्षरांची ओळख होण्या-पुरती. अर्थात् त्यांचें उदाहरण कारकुनी पेशाच्या लोकांना लावणें असमंजसपणाचें होय. शिवाय दुसरेंहि एक कारण आहे, तें असें कीं, छापखान्यांत निघणारें काम होईल तितकें शुद्ध असावें लागतें. ऱ्हस्व, दीर्घ, जोडाक्षरें वगैरेंचे सूक्ष्म भेद यांत फारच बारकाईनें पाळावे लागतात, आणि मूळ प्रत मोडींत लिहिली तर कंपॉझिटरलोक इतक्या चुका करून ठेवावयाचे कीं, तसलें घाणेरडें मुद्रित शुद्ध करण्यापेक्षां फिरून सर्वच प्रत लिहून कंपोज करविलेली पुरवेल! छापलेलें काम कायम टिकण्याची अपेक्षा असते. पण सर्वच सरकारी कागदपत्रांची किंमत इतकी असत नाहीं. त्यांत ऱ्हस्व, दीर्घ, व्याकरणशुद्धता हीं थोडींबहुत कमी असलीं तरी चालतात व कांहीं कांहीं सरकारी कागदपत्र तर इतक्या अनित्य स्वरूपाचे असतात कीं, सरकार त्यांचा मुद्दाम नाश करितें. तात्पर्य, ऋग्वेदसंहिता छापण्याची प्रत बाळबोधींत लिहितात म्हणून कोंडवाड्याच्या बारनिशीचे शेरेहि बाळबोधींतच लिहावे, असें कोणी म्हणूं लागेल तर त्याचे तोंडास हात कोण लावणार?

राहतां किंकेडसाहेबांनीं दाखविलेलें एक कारण रहातें; तें हें कीं, देव-

नागरी लिपी हीच काय ती एक अशी लिपी आहे कीं, मुंबई इलाख्यांतील सर्व प्रांतांस ती लागू करतां येईल. पण तेथेंहि त्यांनीं खोल नजर पुरविलेली दिसत नाहीं. कारण संस्कृत भाषा सर्व देशी पोटभाषांची जननी असली तरी हिंदुस्थानांतील सर्वच संस्कृत ग्रंथ देवनागरी लिपींत लिहिलेले आहेत असें नाहीं. कारण प्रत्येक देशी भाषेच्या लिपींत लिहिलेले असेहि संस्कृत ग्रंथ बरेच आहेत. त्यांतूनहि आज संस्कृत भाषा सर्वत्र प्रचलित करावयाची असा जर प्रश्न असता तर " विनाकारण लिपी मात्र भिन्न कां ठेवितां ?" असें कोणालाहि विचारून अडविण्यांत स्वारस्य होतें. पण प्रस्तुत प्रश्न आहे तो निरनिराळ्या देशी भाषांत होणाऱ्या चालचलाऊ सरकारी व खासगी कागदपत्रांपुरता. शिवाय महाराष्ट्रांत आज बाळबोध मोडी दोन्ही व्यवहारांत प्रचलित आहेत म्हणून एक काढून तिच्या जागीं दुसरी घालणें यांत आपण विशेष कांहींच करीत नाहीं, असें किंकेडसाहेबांस वाटणें स्वाभाविक आहे. पण सिंध, कर्नाटक, गुजरात येथें सरकारदरबारचे सर्व कागदपत्र बाळबोधींत सुरू करणें हें काम किती दुष्कर आहे याची त्यांना कल्पनाच नाहीं असें आम्हांस वाटतें. मुंबई इलाखाभर बाळबोध सुरू करूं पाहणारे किंकेडसाहेब राष्ट्रीय भावनेच्या दृष्टीनें खुद्द नागरी-प्रचारणी सभेच्या किंवा-एक-लिपी-विस्तार-परिषदेच्या अत्यंत उत्साही-अशा चिटणीसासहि लाज आणतात, असा क्षणभर देखावा दिसतो खरा; पण या देखाव्यानें कोणीहि विचारी मनुष्य फसणें शक्य नाहीं. किंकेडसाहेब परके असतांहि राष्ट्रीयत्वाच्या भावनेंत आम्हांस उदाहरण घालून देण्याची आकांक्षा त्यांनीं धरल्याबद्दल आम्ही साहेबांचे आभारच मानितों. पण बाळबोध लिपी सर्व इलाखाभर सरकार चालू करणार अशी आम्हांस आधीं खात्री पटेल तेव्हां एक वेळ या गोष्टीचा विचार करितां येईल. पण हें उज्ज्वल राष्ट्रकार्य साधण्याच्या ऐवजीं केवळ आळशी साहेब लोकांच्या सोयीकरितां महाराष्ट्रांचें मात्र तूर्त नुकसान होणार अशीच उलट आज आमची खात्री असल्यामुळें, त्यांच्या या सूचनेस विरोध करणें आम्हांस भाग आहे. दुर्दैव इतकेंच कीं, मुंबईच्या कायदेकौन्सिलांतील आमच्या कित्येक लोकनियुक्त प्रतिनिधींनाहि मोडीचें मर्म न कळल्यामुळें बाळबोधीची तळी उचलून किंकेडसाहेबांना ' राष्ट्रकार्य ' करण्याला आपण मदतच करीत आहों,

असा त्यांना भ्रम झालेला दिसतो ! आमच्या कित्येक नामदारांना मोडी हा काय पदार्थ आहे हेंच मुळीं माहीत नाहीं. मुलाप्रमाणें त्यांना अक्षरें काढून समजूत करून द्यावी लागते; व समजूत पटली तरी दुसरे कित्येक असें म्हणणारे भेटतात कीं, "तुम्ही राष्ट्रीयत्वाचे मोक्ते म्हणवितां आणि बाळबोधीला विरोध करितां ?" पण यावर उत्तर हेंच कीं, "होय; एकराष्ट्रीयत्वाच्या भावनेंत आम्ही तुम्हांस केव्हांहि तिळभर हार जाणार नाहीं. पण बाळबोध देवनागरी झाली तरी ती तुम्ही आपल्या जिल्ह्यांत खासगी व सरकारी कागदपत्रांतून चालू करण्यास तयार आहां काय ?" या प्रश्नाचें उत्तर द्या म्हणजे आमची अडचण तुम्हांस कळून येईल. देवनागरी लिपीचा अभिमान तुम्ही आम्हांस शिकवावयास नको. सुदैवानें महाराष्ट्रांत देवनागरी जितकी प्रजलित आहे तितकी बंगाल, मद्रास, पंजाब या इलाख्यांत किंवा सिंध, कर्नाटक, गुजराथ वगैरे प्रांतांत प्रचलित नाहीं; आणि प्रांताप्रांताच्या किंवा इलाख्या-इलाख्याच्या व्यवहाराचा प्रसंग येईल तेथें आम्ही अर्थात् देवनागरीचाच आग्रह व अभिमान धरूं, मोडीचा आग्रह धरणार नाहीं. पण केवळ महारारा़ष्ट्रांतच—म्हणजे जेथें मोडी व बाळबोध यांची जवळजवळ समव्याप्तिच आहे तेथें—केवळ सरकारी कामकाज व खासगी कागदपत्र यांपुरती त्यांतल्यात्यांत अधिक सोईची म्हणून मोडी लिपीहि फार पूर्वीपासून चालत आल्याप्रमाणें पुढेंहि चालू राहावी—तिच्यावर निरर्थक बहिष्कार घालण्यांत येऊं नये—असें आम्हीं आग्रहपूर्वक म्हटलें तर त्यांत वावगें कोणतें ? मोडी लिपी जर आपला प्रांत ओलांडून परक्या प्रांतावर स्वारी करूं पहात असेल तर एक गोष्ट निराळी. अहमदाबादच्या कोर्टांतील दप्तर मोडी लिपीत ठेवलें जावें असें जर मोडीच्या अभिमानानें आम्ही म्हणूं तर मग "सर्वांना साधारण अशी बाळबोव—देनावगरी—च असूं द्या" असें एखाद्या लल्लुभाई सामळदासानें म्हणावें; किंवा पार्शी—वाण्यांनींहि आपले हिशेब गुजराथींत न ठेवतां मोडींत ठेवावे, असें आम्ही म्हणूं तर सर फेरोजशहा मेथा यांनीं मुंबई बेटाच्या सरहद्दीवर एखादा खंदक खणवून मोडीला प्रतिरोध करावा किंवा त्या खंदकांत मोडीला गारदहि करून टाकावी. एवढेंच नव्हे तर, महाराष्ट्रांतील एखाद्या जिल्ह्यांत जेथें मोडी सरकारी

दप्तरांत पूर्वी चालू नव्हती तेथें ती नवीन चालू करा असेंहि आमचें म्हणणें नाहीं. तसें असतें तरी विरोधांत कांहीं अर्थ होता. किंवा टाइम्सनें म्हटल्या प्रमाणें "मोडी लिपीरूपी शेतकऱ्यांच्या या वैरिणीला व सावकाराच्या मैत्रिणीला स्वेच्छाचाराला नसती नवी जागा करून देऊं नये, हें म्हणणें शोभलें असतें." पण वस्तुस्थिति अशी आहे कीं, मोडी ही अनेक शतकां-पासून चालत आली आहे. उत्तरेस ग्वाल्हेरीपासून दक्षिणेस हुबळीपर्यंत तिचा प्रसार आहे. मुसलमानांनीं महाराष्ट्रांत अमदानी गाजविली, तेव्हां राजाला किंवा प्रजेला मोडीची अडचण झाली नाहीं, पेशवाईत तर सर्वत्र मोडीचा प्रसार होताच. पेशवाईनंतर देखील आज जवळ जवळ शंभर वर्षेपर्यंत सरकारदरबारचें सर्व कामकाज मोडीवर सुरळीत चाललें. आजवर शेंकडों युरोपियन अधिकारी मोडींत अगदीं निष्णात नसले तरी त्यांना तिचा जाच झाला नाहीं. एकहि नेटिव्ह अधिकारी किंवा खासगी गृहस्थ मोडी काढून टाकून बाळबोध सुरू करा असें म्हणत नाहीं. असें असतां केवळ एका किंकेडसाहेबांच्या लहरीखातर—किंवा त्यांच्या मताप्रमाणें सर-सहा युरोपियन अधिकाऱ्यांच्या सोईखातर—कलमाच्या एका फटकाऱ्यासरशीं मोडीला पदभ्रष्ट करून सरकार जर सक्तीनें बाळबोध पदारूढ करील, तर मग या दांडगाईस सीमाच राहिली नाहीं असें म्हटलें पाहिजे!

---

# ३३. विद्यार्थी व सभा

( आत्मोद्धार, सन १९१४ )

नवीन परिस्थितींत नवे घोटाळ्याचे प्रश्न उत्पन्न होणें स्वाभाविक आहे. आमच्या हल्लींच्या विद्यार्थ्यांनीं सार्वजनिक कामांत किती पडावें व किती पडूं नये हा प्रश्न अशापैकींच एक होय. स्थलपरत्वें निरनिराळ्या प्रांतांत या प्रश्नानें निरनिराळ्या प्रमाणानें उचल खाल्लेली आहे. पंजाब, संयुक्तप्रांत वगैरेमधून या प्रश्नांची चर्चा झालेली फारशी ऐकूं येत नाहीं. पण बंगालच्या फाळणीच्या चळवळीच्या वेळीं बंगाल्यांत या प्रश्नाला इतकें स्वरूप आलें होतें कीं, प्रख्यात रिस्लेसर्क्युलर हें बंगाली विद्यार्थ्यांमुळेंच

जन्मास आलें, असें कदाचित् म्हणतां येईल. मद्रास हा अलीकडेच जागा झाला आहे, पण तेथें विद्यार्थ्यांचे संप होण्यापर्यंत मजल गेली आहे. नागपूर प्रांतांत त्याच्याहि पुढें मजल गेलेली असून विद्यार्थ्यांचें वर्तन व प्रांतिक सरकारचें धोरण यांच्या विरोधामुळें चिंता उत्पन्न झाली आहे. आणि मुंबई इलाख्यांत हा प्रश्न अद्यापि उतू आला नसला तरी शिजत घातला गेला आहे यांत शंका नाहीं.

विद्यार्थ्यांनीं कोणत्या सार्वजनिक कार्यांत किती पडावें याविषयीं सरकार, शिक्षक व पालक या तिघांचीं निरनिराळीं मतें असल्यासारखें दिसतें. सरकारचें मत रिस्लेसक्युंलरांत स्पष्टपणें नमूद आहेच. पण प्रत्यक्ष व्यवहारांत तें सदर सक्युंलरापलीकडेहि जाण्याचा प्रयत्न करितें. एकाच वाक्यांत सांगावयाचें तर विद्यार्थ्यांनीं कोणत्याच जाहीर किंवा खाजगी सभेला गेलेलें सरकारास आवडत नाहीं; मग विषय कोणताहि असो, वक्ता कोणीहि असो. कारण कोणता वक्ता कोणत्या विषयाच्या चर्चेत मुलांच्या कानीं न जावे असे शद्ब उच्चारील याचा नेम नाहीं. अशी भीति त्यांना वाटते. शाळा सुटली म्हणजे मुलांनीं खेळण्याकरितां मैदानावर जावें, तेथून घरीं जावें व तेथून शाळेंत यावें, याखेरीज मुलांकरितां असा कोणताहि कार्यक्रम त्यांच्या दृष्टिकक्षेंत येत नाहीं. घरींदेखील विद्यार्थी कोणाशीं काय बोलतात, काय वाचतात याच्यावरहि जर सरकारास नजर किंवा कैद ठेवितां आली तरीहि ती त्यास हवी आहे. पण घरोघर ठेवण्यास लागणारे इतके गुप्तपोलीस सरकारास कसे ठेविता येणार ? नाहीं म्हणावयास सरकार या बाबतींत दोन अपवाद मोठ्या खुषीनें पत्करतें. एक असा कीं, सरकारमार्फत भरलेली किंवा सरकारचा अथवा सरकारपक्षीयांचा गौरव करण्याकरितां भरलेली सभा जाहीर असली तरी तिला विद्यार्थ्यांनीं खुशाल जावें. किंबहुना, प्रेक्षकवर्गानें एरवीं सभागृह भरून जाणें शक्य नसेल तर शिक्षकांकडून उत्तेजन देऊन मेंढरांप्रमाणें त्यांना सभागृहांत खुशाल वळवून न्यावें व मग तेथें त्यांनीं टाळ्या वाजविल्या, पायांचा खडखडाट केला, किंवा ‘ हिप हिप हुरे ’ म्हणत डोकीच्या टोप्या वर फेंकल्या तरी चालतील दुसरा अपवाद म्हटला म्हणजे अधिकाऱ्यांनीं शाळांतून वगैरे जाऊन प्रचलित राजकाणांत तोंड घालून वाटतील ते एकांगी विचार विद्यार्थ्यांना ऐकविणें

हा होय. अशा ठिकाणीं अधिकारी समाजांतील कोणाहि प्रतिष्ठित मनुष्याची उघड किंवा प्रच्छन्नपणें वाटेल तितकी निर्भर्त्सना करोत व त्यांच्या शिक्षकांसुद्धां सर्व समाजाला मान्य असलेल्या सिद्धान्ताविरुद्ध कितीहि टाकून बोलोत; ती कांहीं राजकारणी चर्चा होत नाहीं. मग तिच्यांत जिवंत राजकारण कितीहि खच्चून भरलेलें असो. या सर्वांचा अर्थ उघडच असा होतो कीं, विद्यार्थ्यांच्या कानांवर राजकीय विचार जाऊन त्यांचें शुद्ध कोवळें मन दूषित होऊं नये, अशी कांहीं सरकारची खरोखर इच्छा नाहीं; तर सरकारास अप्रिय, नावडतें असे तेवढे विचार त्यांच्या कानांवर जाऊं नयेत. अर्थात् सरकारची दृष्टि शुद्ध तत्त्वाची नाहीं, तर केवळ आपमतलबीपणाची आहे. शिक्षण हें मोठया खर्चाचें काम आहे; लोकांना स्वतंत्र शाळा घालून चालवितां येत नाहींत; व पैशाच्या दृष्टीनें त्या स्वावलंबी होऊं शकल्या तरी परीक्षा, पद्व्या, नोकऱ्या यांच्या मार्गानें त्यांना सर्वस्वी सरकारावर अवलंबून रहाणेंच प्राप्त आहे—या एका गोष्टीचा सरकार निष्ठुरपणानें फायदा घेतें, व शिस्तीच्या नांवावर विद्यार्थ्यांना विशिष्ट प्रकारच्या राजकीय विचारांचे गुलाम बनवूं पहातें.

शिक्षकवर्गाची मजल या बाबतींत सरकारच्याइतकी पुढें जात नाहीं. खुद्द सरकारी शाळांतील शिक्षक घेतले तरी त्यांची खाजगी राजकीय मतें सर्वस्वीं सरकारच्या मतासारखीं असणें शक्य नाहीं. तथापि नोकरीच्या बंधनामुळें त्यांना खाजगी मतें बाजूस ठेवून सरकारच्या हुकुमाची अंमलबजावणी करूं लागते. किंबहुना स्वतःचें नुकसान न व्हावें, म्हणून क्वचित् वरिष्ठ शाळाधिकारी ज्या सभांना विद्यार्थ्यांना एक वेळ धाडतील अशा सभांनाहि जाण्याला ते प्रतिबंध करितात. या सावधपणाच्या बाबतींत स्वतः सरकार एक हात उडी मारण्यास तयार असेल, तर सरकारी शाळामास्तर चार हात उडी मारण्यास तयार असतात. खासगी शाळामास्तर या बाबतींत अधिक स्वतंत्र असे दिसतात व थोडेबहुत तसे असतातहि; पण सरकारकडून द्रव्याची मदत घेतल्याशिवाय चालणाऱ्या शाळा फार थोडया; सरकारी मदत घेतात त्यांच्या अधिकाऱ्यांना नाइलाजानें फार जपून वागावें लागतें. सरकारी शाळा-मास्तराच्या हातून चूक झाली असतां ती फार तर त्याची त्याला भोंवेल. पण मदत घेणाऱ्या शाळेंतील शिक्षकाची

चूक झाली तर तिचें प्रायश्चित्त व्यक्तिशः त्यालाच न मिळतां संस्थेलाहि मिळतें. म्हणून संस्थेच्या ओढीनें त्याला विशेष सावधगिरी ठेवावी लागते. केवळ अशा विचारानेंच आपल्या विद्यार्थ्यांना पण, कोणत्याहि जाहीर सभेस जाण्यास सरसकट बंदी हे खाजगी शाळेंतील शिक्षक करतील तर त्यांच्या-संबंधानें गैरसमज होणार नाहीं. कारण शाळेच्या मुख्य उद्देशाकडे लक्ष देऊन व बोलूनचालून आपल्या परावलंबी स्थितीचा कमीपणा पदरांत घेऊन ते सरळ बुद्धीनें वागतात, असा त्यांच्या वर्तनाचा अर्थ होऊं शकेल. पण कांहीं शाळांचे शिक्षक असें दुटप्पी धोरण ठेवितात कीं, इकडे सरकारच्या हुकुमाप्रमाणें सर्वस्वीं चालावयाचें नाहीं आणि इकडे विद्यार्थ्यांस सर्वस्वीं मोकळीकहि द्यावयाची नाहीं. तर आपल्या पक्षाची सभा असल्यास, मग ती उघड उघड राजकीय चर्चेविषयीं का असेना, तिला विद्यार्थ्यांना जाऊं द्यावयाचें, एवढेंच नव्हे तर हांकूनहि न्यावयाचें ! उदाहरणार्थ, एकाद्या कॉलेजच्या लाईफमेंबर लोकांनीं विशिष्ट प्रकारची राजकीय चळवळ करण्याची मोकळीक असली पण इतर शिक्षकांना ती नसली, तरी अशा लाईफमेंबर लोकांनीं आपल्या पक्षाच्या अभिमानानें भरविलेल्या सभेस त्यांच्या कॉलेजला जोडून असलेल्या शाळांतील इतर शिक्षक आणि मुलेंहि आलीं तरी त्यांना चालतात. लाईफमेंबर स्वतः सरकारविरुद्ध कितीहि जहाल बोलले तरी तें ऐकून मात्र मुलांची शिस्त यांच्या दृष्टीनें बिघडत नाहीं. पण प्रतिपक्षीयांनीं भरविलेली सभा असली म्हणजे मग ती कोणत्याहि विषयाची असो किंवा तेथें वक्ते कितीहि सौम्य भाषणें करोत, त्यांची शिस्त हटकून बिघडते. तात्पर्य, तेथेंहि शुद्ध तत्त्वांचा अवलंब दिसत नाहीं, तर केवळ पक्षभेदाचा दिसतो.

विद्यार्थ्यांसंबंधानें तिसरेहि एक अधिकारी आहेत व ते पालनकर्ते होत. हेहि आपआपल्या परीनें विवक्षित सभांना मुलांना जाऊं देतात अगर जाऊं देत नाहींत. सरकार किंवा शिक्षक यांच्याप्रमाणें त्यांच्याहि ठिकाणीं पक्षभेद संभवतो. पुष्कळ वेळां पालकांना मुलें कोणत्या सभेला गेलीं अगर न गेलीं याचा विधिनिषेध नसतो व इतर रीतीनें मुलें बेशिस्त वागत नसलीं म्हणजे सभांना जाणें अगर न जाणें हें ते मुलांवरच सोंपवितात. याचा प्रायः असा परिणाम होतो कीं, बहुतेक मुलें राजकीय सभांना जातात व पालकां-

करून या कामीं त्यांना प्रतिबंध होत नाहीं. क्वचित् एखादा सरकारी नोकर आपल्या मुलांना राजकीय सभांना जाण्यास प्रतिबंध करितो; पण प्रायः सभांना न जाण्याची स्वतःवर येणारी आपत्ति ते मुलांवर सहसा आणीत नाहींत. एखादा पालक पक्षाभिनिविष्ट असला तर मात्र तो पक्षाभिमानामुळें आपल्या मुलांस विवक्षित राजकीय सभांना जाऊं देत नाहीं, इतकेंच.

अशा रीतीनें मुलांची सभांस जाण्यासंबंधाची शिस्त या तीन निरनिराळ्या अधिकाऱ्यांमध्यें वांटली गेलेली आहे. या तिघांनाहि जी सभा संमत असेल त्याविषयीं वादच नाहीं; पण जेथें मतविरोध उत्पन्न होतो तेथें कोणाचा अधिकार चालावा, हा बिकट प्रश्न उभा राहातो. या प्रश्नाचें एकच उत्तर एकाच वाक्यांत देणें शक्य नाहीं. तथापि तें द्यावयाचेंच तर असेंच दिलें पाहिजे कीं, या बाबतींत सर्वांत श्रेष्ठ अधिकार पालकांनाच आहे. सरकार शाळा घालतें व त्यांवर खर्च करतें, म्हणून त्यांना अमुक सभांना मुलांनीं जावें व अमक्यांना जाऊं नये असा निर्बंध घालण्याचा निर्णयात्मक अधिकार असावा असें सकृद्दर्शनीं भासतें. पण वास्तविक सरकारचा पैसा हा लोकांचा म्हणजे पालकवर्गाचाच होय. त्या पैशाचा उपयोग अमुक रीतीनें व्हावा अगर अमुक रीतीनें होऊं नये हें म्हणण्याचा अधिकार इतर सरकारी खर्चाच्या बाबींप्रमाणें लोकांनाच असला पाहिजे. यावर कोणी असें म्हणेल कीं, सरकारी खर्चाच्या इतर बाबींत झालें तरी अमुक असें असावें, अमुक तसें असूं नये असें लोक म्हणतात, पण त्यांच्या म्हणण्याप्रमाणें सरकार वागतें कोठें ? तसेंच शिक्षणाच्या खर्चाच्या बाबतींतहि होणार, व हें म्हणणें कांहीं खोटें नाहीं. निर्णयात्मक अधिकार सरकारच्या हातीं आहे हें आम्ही घेऊनच चालतों. जोंपर्यंत लोकांच्या हातीं हा निर्णयात्मक अधिकार आला नाहीं तोंपर्यंत सरकार आपला हट्ट चालविणारच, व जोंपर्यंत इतर रीतीनें लोकांना आपल्या स्वतंत्र शाळा काढतां येत नाहींत तोंपर्यंत सरकारचा हा हट्ट लोकांना मान्य करावाच लागणार. सरकारचा हुकुम अन्यायाचा आहे एवढें फार तर ते म्हणतील; पण केवळ मुलांना विवक्षित सभांना जाण्यास मोकळीक असावी या तत्त्वाकरितां मुलांचें शिक्षण मध्येंच संपवून, म्हणजे त्यांच्या भावी चरित्रक्रमाची नासाडी करून, मुलें घरीं बसवून घेईल असा पालक मिळणें शक्य नाहीं. राजकीय

अधिकार हातीं नसल्यामुळें इतर अन्याय पालकांना नागरिक या नात्यानें सोसावे लागतात त्यांतच आणखी हा एक, असें म्हणून सरकारचा हट्ट पुरवूं देणें त्यांना प्राप्त आहे. पण हा हट्ट निमूटपणें पुरवूं द्यावयाचा किंवा त्यासंबधीं निषेध करीत राहावयाचें ? तक्रार करीत बसावयाचें कीं नाहीं ? हाच मुख्य प्रश्न आहे. व त्याचें उत्तर अस्तिपक्षीं सर्व प्रांतांतील पालक हळुहळू देऊं लागले आहेत.

आजकालची शिक्षणपद्धतीच अशी होऊन राहिली आहे कीं, शिक्षक व विद्यार्थी यांचा संबंध शाळेच्या ठराविक तासांखेरीज इतर येऊंच शकत नाहीं. शिक्षक भाडोत्री, शिक्षण भाडोत्री असें झाल्यावर पूर्वीचे गुरुशिष्यांचे निकटपणाचे व प्रेमळपणाचे संबंध आतां कसे राहणार ? व सरकार विद्यार्थ्यांना जी शिस्त ठेवूं पाहणार ती अशाच शिक्षकांच्या मार्फत. बाजारांत जाऊन पैसा टाकून जिन्नस विकत आणावा असलें व्यवहाराचें किंवा सवद्याचें रूप शिक्षणाला आलें आहे. शिवाय शिक्षण संपल्यावर विद्यार्थ्यांचें काय होणार किंवा काय व्हावें याची काळजी सरकारला जर अप्रत्यक्ष असली तर पालकांना ती प्रत्यक्ष असते. म्हणून शाळेंतील वेळापुरती शिस्त सरकार व त्यांचे प्रतिनिधि शिक्षक यांनीं ठेवावी आणि इतर वेळांतील शिस्त पालकांनीं ठेवावी, अशीच वांटणी स्वाभाविक होते व ती योग्यहि आहे. शिक्षकांनीं तर या बाबतींत जो सरकारी हुकूम असेल त्याचा वाटेल तर अंमल करावा आणि त्यांनीं तो निमूटपणें केल्यास त्यांस कोणी दोषहि ठेवणार नाहीं. लोकांच्या हातीं सत्ता नसल्यामुळें परतंत्रपणाची जी स्थिति पालकांची तीच शिक्षकांची. वरिष्ठ शिक्षणापर्यंतच्या स्वतंत्र शाळा काढतां येत नाहींत म्हणून पालकांनीं वाटेल त्या सरकारी सर्क्युलरास मान लवविली पाहिजे; व सरकारी मदतीशिवाय आपली शाळा चालू शकत नाहीं किंवा शिक्षणखात्याकडून तिला मान्यता मिळूं शकणार नाहीं. या भीतीमुळें शिक्षकांनींहि अशा सर्क्युलरला मान लवविली पाहिजे. म्हणजे पालक व शिक्षक दोघेहि या बाबतींत समदुःखी आहेत. पण शिक्षक व पालक यांच्यामध्यें वाद उत्पन्न होतो तो अशाच ठिकाणीं कीं, सरकारी हुकमाचा प्रतिबंध नसता किंवा ' होय नाहीं ' म्हणण्याचा अधिकार शिक्षकांवर सोंपविला असतां पालकांना संमत असलेल्या अशाहि सभांना शिक्षक

आपल्या पक्षाभिनिवेशामुळें विद्यार्थ्यांना सभेस जाऊं देत नाहींत. पण जो न्याय सरकार व पालक यांच्या दरम्यान लागू, तोच शिक्षक व पालक यांच्या दरम्यानहि लागू असला पाहिजे. कारण आपल्या मुलाचा पुढील आयुष्यक्रम कसा व्हावा किंवा त्यानें कोणत्या मतांचा अभिमान अधिक धरावा हें ठरविण्याचा अधिकार पालकांनाच असला पाहिजे. जेथें विद्यार्थ्याला पालक नसल्यामुळें पालकत्वाचा अधिकार शिक्षकांकडे दुय्यमपणानें येतो तेथें गोष्ट वेगळी. पण पालक पायावर उभा असतां त्याच्या मुलाची शिस्त-अर्थात् शाळेबाहेरील शिस्त--लावण्याचा अधिकार शिक्षकांनीं कां मागावा हें समजत नाहीं. अमूक सभा राजकीय असली तरी ती तात्त्विक चर्चेच्या स्वरूपाची आहे, व अमूक सभा मतप्रदर्शक किंवा चळवळीच्या स्वरूपाची आहे हें आपण ठरवूं पाहाणें म्हणजे शिक्षकांनीं अधिकाराचा अतिक्रम करणें होय; व या अतिक्रमाच्या मागें जेव्हां पक्षाभिमानाची भूमिका असते तेव्हां तर वरील प्रकारची निवडानिवड करण्यानें या अतिक्रमाच्या दोषांत भरच पडते.

वरील चर्चा ही अर्थात् विद्यार्थ्यांना शिस्त लावण्यास हक्क सांगणाऱ्या तीन पक्षांच्या अधिकाराच्या बलाबलासंबंधापुरतीच आहे. हें बलाबल ठरवितांना विद्यार्थी कोणत्याहि सभेस गेले असतां तेथें त्यांनीं कसें वागावें याचा विचार करण्यांत आला नाहीं. तो विचार अर्थात् स्वतंत्र आहे, व त्याविषयींहि एकदोन शब्द लिहिणें प्राप्त आहे. विद्यार्थ्यांनीं वाटेल त्या जाहीर सभेस जावें असें जरी आम्हांस वाटतें, तरी तेथें गेल्यावर त्यांनीं केवळ साक्षीभूतपणानें व तटस्थवृत्तीनें वागावें याविषयीं कोणाचाहि मतभेद असेल असें आम्हांस वाटत नाहीं. वास्तविक जाहीर सभा या प्रायः मतप्रदर्शक असल्या, व त्यांतील ठराव अध्यक्ष अनुकूल व प्रतिकूल मतें विचारून मगच मंजूर करतात असा प्रघात असला तरी तो केवळ सर्व औपचारिक प्रकार असतो. जाहीर सभांपुढें आणलेला ठराव बहुमतानें नामंजूर झाला किंवा दुमत होऊन नुसत्या बहुमतानें मंजूर झाला असें उदाहरण सहसा कोणीं पाहिलें अगर ऐकलेंहि नसेल. याचा अर्थच हा कीं, अशा सभांतून वस्तुतः व्यक्तिशः मतें घेण्याचीं नसतात; तर केवळ सामुदायिक पसंती अगर नापसंती विचारावयाची असते; व अशा सामुदायिक पसंतींत

अगर नापसंतींत इतर सभासदांबरोबर हजर असलेल्या विद्यार्थ्यांचा समावेश झाला, तरी विद्यार्थ्यांनीं मतें दिलीं व सभेच्या कामांत त्यांनीं भाग उचलला असें म्हणणें सारासारविचारास सोडून आहे. निमंत्रित किंवा निवडलेल्या प्रतिनिधींच्या सभा असतात त्या जाहीर सभांहून वेगळ्या असतात. अशा सभांना विद्यार्थ्यांना प्रतिनिधि म्हणून कोणीं घेत नाहींत, व अशा सभांत विद्यार्थीहि प्रतिनिधि म्हणून जात नाहींत. तात्पर्य, व्याख्यानाच्या जाहीर सभा, किंवा सर्वसंमत ठराव मंजूर करण्याच्या जाहीर सभा अशांना विद्यार्थी गेले तर ते केवळ तेथें काय चालतें व भाषणें काय होतात हें पाहण्याकरितांच जातात. घरीं अगर लायब्ररींतून वर्तमानपत्रें वाचणें किंवा वडील माणसें, स्नेहीसोबती यांच्यातील चर्चा ऐकणें हीं जशीं सार्वजनिक विषयांचें ज्ञान त्यांना होण्याची सुलभ साधनें आहेत तशांतलेंच जाहीर सभा हेंहि एक साधन आहे; व पहिल्या दोन गोष्टींना जोंपर्यंत प्रतिबंध केला जात नाहीं, तोंपर्यंत जाहीर सभांना जाण्याला प्रतिबंध करण्यापासून तरी काय फायदा ? जाहीर सभांतून विद्यार्थी मत देऊन प्रौढ नागरिकांचे हक्क अकाली बजावतात हा बाऊ अशा रीतीनें खोटा ठरल्यावर, सभांतून विद्यार्थी इतर कोणत्याहि रीतीनें अप्रशस्त वर्तन करतात कीं काय एवढेंच पाहाणें उरलें; व सभांतून चाललेला प्रकार केवळ साक्षीभूतपणानें पाहाण्याशिवाय विद्यार्थ्यांनीं इतर कांहीं करूं नये, असें आमचें मत वर दर्शविलेंच आहे. सभेंत गोंगाट करणें किंवा वक्त्याला बोलूं न देणें या गोष्टी प्रौढ सभासदानें केल्या तरी गर्हणीयच होत. मग त्या विद्यार्थ्यांनीं केल्या तर अधिकच गर्हणीय होत यांत शंका कसली ? आणि ही चूक किंवा हा अपराध करणाऱ्या विद्यार्थ्यांस शासन होणें जरूर आहे; मग तें सभापति करो, किंवा पालक करो किंवा या दोहोंनींहि न केलें तर शिक्षकहि करो. पण सभेंत गैरशिस्त वर्तन केल्याचा गुन्हा व केवळ सभेस गेल्याचा गुन्हा हे दोन्हीहि एकाच स्वरूपाचे मानले जाऊं नयेत. आतां विद्यार्थ्यांचा भरणा सभेंत पुष्कळ असतो व या अर्थानें सभा प्रौढ सभासदांच्या हातांत न राहतां विद्यार्थ्यांच्या हातांत जाते असेंहि एक म्हणणें आहे. पण ती तशी गेली तरी विद्यार्थी खरोखर काय करतात हें पाहिलें पाहिजे. विद्यार्थी आनंददर्शक किंवा संमतिदर्शक अशा टाळ्या

प्रौढ सभासदांपेक्षां मोठ्यानें वाजवितात, किंवा क्वचित् एखाद्या वक्त्याचें भाषणच ऐकूं येत नसेल तर प्रौढ सभासद जेवढी गंभीरता ठेवितील तितकी विद्यार्थी ठेवीत नाहींत, हें खरें आहे. पण अमुक मत पसंत व अमुक नापसंत एवढ्याचकरितां विद्यार्थ्यांनीं वक्त्यास खालीं बसावयास लाविलें असें सहसा पाहण्यांत येत नाहीं. विद्यार्थ्यांची संख्या सभांतून कमी यावी असें वाटल्यास तिकिटें लावून सभा भरविण्याचा प्रघात हळूहळू पाडतां येणें शक्य आहे; व असें झाल्यास अल्पवयी मुलें आपोआपच गळतील. पण विद्यार्थ्यांना कोणत्याहि सभेस जाण्याला हरकत नाहीं, हें तत्त्व एकदां मान्य झालें म्हणजे असल्या बारीकसारीक सुधारणा करण्यास कोणी ना म्हणणार नाहीं.

---

# ३४. हातकामाचें शिक्षण

## ( एक शिक्षणविषयक सुधारणा )

( लोकशिक्षण, सन १९१५ )

अलीकडे सरकारानें योजिलेल्या कित्येक शिक्षणविषयक सुधारणांपैकीं हातकामाचें शिक्षण ही एक असून, दुय्यम प्रतीच्या सरकारी शाळांमधून मुलांस हातकाम शिकविण्याची तजवीज लवकरच अमलांत येणार आहे. हातकाम याचा अर्थ विशेष स्पष्ट करून सांगण्याची फारशी आवश्यकता नाहीं. आजकाल ड्रॉइंग हें दुय्यमप्रतीच्या शाळांमधून व इतरत्रहि कायमचें शिरून राहिलें असल्याचें महशूरच आहे. हातकाम ही ड्रॉइंगच्याच दिशेनें पण त्याच्या पुढची पायरी आहे. शाळेंतून ड्रॉइंग शिकविलें जातें तें अर्थातच थोडें शिकविलें जातें. मुंबई आर्टस्कूलमार्फत घेतल्या जाणाऱ्या ड्रॉइंगच्या ‘ ग्रेड’च्या परीक्षांस बसतां येण्याइतकें तें नसतें, व त्या परीक्षांस बसूं इच्छिणाऱ्या विद्यार्थ्याला वेगळी तयारी करावी लागते. पण जें थोडें ड्रॉइंगचें शिक्षण दिलें जातें त्याचा हेतु इतकाच असतो कीं, विद्यार्थ्याचा

त्या विषयांत प्रवेश व्हावा, इतर विषयांप्रमाणें याहि विषयाची त्यास गोडी लागावी, व जर कदाचित् एखाद्या विद्यार्थ्याच्या अंगीं ड्रॉइंगच्या विद्येत प्रवीण किंवा निष्णात होण्याची उपजत पात्रता असेल तर तिला कार्यक्षेत्र मिळावें. हायस्कुलांतून मिळणाऱ्या तुटपुंजी ड्रॉइंगच्या ज्ञानानें जशी कोणास 'ग्रेड'ची परीक्षा पास होतां येत नाहीं, त्याचप्रमाणें तीनहि ग्रेड पास झालेल्या विद्यार्थ्यांस झालें तरी खरी चित्रकला कोठें येते ? चित्रकलाच काय पण शिल्पचिताऱ्याचें किंवा ड्राफ्ट्स्मनचें काम करावयाचें असेल तरी थर्डग्रेड-वाल्या विद्यार्थ्यांस त्या विषयाचें स्वतंत्र शिक्षण घ्यावेंच लागतें. सांगण्याचा मुद्दा हाच कीं, हायस्कूलच्या शिक्षणाचा हेतु निरनिराळ्या विषयांच्या मूल-तत्त्वांची व त्याच्या सामान्य स्वरूपाची नुसती ओळख करून देण्याचा असतो; आणि ड्रॉइंगच्या बरोबरीनें हातकामाचें शिक्षण देण्याचा शाळा-खात्याचा जो विचार आहे तो झाला तरी याच दृष्टीनें. ड्रॉइंग शिकल्यानें एखाद्या वस्तूचें प्रत्यक्ष पाहून किंवा स्मरणानें रेखाचित्र काढतां येतें. पण वस्तूचें असें चित्र रेखाटतां येणें व ती वस्तूच हातानें बनवितां येणें या दोन गोष्टी अर्थातच भिन्न आहेत. ड्रॉइंगच्या साहाय्यानें चित्र काढतां आल्यास मनानें कल्पिलेल्या वस्तूला मूर्तस्वरूप देण्याच्या मार्गातील एक मजल गांठली हें खरें. पण मनांतील कल्पना कागदावर आल्यानें ती पाहण्यादाखविण्यासारखी किंवा समजून सांगण्यासारखी झाली, तरी तिचें अमूर्तत्व विशेषतः व्यवहाराशक्यता तितकीच कायम राहिली. कागदावर रेखांनीं काढलेल्या गाडींत बसतां येत नाहीं. इतकेंच नव्हे, तर चित्रांतील गाडी एकाच पातळींत काढलेली असल्यामुळें तिची जाडी, खोली, तसेंच तिचें घटकद्रव्य वगैरे चित्रांत अदृश्य राहणाऱ्या गोष्टी अमूर्त राहतातच. ड्रॉइंगच्या साहाय्यानें कल्पनागत वस्तूची माया किंवा आभास उत्पन्न करतां येतो. पण मायेनें किंवा आभासानें प्रत्यक्ष अनुभवाची बरोबरी कशी करवेल ? म्हणून शिक्षणक्रमांत ज्या कारणाकरितां ड्रॉइंगचा समावेश करण्यांत येतो त्याचकरितां हातकामाच्या शिक्षणाचाहि समावेश करणें सयुक्तिक आहे हें कोणासहि कबूल करावें लागेल.

'शिक्षण' या शब्दाचा अर्थ मनुष्याच्या अंगीं असलेल्या गुणांचा किंवा शक्तींचा विकास होण्यास लागणारी पूर्वतयारी असा जर मानला,

तर ज्या शिक्षणक्रमांत हाताकडून शिक्षणात्मक असें कांहींच काम करवून घेतलें जात नाहीं, तो सदोष ठरलाच पाहिजे. हातांत पुस्तक धरणें, किंवा पाटीवर आंकडे मोडणें, अथवा मजकूर लिहिणें याला हातकाम म्हणतां येत नाहीं. हातकाम म्हणजे जीवनोपयोगी अशा कलांसंबंधीं काम. पंचेंद्रियांकडून ज्ञान मिळविणें ही जशी एक शक्ति आहे त्याचप्रमाणें मिळालेलें ज्ञान व्यक्त करणें हीहि एक शक्तीच आहे. लेख व भाषण हीं ज्ञान व्यक्त करण्याचीं साधनें आहेतच; परंतु हात हेंहि एक त्याच प्रकारचें साधन आहे. ही गोष्ट आजवरच्या शिक्षणक्रमांत गणिली जात नसे. शब्द व लेख यांनीं जी समजूत पडत नाहीं ती रेखाचित्र काढल्यानें अधिक पडते, ही गोष्ट सचित्र शिक्षणविषयक पुस्तकें व व्यापारी क्याटलॉग यांजवरून दिसून येते. आणि जी समजूत चित्रानेंहि पडत नाहीं ती वस्तूच्या अल्पप्रमाणावर का होईना पण मूर्तस्वरूपाच्या नमुन्यानें पडते ही गोष्ट प्रयोगशाळा, पदार्थसंग्रहालयें यांतून मांडलेल्या प्रतिमांवरून आणि यंत्रें वगैरेंच्या दुकानांत ठेवलेल्या नमुन्यांवरून उघड होते. म्हणून कोणतीहि इष्ट वस्तु निर्माण करण्याच्या धंद्याच्या हेतूनें नसेना का, पण त्या वस्तूचें ज्ञान म्हणजे त्या वस्तूबद्दलची मनांतील कल्पना व्यक्त करण्याची शक्ति वाढविण्याच्या हेतूनें तरी सर्वसाधारण शिक्षणाच्या शाळांतून हातकामाचें शिक्षण देणें जरूर आहे. प्रत्यक्ष धंदा म्हटला म्हणजे तेथें अर्थातच निष्णातपणाची, प्राविण्याची, पूर्णज्ञानाची अपेक्षा आली, व इतक्या उच्च कोटीचें ज्ञान मिळण्यास स्वतंत्र धंदेशिक्षणाच्या शाळेंतच कोणासहि जावयास पाहिजे हें उघड आहे. पण लेखन किंवा भाषण यांचें अशा उच्च कोटीस पोंचलेलें ज्ञान तरी शाळांतून कोठें मिळतें? त्याचींहि मूलतत्त्वेंच काय तीं शाळेंत शिकविलीं जातात. प्रश्न इतकाच कीं, जीभ ही अर्थ व्यक्त करण्याचें एक साधन म्हणून मानली जाते, तसा हातहि कां मानला जाऊं नये? खरें म्हटलें असतां हाताचें तर या दृष्टीनें फारच महत्त्व आहे. हात हा स्पर्शेंद्रियाच्या अवयवांतील प्रधान अवयव होय. कान, डोळे यांचें मुखत्यारपत्र हातास दिल्याशिवाय तर चालत नाहींच, पण वर दर्शविल्याप्रमाणें, जिव्हा व मन यांचेंहि काम पुष्कळ वेळां हातास मुखत्यारपत्र दिल्याखेरीज तडीस जात नाहीं.

शिक्षणाचा खरा, शास्त्रोक्त व उपपत्तिसिद्ध मार्ग म्हटला म्हणजे मनाची प्रत्यक्ष वस्तूशीं गांठ घालून देणें हा होय. ज्या गोष्टी मुलांस कित्येक व्याख्यानें देऊनहि कदाचित् समजणार नाहींत त्या त्यांस प्रत्यक्ष वस्तु-दर्शनानें तेव्हांच समजतात. उदाहरणार्थ, ग्रहणाची कल्पना वस्तु साहाय्या-वांचून मुलांस समजावून देणें किती तरी कठिण आहे ! पण वस्तूंच्या साहाय्यानें का होईना, शिक्षकानें मुलांस दुरून समजावून दिलेली गोष्ट जर मुलांच्या मनावर एकपट बिंबेल तर तीच गोष्ट, मुलानें स्वतः आपल्या हातानें करून तिचा अनुभव पाहिला असतां दसपट अधिक बिंबेल. ज्ञान जसें हातानें गोष्ट घडल्यानें डोक्यांत शिरतें तसें तें कानांतून किंवा डोळ्यां-तून शिरत नाहीं, व जी गोष्ट ज्ञानार्जनाची तीच ज्ञान व्यक्त करण्याची. ज्ञानार्जनासंबंधानें अलीकडे किंडरगार्टनपद्धति अमलांत आलेलीच आहे. ज्ञान व्यक्त करण्यासंबंधानें ड्रॉइंगचा प्रघात पडला आहे तसाच तो हात-कामाचाहि पडणें जरूर होतें. हात हा मनाचा जसा मदतगार आहे तसा तो चूक काढणारा टीकाकारहि आहे. मनांतील कल्पना व्यक्त करतांना तसाच तोंडानें केलेल्या गडबडगुंड्यांत गुरफटून राहिलेली चूक सहसा लक्षांत येत नाहीं. पण तीच कल्पना हातानें व्यक्त करूं लागलें असतां झालेली चूक करणाराच्याहि लक्षांत चटकन येते; मग पाहणाराच्या येईल तर नवल नाहीं. भूमितीचे सिद्धान्त सत्य आहेत अशी मनाची खात्री असते खरी; व पूर्वीच्या भूमितिशिक्षणाच्या पद्धतींत त्या सत्यप्रमेयांचा उच्चार अनेक वेळां होऊन जाई. पण हल्लींच्या नव्या पद्धतींत मुलानें सिद्धान्तकृत्य कंपासपट्टीच्या साहाय्यानें हातानें केल्यामुळें त्या सिद्धान्तकृत्याच्या सत्यप्रतीतीचा जो आनंद त्याला लाभतो तो पूर्वीच्या पद्धतींत खास मिळत नसला पाहिजे.

पण केवळ एखादा गूढ विषय अधिक सुलभ रीतीनें शिकण्याकरितांच विद्यार्थ्यांकडून हाताचा उपयोग करविला पाहिजे, एवढेंच नव्हें, तर शक्य असल्यास व शक्य असेल तेथपर्यंत जीवनोपयोगी अशा कलांचें ज्ञान मुलांस त्यांच्या अल्पवयांत मिळणें इष्ट आहे. अर्थात् या कलांचें शिक्षण म्हणजे तें पुस्तकांपेक्षां हातानेंच अधिक व्हावयाचें असतें. शिक्षणक्रमांत आजपर्यंत कलांवर सर्वस्वीं बहिष्कारच पडला आहे. पूर्वी इतिहास, न्याय, व्याकरण, तत्त्वज्ञान, गणित वगैरे विषयांवरच सर्व भर असे. अगदीं अलीकडे शास्त्रीय विषयांचा

समावेश त्यांत होऊं लागला आहे. पण शास्त्र हा विषयसुद्धां एका अर्थी तात्त्विक व पुस्तकांच्या साहाय्यानें शिकण्याचा असतो. कलेच्या अभ्यासाची गोष्ट तशी नाहीं. कलेचें बहुतेक शिक्षण क्रियात्मकच असतें. शास्त्र हें समजून घेण्याचें व मनन करण्याचें असतें. पण कला ही प्रत्यक्ष हातानें करण्याची क्रिया असते. शास्त्राच्या अभ्यासांत पुस्तकी ज्ञान हें मुख्य व हस्तक्रिया ही गौण व उपकारक असते. याच्या उलट, कलांच्या अभ्यासांत हस्तक्रिया हीच मुख्य असून पुस्तकी ज्ञान हें गौण व उपकारक असतें. मनुष्यमात्राच्या जीविताला तात्त्विक ज्ञान व शास्त्रीय ज्ञान अर्थातच उपयोगी आहे; कारण त्याच्या योगानेंच जीवनोपयोगाच्या व सुखाच्या नवीन कल्पना सुचतात. पण कल्पना वठविणें हें काम कलांचें अर्थात् हातांचें आहे व ही हस्तक्रिया जर बरोबर न होईल तर कल्पना सुचून आणि न सुचून सारख्याच निरुपयोगी होणार! 'क्रियेवीण वाचाळता व्यर्थ आहे' हा समर्थांचा फटकारा तोंडाच्या बडबडीप्रमाणें डोक्यांतील ज्ञानासहि लागू आहे. म्हणून शास्त्रीय व तात्त्विक शिक्षणाच्या जोडीला कलांच्या शिक्षणाचा समावेश शिक्षणक्रमांत झाला तरच तें शिक्षण अविकलांग, सर्वांगसुंदर व यशस्वी होईल, एरवीं होणार नाहीं.

हस्तक्रियेची जोड मिळाल्याशिवाय, पर्वतांच्या गुहांतून राहाणारे रानटी लोक किंवा पारध करून उपजीविका करणारे वनचर यांची आणि आर्किमिडीजपासून लॉर्ड केलविनपर्यंत झालेले सर्व तात्विक शास्त्रज्ञ यांची योग्यता सारखीच भरेल. कारण डोक्यांत ज्ञान पुष्कळ आहे व कल्पना हव्या तितक्या सुचतात, परंतु त्यांना मूर्त स्वरूप देण्याचें साधन किंवा कौशल्य जर पदरीं नाहीं तर त्याचा काय उपयोग? आर्किमिडीजनें अशी एक प्रचंड कल्पना मनांत बांधली होती कीं, पहारेची तरफ लावून आपण जसा एखादा जड धोंडा उलथून टाकतो, तसाच पृथ्वीच्या बाहेर दुसऱ्या एखाद्या गोलावर आधार (फलक्रम) मिळून यथाप्रमाण पहार मिळेल तर ही पृथ्वी म्हणजे हा भूगोलहि सहज उलथून टाकतां येईल. कल्पना उदात्त खरी; व कोणी गणित करण्यासच बसेल तर पृथ्वी उलथून टाकण्यास केवढी शक्ति व ती उत्पन्न करण्यास साधनीभूत अशी केवढी पहार लागेल हेंहि नक्की सांगतां येईल. पण

उपयोग काय? आर्किमिडीजची कल्पना कोणाच्याहि जन्मभर मनांतल्या मनांतच राहणार. क्रोधास चढलेला बालवीर कुश म्हणतो, ' मारीन पन्नग मी फोडिन शेषटाळू। भूगोल हा उलथितां मज नाहि वेळू; ' पण याच्या उलट, जो खरोखरच आपल्या हातानेंच पहारेची तरफ चालवून आपल्या मार्गांतील दगडाचा अडथळा दूर करितो, किंवा दगडानें व्यापलेली भूमि आपलीशी करून उपयोगाला आणितो, त्याचें यश आर्किमिडीजच्या यशाहून व्यावहारिकदृष्ट्या खचित अधिक भरेल. जगांतील सुधारणेचा इतिहास हा निवळ तात्त्विक ज्ञानाचा इतिहास नसून सक्रिय ज्ञानाचा आहे, किंवा कलाकौशल्याच्या व कारागिरीच्या हत्यारांचा इतिहास आहे असें म्हटलें तरी चालेल. कुदळ, करवत, रंधा, हातोडा, गुण्या, टाकी आणि कानस या कारागिरीच्या अवघ्या सात हत्यारांनीं रानटी मनुष्य व सुधारलेला मनुष्य यांतील सर्व फरक निर्माण केला आहे. पूर्वीं हीं हत्यारें माणसाच्या शक्तीनें चालविलीं जात; आणि अलीकडे शास्त्रीय शोध लागल्यापासून हीं हत्यारें पंचभूतात्मक शक्तीच्या योगानें चालविलीं जातात. परंतु कारागिरीच्या हत्यारांचीं मूलतत्त्वें कायमच आहेत; व पंचभूतांची शक्ति मदतीला घेतली तरी मनुष्याच्या हस्तक्रियाकौशल्याची जरूर नाहींशी झालेली नाहीं. म्हणून या सुधारणेच्या काळीं देखील मुलांना लहानपणीं कारागिरीच्या हत्यारांची ओळख करून दिली पाहिजे. मातीच्या घरकुलापासून तों आधुनिक काळच्या राजवाड्यापर्यंत इमारती बांधण्याला, साध्या नांगरापासून तों सुधारलेलीं व गुंतागुंतीचीं शेतकीचीं आउतें चालविण्याला, झाडाच्या बुंधांतून पोखरून केलेल्या डुबाऊ नावेपासून तों पी. अँड ओ. ची आगबोट बनविण्याला, धनगराच्या अंगावरील जटिली कांबळ्यापासून तों हिंदी संस्थानिकाच्या अंगावरील भरजरी वेलबुट्टीदार कपडा विणण्याला, साध्या सुगडपणतीपासून तों हजारों रुपये किंमतीचे नक्षीदार चिनी रांजण तयार करण्याला, हातकामाची व कारागिरीच्या हत्यारांचीच गरज लागते. डोंगरांत बोगदे खणणें, पाटबंधारे बांधणें व डोंगरी जमिनीचे बगीचे करणें इत्यादि उपयोगी व सुखाच्या सोई कारागिरीच्या हत्यारांनीं हातच निर्माण करितात. शाळांतून ज्योतिषशास्त्रासारखे विषय शिकवितात हें ठीकच आहे; कारण त्यानें मन उदात्त होतें. ज्यांच्या उष्णतेवर येथें घोटभर पाणीहि तापायचें नाहीं अशा लाखों मैल

दूर असलेल्या तारकांच्या स्वरूपाचा व गुणधर्मांचा विचार कशाला शिकवितां असें आम्ही म्हणत नाहीं; तर तो विचार शिकवून त्याचबरोबर आपल्या पायाखालीं जळणाऱ्या सुखदु:खाच्या गोष्टींचा व्यवहारिक विचार व त्यास सक्रिय करण्याकरितां लागणारें हातकामाचें शिक्षणहि द्यावें असें कोणीं प्रतिपादिल्यास त्यांत वावगें तें काय आहे ?

असो; हातकामाच्या शिक्षणाची उणीव आमच्याकडेच काय, पण सुधारलेल्या पाश्चात्य देशांतहि अगदीं अलीकडच्या काळापर्यंत होती. किंबहुना १८८० पावेतों हातकामाचें शिक्षण सर्वसाधारण शिक्षणाच्या शाळांतून द्यावें ही गोष्ट तिकडील शिक्षणशास्त्रप्रवीणांसहि सुचली नव्हती. निदान तिचा अंमल झाला नव्हता. त्यापूर्वी फ्रोबेल, पेस्टॅलोझी वगैरेंच्या सूचनेवरून किंडरगार्टन पद्धत अमलांत आली होती. पण १८६८ सालीं रशियामध्यें व १८७६ सालीं अमेरिकेमध्यें हातकामाच्या शिक्षणाच्या प्रयोगास सुरवात झाली, व १८८४ च्या सुमारास तें शिक्षण कायम झालें. इंग्लंडमध्यें १८९९ च्या टेक्निकल इन्स्ट्रक्शन ॲक्टानें हातकाम शिकविण्याच्या शाळांची सुरवात होऊन पुढील अवघ्या सहा वर्षांत या शाळांची संख्या हजारबाराशेंपर्यंत गेली. इंग्लंडप्रमाणें फ्रान्स, जर्मनी वगैरे राष्ट्रांतूनहि हातकाम शिकविण्याच्या शाळा आहेत. प्रत्येक राष्ट्रांत शाळांचे प्रकार, अभ्यासक्रम, या शाळांस लागणाऱ्या खर्चाची योजना व शिक्षणावर देखरेख करणारे अधिकारी ह्या सर्वांची योजना अर्थात् निरनिराळ्या प्रकारची आहे. परंतु ह्या सर्वांच्या मुळाशीं एकच तत्त्व आहे तें हें कीं, अल्पवयांत मुलांना हातकामाचें शिक्षण देणें श्रेयस्कर असून पुस्तकी शिक्षण देण्याची जबाबदारी जशी सरकारवर व पालकांवर आहे तशीच हातकामाचें शिक्षण देण्याचीहि आहे.

हातकामाचें शिक्षण देण्याच्या बाबतींत कित्येकांस प्रथम अशी एक शंका येईल कीं, मुलांच्या डोक्यावर आधींच अभ्यासाचा बोजा इतका असतां त्यांत आणखी भर टाकणें योग्य होईल कीं काय ? कित्येकांच्या मतें शाळेंत मुलांस जें कवाईत तसेंच रेखाकला वगैरे शिकवितात तीच मुळीं चूक आहे. त्यांच्या मतें खऱ्या अभ्यासाच्या तासांतील कांहीं तासांचा अशा रितीनें अपव्ययच होतो व ही ज्यांची आधींपासूनच कल्पना त्यांना

त्यांतच हातकामाची भर पडल्यास मुलांवर तो निवळ जुलूम होत आहे असें वाटल्याशिवाय राहणार नाहीं. पण केवळ पुस्तकी शिक्षण हेंच काय तें खरें शिक्षण अशी समजूत असणें हीच मुळांत खरी चूक होय, हें त्यांच्या लक्षांत येत नाहीं. शिक्षणाची खरी उपपत्ति त्यांना माहीत नसल्यानें अशी चूक त्यांच्या हातून सहजच होते. पण कवाईत, रेखाकला वगैरेसारख्या गोष्टींनीं पुस्तकास जुंपलेल्या मुलांना एक प्रकारचा विरंगुळाच मिळतो. ड्रिल वगैरेंनीं केवळ पद्धतशीर रीतीनें नुसता शरीरास व्यायाम होतो. सबब ती बाब या ठिकाणीं बाजूस ठेवूं, परंतु ड्राइंग शिकण्यावर मुलाचे आठ-वड्यांतून एक दोन तास जाऊन जर त्याच्या मोबदल्यांत त्याला वस्तूंच्या आकृतींचें साधारण मानानें दिग्दर्शन करण्याची पात्रता आली तर ते दोन तास फुकट गेले असें केव्हांहि म्हणतां येणार नाहीं. एखाद्या कारखान्यांत एखादा युरोपियन गृहस्थ गेला व एखादा नेटिव्ह गृहस्थ गेला व त्या दोघांस एखादा नवीन पदार्थ बनविण्याचें सांगावयाचें असलें तर पुष्कळ वेळां असा फरक दिसून येईल कीं, युरोपिअन गृहस्थ कागद पेन्सिल मागून घेऊन उभ्या उभ्या चटदिशीं आपल्या मनानें योजलेल्या पदार्थाची आकृति रेखाटून कारखानदाराजवळ देईल. अर्थात् गिऱ्हाइकास काय पाहिजे या-विषयीं कारखानदारास शंका न उरतां त्याची समजूत बरोबर पटेल. तोच नेटिव्ह गृहस्थ त्यास ड्रॉइंग येत नसेल तर आपल्या मनांतील कल्पना कार-खानदारास समजावून सांगण्याचा अनेकपरी शब्द योजून प्रयत्न करील; पण गिऱ्हाइकाची कल्पना गिऱ्हाइकाजवळ व कारखानदाराची कारखानदारा-जवळ असा बेबनाव कायम राहून त्यानें मागितलें एक व यानें तयार करून दिलें भलतें अशी स्थिति होणार हें अगदीं उघड आहे. व जी गोष्ट ड्रॉइंगची तीच हातकामाची. दुसरे कित्येक अशी शंका घेतील कीं, हातकामाचीं मूलतत्त्वें म्हणून तुम्ही शिकविणार, त्यानें विद्यार्थ्यांस कोणची कला पुरी किंवा चांगलीशी येईल ? शिवाय शाळेंत जाणारा मुलगा पुढें त्या कलेचा धंदा म्हणून थोडाच करणार आहे, कीं त्याला हें शिक्षण उपयोगी पडेल. श्रमविभागाचें तत्त्व आतां सर्वसम्मत आहे, एकाला सर्व विषय शिकवून ते धंदे करण्याची पात्रता अंगीं आणून देऊं पाहणें हें हास्यास्पद आहे. पण यावर उत्तर असें आहे कीं, शाळांतून

जें हातकामाचें शिक्षण दिलें जाईल किंवा जावें तें कोणत्याहि कलेचा धंदा करण्याइतकें असेल अशी शिक्षण देणारार्चीच जर अपेक्षा नाहीं तर इतरांनीं तरी ती कां बाळगावी ? बोलूनचालून इतर विषयांप्रमाणेंच याहि विषयाचीं फक्त मूलतत्त्वेंच शिकविलीं जाणार. इतर विषयांचीं मूलतत्त्वें शिकून तरी त्या विषयांतील शिक्षण पूर्णतेस पावतें असें थोडेंच आहे. शाळेंत किंवा कॉलेजांतहि मुलांस जो इतिहास शिकवितात तेवढ्यानें कसलाहि मुलगा असला तरी तो इतिहाससंशोधक किंवा इतिहासवेत्ता थोडाच निपजतो ? अथवा राजकीय किंवा सामाजिक व्यवहारज्ञान असें त्याला थोडेंच येतें ? अर्थशास्त्राचीं मूलतत्त्वें शाळेंत शिकल्यानें मुलगा एकादी बँक काढूं किंवा चालवूं शकेल अगर एखादी बाजार पेठ हस्तगत करील, किंवा सोन्यानाण्याच्या प्रचंड देवघेवी करील असें थोडेंच आहे ? बी. ए. परीक्षेला ज्योतिषशास्त्र ऐच्छिक विषय घेतला तरी साधारण ग्रहण वर्तवावयाचें झाल्यास परंपरागत धंदेवाईक ज्योतिषीबुवांकडे जाऊन त्यांजकडून सारण्या शिकाव्या लागणारच. पण या सर्वांचें खरें कारण हेंच कीं, हर्बर्ट स्पेन्सर यानें म्हटल्याप्रमाणें कोणत्याहि विषयाचें खरें व्यवहारोपयोगी व पूर्ण असें ज्ञान शाळा किंवा कॉलेज सोडल्यानंतर मनुष्य जो उद्योग करील त्यापासूनच मिळणार आहे. खरें वाङ्मयज्ञान व नुसत्या वर्णलिपीचा परिचय या दोहोंत जें प्रमाण आहे तेंच प्रमाण कोणत्याहि कलेचा धंदा करण्यास लागणारें ज्ञान व तत्संबंधीं शाळेंत मिळणारें ज्ञान यांच्यामध्यें आहे. सुतार, सोनार, लोहार, फिटर वगैरे लोकांचे धंदे करण्याइतकें हातकामाचें शिक्षण शाळेंतून मिळणार नाहीं हें खरें, पण यांतील एखादा धंदा करण्याची पात्रता जर एखाद्या मुलाच्या अंगीं अव्यक्तरूपांत असली तर ती व्यक्त करून जरूर त्या मार्गानें पुढें अभ्यास चालविण्याची सूचना तरी या तुटपुंजी शिक्षणानें खास होईल व हा फायदा कांहीं लहान नाहीं. दुसरें असें कीं, आज शाळेंत जाणारीं मुलें किंवा त्यांचे पालक यांपैकीं कोणालाहि शिक्षण संपल्यावर केवळ लिहिण्यावाचण्याच्या म्हणजे सामान्यत: विद्वत्तेच्या नांवाखालीं येणाऱ्या धंद्याखेरीज इतर धंदा—म्हणजे अंगमेहनतीचा, कारागिरीचा वगैरे धंदा—करावा लागेल अशी फारशी आवश्यकता वाटत नसते ही गोष्ट खरी; परंतु शाळेंत जाणारीं शेंकडा शंभर मुलें पुढें केवळ

विद्वत्तादर्शक धंदे करण्यास पात्र होतीलच असें मानणें आणि तदितर दुसरे धंदे त्यांस करावे लागण्याचा संभव आहे असें न मानणें यासारखी ढोबळ चुकी कोणतीच नाहीं. शाळेंत जाणाऱ्या प्रत्येक विद्यार्थ्याच्या पालकाला आपला मुलगा फरडा कारकून, लेखक, शिक्षक, प्रोफेसर, वैद्य, वकील, मुनसफ किंवा कारभारी होईल अशी इच्छा असणें स्वाभाविक आहे. पण पालकांची ही आकांक्षा खरोखर शेंकडा किती विद्यार्थ्यांच्या हातून सफळ होते व बाकीच्यांची पुढें शाळा सोडल्यानंतर किती हाल-अपेष्टा होते हा नित्याचा अनुभव आहेच. अर्थात् अशा स्थितींत विद्वत्ते-व्यतिरिक्त एखाद्या कलेच्या तत्त्वांचा परिचय मुलांस शाळेंत झालेला असेल व तिची गोडी त्यास लागलेली असेल तर त्यापासून त्याचा कितीतरी उपयोग होईल बरें! पदवीधर झाला म्हणून तरी त्यानें एखाद्या जीवनोपयोगी व्यावहारिक कलेचाच धंदा करूं नये याला तरी कारण काय? एखाद्या चित्रकाराची अब्रु तो चित्रकार असून शिवाय बी. ए. असल्यास जशी कमी होत नाहीं, तसाच एखाद्या बी. ए. नें, समजा कीं, एखाद्या कारागिरीचा कारखाना काढला तरी कोणती हरकत नाहीं. उलट बी. ए. असल्यानें हुशार पण निरक्षर कारखानदारापेक्षां तो आपला कारखाना खचित अधिक यशस्वी करील.

श्रमविभागाचें ढोबळ तत्त्व कोणीहि मान्य करील; पण प्रत्येक मनुष्यास शक्य तर प्रत्येक उपयुक्त गोष्टीचें थोडथोडें उपयुक्त ज्ञान असल्यास त्याच्या योगानें श्रमविभागाच्या तत्त्वास बाध न येतां उलट व्यक्तिशः त्याचें स्वावलंबन मात्र वाढतें ही गोष्ट ध्यानांत ठेवली पाहिजे.

एखाद्याचा लेखकाचा धंदा चांगला चालत असला तर त्यानें मुख्यतः तोच करावा, माझ्या लेखनाचीं साधनें व उपकरणें ही सुद्धां मीच बनवीन असा हव्यास त्यानें धरूं नये, ही गोष्ट खरी; पण लेखकानें स्वतःच टांकांचा किंवा पेन्सिलीचा घरचा कारखाना न काढला तरी टांक व पेन्सिली कशा करितात यांचें सर्वसाधारण ज्ञान त्याला असल्यानें बाध येणार नाहीं. निदान एवढी गोष्ट खरी कीं, आपली पेन्सिल मोडली असतां ती स्वतः न करितां तें काम माझें नाहीं असें म्हणून जर तो त्याकरितां दुकानदाराकडे धांव घेईल तर श्रमविभागाच्या खऱ्या तत्त्वाला विशेष मदत न होतां हा मात्र

सर्वस्वी परावलंबी बनेल. कोणतीहि गोष्ट स्वतः धंदा म्हणून करणें वेगळें व तिची माहिती असणें वेगळें. ज्याला ही माहिती असते तो स्वावलंबी होतो. मनुष्यमात्राचें पीडेपासून रक्षण करणें हें पोलिसांचें कर्तव्य खरें; परंतु घरांत विंचू किंवा साप निघाला असतां तो आपल्या हातानें न मारतां जर कोणी पोलिसास बोलावण्याकरितां गेटाकडे धांवेल तर तो स्वतःस जितकें हास्या-स्पद करून घेईल, तितकाच हातकामाच्या कलेंतील सामान्य व बारीक-सारीक सुद्धां गोष्टी माहीत नसणारा मनुष्य परावलंबनामुळें हास्यस्पद होतो. श्रमविभाग ही पोषाखीपणाला नुसती सबब आहे, याहून जास्त कांहीं नाहीं. आपलें लिहिण्याचें खुर्ची–टेबल स्वतःच उत्तम नमुनेदार करणें हें विद्वान् मनुष्यास न येणें किंबहुना तें येत असलें तरी इतर रीतीनें त्याच्या वेळेची किंमत अधिक येण्यासारखी असल्यामुळें तो वेळ त्यानें खुर्ची –टेबल करण्यामध्यें घालविणें हा अपव्यय होय, व ही गोष्ट अर्थशास्त्रालाहि सम्मत होणार नाहीं, परंतु आज स्थिति मात्र अशी आहे कीं, विद्वान् किंवा विद्वानब्रुव लोकांना अंगरख्याचा एक टाका तुटला असतां तो आपल्या हातानें वेळींच घालण्याचें ज्ञान किंवा इच्छा नसते. अर्थातच इंग्रजी म्हणी-प्रमाणें एकच टांका पण तो वेळेवर न घातल्यामुळें मागाहून एकाऐवजीं नऊ टांके घालावे लागतात. व मग शिंप्याच्या तोंडाकडे पाहात बसावें लागून वेळ व पैसा दोन्हीहि अधिक प्रमाणानें खर्च होतात. त्यांना साधा स्क्रू पिळतां येत नाहीं, वाकडा खिळा नीटनेटका करून कामास लावतां येत नाहीं, हातांतील काठी रंधून किंवा घांसून साफ करून घेतां येत नाहीं, तुटलेलें बटन लावितां येत नाहीं, साधे रंग वार्निस समजत नाहीं, एखाद्या यादीप्रमाणें जिन्नस आणून शाई बनवितां येत नाहीं, चित्रास चवकट बसवितां येत नाहीं, तसबिरीचे डाग काढतां येत नाहींत–तात्पर्य, त्यांना काय काय करतां येत नाहीं, हें सांगू गेलें असतां त्याची याद फारच मोठी होईल व याचें कारण एकच व तें हें कीं, अर्थ-शास्त्रांतील श्रमविभागाच्या तत्त्वांची पायमल्ली करण्याचें पाप आपल्या हातून घडण्याची त्यांना भीति वाटते असें नाहीं; तर असल्या साध्या किर-कोळ बाबतींत लागणारें जें क्षुल्लक हातकामाचें शिक्षण तें त्या बिचाऱ्यांना वेळींच कोणीं दिलें नाहीं हें होय. तें मिळतें तर परावलंबनामुळें त्यांची

अशी दुर्दशा झाली नसती. दुसरी एक सूक्ष्म गोष्ट लक्षांत घेण्यासारखी आहे. ती ही कीं, हातकामाचें शिक्षण मुलांस दिलें असतां श्रमाचें किंवा हलकेसलकें काम हातानें करणें यांत कमीपणा आहे अशी जी परंपरानुगत एक समजूत मोठ्याप्रमाणें लहानांच्याहि मनांत खिळून राहिलेली आहे ती नाहींशी तरी होईल. वास्तविक सर्व जीवनोपयोगी कला कारागिरांच्याच हातीं असतात. व्यवहाराच्या सुखसोयी करण्याला त्यांचा जितका प्रत्यक्ष उपयोग होतो तितका विद्वानभ्रुवांचा होत नाहीं. अर्थात् कारागिरांनाहि एकप्रकारची मान्यता आहे असेंच वास्तविक समजावयास पाहिजे. कला येत असतां तिचा धंदा म्हणून उपजीविकेकडे उपयोग करावा न लागला तर उत्तमच; पण कलेचा उपयोग धंद्याच्या दृष्टीनें केला तरी त्यांत कमी-पणा तो कसला? आमच्या इकडील वर्णव्यवस्थेंत श्रमविभागाचें बीज समाजव्यवस्थाकारांनीं रोविलेलें आहे हें आपण म्हणतों खरें; पण श्रम-विभाग याचा अर्थ एकानें सर्व मान्यता आपणांकडे घेऊन सर्व अवमान्यता दुसऱ्याकडे देणें असा विभाग मात्र खचित नव्हे. श्रमविभागाला असलेंच तर समान मान्यतेचेंच अधिष्ठान असावयास पाहिजे व तें मिळेल तर जीव-नोपयोगी कलांचा धंदा करणाऱ्या लोकांना कमी मानण्याची व ते ज्या साधनांचा आणि उपकरणांचा उपयोग करितात त्यांचा उपयोग आपण केल्यास आपणास कमीपणा येतो असें मानण्याची जी एक मनाची संवय रूढ होऊन राहिली आहे ती नाहींशी होईल.

खऱ्या श्रमविभागपद्धतींत प्रसंगपरत्वें सेव्यसेवकभाव निरनिराळ्या लोकांत वांटून गेला तरी त्यापासून अन्यायाच्या किंवा गुलामगिरीच्या कल्पना मनांत येण्याचें कारण नाहीं. निदान हल्लींचा काळ तरी असा आलेला आहे कीं, त्यांत जन्मसिद्ध असे कोणतेच हक्क कोणासहि न राहतां सर्व हक्क स्पष्ट किंवा गर्भित करारानेंच उत्पन्न होतात व अशा हक्कांमुळें उत्पन्न झालेल्या अधिकारालाहि करारांचेंच म्हणजे परस्परसंमतीचेंच अधि-ष्ठान आहे. यामुळें पूर्वी पैसे देऊन कायमचा विकत घेतलेला गुलाम किंवा अशा गुलामाची संतति म्हणून बनलेला जो गुलाम त्याच्या हातून कितीहि मौल्यवान् कलेचें किंवा कारागिरीचें काम झालें तरी काम करणाऱ्याच्या कनिष्ठपणामुळें त्या कामालाहि एक प्रकारचा कमीपणा किंवा हलकेपणा

चिकटून राहत असे, तसा प्रकार होण्याचें हल्लींच्या दिवसांत कारण उरलें नाहीं. तात्पर्य, गुलामगिरी व ईश्वरनिर्मित श्रमविभागाच्या कल्पनेनें कोणीं कोणचें काम करावें व कोणचें करूं नये याविषयीं पडलेलीं कृत्रिम बंधनें दोन्हीहि नाहींशीं झाल्यामुळें हुन्नर, कला व कारागिरी अर्थात् हातानें मेहनतीनें करण्याचें काम यांविषयीं हलकेपणा वाटण्याचें कारण नाहीं.

---

## ३५. गरीब शाळामास्तरांची कैफियत

( केसरी, तारीख २८ सप्टेंबर १९२० )

प्राथमिक शाळामास्तरांची हलाखी व त्यांचे पगार वाढविण्याची आवश्यकता यांच्यासंबंधानें आम्ही केसरींतून वेळोवेळीं लिहीत आलोंच आहों. तथापि हल्लीं शिक्षकवर्गाच्या संघटित प्रयत्नानें आणि मुंबईसरकारच्या हलगर्जीपणानें हा प्रश्न निकरावर आल्याचीं स्पष्ट चिन्हें दिसत आहेत. प्राथमिक शिक्षक लोक अत्यंत गरीब, सालस, निरुपद्रवी असून मेहनती असल्यामुळेंच त्यांच्या पगारवाढीचा प्रश्न सर्वांच्याहि मागें टाकण्याची विपरीत बुद्धि सरकारास झाली कीं काय न कळे! पण एवंगुणविशिष्ट शिक्षकवर्ग हा देखील स्वाभिमानी असल्यामुळें व सर्व परिस्थितीच आतां तशी बनत चालल्यामुळें त्या वर्गानें यापुढें सरकारचा मुलाजा किंवा भीडमुर्वत न धरल्यास त्यांत कांहीं विशेष आहे असें कोणास म्हणतां येणार नाहीं. पट्टेवाल्यापासून तों पट्टाभिषिक्त सिव्हिल सर्व्हंटापर्यंत सर्व दर्जाच्या सरकारी नोकरांनीं सरकारच्या डोक्याशीं पिस्तुल रोखून आपले पगार वाढवून घेतले असतां, शिक्षकवर्गानें मात्र हात जोडून स्वस्थ बसावें व सरकार जी काय चत्कोर भाकर केवळ आपल्या खुषीनें देईल ती संतोषानें पदरांत घ्यावी अशी कोणीहि अपेक्षा करणार नाहीं. शिक्षकवर्गाचें महत्त्व सरकारला कळत नसलें तरी समाजाला चांगलें कळतें. शिक्षण व ज्ञान यांच्या नद्या पुढें मोठ्या फुगून पश्चिमसमुद्राला मिळोत, परंतु या सर्व नद्यांचे मूळ झरे ज्या क्षेत्रांत उत्पन्न होतात त्यांची बांधबंधस्ती व रखवाली करणें आणि त्या झऱ्यांचें पाणी शुद्ध व पवित्र राखणें हें जोखमीचें काम प्राथमिक शिक्षक

लोकच करीत असतात. "देशांतील कायदे करण्याचें बहुमानाचें काम वाटेल त्यानें घ्यावें, पण कोंवळ्या मनाच्या मुलांना शिक्षण देण्याचें काम मला लाभो, याशिवाय मी ईश्वराजवळ दुसरें कांहीं मागत नाहीं," अशी एका प्रसिद्ध इंग्रज शिक्षकाची उक्ति सर्वमान्य होऊन ती तिकडे म्हणच बनून गेली आहे; व आमच्या इकडील शिक्षकवर्गालाहि ही म्हण योग्य अभिमानानें स्वतःस लावून घेतां येईल. एखादा कर्ता पुढारी पुढें कितीहि नांवाजला तरी बालपणीं आपण ज्याच्याजवळ श्री—ग शिकलों त्याच्याविषयीं प्रेम व आदर तो निरंतर बाळगतो असें आढळतें; याचें कारण झालें तरी हेंच होय.

अशा शिक्षकवर्गाला विशेष सवलतीनेंहि सरकारनें वागविलें असतें तरी कोणीं त्यांस नांव ठेवलें नसतें; परंतु विशेष औदार्य दाखविण्याऐवजीं सरकारचा विशेष कृपणपणाच त्यांच्या वांट्याला आजवर आलेला आहे. दुसरीहि एक गोष्ट सांगितली पाहिजे, पण ती सांगण्यांत कोणावर शिंतोडा उडविण्याचा मात्र आमचा हेतु नाहीं. ती गोष्ट ही कीं, सरकारी नोकरीच्या बहुतेक खात्यांतून पट्टेवाल्यापासून तो हेडक्लार्क किंवा शिरस्तेदारापर्यंत प्रत्येकाला कांहींना कांहींतरी अवांतर मिळकत, किंवा प्रतिष्ठित भाषेंत बोलावयाचें तर 'दरबारखर्चाचा अंश' मिळूं शकतो. या सर्वांनींच पापानें हात धुतले आहेत असें म्हणणें नाहीं. तथापि स्थलकाल, कामकाजाचें महत्त्व व स्वतः मिळवत्या माणसाची हुशारी यांच्या अनुरोधानें या अनेक नोकरांना अडलेले किंवा काम फत्ते झालेले लोक खुषीनें अगर नाखुषीनें कांहींना कांहीं पोंचवूं शकतात ही गोष्ट नाकबूल करण्यांत अर्थ नाहीं. पण दुर्दैवानें—किंवा सुदैवानेंच म्हटलेलें अधिक बरें—बिचाऱ्या शाळामास्तरला मात्र आपल्या पोटगींत अवांतर भर टाकण्यास फारसें साधन नसतें. त्यानें फार तर सरस्वतीपूजनाची मिळालेली सुपारी चघळावी, किंवा अप्रामाणिक बनून हात चालविण्याचेंच त्यानें मनांत आणलें तरी सादिलवारांतील 'शेणा' हून त्यास अधिक कांहीं खातां येईल असें वाटत नाहीं. पूर्वीं कदाचित् असा एक काळ होता कीं, शाळामास्तरची अपूर्वाई वाटून खेडेगांवचे साधेभोळे लोक शाळामास्तरचें नांव हक्कदार अलुतेबलुतेदारांच्या यादींत घालून त्याला दर हंगामाला येणाऱ्या उत्पन्नांतील मूठभर धान्य, भाजी वगैरे पोंचवीत. पण या नव्या खडतर काळांत मिळकतीची ती

कूसहि नाहींशी झाली. खेडेगांवांतून खासगी शिकवण्याहि शहरगांवां-प्रमाणें मिळत नाहींत. क्वचित् गांवपोस्टमास्तरच्या कामगिरीकरितां लहानशी रक्कम मिळते; पण वॉर अलावन्स देतांना शाळाधिकारी ही रक्कम वजा घालतात असें म्हणतात. वरील सर्व गोष्टींवरून हेंच निष्पन्न होतें कीं, शाळामास्तरानें केवळ जगून आपलें काम करावें म्हटलें तरी बाजार-निरखांच्या बरोबरीनें त्याचे पगारहि वाढले पाहिजेत. पण सरकारनें त्यांज-कडे या दृष्टीनें केव्हांहि पाहिलेलें नाहीं.

सुमारें तीस वर्षांपूर्वी शाळामास्तराला पांच रुपये पगार होता तो १८९२–९३ चे सुमारास सात रुपये करण्याचें श्रेय ना० सेटलवाड व इतर कौन्सिलचे लोकनियुक्त सभासद यांनीं घेतलें. त्यानंतर त्यांच्या पगाराची सरसकट वाढ १९१२ च्या सुमारास अल्पप्रमाणानें झाली. १९१८ सालीं ही पगाराची वाढ १०-१२-२५-४०-६० येथपर्यंत झाली; व पुढील सालीं वरवरचे पगार कायम राहून खालच्या पगारांत फक्त १० चे १२ व १२ चे १५ असे पगार वाढविण्यांत आले. पण गेल्या ३० वर्षांत बाजारनिरख ज्याप्रमाणें वाढले त्याप्रमाणें पगार मात्र वाढले नाहींत. अन्ट्रेन्ड मास्तर व पहिल्या वर्षाच्या सर्टिफिकिटाचा मास्तर यांच्या पगाराची वाढ दोन ते अडीचपट इतकी झाली, पण बाजारभाव मात्र तिपटीहून अधिक वाढले. याहून वरच्या दर्जाच्या मास्तरांच्या पगारांचे बाजारनिरखाशीं प्रमाण तर इतकेंहि बसत नाहीं. कारण ४० व ६० हे जे कमालीचे पूर्वींचे पगार तेच अद्यापि कायम आहेत; व दरम्यान जर तपास केला तर असेंच आढळून येईल कीं, पगाराचें स्केल कागदावर जें लिहिलेलें आहे तेंहि प्रत्यक्ष पदरांत पडत नव्हतें. पगार व बाजारभाव यांचें प्रमाण होतां होईतों मिळतें रहावें ही गोष्ट सरकारास समजत नाहीं, असें नाहीं. मुंबईसरकारनें या बाबतींत गेल्या जानेवारींत हिंदुस्थानसरकार-कडे नोकरांच्या पगारवाढीबद्दल जें पत्र लिहिलें त्यांत बाजारनिरख कसे वाढले आहेत, व ते लक्षांत घेतां मोठ्या व लहान शहरीं सामान्य प्रतीच्या एका कुटुंबास केवळ जगण्यास काय खर्च लागतो, याचा फारच सूक्ष्म रीतीनें आंकडे मांडून विचार केला आहे. हरखात्यांतील सरकारी नोकर हा उपजीविकेच्या दृष्टीनें सारखाच, म्हणून किमान मर्यादा ठरवितांना ही

आंकडेमोड लक्षांत घेऊनच पगार ठरविले गेले असते तर कोणास तक्रारीस फारशी जागा नव्हती. पण हिंदुस्थानसरकारला लिहिण्याचें माप वेगळें आणि प्रत्यक्ष नोकरांच्या पदरांत टाकण्याचें माप वेगळें अशी मुंबईसरकारची कृति असल्याचें उघड दिसतें.

बरें, वरिष्ठ सरकारकडे कळविलेलें प्रमाण केवळ कमालीचें असें म्हटलें तरी आपल्याच निरनिराळ्या खात्यांत पगार वाढवितांना मुंबई सरकारनें जें धोरण ठेविलें तेंहि सुसंगतपणाचें नाहीं. शाळामास्तर व मुलकी अगर न्यायखात्यांतील शेवटच्या दर्जाचा कारकून यांच्या योग्यतेंत फरक मानण्यास कांहींच कारण नाहीं. असें असतां एकाचा पगार सात तर दुसऱ्याचा बारा व एकाचा बारा तर दुसऱ्याचा वीस, असे पगार पूर्वापार ठेवण्यांत आले आहेत. हल्लीं कारकुनीखात्याचे किमान पगार वाढविल्याचें जें पत्रक प्रसिद्ध झालें आहे त्यावरून पाहातां हा फरक तर अधिकच वाढला आहे. उदाहरणार्थ, केवळ मराठी सातवी इयत्ता पास झालेला मनुष्य रेव्हिन्यु-खात्यांत कारकुनीच्या जागेवर लावून घेतां येतो. तो घेतल्यास, नवीन व्यवस्थेप्रमाणें त्यास सुरुवातीस ३० रुपये पगार मिळून ८० रुपयांपर्यंत तो बिनबोभाट वाढत जाणार. पण हाच मनुष्य आज शाळाखात्यांत शिरल्यास त्याला फक्त १६ रुपये मिळतील व पुढें एक रुपयाहि वाढण्याचा संभव नाहीं. फारच तर तो स्वतंत्र शाळामास्तर झाल्यास त्याला फक्त १९ रुपये पगार मिळेल. ट्रेनिंग कॉलेजचीं सर्टिफिकिटें मिळविलेले शिक्षक विचारांत घेतले तर ही तफावत याहूनहि अधिक पडते. तिसऱ्या वर्षाचें सर्टिफिकेट मिळविलेल्या शिक्षकाला मराठी बी. ए. म्हणण्याचा प्रघात आहे, व त्याला मिळणारें ज्ञान लक्षांत घेतां ही पदवी अगदींच फुकट आहे असेंहि म्हणतां येत नाहीं. असें असतां यू. एस्. एफ्. पास झालेल्या मनुष्यास सुरवात ४० रुपयांवर होते तर या मराठी बी. ए.ला फक्त २५ रुपये मिळणार, व ४० मिळावयाचे तर त्यानें आणखी पंधरा वर्षे म्हणजे निम्मी नोकरी घालविलेली पाहिजे. बरें, सरकारजवळ पगारवाढीस पैसा नाहीं असें म्हणावें तर पब्लिकवर्क्सखात्यासारख्या कांहीं खात्यांतून स्केल वाढविण्यांत मुंबई सरकारनें कर्णासहि लाजविलें आहे. कारण नवीन स्केल अंमलांत येण्यापूर्वी ज्या ओव्हरसीअरला ६० रुपये पगार होता

त्याला एकदम २५० ते ३०० पर्यंत रुपये पगार झाल्याचीं उदाहरणें आहेत ! मुनसफ, मामलेदार, डेप्युटी कलेक्टर यांचे पगारहि बरेच वाढले आहेत. मुनसफाचा पगार दुप्पट वाढला, मामलेदाराचा दीडपट तरी वाढेल व ते तेवढ्यावरहि खुष नाहींत. पण १५०–२०० रुपये ज्यांस आगाऊच मिळत आहेत अशा लोकांच्या पगारांत ज्या प्रमाणानें वाढ झाली त्यापेक्षां कनिष्ठ प्रतीच्या नोकरांच्या पगारांत अधिक वाढ झाली पाहिजे. दोहोंना एकच प्रमाण लावतां येत नाहीं ही गोष्टहि मुंबईसरकारनें लक्षांत घ्यावयास पाहिजे होती.

असो; हें सर्व युक्तिवादाचें विवेचन झालें. पण लक्ष घातलें असतां स्वतः सरकारास न सुचेल असा युक्तिवाद आम्ही अतज्ज्ञ टीकाकार कोणता करणार, किंवा सरकारास ठाऊक नाहींत अशीं कारणें आम्ही आपलें डोकें चालवून किती सुचविणार ? शाळामास्तरांना न्याय देण्याचें काम खात्याचा अभिमान धरून डायरेक्टरसाहेबांनींच करावयास पाहिजे होतें. अबकारी, फॉरेस्ट, पब्लिकवर्क्स वगैरे खात्यांच्या मुख्य अधिकाऱ्यांनीं मात्र नेटानें आपली कारवाई यशस्वी करावी, आणि विद्याधिकाऱ्यांनीं मात्र रेंगाळत बसावें हें त्यांस फारसें भूषणावह नाहीं. इतर खात्यांतील कामाच्या मानानें शाळामास्तरांचें काम हलकें किंवा बिनश्रमाचें असें डायरेक्टरसाहेबांना वाटत असल्यास मग मात्र आमचा नाइलाज आहे ! 'चाकरी मिळेना तर माग भीक, व कोणी वाढीना तर पंतोजीपणा शीक' ही म्हण आजच्या शिक्षकांच्या हलाखीची पूर्णपणें द्योतक अशीच आहे. धर्मोपदेशक, भिक्षुक, मिशनरी यांच्याप्रमाणें शिक्षक लोकहि अनेक देशांतून विनोदाचा विषय होऊन बसलेले असतात. पण तें त्यांची कामगिरी कमी महत्त्वाची म्हणून नव्हे, तर त्यांच्या धंद्यांत सालसपणा व निरुपद्रवीपणा हाच गुण असतो म्हणून. गरीब गाईच्या पाठीवर कोणींहि थाप मारावी, चावऱ्या कुत्र्याच्या वाटेला कोण जाणार ? लेखणीनें डोळ्यांतलें काजळ काढून घेणारा कारकून, चावडींतील रकट्यावरून बादशाही गाजविणारा पाटील, दीड हात दंडुक्याच्या बळावर जुलूम करणारा पोलीस, लोकांना मद्यपी बनवून कलालाचें व सरकारचें घर भरणारा अबकारी खात्याचा नोकर, यांची कामगिरी सर-

कारच्या डोळ्यांत भरावी; आणि रात्रीं कोणाला न कळत शेतावर पडून धान्याला अंकुर फुटविणाऱ्या परोपकारी पावसाप्रमाणें लोकांच्या डोळयां-आड खेडेगांवांत बसून कोंवळ्या मुलांच्या मनाला वळण लावण्याचें कार्य करणाऱ्या शाळामास्तराचें काम सरकारच्या डोळ्यांत भरूं नये हा केवळ कालमहिमा म्हटला पाहिजे ! पण सरकार गप्प बसलें म्हणून स्वतः शिक्षकांना तरी गप्प बसतां येत नाहीं. आपल्या पोटाची व्यवस्था त्यांना पाहिलीच पाहिजे. यामुळें अशा निरुपद्रवी लोकांकडूनहि चळवळ व संघशक्ति उत्पन्न करण्याचें काम झाल्याशिवाय राहिलें नाहीं. किंबहुना गुजराथेंतील शाळा-मास्तरांनीं संप करून एकदम चळवळीचें तीव्र रूप दाखविल्यापासूनच इलाख्यांतील शाळामास्तरांच्या चळवळीला सुरुवात झाली आहे. संप-वाल्यांच्या मागणीप्रमाणें वॉर-अलावन्स तर देण्यांत आलाच, पण एकंदरीनें शाळामास्तरांच्या पगारवाढीबद्दल शाळाखात्यानें आपण होऊन पुढील योजना करावयास पाहिजे होती ती मात्र केली नाहीं. पुढें व्यक्तिशः अर्ज होऊं लागले, कायदे-कौन्सिलांतहि प्रश्नोत्तरें सुरू झालीं, तेव्हां सरकारनें मास्तरांचे पगार थोडथोडे वाढविले; पण ही वाढ वास्तविक कोणत्याहि नव्या पक्क्या योजनेस अनुसरून केली असें नसतां जुन्या स्केलप्रमाणें जो पगार ज्याला मिळावयास पाहिजे होता तो फार तर देण्यापलीकडे कोठेंहि मजल गेली नाहीं. याशिवाय पसंत्यनुरुप म्हणून शेंकडा दहा इतक्या जागांचे कमालीचे पगार वाढविण्यांत आले. पण त्यानें फारच थोड्या लोकांची गैरसोय निघाली. शिवाय बाजारभाव कडकल्यानें कनिष्ठ दर्जाच्या, सर्वांत कमी पगार मिळणाऱ्या लोकांचा म्हणून जो विशेष विचार व्हावयास पाहिजे होता तो झाला नाहीं. अर्थात् सामुदायिक चळवळ केल्याशिवाय भागत नाहीं असें पाहून प्रांतीय शिक्षकपरिषदेची कल्पना निघाली व पुणें व सोलापूर या दोन ठिकाणीं तिच्या बैठकांहि झाल्या. या दुसऱ्या बैठकींत मास्तरांच्या पगारवाढीबद्दल जी मागणी मुक्रर झाली ती योग्य असावी अशी खात्री होण्यास, परिषदेचे अध्यक्ष ना० साठे यांच्या सारखे विचारी व शांत डोक्याचे गृहस्थ होते. याशिवाय वेगळें कारण सांगण्याची गरजच नाहीं. किंबहुना शाळामास्तरांनीं योजलेली अधिक पगाराची मागणी मर्यादित करून ती न्याय्य आहे असा ना० साठे यांनीं

अभिप्राय दिल्यावरूनच शिक्षकवर्गानेंहि ती मान्य केली. अर्थात् या मागणीबरहुकूम तरी पगार वाढावे, किंबहुना ते ताबडतोब पदरांतहि पडावे, त्याला आतां एक क्षणाचाहि विलंब लागूं नये, असा आग्रह शिक्षकवर्गानें धरल्यास तो वावगा आहे असें कोणासहि म्हणतां येणार नाहीं.

असो; मागणी ठरली व ही मागणी अमान्य झाल्यास पुढें काय करावें याचा विचार शिक्षकवर्ग व त्याचे सल्लागार मिळून योग्य तो करतीलच. म्हटलें तर चहूंकडे संपाचें हत्यार सर्वांनींच उचललें आहे, गुजराथेंत संप होऊनहि चुकला व विलायतेंतील प्राथमिक शिक्षक संप करणार अशा बातम्या जाहीर रीतीनें इकडे येऊन थडकल्या आहेत. या दृष्टीनें पहातां शिक्षकवर्ग स्वभावतः सालस निरुपद्रवी असतांहि त्यांनीं संपास प्रवृत्त व्हावें यांत कोणास आश्चर्य वाटणार नाहीं. तथापि हा अनिष्ट प्रकार घडून येऊं नये अशी आमची इच्छा असल्यामुळें असें आम्ही सुचवितों. सरकारनें या कामीं वेळींच लक्ष घालावें; व शिक्षकवर्गाचें भांडण कमाल-मर्यादेचा पगार अगर जागा बेसुमार वाढाव्या अशाकरितां नसून, केवळ जगण्यास जेवढा पगार आज अवश्य आहे तेवढाच मिळण्यापुरतें आहे ही गोष्ट लक्षांत घेऊन ताबडतोब ती तक्रार सरकारनें दूर करावी. नाहीं तर संप होऊन सरकार व शिक्षक यांच्या संबंधांतील अब्रूचें कांचेचें भांडें एकदां फुटलें म्हणजे तें फिरून सांधलें जाणार नाहीं. शाळामास्तरांनीं संप केला म्हणून सरकारचें कोणतेंच काम प्रत्यक्ष अडणार नाहीं ही गोष्ट आम्हांस माहीत आहे. किंबहुना प्लेगांत शाळा बंद पडतात तशाच फारतर संपांत बंद पडतील असली उक्ति कित्येकांनीं काढल्याचेंहि आमच्या कानावर आलें आहे. त्याला उत्तरच द्यावयाचें तर 'आमचेंहि या कामामुळें अडलें नाहीं' असें म्हणून व संप करून शिक्षक लोक उत्तर देण्यास समर्थ आहेत. पण सरकारचा बेगुमानपणा अधिक किंवा शाळामास्तरांची तडफ अधिक याची झुंज लावून परीक्षा पहाण्याची ही वेळ नाहीं, व त्यांत फायदाहि कोणाचा नाहीं. सर्वच गोष्टि सामोपचारानें झालेल्या बऱ्या. पण शाळामास्तर म्हणजे कोणत्या झाडाचा पाला अशा समजुतीनें ते आजवर रगडले गेले तसेच यापुढेंहि रगडले जाऊं नयेत इतकीच आमची इच्छा असल्यामुळें, आम्हीं या प्रश्नास मुद्दाम महत्त्व देऊन त्याची आज थोडक्यांत चर्चा केली

आहे. राखून ठेवलेलीं खातीं आवडतीं व तोडून दिलेलीं नावडतीं असा भेद कदाचित् सरकारास वाटण्याचा संभव आहे. पण हेंहि खरें नाहीं. कारण ज्यांत पगाराची वाढ केली अशा तोडून दिलेल्या खात्यांचींहि उदाहरणें सहज दाखवितां येतील. अर्थात् शाळाखात्याचे पगार न वाढले तर सरकार या एकाच खात्याला विशेष तुच्छ मानतें व या एकाच खात्यांतील नोकरांच्या अंगीं स्वाभिमानाचा विशेष अभाव आहे याशिवाय तिसरें अनुमान आमच्यासारख्या तिऱ्हाइतास तरी काढतां येणें शक्य नाहीं; व या प्रकरणाचा निकाल लागेल तेव्हां या दोहोंपैकीं खरें अनुमान कोणतें हें आपोआपच सिद्ध होईल.

---

# ३६. हे जबाबदार दिवाण !

( केसरी, ता. २८ जून १९२१ )

नवीन शिक्षणमंत्री रघुनाथराव परांजपे यांनीं जडजोखमीच्या सरकारी कार्यधुरेला मान लवविल्यापासून फार काळ लोटला आहे असें नाहीं; तथापि तेवढ्याहि काळांत त्यांना शिक्षणविषयक एखादी नक्की योजना लोकांपुढें मांडतां आली असती. पण अशा एखाद्या नक्की योजनेच्या-ऐवजीं त्यांनीं अनिश्चित तात्पर्याचीं अशीं दोनतीन जाहीर भाषणें मात्र केलीं. आम्ही तर काय बोलूनचालून राज्यकारभाराच्या कक्षेबाहेर राहिलेले बेजबाबदार लोक ! आम्हांला जबाबदार राज्यकारभाराच्या मर्यादा कळत नसल्यामुळें आम्हीं परांजप्यांच्या कारभारावर आजवर सहसा फारशी टीका केली नाहीं. पण या मर्यादा नीट ओळखणाऱ्या त्यांच्याच पुढ्यांतील कांहीं लोकांनीं त्यांची अमर्यादा करून रेवडी उडविली आहे; अशा वेळीं आम्हीं एखादा टीकेचा शब्द लिहिला तर आतां हेतुविपर्यास तरी होणार नाहीं. परांजप्यांच्या मदतगार पक्षांतील एका पत्रानें तर परांजप्यांवर इतकी जहाल टीका एकसारखी चालू ठेविली आहे कीं प्रो० काळ्यांना ती करणाराला पिसाळलेल्या कुत्र्याची उपमा द्यावीशी वाटली व ' ज्ञानप्रकाशकारां 'नीं तिला आपली मान्यता दिली ! पण स्वतः ज्ञानप्रकाशकारांना ही टीका-

पद्धति अगदींच अपरिचित आहे असें नाहीं. लो० टिळकांच्या मृत्यूच्या आधींपासूनच पण विशेषतः त्यांच्या मृत्यूनंतर ज्ञानप्रकाशानें केळकरांवर वेळीं-अवेळीं, सकारण-निष्कारण, वेडीवांकडी, उलटीसुलटी, संस्कृत-प्राकृत अशी टीका किती केली असेल हें ज्ञानप्रकाशकारांना माहीतच आहे. असो, अशा टीकाकाराला प्रोफेसर काळ्यांनीं पिसाळलेला कुत्रा म्हटलें, तरी पण खुद्द काळे यांनाहि शिक्षणमंत्री परांजपे ह्यांचें काम पसंत न पडल्याचें उघड बोलून दाखविल्याशिवाय राहवलें नाहीं हें लक्षांत ठेवलें पाहिजे. त्यांनाहि सहा महिन्यांच्या कारभारांत व्हावी तेवढी प्रगति दिसून आली नाहीं. पण त्यांना परांजप्यांच्या मार्गांतील अडचणी दिसत नाहींत असा ज्ञानप्रकाश-कारांचा त्यांच्यावरहि शेरा आहेच. अडचणींची सबबच सांगावयाची, तर बाहेर राहून देखील ती कोणासहि सांगतां आली असती. त्याकरितां सहा महिन्यांत तीस चाळीस हजार रुपये खर्ची पडण्याचें फारसें कारण नव्हतें. इतकेंहि होऊन दुसऱ्यावर कुत्सित टीका करण्याची स्वतः परांजप्यांची द्वाड खोड जात नाहीं ती नाहींच. कौन्सिलाबाहेर राहणाऱ्या लोकांना त्यांनीं 'शेख महंमदा'ची उपमा दिली आहे. मॅकमिलन कंपनीलाच फिरून मराठी क्रमिक पुस्तकांच्या फायद्याचा आणखी एक वर्ष मलिदा चारतांना परांजप्यांनीं शेख महंमदाच्या गोष्टींचीं पानें चाळलेलीं दिसतात. 'घाण्याच्या बैला'ची गोष्ट कदाचित् या पुस्तकांत नसेल म्हणून ती मात्र कांहीं खोटी नाहीं. असहकारितावादी व कांहीं सहकारितावादीहि जर शेख महंमद ठर-तात तर खुद्द परांजप्यांनाहि घाण्याच्या बैलाची उपमा देण्यास काय हरकत? प्रो० काळे ह्यांच्या टीकेप्रमाणें सहा महिन्यांत परांजप्यांनीं कांहीं प्रगति करून दाखविली नाहीं हें जर खरें असेल, तर एका युरोपिअनानें शिक्षणखात्याच्या घाण्याचें जूं मानेवरून टाकून दिलें व परांजप्यांनीं तेंच आपल्या मानेवर घेऊन डोळ्यासमोर पण हातभर अंतर कधीं न तुटेल अशा बांधलेल्या पांच हजार रुपयांच्या पेंडीकडे पाहून पूर्वींप्रमाणें वाटोळें फिरण्याचें काम चालविलें, यांत जनतेला लाभ तो कोणता झाला?

शिक्षणमंत्र्याची जागा हातीं येतांच सक्तीच्या शिक्षणाचा प्रश्न आज-मितीस एकदम प्रचारांत आणणें शक्य नाहीं असें विधान परांजप्यांनीं केलें. त्याबद्दल त्यांच्याकडे लोक निंदाव्यंजक ठराव करून पाठवीत अस-

त्याचें त्यांनींच कबूल केलें आहे. ठीकच आहे, लोक असे ठराव कां न करतील ? परांजप्यांनीं विधान केलें त्यापेक्षां सरकार गोखल्यांना तरी वेगळें काय सांगत होतें ? लोकांची तयारी कितपत आहे, हें अजमावणें रास्त आहे. पण त्याबद्दल परांजप्यांनीं लोकांना टोमणा मारण्याचें कारण नाहीं. लोकांची संमति, पैशाची अनुकूलता व थोडया काळांत पुष्कळ घडवून आणण्याची शक्यता, या अडचणी जर खऱ्या, तर त्या मुंबईसरकारा-प्रमाणें पुणें म्युनिसिपालिटीलाहि त्या कां नसाव्या ? पण पुण्यांतील राष्ट्रीय पक्षानें प्रथम मुलांचें शिक्षण मोफत व सक्तीचें करूं, नंतर कांहीं दिवसांनीं मुलींचेंहि शिक्षण तसेंच हातीं घेऊं, असें ठरविलें तेव्हां मात्र परांजप्यांनीं आपल्या बगलबच्चांना व्यर्थ चळवळ करण्याला एवढी कां मदत केली ? तात्पर्य, सरकारी कूटाबाहेर असतांना उदारमतवादित्वाच्या लांबलांब गप्पा झोकून, या कूटांत सामील होतांच परांजप्यांना 'नकार' हा कसा फुगवून सुजवून, सजवून मांडावा या विद्येच्या संशोधनापलीकडे दुसरें कांहीं कर्तव्य राहिलेलें दिसत नाहीं, व हा नकार आणखी दोनतीन वर्षें तरी असाच टिक-णार असेंहि त्यांनीं एकदमच सांगून टाकलें आहे. म्हणजे पुढें काय करणार असा प्रश्न विचारणारांची त्यांच्या प्रधानकीच्या मुदतींत राखण लागली.

शिक्षणाचें कार्य पार पाडण्याला पैसा लागतो ही गोष्ट खरी आहे आणि हा पैसा सर्वस्वीं दारूच्या उत्पन्नांतून येणारा आहे हीहि गोष्ट प्रसिद्ध आहे. दारूच्या पैशाला आणि शिक्षणाच्या खर्चाला कायमचा मेळ घालण्याचें जनतेनें कधींहि कबूल केलेलें नव्हतें. नवीन सुधारणांत ही कारवाई घडून आली व नवीन सुधारणांचें तर आपण ढोलके पिटलें, म्हणून आपणाला आतां तक्रार करण्यास जागा नाहीं, ही गोष्ट परांजप्यांच्या मनाला खाऊं लागली असावीशी दिसते. कारण या मुद्द्यावर त्यांनीं खालीलप्रमाणें वाक्पुष्पें उधळलीं आहेत. "मद्यपाननिषेधामुळें पैशांत येणाऱ्या तुटीकडेहि डोळेझांक करून चालणार नाहीं. मद्यपानाची हकालपट्टी झाली तर ती आम्हांस हवीच आहे; पण द्रव्यसामर्थ्यावर त्याचे अप्रत्यक्ष परिणाम काय होतील याचा विचार करून त्याप्रमाणें आपलें धोरण बनविणें हेंहि अवश्य आहे." या विधानांत परांजप्यांची मद्यपान-निषेधाची तकलुपी उत्सुकता दिसून येते, पण ती जशी लोकांस मान्य होणार नाहीं, तशीच द्रव्यशोषणाकडे

नजर देऊन मद्यपाननिषेधाचे पाय तोडावे किंवा दारू थांबविण्यास शिक्षणाचे पाय तोडण्यास तयार व्हावें, ही सूचनाहि त्याज्यच वाटेल. शिक्षण हवें तर लोकांस दारू पिऊं द्या, असा ध्वनीहि परांजप्यांनीं आपल्या भाषणांत निघूं देणें त्यांना शोभत नाहीं. एकवेळ शिक्षण मागें पडलें तरी चालेल, माझा तीन वर्षांचा सगळा कार्यक्रम ढांसळला तरी बेहेत्तर, पण मद्यपानाची हकालपट्टी झालीच पाहिजे असें म्हणण्याचें तारतम्य परांजपे दाखविते तरी शिक्षणमंत्री या नात्यानें त्यांची अब्रू कमी न होतां मद्यपान निषेधक या नात्यानें ती जास्ती वाढली असती. शिक्षणाला पैसा पाहिजे, पण तो मिळण्याकरितां राखीव खात्यांशीं भांडावें लागणार हें उघड आहे. पण परांजप्यांनीं नुसती प्रधानकी गाजवावी आणि हें भांडण भांडण्याला मात्र कोणा भलत्या गांवचा पाटील बोलवावा! आपलें म्हणणें राखीव खात्यानें ऐकलें तर त्यांना राजिनाम्याची भीति दाखवावी हें स्वाभिमानबुद्धि सांगणार; म्हणून 'राजिनाम्याच्या भीतीची' भीति परांजप्यांना एव्हां-पासूनच वाटूं लागली आहे. व त्यांनीं सांगून टाकलें आहे कीं, राजिनामा देऊं म्हणणारा मनुष्य सरकारच्या दृष्टीनें नालायक ठरेल. पण याच्या उलट आपलें कांहीं चालत नाहीं असें असतांहि जो प्रधान घाण्याच्या बैलाप्रमाणें मानेवर जूं घेऊन ठरीव वाटोळ्या रंगणांत फेऱ्या घालीत राहील तो लोकांच्या दृष्टीनें नालायक ठरेल हें परांजप्यांनीं विसरूं नये.

---

## ३७. खेड्यांतील शिक्षण व अस्पृश्यवर्ग

( केसरी, तारीख ५ जुलई १९२१ )

बुधवार, ता. २९ रोजीं श्रीशिवाजीमंदिरांत न. चिं. केळकर, यांचे अध्यक्षतेखालीं प्रो० कानिटकरांचें वरील विषयावर व्याख्यान झालें. अध्यक्ष प्रास्तविक भाषणांत म्हणाले, अस्पृश्यता घालविण्यास व्यक्ति, संस्था व प्रत्यक्ष राष्ट्रीय सभा प्रयत्न करीत आहेत. वर्णाश्रमवादी असूनहि महात्मा गांधी हे कट्टे स्पृश्यतावादी आहेत. परंतु अस्पृश्यता ही केवळ स्पर्श केल्यानें जाणारी नाहीं. स्पृश्य-अस्पृश्य यांतील फरक केवळ शिक्षणामुळेंच

जाऊं शकेल. स्वच्छ कसें राहावें व मन उदार कसें ठेवावें हें केवळ शिक्षणानेंच समजेल. अस्पृश्यता केवळ ब्राह्मणच मानतात असें नाहीं. खेड्यापाड्यांतून महाराला अस्पृश्य मानणारे ब्राह्मणेतरच ब्राह्मणांच्यापेक्षां जास्त आहेत. या वादांत केवळ ब्राह्मण व ब्राह्मणेतर असा भेद नसून स्पृश्य व अस्पृश्य असा भेद आहे. ब्राह्मण व मराठे या दोघांनींहि मिळून ही अस्पृश्यता घालविली पाहिजे.

यानंतर प्रो० कानिटकर म्हणाले, अध्यक्षांचें प्रास्तविक भाषण मलाहि मान्य आहे, खेड्यापाड्यांत अस्पृश्य वर्ग जास्त आहे. प्रत्येक पदवीधरानें मनावर घेऊन त्यांस शिकविलें पाहिजे. मुंबई इलाख्यांत सुमारें २ कोटी लोकांपैकीं प्राथमिक सक्तीच्या शिक्षणास योग्य अशीं २४–२५ लाख मुलें निघतील. खेड्यापाड्यांतून शिक्षणाचा खर्च कमी येतो. पुण्यांत कदाचित् २५ रु. येईल. पूर्वी तीन कौन्सिलरांत राज्यव्यवस्थेचें काम भागत असे, पण सध्यां सात झाले आहेत व प्रत्येकाचा सालिना पाऊण लाख पगार जातो. या एकाच्या पगारांत ५००० मुलांचें शिक्षण होईल. पण एकटा पांच हजारांचें शिक्षण खाऊन जातो. दारूखात्याचें उत्पन्न कमी केलें तरी पोलिसखातें सरकार कमी थोडेंच करणार ? पब्लिक वर्क्समधलेहि अवास्तव पगार चाढले आहेत. पण याकरितां इतर एक्झिक्यूटिव्ह ऑफिसरांशीं भांडणें, प्रधानाचें काम आहे. पण पैसा उभारावयाचा कसा, कर कोणते वाढवावयाचे हें ठरविण्याचें मिनिस्टरचें काम आहे; हेंहि आम्हांलाच विचारलें तर मिनिस्टर कशाला ? लहान मुलें एकमेकांस लागलेल्या तीन रुपयांचा खेळ करितात. मधल्यावर दाब देऊन एक रुपया त्यावर आडवा मारला, कीं त्याचा मार शेजाऱ्यास लागून तो लांब उडतो. शिक्षणमंत्री हा मधल्या दाबलेल्या रुपयासारखा आहे. चांगल्या बुद्धीनें का होईना, पण त्याचें कल्याण व्हावेंसें वाटत असेल तर त्यावर लोकमतानें प्रहारच केले पाहिजेत. दिवाणाच्या अंगाला न लागतां हा मार इतर खात्यांना लागेल. शिक्षण सक्तीचें केलेंच पाहिजे. त्याबद्दलचा अवश्य तेवढाच खर्च आम्ही सोसूं. मात्र प्रधानानें हक्काकरितां इतर खात्यांशीं भांडावयाचें कीं नाहीं, कसे कर बसवावयाचे, हें स्वत: ठरवावें. सक्तीचें शिक्षण हाच अस्पृश्यता जाण्यास उपाय आहे.

यानंतर डॉ० रुईकर यांनीं सांगितलें कीं, अस्पृश्यतेचा प्रश्न धर्माचा आहे. त्यावर शंकराचार्य मुळींच गप्प बसतात. त्यांनीं अस्पृश्यता गेली पाहिजे असें सांगावें. न सांगितल्यास लोकमतानें त्यांस तसें करण्यास भाग पाडावें.

प्रो० नाईक म्हणाले, सर्वांनीं हा प्रश्न हातीं घ्यावा. नॉर्वे देशांतल्याप्रमाणें दरवर्षी तीनच महिने लोकांना शिक्षण दिलें तरी ३/४ खर्चाचा प्रश्न आपण होऊन सोडविल्यासारखें होईल. स्वयंसेवकांनीं मला नांवें द्यावीं. त्यांना भरपूर काम मिळेल.

यानंतर अनाथ विद्यार्थिगृहाच्या कानिटकरांनीं सांगितलें,कौन्सिलें किंवा प्रधान आमचे नाहींत, पण प्राथमिक शिक्षणाचा खर्च चरक्यावर भागूं शकेल.

उत्तरादाखल प्रो० कानिटकरांनीं थोडेसें भाषण केल्यानंतर केळकर आपल्या भाषणांत म्हणाले, "मी व्यक्तीला अनुलक्षून बोलत नाहीं. एक क्ष प्रधान आहे असें समजून बोलतों. पण प्रधानानें आपल्याकडून शक्य तितका प्रयत्न केला आहे असें दिसल्याशिवाय आमचें समाधान व्हावयाचें नाहीं. कानिटकर म्हणाले कीं, दंड भक्कम करण्याकरितां मिनिस्टरवर आपण तडाखे दिले पाहिजेत. पण मिनिस्टर जर इतका स्वाभिमानी असेल व आम्हांलाहि वाटलें कीं, आपल्या तडाखे देण्यानें त्याला उपयोग होईल तर आम्हीहि आमच्याकडून कसूर करणार नाहीं. पण प्रधान स्वाभिमान दाखविणारा असला तर उपयोग! नाहींतर चावून चिवट असें व्हावयाचें. व्याख्यात्यांनींच सांगितलें कीं, एकटे परांजपे ५००० विद्यार्थ्यांचें शिक्षण खातात. म्हणून मी त्यांना अशी जाहीर सूचना करतों कीं, त्यांनीं तात्पुरता लागणारा खर्च घेऊन निदान दोनतीन हजारांचें तरी शिक्षण आपल्या पगारांतून करावें. त्यांनीं सिव्हिल सर्व्हिसचा नाद सोडून जन्मभर स्वार्थत्याग केला व आतां शेवटीं ६००० रुपये पगार घेण्यांत स्वार्थत्यागाची त्यांची परंपरा बिघडते असें माझें त्यांना सांगणें आहे. मोठेपणा राखण्याकरितां सहा हजार पगार घ्या पण तो स्वत:जवळ मात्र ठेवूं नका. यानें सर्व गोष्टी साधतील. त्यांचा प्रामाणिकपणा दिसेल. अधिकाऱ्यांशीं त्यांचें वजन राहील, व त्यांच्याच शिक्षणकार्याला त्यांनीं मदत केल्यासारखें होईल; व असें तीन वर्षे लागोपाठ झालें तर मग परांजप्यांनाच इतर अधिकाऱ्यांना म्हणतां येईल कीं, 'कशाला तुम्हांला येवढा माराभर पगार? टाका थोडासा

तुमच्यांतला, पण स्वतः परांजपे ही गोष्ट न करितां त्यांना सांगूं लागतील, तर ते उलट म्हणतील कीं, वेळ आली तेव्हां परांजप्यांनीं इतका पगार घेण्याला काय कमी केलें ?

प्रथमतःच कर बसविण्याचें प्रधान बोलूं लागेल तर सर्व फसेल. लोकांच्या स्वार्थत्यागाखेरीज ही गोष्ट होणार नाहीं हें मला मान्य आहे. पूर्वी टिळकांनींहि जाहीर सभेंत सांगितलें होतें कीं, 'दारू बंद करण्याचा अधिकार तुम्हास आहे' असा हुकूम सरकारनें मला द्यावा, दारूच्या उत्पन्नाचे ४ कोटि रुपये मी सरकारला मिळवून देतों. पण आज प्रत्येक खात्याच्या प्रधानाची गोष्ट अगदींच मुलखावेगळीं. त्यानें म्हणावें, "तुम्हांला दारू नकोना ? द्या ४ कोटि रुपये." शिक्षणमंत्र्यानेंहि म्हणावें "शिक्षण पाहिजे ना ? टाका ३ कोटि रुपये." प्रधानांना कांहीं जबाबदारी नाहीं. आम्ही ३ कोटि रुपये त्यांना मिळवून द्या; मग हे तेथें कशाला मिनिस्टर ? ४ कोटि रुपये कसे उभारावयाचे हें आम्हांला विचारावयाचें असेल तर तुम्ही घरीं होतां तें काय वाईट होतें ? यांतला सगळा कावा असा आहे; लोकांनीं सुचवावें कोणकोणत्या खात्यांतून कसकसा वसूल करावा; सर्व बजेट लोकांनीं ह्यांच्याजवळ द्यावें; नंतर त्यांनीं सरकारला सांगावें "लोक इतके कर बसवून घेण्यास कबूल आहेत; हा घ्या त्यांचा कबुलीजबाब" पण हें होणार नाहीं. स्वतः मिनिस्टरनें झीज सोसली पाहिजे. स्वतः विचार करून स्कीम तयार केली पाहिजे व नंतर जाहीर करावें कीं, इतका खर्च लागेल, इतका कमी पडेल. असें प्रामाणिकपणानें केल्यास लोक कमी पडलेला पैसा जरूर देतील. परांजप्यांनीं प्रामाणिपणानें अंग घासून व इतर खात्यांशीं वेळ पडल्यास भांडण्याची आपली तयारी दाखवून स्वतःची स्कीम जाहीर करून कार्याला लागावें. तूट येणारे पैसे मी त्यांना पुरवतों असें मी जाहीर रीतीनें सांगतों. पण जी गोष्ट व्यवहारज्ञानाच्या दृष्टीनें शेवटीं बोलावयास पाहिजे ती कर बसविण्याची गोष्ट हे पाहिल्यानेंच लोकांच्या तोंडावर मारतात व म्हणतात कीं, "शिक्षण पाहिजे तर टाका ३ कोटि रुपये." म्हणजे तुम्ही तेथें (प्रधान) आहांत हा जुलूमच झाला म्हणावयाचा ! मग पूर्वी घरीं होतां तें काय वाईट होतें ? स्वतःची स्कीम असल्याशिवाय कराची गोष्ट बोलणें म्हणजे विनाकारण आपली कूस दुसऱ्याला

दाखविण्यासारखें आहे. आणि शिक्षणाचा पुत्रलाभच होणार नसेल तर कूस दाखवून तरी उपयोग काय? केळकर पुढें म्हणाले कीं, अनाथ विद्यार्थी-गृहाचे कानिटकर म्हणाले चरक्यांनीं हा प्रश्न सोडवितां येईल. पण मला तसें वाटत नाहीं. आज कौन्सिलें आमचीं नाहींत म्हणून काय झालें! आज असहकारिता केली आहे ती शाश्वत नसून अजीर्ण घालविण्याकरितां केलेल्या उपोषणासारखी आहे. उपोषण हें जसें मरेपर्यंत करावयाचें नसतें त्याप्रमाणें असहकारिता ही जन्माची थोडीच करावयाची आहे! या उपोषणाचें पारणें फेडण्याची वेळ उद्यां येणार आहे. त्या वेळेला नुसतें पारणें नाहीं तर लखलखीत द्वादशी करूं.

शेवटीं परांजप्यांना हेंच सांगावयाचें आहे कीं, त्यांनीं कसूर न करितां शक्य तर वरिष्ठ अधिकाऱ्यांशीं झगडण्याची तयारी दाखवावी. स्वाभिमान शून्यतेनें लोकांनाच ४ कोटींचा हवाला विचारूं नये. आतां येवढा मोहरा इरेसच पाडण्याची वेळ आली तरी आम्हींहि पाहूं!"

---

# ३८. दिवाणसाहेबांचा कारभार!

( केसरी, तारीख २६ जुलै १९२१ )

आमचे शिक्षणमंत्री रघुनाथराव परांजपे यांच्या कारकीर्दीचे दिवस अधिकाधिक लोटत चालले, तसतसा त्यांच्या कर्तृत्वाचा मोकळेपणा लोकनिदर्शनाला अधिकाधिकच येत चालला आहे. ते शिक्षणाचे अध्वर्यु व उदारमतवादित्वाचे अस्सल गड्डे, म्हणून प्रधानपद लाभल्यावर त्यांच्या हातून प्राथमिक शिक्षणाची प्रगति होईल अशी लोकांना थोडीबहुत अपेक्षा होती; पण ती सर्व निष्फळ ठरूं पाहात आहे. हल्लीं त्यांनीं सक्तीच्या शिक्षणासंबंधानें चौकशी करण्याकरितां एक कमिटी नेमिली आहे. पण ती नेमण्याच्या सरकारी ठरावांतच जी भाषा योजण्यांत आली आहे तिच्यावरून आपल्या दुर्बल धोरणांत टेकावयाला कोणी आधार पाहिजे म्हणून त्यांनीं ही कमिटी नेमून घेतली असावी असा भास होतो. आजवर तीन

चार म्युनिसिपालिटयाच सक्तीचें शिक्षण लागू करण्यास पुढें आल्या असा ठरावांत दोष दिला आहे. पण सरकारी ग्रँट एकंदर खर्चाच्या निम्म्याहून किती अधिक कोणास देण्याचा सरकारचा विचार होता याचा उल्लेख नाहीं, व म्युनिसिपालिट्यांची सांपत्तिक स्थिति परांजप्यांना माहीत नाहीं असेंहि नाहीं. सक्तीच्या शिक्षणाबद्दल लोकांनीं उत्सुकता दाखविली आहे असें म्हणून ठरावांत दिवाणसाहेबांनीं त्यांच्या तोंडाला स्तुतीचीं पानें पुसलीं आहेत; पण खर्चाचा पैसा कोठून आणावा, सक्ति करावयाची ती कोणाकडून करवावी वगैरे तपशिलांच्या गोष्टींवर लोकांनीं निश्चित मत दिलें नाहीं, म्हणून असें निश्चित मत बनविण्याचें शहाणपण त्यांच्या अंगीं नाहीं, अशी गर्भित निंदाहि केली आहे. दिवाणसाहेबांच्या अंगावर खोगीर चढलें नव्हतें तेव्हां त्यांनीं स्वतः असल्या वादविवादांत पूर्वीं भाग घेतला होता; पण वरील मुद्द्यांवर त्यांनीं तरी स्वतःचें निश्चित मत कोठें दिलें होतें ? मग इतर गांवढळ लोकांप्रमाणें रँगलरसाहेबांनाहि हें मत देण्याइतकें शहाणपण नव्हतें असेंच समजावयाचें कीं काय ?

पण या ठरावांत याहीपेक्षां विशेष मौजेची व आश्चर्याची गोष्ट आहे ती ही कीं, ' जनतेंतील बहुमत शिक्षणविषयक सक्ति करून घेण्यास अनुकूल नाहीं,' म्हणून शिक्षण सक्तीचें करूं नये असा ध्वनि निघण्यासारखी भाषा वापरली आहे ! परांजपे दिवाण झाल्याबरोबर त्यांना एकेक नवीन शहाणपण सुचूं लागलें असलें पाहिजे. कारण पुणें म्युनिसिपालिटींतील राष्ट्रीय पक्षानें पुण्यांतील सर्व मुलग्यांना सक्तीचें शिक्षण देण्याचा प्रश्न पुढें आणला, तेव्हां मुलांबरोबर सर्व मुलींनाहि शिक्षण दिलें पाहिजे व तेंहि सरकारच्या विशेष मदतीची अपेक्षा न बाळगतां दिलें पाहिजे असें थोतांड माजवून याच परांजप्यांनीं गोंधळ घातला तेव्हां त्यांचें हें शहाणपण कोठें गेलें होतें, कळत नाहीं ! सक्तीच्या शिक्षणाच्या खर्चाविषयीं ठरावांत लिहितांना तर, परांजप्यांच्या हातून सरकारी खर्चाच्या काटकसरीला कांहीं मदत होईल याविषयीं लोकांची कायमची निराशाच त्यांनीं करून टाकली आहे. या शिक्षणाला लागणारा बहुतेक पैसा नव्या करपट्टीनें वसूल करावयाचा हेंच जर दिवाणसाहेबांचें मत तर तें मत लोकांनींहि पूर्वीं सहज देऊन टाकलें असतें जितका पैसा यापुढें कोणत्याहि सरकारी कामाला नवीन लागेल

तितका सर्व नव्या करांनीं वसूल करावा हें म्हणण्यास फारसें शहाणपण लागत नाहीं, व त्याकरितां प्रधानकीचा सालिना साठपांसष्ट हजार रुपये इतका खर्च रयतेला पाडण्याचेंहि कारण नाहीं. कांहींहि असो; पुण्यांतील ' उदारमतवाद्यां'चे पुढारी आतां पुरें रंगणावर आले, व पूर्वीच्या त्यांच्या बडबडींत किती फेंसाळपणा, किती बालिशता व किती बढाईखोरपणा होता हें पाहण्याला लोकांना आतां पुरा अवसर मिळेल. हे अनाथांचे नाथ, गरिबांचे कनवाळू, मागासलेल्यांचे पुढारी व हे अस्पृश्यांचे आलिंगनदाते, राष्ट्रीय पक्षाला जनतेच्या हिताची कळकळ नाहीं असें बरळत असत; पण तेच आतां प्रधानपदस्थ झाल्याबरोबर लोकांना शिक्षणविषयक सक्ति कितपत रुचेल याविषयीं त्यांना स्वतःलाच शंका येऊं लागली आहे !

गतवर्षी निवडणुकीच्या वेळीं ५ जुलै रोजीं याच परांजप्यांनीं आपला मॅनिफेस्टो ऊर्फ जाहीर विनंतिपत्रक काढिलें, त्यांत त्यांनीं मतदारांना जीं अठरा आश्वासनें दिलीं त्यांतलें पहिलेंच आश्वासन, कर्मधर्मसंयोगानें, सक्तीच्या शिक्षणाचें आहे. Compulsory primary education both for boys and girls ( मुलांमुलींचें सक्तीचें प्राथमिक शिक्षण ). वरील वचनांतून निसटून जातां येण्यासारखे पळवाटीचे शब्दहि त्यांनीं मॅनिफेस्टोंत घातलेले नव्हते. उलट मागासलेल्यांचा मी कट्टा दोस्त आहे, आणि हीनजन्म, स्त्रीजन्म किंवा दारिद्य यांपैकीं एकाहि कारणानें येणारा मागासलेपणा कोणाचा राहूं नये याकरितां कौन्सिलध्यें मी समानतेचा पुरस्कार करीन असें लिहून त्यांनीं खुंटी हलवून बळकट केली होती. पण परांजप्यांचे टीकाकारच वेडे खरे. कारण 'प्रधानपद मिळालें असतां मी काय करीन ' अशा अर्थाचा तो कांहीं त्यांचा मॅनिफेस्टो नव्हता ! फक्त मतदारांनीं आपल्यास कौन्सिलांत निवडून द्यावें एवढ्यापुरताच तो होता. आणि शिडी-वरून भिंतीवर चढून गेलें म्हणजे शिडी लाथाडून द्यावी हा राजमान्यतेचा राजमार्गच आहे ! निवडणूक होण्याकरितां परांजप्यांना जसा हा मॅनिफेस्टो काढावा लागला तसा प्रधानकी मिळविण्यालाहि एखादा मॅनिफेस्टो काढावा लागला असण्याचा संभव आहे. मात्र कदाचित् तो जाहीर लेखी नसून तोंडी असेल ! पण मॅनिफेस्टोंत परांजप्यांनीं काय काय घातलें असेल याची कल्पना आतां हळूहळू कोणासहि होण्यासारखी आहे.

सक्तीच्या शिक्षणाविषयीं चौकशीची कमिटी नेमून शिक्षणमंत्र्यांनीं एका दगडानें दोन पक्षी मारण्याचा बेत केला असावा असें दिसतें. एक तर सक्तीच्या शिक्षणाकरितां नवे कर बसविण्याच्या त्यांच्या ‘ उदार ’ कल्पनेस दुजोरा मिळेल. दुसरें, प्राथमिक शिक्षकांना जी पगारवाढ सरकारनें कबूल केली होती तिलाहि आयताच खो बसला. या पगाराच्या बाबतींत जी कमिटी पूर्वी नेमली होती तिच्या शिफारसी सरकारनें मान्य केल्या, व शिक्षकांनींहि निरुपायास्तव समेटादाखल त्या कबूल करून त्यांनीं योजलेला संपहि थांबविला. या कमिटींत स्वतः रँगलर परांजपे हे एक प्रमुख सभासद असून त्यांच्या आश्वासनावरच हें प्रकरण तेव्हां असें मिटलें. अथात् स्वतः परांजपे हेच पुढें शिक्षणमंत्री झाल्यानें कमिटीचीं पगारवाढीचीं आश्वासनें ताबडतोब अमलांत यावयास पाहिजे होतीं. पण परवां त्यांजकडे डेप्युटेशन गेलें त्यावेळीं त्यांनीं “ मजकडून कांहींएक होणार नाहीं, तुम्ही चंदावरकरकमिटीकडे अर्ज करा, फिरून साक्षी पुराव्यापासून आपलें सर्व भांडण नव्यानें भांडा ” असें सांगून लख्ख कानावर हात ठेवले म्हणतात !

तसें घडलें असेल तर या विश्वासघाताला जोड नाहीं! परांजपेसाहेबांची ही पुच्छप्रगति पाहून बिचाऱ्या शिक्षकवर्गाला काय वाटेल याची वाचकांनींच कल्पना करावी ! दुय्यमपासून वरच्या सर्व शिक्षणशाखांच्या लोकांचे पगार वाटेल तसे वाढून पदरांत पडले देखील. याचें कारण त्यांचे वाली साहेब लोक, आणि प्राथमिक शिक्षकांची ही दुर्दशा; कारण त्यांचे वाली परांजप्यांसारखे दुर्बळ व बेभरंवशी नेटिव दिवाणजी ! मिळून शिक्षक लोकांचें रक्षण अखेर त्यांचें त्यांनींच केलें पाहिजे असें ठरलें म्हणावयाचें! वास्तविक सक्तीच्या नव्या शिक्षणयोजनेचा व पूर्वी कबूल केलेल्या पगारवाढीचा कांहींएक संबंध नाहीं. ही वाढ योग्य म्हणूनच स्वतंत्र रीतीनें कबूल केलेली होती. चंदावरकर-कमिटीनें वाटेल तर ती लक्षांत घेऊन मगच आपली योजना निश्चित केली असती. पण बिचारे परांजपे तरी काय करणार? वरच्या जबरदस्त फिनान्सकमिटीला धक्का द्यावयाची शक्ति नाहीं, तेव्हां खालच्या शिक्षकवर्गाला लाथा देऊनच त्यांना आपलें पद संभाळलें पाहिजे !

# ३९. निवडणुकीचा निकाल

( केसरी, १९२३ )

मुंबई युनिव्हर्सिटीच्या निवडणुकीचा निकाल अपेक्षेप्रमाणेंच लागून बॅ०जयकर निवडून आले. आपण पराभूत होणार ही जाणीव परांजपे यांना आधींपासूनच होती असें स्वतः त्यांनींच कबूल केलें आहे. एका दृष्टीनें ही निवडणूकच स्वराज्यपक्षाच्या यशाची खरी खूण मानावी लागते. कारण मतदार अशिक्षित नसून सात वर्षें मुरलेले पदवीधर होते. पण याहि पराभवाला कांहींतरी कारण म्हणून सांगण्याचा मोह परांजपे व त्यांचे काळेगोरे स्नेही यांना आवरला नाहीं. त्यांनीं असें कारण जाहीर केलें आहे कीं, असंतुष्ट अशा पदवीधरांनीं परांजप्याविरुद्ध मतें दिलीं ! आजवर राजकीय चळवळीचे आधारस्तंभ 'फेल्ड' (नापास झालेले) बी. ए. असें सरकार म्हणत असे. आतां हा दर्जा वाढून पास झालेल्या पदवी मिळालेल्या सुशिक्षितांचाहि त्यांत समावेश होऊं लागला म्हणावयाचा ! या पुढें हें वर्णन 'नापास झालेल्या असंतुष्ट कौन्सिलरांना' लाभो अशी इच्छा आहे. खरेंच आहे, परांजपे यांना दिवाणगिरी एकदां मिळाली असून दुसऱ्यानें मिळावयाची ती बुडाली म्हणून त्यांचा असंतोष होतो; तर ज्यांना परांजप्यांनीं पहिल्यानेंहि लहानशी नोकरी दिली नाहीं त्यांना राग यावा हें साहजिकच आहे ! परांजपे हे आतां द्राक्षें आंबट म्हणून असेंहि बोलूं लागले आहेत कीं, ' बरें झालें स्वराज्यवादी निवडून आले. त्यांना दिवाणगिरी व विधायक कार्य कसें अवघड असतें हें चांगलें कळून येईल!' पण स्वराज्यपक्षीयांना दिवाणगिरीच्या अडचणी कळून येण्यास सरकारच्या व त्यांच्याहि इच्छेमुळें मार्ग नाहीं हें परांजपे जाणतातच. बाकी ' काम साधलें नाहीं ' याची व्याख्या ' काम अवघड आहे ' या पर्याय शब्दांनीं करणें हा प्रकार कांहीं नवा नाहीं. हें आपमतलबी समीकरण गणिताचें ज्ञान नसणाराच सोडवितो ! विधायक कामगिरीचें पिलूं फिरून या वादांत पुढें आलेंच आहे. पण स्वराज्यवादी हे जर बोलूनचालून सरकारच्या अडवणुकीकरितां कौन्सिलांत शिरताहेत, तर त्यांना विधायक कार्य करतां न

आलें तर त्यांत फारसा तोटा नाहीं. 'आतां विध्वंसक टीकेची मात्र चंगाळी होईल' असें परांजपे यांनींच सांगितलें आहे, व स्वराज्यपक्षीयांना पूर्ण प्रांतिक स्वराज्य मिळेपर्यंत, हें सर्टिफिकीट पुरेसें आहे. 'असंतुष्ट' पदवीधरांप्रमाणें 'ऋणानुबंधी' वकीलवर्गावरहि परांजपे यांचा आक्षेप आहे. पण ऋणानुबंधाच्या आरोपांतून स्वतः परांजपे यांना मतें देणारे मतदार तरी कसें सुटणार ? कसेंहि असो; परांजप्यांना आपल्याविषयींचें लोकमत कळण्याचा आज जो प्रसंग आला तो तीन वर्षांपूर्वींच यावयाचा; पण तो टळून त्यांना तीन वर्षें दिवाणगिरी लाभली याबद्दल त्यांनीं असहकारितेच्या तीन वर्षांपूर्वींच्या हुल्लडीचे आभारच मानले पाहिजेत. मवाळपक्ष हा राष्ट्रीय पक्षांशीं तुलबल्य असें दाखविण्याचा प्रयत्न परांजपे यांनीं लो० टिळकांच्या आयुष्याच्या अखेरच्या सालीं कोणकोणत्या प्रकारांनीं केला; पुण्याचें मानपत्र, सोलापुरची प्रांतिक सभा, जुन्नर येथलि जिल्हा परिषद इत्यादि प्रसंगीं ब्राह्मणेतरांचें उसनें पाठबळ घेऊन त्यांनीं कसा धिंगाणा घातला, याची आठवण परांजप्यांच्या मतदारांना होती. व तीन वर्षांच्या दिवाणगिरींत गैरकाय व सरकार यांविषयींचें त्यांचें पक्षपातित्व लोकांच्या चांगलें नजरेस आलें, म्हणूनच त्यांचा पराभव झाला अशी आमची मीमांसा आहे. त्यांतूनहि जयकर हे सुसंस्कृतीनें त्यांच्याच योग्यतेचे आहेत; त्यांना निवडून दिलें यांत मतदारांनीं वाईट तें काय केलें ? टाइम्सनें म्हटल्याप्रमाणें जयकर हे 'परांजप्यांहून वेगळ्या पेठेंत राहतात' शब्द मुग्ध असले तरी त्यांचें निंदाव्यंजकत्व झांकत नाहीं. खरेंच आहे, परांजपे यांचें घर 'राज'रस्त्यावर आहे, जयकरांचें स्वराज्यपक्षाच्या आळींत आहे ! विधायक कार्य, विशेषतः दिवाणगिरी, अवघड आहे हें जर परांजप्यांना कळून चुकलेंच होतें तर, त्यांनीं आंबट द्राक्षांच्या या घोसाला फिरून हात घालण्याचे आधींच माघार घेऊन तो घेण्याला दुसऱ्याला मार्ग मोकळा सोडला असता तर त्यांना वादाची बाजू तरी परतवितां आली असती.

---

# ४०. टिळक व इंग्रजी शिक्षणपद्धति

(लोकसंग्रह, खास अंक १९२०)

## ( म. गांधींनीं सुरू केलेला एक महत्त्वाचा वाद )

पुण्यांत लो० टिळकांची प्रथम श्राद्धतिथि अत्यंत उत्साहानें व पुण्यास शोभेल अशा कार्यक्रमानें पाळली गेली याविषयीं कोणासहि समाधान वाटल्यावांचून रहाणार नाहीं. गतवर्षी लो० टिळकांना तिलांजलि देण्याच्या दिवशीं लाला लजपतराय हे पुण्यास आले होते; यंदा प्रथम श्राद्धतिथीच्या दिवशीं महात्मा गांधी हे आले. अशा रीतीनें लो० टिळकांच्या और्ध्वदेहिक धर्मक्रियेच्या दोन महत्त्वाच्या दिवशीं लजपतराय व गांधी यांसारखे दोन सर्वश्रेष्ठ पुढारी पुण्यास लाभले; व त्यांनीं आपल्या वक्तृत्वपूर्ण शब्दांनीं केलेली टिळकांची स्तुति ऐकून व आपले समानधर्मी असे प्रमुख लोक इतर प्रांतांतहि आहेत हें पाहून, टिळकभक्तीविषयीं पुणेकरांचा आत्मीविश्वास दृढतर झाल्यास नवल नाहीं. महाराष्ट्रांतील लोक आत्मीयबुद्धीनें टिळकांची भक्ति करितातच; पण आत्मिक भावनेपेक्षांहि अधिक प्रशस्त, विस्तृत व सात्त्विक असें अधिष्ठान आपल्या भक्तीला आहे असें महाराष्ट्रीयांनीं म्हटल्यास त्यांत कांहीं वावगें नाहीं. टिळकांच्या खऱ्या योग्यतेचें परीक्षण आजवर झालें याहून अधिक निरनिराळ्या दृष्टींनीं अद्यापि व्हावयाचेंच आहे व या दृष्टींपैकींच एक दृष्टि म्हणून खालील दोन शब्द लिहिण्याचें योजिलें आहे.

याचें कारण असें कीं, महात्मा गांधी यांनीं कांहीं महिन्यांपूर्वी इंग्रजी शिक्षणावर जवळजवळ बहिष्कार घालावा असें सुचवितांना असें एक विधान केलें होतें कीं, इंग्रजी शिक्षण टिळक न घेते तर ते झाले याहून अधिक मोठे झाले असते व केवळ इंग्रजी शिक्षणामुळेंच ते खुरटून गेले. टिळक इंग्रजी शिक्षण न घेते तर कदाचित् पूर्वकालीन साधुसंतांप्रमाणें खरे लोकमान्य झाले असते; पण या शिक्षणामुळें या साधुसंतांच्या मानानें ते बाहुलीसारखे किंवा बटुवामनासारखे हलके भरतात. टिळकांच्या जोडीला उपरि-

निर्दिष्ट लेखांत महात्मा गांधी यांनीं राजा राममोहन राय यांनाहि बस-विल्याचें वाचकांस स्मरत असेल. मॉडर्न रिव्ह्यूचे संपादक व मि० अँड्रयूज यांना ही तुलना न आवडून त्यांनीं राजा राममोहन राय हे इंग्रजी शिक्षणामुळें खुरटले नव्हते व एका विशिष्ट दृष्टीनें पाहतां राममोहन राय यांची योग्यता, साधुवर्य चैतन्य यांच्याहून कमी नव्हती असें मॉडर्न रिव्ह्यूच्या एकदोन अंकांत सिद्ध करण्याचा प्रयत्न केला आहे. असाच प्रश्न लो० टिळकांच्या योग्यतेसंबंधानेंहि लक्षांत घेण्यासारखा आहे. व लोकसंग्रहाच्या वाचकांचें लक्ष या विषयाकडे वेधावें एवढाच प्रस्तुत लेख लिहिण्याचा माझा उद्देश आहे.

महात्मा गांधी यांच्या उपरिनिर्दिष्ट लेखांत 'पिग्मी' (बटुवामन) हा जो शब्द आला आहे त्यासंबंधानें प्रथम हें सांगितलें पाहिजे कीं, तो कित्येक लोक मानतात त्याप्रमाणें निंदाव्यंजक नाहीं. तो शब्द घालण्यांत टिळकांना कमीपणा आणण्याचा गांधींचा उद्देश नसून, टिळक हे मोठे व लोकमान्य असले तरी त्यांच्याहून अधिक मोठीं लोकमान्येतर अशीं माणसें आपणांतच पूर्वी होऊन गेलीं; आणि विशेषेंकरून याचें कारणहि टिळकांना इंग्रजी शिक्षण घ्यावें लागलें, इतरांना तें घ्यावें लागलें नाहीं, एवढेंच प्रतिपादण्याचा त्यांचा हेतु होता असें मला वाटतें. जे लोक 'पिग्मी' या शब्दामुळें नाराज झालेले आहेत त्यांनीं गांधींच्या लेखांतील प्रस्तुत व अप्रस्तुत यांतील भेद ओळखला नाहीं असें दिसतें. गांधींना टिळकांची स्तुति विवक्ष्य नसून इंग्रजी शिक्षणाची निंदाच विवक्ष्य होती, हें जरूर लक्ष्यांत ठेवलें पाहिजे. निदान टिळकांना तुलनादृष्टीनें किंचित् कमीपणा आणण्यासारखा शब्द वापरतांना गांधींच्या मनांत चैतन्य वगैरे साधूंविषयीं फाजील बहुमानबुद्धि होती, असें कोणीं वाटेल तर म्हणावें; पण स्वतःविषयींच्या अहंकारबुद्धीनें गांधींची ही चूक झाली असें कोणी मानण्याचें कारण नाहीं. कां कीं, लेखांत गांधींनीं टिळकांची व आपली तुलना करून त्यांच्यापुढें आपणहि बटुवामन आहों असें स्पष्ट म्हटलें आहे.

असो; टिळक मोठे कीं गांधी मोठे हा वादाचा मुद्दा नसून टिळक, राममोहन राय वगैरे इंग्रजी शिकलेले लोक चैतन्यादि साधूंहून फार कमी योग्यतेचे ठरतात कीं काय, हाच वादाचा मुख्य प्रश्न आहे. याचें उत्तर

देतांना दोन प्रकारची सावधगिरी ठेवणें जरूर आहे. एकीकडे टिळकांची व राममोहन राय यांची न कळत निंदा होईल एवढीच भीति मनांत बाळगणारा मनुष्य, तसें न व्हावें म्हणून, इंग्रजी शिक्षणपद्धतीला योग्य तो दोष देण्यापासून परावृत्त होण्याचा संभव आहे. दुसरेपक्षीं, इंग्रजीपेक्षां जुनी शिक्षणपद्धति अधिक चांगली असें सिद्ध करण्याच्या भरांत टिळक, राममोहन राय इत्यादि लोकांच्या खऱ्या योग्यतेकडे न कळत दुर्लक्ष होण्याचा संभव आहे. आमच्या मतें रामानंद चतर्जी व अँड्रयूज यांनीं पहिल्या प्रकारची चूक केली असून; महात्मा गांधी यांनीं दुसऱ्या प्रकारची चूक थोडीशी केली आहे. प्रथम अँड्रयूज वगैरेंच्या विचारसरणीकडे पाहूं. गांधींच्या हल्लयाचा मुख्य रोंख इंग्रजी राज्यांतील शिक्षणक्रमाविरुद्ध जितका आहे तितका इंग्रजी भाषेच्या विरुद्ध नाहीं, हें अँड्रयूज प्रभृतींनीं लक्षांत ठेवलें नाहीं. भाषा ही बिचारी कोणाचेंच कांहीं घोडें मारीत नसते. उलट इंग्रजी भाषेनें हिंदी लोकांना पूर्वकालीं अगम्य असलेलें असें एक नवीनच ज्ञानभांडार उघडून दिलें आहे. हा तिचा आमच्यावर उपकारच आहे; पण इंग्रजी भाषेबरोबर इतर गोष्टीहि इंग्रजी शिक्षणांत येतात व त्यांचाच परिणाम मुख्यत: आपल्या मनावर अनिष्ट होतो. भाषा तीच; पण तींत इष्ट ग्रंथांप्रमाणें अनिष्ट ग्रंथहि असूं शकतात; आणि अनिष्ट ग्रंथ वर्ज्य करून इष्ट ग्रंथ तेवढे विद्यार्थ्यांच्या हातीं पाडण्याची सत्ता हिंदी लोकांना मिळाल्यास इंग्रजी शिक्षणाशीं त्यांचें भांडण होण्याचें कारण नाहीं; व इष्ट व अनिष्ट हा भेद अत्यंत महत्त्वाचा आहे व ही सत्ता हातीं येईपर्यंत हा तंटा कायम राहणार हें उघड आहे. इंग्रजी भाषा ही हिंदी लोकांना परकी भाषा, हाहि येथें मुख्य मुद्दा नाहीं; कारण अमेरिकन लोक व इंग्रज लोक या उभयतांनाहि इंग्रजी ही मायभाषाच असली तरी खऱ्या राष्ट्रीय दृष्टीनें अमेरिकन व इंग्रज आपापल्या मुलांना त्याच भाषेंतील वेगवेगळीं पुस्तकें शिकवतील व त्यांचे अभ्यासक्रमहि वेगवेगळे असूं शकतील. राजा राममोहन राय हे जसे इंग्रजी राज्याखालीं असतांना स्वेच्छेनें पर्शिअन व अरेबिक भाषा शिकले तसेच विद्याभ्यासंगी टिळक स्वराज्य असतें तरीहि कदाचित् इंग्रजी भाषा शिकून, इंग्रजी वाङ्मय वाचून, इंग्रजी भाषेंत एखादा ग्रंथहि लिहिते. पण केवळ इंग्रजी राज्य

असल्यामुळें नुसत्या इंग्रजी भाषेलाच शिक्षणक्रमांत एवढें महत्त्व आलें कीं, त्यांचीं अनेक वर्षे इंग्रजीच्या अभ्यासांत व्यर्थ गेलीं व इंग्रज विद्वान् हेच खरे विद्वान् व त्यांच्या मनावर आपला पगडा बसला तरच आपण जिंकली, अशा बुद्धीनें टिळकांनीं 'ओरायन' व 'आर्क्टिक होम इन् धी वेदाज्' हीं पुस्तकें मूळ मराठींत लिहावीं व इंग्रजांनीं त्यांचीं इंग्रजींत भाषांतरें करावीं असें न होतां, त्यांनीं तीं मूळ इंग्रजींत लिहिलीं व निदान मागाहून तरी त्यांनीं स्वतः त्या विषयावर स्वतंत्र ग्रंथ लिहावे तेहि लिहिले नाहींत, असा आक्षेप टिळकांच्या कित्येक भक्तांनींच घेतला आहे. इंग्रज विद्वानांनीं आजपर्यंत एकाहि महाराष्ट्रीय विद्वानाच्या ग्रंथाचें भाषांतर केलें नाहीं आणि टिळकांनीं मात्र दोन महत्त्वाचे ग्रंथ केवळ इंग्रजींत लिहिले याचा दोष विद्यमान शिक्षणपद्धतीकडेच दिला पाहिजे; व राज्यपद्धतीपासून शिक्षणपद्धति भिन्न असूं शकत नाहीं असें कोणी म्हटलें ( व तें खरेंच आहे ) तरी शिक्षणपद्धतीचा दोष कांहीं कमी होत नाहीं. मॉडर्न रिव्ह्यूच्या संपादकांनीं म्हटल्याप्रमाणें राममोहन राय यांच्या वेळेपेक्षां टिळकांच्या शिक्षणाच्या वेळीं ही अनिष्ट शिक्षणपद्धति अधिक दृढमूलच झाली होती. राममोहन राय यांना कदाचित् इंग्रजी भाषेंतून विचार करण्याची संवय लागलेली नसेल; परंतु टिळकांच्या वेळीं तेथपर्यंत मजल येऊन ठेपली होती. तात्पर्य, राममोहन राय किंवा टिळक काय दोघांनाहि पाश्चात्य शिक्षणपद्धतीनें शिक्षण न मिळतें तर त्यांचें इंग्रजी भाषेचें ज्ञान जरूरीपुरतें राहूनहि त्यांच्या मोठेपणाला हरकत आली नसती. कारण टिळक किंवा राममोहन राय हे त्यांचे देशाभिमानाचे विचार व आचार आणि व्यापक विद्वत्ता यांच्यामुळें मोठे मानले जातात, त्यांच्या इंग्रजीच्या ज्ञानामुळें नव्हे.

दुसरेपक्षीं, महात्मा गांधी यांच्या विचारसरणींत आम्हाला दोष हा दिसतो कीं, इंग्रजी शिक्षणपद्धतीची निंदा करण्याच्या भरांत त्यांनीं टिळक, राममोहन राय यांना कबीर, नानक, चैतन्य यांच्याहून कमी योग्यतेचे ठरविले आहेत. आमच्या मतें या तुलनेला समान अधिष्ठान असें फारसें नाहीं. साधु हे देखील देशभक्त असतात व देशभक्तांच्या अंगींहि साधुत्व असतें; परंतु लौकिक व पारलौकिक हे दोन पंथच वेगळे असल्यामुळें, साधु व राजकारणी पुरुष ह्यांची तुलना करण्यांत फारसें स्वारस्य नाहीं. पण तुलनेचा हा विषय

काढलाच तर महात्मा गांधी म्हणतात तें बरोबर आहे असें आम्हांस वाटत नाहीं. प्रथमच ही गोष्ट निदर्शनास येते कीं, कबीर, नानक, चैतन्य आणि टिळक, राममोहन राय या दोन वर्गांची तुलना दोन प्रकारांनीं करतां येईल. एक मनःसंस्कृति व दुसरा जनतेवर परिणाम. पहिल्या दृष्टीनें पाहतां कबीराचे दोहरे व टिळकांचे लेख हे ताडून पाहिल्यास टिळकांची मनःसंस्कृति किंवा परिणति कबीराहून कमी होती हें सिद्ध करणें कोणासहि जड जाईल. कबीर हे जितके ईश्वराशीं तादात्म्य पावले होते, तितकेच टिळकहि देशाशीं तादात्म्य पावले होते. टिळकांच्या लेखांत यमकें साधलीं नसलीं किंवा ठराविक छंदोबद्ध रचना केली नसली, तरी सत्यज्ञान देणारीं व अनुभवाचीं वचनें कबीराच्या वचनाइतकींच खणखणीत, झणझणीत, समर्पक, मार्मिक अशीं खचित सांपडतील. टिळकांचे लेख निर्यमक होते म्हणून त्यांना अधोगति मिळाली व दोहऱ्याच्या पायऱ्यांमुळें कबीराला मोक्षपद गांठतां आलें, असें कोणास म्हणावयाचें तर त्यानें खुशाल म्हणावें. कारण या उभयतांचीं आजचीं पारलौकिक स्थानें पाहून येऊन कोण सांगणार ?

दुसरा मुद्दा घेतला तर तुलनेचा कांटा कबीरापेक्षां टिळकांकडेच अधिक झुकेल. कबीर कितीहि लोकप्रिय असला तरी त्या लोकप्रियतेची व्याप्ति एक दोन प्रांतांपुरतीच आढळेल; पण टिळकांची लोकप्रियता सर्व नऊ दहा प्रांतभर पसरलेली आहे. कबीराच्या दोहऱ्यांनीं हिंदी जनतेला जितकें अध्यात्मज्ञान झालें असेल तितकें स्वराज्याच्या हक्काचें ज्ञान टिळकांच्या सुप्रसिद्ध चतुर्दश अक्षरी मंत्रानें खचित झालें असलें पाहिजे. स्वतः कबीरानें राम आणि रहिम हे एकच आहेत असें म्हटल्यानें हिंदु-मुसलमानांची एकी जितकी झाली असेल त्यापेक्षां आज मौलाना महंमदअल्लींनीं, टिळक हेच माझे राजकारणांतले गुरु असें परस्पर म्हटल्यानें ती एकी होण्याचा संभव खचित अधिक आहे. सामान्य जनतेवर कबीर किंवा चैतन्य किंवा नानक ह्यांचा जेवढा परिणाम घडला तितका किंवा त्याहूनहि थोडा अधिकच निदान टिळकांचा तरी घडला असें आम्ही खात्रीनें म्हणूं शकतों. मग राजा राममोहन राय यांजविषयीं तें तितकें खरें असो किंवा नसो. फार काय पण गांधी हे विनयामुळें आत्मनिंदा कितीहि करोत, पण सर्व हिंदुस्थान मिळून घेतलें असतां स्वतः त्यांनीं जनतेवर जो परिणाम घडविला

तेवढा वरील साधुसंतांनीं घडविला नाहीं असें आम्हांस तरी वाटतें. टिळकांचें नांव हिंदुस्थानभर पसरण्याला कबीर-नानकांच्या वेळीं नसलेलीं आगगाडी, तारायंत्रें वगैरे साधनें विशेष कारणीभूत झालीं असें कोणाचें म्हणणें असेल तर त्यास आमची हरकत नाहीं. पण प्रत्यक्ष वस्तुस्थितीबद्दल तरी वाद असण्याचें कारण नाहीं.

तात्पर्य, गांधी म्हणतात त्याप्रमाणें प्रस्तुतची शिक्षणपद्धति सदोष आहे खरी; परंतु ती तशी ठरविण्याकरितां टिळक, राममोहन राय यांना कबीर-नानकांहून कमी लेखणें अवश्य नाहीं.

---

# ४१. लो० टिळकांच्या चरित्रासंबंधीं

## [ विद्यार्थ्यांस चार उपदेशपर शब्द. ]

[ मंगळवार, ता. १७ ऑगस्ट सन १९२० रोजीं फर्ग्युसन कॉलेजांत श्री० तात्यासाहेब केळकर यांचें " लो० टिळकांच्या चरित्रासंबंधीं चार उपदेशपर शब्द" या विषयावर व्याख्यान झालें. अध्यक्षस्थानीं प्रो० काळे हे होते. व्याख्यानाच्या आरंभीं एका विद्यार्थ्यानें एक सुंदर पद्य म्हटल्यानंतर अध्यक्ष प्रो० काळे म्हणाले, "माझ्या विनंतीला मान देऊन प्रकृति नादुरुस्त असतांहि तात्यासाहेब येथें आले हे त्यांचे आपणांवर फार उपकार आहेत. तात्यासाहेब हे ' राजेश्री ' टिळकांचे उजवे हात आहेत व टिळकांच्या सतत सान्निध्यामुळें आपण या विषयावर मत देण्यास कदाचित् असावे तितके योग्य नाहीं असें परवां मराठा पत्रांत प्रसिद्ध झालेल्या त्यांच्या लेखावरून वाटण्याचा संभव आहे. इंग्रजींतहि No hero is a hero to his valet de chamber अशी एक म्हण आहे तिचाहि असाच अर्थ आहे. तरीपण ते समतोल वृत्तीचे असल्या-कारणानें ' अतिपरिचयात् अवज्ञा ' होण्याचें कांहीं कारण नाहीं. थोड्याच दिवसांपूर्वी तात्यासाहेबांनीं केसरीपत्रांत " टिळक सुटले

पुढें काय !" असा अग्रलेख लिहिला होता. परंतु "आतां टिळक गेले पुढें काय !" असा प्रश्न पुढें उभा राहिला आहे. असो; आतां मी आपला जास्त वेळ न घेतां रा० तात्यासाहेब यांस आपलें भाषण करण्यास विनंति करतों." ]

"आज तुमच्यापुढें भाषण करण्यांत माझ्या मार्गांत तीन अडचणी आहेत. एकतर माझी प्रकृति आज बरी नसल्यामुळें मला फार मोठ्यानें बोलतां येणार नाहीं. आतांहि थोडी थंडी वाजतेच आहे. ! तसेंच मी विद्यार्थ्यांच्या पुढें भाषण करणार आहे व विद्यार्थ्यांच्या पुढें कशा तऱ्हेचें भाषण करावें लागतें हें आपणांस माहीत आहेच. दुसरें असें कीं, मी फर्ग्युसन कॉलेजांत बोलत आहे. यांत सकृद्दर्शनी कांहीं अवघड दिसत नाहीं; परंतु दुर्दैवाची गोष्ट म्हणा, किंवा कांहीं म्हणा पण फर्ग्युसन कॉलेजचे व टिळकांचे ग्रह कांहीं जमले नाहींत ही गोष्ट खरी ! तिसरी गोष्ट म्हणजे आपल्या अध्यक्षांनींच आतां आपणांस सांगितलें कीं, मी त्यांचा अतिशय निकटचा स्नेही आहे. मला ही गोष्ट कबूल आहे. पण मलाहि इतरांच्या संबंधानें असें म्हणतां येईल कीं, 'लोकमान्य' हा शब्द एकाद्याच्या तोंडून न आला तरी, मनांतून तरी तुम्ही ही पदवी मान्य करतांच करतां. ( टाळ्या ). आपणांपुढें हें जें पद्य नुकतेंच म्हणण्यांत आलें त्यापेक्षां टिळकांची अधिक स्तुति ती मी काय करणार ! मी केवळ त्यांची स्तुति करण्यासाठीं येथें आलों नाहीं. कारण मी कांहीं भाट नाहीं. तसेंच गुणदोषविवेचनाच्या पद्धतीनेंहि आज मी आपणांपुढें बोलणार नाहीं. कारण टिळकांत जरी एकादा दोष असला तरी यावेळीं मी तो दाखवावा अशी ही वेळ नाहीं. यावेळीं दोषचर्चा ही अप्रस्तुत आहे व दोषाविष्करणाची ही वेळहि नाहीं. मी त्यांचें नुसतें गुणवर्णन करणार नाहीं; तसेंच नुसतें दोषाविष्करणहि करणार नाहीं. तर मग मी तुमच्यापुढें आज काय बोलणार आहे ? मी आज ॲप्रीसिएशनच्या म्हणजे गुणग्राहकतेच्या दृष्टीनें त्यांच्याकडे पाहणार आहे. या दृष्टीनें पाहतां नुसती निंदा किंवा नुसती स्तुतीच करावयाची नसते, फक्त गुण पहावयाचे असतात; व त्यांतल्या त्यांत जो चांगला गुण असेल तो प्रामुख्यानें दाखवावयाचा असतो. त्यापासून आपल्याला काय बोध घेतां येईल हें पहावयाचें असतें.

कोणी म्हणतील कीं ही दृष्टि एकेरी आहे. परंतु गुणग्रहण हें नेहमीं एकेरीच असणार. सर्वगुणसंपन्न असा कोण आहे? कांहीं गुण परस्पर-विरोधी असतात व ते दोन्ही एकाच माणसाच्या ठिकाणीं असणें हें प्रायः अशक्य असतें. रानड्यांच्याविषयीं असें सांगतात कीं, रानडे म्हणजे केवळ क्षमासमुद्र होता! याच्या उलट टिळक हे तापट होते. आतां हे दोन्ही गुण एकाच वेळीं एका माणसांत असणें केव्हांहि शक्य नाहीं. परस्पर विरोधी अशा गुणांचा वास फक्त एका परमेश्वराच्याच ठिकाणीं कल्पिलेला आहे. कसें तें पाहा. परमेश्वर हा सर्वज्ञ, प्रेमळ व न्यायी आहे असें म्हणतात. आतां परमेश्वर जर सर्वज्ञ आहे तर त्याला लोकांचें दुःख कळत असलें पाहिजे. आणि परमेश्वर न्यायी असें म्हटलें तर प्रेमळ कसें म्हणतां येईल? पण सर्वगुणसंपन्नता ही एका परमेश्वरापाशींच संभवते. मानवी समाजांत जन्मास येऊन कोणीहि 'सुपरमॅन' कसा असूं शकेल? असो; आतांपर्यंत टिळकांच्या गुणांची इतकी चर्चा झालेली आहे, कीं एकाद्याला सांगितलें कीं आजपर्यंत कोणास न दिसलेला असा एकादा टिळकांचा गुण सांग, तुला हजार रुपये बक्षीस देतों, तरी तें त्याला शक्य होणार नाहीं. तेव्हां मी तुम्हांला टिळकांचा एकादा कोणास न दिसलेला गुण दाखविणार आहें असें नाहीं. टिळकांचे गुण तेच, पण ते मी वेगळ्या पद्धतीनें आपणांपुढें मांडणार आहें. तींच फुलें पण चार माळ्यांपुढें दिलीं तर चौघेहिजण चार तऱ्हेनें हार गुंफतील. त्याचप्रमाणें टिळकांचे आजपर्यंत वर्णन केलेलेच गुण पण ते जर निराळ्या तऱ्हेनें मांडून दाखविले तर ते नवीन दिसतील.

असो, प्रथम मी विष्णुसहस्रनामाप्रमाणें त्यांचे गुण आपणांपुढें म्हणून दाखवितों. पहा त्याचा काय बोध होतो? टिळक सद्वर्तनी होते, विद्वान् होते, स्वार्थत्यागी होते, देशभक्त होते, उद्योगी होते, पराक्रमी होते, धैर्यवान् होते. अर्थात् यानें आपणांस कांहींच बोध झाला नसेल. आतां हेच गुण पण ते एकमेकांवर कसे अवलंबून होते हें मी आपणांस दाखवितों. या सर्व परस्परावलंबी गुणांची मी एक सांखळी तयार केली आहे ती अशीः—टिळक सद्वर्तनी होते, म्हणून त्यांच्या विद्वत्तेचें चीज झालें. ते विद्वान् होते म्हणून त्यांच्या स्वार्थत्यागाचा उपयोग झाला.

स्वार्थत्यागी होते म्हणून त्यांच्या देशभक्तीचें चीज झालें. देशभक्त होते म्हणून त्यांच्या उद्योगाचें चीज झालें. उद्योगी होते म्हणून पराक्रमाचें चीज झालें. पराक्रमामुळें धैर्याचें चीज झालें. व टिळक स्वतः धैर्यवान् होते म्हणून लोकांना उपदेश करण्याची त्यांना पात्रता आली.

ही सांखळी थोडी स्पष्ट रीतीनें दाखविणें जरूर आहे. 'टिळक सद्वर्तनी होते म्हणून त्यांच्या विद्वत्तेचें चीज झालें ' हें कसें ? टिळकांच्या अंगचा लहानपणासूनचा पहिला गुण म्हणजे सद्वर्तन हा होय. मनुष्य नुसता विद्वान् असून उपयोग नाहीं. त्याच्या जोडीला सद्वर्तन हाहि गुण त्याच्या अंगीं पाहिजे. या दोन गुणांची सांगड असल्यामुळेंच न्यू इंग्लिश स्कूल काढलें तेव्हां टिळकांच्या लायकीविषयीं कोणाला शंका आली नाहीं. खुद्द भांडारकरांनीं त्यावेळीं या प्रसंगासंबंधानें बोलतांना असे उद्गार काढले कीं, 'ही संस्था काढणाऱ्या लोकांत दोन सद्वर्तनी स्वार्थत्यागी एल्एल्. बी. आहेत ही गोष्ट लक्षांत ठेवली पाहिजे !' मनुष्य सद्वर्तनी असेल तरच त्याच्या विद्वत्तेचें चीज.

दुसरें, ' टिळक विद्वान् होते म्हणून त्यांच्या स्वार्थत्यागाचा उपयोग झाला. ' मनुष्य विद्वान् असून स्वार्थत्यागी असेल तरच त्याचा उपयोग व चीज. जवळ ५ रुपये असून त्यांतून ८ आणे धर्म करण्यापेक्षां जवळ १००० रुपये असून त्यांतून ९०० देशकार्याला देणारा मनुष्य माझ्या मतानें जास्त श्रेष्ठ ठरेल. टिळक वकील झाले असते तर दरमहा हजारों रुपये मिळवितां येण्यासारखी त्यांची विद्वत्ता होती. परंतु त्यांनीं स्वार्थाचा त्याग केला व दरमहा ३० रुपयांवर स्वतंत्रपण दरिद्री आयुष्य पत्करिलें ! हा खरा स्वार्थत्याग. अविद्वानाच्या स्वार्थत्यागाला जग काडीचीहि किंमत देत नाहीं हें लक्षांत ठेवा. स्वार्थी असता तर जगाला आग लावली असती अशा मनुष्यानें निःस्वार्थी होऊन देशाचा दास व्हावें हा केवढा गुण ! सुभाषितकारानें धीर कोण हें सांगितलेंच आहे. 'विकारहेतौ सति विक्रियन्ते येषां न चेतांसि तएव धीराः ' विकारहेतु असून त्याचा त्याग करतील ते धीर !

' टिळक स्वार्थत्यागी होते म्हणूनच त्यांच्या देशभक्तीचें चीज झालें. ' स्वार्थत्यागाचा उपयोग देशभक्तीकडेच केला पाहिजे, तरच त्याचें चीज.

मला अशीं कांहीं माणसें माहीत आहेत कीं, ज्यांच्या अंतःकरणांत कधीं देशभक्तीचा लवलेशहि नव्हता ! परंतु तोंडांतून एक शब्द उच्चारल्याबरोबर ज्यांची रवानगी तुरुंगामध्यें झाली व सुटल्यावरहि त्यांनीं कधीं देशभक्ति दाखविली नाहीं ! माणूस उद्योगी असून मनावर घेईल तर हातून पराक्रम घडणार. उद्योग करीत असतांनाच पराक्रम केले पाहिजेत. न कळत पराक्रम एकाद्याच्या हातून पुष्कळ होतात; पण टिळकांचे पराक्रम तशांपैकीं नव्हते. टिळकांनीं सर्व उद्योग जाणूनबुजून केले असल्यामुळें त्यांना पराक्रम करतां आले. त्यामुळेंच त्यांच्या अंगीं असलेल्या धैर्याचें चीज झालें व स्वतः त्यांच्या आंगीं एवढें अलोट धैर्य होतें म्हणूनच लोकांना उपदेश करण्यास त्यांना पात्रता आली, हें काय कोणास सांगावयास पाहिजे !

टिळकांच्या विरुद्ध नुकताच एके ठिकाणीं असा एक आक्षेप घेण्यांत आलेला आहे कीं, त्यांचें सर्व काम Destructive म्हणजे विघातक होतें. माझ्या मतें आक्षेप घेणारांनीं हा दोष म्हणून दाखवावयास नको होता. निदान तो यावेळीं तरी दाखवावयास नको होता ! गुण सुद्धां दोषांच्या भाषेंत बोलतां येतात व दोष हे देखील गुणांच्या भाषेंत बोलतां येतात. दोष दाखविणारालासुद्धां यावेळीं असें म्हणतां आलें असतें— “ डिस्ट्रक्टिव्ह काम ना ? होय; डिस्ट्रक्टिव्ह काम टिळकांनींच करावें. तें त्यांनाच करतां येतें ! डिस्ट्रक्टिव्ह काम का होईना, पण पहा कसें बहादुरीनें केलें !” दोष देणाराला हो काय ! लागेल त्याला दोष देतां येईल. कर्व्यांना म्हणावें, ‘तुम्हांला राजकीय कामांत काय करतां आलें ? ’ व टिळकांना म्हणावें, ‘तुम्ही सामाजिक कामगिरी काय काय केलीत ? ’ म्हणजे खासा रोजगार ! कोणाबद्दल चांगलें म्हणून बोलतां यावयास नको ! टिळकांच्याबद्दल जसा मला आदर वाटतो, तसाच गोखल्यांच्याबद्दलहि माझ्या मनांत कमी आदर नाहीं, ही प्रसिद्ध गोष्ट आहे. मलाहि गोखल्यांच्याविषयीं असें लिहितां आलें असतें कीं, गोखल्यांना डिस्ट्रक्टिव्ह काम मुळींच करितां येत नव्हतें. दुसरें, आक्षेपकांनीं निदान राजकीय बाबतींत तरी टिळकांच्या-बद्दल असें म्हणावयास नको होतें. प्रत्यक्ष चिरोलसारख्या शत्रूकडून त्यांना The father of the Indian unrest म्हणजे “ हिंदवी प्रक्षोभाचे

जनक'' अशी पदवी मिळाली होती व ती सर्वथैव योग्य होती. कोणतेंहि राष्ट्र उदयोन्मुख होत असतें तेव्हां त्यांत अनूरेस्टच उत्पन्न व्हावी लागते. इंग्रज श्रेष्ठ म्हणून त्यांच्याशीं नमून वागण्यांत नेहमीं जी एक फाजील आदरबुद्धि दाखविण्यांत येते, तिचा विध्वंसच झाला पाहिजे. कांहीं वेळां विध्वंसच योग्य असतो. लढाई सुरू असतां काय होत असतें ? दोन्ही पक्षांकडून लढाईची तोफ सुरू झाली म्हणजे मधल्या जमिनींत पखालींनीं पाणी टाकून शेताकरितां ती कांहीं कोणी नांगरावयास लागत नाहीं किंवा त्या वेळेला तेथें शहर कसें उठेल याचाहि कोणी विचार करीत बसत नाहीं तोफांच्या माऱ्यानें सर्व वातावरण भाजून निघून तेथें No man's land उत्पन्न होते. चिटपाखरूंसुद्धां तेथें जिवंत रहात नाहीं मग माणसाची काय कथा ! जमीन भाजून काढल्यानंतरच पेरणी करतात ना ! टिळकांना त्यांच्या शत्रूंनीं तोफेची उपमा दिली असती तर ती जास्त समर्पक झाली असती. टिळकांच्या शत्रूंनीं देखील त्यांची राजकीय कामगिरी पाहून असें म्हणावयास पाहिजे होतें कीं, ''वा; अहो टिळक म्हणजे केवढी तोफ ! ''

असो, टिळकांच्यावरील आक्षेपांचा कांहीं मी आज येथें विचार करणार नाहीं. कारणपरत्वें म्हणून येवढ्या एकाच आक्षेपाबद्दल बोललों. मीं आपणांस जी गुणमाला सांगितली त्यांतला मुख्य गुण कोणता हें आपणांस पहावयाचें आहे. जगामध्यें रुचिवैचित्र्य आहे. अर्थात् कोणाला हा गुण विशेष आवडेल तर कोणाला तो आवडेल. पण माझ्या मतानें ज्योतिषी ज्याप्रमाणें कुंडलींतील ग्रहांवरून एक 'मुंथाग्रह' किंवा संकीर्णग्रह काढतात त्याप्रमाणें मीं एक संयुक्त गुण काढला आहे. संयुक्त गुण म्हणजे तुमच्या भाषेंत ' The resultant of so many forces ' माझ्यामतें टिळकांचे मुख्य गुण म्हणजे निःस्वार्थीपणा, पराक्रम व धैर्य, आणि उद्योगीपणा. या चार गुणांच्या संयोगामुळेंच त्यांचें आयुष्य इतकें प्रभावी झालें. या गुण-मिश्रणालाच इंग्रजींत ' Practical Power ' असें म्हणतात.

निःस्वार्थीपणापासूनच त्यांचें चरित्र सुरू झालें म्हणून तो गुण सांगण्याची जरूरी नाहीं. टिळकांचें धैर्य असामान्य होतें. त्यांचें धैर्य केवळ प्रसंगापुरतें होतें, असें म्हणणारे कांहीं लोक आहेत; परंतु मी निकट सह-वासामुळें खात्रीनें असें सांगू शकतों कीं, जितका जोरानें निराशेचा आघात

होत असे, तितक्याच जोरानें किंबहुना त्याच्यापेक्षां जास्त जोरानें टिळक आपल्या कार्याला पुनः सुरवात करीत. त्यांच्या धैर्याविषयीं एकदोन गोष्टी सहज आठवल्या म्हणून त्या सांगतों. शिक्षा होण्यापूर्वी अर्धा पाऊणतास ते आपल्या स्नेह्यांशीं गप्पागोष्टी व विनोद करीत बसले होते, व तो विनोद ओढूनताणून आणलेला नसून अगदीं खरा व मनापासूनचा होता. नंतर खटल्याचा शेवटचा निकाल ऐकण्याकरितां आम्ही चौघेजण चौचाकींतून कोर्टांत जावयास निघालों. निकाल काय होणार याचें स्वप्न त्यांना पडलेंच होतें; पण अशा प्रसंगींसुद्धां त्यांनीं विनोदानें म्हटलें कीं, "जातांना आपण चौघेजण आहोंत. येतांना घोड्याचें ओझें एका माणसानें तितकेंच कमी होईल!" तसेंच, १९०८ सालीं त्यांच्यावर खटला झाला. त्यांत शेवटच्या दिवशीं त्यांच्याकडला एक वकील हजर नव्हता. स्नेह्यांनीं विचारलें, "त्यांच्याबद्दल दुसरे दोन वकील देऊं का?" टिळकांनीं उत्तर केलें, "दुसरे दोन वकील आणून काय उपयोगी? एखाद्या मुलीला वीस वर्षांचा नवरा पाहून देण्याऐवजीं दहा दहा वर्षांचीं दोन मुलें तिच्यापुढें उभीं करावीं! असें केलें तर चालेल काय!" (हंशाच हंशा) असो. यावरून त्यांचें मन किती निष्काळजी व संकटाविषयीं बेफिकीर असे तें दिसून येतें.

टिळकांच्या अतुल पराक्रमामुळेंच लोकांवर त्यांची इतकी छाप बसली. वास्तविक पाहतां ते तुरुंगांत गेले हा पराक्रम असें मी म्हणणार नाहीं. त्यांना तुरुंगांत घालण्याची बुद्धि सरकारला ज्या कारणामुळें झाली तें कारण म्हणजे त्यांचे तेजस्वी लेख हा पराक्रम होय. " नो मॅन इज ए हीरो टु हिज व्हॅलेट डी चेंबर" अशी एक इंग्रजींत म्हण आहे. म्हणजे "राजाचें मोठेपण त्याच्या खासगी नोकराला काय!" परंतु टिळकांच्या बाबतींत तसें म्हणतां यावयाचें नाहीं. तुमच्या ज्यूलियस सीझर नाटकांतच अशाविषयीं एक प्रसंग आहे:--कॅशस हा ब्रूटसचें मन सीझरविरुद्ध वळवीत असतो व ते दोघे बोलत असतात. त्यांत कॅशस हा ब्रूटसला म्हणतो, "अरे, हा सीझर इतका मोठा कशानें झाला? वास्तविक हा तुझ्या माझ्यासारखा यःकश्चित् मनुष्य! सर्व जगानें याच्या मोठेपणाकडे येवढें स्तिमित होऊन पहावें असें याच्यामध्यें आहे काय! मी व हा एकदां स्पेनमध्यें स्वारीवर गेलों असतां याला तेथें ताप आला; तेव्हां हा हाच

सीझर एकाद्या दीनदुबळ्या पोरीप्रमाणें मजपाशीं म्हणूं लागला कीं, 'कॅशस मला ताप आलारे !' तसेंच, पूर्वी लहानपणीं सीझर व मी टायबर नदींत पोहावयास पडलों असतां वाहतीला लागून हा सीझर बुडूं लागला तेव्हां याला मीं वांचवला ! असें असतां सीझर मोठा कशानें झाला ? अशा यःकश्चित् साधारण मनुष्याला तुम्ही येवढा थोर समजता ?" पूर्ववयांत एकेकाळीं टिळकांच्याबरोबर असणाऱ्या कांहीं व्यक्तींना पुढें त्यांच्या उत्कर्षाबद्दल असेंच वाटे. परंतु टिळकांच्या सहवासांत चोवीस तास एकसारखा राहणारा मनुष्यसुद्धां टिळकांच्या गुणांची तारीफ केल्यावांचून राहणार नाहीं. म्हणून, टिळक वॉज ए हीरो टु हिज व्हॅलेट डी चेंबर ! रानडे देखील टिळकांच्या कांहीं गुणांचें प्रेमानें वर्णन करीत.

विद्यार्थ्यांनीं देखील टिळकांच्या अंगचे कांहीं गुण घेण्यासारखे आहेत. विद्यार्थीदशेंत टिळक हे पुढें पुढें येणारे किंवा कांहींतरी उद्योग बगलेंत मारणारे विद्यार्थी नव्हते. चंदावरकरांनीं टिळकांचें असें वर्णन दिलें आहे कीं, "टिळक म्हणजे त्या वेळीं आमच्या वर्गांत एका कोपऱ्यांत बसणारा गरीब मुलगा होता. परंतु गणित व संस्कृत या विषयांत त्याचा हात धरणारा कोणी नाहीं हें सर्वांस पक्कें माहीत होतें. विद्यार्थीदशेंत त्याची देशभक्ति वाखाणण्यासारखी होती." नुसती देशभक्ति घेतली तर विद्यार्थीदशेंत प्रत्येकाच्या अंगांत देशभक्ति असते. फार काय पण विद्यार्थीदशेंत देशभक्त नाहीं असा मनुष्यच विरळा ! (हंशा). याचें कारण असें कीं, या वयांत मनाच्या भराऱ्या फार उंच असतात; भावी आयुष्याचें अत्यंत सुखमय व उज्ज्वल चित्र रेखाटावयाचा प्रयत्न प्रत्येकजण करतो. लांगफेलो यानें " यूथ " म्हणून कविता लिहिली आहे. त्यांत त्यानें तारुण्याचें फार सुंदर चित्र काढलें आहे.

" How beautiful is youth, how bright it gleams,
With its illusions, aspirations, dreams.
Book of beginnings story without end.
Each maid a heroine each man a friend.
Alladins lamp fortunatus' purse.
That holds the treasure of the universe;

All possibilities are within its hands.
No danger daunts it, no foe withstands ;
In its sublime audacity of faith
Be thou removed, it to the mountain saith.
And with ambitious feet secure and proud
Ascends the ladder leaning on the cloud. "

पहा बरें या कवितेंत तुमचें किती सुंदर चित्र काढलें आहे ! तुमचें वर्णन येईल तुम्हांला असें करितां ! या कवितेचा अर्थ तुमच्या लक्षांत आला असेल. अशक्य हा शब्दच तारुण्यांत मनाला माहीत नसतो. अडचणींचा पर्वत जरी मार्गांत आडवा आला तरी तरुणपणीं इतका आत्मविश्वास विलक्षण वाटत असतो कीं, पर्वताला तो म्हणतो, 'चल तूं दूर हो ! मला पुढें जावयाचें आहे.' तसेंच तरुण मनुष्य आपल्या महत्त्वाकांक्षेची शिडीहि अशी लावतो कीं, त्याचें एक टोंक जमिनीवर तर दुसरें टोंक आकाशांत उंच असणाऱ्या ढगावर ! पहा कशास काय संबंध ? पण विचार नसणें हेंच तरुणांचें लक्षण. पर्वत मार्गांत आडवा आला तर त्याला दरडावून दूर होण्यास सांगणें हाच तरुणपणा. पर्वत कसा दूर होईल, आपणांस बाजूनें गेलें पाहिजे, हा विचार त्याच्या मनांतच येत नाहीं. पण सगळी अडचण काय ती—ही धडाडी, हा जोम पुढील आयुष्यांत कायम ठेवणें यांतच आहे. वृद्ध लोक म्हणतात कीं, आम्ही आतां झालों. तरुणमुलेंच आतां राष्ट्राचे भावी आधारस्तंभ आहेत. हें त्यांचें म्हणणें अक्षरशः खरें आहे. तरुण असतांना आधार होते तसेंच पुढेंहि आधारस्तंभ म्हणवून घेतां आलें पाहिजे. नाहींतर पूर्वीं मानला जाणारा आधारस्तंभ पुढें चिपाडासारखा वाळून हलका झाला तर उपयोग काय ? अमका चांगला तमका वाईट, असले वादहि व्यर्थ होत. टिळक मोठे कीं गोखले मोठे, असा शुष्क वाद करणारांना नेहमीं मी हेंच सांगतों कीं, यांतून तुमच्या दृष्टीनें जो कमी असेल त्याच्याइतके तुम्ही स्वतः मोठे व्हा म्हणजे झालें ! नुसता वाद करून उपयोग काय ? तुम्ही काय करितां ? तुमचें कर्तव्य काय, याची तुम्हांस जाणीव पाहिजे. टिळकांचें विद्यार्थ्यांस नेहमीं हेंच सांगणें असे. टिळकांची तरुण मुलांवर भक्ति होती, याचें कारण यांतून कर्ती माणसें निघण्याची त्यांना आशा असे. ज्याप्रमाणें एकाद्या तरुण

उपवर मुलीचा बाप जो जो तरुण भेटेल त्याच्याकडे पहात 'हा माझा जांवई होण्यास योग्य आहे काय?' असा प्रश्न स्वतःला विचारीत असतो, त्याप्रमाणें प्रत्येक तरुणाच्या चेहेऱ्याकडे टिळक नजर लावून मोठ्या आशेनें पहात असत. टिळकांकडे कोणीहि तरुण गेला तर याचा राष्ट्रकार्याला काय उपयोग होईल याचा विचार ते करीत. ऑक्सफर्ड–केंब्रिजला परवां आम्ही गेलों होतों, तेव्हां टिळकांनीं प्रत्येक विद्यार्थ्याला विचारलें कीं, "तूं पुढें काय करणार?" आपण पुढें काय करणार हें जरी आपण ठरविलें असलें तरी पुढेंहि तें तसेंच हटकून अंमलांत येतें असें नाहीं. अरविंद घोष हे सिव्हिल सर्व्हिसची परीक्षा घोड्यावर न बसतां आल्याकारणानें नापास झाले व त्यांच्या आयुष्याची सर्व दिशा बदलली. गोखले हे एंजिनियरिंगची परीक्षा पास होते तर एक बडे ऑफिसर झाले असते! अर्थात् अशा गोष्टी क्वचित् होत असल्या तरीपण कांहींतरी निश्चित ध्येय प्रत्येकानें डोळ्यासमोर ठेवणें जरूर आहे. प्रत्येकानें राजकारणाचाच अभ्यास केला पाहिजे किंवा राजकारणांत प्रत्येकाचें डोकें चालेंलच असें नाहीं. राजकारणाशिवाय दुसरे पुष्कळ विषय आहेत. देश हा त्यांतल्या मोठ्या माणसावरून ओळखला जातो. बंगाल म्हटला म्हणजे आज आपल्या डोळ्यांसमोर एकदम दहावीस थोर व्यक्ति उभ्या राहातात. ते सर्वच पुरुष काय राजकारणी आहेत? कोणी जगद्वंद्य कवि आहेत, तर कोणी वनस्पतिशास्त्र, प्राणिशास्त्र यांत शोध लाविले आहेत. एकादा विषय आला नाहीं तरी चालेल. तेवढ्यानें निराश होऊं नका. दुसऱ्यांत तुमचें डोकें चालेल. कांहींतरी मोठें कार्य करण्याची इच्छा धरा. स्वभावभेदामुळें तें राजकीय नसलें तरी चालेल. तुमचें सध्यांचें कर्तव्य म्हणजे उत्तम तऱ्हेची विद्या संपादन करणें हें होय. अशी महत्त्वाकांक्षा तुम्हीं मनांत बाळगली पाहिजे कीं, येथील सर्वांत उच्च शिक्षण व सर्वांत उच्च पदवी मी मिळवीन व नंतर ही सामुग्री बरोबर घेऊन मी देशकार्य करण्यास झटेन." ( टाळ्यांचा कडकडाट ).

---

# ४२. सार्वजनिकसभेंतील व्याख्यान

( आक्टोबर १९२० )

कलकत्ता येथें जादा काँग्रेसमध्यें अनपेक्षित रीतीनें व फारच थोड्या बहुमतानें बहिष्काराचे ठराव पास झाल्यानंतर विद्यार्थ्यांमध्यें खळबळ सुरू झाली व कॉलेजें सोडावींत कीं काय यासंबंधीं जो तो विचार करण्यांत गर्क होऊन गेला. याच सुमारास केसरींतून " विद्यार्थ्यांची विद्यार्थ्यांस विनंति " प्रसिद्ध होऊन लगेच एकदोन दिवसांत सार्वजनिक सभेमध्यें विचारविनिमय करण्याकरितां व पुढारी या नात्यानें आपले विचार सांगण्याकरितां विद्यार्थ्यांनीं केळकरांना निमंत्रण दिलें. या सभेंत प्रारंभीं अनेक विद्यार्थ्यांचीं भाषणें झालीं. सरतेशेवटीं अध्यक्ष या नात्यानें भाषण करतांना त्यांनीं मुलांस स्वच्छ सांगितलें कीं, कलकत्त्याच्या काँग्रेसनें ठराव पास केला असला तरी त्यांत " स्वतःच्या सदसद्विवेकबुद्धीला स्मरून " असे शब्द घातले आहेत. हा ज्याच्या त्याच्या स्फूर्तीचा प्रश्न आहे. स्वतःच्या सदसद्विवेकबुद्धीला अनुसरून केवळ स्वतःच्या स्फूर्तीनें जो कॉलेज सोडील त्याला मी डोक्यावर घेऊन नाचेन ! कॉलेज सोडा असा सरसकट उपदेश मी करणार नाहीं. माझें मतच तुम्हांला पाहिजे असेल तर आज सभेला येण्याच्या आधींच माझीं मुलें मीं सरकारी कॉलेजांतून काढलीं आहेत ! हा प्रश्न ज्याच्या त्याच्या स्वयंस्फूर्तीचा आहे. "

कित्येकांना हें भाषण न पटून त्यांनीं मध्येंच गोंगाट करावयास सुरवात केली. त्यावेळीं किंचित् रागानें व किंचित् विनोदानें त्यांनीं मुलांस सांगितलें, " असा गोंगाट करूं नका; The best furnaces are those which give out no smoke; चांगल्या भट्ट्या त्या कीं ज्या आपला धूर बाहेर पसरूं देत नाहींत, हें वाक्य ध्यानांत ठेवून थोडें शांत बसा. कॉलेज सोडणें हा ज्याच्या त्याच्या स्फूर्तीचा प्रश्न आहे—"

यावर मध्येंच एका विद्यार्थ्यानें विचारलें, " पण ती स्फूर्ति तुम्ही उत्पन्न करणार कीं नाहीं ? "

यावर क्षणभर थांबून पण लगेच केळकरांनीं उत्तर दिलें--" हेंहि थोडें ज्याचें त्याच्यावरच अवलंबून आहे. कवीनें म्हटलेंच आहे, 'प्रभवति मणिः बिंबोद्ग्राहे मणिः न मृदांचयः' ! "

याच सभेंत केळकर यांनीं असेंहि सांगितलें कीं, " असहकारितेचा ठराव जरी पास झाला असला तरी त्याला थोडेंसें मुदतीच्या संपाचें स्वरूप आहे. शिक्षणावरील बहिष्कार कायमचा समजावयाचा नाहीं. म्हणून जे कोणी स्वतःच्या स्फूर्तीनें कॉलेजें सोडतील त्यांना शिक्षण हवें असल्यास सुमारें शंभर मुलांची सोय करण्याकरितां कॉलेज काढतां येईल; " असें म्हणून केळकर यांनीं शंभर मुलांची फक्त दोन वर्षें शिक्षणाची काय तजवीज करतां येईल याविषयीं आपली कल्पना सभेंत वाचून दाखविली.

---

# ४३. राष्ट्रीय शिक्षणाची योजना

( तारीख ३० नोव्हेंबर सन १९२० )

मागील अंकीं जाहीर केल्याप्रमाणें पुण्यास राष्ट्रीय शिक्षणाची जी एक संस्था निघत आहे तिचे हेतु व कार्यक्रम यांविषयींची स्थूल कल्पना खालील माहितीवरून केसरीच्या वाचकांस होईल.

राष्ट्रीय शिक्षणाची कल्पना कांहीं नवीन नाहीं; जुनीच आहे. बारापंधरा वर्षांपूर्वी या कल्पनेला बराच जोर आला होता. कित्येकांना राष्ट्रीय शिक्षण म्हणजे काय हें कळतदेखील नव्हतें ! " तें एक खूळ आहे " असा कांहीं लोक बहाणा करीत. अखेर देशांत लोकमत तयार होऊन व खुद्द राष्ट्रीय सभेंत बहुमत पडून राष्ट्रीय शिक्षण हा विषय सर्वमान्य झाला. १९०६ सालीं दादाभाई नवरोजी यांच्या अध्यक्षतेखालीं भरलेल्या राष्ट्रीय सभेंत वळलेल्या चतुःसूत्रींत राष्ट्रीय शिक्षणाचा ठराव हें एक सूत्र आहे. त्या वेळीं राष्ट्रीय शिक्षणाचे लहानमोठे प्रयत्न अनेक ठिकाणीं अनेक प्रांतांतून झाले. स्वावलंबनाचें तत्त्व लोकांच्या तोंडीं तेव्हां असल्यामुळें ज्या राष्ट्रीय शिक्षणाच्या

संस्था निघाल्या अगर योजल्या गेल्या त्यांचा पाया स्वावलंबनाच्या तत्त्वावर होता. पण त्या वेळचे प्रयत्न बहुतेक फसले. त्याचीं कारणें मात्र निरनिराळ्या ठिकाणीं निरनिराळीं घडून आलीं. बंगालमध्यें राष्ट्रीय शिक्षणाचें कॉलेज निघालें, परंतु त्याला हवीं तितकीं मुलें मिळालीं नाहींत. इतर कित्येक ठिकाणीं पैशाचा पुरवठा भरपूर न झाल्यामुळें शाळा बंद पडल्या. वऱ्हाडांत व मुंबई इलाख्यांत द्रव्याभावापेक्षां दडपशाहीच त्या शाळा बुडविण्यास अधिक कारणीभूत झाली. पण मध्यंतरीं ही राष्ट्रीय शिक्षणाची कल्पना जरी थोडीशी दबली तरी बनारस हिंदु युनिव्हर्सिटी व अलीगड युनिव्हर्सिटी या संस्था अस्तित्वांत आल्या. यावरून राष्ट्रीय शिक्षणाच्या कल्पनेचा झरा आटला होता असें म्हणतां येत नाहीं. या संस्थांच्या चालकांनीं सरकारच्या पैशाची मदत घेतली होती व सरकारशीं संबंध ठेवला ही गोष्ट खरी; तथापि विद्यमान युनिव्हर्सिट्या व एकंदरींत सर्व शिक्षणपद्धति हीं सदोष आहेत व शिक्षण हें जितकें लोकांच्या हातीं स्वतंत्रपणें अधिक असेल तितकें बरें, ही कल्पना न हटतां दृढमूलच झालेली होती. तीच कल्पना हल्लीं विशेष बळावली आहे व पंजाबप्रकरण व खिलाफत वगैरे कारणांनीं फिरून त्या कल्पनेचा स्फोट आज झालेला आहे. हल्लीं चालू असलेले प्रयत्न झाले तरी फिरून एक वेळ कशावरून थांबणार नाहींत असा प्रश्न कित्येकांना सहजच सुचतो. त्याचें उत्तर हेंच कीं, ही गोष्ट आधीं सहसा घडणार नाहीं; व घडली असें घेऊन चाललें तरी एकंदरीनें स्वतंत्र व स्वावलंबी शिक्षणाचें पाऊल पुढेंच पडेल. समुद्राला भरती भरत असतांहि समुद्राच्या पोटांतून उठलेली प्रत्येक लाट किनाऱ्याची अंतिम सीमा गांठीत नाहीं. इतर लाटांप्रमाणें तीहि वाटेंत फुटतेच! पण पहिल्या लाटेपेक्षां दुसरी अधिक पुढें जाते व दुसरीपेक्षां तिसरी अधिक पुढें जाते व अशा रीतीनें भरतीची रेषा पुढें पुढें ढकलली जाते. राष्ट्रीय प्रगतीचीहि गोष्ट अशीच आहे.

पंधरा वर्षांपूर्वी राष्ट्रीय शिक्षणाला शिक्षणसुधारणेचें स्वरूप मुख्यतः होतें. आज त्याचें हें पूर्वीचें स्वरूप कायम असूनहि शिवाय असहकारितेच्या चळवळीनें त्याला एक नवीन स्वरूप प्राप्त झालें आहे. पूर्वी सुधारलेल्या शिक्षणाची व्यवस्थित रीतीनें सर्व तजवीज झाली म्हणजे मग हा प्रश्न कोठें

कोणीं हातीं घेतला तरी चालण्यासारखें होतें; पण असहकारितेच्या चळवळी-मुळें सरकारशीं संबंध असलेल्या शिक्षणसंस्थांतून मुलें निघूं लागलीं आहेत, म्हणून त्यांचें नुकसान न व्हावें याकरितां थाटामाटाची वाट न पाहतां मिळेल तसें शिक्षण देण्याची व्यवस्था करणें जरूर भासूं लागलें आहे. राष्ट्रीय शिक्षणाच्या चळवळींत पूर्वी बौद्धिक तेज अधिक होतें; हल्लींच्या त्याच चळवळींत पूर्वीचें बौद्धिक तेज असूनहि त्यांतच प्रबळ भावनेच्या तेजाची भर पडली आहे. मुलांस कांहींएक शिक्षण न मिळतां तीं घरीं स्वस्थ बसलीं किंबहुना उनाड झालीं तरी पुरवलें, पण सरकारशीं संबंध असलेल्या शाळेंत त्यांनीं जातां कामा नये असें म्हणण्यापर्यंत महात्मा गांधींची मजल आज गेलेली आहे. पण मुळींच शिक्षण नको येथवर सर्वांचीच मजल जाणार नाहीं. प्रत्येक मनुष्याच्या मागें उपजीविका ही जोंपर्यंत लागली आहे, व कोणाकडे भीक न मागतां आपल्या पायावर स्वावलंबनानें उभें राहून प्रामाणिकपणें उदरनिर्वाह त्यानें केला पाहिजे, व राष्ट्रीय स्वातंत्र्याच्या पायाचा हाच पहिला धडा होय हें ज्यांना मान्य असेल त्यांना बरीवाईट अर्धीमुर्धी कशी का होईना, पण मुलांच्या शिक्षणाची सोय केलीच पाहिजे हें पटेल. दुसरें असें कीं, तडफेनें बाहेर पडणाऱ्या विद्यार्थ्यांच्या शिक्षणाची सोय झाल्यास शाळा सोडणाऱ्या मुलांची संख्या सहजच वाढेल, व एकामुळें दुसरें व दुसऱ्यामुळें तिसरें असें होऊं लागून असहकारितेमुळें राष्ट्रीय शिक्षणाला व शिक्षणाच्या सोयीमुळें असहकारितेला असें परस्पर बळ येऊं लागेल.

असहकारितेची चळवळ ही जशी प्रत्येक ठिकाणचे लोक आपापल्या सामर्थ्यावर करितात त्याचप्रमाणें नवीन शिक्षणाचा प्रश्नहि ज्या त्या ठिकाणच्या लोकांनीं शक्य तितका आपल्याच सामर्थ्यावर सोडविला पाहिजे. नवीन शिक्षणाचा उच्चार करतांच कित्येक केवळ भावनाप्रधान लोकांच्या मनांत जगड्व्याळ कल्पना येतात. त्यांना एकादें कॉलेज किंवा प्रांतिक युनिव्हर्सिटी निघूनहि समाधान होत नाहीं; तर सर्व हिंदुस्थानाला मिळून एक विश्वविद्यालय असावें व हरएक प्रांतांतून शिक्षणाचा कार्यक्रम, शिक्षणाची पद्धति व अभ्यासाचीं पुस्तकें देखील तींच असावीं असें वाटूं लागतें. कांहीं तर अशा विश्वविद्यालयाचें शिक्षण सर्व प्रांतांतून एकाच म्हणजे हिंदी भाषेच्या द्वारें चाल-

त्याची कल्पना मनांत येऊन त्यांना भावी आनंदाची आगाऊच समाधी लागते. पण त्यांच्या लक्षांत हें येत नाहीं कीं, येवढ्या मोठ्या रचनेचा संकल्प करूं लागलों असतां त्याच्या पायाचा नकाशा हातानें रेखाटण्यांतच आपल्या चिमकुल्या शक्तीचा व्यय होऊन जावयाचा. म्हणून मोठ्या गोष्टी बोलण्या-पेक्षां हातानें होईल तेवढी लहानशी पण स्वावलंबी कृति प्रत्येकानें केली तर त्यांतच अधिक श्रेय आहे.

पुण्यापुरता विचार आपण करूं लागलों तर असें दिसून येईल कीं, आज पुण्यांत खालपासून वरपर्यंत शिक्षण घेणारीं अशीं दहापंधरा हजार तरी मुलें आहेत व यांतील बहुतेक सरकारशीं कोणत्याना कोणत्यातरी रीतीनें संबंध असणाऱ्या संस्थांतून शिकत आहेत. हीं सर्व मुलें गांधींच्या इच्छेप्रमाणें एकदम बाहेर पडलीं तर त्याचा परिणाम सरकारावर अर्थातच होईल. पण ही नुसती कल्पना झाली. नुसतें कल्पनेचें घोडें नाचवून कोणत्याच गांवची मजल गांठतां येत नाहीं. कारण या विद्यार्थ्यांत शेंकडा पंचवीस तरी असे असतील कीं, जे केवळ सरकारी नोकरीकरितां शिकत आहेत आणि स्वतः ते किंवा त्यांचे पालक यांची सर्व महत्त्वाकांक्षा सरकारी नोकरींत शिरून पुष्कळसा मान व पैसा मिळविणें यांतच गुरफटली आहे. असे लोक प्राण गेल्यानेंहि शाळा सोडणार नाहींत. मग गांधी नाहीं गांधींचे परात्पर गुरु त्यांच्यापुढें उभे केले तरी ते फुकट. दुसरे पक्षीं शेंकडा दहा वीस विद्यार्थी असे निघूं शकतील कीं, ते आपल्या तीव्र राष्ट्रीय भावनेमुळें शाळा सोडतील व शाळा सोडतांना पुढें आपली पोटा-पाण्याची काय सोय लागेल याचा विचारहि करणार नाहींत. अशाहि लोकांकरितां नवीन शिक्षणाची सोय झाली तर हवीच; मात्र हे लोक अशा सोयीकरितां अडून न बसणारे असल्यामुळें त्यांचा भार दुसऱ्यावर पडत नाहीं व त्याबद्दल दुसऱ्यास जबाबदारी वाटण्याचेंहि कारण नाहीं. परंतु ते पंचवीस व हे दहावीस वगळले असतां उरलेल्या पन्नासपंचावन्न विद्या-र्थ्यांची मनःस्थिति मध्यम व सरमिसळ असते. म्हणजे सरकारी नोकरीवर तर त्यांचें लक्ष नसतें; किंबहुना सरकारी नोकरी आजन्मांत करणार नाहीं असें लिहून देण्यासहि ते खुषीनें तयार होतील; पण उपजीविकेकरितां कांहीं तरी शिक्षणाची सोय आगाऊ ते पाहतील तेव्हांच त्यांचा पाय

शाळांतून कायमचा निघेल. एरवीं एकाददुसऱ्या महिन्याच्या संपासारखी हुल्लड ते करतील, परंतु नवीन व पक्क्या आधाराशिवाय जुन्या शिक्षणाच्या सोयींना कायम मुकण्यास ते सहसा तयार होणार नाहींत. एका अर्थानें या त्यांच्या सावधगिरीस फारसें नांवहि ठेवतां येणार नाहीं. कारण राष्ट्रीय सभेचा असहकारितेचा ठराव घेतला तरी जोंपर्यंत सर्व पदवीधरांनीं पदव्या टाकल्या नाहींत, सर्व सोनेरी, रुपेरी बिल्लेवाल्यांनीं बिल्ले परत केले नाहींत, सर्व वकिलांनीं वकिली सोडली नाहीं, किंवा सर्व परदेशी व्यापाऱ्यांनीं अशा मालाची विक्री थांबविली नाहीं तोंपर्यंत सर्व विद्यार्थ्यांनीं मात्र शाळांवर बहिष्कार घालावा अशी अपेक्षा कोण कशी करील ? व्यापारी, विद्यार्थी, वकील कोणीहि घेतला तरी ती एकाच हिंदी जनतेच्या खाणींतली माती ! अर्थात् या निरनिराळ्या मातींच्या भांड्यांचा कच्चेपक्के-पणा एकाच डिग्रीचा असणार. आतां मुलें हीं तरुण व भावनाप्रधान म्हणून त्यांची डिग्री इतरांपेक्षां थोडी वर चढेल इतकेंच काय तें ! तरुण पिढीला राष्ट्राची भावी आशा किंवा आधारस्तंभ हें नांव देण्यांत येतें तें यथार्थ आहे; तरी पण या नांवानें त्यांना भुलवून त्यांना लोकोत्तर स्वार्थ-त्यागाच्या भरीस घालणें हें दुसऱ्यानें करतां कामा नये. त्यांनीं वाटेल तर स्वतः करावें. स्वतःच्या स्फूर्तीनें ते जें करतील तेंच खरें व तेंच लाभ-दायक होईल. कदाचित् ज्यानें म० गांधींप्रमाणें सर्वस्वीं स्वार्थत्याग करून फकिरी पत्करली आणि सर्वनाशाच्या पायरीवर पाऊल ठेवलें त्याला सर-सकट विद्यार्थ्यांनीं शाळा व कॉलेजें एकदम सोडावीं हें म्हणणें शोभेल, व अशा तऱ्हेचा उपदेश स्वतः गांधींनीं आपल्या तोंडानें मुंबई, पुणें वगैरे अनेक शहरीं हजारों विद्यार्थ्यांना समक्ष केलेलाच आहे. तेव्हां राष्ट्रीय सभेचा ठराव व गांधींचा उपदेश या दोन गोष्टी लक्षांत घेतां विद्यार्थ्यांना आज मार्गदर्शकतेची वाण आहे असें म्हणतां येत नाहीं.

असो. राष्ट्रीय शिक्षणाच्या योजना पूर्वी अनेक झाल्या, पुढेंहि अनेक होतील. त्या सर्व निरनिराळ्या दृष्टीनेंच केल्या जाणार हें उघड आहे. पुण्याच्या असहकारिता–कमिटीनें आपली योजना करतांना खालील प्रका-रची दृष्टि ठेवलेली आहे.

( १ ) मोठा जगड्व्याळ प्रयत्न करण्यांत अर्थ नाहीं. त्यामुळें हातास

कांहींच येत नाहीं. म्हणून पुण्यांतील सर्व मुलें कॉलेजांतून नांवें काढून घेतील व दोन अडीच हजार मुलांकरितां शिक्षणाची सोय करूं ही अपेक्षा व्यर्थ आहे. पुण्यांतीलच काय पण कोठलींहि सर्व मुलें एकदम कायमच्या शाळा सोडतील हें शक्य नाहीं. शिवाय पंचवीसशें मुलांच्या शिक्षणाची कायमची सोय करणें कोणा चालकास एकदम झेंपणारहि नाहीं. दुसरेपक्षीं अगदींच कोणी मुलें येणार नाहींत असें निराश होण्याचेंहि कारण नाहीं. याकरितां प्रथम सुमारें शंभर मुलें कॉलेज सोडून येतील असा अंदाज करून त्यांच्यापुरती सोय करण्याचें असहकारिता–कमिटीनें ठरविलें आहे. विद्यमान कॉलेजांत प्रवेश न मिळालेलीं शंभर मुलें व हल्लीं कॉलेजांत शिकत असतां तीं मुद्दाम सोडून येणारीं शंभर मुलें यांत पुष्कळच तफावत आहे !

( २ ) राष्ट्रीय शिक्षण किंवा असहकारिता, कोणत्याहि दृष्टीनें पाहिलें तरी कॉलेजच्या दर्जाच्या मुलांची प्रथम सोय करणें हेंच सर्वांत अधिक युक्त आहे. बी. ए. झालेल्या लोकांकरितां शिक्षणाची सोय करण्याचें एक तर कारण नाहीं, कारण ते पदवी घेऊन पोटापुरतें मिळविण्याला तयार झालेले असतात. शिवाय नंतरचा Post-Graduate शिक्षणक्रम अति खर्चाचा असल्यामुळें एखाद्या मोठ्या युनिव्हर्सिटींतच त्यांची व्यवस्था होऊं शकते. दुसरे पक्षीं प्राथमिक शाळेंतील किंबहुना हायस्कूलच्या वर्गांतील मुलें घेणें सोयीचें नाहीं. कारण एक तर मुलें वयानें अज्ञान असतात म्हणून पालकांच्या संमतीशिवाय त्यांना स्फूर्ति असूनहि शाळा सोडतां येत नाहीं. दुसरें असें कीं, लहान मुलांना प्रयोगविषयक राष्ट्रीय शाळेंत घेतल्यास हें शिक्षण पुष्कळ दिवस चालवावें लागून तें कितपत यशस्वी होतें व मुलगा कितपत तरतरीत व उपयुक्त निघतो हें लोकांना दिसून येण्याला दीर्घ काळ लागतो. म्हणून कॉलेजांत शिकणारीं मुलें घेतल्यास तीं जरूर तर आई-बापांच्या इच्छेविरुद्ध स्वतंत्र शिक्षण घेण्यास वयानें सज्ञान झालेलीं असतात; व दोन किंवा फार तर तीन वर्षांच्या शिक्षणानें तीं पोटाच्या उद्योगास कशीं लागतात, व सामान्य बी. ए. च्या तुलनेनें तीं कमीअधीक लायक कितपत ठरतात हें दिसून येऊं शकेल.

( ३ ) नवीन संस्थेंत शिक्षणक्रम ठेवावयाचा त्यांत केवळ पुस्तकी ज्ञानाची तजवीज न करतां व्यावहारिक शिक्षणहि ठेवणें जरूर आहे. या हेतूनें

कॉलेजच्या दर्जाच्या पुस्तकी शिक्षणाबरोबर हस्ताक्षर, टाईप-रायटिंग, लघुलेखन-पद्धति, बँकांचा सामान्य व्यवहार, जमाखर्च, कागदी चलन, प्रॉमिसरी नोटा, बॉण्ड वगैरेंची चालचलाऊ माहिती, तसेंच सोयीप्रमाणें कोणत्या तरी एका धंद्याचें शिक्षण इतक्यांची सोय असहकारिता–कमिटीनें आपल्या योजनेंत केलेली आहे. हल्लीं बी. ए. पर्यंतच्या अभ्यासक्रमांत निव्वळ पुस्तकी ज्ञानाचा समावेश असतो, पण तें ज्ञान व्यवहाराला फारसें उपयोगी पडत नाहीं. पुस्तकी तर्कशास्त्र, त्रिकोणमिति, शेक्सपिअरचीं नाटकें, संस्कृत नाटकें, इंग्रजी कादंबऱ्या असल्या गोष्टींचें ज्ञान व्यवहारास कांहींएक उपयोगी पडत नाहीं व मुलगा बी. ए. झाला तरी फिरून त्याला आपण असहाय असें वाटून मास्तरकीच्या धंद्याशिवाय दुसरा तरणोपाय उरत नाहीं. वरील विषयांच्या अभ्यासानें मनाला एकप्रकारची संस्कृतीची कल्हई किंवा जिल्हई होते हें खरें, पण व्यवहारज्ञान किंवा द्रव्योत्पादक धंदा करण्याची पात्रता या दोनहि दृष्टींनीं तो निरुपयोगी ठरतो. तो धड पंडित नाहीं, व्यवहारचतुर नाहीं, अशी त्याची अर्धवट स्थिति होते. ही दुर्दशा टाळण्याकरितां हें व्यावहारिक विषय मुद्दाम घालण्यांत आले आहेत. सामान्य बी. ए. मनुष्य घेतला तर त्याचें इंग्रजी अक्षर सुमार असतें, बालबोध सामान्य असतें, व मोडी वगैरे जें व्यवहारोपयोगी लेखन तें त्यास मुळींच येत नाहीं. शिवाय बी. ए. झाल्या नंतर एखाद्या वर्गांत जाऊन टाईप-रायटिंग किंवा लघुलेखन शिकण्यास त्याला लाज वाटते म्हणून तें आधींच सक्तीनें झालेलें बरें; तसेंच सामान्य बी. ए. ला बँकांशीं व्यवहार करा करावा, हिशेब कसे ठेवावे, हुंड्या, कागदी चलन यांचा व्यवहार कसा करावा; विमापद्धतीचीं सामान्य तत्त्वें काय वगैरे माहीत नसल्यामुळें व्यवहारांत तो इतर लोकांच्या दृष्टीनें हास्यास्पद ठरतो. या सर्व गोष्टी शिकण्याला फार श्रम लागतात असें नाहीं. पण हें शिक्षण वेळीं न झाल्यास पुढें मुळींच होत नाहीं. कित्येकांच्या मतें कॉलेजच्या अभ्यासक्रमांत असले विषय ठेविल्यानें शिक्षणाच्या दर्जास कमीपणा येतो, पण ही समजूत वेडेपणाची आहे पाश्चात्य देशांत व्यावहारिक शिक्षण असेंच दिलें जातें. आपल्याकडे धंदेवाईक शिक्षणाचीं स्वतंत्र कॉलेजें असलीं तरी प्रत्येकाला तें शिक्षण घेणें शक्य नसतें. पण त्या विषयाची माहिती प्रत्येकाला माहीत असणें जरूर असतें.

(४) वरील व्यावहारिक शिक्षणाशिवाय एखाद्या स्वतंत्र धंद्याचेंहि शिक्षण देण्याची तजवीज असहकारिता–कमिटीच्या योजनेंत केली आहे. याचें कारण हेंच कीं, बुद्धि चालेल त्याप्रमाणें या संस्थेंतून निघालेल्या विद्यार्थ्यानें वाटेल तर शाळामास्तर व्हावें अगर कांहीं व्यापार–धंदा करावा. शेक्सपिअरचें नाटक किंवा बाणाची कादंबरी वाचण्याऐवजीं सुतारकी, लोहारकी आलेली बरी. सुखवस्तु मनुष्य हीं पुस्तकें प्रौढवयांत स्वतः किंवा शिक्षक ठेवून वाचूं शकतो. पण प्रौढवयांत वाकस, किंकरें किंवा हातोडा घेऊन सुतारकी, लोहारकी किंवा विणकरीचे माग चालविण्याची कला त्याला येणार नाहीं. तात्पर्य, लघुलेखन, टाईपरायटिंग, एखादा हस्तकौशल्याचा धंदा, हिशेब व पेढीचे व्यवहार इतकें ज्ञान मिळाल्यास कोणासहि उपाशीं मरण्याचें कारण नाहीं.

( ५ ) असें आहे तरी खुद्द पुस्तकी ज्ञानाकडे कोणत्याहि प्रकारें दुर्लक्ष करण्यांत आलेलें नाहीं. असहकारिता–कमिटीच्या योजनेंत पांच विषयांपैकीं तीन विषय पुस्तकी ज्ञानाचे व तेहि कॉलेजच्या दर्जाचे आहेत. इंग्लिश या विषयांत कांहीं उत्कृष्ट उंची इंग्रजी सर्वमान्य ग्रंथ ठेवण्यांत येऊन शिवाय इंग्रजी निबंधलेखन, भाषांतर, संभाषण, वर्तमानपत्रांचा व्यवहार यांचेंहि शिक्षण दिलें जाईल. नाहीं म्हणावयास पुष्कळशीं इंग्रजी नाटकें, कादंबऱ्या किंवा काव्यें हीं ठेवण्यांत येणार नाहींत. त्याचें कारण उघड आहे. हें इंग्रजी भारूड वाचण्यांत पुष्कळ वेळ फुकट जातो. पण पुढें मात्र त्याचा कांहीं उपयोग होत नाहीं. कमिटीनें योजिलेलें इंग्रजी शिक्षण व्यवहारासच काय पण शाळामास्तरहि होण्यास पुरेसें आहे.

( ६ ) आर्यसंस्कृति–यांत संस्कृत व मराठी या दोनहि भाषांतील धार्मिक व विदग्ध वाङ्मय यांचें ज्ञान द्यावयाचें; मात्र एकच पुस्तक अथपासून इतिपर्यंत न शिकवितां व्याख्यानांच्या पद्धतीनें प्रमुख प्रमुख अशा अनेक ग्रंथकारांचा परिचय करून द्यावयाचा आणि संस्कृत व मराठी वाङ्मयाचा समग्र वृत्तान्त अगर इतिहास सांगावयाचा, असें शिक्षण–कमिटीनें योजिलें आहे. युनिव्हर्सिटीच्या कॉलेजच्या शिक्षणक्रमांत कांहीं संस्कृत पुस्तकें असतात, पण मराठीस जवळ जवळ अजिबात फाटाच दिलेला असतो. ही पद्धति बदलून सर्व शिक्षणक्रम होतांहोईतों मराठींतूनच पार पाडावयाचा

पण त्यांतूनहि मराठी हा विषय म्हणून शिकवावयाचा असें ठरविण्यांत आलें आहे.

( ७ ) शेवटचा विषय कायदा, अर्थशास्त्र, राजधर्म व प्रजाधर्म हा ठेवण्यांत आला आहे. युनिव्हर्सिटीच्या अभ्यासक्रमांत हिंदुस्थानची राज्य-पद्धति हा एक विषय इंटर म्हणजे मध्यम परीक्षेला असतो, त्याचा यांत समावेश होईलच. पण शिवाय अर्थशास्त्र आणि राजधर्म व प्रजाधर्म हे विषय केवळ हिंदी दृष्टीनें शिकविण्यांत येऊन खासगी, सार्वजनिक, राजकीय व्यवहाराला लागणारे मुख्य मुख्य कायदेकानू मुलांकडून वाचून घेण्यांत येतील. या नवीन संस्थेतील विद्यार्थी पुढें हरएक प्रकारच्या सार्वजनिक कार्यांत व चळवळींत पडणार आहेत हें निश्चित आहे. कारण निवळ पोटार्थी मुलगा हल्लींचें कॉलेज मुद्दाम सोडून देऊन या नवीन संस्थेत येतो आहे कशाला ? आणि अशा चळवळींत पडावयाचें तर व्यवहारोपयोगी व व्यवहार नडवणारे म्हणजे दडपशाहीचे कायदे त्याला चांगले माहीत असले पाहिजेत.

( ८ ) कमिटीनें योजिलेला शिक्षणक्रम दोन वर्षांचा असून त्यांत वरील पांच विषयांचें प्रत्येकीं रोज एक तास शिक्षण दिलें जाईल. याहूनहि हा शिक्षणक्रम अधिक वरच्या दर्जाचा करतां येईल कीं नाहीं असें पुष्कळांकडून विचारण्यांत आलें आहे. पण या दोन वर्षांच्या भरीस आणखी एक तिसरें वर्ष घातलें असतां वरीलपैकीं कोणत्याहि एका विषयाचें उच्च दर्जाचें ज्ञान अर्थात् देतां येईल; पण हा विचार नवीन कॉलेज सुरू झाल्यानंतर पहिल्या वर्षअखेर केला तरी चालेल. शिवाय सुट्टीच्या दिवसांत वरील विषयांना उपयोगी पडणारीं अशीं सर्वसाधारण माहितीचीं व्याख्यानें नामांकित विद्वानांकडून दिलीं जातील. तात्पर्य, या संस्थेतील शिक्षण घेऊन बाहेर पडणारा विद्यार्थी सामान्य संस्कृतीच्या दृष्टीनें पाहतां बी. ए. च्या तोडीचा होईल. इतकेंच नव्हे, तर त्याहून अधिक माहितगार, कार्यक्षम, वाकबगार व स्वतंत्र उपजीविकेस समर्थ असाच होईल.

तूर्त शिक्षणक्रम दोन वर्षांचा धरून हा प्रयोग दोन वर्षेपर्यंत तरी करून पहावा असें कमिटीनें ठरविलें असून त्याच्या खर्चाची तरतूदहि केली आहे. पण प्रयोग हा शब्द असहकारिता-कमिटीच्या ठिकाणीं आत्म-

विश्वास नसल्याचें दर्शक नसून केवळ तिच्या नम्रताबुद्धीचें द्योतक आहे, व कमिटीची अशी खात्री आहे कीं, मुलांची संख्या ज्याप्रमाणें वाढेल त्याप्रमाणें या संस्थेचे वर्गहि वाढूं शकतील. तात्पर्य, ज्या मुलांना कॉलेज सोडण्याची आंतून खरी स्फूर्ति असेल त्यांना यापुढें तें न सोडण्याला कोणतीहि सबब राहणार नाहीं. मात्र त्यांनीं आपली जबाबदारी आपणच उघड्या डोळ्यांनीं पतकरून कॉलेज सोडावें. मग आमची अशी तशी सोय झाली नाहीं अशी तक्रार करून दुसऱ्यास दोष लावण्यास जागा राहणार नाहीं.

कित्येक बढाईखोर लोक हें कसलें लहानसें कॉलेज म्हणून नाकें मुरडतील हें आम्हांस माहीत आहे. पण सर्व संस्थांचा प्रारंभ असाच अल्प असतो हें त्यांनीं लक्षांत ठेवावें. आज फर्ग्युसन कॉलेज एवढें मोठें सजलें असलें तरी तें प्रारंभीं एका सातखणी माडींतच मावत होतें ! बरें, तें आज एवढें मोठें झालें असलें तरी तें मुख्यतः सरकारच्या आधारावर, हें कॉलेजचें नांवच सांगतें. सरकारची मदत म्हणूनच राजेरजवाड्यांची मदत, नाहीं तर त्याला विचारीत कोण होता ? व एवढ्या देणग्या कशा मिळत्या ? या कॉलेजला खासगी गृहस्थांनींहि पुष्कळच देणग्या दिलेल्या आहेत, पण त्या वेळीं सर्व महाराष्ट्रांत ही एकच उंची संस्था होती व तिच्या उत्पादकांच्या नांवाच्या पुण्याची जोड संपली नव्हती. बरें, लोकांच्या देणग्यांवर हें कॉलेज इतकें पोसलें म्हणून त्या मानानें त्याची कार्यक्षमता वाढली किंवा विद्यार्थी त्या मानानें अधिक विद्वान् व सतेज निर्माण होऊं लागले असेंहि नाहीं. पण कॉलेजचें शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्यांची संख्याच अलीकडे पुष्कळ वाढली म्हणून या कॉलेजचें प्रस्थहि पुष्कळ माजलें इतकेंच काय तें. तात्पर्य, या जुन्या तीस वर्षांच्या कॉलेजाच्या तुलनेनें आज नवीन निघणारें कॉलेज लहान वाटावें हें ठीकच आहे. कित्येक त्याला क्षुद्र असेंहि म्हणतील. पण अभ्यासक्रम, शिक्षण वगैरेंच्या दृष्टीनें पाहतां या नव्या कॉलेजांत आज फारसें कमी कांहीं नाहीं, व असेल ती उणीवहि विद्यार्थी व जनता यांचा आश्रय मिळाल्यास लवकरच निघून जाईल असें गृहीत घेऊन चालण्यास हरकत नाहीं. विद्यार्थ्याला शिक्षण मिळेल तें कशा दर्जाचें मिळेल, त्यांत खरी राष्ट्रीय दृष्टि कितपत आहे येवढ्यावर नजर देणाऱ्याला टोलेजंग इमारती,

विस्तृत मैदानें, वसतिगृहें हीं नसलीं तरी कांहीं एक वाईट वाटणार नाहीं. किंबहुना राष्ट्रद्रोही बडेजावीचें कंबरडें फकिरी सोय्यानें मोडलें तरी आज तें इष्टच आहे. आज भिक्षापात्राला राष्ट्र जो मान देतें तो सोन्याच्या सलकड्यांना देत नाहीं.

---

# ४४. राष्ट्रीय शिक्षण व पालकांचें कर्तव्य

( केसरी, तारीख ७ डिसेंबर १९२० )

गेल्या केसरींत पुणें येथील राष्ट्रीय शिक्षणाच्या योजनेविषयीं लिहितांना, मुलांना उद्देशून कोणीं कसा उपदेश करावा यासंबंधानें आम्हीं आपलें मत दिलें होतें. तरुण मुलांना निवळ भावनापूर्ण वक्तृत्वानें भुलवून लोकोत्तर स्वार्थत्यागाच्या भरीला घालणें हें तिऱ्हाइतास योग्य नाहीं. विद्यार्थ्यांनीं स्वतःच्या स्फूर्तीनें योग्य वाटेल तेंच करावें असें आम्हीं म्हटलें होतें. पण स्वतः तरुण मुलें किंवा तिऱ्हाईत यांना उद्देशून जें बोलावयाचें तें वेगळें व खुद्द पालकांस उद्देशून बोलावयाचें तें वेगळें असणार हें सांगावयास नकोच. असहकारिता व राष्ट्रीय शिक्षण यांच्या संबंधांत वास्तविक जबाबदार पालकांनींच पुढाकार घेऊन कार्य केलें पाहिजे; व या बाबतींत पालकांना जागें करण्याची वेळ खास आली आहे असें आम्हांस वाटतें.

गेल्या पंधरवड्यांत राष्ट्रीय शिक्षणाची जी चळवळ झाली तिच्या योगानें पालकवर्ग जागा झाल्यासारखा दिसतो खरा, पण ही जागृति थोडीशी उलट्या दिशेनें असल्याची शंका येते असें मोठ्या कष्टानें म्हणावें लागतें. पुण्यास कांहीं पालकांनीं एक हस्तपत्रक काढून गेल्या रविवारीं एक पालकांची म्हणून जाहीर सभा भरविली होती. ती एकंदर पालकवर्गाच्या मनोवृत्तीचें निदर्शक अशी मानितां आली असती तर ती खेदाची गोष्ट होती; पण पुण्याच्या काय किंवा पुण्याबाहेरील काय, पालकवर्गाच्या सारासार विवेकाविषयीं आमची निराशा झालेली नाहीं. त्यांच्याशीं मोकळ्या मनानें थोडासा युक्तिवाद केल्यास त्यांना तो पटेल; व असहकारिता आणि राष्ट्रीय

शिक्षण यांना सन्मुख अशीच त्यांची मनोवृत्ति होईल अशी आम्हांस अजून बळकट आशा आहे.

पालकांना उद्देशून बोलतांना प्रथम एकदोन गोष्टी सांगून टाकल्या पाहिजेत, व त्या त्यांच्याच तर्फेच्या आहेत. पहिली ही कीं, आपल्या मुलांना शिक्षण कोणतें द्यावें हें ठरविण्याची अवल जबाबदारी व मुख्य अधिकार हा पालकांचाच आहे ही गोष्ट कोणीहि नाकबूल करून चालावयाचें नाहीं. राष्ट्रीय प्रश्न झाले तरी, त्यांत मुलांचा संबंध येत असल्यास, मुख्यतः पालकांच्या द्वारेंच ते सोडविले पाहिजेत. बाहेर वाटेल तितका सूर्य प्रकाश असला तरी आपल्या कांचेवर तो किती व कसा घ्यावा हें छायाचित्र काढणारा मनुष्य म्हणजे फोटोग्राफर स्वतः ठरवितो, व त्याप्रमाणें 'कॅमेऱ्या'च्या तोंडावर लहान मोठ्या भोंकाची काळी चकती किंवा 'ड्रायफ्रॅम' घालतो, त्याचप्रमाणें आपली गृहस्थिति, मुलाच्या अंगची बुद्धि व इतर गुण, आणि शिक्षणाची उपलब्ध साधनें या तिहींचा मेळ स्वतः पालक हाच योग्य रीतीनें घालूं शकेल, दुसऱ्यानें फार तर सुद्धेतुपूर्वक त्याला सल्लामसलत द्यावी इतकेंच काय तें. तसेंच तरुण मुलांनीं झालें तरी आपल्या आईबापांच्या आज्ञेनुसार वागणें हेंच त्यांचें कर्तव्य आहे. कुटुंबांतील शिस्त हाच राष्ट्रीय शिस्तीचा पाया आहे; व तिचा उच्छेद करणें हा एक प्रकारचा राष्ट्रद्रोहच होय, हें आम्हांस मान्य आहे. राष्ट्रीय शिक्षणाचे उपदेशक झाले तरी प्रायः या मार्गाचें उल्लंघन करीत नाहींत असहकारितेला अनुलक्षून पुण्यास जें राष्ट्रीय कॉलेज लोकमान्य टिळकांचें स्मारक म्हणून निघणार त्याचें कार्यक्रमपत्रक गेल्या अंकीं प्रसिद्ध झालें आहे. त्यांत या कॉलेजकडे "नांवें नोंदवितांना विद्यार्थ्यांनीं शक्य तितका पालकांच्या संमतीचा दाखला सोबत जोडावा" असेच शब्द घातलेले आहेत. यावरून निदान सदर विद्यालयाच्या चालकांच्या मनांत पालकांच्या अधिकाराचा उपमर्द करण्याचें बिलकुल नाहीं हीच गोष्ट शाबीत होते, व पुण्याबाहेरहि ज्या कोठें अशा शाळा किंवा कॉलेजें निघतील तेथेंहि हाच समंजसपणाचा मार्ग अनुसरला जाईल अशी आमची खात्री आहे. म्हणून या बाबतींत तरी पालकांना तक्रार करण्यास जागा मिळाली आहे असें आम्हांस वाटत नाहीं. पालकांच्या तर्फेची दुसरी गोष्ट ही कीं, तरुण मुलें होतां होईतों

अशिक्षित राहूं नयेत, स्वावलंबी उपजीविका चालण्याचें साधन मिळवून देण्यासारखें कांहीं तरी शिक्षण त्यांस मिळण्याची सोय अवश्य असावी अशी पालकांची इच्छा सहजच असणार व तिचेंहि समर्थन आम्हीं गेल्या केसरींत केलें आहे. अशा शिक्षणाची कांहींच सोय नसतां सर्व मुलांनीं एकदम शाळा किंवा कॉलेजें सोडून देऊन घरीं बसणें ही गोष्ट पालकांच्या जिवावर येणारी आहे हें आम्ही जाणतों. पण वरील दोन सिद्धांत संभाळूनहि आम्हांस असें कष्टानें म्हणावें लागतें कीं, पालकवर्गानें आपल्या आजच्या खऱ्या कर्तव्याविषयीं जितकें जागृत राहिलें पाहिजे तितके ते राहिलेले दिसत नाहींत.

महात्मा गांधीं किंवा असहकारितेचे कांहीं जहाल उपदेशक अविचारानें शिक्षण एकदम सोडून देण्याविषयीं सर्व मुलांना उपदेश करितात असा आरोप केलेला कोठें कोठें आढळून येतो. पण आम्हांस वाईट इतकेंच वाटतें कीं, पालकांच्या दृष्टीनें विचाराची योग्य मर्यादा तरी कोणती हें स्पष्ट करून सांगण्याला मात्र पालक पुढें येत नाहींत. पुण्यास भरलेल्या पालकांच्या जाहीर सभेच्या निमंत्रणपत्रिकेंत इतके मुग्धपणाचे शब्द होते कीं, त्यावरून त्यांची खरी मनस्थिति कांहींच कळून येत नव्हती; व खुद्द सभा भरली तिजमध्यें देखील पालकांच्या तर्फेचें विधायक स्वरूपाचें असें म्हणणें कांहींच मांडलें गेलें नाहीं. मुलें सर्वस्वीं शिक्षणविरहित राहिलीं तर अनर्थ होतील एवढेंच सांगण्यांत आलें; पण अलीगडांत काय, गुजराथेंत काय किंवा पुण्यांत काय, जो उपक्रम आज होत आहे त्यावरून मुलें निरुद्योगी ठेवण्याचा कोणाचाच विचार नाहीं ही गोष्ट उघड होत आहे. मग जी गोष्ट मुळांत नाहीं तिचा निषेध किंवा इनकार करण्यापासून काय फायदा ? मुलें बेकार तर ठेवावयाची नाहींत; पण सरकाराशीं संबंध असलेल्या शिक्षणसंस्थांतहि तो पुढें ठेवावयाची नाहींत, अशा दोन गोष्टींचा मेळ घालण्याचा विधायक प्रयत्न असहकारिता-कमिटीनें जो केला आहे तो सिद्धीस कसा जाऊं शकेल व त्यांत सुधारणा काय झाल्या पाहिजेत अशाविषयीं जर सभा भरविणाऱ्या पालकांनीं स्वतःच्या म्हणून कांहीं विधायक सूचना केल्या असत्या तर त्या अवश्य ग्राह्य झाल्या असत्या. पण अशा सूचना पुढें न येण्याचें कारण एकच आहे व तें हेंच कीं, सामान्य

पालकवर्गाच्या मनाला विद्यमान राजकीय परिस्थितीची जितकी आंच लागावयास पाहिजे तितकी लागलेली नाहीं; व राष्ट्रीय सभेनें असहकारितेच्या ठरावाच्या रूपानें जी स्वार्थत्यागाची हुंडी त्यांच्यावर लिहिली ती अद्यापि पटवून घेण्याची त्यांची तयारी नाहीं.

पण ती हुंडी यापुढें फार दिवस खडी राहूं शकणार नाहीं हें मात्र त्यांनीं जरूर लक्षांत ठेवावें. त्यांना फक्त दोनच मार्ग खुले आहेत; पैकीं एक हा कीं, ती हुंडी पटवून घेऊन राष्ट्राचें देणें द्यावें व स्वतः अनृणी व्हावें. दुसरा मार्ग म्हटला म्हणजे हुंडी अमान्य करून राष्ट्रीय सभेचा अपमान करावा व तिची नापत करावी. दुसरा मार्ग अर्थात् बिनखर्ची व सोपा या बुद्धीनें तोच अनुसरावा असें त्यांना वाटेल; पण त्यांनीं आज तसें केल्यास त्याचा सव्याज मोबदला त्यांना पुढें द्यावा लागेल ही गोष्ट मात्र त्यांनीं विसरतां कामा नये. व्यवहारांतल्या सावकाराची हुंडी वसूल करण्याला सरकारी न्यायकोर्टें असतात तशी राष्ट्राचें देणें वसूल करण्याला नाहींत हें खरें, तथापि प्रक्षुब्ध लोकमत हा एक जहाल लाठियाळ पुरभय्या किंवा पठाण असून तो कोर्टाच्या हुकुमनाम्याची अपेक्षा न करितां आपला तगादा वसूल करण्यास आजहि समर्थ आहे व दिवसेंदिवस तो अधिकाधिक समर्थ होणार ही गोष्ट पालकवर्गानें विसरूं नये. मात्र बऱ्या बोलानें आपलें देणें न दिल्यास या वाममार्गाच्या तगादावसुलींत कोठें खरचटलें, कोठें रक्त निघालें, कोठें टेंगूळ आलें अशी तक्रार करण्यास त्यांना जागा राहणार नाहीं.

तरुण मुलांनीं आईबापांची आज्ञा पाळावी, पण या आज्ञापालकत्वालाहि ज्या अंतिम मर्यादा आहेत त्या पालकांनीं विसरूं नयेत. घरची सुस्थिति आहे, मुलगा सज्ञान झाला आहे, सरकारी किंवा निमसरकारी शिक्षण संस्था सोडून दिल्यास इतर रीतीनें थोडें निराळें पण स्वतंत्र शिक्षण मिळण्याची सोय आहे, अशी स्थिति असतांहि राष्ट्रीय शिक्षण घेण्याची मुलाची हौस जो बाप पुरविणार नाहीं त्या नतद्रष्ट बापाची आज्ञा तरी मुलानें कां पाळावी हें आम्हांस समजत नाहीं. आणि असे बाप किंवा पालक आज थोडे आहेत असें आम्हांस म्हणतां येत नाहीं, हें आमचें दुर्दैव होय. पूर्वी महाराष्ट्रांत लष्करच्या नोकरीवर निघण्याची वेळ आली असतां घरटीं एक

मनुष्य देऊन लष्करी नोकरी करून वतन संभाळलें जाई. आजच्या पालकवर्गाला आमचा आज असा खडा सवाल आहे कीं, राष्ट्राचें सर्व वतन परकीयांच्या हातीं जाऊन नष्ट होण्याची वेळ आली आहे व तें राखावयाचें तर केवळ स्वार्थत्यागानेंच राखलें जाणार आहे, अशा वेळीं हिंदुस्थानांतील प्रत्येक कुटुंबानें आपला एक मुलगा राष्ट्रकार्याकरितां वाहिला तर एवढी प्रचंड सेना सिद्ध होईल कीं, तिच्या बळावर आमचें हरपलेलें स्वातंत्र्य परत आणतां येईल, पण स्वातंत्र्याचें वतन बुडालें तरी चालेल, आपल्या मुलांचें मात्र नुकसान काडीभरहि होऊं नये ही क्षुद्रपणाची स्वार्थबुद्धि आमच्यांतून अजून गेली नाहीं.

स्वतः मुलगाच रडतराऊ असेल तर त्याला स्वारीवर सक्तीनें धाडण्यांत अर्थ नाहीं. पण राष्ट्रीय सभेसारख्या अधिकारी संस्थेनें किंवा महात्मा गांधी-सारख्या वैराग्यसंपन्न फकीरानें हांक मारलेली ऐकून जो मुलगा स्वार्थत्याग करण्याला तयार होतो त्याला राष्ट्रद्रोही अशा फाजिल मायाममतेनें कोंडून ठेवणाऱ्या आईबापांचा जेवढा धिक्कार करावा तेवढा थोडाच आहे. अशाहि आईबापांची इच्छा मुलाचें कल्याण व्हावें हीच खरी; तथापि कल्याण या शब्दाचा अर्थच आज त्यांना बरोबर कळत नाहीं, किंवा कळत असला तरी तो फार संकुचित आहे. त्याचा राष्ट्रदृष्टीनें विस्तार झाला पाहिजे, असें म्हणण्यास पालकवर्गाच्या देवाचीहि आम्हांस भीति वाटत नाहीं. जे आईबाप इतर रीतीनें अशरण, असहाय, दुबळे, पंगु असतील व ज्यांच्या उदरपोषणाचा भार सर्वस्वीं आपल्या मुलांवरच असेल अशांनीं एक वेळ मुलांना मिळणाऱ्या शिक्षणाकडे केवळ पैशाच्या दृष्टीनें पाहिलें तर तें कदाचित् क्षम्य होईल व अशा आईबापांच्या हातची म्हातारपणची काठी काढून घेऊन त्यांना तोंडघशी पाडण्याचा निष्ठुरपणा कोणीहि करणार नाहीं. पण आपण चैनींत किंवा भरपूर सुखांत दिवस घालविले तसेच मुलानेंहि घालवावे, किंबहुना त्याच्या सुखाची व चैनीची कमान चढती असावी, आपण केलेला धनसंचय त्यानें कमी न करतां उलट वाढवावा व त्याकरितां सरकारी नोकरी करावी, किंवा स्वतंत्र शिक्षण घेऊं नये, अशा नादान कल्पना ज्यांच्या डोक्यांत असतील त्या आई-बापांना मुलांनीं राष्ट्राचेच काय पण स्वतःचेहि हितशत्रु खुशाल मानावें,

आणि त्यांची स्वार्थी दृष्टीची आज्ञा बेलाशक लाथाडावी; त्यांत त्यांना मुळींच पातक लागणार नाहीं.

आतां सर्वच पालकवर्ग असा आहे असें आमचें म्हणणें नाहीं. तथापि देशाभिमानाचा प्रकाश मनांत थोडाबहुत पडणाऱ्या पालकांमध्येंहि पुष्कळ लोक आज राष्ट्रीय शिक्षणाविषयीं साशंक दिसतात. व त्यांना उद्देशून आम्हांस हेंच सांगावयाचें कीं, त्यांनीं आतां ही साशंकवृत्ति टाकावी व देशांत शिक्षणविषयक असहकारिता फैलावण्याचा उद्योग, निदान विधायक उद्योग जे लोक करीत असतील त्यांना, पुढें येऊन, हरएक प्रकारची सल्ला-द्यावी, मदत करावी व राष्ट्रीय शिक्षणाचें कार्य पुढें ढकलावें. कोणचीहि संस्था बनविण्याला पुष्कळ दिवस लागतात व ती मोडण्याला फारसे श्रम लागत नाहींत हा सामान्य सिद्धांत खरा आहे; व राष्ट्रीय चळवळींत झालें तरी शहाण्या मनुष्यानें तृणजलुकेप्रमाणें दुसऱ्या काडीवर पाय पक्का ठेवल्यावरच पहिल्या काडीवरील पाय काढून घ्यावा ही सावधगिरीची सूचना सामान्यतः कोणालाहि ग्राह्य होईल. तथापि स्वतः पालकांकडून जोंपर्यंत प्रगतिपर अशा विधायक सूचना येणार नाहींत तोंपर्यंत एका बाजूस स्वार्थबुद्धीनें विद्यमान् संस्थांना कवटाळून धरणारे लोक व दुसऱ्या बाजूस अशा संस्थांच्या पायाखालीं सुरुंग खणून त्या एकदम उडवून देण्याचे प्रयत्न करणारे लोक यांच्यांतच बिनतोड झगडा चालू राहिल्यास नवल काय ? पुण्यांतील कांहीं पालकांनीं मुलांचें हित लक्षांत घेऊन राष्ट्रीय शिक्षणाच्या चर्चेकरितां पालकांची जाहीर सभा भरविण्याचें श्रेय घेतलें याबद्दल आम्ही त्यांचें अभिनंदन करतों; कारण त्या सभेचा परिणाम शेवटीं राष्ट्रीय शिक्षणाच्या तर्फेचाच होणार; पण वाईट एव-ढेंच वाटतें कीं, राष्ट्रीय शिक्षणाच्या शाळेंत मुलांनीं जाणें हें संकट वाटून ज्यांनीं आपले हातपाय हलविले त्यांना असेच हातपाय हलविण्याच्या इतर अनेक बाबी असतांहि त्या कामीं मात्र ते हलत नाहींत. उदाहरणार्थ, पुण्यांत पालकांच्या परवानगीशिवाय सिनेमा किंवा नाटकें पाहण्यास जाणारे गांवचे, निदान परगांवचे, विद्यार्थी अनेक असतील. याकरितां पालकांच्या दाखल्याशिवाय नाटकवाले किंवा सिनेमावाले यांनीं मुलांना तिकिटें विकूं नये अशी चळवळ झाली तर ती इष्ट नव्हे काय ? पण या कामीं मात्र

कोणी पालक हस्तपत्रकें काढून सभा भरवीत नाहींत यावरून काय अनुमान काढावयाचें तें उघडच आहे.

आमची अशी खात्री आहे कीं, पालकवर्गानें मनावर घेतल्यास राष्ट्रीय शिक्षणाचा प्रश्न हटकून सुटून असहकारितेचें कार्य सफल होईल. सरकारी ग्रँट घेणें ही गोष्ट ती ग्रँट घेणारालाहि मनापासून आवडतेच असें आम्ही म्हणत नाहीं. पण ज्यांनीं ती घेण्याचा प्रघात पाडला व तिजमुळें येणाऱ्या स्वास्थ्याच्या उपभोगाची संवय लावून घेतली त्यांना ती सोडून देण्याचें वैराग्य एकदम स्फुरेल हें शक्य नाहीं. पण सरकारी ग्रँटचे आंकडे व त्याचा प्रत्यक्ष उपयोग यांची ज्यांना थोडीशी माहिती आहे त्यांच्या हें चटकन लक्षात येतें कीं, एका बाजूस सुशिक्षणाच्या नांवाखालीं होणारा फाजील डामडौल व बडेजाव कमी करण्यांत आला, व दुसरे बाजूस पालकांनीं स्वार्थत्यागाची थोडीशी कळ सोसण्याचा निश्चय केला तर सरकारी ग्रँटवर बहिष्कार घालणें ही गोष्ट अशक्य कोटींतील नाहीं. आणि या कामीं चळवळ करावयाची तर ती करण्यास विद्यार्थ्यांचे पालकच योग्य आहेत, व त्यानीं थोडी उचल केल्यास विद्यमान शिक्षणसंस्थांचे चालक ग्रँट सोडण्यास मिळतें घेतील व कोणी ग्रँट न सोडण्याचा आग्रहच धरील तर त्यांना वठणीवर आणण्यास फारसें अवघड जाणार नाहीं. युनिव्हर्सिटीशीं संबंध सोडणें ही गोष्ट ग्रँट सोडण्यापेक्षांहि थोडी अवघड खरी; तथापि स्वतः पालकांनीं मनावर घेतल्यास हीहि गोष्ट अशक्य नाहीं. प्रत्यक्ष सरकारी नोकरी वगळली असतां युनिव्हर्सिटीच्या पदवीला किती मान द्यावा, किती किंमत द्यावी हें लोकमतानेंच ठरणार आहे. हा मान व ही किंमत शक्य तितकी कमी करण्याचा उद्योग असहकारितेच्या पुरस्कर्त्यांनीं हल्लीं सुरू केला असून, पालकवर्ग जर या कामीं त्यांना येऊन मिळेल तर दुधांत साखर पडल्यासारखें होईल. पण त्यांना स्वतः पुढें पाऊल टाकून विधायक प्रगतिपर असें कांहींच करावयाचें नसेल तर सर्वनाश जवळच ठेवलेला आहे हें मात्र त्यांनीं पक्कें ध्यानांत ठेवावें.

---

# ४५. पुणें टिळक महाविद्यालय

( केसरी, तारीख १४ डिसेंबर १९२० )

## उद्घाटनसमारंभ

सदर विद्यालयाचे हेतु दोन आहेत—( १ ) असहकारितेच्या तत्त्वाला अनुसरून शाळा व कॉलेजें सोडून बाहेर पडणाऱ्या विद्यार्थ्यांच्या शिक्षणाची सोय करणें, व ( २ ) लो० टिळकांच्या स्मारकाकरितां योजिलेल्या युनिव्हर्सिटीचा पहिला घटक बनविणें. राष्ट्रीय सभेच्या असहकारितेच्या ठरावाचा खरा अर्थ किंवा तो अमलांत आणण्याचीं योग्य साधनें कांहींहि असोत, राष्ट्रीय सभेशीं निष्ठा बाळगून व स्वार्थत्याग करून जीं मुलें बाहेर पडलीं त्यांच्या अभ्यासाची तजवीज लावणें हें अवश्य कर्तव्य आहे. हें विद्यालय प्रारंभीं असावें तितकें बडेजावीचें नाहीं असे दोष टीकाकार दाखविणार हें ठरलेंच आहे. पण इतर विद्यालयापेक्षां यांत एकदोन फायदे इतके भरपूर आहेत कीं, ते ही उणीव भरून काढतील. पहिलें हें कीं, इतर कॉलेजांच्या मानानें यांतील पुस्तकी शिक्षण कमी नसून व्यावहारिक शिक्षण मात्र अधिक आहे. यांतून बाहेर पडणारे विद्यार्थी सरकारी नोकरीला नालायक अर्थातच असणार; व सरकारच्या बगलेंत शिरणाऱ्या श्रीमंत कारखानदारांनाहि यांना नोकरीस ठेवण्याची बुद्धि होणार नाहीं. कारण त्यांच्या अंगांतील राष्ट्रीयत्वाचें तेज हाच त्यांचा अपराध. पण स्वतंत्र धंद्यांच्या दृष्टींत या विद्यालयांतील शिक्षण खास अधिक उपयोगीं पडेल. शिवाय यांतील विद्यार्थी पुढें राष्ट्रीय सेवा करण्यास विशेष लायक ठरतील हें सांगावयास नकोच. तसेंच यांतील शिक्षक व विद्यार्थी हे एकाच हेतूनें प्रवृत्त झाले असल्यामुळें या उभयतांनीं मिळून हें विद्यालय जसें काढलें तसेंच तें यशस्वी व्हावें अशीहि त्यांची इच्छा असणार, यामुळें ते एकमेकांशीं जिव्हाळ्यानेंच वागतील. शिवाय लो. टिळकांविषयीं त्यांची आदरबुद्धी व तिजमुळें येणारी स्फूर्ति याहि दृष्टीनें ते समानधर्म म्हणतां येतील.

पुणें टिळक स्मारक कमिटीनें शिक्षणविषयक स्मारक करण्याचें ठरविलें हें अभिनंदनीय होय ! आपल्या बाळपणींच टिळकांनीं शिक्षण हेंच राष्ट्रीय

सेवेचें मुख्य अंग मानलें होतें. विष्णुशास्त्री चिपळूणकराबरोबर टिळकांनीं 'न्यू इंग्लिश स्कूल' नामक शाळा काढली हे खरें. परंतु त्यांचा खरा मानस जमल्यास कॉलेज काढावें असाच होता हें प्रसिद्ध आहे, व पुढें संधि येतांच टिळकांनीं फर्ग्यूसन कॉलेज काढलेंहि. या कॉलेजला एका गोऱ्या अधिकाऱ्याचें नांव दिलें गेलें व युनिव्हर्सिटीचा अधिकार त्यानें मानला या दोन दोषांत पुढें सरकारी ग्रँट घेतल्याच्या तिसऱ्या दोषाची भर पडली; शिवाय टिळक व त्यांच्या मताचे लोक यांनीं अंग काढून घेतल्यावर ज्यांच्या हातीं या कॉलेजाची व्यवस्था गेली त्यांची राजकीय मतें तर प्रसिद्धच आहेत! कोणावर टीका करण्याची माझी इच्छा नाहीं; व आपल्या चालू संस्थेचें धोरण एकदम बदलणें कोणासहि एकदम अवघड जातें हें खरें. पण व्यक्तीच्या अडचणींमुळें एकादी गोष्ट अवघड ठरली तर ती राष्ट्रानें करूं नये असें नाहीं.

प्रथम सरकारी संस्थांना दोष देऊन ग्रँट घेणाऱ्या खासगी संस्था निघाल्या. ग्रँट घेण्याला दोष देऊन ग्रँट न घेणाऱ्या संस्था निघाल्या, पण त्यांना युनिव्हर्सिटीशीं संबंध तोडतां आला नाहीं. याच्या पुढची पायरी म्हणजेच ग्रँट नको व हा संबंधहि नको असें म्हणणारांची. त्यांनीं वाटल्यास सर्वस्वी स्वतंत्र अशी संस्था कां काढूं नये? बनारस हिंदु युनिव्हर्सिटी, अलीगड युनिव्हर्सिटी यांनीं एक पाऊल पुढें टाकलें तर चौदा वर्षांपूर्वीं महाराष्ट्रविद्याप्रसारक मंडळ म्हणजे समर्थ-विद्यालय निघालें, त्यानें दोनहि पावलें पुढें टाकलीं होतीं. सरकारनें समित्यांचा कायदा लावून समर्थविद्यालय बुडविण्याचा अव्यापारेषु व्यापार केला; नाहीं तर तळेगांवास आज राष्ट्रीय कॉलेज व युनिव्हर्सिटीच दिसली असती. अलीकडे प्रो० कर्वे यांनीं परिश्रमपूर्वक स्त्रियांकरितां युनिव्हर्सिटी काढली व तीहि आज निखालस राष्ट्रीय शिक्षणाचीच संस्था आहे व सरकारी ग्रँट किंवा चार्टर न घेतां ती चालली तर त्याच नांवास याहीपुढें ती पात्र राहील. महाराष्ट्रांत पुरुषांकरितां राष्ट्रीय युनिव्हर्सिटी स्त्रियांच्या युनिव्हर्सिटीनंतर निघावी ही विधिघटनेची एक मौजच आहे. पण मागाहून का होईना निघो म्हणजे झालें! गुजराथेंत गांधींनीं स्वतंत्र युनिव्हर्सिटी काढलीच आहे तशीच महाराष्ट्रांत कां निघूं नये?

आमची ही संस्था आज अल्पप्रमाण आहे, पण सर्व मोठ्या संस्था अल्पमूलच असतात. पण अल्पमूल म्हणजे अल्पमूल्य नव्हे. लो० टिळकांच्या नांवानें युनिव्हर्सिटी निघाल्यास तिला पांच प्रकारची कामगिरी करतां येईल. ( १ ) असहकारितावाल्या स्वार्थत्यागी विद्यार्थ्यांच्या शिक्षणाची सोय, ( २ ) हल्लींच्या कॉलेजांतून न मिळणाऱ्या व्यावहारिक शिक्षणाची सोय, ( ३ ) उदार ज्ञानाचा मुबलक प्रसार, ( ४ ) उपयुक्त विषयावर राष्ट्रीय दृष्टीनें सोप्या भाषेंत लिहिलेल्या सोप्या पुस्तकांचा प्रसार, ( ५ ) आजन्म राष्ट्रसेवेस वाहून घेणाऱ्या लोकांची सोसायटी.

मुंबईच्या सरकारी युनिव्हर्सिटींत राष्ट्रीय दृष्टीनें सुधारणा करण्याचा प्रयत्न आजवर ज्यांनीं केला त्यांचे आभार मानलेच पाहिजेत, पण हें काम खांद्यावर पर्वत उचलल्यासारखे जड व मुंगीच्या पायानें चालण्यासारखें हळुहळू होत असतें म्हणून शिक्षणाच्या बाबतींत सुधारणेचा नाद टाकून देऊन क्रांतीचा मार्ग पत्करणें योग्य होईल. अशा प्रकारच्या प्रयत्नांची लोक निंदा व थट्टाहि करतील. एकादा-अर्धा प्रयत्न फसेलहि, पण राजकीय स्वराज्य मिळविण्याकरितां चाललेल्या युद्धांत जशा एकामागून एक मोहिमा चालतात—त्यांतील एकादी साधते व एकादी फसते—तसाच राष्ट्रीय शिक्षणाच्या कामींहि प्रयत्न अवश्य झाला पाहिजे.

अशा आशयाचें उद्देशपत्रक वाचून दाखविल्यानंतर न. चिं. केळकर आपल्या भाषणांत म्हणाले कीं, चाळीस वर्षांच्या अवधीनें ज्या संस्था आज वाढीस लागल्या आहेत त्या संस्थांचे चालक आपल्या या अल्प प्रमाणांतील प्रयत्नास हंसोत; पण त्यांच्या संस्थांचे बाल्यावस्थेंतलें रूप कसें होतें तें मला माहीत आहे आणि आजमितीला देखील त्या संस्थांतील विद्यार्थ्यांस विश्वासांत घेऊन तुझे कांहीं प्रोफेसर्स कसे आहेत असें विचारल्यास हल्लींचेंहि स्वरूप उघडकीस आल्यावांचून रहात नाहीं. अशांनीं नाकें मुरडण्यासारखी आपली संस्था खास नाहीं. प्रत्येक ठिकाणाहून एक दोन निवडक खेळाडू घेऊन 'टीम' बनवावी तसा आमचा प्रोफेसरांचा संघ सर्वोत्कृष्ट बनला आहे. आमच्या या महाविद्यालयाची लवकरच महाराष्ट्रीय युनिव्हर्सिटी बनेल. महाराष्ट्रीय युनिव्हर्सिटींत इतर प्रांतांतल्या विद्यार्थ्यांस येण्यास प्रतिबंध आहे असा याचा अर्थ होत नसून जशी गुजराथेंत निघालेली ती गुर्जर युनिव्हर्सिटी, तशीच

महाराष्ट्रांतहि निघणारी ही महाराष्ट्रीय युनिव्हर्सिटी होय. या महाविद्यालयांत कानडी विद्यार्थ्यांना कानडी वाङ्मय शिकविण्याची सोय लवकरच करण्यांत येणार आहे.

---

# ४६. विद्यार्थी व असहकारिता

( केसरी, तारीख २५ जानेवारी १९२१ )

कलकत्त्याच्या जादा राष्ट्रीय सभेनें असहकारितेचा जो ठराव मंजूर केला त्यांत विद्यार्थ्यांनीं असहकारिता अंमलांत आणावी असें उपदेशिलें होतें; तथापि असहकारितेच्या ठरावाची प्रत्यक्ष भाषा इतर बाबींप्रमाणें विद्यार्थ्यांच्या बाबतींतहि संदिग्ध होती, निदान समाधानकारक तरी नव्हती. यामुळें ठरावाचा अर्थ व तदनुरोधानें अंमल करतांना समजुतींत एकवाक्यता होत नव्हती. नागपूरच्या राष्ट्रीय सभेनें ही संदिग्धता काढून टाकली. एवढेंच नव्हे, तर असहकारितेचा एकंदर ठराव व्यापक म्हणजे सर्वस्पर्शी व समाधानकारक केला, यामुळें असहकारितेच्या लोकांनीं किंवा कॉंग्रेसच्या इमानी सेवकांनीं विद्यार्थ्यांसंबंधीं कोणतें धोरण स्वीकारावें याविषयीं संशयास जागा उरली नाहीं. हल्लींच्या ठरावाप्रमाणें सोळा वर्षांच्या आंतील विद्यार्थ्यांना असहकारितेचा प्रत्यक्ष उपदेश कोणास करतां येत नाहीं; फक्त त्यांच्या पालकांसच तो करतां येतो. सोळा वर्षांच्या आंतील विद्यार्थ्यांनेंहि स्वतःच्या मनास पटेल तर असहकारिता अंमलांत आणावी. स्वयंस्फूर्तीला इतर कशाचेंहि बंधन पडूं शकत नाहीं. पण पूर्वी त्यांना उद्देशून प्रत्यक्ष उपदेश करण्यास जी चुकून जागा होती ती हल्लींच्या ठरावानें काढून टाकून तसा उपदेश करण्याचा स्पष्ट निषेध केला आहे, यामुळें असहकारितावादी लोकांचें नुकसान असें फारसें झालें नाहीं. पण हे लोक वयाकडे न पाहतां कोंवळ्या पोरांनाहि कुमार्गाला लावितात असा जो आक्षेप घेण्यास जागा होती ती गेली, एवढा खरोखर फायदा झाला. सोळा वर्षांच्या आंतील मुलांना प्रत्यक्ष उपदेश करूं नये. याच्याच जोडीला सोळा वर्षांच्या वरील मुलांना तसा उपदेश करतां येईल, अशी जी स्पष्ट संमति मिळाली ती इष्ट असून तिच्याच

जोरावर विद्यार्थिकृत असहकारितेचें काम हल्लीं फैलावत आहे. सोळा वर्षा-च्यावरील मुलगा म्हणजे प्रायः कॉलेजांतील मुलगा असाच अर्थ होतो. जो अखेरची परीक्षा देऊन सुटला त्याला विद्यार्थी या नात्यानें असहकारितेचा उपदेश कसा करावयाचा ? तो मग प्रौढ झाला व स्वतंत्र नागरिकांच्या ओळीस बसला. स्वतंत्र नागरिक या नात्यानेंहि असहकारितेचें कार्य कर-ण्यास त्याला पुढें जन्मभर वाव आहेच. पण प्रस्तुत मुद्दा इतकाच कीं, एकीकडे सोळा वर्षांच्या आंतील वय, व दुसरीकडे परीक्षा पास होऊन जाणें; या दोन मर्यादा लक्षांत घेतल्या तर विद्यार्थीविषयक असहकारितेची व्याप्ति आपोआपच निश्चित होते. असहकारितेसंबंधानें बोलावयाचें तर विद्यार्थी म्हणजे कॉलेजांतील विद्यार्थी एवढाच अर्थ निघूं शकतो; दुसरा निघतच नाहीं.

कॉलेजांतील मुलें झालीं तरी एका अर्थानें अज्ञानच म्हणतां येईल. परंतु ती भाषा फाजील प्रेमाची किंवा लाडाची होय. मध्यम वयाच्या मनुष्याच्या नशिबांत जर मातृसुख असलें तर त्या आईलाहि आपला मुलगा कोंवळा बाळ वाटतो व त्या दृष्टीनें ती त्याला काळजी घेऊन वागविते. पण सार्वजनिक व्यवहारांत ही घरगुती दृष्टि ठेवून चालत नाहीं. कॉलेजचीं मुलें हीं मुलेंच असलीं तरी प्रौढ मुलें. स्वतःचें बरेंवाईट काय हें समजण्याची त्यांची पात्रता व तिला अनुसरून स्वतंत्रपणें वागण्याचा अधिकार हीं दोनहि गृहीत घेतलीं जातात. या गोष्टीस अनुसरूनच नाग-पूरच्या राष्ट्रीय सभेनें प्रौढ विद्यार्थ्यांच्या विवेकबुद्धीचा स्पष्ट उल्लेख केला आहे; व अशा विद्यार्थ्यांना म्हणजे अर्थात् त्यांच्या विवेकबुद्धीला उपदेश करण्याची स्पष्ट अनुज्ञा दिली आहे. अशाहि प्रौढ मुलांना असहकारितेच्या उपदेशाचें पाणी पाजावयाचें तर तें शक्य तितकें पालकांच्या वळणानें पाजतां आलें तर वावगें नाहीं; व याच दृष्टीनें तारीख ७ डिसेंबर १९२० च्या अग्रलेखांत "राष्ट्रीय शिक्षण व पालकांचें कर्तव्य" या विषयाची आम्हीं चर्चा केली होती. त्या लेखांत योजलेल्या शब्दांनींच बोलावयाचें तर आम्हीं असें म्हटलें होतें कीं, "पालकवर्गानें मनावर घेतल्यास राष्ट्रीय शिक्षणाचा प्रश्न हटकून सुटून असहकारितेचें कार्य सफल होईल." विशेषतः सरकारी ग्रँट घेणाऱ्या शिक्षणसंस्थांनीं ती सोडून देणें व आपल्या संस्था राष्ट्रीय करणें या बाबतींत चळवळ करावयाची तर ती करण्यास विद्यार्थ्यांचे पालकच

योग्य आहेत. त्यांनीं थोडी उचल केल्यास सर्व काम होईल, आणि पालक-वर्ग जर असहकारितेच्या पुरस्कर्त्यांना येऊन मिळेल तर दुधांत साखर पडल्यासारखें होईल असें आम्हीं म्हटलें होतें. पण त्याच वेळीं हेंहि स्पष्ट बजावलें होतें कीं, "त्यांना स्वतः पुढें पाऊल टाकून विधायक व प्रगतिपर असें कांहींच करावयाचें नसेल तर सर्वनाश जवळच ठेवलेला आहे, हें मात्र त्यांनीं ध्यानांत ठेवावें." पण दुर्दैवाची गोष्ट ही कीं, त्यानंतर आज दीड महिन्यांत व दरम्यान नागपूरच्या राष्ट्रीय सभेनें कलकत्त्याच्या सभेचा ठराव पक्का केला असतांहि पालकवर्गाच्या हातून पुढें पाऊल पडल्याचें कांहींच चिन्ह नाहीं, यामुळें एक पक्षीं विद्यार्थी अस्वस्थ व उतावळे झाले आहेत, व दुसरे पक्षीं असहकारितावादी लोकांनाहि खुद्द विद्यार्थ्यांना कॉलेजें सोडण्याला बेलाशक उपदेश करण्याला कांहीं हरकत उरली नाहीं. यामुळें पालकांच्या पर्वतप्राय अनास्थेंत या दोन बाजूंनीं बोगदा पोखरण्यास सुरवात झालेली असून नागपूर, कलकत्ता वगैरे ठिकाणीं झालेल्या चळवळीचा अर्थ हाच कीं, या बोगद्यांतून आतां आरपार उजेड लुकलुकूं लागला असून असहकारितेचा राजमार्गहि लवकरच साफ होईल.

परवां पुण्यास भरलेल्या विद्यार्थ्यांच्या सभेपासूनहि हाच बोध घेतला पाहिजे. या बोगद्याचें भगदाड पाहून सर्वनाश जवळ ठेपला असें कदाचित् पालकांस वाटेल. पण आम्हीं पूर्वीच्या एका लेखांत म्हटल्याप्रमाणें कल्याण व अकल्याण या शब्दांचे त्यांचे अर्थ फार संकुचित असतात. म्हणून मळलेला मार्ग सोडून आपला मुलगा किंचित् बाजूला गेला एवढ्यानेंच त्यांना सर्वनाश वाटतो. पण हा नाश लहान असो वा मोठा असो, मानीव असो किंवा वास्तविक असो, त्यांना ती शिक्षा होणें आतां सर्वस्वीं योग्यच ठरत आहे. मनुष्याला शिक्षा करण्याचे दैवाचे प्रकारच असे मार्मिक असतात कीं, जी गोष्ट मनुष्य अज्ञानानें उराशीं बाळगतो तिच्याच द्वारें त्याची हानि व्हावी. फार लाड केलेला मुलगा मूर्ख व आईबापांसच लाथा मारणारा निघावा, किंवा नवसानें झालेला मुलगा मृत्युमुखीं पडावा हे याच शिक्षेचे प्रकार होत. आजकालचे पालक असें मानतात कीं, सरकारी किंवा निमसरकारी शाळांतून ठराविक शिक्षण घेणें हीच आपल्या मुलाच्या कल्याणाची परमावधि; व ही त्यांची घातक

कल्पना दैवाला आज काढून टाकावीशीं वाटत असल्यामुळें हीं मुलेंच बंडखोर बनून ही शिक्षणपद्धति लाथाडूं लागलीं आहेत. पालकांच्या दृष्टीनें हा सर्वनाश असेल, पण वास्तविक राष्ट्राच्या प्रगतीचें तें एक गूढ बीजच आहे. पालकांनीं आपली विवेकशक्ति कायमची गवसणींत घालून ठेवली, तेव्हां राष्ट्रीय सभेलाहि खुद्द मुलांच्या विवेकशक्तीला गवसणींतून काढावें लागलें; व या विवेकशक्तीच्या तारा जुळवून हें मानसिक वाद्य सर्व देश-भर सारखें सुरेल करून वाजविण्याचें काम आतां सुरू झालें आहे. एक तार छेडल्याबरोबर दुसरी तार आपोआप स्पंदन पावूं लागली म्हणजे जोड बरोबर लागला असें समजण्यांत येतें. त्याच रीतीनें नागपूर, कलकत्ता व महाराष्ट्र या तीन दूरदूरच्या ठिकाणीं एकाच उमद्या प्रवृत्तीनें विद्यार्थ्यांचीं मनें स्फुरण पावूं लागलीं आहेत. यावरून असहकारितेची वीणा विद्यार्थ्यांच्या बाबतींत तरी सुरेल लागत चालली आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. पालकांनीं पुढें पाऊल न टाकल्या-मुळें ती जागा आक्रमण्यास असहकारितावाद्यांनीं पुढें यावें हें रीतीचेंच आहे. कारण विद्यार्थ्यांच्या मनाचा अंत तरी त्यांनीं कोठवर पहावा ? पुढाऱ्यांनीं अनुसरलेलें धोरण फाजील सावधगिरीचें आहे अशी तक्रार उत्पन्न होणें हें विद्यार्थ्यांची विवेकबुद्धि पूर्ण विकसित होत असल्याचें स्पष्ट चिन्ह आहे. कोणीहि आपल्या उपदेशानें भरीस भरून व्यर्थ बळी पडूं नये असें पुढाऱ्यांना वाटणें व आपल्याविषयीं अशी सावधगिरी पुढारी ठेवतात हें आपल्यावरील अविश्वासाचें एक लक्षण म्हणून त्याचा विद्यार्थ्यांना राग येणें या गोष्टी उभयतांनाहि सारख्याच शोभणाऱ्या आहेत.

पालकांनाहि आम्ही हें स्पष्ट विचारतों कीं, त्यांचीं मुलें रूढ विद्याभ्यास-क्रमांतून बाजूला गेलीं तर त्यांना तरी इतकें वाईट कां वाटावें ? धंदे-शिक्षणाची गोष्ट कदाचित् थोडीशी निराळी मानली जाईल तर तें एक असो. पण नुसत्या आर्ट्स् शाखेच्या अभ्याससंबंधानें देखील आहे हेंच अत्यंत श्रेयस्कर याहून राष्ट्रदृष्ट्या अधिक श्रेयस्कर, असें कांहीं असूं शकणार नाहीं, ही त्यांची बुद्धि ढळत नाहीं असें पाहिलें म्हणजे त्यांच्या बुद्धिजाड्याची कींव करावी तितकी थोडीच वाटते. खुद्द पुण्याचेंच उदाहरण घेतलें तर आज सुमारें पंधराशें मुलें आर्ट्स् शाखेचा अभ्यास करीत आहेत. या सर्वांनीं

जर आज सरकारी किंवा निमसरकारी कॉलेजें सोडून दिलीं तर त्यांचें विशेष नुकसान होईल असें आम्हांस तर वाटत नाहीं. याच तोडीचें शिक्षण राष्ट्रीय शाळांतून देतां येईल. पण हें शिक्षण कायमचें सोडून देण्याचाहि प्रश्न नसून फार तर एक वर्षभर कॉलेजांवर बहिष्कार घालण्याचा प्रश्न जेव्हां पुढें येतो तेव्हां तर कांहींच अडचण उरत नाहीं. एक वर्षभर कॉलेज सोडणाऱ्या मुलांची तीन तऱ्हांनीं व्यवस्था होऊं शकते. कांहीं मुलें घरचीं खाऊनपिऊन सुखी असतात यामुळें राष्ट्राकरितां एक वर्षभर शिक्षण सोडून तीं घरीं बसलीं तर आईबाप खास दरिद्री होत नाहींत. घरीं बसूनही विद्यार्थ्याला लिहितां येऊं शकतें व इच्छा असल्यास त्याला राष्ट्रकार्यांतहि थोडे सामील होतां येईल. ज्यांना शिक्षण लवकर संपवून पोटास मिळावयास लागलेंच पाहिजे असेहि कांहीं विद्यार्थी असतात. पण त्यांच्याकरितां स्वतंत्र राष्ट्रीय शिक्षणाचीं कॉलेजें निघणें मुळींच कठीण नाहीं. इकडे शिकावयाचें तें तिकडे इतकाच फरक. उलट राष्ट्रीय सभेच्या सेवेचें पुण्य मात्र पदरांत पडतें. तिसरा वर्ग अशांचा कीं, ज्यांना शिक्षण पुरें करण्याची इतकी आस्था किंवा आवश्यकता नाहीं. त्यांना करण्यासारखी फार मोठी कामगिरी वाढून ठेवलेली आहे. ती म्हटली म्हणजे खेड्यापाड्यांतून जाऊन राष्ट्रीय सभेचा निरोप अज्ञ जनतेला समजावून सांगणें. अशा रितीनें तीनहि वर्गांची व्यवस्था तर लागतेच; पण त्याचबरोबर कॉलेजांवर बहिष्कार घालणें ही फार महत्त्वाची गोष्ट सिद्ध होते.

या बहिष्काराचा परिणाम सरकारवर खरा कितपत होईल असाहि प्रश्न कोणी विचारतात. पण त्याला उत्तर हेंच कीं, सरकारवर परिणाम होवो न होवो; आपलें कर्तव्य केल्याचें समाधान तरी आपणांस खचित लाभेल. सरकारी किंवा निमसरकारी कॉलेजें ओस पडलीं म्हणून सरकारची प्रत्यक्ष कांहींच हानि होत नाहीं. त्यांची नोकरभरती एक वर्षांत फारशी रोडावणार नाहीं, किंवा अठरा कारखाने बंद पडणार नाहींत. पण राष्ट्रीय सभेच्या शब्दाला राष्ट्रांत मान आहे, सभा सांगते तें लोक अमलांत आणतात, पुढारी व अनुयायी यांचा परस्पर विश्वास असून एकाच्या हांकेला ओ देऊन दुसरा त्याला कृतार्थ करतो ही गोष्ट सिद्ध होण्यांत राष्ट्राचा खरा फायदा आहे. आज विद्यार्थ्यांनीं ऐकलें, उद्यां

वकील ऐकतील, परवां व्यापारी ऐकतील, नंतर मजूर ऐकतील, शेवटीं शेतकरी ऐकतील व एखाद्या वेळीं जरूर तर हे सर्व मिळून ऐकतील असा आत्मविश्वास पटूं लागतो, हेंच यांतील मुख्य मर्म आहे. विद्यार्थ्यांनीं मनावर घेतल्यास एक वर्षाच्या बहिष्कारानेंहि त्यांना इतर गोष्टी साधतां येतील. उदाहरणार्थ, जीं कॉलेजें चतकोर भाकरीच्या आशेला लागून अजूनही गुलामगिरींत व्यर्थ खितपत पडलीं आहेत त्यांना तींतून बाहेर काढणें. अशा कॉलेजांपैकीं कांहीं मवाळ लोकांच्या हातीं असून राष्ट्रीय सभेला विरोध करणें हेंच त्यांचें ब्रीद असल्यामुळें एकच विद्यार्थी उरला तरी बेहेत्तर, पण आम्ही ग्रँट घेतल्याशिवाय राहाणार नाहीं अशा हट्टाला ते पेटूं शकतील. अशांनाहि वठणीवर आणतां येणार नाहीं असें नाहीं. प्रत्यक्ष मुलांनीं मनावर घेतल्यास हा हट्ट किती चालतो हें जग पाहील. पण दुसरीं कित्येक कॉलेजें अशीं आहेत कीं, तीं वास्तविक राष्ट्रीय भावनेच्या लोकांनींच चालविलेलीं आहेत. पण सरकारी ग्रँटच्या रोगानें येणारी सूज हेंच निरोगी बाळसें असें त्यांना वाटूं लागतें, आणि कोणी-कडून तरी कॉलेज वाढूं दे मग स्वाभिमान कितीहि खर्ची पडला किंवा अधिकाऱ्यांशीं लांगूलचालन करावें लागलें तरीहि चालेल अशी बुद्धि त्यांना होऊं लागते. अशा लोकांना क्वचित् मधून मधून वैराग्य येऊं शकतें. पण त्यांना अशी शंका येते कीं, आम्हीं आज ग्रँट सोडली व बडेजावीला रजा देऊन फीच्या उत्पन्नांत कसें तरी निभावून घेतलें, तरी खुद्द विद्यार्थ्यांचा तरी उदार आश्रय कायमचा टिकेल हें कशावरून? व आज जसे धनिक लोक देणग्या देतात तसेच उद्यां देतील कशावरून? असल्या शंकेला आमच्या मतें खुद्द विद्यार्थीच समर्पक उत्तर देण्याला समर्थ आहेत.

आज न्यू पूना कॉलेजला कोणा एका गृहस्थानें तीन लक्ष रुपयांची देणगी कबूल केली असतांहि त्यांना आपलें कॉलेज राष्ट्रीय करण्याचें धैर्य होत नाहीं, याचें एक कारण विद्यार्थ्यांच्या हृदयांत ज्योत जशी पेटावी तशी पेटलेली त्यांना दिसत नाहीं हें होय. या कॉलेजांतील विद्यार्थ्यांच्या चारित्र्यावर हा एक डागच आहे असें आम्ही समजतों. म्हणून त्यांनीं निश्चय करून जर हें कॉलेज एक वर्षभर सोडलें तर सर्वांचाच त्यांत फायदा होईल. विष्णुशास्त्री चिपळूणकरांपर्यंत केसरी व न्यू पूना कॉलेज

या दोघांचाहि संबंध पोंचत असल्यामुळें केसरी व कॉलेज हे दोनहि सगोत्र होत. व सगोत्राचें निसंतान व्हावें अशी कोणीहि इच्छा करीत नाहीं हें आम्हांस माहीत आहे. पण हें कॉलेज राष्ट्रीय झाल्याच्या योगानें त्याचें निसंतान न होतां, उलट त्याचा कीर्तिवंश विस्तारच पावूं लागेल असें आम्हांस वाटतें. न्यू पूना कॉलेजच्या विद्यार्थ्यांनीं हट्टानें आजचें कॉलेज बुडवावें असें आमच्या मनांत येण्याला द्वेष नसून प्रेमच कारण आहे. तात्पर्य, कलकत्त्या-प्रमाणें पुण्याच्या विद्यार्थ्यांनीं निश्चय करून एक वर्षपर्यंत एकोपा दाखविल्यास त्या एका कृत्यांतून अनेक कार्यें निष्पन्न होण्यासारखीं आहेत. आपल्या पालकांनीं राष्ट्राला दगा दिला याची जर विद्यार्थ्यांस चीड येत असेल व राष्ट्रीय सभेनें गृहीत धरल्याप्रमाणें विद्यार्थ्यांना विवेकबुद्धि असेल, तर ती जगाला दाखविण्याची हीच वेळ आहे. सुदैवानें कॉलेजांतील विद्यार्थी अजून संसारपंकांत रुतलेले नसतात. त्यांचा आश्रित वर्ग वाढून जबाबदारी फैलावलेली नसते. म्हणून मळलेल्या मार्गाला सोडून किंचित् बाजूला जाऊन स्वसामर्थ्यावर थोडासा पराक्रम करून दाखविण्याची हौस असल्यास ती भागविण्यास आयुष्यांत हा एवढाच काळ आहे, हें लक्षांत घेऊनच राष्ट्रीय सभेनें त्यांना हांक मारलेली आहे व ते तिला ओ देतील असा आम्हाला भरंवसा वाटतो.

---

## [ २ ]

( केसरी, तारीख १ फेब्रुवारी सन १९२१ )

गेल्या आठवड्यांत मुंबई, पुणें, धारवाड वगैरे ठिकाणीं विद्यार्थीवर्गा-मध्यें असहकारितेच्या चळवळीला बरी सुरवात झालेली आहे. कॉलेज सोडणाऱ्या विद्यार्थ्यांची संख्या मुंबईस सुमारें १००० पर्यंत गेलेली असून राष्ट्रीय शिक्षणाच्या कॉलेजची स्थापनाहि या आठवड्यांत होईल अशीं चिन्हें दिसत आहेत. धारवाडास तीनचारशें विद्यार्थ्यांनीं कॉलेज सोडल्याची बातमी आली असून तेथेंहि हल्लींचें खासगी कॉलेज स्वतंत्र राष्ट्रीय शिक्षणाचें केलें जाईल असा अंदाज आहे. या चळवळीला पुण्यांत दोन महिन्यांपूर्वींच

प्रारंभ झाला होता व टिळक महाविद्यालयांतील विद्यार्थ्यांची संख्या हल्लींच नव्वदावर गेली असून हळूहळू ती वाढेल, घटणार नाहीं, असें स्पष्ट दिसत आहे. पण या कॉलेजांत न येतां घरीं बसणाऱ्या किंवा स्वयंसेवक या नात्यानें राष्ट्रकार्याकरितां बाहेर जाणाऱ्या विद्यार्थ्यांची संख्या जमेस धरली तर कॉलेज सोडलेल्या एकंदर विद्यार्थ्यांची संख्या २०० वर गेली आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. या संख्येस डेक्कन कॉलेजमधील विद्यार्थ्यांचा समावेश झालेला नाहीं. पण लवकरच त्या कॉलेजांतील विद्यार्थ्यांच्या स्वार्थ-त्यागाची बातमी देण्याचा सुयोग येणार अशीं चिन्हें स्पष्ट दिसत आहेत आणि राहिलेल्या इतर विद्यार्थ्यांनीं ही टर्म पदरांत पाडून घेऊन पुढें मात्र त्या पूर्ण सरकारी कॉलेजास कायमचा रामराम ठोकल्यास त्यांचें तेंहि कृत्य असहकारितेच्या पुण्यमार्गांत रुजू होणार आहे. एकंदरीनें हा प्रारंभ निराशा-जनक नाहीं एवढेंच नव्हे तर येत्या मार्चमध्यें वार्षिक परीक्षा होऊन कित्येकांचें वर्ष पदरांत पडणार, कित्येकांची फी खरी होऊन टर्म पदरांत पडणार या गोष्टी लक्षांत घेतल्या म्हणजे बहिष्कारवादी विद्यार्थ्यांची संख्या येत्या जूनमध्यें आणखीहि वाढेल असें अनुमान करितां येईल.

विद्यार्थ्यांनीं कॉलेजवर बहिष्कार घालण्याच्या चळवळीबरोबरच बहिष्कार घालून बाहेर पडणाऱ्या विद्यार्थ्यांच्या तजविजीचाहि प्रश्न जबाबदार लोकांनीं हातीं घेतलाच पाहिजे. या तजविजीचे मुख्य तीन मार्ग आम्हीं गेल्या अंकीं सुचविलेंच होते. पहिला सुखवस्तु आईबापांच्या मुलांनीं घरीं राहून विद्यार्जन किंवा राष्ट्रकार्य करण्याचा. अशा विद्यार्थ्यांची तजवीज करण्याची जबाब-दारी जनतेवर फारशी पडणार नाहीं. आईबाप झाले तरी ते जनतेचेच अंश होत. अर्थात् आईबापांनीं मुलांच्या योगक्षेमाचा भार एक वर्षभर सोसणें काय आणि नागरिक या नात्यानें परक्या मुलांच्या योगक्षेमाकरितां वर्गणी देणें काय दोनहि सारखींच. ही वर्गणी समंजस नागरिकाला व राष्ट्राभिमानी नागरिकाला यापुढें चुकणार नाहीं. मग घरच्या मुलांनाच वर्षभर पोटाला घातलें तर त्यांत काय बिघडलें? पूर्वीं कॉलेजचा अभ्यासक्रम तीन वर्षांचा होता तो हल्लीं चार वर्षांचा सरकारनें करविला आहे. या व्यवस्थेनें किंवा अव्यवस्थेनें पालकांवर जें एक वर्ष लादलें गेलें. तें जर त्यांना खपतें तर राष्ट्रानें त्यांजवर लादलेलें असेंच एक वर्ष

त्यांना कां खपूं नये ? उलट ते आपलीं मुलें एखाद्या राष्ट्रीय कॉलेजांत पाठवितील तर मुलांना अवश्य असा अभ्यासक्रम दोनतीन वर्षांत आटोपून अभ्यास व राष्ट्रकार्य दोहोंचेंहि पुण्य एकदम पदरीं पडेल. मुलगा एकादे वर्षी आजारी पडला तर जसें एकादें वर्ष फुकट जातें तसेंच हेंहि कां समजूं नये ? व्यक्तीला आलेल्या तापाइतकी तरी निदान राष्ट्राच्या संतापाला किंमत असावी असें म्हटलें तर फारसें वावगें होणार नाहीं. लष्करभरतीची चळवळ निघाली तेव्हां सरकार–पक्षपाती प्रोफेसरांनीं तीनतीन चारचार महिने अभ्यास दवडून मुलांचें वर्ष बुडालें तरी हरकत नाहीं असा सल्ला दिमाखानें दिला व आईबापांनीं तो मान्य करून मुलांस सैन्यभरतींत नांव देण्यास परवानगी दिली आणि युनिव्हर्सिटीनेंहि त्या विद्यार्थ्यांस अनेक सवलती दिल्या. पण आज प्रत्यक्ष राष्ट्रीय सभा मुलांचें एक वर्ष मागत असतां तें मात्र त्यांनीं देऊं नये याला काय म्हणावें ? मुलगा खाकी पोषाख घालून उनाडक्या करीत असलेला पाहून आईबापांच्या डोळ्यांना बरें वाटावें, आणि आज तोच मुलगा खादी घालून राष्ट्रीय सभेचा आदेश जनतेला सांगत एकाद्या समर्थशिष्याप्रमाणें झोळी लटकावून फिरूं लागला असतां तें मात्र त्यांना दुःसह व्हावें काय ? दुसऱ्या कित्येकांना आपल्या मुलांनीं कॉलेजांत राहून चैनीनें मेजवान्या झोडून अजीर्ण करून घेतलें तरी त्याचें वाईट वाटूं नये, पण राष्ट्रकार्याचें शिक्षण संपादीत असतां एकादा अर्धा दिवस त्यांना उपोषण घडलें तर त्यानें मात्र काळजाला पीळ पडावा हें कशाचें लक्षण ?

दुसरा वर्ग राष्ट्रीय कॉलेजांत जाऊन शिक्षणक्रम चालू ठेवणाऱ्या विद्यार्थ्यांचा. या बाबतींत आम्ही फिरफिरून हेंच निक्षून सांगूं इच्छितों कीं, सरकारी अगर निमसरकारी आर्टस् कॉलेजें सोडून जितके विद्यार्थी बाहेर पडतील व राष्ट्रीय कॉलेजांत शिक्षण घेऊं इच्छितील तितक्या सर्वांची व्यवस्था मुंबई, पुणें, धारवाड यांसारख्या ठिकाणीं होण्यासारखी आहे. एवढेंच नव्हे तर त्यांचें शिक्षणहि सरस होण्याचा संभव आहे. धंदेवाईक शिक्षकांनीं कितीहि वाईट शिकविलें तरी तें खपावें, त्यांनीं नसतीं कामें अंगावर घेऊन आपल्या खास कर्तव्याकडे दुर्लक्ष केलें तरी तें खपावें, हा जनतेनें आपण होऊन पाडलेल्या रूढीचा परिणाम आहे. त्याची तक्रार करून काय चालणार ? पण अजून जरी या रूढीचा फांस मनावरून

काढण्याचा आपला निश्चय झाला तरी तो काढतां येईल. सरकारी आर्ट्स् कॉलेजें केवळ संस्कृत, इंग्रजी कादंबऱ्या व नाटकें पढण्याची जागा, अशी स्थिति आहे, ती पालटून जरूर त्या वाङ्मयशिक्षणांत इतर ज्ञानाची भर घालून शिवाय हा सर्व शिक्षणक्रम चार ऐवजीं तीन किंवा दोन वर्षांत पुरा करणें शक्य आहे व शिक्षण देणारी संस्था सरकारीच काय पण निम-सरकारी कॉलेजापेक्षां कमी खर्चानें चालविणें शक्य आहे, हें थोड्याशा प्रयत्नांतीं सिद्ध होणारें आहे. मोठमोठ्या शहरीं अनेक विद्वान् लोक राहात असतात; व आपले इतर धंदे संभाळून त्यांनीं आठवड्यांतून एक दोन तास जरी राष्ट्रीय शिक्षणाकडे देण्याचें कबूल केलें, तरी दर भाषावार प्रांतांत दोनदोन तीनतीनहि चांगलीं आर्ट्स् कॉलेजें चालण्याचा संभव आहे. इतर धंदा करणारा एम्. ए. किंवा एल्एल्. बी. हा देखील आर्ट्स् कॉलेजांतील आपल्या आवडीचा एकादा विषय घेऊन परिश्रमानें कॉलेजच्या नांवास शोभेल असा शिकवूं शकेल. आज अशी स्थिति आहे कीं, सरकारी किंवा निमसरकारी कॉलेजांत एकदां प्रोफेसरांच्या यादींत नांव पडलें म्हणजे मग तो कितीहि मठ्ठ किंवा रुक्ष असला, त्याच्या अंगांत तेज, बुद्धींत प्रतिभा किंवा शिक्षणपद्धतींत चित्ताकर्षकपणा नसला तरी चालतें. उलट ज्यांनीं कॉलेजांत असतां अभ्यासांतील तरतरीमुळें नांव केलें, बक्षिसें मिळविलीं, परीक्षेंत वर नंबर मिळविला असे लोक वकिलीसारखा धंदा करूं लागले म्हणजे हे काय कॉलेजांत शिकविणार, असें लोकांना वाटूं लागतें पण त्याहूनहि विशेष हें कीं, त्यांना स्वत:लाहि आपणाविषयीं अविश्वास वाटूं लागतो. एका पुण्यांत तरी आज इतर धंदे करणाऱ्या लोकांनीं मनावर घेतलें तर अगदीं फावल्या वेळीं व विशेष यातायात न करितां ते सर्व मिळून दोनतीन कॉलेजें चालवूं शकतील. वकिलांना नांवें ठेवलीं म्हणजे त्यांना राग येतो व या वर्गाचा एकंदरीनें राजकारणांत झालेला उपयोग लक्षांत घेऊन आम्हीहि त्यांची तरफदारी केव्हां केव्हां करितों. तथापि आजकालच्या सरसकट वकिलांकडे पाहिलें म्हणजे तो वर्ग आपली बुद्धि, आपला वेळ व आपला पैसा हीं राष्ट्रकार्या-कडे जितकीं लावतां येतील तितकीं लावतो असें आमच्यानें प्रामाणिकपणें म्हणवत नाहीं. धंदेशिक्षणाची गोष्ट थोडीशी वेगळी आहे, हें आम्ही

जाणतों; कारण अशा शिक्षणाचीं कॉलेजें काढण्याला शास्त्रीय ज्ञानांत पारंगत असलेले शिक्षक व मोठ्या खर्चाचीं साधनें लागतात व आर्ट्स् किंवा वाङ्मय–शिक्षण यांच्या मानानें हीं दोनहि सुलभ असत नाहींत. तथापि पुण्यांतील डॉक्टर, इंजिनिअर वगैरे लोकांनीं मनावर घेतल्यास राष्ट्रीय पद्धतीचें इंजिनियरिंग किंवा मेडिकल स्कूलहि निघणार नाहीं असें म्हणवत नाहीं. सांगण्याचें तात्पर्य इतकेंच कीं मोठमोठ्या शहरांतील सुशिक्षित लोकांनीं मनांत ईर्ष्या धरल्यास राष्ट्रीय शिक्षणाचा प्रश्न सुटणें फारसें अवघड नाहीं.

हा मुद्दा संपविण्यापूर्वीं दुसऱ्या एका गोष्टीचा उल्लेख करणें अवश्य आहे. ती न्यू-पूना-कॉलेजसारख्या संस्था राष्ट्रीय करण्यासंबंधाची. फर्ग्युसन कॉलेजप्रमाणें न्यू-पूना-कॉलेजच्या चालकांना हट्टच धरावयाचा असेल तर गोष्ट वेगळी ! यांत अभिमानास पेटण्यासारखें भूषणास्पद कांहीं आहे असें आम्हांस वाटत नाहीं. पण केवळ अभिमानास न पेटतां आजवर ज्या राष्ट्रीय दृष्टीनें या संस्थेच्या चालकांनीं ती चालविली त्याच दिशेनें आणखी एक पाऊल पुढें टाकून व राष्ट्रांतील विचाराचा ओघ लक्षांत घेऊन जर त्यांनीं आपलें कॉलेज स्वतंत्र केलें तर त्यांना ती गोष्ट असाध्य आहे असें आम्हांस वाटत नाहीं. या कॉलेजची आजची स्थिति हें जसें त्यांतील कांहीं व्यक्तींच्या परिश्रमाचें फल आहे, त्याचप्रमाणें त्यांनीं किंवा इतरांनीं आणखी परिश्रम केल्यास उत्क्रांतीची ही पुढची पायरी त्यांना सहज गांठतां येईल. त्यांनीं ही गोष्ट करण्याचें मनावर घेतल्यास पालकहि त्यांना मदत करण्याच्या दृष्टीनें मुलांची वाढती फी सोसण्यास तयार होतील व युनिव्हर्सिटीचें जूं फेकून देऊन आर्ट्स् शाखेंतील अभ्यासक्रम चार वर्षांवरून तीन वर्षांवर आणल्यास अधिक फी देऊनहि एकंदरीनें मुलांचें शिक्षण त्यांना स्वस्तच पडेल. कारण इकडे फी थोडी वाढली तरी तिकडे पोटगीचें एक वर्ष वांचलें. शिवाय या तीन वर्षांत वाङ्मयशिक्षणाच्या भरतीस व्यावहारिक शिक्षणाचा एखादा विषय दोनतीन वर्षें शिकविल्यास कॉलेजांतून निघणारा पदवीधर हल्लींच्या बी. ए. सारखा असहाय्य न राहतां आपला योगक्षेम चालविण्याची पात्रता आपल्या ठिकाणीं अधिक आली असा त्यालाहि आत्मविश्वास वाटेल. या दृष्टीनें पाहतां या कॉलेजला

कोणा एका गृहस्थानें तीन लक्ष रुपये देऊं केले ही गोष्ट कांहीं अगदींच त्याज्य नव्हती. एक कोटी रुपये तुम्ही द्याल तर सगळी कलकत्ता युनिव्हर्सिटी मी राष्ट्रीय बनवितों अशी पैज सर आशुतोष मुकर्जी यांनीं मारली व ती बॅ० दास यांनीं मान्य केली असें वर्तमानपत्रांतून प्रसिद्ध झालें आहे. ही हकीगत जर खरी मानली तर न्यू पूना कॉलेजला देऊं केलेली तीन लक्षांची देणगी ही कांहीं अगदींच थोडी होती असें म्हणतां येत नाहीं. पण एकवेळ नुकसान झालें तरी चालेल पण असहकारितेच्या स्वरूपाची कांहींही गोष्ट आम्ही करणार नाहीं, असाच सदर कॉलेजच्या चालकांचा हट्ट असल्यास त्यांना आम्हांला कांहीं म्हणतां येणार नाहीं हें उघड आहे. असो !

शिक्षणावर बहिष्कार घालून निदान एक वर्ष बाहेर पडणाऱ्या विद्यार्थ्यां-विषयीं आपण मूळ बोलत होतों व अशा विद्यार्थ्यांपैकीं तिसऱ्या वर्गाविषयीं विचार करावयाचा उरला आहे तेवढा करून हा लेख पुरा करूं.

या तिसऱ्या वर्गांतील विद्यार्थ्यांची म्हणजे स्वयंसेवकांची एक वर्षपर्यंत सोय करणें यासारखी म्हटली तर सोपी गोष्ट कोणतीहि नाहीं. पण म्हटली तर अवघडहि कोणती नाहीं. फक्त एकाच योजनेनें ती सोपी होऊं शकते व ती योजना म्हटली म्हणजे दरएक तालुक्यानें कमींत कमी पांच सात स्वयंसेवकांची वर्षभर सोय लावणें किंवा तालुक्यानिहाय कोठें कमतरता आली तर जिल्ह्यांतील पुढाऱ्यांनीं ती भरून काढणें. नुसत्या महाराष्ट्राचे दहा जिल्हे घेतले तरी त्यांत शेंदोनशें वकील असे सांपडतील कीं, त्यांना केवळ आपल्या खर्चानें एक स्वयंसेवक एक वर्षभर सहज पोसतां येईल. वकील लोकांना राष्ट्रीय सभेची आज्ञा कस्पटाप्रमाणेंच लाथाडावयाची असेल व आपल्यावर स्वार्थत्यागाची जबाबदारी कांहींच नाहीं अशी वकिली लढवावयाची असेल तर गोष्ट वेगळी ! पण सर्वच वकिलांनीं अशा बेइमानीपणानें हात धुतले आहेत असें आम्हांस वाटत नाहीं. राष्ट्रीय सभेच्या आज्ञेला अनुसरून वकिली सोडणें हा उत्तम पक्ष, पण तें हातून कांहीं कारणानें नच घडलें तरी इतर रीतीनें शक्य तितका स्वार्थत्याग करून असहकारितेचें कार्य सफल करण्यास मदत देणें हें ते आपलें कर्तव्य मानतात असें आम्ही समजतों. तसें असेल तर त्यांना आपल्या प्राप्तीचा बराच अंश

राष्ट्रकार्यास देणें प्राप्त आहे, व त्यांना स्वतःला जिल्हाभर हिंडतां येत नसेल तर सुदैवानें मिळणारे हे स्वयंसेवक आपल्या मदतीस घेऊन त्यांना जिल्हाभर जागृतीचें काम करणें अनायासानें सुलभ होणार आहे. खेडोपाडीं हिंडणारे हे स्वयंसेवक मिजासी नसल्यामुळें, शिवाय आपणास मिळणाऱ्या शिधासामुग्रीचा मौल्यवान् मोबदला उपदेश किंवा उपयुक्त काम यांच्या रूपानें परत देणारे असल्यानें, दर दहापांच गांवच्या मिळून एकेका गटाला एकदोन स्वयंसेवक पोसणें कांहीं जड जाणार नाहीं. या राष्ट्रीय बलुतेदारांची योग्यता फार मोठी आहे व आजच्या घटकेला त्यांचा उपयोगहि तसाच मोठा आहे. बैरागी, फकीर, ज्योतिषी, जोशी, पुराणिक, पुजारी व निवळ भिक्षेकरी या नात्यानें गांवगन्ना आज कितीतरी लोक पोसले जातात, त्यांत एकाद्याअर्ध्या स्वयंसेवकाची भर डोईजड खचित नाहीं व एक वर्षाच्या अनुभवानें आपणांस पडलेला खर्च सत्कारणीं लागला, किंवा राष्ट्रीय दृष्टीनें भरूनहि निघाला असें खेडेगांवच्या लोकांना वाटेल अशी आमची खात्री आहे. अशा स्वयंसेवकांचें रजिस्टर पुण्यास असहकारिता-कमिटीनें हल्लीं ठेवलें असून त्याचा मुकाबला म्हणून जिल्ह्यांतील पुढाऱ्यांकडूनहि आम्ही अमुक इतक्या स्वयंसेवकांची तरतूद करितों असे उलट निरोप असहकारिता-कमिटीकडे येऊं लागले पाहिजेत. विद्यार्थी कॉलेजांतून बाहेर निघणें ही गोष्ट अशा निरोपांवर बरीचशी अवलंबून आहे. ही गोष्ट लक्षांत घेऊन सर्व जिल्ह्यांचे पुढारी स्वयंसेवकांच्या हातून काम घेणें व निदान एक वर्षभर त्यांच्या योगक्षेमाची तजवीज करणें या गोष्टीच्या तयारीला एका क्षणाचाहि विलंब न करतां लागतील अशी आम्हांस आशा आहे.

---

# ४७. बहिष्कारयोगी विद्यार्थ्यांची सोय

( केसरी, तारीख ८ फेब्रुवारी १९२१ )

मुंबई, पुणें, सांगली वगैरे ठिकाणच्या कॉलेजांतील ज्या विद्यार्थ्यांनीं शिक्षणावर बहिष्कार घातला आहे त्यांची व्यवस्था काय होणार यासंबंधानें अनेक लोकांकडून माहिती मागण्यांत येत असल्यामुळें, खालील माहिती प्रसिद्ध करण्यांत येत आहे व तिनें सर्वांच्या शंकांचें निरसन होईल अशी आशा आहे. बहिष्कारवादी विद्यार्थ्यांनीं कॉलेजें सोडलीं तीं राष्ट्रीय सभेच्या ठरावास मान देण्याकरितां व स्वतःचें कर्तव्य म्हणून सोडलीं. हें शिक्षण त्यांनीं तहकूब केलें तें बिनशर्त तहकूब केलें. या तहकुबीच्या मुदतींत अमुकानें आपणांस अमुक मदत करूं असें वचन दिलें आहे असें त्यांना म्हणतां येणार नाहीं, व तसें ते म्हणूं इच्छीतहि नाहींत. या सर्व गोष्टी खऱ्या. तथापि त्यांना योग्य तो सल्ला व शक्य ती मदत देणें हें सर्व पुढाऱ्यांचें काम आहे. मुलांनीं शिक्षण तहकूब करणें हें ज्या राष्ट्रीय सभेनें सांगितलें त्याच सभेनें हेंहि सांगितलें आहे कीं, राष्ट्रीय शिक्षणाच्या शाळा काढल्या जाव्या; लवाद-कोर्टें स्थापिलीं जावीं, स्वदेशीचा फैलाव केला जावा. काँग्रेसचा निरोप व आदेश खेड्यांतून पसरला जावा. या सर्व कामांत विद्यार्थ्यांचा शक्य तितका उपयोग करून घेतल्यास राष्ट्रीय सभेचें कार्य सफळ होईल व विद्यार्थ्यांचीहि सोय होईल.

जे विद्यार्थी कॉलेजें सोडून आज बाहेर निघाले आहेत त्यांचे तीन चार वर्ग करितां येतील.

( १ ) ज्यांची घरची स्थिति साधारण बरी आहे त्यांनीं पुढाऱ्यांकडून कोणत्याहि प्रकारें सांपत्तिक मदतीची अपेक्षा करणें योग्य होणार नाहीं. त्यांनीं वाटेल तर राष्ट्रीय कॉलेजांत जावें. आज मुंबई व पुणें दोनहि ठिकाणीं राष्ट्रीय आर्ट्स् कॉलेजें निघालीं आहेत. त्यांत येतील तितकीं मुलें घेतलीं जातील; मात्र अशा कॉलेजांत त्यांनीं ठरीव फी देण्यास तयार असलें पाहिजे. कॉलेजच्या तोडीचें शिक्षण मिळेल, पण तें फुकट मिळणार नाहीं. नवीन मुलें आलीं असतां जितके अधिक वर्ग काढावे लागतील

तितके काढण्याची या दोन कॉलेजच्या चालकांची तयारी आहे. मुलें येता-तसें वाटल्यास धंद्यांच्या शिक्षणाच्या कॉलेजांसहि हळूहळू सुरवात होईल.

( २ ) ज्या मुलांनीं कॉलेज सोडलें पण ज्यांना कॉलेजची फी देणें झेंपत नाहीं, त्यांनीं घरीं राहून अभ्यास करावा. मात्र अशांची परीक्षा घेऊन त्यांना त्यांच्या दर्जाप्रमाणें कॉंग्रेसचें सर्टिफिकीट किंवा पदवी दिली जाईल. सामान्यतः कॉलेजच्या विद्यार्थ्यानें मनावर घेतल्यास त्याला कॉलेजचा अभ्यास घरीं करतां येतो. पुष्कळ विद्यार्थी टर्मचे दिवस भरण्याच्या सक्तीमुळें कॉलेजांत जातात, पण हजेरीनंतर हजर राहात नाहींत. राहिले तरी गमतीखातर राहतात, व गप्पागोष्टी करीत असतात. कॉलेजांतील निम्याहून अधिक विद्यार्थी केवळ घरच्या अभ्यासानें पास होतात, प्रोफेसरांच्या व्याख्यानांवर त्यांची भिस्त नसते. कित्येक प्रोफेसरहि त्यांच्यावर भिस्त ठेवण्यास लायक नसतात हें प्रसिद्धच आहे. खासगी अभ्यासच काय, पण उपजीविकेकरितां एखादी नोकरी पत्करून अभ्यास करून पास होणें हेंहि मेहनती विद्यार्थ्यांस शक्य असतें. अलाहाबाद युनिव्हर्सिटीनें शिक्षक लोकांना नोकरी करून—म्हणजे कॉलेजांत 'टर्म' न भरतां—परीक्षेस बसण्याची परवानगी ठेवली आहे. विलायतेंत मजूरपक्षापैकीं फारच थोडे लोक युनिव्हर्सिटीची परीक्षा दिलेले असतात. तथापि कॉलेजांत न जातां ज्यांनीं उत्कृष्ट प्रकारची विद्या किंवा संस्कृति संपादन केली असे लोक त्यांत थोडे नाहींत. हे लोक नोकरी करून पोटाला मिळवून फावल्या वेळीं अभ्यास करून विद्वान् झालेले आहेत. तात्पर्य, विद्वत्ता परीक्षेवरच अवलंबून असते असें नाहीं. तथापि परीक्षेचें सर्टिफिकीट किंवा पदवी असली म्हणजे खासगी नोकऱ्या वगैरेहि मिळणें सुलभ होतें ही गोष्ट कांहीं खोटी नाहीं. यामुळें ज्यांना अशीं सर्टिफिकिटें किंवा पदव्या हव्या असतील त्यांच्याकरितां टिळक महाविद्यालयाच्या मंडळामार्फत—म्हणजे भावी टिळक युनिव्हर्सिटीमार्फत—सर्व प्रकारच्या परीक्षा घेण्याची व्यवस्था करण्यांत येत आहे. अशा रीतीनें शिक्षण बिनखर्ची होऊन उपजीविकेस खंड न पडतां मान्यताहि मिळेल. ज्यांना खासगी नोकरीच पुढें करावयाची त्यांना परीक्षा देण्याला एखादें वर्ष अधिक लागलें तरी हरकत नसते, कारण नोकरी सुरू असते.

(३) ज्यांना घरीं बसून स्वस्थ राहतां येत नाहीं, किंवा ज्यांना अभ्यास चालू ठेवण्यापेक्षां खेडोपाडीं जाऊन राष्ट्रकार्य करण्याचें महत्त्व अधिक वाटतें त्यांना तिकडे पाठविण्याची व्यवस्था करण्यांत येत आहे. या बाबतींत दोन प्रकारची व्यवस्था झाली आहे. पहिली अशी कीं, ज्या विद्यार्थ्यांची एकदम खेडोपाडीं जाण्याची तयारी नसेल, व या कार्यास लागणारें शिक्षण ज्यांना बरेंच दिवस घ्यावयाचें असेल, त्यांच्याकरितां मुंबईजवळ अंधेरी येथें एक आश्रम काढण्यांत आला आहे. या आश्रमांत राहण्याची व जेवण्याखाण्याची व्यवस्था बहुतेक बिनखर्ची करण्यांत आली आहे. तथापि सुखवस्तु विद्यार्थ्यांनीं राष्ट्रीय द्रव्यनिधीवर अधिक भार पडूं नये म्हणून स्वतःच्या खर्चाचे पैसे द्यावे. आश्रमांतील विद्यार्थ्यांस शिक्षण द्यावयाचें तें राष्ट्रकार्याचें, म्हणजे सध्या कॅांग्रेस–प्रचाराचेंच दिलें जाईल. मात्र शिक्षण अनेकांगी असून योग्य असा अभ्यासक्रम ठरविला आहे, आणि विद्वान्, अनुभविक अशा व्याख्यात्यांच्या व्याख्यानांची व्यवस्था केली आहे. ही आश्रम–व्यवस्था प्रयोगादाखल निदान सहा महिने चालेल व जरूर तर पुढेंहि वाढविली जाईल.

(४) ज्या विद्यार्थ्यांना या आश्रम-व्यवस्थेचा फायदा न घेतां एकदम प्रचाराच्याच कामास सुरवात करावयाची असेल त्यांचीहि तदनुरूप व्यवस्था करण्यांत आली आहे. ही व्यवस्था म्हणजे, विद्यार्थी-स्वयंसेवकास त्यानें पसंत केलेल्या जिल्ह्यांत अगर तालुक्यांत पाठविण्यांत येईल. निघण्यापूर्वी त्याला मुंबई किंवा पुणें येथें व्याख्यानरूपानें पांच चार दिवस माहिती देण्यांत येऊन सर्व साधारण अनुभवाच्या अशा सूचना करण्यांत येतील तशीं व्याख्यानें गेल्या आठवड्यांत मुंबईस सुरू झालींच आहेत व पुण्यासहि या आठवड्यांत सुरू होतील. त्याच्याबरोबर सुरवातीसच कांहीं उपयुक्त पुस्तकें व हस्त-पत्रकें देण्यांत येतील. शिवाय मागाहून प्रचाराकरितां मुद्दाम लिहविण्यांत येणारीं पत्रकें हींहि त्याजकडे मधून मधून पाठविण्यांत येतील. ज्यांची वर्तमानपत्रें वाचून दाखविण्याची इच्छा असेल. त्यांना त्यांच्या पत्त्यावर नियमितपणें वर्तमानपत्रें पाठविलीं जातील. तसेंच विद्यार्थ्यांचें हें प्रचाराचें काम सुरू असतां, विशेषेंकरून खेडेगांवच्या लोकांना उपयोगी पडण्यासारखी माहिती देणारे लेख वर्तमानपत्रांतून लिहविले जातील. ज्या

ठिकाणीं हे प्रचारक जाणार तेथील पुढारी व प्रतिष्ठित गृहस्थांना शिफारस-पत्रें लिहून प्रचारकांचा योग्य परामर्ष घेऊन त्यांस लागेल ती मदत करण्याविषयीं विनंति करण्यांत येईल. सुरवातीस प्रवासखर्च, दोन तीन आठवड्यांची पोटगी व जुजबी कपडालत्ता यांकरितां म्हणून लहानशी रक्कम प्रचारकांना देण्यांत येईल. पण त्यापुढें या स्वयंसेवकांनीं केवळ आपल्या परिश्रमानें आपल्या चरितार्थाची सोय लाविली पाहिजे. याचीं कारणें दोन आहेत. एक तर सर्व प्रचारकांचा वर्षभर जेवणाखाण्याचा व प्रवासाचा खर्च मुख्य कचेरीस सोसवणार नाहीं. तीन प्रचारक वर्षभर अंगावर पोसावयाचे असल्यास त्यांजकरितां निदान एक हजार रुपये लागतील असा अंदाज आहे. याशिवाय छपाई वगैरेचा खर्च वेगळाच. म्हणजेच पांचशें प्रचारक वर्षभर संभाळण्यास दीडपासून दोन लक्ष रुपये लागतील. महाराष्ट्राची इच्छा, हे प्रचारक असे संभाळले जावे, त्यांना खेडेगांवीं कोणावरहि अवलंबून राहावयास लागूं नये—अशी असल्यास त्यानें राष्ट्रीय सभेनें फर्माविल्याप्रमाणें टिळक-स्वराज्य-फंडाकरितां तितकी रक्कम जमविली पाहिजे व तो जमवीलहि. पण ती प्रत्यक्ष जमेपर्यंत वाट पहात बसून मग स्वयंसेवकांना बाहेर रवाना करावयास लागल्यास व्यर्थ कालहानि होणार. उलट स्वयंसेवक रवाना झाले तर ही वर्गणी जमण्यास मदतच होईल. कारण कोणासहि मुद्दाम आठवण ठेवून उठून वर्गणी पाठविणें हें मुष्किलीचें असतें. तेंच त्याला घरबसल्या वर्गणी मागावयास गेल्यास ती तो सहज हात उचलून देतो. दरतालुक्यास पांचचार फिरते स्वयंसेवक लाभल्यास जरूर ती वर्गणी लवकरच जमेल याविषयीं आम्हांस संशय वाटत नाहीं. ही वर्गणी मुख्य कचेरीकडे अगर जिल्हापुढा-याकडे आल्यास तींतून स्वयंसेवकांना जरूर ती पोटगी देऊन स्वावलंबी बनवितां येईल व असें होणेंच एका अर्थी अधिक बरें. कारण स्वयंसेवकांजवळ पावती-पुस्तकें असलीं तरी ते अनोळखी म्हणून त्यांच्या-शीं पैशाचा व्यवहार सर्रास करण्याला लोकांचा दिल प्रथम खुला राहणार नाहीं. याकरितां वर्गणी जमणें ती जिल्ह्यांतील प्रमुख पुढाऱ्यांकडे जमा होऊन शक्य तितकी त्यांच्या जिल्ह्यांत काम करणाऱ्या स्वयंसेवकांच्या

पोटगीकरितां या पुढाऱ्यांकडून खर्च झाल्यास फार उत्तम होईल व मुख्य कचेरीचें जमाखर्चाचें बरेंच काम वांचेल.

पण कोणी म्हणतील कीं, वर्गणी अशी जमावयाची तर ती रोख व एकदम द्यावी लागणार त्यापेक्षां स्वयंसेवकांनाच आम्ही संभाळूं म्हणजे झालें. वास्तविक हीहि योजना कांहीं वाईट नाहीं. दुसऱ्या एका दृष्टीनें अधिक सोईचीहि आहे. पण तींत एक अडचण आहे ती अशी कीं, या व्यवस्थेंत स्वयंसेवकाला परावलंबी व्हावें लागेल. एखादा गांव असा उमद्या दिलाचा निघेल कीं, स्वयंसेवकाला तो घरच्या माणसासारखा किंबहुना पाहुण्यासारखा प्रतिष्ठित रीतीनें वागवील. पोटगीची किंवा प्रत्यक्ष जेवणाखाण्याची व्यवस्था या कानाची त्या कानाला न कळतां करून टाकील. स्वयंसेवकास आपण परावलंबी आहों असें यत्किंचितहि वाटणार नाहीं. पण सर्वच गांव सारखे नसतात. स्वयंसेवकांचा चरितार्थ परस्पर गांवाकडे सोंपविल्यास यांपैकीं कित्येकांच्या स्वाभिमानबुद्धीला मधून मधून धक्का लागण्याचा संभव आहे. याकरितां स्वयंसेवक स्वतंत्र व स्वावलंबी असलेला बरा. ज्या लोकांत प्रत्यक्ष काम करावयाचें. त्यांच्याकडूनच पोटगी मिळावयाची असल्यास त्या कामाचें तेज निम्मेंअधिक नाहींसें होतें. उलट उपदेशक किंवा प्रचारक आपलें काम तर करितो, पण पोटाला दिलें तरीहि घेत नाहीं, असें लोकांना अनुभवाला आल्यास त्याच्या उपदेशाचें तेज द्विगुणित वाढतें. तात्पर्य, या दोन व्यवस्थांचे गुणदोष वेगवेगळे असल्यानें त्यांपैकीं कोणती व्यवस्था पत्करावयाची, व स्वयंसेवकांच्या निदान एक वर्षभरच्या पोटगीची तयारी करावयाची, याचा विचार व निश्चय जिल्हापुढारी आणि तालुक्यांतील पुढारी यांनीं एकत्र जमून करावा. हा त्यांचा निश्चय होईपर्यंत जी चारदोन आठवड्यांची पोटखर्ची लागेल ती पुणें व मुंबई येथील स्वराज्य-संघ-कचेरींतून स्वयसेवकाजवळ दिली जाईल.

ही पोटखर्ची वास्तविक थोडी आहे. पण एक तर वर दर्शविल्याप्रमाणें सर्व स्वयंसेवक पगारी ठेवून त्यांना मुख्य कचेरींतून पगार देण्याला पुष्कळ रोख रक्कम लागेल, व ती जमवीपर्यंत स्वयंसेवक निरुपयोगी राहतील. दुसरे पक्षीं आपणांस अमुक इतके स्वयंसेवक पाहिजेत असें दरतालुक्यानें मनाशीं ठरवून त्यांच्या पोटखर्चीची तयारी केल्यास त्यांना

तावडतोब कामास सुरवात करतां येईल. पण क्षणभर समजा कीं, तालुक्याच्या पुढाऱ्यांनीं आपलें कर्तव्य केलें नाहीं असें मानिलें तर स्वयंसेवकांना हताश होण्याचें कारण नाहीं व ते हताश होणार नाहींत अशी आमची खातरी आहे. आमचा या विद्यार्थी-स्वयंसेवकांना असा स्पष्ट सवाल आहे कीं, आपल्या पोटगीची कोणी हमी देईपर्यंत पायावर पाय घालून ते आळशी बसणार कीं काय ? त्यांना आधींच इतकें शिक्षण आहे कीं, ते तालुक्यांच्या शाळांतून शिक्षकहि होऊं शकतील व तालुकानिहाय शाळांची वाण असते हें प्रसिद्धच आहे. याकरितां त्यांनीं दोनदोन चारचार असामी मिळून तालुक्याच्या गांवास निदान राष्ट्रीय शिक्षणाच्या शाळा काढल्या व मुलें पढविलीं तर त्यांच्या पोटापुरतें वेतन सहज मिळून शिवाय उरलेल्या वेळांत त्यांना गांवच्या लोकांना उपयोगीं पडतां येईल. शाळाहि न चालल्या व पाहुणचार करण्यास पुढें येण्यांत गांवगन्नाच्या लोकांनीं कुचराई केली तरी त्यांची झोळी कांहीं कोणी काढून नेलेली नाहीं. फंदीबुवांनीं आपल्या फटक्यांत सांगून ठेवलेंच आहे.

असल्यावर भीक मागुं नको ।
नसल्यावर सांगणें कशाला ।
गांव तुझा भीड धरूं नको ।

कर्तव्यपराङ्मुख निःस्फूर्त जनतेला लाजविण्याचा तो एक प्रशस्त मार्गच आहे. निःस्वार्थीपणाचें ठळक लक्षण भिक्षेइतकें दुसरें कोणतें असणार ? प्रतिष्ठित मनुष्यानें मागितलेली भिक्षा हा स्वार्थच नव्हे. मी पोटाकरितां भिक्षा मागत नाहीं हें तो जाणतो; हा पोटाकरितां भिक्षा मागत नाहीं हें ते जाणतात. ' भिक्षावृत्ति अवलंबणें । जळो जिणें लाजिरवाणें ' यांत मुख्य रोख वृत्ति या शब्दावर आहे. वृत्ति म्हणजे धंदा. अर्थात् जी धंदेवाईक भिक्षा, ज्या भिक्षेचा आद्य व अंतिमहि हेतु स्वतःचें उदरभरण हा आहे, ती भिक्षा मात्र लाजिरवाणी. तसें नसतें तर ' आधीं मागितली पाहिजे भिक्षा । ओं भवति या पक्षा रक्षिलें पाहिजे ' असें समर्थांनीं म्हटलें नसतें व भिक्षेचें गौरव केलें नसतें. आजवर हिंदी लोक धर्मबुद्धीनें भिक्षा घालीत आले आहेत हें खरें; पण भिक्षेकऱ्याकरितां खरी आदरबुद्धि बाळगून घातलेली भिक्षा फार थोडी. भिक्षा वाढतांना हात पुढें

होतो, पण मन मागें होत असतें. नेहमींची भिक्षा घालतांना यजमानाला स्वतःविषयीं मोठेपणा आणि भिक्षेकऱ्याविषयीं तुच्छ बुद्धि वाटत असते. पण तोच निःस्वार्थी देशाभिमानी भिक्षेकरी भिक्षा मागण्यास आला असतां या भावनांची उलटापालट होते. यजमानाला वाटतें कीं, मोठ्या कार्याकरितां भिक्षा मागण्याला आलेला हा याचक खरा मोठा; मीच खरोखर क्षुद्र. कारण त्याच्या कार्याच्या मानानें मी देऊन किती देणार ! शिवाय मी जें मूठभर देणार तें देण्याला तो मागावयाला येईपर्यंत कां थांबलों ? तो उठून चालत माझ्या दारापर्यंत आला, मी घरींच राहिलों म्हणून त्याची स्फूर्ति अधिक प्रबळ.

बरें, आपण असेंहि घेऊन चालूं कीं, स्वयंसेवकाला भिक्षा घालतांना खेडेगांवच्या लोकांनीं वर सांगितल्या प्रकारची उदार मनोवृत्ति न अनुसरतां तोंड वांकडें केलें, तरी स्वयंसेवकांनीं असें मनांत आणावें कीं, वांकडें कर–करून याचें तोंड कायमचें वांकडें बनलें तरी चालेल, पण त्याला देशाकरितां हा मुर्देड पाडलाच पाहिजे. तो पाडल्यानें त्याचें कल्याणच होईल. अजीर्णानें आजारी झालेल्या मुलाला ज्याप्रमाणें एकादशीच्या निमित्तानें डॉक्टर उपोषण घालतो त्याचप्रमाणें स्वार्थाचें अजीर्ण झालेल्या लोकांना हे स्वयंसेवक भिक्षेच्या द्वारें उपोषण घालतील. खेडेगांवचे लोक एरवीं सरकारी अधिकाऱ्यांची काय थोडी सरबराई करितात व शिधापाणी देतात ? स्वयंसेवक झाला तरी तो जनतेच्या पदरचा अधिकारीच आहे; त्याचीहि थोडीबहुत सरबराई त्यांच्या हातून घडली तर काय बिघडलें ? युद्ध सुरू असतां सरकार आपले शिपायास वाटेल त्याच्या घरीं सक्तीनें जाऊन उतरण्याचा व बिऱ्हाड लावण्याचा परवाना देतें. सांप्रत असहकारितेच्या युद्धांत झालें तरी जनतेनें बहिष्कारवादी विद्यार्थी–सैनिकांस जर खेडेगांवच्या पुढाऱ्यांना घरीं उतरण्याचा परवाना दिला तर त्यांत तरी काय बिघडलें ? खेडेगांवच्या लोकांवर एरवीं बोजे काय थोडे असतात ? त्यांतच त्यांनीं हाहि एक समजावा. त्रिंबक नारायण अत्रे यांनीं गांवगाडा नांवाचें जें अत्यंत मनोरंजक पुस्तक लिहिलें आहे त्यांतील सहाव्या प्रकरणांत 'फिरस्ते' या सदराखालीं खेडेगांवच्या लोकांकडून कमी अधिक हक्कानें, वहिवाटीनें, जरबेनें, कुचेष्टेनें, चोरीनें, भिक्षेनें

धान्य अगर पैसे उकळणाऱ्या लोकांची याद दिली आहे. ती या प्रसंगीं समग्र उतरून घेण्याची लहर आम्हांस आंवरत नाहीं. ही याद अशी:— पांचाळ, बेलदार, वडार, कैकाडी, वंजारी, लमाण, मेवाती, वैदू, गोंड, मांगगारोडी, गोपाळ, कोलहटी, हरदास, दरवेश, बेदरवाले, गारोडी, कुंचेवाले, कंजारी, तिरमल, चित्रकथी, फासेपारधी, बहुरूपी, रायनंद, भोपे, भगत, मुल्ये, आराधी, वाघ्ये, मुरळ्या, जोगती, कांतकाडिणी, भराडी, वासुदेव, पांगूळ, गुरुबाळसंतोष, राऊळ, ठोकेजोशी, कुडमुडे जोशी, सुपहलव्ये, पोतराज, कानफाटे, उदासी, आघोरी, खोटे, आंधळे-पांगळे, नाथपंथी, वारकरी, कबीरपंथी, संन्यासी, कापडी ( कापडी-वाले ), बैरागी, जती, साधू, अयाचित, मानभाव, नानकशाही फकीर, शिद्दी, इराणी, बलुची, अफगाणी, इत्यादि. पुष्कळ वाचकांना ही याद वाचून नवल वाटेल. पण सदर ग्रंथकारांनीं त्यांपैकीं बहुतेकांचें प्रत्यक्ष चरित्र वर्णिलें असल्यामुळें त्यांच्या खरेपणाविषयीं कोणास शंका घेण्याचें कारण नाहीं. शहरगांवच्या लोकांना यांतील कित्येक नांवें अपरिचित असतील. पण खेडेगांवच्या लोकांना या सर्वांची प्राय: प्रत्यक्ष ओळख असते. आमचें एवढेंच म्हणणें कीं, वरील यादींत कॉलेजचा विद्यार्थी ऊर्फ असहकारितेचा स्वयंसेवक जर एक अधिक घातला गेला तर आम्हीं मोठासा अपराध केला असें होणार नाहीं; व आमचे खेडेगांवचे बंधूहि त्याचा वरील यादींत कायमचा समावेश मोठ्या हौसेनें करतील. कारण हरिदास किंवा वारकरी यांखेरीज आमच्या विद्यार्थी स्वयंसेवकाच्या जोडीला बसूं शकेल असा उपयुक्त किंवा सात्विक फिरस्ता वरील यादींत दुसरा एकहि सांपडणार नाहीं.

खेडेगांवांत जाऊन स्वयंसेवकानें कोणतें काम करावें याची तात्विक उदाहरणें आम्हांस पुष्कळ देतां येतील. साक्षरतेचा प्रसार करणें, वर्तमानपत्रें, राजकीय पोथ्या, पुस्तकें वाचून दाखविणें, चित्रें दाखविणें, गोष्टी सांगणें, गप्पा मारतां मारतां उपयुक्त माहिती देणें, स्थलवर्णनें करून रंजविणें, ऐतिहासिक कथा सांगणें, हातरहाट, सुधारलेले माग, कापूस वठण्याचीं यंत्रें चालविणें, पतपेढ्यांची माहिती देणें, वरिष्ठ राज्यकारभार, जमाखर्च यांची माहिती देणें, कायदेबाजी, दारूबाजी, जुगार, ग्रामकलह

वगैरेंच्या निषेधपर उपदेश करणें, स्वदेशी जिनसा प्रत्यक्ष दाखविणें, त्यांच्या मूळ ठिकाणची माहिती देणें, शेतकीची सुधारणा, बीं-बियाणें, खतमूत्र, जनावरांची पैदास, गोरक्षण वगैरे विषयांचीं मूलतत्त्वें पुस्तकांवरून किंवा हस्त-पत्रकांवरून समजावून देणें, कायद्याचे लढे उकलणें, लवाद कोर्टाची स्थापना करणें, पंचायती निवडून दाखविणें, परदेशच्या वर्णनाची माहिती सांगणें, युरोपियन लोकांचे गुणदोषपर स्वभाववर्णन करणें, हिंदी लोकांचे नागरिक-त्वाचे प्रामाणिक हक्क समजावून देणें, राष्ट्रीय सभेची माहिती देणें, तिचे ठराव समजावून सांगणें, सहकारितेचा दुःखद इतिहास व असह-कारितेचा अवतार यांचा संबंध समजावून देणें, कॉंग्रेसकमिट्या बनविणें, सदर कमिट्यांचे सभासद करणें, टिळक स्मारकाचा फंड जमविणें, अशीं किती तरी उदाहरणें देतां येतील. एखाद्या पढिक हरिदासाप्रमाणें स्वयं-सेवकानें रोज एक नवी गोष्ट घेतली किंवा राष्ट्रीय आख्यान लाविलें तरी त्याला वर्षभर पुनरुक्ति करण्याचें कारण पडणार नाहीं. तात्पर्य, स्वयं-सेवकाला खेडेगांवांत उद्योगाची वाणच पडणार नाहीं, मात्र इच्छा हवी.

कित्येक विद्यार्थ्यांना हा पहिलाच अनुभव असल्यामुळें ते प्रथम गांगरून जातील. परंतु पहिली भीड मोडतांच ते लोकांना प्रिय व उपयुक्त झाल्याशिवाय राहणार नाहींत. अशी संधि ही पहिल्यानेंच आलेली आहे व ती दवडली जाणार नाहीं अशी आम्हास आशा आहे. तालुक्याच्या लोकांच्या अनास्थेनें किंवा विद्यार्थी स्वयंसेवकांच्या अचतुरतेनें जर ती फसली किंवा बिघडली तर त्यापासून देशाचें हित होणार नाहीं, व ती जर कां एकदां साधली तर हा दाखला कायम होऊन राजकीय चळवळीचें हें साधन सर्वांत आधुनिक पण सर्वांत अधिक परिणामकारक असेंच ठरेल. सरकारनें मतदारी खेड्यापर्यंत नेऊन भिडविली, त्याला राष्ट्रीय सभेचाहि जबाब खेड्यापर्यंत नेऊन राजकीय चळवळ भिडवूनच देणें योग्य होईल.

असो. पण या बाबतींत इतकें विस्तृत लिहिण्याचें कदाचित् कारणहि नाहीं. आमचा स्वयंसेवक सुशिक्षित व प्रतिष्ठित असून शिवाय लोको-पयोगाकडे त्यांचें विशेष लक्ष राहील, यामुळें तो लवकरच खेडेगांवच्या लोकांना प्रिय होईल असा आम्हांस भरंवसा आहे; विद्यार्थ्यांनीं खेडे-गांवांत गेल्यावर कसें वागावें याविषयीं त्यांस मुद्दाम कांहीं सांगण्याचें

कारण दिसत नाहीं. त्यांचें स्वभावदाक्षिण्य तें त्यांना शिकवील; शिवाय राष्ट्रीय स्वयंसेवक या नात्याची नवी जबाबदारीहि ओळखूनच ते वागतील याविषयीं शंका नाहीं. स्वार्थाच्या दृष्टीनें प्रतिष्ठित पाहुण्याप्रमाणें म्हणजे अत्यंत भिडस्तपणानें त्यांना वागावें लागेल, पण लोकोपयोगाच्या दृष्टीनें ती वृत्ति ठेवून चालणार नाहीं. कारण पाहुणा प्रतिष्ठित असला तर डोळ्यासमोर मांजर यजमानांचें दूध पीत असलें तरी त्याचा हात उचलत नाहीं! तसें मात्र स्वयंसेवकांनीं करून चालणार नाहीं. लोकोपयोगाच्या बाबतींत नम्र सेवकाप्रमाणेंच त्यांना वागावें लागेल. हिंदी राष्ट्रांतील चालत्या गांवगाड्यांची व बोलत्या गांवगाड्यांची ही पहिलीच भेट आहे. म्हणून गांवगाडा ग्रंथाचे कर्ते अत्रे यांच्याच उमद्या शब्दांनीं हा लेख पुरा करितों.

"चालत्या गांवगाड्यांतलें पुष्कळ भरित ह्या बोलत्या गांवगाड्याबाहेर आहे; आणि तें कोठें गांवांत तर कोठें वनपर्वतांत पांगलें आहे. आपल्या ह्या बंधूंना निरक्षर म्हणून मागासलेलें गणण्याची चाल पडली आहे. पण गंजाखालीं पाणीदार पोलादहि निमूटपणें दिवस कंठतें हें विसरतां कामा नये. हे लोक अनादि कालापासून बिकट परिस्थितीशीं झगडून संसारयात्रा करीत असल्यामुळें नानातऱ्हेचे, विशेषतः शेती, वनस्पती, पक्षी, मनुष्य, वैद्यक इत्यादिकांचें ज्ञानभांडार त्यांच्या तोंडांत व दिलदप्तरांत नुसतें खेळत आहे. जर साक्षर मंडळी नमतें घेऊन त्यांच्याच सुतासुतानें घेतील तर ह्या वस्तुस्थितीविषयीं त्यांची बालंबाल खात्री झाल्यावांचून रहाणार नाहीं. तसेंच मानापमान गुंडाळून ठेवून जर संशोधक व सुधारक रानोमाळ हिंडून त्यांच्यामध्यें मिसळतील तर नानाविध सामाजिक, धार्मिक व ऐतिहासिक माहितीची किती तरी मनोरम व बिनमोल लेणीं ह्या नैरक्षर्य पर्वताच्या उदरांत दडून राहिलीं आहेत, हें त्यांना कळून येऊन विलक्षण ज्ञानानंदाचा अपूर्व आस्वाद लाभेल ह्यांत संशय नाहीं. तेव्हां ह्या बाहेर राहिलेल्या भरिताचाहि थांग व व्यवस्था लावणें त्वरित व देशहितास्तवच नव्हे तर मानवधर्मपालनास्तवहि अत्यंत इष्ट आणि अवश्य आहे."

---

# ४८. टिळक-विद्यापीठाची योजना

( केसरी, तारीख २१ जून सन १९२१ )

पुण्यांतील टिळकस्मारक कमिटी अस्तित्वांत आल्यापासून थोड्याच दिवसांत तिनें असें ठरविलें कीं, सदर स्मारक मुख्यतः शिक्षणविषयक असावें. अशा प्रकारच्या स्मारकाची व्याप्ति प्राथमिक शाळांपासून विद्यापीठा-(युनिव्हर्सिटी) पर्यंत सहजच होऊं शकते. असहकारितेची मदत याच वेळीं झाल्यानें स्मारक—चालकांच्या अदमासापेक्षांहि आधींच लोकमान्य टिळकांच्या नांवाचें महाविद्यालय ( कॉलेज ) पुण्यास निघालें. तें आपल्या पैशांतून चालविण्याचें काम सदर कमिटीनें आपणाकडे घेतलें व ता. ५ डिसेंबर १९२०च्या जाहीर सभेंत स्मारकाच्या योजनेंत टिळक—विद्यापीठाचा प्रत्यक्ष समावेश करण्यांत येऊन टिळक स्मारकफंडाच्या कोणत्या दर्जाच्या वर्गणीदारांस सदर विद्यापीठांत कोणत्या दर्जाचा सभासद होतां येतें हेंहि ठरविण्यांत आलें. त्यानंतर टिळकमहाविद्यालयातर्फे परीक्षा घेण्याचा उपक्रम करण्यांत आला तो बराच यशस्वी झाला, हें परीक्षांचे निकाल प्रसिद्ध झाले त्यावरून दिसून येईलच. सदर परीक्षांच्या उपक्रमांत विशेष ध्यानांत घेण्यासारखी गोष्ट घडली ती ही कीं, गुजराथ-विद्यापीठाच्या योजनेप्रमाणेंच याहि विद्यालयाच्या परीक्षास्थापनाच्या शाखा वऱ्हाड, मध्यप्रांत किंबहुना अलाहाबाद, डेहराडून येथपर्यंत पसरल्या होत्या; यावरून योग्य दिशेनें प्रयत्न झाल्यास विद्यापीठाचा पाया घालण्यास थांबण्याचें फारसें कारण नाहीं असें उघडच झालें. आणि वसई येथें भरलेलें प्रथम महाराष्ट्रीय प्रांतिक परिषदेच्या प्रसंगीं टिळकविद्यापीठाची कल्पना अनेक लोकांपुढें ठेवून तें कार्य पुढें ढकलण्यास संमति मिळविण्यांत आली. पुण्यास काल रोजीं भरलेली सभा ही या कार्यातली आणखी एक पुढची पायरी असून तिच्या योगानें लोकमान्य टिळकांच्या शिक्षणविषयक स्मारकाचें ध्येय तितकें जवळ येत आहे ही आनंदाची गोष्ट होय.

कोणाचेंहि स्मारक अनेक प्रकारांनीं करतां येतें व त्यांपैकीं बऱ्याच प्रकारांचा अवलंब हिंदुस्थानांतील लो० टिळकांचे चहाते व भक्त अनेक

ठिकाणीं करून चुकलेच आहेत. कोणीं त्यांच्या नांवाच्या नवीन इमारती बांधल्या; कोणीं जुन्या इमारतींना त्यांचीं नांवें दिलीं; कोणीं त्यांच्या नांवाचीं लहानसहान वाचनालयें स्थापिलीं; त्यांचें सर्वांत मोठें स्मारक टिळक-स्वराज्यफंडाच्या रूपानें होत आहे; तथापि यांपैकीं बऱ्याच गोष्टींचा लवकरच विसर पडण्याचा संभव आहे. टिळकस्वराज्यफंड एक कोटि रुपयांपर्यंत जमला तरी कॉंग्रेसची मुख्य कचेरी व प्रांतिक कचेऱ्या यांच्या द्वारें तो लवकरच खर्चून जाईल. परंतु पुणें शहरानें आरंभिलेल्या व महाराष्ट्राच्या अनेक विभागांनीं संमति दिलेल्या शिक्षणविषयक स्मारकाची गोष्ट तशी नाहीं. हें स्मारक दिवसेंदिवस वृद्धि पावणारेंच आहे. टिळकविद्यापीठाला प्रत्यक्ष प्रारंभ होण्यापूर्वी आज हें बोलणें कदाचित् धाडसाचेंहि दिसेल; तथापि हें विद्यापीठ स्थापन झाल्यास हिंदुस्थानांतील कित्येक जुन्या विद्यापीठांप्रमाणें किंवा ऑक्सफर्ड, केंब्रिज वगैरे ठिकाणच्या विद्यापीठांप्रमाणें त्यांचें नांव अनेक शतकेंपर्यंत अबाधित चालावें अशी इच्छा करणें वावगें होणार नाहीं.

विद्यापीठें व त्यांचीं नांवें यांचा संबंध सामान्यतः दोन प्रकारचा असतो. एक संबंध स्थलवाचक व दुसरा व्यक्तिवाचक. हिंदुस्थानांतील सर्व विद्यमान विद्यापीठें पहिल्या संबंधाचीं उदाहरणें होत. मुंबई युनिव्हर्सिटी ही मुंबई शहरांत स्थापिली गेली, मुंबई इलाख्यांतील विद्यार्थ्यांकरितां ती काढण्यांत आली व मुंबईसरकार तिचा खर्च चालवितें. अर्थात् कोणत्याहि रीतीनें विशिष्ट व्यक्तीचा तिच्याशीं संबंध येत नाहीं. दुसऱ्या प्रकारची युनिव्हर्सिटी अमेरिकेंतील जॉन हॉपकिन्स युनिव्हर्सिटी होय. सदर गृहस्थानें सदर युनिव्हर्सिटी स्थापण्यास लागणारा पैसा देणगीरूपानें दिलेला असल्यामुळें सदरहू युनिव्हर्सिटीला त्याचें नांव यथार्थच लावलें जातें. लोकमान्य टिळकांच्या स्मारकाकरितां काढल्या जाणाऱ्या विद्यापीठास व्यक्तिवाचक व स्थलवाचक अशीं दोनहि नांवें शोभतील. याचें कारण उघड आहे. सदर विद्यापीठ स्वतः टिळकांनीं दिलेल्या एखाद्या पैशाच्या देणगींतून निघालेलें नाहीं. पण टिळकांनीं या विद्यापीठास त्यांचें नांव देणें शोभण्यासारखी दुसरी एक देणगी दिलेली आहे व ती म्हणजे स्वतः त्यांच्या स्फूर्तिदायक स्मरणाची. कोणत्याहि विद्यापीठाचा मुख्य हेतु विद्वत्ता,

सच्छील आणि देशकार्यकर्तृत्व हीं जनतेंत पसरविणें हाच असतो. या दृष्टीनें पाहतां लोकमान्य टिळकांनीं या तीनहि गुणांचा एवढा भरपूर ठेवा आपल्या उदाहरणानें महाराष्ट्रास दिलेला आहे कीं, एरवीं कोणीं लाखों रुपयांची देणगी दिली तरी या त्रिगुणात्मक धनाची बरोबरी तिला करतां येणार नाहीं. म्हणूनच टिळकांचें स्मरण ही टिळकांची देणगी समजून त्याच्या बळावर त्यांच्या नांवाचें विद्यापीठ काढणें हें सर्वस्वी युक्त होईल. मुंबई युनिव्हर्सिटीच्या प्रत्येक वार्षिक पदवीदानसमारंभाच्या प्रसंगीं नवीन पदवीधरांना जो विविध उपदेश केला जातो त्या सर्वांचें सार तुम्ही टिळकासारखे व्हा, या एका लहानशा सूत्रांत गोवितां येईल, व दिवसहि सुदैवानें असे येत चालले आहेत कीं, मी मुंबईच्या सरकारी युनिव्हर्सिटीचा पदवीधर म्हणून घेण्यांत पूर्वीं जो अभिमान वाटत असे तो आतां वाटत नाहींसा झाला आहे. आणि मी टिळक-विद्यापीठाचा पदवीधर असें म्हणण्यांत तरुण पिढीला अधिक अभिमान वाटेल अशीं चिन्हें दिसत आहेत.

नवीन विद्यापीठाच्या नांवांत टिळकांच्या नांवाबरोबर महाराष्ट्र हें स्थलवाचक नांव येणें अयोग्य होणार नाहीं. कारण टिळकांना हिंदुस्थानांतील सर्व प्रांत जरी आपलेसे मानीत होते, तरी टिळक व महाराष्ट्र यांचा संबंध विशेष प्रकारचा होता व टिळक आज जरी मृत झाले असले तरी महाराष्ट्राच्या अंतःकरणांतील त्यांच्या स्मृतीनें तो आत्मीय भाव अद्यापि अबाधित आहे व पुढेंहि तो तसाच अबाधित राहील; शिवाय विद्यापीठाच्या योजनेनें टिळक व यच्चयावत् महाराष्ट्रीय यांचें एकीकरण जितकें समर्पक व दृढ होईल तितकें इतर कशानेंहि होणार नाहीं. सरकारी रचनेमुळें महाराष्ट्र कायमचा तिभंगलेला असून सरकार फिरून हीं शकलें एकत्र सांधील अशी आशा करवत नाहीं. वेणीसंहारांतील क्रुद्ध भीमाप्रमाणें 'मी तर फोडायलाच बसलों आहें, तुमची छाती असेल तर जोडून पहा' अशीच जणुं काय प्रतिज्ञा करून सरकारनें एका महाराष्ट्राचे तीन महाराष्ट्र केले आहेत. आणि तुम्ही कसें जोडतां तें पहातों, असा रोकडा सवाल टाकला आहे. पण या सवालासहि जबाब बरोबर देतां येईल व तो टिळक विद्यापीठासारखी सर्व महाराष्ट्राकरितां स्वतंत्र अशी एखादी संस्था काढूनच देतां येईल असें आम्हांस वाटतें. हें उत्तर देण्याला नाग-

पूर्च्या राष्ट्रीय सभेनें भाषावार प्रांत–रचना अंगिकारून प्रारंभ केला हें प्रसिद्धच आहे; तथापि वरील तत्त्वास विघातक अशीं कांहीं उदाहरणें अजूनहि शिल्लक राहिलीं आहेत. उदाहरणार्थ, बंगाली भाषा बोलणाऱ्या चार कोटि लोकांना एकटी एकच प्रांतिक कॉंग्रेसकमिटी पुरते. चार कोटि हिंदी भाषा बोलणाऱ्या संयुक्तप्रांतालाहि एकच प्रांतिक कॉंग्रेसकमिटी पुरते. असे असून मराठी भाषा बोलणाऱ्या दोन-सव्वादोन कोटि लोकांना तीन कॉंग्रेसकमिट्या लागतात. पण त्यांतहि लोकांच्या मनःस्फूर्तीपेक्षां विद्यमान राजकीय परिस्थितीचाच दोष अधिक आहे असें आम्हास वाटतें. नागपूर, वऱ्हाड व दक्षिणमहाराष्ट्र यांतील लोकांत क्वचित् मतभेद असला तरी बंगाल इलाख्यांतील लोकांपेक्षां अधिक आहे असें नाहीं. संयुक्तनामधारी प्रांतांतल्या हिंदी लोकांत तर इतका मतभेद बोकाळला आहे कीं, परवां पुण्यास झालेल्या भाषणांत महंमद अल्ली यांनीं या गंगाजम्नी प्रांताला संयुक्त म्हणण्यापेक्षां संविभक्त प्रांत म्हटलें तर अधिक शोभेल असें उघड सांगितलें. असें असतां एकाच गव्हर्नराच्या अमलाखालीं सर्व बंगाली लोक म्हणून त्याला एकच प्रांतिक कॉंग्रेसकमिटी चालते व एकाच गव्हर्नरच्या अमलाखालीं गंगायमुना प्रांतांतील चार कोटि हिंदी लोक असले तरी त्यांच्याकरितां दोन प्रांतिक कमिट्या कोणी मागत नाहीं. आणि नागपूरला वेगळी, उमरावतीला वेगळी व पुण्याला वेगळी अशा तीन वेगळ्या प्रांतिक कॉंग्रेसकमिट्या हव्या असें आम्हां मराठी लोकांना मात्र अद्यापि वाटतें. याचें कारण आम्हांला मनांतून एकी नको म्हणून नव्हे तर यदृच्छेनें तीन निरनिराळ्या प्रांतिक सरकारच्या अमलाखालीं आम्ही आज अनेक वर्षें रहात आलों म्हणून. आतां तीन वेगवेगळ्या प्रांतिक कॉंग्रेसकमिट्या असल्यामुळें राष्ट्रीय सभेच्या अध्यक्षाच्या निवडणुकीसारख्या एखाद्या बाबतींत महाराष्ट्रीय लोकांना तीन मतें मिळतील ही गोष्ट खरी; परंतु हा फायदा तितक्यापुरताच आहे. कारण राष्ट्रीय सभेंत प्रांतवार मतें घेण्याची वेळ आली असतां तीन महाराष्ट्र मिळून जी मतांची संख्या मिळते ती इतर कोणत्याहि प्रांताच्या तिपटीइतकी नसते. पण मतांच्या बाबतींत अशा रीतीनें थोडासा सूक्ष्म फायदा असला तरी सर्व महाराष्ट्र हा एक प्रांत झाल्यापासून जो फायदा

होईल त्याहून तो खचित अधिक नाहीं. मूळ राज्यघटना होतांना अव्वल इंग्रजींत नागपूर, वऱ्हाड व दक्षिणमहाराष्ट्र हे जर एकाच सरकारच्या अमलाखालीं येते तर काँग्रेसच्या पहिल्याच घटनेंत या सर्वांकरितां मिळून एकच प्रांतिक काँग्रेसकमिटी स्थापन झाली असती व आज महाराष्ट्राचे तीन विभाग जोडून त्याकरितां एक कमिटी स्थापणें हें जसें कित्येकांना चमत्कारिक किंवा धाडसाचें वाटतें, तसेंच उलट एका महाराष्ट्राचे तीन विभाग करून त्याकरितां तीन निरनिराळ्या कमिट्या करण्याची सूचना धाडसाची व उपद्यापी वाटली असती. पण स्वराज्याच्या चळवळींत ज्या अनेक बाबतींमध्यें पूर्वग्रह प्रयत्नानें खोडून टाकावे लागतात त्यांतलीच ही एक आहे. ते खोडून निघण्यास तूर्त दोन उपाय दिसतात. पहिला उपाय सर्व महाराष्ट्राची मिळून महाराष्ट्रीय परिषद वेळोवेळीं भरविणें, व दुसरा सर्व महाराष्ट्राकरितां मिळून एक विद्यापीठ स्थापणें हा होय. पैकीं दुसरी गोष्ट आतां घडून येत आहे, व तिच्या मागोमाग पहिलीहि गोष्ट लवकरच घडून येईल अशी आम्हांस आशा आहे.

कोणत्याहि विद्यापीठाचा हेतु वरिष्ठ प्रतीच्या शिक्षणास मान्यता देणें व द्रव्यबलानुसार अशा शिक्षणाच्या संस्था स्थापणें हा असतो. टिळक विद्यापीठाचा हेतु राष्ट्रीय शिक्षणाची प्रगति करण्याचा असल्यामुळें अशा शिक्षणाला मान्यता देणें व अशा शिक्षणाच्या संस्था स्थापणें या दोनहि गोष्टी त्याला कर्तव्य आहेत. पैकीं दुसरी गोष्ट विशेष खर्चाची असते हें उघड आहे. ती इतकी कीं, हिंदुस्थानांतील सरकारी युनिव्हर्सिट्यांना देखील त्या आज ५० वर्षांवर हयात असतांना व अखंड काम चालवीत असतां तें अद्यापि सर्रास हातीं घेतां आलें नाहीं. कोणत्याहि प्रांतांतील युनिव्हर्सिटीनें स्वतः चालविलेलें असें एकहि कॉलेज नाहीं. अर्ध शतकपर्यंत उदार धनिकांनीं पाडलेला देणग्यांचा पाऊस व दिवसेंदिवस विस्तार पावणाऱ्या विद्यार्थीवर्गानें परीक्षेच्या फीच्या रूपानें त्यांत घातली जाणारी भर, या दोहोंस सरकारकडून पैशाची मदत मिळून त्रिवेणीसंगम झाल्यावरच एखाददुसऱ्या विषयावर व्याख्यानें देण्यास प्रोफेसर नेमण्यांत आले आहेत. कनिष्ठ पदव्या घेतल्यानंतर वरिष्ठ पदव्यांचें शिक्षण देण्याची सोय एका बंगाल्याखेरीज इतर कोठेंहि अजून झालेली नाहीं. भारतमहिला-विद्या-






पीठाला सर विठ्ठलदास यांनीं एकदम सालिना पन्नास हजार रुपये येण्या-एवढी रक्कम देऊं केली, तेव्हांच त्याला आपलें खास असें कॉलेज काढतां आलें. तात्पर्य, टिळकविद्यापीठ आज स्थापन झालें तरी त्याला स्वतःच्या खर्चानें कॉलेज काढतां येणार नाहीं. परंतु स्वतंत्र रीतीनें निघालेल्या कॉलेजांना मान्यता देतां येईल; तसेंच प्राथमिक व दुय्यम प्रतीचें शिक्षण राष्ट्रीय दृष्ट्या कसें असावें हें ठरवून या नवीन पद्धतीची परंपरा सुरू करतां येईल. पण 'विद्या' या शब्दाचा अर्थ हल्लींच्या युनिव्हर्सिटयांतून पुस्तकी ज्ञान व कागदी परीक्षा असा जो संकुचित केला जातो तो अधिक विस्तृत केल्यास पाश्चात्य देशांतील 'युनिव्हर्सिटी एक्स्टेन्शन' पद्धतीनें सामान्य जनतेंत संस्कृति पसरविणें व स्वयंभूहि विद्या जेथें आढळेल तेथें तिला मान्यता देणें, याहि गोष्टी अशा विद्यापीठाला करितां येण्यासारख्या आहेत. चार इंग्रजी व चार संस्कृत ग्रंथकार वाचण्याबाहेर कांहीं विद्या म्हणून आहे असें हल्लींच्या सरकारी विद्यापीठांना वाटत तरी असेल कीं नाहीं कोण जाणे, अशीहि शंका येते. सूक्ष्म दृष्टीनें समाजांत फिरून चवकशी करूं लागलों असतां सरकारी विद्यापीठें बहुमानाच्या ज्या उच्च पदव्या फुकट लब्धप्रतिष्ठ अशा मोठ्या लोकांना देतात, त्या देण्याला स्वयंभू विद्यासंपन्न असे सत्पात्र विद्वान् किती तरी आढळतील. परवां ऑक्सफोर्ड युनिव्हर्सिटीनें राणी मेरी हिला कायदे-पंडित ही पदवी देऊन भूषविलें किंवा त्यापूर्वी इकडील कित्येक राजे-रजवाड्यांना ही पदवी दिली; यापेक्षां त्या पदव्यांचा उपयोग अधिक प्रयोजक रीतीनें खर्चित करतां आला असता. कारण विद्यापीठाची एखादी प्रत्यक्ष परीक्षा उत्तीर्ण होणें यांतच गुणसर्वस्व सांठविलेलें नाहीं ही गोष्ट आजकालच्या पाश्चात्य प्रधानमंडळांत पदवीधर असे किती थोडे लोक असतात यावरून दिसून येईल. त्याच रीतीनें टिळकविद्यापीठाच्या अधिकारस्थानीं महाराष्ट्रांतील सर्व बाजूंनीं श्रेष्ठ असे लोक बसले असतां विद्यापीठाच्या प्रत्यक्ष तोरणाखालून न गेलेल्या अशाहि विद्वानांना म्हणजे कवींना, लेखकांना, वक्त्यांना, चित्रकारांना, शिल्पकारांना, संशोधकांना, गवयांना, पंडितांना, सामुदायिक कार्यवाहकांना, योग्य पदव्या देऊन कसें भूषवितां येईल हें त्यांना सांगावयास नको. आज सरकारी विद्यापीठांतून

अगदीं एकेरी किरण ठराविक दिशेनें पडत असल्यानें त्यांच्या मान्यतेचा प्रकाश फार थोड्या व्यक्तींच्या कपाळावर पडतो, पण हा अन्याय होय. खऱ्या विद्यापीठाच्या मान्यतेचा प्रकाश, गुप्त पोलिसांच्या छुप्या कंदीला-प्रमाणें, ( Pocket Light ) आसपासच्या गहन अंधारांत एकाच वस्तु-वर पडून ती अत्यंत उज्ज्वल अशी भासावी यापेक्षां, सूर्यप्रकाशाप्रमाणें सर्वत्र म्हणजे कानाकोपऱ्यांतहि पसरून त्यांत वस्तुमात्राच्या नैसर्गिक उच्च नीचतेचें स्वभावदर्शन व्हावें हेंच अधिक रास्त आहे. स्वतः लोकमान्य टिळकांनीं आपली गुणग्राहकता जशी सर्व जनतेमध्यें पसरून जेथें जेथें सांपडले तेथें तेथें गुणिजनांना मान्यतेनें भूषविलें.त्याच धोरणाला अनुसरून त्यांचें स्मारक म्हणून स्थापिल्या जाणाऱ्या विद्यापीठानें मान्यतेचा फैलाव केल्यास मोठेंच कार्य होणार आहे. कोणतेंहि नवीन धोरण बनविणें म्हणजे वाहत्या प्रवाहाच्या पाण्यांत नवीन भोवरा निर्माण करणें होय. हा भोवरा निर्माण करण्याला पुष्कळ गति देऊन पाण्यांत क्षोभ उत्पन्न करावा लागतो. त्याचप्रमाणें एकादें नवें विद्यापीठ स्थापून नवी परंपरा पाडणें यालाहि समाजाचें पाणी खळबळून सोडावें लागतें व अशी खळबळ सुरू करण्याचें दिवस आतां आले आहेत हें म्हणणें कोणासहि पटेल.

---

# ४९. पदवीदान-समारंभ

( केसरी, तारीख ४ सप्टेंबर १९२३ )

गेल्या रविवारीं सायंकाळीं टिळक-विद्यापीठाचा दुसरा पदवीदानसमारंभ मोठ्या थाटानें साजरा करण्यांत आला. लोकमान्यांच्या स्मारकाकरितां श्रीजगन्नाथमहाराज यांनीं अर्पण केलेली रम्य व प्रशस्त जागा, पदव्या घेणारे स्वार्थत्यागी व हौशी विद्यार्थी आणि राष्ट्रीय शिक्षणावर प्रेम करणाऱ्या प्रेक्षकांचा समाज या तिहींच्या संमेलनानें समारंभ विशेष आनंद-दायक झाला. कारण 'राष्ट्रीय शिक्षण' हा शद्ब वाच्यार्थानें एकेरी असला तरी त्यांतून स्फूर्तिदायक व हृदयस्पर्शी अशा अनेक भावनांचें अनुरणन मार्मिक मनुष्याच्या मनांत होत असतें. विद्यापीठाचे कुलपति श्रीशंकरा-

चार्य यांनीं आपल्या आशीर्वादरूपी संदेशांत असें म्हटलें आहे कीं, "शंकराचार्यांची गादी व रामदासांचे मठ याप्रमाणेंच विद्यापीठ हाहि एक राष्ट्रकार्याचा मठ होय." सरकारी विद्यापीठाच्या पदवीदान-समारंभाच्या वेळीं तेथील कुलपति किंवा चॅन्सेलर देखील हीच भाषा वापरीत असतात. तथापि उद्देश व सहचारी कल्पना यांच्यामुळें तिचे अर्थ अनेक प्रकारचे होतात, व यांतील कित्येक अर्थ हितसंबंधाच्या दृष्टीनें अगदीं परस्पर-विरोधी असावे असेंहि संभवतें. सर जॉर्ज लॉईड व श्रीशंकराचार्य या दोघांनींहि नवीन पदव्या घेणारांना "देशकार्यकर्ते" व्हा, अशाच शद्बांनीं उपदेश केला तरी परकी गव्हर्नरांचा इष्टार्थ कोणता व श्रीशंकराचार्यांचा इष्टार्थ कोणता याची कल्पना सामान्य बुद्धीच्याहि मनुष्यास करितां येईल.

स्वत: शिक्षणाला मान व महत्त्व मोठें असलें तरी शिक्षण हें एक निव्वळ साधन आहे. साध्य नाहीं. यामुळेंच शिक्षणाच्या प्रकारांत विविधता दिसून येतें. हें एकच कारण अमेरिकेंतील शिक्षण युरोपांतील शिक्षणाहून भिन्न कां व खुद्द हिंदुस्थानांतील सरकारी विद्यापीठें व खाजगी विद्यापीठें यांतील शिक्षण भिन्न कां हें सांगण्यास पुरेसें आहे. सुशिक्षणावांचून कोणालाच आपलें कार्य स्वतः करतां येत नाहीं किंवा तें दुसऱ्याकडून करवून घेतां येत नाहीं. पण सुशिक्षण हें पोलादासारखें असून, तें भट्टींत कमावितांना किंवा यंत्रांत घालून त्याचे निरनिराळे पदार्थ बनवितांना योजकाच्या निरनिराळ्या हेतूंप्रमाणें त्याचा आकार बनविला जातो किंवा त्याला पाणी दिलें जातें. एकाच पोलादाची कांब, पण त्यांतील एक तुकडा कोणी तलवार बनविण्याकरितां कापून घेईल, दुसऱ्याचा कोणी नांगराचा फाळ बनवील व तिसरा कोणी त्यांतून शेंकडों घड्याळांकरितां कमानी तयार करील. उदार या नांवानें उल्लेखिल्या जाणाऱ्या शिक्षणाचीहि तीच गोष्ट आहे. शिक्षण म्हणजे फक्त बुद्धिसंस्कार याहून दुसरें कांहीं नाहीं. पण बुद्धिसंस्काराचें मुख्य द्रव्य किंवा संस्कृतीचा रांधा पुष्कळसा तोच असला तरी, त्या संस्कृतीचा अखेर उपयोग ज्या दृष्टीनें व्हावयाचा त्या दृष्टीनेंच त्याचा आकार, त्याचीं उपांगें, व त्याच्या सहचर उपाधि या निर्माण केल्या जातात. म्हणूनच संस्कृतीच्या मूळ द्रव्यापेक्षांहि या इतर गोष्टींना सहजच एक प्रकारें अधिक महत्त्व प्राप्त होतें.

सरकारी विद्यापीठांतील शिक्षणाचे मुख्य विषय व राष्ट्रीय विद्यापीठांतील शिक्षणाचे मुख्य विषय हे सकृद्दर्शनी प्रायः एकरूपच दिसले तरी, या अवांतर महत्त्वाच्या गोष्टींनींच त्या विषयांच्या शिक्षणापासून उत्पन्न होणाऱ्या मनोरचनेचा नूर बदलत असतो. लिहिणें-वाचणें, अभिजात वाङ्मयाशीं निकट परिचय करणें, निरनिराळ्या विषयांत खोल शिरून त्यांचें सांगोपांग आकलन करणें, दुसऱ्याचे विचार समजून घेण्याप्रमाणें स्वतःचेहि विचार दुसऱ्याच्या मनावर ठसविण्याची पात्रता अंगीं आणणें, यालाच उदार शिक्षण म्हणतात. अर्थात् ती बुद्धीची एक प्रकारें तालीम किंवा कसरत होय. कोणत्याहि आखाड्यांत जोर, उठाबशा, मल्लखांब, कुस्ती, दांडपट्टा वगैरे शरीरमेहनतींचे तेच प्रकार दृष्टीस पडतात. परंतु अशा रीतीनें शरीर कमावणारा तरुण मनुष्य स्वतः त्याच्या किंवा इतरांच्या योजनेनें, एकाद्या सावकाराच्या देवडीवरील पहारेवाला, किंवा पोटभरू पहिलवान, किंवा एखाद्या गोल्डन गँगच्या पदरचा भाडोत्री लाठ्याळ किंवा सरकारच्या लष्करांतील शिपाई, किंवा राष्ट्रीय पथकांतील स्वयंसेवक किंवा एकाद्या मोफत तालमीचा परोपकारी वस्ताद होणार यावरूनच त्याच्या शरीरसंपत्तीचा खरा उपयोग ठरविण्यांत येईल; आणि मेहनतीचे व कसरतीचे प्रकार तेच असले तरी शिक्षक व इतर परिस्थिति यामुळेंच त्यांच्या उपयोगाचा ओघ निरनिराळ्या दिशांनीं वळेल.

सरकारी विद्यापीठाच्या पदवीदानसमारंभाच्या वेळीं चॅन्सेलरसाहेबांची दृष्टि जेव्हां पदवी घेणारांवर पडते तेव्हां त्यांच्या मनांत प्रायः हाच विचार येतो कीं, या तरुण मुलानें सरकारी नोकरींत शिरावें, तेथें मिळेल तें वेतन घेऊन संतुष्ट रहावें, त्याचा गोरा अधिकारी हुकूम फर्मावील तो त्यानें इमानदारीनें पाळावा, व्यक्तिमात्रानें करतां येईल तितका कारभार सुयंत्रित व सुरक्षित करावा, व अशा रीतीनें इंग्रजांचें हिंदुस्थानांतील राज्य व जगावरील साम्राज्य हें सुदृढ, पुष्ट व टिकाऊ होण्यास मदत करावी. याच्या उलट टिळकविद्यापीठासारख्या राष्ट्रीय भावनेच्या विद्यापीठांतील पदवीदानसमारंभाच्या वेळीं कुलपति किंवा कुलगुरु यांची दृष्टि पदवी घेणाऱ्या तरुणांकडे जाते, त्या वेळीं त्यांच्या मनांत कोणच्या प्रकारची विचारपरंपरा चालू असेल ! या मुलानें वाटेल तर उपाशीं मरावें, व जरूर तर सामान्य

मोलमजुरी करून देखील उदरनिर्वाह करावा, पण सरकारी नोकरीची कल्पनाहि मनांत आणूं नये; यानें निर्भय होऊन सरकारी अधिकारी. मग तो कोणी व केवढाहि का असेना, अधिकारदृष्ट्या तुच्छ मानावा; इंग्रज सरकारचें हित तेंच प्रायः आपलें अहित व हिंदुस्थानचें हित तेंच प्रायः इंग्रजांचें अहित हा स्वाभाविक व दुस्तर विरोध निरंतर लक्षांत ठेवून क्षणशः व कणशः या विरोधांत स्वदेशाचें हित साधावें व त्याकरितां इंग्रजांचें अहित चिंतण्यास किंवा आचरण्यासहि कसूर करूं नये; सरकारी नोकर होऊन राज्ययंत्राचा राखणदार स्वतः तर बनूंच नये, पण हिंदी लोकांना स्वराज्य मिळावें म्हणून दुसऱ्याच्या हातीं असलेलें राज्ययंत्रहि शक्य तेथवर सुरक्षित व सुरळित राहूं नये असाच प्रयत्न करावा; भावी महत्त्वाकांक्षेचा पाया म्हणून आपल्या पात्रतेप्रमाणें द्रव्यबल मिळेल तितकें मिळवून होईल तितका ओला स्वार्थत्याग करावा; अधिकारी व प्रजाजन यांच्या दरम्यान जेथें जेथें अन्यायाचें झुंज चाललेलें दिसेल तेथें तेथें उडी टाकून आपल्या शक्तीप्रमाणें स्वकीयांची न्यायाची बाजू उचलून धरावी. स्वराज्याकरितां जरूर तर साम्राज्यास धोका देण्याचे विचारहि याच्या मनांत खेळावेत; व निर्वाणीचे प्रसंग थोडे येत असले तरी अशा प्रसंगांत त्यानें आपली आहुतिहि द्यावी, पण स्वकीयांचेंच हित साधावें, अशी अपेक्षा हा पदवी देणारा या पदवी घेणाराकडून करीत असेल यांत काय संशय ?

भाषा, इतिहास, गणित, अर्थशास्त्र, पदार्थविज्ञान, व्यापार, यंत्रकला या गोष्टी यथाद्रव्यशक्ति त्याच शिकवावयाच्या; पण शिकविणारा व शिकणारा यांच्या मूल हेतूनेंच त्या शिक्षणाला अखेरचें पाणी मिळत असतें. राष्ट्रीय विद्यापीठांतील झालें म्हणून कांहीं गणितांत दोन व दोन यांची बेरीज पांच होऊं शकणार नाहीं. भूमितींतील वर्तुळाच्या जागेंत त्रिकोण बरोबर बसतो असें होणार नाहीं, वाङ्मय—शिक्षणांत कालिदासाच्या शकुंतलेला दुष्यंत किंवा उपवनाला तपोवन म्हणतां येणार नाहीं. शेक्सपियरचा आयागो हा साधु किंवा अथेल्लो हा शहाणा विवेकी ठरवितां येणार नाहीं. इतिहासांत प्लासीची बॅटल्र्ह होणार नाहीं. भूगोलांत जिब्राल्टर मुंबई बंदरांत येणार नाहीं. धर्मशिक्षणांत बायबल हें गीता ठरणार नाहीं, किंवा स्मृतिशास्त्रांतील निषेध विधिपर लावतां येणार नाहींत. व्यापारी शिक्षणां-

तील रोजकीर्दीत खर्चापेक्षां जमा अधिक असल्याखेरीज शिल्लक उरते असें शिकवितां येणार नाहीं. ज्योतिषांत पृथ्वी सूर्यापेक्षां मोठी ठरवितां येणार नाहीं. पदार्थविज्ञान राष्ट्रीय झालें म्हणून त्यांत क्रियेपेक्षां प्रतिक्रिया लहान-मोठी होते, किंवा स्वरूपनाश हा आत्यंतिक द्रव्यनाश ठरतो असें शिकवितां येणार नाहीं. हें सर्व खरें. तथापि ज्ञान तेंच व मन विकसित करण्याचा त्याचा परिणाम तोच असला तरी सरकारी विद्यापीठांतून बाहेर पडणारा पदवीधर व हा हे पुष्कळ वेळां वेगवेगळ्या दिशेनेंच चालूं लागल्याचें आढळतील यांत शंका नाहीं. शिक्षणक्रम तोच असतांहि आमचें कॉलेज हें कांहीं डेक्कन कॉलेज नाहीं असें म्हणण्यांत फर्ग्युसन कॉलेजच्या अधिकाऱ्यांना जर यथार्थता वाटूं शकते, न्यू पूना कॉलेजच्या लोकांना आमचें कॉलेज म्हणजे कांहीं फर्ग्युसन कॉलेज नव्हे असें जर अभिमानपूर्वक व सयुक्तिकपणें म्हणतां येतेंच, तर तितक्या प्रमाणेंच का होईना, टिळक-विद्यापीठ हें कांहीं सरकारी किंवा निमसरकारी विद्यापीठ नव्हे असें, परवां वाङ्मयविशारद ही पदवी घेतलेल्या पदवीधरांनाहि नुसतें अभिमानानेंच नव्हे तर यथार्थतेनेंहि म्हणतां येणार आहे. कारण राष्ट्रीय शिक्षण हा शिक्षणापेक्षांहि अधिकाराचाच प्रश्न अधिक आहे व हा अधिकारहि निवळ पोकळ स्वातंत्र्याच्या इच्छेचा नसून आपणाकडून शिक्षण व पदवी घेणाऱ्या विद्यार्थ्यांच्या बुद्धीचा व क्रियेचा ओघ तावडतोब कोणीकडे वळवावा या दृष्टीनेंच महत्त्वाचा ठरतो.

सरकारी विद्यापीठ व राष्ट्रीय विद्यापीठ यांतील विरोध एकाच शहरांतील दोन आखाड्यांच्या स्पर्धेसारखा सहेतुक व स्वाभिमानमूलकच आहे. सरकारी विद्यापीठांत किंवा शिक्षणसंस्थांत फाजील गर्दी झाली ती कशी तरी मोडण्याकरितांच केवळ राष्ट्रीय विद्यापीठ किंवा टिळकविद्यालय अशांची स्थापना नाहीं. निराळ्या प्रकारची पदवीधरपरंपरा निर्माण करण्याचा हेतु नसेल, किंवा तो हेतु असूनहि विफलच होणार असेल, तर राष्ट्रीय शिक्षणाचें वेगळें कॉलेज किंवा विद्यापीठ काढण्याचा प्रयत्न हा निवळ उपद्व्यापच ठरेल. पण खरा प्रकार तसा नाहीं. बलाबलाची तुलना करितांना एकीकडे सर्व देशभर पर्वतप्राय पसरलेला सरकारी विद्यापीठांच्या पदवीधरांचा सांप्रदाय, दुसरीकडे तळहाताएवढ्या लहानशा दिसणाऱ्या राष्ट्रीय

शिक्षणसंस्थांचा क्षुद्र उपक्रम, असा विरोध पाहून अदूरदर्शी लोक निराशा पावोत; परंतु एका सुप्रसिद्ध कविवचनाप्रमाणें, पुढें आकाश भरून टाकणारा मेघसमुदाय प्रारंभीं तळहातासारख्या लहानशा चकतीएवढाच असतो. आतां राष्ट्रीय शिक्षणाचा प्रसार सर्व शिक्षण-संस्था पुढें केव्हां तरी खासगी स्वरूपाच्या बनूनच होणार असें नाहीं. देशांत जोंपर्यंत सरकार आहे व सरकारचें आश्रित आहेत, तोंपर्यंत शिक्षणसंस्था या सरकारी व निमसरकारी अशा पुष्कळशा राहणारच. पण अशा संस्थांना आज मान्यतेचा असा कोणीच प्रतिस्पर्धी नाहीं ही जी खेदकारक स्थिति ती मात्र यापुढें फार दिवस टिकणार नाहीं. कदाचित् मुंबईचें सरकारी विद्यापीठ हेंच पुढेंमागें बहुतांशीं लोकनियुक्त होऊन, शिक्षणमंत्री हा जो आज सरकारच्या बाहुल्याप्रमाणें नाचलेला दिसतो तोच उद्यां कायदे-कौन्सिलच्या पाठबळामुळें अरेराव बनून लोकमताचें प्रतिबिंब सरकारी युनिव्हर्सिटींत पाडूंहि शकेल. तथापि ही इष्ट गोष्टहि लवकर घडून यावी, ती घडून आल्यानंतरहि ज्यांना सरकारी विद्यापीठांत अनेक कारणांनीं स्थान मिळूं शकत नाहीं अशा विद्वानांचा एकादा सुदृढ संघ बनावा, व त्याच्या सांप्रदायाचें महाराष्ट्रभर जाळें लवकरच पसरावें हाच टिळक-विद्यापीठाच्या चालकांचा मुख्य हेतु आहे.

राष्ट्रीय शिक्षणाची कुस्ती ही मान्यता मिळविण्याची कुस्ती आहे. आणि देशांतील स्वतंत्र विचाराचे विद्वान्, मग ते कोणत्याहि शास्त्रांत किंवा कलेंत निष्णात झालेले असोत, त्यांनीं एकजुटीनें कार्य केल्यास सरकारी विद्यापीठाला योग्य प्रतिस्पर्धी असा विद्वत्संघ निर्माण होण्याला व सांप्रदाय बनण्याला अडचण पडणार नाहीं. हें कार्य एकजुटीनें होत नाहीं म्हणूनच केवळ, आपण सरकारबहिष्कृत एवढ्याचकरतां नादान, टाकाऊ, कमकुवत अशी जी एक घातक बुद्धि विद्येच्या क्षेत्रांत उत्पन्न झालेली आहे ती निघून जाऊन, उलट आम्ही संघ बनवूं तर सरकारी विद्यापीठालाहि मान्यतेंत कालांतरानें खालीं पहावयास लावूं अशी बुद्धि व तत्सिद्ध्यर्थ प्रयत्न होणें हीच काय ती आज मुष्किलीची गोष्ट होऊन बसली आहे. इतर सर्व कांहीं सोपें आहे असें आम्हांस वाटतें. ही बुद्धि कोठें व कशी उत्पन्न करतां येईल हा खरोखरच आज लोकांपुढें मांडण्याला

अत्यंत योग्य असा विषय आहे; व सवडीनुसार राष्ट्रीय शिक्षणाच्या विषयाचें या दृष्टीनें विवेचन करण्याचा आमचा विचारहि आहे.

---

## ५०. पुण्यांतील विद्यार्थ्यांची सभा

( केसरी, तारीख २५ जानेवारी सन १९२१ )

रविवार ता. २३ रोजीं सायंकाळीं सहा वाजतां श्रीशिवाजीमंदिराच्या मैदानांत पुण्यांतील विद्यार्थ्यांची सभा भरली होती. सभेस पुष्कळ सद्‌गृहस्थ व दोनतीन हजार विद्यार्थी हजर होते. न. चिं. केळकर यांचीं अध्यक्षस्थानीं योजना झाली. प्रास्ताविक भाषण करतांना केळकर यांनीं ही सभा भाषणें करण्याकरितां बोलावलेली नसून, प्रत्यक्ष कृति करण्याचा निश्चय करण्याकरितां बोलावली आहे असें सांगून ज्या विद्यार्थ्यांना बोलावयाचें असेल त्यांनीं बोलावें असें सांगितलें. न्यू इंग्लिश स्कूलचे कान्हेरे यांनीं आपण आजपासून शाळा सोडली असून पुढारी सांगतील तें काम करण्यास तयार आहों असें सांगितलें. बेलापूरकर, बेलसरे व परांजपे या विद्यार्थ्यांनीं आपण पूर्वींच कॉलेज सोडल्याचें जाहीर करून महाराष्ट्राची उज्ज्वल परंपरा राखण्याची विद्यार्थ्यांना विनंति केली. भिडे यांनीं इंग्रजीमध्यें व रबडे, दातार व दीक्षित यांनीं मराठीमध्यें आपणहि कॉलेज सोडल्याचें सांगून प्रथम विद्यार्थ्यांनीं कोणाचीच वाट न पाहतां स्वार्थत्याग कां करावा हें सांगितलें. यानंतर अध्यक्षांनीं कोणा विद्यार्थ्यांस उलट बोलावयाचें असल्यास बोलावें व त्यांचें भाषण सर्व मंडळींनीं अगदीं शांतपणें ऐकून घ्यावें अशी विनंति केली. शहा यांनीं विद्यार्थ्यांना शाळा व कॉलेजें सोडण्यास सांगणें अनुचित असून त्यांत विद्यार्थ्यांचें नुकसान आहे असें उलट बाजूनें प्रतिपादन केलें. यानंतर म्हैसूरकर, रा. दा. देसाई, घारपुरे, फडके, दा. वि. गोखले याचीं कळकळीचीं भाषणें झालीं. अध्यक्ष या नात्यानें भाषण करतांना केळकर म्हणाले:—

" कलकत्त्याच्या राष्ट्रीय सभेहून जास्त समाधानकारक व पक्का असा ठराव नागपूरच्या राष्ट्रीय सभेनें केला आहे. " जो Conscience ला

स्मरून आपल्या बळावर कॉलेज सोडील त्याला मी डोक्यावर घेऊन नाचेन " असें मी पूर्वी एका सभेंत सांगितलें होतें. 'Conscience' या महत्त्वाच्या शब्दानें राष्ट्रीय सभेनें आपल्या ठरावांत बदल केला असून, १६ वर्षांवरील प्रौढ विद्यार्थ्यांनीं एक वर्ष जरी कॉलेज सोडलें तरी हा स्वार्थ-त्याग राष्ट्राला मंजूर आहे, असें तिनें सांगितलें आहे. आतां मात्र परीक्षा तुमची आहे. दास, भोपटकर वगैरे पहिल्या प्रतीच्या वकिलांनीं स्वार्थत्याग करून दाखविल्याकारणानें वकीलवर्गाकडेहि बोट दाखविण्यास जागा नाहीं. कॉलेज सोडल्यानें कोणीहि फुकट मरत नाहीं. ज्यांना शिकावयाचें आहे त्यांच्याकरितां कॉलेजें आहेत. माझ्या अंगीं ' सावधपणानें बोलतों ' असा दोष आहे खरा. पण अविचाराच्या दोषापेक्षां जबाबदार पुढारी या नात्यानें मला सावधपणाचा दोष पत्करेल. ' सार्वजनिक सभेंत ' मीं माझें मत सांगितलें नाहीं, असा माझ्यावर आरोप आहे! माझें मत तुम्हांस पाहिजे का ? त्याच वेळेला सभेंत बोलण्याच्या आधीं मीं माझीं मुलें शाळांतून काढून प्रत्यक्ष उदाहरणानें माझें मत काय तें सांगितलें होतें. त्या वेळेला तुम्ही माझ्या सावधगिरीला हंसलांत, कीं मी फक्त १०० मुलांची शाळा काढणार. पण आतां हंसणारांचेच दांत दिसत आहेत. कारण अद्याप १०० मुलेंहि आलीं नाहींत ! केळकर आमची सोय करावयाला तयार नाहींत अशा तक्रारी कित्येकांनीं गांधींकडे केल्या आहेत ! पण मी या चहाड-खोरांना विचारतों कीं, आतां असें पुढें या, व मी विचारतों या प्रश्नांचा जाब द्या. ज्यांना माझ्या शब्दांकरितां आडकाठी असेल त्यांना मी स्वच्छ सांगतों कीं, मी घरावर तुळशीपत्र ठेवीन, भीक मागेन पण तुमची सोय लावण्याचा शक्य तो प्रयत्न करीन. पण नक्की करीनच असें सांगत नाहीं, कारण मी 'सावध' असा दोषारोप तुम्हीच करतां ! पण मध्यंतरीं मुलांना सरसकट कॉलेजें सोडण्याला सांगण्यापूर्वी येथील न्यू पूना कॉलेजला मीं असें विचारलें होतें कीं, " १२ हजार रु. ची तुम्हांस तूट येते. मी तीन लक्ष रुपये म्हणजे सालिना १८ हजार तुम्हांस मिळण्याची हमी घेतों. तुमचें कॉलेज राष्ट्रीय करतां काय ?" त्यांनीं तुम्हां विद्यार्थ्यांवरच अविश्वास व्यक्त करून असें म्हटलें कीं, "संस्था राष्ट्रीय केली तरी ५०० मुलें राहतील यांची हमी काय?" याची लाज तुम्हांला पाहिजे. राष्ट्राचे भावी आधारस्तंभ

असा इतके दिवस स्तुतीचा खुराक खाल्लात. आतां परीक्षेची वेळ आहे, पुढें कोण येतां ते या. डेक्कन कॉलेजांतील विद्यार्थ्यांप्रमाणें श्रीमंत असलात, व शिक्षण घ्यावयाचें नाहीं म्हटलेंत तरी तुमच्या राष्ट्रीय मताकडे पाहून आईबाप हरकत घेणार नाहींत. गरीब असून धंदा कसा करूं म्हटलेंत, तरी खेड्यापाड्यांत पुष्कळ काम आहे. एक खेडें जरूर एका माणसास आनंदानें पोशील. आम्हीहि शक्य तितकी त्याला मदत करूं. ज्याला एवढीहि धमक नाहीं व खेड्यांत काम करून आपलें पोटहि भरतां येणार नाहीं, तो कसला राष्ट्राचा आधार ! ज्यांना शिकावयाचें आहे त्यांच्याकरितां कॉलेज आहे. पूर्वी तुम्ही माझ्या सावधगिरीची परीक्षा पाहिली; आतां मी तुमच्या तडफेची परीक्षा पाहतों."

---

# ५१. शिक्षणावरील बहिष्कार

## ( शिवमंदिरांतील सभा )

नागपूरच्या कॉंग्रेसनंतर तारीख १ फेब्रुवारी १९२१ रोजीं शिवाजी मंदिरांत केळकर यांच्या अध्यक्षतेखालीं शिक्षण-बहिष्कार-विषयक सभा झाली. व्याख्याते हे गुजराथेकडील असून बहिष्काराचा प्रचार करण्याकरितां इकडे आले होते. याच वेळीं टिळकमहाविद्यालय नुकतेंच निघालें असून बहिष्काराची चळवळ जोरांत होती; व मुलांनीं भराभर शाळा व कॉलेजें सोडावीं याकरितां प्रो० फडके, घारपुरे, देव वगैरे व्याख्यात्यांची व्याख्यानें गांवांत होत होतीं. विद्यार्थ्यांतर्फेहि यासंबंधीं बरीच खटपट होत असून कित्येक स्वतः शाळा सोडून इतरांस उपदेश करीत, तर कित्येक बहाद्दर असे होते कीं, स्वतः कॉलेजें न सोडतांच इतरांस फूस देऊन त्यांच्या याद्या सभेंत वाचून दाखविण्याचा त्यांचा उपक्रम चालू होता ! इतर उत्साही उपदेशक व केळकर यांच्यामध्यें कार्याच्या पद्धतीसंबंधानें एक तीव्र मतभेद होता. तो हाच कीं, कॉलेज सोडावयास सांगतांना विवेचकबुद्धि जरूर चालविली पाहिजे असें केळकर यांचें मत होतें.

इतरांच्या मतें पुढाऱ्यानें सर्वांस सरसकट कॉलेज सोडण्याचा जाहीर उपदेश केलाच पाहिजे व असा उपदेश केळकर यांनीं करावा असा त्यांचा आग्रह होता.

व्याख्यात्यांचें व्याख्यान चांगलें सुश्राव्य झालें. त्यानंतरहि कांहीं किरकोळ भाषणें झाल्यावर 'ऑनर्स लिस्ट' प्रमाणें ज्यांनीं कॉलेज सोडल्याचा शुभ संकल्प जाहीर केला त्यांची यादी नेहमींप्रमाणें घाणेकर हे विद्यार्थी वाचून दाखवूं लागले. पण हेंच काम करतांना पुढें आडवाटेंत शिरून त्याच दिवशीच्या केसरीवर त्यांनीं भाष्य करावयास सुरुवात केली. केसरीचा त्या दिवशीचा अग्रलेख बहिष्कारविषयक होता; पण ज्यांना त्यांतील धोरण नापसंत होतें त्यांनीं सत्प्रवृत्तीनें का होईना, पण थोडया अविचारानेंच संध्याकाळच्या जाहीर सभेंत वेगळ्या तऱ्हेचा उपदेश करण्याची केळकर यांस निकड लावली. केळकर यांनीं तें मनावर घेतलें नाहीं, तेव्हां योग्य मर्यादा ओलांडून घाणेकर हे केसरीच्या वाक्यांनीं उत्पन्न झालेला गैरसमज (?) दूर करूं लागले! तेव्हां मात्र केळकर यांनीं उठून घाणेकर यांस रागानें विचारलें, "काहो, मी येथें असतां तुम्ही माझ्याबद्दल कां बोलतां? गैरसमज असल्यास एकादा विचारील. मी उत्तर द्यावयाला येथें हजर आहे. तुम्हाला हा 'अव्यापारेषुव्यापार' सांगितला कोणीं? गैरसमज होता कशावरून? नसला तर तुमच्या या कृत्यानें तो पसरावयाचा मात्र!"

असो. मला कांहीं विशेष बोलावयाचें नाहीं. पण आजच्या एका गोष्टीनें मी कावराबावरा झालों खरा. त्याबद्दल मी आपणांला एकदां स्वच्छ सांगतों. घाणेकर यांनीं अमुक बोला म्हणून मला सकाळीं सांगितलें. पण काय लिहावयाचें व काय बोलावयाचें हें मला त्यांच्यापेक्षां चांगलें समजतें. तुम्हांला वाटत असेल, कीं टिळक गेल्यामुळें ही नगरी गतधवा झाली तर तुमच्याप्रमाणें मीहि तसें म्हणण्यास तयार आहे. मी मला तुमचा पुढारी असें मानीत नाहीं. किंबहुना ज्याच्या अंगांत सामर्थ्य असेल त्यानें खुशाल हें असलें पुढारीपण पतकरावें. त्याला माझी ना नाहीं. मी आनंदानें त्याचा अनुयायी होईन. त्यांत मला बिलकूल असंतोष किंवा असमाधान नाहीं. ओघासच आलें म्हणून सांगतों कीं, मी पहिल्यापासून हिंमतीपेक्षांहि दोन शब्द कमीच बोलणारा आहे. लोकांस वाटेल तसें मला बोलतां येत नाहीं. पुढारी झाला तरी त्यालासुद्धां बोलण्यास मर्यादा

आहेच. त्यानें वाटेल तें सांगितलें तरी चालतें असें कोणास वाटत असेल, मला तसें वाटत नाहीं. तुम्हांला जर टिळकांच्या नांवाबद्दल एवढें प्रेम वाटतें तर तुम्हीं कॉलेज सोडावयाचें होतें त्यांच्याकरितां; यांत पुण्याचें नांव जातें असें जर तुम्हांला वाटत होतें तर आपण होऊनच कां सोडलें नाहींत कॉलेज? हा ज्याचा त्याचा व्यक्तिशः प्रश्न आहे. यांत कांहीं प्रांतिक अभिमानाचा किंवा पुढाऱ्याच्या नांवाचा प्रश्न नाहीं.

आजचे व्याख्याते माझ्याकडे दुपारीं आले त्यावेळीं मी क्षणभर निजलों होतों. आल्याबरोबर त्यांनीं मला पहिला प्रश्न विचारला तो असा कीं, ' महाराष्ट्रांत जागृति दिसत नाहीं! ' मला त्यावेळीं थोडा रागच आला. मीं म्हटलें, 'होय नाहीं खरीच. कारण त्या वेळेला मी निजलों होतों!' नंतर मीं त्यांना विचारिलें कीं, 'महाराष्ट्राचें एकवेळ असो; पण तुमच्या गुजराथेंत कसें काय आहे?' तेव्हां त्यांना झकत कबूल करावें लागलें कीं, तेथें महाराष्ट्रापेक्षांहि कमी मुलें शाळेंतून निघालीं आहेत! आणि तेथें तर स्वतः गांधीच जातीनें हजर आहेत! हें आतां कसें काय तें तुम्हीच पाहून घ्या. मी मुलांना मुद्दामच सांगत नाहीं. जेथें गांधींनीं स्वतः सांगून परिणाम होत नाहीं तेथें मी सांगून होईल ही समजूत चुकीची आहे. आम्हीं बोलावें आणि मुलांनीं निमूट ऐकावें अशी स्थिति असती तर वेगळी गोष्ट होती. पण मुलांचा स्वभाव कसा असतो तें मला माहीत आहे. कित्येक मुलें तर आमची केवळ परीक्षा घ्यावयाला येतात. मग आम्हीं तरी सावधगिरीनें कां बोलूं नये? माझ्या कामगिरीची व टिळकांची कित्येक तुलना करतात. टिळक असते तर यापेक्षां अर्थातच जास्त काम झालें असतें हें उघड आहे. टिळकांपेक्षां माझें काम कमी, असें कोणास वाटल्यास त्यांत वावगें तरी काय आहे? बरोबरच आहे. मी जितका टिळकांपेक्षां लहान तितकें माझें काम कमी. हा तरी हिशेबच आहे. पण माझी खात्री आहे कीं, स्वतः टिळकांनीं सांगूनहि तुम्हीं कॉलेज सोडलें नसतें. ते स्वतः याबद्दल काय म्हणत तें मला माहीत आहे. रेमार्केटांत एकदां लोकांनीं त्यांचा सन्मान केला, तेव्हां त्यांनीं लोकांना स्वच्छ बजावलें कीं, आतां माळा घालाल पण नंतर कामाला मात्र कोणीहि राहणार नाहीं!

मला रडतराव घोड्यावर बसवावयास नको आहेत. डेक्कन कॉलेजच्या

विद्यार्थ्यांना तर स्वतः कांहीं न करतां दुसऱ्याची परीक्षा पहावयास हवी. पण कोण कसा काय आहे हें मी जाणून आहें. मीं या डेक्कन कॉलेजच्या विद्यार्थ्यांना सांगितलें कीं, खुशाल तुम्ही सर्व सरसकट कॉलेज सोडा. पाहूं या, पुढच्या टर्मच्या सुरवातीला तुम्हांपैकीं कॉलेजांत कोणींहि हजर राहूं नये. पण त्यांच्या हातून हें झालें नाहीं. चैन करून चटावलेल्या या विद्यार्थ्यांना हें अशक्य होतें हें मी जाणून आहें. पण हेच विद्यार्थी कॉलेज स्वतः न सोडतां फुकट आमची परीक्षा मात्र पहावयाला येणार! मग आम्हीं तरी सावधगिरीन कां बोलूं नये? सर्व विद्यार्थ्यांस सरसकट कॉलेज सोडा म्हणून सांगणें माझ्या हातून होणार नाहीं. विद्यार्थ्यांच्याबद्दल माझ्या मनांत एक प्रकारचें प्रेम आहे. त्यामुळें माझ्यानें त्यांना कॉलेज सोडा असें सांगवत नाहीं! विवेचकबुद्धि अंगीकारूनच येथें वागलें पाहिजे. आज माझ्याकडे दोन विद्यार्थी आले; तेव्हां अगोदर मीं त्यांची परिस्थिति विचारली व नंतर एकाला कॉलेज सोड व दुसऱ्याला कॉलेज सोडूं नको असें सांगितलें. कित्येक म्हणतात कीं, आम्ही 'व्हिलेज् प्रापोगँडा' करूं; पण कांहीं नाहीं म्हटलें तरी त्यांची तरी कांहीं सोय केली पाहिजेच ना? परवां मीं बमनजी शेटजीकडे जाऊन याकरितांच भीक मागितली व दहा हजार रुपये आणले; पण असे पैसे मिळवून किती पुरणार? एक हजार रुपयांत फार तर तीन विद्यार्थ्यांची सोय करतां येईल. म्हणूनच खेडोंपाडीं चळवळ करण्यास मुलें पाठविण्याची कल्पना अव्यवहार्य आहे. म्हणून मी तुम्हांला स्पष्ट सांगतों कीं, विद्यार्थ्यांची शक्य तितकी सोय करण्याचा प्रयत्न आम्ही जिवापाड करूं; पण सर्वांची सोय आमच्याकडून होईलच असें मी तुम्हांस सांगत नाहीं. कॉलेज सोडणारानें तें आपल्या मगदुरावर सोडावें; यापेक्षां त्यानें मुळींच सोडलें नाहीं तरी मला त्याची फिकीर नाहीं. तुम्हांस त्यागाचा सरसकट उपदेश करण्याची पात्रता माझ्यांत नाहीं. फक्त, ज्यांनीं सर्वस्वाचा त्याग केला आहे त्या गांधींनाच तेवढी आहे. मी स्वतःच्या घरावर तुळशीपत्र ठेविलें नाहीं तोंपर्यंत सर्वांना सरसकट त्यागाचा उपदेश करण्यास मी अपात्र आहें, असें वाटल्यास म्हणा.

आजच्या व्याख्यात्यांनीं एक गोष्ट अगदीं खरी सांगितली. ती म्हणजे स्वावलंबीपणा. हा सर्व स्वार्थत्यागाचा मामला आहे. ज्याला स्वार्थत्याग

करावयाचा त्यानें तो स्वतःच्या हिंमतीवर करावा; परिणामाचे धनी आपण या बुद्धीनें करावा. अशा बाबतींत कोणीं कोणास सल्ला देऊं नये. कोणास कोणीं काय करूं म्हणून विचारण्यास जाऊं नये. स्वार्थत्याग हा ज्याचा त्यानें करावयाचा असतो. जें करावयाचें तें ज्याचें त्यानें आपल्या जबाबदारीवर आजूबाजूस न पाहतां, पुढील परिणामाबद्दल कुरकूर न करतां, आणि तें सुद्धां स्वतःला वाटलें म्हणून करावें. लोकांनीं सांगितला म्हणून स्वार्थत्याग करूं नये. अशा रीतीनें स्वार्थत्याग करणाऱ्याला एकान्तांत असतांना स्वतःच्या समाधानाचें तरी सुख मिळेल. स्वतःच्या मनाचें बक्षीस हेंच खरें बक्षीस होय. कोणाच्या सांगण्याची तुम्ही वाट कां पाहतां? माझ्या तोंडून माझ्या हिंमतीपेक्षां जास्त उपदेश तुम्हांला मिळणें शक्य नाहीं. उलट मी तुम्हांला स्पार्टामधील एका शिपायाची गोष्ट सांगतो. इतर शिपायांबरोबर याहि स्पार्टन शिपायाला तलवार देण्यांत आली. पण याची तलवार इतरांपेक्षां वीतभर कमी होती म्हणून हा कुरकुरूं लागतांच त्याच्या कमांडरनें त्याला सांगितलें, "अरे, तुझी तलवार एक वीतभर कमी आहे, तर तूं वीतभर पाऊल पुढें टाक!" तसेंच मीहि तुम्हांला सांगतों कीं, माझा उपदेश अपेक्षेपेक्षां वीतभर कमी पडला तर तुम्ही पाऊल एक वीत पुढें टाका म्हणजे झालें!

स्वार्थत्याग करणाराला उपदेशाचीच जरूर आहे असें नाहीं. आणि खरा स्वार्थत्याग करणारा कोणाच्या उपदेशाची वाटहि पहात नाहीं. पण ज्यांना कांहींच करावयाचें नसतें ते दुसऱ्याला विचारतात! कलकत्त्याच्या काँग्रेसच्या ठरावांत विशिष्ट वर्गांचाच निर्देश असल्यामुळें इतरांना आधार घेण्यास सवड तरी होती. पण सर्व वर्गांनीं स्वार्थत्याग करण्याबद्दलचें कलम घालून नागपूरच्या काँग्रेसनें त्यांचा हा आधार काढून घेतला आहे. नागपुरास गांधींशीं भांडून ही दुरुस्ती मी मुद्दाम करून घेतली. या ठरावानें सर्व वर्गांना स्वार्थ-त्याग करण्यास आव्हान केलें आहे. दुसऱ्याकडे पहावयाची आतां सोय नाहीं.

ज्यांना स्वतः कांहींच करावयाचें नसतें ते दुसऱ्यास विचारण्यास जातात; पण दुसऱ्याचा सल्ला विचारणें किंवा आधीं इतर वर्ग काय काय करतात याची रिकामटेकडी चौकशी करणें हा नुसता चावटपणा आहे. आगींत उडी घालावयाची ती दुसऱ्याला बरोबर घेऊन घालूं म्हणण्यांत काय हंशील? दुसरीकडे पाहील तो स्वार्थत्याग करण्यास नालायक. महाभारतांतील या-

विषयींची गोष्ट प्रसिद्ध आहे. द्रोणांनीं सर्व शिष्यांची धनुर्विद्येंत परीक्षा घेण्याचें ठरविलें. प्रथम युधिष्ठिर धनुष्यबाण घेऊन पुढें आला. द्रोणांनीं त्याला विचारलें, तुला काय काय दिसतें? युधिष्ठिरानें उत्तर केलें मला येथें बसलेले तुम्ही सर्वजण दिसतां. द्रोणानें सांगितलें, तूं नालायक आहेस; धनुष्यबाण खालीं ठेव. याप्रमाणेंच इतरांचीहि काय काय ती परीक्षा झाली. अर्जुनाला द्रोणांनीं विचारलें, तुला काय दिसतें? अर्जुनानें उत्तर केलें, 'मला फक्त माझ्या बाणाचें टोंक आणि झाडावरील पक्ष्याचें डोकें यां-खेरीज दुसरें कांहींहि दिसत नाहीं.' अर्थात् या परीक्षेस एकटा अर्जुनच उतरला. स्वार्थत्यागी माणसानेंहि असेंच करावें. स्वार्थत्यागाशिवाय दुसरें कांहींएक मनांत आणलें नाहीं, त्याचा स्वार्थत्याग खरा!

यासंबंधानें मी तुम्हांला ग्रीक इतिहासांतील आणखी दुसरी एक गोष्ट सांगतों. एकदां ग्रीसमध्यें एक मोठा धरणीकंप होऊन शहराच्या मध्यभागींच एक मोठा खोल खड्डा पडला. इतका कीं, वरून पाहिलें तर त्याच्या तळापर्यंत नजरहि पोंचत नसे. अर्थातच हा अनर्थ ईश्वराचा कोप झाला म्हणूनच उद्भवला असें लोकांनीं मानलें. आतां परमेश्वराच्या कोपाची शान्ति ही केलीच पाहिजे. ती कशानें होईल म्हणून सध्यांच्या काळीं पुढाऱ्याचा सल्ला घेतात त्याप्रमाणें त्या वेळीं देवाला कौल मागितला. तेव्हां अशी आकाशवाणी झाली कीं, आपणाला जें प्रिय त्याचा या वेळीं कोणीं बळी दिला तर देवतांचा हा कोप शांत होईल व खड्डा भरून येईल. त्याप्रमाणें जो तो विचारपूस करूं लागला. नंतर सर्व लोक त्या खड्ड्या-जवळ जमले. त्यांत कोणी व्यापारी होते. त्यांपैकीं एक शेठजी विचार करूं लागले कीं, आपण काय केलें असतां हा खड्डा भरून येईल? त्याचा मुनीम जवळच होता तो म्हणाला, होय, आपल्या येथें असलेली ती धर्मादायाची पेटी नव्हे का? त्यांत बराच धर्मादायाचा पैसा सांचून राहिला असेल. फार तर त्या रकमेचें व्याज काढून घेऊन आपण ही पेटी आंत टाकून देऊं म्हणजे कदाचित् हा खड्डा भरून येईल. शेटजींनाहि हा सल्ला पसंत पडला व त्यांनीं मुनीमाकडून पेटी आंत टाकवली. पण खड्डा जशाचा तसाच कायम राहिला.

कांठावरच्या गर्दींत कांहीं स्त्रियाहि जमल्या होत्या. एकीनें विचार केला

आपण कोठली प्रिय वस्तु टाकली तर हा खड्डा भरून येईल बर ? तिची दुसरी मैत्रीण शेजारीच होती. ती म्हणाली, स्त्रियांना अत्यंत प्रिय वस्तु म्हणजे त्यांचें मुखकमल. पण मुखकमलच कस टाकून देणार ? तेव्हां पहिलीनें विचार केला, मुखकमलाखालोखाल स्त्रियांना त्यांचे कुरळ कुंतल फार आवडतात. तेव्हां बाजूकडेचा एक कुंतल तोडून टाकून दिला म्हणजे झालें. हा विचार पटून तिनें आपला एक केंस खड्डयांत टाकला ! पण खड्डा कायमच राहिला !

हा प्रकार होत आहे तों त्यांत एक वर्तमानपत्राचे संपादक होते त्यांसहि त्यावेळीं स्वार्थत्याग करण्याची बुद्धि झाली. पण वर्तमानपत्राचा संपादक मॅनेजराचा सल्ला घेतल्याशिवाय काय करणार ? संपादक म्हणाले, काढा, तुमच्या खतावण्या. त्यांतील जाहिरातींचीं बिलें येतच नाहींत. पैसे येतील तेव्हां या बिलांच्या कागदांना किंमत. तेव्हां त्या खतावण्या व हीं बिलें हींच स्वार्थत्याग म्हणून खड्डयांत सोडून द्यावीं. मॅनेजर म्हणाले, अहो ! खतावण्या टाकून मी वर्तमानपत्र काय चालवूं ? त्यापेक्षां फुकट रद्दी म्हणून ते सहाशें अंकांचे बांधलेले गठ्ठे आहेत ते का टाकाना ? संपादक म्हणाले, अंकाची किंमत एक एक आणा आहे; म्हणजे हे अंक टाकण्यांत आपले सहाशें आणे गेलेच कीं ! तेव्हां उभयतांच्या सल्ल्यानें हाच विचार कायम होऊन गठ्ठे खड्डयांत टाकण्यांत आले. पण खड्डा कांहीं भरून आला नाहीं !

सदर संपादकाचे एक स्नेही वकील शेजारींच होते. त्यांनीं गठ्ठे टाकलेले पाहून संपादकास विचारलें. संपादक म्हणजे सर्वज्ञ सल्लागार ! त्यांनीं आपला अभिप्राय दिला, कीं वकीलवर्गानें आपल्या प्रिय वस्तूचा त्याग केल्याशिवाय हें राष्ट्रीय संकट टळणार नाहीं. तेव्हां खड्डा भरून येण्यास वकीलवर्गानेंच पुढें झालें पाहिजे. वकिलानें आपल्या कारकुनास विचारलें. कारकून स्वतः वकिलालाच काय सल्ला देणार ? वकिली सोडण्याची आजची कल्पना त्याला त्यावेळीं आठवली नाहीं. तेव्हां वकिलालाच कल्पना सुचून अशिलाचे जे कांहीं अनामत पैसे त्याजकडे होते त्याची एक लहानशी पिशवी त्यानें खड्डयांत टाकून दिली. पण खड्डा भरून आला नाहीं.

याप्रमाणें तेथें जे जे वर्ग हजर होते त्यांपैकीं सर्वांनीं आपापल्या बुद्धीनुसार स्वतःचे म्हणून कांहीं कांहीं त्या खड्डयांत टाकून पाहिलें. परंतु खड्डा जसाचा

तसाच ! इतकें होत आहे तों लांबून एक घोडेस्वार भरधांव तेथें आला; व आजूबाजूस न पाहतां त्यानें निःशंकपणानें घोड्यासकट त्या खड्ड्यांत उडी घेतली ! त्याबरोबर चमत्कार होऊन खड्डा एकदम भरून गेला.

या गोष्टीचें तात्पर्य आपल्या लक्षांत आलेंच असेल. स्वार्थत्याग करावयाचा असेल त्यानें कोणाचा सल्ला विचारण्यास न जातां स्वतःच्या स्फूर्तीनें तो करावा. म्हणून जो कोणी आपल्या स्वतंत्र बुद्धीनें व स्वयंस्फूर्तीनें या वेळीं स्वार्थत्याग करील, त्याला मी डोक्यावर घेऊन नाचेन असें मीं पूर्वीं सार्वजनिक सभेंत म्हटलें होतें तें माझें म्हणणें आजहि कायम आहे. दुसऱ्यानें रडतराव घोड्यावर बसवण्यांत अर्थ नाहीं. माझ्याकडे मी दहा दिवसांनीं कॉलेज सोडूं का, वगैरे विचारण्यास येतात त्यांना मी पूर्ण ओळखतों. मग मी काय म्हणून त्यांना सांगूं कीं तूं आतांच सोड म्हणून. आम्ही तुमची सोय करूं या भावनेनें तुम्ही सोडीत असाल तर मी तुम्हांस आतांच सांगतों कीं, तुमची सोय करण्याबद्दल मी जबाबदार नाहीं. कायमचा पत्कर कोण कोणाचा घेऊं शकेल ? मला स्वतः गांधींची गोष्ट माहीत आहे. गांधींच्याकडे एक वकील गेले व म्हणाले, मीं आपली वकिली सोडली. गांधी म्हणाले फार उत्तम आहे. पण नंतर ते वकील माझी पुढची तजवीज काय असें विचारूं लागतांच, गांधी त्याला म्हणाले, बाबारे ! असें असेल तर तूं आपली वकिली सोडूं नको. मीहि तुम्हांला सांगतों, कीं कॉलेज काढल्यानंतरच मीं तुम्हांस कॉलेज सोडावयास सांगितलें. शाळांतल्या मुलांचा पत्कर मीं घेतला नाहीं. शक्य त्या मुलांची सोय आम्हीं केली व आमच्या शक्त्यनुसार आणखीहि करूं. आम्हालाहि थोडेंबहुत ब्रीद असेलच. त्याला आम्ही जागूं.

सरतेशेवटीं मला इतकेंच सांगावयाचें कीं, हा सर्व स्वार्थत्यागाचा मामला आहे. म्हणून ज्याला कोणाला स्वार्थत्याग करावयाचा असेल त्यानें तो स्वयंस्फूर्तीनें व आपल्या जबाबदारीवर करावा. अशा बाबतींत कोणी कोणाचा सल्ला घेऊं नये, कोणीं देऊं नये !

---

# ५२. प्रो० घारपुरे व ' राष्ट्रीय शिक्षण '

[ बुधवार तारीख १७ ऑगष्ट १९२२ रोजीं द. रा. घारपुरे यांचें " राष्ट्रीय शिक्षण " या विषयावर शिवाजी मंदिरांत व्याख्यान झालें अध्यक्षस्थानीं न. चिं. केळकर हे होते. ]

प्रथमत: घारपुरे यांनीं राष्ट्रीय सभेच्या ठरावांची कशी प्रगति होत गेली वगैरे सांगून सरतेशेवटीं ते राष्ट्रीय शिक्षणाच्या सद्य:स्थितीवर आले. ती सांगतांना नुकत्याच होऊन गेलेल्या कायदेभंगकमिटीपुढील साक्षींचा त्यांनीं आधार घेतला; व केळकर, लवाटे, भोपटकर, जम्नादास मेहता व लोहोकरे या सर्वांनीं विरुद्ध स्टेटमेंट लिहिल्यानें घाण केली, एकट्या आपण मात्र आपल्या स्टेटमेंटमध्यें राष्ट्रीय शिक्षणाबाबत यथायोग्य लिहिलें असें त्यांनीं प्रौढीनें बोलून दाखविलें ! पण याहि पलीकडे जाऊन व शिष्टाचाराची योग्य मर्यादा ओलांडून त्यांनीं वरील मंडळीवर इतकी कुत्सित व खोडसाळ-पणाची व्यक्तिविषयक टीका केली कीं, शब्दावडंबर व मुत्सद्दीपणा यांच्या पांघरुणाखालीं केवळ आपला नादानपणा झांकण्याचा प्रयत्न महाराष्ट्रीय पुढारी करीत आहेत असें लोकांस भासविण्याचा त्यांनीं प्रयत्न केला. स्वत:ची पायरी सोडून इतक्या निःशंक बेमुर्वतखोरपणानें जाहीर सभेंत घारपुरे यांनीं तोंड चालविल्यामुळें साहजिकच येथें कांहींतरी पाणी खरोखरीच मुरत असावें असा आभास त्यांनीं निर्माण केला. यामुळें उत्तर देऊन गैरसमज दूर करणेंहि अपरिहार्य झालें. परंतु या दिवशीं व्याख्यानास बराच उशीर झाल्यामुळें सभा तहकूब होऊन दुसऱ्या दिवसावर ढकलण्यांत आली.

घारपुरे यांनीं अशा रीतीनें लोकमत चाळविल्यामुळें दुसऱ्या दिवशीं व्याख्यानास जास्त गर्दी झाली. प्रथमत: गोखले यांनीं भाषण केल्यावर लवाटे यांनीं आपला खुलासा केला व सांगितलें कीं, जे शब्द आपण लिहिले असें घारपुरे यांचें म्हणणें आहे तसले शब्द आपण कधींहि लिहिले किंवा बोललों नाहीं. या बाबतींत बाजू समूळ उलटलेली पाहतांच " माझा तसें म्हणण्याचा उद्देश नव्हता. मी आपले शब्द परत घेतों " असें म्हणून घारपुरे यांनीं आपणांस सांवरून घेतलें.

वास्तविक या व्याख्यानास अध्यक्ष भोपटकरच व्हावयाचे; पण त्यांस

बाहेरगांवीं जावयाचें असल्याकारणानें ते व्याख्यानाच्या दिवशीं हजर राहूं शकले नाहींत. पण दुसऱ्या दिवशीं घारपुरे यांनीं घेतलेले आक्षेप त्यांच्या कानीं गेले तेव्हां स्वतःबद्दल सर्व खुलासा त्यांनीं सभेंत येऊन केला.

न. वि. गाडगीळ यांनीं घारपुरे यांचा थोडासा पूर्वेतिहास सांगितला; व घारपुरे स्वार्थत्याग करून टिळकमहाविद्यालयांत आले असें म्हणतांना यापूर्वीं किती प्रसंगीं न्यू पूना कॉलेजचा राजीनामा पाठविला होता असें त्यांस विचारलें. पण तुम्ही केवळ 'रडवेपणानें' इकडे आलांत असा व्यक्तिविषयक शब्द त्यांनीं योजल्यामुळें लोकमताची बाजू गाडगीळ यांजवर उलटली व त्यांस खालीं बसावें लागलें.

यानंतर शंकरराव देव आले व म्हणाले, " दारूच्या गुत्त्यावर पिकेटिंग करणें तुम्ही योग्य मानतां मग कॉलेजपुढें जाऊन विद्यार्थ्यांपुढें पिकेटिंग करण्यास हरकत कोणती ? शाळा व कॉलेजें हे झाले तरी दारूचे गुत्तेच आहेत ! अशी सरसकट असहकारितेची चळवळ हीच योग्य चळवळ होय. टिळकांच्या चळवळीमुळें जशी पूर्वींच्या मवाळांची चळवळ फिक्की पडली तशीच आजच्या चळवळीमुळें राष्ट्रीय पक्षाची स्थिति झाली आहे." कित्येकांस हा वाग्बाण सहन न झाल्यामुळें त्यांनीं देवांस 'शब्द परत घ्या' असें आव्हान केलें व सभेंत गोंगाट केला. परंतु " त्यांना संपेपर्यंत बोलूं द्या " असें म्हणून केळकरांनीं त्यांचें भाषण होऊं दिलें.

तिसऱ्या दिवशीं लोहोकरे यांनीं भाषण केलें. त्यांत त्यांनीं व्यक्तिविषयक भांडणांनीं येथील राष्ट्रीय शाळेंत कशी दुफळी झाली व सरतेशेवटीं बोर्डाची सभा बोलावल्यावर त्यांनीं घारपुरे व साने यांच्या हवालीं त्यांच्या खासगी जबाबदारीवर शाळा कशी स्वाधीन केली वगैरे सांगितलें. राष्ट्रीय शिक्षण व निमसरकारी शिक्षण यांची तुलना फार तर घरचें अन्न व खाणावळींतील अन्न अशी करावी; परंतु त्यांस दारूचे गुत्ते म्हणणें ही भाषा आपणास पटत नाहीं असें ते म्हणाले. टिळक-राष्ट्रीय पाठशाळेंतील एकदोन शिक्षकांचींहि भाषणें झालीं. त्यांपैकीं एका शिक्षकानें ' असा अविचार करूं नका, अहसकारितेमध्यें इतके भडकून जाऊं नका ' असा इशारा दिला. व हरोलीकर यांनीं अरेराव अधिकारी जसे बोलतात त्याप्रमाणें येथील राष्ट्रीय शाळेच्या मार्फत अंतर्व्यवस्थेचा खुलासा सांगितला.

टिळकमहाविद्यालयांतील प्रो० वि. प्र. लिमये यांनींहि भाषण केलें. त्यांच्या भाषणाचा रोख असा कीं, धारपुरे यांची व्यक्तिविषयक टीका ही अयोग्य झाली. संस्था चालविण्यास त्यांतील माणसांनीं एकोप्यानेंच वागलें पाहिजे.

यानंतरहि अनेकांचीं भाषणें होऊन लोकमत फार प्रक्षुब्ध झालें; व लोकमताच्या न्यायबुद्धीचा तराजू अत्यंत सूक्ष्म व चंचल झाला. अमुक गृहस्थ आज तुरुंगांत आहेत त्यांच्याबद्दल या वादांत काय म्हणून बोलतां, अमक्याला बोलूं दिलें नाहीं त्याला बोलूं द्या, अमक्या या बाबतींत तुम्हीं अन्याय केला, वगैरे प्रश्न मधून मधून प्रेक्षकांमधून धारपुऱ्यांवर येऊं लागले व दरवेळेस सभेंत दंगल माजून वातावरण अस्थिर होऊन जात असे.

इतक्यांत अवचित जमनादास मेहेता हेहि मुंबईहून आल्याकारणानें सभेंत हजर झाले. पुण्यांत इतक्या थरापर्यंत या सभेचा प्रकार गेला असेल याची त्यांस कल्पनाहि नव्हती! Above all the places in India Poona is a land of Freedom— "हिंदुस्थानांतील इतर कोणत्याहि ठिकाणापेक्षां लोकशाहीचा अवतार पुण्याइतका कोठेंहि पहावयास सांपडत नाहीं!" असें पुण्याचें प्रथम गौरवपूर्वक वर्णन करून पैसा व पदवी हे दोन मोठे प्रश्न राष्ट्रीय-शिक्षण देणारास प्रथमतः सोडवावे लागतात; किंबहुना हीच मोठी अडचण राष्ट्रीय शिक्षणाच्या मार्गांत आहे, असें त्यांनीं सांगितलें व हेंच आपल्या स्टेटमेंटमध्यें आपण सांगितलें असा खुलासा केला.

सरतेशेवटीं अध्यक्ष या नात्यानें केळकर यांजवर भाषण करण्याची पाळी आली; व केळकर आतां आपला खुलासा—समारोप कसा काय करतात याविषयीं प्रेक्षकांचीं मनें अत्यंत उत्कंठित व उतावीळ झालीं. परंतु यावेळीं रात्रीचे नऊ वाजावयास आले होते. म्हणून मला सावकाश व व्यवस्थित रीतीनें बोलण्यास तीन तास तरी पाहिजेत असें सांगून केळकर यांनीं मंगळवारचा दिवस मुद्दाम मागून घेतला.

तीनचार दिवस चाललेल्या या जाहीर भांडणाचा अनिष्ट परिणाम टिळकमहाविद्यालयांतील मुलांच्या मनावर झाल्याशिवाय राहिला नाहीं व तेथें एकदोन सभाहि झाल्या. पण बाहेरील वादांत आपण कोणताच भाग घेऊं नये किंवा कोणाबद्दलच विश्वासनिदर्शक किंवा निंदाव्यंजक ठराव

करूं नये, आपण तटस्थ रहावें असेंच बहुमतानें ठरल्यामुळें, केळकर यांनीं विद्यार्थ्यांच्या कोणत्याच मताचा उल्लेख करूं नये असें त्यांस मंगळवारच्या सभेच्या पूर्वीं कळविण्यांत आलें.

रविवार व सोमवारचा दिवस मध्यें गेल्यानें लोकांची उत्कंठा अधिकच वाढली व मंगळवारीं हें व्याख्यान केसरींत जाहीर केलें नसतांहि संध्याकाळीं सभेस अतोनात गर्दी जमली. पांच हजारांवर श्रोतृसमुदाय जमला होता. बरोबर सहा वाजतां केळकर यांनीं आपल्या भाषणास सुरवात केली. केळकर म्हणाले:—

" घारपुरे यानीं आपल्या व्याख्यानांतून जे आक्षेप आमच्यावर घेतले आहेत त्यांचें स्पष्टीकरण आज मी करणार आहे. तें व्यवस्थित रीतीनें करतां यावें म्हणून एक दिवस मीं आपणाकडून स्वतंत्र मागून घेतला. हें स्पष्टीकरण करितांना शांतपणा न सोडण्याचा मी आपणांकडून शक्य तितका प्रयत्न करीन. परंतु क्वचित् माझें हातून तसें न झालें तर त्याला माझा नाइलाज आहे.

घारपुरे यांनीं राष्ट्रीय शिक्षण हा विषय आपल्या व्याख्यानास घेऊन त्यांत राष्ट्रीय सभेच्या ठरावांतून राष्ट्रीय शिक्षणाच्या विषयाची प्रगति कशी होत गेली तें सांगितलें. यानंतर 'राष्ट्रीय शिक्षण कसें वाढवावें' वगैरे विधायक गोष्टी ते सांगतील असें व्याख्यानाचा बराच भाग होईपर्यंत मला वाटलें. पण यानंतर मात्र, मांजराच्या नखांप्रमाणें लपवून ठेवलेलीं आपलीं नखें घारपुरे यांनीं एकदम बाहेर काढलीं व ज्याला त्याला ते बोचकारू लागले ! प्रत्युत्तराच्या वेळीं तर त्यांच्या बोचकरण्यांतून श्रोतृवृंदहि सुटला नाहीं !

या बाबतींत थोडें असें झालें, कीं घारपुऱ्यांची हरवली होती एक टांचणी; म्हणून हातांत दिवा घेऊन ती शोधण्याकरितां घारपुरे कापसाच्या वखारींत गेले. कापसावर अग्नि पडून त्यानें पेट घेतला व आग लागली. साहजिकच लोक जमले. तें पाहून घारपुरे म्हणतात, " छेः हो ! मी अगदीं साधासुधा प्राणी. मी फक्त माझी टांचणी शोधली. पण ही आग कशी भडकली ?" बरोबर ! घारपुऱ्यांनीं फक्त आपली टांचणी शोधली; इकडे आग कशी भडकली हें त्यांना माहीत नाहीं.

राष्ट्रीय शिक्षणाची खरीखुरी कळकळ घारपुरे यांना असती तर हा घोंटाळा त्यांनीं माजवावयास नको होता. यापेक्षां चांगलें व विचारपरिप्लुत व्याख्यान त्यांना देतां आलें असतें. पण मूळ बुद्धीच तसें करण्याची नव्हती. आमच्या 'स्टेटमेंट'नें सगळी घाण झाली असें घारपुऱ्यांनीं सभेंत उभें राहून सांगितलें. पण त्यांना मी जाहीर रीतीनें सांगतों कीं, राष्ट्रीय शिक्षण आम्हीं स्टेटमेंट विरुद्ध लिहिलें म्हणून बुडत नाहीं; आणि तें बुडणारच असलें तर घारपुऱ्यांच्या कळकळीनें तें तरणारहि नाहीं. राष्ट्रीय शिक्षण हें स्वतःच्या पायावर उभें आहे. स्वतःच्या गुणांनींच तें बुडेल किंवा तरेल. तें केवळ लोकांच्या मदतीवर अवलंबून आहे. लोकांकडे मदत मागण्याचा हेतु या व्याख्यानांत होता असेंहि नाहीं. केवळ आम्हांस नांव ठेवण्यासाठींच त्यांनीं व्याख्यान दिलें हेंच शेवटीं ठरलें. घारपुरे वैतागानें कांहींतरी बोलले असें म्हणावें तर त्यांनीं घेतलेल्या आक्षेपांत सत्याचा लवलेश तरी असावयास पाहिजे होता. पण त्यांनीं घेतलेले आक्षेप धड-धडीत खोटे आहेत, हें मी क्रमाक्रमानें दाखविणार आहें. व्याख्यान देण्याचा त्यांचा हेतु कांहींतरी घाण आमच्यावर उडवावी हाच होता. परंतु त्यांनीं घाण केली तरी आम्हांला ती काढणें प्राप्तच आहे. मी तर येथील म्युनिसिपालिटीचा अध्यक्ष आहें. घाण काढणें हें माझें कामच आहे. एवढ्याचकरितां मीं स्वतंत्र दिवस मागून घेतला आहे.

स्वतःबद्दल बोलण्यापूर्वीं प्रथम मला लवाटे, भोपटकर व लोहोकरे यांच्या-संबंधानें दोन शब्द सांगितले पाहिजेत. घारपुऱ्यांनीं यांच्यावरहि शिंतोडे उडविले आहेत. पैकीं डॉ० लोहोकरे हे येथील राष्ट्रीय शाळेच्या बोर्डावर होते. पण जेव्हां शाळा अगदींच डबघाईस आली त्यावेळीं त्यांनीं बोर्डाची सभा बोलावली व बोर्डानें पुढील व्यवस्था लावली. रा० भोपटकरासंबंधींचे आक्षेप भोपटकरांनीं खोडून काढलेच आहेत. पण त्यांच्यावर घाण उड-वितांना भोपटकर यांनीं यापूर्वीं राष्ट्रीय शिक्षणासंबंधीं काय श्रम घेतले आहेत, किती झीज सोसली आहे याचा विचार घारपुरे यांनीं करावयास पाहिजे होता. घारपुरे यांना जगांत अजून पुष्कळ अनुभव यावयाचा आहे! भोपटकरांइतकी मजल गांठण्यास घारपुरे यांस अद्याप बराच अवकाश आहे. घारपुरे यांना राष्ट्रीय शिक्षणासंबंधानें स्फूर्ति आज आली

आहे! पण सर्वांना तीच स्फूर्ति किंवा उमेद एकाच वेळीं यावी हें कसें होणार? मला स्फूर्ति आली त्याच वेळीं इतरांनाहि कां आली नाहीं हें विचारणें अगदीं गैरशिस्त आहे. दुसऱ्यांवर आरोप करण्यापूर्वी त्यांचें पूर्वचरित्र काय आहे याचा थोडा तरी विचार घारपुऱ्यांनीं करावयास पाहिजे होता! भोपटकरांवर घारपुरे इतके चरफडले, कां तर त्यांच्या स्टेटमेंटमध्यें घारपुरे यांच्या मनासारखें वाक्य नाहीं म्हणून! पण असें करण्याचें घारपुऱ्यांना कांहींच कारण नाहीं. पूर्वी भोपटकरबंधूंनींच पुण्यांत राष्ट्रीय शाळा काढून चालविली होती व त्या शाळेसंबंधानें टिळक नेहमीं मोठ्या अभिमानानें सांगत असत. लवाटे यांच्यासंबंधानें तर घारपुऱ्यांनीं बोलूं सुद्धां नये. लो० टिळकांच्या चरित्रासंबंधीं कागदपत्र चाळतांना यांच्या शाळेची जाहिरात मीं तीस वर्षांपूर्वीच्या केसरींत पाहिली आहे! व बोर्डिंगची यातायात तर यांनीं अगदीं परवां परवांपर्यंत चालविली होती, ती काय राष्ट्रीय शिक्षणासंबंधीं त्यांना कळकळ नव्हती म्हणून! मी घारपुऱ्यांना स्वच्छ सांगतों, अशा माणसांचा पूर्ववृत्तांत विसरणें म्हणजे शुद्ध कृतघ्नपणा आहे! त्यांना कळकळ नाहीं म्हणणें म्हणजे त्यांची व त्यांच्या पूर्वीच्या कृत्यांची बदनामी करणें आहे. आपल्याच अहंपणाच्या प्रौढींत मुसंडी मारून पाया-खालीं सांपडेल त्याला लाथ व शेजाऱ्याला कोपरखळी मारीत घारपुरे पुढें जात आहेत! भोपटकर, लवाटे यांनीं शाळा चालविली त्यावेळीं थोडेंबहुत पोटाला घेतलें असेल म्हणून त्यांचा निःस्वार्थीपणा फुकट गेला कीं काय? पण आज घारपुरे देखील टिळकविद्यालयांतून १२५ रु. पगार घेतच आहेत! दुसऱ्यांना सरसहा असा दोष देऊन कार्यभाग होणार नाहीं; गोड शब्दांनीं सर्वांची सहानुभूति कशी मिळवावी लागते याचा अनुभव घारपुरे यांना अद्याप यावयाचा आहे. एखादें मोठें काम अंगावर घेऊन तें करावयास जातील तेव्हां घारपुरे यांना हा अनुभव येईल.

घारपुरे यांनीं माझी निंदा केली व मला हातांतली टांचणी टोंचण्याचा प्रयत्न केला; पण मी स्वच्छ बजावतों, कीं या त्यांच्या टोंचण्यानें माझें रक्त निघणार नाहीं. किंबहुना मी त्यांना पुरून उरणार आहें. त्यांनीं हें लक्षांत ठेवावें कीं, मी त्यांनाच काय पण पुष्कळांना पुरून उरणार आहें. मोठे-पणाच्या ताठ्यांत ते बोलले, पण आपण कितीसे मोठे आहों याचें भान त्यांना

रहावयास पाहिजे होतें ! ' केळकरांचा मीं वेळोंवेळीं बचाव केला आहे ' असें घारपुरे यांनीं बोलून दाखविलें ! केवढा हा अभिमान ? कोण आढ्यतखोरपणा हा ? आज असा काळ आला आहे काय, कीं घारपुरे यांना माझें संरक्षण करावयास लागावें ? मी त्यांना आव्हान करून सांगतों कीं जी काय माझी निंदा करावयाची असेल ती घारपुरे यांनीं खुशाल करून घ्यावी ! त्यांच्या निंदेला कोणी कुत्रासुद्धां विचारणार नाहीं. पण घटकाभर असेंहि समजा, कीं घारपुरे यांनीं माझ्यावर यःकश्चित् एकादा उपकार केला असला, तरी कोणी कोणावर केलेला उपकार जाहीर सभेंत सांगणें—मोठ्या बढाईनें सांगणें—हा कोठल्या सभ्यतेचा प्रकार ? पण घारपुरे यांच्या अंगीं मोठेपणाचें वारें शिरलें आहे. म्हणून, मला त्यांनीं ' डिफेंड ' केलें असें जाहीर सभेंत सांगण्याचें धाडस ते करतात !

बरें, माझ्यासंबंधानें इतके दोष घारपुरे यांनीं सांगितले, पण माझ्याबद्दल जातांजातां चांगुलपणाचा एक शब्द तरी त्यांनीं सांगितला काय ? एकाद्याचे दोषच दाखवावयाचे असले तरी ते नुसते तसे दाखवून भागत नाहीं ! जमेच्या बाजूस एकादा तरी गुण दाखवावा लागतो. दोष देतांना देखील प्रथम कांहीं गुण जमेस धरून त्या गुणाच्या बैठकीवर जर दोष मांडून दाखविले तर तो मनुष्य देखील स्वतः निरुत्तर होईल. स्वतः घारपुरे यांच्या दृष्टीनेंहि मी असें म्हणतों कीं, मला दोष देण्यापूर्वी माझ्याबद्दल एक स्तुतिवाचक शब्द घारपुरे बोलते तरी त्यांच्या दृष्टीनें त्यांनीं माझें काम अधिक अवघड करून ठेविलें असतें. पण घारपुरे यांना न्यायबुद्धीच नाहीं. त्यांना फक्त माझे दोषच दाखवावयाचे होते ! मजकडूनहि कांहीं अल्पस्वल्प देशसेवा झाली असेल, नाहीं असें नाहीं. पण स्वाभिमानानें बडेजाव करून यंव केलें, त्यंव केलें, असें स्वतःच सांगणें बरें झालें असतें काय ? आम्ही जर सत्यस्थिति सांगितली तर तें स्मशानगीत ठरतें आणि यांनीं केलेली आत्मस्तुति ही अभिमानाचीं मंगलाष्टकें होतात ! आम्हीं जर कांहीं गोष्टी विनयानें सांगितल्या तर जग कांहीं खास मरत नाहीं व यांनाहि स्मशानगीतें गाण्याची पाळी खास येत नाहीं हें निश्चित समजा. आतां मी आपणाला माझें सी. डी. कमिटीपुढील स्टेटमेंट वाचून दाखवितों. यांत कोठें स्मशानगीतें आहेत हें आपणच पहा.

माझ्या स्टेटमेंटसंबंधीं सांगत असतांना घारपुरे असे कांहीं विलक्षण हसले कीं, त्या हंसण्यांतच साऱ्या निंदेचें सार होतें. आपल्याला कदाचित् तें आठवत नसेल. मी उघड शिव्या सहन करीन; पण असें कोणीं मला कुचेष्टेनें हास्यास्पद केलें किंवा मला हास्यास्पद करण्याच्या हेतूनें अर्धा ओठ वांकडा झाला तरी मी तें जन्मभर विसरणार नाहीं ! माझें स्टेटमेंट अर्थ-विहीन आहे असें घारपुरे म्हणतात पण ज्यांना माझें लिहिणें व बोलणें माहीत आहे त्यांनींच हें ठरवावें. सी. डी. कमिटीपुढील साक्षींत मीं निरर्थक शब्द घातले हें म्हणणें अज्ञानाचें द्योतक आहे. माझी साक्ष सर्व हिंदुस्थानभर प्रसिद्ध झाली आहे, व चौकशी कमिटी येथें आली असतां तिनें माझी चार पांच तास कसून तपासणी केली. असें असतां स्टेटमेंट-मध्यें निरर्थक शब्द मी कसे घालीन ?

घारपुरे यांचा दुसरा मोठा आक्षेप हा कीं, कमिटीपुढील साक्षींत मीं कौन्सिलच्या सदराखालींच राष्ट्रीय शिक्षणाची मोट बांधून टाकली आहे व कौन्सिलवर भर देऊन राष्ट्रीय शिक्षण पाठीमागें टाकलें आहे. पण हें म्हणणें खोटें आहे. आपण माझें स्टेटमेंट काढून पहा. त्यांत पुढें प्रश्नावलींत केवळ ‘राष्ट्रीय शिक्षण’ या विषयाचें मीं स्वतंत्र हेडिंग केलें आहे. घारपुरे ही गोष्ट विसरले असें दिसतें. यंदां गतवर्षींपेक्षां राष्ट्रीय शिक्षणाची पिछेहाट झाली आहे येवढेंच माझें विधान त्यांनीं तुम्हांला वाचून दाखविलें. पण याच्याच पुढें जाऊन स्टेटमेंटमध्यें ते पहाते तर त्यांना आणखीहि कांहीं दिसलें असतें. वरील वाक्याच्याच पुढें मीं असेंहि लिहिलें आहे कीं, “अशी स्थिति असली तरी दिवसेंदिवस युनिव्हर्सिटीच्या डिग्र्या घेण्याकडील लोकांची प्रवृत्ति मावळत चालली आहे. शिवाय सुदैवानें राष्ट्रीय शिक्षणाकडे लोकांचें जास्त लक्ष लागत चाललें आहे.” ही वस्तुस्थिति अतिशयोक्तीनें सांगितली नाहीं हाच माझा गुन्हा झाला असें त्यांचें म्हणणें आहे ! माझें स्टेटमेंट जगजाहीर आहे. कोणीहि तें वाचून राष्ट्रीय शिक्षणाचे पाय मीं मागें ओढले आहेत असें दाखवून द्यावें. उगाच कांहींतरी बोललों असतों तर घारपुरे यांना बरें वाटलें असतें. पण मला तसें करतां येत नाहीं.

तसेंच घारपुरे यांनीं ‘इन्डिजिनस’ या शब्दाबद्दलच वाद घातला. आतां ‘इन्डिजिनस’ हा शब्द जोरदार कीं, ‘नॅशनल’ हा त्यापेक्षां जोरदार

हें ठरवावयाचें कसें ? मी पूर्वी कोल्हापुरास असतांना हलवाई व मेवेकरी या दोन शब्दांबद्दल भांडणाऱ्या दोघां माणसांची गोष्ट मला आठवते. एक म्हणे 'हलवाई' हा शब्द जोरदार. दुसरा म्हणे छे: 'हलवाई' कसला ? मेऽवेऽकरी हाच शब्द जास्त जोरदार ! वास्तविक शब्दांत काय आहे ? एखाद्या शब्दाला हास्यास्पद करावयाचें झाल्यास तें कोणालाहि करतां येईल. बोलण्याचा सूर बदलला कीं चांगला शब्दसुद्धां वाईट ठरतो. पूर्वीच्या मवाळांनीं नॅशनल याऐवजीं 'इण्डिपेण्डण्ट' हा शब्द योजला. 'इण्डिजिनस' हा शब्दहि त्याच्याच सारखा आहे असें म्हणून घारपुरे यांनीं आम्हांला मवाळ ठरविण्याचा प्रयत्न केला. पण मी त्यांना इतकेंच सांगतों कीं, लखनौच्या कॉंग्रेसनेंहि शिक्षणाबद्दलच्या आपल्या ठरावांत हाच शब्द योजलेला आहे. लखनौच्या कॉंग्रेसला जमलेले लोक तर सर्व मवाळ नव्हते ना ? असो. हा शब्द आपण लक्षांत ठेवा. यासंबंधानें व टिळकांच्या राष्ट्रीय शिक्षणाच्या कल्पनेबद्दल मला पुढें आपणांला सांगावयाचें आहे.

माझ्या स्टेटमेंटमध्यें राष्ट्रीय शिक्षणाबद्दल मीं स्मशानगीतें गाइलीं आहेत असें घटकाभर म्हटलें तरी घारपुरेपक्षीय इतरांनीं आपापल्या स्टेटमेंटमध्यें काय लिहिलें आहे तें पहा. ( येथें श्री० केळकर यांनीं सी. डी. कमिटीपुढील स्टेटमेंट्सच्या फाइलींतून घारपुरेपक्षीय सर्व मंडळींच्या साक्षीचे उतारे वाचून दाखविले. ) घारपुरे सांगतात कीं, राष्ट्रीय शिक्षणाचा उत्कर्ष झाला आहे. पण आतांच मीं त्यांच्या मंडळींची आपणांस यादी वाचून दाखविली. ही सर्व मंडळी सांगतात कीं राष्ट्रीय शिक्षणाची स्थिति सर्वत्र खालावली आहे. भुसावळचे दास्ताने लिहितात तेंच मीं लिहिलें आहे. देवकीनंदन, पी. जी. जोशी, सातारचे सोमण, पंढरपूरचे फणसळकर, तसेंच नगर, कुलाबा, रत्नागिरी, कऱ्हाड येथील सर्व मंडळीहि परिस्थिति खालावली असेंच लिहितात. पण याहिपेक्षां पुढें जाऊन देव व कानिटकर आपल्या साक्षींत काय लिहितात तें पहा. " राष्ट्रीय शिक्षणासंबंधीं सर्वत्र निराशा आहे. कॉंग्रेसनें या शाळांना पैसे दिले ही मोठी चूक केली व टिळक-स्वराज्यफंड शाळांकरितां देऊन विनाकारण उधळपट्टी मात्र केली आहे. ज्यांनीं एक वर्षांत स्वराज्य देतों असें सांगितलें त्यांनींच ही सुरवात केली आहे. राष्ट्रीय शिक्षणाचा उपक्रम मूर्खपणाचा नसला तरी हास्यास्पद झाला

आहे" पहा हीं मुक्ताफळें ! याला आतां स्मशानगीत म्हणावें कीं देवदूतांचें गाणें म्हणावें हें आपणच ठरवा. या वाक्यांनीं मात्र राष्ट्रीय शिक्षणाची हानि होत नाहीं ! कानिटकर येथें असल्यास मी त्यांस उघड विचारतों कीं, राष्ट्रीय शिक्षणाला म्हणून दिलेले कॉंग्रेसचे पैसे कॉंग्रेसनें उधळले असें म्हणतां तर येथील चिंचवडच्या संस्थेला कॉंग्रेसच्या मार्फत परवां दहा हजार रुपये कां घेतलेत ? अंधेरी आश्रमाप्रमाणें तेथेंहि फक्त प्रचारक तयार करण्याचें शिक्षण कां देत नाहीं ? ( येथें लोकांनींहि कानिटकर यांस उत्तर द्या म्हणून जाब विचारला पण त्यांस उत्तर देतां आलें नाहीं ! ) मी हा प्रश्न कानिटकर यांस जाहीर रीतीनें विचारितों. यांचीं उत्तरें वाटल्यास त्यांनीं जाहीर करावीं. स्वतःच्या संस्थेला कॉंग्रेसकडून मदत घेऊन पुन्हा स्टेटमेंटमध्यें कॉंग्रेसनें हे पैसे उधळले असें लिहिणें त्यांस शोभत नाहीं.

राष्ट्रीय शिक्षणाची स्थिति सर्वत्र कशी खालावली आहे हें या मंडळींच्या साक्षीवरून मीं आतां आपणांस दाखविलेंच आहे. परंतु स्थिति खालावली असें आम्हीं सांगितलें तर हें उघड कां केलें ? असा प्रश्न विचारतात. पण ही स्थिति एकट्या माझ्याच साक्षीवरून उघड झाली आहे काय ? इतरांनींहि तेंच सांगितलें आहे याचा विचार करा. स्थिति खालावली अशी वस्तुस्थिति सांगितली तर असले खोटे आक्षेप कां घेतले असा प्रश्न विचारतात. पण अशा आक्षेपांना उत्तर न देतां स्वस्थ बसलें तर तें अंगाशीं येतें याचा मला पदोपदीं अनुभव आला आहे. साक्षीमध्यें मीं वस्तुस्थिति सांगितली येवढाच माझा दोष ! राष्ट्रीय शिक्षणाच्या खालावलेल्या स्थितीला पुढाऱ्यांच्या अनास्थेची पुस्ती जोडण्यांत आली आहे ! महाराष्ट्रांतील पुढारी निष्काळजी आहेत असें घटकाभर कबूल केलें तरी इतर प्रांतांतहि हीच स्थिति कां दृष्टीस पडावी ? मद्रासेंत किती शिक्षणसंस्था आहेत ? बंगाल्यांतील दासांचें कॉलेज कुठें आहे ? लजपतरायांच्या कॉलेजमध्यें मुलें गेलीं पण त्यांना निराश होऊन परत यावें कां लागलें ? असा प्रश्न विचारून या थोर पुढाऱ्यांबद्दल मीं अनादर दर्शवितों असें कृपा करून आपण मानूं नका. पण एकट्या महाराष्ट्रीय पुढाऱ्यांना नादान ठरवितांना जरा आजूबाजूला पहावयास नको काय ? थोर पुढाऱ्यांचा अपमान करावा म्हणून हें मी सांगत नाहीं; फक्त माझ्या बचावार्थ सांगतों आहे.

हे पुढारी मला सर्वस्वीं वंद्य आहेत. आमच्या येथें जी अडचण आम्हांला आहे तीच अडचण त्यांच्यापुढें आहे हें मी जाणतों. आणि म्हणूनच त्यांचीं उदाहरणें मीं घेतलीं. आम्हाला सरसहा दोषी ठरवितांना घारपुरे यांनीं थोडातरी विचार करावयास पाहिजे होता !

माझ्यावरील आणखी आरोप काय, तर मी बडोद्याच्या साहित्य संमेलनास गेलों. पहा, हा टीकाकार किती अधोगतीला गेला आहे. बरें, गेलों तर गेलों ! पण तेथें टिळकमहाविद्यालयाचा उच्चारहि केला नाहीं म्हणे ! पण ही गोष्ट खरी कशावरून ? सरकारी नोकर, बडोदें सरकार वगैरे इतर सर्व मंळळींनीं असा ठराव केला आहे कीं, मराठी विद्यापीठ महाराष्ट्रांत असणें अवश्य आहे. यांत लोकमान्य टिळकांच्या नांवानें निघालेल्या विद्यापीठाचा उल्लेख नाहीं इतकेंच; पण हा ठराव तेथें सर्व दर्जाच्या लोकांनीं पास केला आहे ही गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे. तसेंच न्यू पूना कॉलेजमधील प्रसंगीं मीं या विद्यालयाचा उल्लेख केला होता असें उपवक्त्यांपैकीं एकानें सांगून परस्परच घारपुरे यांचे कान टोचले आहेत. घारपुरे म्हणतात, इतिहासमंडळांत मीं व्याख्यान दिलें, तेथें मीं टिळकविद्यालयाचा उच्चार केला नाहीं. पण मीं जाईन तेथें तेथें टिळकविद्यालयाचा उच्चार केलाच पाहिजे असें आहे कीं काय ? युनिव्हर्सिटीचा उल्लेख मीं तेथें केला म्हणून घारपुरे रागावतात; पण मी त्यांना असें विचारतों कीं, कायदेभंग कमिटीपुढें जी साक्ष त्यांनीं लिहून पाठविली त्याच्यावर आपल्या नांवापुढें त्यांनीं एस्. ए., बी. एस्. सी. ही पदवी जोडली आहे. त्यावांचून त्यांचें काय अडलें होतें ? मीं माझ्या नांवापुढील पदवी केसरींत काढून टाकली आहे. मग यांनाच त्याचा एवढा मोह कां वाटावा ? देवांनीं आपल्या भाषणांत शाळा व कॉलेजांना दारूचे गुत्ते म्हटलें आहे. आम्हाला कांहीं असें बोलतां येत नाहीं. अलंकारशास्त्रांत अतिशयोक्ति खपते, पण व्यवहारांत तसें चालत नाहीं. इतर शाळा व कॉलेजें हे दारूचे गुत्ते असले तर असोत; पण मला मात्र त्यांतून दारू पिऊन बाहेर पडलेला घारपुरे हा एकच पदवीधर दिसतो आहे. एरवीं त्याच्या तोंडून अशीं बेभान विधानें बाहेर पडतींना. दुकानांत दारू ओतून दारूचें पिप रिकामें होऊन परत चाललें तरी शिंदीची एकादी फांदी तें आपल्या

डोक्यांत खोंचतेंच ! असहकारितावादी म्हणवूनहि सरकारी पदवीचा मोह ज्यांना सुटत नाहीं त्यांना यापेक्षां काय म्हणणार ?

घारपुरे यांचा आमच्यावरील दुसरा एक आक्षेप म्हणजे " तुम्ही असें करतां म्हणून असें झालें. तुम्हाला याहून जास्त करतां आलें असतें. " या आक्षेपाला मात्र कोणापाशींच उत्तर नाहीं. याप्रमाणें मी प्रत्यक्ष ब्रह्मदेवाला सुद्धां विचारीन कीं, " बाबारे, तूं एवढी सृष्टी निर्माण केलीस पण याहून अधिक करतास तर चांगलें झालें असतें. " पण आम्हांला जर ही अधिकाची कसोटी लावावयाची तर जे त्या संस्थेंतून पगार घेतात त्यांना ही कसोटी कां लावूं नये ? मी घारपुरे यांना असें विचारितों कीं, आम्ही अविश्वासी, कबूल; पण तुमचा राष्ट्रीय शिक्षणावर जास्त विश्वास आहे आणि तुम्ही पगारहि संस्थेंतून घेतां. तुम्हीं शिक्षणाप्रीत्यर्थ काय काय केलें आहे तें तरी कळूं द्या. मला संस्थेंतून पगार नाहीं, पण मी आठवड्यांतून दोन तासपर्यंत वर्षभर विद्यालयांत शिकविलें आहे. पण घारपुरे हे कांहींच शिकवीत नाहींत. मला वेळ मिळेल त्याप्रमाणें मी टिळक–महाविद्यालयांत शिकवीत असतों. तसेंच परवां संस्थेचा खर्च चालण्यास अडचण पडली तेव्हां मीच नेने यांना भीड घालून, त्यांच्याशीं भांडून ज्युबिली–फंडापैकीं व्याजाचे ३५०० रुपये टिळक–विद्यापीठाकरितां मागून घेतले. लोकमान्य टिळक राष्ट्रीय शिक्षणाचे अभिमानी होते अशी त्यांची ख्याति आहे. पण या विषयावर त्यांचे फक्त दहाबाराच अग्रलेख केसरींत आहेत. समर्थ विद्यालयांत तर तेथील अभ्यासक्रम पहाण्यास ते उभ्या आयुष्यांत एकदांहि गेले नव्हते. चिरोल केसच्या वेळीं साक्षीमध्यें त्यांनीं ही गोष्ट शपथेवर सांगितली होती. पैशासाठींहि त्यांनीं एकदांच दौरा काढला होता. महाराष्ट्र गरीब आहे, त्याच्याजवळ पैसा नाहीं ही गोष्ट ते जाणून होते. ज्याच्या पाठीमागें दहा कामें असतात त्याचें असेंच असतें. लो० टिळकांचें उदाहरण मी स्वतःला लावतों असें आपण समजूं नका. टिळकांच्या पाद-रजाचीहि मला किंमत नाहीं. माझें म्हणणें इतकेंच कीं, अशा स्थितींत जें काय थोडें बहुत करण्यांत येईल त्याला दूषण देऊं नका. कर्वे हे मोठी युनिव्हर्सिटी चालवितात, पण त्यांना असलीं स्मशानगीतें गायचा प्रसंग आला नाहीं. जो निमित्ताला टेंकलेला असतो तोच रडगाणीं गात असतो. विद्यापीठाला पैशाची मदत

व्हावी म्हणून मीच त्या स्मारकाचा पैसा विद्यापीठाकडे लावला. पण घारपुरे यांनीं स्वतः जितका पगार आजवर संस्थेंतून घेतला तितकाहि त्यांनीं बाहेरून मिळवून आणला नाहीं. चिंतामणराव वैद्यांचें वय पहा ! पण वैद्य हे या वयांत स्वतः जितके हिंडले तितके हे पगारी प्रचारक स्वतः हिंडले नाहींत !

मी राष्ट्रीय शिक्षणाचा वैरी आहे असें घारपुरे यांनीं भासविलें; पण आमची राष्ट्रीय शिक्षणाबाबत कल्पना घारपुऱ्यांच्या कल्पनेहून निराळी आहे. घारपुरे यांना राष्ट्रीय शिक्षणाची बरोबर कल्पना नाहीं. बहिष्कार हा नैमित्तिक आहे, पण शिक्षण हें नित्याचें आहे. टिळक राष्ट्रीय शिक्षणाचे अभिमानी होते पण ग्रँट घेण्याच्या ते विरुद्ध नव्हते. कारण शाळेला पैसा पाहिजे. पैशाचा प्रश्न हीच राष्ट्रीय शिक्षणाच्या कामांत एक मोठी अडचण होय. त्यामुळेंच आपणांस हव्या तितक्या राष्ट्रीय संस्था निघूं शकत नाहींत. पंढरपुरास १९०७ सालीं वाळवंटांत त्यांचें व्याख्यान झालें. त्यावेळीं समोर दिसणाऱ्या एका देवळाच्या शिखरांचें उपलक्षणादाखल उदाहरण घेऊन ते म्हणाले, "मलाहि असें एक देऊळ बांधावयाचें आहे." पण तें 'एकच' असें म्हणाले; अनेक देवळें बांधीन असें त्यांनीं म्हटलें नाहीं !

ग्रँटच्या बाबतींत त्यांचें मत असें होतें कीं, शिक्षणास ग्रँट घेण्यास मुळींच हरकत नाहीं. कारण ग्रँटचा पैसा हा मुळांत लोकांनींच दिलेला असतो. ग्रँट-बरोबर जो सरकारी नियंत्रणाचा लगाम येतो तो मात्र त्यांना नको होता. बंगालच्या फाळणीच्या वेळीं रिसले-सर्क्युलर निघालें व प्रत्येक शाळेनें ग्रँट घेत-लीच पाहिजे, नाहींतर ती शाळा राजद्रोही असें जाइल्ससाहेब म्हणाले, त्यावेळीं बहिष्कार पुकारला; एरवीं नाहीं. राजकीय शिक्षण शाळेंतून देण्यास अडचण पडते; "व्याख्यानांमधून स्वतंत्र विचार मुलांना ऐकावयास मिळाले म्हणजे आपलें काम झालें; एरवीं तीं मुलें सरकारी शाळेंत गेलीं तरी मला चालतील !" असें टिळक म्हणत त्यांतील मर्म हेंच आहे. १९०८ सालीं बॉंब–प्रकरणांत सांपडलेलीं बहुतेक मुलें सरकारी शाळेंतीलच होतीं. पण सर्वांना सरसकट आपापल्या शाळा सोडून बाहेर पडा म्हणावयाचें तर, त्यांच्या शिक्षणाची व्यवस्था लागलीच पाहिजे. मुलगा मोकळा राहिला ही गोष्ट मला पटत नाहीं व माझ्या स्टेटमेंटमध्यें मीं असेंच लिहिलें आहे. यांत घारपुरे यांचें मीं काय घोडें मारलें आहे, तें त्यांचें त्यांनाच ठाऊक !

दुसरें असें कीं, घारपुरे यांना संस्थेंत मी 'फ्री-हॅंड' दिला नाहीं असें घारपुरे म्हणतात. पण तेंहि खोटें आहे. संस्थेंत तर त्यांच्याच बाजूच्या मंडळींचें बहुमत आहे. पण हे निमित्ताला टेकलेले, कोणावर तरी दोषाचें खापर फोडायला पाहिजे होतें म्हणून माझ्यावर कोसळले इतकेंच. पण मी कोणाच्याच मार्गांत आड येत नाहीं. त्यांना मी नको असेन तर मी आनंदानें सोडीन. त्यांना संस्थेंत काम करणें नको असेल तर त्यांनीं बेलाशक संस्था सोडावी, मी ती चालवीन. टिळकांचें खरें स्मारक शैक्षणिक असावें ही कल्पना माझी आहे. पुण्यांत असहकारिता सुरू झाली त्या वेळेला, टिळकांचें स्मारक व असहयोगी मुलांच्या शिक्षणाचा प्रश्न यांची सांगड घालून मीच हा ठराव स्मारक कमिटीच्या गळ्यांत बांधला. आपण त्या वेळचें प्रोसिडिंग बुक काढून पहा, म्हणजे आपल्या लक्षांत येईल. घारपुरे यांना पाहिजे असेल ती गोष्ट त्यांनीं पत्करावी. त्यांपैकीं कोठल्याहि गोष्टीला मी तयार आहें. किंवा, यापेक्षां उत्तम म्हणजे आपण दोघेहि हातांत हात घालूं व ह्या सर्व गोष्टी विसरून आजवर जसें काम केलें तसेंच पुढें करूं या! मी विसरणारा मनुष्य आहें. त्यांनींहि हें सर्व विसरून जावें. आजच्या प्रसंगीं इतकें बोलावें लागेल अशी कल्पना नव्हती. पण मी तुम्हांला खरोखर सांगतों, घारपुरे यांच्या भाषणानें माझ्या अंतःकरणाला घरें पडलीं! न्यू पूना कॉलेज सोडून प्रोफेसर घारपुरे व फडके बाहेर पडले तेव्हां आम्हीच त्यांना घोड्यावर बसविलें. त्यांपैकीं एक चाबुकस्वार जो घोड्यावर बसला तो घोडाच घेऊन पळून गेला. कोठें? तर शिकारीला! आणि दुसरा आमच्यावरच उलटून हातांतल्या चाबकाचे तडाखे घोड्यास मारण्याऐवजीं आम्हांलाच मारूं लागला! परंतु झाल्या गोष्टी विसरावयास मी तयार आहें. घारपुरे यांनीं त्याबद्दल क्षमा मागावी असेंहि मी म्हणणार नाहीं. त्यांनीं आपली दिलगिरी पुढील वर्तनांत नुसती निदर्शनास आणली तरी त्यांत मला समाधान आहे. संस्थेचा उच्छेद व्हावा अशी माझी इच्छा नाहीं. विनाकारण एकमेकांस नांवें ठेवल्यानें कार्याची हानी होते. अगोदर आपणाकडे माणसें थोडीं, त्यांत अशा उखाळ्यापाखाळ्या काढल्या तर आहेत हींच माणसें दूर होतील!

सरतेशेवटीं, या टिळकविद्यालयाच्या विद्यार्थ्यांसंबंधानें मला सांगावयाचें

आहे. खरा स्वार्थत्याग माझा नाहीं व घारपुऱ्यांचा तर नाहींच नाहीं. खरा स्वार्थत्याग जर कोणाचा असेल तर तो या टिळक महाविद्यालयांतील मुलांचा आहे! त्यांनीं हा सर्व वाद विसरून जावा व आपला वेळ उगाच सभा वगैरे भरविण्यांत खर्चूं नये. टिळक महाविद्यालयांतला मुलगा शिकला किती, इकडे सर्वांचें लक्ष लागून राहाणार हें लक्षांत ठेवा. यापेक्षां अधिक मला कांहीं सांगावयाचें नाहीं."

---

# ५३. विद्यार्थ्यांना उपदेश

( केसरी, १९२३ )

गुरुवार, ता. १८ रोजीं डेक्कन कॉलेजांत न. चिं. केळकर यांचें विद्यार्थ्यांपुढें व्याख्यान झालें. त्यांतील महत्त्वाचा भाग खालीं दिला आहे. "मी आज येथें आल्यावर मला एक नवीन गोष्ट कळली. लो० टिळक डेक्कन कॉलेजमध्यें असतांना ज्या खोलींत राहत असत ती खोली तुमच्यांपैकीं एकानें मला दाखविली. घ्यावें त्याप्रमाणें उलट द्यावें ही रीतच असल्याकारणानें मीहि आपणांस एक नवीन वाटेल अशी हकीकत सांगतों. १८८३-८४ सालीं डेक्कन कॉलेज हें अजीबात बंद करावें व तें 'नेटिव्ह' लोकांच्या ताब्यांत द्यावें अशी वरिष्ठ अधिकाऱ्यांना बुद्धि सुचली होती व ही गोष्ट अमलांत येती तर एकाद्या युरोपियन प्रिन्सिपालच्या ऐवजीं टिळक किंवा आगरकर हे या कॉलेजचे प्रिन्सिपाल झाले असते. आज सर्वच खात्यांत काटकसरीची जरूरी सरकारला भासत आहे व त्याप्रमाणें हें कॉलेज जर बंद झालें तर ती फार इष्ट गोष्ट होईल. सरकारशीं निदान या बाबतींत तरी आमचें एकमत आहे व तुम्हांलाहि ही गोष्ट पटण्याला मला हरकत दिसत नाहीं. स्वराज्याच्या चळवळीचा ओघ पाहतां प्रथम सरकारी कॉलेजें निमसरकारींत सामील होणें व त्यांचीं पुनः खाजगी राष्ट्रीय कॉलेजें होणें ही कालाच्या ओघानें होणारीच गोष्ट आहे.

आज हें कॉलेज ओस पाडावें म्हणून अर्थातच मी येथें आलों नाहीं. पण माझें मत तुम्ही होऊन विचारलेंत तर मी असें स्पष्ट सांगेन कीं,

'ज्यांना शक्य असेल त्यांनीं प्रथम टिळक–कॉलेजांत जाणें चांगलें; शक्य नसेल, त्यांनीं निमसरकारींत जावें, व ज्यांना प्रकृतीमुळें किंवा वडील माणसांच्या सक्तीच्या इच्छेनेंच या कॉलेजांत येणें भाग पडेल तेवढ्यांनीं नाइलाज म्हणून इकडे यावें. यदृच्छा किंवा परिस्थिति ही कोणासहि सुटत नाहीं, म्हणून मला कोणालाहि तोडून बोलवत नाहीं, किंवा दोष देववत नाहीं. तुम्ही या कॉलेजांत आहां म्हणून मी तुम्हांस दोष देणार नाहीं. परिणामीं तुम्ही सर्व आमचेच आहां व आमच्या कार्याला उपयोगी पडणारे आहां असा आमचा तुमच्यावर विश्वास आहे. सार्वजनिक कार्याकरितां शेंकडों रुपये तुम्ही येथून आम्हांला वेळोवेळीं दिले आहेत; मग तुम्ही आमचे नाहीं असें आम्हीं कसें म्हणावें? परभृत न्यायानेंच आम्ही तुमच्याकडे पाहतों. कोकिळा आपलीं अंडीं स्वतःच्या घरट्यांत ठेवीत नाहीं, दुसऱ्याच्या घरट्यांत ठेवून उबविते; पण तें अंडें कावळ्यानें उबविलें तरी अंडें फुटल्यावर बाहेर येणार ती कोकिळाच असणार! तुम्ही सरकारी शिक्षण-संस्थांतून युरोपियन प्रिन्सिपालच्या हाताखालीं शिक्षण घेतां, ही स्थिति आम्हाला आवडणारी नसली तरी तुम्हांवर आमचा गैरविश्वास असण्याचें काय कारण?

अशा स्थितींतहि तुम्हांवर जसा आम्ही विश्वास ठेवूं त्याप्रमाणें तुम्हीहि स्वतःबद्दल विश्वास बाळगला पाहिजे. अशाहि कॉलेजांतून पुढें एखादा टिळकांसारखा माणूस निर्माण होऊं शकतो हें विसरूं नका. मी तुम्हांला कांहीं तरी सांगतों असें नाहीं. ही गोष्ट खरीच आहे. तुम्ही या गोष्टीचा जरूर अभिमान बाळगा. -राष्ट्रीय कॉलेजांतलीं मुलें काय व तुम्ही काय, सर्व एकाच खाणींतली माती आहां. तुमची योग्यता त्यांच्याहून मी मुळींच कमी समजत नाहीं. महत्त्वाकांक्षा ठेवाल तर तुम्हांलाहि या परिस्थितींतून बाहेर आल्यावर मोठें होतां येईल. प्रत्येकाची पूर्वायुष्यांतील महत्त्वाकांक्षा सफल होतेच असें नाहीं. 'तुम्ही कोण होणार' म्हणून विचारलें असतां "मी न्यायाधीश होणार" असें सांगणारा परिस्थितीच्या प्रवाहांत सांपडून नवीन महत्त्वाकांक्षा उत्पन्न होऊन संपादक किंवा मुत्सद्दी होतो. पण याच्या उलट अशीं माणसेंहि दाखवितां येतील कीं, सरकारी व निम-सरकारी कॉलेजांतील विद्यार्थ्यांना बाहेर खेचण्याचा चंग बांधून अखेरीस

स्वतःच ज्यांनीं सरकारी संस्थांकडे प्रोफेसरी मिळण्याविषयीं अर्ज पाठविले ! तात्पर्य, मी अमुक होईनच म्हणून कोणी बढाई मारण्याचें कारण नाहीं. परंतु कोठल्याहि परिस्थितींत मनुष्य असला तरी स्वतःबद्दल योग्य महत्त्वाकांक्षा ठेवणें हें प्रत्येकाचें कर्तव्य होय, व ती तुम्ही या वयांत अवश्य जागृत ठेवली पाहिजे.

Saints have a past and Sinners have a future हें वाक्य खोलींतल्या भिंतीवर तुम्ही मोठ्या अक्षरांनीं लिहून ठेवा. 'सत्पुरुषांनाहि पूर्वेतिहास असतो तर अनेकवार चुकलेल्या पापी माणसांनाहि भविष्यकालाबद्दल सदाशा ठेवण्यास हरकत कोणती ?' ऋषींचें कूळ पाहूं नये अशी म्हणच आहे. स्वतःबद्दल निराश होण्याचें कोणास कधींच कारण नाहीं. जनता ही अत्यंत उदार आहे व थोड्याशा क्षुल्लक सेवेनेंहि ती एखाद्या माणसाचें पूर्ववृत्त सहज विसरून जाते. तुम्हीं देशाच्या खरोखरच उपयोगी पडलांत तर तुम्ही कोणत्या सरकारी शाळेंत केव्हां शिकत होतां हें तुम्हांला पुढें कोणी विचारणारहि नाहीं. टिळकांना कधीं कोणी दोष दिला काय, कीं तुम्ही सरकारी कॉलेजांत शिक्षण घेतलेंत म्हणून ? टिळकांनीं अशा प्रश्नास "त्या वेळीं खासगी कॉलेजच नव्हतें त्याला मी तरी काय करूं" असें उत्तर दिलें असतें ही गोष्ट वेगळी ! पण उलट तुम्ही "सरकारी कॉलेजांत शिक्षण घेऊनहि इतके मोठें झाला अं ? काय तुमची थोरवी !" अशी लोकांनीं टिळकांची प्रशंसाच केली असली पाहिजे.

पण, सत्पुरुषांना पूर्वेतिहास असतो व पापी माणसांना भविष्यकाळ असतो, ही म्हण तुम्हांला विशेषतः कां सांगूं इच्छितों ? कारण या वेळीं तुमच्या हातून पाप घडलेलें नाहीं व अशाच रीतीनें आयुष्यक्रम घालवून पुढें सत्पुरुषाच्या थोर पदवीस पोंचल्यावर आपल्या हातून पूर्वीं पाप घडलें होतें असा पश्चात्तापहि करावयाची वेळ तुम्हांस येणार नाहीं. आयुष्याच्या अशा संधिकालावर तुम्हीं उभे आहां, म्हणून या आयुष्याचा वेळ जितका होईल तितका विद्यार्जनाकडे तुम्हीं लावला पाहिजे; 'विद्वान्' ही कांहीं शिवी नाहीं भूषणच आहे. जग विद्वानांच्याच स्वार्थत्यागाला जास्त किंमत देतें हें लक्षांत ठेवा. माणूस स्वार्थत्यागी असेल, पण तो विद्वान् नसेल तर तो त्याच्या अंगीं दोषच आहे असें आपण म्हटलें पाहिजे. विद्वत्ता हें स्वार्थ

व परमार्थ यांचें एकच साधन होय. स्वार्थाची पात्रता माणसानें सिद्ध केल्यावरच त्याच्या परोपकाराला तेज चढतें. कवीनें म्हटलेंच आहे कीं, "विकारहेतौ सति विक्रियन्ते येषां न चेतांसि त एव धीराः" ज्याला विकारहेतूच नाहीं तो स्वार्थत्याग तरी कशाचा करणार व अशा स्वार्थत्यागाला विचारतो तरी कोण? विद्वत्ता हा सर्व जगांत उपयोगी पडणारा पासपोर्ट आहे. तो हस्तगत करणें हेंच तुमचें या वेळीं कर्तव्य आहे. स्वार्थत्याग करण्यालाहि पात्रता लागते व ती सर्वांना मान्य होईल अशा विद्वत्तेनेंच मिळते. म्हणून या वयांत तुम्हां सर्वांना मी एकच गोष्ट सांगेन कीं, '**विद्वान् व्हा.**'

---

# ५४. वैश्य-विद्याश्रम, सासवनें

( तारीख १२ आक्टोबर १९२३ )

[ श्री० तात्यासाहेब केळकर यांनीं ता. १२ रोजीं कुलाबा जिल्ह्यांत दौऱ्यावर असतांना वैश्य-विद्याश्रम, सासवनें या संस्थेस भेट दिली.

आरंभीं ईशस्तवन झाल्यावर तात्यासाहेब बोलावयास उठले. राजकारण हें स्वतःचें मुख्य कार्य असल्यामुळें राष्ट्रीय शिक्षणसंस्थांशीं व इतर संस्थांशीं आपला कोणत्या स्वरूपाचा संबंध असतो, याचा खुलासा करून व्याख्याते म्हणाले, ] "राजकीय कार्यांत पडणाऱ्या लोकांना इतर संस्थांमधून उपांग म्हणून बरेंच कार्य करतां येतें, व तसें कार्य माझ्या हातून थोडेंबहुत झालेलें आहे. 'वैश्य-विद्याश्रम' ही संस्था लोकाश्रयास पात्र असून टिळक महाराष्ट्र विद्यापीठाशीं या संस्थेचा संबंध जोडण्याचे कामीं मीं थोडीबहुत मदत केली आहे. राष्ट्रीय शिक्षण हें जरी माझें मुख्य कार्य नसलें तरी या बाबतींत मीं विचार केला आहे. व माझे विचार लौकरच लेखमाला लिहून मी प्रसिद्ध करणार आहें. नेहमीं असें सांगण्यांत येतें कीं, राष्ट्रीय शिक्षण म्हणजे सगळ्या राष्ट्राचें शिक्षण हातीं घेणें. पण वर्गण्या जमवून शिक्षण हातीं घेणें ही कल्पना कशी वेडे-

पणाची व खोटी आहे, हें सप्रमाण सिद्ध करून दाखवितां येण्यासारखें आहे. सध्यां राष्ट्रीय शिक्षणाचा प्रयोग झाला पाहिजे. स्वराज्याची चळवळ जोरानें चालवून त्याबरोबरच स्वराज्यप्राप्तीनंतर कोणत्या नमुन्याचें शिक्षण द्यावें, याचें प्रयोगहि तितक्याच जोरानें झाले पाहिजेत. शेतीचा दृष्टान्त घेतला तर बीं पेरून रोप उगवल्यावर तें उपटून चिखल केलेल्या जागीं नेऊन लावल्या-खेरीज फलनिष्पत्ति होणें शक्य नाहीं. त्याप्रमाणें आज राष्ट्रीय शिक्षणाचे प्रयोग झाले, तरी स्वराज्यप्राप्तीवरच त्यांचें यश अवलंबून राहणार. तर असें राष्ट्रीय शिक्षणाचें काम तुम्हां राष्ट्रीय शिक्षणप्रसारकांचें, व त्या नमुन्याचा प्रसार व्हावा म्हणून चळवळ करून शिक्षणाचें खातें हस्तगत करून घेण्याचें काम आमचें; प्रयोगासाठीं अशा संस्थांतून पांचच मुलें जरी पूर्ण स्वावलंबी बनून बाहेर पडलीं, तरी राष्ट्राला खरा लाभ झाला असें म्हणतां येईल. ज्या संस्थेचें नांव घेऊन मुलगा बाहेर पोट भरील तीच संस्था यशस्वी असें म्हणतां येईल. आपली ही संस्था या पद्धतीची आहे, असें दिसतें. कारण, वैश्यसमाजाला स्वतंत्र बुद्धि असून आर्थिक व्यवहार करणें, हें त्यांचें ध्येय आहे. तेव्हां अशा स्वतंत्र संस्थांच्या बाबतींत तुम्हांला यश मिळणें सुलभ आहे. कृषी, गोरक्षण, वाणिज्य हीं वैश्यांचीं स्वाभाविक कर्मे आहेत. 'गोरक्षण' मी कोठल्या तरी पोटांत घालतों. आणि तुमच्या या संस्थेनें देशांतील कृषी व वाणिज्य सांभाळणारी पिढी उत्पन्न केली, तरी मोठें कार्य होणार आहे. मला सुशिक्षित वाणी व सुशिक्षित शेतकरी पाहिजेत. सर्वांनींच वडिलार्जित धंदा करावा अशी सक्ति नसावी; तरी पण वडिलार्जित धंद्यांतच यशःप्राप्तीचा संभव जास्त असतो."

सरतेशेवटीं केसरी—मराठा संस्थेतर्फे शंभर रुपयांची देणगी वैश्य-विद्या-श्रमास अर्पण केली असल्याचें सांगून तात्यासाहेब केळकर यांनीं आपलें भाषण संपविलें.

---

# ५५. राष्ट्रीय शिक्षण

( सांगली, तारीख २६ जुलई १९२३ )

[ तारीख २६ रोजीं सांगलीस तात्यासाहेब केळकर यांचें सायंकाळीं ६ वाजतां श्री० केशवराव छापखाने यांचे अध्यक्षतेखालीं सदासुख थिएटरांत "राष्ट्रीय शिक्षण" या विषयावर दीड तास सुश्राव्य व्याख्यान झालें. थिएटर व्यापारी, विद्यार्थी व वकील यांनीं अगदीं भरून गेलें होतें. स्त्रीसमाजहि बराच जमला होता. व्याख्यानास सुरवात करतांना तात्यासाहेब म्हणाले, ] "टिळक महाविद्यालय माजी विद्यार्थी—संघातर्फे टिळक सप्ताहांत टिळक महाविद्यालयाच्या मदतीकरितां या भागांत मदत मिळविण्याविषयीं विनंति केल्यावरून मीं येथें आलों आहें. राष्ट्रीय शिक्षणाचा इतिहास राजकारणाशीं निगडित आहे. साधारणपणें राष्ट्रीय शिक्षणाचा उगम न्यू इंग्लिश स्कूलचे स्थापनेचे वेळीं आहे, असें म्हणतां येईल. आज कालांतरानें त्यांत थोडाबहुत फरक पडला हें खरें; परंतु तत्त्वत: तोच उगम असें म्हणतां येईल. राष्ट्रीय शिक्षणाचें मुख्य अंग म्हणजे "सर्वस्वीं स्वतंत्र" या शब्दांनीं व्यक्त करतां येईल. नंतर मध्यम भाषा कोणती असावी, शिक्षण कसें असावें, शिक्षक कोण असावेत, पदव्या कोणच्या असाव्या, वगैरे अनेक दृष्टींनीं त्याचा विचार करतां येतो. सरकारी शिक्षणाशीं स्पर्धा करण्याकरतांच राष्ट्रीय शिक्षणाचा उपक्रम आहे, असें म्हटलें असतां बिघडणार नाहीं. न्यू इंग्लिश स्कूलच्या इतिहासावरून जितका व्याप अधिक तितकी भावनेची तीव्रता कमी व स्वतंत्र वृत्ति कमी होते, ही गोष्ट दिसून येते. परंतु शाळेचें कॉलेज केल्यावर चालक मंडळींना हें स्वातंत्र्य राखूं अशी उमेद होती. आज शिक्षणाचा किल्ला सरकारच्या हातीं आहे तो आमच्या हातीं आला म्हणजे राष्ट्रीय शिक्षणाचा बराचसा प्रश्न सुटल्यासारखा आहे. पुष्कळ लोक विचारतात कीं, तुमच्या शिक्षणांत व सरकारी शिक्षणांत फरक काय ? परंतु असलेला फरकहि जरी बाजूला ठेवला, तरी देखील शिक्षण देण्यामध्यें जी भावना, जें ध्येय व जी फलश्रुति असते, तींतच मुख्य फरक आहे. राजकीय चळवळीपासून निराळ्या स्वरूपांत राष्ट्रीय शिक्षणाचा प्रश्न बंगालच्या चळवळीपासून प्रामुख्यानें पुढें

आला व त्याप्रमाणें अनेक संस्थाहि त्या वेळीं स्थापन झाल्या. त्यांत समर्थ विद्यालयासारखी दुय्यम शिक्षण देणारी संस्था लो० टिळकांनीं काढली व बंगाल्यांत तर कॉलेज निघालें. त्याचाच हा परिणत परिणाम आहे कीं, आज राष्ट्रीय विद्यापीठहि स्थापन झालें आहे. या प्रत्येक चळवळीचे वेळीं राष्ट्रीय शिक्षणाच्या कल्पनेची अयशस्विताच सिद्ध होत गेली. न्यू स्कूल, बंगालची चळवळ व म० गांधींची चळवळ, या तीनहि प्रसंगीं वरील अनुभव आला आहे. तरी देखील समुद्राची लाट मागें आली, हें ओहोटीचें लक्षण नसून भरतीचेंच लक्षण आहे. कारण वरील इतिहासावरून राष्ट्रीय शिक्षणाची वृद्धीच होत आहे, हें दिसून येईल. याशिवाय दोन तीन गोष्टीहि आज नाहीं उद्यां झाल्याशिवाय राहत नाहींत. मुंबईची युनिव्हर्सिटी ही उद्यां लोकपक्षाची होणार, याविषयीं माझी अगदीं खात्री आहे. त्याचप्रमाणें सरकारचें जें शिक्षणखातें तेंहि लोकपक्षाच्या हातीं येईल व हें स्पर्धेचें अंतर कमी होत जाईल. उदाहरणार्थ, विलायतेंत सरकारी नियंत्रणाखालची अशी युनिव्हर्सिटी नाहीं. इतकें असूनहि तेथें हजारों विद्वान् पदवीधर आहेत. मग येथेंच सरकारी व राष्ट्रीय असा भेद कां ? मद्रास इलाख्यांतच सरकारी हायस्कूल नाहीं ! मग काय शिक्षण होत नाहीं कीं काय ? विलायतेंत कोणतीहि शिक्षणसंस्था जी असते, ती सरकारी सत्तेवर अगर मदतीवर नसून तिला सर्व लोकांनीं दिलेल्या व तिनें मिळविलेल्या गुणांवर जगते व म्हणूनच हल्लीं असलेल्या युनिव्हर्सिटीच्या मागें असलेलें जें सरकारचें ( Prestige ) स्तोम आहे, तें पहिल्याप्रथम मोडण्याच्या कल्पनेचीहि प्रगति म्हणजेच राष्ट्रीय शिक्षणाचा इतिहास होय. टिळक महाविद्यालयाचीच गोष्ट घेऊं. आज संस्था अगदींच लहान आहे हें खरें. राष्ट्रीय शिक्षण पूर्णपणें केव्हां हातीं येईल, याचें उत्तर स्वराज्य हातीं येईल तेव्हांच, असें द्यावें लागेल. मग तोंपर्यंत राष्ट्रीय शिक्षणाचा प्रश्नच हातीं घ्यावयाचा नाहीं कीं काय ? म्हणूनच हा प्रश्न आज क्षुद्र दिसत असला तरी तो हातीं घेणें प्राप्त आहे. कोणत्याहि मोठ्या कार्याचा उगम हा लहानच असतो. म्हणून हें कार्य पुढें मोठें होणारच नाहीं काय ? केंब्रिज किंवा ऑक्सफोर्ड या युनिव्हर्सिट्यांना सरकारचें अधिष्ठान नसतांना इतकें महत्त्व आलें कसें ? तर त्यांच्या मागें विद्यार्थी, पैसा, काळ व

शिक्षणाचा उत्कृष्टपणा यांची मोठी परंपरा आहे. ही परंपरा आम्हांला निर्माण करावयाची आहे; परंतु ही परंपरा निर्माण करतांना जुन्या शिक्षण-पद्धतीला दारूचे गुत्ते असें म्हणणें मला अगदीं पसंत नाहीं. हा पहिला फरक. दुसरा फरक म्हणजे विद्यार्थी जुन्या कॉलेजांतून बाहेर काढण्याचे वेळीं बेजबाबदारपणानें सरांस आग्रह न धरतां जे विद्यार्थी आत्मस्फूर्तीनें बाहेर येतील, तेवढेच मला पुरेसे वाटले व तेवढ्यांचीच चांगली सोय लावणें हें माझें कर्तव्य असें मला वाटलें व याकरतां मीं लोकांच्या शिव्याहि सहन केल्या. तिसरा फरक असा कीं, शिक्षणाकरितां लहान मुलें न घेतां कॉलेज-मधील प्रौढ विद्यार्थी घ्यावेत असें मला वाटतें. खर्च व परिणाम या दोन्ही दृष्टींनीं मी म्हणतों या गोष्टीचा आपण विचार करा. समर्थ विद्यालयाचें उदाहरण आपल्यापुढें आहेच. परंपरा निर्माण करावयाची असें मी म्हणतों, त्या दृष्टीनेंहि वरील विचारसरणी आपणांस पटेलसें वाटतें व म्हणूनच राष्ट्रीय शिक्षणाचें कॉलेजच काढावें व त्याची परंपरा राखण्याकरतां युनि-व्हर्सिटीच असणें जरूर आहे असें दिसून येईल. मुंबईच्याच युनिव्हर्सिटीची गोष्ट घ्या. तींत कांहीं युरोपियन, कांहीं तत्सम पार्शी व खिश्चन व उरलेले इतर. हे लोक आमच्या शिक्षणाला काय मदत करणार? व देशी भाषेच्या द्वारें शिक्षण द्यावें, असें ते काय म्हणणार? इतक्या वर्षांच्या झगड्यानंतर युनिव्हर्सिटींत आज मातृभाषांचा नुसता प्रवेश झाला आहे! हल्लीं काय झालें आहे? तर शिकवा मराठींतून, पण परीक्षा मात्र म्हणे इंग्रजींतून! म्हणून या युनिव्हर्सिटीची जी ही मायावी इभ्रत पसरली आहे, ती मोडून आपणांस आज नवी परंपरा निर्माण करावयाची आहे. याकरतां एक-प्रकारचा संकेत निर्माण केला पाहिजे. विद्येचें एक प्रमाण उपजीविका असें समजूं. मग असे किती तरी धंदे आहेत कीं, येथें पदवी न घेतां शेंकडा ९५ लोक आज जगत आहेत. मग तीहि विद्या कां म्हणूं नये? व या हल्लींच्या निष्फळ विद्येचा कां नाश करूं नये? यांत कोणता घातपात आहे? इंग्लंडनें देखील युद्ध जिंकलें, तें पदवीधरांच्या मंत्रिमंडळाच्या बुद्धिबळावर नव्हे तर देशांतील इतर कर्तृत्ववान् लोकांच्या शहाणपणावर जिंकलें. तेव्हां नुसत्या पदवीवर न जातां मी व्यवहाराला अधिक महत्त्व देतों, असे लोक जर युनिव्हर्सिटीच्या सेनेटमध्यें घेतले तर काय दोष? व अशा निष्णात लोकांनीं

दिलेल्या पदव्या आम्हीं मानाव्या कीं नाहीं ? ही अब्रू पदवींत नाहीं तर ती देणाऱ्यांच्या कौशल्यावर आहे व हाच संकेत आपण केला पाहिजे आणि ही इभ्रत आपणच वाढविली पाहिजे. या पद्धतीचें शिक्षण घेणारे विद्यार्थी, त्यांना नोकऱ्या देणारे व मानणारे लोक आणि त्यांचा संतोष, ह्याच गोष्टी ही परंपरा वाढविण्यास पुरेशा आहेत. सरकारच्या इतका आपल्याजवळ पैसा नाहीं व तितके विद्यार्थीहि नाहींत. एक शंभर विद्यार्थी जरी अशा या स्वतंत्र युनिव्हर्सिटींतून बाहेर पडले तरी नाहीं का आपल्याला कौतुक वाटणार ? सरकार हल्लींचीं बंधनें व दोष काढून टाकणार नाहीं कारण आज त्यांना हवे तितके विद्यार्थी मिळतात. मग आपण नको का ही अडचण दूर करावला ? हिंगणें युनिव्हर्सिटीचीच गोष्ट घ्या. तिकडे काय कमी आहे ? पुष्कळ पैसा, उत्तम शिक्षक, मोठाल्या इमारती सर्व कांहीं आहे. पण मुली कुठें आहेत ? कारण त्याला सरकारी अधिष्ठान नाहीं ! येवढ्याकरतांच आपणा सर्वांचा संकेत पाहिजे असें मी म्हणतों. प्रारंभ जरी लहान आहे, तरी त्यांतील तत्त्व फार मोठें आहे. ह्या पदवीधरांना आपण चहाणें हें आपलें कर्तव्य व त्यांनीं समाजाची अब्रू वाढविणें हें त्यांचें कर्तव्य, असें हें परस्परावलंबी आहे. आपण केलेल्या मदतीबद्दल मी आपला फार आभारी आहें. "

[ अध्यक्षांनीं थोडक्यांत सुंदरसा समारोप केल्यावर सांगलीतर्फे टिळक-महाविद्यालयास १५०० रुपयांवर मदत मिळाल्याचें जाहीर करण्यांत आलें. टाळ्यांच्या प्रचंड कडकडाटांत सभेचें काम संपलें. ]

---

# ५६. प्रासंगिक उद्गार

[ असहकारितेमधील स्वानुभव व कांहीं अप्रसिद्ध हकिगती यांसंबंधीं हें टांचण टिळक-महाविद्यालयाच्या एका माजी विद्यार्थ्यानें आमचेकडे प्रसिद्धीस पाठविलें आहे, त्यांतील महत्त्वाचा भाग येथें देत आहों. ]

ज्या दिवशीं टिळक महाविद्यालय सुरू झालें त्या, म्हणजे अगदीं पहिल्या दिवशीं, प्रथमतः शिक्षक व विद्यार्थी यांची समोरासमोर मुलाखत

झाली. सुमारें ५०।६० विद्यार्थी हजर होते. त्या प्रसंगीं गुरुवर्य तात्यासाहेब केळकर, आपटे, करंदीकर वगैरे सर्व शिक्षक हजर होते. प्रास्ताविक भाषणांत गुरु० करंदीकर यांना पूर्वीं सरकारच्या जुलमी वटहुकुमानें आपणांस समर्थ विद्यालय कसें मोडावें लागलें व मुलांप्रमाणें काळजी घेतलेल्या विद्यार्थ्यांची स्वतःला पालकांकडे कशी रवानगी करावी लागली याचें स्मरण होऊन क्षणभर गहिंवरून आलें व त्याचा परिणाम विद्यार्थ्यांवरहि झाल्याशिवाय राहिला नाहीं. सरतेशेवटीं तात्यासाहेब यांनीं भाषण केलें त्यांत त्यांनीं जी विद्यार्थ्यांस सावधगिरीची सूचना केली त्याचा गंभीरपणा मला अजूनहि चांगला स्मरतो. ते म्हणाले, "तुम्ही व आम्ही दोघांनीं मिळून आज हा उपक्रम सुरू केला आहे. याचा गंभीरपणा कायम ठेवणें हें तुमचें काम आहे. तुम्ही आतां टिळक कॉलेजांतील विद्यार्थी आहां ही गोष्ट लक्षांत ठेवा, म्हणून चारचौघांत असतांना किंवा एखाद्या सार्वजनिक प्रसंगीं, ज्यावेळीं तुमच्याबद्दल किंवा तुमच्या या कॉलेजाबद्दल जेव्हां कोठें हास्यास्पदता उत्पन्न होण्याचा प्रसंग असेल त्या त्या वेळीं तुम्हीं आपल्या गंभीरपणानें त्यावर दाब ठेवला पाहिजे. जे आतां हंसतील त्यांचे दांत दिसतील. He who laughs last laughs best हें वाक्य लक्षांत ठेवा. आतां क्वचित् कोणी तुम्हांला हंसतील तरी पुढें मागें तेच तुमचें कौतुक केल्याशिवाय रहावयाचे नाहींत !"

* * *

सन १९२२ सालीं कौन्सिलवाद हा निंदेच्या दृष्टीनें अगदीं भराला आला असतां पां. वा. गाडगीळ यांचें महाविद्यालयांत "कौन्सिल-प्रवेश" या विषयावर व्याख्यान झालें. त्या प्रसंगीं अध्यक्ष या नात्यानें भाषण करतांना केळकर म्हणाले, "कौन्सिलप्रवेश हा राजकारणांतील विषय होय. अर्थात् या प्रसंगीं या विषयावर माझें मत तुम्हांस कळावयास पाहिजे असलें तरी मी तें तुम्हांस येथें सांगणार नाहीं. वर्तमानपत्रें किंवा जाहीर-सभा यांतून आम्हांला आमचीं मतें मांडून मतप्रचार करतां येतो. म्हणून तुम्हांला माझें मत माझ्या तोंडून मांडलेलें ऐकण्याची इच्छा असली तरी गुरु व शिष्य या नात्याचा मी या प्रसंगीं असा फायदा घेणार नाहीं ! भिन्नमतांची बाहेर धुमश्चक्री चालली असतां स्वतःचा किंवा कोणताहि

मतप्रचार करण्याचें योग्य स्थान कॉलेज हें नव्हे. तुम्हांला माझें मतच पाहिजे असलें तर तें सभांतून कळेल किंवा खाजगी रीतीनें मताकरितां माझ्याशीं भांडायला या म्हणजे मी आपलें मत सांगेन. अशा चालून आलेल्या प्रसंगाचा फायदा घेऊन मी आपलें मत तुम्हांस पटविणें हें मला बरोबर वाटत नाहीं."

* * *

१९२२ सालीं झालेल्या टिळक महाविद्यालयाच्या संमेलनाचे अध्यक्ष या नात्यानें भाषण करतांना ते म्हणाले, " दोन वर्षांपूर्वी आम्हीं हें कॉलेज काढलें त्यावेळीं या कॉलेजांत येणारे तुम्ही पहिले विद्यार्थी आहां; थोड्यांच दिवसांत शिक्षणक्रम संपवून तुम्ही घरोघरीं जाल. येथें येऊन तुम्ही जे बरेवाईट अनुभव घेतले असतील ते तुम्ही सहजच विसरून जाल, पण या विद्यालयासंबंधींची स्मृति मात्र तुमच्या मनांत अखंड कायम राहील, व ती ठेवावीशीं वाटेल. तुमच्या पुढील आयुष्यक्रमाला उपयुक्त व्हावें अशा दृष्टीनेंच येथें तुम्हांस शिक्षण दिलेलें आहे, तें तुम्हांस कितपत उपयोगी पडतें किंवा त्याचा तुम्ही काय उपयोग करतां हें पुढें ठरावयाचें आहे. पण तुमच्या विद्वत्तेसंबंधानें किंवा अभ्यासासंबंधानें तुम्हांस एक गोष्ट सांगावयाची आहे ती ही कीं स्वतः विद्वत्तेपेक्षां विद्वत्तेचा सदुपयोग हाच श्रेष्ठ होय. विद्वत्तेसंबंधानें तीन प्रकार आढळतात. A crafty man hates learning, a simple man admires learning, but a wise man *uses* learning. अंगीं असलेल्या विद्वत्तेचा सद्यःपरिणामी किंवा सद्यःफलदायी उपयोग केलात तर उपयोग; नाहींतर भाराभर पुस्तकें वाचून नुसता कापूस पिंजला, पण उपयोगाच्या दृष्टीनें त्यांतून बोटभरहि सूत निघालें नाहीं तर काय उपयोग ? "

* * *

१९२३ सालीं कॉलेजमध्यें नवीन मुलें आलीं व कॉलेज सुरू होण्याच्या पहिल्या दिवशीं विद्यार्थ्यांपुढें त्यांनीं प्रास्ताविक भाषण Opening speech केलें. याप्रसंगीं बरेच माजी विद्यार्थी कुतूहलानें हजर राहिले होते. त्यांपैकीं बऱ्याच जणांनीं महाविद्यालयासंबंधीं आपलें अनुभव सांगितले. त्यांपैकीं एका




विद्यार्थ्यानें असें बोलून दाखविलें कीं, " येथील कांहीं शिक्षकांची भावना आमच्याबद्दल जशा प्रकारची असावयास पाहिजे तशी ती असत नाहीं. निर्जीव द्रव्यावर जसा रासायनिक प्रयोग करून पाहातात त्याप्रमाणेंच हाहि एक राष्ट्रीय शिक्षणाचा 'प्रयोग' आपण विद्यार्थ्यांवर करून पहात आहों असें त्यांना वाटतें ! ' यानंतर अध्यक्ष या नात्यानें तात्यासाहेब केळकर यांनीं भाषण केलें. ते म्हणाले, " आजच्या प्रसंगीं नवीन विद्यार्थ्यांबरोबर बरेच जुने विद्यार्थीहि या समारंभास आलेले दिसत आहेत. म्हणून या कॉलेजसंबंधीं त्यांना जें कांहीं वाटतें तें त्यांनीं अगदीं मोकळ्या मनानें सांगावें, अशाकरितां त्यांनींहि बोलावें असें मीं प्रथम सांगितलें. त्याप्रमाणें अनेकांनीं आपले अनुभव सांगितले. त्यांपैकीं बऱ्याचजणांचे अनुभव समाधानकारक आहेत हें ऐकून मला बरें वाटलें. परंतु तुमच्यापैकीं एकानें न कळत ' प्रयोग ' हा जो शब्द वापरला तो जरा मला थोडा लागला. यांत त्याची कांहीं चूक नाहीं. विशेषतः कोणाला उद्देशून किंवा कोणत्या गोष्टीला अनुलक्षून त्यानें हा शब्द वापरला असेल हें मला माहीत नाहीं. पण तें कसेंहि असलें तरी, ज्या भावनेनें आमच्यावर विश्वास टाकून तुम्ही येथें आलां त्याच भावनेनें आम्ही तुम्हाशीं वागलें पाहिजे ही गोष्ट कोणींहि नाकबूल करणार नाहीं. याहून वेगळ्या रीतीनें जर येथें कोणी वागत असेल तर उघडच तें दोषास्पद ठरेल. बेडकाची चिरफाड प्रयोगाकरितांच होत असते; पण ती होतांना त्या बिचाऱ्याला ज्या प्राणांतिक वेदना होत असतात त्याकडे मात्र प्रयोग करणारा दुर्लक्ष करतो ! इतकें विकृत स्वरूप अशा भाषेनें जरी बाहेर एखाद्या टीकाकारानें रंगविलें तरीहि तें योग्यच ठरेल !

असो. या प्रयोगासंबंधानें मला इतकेंच म्हणावयाचें कीं, जीं मुलें या कॉलेजांत आज नव्यानें आलीं तीं हा प्रयोग पाहून आपण होऊनच येथें आलीं. त्यांना या असें आम्हीं सांगितलें नाहीं. तेव्हां यापुरती तरी त्यांची जबाबदारी आम्हांवर नाहीं. जे जुने विद्यार्थी आहेत त्यांनीं आमच्या सांगण्यावरून कॉलेज सोडलें. व त्यांच्याबद्दल आम्ही उघडच जबाबदार आहों. पुढच्या भावी आयुष्यक्रमाला उपयोगीं असें विशिष्ट कांहींतरी शिक्षण प्रथमपासूनच येथें देण्याचें ठरविलें आहे. त्यांपैकीं ज्यांनीं त्याचा या दृष्टीनें खरा उपयोग करून घेतला असेल त्यांना तें शिक्षण पुढें किती

उपयोगीं पडतें किंवा त्याचा ते किती उपयोग करतात तें दिसावयाचें आहे. व हें ऐच्छिक शिक्षण अजूनहि अपुरें पडतें असें दिसल्यास वाटल्यास तुम्ही सांगाल त्या त्या विषयांत अजूनहि एक वर्षभर तुम्हांला शिक्षण देण्याची आम्ही व्यवस्था करूं. ज्यांनीं हें शिक्षणच प्रथमपासून अशा दृष्टीनें घेतलें नसेल त्यांच्याबद्दल मात्र नाइलाज आहे. तुम्हांला भावी आयुष्यक्रमाला उपयोगीं पडावा अशा सद्धेतूनेंच हा प्रयोग आम्ही तुमच्या सल्ल्यानेंच केला. अठरा वर्षांच्या आंतील मुलांची जबाबदारी मी घेतली नाहीं ! जाणत्या मुलां-करितां म्हणूनच हें कॉलेज काढलें व पुढें काय ? हा तुमचा प्रश्न तुम्हाला सोडवितां यावा म्हणून आम्हीं प्रामाणिक प्रयत्न करून पाहिला. याहि उपर ज्यांना खरोखरीच असें वाटत असेल, कीं हा प्रयोग फसला त्यांनीं खुशाल तसें म्हणावें. त्याला काय करणार ? पण अशा विद्यार्थ्यांच्या दृष्टीनेंहि मी सांगतों कीं, आम्ही दिलेलें शिक्षण व तुम्ही घेतलेले श्रम व्यर्थ गेले असें जरी घटकाभर मानलें तरी, तुम्हीं पुढील प्रश्न सोडविण्यास जो मार्ग शोधून काढाल किंवा सुचवाल त्यामध्यें तुम्हांस हवीअसेल ती मदत देण्यास आम्हीं तयार आहों. घटकाभर मी तुम्हांस असेंहि सांगेन कीं, हा प्रयोग फसला असें तुम्ही म्हण-ण्यांत एकट्या आमचीच फजिती होते असें नाहीं, तुमचीहि होते. आपण दोघांनीं मिळून हा प्रयत्न करून पाहिला. साधलें तर यांत दोघांनाहि भूषण; फसलें तर दोघांचीहि फजिती ! म्हणून प्रयोग साधला किंवा फुकट गेला हा विचार पुढील आयुष्यक्रमाच्या दृष्टीनें क्षणभर मनाशीं केला तरी, फसला म्हटल्यानें तुमचा पुढील प्रश्न सुटत नाहीं ! म्हणून प्रश्न सोडविण्याच्या दृष्टीनें जो विचार तुम्ही ठरवाल त्यांत तुम्ही मागाल व आम्हांला जी शक्य, ती मदत आम्हीं आनंदानें देऊं.

ज्यांनीं या कॉलेजांत शिक्षण घेतलें नाहीं, परंतु इकडच्या परीक्षेला बसून पदवी घेतली त्यांचेंहि बरें चाललें आहे हें उदाहरणादाखल मला सांगावेसें वाटतें. अशा विद्यार्थ्यांपैकीं म्हणजे, वि. प्र. लिमये, खाडिलकर व केळकर हे होत. केळकर, यांनीं सरकारी एंजिनीअरिंग कॉलेजांत शिक्षण घेतलें; पण पदवी येथें घेतली. तसेंच नुकताच दवाखाना उघडलेले डॉक्टर लागू झाडावर पिकून तयार झालेलें फळ जसें तोडून घ्यावें, तसें या मुलानें मेडिकल कॉलेजांत पांचव्या वर्षात असतां तें कॉलेज सोडलें व इकडची

पदवी घेतली ! त्यांचा दवाखाना चांगला चालला आहे हें ऐकून मला फार बरें वाटलें. देव त्यांचे पुढेंहि असेंच बरें करो !

* * *

मला आतां क्षणभर गहिंवरून आलें याचें कारण मुलांच्याबद्दल मला वाटत असलेली एक प्रकारची प्रेमबुद्धि होय. त्यामुळें माझ्या हातून कोणाहि विद्यार्थ्यांचें नुकसान होऊं नये असें मला नेहमीं वाटतें. म्हणून सर्वांना सरसकट कॉलेज सोडा असें मला तोंडून सांगतां येत नाहीं. हा माझ्यांत दोष आहे असेंहि वाटल्यास म्हणा.

कित्येकांनीं आम्हांस पुढें नोकऱ्या मिळणार नाहींत असें सांगितलें. नोकरीच्या लायकीला या पदवीपेक्षां सरकारी युनिव्हर्सिटीची पदवी थोडी अधिक उपयोगी पडेल यांत शंका नाहीं. पण शेंकडा सरकारी नोकऱ्या तरी किती आहेत ? त्या पांचाहून अधिक नाहींत. सध्यां मुंबई युनिव्हर्सिटीच्या बी. ए. ना तरी नोकऱ्या कोठें मिळतात ? याचीं अनेक उदाहरणें दाखवितां येतील. त्यांनाहि कोठें इकडे तिकडे खासगी नोकऱ्याच पहाव्या लागत आहेत. तुमच्या आमच्या प्रयत्नानें त्या तुम्हांसहि मिळूं शकतील. व्यापारविषयाची पदवी मिळालेल्या येथल्या कोणाहि विद्यार्थ्यास एखादा व्यापारी आपल्या दुकानांत हाताखालीं ठेवण्यास कमी मानणार नाहीं. सरकारी पदवी न मिळाल्यामुळें आजची स्थिति पाहतां तुमचें पांच किंवा दहा टक्के नुकसान झालें आहे इतकें मी कबूल करतों; पण त्या पदवीऐवजीं तुम्ही ही पदवी घेतलीत यामुळें तुमचें यापेक्षां जास्त नुकसान झालें किंवा सर्वस्व बुडालें असें मानण्याला मी तयार नाहीं. तुमचें जें थोडेंसें नुकसान झालें आहे तें तुम्हीं मनांत आणलेंत तर तुम्हांला थोड्याफार श्रमानें भरून काढतां येईल व मग दर्जा या दृष्टीनें त्यांच्यांत व तुमच्यांत फरकहि राहणार नाहीं.

* * *

## ( टि. म. वि. चें वार्षिक संमेलन )

" आजचा हा दिवस आनंदाचा आहे. आपल्या या संस्थेचें पाऊल दर वर्षी निश्चितपणें पुढेंच पडत आहे. आपल्यापुढें स्वतंत्र बाण्याचें शिक्षण देण्याचें काम आहे व हाच आमचा इतर शिक्षणसंस्थांपेक्षां विशेष आहे.

आमच्या या शिक्षणसंस्थेंतील उणीवांची मला जाणीव आहे. परंतु पूर्ण सुधारणा तरी कोठें दृष्टीस पडते ? पन्नास वर्षांपूर्वीपासून पाश्चात्य राष्ट्रांतील विद्वान् लोक तत्कालीन शिक्षणक्रमाविषयीं ओरड करीत आहेत. परंतु आज तरी त्यांच्या शिक्षणसंस्थांतून दोष नाहींत, असें थोडेंच आहे! उदार शिक्षणाचे साचे जे पूर्वी ओतलेले आहेत त्यांचेंच अनुकरण आपल्याकडे सर्वत्र होत आहे. मग सुधारणा व्हावी कशी ? किंबहुना उदार शिक्षण म्हणजे काय हेंच अद्यापहि एकमतानें ठरलेलें नाहीं. माझ्या मतें इंग्लंडमधील प्रसिद्ध शिक्षणविषयक तज्ज्ञ प्रो. हक्स्ले यांनें जी उदार शिक्षणाची व्याख्या केली आहे ती पुष्कळांशीं बरोबर आहे. तो म्हणतो कीं, ज्या शिक्षणानें मनुष्याला सदिच्छा-शक्तींचा गुलाम बनतां येतें, ज्याच्या योगानें मनुष्याची विवेचकशक्ति अत्यंत सूक्ष्म बनते व वेळ पडल्यास जी स्थूलस्वरूपाचेंहि यथार्थ ग्रहण करूं शकते, ज्याच्या योगानें मनुष्य शांत व विवेकशील बनूं शकतो व ज्या शिक्षणाच्या योगानें तो प्रवृत्तिपर सुखलालसा व निवृत्तिपर वैराग्य या दोहोंचाहि त्याग करून, योग्य असा व्यवहारोपयोगी मध्यम मार्ग काढूं शकतो तेंच खरें उदार शिक्षण होय. वरील व्याख्या थोडीशी ध्येयात्मक जरी वाटली, तरी शिक्षणाचें ध्येय निश्चित करण्याच्या बाबतींत ती अचुक आहे यांत शंका नाहीं. वर जी उदार शिक्षणाची (liberal education) व्याख्या व तदंगभूत उपयुक्तता दिली आहे त्यांपैकीं आपणांस हल्लींच्या शिक्षणांत काय दिसत आहे? काव्य, इतिहास अगर भूगोल यांनीं शिक्षणाचें खरें कार्य कधींहि साधणार नाहीं. हल्लींच्या शिक्षणपद्धतींतून शिक्षण घेतलेल्या पदवीधराचीच गोष्ट घेऊं. त्याच्या भाराभर पुस्तकी ज्ञानाच्या मानानें तो व्यवहारांत किती नापास ठरतो हें आपण पहातोंच. एकतर त्याला आपल्या ठराविक शिक्षणापलीकडे इतर व्यवहारांचें मुळींच ज्ञान नसतें आणि दुसरें असें कीं, इतर अनेक धंद्यांपैकीं कोणचाहि धंदा करण्याची त्याची तयारी नसते. म्हणजे तो जगाच्या बाजारांत कवडीमोल असतो. असें कां तर या शिक्षणपद्धतीच्या योगानें एकप्रकारचा प्रवाह बनत जातो; आणि एकदां तो प्रवाहपतित झाला म्हणजे त्याला एकसारखें वहावतच जावें लागतें. याचकरतां युनिव्हर्सिटी एक्स्टेन्शन लेक्चर्सची पद्धति फार चांगली. त्याच्या योगानें मनुष्याला अनेक विषयांचें थोडेंबहुत ज्ञान झालेलें असतें व त्यापैकीं ज्या गुणाचा

विशेष उत्कर्ष होईल तिकडे तो जाऊं शकतो. यावरून असें म्हणतां येईल कीं, जितकें एखाद्याच विषयांतील अगर धंद्यांतील मनुष्याचें प्रावीण्य अधिक तितका तो इतर व्यवहारांत अगर धंद्यांत अधिक नालायक! हें म्हणणें थोडेसें विरोधाभासासारखें वाटेल; परंतु वस्तुस्थितीचा थोडा विचार केला कीं, आपणांस तें बरोबर असल्याचेंच आढळून येईल. कायद्याची परीक्षा पास झालेला मनुष्य वकिलीच करण्याकरतां सर्व धडपड करील. मग त्याची वकिली नाहीं चालली तरी चालेल! परंतु कायद्याची परीक्षा पास झाली म्हणजे तेवढें ज्ञान मीं मिळविलें, त्याच प्रवाहांत वहात गेलें पाहिजे असें नाहीं, हें कांहीं त्याला कळत नाहीं. परीक्षापद्धतीचा हा एक मोठा तोटा आहे. ज्ञानाला संकलित दर्जा देण्यासाठीं परीक्षांची जरूरी आहे हें खरें, पण त्या परीक्षांच्या योगानें प्रवाह उत्पन्न होतां कामा नये. त्यामुळें जितकें उच्च एकांगी परीक्षासिद्ध ज्ञान तितका तो अधिक पंगु नालायक असा बनतो. हा मोठा दोष उदार शिक्षणांत असतां कामा नये. आतां आपण आणखी एका महत्त्वाच्या मुद्याकडे वळूं. शिक्षणाच्या योगानें मनुष्य सुसंस्कृत व्हावा हें खरें. पण सुसंस्कृतता म्हणजे काय याच मुद्यावर विलक्षण मतभेद आहेत. उदाहरणच घ्यायचें झालें तर बेलापूरच्या शांतिनिकेतनाचें घेतां येईल. तेथें देण्यांत येणाऱ्या शिक्षणानें मनुष्य खरोखरच सुसंस्कृत म्हणजे उदार शिक्षण घेतलेला-असा बनेल का? हक्स्ले यांच्या व्याख्येप्रमाणें पाहिलें म्हणजे ज्या शिक्षणानें मनुष्याची केवळ स्वार्थी सुखलालसाच बळावत जाते, तें उदार शिक्षण होऊंच शकत नाहीं. झुळझुळीत राहणी व स्वसुखशमनार्थंच शिक्षणाचा उपयोग करण्याची दृष्टि यांनीं मनुष्य सुसंस्कृत बनूं शकत नाहीं. याच्या उलट हल्लीं कांहीं आश्रमांची राहणी केवळ वैराग्यपर होऊं पहात आहे तिचा विचार करूं. अगदीं जरूर तेवढेंच शरीरपोषणाला अन्न व वस्त्र असलें म्हणजे झालें. इतर सुखसोईंच्या आवश्यक गोष्टींची काय जरूर? अशा प्रकारच्या वृत्तीनेंहि उदार शिक्षणाचें खरें कार्य झालें असें म्हणतां यावयाचें नाहीं. स्वार्थाचा त्याग पाहिजे खरा. पण त्यालाहि सीमा आहे. अशा शिक्षणानें विद्यार्थी निराश बनत जातो. जगांत सर्वत्र सुखसोईचे उपभोग त्याला समाधान मिळूं देत नाहींत आणि शेक्सपीअरनें वर्णन केलेल्या मनुष्याप्रमाणें तो जगाकडे तिरस्काराच्याच दृष्टीनें पाहूं लागतो. अशा प्रसंगीं क्वचितच

व्यक्तिधर्म या दृष्टीनें हें भूषण ठरेल; पण समाजाच्या दृष्टीनें तें दूषणच ठरेल. मनुष्याची द्रव्योत्पादनशक्ति वाढती पाहिजे आणि त्याचबरोबर त्यागाची शक्तीहि वाढत गेली पाहिजे. हा दोहोंच्या मधला मार्ग शोधून काढणें कठीण असतें व तो सुकर करणें हाही एक उदार शिक्षणाचा उद्देश आहे. यावरून हल्लीं उदार म्हटलें जाणारें शिक्षण खऱ्या उदार शिक्षणापासून किती दूर आहे हें सहज लक्षांत येईल. परंतु वरील व्याख्ये-नुसार उदार शिक्षण देण्याचें ठरविलें तरी तें शाळेंत अगर कॉलेजमध्यें संप-विणें शक्य नाहीं. कॉलेज हा नुसता त्या शिक्षणाचा आरंभ आहे. मग हें शिक्षण पूर्ण होणार तरी कधीं ? कॉलेजमध्यें मिळालेलें एकांगी पुस्तकी शिक्षण व्यवहारांत निरुपयोगीच ठरेल. म्हणून त्याची पूर्तता होण्याचें खरें कॉलेज म्हणजे जग व त्यांतील व्यवहार हेंच होय असें म्हणावें लागेल. जगांत मनुष्य अनुभवानें शहाणा होत जातो. लहान मुलाला जसें विस्तवाला हात लावल्या-नेंच " भाजतें " असें ज्ञान प्राप्त होतें; त्याचप्रमाणें या अनुभवजन्य ज्ञानाचें आहे. त्याचें ग्रहण मनुष्य जन्मभर अनुभवद्वारां येत असतो; आणि याच अर्थानें मनुष्य हा जन्मभर विद्यार्थीच असतो असें म्हणतात तें अगदीं यथार्थ आहे. कॉलेजमध्यें मिळणाऱ्या ज्ञानाचाहि उपयोग थोडासा असतो व तोच उपयोग वरील प्रो. हक्स्लेची उदार शिक्षणाची व्याख्या डोळ्यांपुढें ठेवून अधिकाधिक मिळविण्याकडे आपल्या महाविद्यालयाची शिक्षणविषयक वाढ होत जाईल असा मला भरंवसा आहे." अध्यक्षांना पुष्पहार घालण्यांत आल्यावर त्यांचे आभार मानण्यांत आले व हा आनंदाचा समारंभ यशस्वी रीतीनें पार पडला.

---

# ५७. तीन शतकांतील शिक्षण

## १८२९–१९२९–२०२९

इंग्रजी अमदानी महाराष्ट्रांत सुरू झाल्यावर इ. स. १८२९ मध्यें नोव्हेंबरच्या २९ व्या तारखेस पुणें जिल्ह्यांतील तळेगांवढमढेरे या गांवीं एक सरकारी प्राथमिक मराठी शाळा उघडण्यांत आली. त्या गोष्टीला गेल्या शुक्रवारीं बरोबर शंभर वर्षें झालीं म्हणून ग्रामस्थ पुढारी व शाळेचे चालक यांच्या सहकार्यानें शाळेचा प्रथम शतसांवत्सरिक समारंभ मोठ्या थाटानें साजरा करण्यांत आला. सुमारंभाकरितां उत्सवाच्या चालकांनीं एक 'त्रोटक इतिहास' सुमारें पन्नास पानांचा तयार करून छापून वाटला. तो मोठा नमुनेदार असून, त्यांत संशोधक बुद्धीनें परिश्रमपूर्वक या शाळे-संबंधीं अनेकविध माहिती दिली आहे. ती वाचणारास क्षणभर कौतुक वाटून मनोरंजन होतें. या समारंभाचें महत्त्व व त्याचा अभिमान हा अर्थात् स्थानिक स्वरूपाचा असणार हें उघड आहे. म्हणजे विशेषतः तळेगांवचे ग्रामस्थ आणि ज्या जिल्ह्याच्या अधिकारक्षेत्रांत हें गांव येतें त्या पुणें जिल्ह्यापुरता तो असावा यांत आश्चर्य नाहीं. परंतु इंग्रजी अमदानींत स्थापन झालेल्या एका प्राथमिक मराठी शाळेचा शतसांवत्सरिक उत्सव हे शब्द कानावर येतांच अनेक प्रकारचे विचार मनांत खळबळून उठल्याशिवाय राहात नाहींत. म्हणून त्यासंबंधानें दोन शब्द लिहिण्याचें आज योजिलें आहे.

कोणत्याहि नव्या अमदानींतील कोणत्याहि कार्याचा शतसांवत्सरिक उत्सव म्हटला म्हणजे प्रथम मनावर आघात करणारी गोष्ट म्हटली म्हणजे त्यापूर्वी होऊन गेलेल्या अमदानीचें स्मरण. प्राथमिक शाळा ही वास्तविक किती क्षुद्र. तथापि राज्यांच्या घडामोडीच्या संबंधांत आज एक शंभर वर्षें गेलीं अशी आठवण करून देण्याचें सामर्थ्य तिच्याहि अंगीं असल्यामुळें, ती त्या दृष्टीनें महत्त्वाचीच ठरते. तथापि आपणाला आज या जुन्या व नव्या अमदानीसंबंधानें केवळ राजकीय असा विचार किंवा विवेचन

कर्तव्य नाहीं. तळेगांवास झालेल्या समारंभानें जुन्या व नव्या शिक्षणाविषयींच तुलनात्मक विचार मनांत उद्‌भवतो. पण कोणत्याहि वाटेनें गेलें तरी शेवटीं, लवकर किंवा उशीरा का होईना, मनुष्याच्या मनांत मुक्काम कायम आहे तोंपर्यंत तो त्या मुक्कामालाच पोंचणार. त्याप्रमाणें तुलनात्मक शिक्षणाच्या मार्गानें मन गेलें तरी तें शेवटीं राजकीय स्वराज्याच्या विचाराचा मुक्कामच गांठतें.

असो. सन १८२६ सालीं महाराष्ट्रांत इंग्रजी अमदानींत नव्या पद्धतीच्या शिक्षणाला प्रारंभ झाला. प्रथम शिक्षण कोणत्या प्रकारचें द्यावें याविषयीं तें देणारांना किंवा घेणारांनाहि निश्चित किंवा दूरदृष्टीची कल्पना अर्थातच नव्हती. म्हणून सामान्य साक्षरतेच्या शिक्षणापासून प्रारंभ झाला. त्या वेळचें वरिष्ठ शिक्षण म्हटलें म्हणजे संस्कृत विद्येतील शास्त्रज्ञान व तें मिळवून देण्याचा उपक्रम पुणें येथील विश्रामबागेंत चालू होणाऱ्या संस्कृत पाठशाळेंत करण्याचें इंग्रज सरकारनें योजलें. पण सर्व महाराष्ट्रभर सार्वजनिक शिक्षण म्हणून देण्याचें जें योजण्यांत आलें तें मराठींतूनच होय.

महाराष्ट्रांतील जुनी शिक्षणाची पद्धत म्हटली म्हणजे ज्यांना तात्या पंतोजींच्या शाळा म्हणत अशा खासगी शाळांची. या शाळांना सरकारकडून आश्रय नसे. पंतोजींनीं देखील करारानें ठराविक फी दरमहा वसूल करण्याची पद्धत नव्हती. तर सण, सुगी, समारंभ अशा निमित्तानें विद्यार्थ्यांनीं गुरूला कांहीं तरी पूजाद्रव्य म्हणून देण्याची वहिवाट होती, व हें नित्यनैमित्तिक गुरूचें ऋण मनुस्मृतींत सांगितल्याप्रमाणें छत्री, जोडा, आसन, धान्य, भाजीपाला, वस्त्र इत्यादींच्या दानानें फेडण्यांत येत असे. सरकारी शाळा झाल्यानंतर ही पद्धती अर्थातच बदलली. त्याबरोबर शिक्षणाचे हेतूहि बदलले. सामान्यतः असें दिसतें कीं, नव्या अमदानींतील शिक्षणाचे प्रारंभींचे हेतु तीन प्रकारचे होते. १ सरकारी राज्यकारभाराकरितां उपयोगी पडेल अशा कारकुनी फडाची निरंतर भरती करणें. हा हेतूच अद्यापिहि अबाधित सुरू आहे; आणि आज शंभर वर्षांत कारकुनी फडाच्या कल्पनेचा विस्तार होऊन साध्या खर्डेघाशीपासून कौन्सिलदारी किंवा गव्हर्नरी येथपर्यंत मजल गेली असली तरी मुख्य सत्ता व धोरण परक्यांच्या हातीं असल्यामुळें अजूनहि वरिष्ठ शिक्षण

पावलेले व कौन्सिलदारी गव्हर्नरीपर्यंत चढलेले हिंदी नोकर या कारकुनी फडांतील आसामीच होत. शिवशाहीमध्यें अष्टप्रधानांनाहि सर कारकून अशीच संज्ञा होती, आणि आजच्या हिंदी कौन्सिलदारांना, प्रधानांना किंवा ॲक्टिंग गव्हर्नरांनाहि शिवशाहींतील अष्टप्रधानांइतकेहि स्वतंत्र अधिकार ज्याअर्थी नाहींत त्याअर्थी त्यांना कारकुनी फडांतील आसामी असें म्हणण्यास काय प्रत्यवाय आहे ?

असो. इंग्रज सरकारचा हा शिक्षण-विषयक हेतु आज पूर्ण फलप्रद झालेला आढळतो व पुढेंहि तो असाच फलप्रद होत राहाणार; कारण सरकारी नोकरीला सुशिक्षित व बुद्धिवान लोक मिळण्याची जरूरी उभय-पक्षी सारखीच आहे. सरकारला असे लोक पाहिजेत, व लोकांना अशा नोकऱ्या पाहिजेत. आणि उष्टें खावयाचें तर तुपाच्या आशेनें तरी खावें या दृष्टीनें सरकारी नोकरी करावयाचीच तर त्या नोकरींतील वरिष्ठांतल्या वरिष्ठ जागा आपल्या हस्तगत व्हाव्या अशी आकांक्षा या कारकुनी फडा-कडे वळणाऱ्या लोकांनीं बाळगल्यास तींत व्यक्तिदृष्ट्या कांहीं वावगें नाहीं. पण नव्या अमदानींत शिक्षण सुरू झालें त्याचे दुसरे दोन परिणाम राज्य-कर्त्यांना दिसत होते. पैकीं एक घडून यावी अशी त्यांची उत्कट इच्छा होती, व दुसरा घडून न आल्यास बरा अशी त्यांना मनांतून इच्छा असली तरी तो घडून आल्याशिवाय राहाणार नाहीं, याची जाणीवहि त्यांतल्या दूर दृष्टीच्या राजकारणी पुरुषांना होती. पैकीं पहिला परिणाम म्हणजे महाराष्ट्रांतील जुनी संस्कृति नष्ट होऊन इंग्रजी संस्कृतीनें तिची जागा घ्यावी. इतकेंच नव्हें तर शिक्षणाच्या योगानें महाराष्ट्रांतील हिंदू धर्म नष्ट होऊन त्याच्या जागीं खिस्ती धर्माचा प्रसार व्हावा हा होय ! १८२० ते १८२७ या वर्षांत म्हणजे महाराष्ट्रांत नव्या शिक्षणाच्या शाळा सुरू होण्याच्या वेळीं पुण्या–मुंबईस जो सर्वांत नांवाजलेला मुत्सद्दी माऊंट स्टुअर्ट एल्फि-न्स्टन होता त्याचे विचार याविषयीं नमूद करण्यासारखे आहेत. तो एके ठिकाणीं म्हणतो, "I am convinced that the Convertion of the natives must infallibly result from the diffusion of Knowledge among them" १८३१ सालीं प्रसिद्ध झालेल्या मोल्स्वर्थच्या शब्दकोशाच्या प्रस्तावनेंत याचेंच प्रत्यंतर खालील शब्दांनीं सांपडतें, "It was under-

taken from a desire to promote the propagation of the glorious gospel."

तथापि शिक्षणद्वारें धर्मांतर घडवून आणण्याचा हा हेतु मनांत ठेवावा, बाहेर प्रगट करूं नये असें शहाण्या इंग्रजांना माहीत होतें. कारण शिक्षणाच्या द्वारें धर्मांतर घडविण्याचा द्राविडी प्राणायाम करीत बसण्यापेक्षां म्हणजे उजव्या हातानें डावीकडून तोंडांत घास घालण्यापेक्षां प्रत्यक्ष नवीन शाळांतून खिस्ती धर्माचें शिक्षणच महाराष्ट्रीयांना दिलें तर काय बिघडलें असा प्रश्न कांहीं उतावळ्या आधाशी मिशनऱ्यांनीं उपस्थित केला. त्याला एल्फिन्स्टन यानें खालील उत्तर दिलें–"The only effect of Christianity in our schools would be to sound the alarm and to warn the Brahmins of the approaching dangerd" पुण्याच्या ब्राह्मणांची भीति इंग्रजांना आजकालचीच नाहीं, तर शंभर वर्षांच्या पूर्वींहि ती होती आणि पुढील इतिहासावरून पाहतां शेवटीं या ब्राह्मणांनीच खिस्ती धर्माच्या प्रसाराला विरोध केला, व त्यामुळें शिक्षणाचा हा एक मूळहेतु सर्वस्वीं फसला असें म्हणण्यास हरकत नाहीं.

आतां शिक्षणाचा दुसरा जो एक परिणाम म्हणून वर सांगितला त्याविषयीं थोडें लिहूं. हा परिणाम घडून येऊं नये अशीच त्यांची इच्छा खरी, पण तो घडून आल्याशिवाय राहूं शकणार नाहीं असेंहि दूरदर्शी इंग्रजांना वाटत होतें, हें वर सांगितलेंच आहे. तो परिणाम म्हटला म्हणजे राष्ट्राचा पुनरुद्धार करण्याची तीव्र आकांक्षा सुशिक्षितांमध्यें उत्पन्न होणें हा होय. किंवा आजच्या भाषेनें बोलावयाचें म्हणजे स्वराज्य, राजकीय स्वातंत्र्य, मिळविण्याची बुद्धि उत्पन्न होणें हा होय. नव्या शिक्षणामुळें ही बुद्धि उत्पन्न होणार, तिला अनुसरून शक्य ते प्रयत्न होणार व त्या प्रयत्नांचा अवश्य तो परिणाम घडणार ही गोष्ट एल्फिस्टनसारख्या मुत्सद्यांना माहीत होती. तो एके ठिकाणीं म्हणतो, " A time of separation must come and it is for our interest to have an early separation from a civilised people than a violent rupture with a barbarous nation. " " हातचें राज्य जाणारच तर तें लवकरहि जावो, पण तें काढून हातीं घेणारे लोक तरी सुशिक्षित व्हावे, सुधारावे व संपन्न व्हावे. कारण पुढें

अशा लोकांशीं व्यवहार व इतर स्नेहसंबंध तरी ठेवतां येतो व त्यापासून आपला आर्थिक फायदा तरी होत राहतो. पण उलट जित लोकांना अज्ञानांत डांबवून ठेवल्यानें ताटातुटीचा प्रसंग जरा उशिरानें येईल हें खरें, तरी पण तो येईल तेव्हां अपघातच होईल व ताटातूट कायमची टिकेल."

महाराष्ट्रांत नवीन शिक्षण सुरू करण्याच्या सुमारास ले. ब्रिग्ज हे एकदां एल्फिन्स्टनसाहेबाच्या भेटीला गेले होते; तेव्हां त्यांच्याजवळ आजूबाजूला शिक्षणोपयोगी अशा पुस्तकांचा भारा पडला होता ! तो पाहून ब्रिग्ज यानें विचारलें कीं, या पुस्तकांचा काय उपयोग? त्यावर एल्फिन्स्टन यानें उत्तर दिलें कीं, हीं पुस्तकें एतद्देशीय लोकांना शिकविण्याकरितां आहेत. पण त्याबरोबर तो असेंहि म्हणाला कीं, "आम्ही या लोकांना शिक्षण देत आहों खरें, पण तें शिक्षण देणें म्हणजे आम्हांला परत विलायतेंत चंबूगबाळें घेऊन जाण्याकरितां रस्ता बांधण्यासारखेंच आहे हेंहि मी जाणून आहे." एल्फिन्स्टन याच्या या उद्गारांत या शिक्षणाचा अंतिम परिणाम व तें देणारांच्या मनाची दुहेरी म्हणजे स्वार्थ व परार्थ किंवा सत्प्रवृत्ति व त्यामुळें उत्पन्न होणाऱ्या संकटांची जाणीव अशी दुहेरी मनःस्थिति स्पष्टपणें पाहाण्यास सांपडते.

असो, अशा स्थितींत साध्या मराठी शिक्षणाचा प्रारंभ झाला व पुढें एक पिढीनंतर वरिष्ठ शिक्षण कोणतें द्यावें याचा विचार सुरू झाला. तेव्हां संस्कृत विद्येऐवजीं इंग्रजी विद्या एतद्देशीय लोकांना शिकवावी हें लॉर्ड मेकॉले यानें प्रतिपादिलेलें धोरण प्रभावी ठरलें. परंतु त्याहि शिक्षणाचा परिणाम आदमासाप्रमाणेंच झाला. मराठींतून बायबल वाचलें म्हणून कोणी शिकलेले लोक धर्मांतराला प्रवृत्त झाले नाहींत, हा जसा एक निश्चित परिणाम घडला, तसाच दुसराहि निश्चित परिणाम घडला. तो हा कीं, इंग्रजी शिक्षणांतून अखेर राष्ट्रोद्धारक बुद्धि व राजकीय स्वातंत्र्याची आकांक्षा उत्पन्न होऊन अखेर राष्ट्रीय चळवळीकडे लोकांची प्रवृत्ति झाली. याचें प्रत्यंतर म्हणून विषयानुसंधानानें तळेगांवचेंच उदाहरण घेऊन असें सांगतां येईल कीं, या शाळेंत शिकलेल्या विद्यार्थ्यांपैकीं कांहीं तरतरीत लोक सरकारी नोकरींत म्हणजे इंग्रजी कारकुनी फडांत शिरले आहेत; वकील झाले आहेत; कांहीं खाजगी कालेजांतून प्रोफेसरीचें काम

करीत आहेत तर एकाद दुसरा विद्यार्थी, म्हणजे कै. विष्णु गणेश पिंगळे यांच्यासारखा, असाहि निघाला कीं, त्यानें राष्ट्रीयबुद्धीनें परदेशाची सफर केली, व परत येऊन राज्यक्रांती करण्याच्या हेतूनें यथाशक्ति उद्योग करून त्यांत आपल्या प्राणाची आहुति देऊन देशाभिमानाप्रीत्यर्थ स्वार्थ-त्यागाची कड पोंचविली ! अशा दृष्टीनें नवीन शिक्षणाच्या कल्पनेला शंभर वर्षे झालीं असें म्हणतां येईल तर त्या शिक्षणामुळें परदास्यबुद्धीचीहि शंभर वर्षे भरलीं असेंहि विधान निराळ्या रीतीनें आज करतां येत आहे; व एल्फिन्स्टनचा भविष्यवाद सफळ होत आहे.

कालगणनेचे योगायोग कित्येक वेळां चमत्कारिक असतात, व असा एक योगायोग म्हटला म्हणजे हा कीं, ज्या १८२९ सालीं तळेगांवची ही प्राथमिक शाळा उघडण्यांत आली, त्याच सालीं कॅप्टन केपन व बाबा साने यांनीं मिळून तयार केलेला ' ग्रँटडफची मराठ्यांची बखर ' हा ग्रंथ प्रसिद्ध झाला. म्हणजे एका गोष्टीनें मराठेशाही बुडाल्याची साक्ष पटून एका विशिष्ट आशेचा दहनविधी झाला, तर दुसऱ्या गोष्टीनें आगामी काळांतील नव्या आशेचें बीज त्याच राखेच्या खतांत रुजत घातलें गेलें आणि त्या बीजाचा वृक्ष होऊन अकालीं मोहोर गळून पडावा त्याप्रमाणें का होईना पण मोहोर येण्याइतकी त्या आशेच्या वृक्षाची वाढ या शंभर वर्षांत झाली हें पिंगळे यांच्या वरील उदाहरणावरून दिसून येतच आहे. याच क्रमानें पाहातां आणखी शंभर वर्षांनीं जर तळेगांवच्या या शाळेचा द्वितीय शत-सांवत्सरिक उत्सव करण्याचा प्रसंग आला तर त्या वेळीं वाचला जाणारा वृत्तान्त कसा असेल व त्यांत काय काय गोष्टी उल्लेखिल्या जातील याची कल्पना प्रतिभासंपन्न सहृदय मनुष्याला आजहि होऊं शकेल. १९२९ सालीं वाचलेला वृत्तान्त पन्नास पानांचा होता तर २०२९ सालीं वाचण्यांत येणारा वृत्तांत ५०० शें पानांचा सहज होऊं शकेल. हल्लींच्या वृत्तान्तांत शिक्षणपद्धती, शिक्षणाधिकारी व शिक्षण मिळ-विलेल्या लोकांचीं जीं वर्णनें आलीं आहेत त्यापेक्षां या सर्व गोष्टींचीं वेगळीं वर्णनें यापुढील समारंभाच्या वृत्तान्तांत वाचावयास सांपडतील यांत काय नवल !

पुढील शंभर वर्षांत स्वराज्य मिळालें तरी प्राथमिक शिक्षण म्हणून

राहणारच. तसेंच वरिष्ठ शिक्षणाधिकारी म्हणून असणारच. तसेंच शाळें-तून निघणाऱ्या विद्यार्थ्यांत विद्वान व कीर्तिमान असेंहि निपजणारच; परंतु परकी राज्यांत होणाऱ्या या गोष्टी व स्वराज्यांत होणाऱ्या या गोष्टी यांच्या स्वरूपांत किती अंतर असतें हें सांगावयास नको. म्हणून तळेगांव येथील शंभर वर्षें झालेल्या आपल्या शाळेचा अभिमान धरणाऱ्या ग्राम-स्थांना आमची अशी सूचना आहे कीं त्यांनीं आपल्या शाळेचें यश असेंच चिंतीत जावें व तिच्या भरभराटीकरितां असेच परिश्रम करावे. पण त्याबरोबर त्यांना आमची राष्ट्रीयदृष्ट्या मनोरंजक वांटण्यासारखी अशीहि एक सूचना आहे कीं, त्यांच्यांतील प्रतिभासंपन्न लोकांनीं या शाळेचे पुढील शंभर वर्षांचें भविष्य कल्पनेनें वर्तवून लिहून ठेवावें. किंबहुना हें भविष्य एकाद्या ताम्रकलशांत घालून शाळागृहाच्या वास्तूंत पुरून ठेवून त्यावर तद्दर्शक असा एखादा दगडी स्तंभ करून ठेवावा. हेतु हा कीं, १०० वर्षांनीं होणाऱ्या उत्सवांत तें भविष्य काढून वाचलें जाईल व भृगुसंहितेच्या बाडांतील एखाद्या जन्मलग्नाची व्यक्तिविषयक पत्रिका पडताळल्यानें त्यांतील जुळणाऱ्या गोष्टींविषयीं जसें कौतुक वाटतें तसें तळेगांवच्या तत्कालीन पिढीला त्या भविष्याचें कौतुक वाटेल. खरें संशोधन हें आगगाडीच्या एंजिनाप्रमाणें दुतोंडी असतें; आणि गतकालांतील संशोधन करतांना तें एंजिन चालण्याला जुन्या पिढीच्या अभिमानाची वाफ ही जशी प्रेरक शक्ति लाभते, तशीच भविष्यकाळांतील संशोधन करतांना तें एंजिन चालण्याला नव्या पिढीच्या उत्कर्षाच्या आकांक्षेची वाफ ही प्रेरक शक्ति खचित लाभण्यासारखी आहे.

---

## ५८. देशी भाषांचीं विद्यापीठें

गेल्या महिन्यांत मुंबई-विश्वविद्यालयाच्या पदवीदानप्रसंगीं त्या विद्या-पीटाचे उपकुलपति सर चिमणलाल सेटलवाड यांनीं 'विद्यापीठांचीं कर्तव्यें' यासंबंधीं जें भाषण केलें तें अनेक कारणांस्तव मननीय आहे. प्रजा-जनांच्या आकांक्षांकडे दृष्टिक्षेप करतांना सरकारचा दृष्टिकोन जसजसा

बदलत जातो तसतशी सरकारची स्वकर्तव्याविषयींची कल्पनाहि बदलत जाते. याच न्यायास अनुसरून प्राथमिक शिक्षण देणें हें मात्र सरकारचें अवश्य कर्तव्य आहे, उच्च शिक्षणाची सोय करण्याला सरकार कांहीं बांधलें गेलें नाहीं, असली भ्रामक विचारसरणी नोकरशाहीकडून एके काळीं प्रतिपादिली जात असे. खरें पाहतां सरकारनें आपलें कोणतेंच कर्तव्य आजपर्यंत पूर्णपणें आणि कळकळीनें पार पाडलेलें नाहीं. सुशिक्षित वर्गाकडून उच्च शिक्षणाची मागणी निकरानें पुढें आली म्हणजे सार्वत्रिक प्राथमिक शिक्षणाची सबब पुढें करावी, आणि प्राथमिक शिक्षणाचा प्रश्न पुढें मांडला जातांच उच्च शिक्षणाचे गोडवे गाण्यास प्रारंभ करावा, एतावता हाताला कांहींच लागूं देऊं नये असला उडवाउडवीचा प्रकार परवांपर्यंत चालू होता. अगदीं अलीकडे मात्र सक्तीच्या प्राथमिक शिक्षणाचीं बिलें प्रांतिक कायदेकौन्सिलांतून पसार झाल्यावेळेपासून ही 'या बोटावरची थुंकी त्या बोटावर' करण्याची कलाति साधेनाशी होऊन सरकारला प्राथमिक शिक्षणाच्या आवश्यकतेचा वाद सोडून द्यावा लागला आणि सॅडलर कमिटीच्या रिपोर्टावरून उच्च शिक्षणाची जबाबदारीहि टाळतां येईना. एतावता शिक्षणाच्या सर्वच अंगांची तरतूद करण्याची जबाबदारी मुख्यत्वेंकरून सरकारावर येऊन पडली. महायुद्धाच्या परिसमाप्तीपासून इंग्लंडांतील शिक्षणमंत्र्यांनीं आपल्यावरची ही जबाबदारी मान्य केली असून ती पार पाडण्याकरितां ते यथाशक्ति झटत आहेत. हिंदुस्थानांतील नोकरशाही मात्र अद्यापि हा लगाम चुकविण्याकरितां मान वेडीवांकडी करीत आहे. तथापि अखेरीस तिलाहि हा लगाम तोंडांत धरावाच लागेल! ही परिस्थिति ओळखून सर चिमणलाल सेटलवाड यांनीं उच्च शिक्षणाची तरफदारी करून, तें शिक्षण देण्याची जबाबदारी सरकारावर आहे व ती जबाबदारी पार न पाडल्यास त्यांत सरकारचेंच नुकसान आहे असें सरकारास स्पष्टपणें बजावलें, हा त्यांच्या भाषणांतील पहिला विशेष होय.

दुय्यम व उच्च प्रतीचें शिक्षण देण्याचें शक्य तितकें टाळावें; त्यांतूनहि तें अगदींच बोकांडी बसल्यास सरकारी हुकमतीखालीं त्याचा इतका कोंडमारा करावा कीं, त्याचें शुद्ध स्वरूप अजीबात नष्ट होऊन त्याच्या विकृत स्वरूपाची जनतेला किळसच वाटूं लागावी; अशाच हेतूनें कर्झन-

साहेबांनीं युनिव्हर्सिटी कमिशन नेमून उच्च शिक्षणाच्या पाण्याच्या झऱ्यांत सरकारी हुकमतीचा चिखल ओतून सगळें पाणी गढूळ करून सोडलें. आतां कोठें १७।१८ वर्षांच्या अवधीनंतर तें पाणी पूर्ववत् स्वच्छ होत आलें आहे आणि सर चिमणलाल सेटलवाड यांच्या भाषणावरून तें बरेंच निवळल्याची साक्ष पटत आहे. विश्वविद्यालयावर सरकारी हुकमतीचें जोखड लादल्यास विद्यापीठांतील प्रोफेसर हे नोकरशाहीचे निवळ स्तुतिपाठक बनतात, आणि प्रोफेसरांची अशी मुस्कुटदाबी झाल्यास त्यांच्या हातून दिलें जाणारें शिक्षण ओजस्वी, बाणेदार व शुद्धबुद्ध स्वरूपाचें असूं शकत नाहीं, हा सिद्धान्त आतां मुंबईच्या अँग्लो-इंडियनी पत्रकारांसहि पटूं लागला हें सुचिन्हच होय.

उच्च शिक्षण देण्याची जबाबदारी सरकारावर आहे, आणि तें शिक्षण नोकरशाहीच्या अधिकाराच्या दडपणामुळें खुरटलेलें असूं नये येवढीं दोन महत्त्वाचीं तत्त्वें सर चिमणलाल सेटलवाड यांनीं मान्य केल्यामुळें, हा प्रश्न सुलभ रीतीनें सुटण्याच्या मार्गास लागेल असें आम्हांस वाटलें होतें. परंतु वर निर्दिष्ट केलेल्या दोन मुद्द्यांवर जसें सर चिमणलाल यांनीं आपलें मत विचारपूर्वक बनवून तें जाहीर केलें; तसें विवेचन तिसऱ्या मुद्द्यासंबंधीं करूं लागण्यापूर्वीच त्यांच्या सदसद्विवेकबुद्धीनें रजा घेतली असें दिसतें. कारण एकदां उच्च शिक्षणाची जबाबदारी सरकारनें पत्करल्यावर ती जबाबदारी पार पाडण्याला तें शिक्षण देशभाषेंतूनच दिलें पाहिजे, हा सिद्धान्त अपरिहार्य ठरतो. परकी भाषेंतून दिलेलें शिक्षण विद्यार्थ्यांच्या अंगीं मुरत नाहीं व तेथें तें रुजून मूळ धरीत नाहीं; याकरितां आपण जो विद्यावृक्ष लावतो त्याचा नैसर्गिकपणें विस्तार व्हावा अशी इच्छा असल्यास त्याची जोपासना स्वभाषेच्या जीवनानेंच केली पाहिजे. याच दृष्टीनें उच्च शिक्षणाचे पाठ देशी भाषेंतून दिले जावेत, आणि परीक्षकांनीं विचारलेल्या प्रश्नांचीं उत्तरें मातृभाषेंतून देण्याची विद्यार्थ्यांस सवड ठेवली जावी, अशा दोन मागण्या विद्यार्थीवर्गाकडून अधिकाऱ्यांकडे येऊन थडकत आहेत, व त्यावरून लोकमताचा वारा कोणत्या दिशेनें वाहत आहे तें स्पष्ट दिसत आहे. असें असतां सर चिमणलाल यांनीं ही दुहेरी सुधारणा अग्राह्य ठरवून फेटाळून लावली !

या सुधारणेचा अव्हेर करतांना चिमणलाल यांनीं ज्या विचारसरणीचा अवलंब केला ती केवळ आभासमय व पूर्वग्रहदूषित आहे असें म्हणणें प्राप्त आहे. एकाच विश्वविद्यालयांत पांचसात देशी भाषांतून शिक्षण देऊं लागल्यास, तितक्या भाषांतून परीक्षा घेऊं लागल्यास महाविद्यालयाचा व विश्वविद्यालयाचा खर्च वाढेल, विद्यार्थ्यांच्या बुद्धिप्रकर्षाचा दृढपणा ठरविण्यास एकच कसोटी न लावल्यामुळें सन्मानदर्शक पदव्या व पारितोषकें देणें अवघड होईल. येथील विद्यार्थ्यांना विलायतेंतील सिव्हिल सर्व्हंटांशीं टक्कर मारतां येणार नाहीं, देशांतील भिन्न भिन्न प्रांतांचें जें एकीकरण घडून येत आहे तें नष्ट होऊन प्रांतिक दुरभिमान बळावत जाईल वगैरे कारणें उपकुलपति सेटलवाल यांनीं पुढें मांडलीं. हीं सर्व कारणें अपरिहार्य नाहींत एवढेंच नव्हें, तर ती बव्हंशी फोल ठरतील असेंच आम्हांस वाटतें किंबहुना ही आपत्ति टाळण्याकरितां त्यांनीं भिन्न भिन्न विद्यापीठें स्थापण्याचा जो उपाय सुचविला त्या उपायानेंच ही आपत्ति अधिक बळावेल आणि उलटपक्षीं एकाच विद्यापीठांत विविध देशभाषांची सोय केल्यास ती आपत्ति टळेल असें म्हणण्यास प्रत्यवाय येऊं शकत नाहीं.

खर्चाच्या वाढीचा पहिला प्रश्नच घेऊं. एकाच महाविद्यालयांत मराठी, गुजराथी, कानडी, उर्दू व सिंधी अशा पांच देश भाषांतून शिक्षण देऊं लागल्यास एकेका विषयाचे पांचसहा प्रोफेसर्स नेमावे लागतील व तसें करणें अतिशय खर्चाचें होईल असें सरसाहेब सांगतात. परंतु यांत त्यांनीं गृहीत धरलेली एक कल्पना वस्तुस्थितीला सोडून आहे. उदाहरणार्थ, पुण्याच्या किंवा धारवाडच्या कॉलेजांत एकेका विषयाचे दोन किंवा फार तर तीन प्रोफेसर्स नेमल्यानें कार्यभाग होणार आहे. यावर आक्षेपक असा सवाल करतील कीं, खर्चाची दुपटीतिपटीनें वाढ होईल हें तुमच्याच कबुलीवरून सिद्ध होत आहे. हा आक्षेप खरा आहे, पण भिन्न भिन्न भाषांच्या युनिव्हर्सिट्या स्थापल्यानें तरी तो कसा टळतो ! सर चिमणलाल सुचवितात त्याप्रमाणें पुण्यास निवळ मराठी विद्यापीठ आणि धारवाडास निवळ कानडी विद्यापीठ स्थापन करून त्या त्या विद्यापीठाच्या कॉलेजांतून एकाच देशभाषेंतून शिक्षण देऊं लागल्यास, ज्यांची मातृभाषा वेगळी असेल त्यांची फिरून वाट काय ? एकाच पुण्यांतल्या कानडी, गुजराथी, मुसलमानी व

इंग्रजी विद्यार्थ्यांच्या शिक्षणाची सोय कशी करावयाची ? त्यांना मराठींतूनच शिक्षण देण्यास भाग पाडावयाचें, का त्यांना आपापल्या मातृभाषेचें विद्यापीठ जेथें असेल तिकडे चालते व्हा म्हणून सांगावयाचें ? अशी सक्तीची हाकालपट्टी व्यवहार्य व इष्ट नसल्यानें पुण्यास जरी प्राधान्येंकरून मराठी विद्यापीठ स्थापन झालें तरी, ज्यांना त्या विद्यापीठाचा फायदा घेणें शक्य नसेल त्यांच्याकरितां तरी मुंबईच्या मध्यवर्ती आंग्ल विद्यापीठाचे आणि शेजारच्या प्रांताच्या देशी विद्यापीठाचे वर्ग तेथें ठेवावे लागणारच. म्हणजे पुनः एकाच शहरांत निरनिराळ्या भाषांतून शिकविणारे प्रोफेसर्स आलेच; व त्यांचा परस्पराशीं तादृश संबंध नसल्यानें त्यांच्या शिक्षणांत एकसूत्रताहि राहूं शकणार नाहीं. त्यापेक्षां मुंबईच्या एकाच विश्वविद्यालयाच्या हुकमतीखालीं जरूर तेवढे भिन्न भिन्न भाषाविषय शिकविणारीं कॉलेजें स्थापलीं गेल्यास त्यांच्यांत एकसूत्रता राहून शिवाय इंग्लिश भाषेपुरतें तरी सर्वांचें एकीकरण कायम राहून तितका खर्चहि कमी येईल आणि भाषाभिन्नत्वामुळें उद्भवणारा परकेपणा तेवढ्यापुरता तरी नष्ट होऊन प्रांतांच्या एकीकरणाचें कार्य दुर्घट होणार नाहीं.

विद्यार्थ्यांच्या गुणदोषांचें मोजमाप करण्यासंबंधानें जी अडचण सेटलवाड यांनीं पुढें मांडली तिच्यावरहि हेंच बिनतोड उत्तर आहे. प्रत्येक विभागाला जर एकेक स्वतंत्र विद्यापीठ स्थापलें गेलें तर इंग्लिश, संस्कृत, अर्थशास्त्र इत्यादि विषयांतील पारंगततेबद्दल जीं पारितोषिकें आजमितीला देण्यांत येतात तीं काय यापुढें केवळ मुंबईतील आंग्ल विद्यापीठासच बहाल करून टाकून इतर विद्यापिठांची प्रारंभापासूनच उपासमार करावयाची ? असें करणें तत्त्वतः न्यायाचें तर नाहींच. पण बक्षिसाचें क्षेत्र केवळ मुंबईच्या विद्यापीठाच्या परीक्षेस बसणाऱ्या विद्यार्थ्यांपुरतेंच मर्यादित केल्यास त्या पारितोषिकाला हल्लींचा बहुमानहि राहणार नाहीं. यास्तव सांप्रतच्या परिपाठाप्रमाणें इलाख्यामधील सर्व विद्यालयांतील विद्यार्थ्यांस त्या बक्षिसाकरितां चढाओढ करण्यास मुभा असलीच पाहिजे.

विलायतेंतील सिव्हिलियनांशीं तुलना केली असतां येथील विद्यापीठांतील छात्रगण कमकुवत ठरूं नये असें सर चिमणलाल म्हणतात. आमचीहि अपेक्षा तशीच आहे. परंतु ही इष्ट स्थिति प्राप्त करून घेण्यास

मुंबईचें विद्यापीठ तेवढें आंग्ल भाषेला वाहून टाकून इतर प्रांतिक विद्यापीठांचें कार्यक्षेत्र त्या त्या भाषेपुरतेंच मर्यादित करणें हा खरा उपाय नसून एकप्रकारें तो अपायच होईल. कारण प्रत्येक प्रांतानें आपापलें देशी भाषेचें स्वतंत्र विद्यापीठ स्थापन केल्यास मुंबईच्या मध्यवर्ती आंग्ल विद्यापीठाचें क्षेत्र बहुतेक मुंबई बेटापुरतेंच मर्यादित होईल. अशा रीतीनें मुंबईच्या विद्यापीठाची खच्ची केल्यास त्या विद्यापीठाचा जोम वृद्धिंगत न होतां उलट त्यास क्षयाची भावना लागण्याचाच संभव फार आहे. कारण आजकाल मुंबई विद्यापीठाची जी कांहीं बुद्धिप्रकर्षाविषयीं ख्याति असेल ती केवळ मुंबई बेटांतल्या मूठभर विद्यार्थ्यांमुळें नसून मुंबईबाहेरच्या शेंकडों विद्यार्थ्यांच्या बुद्धिमत्तेचा ओघ मुंबईच्या ओघांत मिसळल्यामुळेंच त्यास ती प्रसिद्धि प्राप्त झाली आहे. हे प्रांतिक ओघ मुंबईकडून फिरवून आपापल्या प्रांतापुरतेच नियमित करण्यांत येतील तर, मुंबई शहराला खुद्द मुंबईचा असा बुद्धिमत्तेचा जिवंत झरा फारच अल्प प्रमाणांत शिल्लक राहून त्याचें अखंडत्व नष्ट होईल; व त्यास सांचलेल्या पाण्याच्या डबक्याचें स्वरूप येण्याचा संभव आहे. मुंबईच्या रहिवाश्यांच्या आग्रहावरून राष्ट्रीय सभेनें मुंबई शहरापुरती एक वेगळी प्रांतिक कमिटी तोडून दिली. पण गेल्या दोन वर्षांत या प्रांतिक कमिटीनें आपल्या तेजाचा प्रकाश कितपत पाडला हें जगजाहीर आहे. सारांश, विलायतेंतील विद्यापीठांतून पसार होऊन हिंदुस्थानांत येणाऱ्या सिव्हिल सर्व्हंटांना तोडीस तोड देण्याला लायक असे विद्वान् भारतपुत्र प्रसवण्याला एकटीच मुंबई शहराची युनिव्हर्सिटी समर्थ होऊं शकणार नाहीं. यास्तव मुंबईच्या विद्यापीठाची इतर प्रांतिक विद्यापीठांपासून ताटातूट न करितां, विशिष्ट विषयापुरतें सर्वांचें केंद्रीकरण करणें आणि विशिष्ट शिक्षणापुरतें व परीक्षेच्या प्रश्नांचीं उत्तरें लिहिण्यापुरतें देशी भाषांचें अवलंबन करणें हाच खरा मार्ग होय.

हिंदुस्थानांतील सर्व प्रांतांच्या एकीकरणाच्या दृष्टीनें पाहूं गेल्यासहि हीच विचारसरणी युक्त ठरते. आज मितीला सर्व प्रांतांच्या विद्यापीठांची मदार आंग्लभाषेवरच असून देखील प्रांताप्रांतांतून भाऊबंदकी दृष्टोत्पत्तीस येते. मग प्रांताप्रांतांतून भिन्न देशभाषांचीं भिन्न विद्यापीठें स्थापन होऊन, त्यांच्यांत परस्पराशीं संबंध जोडणारा एकहि दुवा नसल्यास, केवळ एका

टोंकास मुंबई, दुसऱ्या टोंकास कलकत्ता, तिसऱ्या टोंकास मद्रास अशीं हाताच्या बोटांवर मोजण्यापुरतींच अतिसंक्षिप्त रूप दिलेलीं पाश्चात्य पद्धतीचीं विद्यापीठें शिल्लक राहून हिंदी राष्ट्राच्या एकीकरणाचें कार्य अवघड झाल्याविना राहणार नाहीं. याकरितां हीं विद्यापीठें आपापल्या शहरापुरतीं मर्यादित न करतां इलाख्यांतील इतर शहरांशीं असलेला त्यांचा आजचा संबंध कायम ठेवावा. मात्र तो संबंध इंग्रजी भाषेपुरता आवश्यक व अविच्छिन्न राहून इतर विषयांच्या क्षेत्रमर्यादेंत मातृभाषेला वावरण्यास पूर्ण वाव मिळावा. सारांश, खर्चाच्या, बुद्धिविषयक चढाओढीच्या, पाश्चात्य विद्वानांशीं टक्कर देण्याच्या लायकीच्या, आणि हिंदुस्थानाच्या एकीकरणाच्या—अशा कोणत्याहि दृष्टीनें पाहिलें तरी सर चिमणलाल यांची सवत्या सुभ्याची क्लृप्ति इष्टफलदायक नाहीं असेंच सिद्ध होतें. व त्यामुळें, मुंबई युनिव्हर्सिटीच्या सीनेटनें मातृभाषेंतून उत्तरें लिहिण्याची सवलत देण्याचेंहि नाकारलें हें अत्यंत अनुचित केलें, असें म्हणणें ओघानेंच प्राप्त होतें. याच सुमारास कलकत्ता युनिव्हर्सिटीपुढेंहि मातृभाषेंतून परीक्षा देण्याचा प्रश्न विचाराकरितां आला असतां निदान त्या विद्यापीठांत तरी ती सूचना ग्राह्य ठरली ही आनंदाची गोष्ट होय. कलकत्ता युनिव्हर्सिटीला जी पद्धति नैसर्गिक व हितप्रद वाटली तिचा मुंबईच्या सीनेट सभेनें तुच्छतेनें अव्हेर करावा हें सर्वथैव अनुचित होय.

असो. कांहीं कालापूर्वी मातृभाषेंतून दुय्यम शिक्षण देखील देणें सरकारला अशक्य व अव्यवहार्य वाटत असतां, आतां नुसतें दुय्यमच नव्हे तर उच्च शिक्षणहि मातृभाषेंतून देण्यास हरकत नाहीं, व त्याकरितां मातृभाषाप्रधान विद्यापीठें स्थापलीं जावीं, अशी शिफारस करण्यापर्यंत व्हाइस चॅन्सेलरसाहेबांची मजल पोंचली हा कशाचा प्रभाव बरें ? राष्ट्रीय शिक्षणाच्या स्वतंत्र प्रयत्नांचाच हा प्रभाव होय, हें त्या शिक्षणाच्या कट्टया शत्रूस कबूल करावें लागेल. राष्ट्रीय शिक्षणसंस्थांच्या चालकांनीं स्वतः झीज सोसून एकादा प्रयोग यशस्वी करून दाखवावा, आणि कावेबाज नोकरशाहीनें आयताच त्याचा फायदा घेऊन आत्मसंरक्षणासाठीं स्वतःच्या नियंत्रणाखालच्या संस्थांतून त्याची बजावणी करावी, असाच प्रकार १९०५ सालापासून आतांपर्यंत चालू आहे. आणि केवळ मातृभाषेंतून

शिक्षण देणारें महिलाविद्यापीठ, टिळकमहाराष्ट्र विद्यापीठ या संस्थांची पुण्यास, आणि गुजराथी विद्यापीठाची अहमदाबादेस यापूर्वीच प्राणप्रतिष्ठा झाली नसती तर प्रस्तुतच्या पदवीदानप्रसंगीं सर चिमणलाल यांनीं देशी भाषेच्या विद्यापीठांची नुसती शाब्दिक महतीहि गाइली नसती, मग तसलीं विद्यापीठें स्थापण्याच्या विचाराची गोष्ट तर बोलावयासच नको.

असो; देशी भाषांतून शिक्षण देणारीं विद्यापीठें स्थापण्याच्या राष्ट्रीय शिक्षणाच्या एका प्रमुख अंगाचा सरकारनें स्वतःच अंगीकार केल्यास आपल्या राष्ट्रीय विद्यापीठांना ही एक सवत उभी राहील कीं काय अशी एक शंका राष्ट्रीय पक्षाच्या मनांत उद्भवल्याशिवाय राहाणार नाहीं. पण अशी भीति मनांत वागविणारास आम्ही ‘लावी पक्षीण आणि तिचीं पिलें’ या गोष्टींचें स्मरण करून देतों. त्या गोष्टींतील शेतकऱ्यानें शेतीची कापणी करण्याचें काम जोंपर्यंत शेजाऱ्यापाजाऱ्यांच्या साहाय्यावर अवलंबून ठेवलें होतें तोंपर्यंत जशी त्या लावी पक्षिणीच्या पिलांस धास्ती बाळगण्याचें कारण नव्हतें, त्याचप्रमाणें सर चिमणलालसारख्यांनीं आजमितीला देशी विद्यापीठासंबंधानें कितीहि शाब्दिक सहानुभूति दर्शविली तरी जोंपर्यंत तिचें प्रत्यक्ष कृतींत रूपांतर होत नाहीं तोंपर्यंत आपल्या विद्यापीठास धोका पोंचण्याचा संभव नाहीं. एवढेंच नव्हे तर राष्ट्रीय शिक्षणाभिमानी सुशिक्षितांची शिक्षणविषयक सुधारणेची कल्पना इतकी व्यापक आणि प्रगति इतकी वेगाची आहे कीं, लोकलज्जेस्तव भीतभीत एकेक पाऊल पुढें टाकणाऱ्या कंजूष सरकारच्या संस्था राष्ट्रीय शिक्षणाच्या संस्थांची बरोबरी करूं शकतील हेंच मुळीं शक्य नाहीं. अर्थातच संपूर्ण स्वराज्य पदरांत पडेपर्यंत राष्ट्रीय शिक्षणाचीं विद्यापीठें हीं सरकारी शिक्षणरूपी नौकेला दीपगृहाप्रमाणें मार्गदर्शकच होऊं शकतील. पूर्ण स्वराज्यप्राप्तीनंतरहि खासगी स्वतंत्र विद्यापीठांची आवश्यकता राहूं शकते कीं नाहीं हा प्रश्न अलाहिदा आहे. परंतु तूर्त तरी राष्ट्रीय शिक्षणवाल्यांनीं स्वतः कष्ट सोसून, स्वार्थत्याग करून, जे जे शिक्षणविषयक प्रयोग यशस्वी करून दाखवावे त्यांचें सरकारकडून कालांतरानें, अत्यल्प प्रमाणांत का होईना, पण अनुकरण केलें जातें व त्या दृष्टीनें राष्ट्रीय शिक्षणाचे हे प्रयोग अखिल भारतवर्षातील शिक्षणाला योग्य वळण लावूं शकतात ही गोष्ट अभिमानास्पद आहे.

याकरितांच राष्ट्रीय पक्षानें आपले स्वतंत्र शिक्षणविषयक प्रयत्न असेच अबाधितपणें पुढें चालवून राष्ट्राच्या कल्याणाचा मार्ग आंखून द्यावा, यांतच त्या पक्षाच्या ओजस्वितेचें बीज आहे.

---

## ५९. नवीं प्रादेशिक विद्यापीठें हवीं

भाषा-प्रांतवार विद्यापीठांची कल्पना इतकी जोरदार आहे कीं, कोणी तिला कितीहि दाबून दडपून टाकण्याचा प्रयत्न केला तरी, ती उलट तितकाच धक्का देऊन उसळी मारून वर डोकें काढल्याशिवाय राहत नाहीं. दोन वर्षांपूर्वी पुण्यास ‘ भरलेल्या ’ कंबळी परिषदेंत ‘भारलेल्या’ सभासदांचें बहुमत असल्यामुळें, अशा नव्या विद्यापीठांना ‘लोकमत’ प्रतिकूल आहे असा आभास भोळ्या लोकांच्या डोळ्यांपुढें उत्पन्न करतां आला ! पण स्वतंत्र वातावरणांत यदृच्छेनें नुकत्याच भरलेल्या दोन विद्याविषयक परिषदांमध्यें, भाषा-प्रांतवार विद्यापीठांच्या इष्टतेचा ठराव कारस्थानी निषेधाला धुडकावून लावून प्रचंड बहुमतानें मंजूर झाला. नवीन विद्यापीठांच्या कल्पनेच्या जीवंतपणाचा दुसरा पुरावा याहून कोणता ?

या दोन परिषदा म्हणजे ( १ ) मुंबई शहरीं भरलेलें मराठी साहित्य-संमेलन, व ( २ ) दुय्यम–शाळा–शिक्षकांची परिषद. साहित्य संमेलनांतील ठराव भाई निमकर यांनीं पुढें आणला व तो मान्य झाला. त्याला पूर्वीचे शिक्षणमंत्री भास्करराव जाधव, खुद्द संमेलनाचे स्वागताध्यक्ष, यांनीं विरोध केला. जाधवरावांची तक्रार अशी होती कीं, महाराष्ट्र विद्यापीठाविषयीं भरपूर माहिती मिळण्याजोगी नाहीं पण हें त्यांचें म्हणणें अगदीं व्यर्थ आहे. एकट्या जाधवरावांखेरीज अशी तक्रार इतर कोणीं केली नाहीं कारण त्यांना ही माहिती भरपूर मिळालेली आहे किंवा मिळाली नसली तर मागितल्यास मिळण्यासारखी आहे हें त्यांना पुरें माहीत आहे. पण आमच्या भास्कररावांच्या हातांत ही माहिती तुम्हीं कोंबली तरी ते डोळे

मिटून बसणार याला कोणीं काय करावें ? आमच्या वरील विधानासंबंधानें कोणास तपशीलवार पुरावा पाहिजे असेल तर त्यानें पुण्यास प्रो. धनंजयराव गाडगीळ यांजकडे चौकशी केली असतां मिळेल इतकेंच आम्हीं सुचवितों घोड्याला पाणवठ्यापर्यंत नेतां येईल. पण तेथें नेल्यावर स्वतः घोड्यानेंच आपलें तोंड उघडलें तर त्याला पाणी पितां येईल. त्याची दांतखिळी न उघडली तर पाण्यानें काय करावें ?

दुसऱ्या परिषदेंत प्रादेशिक विद्यापीठाचा ठराव प्रो. के. टी. शहा यांनीं मांडला. त्याला श्री. कन्हयालाल मुनशी, प्रिन्सिपॉल हॅंपटन व खुद्द अध्यक्ष रे. प्रो. डूहर यांनीं संमति दिली. विरोध करण्यांत प्रो. व्हीलर, प्रो. वाडिया व प्रिं. हॅमिल हे होते. परंतु याहि परिषदेंत विद्यापीठाला अनुकूल असा ठराव प्रचंड बहुमतानें पास झाला. विरोधकांचें म्हणणें जुनेंच, लोकांना माहीत आहे तेंच होतें. तें असें कीं, अशीं निरनिराळीं प्रादेशिक विद्यापीठें झाल्यानें विनाकारण पुष्कळ खर्च लागेल. मुंबई युनिव्हर्सिटीचें नुकसान होऊन तिचें महत्त्व कमी होईल आणि प्रांतिक दुरभिमान बळावून व्यापक स्वरूपाच्या राष्ट्रीय वृत्तीला बाध येईल. पहिल्या दोन आक्षेपांना थोडक्यांत देण्यासारखीं उत्तरें अशीं कीं, ( १ ) जे लोक विद्यापीठें काढूं पाहतील ते त्यांच्या खर्चाची तजवीज करतीलच; आणि ( २ ) मुंबई विद्यापीठाची आजची श्रीमंती तरी मुंबई बाहेरच्या इतर विभागांतल्या लोकांकडूनच मिळालेली आहे कीं नाहीं ! झालें तर या विभागांनीं, म्हणजे महाराष्ट्र-गुजराथ, कर्नाटक, सिंध यांनीं, आपापलीं खास विद्यापीठें काढल्यानें मुंबई-पीठाची श्रीमंती हटली तर त्यांत अन्याय कसला !

प्रादेशिक विद्यापीठें काढल्यानें प्रांतिक भेदभाव बळावतील या म्हणण्यांतहि कांहींच अर्थ नाहीं. कॉंग्रेसच्या नांवानें आज हिंदु महासभेला जी हरकत घेण्यांत येते, तशाच प्रकारची हीहि आहे. पण समष्टि आणि व्यष्टि यांचे खरे संबंध असेच जिव्हाळ्याचे असतात कीं, एका विषयींची निष्ठा ती त्यापुरती दुसऱ्या विषयींच्या निष्ठेशीं विरोधी किंवा विघातक होत नाहीं. या दोन्ही निष्ठांचा समन्वय 'पिंड ब्रह्मांड' न्यायाच्या, एका वेगळ्या अर्थानें, समंजस मनुष्य करूं शकतो. ब्रह्मांड जसें आपल्या परीनें महत्त्वाचें

तसाच पिंडहि आहे. पिंड सुदृढ राहील तरच ब्रह्मांडहि सुदृढ राहील. कारण ब्रह्मांड ही पिंडाची गोळाबेरीज असते. हिंदु महासभेविषयीं निष्ठा बाळगली म्हणजे एकंदर हिंदुस्थानाविषयींची त्याची निष्ठा कमी झाली असें होत नाहीं. नातवंडावरील प्रेमामुळें मुलावरील प्रेम कमी झाल्याचें कोणी कधीं ऐकलें आहे काय?

हल्लींची मुंबई युनिव्हर्सिटी संकीर्ण व बकाली स्वरूपाची असून, तिजविषयीं आंधळी निष्ठा धरल्यानें यापुढें प्रादेशिक जनतेचा निभाव लागणार नाहीं. शिवाय हिंदुस्थानच्या राष्ट्रावर जशी ब्रिटिश साम्राज्याची स्वार्थी पकड बसली आहे, तशीच मुंबई युनिव्हर्सिटीची पकड इतर प्रांतांवर बसली आहे. त्या पकडींतून त्यांची सोडवणूक केलीच पाहिजे. अनेक रंगांच्या तावदानांनीं बनविलेल्या खिडकीसारखी मुंबई युनिव्हर्सिटी ही वरून अनेक संस्कृतींच्या समुदायानें शोभिवंत दिसते. पण रंगीबेरंगी तावदानांच्या खिडकींतून स्वच्छ प्रकाश कमीच येणार. तो प्रकाश एकजिनशी पांढऱ्या तावदानांतूनच येईल. त्याचप्रमाणें भाषावार प्रांताच्या विद्यापीठाकडून जनताशिक्षणाचें कार्य झालें, तरच तें शुद्ध व उपयुक्त होईल. जशी मुंबई राजधानी तशीच मुंबई युनिव्हर्सिटी म्हणजे बाहेरच्या सर्व इलाख्यांतील संपत्ति आपल्या घरीं आणून त्यावर आपली मिजासखोर चैन चालविणारी! शरिरांतील काळीज हें जसें शरिराच्या अगदीं टोकांनाहि जीवनरस पुरवितें, तसें मुंबई राजधानी व मुंबई युनिव्हर्सिटी करीत नाहींत.

पण अशा आक्षेपांना आतां उत्तरें देत बसण्याचें फारसें कारणच उरलें नाहीं. प्रांतवार विद्यापीठांची कल्पना आपल्या आपण लोकांना इतकी पटत चालली आहे कीं, फक्त एखादा प्रतिभासंपन्न कर्तबगार उमेदीचा शिक्षणमंत्री नव्या राजवटींत निघून तर त्यानें प्रादेशिक विद्यापीठांविषयीं कायदेमंडळांत एखादें बिल आणण्याचाच अवकाश! तें इटकून पास होईल अशी आम्हाला खात्री वाटते. कारण लोकमताचा ओघच तसा वळत चालला आहे. याविषयीं इतिहास पाहूं गेलों तर बराच जुना पण सुसंगत आहे; म्हणून तो थोडक्यांत खालीं देतों.

१८८५ सालीं डे. ए. सोसायटीनें लॉर्ड रे यांना मानपत्र दिलें. त्यांत खालील वाक्य आढळतें. " खऱ्या युनिव्हर्सिटींत लोकांच्या उपयोगी पडणारें प्रत्येक प्रकारचें शिक्षण मिळालें पाहिजे म्हणून असली युनिव्हर्सिटी आपण येथें स्थापाल अशी आशा आहे. " मुंबई युनिव्हर्सिटीचे खुद्द चॅन्सेलर असलेल्या गव्हर्नरांना ही विनंति म्हणजे मुंबई युनिव्हर्सिटीहून वेगळी युनिव्हर्सिटी स्थापण्याचीच सूचना होय. १९१० सालीं किंवा त्या सुमारास लॉर्ड सिडनहॅम यांनीं मुंबई युनिव्हर्सिटीचे चॅन्सेलर या नात्यानें भाषणांत पुणें आणि अहमदाबाद येथें स्वतंत्र विद्यापीठें स्थापणें आवश्यक आहे असें सांगितलें. सॅडलर-शिक्षण-कमिटीच्या रिपोर्टीवरूनहि फुटकळ विद्यापीठांची कल्पना निघू शकते. १९१७ सालीं मुंबईस सर नारायण चंदावरकर हे अध्यक्ष असतां शिक्षण-परिषद भरली; तींत प्रो. कर्वे यांनीं, भाषानुसारी पांच निरनिराळीं विद्यापीठें मुंबई इलाख्यांत काढावीं असा ठराव मांडला तो मंजूर झाला. १९२४ सालीं युनिव्हर्सिटी-सुधारणा-कमिटी नेमिली गेली, तिनेंहि मुंबईबाहेर नवीं विद्यापीठें काढण्याची शिफारस केली. इतकेंच नव्हें तर पहिलें नवें विद्यापीठ कोठें काढावें व त्याला खर्च काय लागेल याचाहि अंदाज सुचविला. १९३३ सालीं मुंबईचे गव्हर्नर सर फ्रेडरिक साइक्स यांजकडे शिष्टमंडळ गेलें. त्यानें विद्यापीठाची योजना त्यांजपुढें मांडली. पुढें तीन महिन्यांनीं पुण्यास कंबळी-परिषद भरली. तींतहि या विषयाचा भरपूर ऊहापोह झाला.

पण सरकार याविषयीं उदासीन म्हणून लोक कांहीं स्वस्थ बसले नव्हते. त्यांनीं खाजगी रीतीनें व जाहीर रीतीनें नव्या विद्यापीठाची कल्पना सिद्ध होण्याकरितां मतप्रसार व सक्रीय सहानुभूति मिळविण्याचा उद्योग कसा चालविला आहे हें प्रो. पोतदार यांच्या छापील पत्रकावरून दिसून येईल. मुंबई इलाख्यांत महाराष्ट्र, गुजराथ, कर्नाटक व सिंध यांची स्वतंत्र विद्यापीठाविषयीं मागणी प्रगट झाली आहे. ही मागणी सयुक्तिक आहे अशाविषयीं पुरावा हाच कीं, मद्रास इलाख्यांत मद्रासची म्हणून एक युनिव्हर्सिटी असतां आंध्र युनिव्हर्सिटी म्हणून स्वतंत्र युनिव्हर्सिटी स्थापिली गेली आहे. केरळ प्रांतांत केरळ विद्यापीठ मंडळ स्थापन झालें आहे. सिलोनकरितां विद्यापीठ स्थापन करण्याची योजना झाली आहे. हिंदी व



मराठी-साहित्य-संमेलनें तीच मागणी करीत आहेत. अशा या लोकमताच्या प्रवाहापुढें स्वार्थी मुंबई युनिव्हर्सिटीच्या विरोधाचा बांध कितीसा टिकणार ? एकाच संयुक्त प्रांतांत लखनौ, अलाहाबाद, आग्रा, अलीगड, बनारस इतक्या वेगवेगळ्या युनिव्हर्सिट्या आज प्रत्यक्ष काम करीत असतां, महाराष्ट्राकरितां खास स्वतंत्र असें विद्यापीठ हवें या मागणीला सरकार तरी काय उत्तर देईल ?

---

## ६०. महाराष्ट्र विद्यापीठ--परिषद्.

[ सदर परिषदेपुढें झालेल्या भाषणाचा सारांश ]

" आतां वेळ थोडा उरला आहे म्हणून मी आपलें भाषणहि फार लांबविणार नाहीं. "

( अध्यक्ष—तुम्ही महाराष्ट्र-युनिव्हर्सिटी-योजनेचे मुख्य चालक आहां, म्हणून तुम्हांला मी भरपूर वेळ देणार आहे. )

आपण मला भरपूर वेळ देणार याबद्दल मी आपला आभारी आहें आणि कदाचित् मी त्याचा भरपूर उपयोगहि करीन. पण नवीन विद्यापीठाच्या योजनेचा मी मुख्य उत्पादक किंवा चालक हा जो मान आपण मला देतां तो मात्र मला स्वीकारतां येत नाहीं. तो मान १९२४-२५ च्या मुं. यु. रिफॉर्म्स-कमिटीकडे जातो. शिवाय या परिषदेंत, चोराला सोडून संन्याशाला बळी द्यावा त्याप्रमाणें, नव्या प्रादेशिक विद्यापीठाची कल्पनाच तेवढी चर्चेला घेणें योग्य असतां, तिचा सर्व विरोधी भर महाराष्ट्र-विद्यापीठावर दिला गेला ही माझी कालची तक्रार आजहि शिल्लक आहे.

( अध्यक्ष— मी अध्यक्ष या नात्यानें कालचा दिलेला निर्णय तुम्ही अमान्य करतां काय ? )

आपला निर्णय मी अमान्य कसा करूं ? पण तो देण्याचा आपल्याला जसा हक्क होता तसा त्या निर्णयाचे परिणाम कसे घातक झाले हें सभेला जाणविण्याचा उलट हक्क मलाहि आहे. कारण काल व आज दोन दिवस सभासदांनीं, मुख्य विषय सोडून, महाराष्ट्र-विद्यापीठाचाच तेवढा

विषय विनाकारण पुढें मुद्दाम ओढून, कुचेष्टेनें त्यावर जळजळीत टीकेचा भडिमार केला हा अन्याय नव्हे तर काय ? राजे लोकांच्या घरीं अशी चाल असते कीं, राजपुत्रानें अपराध केला तर त्याची शिक्षा म्हणून एखाद्या गरीब नोकराला छड्या व चाबूक मारतात ! तसाच प्रकार हा झाला. पण इतर सभासदांनीं कांहीं एका हेतूनें जी दिशाभूल केली तिला मी बळी पडणार नाहीं हें मात्र निश्चयानें सांगतों. महाराष्ट्र विद्यापीठाचें वकीलपत्र मीं या सभेंत घेतलेलें नाहीं. तिची योजना किंवा तिचा द्रव्य-निधि याविषयींहि मी एक शब्ददेखील तुम्हांला सांगणार नाहीं. कारण परि-षदेच्या कार्यक्रमपत्रिकेंत, पहिला चर्चेचा मुद्दा म्हणून, नवीन प्रादेशिक विद्या-पीठाचा जो सरकारी रीतीनें घातला गेला त्याला कांहीं सभासदांनीं बगल दिली. पण तोच मुद्दा नेमका मी आपणांपुढें मांडणार आहे. कारण तो मुद्दा सर्वसाधारण आहे, तत्त्वाचा आहे. अर्थात् त्यावर जो निर्णय होईल तो महाराष्ट्र-विद्यापीठालाहि लागू होईलच.

## करोल ब्राह्मणेतरांचाच रिपोर्ट

प्रत्येक टीकाकाराला प्रत्येक मुद्द्यावर मी वेगळें उत्तर देणें शक्य नाहीं. आणि कांहीं टीकाकारांना तर मी मुळींच उत्तर देणार नाहीं. नव्या विद्या-पीठाची कल्पना मीं काढलेली नाहीं; ती वर सांगितलेल्या कमिटीनेंच काढली आहे. ही कल्पना पुण्यांत माझ्या सुपीक डोक्यांतून निघाली असा आक्षेप एका वर्तमानपत्रांत एकानें घेतला आहे ! त्याला उत्तर हेंच कीं, सगळ्याच कल्पना मेंदूतून निघतात ! आणि नवी कल्पना निघण्याला आधीं मेंदू चांगला लागतो. तो आपल्या डोक्यांत आहे कीं नाहीं याचा विचार आक्षेपकानें आधीं स्वतःचें डोकें खाजवून करावा ! कमिटींतील सभासदांच्या डोक्यांत अशा मोठ्या कल्पना जन्मण्याइतका मेंदू होता हें मात्र खास. ही कल्पना बामणांनीं काढली असा एक आक्षेप. पण कमिटीवर चौदा सभासद होते त्यांत डॉ. रँ. परांजपे याशिवाय एकहि ब्राह्मण नव्हता आणि डॉ. परांजपे हे कसे काय ब्राह्मण आहेत हें लोक जाणतातच. माझा अर्थ असा कीं, माझ्यासारख्या ब्राह्मणावर जे आरोप ब्राह्मणेतर करूं शकतील ते परां-जपे यांजवर करतां येणार नाहींत इतके ते उदारमतवादी आहेत. पण त्याहून मौज ही कीं, या अर्ध्यामुर्ध्या ब्राह्मणाचीहि त्या रिपोर्टावर सही

कांहीं कारणानें झाली नाहीं. मिळून उरले तेराच्या तेरा करोल ब्राह्मणेतर ! त्यांना वाटल्यास नांवें ठेवा. पुण्याच्या बामणाला कां नांवें ठेवतां ? या तेरांत कोणी युरोपियन, कोणी अनुभविक व्यापारी, व अनेक विद्वान् असे लोक आहेत. त्यांनींच नव्या विद्यापीठाची कल्पना सुचविलेली आहे. त्यांच्यावर तुम्हांला जातिद्वेषाचा किंवा गुप्त राजकीय हेतूंचा आरोप करतांच येणार नाहीं !

## विद्यापीठाची परंपरा

आतां या कल्पनेची परंपरा पाहा. १९२५ सालीं कमिटीचा रिपोर्ट झाला. १९२६ सालीं मुंबई-सरकारानें तो मुं. युनिव्हर्सिटीकडे पाठवून अभिप्राय मागितला. तेव्हां मुख्य सेनेट सभेनें, सिंडिकेट सभेनें नव्हे, रिपोर्टांतील शिफारशींना पाठिंबाच दिला. तेव्हां सहजच वाटलें कीं, सरकार एखादा ठराव काढून आपलें धोरण जाहीर करील. पण तेव्हांचे शिक्षणमंत्री पडले आमच्या जाधवरावांसारखे ! तेव्हां त्या प्रश्नाचें काय झालें असेल हें मनांत ओळखालच. पण दुर्दैवानें १९२८ सालीं मुं. यु. चा नवा कायदा झाला. त्यांत संभवित नव्या विद्यापीठांच्या कल्पनेचा स्पष्ट उल्लेखच केला गेला. प्रि. हॅमिल म्हणतात कीं, "या कायद्याच्या सरनाम्यांत मुं. यु. नें उच्च शिक्षणाची विशेष सोय करावी, असा हेतु दर्शविला आहे." होय; मी तें नाहीं कोठें म्हणतों ! युनिव्हर्सिटीनें त्याचें प्रत्यक्ष काय केलें हा प्रश्न वेगळा. पण सरनाम्यापेक्षां ॲक्टाचें तेरावें कलमच येथें अधिक लागू पडतें. कारण तेथें नव्या घटनेंत एक्स-ऑफिशिओ फेलोज व सभासद कोण असावेत हें सांगतांना, मुंबई इलाख्यांत नवी विद्यापीठें झालीं तर त्यांचे व्हाइस चॅन्सेलर हे असे सभासद असावेत असें स्पष्ट म्हटलें आहे. यावरून हा कायदा करतेवेळीं नव्या विद्यापीठांचा संभव सरकारला स्पष्ट दिसत होता.

असो, तात्पर्य १९२४ पासून १९२८ पर्यंत नव्या विद्यापीठांच्या कल्पनेची परंपरा अखंड चालू राहिली तरी मुंबई-सरकार आपलें धोरण प्रकट करीत नाहीं, हें पाहूनच या नव्या चळवळीचा आम्ही उपक्रम केला आहे. पण तोहि एकट्या महाराष्ट्राला नवें विद्यापीठ द्यावें म्हणून नव्हे; तर गुजराथ, कर्नाटक, सिंध यांनाहि तें मिळावें म्हणून. पैकीं सिंध

आतां वेगळा होणार. तेथील लोकांना स्वतःच्या कायदे-कौन्सिलांत नव्या विद्यापीठाचा कायदा करवून घेतां येईल. त्याला मुं. यु. विरोध कसा करणार हें सांगा पाहूं ?

## विद्यापीठें निघणारच.

कर्नाटकचे म्हणून प्रतिनिधि या सभेला आले. त्यांनीं येथें महाराष्ट्र युनिव्हर्सिटीला विरोध केला. तो ते करणारच. पण कर्नाटक प्रांतांत एकीकरणाची चळवळ सुरू आहे व प्रांतिक एकीकरण विद्यापीठाशिवाय सार्थ व सफल होत नाहीं हें त्यांनाहि माहीत असेल. पुण्याच्या या परिषदेंत त्यांनीं खुशाल वाटेल तें बोलावें ! गुजराथेंतील एका प्रतिनिधीनें या सभेंत नव्या विद्यापीठाला पाठिंबाच दिला. परवा दि. ब. ध्रुव, बनारस युनिव्हर्सिटीचे प्रिन्सिपॉल, यांच्या अध्यक्षतेखालीं अहमदाबादेस सभा भरून गुजराथी विद्यापीठाची मागणी करण्यांत आली अशी तारच आली आहे. बडोद्याचे अधिपति श्री. सयाजीराव यांनीं गुजराथ-विद्यापीठाची योजना तयार करून ठेवली आहे हें प्रसिद्ध आहे. तात्पर्य, महाराष्ट्राच्या द्वेषानें इतर प्रांतांतील लोक कांहींहि बोलले तरी, त्यांच्या प्रांतांत लोकमत खरें कसें आहे, हें योग्य साधनांनीं अजमाविल्यास तें कळून येणारें आहे; व तें अनुकूलच आढळेल असें मला वाटतें. तात्पर्य, नव्या विद्यापीठाच्या कल्पनेचा इतिहास व परंपरा ही अशी आहे. म्हणून तिचा त्याग करावा व धोरण बदलावें असें जे म्हणतात त्यांच्यावरच त्याच्या शाबितीचा सर्व बोजा येऊन पडतो. स्वतः माझा तर विश्वासच आहे कीं, तुम्ही कांहींहि म्हणा, कांहीं करा, नव्या विद्यापीठाची कल्पना रुजणार व फलप्रद होणार. तिला तुम्ही जादा विद्यापीठ म्हणा, प्रादेशिक म्हणा, भाषिक म्हणा, उपप्रांतिक म्हणा, स्थानिक म्हणा, किंवा काय वाटेल तें इतर नांव द्या.

## चंदावरकर काय म्हणाले ?

यानंतर आतां मी खुद्द मुंबई-विद्यापीठासंबंधानें दोन शब्द बोलतों. कारण नव्या पीठांच्या योगानें मुंबई विद्यापीठाचें नुकसान होण्याचा संभव कोणासहि वाटतो. प्रथम मला व्हाइस चॅन्सेलर विठ्ठलराव चंदावरकर यांचे कृतज्ञतापूर्वक आभार मानले पाहिजेत. कारण त्यांनीं भाषण करतांना आमच्या टीकाकारांना परस्पर उत्तर देऊन, आमचे हेतु शुद्ध आहेत,

विद्यापीठ मागण्यांत आमचा राजकीय हेतु नाहीं, उच्च संस्कृतीच्या दृष्टीनें विद्यापीठ मागण्याला पुण्याची पात्रता आहे इ० उदार उद्गार काढले. तसेंच भावी प्रतिस्पर्धी संस्थेबद्दलहि त्यांनीं समर्थन न केलें तरी द्वेष प्रकट केला नाहीं. अतिशय विनत भावानें व किंबहुना स्वतःकडे कमीपणा घेऊन ते म्हणाले, " मुंबई युनिव्हर्सिटीच्या चुका असतील त्या सुधारण्याची आमची इच्छा आहे. आम्हांला एक वेळ संधि तरी देऊन पहा. " विलायतेंत गवती मैदान तुडवूं नये म्हणून पाट्या लावलेल्या असतात. त्यांवर " गवत उगवण्याला संधि द्या " असे मार्मिक शब्द लिहिलेले असतात त्यांची मला आठवण झाली.

## हॅमिल यांचा कांगावा

पण मी चंदावरकर यांना असें सांगतों कीं, अशी विनम्र प्रार्थना करण्याचें तुम्हांला कांहींच कारण नाहीं. नवें विद्यापीठ मागण्यांत कोणाचाहि हेतु मुं. यु. ला दोष देण्याचा, पायमल्ली करण्याचा, उणेंदुणें काढण्याचा नाहीं आणि आपल्या शुभ्र कीर्तीच्या वस्त्रावर नव्या विद्यापीठाच्या मागणीनें दोषांचा शिंतोडा उडतो, अशीहि भावना तिनें करून घेऊं नये. तिनें आजवर पुष्कळ काम केलें, चांगलें काम केलें, अजूनहि चांगलें काम ती करील. तिच्या कर्तृत्वाविषयीं कोणालाहि शंका नाहीं. तिच्या प्रचंड कामाच्या व्यापाचें वर्णन कोणीं केलें तर तें तिची अपात्रता जाणविण्याकरितां नव्हे, किंवा तिच्या संपत्तीचें वर्णन केलें तर तिचा हेवा वाटून किंवा कायदेशीर हिस्सा मागण्याकरतां नव्हे. वास्तविक तिच्या संपन्नतेचें समर्थन करतांना प्रि. हॅमिल यांनीं केला तसा कावा किंवा कांगावा करण्याचें कारण नव्हतें. कारण तिच्या लाखों रुपयांच्या शिलकी रकमेला रुपये न म्हणतांना त्यांचे त्यांनीं मुद्दाम पौंड करून सांगितले. हेतु हा कीं, एकदम तेरा–चौदा पट कमी संख्या व्हावी. पण या युक्तीनें जगांतील समुद्राचें पाणीहि फार थोडें असें म्हणतां येईल. कारण अवघे सातच समुद्र ! काय अधिक आहेत !! मुंबई युनिव्हर्सिटीचे लाख रुपये विलायतेंत का खर्च व्हावयाचे आहेत म्हणून त्यांचे पौंड करून सांगावेत ? असला कोटिक्रम साधक न होतां बाधकच होतो हें त्यांनीं पुरें लक्षांत ठेवावें.

## आम्हांला संधि द्या.

नवें विद्यापीठ मागतांना आमची द्वेषबुद्धि मुळींच नाहीं. तर अधिकारविभागणी, कार्यविभागणी, हें लौकिक कार्यांतील महत्तत्त्व लक्षांत घेऊनच मागणी करण्यांत येत आहे. लौकिकापेक्षांहि कौटुंबिक व्यवस्थेंतील उदाहरण दिलें तर तें अधिक पटेल. युरोपियन समाजांत अशी चालच आहे कीं, मुलगा कर्ता झाला म्हणजे तो आपलें बिऱ्हाड वेगळें करतो. पण त्याचा अर्थ तो भांडून निघाला असा होत नाहीं. तर मनुष्य वयांत आल्यावर त्यानें आपला कारभार आपण करावा अशा समजुतीनें ! अशा वेळीं चंदावरकर यांनीं शब्दयोजना केल्याप्रमाणें, " बाळ आम्हांला संधि तरी देऊन पहा " असें आई-बाप म्हणत नाहींत. कारण तसें म्हणण्याचा प्रश्नच नसतो. सवत्या सुभ्याची योजना उभयपक्षीं हौसेनेंच होते. आई-बाप मुलाला निघतांना प्रेमानें आशीर्वाद देतात व मुलगा ते कृतज्ञतेनें स्वीकारतो. कदाचित् या सवत्या सुभ्याचा बस प्रथम नीट बसावा म्हणून आई-बाप त्याला कांहींतरी आपल्या पैशांतून देणगीच देतात ! तात्पर्य, संपन्न अशा मुंबई युनिव्हर्सिटीनें नवीन विद्यापीठांना सुरुवातीला देणग्या दिल्या तरीहि तें शोभेल. मग चंदावरकरांना विचारूं का कीं तसें कांहीं करण्याचा विचार आहे काय ? कारण इतर विद्यापीठें नव्हतीं, मुंबईचें एकटें एकच होतें, अशा वेळीं इलाख्याच्या सर्व भागांतून ज्या देणग्या मिळाल्या त्यांनींच मुंबईपीठाची संपन्नता सजली आहे. पण तो मुद्दा विनोदाचा म्हणून वाटेल तर मी बाजूला ठेवतों.

## वेगळें पीठ कां ?

आतां प्रादेशिक विद्यापीठावरील कांहीं आक्षेपांना उत्तर देतों. पहिला हा कीं, अशा विद्यापीठांनीं फाटाफूट होते व दुही माजते. पण हा आक्षेप खरा नाहीं. वेगळी व्यवस्था करणें यांत फुटून निघण्याची वृत्ति असतेच असें नाहीं. वेगळ्या व्यवस्थेंत अधिक सोय व अधिक कार्यक्षमता असते म्हणूनच ती करावयाची. मी असेंच म्हणणारा आहे कीं, सर्व हिंदुस्थान हा एकच देश व अविभाज्य देश आहे व असला पाहिजे. ब्रिटिश मुलुखाला उद्देशून मी हें म्हणतोंच पण त्यांत फारसें स्वारस्य नाहीं. कारण एकाच इंग्रजी राज्याखालीं असल्यामुळें ब्रिटिश हिंदुस्थान हा सर्व एक





देश आहेच आहे. पण देशी संस्थानांतून तेथील प्रजेसंबंधीं मी बोलतों तेव्हांहि हेंच प्रतिपादितों कीं, संस्थानें व ब्रिटिश मुलूख मिळून सर्व एक व अविभाज्य देश आहे व असला पाहिजे. पण कोणतेंहि ध्येय व त्याचा व्यवहार यांचा मेळ घातला पाहिजे. तो न घातला तर हास्यास्पदता निर्माण होते. ब्रिटिश मुलुखच नुसता घेतला तरी त्यांत कारभाराच्या सोयी-करिता प्रांत पाडलेच आहेत कीं नाहीं ? फार काय, पण या एकाच मुलुखां-तील एकेका प्रांतांत कांहीं ठिकाणीं अनेक विद्यापीठें आहेतच कीं नाहींत ! एवढेसें इंग्लंड ! एका टोकापासून दुसऱ्या टोकापर्यंत प्रवास करण्यास बारा तासहि लागत नाहींत. पण या एवढ्याशा भागांत दहा–वीस विद्यापीठें कां असावींत ? तीं काय त्या लोकांना दुहीची–भांडखोरीची आवड म्हणून ?

## आम्ही भांडखोर नाहीं !

यूरोपमध्येंहि अशींच लहान लहान विद्यापीठें आहेत. याचें कारणच हें कीं, राजकीय सत्ता व सांस्कृतिक सत्ता यांचीं क्षेत्रें व अधिकारमर्यादा समव्याप्त असणें शक्य नसतें. आम्ही वेगळें विद्यापीठ मागतों म्हणून एकीचें ध्येय सांगून, व आम्हांला भांडखोर, फुटून वागणारे, सवता-सुभा-वाले म्हणून खिजवितां काय ? पण आक्षेपकांचें तोंड बंद करण्यासारखें एक उत्तर मजजवळहि आहे. तें असें कीं, हिंदुस्थानाच्या नवीन राज्य-घटनेंत ज्यांनीं जातवार मतदारी आग्रहानें मागून, आणि ज्यांनीं ती मोठ्या उदार हस्तानें देऊन, जातिद्वेषाला सर्व रान मोकळें करून दिलें, त्या जात-वाल्यांना व त्या सरकारांना आम्ही पुण्याचे लोक वेगळें विद्यापीठ मागतों एवढ्याकरितां आम्हांला नांवें ठेवण्याला काय तोंड आहे ? म्हणून असली बाष्कळ कोटि कोणीं करूं नये. आम्ही मागतों तें एखादा सवता सुभा हवा म्हणून नव्हे, तर खुद्द मुंबई–विद्यापीठाच्या कामांत विभागणी कर-ण्याची वेळच आतां आली आहे म्हणून. प्रादेशिक विद्यापीठें निर्माण झालीं तरी त्यांच्यामध्यें परस्पर सहकार्य होणार नाहीं, किंवा होऊंच नये असें आम्ही कोणीहि म्हणत नाहीं. याचें कारण हें कीं, या निरनिराळ्या संस्थांतून अभ्यासक्रम, संशोधन, गुणप्रमाण, परीक्षण, इत्यादि दृष्टींनीं सहकार्य होण्यासारखें आहे व तें व्हावें असें म्हणणारांपैकीं आम्ही आहों.

### अधिकार-विभागणीची जरुरी

कारभाराची वांटणी व अधिकारविभागणी या तत्त्वाचा विजय आज ३० वर्षें हिंदुस्थानांत होत असून, त्याचें अंतिम स्वरूप म्हणून लवकरच राज्यघटनेंत स्वायत्त असे प्रांत निर्माण होणार आहेत व प्रॉव्हिन्शियल ऑटॉनमी मिळणार आहे. स्थानिक स्वराज्यांत तर ती सर्वत्र यापूर्वीच मिळून चुकली आहे. लॉर्ड कर्झन यांच्या वेळीं थट्टेनें असें म्हणता येत असें कीं, हिंदुस्थानांतील एखाद्या टोकाच्या खेडेगांवांत चावडींत लावलेल्या पाटीवरील नांव बदलावयाचें झा ें तर, सिमल्यास बसून कारभार चालविणाऱ्या एखाद्या खातेवार डायरेक्टर-जनरलची परवानगी आधीं घेतली पाहिजे; त्याशिवाय तें होणार नाहीं. इतकी अधिकाराच्या एकीकरणाची अतिशयोक्ति एक वेळ झाली होती ! पण आतां वारा सर्वच अगदीं उलटया दिशेनें वाहत आहे.

### मातृभाषेची प्रगति

आतां मी मातृभाषेच्या मुद्दयावर येतों. आठ वर्षांपूर्वीं युनिव्हर्सिटी कमिटीनेंच म्हणून ठेवलें होतें कीं, मुंबई विद्यापीठांत मातृभाषांची प्रगति दिवसेंदिवस अधिकाअधिक होणार आहे आणि ती व्हावी हेंच योग्यहि आहे. हल्लीं एका इंटर आर्ट्सशिवाय इतर सर्व परीक्षांत मातृभाषेचा प्रवेश झालेला आहे. यंदापासूनच बी. ए. ऑनर्सच्या परीक्षेंत देशी भाषांना स्थान मिळालें. शिक्षणाच्या या सुलभ साधनांचा फायदा विद्यार्थि-वर्ग हळुहळू घेऊंहि लागला आहे. युनिव्हर्सिटीकमिटीचें म्हणणें असें कीं, निरनिराळ्या मातृभाषांचा उपयोग होऊं लागल्यास युनिव्हर्सिटीच्या कामांत फार गुंतागुंत होईल. याचाच अर्थ ही गुंतागुंत न रहावी तर वेगळीं विद्यापीठें असावीं. अर्थात् कमिटीची शिफारस सकारणच होती. मातृभाषांच्या अभ्यासाचा विस्तार वाढणारा म्हणून वेगळीं विद्यापीठें करावीं हा एक मार्ग; व वेगळीं विद्यापीठें करावीं लागतील या भीतीनें मातृभाषांच्या अभ्यासाचा प्रसार थांबवावा हा दुसरा मार्ग. यांपैकीं अधिक न्यायाचा व श्रेयस्कर कोणता हें मी तुम्हांला सांगावयाला पाहिजे काय ?

### मातृभाषा हीच बोधभाषा

मी तुम्हांला असें हडसून खडसून विचारतों कीं, सगळ्या जगांत

असा एक तरी देश आहे काय कीं ज्यामध्यें मुलांचें शिक्षण-युनिव्हर्सिटींतील शिक्षण-परकीय भाषेंतून दिलें जातें. ( येथें प्रो. फादर ड्रूअर यांनीं युरोपांतील अपवादात्मक अशीं एकदोन उदाहरणें सांगितलीं ). प्रोफेसरसाहेबांनीं दिलेलीं उदाहरणें खरीं असलीं तरी त्या अपवादांनीं माझे सिद्धान्तिक बोलणेंच खरें ठरतें. जपानानें युरोपांतील सर्व कांहीं घेतलें आहे. ज्ञान सुधारणा इ० पण अशा जपानांतदेखील युनिव्हर्सिटींतील शिक्षण मातृभाषेंतूनच होत आहे. क्वचित् शास्त्रीय विषयांत एखाद्या परभाषेचा उपयोग केल्यास न कळे.

अशी जगांतील स्थिति असल्यामुळें हिंदुस्थानांतच परभाषेचा जुलूम आम्हीं कां व किती सोसावा ! आतां हिंदुस्थानानें परकीय राज्य आपल्या डोक्यावर घेण्याचा गुन्हाच केला आहे, तेव्हां राज्यकर्त्यांच्या भाषेचा वरचष्मा येथें व्हावा हें सरळच आहे. पण त्याची मर्यादा दिवसेंदिवस हटली पाहिजे.

## परकीय भाषेचा अवघडपणा.

परकीय भाषा कोणी किती चांगली शिकला तरी ती परकीच. मी स्वतः आज ४५ वर्षें इंग्रजी भाषेचा व्यासंग करतों. पण अजून उठून इंग्रजींत बोलण्याचा प्रसंग आला म्हणजे मला सुख वाटत नाहीं. याचें कारण कदाचित् असें असेल कीं, परकी भाषा बोलतांना अनुद्दिष्ट, अप्रयोजक, किंवा तोल घसरणारा शब्द सहज हटकून निघून जातो; व औचित्याची दृष्टि असेल असा मनुष्य ही चूक लक्षांत येतांच गांगरून जाणें स्वाभाविक आहे. लाज न ठेवतां बोलणाराला मैदान मोकळेंच असतें. इंग्रजी बोलतांना हिंदी लोक स्वतःला हास्यास्पद करून घेतात; पण युरोपियन लोकांनींहि यांत तोरा मिरवावयास नको. सिव्हिलियन लोकांना डिपार्टमेंटल देशी भाषांच्या परीक्षा ठेवलेल्या असतात; पण त्या काय असतात हें मला माहीत आहे. कोणाहि इंग्रजाला दहा मिनिटेंपर्यंत हिंदुस्थानांतील कोणतीहि भाषा अस्खलित बोलण्याविषयीं मी आव्हान करतों. ते स्वतःला हास्यास्पद करून घेतल्याशिवाय राहणार नाहींत. तात्पर्य, बोधाचें उत्तम साधन म्हणजे मातृभाषा. ती आपली कोणी सोडीत नाहीं. ( प्रि. हॅमिल म्हणाले–' वः, आम्हीं स्कॉच लोकांनीं नाहीं का इंग्रजी भाषा स्वीकारली ! ' ) हॅमिल

साहेबांना मी सांगतों कीं, स्कॉच लोकांनीं सगळें इंग्लंडचें राज्यच ताब्यांत घेतलें अशी इंग्रज लोकांचीहि तक्रार आहे. मग येवढें इंग्लंडचें राज्य व पैसा खिशांत आल्यावर मोबदला म्हणून त्यांनीं आपली भाषा कां सोडूं नये ? आम्हांलाहि उद्या इंग्लंडवर राज्य मिळालें तर आम्हीदेखील मराठी सोडून इंग्रजीच घेऊं. काय हरकत आहे ?

## गैरसमजाचा खुलासा.

मातृभाषेसंबंधानें एका गैरसमजाचा खुलासा केला पाहिजे. प्रादेशिक विद्यापीठें स्थापलीं तर त्यांत अनेक भाषा बोलणारे लोक येणार, म्हणून अनेक देशी भाषांतून शिक्षणाची योजना करावी लागेल, मग मुंबई-विद्यापीठांतील भाषांच्या खिचडीपेक्षां तुम्ही अधिक काय मिळविलें ? व तुमचा गोंधळ कसा वांचणार ? असें कोणी विचारतात. त्याला माझें उत्तर असें कीं, प्रांतवार विद्यापीठें स्थापिलीं म्हणजे तेथें शिक्षण मुख्यतः त्या प्रादेशिक भाषेंतूनच बहुतेक दिलें जाईल. वेगळी मातृभाषा असणाऱ्या विद्यार्थ्यांची संख्या लक्षांत घेण्याइतकी पुष्कळ असेल, तरच त्या भाषेंतून शिक्षणाची कांहीं व्यवस्था करावी लागेल. पण दोनशें मुलांच्या कॉलेजांत वेगळी मातृभाषा बोलणारे पांच विद्यार्थी आले तर तेवढ्याकरितां वेगळे वर्ग, वेगळे शिक्षक, अशी सजोड व्यवस्था करण्याची जबाबदारी कॉलेजाच्या चालकावर नाहीं. त्या विद्यार्थ्यांनीं मुंबईच्या इंग्रजी विद्यापीठांत खुशाल जावें. उदा० कानडी लोकांनीं म्हैसुरांत कां जाऊं नये ? उर्दू मातृभाषावाल्यांनीं हैद्राबादेस कां जाऊं नये ?

## बहुसंख्य लोकांची भाषा

हिंदुस्थानांतील म्युनिसिपालिट्यांपासून लीग ऑफ नेशन्सच्या संरक्षणाखालीं असणाऱ्या अल्पसंख्य राष्ट्रांपर्यंत एकच नियम आहे; व तोच समंजसपणाचा आहे. असा कीं विशिष्ट भाषा बोलणाऱ्या विद्यार्थ्यांची संख्या अमुक किमान मर्यादेवर असेल तरच आपल्याकरितां खर्च करून शिक्षणाची वेगळी सोय करा असें म्हणण्याचा हक्क त्यांना येतो, एरवीं नाहीं. ही गोष्ट लक्षांत घेतल्यास जी अडचण आज मुंबईच्या विद्यापीठासंबंधानें आहे ती प्रादेशिक विद्यापीठांत उरणार नाहीं. कोणत्याहि प्रदेशांत राहणारे अल्पसंख्य लोक तेथें उपरे नसतील तर म्हणजे कायमचे रहिवासी असतील

तर तेथील बहुसंख्य लोकांची भाषा शिकतात व या उलट-सुलट तारतम्यानेंच हा प्रश्न सोडविला पाहिजे. राजकर्त्यांची भाषा ती प्रजेची भाषा नाहीं असें पुष्कळ ठिकाणीं घडतें. शिंदेशाहींत राजा मराठा, पण दरबारी भाषा मराठी नाहीं; हिंदी, उर्दू आहे. बडोद्याचा राजा मराठा, पण राज्यकारभाराची भाषा गुजराथीच आहे. येऊन जाऊन हैद्राबादेंत मात्र विपरीत घडत आहे. कारण निजामशाहींत नऊ-दशांश लोक असे आहेत कीं त्यांची मातृभाषा उर्दू नाहीं, असें असतां राजा मुसलमान म्हणून युनिव्हर्सिटी उर्दू भाषेची ठेविली आहे! पण निजामशाहींत इतर इतके अन्याय चालले त्यांतलाच हा एक. त्या अन्यायाची दाद कोण लावून देणार?

असो. अशा रीतीनें प्रादेशिक विद्यापीठावर जे आक्षेप येतात त्यांना मी यथामति उत्तरें दिलीं आहेत आणि अजून तरी सरकारनें याविषयीं आपलें धोरण प्रकट करावें अशी माझी आग्रहाची सूचना आहे. तथापि फिरून सांगतों कीं, महाराष्ट्र युनिव्हर्सिटी हा विषय या सभेपुढें नाहीं. तिची योजना आपणांपुढें नाहीं. तिच्या खर्चाचें अंदाजपत्रक आपल्यापुढें नाहीं. कारण ही परिषद त्या गोष्टींचा विचार करण्याकरितां भरविलेलीच नाहीं. म्हणून तिला ज्यांनीं नांवें ठेविलीं ते सभेपुढें नसलेल्या भलत्या विषयावर भलतेंच बोलले असें मी म्हणेन!"

---

# ६१. महाराष्ट्राकरितां स्वतंत्र विद्यापीठ

मुंबई-विश्वविद्यालयाचा पदवीदान समारंभ गेल्या मंगळवारीं मुंबईस साजरा झाला. त्या वेळीं विश्वविद्यालयाचे चॅन्सेलर व व्हाईस चॅन्सेलर हे दोघेहि हजर होते. अशा स्थितींत नवीन पदवीधरांना उपदेश करण्याचा मान चॅन्सेलर यांसच मिळावयाचा. इलाख्याचे गव्हर्नर हे त्यांतील विश्वविद्यालयाचे स्वयंभू चॅन्सेलर होत. परंतु मुंबई इलाख्याचे गव्हर्नर सर फ्रेड्रिक साइक्स यांनीं उपदेशाचा मान यंदा आपण न स्वीकारतां व्हाईस चॅन्सेलर यांसच घेऊं दिला. गेल्या वर्षी चॅन्सेलर या नात्यानें साईक्स साहेबांनीं पदवीधरांना उपदेशपर भाषण केलेंच होतें. त्यामुळें असो किंवा

देशांतील राजकीय परिस्थिति सरकारास प्रतिकूल असल्यामुळें हिंदी पदवीधरांस आपण केलेला उपदेश रुचणार नाहीं असें त्यांचें मन त्यांस सांगू लागल्यामुळें असो, किंवा नवीन व्हाईस चॅन्सेलरास हा मान देणें त्यांस जरूर वाटल्यामुळें असो, व्हाईस चॅन्सेलर ना. मिर्झाअल्ली अकबरखान यांनीं हें कार्य यंदा पार पाडलें.

### बोलतात एक व वागतात भलतेंच

हिंदुस्थानांत ज्यांची संख्या थोडी, त्यांनीं हिंदुस्थानावर राज्य करावें, असा अलीकडे ईश्वरी संकेत ठरला असल्यास न कळे. कारण मुंबई इलाख्यांत इंग्रजलोक मूठभर, तरी मुंबई इलाख्यावर राज्य इंग्रजांचें. इंग्रजापेक्षां मुसलमान संख्येनें जास्ती पण हिंदुलोकांपेक्षां पुष्कळ कमी, म्हणून इंग्रजांच्या खालोखाल मुंबई इलाख्यावर राज्य मुसलमानांचें असें सांप्रत तरी अनुभवास येत आहे. तथापि कांहीं म्हटलें तरी मुसलमानांची जन्मभूमि हिंदुस्थानच असल्यामुळें, त्यांना हिंदुस्थानचा अभिमान इंग्रजांपेक्षां जास्ती वाटावा हें स्वाभाविक होय व त्याचा प्रयत्नहि ना. मिर्झाअल्ली अकबरखान यांनीं आपल्या भाषणांत आणून दिला आहे. गव्हर्नर सर साईक्स यांचें गेल्या सालचें भाषण मिर्झाअल्लींच्या यंदाच्या भाषणापेक्षां विद्वत्तेच्या दृष्टीनें कदाचित् सरस असेल, त्यांतील उदात्त तत्त्वांचें अवडंबरहि मोठें असेल, पण त्यांत आपलेपणाचा ओलावा फारच थोडा असल्यानें त्याचा परिणाम नूतन पदवीधरांच्या मनावर कदाचित् मुळींच झालाहि नसेल; किंबहुना असले बडेसाहेब बोलतात एक व वागतात भलतेच. या कारणानें गव्हर्नरसाहेबांच्या भाषणाचा त्यांना तिटकाराहि वाटला असेल.

### शिक्षणाची सहाशेंपट वाढ

व्हाईस चॅन्सेलर नामदार मिर्झाअल्ली यांच्या भाषणांत उदात्त तत्त्वांचा पोकळ दिमाख नव्हता व मोहक शब्दांचें इंद्रजालहि पसरलेलें नव्हतें. त्यांचें भाषण अगदींच साधें होतें. तथापि त्यांत मुसलमानी बाण्याचा मुळींच पीळ नव्हता असेंहि नाहीं. मुसलमानांची ती उर्दू भाषा, त्या मद्रेसा, आणि मुंबई युनिव्हर्सिटीनें इंग्रजीचें प्रभुत्व झुगारून दिल्यावर व गुजराथ व महाराष्ट्र फुटून निघून मुंबई युनिव्हर्सिटी एकट्या मुंबई शहरापुरतीच राहिल्यावर, मुंबई युनिव्हर्सिटीची बोध–भाषा उर्दूच ठेवण्याचा

तो अहंकार, त्यांच्या भाषणांतून ठायीं ठायीं डोकावत होता असें म्हणण्यांत अयथार्थ वर्णनाचा दोष मुळींच येणार नाहीं. हा ताठा वगळला असतां मिर्झाअली यांचें भाषण एकंदरीनें बरें झालें. मुंबईची युनिव्हर्सिटी स्थापन झाल्यापासून मुंबई इलाख्यांत ज्ञानाची प्रगति किती झाली हें पाहाण्याची अनेक मापें आहेत. त्यांपैकीं एक माप म्हणजे पदवीधरांची शिरगणति. १८६२ सालीं मुंबई-विश्वविद्यालयांतून ८ पदवीधर निर्माण झाले. पण त्यांची वाढ गेल्या ६८ वर्षांत होत होत यंदा पैदा झालेल्या पदवीधरांची संख्या ४७०० वर गेली. याचा अर्थ शिक्षणाचा फैलाव इतक्या वर्षांत जवळ जवळ सहाशें पटींनीं वाढला !

## बौद्धिक तालिमखाना

हिंदुस्थानाइतकी पदवीधर होण्याची प्रवृत्ति पाश्चात्य देशांतूनहि क्वचि-तच आढळून येते. परंतु पाश्चात्य देशांतील पदवीधरांनीं लावलेलें शास्त्रीय शोध, निरनिराळ्या विषयांवर लिहिलेले ग्रंथ, व स्वभाषेची वाढविलेली योग्यता, यांचा विचार केल्यास आमच्या पदवीधरांनीं बजावलेली काम-गिरी त्यांच्या पासंगासहि पुरणार नाहीं. तथापि इंग्रजी विद्येच्या प्रादु-र्भावानें एक महत्त्वाचें कार्य केलें. तें हें कीं, देशांत राजकीय व सामाजिक क्रांति करून सोडली. देशांत कायदेभंगाच्या चळवळीनें जें उग्र स्वरूप धारण केलें आहे, त्याचें बरेंचसें श्रेय इंग्रजी विद्येसच दिलें पाहिजे यांत शंका नाहीं. अर्थात् हा विचार एकांगी झाला. म्हणून युनिव्हर्सिटीच्या शिक्षण–क्रमांत या एकाच विचारावर जोर देऊन चालणार नाहीं. किंब-हुना शिक्षणाचा असा राजकीय परिणाम व्हावा, हा हिंदी लोकांना इंग्रजी विद्या शिकविण्यांत इंग्रज सरकारचा हेतुहि नव्हता. विद्यापीठ हा राष्ट्रो-पयोगी अनेक विद्वान् तरुण निर्माण करण्याचा तालिमखाना आहे. त्यांतून अनेक विद्या, कला, कौशल्य, कारखाने, उद्योगधंदे व संशोधन यांत पारं-गत अशीं माणसें तयार होऊन त्यांनीं आपला देश संस्कृतीचें व ऐश्वर्याचें माहेरघर करून सोडावयास पाहिजे.

## आमच्या देशांतील रडकथा

पण त्याऐवजीं आमच्या या देशांत आज काय दृष्टीस पडत आहे ? नोकऱ्या मिळत नाहींत, व ज्ञान नसल्यामुळें नवीन धंदेहि काढतां येत

नाहींत, म्हणून हजारों सुशिक्षित असंतोषाचे व निराशेचे दीर्घ उसासे सोडीत बसले आहेत. मुंबई युनिव्हर्सिटी स्थापन होऊन सत्तर वर्षें भरत आलीं तरी तिला आपलें असें उद्योगधंद्याचें एक कॉलेज स्थापन करतां येऊं नये, ही काय तिच्या थोरवीची गोष्ट समजावयाची ? ना. मिर्झाअल्ली आपल्या भाषणांत म्हणतात कीं, "नवीन कायद्याप्रमाणें युनिव्हर्सिटी नुकतीच सुधारली असून तिला टेक्नॉलॉजी हा विषय शिकविण्याची आवश्यकता वाटूं लागली आहे." ही जांभई सत्तर वर्षांनीं मुंबई युनिव्हर्सिटीस आली आहे हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. परंतु याहि ठिकाणीं त्यांना पैशाची रड गावी लागली असल्यामुळें युनिव्हर्सिटी यापुढें काय पराक्रम करून दाखविणार हें दिसतेंच आहे. विद्यार्थ्यांस कलाकौशल्याचें व उद्योगधंद्याचें ज्ञान नाहीं तर नाहीं, पण निदान ते शरिरानें धट्टेकट्टे तरी बनावेत या उद्देशानें १९२७ सालीं पुण्यांतील कॉलेजांतून सदर कॉलेजमधील प्रिन्सिपालांच्या प्रयत्नानें शारीरशिक्षण देण्याचा उपक्रम करण्यांत आला. कॉलेजांतील कित्येक विद्यार्थी त्यानंतर सुदृढ व सतेज दिसूं लागले. हा त्या शिक्षणाचाच प्रभाव होय. पण तो प्रभाव दृष्टीस पडतो न पडतो तोंच दृष्टावल्यासारखें होऊन हेंहि शिक्षण बंद पडलें. आतां त्याची योजना लवकरच अमलांत येईल असें आश्वासन व्हाईस चॅन्सेलर देत आहेत. तें तरी, ते म्हणतात त्याप्रमाणें लवकर खरें होवो म्हणजे झालें.

## परकी भाषेचा सासुरवास

प्रस्तुतच्या शिक्षणांत एक ठळक दोष आहे व तो मिर्झाअल्ली यांनींहि कबूल केला आहे. आधींच शिक्षणपद्धति परकीयांची, व त्यांतील पदार्थविज्ञानशास्त्र, रसायनशास्त्र, अर्थशास्त्र इत्यादि हिंदी लोकांस सामान्यत: अपरिचित व परकीय अशा विषयांचा अभ्यास इंग्रजी भाषेसारख्या परकीय भाषेंतून करावा लागावा ही हिंदी विद्यार्थ्यांवर केवढी आपत्ति ! ही आपत्ति व कोल्ह्यानें करकोच्या पक्ष्यास आपल्या घरीं जेवावयास बोलावून आणून त्यास ताटांत वाढलेली खीर लांब चोचीनें भुरकावयास सांगणें ही आपत्ति, या दोनहि सारख्याच. करकोच्याची चोच ओली, पण तोंड कोरडें. श्रम फार पण प्राप्ति थोडी. तीच स्थिति वरील अनेक विषयांचा अभ्यास इंग्रजींतून करणाऱ्या विद्यार्थ्यांची. त्यांना विषयांचें मर्म सहसा समजत नाहीं; व

एखादा विषय समजून घेण्याचा प्रयत्न केला तरी तो पचवितां येत नाहीं. या कारणानें आमचे विद्यार्थी पुष्कळ वेळ जेवून प्रायः उपाशीच उठतात; व कदाचित् कांहीं अन्नाचा अंश त्यांच्या पोटांत गेला तरी तो त्यांच्या जठरास पचवितां न आल्यामुळें त्यांच्या शरीरावर बाळसें चढलेलें दृष्टीस पडत नाहीं. पण परकीय इंग्रजी भाषेनें आमच्या विद्यार्थ्यांवर चालविलेला जुलूम परकीय विषयांपुरतांच राहता तरी थोडीशी मेहेरबानीच समजतां आली असती. परंतु संस्कृतसारखा आमचा विषय, पण त्याचा अभ्यासहि आमच्या विद्यार्थ्यांस कॉलेजांत इंग्रजीमधून करावा लागावा यापुढें द्राविडी प्राणायामहि सोंग म्हणण्याची पाळी येते.

## शरीर हिंदुस्थानांत, मन इंग्लंडांत

इंग्रजींतून का होईना कॉलेजांतील अभ्यासक्रमांत खालपासून वरपर्यंत संस्कृतसारख्या प्राचीन भाषेचा प्रवेश झाला आहे. पण मराठीसारख्या मातृभाषेच्या नशिबीं तोहि मान अद्यापि लिहिलेला दिसत नाहीं. नाहीं म्हणावयास अलीकडे बी. ए. च्या दोन वर्षांत जे मराठी हा विषय घेतील, त्या विद्यार्थ्यांस मराठीची भेट घ्यावयास सापडते. तथापि मॅट्रिक-पर्यंत आलेली मराठीची सांखळी कॉलेजांतील पहिल्या दोन वर्षांत तशीच तुट-लेली राहाते. त्यांतूनहि बी. ए. च्या वर्गांत मराठी भाषाविषय घेणारे विद्यार्थी इतके थोडे असतात कीं, आमचे कॉलेजांतील विद्यार्थी एकंदरीनें मराठीस पारखे राहतात असें म्हणण्यास हरकत नाहीं. म्हणून मिर्झाअल्ली यांनीं म्हटल्याप्रमाणें आमचा विद्यार्थी शरिरानें हिंदुस्थानांत असला, तरी मनानें इंग्लंडच्याच वातावरणांत वावरत असतो. याचा परिणाम असा झाला आहे कीं, तो आपल्या परंपरेपासून तुटून स्वतःच्या समाजास परकीयाप्रमा-णेंच लेखूं लागतो. राष्ट्रीयदृष्ट्या हें संकट फार मोठें असून त्यामुळें राष्ट्राची अपरिमित हानि होत आहे. राष्ट्रीय शिक्षणाची जनतेस आवश्य-कता विशेष भासूं लागण्यास हेंहि एक कारण घडलें आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं.

## आमचें चतुर्मुख विद्यापीठ

अशा प्रकारच्या अनैसर्गिक शिक्षणपद्धतीमुळें आमच्या विद्यार्थीवर्गाची

स्थिति अत्यंत अनुकंपनीय झाली आहे. ते धड हिंदी नाहींत, धड इंग्रजी नाहींत. धड भू-चर नाहींत, धड खे-चर नाहींत. वटवाघुळाप्रमाणें त्यांनीं आपला तृतीय पंथच सुरू केला आहे. इंग्रजीमधून शाळाकॉलेजांतील विषय शिकविणें प्रारंभीं अपरिहार्यहि असेल. पण युनिव्हर्सिटी स्थापन होऊन साठ सत्तर वर्षें झाल्यानंतर इंग्रजीऐवजीं देशी भाषांतून सदर विषय शिकविण्याइतक्या त्या भाषा प्रगल्भ बनल्या नाहींत, अशी सबब पुढें येणें युनिव्हर्सिटीस लाजिरवाणेंच समजलें पाहिजे. युनिव्हर्सिटीच्या अभ्यासक्रमांत बोधभाषा ही देशी भाषाच ठेवली जाण्यापूर्वी युनिव्हर्सिटीची पुनर्घटनाच होणें जरूर आहे. मुंबई-इलाखा हा वस्तुत: एक प्रांत नसून ती चार प्रांतांची दावण आहे. बंगाल, पंजाब, संयुक्तप्रांत यांस प्रांत समजणें जितकें सयुक्तिक आहे, तितकें मुंबई इलाख्यास एक प्रांत म्हणणें अयुक्तिक. कारण मुंबई इलाख्यांत सिंध, गुजराथ, महाराष्ट्र व कर्नाटक या चार प्रांतांचा समावेश होतो. या चार प्रांतांत व श्वा, युवा, मघवा या पाणिनीय पंक्तींतील प्राण्यांत साम्य सारखेंच. अशा या चार प्रांतांची एकमेकांशीं ओळख करून घेण्यासच इंग्रजीसारख्या परभाषेचा आश्रय जर करावा लागतो, तर मुंबई-युनिव्हर्सिटीसहि त्याच मार्गाचा अवलंब करणें भाग पडल्यास त्यांत आश्चर्य काय ?

## महाराष्ट्राची रचना कशी असावी ?

याच दृष्टीनें ना. मिर्झाअली यांनीं महाराष्ट्राकरितां पुण्यास व गुजराथेकरितां अहमदाबादेला स्वतंत्र विद्यापीठ स्थापण्यांत यावें अशी शिफारस केली आहे. मिर्झाअली यांची ही शिफारस कांहीं नवीन नाहीं. त्याप्रमाणें महाराष्ट्र-विद्यापीठ स्थापण्याविषयीं कित्येक विद्वानांनीं दोन तीन वर्षांपूर्वी उचलहि खाल्ली होती. परंतु ती अलीकडेच थंडावली. त्यांचें कारण नवीन विद्यापीठ शिकवणारें असावें कीं, परीक्षा घेणारें असावें, या वादापेक्षांहि विद्यापीठाच्या सुरुवातीस लागणारे १०।१२ लक्ष रुपये कोठून आणावयाचे हीच अडचण होय. सध्यांचा महाराष्ट्र तरी एकत्र कोठें आहे ? त्याचेहि तीन तुकडे पडले आहेत. त्याचा एक मोठा तुकडा मध्यप्रांताच्या साहाय्यास गेला आहे, एक लहान तुकडा मोंगलाईंत मुरला आहे व सर्वांत थोरला तुकडा मुंबई इलाख्यांत राहिला आहे. हे तीन तुकडे एकत्र जोडल्यास सबंध महाराष्ट्राची लोकसंख्या दोन कोटींच्या घरांत जाते, व ती एक स्वतंत्र

इलाखा बनविण्यास व त्याकरितां एक विद्यापीठ स्थापण्यास पुरेशी आहे. इतकेंच काय पण त्या विद्यापीठाचा खर्च भागविण्यासहि समर्थ होण्यासारखी आहे.

## सद्यःस्थितींत काय करतां येईल ?

आतां कदाचित् वऱ्हाड-नागपूरचे कांहीं जिल्हे मध्यमहाराष्ट्रास प्रांतिक पुनर्घटनेच्या वेळीं जोडले जातील. पण मोंगलाईंतील मराठवाडा महाराष्ट्रास जोडला जाण्याची तूर्त तरी आशा दिसत नाहीं. तरी पण आहे हाच मुंबई इलाख्यांतील महाराष्ट्र घेतला तरी त्यांतील वस्ती एक कोटीपर्यंत आहे; व सध्यांच्या मुंबई-युनिव्हर्सिटीनें आपल्या संपत्तीचा व साधनांचा वांटा महाराष्ट्रास यथाप्रमाण देण्याचें ठरवल्यास तिला एका विद्यापीठाचा बोजा झेपणार नाहीं असें नाहीं. कारण सिंध, गुजराथ व महाराष्ट्र हे मुंबईयुनिव्हर्सिटींतून फुटून निघाल्यावर, कर्नाटकाचे कांहीं जिल्हे व मुंबई शहर एवढेच तिच्या कक्षेंत राहणार. म्हणून मुंबई युनिव्हर्सिटीस महाराष्ट्र-विद्यापीठाच्या संसाराचा प्रारंभ करून देतांना कांहीं मिळकतीची व देणग्यांची मदत करण्यास मुळींच हरकत नाहीं. त्यांतूनहि कदाचित् ही गोष्ट शक्य न झाल्यास मुंबईसरकारनें महाराष्ट्रीयांवर माणशीं रुपया-आठ आणे इतकी एखाद्या वर्षापुरती डोईपटी बसवून तो पैसा महाराष्ट्र-विद्यापीठाकडे खर्चण्याचें आश्वासन दिलें, तर तोहि कर आपल्या शिरावर लादून घेण्यास महाराष्ट्रीय लोक आनंदानें कबूल होतील याविषयीं आम्हांस खात्री वाटते. तरी ना. मिर्झाअल्ली यांनीं पदवीदान समारंभाच्या प्रसंगानें प्रस्तुतच्या विषयास दिलेल्या चालनेचा फायदा घेऊन, महाराष्ट्रांतील विद्वानांनीं महाराष्ट्र विद्यापीठाचा प्रश्न फिरून नेटास लावून तो सिद्धीस न्यावा अशी त्यांस आमची विनंति आहे. वरील उपायानें एकदां विद्यापीठ सुरू झालें म्हणजे महाराष्ट्रांतील संस्थानिकांची व इतर धनिकांचा त्यास आश्रय मिळणें कठीण नाहीं, असें अनेक शिक्षण-संस्थांच्या इतिहासावरून गृहीत धरून चालण्यास हरकत नाहीं.

---

# ६२. मराठीवरील सरकारी संकट

( केसरी १९३३ )

कांहीं दिवसांपूर्वीं महाराष्ट्र विद्यापीठाच्या शिष्टमंडळानें गव्हर्नरसाहेबांची मुलाखत घेऊन, त्यांना स्वतंत्र विद्यापीठाच्या स्थापनेबद्दलची कैफियत सादर केली व इलाखाधिपतींनींहि शिष्टमंडळाला आश्वासनपर उत्तर दिलें. सन १९३३ सालाच्या जूनपासून मराठी विषयाच्या अभ्यासक्रमांत सन्मान्य शाखा ( ऑनर्स कोर्स ) सुरू करण्याचें मुंबई विद्यापीठानें ठरविलें आहे. अशा रितीनें सभोंवार मराठी भाषेच्या वैभवाचीं प्रसाद-चिन्हें उमटत असतां, सरकारी महाविद्यालयांतूनच हकालपट्टी होण्याचा तिजवर प्रसंग ओढवावा हें मोठेंच दैवदुर्विलसित होय ! मुंबई-सरकाराच्या पुनर्घटना-मंडळानें सर्व सरकारी कॉलेजें बंद करण्याबद्दल शिफारस केली होती. परंतु सरकारानें एक ठराव करून बाकीच्या कॉलेजांना जीवदान दिलें आणि एकट्या डेक्कन कॉलेजावरच धाड आणली. आतां सदर कॉलेजच बंद होणार तर त्यांतील शिक्षक-वर्गाची सोय दुसरीकडे लावणें सरकाराचें कर्तव्य आहे. शिक्षकांतहि कायम आणि हंगामी असा फरक असल्यानें सरकार कायम शिक्षकांची सोय लावील यांत शंकाच नाहीं. परंतु हंगामी म्हणून संबोधिल्या जाणाऱ्या आणि कायम म्हणूनच काम करणाऱ्या शिक्षकांचीहि दुसरीकडे सोय लावण्याची नैतिक जबाबदारी सरकारावरच पडते.

* * *

डेक्कन कॉलेजांत हंगामी सदरांत पडणाऱ्या जागा देशी भाषांच्या होत. त्यांत अर्थातच मराठीचाहि समावेश होतो. १९२१ सालीं रँगलर परांजपे हे शिक्षणमंत्री असतां देशी भाषांसाठीं सरकारी कॉलेजांतून पांच जागा निर्माण करण्यांत आल्या. त्या म्हणजे पुणें येथील डेक्कन कॉलेजांत व मुंबई येथील एल्फिन्स्टन कॉलेजांत, मराठी व गुजराथी या देशी भाषांसाठीं अनुक्रमें दोन दोन व धारवाड कॉलेजांत कानडीसाठीं एक अशा पांच जागा होत. या योजनेप्रमाणें मुंबईच्या एल्फिन्स्टन कॉलेजमध्यें मराठीचे शिक्षक म्हणून कै. रा. गोपाळराव टिपणीस यांनीं कांहीं वर्षें काम केलें. पुढें रा. बनहट्टी यांनीं तें काम सुमारें १॥ वर्ष केलें. परंतु रा. बनहट्टी यांच्या-

नंतर 'मराठी घेणाऱ्या विद्यार्थ्यांची संख्या कमी असते, संख्येच्या मानानें सरकारला खर्चाची तोशीस फार लागते; शिवाय डेक्कन कॉलेजांत मराठीची एक जागा आहेच' अशी लंगडी आणि पोचट कारणें सांगून सरकारनें एल्फिन्स्टन कॉलेजांतील मराठीची जागा नामशेष केली! मराठीचीच तेवढी गळचेपी करून त्याच कॉलेजांत विद्यार्थ्यांची पुरेशी म्हणजे मराठी विषय घेणाऱ्या विद्यार्थ्यांच्या इतकीहि संख्या नसतां, उर्दू, गुजराथी इत्यादि भाषां-वरील आपल्या कृपेची पाखर सरकारनें कायम ठेवली! या त्यांच्या पक्षपाती धोरणाबद्दल त्याच वेळीं पुष्कळ गवगवा झाला. परंतु निषेध आणि निंदा आहारीं टाकण्यांत सरकार इतकें निर्ढावलें आहे कीं, त्यानें त्या विरोधाची कांहींच क्षिति बाळगली नाहीं.

* * *

एल्फिन्स्टन कॉलेज राहो, पण डेक्कन कॉलेजांत तरी मराठीचें वास्तव्य कायम आहे या अल्पशा आधारावर लोक समाधान मानून होते. परंतु आतां तर सरकारानें आपल्या नव्या कृतीनें पूर्वीच्या साऱ्या पापांवर कळसच चढ-विला म्हणावयाचा. डेक्कन कॉलेज १९३४ च्या जूनपासून पुरतेंच बंद होणार आहे. परंतु त्या कॉलेजांतील मराठीचे विद्वान् प्रोफेसर श्री. श्रीकृष्ण नीलकंठ चाफेकर यांना १ एप्रिल १९३३ पासूनच बडतर्फीचा हुकूम देऊन सरकार मराठीच्या जिवावर आजच उठलें आहे! सरकारच्या या हुकुमामुळें प्रो. चाफेकर यांजवर अन्यायाचा तर डोंगरच कोसळला आहे. तो कसा तें पाहा. देशी भाषांकरितां पांच जागा निर्माण केल्याचें वर सांगितलें आहे; त्यांची मुदत दर तीन वर्षांनीं वाढविण्यांत येत असते. प्रांतिक नोकरींत त्या जागांचा कायमचा प्रवेश झालेला नसला तरी त्या जागांवरील अध्यापकांना पगार व वाढ ही त्या नोकरींतील नियमाप्रमाणेंच मिळत असे. परंतु १९३० सालीं सरकारनें काटकसरीच्या नांवाखालीं प्रो. चाफेकर यांचा ३५० रु. पगार एकदम १५० रुपयांवर आणिला! प्रो. चाफेकर यांची मुदत फेब्रुवारींत तीन वर्षांनीं वाढली, परंतु यंदाच्या सरकारचें शिक्षणखातें इतकें आंधळें आणि विसराळू आहे कीं, त्यानें लगेच दुसऱ्याच महिन्यांत म्हणजे मार्च महिन्यांत प्रो. चाफेकर यांजवर बडतर्फीचा हुकूम बजावला! नियमाप्रमाणें सरकारी हंगामी नोकराला कामावरून काढावयाचें तरीदेखील त्याला एक महिन्याची आगाऊ

नोटीस द्यावी लागते. परंतु प्रो. चाफेकर यांना धड पंधरा दिवसांचीहि मुदत मिळाली नाहीं. एप्रिल, मे, जून हे तीन महिने शाळा-कॉलेजांच्या सुटीचे महिने. अशा वेळीं एका सन्मान्य आणि विद्वान् अध्यापकाला सरकारानें लेखणीच्या फटकाऱ्यानें कमी करावें यांत सरकाराच्या हुकुमाची, वचनाची आणि धोरणाची प्रतिष्ठा ती काय राहिली !

* * *

सरकारी हुकुमानें प्रो. चाफेकर यांचा व्यक्तिशः फारच तोटा झाला आहे इतकेंच नव्हे, तर त्यामुळें सरकारी वचनालाहि बट्टा लागणार आहे. एल्फिन्स्टन कॉलेजामधील मराठीची जागा नाहींशी करतांना सरकारानें डेक्कन कॉलेजाकडे बोट दाखविलें होतें. तथापि आतां पुनर्घटनामंडळाच्या शिफारशीप्रमाणें व सरकारी ठरावाप्रमाणें डेक्कन कॉलेजच बंद होणार असल्यानें 'इतो भ्रष्टस्ततो भ्रष्टः' अशी मराठीची केविलवाणी स्थिति होणार आहे. मुंबई विद्यापीठांत मराठीची सन्मान्य शाखा सुरू होण्याच्या प्रभात काळीं इलाख्यांतील उरलेल्या एका सरकारी कॉलेजांत म्हणजे एल्फिन्स्टन कॉलेजांतहि मराठीला स्थान नसावें ही सरकारला शरमेची गोष्ट होय. सरकारला आपलें पूर्वीचें वचन पाळावयाचें असेल व प्रो. चाफेकर यासारख्या विद्याभिलाषी, सुसंस्कृत, तज्ज्ञ आणि नाणावलेल्या शिक्षकाचा वृत्तिच्छेद करावयाचा नसेल तर त्यानें एल्फिन्स्टन कॉलेजांत मराठीची शाखा पुनरपि सुरू करून, तिजवर प्रो. चाफेकर यांचीच नेमणूक करणें योग्य होय. विशेषतः त्याच कॉलेजांत गुजराथी, उर्दू यांसारख्या देशी भाषा नांदत असतां एकट्या मराठीचें उच्चाटन करणें अन्यायाचें होय. मराठी घेणाऱ्या विद्यार्थ्यांची संख्या इतर देशी भाषा घेणाऱ्या विद्यार्थ्यांपेक्षां कमी असते हें सरकाराचें विधान वस्तुस्थितीला धरून नाहीं. आम्हांस जी माहिती मिळाली आहे तिजवरून असेंच दिसतें कीं, इतर देशी भाषा घेऊन बी. ए. च्या परीक्षेला जितके विद्यार्थी बसतात त्या विद्यार्थ्यांच्या संख्येपेक्षां मराठी विषय घेऊन बसणाऱ्या विद्यार्थ्यांची संख्या दिढीदुपटीनें अधिक आहे. खुद्द एल्फिन्स्टन कॉलेजांत उद्यां ती शाखा पुनरपि उघडण्यांत आली तर त्या शाखेंतहि विद्यार्थ्यांचा अधिक भरणा होईल. त्याचें कारण असें कीं, डेक्कन कॉलेज बंद झाल्यावर त्यांतील मराठी विषय घेणारे विद्यार्थी एल्फिन्स्टनला जाण्याचा बराच संभव आहे. शिवाय मराठीला विद्या-

पीठांत सन्मान्य शाखेचें उच्च स्थान मिळाल्यामुळेंहि अधिक विद्यार्थी त्या शाखेंत आपलीं नांवें नोंदवतील. फार काय, पण मराठी विषय घेऊन बसणाऱ्या विद्यार्थ्यांत पहिल्या व दुसऱ्या वर्गांतील हुषार आणि अभ्यासू असे विद्यार्थी दिसून येतात. सारांश, सरकारानें एल्फिन्स्टन कॉलेजांत जूनपासून मराठीची शाखा निर्माण करून, तिजवर प्रो. चाफेकर या अनुभविक शिक्षकाला नेमावें व सरकारी महाविद्यालयांतील मराठीचें दैन्य फेडावें हेंच सरकाराचें अवश्यमेव कर्तव्य ठरतें.

---

## ६३. महाराष्ट्र विद्यापीठाचें स्वरूप

(श्री. न. चिं. केळकर यांची 'प्रतिभा' पाक्षिकाच्या ता. २२ मे १९३३ च्या अंकांत प्रसिद्ध झालेली मुलाखत)

**प्रश्न**—महाराष्ट्र विद्यापीठाविषयीं आपली कल्पना काय आहे?

### इंग्रजीचें महत्त्व

**उत्तर**—महाराष्ट्र विद्यापीठ हें महाराष्ट्राकरितां प्रादेशिक म्हणून व्हावें. परंतु कोणताहि प्रदेश म्हटला, तरी त्यांत विशिष्ट देशभाषा हीच सर्वांत अधिक प्रचलित व प्रबळ असणार. अर्थात् विद्यापीठ प्रादेशिक म्हटलें तरी तिचें कार्य व यश मराठी भाषेंतून विद्याभिवृद्धि करण्यावरच अवलंबून असणार हें उघड आहे. पण खरें बोलावयाचें, म्हणजे प्रादेशिकत्व हें लक्षण अशा कांहीं लोकांकरितां म्हणून मुद्दाम प्रमुखपणें सांगावें लागतें कीं, ज्यांच्या मनाची गुलामगिरी अद्यापि नष्ट झाली नाहीं, व म्हणून ज्यांना मायभाषेंतून शिक्षण देणें ही गोष्ट अद्यापि कशीशीच वाटते, त्यांना तुम्ही विचारा कीं, जगांतल्या कोणत्या देशांत हिंदुस्थानाप्रमाणें परभाषेंतून शिक्षण दिलें जातें? या प्रश्नाला त्यांना उत्तर देतां येत नाहीं. पण मग इंग्रजी भाषेचें काय होणार असा उलट प्रश्न ते करतात. त्याला मी उत्तर देत असतों कीं, इंग्रजीचें महत्त्व यथाप्रमाण राहीलच. मीं युनिव्हर्सिटींत जितकें इंग्रजी वाचलें, त्याच्या निदान पन्नासपट युनिव्हर्सिटी सोडल्यावर वाचलें. याचें कारण त्या भाषेमध्यें उत्कृष्ट प्रकारचें ज्ञान सांठविलें आहे; व हें जोंपर्यंत कायम राहील तोंपर्यंत

इंग्रजीनें कां घ्यावें ? आज वऱ्हाड-नागपूर प्रांतांकडे कांहीं लोकांना वाटतें कीं, आपली प्रादेशिक भाषा पुण्याकडील मराठी बोलीपेक्षां श्रेष्ठपणानें कां उपयोगांत आणली जाऊं नये ? पण तसें न होण्याचें कारण हेंच कीं, विद्यमान मराठी संस्कृति पुण्याकडील मराठी भाषेंत आज सांठविली आहे. या उदाहरणांत प्रादेशिक वऱ्हाडी भाषा व मराठी भाषा यांचा जो संबंध तोच मराठी व इंग्रजी भाषा यांचा समजावा.

## इतर भाषांची सोय

इंग्रजीशिवाय मराठी विद्यापीठाचें चालणार नाहीं. तथापि शिक्षण देणें, परीक्षा घेणें व विद्याप्रसार करणें या गोष्टी शक्य तितक्या तारतम्यानें मराठी भाषेंतून कराव्यात, हें मराठी विद्यापीठाचें ध्येय राहील यांत शंका नाहीं. तसेंच महाराष्ट्र विद्यापीठ हें प्रादेशिक म्हटलें किंवा देशभाषेला महत्त्व देणारें म्हटलें म्हणजे तरी मराठी लोकांशिवाय इतर भाषा बोलणारे लोक यांना शिक्षण देण्याची योजना त्यांत होईल. असे वेगळी भाषा बोलणारे लोक संख्येनें किती असले म्हणजे त्यांच्याकरितां वेगळा शिक्षकवर्ग ठेवावा हा तपशिलाचा प्रश्न आहे. परंतु इतरांचा हा हक्क मान्य केलाच जाईल. तसेंच मुख्य भाषा मराठी झाली, तरी इतर देशभाषांचें शिक्षण देण्याकरितां चेअर्स म्हणजे अध्यापक स्वतंत्रपणें ठेवावे लागतील. संस्कृत—मराठीबरोबरच उर्दू, पर्शिअन, अरेबिक यांचेंहि शिक्षण संस्कृतीच्या दृष्टीनें देण्याची व्यवस्था मराठी विद्यापीठांत होणें शक्यच नव्हे तर इष्टहि आहे. पण हा सर्व पैशाचा खेळ आहे; ध्येयाचा दोष नाहीं.

## विद्यापीठाचा दर्जा

**प्रश्न**—या विद्यापीठामुळें मध्यप्रांत, वऱ्हाड, गोमांतक व निजामशाहींतील मराठवाडा यांच्या वाङ्मयीन एकीकरणाला मदत होईल काय ?

**उत्तर**—अशी मदत होईल. पण तसें होण्याला महाराष्ट्र-विद्यापीठाचा दर्जा हिंदुस्थानांतील विद्यापीठाच्या बरोबरीचा ठेविला गेला पाहिजे, तरच तें होईल. आज म्हैसूर, बनारस किंवा अलीगड येथील पदवी हिंदुस्थानांतील कोणत्याहि भागांत सरकारी नोकरीला सारखीच पात्र समजली जाते. तीच गोष्ट महाराष्ट्र-विद्यापीठाची झाल्यास मराठी विद्येचें केंद्र म्हणून मोंगलाई, वऱ्हाड, नागपूर या प्रांतांतील विद्यार्थीहि महाराष्ट्र विद्यापीठांत येऊं इच्छि-

तील. पण समजा, नागपूर-विद्यापीठानें प्रगति करून मराठीचा अभ्यास खूप वाढविला (व तसें होण्यास सुरुवातहि झाली आहे), तर नागपूर-विद्यापीठ व महाराष्ट्र-विद्यापीठ हीं जोडीनें एकच कार्य करीत राहतील. तसें झाल्यास महाराष्ट्र-विद्यापीठाच्या अभिमान्यांना वाईट वाटण्याचें मुळींच कारण नाहीं. विशेष सोय होईल, ती मात्र मोंगलाई व कर्नाटकांतील मराठी लोकांना सासुरवासांत राहावें लागतें त्यांची. गोंवें प्रांतांत मराठीचा अभिमान पुष्कळच आहे. त्या भाषेला तेथें राजाश्रय नाहीं. तथापि महाराष्ट्र-विद्यापीठाची पदवी घेणाऱ्या गोमंतकी विद्यार्थ्यांची हौस भागेल. इतकेंच नव्हे तर कळत न कळत त्या पदवीचा त्यांना इतर कामांतहि उपयोग होईल.

## दहा वर्षांत स्थापना

**प्रश्न**—महाराष्ट्र विद्यापीठ केव्हां अस्तित्वांत येईल ?

**उत्तर**—हें विद्यापीठ केव्हां अस्तित्वांत येईल, हें सांगणें फार कठिण आहे. कारण आज त्याला अनुकूलता सर्व बाजूंनीं कमी; व विरोध सर्वच बाजूंनीं विशेष. तथापि कल्पनेचें बीज याविषयींचें जें एकदा रुजलें आहे, तें केव्हां तरी फळ दिल्याशिवाय राहणार नाहीं. मुंबई इलाख्याची आजची आर्थिक स्थिति इतकी वाईट आहे कीं, तिजवरच अवलंबून राहावयाचें तर आणखी वीस वर्षे आशा करावयाला नको. पण माझी कल्पना तशी नाहीं. उलट उद्यां इलाख्यांत प्रांतिक स्वराज्य स्थापित झालें म्हणजे लोकमताला मान देणारा एखादा शिक्षणमंत्री लाभण्याचा संभव आहे; व तसें झाल्यास कायदा होण्यास फार मदत होईल. हल्लीं प्रांतिक कायदे–कौन्सिलांना कायदा करून विद्यापीठ निर्माण करतां येतें, ही मोठी सोय झाली आहे. तात्पर्य, सुमारें दहा वर्षांत हें विद्यापीठ चालतें बोलतें होईल, अशी मला आशा वाटते. माझ्या हयातींत ही गोष्ट घडणार नाहीं हें मला दिसतें, पण तें होणार असा माझा विश्वास आहे.

## विरोधाचें स्वरूप

**प्रश्न**—विद्यापीठाला असलेल्या विरोधाचें स्वरूप काय ?

**उत्तर**—वास्तविक महाराष्ट्र विद्यापीठाच्या कल्पनेला विरोध होण्याचें कारण नाहीं. मुंबई विश्वविद्यालय या विद्यापीठाच्या कल्पनेचें स्वागतच करील असें वाटतें; व येत्या जून–जुलैमध्यें जी परिषद पुण्यास भरणार आहे तींत

मुंबई विश्वविद्यालयाचे नवीन व्हाइस-चॅन्सेलर बॅ. चंदावरकर हे या कल्पनेस चांगलें पाठबळ देतील, अशी मला आशा वाटते. कानडी व गुजराथी समाजांनीं या कल्पनेला विरोध करण्याचें कारण नाहीं. कारण एक तर मराठीबरोबर गुजराथी विद्यापीठ सहज होण्यासारखें आहे आणि कानडी लोकांना म्हैसूरची युनिव्हर्सिटी आधींच आहे. शिवाय या समाजांना मुंबई युनिव्हर्सिटीशीं संबंध ठेवावेसें वाटलें तर, तेंहि त्यांना करतां येईलच. धारवाड-बेळगांवचीं कॉलेजें किंवा सुरत-अहमदाबादचीं कॉलेजें यांना महाराष्ट्र-विद्यापीठास येऊन मिळण्याची सक्ति होणार नाहीं. मग मराठी-विद्यापीठ कोणाचें नुकसान काय करणार ! मुंबईसरकारचाहि विरोध असण्याचें कारण नाहीं. फक्त त्याच्याकडून पैशाची मदत अजमासाबाहेर न मागितली म्हणजे झालें. नवीन विद्यापीठें निघालीं, तर आम्ही प्रत्येकाला भरपूर पैशाची मदत कशी करूं शकणार असें ते म्हणतील. पण मुंबई-सरकारच्या द्रव्यबळावर आधारणारें मराठी विद्यापीठ कधींच अस्तित्वांत यावयाचें नाहीं असें मला वाटतें. महाराष्ट्रांतील लोकांनींच जरूर तो पैसाहि दिला पाहिजे तो ते देतील अशी मला आशा आहे; व आरतीच्या ताटांत पैसा टाकावा अशा बुद्धीनेंच मी या भावी विद्यापीठाला ८००० रुपयांची देणगी दिली आहे मला विश्वास वाटतो कीं, महाराष्ट्रांतील धनिक व विद्याप्रिय लोक पैशाकरितां या विद्यापीठाचें कार्य अडूं देणार नाहींत.

## तात्त्विक विरोध

आतां तात्त्विक असा एकच विरोध राहिला. तो असा कीं, अशा प्रादेशिक किंवा भाषावार विद्यापीठें निर्माण केल्यास राष्ट्रीयत्वाच्या बुद्धीची हानि होईल. पण हें खरें नाहीं. शिवाय सिंध प्रांत वेगळा होतो; ओरिसा प्रांत होणार, आंध्र प्रांत वेगळा न झाला तरी आंध्र विद्यापीठ निर्माण झालेंच आहे आणि म्हैसूर व हैद्राबाद येथेंहि विद्यापीठें झालीं आहेत. यावरून काय दिसतें ? तसेंच उद्यां प्रांतिक स्वराज्य सर्वत्र स्थापन होणार, याचाहि अर्थ प्रादेशिक कारभार, पैसा, बुद्धि, कर्तृत्व व संस्कृति यांना महत्त्व देणार असाच नाहीं काय ? लहानाचें शत्रुत्व करण्याचा मार्ग म्हणून मोठ्याकडे बोट दाखवावें, हें ठीक आहे. पण पिंडापासून ब्रह्मांडापर्यंत लहान व मोठे, व्याप्य व व्यापक, सामान्य व विशेष यांचा मेळ घालण्यावरच जग

अधिष्ठित आहे व चाललें आहे. तसा मेळ नव्या विद्यालयाच्या बाबतींतहि घालतां येईल.

### पुणें म्हणून विरोध !

खुद्द पुण्याला तें पुणें म्हणून कांहीं लोक विरोध करतात हें मला माहीत आहे. पण त्याला इलाज नाहीं; व तो विरोधहि मी इतका क्षुद्र मानतों कीं, त्यानें एरवीं होणारें महाराष्ट्र–विद्यापीठाचें कार्य अडून बसणार नाहीं. फक्त पुण्यानें बाहेर कोणावर अतिक्रमण न होईल अशी खबरदारी घेतली म्हणजे झालें. खुद्द पुण्यांत असणाऱ्या शिक्षणसंस्था इतक्या महत्त्वाच्या आहेत कीं, त्यांतून विद्यापीठाचें केंद्र निर्माण होण्यास हरकत नाहीं व त्या कोणास बाहेरहि उचलून नेतां येत नाहींत. तेव्हां पुणें हें पुणें म्हणून विरोध करणाऱ्या लोकांस नम्रपणें व स्नेहभावपूर्वक व्यर्थ विरोध न करण्याची विनंति करणें एवढेंच उरतें; व तशी विनंति करण्यास पुण्याचे लोक केव्हांहि तयार आहेत. महाराष्ट्र–विद्यापीठ पुण्याबाहेर इतर कोठें होण्यासारखें असेल, तर तेथें तें कोणीहि खुशाल करावें; आमची त्याला हरकत नाहीं. एवढेंच नव्हे तर आम्ही त्याला मदतहि करूं. म्हणून या दृष्टीनें तज्ज्ञांनीं उघड चर्चा करावी.

---

## ६४. महाराष्ट्र विद्यापीठ

" युनिव्हर्सिटी कमिशननें मुंबई इलाख्यांत नवीन विद्यापीठें स्थापण्याची शिफारस केली तिला या सभेचा पूर्ण पाठिंबा आहे. या सभेच्या मतें या नव्या पीठांचा अधिकार भाषानुरोधानें एकत्रिक समजल्या जाणाऱ्या स्वाभाविक प्रांतांवर चालावा, आणि प्रारंभींच या नव्या विद्यापीठांत पदवी घेतलेल्या विद्यार्थ्यांच्या त्यापुढील शिक्षणाची भरपूर व्यवस्था करण्यांत यावी. " सदर ठरावाच्या समर्थनार्थ श्री. केळकर म्हणाले, आजची सभा अपूर्व आहे. सभांना नेहमीं न येणारा असा कांहीं सुशिक्षित वर्ग आज आला आहे. सभेंत मतभेद असेल पण पक्षभेद नाहीं. पुणें हें विद्येचें माहेरघर असून विद्यापीठ स्थापून त्याचा लौकिक वाढावा अशी पुण्यांतील सर्वांचीच इच्छा आहे. विलायतेंत मला लोक विचारीत कीं, तुमच्या पुण्यास कसला कारखाना

आहे ? मी सांगे, " विद्यादानाचा. " या कारखान्यांत इतर कारखान्यांप्रमाणें अल्प व्ययांत चांगली वस्तु निर्माण करण्याकडे दृष्टि ठेवलेली असते. पण इतर मालकीच्या कारखान्यांप्रमाणें या पुण्याच्या कारखान्याचे धनी अल्प अल्प व्ययानें झालेल्या नफ्यानें स्वतः श्रीमान होत नाहींत. पुण्यांतील विद्या, विद्यार्थी व विद्याधिकारी यांच्यावर स्वार्थत्यागाचा एक अपूर्व तजेला असतो. त्या स्वार्थत्यागामुळेंच त्यांचा बाहेर एवढा लौकिक आहे. या नव्या राज्यांत शंभर वर्षांपूर्वी विश्रामबागेंत म्हणजे पुण्यास नव्या विद्येचा प्रारंभ झाला आणि आज शंभर वर्षें गेल्यावर स्वतंत्र विद्यापीठ स्थापन होऊन त्याची परिणति पूर्ण व्हावी ही अपेक्षा स्वाभाविक आहे. पुण्यास विद्यापीठाला साधन भरपूर आहे इतकेंच नव्हे तर कर्वे यांच्या स्त्री–विद्यापीठानें अशी संस्था चालविण्याचा अनुभवहि प्रसिद्ध झालेला आहे. तुमच्या नव्या विद्यापीठाला १७ लक्ष रुपये हवेत तर या स्त्री–विद्यापीठाला १७ लक्ष रुपये आधींच मिळून चुकले आहेत; व त्याच्या सेनेटच्या सभासदांची यादी हातांत घेतल्यास त्यांची योग्यता मुंबई–विद्यापीठाच्या मुख्य सभेच्या सभासदांकडून खचित कमी भरणार नाहीं. स्त्री–विद्यापीठाला इमारती एवढ्या मोठ्या मिळाल्या आहेत कीं, शिकणाऱ्या मुली एका कोंपऱ्यांत मावून बाकीची जागा पडपोशीची प्लेग्राऊंड म्हणजे फुगड्या खेळण्याकरितां केली आहे असें मी विनोदानें लोकांना सांगत असतों ! आधीं मागणी व मग पुरवठा हा अर्थशास्त्रांतील नियम स्त्री–विद्यापीठानें बदलून टाकला आहे. हें जेथें घडलें तेथें नव्या विद्यापीठाच्या साधनांना काय तोटा ?

युनिव्हर्सिटी–कमिशननें भाषावार प्रांतरचना मनांत आणूनच सर्व महाराष्ट्राकरितां म्हणून विद्यापीठ असावें अशी शिफारस केली आहे. स्वराज्याचे अधिकार हातीं येतांच आम्ही प्रथम स्वाभाविक अशी भाषावार प्रांतरचनाच अमलांत आणूं. पण तें होईपर्यंत एक भाषा चालणाऱ्या प्रांतांचें एक विद्यापीठ असावें ही गोष्ट तावडतोब अमलांत येण्यास हरकत नाहीं. नवीन विद्यापीठाच्या ध्येयासंबंधानें या सभेची दृष्टि उच्च आहे. म्हणूनच या ठरावांत असें म्हटलें आहे कीं, प्रारंभापासूनच तेथें वरिष्ठ म्हणजे पदवीधर विद्यार्थ्यांच्या शिक्षणाची सोय केली जावी.

या सर्व गोष्टी खरोखर पूर्वींच घडून यावयाच्या. परंतु राजाश्रय नसल्यानें

आमचें सर्वच काम लंगडें पडत आहे. राजाश्रय असतां तर महाराष्ट्र विद्यापीठ केव्हांच निर्माण व्हावयाचें. या ठिकाणीं मला फ्रेंच ॲकॅडमीची आठवण होते. ही जगप्रसिद्ध संस्था १८ व्या शतकांत प्रथम एका क्लबाच्या रूपानें कांहीं थोड्या विद्वानांनीं काढली. त्या वेळचा मुख्य धर्माधिकारी व प्रधान रिचलिओ हा स्वदेशाविषयीं अत्यंत महत्त्वाकांक्षी असल्यामुळें, त्यानें राजाकडून सनद देऊन त्या क्लबाची ॲकॅडमी बनविली, व नंतर तिला पार्लमेंटानेंहि विद्यापीठाचे अधिकार दिले. हें विद्यापीठ निर्माण करण्यांत रिचलिओ याचा मुख्य उद्देश असा होता कीं, लॅटिन भाषेचें विद्वेच्या प्रांतांत जें प्रस्थ माजलें होतें तें काढून टाकून प्राकृत देशी फ्रेंच भाषेला महत्त्व आणून द्यावें; कला, शास्त्रें यांना देशी भाषेचा व देशी संस्कृतीचा आधार मिळून त्यांना तेज चढावें, विद्या कार्यक्षम व्हावी, विद्वत्तेला गुणाची कसोटी लावण्याचें तें एक अधिकारस्थान व्हावें, बाजारांत सोन्यामोत्याची टीप करतात तशी विद्वत्तेची टीप करण्याचें साधन व्हावें असा रिचलिओ याचा हेतु होता व तो सफलहि झाला. आमचें मुंबईचें विद्यापीठ दिसण्यांत गोंडस दिसतें; कारण त्यांत सर्व धर्म, जाती, सर्व मतें, किंबहुना सर्व दुमतें यांचा भरपूर समावेश झाला आहे. विश्वधर्माच्या दृष्टीनें हें ठीक आहे! पण राष्ट्रीय बुद्धीचा त्यामुळें घात होतो. देशी भाषेचा प्रवेश विद्यापीठांत व्हावा याविषयींचा उद्योग मोडक-रानड्यांपासून तों परवां हरिभाऊ लिमयांपर्यंत सारखा सुरू होता. पण मोठ्यांत मोठी सवलत आज मिळाली आहे ती ही कीं, मराठी या विषयाची प्रश्नोत्तरावली विद्यार्थ्याला वाटेल तर त्यानें मराठींत लिहावी. सेनेटची रचना पाहून मुंबई युनिव्हर्सिटीच्या मुख्य दिवाणखान्यांतील उत्तरेकडील मोठ्या वर्तुलाकार खिडकीची मला आठवण होते. सर्व रंगांचीं भिंगें यथाप्रमाण बसवून ती खिडकी हा पदवीदानसमारंभाच्या दिवाणखान्यांतील एक मुख्य व उत्कृष्ट अलंकार बनविला आहे. पण या सबगोलंकारी खिडकींतून व्यवहारोपयोगी असा प्रकाश मात्र मिळत नाहीं. लिहावाचावयाला एकजिनसी स्वच्छ, पांढऱ्या तावदानाच्या खिडकीचाच आश्रय करावा लागतो. अर्थात् ही स्थिति बदलली पाहिजे व राष्ट्रीय दृष्टीनें देशी भाषेला म्हणजे मराठीला पूर्ण महत्त्व देऊनच नव्या विद्यापीठाची व तेथील वरिष्ठ शिक्षणाची व्यवस्था झाली पाहिजे.

या ठरावावर प्रि. कानिटकर यांनीं आणलेल्या उपसूचनेला उत्तर देतांना श्री. केळकर म्हणाले, सदर उपसूचनेनें मुख्य ठरावांतील भाषावार प्रांत-रचनेच्या कल्पनेस हरताळ फांसला आहे, तसेंच ठरावांतील तिसऱ्या भागाचे शब्द वगळून त्यांची जागा उपसूचनेनें घेण्याचें कारण नव्हतें. शिकविणारीं व परीक्षा घेणारीं असे विद्यापीठाचे दोन प्रकार होऊं शकतात. पण त्यांत अवश्य व अनिर्बाह्य विरोध नाहीं. पुण्यांतील व पुण्याशेजारच्या कॉलेजांना शिक्षणाच्या दृष्टीनें एकीकृत करणें शक्य आहे व तसें करावें. पण नाशिक व सांगली हीं ठिकाणें दूर असलीं तरी पुण्यांतील युनिव्हर्सिटी प्रोफेसरांची व्याख्यानें कांहीं दिवस नाशिकास व सांगलीस होण्याची व्यवस्था करतां येणेंहि शक्य आहे. वर्षांतून कॉलेजांना सहा महिने सुट्या असतात, व आज पुण्यास तर उद्यां सांगलीस किंवा नाशकास जातां येतें. परवां मुंबईस या प्रश्नाची एके ठिकाणीं चर्चा सुरू असतां कोणी सभासद असें म्हणाला कीं, रे स्कॉटच्या मतें मुंबई युनिव्हर्सिटी आजहि थोडेंबहुत शिक्षण देतच आहे, अर्थात् तिला नुसती परीक्षा घेणारी युनिव्हर्सिटी म्हणण्याचें कारण नाहीं. त्याच रीतीनें पुण्यास होणाऱ्या विद्यापीठानें शिकविणें व परीक्षा घेणें या-करितां बाहेरगांवचीं कॉलेजें प्रारंभीं आपल्या अधिकारक्षेत्रात समाविष्ट कर-ण्यास हरकत नाहीं. प्रो. परांजपे किंवा प्रो. शहा हे जसे एम्. ए.चे विद्यार्थी पढवितात त्याचप्रमाणें त्यांनीं आपल्या हायस्कुलांना महत्त्व येण्याकरितां व त्यांच्या विद्यार्थ्यांना मान मिळण्याकरितां हायस्कुलांतील सातव्या इयत्तेला गणित विषय एकादे वेळीं शिकविल्यानें बाध येत नाहीं. झाला तर फायदाच होईल, त्याचप्रमाणें नव्या विद्यापीठाच्या पदवीधर विद्यार्थ्यांना देण्याच्या वरिष्ठ शिक्षणाच्या खास प्रोफेसरांनीं पदवी घेऊं इच्छिणाऱ्या विद्यार्थ्यांसहि व्याख्यानें दिलीं तर त्यांत वावगें कांहीं नाहीं. प्रोफेसर चांगला असला तर त्यांचीं व्याख्यानें ऐकावयाला दूरचेहि विद्यार्थी धांवून जातील मात्र शिक्षक तसा गुणी पाहिजे. ऑक्सफर्ड व केंब्रीज येथील विद्यापीठांत निरनिराळ्या विषयांचे प्रवीण प्रोफेसर असतात व एकाद्या विद्यार्थ्याच्या मनांत असल्यास त्याला इकडून तिकडे केव्हां तरी जाऊन कांहीं थोडीं व्याख्यानें ऐकणें शक्य होत असेल असें मला वाटतें.

परीक्षा घेणारें विद्यापीठ व बाहेरगांवचीं कॉलेजें जोडून घेणारें विद्यापीठ

बनविलें तर मात्र पुण्यांतील विद्यार्थ्यांना कमी लेखतील व नांवें ठेवतील आणि तेंच विद्यापीठ फक्त पुण्यापुरतेंच केलें म्हणजे पुण्यांतील विद्यार्थ्याला बहुमान्यता प्राप्त होईल, हें कसें तें मला समजत नाहीं. मुंबईतील लोक पुण्यांतील विद्यार्थ्याला नांवें ठेवितांना ऐकून पुण्यांतील जो शिक्षक किंवा पुढारी जागच्या जागीं उत्तर न देतां गप्प बसेल तो स्वाभिमानशून्य आहे असेंच मी म्हणेन. मुंबईचे लोक पुण्यांतील शिक्षणाला नांवें ठेवतात असें आपल्या तोंडानें सांगून पुण्यांतील प्रोफेसर आपली अब्रू आपणच कमी करून घेतात! बरें, मुंबईच्या विद्यार्थ्याला पुण्यांतील विद्यार्थ्यापेक्षां अधिक चांगला म्हणण्याला मुंबईत तरी असे कोण नामांकित प्रोफेसर आहेत? पुण्यांत परांजपे व शहा असे दोन रँगलर आहेत; मुंबईत कोण आहेत?

असो. नाशिक, सांगली वगैरे बाहेरगांवचीं कॉलेजें हीं घरांतील अडगळीसारखीं किंवा पोहणाराच्या गळ्यांतील दगडासारखीं कित्येकांना वाटतात. पण ज्यांनीं तीं काढण्याची खटपट केली त्यांनीं तरी त्यांना अशीं नांवें ठेवूं नये. डे. ए. सोसायटीचाच तो गोतावळा आहे. म्हणून आज डे. ए. सोसायटीच्या प्रोफेसरांनींच हीं कॉलेजें पुण्याबाहेर म्हणून त्यांना व्यर्थ अडगळ असें म्हणावें हें चांगलें काय? पुण्यांत युनिटरी म्हणजे एकमुखी व एकाच ठिकाणीं वरिष्ठ शिक्षण देणारें विद्यापीठ काढणें ही कल्पना श्रेष्ठ म्हणून त्यानें सांगली—नाशिक येथील कॉलेजांना झिटकारून बाजूला टाकावयाचें! आणि कित्येकांच्या मतें पुण्याला नवें विद्यापीठ देण्यांत कमिशनचा हेतु मुंबई शहरापुरतें एकमुखी, एकस्थलीन विद्यापीठ करावयाचें म्हणून मुंबई युनिव्हर्सिटीहि त्यांना दूर लोटून देणार! मग सांगली व नाशिक येथील कॉलेजांचें व्हावयाचें तरी काय? तीं तुम्हीं बुडवूं इच्छित असलां तर तसें स्पष्ट तरी सांगा. जरी ती अडगळ वाटली तरी ती सांभाळून घेऊन तिच्या अनुरोधानें मार्ग आक्रमण करण्याची बुद्धि मुंबईला होईल कीं, पुण्याला होईल? या कॉलेजांचा जिव्हाळा मुंबईच्या लोकांना अधिक कीं पुण्याच्या लोकांना अधिक? एकस्थलीन, एकमुखी विद्यापीठ पुण्याला हवें व मुंबईला हवें, याचा अर्थ सांगली व नाशिक वगैरे ठिकाणचीं कॉलेजें मोडलीं पाहिजेत किंवा सांगली व नाशिक येथें स्वतंत्र विद्यापीठें होईपर्यंत त्या शहरांना वरिष्ठ शिक्षणाच्या फायद्याला मुकलें पाहिजे! पैशाची अडचण सांगण्यांत येते. पण आज कोणास दुय्यम प्रतीची

वाटणारी का होईना पण पुण्यास प्रत्यक्ष युनिव्हर्सिटी सुरू झाली म्हणजे पुढें पैसा मिळण्यासारखा आहे. कर्व्यांना १५ लाख मिळाले ते विद्यापीठ सुरू केल्यावर, आधीं नाहीं.

प्रो० नाईक यांनीं सांगितल्याप्रमाणें विद्यापीठाच्या बाबतींत आज श्रेष्ठ हें त्वरित लागत नसेल तर हातीं येण्यासारखें जें फक्त श्रेयस् असेल तें तरी घेऊन प्रारंभीं निर्वाह करावा हेंच शहाणपण होय. प्रि. कानिटकर यांनीं मुंबईच्या ट्रामगाडीचा दाखला दिला तो चुकीचा आहे. हल्लीं मुंबईत ट्रामच्या व्यवस्थेप्रमाणें समोर येईल ती पहिली ट्राम घेऊन गेलें असतां पुढें लवकरच कोठें तरी सांधजोडीचें स्टेशन येतें व एका गाडींतून उतरून दुसरींत बसून ध्येयाचा मुक्काम गांठतां येतो. थेट आपल्या मुक्कामास जाणाऱ्या ट्रामकरितां पूर्वीप्रमाणें फार वेळ थांबावें लागत नाहीं. पुण्यास परीक्षक व समावेशक अशी युनिव्हर्सिटी काढल्यास क्षुद्र प्रांतिक मनोवृत्ति बळावतील असें प्रो. खाडे हे म्हणाले. परंतु मौज ही कीं, हा आक्षेप आगाऊ लक्षांत घेऊनच युनि० कमिशननें आपल्या रिपोर्टांत पृ. ४६ वर तो खोडून काढला आहे. बरें, युनिटरी स्वरूपाचें विद्यापीठ पुण्यास काढलें तर या मनोवृत्ती बळावणार नाहींत कशावरून? उलट कमिशननें लिहिल्याप्रमाणें, विस्तृत क्षेत्रमर्यादेवर नव्या विद्यापीठाचा अधिकार चालता राहिल्यास श्रेष्ठ–कनिष्ठ यांची व विविध मनोवृत्तींच्या लोकांची गांठ पडल्यानेंच विद्यापीठाच्या कार्यांत अधिक समतोलपणा येईल. कमिशनचे सभासद सर्वच तज्ज्ञ होते व पुण्याची बाजू घेऊन बोलेल असा त्यांत प्राय: कोणी नव्हता. त्यांनीं पुण्याच्या उदार मनोवृत्तीवर विश्वास टाकावा व पुण्याच्याच कांहीं थोड्या लोकांनीं स्वत:विषयीं अविश्वास प्रगट करावा हें दुर्भाग्य नव्हे काय?

× × ×

## ( १९३३ सालीं पुण्यास भरलेल्या जाहीर सभेंतील भाषण )

महाराष्ट्र विद्यापीठ पुण्यास स्थापन व्हावें याबद्दल वाद नाहीं, तर फक्त आतां प्रयत्न करण्याचा राहिला आहे. कांहीं वर्षांपूर्वी याबाबत पुण्यास जाहीर सभा भरून तींत विद्यापीठ हें युनीटरी ( एकावयवी ) असावें कीं, ॲफिलिएटिंग ( अनेकावयवी ) असावें याबद्दल बराच वादविवाद झाला. पण त्यानंतर जसा काल पालटला तशी परिस्थितिहि पालटली आहे; व त्या

दृष्टीनें पाहतां हा वाद अमुख्य मानून युनिटरी का होईना पण पुण्याला विद्यापीठ निघेल याबद्दल मला अधिक शक्यता वाटते. पोतदारांनीं आपल्या भाषणांत तात्त्विक आक्षेपांना आपणाकडून चोख उत्तरें दिलीं आहेत. पण एका दृष्टीनें पाहतां तात्त्विक आक्षेपांना समर्पक उत्तर देतांच यावयाचें नाहीं. कारण कितीहि उत्तरें व वादविवाद केला तरी शेवटीं तत्त्व म्हणून कांहीं तरी मिरवून त्याच्या नांवावर वाद घालणारे भेटतातच. म्हणून त्या भानगडींत मी न पडतां व्यावहारिक आक्षेप काय घेतले जातात तें पाहून त्याला उत्तरें देण्याचा प्रयत्न करतों.

विद्यापीठाच्या व्यावहारिक प्रश्नाला दोन टोकांच्या दोन अडचणी आहेत. अगदीं वरच्या टोकाची अडचण अशी कीं या विद्यापीठासंबंधानें कौन्सिलामध्यें सरकारतर्फे बिल आलें पाहिजे व तें पास झालें पाहिजे आणि याच्या उलट अगदीं तळाची अडचण अशी कीं येथील स्थानिक शिक्षणसंस्थांची अशा तऱ्हेचें विद्यापीठ काढण्यास एकमुखी योजना व संमति असली पाहिजे. ही दुसरी अडचण म्हणून जी सांगितली ती अडचण कांहीं वर्षांपूर्वीं जरा तीव्र स्वरूपांत होती. पण सुदैवानें आतां येथील कॉलेजांच्या प्रिन्सिपालांमधील सर्व मतभेद नाहींसे होऊन पुणें येथें विद्यापीठ स्थापन करावें याबद्दल एकमत झालें आहे. तेव्हां ही अडचण दूर झाल्यामुळें विद्यापीठ स्थापन करण्यास लागणारें स्थान, द्रव्य, विद्यार्थी, शिक्षक वगैरे सर्व सरंजाम जमेल. पण त्याच्या बुडाशीं कायद्याची बैठक नसेल तर तो डोलारा उभा राहणार नाहीं. कायद्याशिवाय ज्या खाजगी संस्था स्थापन होतात त्या मर्यादित व नैमित्तिक स्वरूपाच्या असतात; त्या सर्व राहोत व राहतील. पण महाराष्ट्र विद्यापीठ हें नैमित्तिक नाहीं व तें अल्पकाळ टिकण्याकरितां काढावयाचें नाहीं. ही गोष्ट साध्य होण्याला कायद्याची मान्यता अवश्य घेतली आहे.

आतां विद्यापीठ हें ॲफिलिएटिंग असावें कीं युनिटरी असावें याबद्दल जर वादविवादाचें रणच माजलें तर माझ्या मतें युनिटरी युनिव्हर्सिटी निघाली तरी हरकत नाहीं. मग ‘ लिव्ह ॲंड लेट लिव्ह ’ या तत्वानें बाहेरची कॉलेजेंहि आपलें कार्य करूं शकतील. आतां अगदीं वरची जी अडचण म्हणजे कायद्याची मान्यता ती कशी दूर करतां येईल हें पाहूं. कोणतेंहि बिल पास करून

घ्यावयाचें म्हणजे त्याला लोकप्रतिनिधींचें बहुमत असावें लागतें आणि तें बहुमत इतकें प्रबल असलें पाहिजे कीं, त्याचा दाब जो शिक्षणमंत्री असेल त्यावर पडला पाहिजे. नव्या कौन्सिलमध्यें कितीहि संरक्षक बंधनें असलीं तरी जर शिक्षणमंत्री आपल्या हातांतला असेल तर गव्हर्नरालाहि त्याच्याविरुद्ध कांहीं गडबड करतां यावयाची नाहीं. अशा तऱ्हेचा शिक्षणमंत्री किंवा बहुमत असणारे प्रतिनिधि कौन्सिलला जेवढे अधिक लवकर मिळतील त्या मानानें हा प्रश्न लवकर निकालांत निघेल. मला पैशाची अडचण मुळींच भासत नाहीं. कारण सरकार, बिल पास झालें तर, पैसाहि देईल. पण मुख्य अडचण उत्साही व प्रयत्नवादी शिक्षणमंत्री केव्हां लाभेल याची आहे. तसेंच इतर कांहीं आक्षेप नाहींसे होण्यास नोकरीमध्यें हिंदीकरण झालें पाहिजे. मला कौन्सिलमध्यें असणाऱ्या युरोपियनांचीहि भीति वाटत नाहीं; कारण ते विद्यापीठाच्याविरुद्ध बोलणार नाहींत. भीति वाटते ती जे युरोपियन आज शिक्षणखात्यांत नोकरीवर आहेत त्यांची. असे युरोपियन म्हाताऱ्या माणसाच्या टक्कल पडलेल्या डोक्यावरील कोठेंतरी दिसणाऱ्या एखाद्या पांढऱ्या केसासारखे जरी तुरळक असेल तरी तेवढे सुद्धां उपटून काढले पाहिजेत. कारण असे नोकरीवर असणारे साहेब आपलीं कॉलेजें या युनिव्हर्सिटीस जोडण्यास केव्हांच तयार होणार नाहींत.

तेव्हां इतक्या अडचणींतून मार्ग काढण्यास आपल्या हातांत कोणती गोष्ट आहे ? या बाबतींत प्रत्येक मतदाराला एक मार्ग मोकळा आहे. तो हा कीं, नवीन निवडणुकीच्या वेळीं जो उमेदवार तुमच्याकडे मत मागावयास येईल त्या वेळीं तुम्ही त्याला 'विद्यापीठ काढण्याबाबत तूं खटपट करशील का ?' असें स्पष्ट विचारून जर तो खटपट करण्यास कबूल असेल तरच त्याला मत देणें हा होय. यायोगें तोहि थोडाबहुत बांधला जाईल. मतदारांनीं हें एक धोरण ठेवलें पाहिजे. तसेंच ब्राह्मणेतरांची याविषयीं समजूत घालून त्यांचें मन वळविलें पाहिजे. कारण कौन्सिलच्या नवीन निवडणुकींत ब्राह्मणेतर प्रतिनिधि अधिक येणार हें पक्कें लक्षांत ठेवलें पाहिजे. तसेंच तिसरी एक खूणगांठ अशी बांधली पाहिजे कीं, विद्यापीठाचें बिल हें शिक्षणमंत्र्यामार्फत आलें तर तें मंजूर होईल आणि खाजगी स्वरूपाचें जर कोणी आणूं म्हणेल तर तें मंजूर होणार नाहीं. पण मार्गदर्शक म्हणून त्याचाहि उपयोग आहे.

एवढ्याकरितां नवीन होणाऱ्या शिक्षणमंत्र्याकडे लक्ष ठेवलें पाहिजे आणि त्याच्याशीं व ब्राह्मणेतर वर्गाशीं सहविचार करून बिल आणविलें पाहिजे. असो. अशा तऱ्हेनें जर अगदीं वरचें आणि तळचें टोक हातीं येईल तर मधले दुवे जोडण्यास मुळींच अडचण पडणार नाहीं. एक–जिनसी स्वतंत्र स्वरूपाची आणि अधिकांत अधिक कार्यक्षम अशी संस्था कायद्याच्या संमतीनें कशी निघेल इकडे सर्वांनीं आपली दृष्टि ठेविली पाहिजे. काल्पनिक अडचणी उत्पन्न करून वादविवाद करण्याच्या भरीस कोणी पडूं नये. असो, शेवटीं प्रो. पोतदार यांनीं या कामीं शक्य तितकी खटपट करावी व विद्यापीठाच्या कार्यास त्यांनीं आपल्या स्वतःला वाहून घ्यावें अशी त्यांना मी विनंति करतों.''

---

# ६५. महिला विद्यापीठावरील संकट

( केसरी, २८ फेब्रुवारी, १९३३ )

पुणें येथील भारत–महिला–विद्यापीठाला कै. सर विठ्ठलदास ठाकरसी यांनीं १५ लक्ष रुपयांची देणगी कांहीं शर्तींवर देऊं केली होती. रकमेचें सुमारें ५२ हजार रुपये व्याजाचें उत्पन्न या विद्यापीठाच्या खर्चाला गतवर्षा-पर्यंत मिळत होतें. परंतु सर विठ्ठलदास यांच्या मिळकतीच्या ट्रस्टींनीं ही व्याजाची रक्कम विद्यापीठाला यापुढें आपण देणार नाहीं असें कळविलें. खुद्द विद्यापीठातर्फे चाललेल्या, व विद्यापीठाकडून मिळालेल्या देणग्यांच्या आधा-रावर चाललेल्या, शिक्षणसंस्थांवर हें किती मोठें संकट येऊन पडलें याची कल्पना अशा संस्था चालविणारांना सहजच येईल. अर्थात् हें प्रकरण असेंच सोडून चालणें विद्यापीठाला शक्य नाहीं. म्हणून कांहीं तरी तडजोड निघावी, गैरसमज दूर व्हावे, अशाविषयी खाजगी प्रयत्न बरेच झाले. पण ते एकतर्फी ठरले. शेवटीं कायदेपंडितांचा सल्ला घेऊन हें प्रकरण हायकोर्टांत न्यावें लाग-णार असें म्हणतात, व मग तेथें काय निकाल लागेल तो खरा !

अशी फिर्याद करणें प्रो. कर्वे यांच्या अगदीं जिवावर आलें होतें. कारण एवढ्या उदार आश्रयदात्यांच्या वारसांवर व ट्रस्टींविरुद्ध तक्रार घेऊन कोर्टांत जाणें हें दिसण्यांत अगदीं कृतघ्नपणासारखें दिसतें. शिवाय खुद्द

सर विठ्ठलदास यांच्या पत्नींनीं व्यक्तिशः प्रो. कर्वे यांच्यासारख्या मनुष्यावरहि संशयास्पद आरोप करण्यास कमी केलें नाहीं असें म्हणतात! यामुळें ही देणगी फुकट गेली तर गेली, पण तिजबरोबर आपला स्वाभिमान खर्ची घालूं नये, असें ठरवून प्रो. कर्वे यांनीं आपल्या आत्मविश्वासू पद्धतीप्रमाणें, वेगळ्या देणग्यांकरितां विनंतिपत्रहि प्रसिद्ध केलें आहे. परंतु महिला–विद्यापीठाची सिंडिकेट ही अर्थातच या प्रश्नाकडे सरळ व्यवहाराच्या दृष्टीनें पाहणार. सर विठ्ठलदास यांच्या ट्रस्टींना देणगीचा करार मोडतां येत नाहीं असा कायदेपंडितांचा सल्ला मिळाला असल्यामुळें, सिंडिकेटनें कोर्टाचा राजमार्ग पत्करला असें दिसतें. हें प्रकरण प्रत्यक्ष कोर्टांत जाऊं घातल्यावर त्यासंबंधीं कोणीं आपले खासगी अभिप्राय देण्यांत कांहीं अर्थ नाहीं. तथापि नुकतेच अहमदाबाद येथून, ठाकरसी ट्रस्टींच्या प्रेरणेनें लिहून प्रसिद्ध केलेलें एक पत्रक आमच्या हातीं आलें आहे. म्हणून या विषयासंबंधानें दोन शब्द लिहावेसे वाटतात.

हें पत्रक निनांवी आहे. तथापि 'गुजराथ समाज–सुधारणा समिती'नें त्या पत्रकाबरोबर आपलेंहि एक पत्र जोडून ठिकठिकाणीं पाठविलें आहे. या पत्रांत ट्रस्टींची तरफदारी करून त्यांनीं केलें तें योग्यच केलें असें दाखविण्याचा प्रयत्न केला आहे; आणि महिला विद्यापीठाच्या चालकांनीं पुष्कळ चुका केल्यामुळें ही स्थिति आली असें दर्शविलें आहे. या पत्रकांत घेतलेले मुख्य आक्षेप असे कीं, ( १ ) विद्यापीठाची कचेरी शक्य तितक्या लवकर पुण्याहून मुंबईस न्यावी ती नेली नाहीं. त्याकरितां विनाकारण सबबी सांगितल्या आहेत. हें न होण्याचें कारण विद्यापीठाच्या शिक्षणसंस्थेंत हिंगणें येथील अनाथ बालिकाश्रमांतील शिक्षकांची सोय कर्वे यांना करावयाची होती. या शिक्षकांची निष्ठा जी आश्रमासंबंधानें ती विद्यापीठासंबंधानें राहूं शकत नाहीं. आणि पगार विद्यापीठाचा घ्यावा व हित आश्रमाचें पहावें अशी विसंगति उत्पन्न होते. ( २ ) नांवाप्रमाणें हें विद्यापीठ सर्व हिंदुस्थानाचें असें करावें तें करण्यांत आलें नाहीं. ( ३ ) मुंबईस जितक्या लवकर विद्यापीठाचें कॉलेज काढावयास पाहिजे होतें तितक्या लवकर तें काढलें नाहीं, ( ४ ) सोळा वर्षांत जितकी अपेक्षा होती तितकी बाहेरची वर्गणी जमविली नाहीं. ( ५ ) विद्यापीठांतून निघाव्या तितक्या पदवीधारिणी निघाल्या नाहींत. ( ६ ) नवीन

शिक्षणसंस्था काढाव्या त्या काढल्या नाहींत. सुरत, बडोदें, अहमदाबाद येथील संस्था पूर्वीच्याच होत्या. ( ७ ) विद्यापीठाचें काम लोकप्रिय नाहीं व सरकारला पटेल असेंहि नाहीं, म्हणून त्यांजकडून चार्टर मिळण्याची आशा नाहीं. ( ८ ) विद्यापीठाच्या सेनेट-सिंडिकेटवर गुजराथी सभासद असावे तितके नसतात. ( ९ ) विद्यापीठानें देशी भाषेंतून पुस्तकें करावीं तितकीं निर्माण केलीं नाहींत. ( १० ) परीक्षा घेण्याची पद्धति सदोष आहे.

वरील सर्व आक्षेपांना योग्य उत्तरें देतां येतील, परंतु आतां तसें करीत बसण्यांत अर्थ नाहीं. तथापि या पत्रकाच्या शेवटीं जीं एकदोन वाक्यें आहेत तीं आम्हांला महत्त्वाचीं वाटतात. पत्रकाचा लेखक म्हणतो, " विद्यापीठाच्या चालकांनीं अधिक कार्यक्षम बनावें व उत्साहानें कार्य करावें, या हेतूनें मीं हें सर्व लिहिलें आहे. पण तसें न घडेल तर जनतेनें हें विद्यापीठ सोडून देऊन, दुसरें एखादें निर्माण करावें. मग तें अखिल भारतीय होवो किंवा फक्त मुंबई इलाख्यापुरतें होवो. पण जें होईल तें खरें होईल भ्रामक होणार नाहीं. त्याला हवे तितके उत्साही कार्यक्षम लोक मिळतील, आणि मग सर विठ्ठलदास यांच्या ट्रस्टींना ती वार्षिक ५२ हजारांची देणगी या नव्या संस्थेला देतां येईल."

हें सर्व लक्षांत घेऊन आम्हांस अशी सूचना करावीशी वाटते कीं, जबाबदारीच्या स्वराज्यांत एक प्रधानमंडळ जाऊन दुसरें प्रधानमंडळ नेमलें जातें, व नवें प्रधानमंडळ पहिल्याची जागा व त्याबरोबर सर्व जबाबदारी पत्करतें, त्याप्रमाणें या विद्यापीठाच्या कामींहि कां होऊं नये? व कोर्टांतील चौकशी कां थांबूं नये? सर विठ्ठलदास यांच्या ट्रस्टींनीं सरळ पुढें येऊन आपल्या पसंतीचें म्हणून जें कार्यकारी मंडळ असेल तें सुचवावें. आणि विद्यापीठाच्या सेनेटनें या नव्या कार्यकारी प्रधानमंडळाला रीतसर निवडून, पुढें कांहीं काळापर्यंत सर्व व्यवस्था त्यांचे स्वाधीन करावी. तसेंच अनाथबालिकाश्रमाच्या शिक्षकांनीं आपण जरूर तर बाजूला होऊं, या मंडळानें हवे ते नवे शिक्षक नेमावें असें पुढें येऊन सांगावें. सर विठ्ठलदास ठाकरसी यांचा विश्वास प्रो. धोंडोपंत कर्वे व अनाथ बालिकाश्रम यांच्यावर होता, तसा त्यांच्या ट्रस्टींचा नाहीं हें उघड आहे. शिवाय लेडी ठाकरसी यांच्या मानापमानाचे प्रश्न बरेच उत्पन्न झाले आहेत. अशा वेळीं जुनें विद्यापीठ मोडून नवें विद्यापिठ स्थापण्याऐवजीं जबाबदारीच्या पद्धतीवर नवें प्रधान-

मंडळ किंवा कार्यकारी मंडळच नेमलेलें काय वाईट? म्हणजे मग या पत्रकांत आजच्या चालकांवर घेतलेले आक्षेप कितपत सकारण आहेत, व नवे चालक झाले तरी ते हे आक्षेप आपल्या कामांतून कितपत काढून टाकूं शकतील हें आपोआप कळेल.

आमच्या समजुतीप्रमाणें या प्रकरणाचा गुजराथी—मराठी हा प्रांतिक अभिमान बखेड्याला बराच कारण झाला आहे. सर विठ्ठलदास जिवंत होते, तेव्हां अशा क्षुद्र विचारांना थारा मिळाला नव्हता. केवळ कर्वे यांची योग्यता व कर्तृत्व सर विठ्ठलदास यांच्या डोळ्यांत भरून गेल्यामुळें त्यांना गुजराथी, दक्षिणी हा भेद दिसलाच नाहीं. आणि आतां तो त्यांच्या ट्रस्टींना दिसूं लागला. एवढ्या मोठ्या देणगीचा फायदा मुख्यतः महाराष्ट्रीय लोकांना मिळतो असा गौण विचार जर खरोखरच उत्पन्न झाला असेल तर, विद्यापीठाच्या महाराष्ट्रीय चालकांनीं बाजूला सरून, प्रांजलपणानें विद्यापीठ गुजराथी चालक वर्गाच्या स्वाधीन करावें. म्हणजे मग विद्यापीठ लोकप्रिय किती होतें, सर्व देशांत त्याला मान्यता किती मिळते, गुजराथी विद्यार्थिनींची संख्या किती वाढते, इतक्या थोड्या पगारावर विद्वान नामांकित शिक्षक कसे मिळतात, या सर्व गोष्टी आपोआपच कळून येतील.

विधायक स्वरूपाच्या कामांत मत्सर बुद्धीला जबाबदारीसारखें औषध नाहीं शिवाय सर विठ्ठलदास यांच्या देणगीच्या भांडवलाची हल्लीं किंमत किती राहिली आहे, तिचें वार्षिक व्याज किती येतें व या सार्वजनिक कार्याकडे हें सर्वच्या सर्व ट्रस्टी लावूं इच्छितात कीं नाहीं हेंहि कळेल. 'राज्य' मागेंतोंपर्यंत ठीक असतें. पण 'राज्य अंगावर आलें' म्हणजे मग तितकें सोपें नसतें हा अनुभव सर्वत्र आहे. अनाथ बालिकाश्रमानें जिवापाड मेहनत घेऊन आज सोळा वर्षें हें कार्य कसें केलें हें प्रसिद्ध आहे. पण नांवाप्रमाणें अखिल हिंदुस्थान देशांतील स्त्रियांच्या विशिष्ट शिक्षणाचें कार्य जर या संस्थेच्या हातून व्हावयाचें आहे, तर कार्यकारी मंडळाचा खांदेबदल झाला तर त्यांत काय वावगें? किंबहुना प्रो. कर्वे व त्यांच्यावर निष्ठा असलेला हल्लींचा चालक वर्ग यांच्या स्वार्थनिरपेक्ष सेवेचें महत्त्व स्पष्टपणें लोकांना कळण्याला व उमगण्याला जबाबदार राज्यपद्धतीला अनुसरून कार्यधुरेखालीं खांदेबदल हाच उत्तम मार्ग दिसतो.

---

# ६६. महाराष्ट्रांतील स्त्रीशिक्षण

( केसरी ३० नोव्हेंबर १९३४. )

गेल्या आठवड्यांत पुण्यांतील हुजूरपागेंत मुलींच्या हायस्कूल संस्थेचा सुवर्णमहोत्सव समारंभ करण्यांत आला. या उत्सवांत सभा, संमेलन, खेळ, बक्षिससमारंभ, नाटक, स्मारकग्रंथप्रकाशन, जुन्या विद्यार्थिनींची गांठभेट इत्यादि अनेक चित्ताकर्षक प्रसंग झाले. आणि अशा रीतीनें संस्थेच्या पन्नास वर्षांतील प्रगतीचें आनंदप्रदर्शन व अभिनंदन झालें तें सर्वस्वीं योग्यच होतें. पण हा समारंभ केवळ याच संस्थेचा सुवर्ण ज्युबिली महोत्सव नसून, तो एका अर्थानें एकंदर महाराष्ट्रांतील स्त्रीशिक्षणाचा सुवर्ण महोत्सव होय असेंहि यथार्थपणें म्हणतां येईल. पुण्यांत ज्या वर्षी डे. एज्युकेशन सोसायटी स्थापन झाली, त्याच वर्षी महाराष्ट्र गर्ल्स एज्युकेशन सोसायटीचें हायस्कूल जन्मास आलें, ही गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे. ज्या सालांत महाराष्ट्रांतील पुरुष विद्यार्थ्यांकरितां खाजगी कॉलेज स्थापण्यांत आलें, त्याच सालीं पुण्यांत महाराष्ट्रांतील विद्यार्थिनींकरितां हायस्कूल स्थापण्यांत आलें, याचा अर्थ स्त्रियांच्या शिक्षणाची तजवीज पुरुषांच्या शिक्षणाच्या तजविजीनंतर कांहीं वर्षांनीं झाली असा उघड होतो. पण पुरुषांचें शिक्षण व स्त्रियांचें शिक्षण यांच्या प्रारंभांत व प्रगतींत पांचपन्नास वर्षांचें अंतर पडलेलें कोणत्याहि देशांत आढळून येईल. महाराष्ट्रांतील ज्या प्रगतिपर पिढीच्या बुद्धींत पुरुषांना इंग्रजी शिक्षण देण्याच्या इच्छेचा अंकुर फुटला त्याच बुद्धींत स्त्रियांना इंग्रजी शिक्षण देण्याच्या इच्छेचा अंकुर पाठोपाठ क्रमानें उगवलाच. पण तो बाहेर पडून त्याला प्रत्यक्ष स्वरूप येण्याला थोडाबहुत कालावधि लागावयाचाच तो लागला.

पन्नास वर्षांपूर्वी महाराष्ट्रांतील समाज जुन्या विचारपरंपरेपासून फारसा च्युत झालेला नव्हता. यामुळें स्त्रीशिक्षणाकडे पाहण्याची त्याची दृष्टि किंचित् स्तिमित किंवा कृपण होती यांत शंका नाहीं. परंतु त्यापूर्वी सुमारें पंचवीस वर्षे, मुंबई विश्वविद्यालयाची स्थापना होऊन, नवीन शिक्षण घेतलेली पहिली पिढी बाहेर पडून कार्यक्षम झाली होती. यामुळें जुन्या मतावर कोणी निरर्गलपणानें किंवा उन्मत्तपणानें किंवा तिरस्कारबुद्धीनें हल्ले केलेले त्या पिढीला जरी मानवणारे नव्हते, तरी ही नवी पिढी तत्त्वतः स्त्रीशिक्षणाच्या विरुद्ध

नव्हती. हायस्कूलांत शिकावयास जाणाऱ्या मुलींना प्रथम गांवांतील रस्त्यांतून पडदे सोडलेल्या गाडींतून पोंचवाव्या लागत अशी एक दंतकथा सांगण्यांत येते. पण त्याबरोबरच हायस्कूल फॉर नेटिव्ह गर्ल्स या संस्थेच्या उद्घाटन समारंभाचे दिवशीं "नववस्त्राभरणांनीं नटलेल्या व शिकण्याची हौस व उत्साह ज्यांच्या मुखांवर झळकत होता अशा बालिकांमुळें सभागृहास अनुपम शोभा आली होती." असेंहि वर्णन आढळतें. हायस्कूलच्या उद्घाटनाचा समारंभ टाऊन हॉलमध्यें झाला तरी त्याचे वर्ग दाणेआळींतील वाळवेकरांच्या वाड्यांत, म्हणजे हल्लींच्या सार्वजनिक सभेच्या इमारतींत, भरूं लागले. त्यानंतर शाळा बुधवार पेठेंतील किबे वाड्यांत आली व तेथून ती हुजुरपागेंत आली. ता. ४ मार्च १८८५ रोजीं हुजुरपागेच्या हल्लींच्या इमारतीची कोनशिला बसविण्यांत आली.

या हायस्कूल संस्थेला अस्तित्वांत आणण्यांत प्रथम तत्कालीन रा. सा. महादेव गोविंद रानडे प्रभृति सुधारणावादी पुढारी हे मुख्यतः कारणीभूत झाले; व आजतागायत त्या संस्थेचें चालकत्व अशाच मतांच्या उत्साही लोकांच्या हातीं आहे. गेल्या पन्नास वर्षांत संस्थेची प्रगति इतकी झाली कीं, पहिल्या दिवशीं नोंदलेल्या १८ विद्यार्थिनींच्या जागीं त्या संस्थेंत आतां सुमारें हजार विद्यार्थिनी शिकत असतात. सरकारनें संस्थेकडील द्रव्यसहाय्य हळुहळू कमी करीत आणलें आहे. त्याची भरती खाजगी प्रयत्नानें अजून तितकीशीं झालेली नाहीं. यामुळें या संस्थेंत येणाऱ्या सर्व विद्यार्थिनींना दाखल करून न घेतां कांहींना परत पाठविण्यांत येतें! पण सुदैवानें आतां या निमसरकारी हायस्कूलच्या जोडीला हिंदी महिला विद्यापीठाचें हायस्कूल (कन्याशाळा) कै. आगरकर यांच्या स्मरणार्थ निघालेलें रास्ता पेठेंतील हायस्कूल व सेवासदनांतील हायस्कूल अशा संस्थांची भर पडल्यामुळें, दुय्यम प्रतीचें शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थिनींची वाढती सोय झाली आहे. आणि आणखीहि एखादें स्त्रीशिक्षणाचें हायस्कूल पुण्यांत निघेल अशी बोलवा आहे.

तात्पर्य, सरकारनें जरी कांहीं अंशीं अधिकारविभागणीच्या तत्त्वावर, कांहीं अंशीं दिवाळखोरीमुळें, व कांहीं अंशीं कृपण बुद्धीमुळें, स्त्रीशिक्षणाकडील खर्चाचा हात आंखडता घेतला, तरी पुण्यांतच काय पण महाराष्ट्रांतील कांहीं प्रमुख गांवींहि लोक स्त्रीशिक्षणाकरितां अवश्य त्या संस्था, बऱ्याच अंशीं स्वावलंब-






नाच्या तत्त्वावर, काढण्यास माघार घेणार नाहींत यांत बिलकूल संशय नाहीं. याचा अर्थ स्त्रीशिक्षणासंबंधानें लोकसमाजाचा दृष्टिकोन आतां सर्वस्वीं बदलला आहे, स्त्रियांचें समाजांतील स्थान, व त्याला आनुषंगिक म्हणून स्त्रियांना शिक्षण देण्याची आवश्यकता, या गोष्टी त्याला पूर्णपणें पटल्या आहेत, सरकारनें, वर दर्शविल्याप्रमाणें, खर्चाचा हात आंखडता घेतला असला तरी इतर एका रीतीनें स्त्रीशिक्षणाला उत्तेजनच दिलें आहे असें म्हटलें पाहिजे. ही रीत म्हटली म्हणजे नवीन राजकीय सुधारणांमध्यें स्त्रियांना संघटित स्वराज्य संस्थांतून स्वतः सभासद होण्याचा व इतरांना सभासद निवडून देण्याचा अर्थात् मतदारीचा हक्क दिला आहे. जॉइंट सिलेक्ट कमिटीच्या रिपोर्टांत, फ्रँचाइज कमिटीच्या रिपोर्टाला संमती देऊन, पुरुष मतदारांच्या संख्येशीं स्त्रीमतदारांच्या संख्येचें प्रमाण एकचतुर्थांश फार तर निदान एकपंचमांश, एथपर्यंत तरी पडावें अशी व्यवस्था सुचविली आहे व ती अमलांत येईल याविषयीं शंका नाहीं.

ही गोष्ट घडून येण्यास स्वतः इंग्रजांचें उदारमतवादित्व हें एकपट कारणीभूत असलें तर, खुद्द स्त्रीसमाजाची आग्रहाची मागणी व तिला पुरुषवर्गाची मनःपूर्वक संमती ही दसपटीनें कारणीभूत आहे असें म्हणतां येईल. पुढल्या वर्षीं सर्व हिंदुस्थानांत मिळून सुमारें साठ लक्ष स्त्रिया मतदार होतील आणि तसें झालें असतां स्वराज्यसंस्थांच्या घटनांवर त्या गोष्टींचा परिणाम झालेला दिसल्याशिवाय राहणार नाहीं. आणि ही सुधारणा सर्वस्वीं इष्ट होय. स्त्रियांच्या वाढत्या हक्कांची मागणी ही सफळ झाली असतां एक प्रकारें ती क्रांतिच होय; व कोणच्याहि क्रांतींत एका वर्गानें उपभोगलेली सत्ता दुसऱ्या वर्गाकडे जात असते; पण सत्तांशांच्या या परिवर्तनानें कोणी भिऊन जाण्याचें कारण नाहीं. अशीं परिवर्तनें जगाच्या इतिहासांतील प्रत्येक युगांत झालेलीं आढळून येतात. हल्लींच्या युगपरिवर्तनांत, ऋषिकालीन विद्वान स्त्रियांच्या बरोबरीच्या विदुषी निपजून, त्या जुन्या युगाचें पुनरुज्जीवन करणार असा रंग दिसतोच. पण कदाचित् ऐहिक संसार व अभ्युदय यांच्या कल्पना दिवसेंदिवस बदलत जात असल्यामुळें, नव्या युगांतील स्त्रियांचें समाधान केवळ विद्वत्तेंत बरोबरी प्रस्थापित करण्यानें न होऊन कर्तृत्वांतहि ती बरोबरी करावी असें त्यांना वाटण्याचा संभव आहे.

दुसरें पक्षीं निदान आजच्या स्थितींत, सरकारशीं लोकशाही तत्त्वांचा

पुरस्कार करण्याच्या स्पर्धेत आम्ही पाश्चात्यांपलीकडेहि जाऊन 'अॅडल्ट सफ्रेज' म्हणजे वयोनिष्ठ मतदारी मागण्याला राष्ट्रीय सभेला संमती देत आहों. ती मतदारी प्रत्यक्षच आल्यावर प्रतिक्रिया होईल किंवा नाहीं सांगवत नाहीं! पण आज राजकीय भावनेच्या उल्हसित वृत्तींत आपण जें उदार मतवादित्वाचें ठाण मांडून बसलों आहों तें टिकेल तोंपर्यंत, स्त्रीशिक्षणाच्या पुरस्काराला मर्यादा घालूं पाहाणें वेडेपणाचें दिसेल. म्हणून स्त्री व पुरुष हा भेद खुद्द निसर्गालाच इष्ट असेल तर तोच निसर्ग अखेर तो भेद संभाळण्याकरितां अवश्य ती प्रतिक्रिया घडवून आणील. एरवी जगाची आजची वृत्ती पाहतां, स्त्रीशिक्षणाचें पाऊल मागें पडण्याचा संभव नाहीं व मागें पडण्याचें कारण नाहीं. स्त्रियांना जर अशिक्षित किंवा अर्धशिक्षित ठेवल्या तर वाढत्या सार्वजनिक संसारांतील हिताहित पाहण्याची जबाबदारी सर्वांशीं एकाच म्हणजे पुरुषवर्गाच्या माथीं पडणार, पण तें न्यायाचें नाहीं!

तथापि, स्त्रियांचें शिक्षण थेट पुरुषांच्या शिक्षणासारखेंच असावें कीं नाहीं हा वादग्रस्त प्रश्न सुशिक्षित स्त्रियांनींच पुढाकार घेऊन आपल्यांतील लोकमतानें सोडविला पाहिजे. स्वराज्य हवें हें म्हणत असतांनाच हिंदुस्थानाला त्याच्या 'जीनियस'ला (प्रकृतीला) मानवेल असा त्याचा नमुना असला पाहिजे अशी मागणी कै. देशबंधु दास करीत असत. त्याच पद्धतीनें, स्त्रियांना शिक्षण हवें, पण तें केवळ पुरुषी शिक्षणाच्या नमुन्याचें नको, तर त्याचा खास नमुना वेगळा हवा, असें कोणी म्हणाल्यास त्यांत तत्त्वतः कांहीं वावगें नाहीं. निदान असें म्हणणारांना दोष ठेवावा असें कोणाला वाटेल तर, त्यानें सुधारकाग्रणी व कर्ते स्त्रीशिक्षणसाहाय्यक प्रो. कर्वे यांच्या सारख्यांना दोष दिला पाहिजे. कारण एरवी कोणी तसें म्हटलें तर तो केवळ अभिनिविष्ट म्हणून हे त्याला निकालांत काढणार!

पण हा प्रश्न अतिशय मोठा व गहन असल्यामुळें त्याच्या चर्चेत येथें शिरतां येत नाहीं. शिवाय आजचा प्रसंगहि पुण्यांतील एका विशिष्ट स्त्रीशिक्षणसंस्थेचें अभिनंदन करण्याइतका मर्यादित असल्यामुळें, त्या चर्चेत शिरण्याचाहि तो प्रसंग नाहीं. म्हणून पुन्हा एकवार पुणें महाराष्ट्र गर्ल्स हॉयस्कूलचें अभिनंदन करून, पुढील प्रगतीच्या पायऱ्या चढण्याचें श्रेय तिच्या मनाप्रमाणें तिला लाभो असें म्हणून हा लेख संपवितों.

# ६७. ज्ञानाचीं सदावर्तें.

( केसरी, ता. १७ आक्टोबर १९११ )

प्रत्येक युगांत धर्मादायाच्या कल्पना बदलत असतात; तथापि धर्मादाय-करण्याची बुद्धि कायम असते. हल्लींच्या काळीं पूर्वीसारखीं तीर्थाटणें व यात्रा करणारे प्रवासी, बैरागी, कावडवाले, संन्यासी, फकीर, ब्रह्मचारी वगैरे कमी झाले आहेत. हे कमी झाले नसले तरी पूर्वीप्रमाणें त्यांना हल्लीं पायपिटी तरी करावी लागत नाहीं. आगगाड्या व गाडीरस्ते झाल्यानें त्यांचा प्रवास सुखकर होतो. यामुळें पूर्वींचीं अन्नछत्रें, सदावर्तें पाणपोया इत्यादि संस्था नामशेष होत चालल्या आहेत. तथापि, ज्ञानार्जनाची एक नवी यात्राच या नव्या युगांत निर्माण झाली असून या यात्रेचेहि चार धाम, बारा, ज्योतिर्लिंगें वगैरे प्रकार आहेतच. अर्थात् ही यात्रा सांग व सफल करण्यास निघालेल्या यात्रेकरूंस तदनुरूप मदतीची अपेक्षा असते; आणि ही मदत मोफत शिक्षणाच्या शाळा, खुलीं वाचनालयें, आणि समृद्ध ग्रंथसंग्रह यांच्या सदावर्तांनीं व अन्नछत्रांनीं मिळते. बडोद्याचे अधिपति श्रीमंत सयाजीराव गायकवाड यांनीं दक्षणा व खिचडी आपल्या अमदानींत बरीच कमी केली, असा त्यांजवर आक्षेप आहे. पण हें करणें योग्य किंवा अयोग्य कसेंहि मानिलें तरी, आपल्या राज्यांत बिनखर्ची प्राथमिक शिक्षण देण्याची सोय करून जशीं विद्येचीं अन्नछत्रें त्यांनीं घातलीं आहेत, तशींच ठिकठिकाणीं मोफत वाचनालयें व ग्रंथसंग्रहा-लयें स्थापून, उच्च दर्जाच्या ज्ञानाचीं सदावर्तें घालण्याचाहि जो त्यांनीं उप-क्रम केला आहे तो त्यांस भूषणावह असून, त्याच्या योगानें खिचडी व दक्षणा यांचा खर्च कमी केल्याचा थोडाबहुत तरी मोबदला त्यांनीं प्रजेस दिला असें म्हणण्यास हरकत नाहीं. महाराजसाहेबांच्या नवीन योजनेप्रमाणें बडोदें राज्यांत लवकरच ठिकठिकाणीं वाचनालयें व पुस्तकसंग्रह सरकारी खर्चानें अगर सरकारी मदतीनें निर्माण होतील असा रंग दिसतो. ही योजना मूळ कल्पनेबरहुकूम कांहीं विघात न होतां अमलांत आली तर ज्ञानदानाच्या सदावर्तांचें हें एक स्पृहणीय व अनुकरणीय उदाहरण महाराजांनीं इतरांस घालून दिलें असें होईल यांत संशय नाहीं.

दोन आठवड्यांपूर्वी पुणें येथें ना. गव्हर्नर सर जार्ज क्लार्क यांनींहि, पुणें

नेटिव जनरल लायब्ररीच्या डायमंडजुबिली–समारंभाच्या प्रसंगीं, वाचनालयें व ग्रंथसंग्रह यांचें जें महत्त्व मार्मिक रीतीनें वर्णन केलें, तें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. या वर्णनाबरोबरच दुसऱ्याहि एका गोष्टीचा–म्हणजे प्राथमिक शिक्षणाचा–उल्लेख करून हें शिक्षण मोफत व सक्तीचें करण्यास अडचणी असल्याचें त्यांनीं ध्वनित केलें. तसेंच वाचनालयामध्यें वर्तमानपत्रें घेण्याच्या बाबतींत पंक्तिप्रपंच कां करावा व कसा करावा याचेंहि सूचक असें दिग्दर्शन आणि समर्थन त्यांनीं केलें. अमुक वर्तमानपत्र किंवा पुस्तक लोकांस निवळ सत्यच शिकवितें कीं काय ? त्याची प्रवृत्ती वाचकांचे विचार उन्नत करण्याकडे आहे कीं, अवनत करण्याकडे आहे ? त्याच्या वाचनापासून समाजांतील द्वेषबुद्धि वाढेल कीं प्रेमबुद्धि वाढेल ? तें प्रगतिपर आहे किंवा प्रतिगतिपर आहे ? त्यांतील टीका रचनात्मक असते किंवा विघातक असते ? वगैरे प्रश्न मनाशीं उपस्थित करून पंक्तिप्रपंच व पक्षपात खुशाल करावा, अशा अर्थाचा नामदारसाहेबांचा उपदेश होता. हे अगर असले प्रश्न विचारले असतां सरकारच्या चौकीपहाऱ्यांतून सुटणारीं वर्तमानपत्रें व ग्रंथ तरी खऱ्या कसोटीस कितपत लागतील ही जरा विचाराचीच गोष्ट आहे. राष्ट्रांतील कोणतीहि चांगली गोष्ट म्हटली म्हणजे ती परिणत किंवा फलप्रद होणें हें सरकार व प्रजा यांच्या परस्पर सहकारितेवर अवलंबून आहे, हें नामदारसाहेबांचें म्हणणें आम्हांस मान्य आहे. परंतु वर्तमानपत्रांचा व्यापक व कडक कायदा झाला असतांहि त्यांतील शर्ती संभाळून जीं थोडीं लोकपक्षाचीं वर्तमानपत्रें जिवंत राहिलीं आहेत त्यांचा वाचनालयांतून प्रवेशहि होऊं नये कीं काय ? तीं सरकारच्या कृत्यावर मोकळ्या मनानें टीका करतात, अगर सरकारची बाजू धरावी तितकी उचलून धरीत नाहींत म्हणून त्यांजवर बहिष्कार घालण्याचें काम स्वतः सरकारानें आपल्या अधिकाऱ्याकडून, सहकारी म्युनिसिपालिट्यांकडून, यत्किंचितहि मदत मिळणाऱ्या वाचनालयांकडून व सरकारच्या केवळ नेत्रसंकेताबरोबर पडेल तें काम हौसेनें उठविणाऱ्या बगलबच्चांकडून जोरानें व नेटानें जें आज चालविलें आहे तें काय म्हणून ? सरकार व लोक यांची सहकारिता म्हणजे ‘ तुझें तें माझें व माझें तें माझें ’ अशा अर्थाचीच असेल तर मग आमचें कांहीं एक म्हणणें नाहीं. परंतु सरकारचें म्हणून जसें कांहीं म्हणणें असेल तसेंच लोकांचेंहि असणार; व ते कायद्यास कोणत्याहि तऱ्हेनें

आक्षेप घेतां येणार नाहीं अशा रितीनें सांगणाऱ्या वर्तमानपत्रास सार्वजनिक वाचनालयांतून मज्जाव व्हावा हें काय म्हणून ? या ठिकाणींच मात्र सहकारितेच्या उदात्त कल्पनेच्या केवळ क्षुद्र खुनशी अशा मनास साजेल असा संकोच कां व्हावा ? पण तें असो; या वादग्रस्त बाबतींत अधिक न लिहितां एकंदरीनें ग्रंथ संग्रहालयाच्या कल्पनेस ना. गव्हर्नरसाहेबांनीं जें उत्तेजन दिलें तेवढ्यापुरतें त्यांचे आभार मानणें जरूर आहे.

पक्षपातीं सरकारच्या प्रेरणेनें एकाक्ष बनलेल्या वाकनीसाच्या हातून नाइलाजानें होणारा हा पंक्तिप्रपंच वगळला असतां, बाकी सरस्वति-देवीच्या मंदिरांत चालू असलेलीं ज्ञानाचीं अन्नछत्रें व सदावर्तें सर्वांस सारखीं प्रिय व पवित्र असतात. मुद्रणकला ही जरी अलिकडच्या काळची असली तरी ग्रंथलेखन व ग्रंथसंग्रह या गोष्टी जवळ जवळ अनादिसिद्ध आहेत. पुत्रसंतति होऊन आपली वंशपरंपरा पुढें चालावी ही मनुष्यमात्राची आकांक्षा जशी स्वाभाविक आहे, तशीच आपले विचार जगांत पसरावे, कायम राहवे व सर्वमान्य व्हावे, ही आकांक्षाहि स्वाभाविक आहे. ज्ञान हा मुख्यतः मनाचा व अंतःकरणाचा विषय असला तरी त्याला मूर्त स्वरूप मिळण्याची अत्यंत हौस असते. विचार व मनन यांनीं ज्ञानाचें सुख मिळण्यासारखें असलें तरी त्याला वाचेचें स्वरूप आल्यानें तेंच सुख द्विगुणित होतें. पण मनुष्यदेहाप्रमाणें वाचा ही नाशवंत असल्यामुळें त्यांहून कमी नाशवंत अशा पदार्थांच्या सहाय्यानें आपले विचार ग्रथित करून ठेविले असतां, ते अधिक काळपर्यंत टिकतील व दरम्यान अनेक लोकांना वाचावयास सांपडतील, या बुद्धीनें मनुष्याच्या हातून ग्रंथ निर्माण होतात. ग्रंथ निर्माण केल्यानें पुत्रजन्ममहोत्सव वाटतो, ही गोष्ट आजवर झालेल्या अनंत ग्रंथकारांच्या अनुभवानें सिद्ध झालेली अशी आहे. जुन्या काळीं मुद्रणकला नसल्यानें ग्रंथप्रसिद्धीस हल्लींसारखी अनुकूल परिस्थिति नव्हती; तरीहि त्या काळचें ग्रंथभांडार कांहीं थोडें होतें असें नाहीं. एका दिवसांत हजारों प्रति निघण्याची, किंवा थोड्याशा खर्चांत जगाच्या अष्ट दिशांना हजारों मैलांवर टपालानें त्या फैलावण्याची सोय नव्हती अशा वेळींहि हजारों ग्रंथ निर्माण होत व त्यांचे प्रचंड संग्रह होत, ही गोष्ट लक्षांत घेतली असतां कोणत्याहि स्थितींत व युगांत मनुष्यमात्रानें दाखविलेल्या ज्ञानप्रियतेचें व विद्याव्यासंगाचें कौतुक करावें तितकें थोडेंच वाटतें.

परवां पुणें मराठी–ग्रंथसंग्रहालयाच्या प्रारंभाच्या दिवशीं आपल्या भाषणांत रा. नानासाहेब पावगी यांनीं भरतखंडांतील विद्यापीठांचें आणि ग्रंथसंग्रहांचें केलेलें वर्णन संक्षेपानें पूर्वी प्रसिद्ध झालेंच आहे. हिंदुस्थानाप्रमाणें प्राचीन काळीं असीरिया, ईजित, ग्रीस, रोम वगैरे राष्ट्रांतहि मोठमोठीं ग्रंथसंग्रहालयें होतीं असें पुराणवस्तुसंशोधकांनीं सप्रमाण दाखवून दिलें आहे. असीरिआच्या राजधानीचें शहर निनव्हे येथें सांपडलेल्या असुरबनीपाल राजाच्या ग्रंथसंग्रहालयामध्यें एक चौरस फुटापासून एक चौरस इंचापर्यंत मृत्तिकापत्रांवर लिहिलेले हजारों ग्रंथ आहेत; व त्यांपैकीं कांहींवरील लेख इतके बारीक खोदलेले आहेत कीं, ते सूक्ष्मदर्शक भिंगाखेरीज वाचतां येत नाहींत! खिस्तापूर्वी चवदाव्या शतकांत ईजिप्तमध्यें ऑसिमँडिस नांवाच्या राजानें एका देवालयामध्यें एक प्रचंड ग्रंथसंग्रहालय बनविलें होतें; त्यांत हजारों ग्रंथ होते. या ग्रंथसंग्रहालयाला ‘ आत्मरुग्णालय ’–आत्म्याला होणाऱ्या रोगांच्या चिकित्सेचा व औषधोपचाराचा दवाखाना–असें अत्यंत मार्मिक नांव दिलें होतें, त्यावरून ज्ञानाचें महत्त्व या जुन्या काळींहि किती मानलें जात असेल याची सहज कल्पना होते. ग्रीसमध्यें खिस्तापूर्वी ६०० वर्षांच्या काळीं इसिसट्रेसस नामक सरस्वतिभक्तानें मोठालीं ग्रंथसंग्रहालयें केल्याचा दाखला सांपडतो. इराणच्या झर्सीस राजानें ग्रीस देशांतून एक प्रचंड ग्रंथसंग्रह इराणांत नेला; व पुढें अलेक्झांडर यानें दिग्विजय केल्यावर तो ॲथीनिअन लोकांस परत मिळाला असें म्हणतात. ईजिप्तमधील टॉलमी नामक राजवंशाची विद्याप्रियता महशूरच आहे. मुसलमानांनीं ईजिप्त जिंकला त्यावेळीं धर्मवेडानें पछाडल्यामुळें त्यांनीं तेथील एक मोठें ग्रंथसंग्रहालय जाळून आपली अरसिकता जगास जाहीर केली, अशा निंदेचा डंका इतिहास आजवर वाजवीत आहे. तें अलेक्झांड्रिया येथेंच होतें. या शहरांतील दोन ग्रंथसंग्रहालयें मिळून चारपासून सात लक्षपर्यंत ग्रंथसंख्या होती असें अनुमान आहे. सिसरो व ॲटिकस या रोमन विद्वानांचीं स्वतःचीं अशीं मोठीं ग्रंथसंग्रहालयें होतीं. जगप्रसिद्ध सीझर यानें रोममध्यें फुकट वाचण्याकरितां सार्वजनिक ग्रंथसंग्रह बनविण्याची योजना केली होती. खिस्ती मध्ययुगांत ग्रंथसंग्रह असावे तसे नव्हते. याचें कारण असें कीं, खिस्ती राष्ट्रांच्या जुन्या काळीं विद्या, ग्रंथलेखन व वाचन या गोष्टी केवळ भटाभिक्षुकांच्या आधिन राहिल्या होत्या. पण आधुनिक काळीं खिस्ती राष्ट्रांनीं हा

दोष सर्व धुऊन काढला आहे. लंडन येथील ब्रिटिश म्युझिअम्, त्याचप्रमाणें बर्लीन, म्यूनिच, शिकागो वगैरे ठिकाणचीं ग्रंथसंग्रहालयें—अर्थात् त्यांतील ग्रंथांचा प्रचंड संग्रह—यांची पद्धतशीर व मार्मिक मांडणी व रचना वगैरे गोष्टी पाहिल्या म्हणजे युरोपिअन लोकांच्या विद्याव्यसनित्वाची खरी साक्ष पटते.

आतां इतर कित्येक गोष्टींप्रमाणें पुस्तकालयांसंबंधानेंहि मूळ मर्म विसरलें जाऊन केवळ त्यांच्या बाह्य स्वरूपाची आणि नसत्या महत्त्वाची अतिशयोक्ति होण्याचा संभव असतो, नाहीं असें नाहीं. पुस्तकसंग्रह आणि त्यावरून ओळखली जाणारी समाजाची विद्याप्रियता यांचें प्रमाण नेहमींच सम राहील असें म्हणतां येणार नाहीं. ग्रंथ जमविणें हा एकदां का निवळ हौसेचा किंवा शोकाचा विषय होऊन राहिला म्हणजे मग ग्रंथावर ग्रंथ जमा होऊं लागतात, वाचनालयांचें उत्पन्न वाढूं लागतें, आणि त्यांचा एकंदर बडेजाव फैलावत जातो. जी गोष्ट समाजाची तीच व्यक्तींची. पुस्तकांचा नाद असणारे सर्वच लोक म्हणजे विद्याव्यसनी असतात असें नाहीं. पुस्तकें विकत घेणें अगर इतर रीतीनें जमविणें तीं वाचण्याकरितां नव्हे तर डोळ्यासमोर दिसल्यानें बरें वाटतें, अगर कलाकुसरीच्या इतर सामानाप्रमाणें तीं खोलीस किंवा दिवाणखान्यास एक प्रकारची शोभा देतात म्हणून पुस्तकसंग्रह करणारे कित्येक लोक असतात. अशा ग्रंथसंग्रहांचा उपयोग प्रसंगोपात्त दुसऱ्यास होतो हें ठीकच आहे; पण या बाबतींत वाईटांतून एवढेंच काय तें चांगलें काढण्यासारखें असतें. पुस्तकें विकत घेण्यास जे पैसे ते खर्च करितात किंवा तीं जमविण्याकरितां जे श्रम ते करितात त्या मानानें त्यांची स्वतःची बहुश्रुतता नसते. मोठमोठ्या ग्रंथसंग्रहालयांतूनहि वर्षानुवर्ष ज्यांना कोळिष्टकें झाडणाऱ्या सफाईकामगारांच्या केरसुणीशिवाय दुसरा कोणताहि स्पर्श झाला नाहीं, अशीं मौल्यवान् पुस्तकें हजारों सांपडतील. या दृष्टीनें पाहतां प्रचंड ग्रंथसंग्रहालयांच्या उपयुक्ततेपेक्षां निरुपयुक्तताच अधिक भासमान होते.

दुसऱ्याहि एका दृष्टीनें ग्रंथसंग्रहाविषयीं अनादर उत्पन्न होणें संभवनीय आहे. इतर गोष्टींप्रमाणें ग्रंथांतहि उत्तम, मध्यम व अधम ही वर्गवारी लागतेच; आणि कनिष्ठ दर्जाच्या ग्रंथांची वाढ रानवट झाडाप्रमाणें बेसुमार होणारी असल्यामुळें, अधम ग्रंथांच्या महापुरांतून उत्तम ग्रंथांचें रक्षण कसें होईल याविषयीं मनुष्यास एकादे वेळीं चिंता वाटल्यास नवल नाहीं. मनुष्यप्राणी

हा जरी सृष्टींत सर्वोत्कृष्ट मानला तरी त्याची केवळ वृद्धीच होऊं लागली, व त्याबरोबर तितकाच क्षय नसला तर पृथ्वीच्या पाठीवर मनुष्यांस राहण्यास जागाच मिळणार नाहीं; म्हणून वेळोवेळीं दुष्काळ, रोगराई, लढाया वगैरे ज्या आपत्ति ईश्वर पाठवितो तीं सर्वच खरोखर संकटें नसून संकटरूपानें मनुष्यावर परमेश्वर उपकारच करितो, असें समाधान मानण्याची एक वेदांती रीत आहे. तोच न्याय ग्रंथांच्या वाढीस लाविला असतां, अकल्पित रीतीनें त्यांचा मधूनमधून संहार होतो, ही गोष्ट केवळ वावगीच आहे असें म्हणतां येणार नाहीं. खंडोगणती प्रजा होणाऱ्या दरिद्री आईबापांस आपलीं मुलें अधिक वाटलीं तरी त्यांचा संहार त्यांना करवणार नाहीं, त्याचप्रमाणें मिळेल तें पुस्तक जमविण्याची दीक्षा घेऊन ग्रंथसंग्रह करण्यास सिद्ध झालेल्या मनुष्यास आपल्या हातानें कोणत्याहि पुस्तकाचा नाश न करवला तरी, त्यांना सुखासनें पुरवितांना त्याच्या चेहऱ्यावर वीट आल्याची झांक दिसल्याशिवाय राहात नाहीं. पण त्याच्या हातून ग्रंथसंहाराचें जें काम होत नाहीं तें उंदीर, झुरळें व कसरी वऱ्यावाइटाच्या मिश्रणानें नित्य करीतच असतात. जोनाथन स्विफ्ट यानें 'बॅटल ऑफ दी बुक्स' नांवाच्या आपल्या विनोदी ग्रंथांत वर्णन केल्याप्रमाणें, नव्या व जुन्या ग्रंथांचीं नेहमीं युद्धें चाललेलीं असून त्यांत विस्मृतिरूप वज्रानें कित्येक नालायक ग्रंथांचा नाश नित्य होत असतो. शिवाय मुसलमान सरदार उमरा यानें ॲलेक्झँड्रिया शहरीं चारशें सार्वजनिक स्नानगृहांमध्यें टॉलमी राजांचीं ग्रंथसंग्रहालयें जळणासारखीं वापरून सहा महिने-पर्यंत आपल्या सैन्यास नित्य आंघोळीस ऊन पाणी पुरवून दिवाळी केली, किंवा दुसऱ्या एका मोंगल योद्ध्यानें एका प्रसिद्ध ग्रंथसंग्रहालयांतील पुस्तकें तबेल्यांतून पसरून आपल्या लढाऊ घोड्यांना सुखशय्या करविली अशाहि अक-ल्पित गोष्टी ग्रंथसंग्रहालयांनीं होणारा भू-भार हरण करण्यास उपयोगीं पडतात.

ग्रंथसंग्रहालयाच्या निंदकांना दुसरेहि कित्येक आक्षेप सकारण घेतां येण्या-सारखे असतात. पुस्तकी ज्ञान म्हणजे खरें ज्ञान नव्हे व व्यवहारचातुर्य तर नव्हेच नव्हे. एरवीं पढत मूर्ख हें नांव देऊन ज्या वर्गाचें वर्णन समर्थांनीं दासबोधांत केलें आहे, तो वर्ग कोठून आला ? "ना दे चित्ता शांति ऐसी विद्या काशाला" या मराठी सुभाषितावरून, ग्रंथपरिशीलनाचा सुपरिणाम हटकून होतोच असें नाहीं असें लोकमत पूर्वापार दिसतें. विद्या नसतांना

ज्यांच्या अंगीं पिशाचवृत्ति असते ते विद्या शिकतील व त्यांच्या अंगीं विनय न येईल तर ब्रह्मसमंधासारखे जाज्वल्य व भयंकर होतात! तसेंच खऱ्या बहुश्रुतपणानें मनास जी शीतलता यावी ती नुसत्या पढिकपणानें येतेच असें नाहीं; व खऱ्या विद्वत्तेच्या अभावीं विद्वत्तेचा अहंकार मात्र उत्पन्न होतो. भाराभर पुस्तकें डोळ्यांसमोर असलीं म्हणजे हें वाचूं कां तें वाचूं असें होऊन बुद्धि फाटते; अनिश्चितपणा वाढतो; आणि वाचनाच्या अभावीं स्वयंभु बुद्धिमत्तेला एकाग्रतेची जोड मिळून जें काम मनुष्याच्या हातून एरवीं झालें असतें तेंहि कित्येक वेळां पढिक मनुष्याच्या हातून होत नाहीं. फाजील ग्रंथाभ्यासानें मनाला दुबळेपणा येतो याचें समर्पक उदाहरण प्राचीन ग्रीक लोकांनीं दाखवून दिलें आहे. विद्वत्ता आणि पारतंत्र्य यांचें विलक्षण साहचर्य ग्रीक लोकांइतकें दुसऱ्या कोणत्याहि राष्ट्रांत आढळणें कठिण. पुस्तकें वाचून वाचून त्यांनीं आपलें स्वातंत्र्य गमाविलें; आणि ते जोंपर्यंत पुस्तकें वाचीत राहतील तोंपर्यंत ते असेच पारतंत्र्य भोगतील असें पुष्कळांनीं भाकितहि केलें होतें! गॉथ्स नांवाचे रानटी लढाऊ लोक ग्रीक लोकांना जिंकून अथेन्स शहरांत शिरले, तेव्हां त्या ठिकाणीं त्यांना प्रचंड ग्रंथसंग्रहालयें आढळलीं. अर्थात् उमरा यानें आलेक्झॉंड्रिआ येथील ग्रंथसंग्रहाची वाट लाविली, तशीच अथेन्स येथील ग्रंथसंग्रहालयें जाळून उध्वस्त करण्याची उर्मी गॉथ्स लोकांच्या मनांत प्रथम आली. पण असें सांगतात कीं, त्यांच्यातच एक शहाणा गॉथ सरदार होता तो इतरांस म्हणाला, "छेः! हें ग्रंथभांडार जाळण्यांत तुमची मोठी चूक होईल. हे मिळमिळीत ग्रीक लोक आपले सुखानें ग्रंथवाचनांत गढून गेले आहेत तें काय वाईट? ते बरे निरुपद्रवी आहेत त्यांचीं हीं पुस्तकें जाळून त्यांच्या क्षात्रतेजावरची राख विनाकारण कां फुंकता? ते पुस्तकें वाचीत राहतील तोंपर्यंत त्यांजवर सुखानें राज्य तरी करितां येईल. त्यांच्या हातचीं पुस्तकें गेलीं म्हणजे त्यांचे रिकामे हात तरवारीकडे धांवतील हें तुम्हांस कसें कळत नाहीं?"

वरील सर्व आक्षेप जमेस धरिले असतांहि ग्रंथवाचनापासून मनास जो आल्हाद होतो त्यास बाध येऊं शकत नाहीं. जगाच्या उत्पत्तीपासून आजवर मनुष्यास खरें व निर्मळ सुख ग्रंथवाचनानेंच मिळालेलें आहे. इतर सुखांनीं भरलेला संसार सोडून संन्यास न घेणाऱ्या मनुष्यासहि, त्याचा जितका वेळ

निर्विकार व एकाग्र अशा ग्रंथवाचनांत जातो तेवढ्या वेळेपुरता संन्यास-सुखाचा अनुभव त्याला संसारांतच मिळतो, असें म्हणण्यास हरकत नाहीं. उलट ज्याचा संसार दुःखाचा होण्याचें त्याच्या कपाळीं लिहिलें असेल त्यालाहि ग्रंथवाचनासारखी समाधानाची दुसरी जागा नाहीं. इतिहासांत अशीं पुष्कळ उदाहरणें आढळून येतात कीं, ज्यांमध्यें केवळ विद्याव्यासंगाच्या सुखावर विद्याप्रिय अशा बंदिवानांनीं वर्षानुवर्षांचा बंदिवास सुखानें नसला तरी समाधानानें घालविला. गिबन यानें आपल्या इतिहासांत कॉर्डोव येथील खलिफाच्या वैभवाचें वर्णन करितांना याविषयीं एक फार मार्मिक उल्लेख केलेला आहे. या खलिफांपैकीं अब्दुल रहिमान नांवाचा एक खलिफा होता. त्यानें ५० वर्षेपर्यंत राज्यैश्वर्यांतील उत्तमोत्तम गोष्टींचें सुख अनुभविलें होतें. या ऐश्वर्याची कल्पना येण्यास ' अरेबियन नाइट्स ' मधील वर्णनाची आठवण करावी एवढें सांगितलें असतां पुरे. हा खलिफा मेल्यावर त्याच्या खासगी पेटीच्या कप्प्यांत एक कागद सांपडला. त्यांत त्यानें असें लिहिलें होतें कीं, " सर्व सुखें माझ्यापुढें हात जोडून उभीं असतां राज्यैश्वर्यांत घालविलेल्या ५० वर्षांपैकीं मला खऱ्या सुखाचे दिवस किती गेले हें मीं मोजून पाहिलें; पण ते फक्त १४ च भरले ! व ज्या ज्या दिवशीं मीं विद्यामृताचें पान केलें तेच हे १४ दिवस होत. "

तात्पर्य, जगाच्या सुखाला वैराग्याचें विरजण घालणारें आणि दुःखरोगाला बरें करणारें औषध म्हटलें म्हणजे एक ग्रंथवाचनच होय. कारण ग्रंथामध्यें अशीच कांहीं विलक्षण जादू भरलेली असते. ईश्वराच्या सर्वगुणसंपन्नतेचा पृथ्वीवरील खरा प्रतिनिधि झाला तर एक ग्रंथसंग्रहच होऊं शकेल, मनुष्य होऊं शकणार नाहीं ! एखाद्या लहानशाच का होईना ग्रंथसंग्रहालयामध्यें आपण बसलों असतां वर्तमान व भूत या दोन काळांतील अंतर आपणास तोडून टाकतां येतें; व गतकालीं होऊन गेलेल्या कोणत्याहि महानुभाव ज्ञात्या पुरुषाच्या आत्म्याशीं समरस होऊन त्याच्या सहवासांत व संभाषणांत काल घालवितां येतो. अगदीं बसल्या जागीं व न उठतां, वेदांतील ऋचा करतांना ऋषींनीं दिव्यदृष्टीनें जें पाहिलें, भारतादि ग्रंथ लिहितांना आद्य कवींना ज्या विचारांची स्फूर्ति झाली, वेदांत–भाष्य व रसभरित स्तोत्रें लिहितांना जे ओजस्वी उद्गार आद्य शंकराचार्यांच्या लेखणींतून बाहेर पडले,

सॉक्रेटिसानें शिष्यांना पढवीत असतांना किंवा वितंडेस प्रवृत्त झालेल्या वावदूकांशीं वाद करितांना जो निरुत्तर कोटिक्रम केला, सर्व समाजांत विचारक्रांति घडवून आणणाऱ्या ज्या सोप्या व गोड कहाण्या बुद्धानें मुमुक्षु जनांस सांगितल्या, ज्या वाक्पांडित्यानें डिमॉस्थेनिस व सिसरो यांनीं सभा हालविल्या, आणि चालत्या राजसत्तेची उलथापालथ केली--या व अशा प्रकारच्या उदात्त गोष्टी आपल्या डोळ्यांपुढें हुकुमी आणून ज्याच्या योगानें मनाला क्षणभर तरी उच्च भावनेंत गुरफटून ठेवितां येते, त्या ग्रंथसंग्रहास परमेश्वराचा प्रतिनिधी म्हटलें असतां फारसें वावगें होणार नाहीं !

जशी भावना तसें फल देणारे ग्रंथाशिवाय दुसरें कोणीहि नाहीं. इतकें असूनहि तुम्ही त्यांना जसें वागवून घ्याल तसें वागण्याइतकी लीनता ग्रंथाच्या अंगीं असते हें वेगळेंच ! अहर्निश अष्टौप्रहर तुमच्या सेवेला अविश्रांत सादर होणारा ग्रंथासारखा दुसरा सेवक तुम्हांला मिळणार नाहीं ! तुम्हीं स्नेही या नात्यानें त्यांना जवळ ओढलें तर ते स्नेह्याप्रमाणें गोड वागतील व सर्वस्वीं निस्पृह असाच सल्ला देतील. शिष्य या नात्यानें तुम्ही त्यांचा आदर केला तरी मानवी गुरूप्रमाणें ते तुम्हांस न शिणवितां व न सतावितां विद्या देतील. प्रतिपक्षी या नात्यानें तुम्हीं त्यांशीं वाद आरंभिला तर तुमच्या जडबुद्धीवर आपली कानस घासून ती सतेज करण्यास किंवा युक्तिवादानें तुम्हांस निरुत्तर करून तुमचा गर्वपरिहार करण्यासहि त्यांची तयारी आहेच. तुमचें अज्ञान कितीहि ढोबळ असलें तरी ते तुम्हांला हंसून खिजविणार नाहींत; किंवा फजित करून तुमचा पाणउताराहि करणार नाहींत ! प्रत्येक मानवी गुरूंत आपल्या प्रिय शिष्यापासूनहि थोडीबहुत विद्या किंवा एखादी तरी गुरुकिल्ली लपवून ठेवण्याची खोड आढळेल. पण ग्रंथाइतका प्रांजळ व निष्कपटी गुरु दुसरा मिळणारच नाहीं. तुम्ही त्यांजपासून शिकलां तर ते तुमच्याजवळ गुरुदक्षिणा मागणार नाहींत; तुम्ही त्यांजविषयीं गुणग्राहकता दाखविली नाहीं तर ते रंजीस होणार नाहींत; किंवा त्यांचे गुण शिकूनहि तुम्ही कृतघ्न बनलां तरी ते एका शब्दानें तुमची कागाळी करणार नाहींत ! जगाच्या इतिहासांत आजवर धर्म, नीति व राजकारण या तिहींच्याहि कल्पनांत मतभेद माजलेला आढळून येतो. परंतु सर्व जगाचें मतैक्य एका बाबतींत आहे; व ती बाब म्हटली म्हणजे ग्रंथ, त्यांचें महत्त्व व त्यांचा उपयोग ही होय.

ग्रंथसंग्रहाची रचना कशी करावी, ते सर्वसाधारण असावें किंवा विशिष्ट भाषेचे अगर विषयांचे असावे वगैरे गोष्टी महत्त्वाच्या आहेत; व यांचा विचार आधुनिक युरोपियन राष्ट्रांनीं जितक्या परमावधीस नेऊन पोहोंचविला आहे तितका तो पूर्वी कधीं तरी पोहोंचला असेल किंवा नाहीं याची मात्र शंका वाटते. तथापि, ही बाब गौण असून ग्रंथसंग्रहांचा फायदा सर्वसाधारण जनतेस जितक्या सुलभ व बिनखर्ची रीतीनें देतां येईल तितका देण्याची तजवीज करणें ही गोष्ट मात्र अत्यंत महत्त्वाची असून ती जेणेंकरून साध्य होईल तें आज आमचें कर्तव्य असलें पाहिजे. इंग्लंडमध्यें ग्रंथसंग्रहालयें व वाचनालयें यांच्या द्वारानें ज्ञानप्रसार करणें हें विश्वविद्यालयाचें एक अंग असेंच मानण्यांत येतें. दुर्दैवानें आमच्या इकडे इतर पुष्कळ गोष्टींप्रमाणें या बाबतींतल्या कर्तव्याची जाणीव विश्वविद्यालयांस आलेली आहे असें दिसत नाहीं. पण जी गोष्ट विश्वविद्यालयें करीत नाहींत ती खाजगी रीतीनें आमची आम्ही करावयास पाहिजे. या दृष्टीनें श्री. सयाजीराव गायकवाड यांनीं जो उपक्रम केला आहे त्याचें आम्हांस महत्त्व वाटतें; व महाराज सरकारांनीं घालून दिलेलें हें उदाहरण इतरत्र अगदींच फुकट जाणार नाहीं, अशीहि आम्ही आशा करतों.

---

# ६८. भाषा--शुद्धीकरणांतील तारतम्य

( सह्याद्री, जानेवारी १९३७ )

गेल्या एक दोन वर्षांत मराठी भाषेच्या शुद्धीकरणाचा वाद बराच आवेगानें झाला. सह्याद्रि मासिकांतून उत्तरें प्रत्युत्तरें झालीं. जळगांव येथील साहित्य संमेलनाच्या प्रसंगीं अध्यक्ष माधवराव पटवर्धन यांनीं तर आपलें सर्व भाषण याच विषयाला वाहिलें. पूर्वीं सह्याद्रींत या विषयाची चर्चा झाली, तेव्हां त्यावर कांहीं लिहावें असें माझ्या मनांत होतेंच. तरी पण आतां, उशीरा कां होईना, या विषयींचे कांहीं विचार थोडक्यांत खालीं देतों.

वादविवाद बिघडविण्याची पहिली कला म्हणजे प्रतिपक्षांनीं एक-

मेकांच्या सिद्धांतांची अतिशयोक्ति करणें, एकमेकांना हास्यास्पद ठरविणें ! भाषाशुद्धीचे कैवारी आणि दूषित मराठी भाषा लिहिणारे कसें लिहितात किंवा लिहितील याचीं अनेक हास्यास्पद उदाहरणें आढळतात. परंतु मला या वादांतील कोणत्याहि पक्षाच्या मतप्रतिपादकाची टवाळी करण्याची इच्छा नाहीं.

विडंबन करणें सोपें आहे. श्री. श्रीपाद कृष्ण कोल्हटकरांनीं पुणें मराठी सा. संमेलनांत एका काल्पनिक शब्दप्रबंधानें सावरकरांचें विडंबन केलें. जळगांवच्या भाषणांत पटवर्धनांनीं ' प्रभात ' पाक्षिकांतल्या एका लघु-कथेंतलेंच उदाहरण देऊन इंग्रजी शब्दमिश्रणाचें विडंबन केलें.

या उदाहरणांविषयीं असें म्हणतां येईल कीं, ती भाषा त्या लघु-कथेंतील एका पात्राच्या तोंडची आहे. स्वतः कथालेखक तसें लिहीत बोलत असेलच असा त्याचा अर्थ नाहीं हें खरें; तथापि समाजांत एरवीहि असें हास्यास्पद बोलणारे लोक असतातच असें सुचविण्याचाच पटवर्धनांचा उद्देश आहे. शिवाजीच्या कालांतील फार्शीमिश्रित मराठीचें विडंबन करा-वयाचें तर तत्कालिन कोणताहि कागद काढून त्यांतला कोणताहि उतारा दिला तरी चालेल. हीं एकांतिक हसूं येण्यासारखीं उदाहरणें अपवादभूत असतात. त्यांचा उपयोग तितकाच कीं मुळांतली दोषविकृति ठळकपणें दिसून यावी.

मला स्मरतें कीं, स्वतः पटवर्धनांच्या काव्यांतील फार्शी शब्दांची दाटी पाहून मी त्यांना एक वेळ हसलों आहें. उलट जळगांवच्या भाषणांत, माझ्या लेखांतील परकीय शब्दांची गर्दी प्रगट करून, मी स्वतः मला हसावें असा योग त्यांनीं आणला. मेकॉलेनें एका निबंधांत म्हटल्याप्रमाणें Man became the serpent and serpent became the man असें हें झालें खरें ! पण त्याकरितां मला त्यांचा राग न येतां त्यांच्या-विषयीं कृतज्ञताच वाटते. कारण येथून पुढें शक्य तितके परकीय शब्द टाळून लिहिण्याचा प्रयत्न मी करूं इच्छितों.

शाळेंत प्रत्येक वर्गांत एक एक मुलगा इतरांकरितां मार खाणारा, ' व्हिपिंग बॉय ' म्हणून असतो. तसा मी पटवर्धनांना उपयोगी पडलों असल्यास मला तें वाईट लागत नाहीं. कारण भाषाशुद्धीचें तत्त्व मला

मान्य आहे; आणि तें जरी शेंकडा शंभर इतकें पाळण्याची कोणी प्रतिज्ञा करूं नये, तरी प्रयत्नानें तें पुष्कळ प्रमाणांत कोणालाहि साधण्यासारखें आहे.

लहान मुलांचा एक खेळ असतो. त्यांत ज्याच्यावर पाळी येईल त्यानें कांहीं क्रमानें नांवें घ्यावयाचीं किंवा शब्द उच्चारावयाचे असतात आणि दुसरा एक मुलगा धोतराला पीळ घातलेला तोबा हातांत घेऊन उभा असतो. त्याचें काम हेंच कीं, पहिल्या मुलानें चूक केली कीं, त्याच्या पाठींत तो तोबा हाणावयाचा. भाषाशुद्धि करण्याचें तत्त्व मान्य करून, शक्य तोंवर शुद्ध मराठी लिहिण्याची सुधारणा जे स्वीकारतील त्यांच्यावर बारीक दृष्टि ठेवून, त्यांच्या चुकांकरितां त्यांच्या पाठींत असलेंच तोबा मारण्याचें काम पटवर्धन यांनीं यापुढें केल्यास त्यांच्या मतप्रसाराचें कार्य थोडेंबहुत यशस्वी होईल असें मला वाटतें. स्वतःपुरतें मी इतकेंच सांगतों कीं, प्रथमपासून वर्तमानपत्राशींच माझा संबंध आला आणि वर्तमानपत्री लेखन हें असें असतें कीं, त्यांत पाठीमागें वाघ लागल्याप्रमाणें लेखकाला आपलें काम उरकून टाकावयाचें असतें. या घाईंत हाताशीं येणारा शब्द समर्पक आहे कीं नाहीं इतकेंच तो पाहतो. तो शब्द देशी कीं विदेशी ही चिकित्सा करीत बसण्याला त्याला वेळ नसतो. भाषादूषणाचा आक्षेप मला स्वतःला बराचसा मान्य आहे; पण तो कसा उत्पन्न होतो, आणि तो दूर करतांना कदाचित् कोणत्या मर्यादा मानणें अवश्य होईल येवढेंच मी सांगणार आहें.

भाषादूषकांचे कांहीं प्रकार खालीलप्रमाणें होतातः—

१ **अज्ञानी**--आपण योजतों ते शब्द परकी आहेत हें मुळांत ज्ञानच नसणारे.

२ **विसरभोळे**—हे ज्ञान असतांहि सहजासहजीं त्या ज्ञानाचा विसर पडणारे.

३ **दुर्बळ**— हे ज्ञान असतां रूढीच्या प्रवाहांत असहायपणें वाहून जाणारे.

४ **उपेक्षाशील**---रूढीच्या प्रवाहांतून तरून जाण्याची शक्ति असणारे पण चालढकल करणारे.

५ **वितंडवादी**—परकी शब्द पदरीं पडले, पचनीं पडले, पवित्र झाले, म्हणणारे.

६ **उपयुक्ततावादी**—ते शब्द पवित्र झाले नाहींत, पण ते कोणत्याहि स्वकीय शब्दांपेक्षां अर्थ अधिक स्पष्टपणें व्यक्त करण्याला उपयोगी पडतात म्हणून निरुपायानें स्वीकारणारे.

७ **कलाप्रेमी**—शब्द परकी खरे, व अर्थ अधिक विशद करण्याचा प्रश्नहि नाहीं; पण त्यांच्या उपयोगानें प्रबंध अधिक रमणीय, शोभिवंत, अलंकृत सुंदर होतो म्हणून स्वीकारणारे.

८ **आक्रमणाकांक्षी**—परकी शब्द जितके अधिक घेतां येतील तितके घ्यावे आणि थोड्याबहुत मराठी-करणाच्या संस्कारानें किंवा सवयीनें ते आपलेसे करून किंवा मानून स्वभाषा अधिक समृद्ध करण्याचा पराक्रम स्वभाषेनें करावा असें म्हणणारे.

केवळ तत्त्वदृष्ट्या सावरकर-पटवर्धन यांचें म्हणणें योग्य आहे. स्वधर्म व स्वदेश यांच्याइतकीच राष्ट्राची स्वभाषेवर भक्ति असली पाहिजे. किंबहुना देश व धर्म यांच्या अभिमानाचें पुष्कळसें कार्य होण्याला भाषा हेंच मुख्य साधन असतें! म्हणून जितक्या सूक्ष्म दृष्टीनें देश व धर्म यांचें हित आपण पाहतों, तितक्याच सूक्ष्म दृष्टीनें भाषेचें हितहि आपण पाहिलें पाहिजे.

आतां भाषेचें हित म्हणजे काय? तर मनांतले विचार व भावना अत्यंत परिणामकारक रीतीनें प्रगट करण्याची शक्ति व पात्रता वाढविणें. ही शक्ति मराठीच्या अंगीं शुद्ध मराठी शब्दच योजून कितपत आणतां येईल? ती आणण्याला इतर भाषांतील शद्बांचें साहाय्य घेणें कितपत अनिवार्य आहे?

सावरकर, पटवर्धन यांचें म्हणणें असें कीं, या कामीं परभाषेचें साहाय्य घेण्याचें कारण नाहीं. प्रतिपक्षीयांचें म्हणणें असें कीं, तें साहाय्य घेणें पुष्कळ कारणांनीं अवश्य ठरतें. तें साहाय्य घेतल्यानें स्वभाषाप्रेमाला गौणता येत नाहीं.

सावरकर—पटवर्धनांचें म्हणणें आपण प्रयत्न करूं तर भाषाविषयांत स्वावलंबी होऊं. उणें पडत असेल तर तें प्रयत्नांत व निश्चयांतच. परभाषेंतील शब्द प्रथम कांहीं रूढ म्हणून घेतले, मग कांहीं अधिक सबळ सार्थ म्हणून घेतले असें करीत गेल्यानें परावलंबीपणाची संवय जडते. उलट जें कार्य होईल तें आपल्या बळावरच करूं अशा निश्चयानें अंग झाडून आपण उद्योगाला लागलों तर सिद्धि ठेवलेलीच.

प्रतिपक्षांचें म्हणणें असें कीं, देश, धर्म यांना संपन्न व सबळ करण्याच्या कामीं विवेक चालवून आपण अवश्य तें परक्यांचें साहाय्य घेतल्यास दूषण लागत नाहीं. तसेंच भाषेच्या कामींहि समजावें. समजा, हिंदुस्थानला शत्रूशीं उद्यां लढावयाचें आहे आणि तो शत्रु अशीं शस्त्रास्त्रें वापरतो कीं तीं आपणांला सिद्ध करतां येत नाहींत. तर आपण काय करूं ? एखादा मित्र देश पाहून त्याकडून द्रव्य देऊन ऋणानुबंध दाखवून, किंवा याचना करून ती मिळवूंच कीं नाहीं ? मुख्य हेतु युद्धांत जय मिळविण्याचा. तो साधला म्हणजे मग त्याचीं साधनें आपण कोठून मिळविलीं याला महत्त्व रहात नाहीं. स्वदेशांत जीं शस्त्रास्त्रें निर्माण होऊं शकतील त्यांनींच युद्ध करूं हें म्हणणें सारासार विचाराला धरून नाहीं. धर्माची गोष्ट घेतली तरी तेंच. निर्गुण पूजा सर्वस्वी स्वावलंबी. पण सगुण पूजा म्हटली म्हणजे तिला साधनसंभार लागतोच. तो संपादितांना आपण परदेशी वस्तूंवर बहिष्कार घालतो कीं सगुण पूजोपचार चांगला सजावा म्हणून जें मिळेल तें घेऊन तो सजवितो ? तीच गोष्ट भाषेची. कांहीं परकीय शब्द अनिर्वाह्य होण्याइतके रूढ झाले आहेत. विचार आणि विचारपद्धति दोन्ही नवीन असल्यामुळें, ती जिकडून आली तिकडून त्यालगत त्यांचे शब्दहि आले आणि आपलें काम सहजासहजीं भागलें किंवा अर्थाचे बारीक भेद, श्लेष व्यक्त करण्याच्या कामीं स्वकीय शब्दांपेक्षां परकीय शब्द निश्चितपणें अधिक समर्थ असे दिसून आले, तर ते शब्द कां न घ्यावे ?

उभय पक्षांचें म्हणणें सूत्ररूपानें मीं मांडलें. त्यांतील योग्यायोग्य ठरवून रोकडा निर्णय देणें फार कठिण आहे. पण इतर कोणावर न्यायाधीश होऊन बसण्यापेक्षां आपल्यापुरतें आत्मनिवेदन-स्पष्टीकरण करणें अधिक बरें.

केवळ ध्येयवादित्वाच्या दृष्टीनें सावरकर-पटवर्धन यांचें म्हणणें मला स्वीकरणीय वाटतें. माझ्या गृहप्रपंचांत मी कांहीं वस्तु परदेशी वापरतों म्हणून शुद्ध स्वदेशीचें तत्त्व मला मान्य नाहीं काय ? नकळत किंवा बुद्ध्या माझ्या प्रपंचांत परकीय असे कांहीं आचारविचार येतात; परंतु तत्साधक असे दुसरे कांहीं शुद्ध स्वदेशी आचारविचार मला जर कोणीं दाखवून दिले तर मी ते त्याज्य मानावे काय ? अधिक अगत्यानें आपली पूर्वीची चूक कबूल करून ते स्वीकारणें योग्य होणार नाहीं काय ? तीच गोष्ट भाषेची.

फार तर अर्थप्रतिपादनाचा हेतु आवरत नाहीं म्हणून वाटेल तसे शब्द नवीन निर्माण करून सावरकरांप्रमाणें मी माझीं वाक्यें दुर्बोध किंवा हास्यास्पद करणार नाहीं. परकीय शब्द योजणें अनिर्वाह्य ठरलें तर निदान माझी तद्विषयक दुर्बलता प्रगट करीन आणि वाचकांची क्षमा मागून मी ते परकीय शब्द लिहीन किंवा बोलेन; म्हणजे हास्यास्पदतेपेक्षां असहाय-तेचा लाजीरवाणेपणा मी अधिक उचित मानीन. यानें तत्त्व संभाळलें जाऊन माझी सर्व नडहि भागेल. स्वभाषेंत प्रगट करतांच येणार नाहीं असा विषय असेल तर तो टाळणें, किंवा अपराधाची जाणीव ठेवून परकीय शब्द योजणें, यांपैकीं वाटेल तें मी करावें आणि करीन. परंतु लाजीरवाणेपणा स्वीकारण्यापेक्षां, हटवादीपणानें परभाषादूषण हें एखाद्या भूषणाप्रमाणें अंगीं लावून घेणें हें मला अधिक लांछनास्पद वाटावें, आणि मी तें करूं नये हें तत्त्वदृष्ट्या योग्य ठरत नाहीं काय ?

करावयाच्याच म्हटल्या तर खालील दोन्ही गोष्टी मला करतां येतात—(१) न कळत, चालढकलीनें, आळसानें, किंवा संवयीनें परकीय शब्द घालून प्रबंध असा सजवावा कीं, वाचकांना तो उत्कृष्ट अभिजात मराठी भाषेचा प्रकार वाटावा. अथवा (२) परभाषादूषणाची जागृति आणि स्वभाषाशुद्धीची आस्था मनांत ठेवून, प्रयत्नानें, कष्टानें शक्य तितके स्वकीय शब्द घालूनच आपलें मनोगत प्रगट करावें. या दोहोंपैकीं पहिली गोष्ट इतरांबरोबर मीहि आजवर करीतच आलों आहें.

परकीय शब्दांचा उपयोग आपल्या पचनीं पडून किती आत्मसात् झाला आहे हें सिद्ध करण्याकरितां पूर्वी एकदां, ठाणें येथील मराठी ग्रंथ-संग्रहालयाच्या वार्षिक समारंभाच्या वेळीं, मी तिसराहि एक प्रकार, पण कुचेष्टा म्हणून केला. शंभर-सवाशें शब्दांचा असा एक प्रबंध रचून मी वाचून दाखविला कीं, त्यांत हिंदुस्थानाबाहेरील देशांतील भाषांचे मिळून सुमारें तीस शब्द होते. चाळीस शब्द उघड उघड संस्कृतोत्पन्न होते. पुढल्या तिसांत शुद्ध मराठी असे माहीत असलेले वीस शब्द होते. उरले दहा संशयित होते. हा प्रबंध सभेला वाचून दाखवून त्यांना सूचक प्रश्न करून मीं असें उत्तर घेतलें कीं, " वाचून दाखविलेल्या प्रबंधाला आम्ही रूढ नागरिक उच्च प्रतीच्या मराठी भाषेचा प्रकार म्हणूं शकतों ! "

हा फसवणुकीचा प्रयोग त्या ठिकाणीं मी कांहीं प्रयोजनाकरितां बुद्धया केला. पण मला नकळत, किंवा संवयीमुळें किंवा नडीमुळें असें धेडगुजरी शब्दमिश्रित वाङ्मय मी गेल्या चाळीस वर्षांत डोंगरभर लिहिलें आहे.

आतां प्रस्तुतचा लेख जो भाषाशुद्धीकरणाच्या वादावर मी लिहीत आहें तो वर सांगितल्यापैकीं दुसरा प्रकार होय. तो असा. हा लेख लिहितांना कांहीं थोडा प्रयत्न केल्यानें, मला वाटतें, मला असा लेख लिहितां आला आहे कीं, माधवराव पटवर्धन हे त्यांतील एकाहि शब्दाला दूषण ठेवणार नाहींत; आणि तितक्यापुरतें तरी स्वभाषादूषकांच्या मालेंतून माझें नांव वगळतील. जी गोष्ट माझी, तीच इतर अनेक लेखकांचीहि मी समजतों. म्हणजे त्यांनीं थोडा प्रयत्न केल्यास त्यांनाहि असें निरपवाद लिहितां येईल. स्वतः माधवराव पटवर्धनांचें अध्यक्षीय भाषण वाचून पाहतां, शुद्ध स्वदेशी शब्द घालण्याच्या आग्रहानेंहि ते सहसा कोठें दुर्बोध किंवा हास्यास्पद झालें आहे असें मला वाटत नाहीं.

उद्यां महाराष्ट्र हा स्वातंत्र्यप्राप्तीकरितां युद्धाला निघाला आणि त्याला विदेशी असा शस्त्रास्त्र-संभार उपयोजावा लागला तर तेव्हां कोण नांवें ठेवील ? किंवा आज सर्व नगरभर विद्युत्प्रकाश खेळत असतां मी पणती किंवा समई लावून वाचीत बसणार नाहीं. मग मला कोणी विदेशी वस्तूंना आश्रय देणारा म्हटलें तरी चालेल. याचा अर्थ ( १ ) असे कांहीं प्रसंग असतात कीं, तेव्हां विदेशी वस्तु उपयोगिल्या तरी कोणी आपणास नांवेंच ठेवणार नाहीं. किंवा ( २ ) दुसरे असे कांहीं प्रसंग असतात कीं, तशीं नांवें कोणीं ठेवलीं तरी तिकडे लक्ष न देतां व्यवहारदृष्टीनें आपल्या मनचेंच आपण करूं. पण या दोन्ही उदाहरणांनीं स्वदेशीव्रताच्या ‘ तत्त्वप्रतिपादना-’ ला विरोध होऊं शकत नाहीं. पटवर्धनांचे कित्येक आक्षेपक, माझ्या दुसऱ्या उदाहरणाप्रमाणें वागून, “ आपल्या नडीचा निर्वाह कसा तरी करतों झालें ” असें म्हणत नाहींत; उलट मुळांत पटवर्धनांच्या तत्त्वालाच विरोध करतात, तें मात्र तितकेंसें योग्य आहे असें मला वाटत नाहीं. तत्त्वप्रतिपादन करून स्वतः त्याप्रमाणें आचरण करणें, ही स्वभाषेची दुहेरी उपासना पटवर्धनांना जर साध्य होऊं शकते, तर आम्हां इतर लेखकांना

ती साध्य कां होऊं नये ! म्हणजे येथें जागृतीची व प्रयत्नांची उणीव आहे असेंच बहुशः म्हणावें लागेल.

आतां ' बहुशः ' हा शब्द वापरून मी कांहीं कानाकोपरा स्वाधीन ठेवला आहे हें उघड होय आणि तोहि सांगून टाकतों. भाषेंतील उचित शब्दांची नड प्रयत्नानें भरून काढावी हें मला मान्य असलें तरी संदर्भा-मुळें, विषयाच्या औचित्यामुळें, सूक्ष्म श्लेष व भेद प्रगट करण्याच्या शक्ती-मुळें, कित्येक वेळां परकी शब्दांचा उपयोग टाळणें हें फार कठिण होईल. अशा वेळीं सहज मिळणारें किंवा उपयुक्त वाटणारें परभाषेचें साहाय्य स्वीकारण्याचा मोह दुस्तर होईल. पण ही गोष्ट मी नडीमुळें म्हणूनच बुद्धया करीत आहें; इतकी तरी जागृति व जाणीव मनाला राहिली तर ती पुरे असें मी म्हणेन.

परभाषादूषण टाकण्याकरितां नवीन शब्द संस्कृताधारें निर्माण केले असतां त्यांतले कित्येक जवळ जवळ निरुपयोगी ठरतात. तसे शब्द योज-ण्याचा आग्रह आपण सर्वजण, निश्चयानें कट करून, पांचपंचवीस वर्षें टिकवून धरूं तर उत्तमच. त्या आग्रहांतून नवा संकेत निर्माण होईल आणि अशा यशस्वी संकेतानेंच स्थिरपद अर्थप्रवृत्ति होते. पण या नव्या युगांत नवें ज्ञानविज्ञान इतकें त्वरित निर्माण होत आहे कीं, तें हस्तगत करावयाचें तर योग्य स्वकीय शब्दांकरतां अडून बसून चालणार नाहीं. जुने फारशी, अरबी शब्द जसे राजकीय कारणानें पूर्वी मराठी भाषेंत घुसले तसे यापुढें आंग्ल किंवा युरोपीय शब्द सांस्कृतिक कारणांनीं मराठी भाषेंत घुसण्याचा संभव आहे.

ग्रामिक जनतेशीं बोलणें–चालणें अधिक एकजीवतेनें करण्याकरितां, पटवर्धन म्हणतात त्याप्रमाणें, जनतेच्या स्मरणांतून नष्ट झालेले जुने शब्द पुढें आणले तर ते फारसे उपयोगी पडतील असें मला वाटत नाहीं. आजची ग्राम्य भाषा प्राचीन मराठी भाषेला अधिक जवळ आणि धरून असली तरी त्याचें हें प्रमाण थोडें आहे. म्हणून शोभतील असे जुने मराठी किंवा नवे संस्कृत शब्द न मिळाल्यास, अवश्य त्या इंग्रजी, युरो-पियन शब्दांचा उपयोग करण्याला आपण माघार घेऊं नये असें मला वाटतें. तसें न केलें तर, ' व्यापक दृष्टि न ठेवतां आपलेंच म्हणून त्याला

कवटाळून बसण्याचा ' जो जुना दोष जळगांवच्या भाषणांत पटवर्धनांनीं महाराष्ट्रियांना लावला तोच आम्हाला पुढेंहि लागेल.

स्वकीय व परकीय शब्दांच्या उपयोगाविषयीं निश्चित विवेक करणें कठिण आहे हें पटर्धनहि मान्य करतात आणि तें कसें खरें आहे हें स्पष्ट करण्याकरितां मी खालील रूपकाची योजना गमतीनें करतों--

मी एकदां वस्त्रभांडारांत गेलों. हिंडून पाहतों तों त्यांतील प्रत्येक दुकानावर ' स्वदेशी कापडाचें दुकान ' अशी पाटी लागलेली आढळली ! तथापि त्यांत काय काय पदार्थ मिळतात हें पाहावें म्हणून चार पांच दुकानांत शिरून सूक्ष्म अवलोकन केलें तेव्हां खालील प्रकार आढळला.

१. पहिल्या दुकानांत समोरच एका अंगाला गिरणीच्या कापडाचे पांच चार तागे असून त्या सर्वांच्या डोक्यावर दोन तागे हातसुताच्या खादीचे होते. पण आंतबाहेर सर्व दुकानभर शुद्ध विलायती कापडांचे तागेच नव्हे तर गठ्ठयांवर गठ्ठे रचले होते ! तेव्हां मी दुकानदाराला म्हणालों "शेंकडा ९८ प्रमाणांत विलायती कापड असतांना तुम्ही दुकानावर ' स्वदेशी कापडाचें दुकान ' म्हणून पाटी कशी लावतां ? " दुकानदार हासून म्हणाला " मी शुद्ध स्वदेशी कापडावर बहिष्कार घालणारा नाहीं, घातलेला नाहीं, हें पलीकडच्या त्या गिरणीकापडाच्या डोक्यावर दिसणाऱ्या खादीच्या ताग्यांवरून तुम्हांला दिसत नाहीं काय ? " मी म्हणालों " खरेंच कीं ! " आणि बाहेर पडलों.

२. नंतर मी दुसऱ्या दुकानांत शिरलों. तेथें पहातों तों निःपक्षपातीपणानें जितकें स्वदेशी तितकेंच विदेशी कापड तेथें ठेवलें होतें. मी म्हणालों " इतकें विदेशी कापड ठेवून तुम्ही याला 'स्वदेशी' कापडाचें दुकान म्हणतां तें कसें ? " दुकानदार म्हणाला, "नियम सांगावा लागत नाहीं. अपवाद सांगावा लागतो. आजकाल कापड-बाजारांत विदेशी कापड असावयाचें हा नियमच आहे आणि माझ्या दुकानीं सर्वच विदेशी कापड असतें तर मीं त्यावर विलायती कापडाचें दुकान म्हणून पाटी लावली असती. पण विलायती कापडाबरोबरीनें मी स्वदेशीहि ठेवतों. एतदर्थ तो अपवाद लोकांच्या नजरेला ठळकपणें पडावा म्हणून मीं तशी फळी लाविली आहे. मी निःपक्षपाती व्यापारी-दृष्टीचा मनुष्य आहें. मी स्वतः

स्वदेशीचा अभिमान मिरवीत नाहीं किंवा लोकांना तो नाहीं म्हणून त्यांना लाजवीत नाहीं. गिऱ्हाईक आलें म्हणजे त्यानें स्वदेशी, विदेशी कोणतेंहि कापड आपल्या इच्छेप्रमाणें मागावें, आणि तो मागेल तें द्यावें इतकेंच मी जाणतों." मी म्हणालों, "खरें आहे!" आणि बाहेर पडलों.

३. तिसऱ्या एका दुकानांत गेलों, तेथें बहुतेक सर्व कापड देशी गिरण्यांचें व कांहीं खादीचें असें होतें. पण त्यांतच एका बाजूला एक मोठें कांचेचें कपाट ठेवलेलें असून त्यांत विलायती फ्लॅनेल, सर्ज, शर्टिंग, कोटाचें कापड, स्वेटर, मफलर वगैरे वस्तु ठेवलेल्या होत्या; आणि या कपाटावर 'विलायती कापड' अशीं अक्षरें पांढऱ्या रंगानें लिहिलीं होतीं. मी म्हणालों "हें कपाट दुकानांत ठेवून बाहेर स्वदेशी कापडाचें अशी पाटी लावतां हें कसें?" दुकानदार म्हणाला "नव्वद टक्के माल स्वदेशी आहे ना? मग फक्त दहा टक्के विलायती कापड ठेवल्यानें स्वदेशी कापडाचें दुकान या नांवाला बाट कसा येतो? स्वदेशी कापड घेणारालाहि थोड्याशा विलायती कापडाची नड असतेच, पण त्याकरितां दुकानांत आलेलें गिऱ्हाइक बाहेर दडवणें धंद्याच्या दृष्टीनें बरें नव्हे." मी म्हणालों "खरें आहे!" आणि बाहेर पडलों.

४. नंतर चवथ्या दुकानांत गेलों. तेथें पाहतों तों स्वदेशी, विदेशी सर्व प्रकारचें कापड, कांहीं भेद न करतां, सरमिसळ एकत्र ठेवलें होतें. तें पाहून मी म्हणालों, "तुम्ही स्वदेशी विदेशी मालांत कांहींच फरक करीत नाहीं असें दिसतें; आणि पाटीवर तर लिहितां कीं स्वदेशी कापडाचें दुकान, हें कसें?" दुकानदार म्हणाला "मनाची प्रवृत्ति आणि आवड खरी कीं स्वदेशी कापडाचाच धंदा करावा. पण स्वदेशी कशाला म्हणावें हें कोणीच शपथेवर सांगत नाहीं. आमच्या नगरांतलें 'स्वदेशी-प्रचार-मंडळ' बिचारें आज पांच वर्षें 'स्वदेशी' या शब्दाची व्याख्या ठरवीत आहे! कॉंग्रेसनें नेमलेल्या कमिटयांचीहि तीच गत. मालाची निपज होण्याचें ठिकाण, कारखान्यांत घातलेलें देशी-विदेशी भांडवल, कारखान्यांतील कामगारांची जात (म्हणजे देशी कीं विदेशी?) असल्या गोष्टींची छाननी अर्थशास्त्रज्ञांनीं करावी. आम्हांला काय कळणार? कोणी म्हणतो सूत विदेशी असलें पण कारखानदार स्वदेशी असला तरी

चालतें. कोणी म्हणतो रेशीम म्हटलें म्हणजे स्वदेशी कीं विदेशी हा प्रश्नच विचारावयाचा नाहीं. ' खादी ' ही शुद्ध म्हणावी तर गिरणीवाले खादी नांवाचें कापड काढतात. खादी स्वदेशी म्हणावी तर चरख्यांतील, मागांतील लोखंडी सामान सर्व परदेशी असते. सगळें कापड स्वदेशी असलें तरी कापड शिवण्याचा दोरा विदेशीच असतो. मग स्वदेशी गिरण्यांतील यंत्रें तर विदेशी मालच होय हें सांगावयास नको. तात्पर्य, स्वदेशी विदेशी यांतील खरा भेद कोणीहि सांगूं शकत नाहीं. स्वदेशीची व्याख्या हा अर्थशास्त्र्यांच्या अहंकाराचा खेळ आणि राष्ट्रीयसभेंतील कुटिलांचें कपट होवून बसलें आहे. या गोंधळांतून माझ्यासारख्याला कसें पार पडतां येईल ? मी कांहीं कारखानदार नाहीं. होईल तेवढें स्वदेशी कापड घ्यावें विकावें एवढी प्रामाणिक बुद्धि ठेवून स्वतःची दृष्टि चालेल तसा माल घेतों आणि विकतों. तुम्ही दुकानाच्या पाटीवर पाहिलीं तीं अक्षरें आंतील कपड्याच्या जातीविषयीं साक्ष देवूं शकतात, त्यापेक्षां माझ्या खऱ्या मनाची व हेतूची साक्ष ती अधिक देतात असेंच तुम्ही समजा ना ! " मी म्हणालों, " खरें आहे ! " आणि बाहेर पडलों.

५. नंतर एका दुकानांत गेलों त्यावर ' शुद्ध खादीचें दुकान ' असें लिहिलें होतें. दुकानदार नखशिखांत ' परीटघडी'च्या खादीचे कपडे घातलेला होता. मी त्याला म्हणालों, " एवढें मोठें नगर आणि त्यांत शुद्ध स्वदेशी कापडाचें एवढें लहानसें दुकान ? " तो म्हणाला, " लोकांची आवड द्वाड. खरे स्वदेशीचे भक्त किती थोडे असतात. त्याला काय करावें ? इकडून लोक जातात तेव्हां एखाद्या देवळाकडे पूज्य बुद्धीनें आदरभावानें पाहावें त्याप्रमाणें या दुकानाकडे पाहतात. पण फारच थोडे आंत येतात, आणि जे आंत येतात त्यांच्याहि अंगावर पाहावें तों नुसताच खादी कपडा असतो असें नाहीं. कित्येक लोक तर येथें दोन वार खादी विकत घेवून सर्व हिंदुस्थानावर मोठा उपकार केल्याचा आव घालतात ! " मी म्हणालों, " खरें आहे ! "

पण इतक्यांत मौज अशी झाली कीं, एक गृहस्थ हातांत खादीचा एक तागा घेवून दुकानांत आला. त्यानें खिशांतून त्या कापडाचें बिल आणि तळहाताएवढें सूक्ष्मदर्शक यंत्र बाहेर काढलें. आणि तणतणून म्हणूं



लागला कीं, "घ्या ही तुमची तलम आंध्र खादी परत! आणि बिलाचे पैसे परत टाका! शुद्ध स्वदेशी कापडाच्या नांवानें दुकान घालून भोळ्या गिऱ्हाइकांना फसवितां. तेव्हां हें पाप कुठें फेडाल?" दुकानदार म्हणाला, "मला कां बोलता? कॉंग्रेसच्या खादी इन्स्पेक्टरानें या दुकानांतील कापडाला जें प्रशस्तिपत्र दिलें आहे, तें त्या सोनेरी चौकटींत लावलें आहे पाहा." गिऱ्हाईक म्हणालें, 'तें नका मला दाखवूं. पण या सूक्ष्मदर्शक यंत्रांतून या खादीकडे पाहा म्हणजे कळून येईल कीं, हें सूत सूक्ष्म विलायती आहे कीं हात रहाटावर टकळीवर काढलेलें भरड आहे?" दुकानदार टंगळमंगळ करूं लागला. तेव्हां मला तें कापड त्या काचेंतून दाखवून तो घेवारी म्हणाला, "बोलाना मी म्हणतों तें खरें आहे किंवा नाहीं?" मी यत्रांतून कापडाचे धागे नीट पाहून म्हणालों, 'खरें आहे' आणि असे पांचव्यांदा 'खरें आहे' म्हणून दुकानांतून बाहेर पडतांना माझें मलाच हसूं आलें!

वर सांगितलेल्या घेवाऱ्यादेवाऱ्यांत संक्रमित झालेले, भाषाशुद्धीच्या वादांतील कोणकोण वादी प्रतिवादी ओळखून घ्यावें हें चाणाक्ष वाचक स्वतःच करूं शकतील असें मला वाटतें.

असो; परकेशब्द कशा प्रकारचे कशा स्थितींत घातले तरी चालतील यासंबंधीं या वादांत सावरकर-पटवर्धन पक्षाचा स्पष्ट व विधायक खुलासा झालेला माझे पहाण्यांत नाहीं, कदाचित् तो झालेला असून माझ्या वाचण्यांत आला नसेल तर तो दोष माझा आहे. भाषाशुद्धीचें तत्त्व मान्य करणारांपैकीं मी असून तें शक्यतोंवर व्यवहारांत उतरविण्याची तत्परता यापुढें मी ठेवणार आहे. मात्र माझें जेथें खरोखर अडतें असें वाटेल तेथें आपद्धर्म म्हणून मी परकी शब्द योजण्यास कमी करणार नाहीं. कांहीं पूर्वपरिचित अशा शब्दांनीं माझ्या मनोवृत्तीचें वर्णन करावयाचें तर मी म्हणेन कीं या कामीं मी तत्त्वनिष्ठ तथापि व्यवहार-प्रेमी, उपयुक्ततावादी 'परिवर्तनी आहे. ही माझी भूमिका स्पष्ट केल्यावर, मी कोणते परकी शब्द घातले असतां सावरकर-पटवर्धनांच्या मतें दोषी होणार नाहीं याविषयीं गमक म्हणून, त्यांनींच सूत्र-रूपानें किंवा उदाहरणें देऊन मला सहाय्य करावें, अशी मागणी करण्याचा अधिकार मला प्राप्त होतो असें वाटतें.

त्यांच्या राज्यांत राहण्या-नांदण्याला मी सिद्ध झालों तर मी माझी वस्ती कोठें कशी करावी याविषयीं त्यांनीं मला मार्गदर्शक झालेंच पाहिजे. जळगांव येथील अध्यक्षीय भाषणांत ज्या माझ्या शब्द-योजनेला पटवर्धनांनीं आक्षेप घेतला त्यांतील अनेक मी मान्य करतों. आणि ते आक्षित शब्द यापुढें माझ्या लेखनांत सहसा येणार नाहींत हें त्यांच्या निदर्शनास यापुढें येईलहि. पण त्याच भाषणांत उल्लेखिलेले, उदाहरणार्थ 'कमी' 'जर्मान' इ. इतर कांहीं शब्द योजनेचा मोह मलाहि आवरत नाहीं, हें मी त्यांना प्रांजलपणें सांगूं इच्छितों. या माझ्या ग्राह्याग्राह्यविवेकानें माझी मनोभूमिका पटवर्धनांच्या लक्षांत येईल. म्हणून त्याच दृष्टीनें तो विवेक आणखी कसा वाढवावा याविषयीं ते कांहीं विधायक सूचना करतील, विशेषतः उदाहरणें देतील, तर बरें होईल.

दुसरी एक गोष्ट सांगणें जरूर आहे. ती अशी. देश व धर्म यांच्या पंक्तीला पटवर्धन यांनीं भाषेला बसविलें आहे. तेव्हां भाषा–दूषकांवर आक्षेप घेण्याचा त्यांचा अधिकार जसा मी मान्य करतों, तसा देश आणि धर्म यासंबंधींच्या कार्यांत स्वतः पटवर्धन हे दोषी आहेत असें ठरवूं पाहणाऱ्या इतर कोणाचा अधिकार ते मान्य करतील काय ? ते देशाभिमान व हिंदुधर्म यांची कोणती व्याख्या मान्य करतात ? त्या व्याख्येला सोडून असणाऱ्या ज्या कांहीं गोष्टी पटवर्धन करीत असतील त्यांविषयीं पुनर्विचार करण्याला, म्हणजे तत्त्वनिष्ठा म्हणून त्या यापुढें सोडण्याला, ते सिद्ध होतील काय ? उदाहरणार्थ, पाटलोणीपेक्षां धोतर हें शुद्ध महाराष्ट्रीय आचाराचें चिन्ह म्हणून सापेक्षतेनें तरी मानलें जाईल असें वाटतें. आणि अशा गोष्टी सापेक्षतेनेंच ठरवाव्या लागतील हें उघड आहे. जी गोष्ट कमरेखालच्या वस्त्राची तीच उपवस्त्राची व शिरोभूषणाची ठरेल. अर्थात् मी स्वत: नेहमीं धोतर नेसतों म्हणून पटवर्धन यांनींहि यापुढें धोतर नेसत जावें असें मी बंधुभावानें किंवा महाराष्ट्रभक्तीच्या आस्थेनें त्यांना सुचविलें तर ते काय म्हणतील, हें जाणण्याची माझी इच्छा आहे. आमच्या बापूजी अण्यांचाहि महाराष्ट्रीय वस्त्रोपवस्त्राविषयीं व शिरोभूषणाविषयीं असाच आग्रह असतो. त्यांना पटवर्धन काय उत्तर देतील !

हे प्रश्न मी पटवर्धनांना अडवून हास्यास्पद करण्याकरितां विचारीत





नाहीं, तर प्रांजल विचारविनिमय व्हावा म्हणून विचारतों. कारण त्यांचें भाषाशुद्धींतील मुख्य तत्त्व मी मान्य केलें म्हणजे मग तें तत्त्व स्वतःला बंधनकारक मानतांना ते किती खोल किंवा दूरवर जाऊं इच्छितात, आणि भाषादूषकांना कोणत्या आपद्धर्माविषयीं अनुज्ञा देण्याला ते सिद्ध आहेत, हें त्यांना कोणी कां विचारूं नये ? स्वधर्म व स्वदेश यांच्या अभिमानानें दुसऱ्याचे दोष काढण्याला जो प्रवृत्त होतो, त्याच्या स्वतःच्या वर्तनाचें सूक्ष्म दर्शनच नव्हे तर छिद्रान्वेषणहि प्रतिपक्षाकडून होणारच ! मात्र हें सर्व करावयाचें तें परस्परांच्या निंदाबुद्धीनें करावयाचें नसून, उभयतांना साधारण व मान्य असें जें तत्त्व त्याचें प्रत्यक्ष कार्य शक्य तितकें भरपूर पदरीं पाडून घेण्याच्या सद्भावनेनेंच करावयाचें असतें. म्हणून धर्मतत्त्व-ज्ञानापेक्षां आपद्धर्माच्या ज्ञानाची चिकित्सा, विद्यमान काळीं किंवा इतर कोणत्याहि युगांत, अधिक श्रेयस्कर ठरली असेल असें मला वाटतें.

देश व धर्म यांच्याशीं तुल्यतेनें भाषेंतील स्वाभिमानाचा विचार पटवर्धन यांनीं केला. परंतु माझ्यामतें भाषाशुद्धि ही, म्हटली तर, देशाभिमान धर्माभिमान यांपेक्षांहि अधिक सुलभ व व्यवहार्य अशी गोष्ट आहे. देशाच्या दृष्टीनें पूर्ण स्वातंत्र्य इष्ट. परंतु परकीय सरकारला जोंपर्यंत स्वदेशांतून घालवून देतां येत नाहीं तोंपर्यंत मनांत स्वातंत्र्यप्रियता संभाळली तरी व्यवहारांत तिला पुष्कळच मर्यादा घालावी लागते. आर्थिक व्यवहारांतील स्वदेशीव्रताचीहि तीच गोष्ट होय. कारण सुई टांचणी आणि साधा शिव-ण्याचा दोरा येथपर्यंत देशाचें परावलंबित्व असल्यामुळें, मी सोळा आणे स्वदेशीव्रत आचरितों असें कोणालाहि प्रतिज्ञापूर्वक म्हणतां येणार नाहीं. फार तर आण्याभराचें टकळीवरील हातभर सूत ज्या उपदेशांतून निर्माण होण्याचा अधिकांत अधिक संभव, तो उपदेश करण्याकरितां पांच हजार रुपयांच्या मोटारींत बसून एक रुपयाचें खनिज तेल खर्चणारे उत्साही प्रचारक तुम्हीं आम्हीं पाहिले नाहींत काय ? धर्माचाराचीहि गोष्ट या युगांत तीच झाली आहे. मुंबईच्या चाळींत कारकून मुलाकडे राहणारा थेट कोकणचा सनातनी वैदिक बाप आपला नैष्ठिक आचार कितीसा संभाळूं शकेल ! पण यापेक्षां भाषाव्यवहारांत मी अमूकच एक शब्द

घालीन, दुसरा घालणार नाहीं, असा निश्चय कोणीं केल्यास तो अधिक यशस्वी होण्याचा संभव आहे. कारण मराठी भाषेच्या व्यवहारांत केवळ महाराष्ट्रीय समाजापलीकडे इतर कोणाशीं संबंध येत नाहीं. आपल्या मराठी वाचकाला कळलें म्हणजे काम भागतें. इतकीच नड येथें भागविण्याची असते. ग्रंथलेखकाला शब्दचिकित्सा करण्याला हवा तितका वेळ असतोच. आणि बोलतांना शब्द नडला तर अंगविक्षेपानें ती उणीव भरून काढतां येते ! मुकीं माणसें जर आपलें मनोगत इतरांना कळवूं शकतात तर एखाद्या शब्दाची नड संभाळून बोलणाराला आपलें मनोगत सहज प्रगट करतां येणार नाहीं काय ?

तात्पर्य, धर्म व देश यांच्या तुलनेवर आधारलेला पटवर्धनांचा युक्तिवाद मला सर्वच्या सर्व पटण्यासारखा नसला तरी, तो वरीलप्रमाणें त्यांच्याहि पुढें नेऊन दाखवतां येईल. मात्र यांत तत्त्वाचा उघडच अतिरेक होतो. आणि एकंदरीनें पाहतां पटवर्धनांना तो झेपलेला नाहीं असेंहि मला वाटतें.

धर्माचें उदाहरण घेतांना पटवर्धनांनीं समाजसत्तावादी क्रांतिकारकांना धर्मवेडे म्हणण्याइतके धर्मनिष्ठ ठरविलें आहे ! पण भाषादूषक म्हटल्या जाणाऱ्या लोकांनींहि मराठी किंवा इतर कोणतीहि भाषा हें फक्त साधन आणि अर्थनिष्पत्ति हें साध्य असें म्हणून हें उच्चतर ध्येय साधण्याकरतां मराठी भाषेचें शुद्धत्व गौण मानलें, तर पटवर्धन त्यांना काय म्हणतील ? पटवर्धन यांनीं स्वीकारलेल्या सांघिक जीवनाचें ध्येयहि कदाचित् त्यांचें त्यांनाच नडणारें आहे. स्नेहीसंवगडी, आप्तस्वकीय, विशेषत: पूर्वजांची संस्कृति यांचें समांतर उदाहरण म्हणून घेतलें तर बूटपाटलोण, टोपी, मिश्रविवाह इत्यादि सामाजिक धार्मिक सुधारणांचें काय होणार ? "ज्या स्वराज्यांत व्यक्तीच्या पराक्रमाला वाव नसेल तें स्वराज्यच नव्हे" असें पटवर्धन म्हणतात. मग मराठी भाषेचें स्वराज्य संभाळून तें वाढविण्याकरतां परकीय शब्द प्रथम अंगावर घेऊन नंतर जिंकून ते आपलेसे किंवा आत्मसात करूं पाहणाऱ्यांच्या पराक्रमशाली महाराष्ट्र भाषावीरांच्या पराक्रमवादित्वाला पटवर्धन काय उत्तर देणार? पूर्वजांचें उदाहरण देतांना ज्ञानेश्वराचें नांव पटवर्धनांनीं घेतलें आहे. स्वत: ज्ञानेश्वरींतील किती शब्द परकीय असतील याचा कांहीं विचार पटवर्धनांनीं केला आहे काय ?

ज्ञानेश्वरीपूर्वीच्या सातशें वर्षांतील परकी शब्द ज्ञानेश्वरांनीं स्वीकारले म्हणून जर ते मराठी, तर अलीकडील निबंधमालाकार चिपळूणकर व रहस्यकार टिळक यांनीं गेल्या सातशें वर्षांतील जे परकीय शब्द स्वीकारले असतील ते पटवर्धनांनीं त्याज्य ठरवून काय उपयोग ? पवित्र गीतेवरील भाष्यांत टिळकांनीं परकीय शब्दांचा विटाळ मानला नाहीं. पण ते तो कसा मानणार ? कारण ज्या वेदऋचांत कांहीं परकी शब्द आल्याचें टिळकांनीं सिद्ध केलें आहे त्या वेदऋचा त्यांनीं अपवित्र मानल्या नाहींत ! किंबहुना वेद प्रत्यक्ष ईश्वरप्रणीत न म्हणतांहि, अनादि या शब्दांतून ईश्वरप्रणीतत्व जितकें निघतें तितकें वेदांविषयीं त्यांनीं मान्य केल्याचा भास उत्पन्न केला आहे. शिवछत्रपतींच्या पराक्रमाचें उदाहरण देतांनाहि पटवर्धनांनीं थोडा अधिक विचार करावयास हवा होता. कारण महाराजांचा राजकीय व क्षात्र पराक्रम मान्य असला तरी, त्यांच्या परभाषादूषणाचें समर्थन पटवर्धनांना करतां येणार नाहीं. मग तें भाषादूषण आज पोतदारांनीं इष्ट आणि पराक्रमस्वरूप मानलें तर त्यांना नांवें कशीं ठेवतां येतील ?

असो. पटवर्धनांचा अध्यक्षीय लेख वाचतांना त्यांतील युक्तिवादाचे कांहीं दुर्बळ सांधे मला दिसले ते मी दाखविण्याचा अशा रीतीनें यत्न केला आहे. परंतु एकंदरीनें त्यांचें भाषाशुद्धीचें 'तत्त्व' मान्य करण्याला चिंता वाटत नाहीं. मात्र त्यांनीं लक्षांत ठेवावें कीं, तत्त्वांत त्यांनीं जिंकलें तरी 'तपशिलां'त त्यांना बरीच हार खावी लागेल !

---

## ६९. 'टिळकचरित्रां'तील शुद्धलेखन

( 'महाराष्ट्र' नागपूर )

माझे मित्र रा. माडखोलकर यांनीं तारीख ४ मार्चच्या 'महाराष्ट्रा'च्या अंकांत वरील विषयावर एक लेख लिहिला आहे. हा लेख लिहून त्यांनीं या विषयाची चर्चा सुरू केली याबद्दल मी त्यांचे आभार मानतों. आणि, लेखाला केवळ उत्तर म्हणून नव्हे, तर या विषयावरील माझे

आजचे विचार काय आहेत, हे संक्षेपतः मराठी वाचकांपुढें ठेवण्याकरितां हा लेख आपल्या पत्रांत प्रसिद्ध व्हावा म्हणून पाठवीत आहे. तरी तो प्रसिद्ध करण्याची कृपा करावी.

मुख्य मुद्याचें विवेचन करण्यापूर्वी एक गोष्ट सांगणें अवश्य आहे. ती ही कीं, टिळकचरित्रग्रंथांत नवी पद्धति अंगिकारल्यामुळें पुष्कळच अनुस्वार घालावयाचे सोडले आहेत; पण त्याबरोबर माझ्या मनांत नसतांहि अनेक अनुस्वार गाळले गेले आहेत. त्याचें कारण हस्तदोष किंवा मुद्रणदोष. ग्रंथ छापावयास दिला तेव्हां मुद्रण–महाशयांना मी प्रथमच सांगून टाकलें कीं, कंपॉझिटर लोकांनीं सहसा अनुस्वाराच्या घरांत हातच घालूं नये; आणि मी प्रुफांत जे अनुस्वार मुद्दाम घालीन तेवढेच त्यांनीं प्रुफ–दुरुस्ती करतांना घालावे. असें केल्याशिवाय गत्यंतर नव्हतें. कारण नेहमींच्या पद्धतीनें त्यांनीं अनुस्वार घातले असते ( आणि तसे ते मूळच्या प्रतींत लेखकांनीं घातलेहि होते ) तर प्रुफांत फारच दुरुस्त्या दरओळीगणीक कराव्या लागल्या असत्या, म्हणून हा गोंधळ व ही मेहनत टाळण्याकरितां वरील सूचना मी प्रथमच देऊन ठेवली होती. तरी हाताची रोजची संवय कशी जाणार ? म्हणून कांहीं प्रुफांतून पूर्वींच्या पद्धतीप्रमाणें अनुस्वार कंपोज होऊन येत. त्याचप्रमाणें ही विशेष सावधगिरी राखल्यामुळें जे अनुस्वार उच्चारित असल्यामुळें सहजच दिले जावे असेहि पुष्कळ अनुस्वार गळत; पण या माझ्या नव्या हौसेचा उपद्रव कंपॉझिटर लोकांना झाला तसा मलाहि झाला; कारण माझ्या तरी हाताची संवय कोठें गेली होती ? पण प्रयोग नवा होता म्हणून तो सर्वांनाच कौतुकाचा विषय झाला; आणि हौसेमुळें मीं माझा त्रास मानला नाहीं. सांगण्याचें तात्पर्य इतकेंच कीं, रा० माडखोलकर यांच्या पाहण्यांत अनुस्वार वगळण्याच्या ज्या चुका असतील त्यांतील कांहीं चुका खऱ्या नव्हत. त्याचबरोबर दुसऱ्याहि एका गोष्टीचा उल्लेख करावयाचा ती अशी कीं, ऐच्छिकरीत्या मुद्दाम मीं अनुस्वार गाळल्यामुळें ज्या वाक्यांत विपरीतपणा रा० माडखोलकर यांना आढळला त्याचीं त्यांनीं कांहीं निवडक उदाहरणें दिलीं असतीं तर मला त्यांच्या टीकेला उत्तर देण्याला अधिक साहाय्य झालें असतें. माझी विनंती इतकीच कीं माझ्या हातून अनुस्वाराच्या बाबतींत वाळल्याबरोबर ओलेंहि जसें कांहीं जळलें गेलें असेल तसेंच

वाचकांनीं व टीकाकारांनीं वाळल्याबरोबर ओलें जाळूं नये. मुद्दाम गाळलेले अनुस्वार कोणते व सहज चुकीनें राहिलेले कोणते याचा विवेक त्यांनीं करावा व तो त्यांना सहज करतां येईल.

रा० माडखोलकर यांच्या लेखांतील मुख्य आक्षेप असा आहे कीं, या माझ्या नव्या योजनेप्रमाणें लेखनपद्धति उच्चारानुसारी असावी हें तत्त्व डोकें वर काढतें. वास्तविक या तत्त्वांत फारशी चूक आहे असें मला तरी वाटत नाहीं. तें तत्त्व अमलांत येण्याला अडचणी असतील व पुष्कळशा मला माहितहि आहेत. तथापि लेखन हें उच्चाराप्रमाणें असावें असें कोणीं सामान्य विधान केलें, तर त्यात चूक नाहीं असें मला वाटतें. पण हा विषय व्यापक असल्यामुळें त्याची चर्चा मी करीत नाहीं. फक्त अनुस्वारापुरतें लिहितों. अनुस्वार हा शब्दहि मी रूढ अर्थानें वापरीत आहे. स्पष्ट उच्चारित जे अनुनासिक किंवा प्रत्येक अक्षरवर्गांतील पांचवें अर्ध अक्षर तो ‘ अनुस्वार ’ व अर्धवट अपूर्ण उच्चारलेला अनुस्वार तें ‘अनुनासिक’ असें उलट सुलट समीकरण आहे व तें मला मान्य आहे. तथापि पुढील विवेचनांत हा सूक्ष्म भेद न ठेवतां अक्षराच्या डोक्यावर दिलेलें टिंब तोहि अनुस्वार अशा अर्थानेंच मीं अनुस्वार हा शब्द वापरला आहे.

माडखोलकर म्हणतात कीं, “ माझ्या योजनेला औचित्य व उपयुक्तता या दोन्ही दृष्ट्या आक्षेप घेतां येईल. ” आपण या आक्षेपांचा थोडा खोल विचार करूं. पैकीं ‘ औचित्या-’चा आक्षेप माडखोलकर यांच्या मनांत काय आहे तो मला नीट समजला नाहीं. उपयुक्तता सोडून दिली असतां, अनुस्वाराचें कांहीं वेगळें औचित्य राहतें या त्यांच्या कल्पनेला त्यांनीं कांहीं उदाहरणें दिलीं असतीं तर मला कांहीं बोध झाला असता. अर्थात् ज्या आक्षेपाचा मला स्वतःला बोध होत नाहीं त्याला मी काय उत्तर देणार? पण उपयुक्ततेचा आक्षेप हा खरा आक्षेप होय; व त्याला धरूनच मी थोडेंसें उत्तर देणार आहें. अनुस्वाराच्याच प्रश्नाचा मीहि अद्याप स्वतःच्या मनाशीं संपूर्ण व सांगोपांग विचार केला आहे असें नाहीं. ‘ वादे वादे जायते तत्त्वबोधः ’ या वचनावरच माझी भिस्त आहे. म्हणून या विषयाचा वाद मला इष्टच वाटतो. अनुस्वाराची उपयुक्तता इतक्या रीतीनें मानतां येते:- ( १ ) शब्दसिद्धि ( २ ) शब्दाचा इतिहास ( ३ ) अर्थभेद ( ४ )

लिंगभेद ( ५ ) वचनभेद. क्रियापदाच्या रूपासंबंधानें अनुस्वाराचा उप-योग होतो असें माडखोलकर यांनीं म्हटलें आहे. पग उदाहरणाच्या अभावीं त्याचा बोध मला झाला नाहीं. असो. आतां यांतील प्रत्येक मुद्दा घेऊन पाहूं.

अनुस्वारानें शब्दसिद्धीला मदत होऊं शकेल ही गोष्ट मला मान्य आहे. पण आज ' उच्चारांत नसलेले ' अनुस्वार शब्दसिद्धीकरितां नसते संभाळून ठेवावयाचे ही गोष्ट मला पटत नाहीं. याचें कारण एक तर असें कीं, 'शुद्ध मराठी ' शब्दांपैकीं बहुतेक शब्द मूळ संस्कृतांतून आले आहेत, असें आपण घेऊनच चालतों. त्याअर्थी शब्दसिद्धीकरितां डोकें खाजवीत बसावयाचें कारण नाहीं. परकी म्हणजे अरबी, पर्शियन, उर्दू वगैरे भाषांतून जे शब्द मराठींत येतात त्यांत अनुच्चारित अनुस्वार असतात असें मला वाटत नाहीं. उरला उगम प्राकृत भाषांचा, पण प्राकृत भाषांचा विशेष गुण हा आहे कीं, संस्कृतांतून शब्द घेतांना म्हणजे अपभ्रंश बनवितांना, त्या अनुस्वार हटकून वगळतात. अर्थात् प्राकृताच्या डोक्यावर उडी मारून फिरून संस्कृताकडे जाण्याकरितां म्हणून उच्चार ठेवण्याचें कारण नाहीं. शिवाय शब्दसिद्धि हें काम त्या शास्त्राचा विशेष अभ्यास करणाऱ्या लोकांचेंच आहे. त्यांच्या सोईकरितां शब्दकोश असतातच. त्यांच्याकरितां सामान्य वाचकांनीं व लेखकांनीं अनुस्वारांची अडगळ माजवून आपली गैरसोय करून घेण्यात अर्थ नाहीं. देशी मराठी शब्द प्रायः संस्कृत मूळ रूपावरून आलेला असतो किंवा असावा अशी मोठ्या अक्षरांनीं लिहिलेली पाटी मराठी भाषेच्या डोक्या-वरच असल्यामुळें, शब्दसिद्धीचें संशोधन करीत बसण्याचें कारण नाहीं. शिवाय प्रत्येक अनुस्वाराचा संबंध मूळच्या शब्दाच्या अनुनासिक वर्गाशीं हटकून लावतां येईलच असें नाहीं. तात्पर्य, शब्दसिद्धीकरितां अनुस्वार ठेवावा असें मला सोईचें वाटत नाहीं. जी गोष्ट शब्दसिद्धीची तीच गोष्ट शब्दाच्या इतिहासाची. शब्दसिद्धि व शब्देतिहास यांचें महत्त्व आहे, पण तें अनुस्वारामुळेंच राहतें असें लोकांना वाटलें असतें तर त्यांनीं अनु-स्वाराचा उच्चार स्पष्टरूपानें कायमचा संभाळला असता. ते त्यांना अर्धोच्चारानें अपूर्णोच्चारानें, गौण स्थान कां देते ? आणि शब्दाचा 'अपभ्रंश'

होत असतां, अनुस्वार गाळावयाचे हा जर नियम मानला तर त्या नैसर्गिक नियमाविरुद्ध वर्तन तरी किती दिवस करावयाचें? कोणी मुद्दाम होऊन शद्वाचा अपभ्रंश करीत नाहीं व उलट अपभ्रंश रूढ झाला म्हणजे त्यालाच शिष्टपणाचें रूप येतें त्याला काय करणार?

आतां अर्थभेद हा आक्षेप घेऊं. एका शब्दापासून अनेक अर्थ निघतात व कांहींचा अर्थ त्याच्यावरील अनुस्वारानें वेगळा समजतो हें खरें. उदाहरणार्थ 'आंत' व 'आत'. 'आंत' म्हणजे अभ्यंतरांत व 'आत' म्हणजे बापाची बहीण, पण प्रश्न असा कीं, या दोहोंतील भेद समजण्याची आवश्यकता व तो न समजल्यामुळें होणाऱ्या घोटाळ्याची ही भीति हे दोन्ही शब्द एका वाक्यांत येतील व त्यांपैकीं एकावर अनुस्वार नसेल तर उपस्थित होणार! कारण वाक्यांत योजलेल्या अर्थाशिवाय शब्दाला अर्थ असला तरी तो निरुपयोगी होय. हे किंवा अशाच प्रकारचे दोन्ही शब्द एकाच वाक्यांत येणें हा प्रायः कपिलाषष्ठीचा योग होय. आणि तो योग येईल तेव्हांहि संदर्भानें त्यांचा वेगळा अर्थ कळून येईलच. एरवी 'आत' म्हणजे बापाची बहीण हा शब्दार्थ लक्षांत आणतांना त्यांतील 'आ' वर अनुस्वार नाहीं अशी आठवण आपण ठेवीत असतो काय? किंवा ज्यांतील 'आ' वर अनुस्वार आहे तो अभ्यंतरवाचक असें तरी स्मरण कितीकांना असतें? अर्थात् 'आ' आणि 'त' ह्या दोन अक्षरांच्या संयोगानें बनलेल्या दोन शब्दांचे वेगवेगळे अर्थ आपण वाक्यांतील त्यांच्या उपयोगानें व संदर्भानेंच जाणतों. पुढील वाक्य पहा, "मी घरीं गेलों पाहतों तों आंत माझी आत बसली होती." या वाक्यांत वरील कपिलाषष्ठीचा योग आल्यामुळें कोणी वाटेल तर तेवढ्यापुरता अनुस्वार द्यावाहि. इंग्रजींत एखादा शब्द विशेष लक्षांत येण्याकरितां आपण अंडरलाईन करतो, म्हणजे खालीं रेघ देतो. तसाच येथें मुद्दाम अनुस्वार घालावा. पण समजा अनुस्वार न घातला तरी या दोन शब्दांचा घोटाळा होण्याचा संभव आहे काय? निदान ज्यांची मातृभाषा मराठी त्यांचा तरी गोंधळ होणार नाहीं. एखादा इंग्रजच जर मराठी भाषा वाचीत असला तर त्याचा कदाचित् घोटाळा होणार. पण इंग्रज पंडित किती तरी अनेक शब्दांचा एरवीहि घोटाळा करतात हें प्रसिद्धच आहे. त्यांना विचारा

कोण कितीसा वाचविणार ? अशा सारख्या शब्दांच्या जोड्या कपिला-षष्ठीच्या योगाप्रमाणें १०-५ ग्रंथांत एखाद्या ठिकाणीं येतील. पण अशी एखादी जोडी येईल कीं, जेथें भेद दाखविण्याला अनुस्वारच मिळणार नाहीं. उदाहरणार्थ ' मला शंकर प्रसन्न झाला व पुष्कळ धन दिलें एव-ढेंच नव्हें तर वर आणखी वरहि दिला " येथें अर्थ भेद कसा कोण दाखविणार ? असल्या आपत्ति दुर्मिळ म्हणून कौतुकास्पदच होत; तसेंच वरील कपिलाषष्ठीच्या योगाप्रमाणें क्वचित् येणारी दुसरी एक जोडी आपण कल्पनेनें घेऊं. उ० " मी पर्णकुटींत शिरलों तेथें एक शांत दांत मुनि बसला होता. तरुण, पण त्याच्या तोंडांत दांत नव्हते. " जुन्या पद्धतीप्रमाणें दुसऱ्या ' दांत ' शद्बावर माडखोलकर अनुस्वार देणार. पण अनुस्वार नसल्यानें ' आंत ' या शद्बाचा ' आत ' ( आत्या ) या शब्दाशीं घोटाळा जितका होणार, तितकाच घोटाळा वरील उदाहरणांत दुसऱ्या ' दांत ' या शद्बा-वर अनुस्वार असल्यानें होणार. अर्थात् कपिलाषष्ठीचें हें दुसरें उदाहरण अनुस्वार काढून टाका असें म्हणावयास लावतें.

आतां लिंगाचा आक्षेप घेऊं. या ठिकाणीं समजूत अशी दिसते कीं, वाचकाला अनुस्वारावरून लिंगबोध होतो. पण सूक्ष्म पाहूं गेलें असतां, लिहिणाराला शब्दलिंगाचा बोध आधीं झालेला असतो म्हणूनच तो अनु-स्वार देतो. कितीशा शब्दांचें लिंग अनुस्वारावरून ठरतें ? शद्बलिंगभेद हा सरावानेंच ओळखावयाचा असतो. शाळेंतून त्याचें शिक्षण दिलें जात नाहीं. व्याकरणाच्या नियमांत लिंगभेद मानलेले आहेत. पण व्याकरणांत लिंगभेद शिकविण्याकरितां शद्बांच्या जंत्र्या देत नाहींत. लिंगदर्शक शद्ब देतात ते पाठ करण्याकरितां नव्हे, तर माहित असलेल्या शद्बांचीं उदाहरणें म्हणून. ' कोकरू ' हा शद्ब घेतला तर तो आजवर ' कोकरूं ' अशी लिहिण्याची कोकणी पद्धति आहे. पण समजा हे अनुस्वार काढून टाकले तर ' कोकरू ' या शद्बाच्या लिंगाचा घोटाळा होईल काय ? होणार नाहीं. कारण त्याचा परिचय आधींच झालेला असतो. माडखोलकर यांनीं दिले-लेंच उदाहरण घेऊं. ' त्याची मुलें त्याची बायको ' यांत पहिल्या ' ची ' वर अनुस्वार न दिला तरी 'मूल' या शद्बाचें व 'बायको' या शद्बाचें लिंग ज्याला माहीत आहे त्याचा घोटाळा होणार नाहीं. 'मूल' हा शब्द नपुंसक

लिंगी आहे हें त्याला आधींच माहित असणार. मुलें हें अनेकवचन हेंहि त्याला माहित असणार. यामुळें 'यांचा' अर्थ 'ची' वर अनुस्वार नाहीं म्हणून तो वेगळा कसा करील ? माडखोलकर म्हणतात, 'हे भेद पुढील शब्द वाचल्यावर कळणार.' पण होय वाक्य सर्व बोलून झाल्याशिवाय जर समुच्चयानें अर्थबोध कोणताच होत नाहीं तर पुढचा शब्द वाचल्याशिवाय अर्थ न समजला तरी काय झालें ? पण व्यवहारांत असेंहि होत नाहीं. जातां जातां अर्थ कळतो. अनुस्वार वगळल्यानें शब्दाच्या स्वरूपांत घोटाळा कसा होतो याचें उदाहरण म्हणून त्यांनीं असें दिलें आहे कीं, "हल्लीं विलायतेंत स्त्रिया पुरुषांप्रमाणें केस कापतात व पुरुष मिशा काढतात, यामुळें स्त्रीचा चेहरा कोणता व पुरुषाचा कोणता हें समजण्याला मुष्कील पडावा तसा." पण आधीं ही भीति खरी नाहीं व क्वचित् हजारांत एखादे ठिकाणीं फसगत होण्यासारखी आहे, म्हणून हे नवे फॅशनेबल आचार कोणी टाकले नाहींत. चेहरा स्त्रीचा कीं पुरुषाचा हें कळणें एवढाच जर केसांचा उपयोग मानला, तर जुन्या हिंदु धर्माच्या चालीप्रमाणें विधवा वपन करतात व विधवांना संन्यासी म्हणतात म्हणून संन्यासी पुरुष व विधवा स्त्रिया यांचा घोटाळा व्यवहारांत कधीं झाल्याची कोणी तक्रार ऐकली आहे काय ?

वचनभेदाची गोष्ट अशीच आहे. लिंगभेद दर्शविण्याला आकार, इकार, एकार हीं अशीं स्वतंत्र साधनें आहेत. तशीं वचनभेद दर्शविण्याला प्रत्ययाच्या अक्षराचीं साधनें आहेत. उदाहरणार्थ स-ला, चा-ची हे प्रत्यय एकवचनी व ना-चे हे प्रत्यय अनेकवचनी. अर्थात् मूळ प्रत्ययांनींच जर वचनभेद कळतो तर पुन्हां अनुस्वार कशाला ? बहुमानार्थी बहुवचनाची हीच गोष्ट. उदाहरणार्थ 'टिळकास' व 'टिळकाना' या दोन शब्दांमध्यें पहिला अनादरार्थी व दुसरा आदरार्थी आहे. वस्तुत: दोन्ही शब्दांचें एकवचनच आहे. अनेकवचन दिसतें तें बहुमानार्थी होय. चिरोल-भाष्य-भाषांतरांत डोंगरे यांना टिळकांबद्दल अनादर दर्शवावयाचा म्हणून ते 'टिळकास' असें एकवचनी टाकून लिहितील. पण मला माझ्या पुस्तकांत टिळकांविषयीं आदरानें लिहावयाचें म्हणून त्यांच्या नांवाचा शब्द येईल तेथें मी अनुस्वार वापरलाच आहे. पण द्वितीया किंवा

चतुर्थी प्रयोग योजावयाचा असतां ' टिळकांना ' या शब्दाचा प्रयोग करून जर मला बहुवचन दाखविण्याचें आयतें साधन आहे तर ' टिळकास ' असें एकवचनी संबोधून मग ' का ' वर अनुस्वार देण्याची मीं एवढी भानगड कां करावी ? ( क्वचित् एखाद्या ठिकाणीं प्रत्यक्ष तसें घडलें असल्यास ती चूक किंवा संवय समजावी. )

दर्शकसर्वनामाबद्दल वेगळें लिहावयाचें कारण नाहीं. कारण तीं बोलून चालून नामावर अवलंबून म्हणजे परतंत्र असतात. त्यांना स्वतंत्र अस्तित्व नाहीं. नामाची जी गत किंवा जें त्याचें व्याकरण तें सर्वनामाचें. म्हणून त्याच्या अनुस्वाराची काळजी करण्याचें कारण नाहीं.

लिंग व वचन यांच्या दृष्टीनें क्रियापद व विशेषण यांच्या स्वरूपांत पडणारे भेद दाखविणारे प्रत्ययच असतात, म्हणून या बाबतींत अनुस्वार हे आगंतुकच होत. याकरितां क्रियापद प्रयोग नपुसकलिंगी हें ज्ञान कर्त्याच्या लिंगावरून असल्यावर क्रियापदावर अनुस्वार नाहीं म्हणून ते पुल्लिंगी किंवा स्त्रीलिंगी याचा विचार करण्याला कोणी थांबत नाहीं आणि अनुस्वार नसला म्हणून तो त्याना पुल्लिंगी किंवा स्त्रीलिंगी मानीत नाहीं. अर्थात् व्याकरणाचा घोटाळा होऊं शकत नाहीं. कारण कर्त्याच्या अनुसारेच क्रियापदाचें लिंग, वचन असतें. हा नियम शास्त्र म्हणून किंवा व्यवहार म्हणून तरी लोकांना माहित असतोच. अर्थात् नामाच्या अनुस्वाराची अडचण नाहीं असें ठरलें म्हणजे क्रियापदासंबंधानेंहि तीच गोष्ट सहज स्वीकारावी लागेल. त्याचें वेगळें विवेचन नको. लिंग–भेद, अर्थ–भेद यांपैकीं कोणताहि भेद दर्शविण्याचें कार्य ज्याच्याकडून होत नाहीं, तो अनुस्वार टाकून देण्याला माडखोलकर यांची कबुलीच आहे. तेव्हां माझ्या वरील विवेचनाप्रमाणें तिन्हींच्याहि संबंधांत हल्लीं वापरण्यांत येणारे किती अनुस्वार काढून टाकतां येतील एवढाच प्रश्न उरला. मला एवढेंच सांगावयाचें कीं, जेथें अनुस्वारानें भेद दर्शविला जातो असें माडखोलकर समजून चालतात, तेथें अनुस्वार हाच तो भेद दर्शविण्याचें अनिवार्य साधन आहे कीं काय हें पाहण्याकडे माडखोलकर यांनीं अधिक सूक्ष्मदृष्टि चालवावी.

येथें सांगण्यासारखे इतरहि विषय आहेत. पण त्यांत मी शिरूं इच्छित

नाहीं. उदाहरणार्थ, संस्कृत भाषेंत अनुस्वार आहे कीं नाहीं? प्राकृतांत आहे कीं नाहीं? कानडी वगैरे देशी भाषांत तो आहे कीं नाहीं? आणि नसला तर तो मराठींत कसा आला व कां राहिला? याचा विचार करणें योग्य नाहीं काय? तसेंच खुद्द मराठी भाषा घेतली तर ज्ञानेश्वर, तुकाराम वगैरेंच्या वेळीं भाषा अशुद्धच लिहीत होते काय? व ती तेव्हां शुद्ध लिहीत असतील तर त्या वेळच्या ग्रंथांत अनुस्वार कितीसे आहेत याचा विचार आपणांस करावयास नको काय?

आतां शेवटीं सोईच्या मुद्यासंबंधानें लिहून हा लेख संपवितों. सोईचा मुद्दा शेवटीं टाकण्याचें कारण तो महत्त्वाचा असला तरी शास्त्रीय दृष्टीच्या मानानें त्याला गौण स्थान येणार हें उघड आहे. पण वाङ्मय फैलावणें, छापावयाची सुधारणा करणें वगैरेंच्या दृष्टीनें अखंड टाइपांची योजना करून अक्षरांचें स्वरूप किंचित् बदलण्याचीहि जशी आपली तयारी होत आहे, तशी व त्याच दृष्टीनें जितके अनुस्वार काढून टाकतां येतील तितके काढून टाकणें हेंहि कर्तव्यच ठरत नाहीं काय? माझा अंदाज असा आहे कीं, एक अनुस्वार छपाईत देण्याला एक अक्षर कंपोज करण्याइतका वेळ लागतो असें म्हटलें तर, अनुच्चारित अनुस्वार काढून टाकल्यानें शेंकडा १० किंवा ८ टक्के फायदा होईल हें सहज सिद्ध करून देतां येईल. अनुस्वाराला जो उलटा अहेर व्यवहारांत होतो तो त्याच्या अनुपयोगित्वानेंच पुष्कळसा होतो. हें लक्षांत घेतलें असतां हा वाद लवकर मिटेल असें वाटतें.

---

## ७०. भाषा व राष्ट्रीयत्व

बंगालची फाळणी प्रथम झाली पण नंतर ती रद्द करण्यांत आली, याबद्दल सरकारची चोहोंकडे वाहवा व बंगाली लोकांचें अभिनंदन होत आहे आणि देशांत चोहोंकडे संतोष पसरला आहे हें तर ठीकच आहे. तथापि, फाळणी केल्यानें असंतोष कां उत्पन्न झाला? व फाळणी रद्द केल्यानें फिरून असंतोषाच्या जागीं संतोष कां आला? याचा विचार

करणारास तो विचार अनेक रीतींनीं बोधप्रद होण्यासारखा आहे. कर्झन-साहेबांना बंगाली लोकांकडे पाहून नाक खाजवावयाचें होतें; बंगाल प्रांतांतील मुसलमानांच्या अंगावर त्यांना नसतें महत्त्व लिंपावयाचें होतें; बंगाली लोकांना ही फाळणी रद्द करून आपला आग्रह खरा करून दाखवावयाचा होता; सरकारास त्यांचा हट्ट चालू द्यावयाचा नव्हता; पण अखेर चळवळीनें व दडपशाहीनें शीण येऊन उभयपक्ष दिलजमाई करून घेण्यास अगदीं निमित्तावर टेकले; व शेवटीं उग्रमुख अशा चळवळीचा परिणाम गोड होऊन आनंदीआनंद झाला. या वरवरच्या गोष्टी पहाणारास जगाच्या इतिहासांत आजपर्यंत राजकीय चळवळींचा जो इतिहास घडून आला आहे, त्यांतच ही आणखी भर पडली अशा विचारानें कौतुक वाटेल यांत शंका नाहीं. पण केवळ राजकीय मनोविकारांचा विचार करून समाधान पावणें म्हणजे समुद्राच्या लाटा उत्पन्न होण्याचें कारण जेथें त्या दिसतात त्या पृष्ठभागांतच कांहीं तरी असलें पाहिजे असा उथळ तर्क करून समाधान पावण्यासारखेंच आहे. समुद्राच्या क्षोभाचें कारण खुद्द लाटांमध्यें नसून लाटा या त्या क्षोभाचें एक फक्त बाह्य लक्षण असतें, ही गोष्ट थोडासा विचार करणारास तेव्हांच कबूल करावी लागेल. राष्ट्रीय स्वरूप असणाऱ्या चळवळींच्या मुळांतहि, ज्याला आपण कोत्या अर्थानें 'राजकीय' असें म्हणतों तशाच प्रकारचे हेतु नेहमीं असतात असें नाहीं; राजकीय क्षोभ उत्पन्न करून सुख पावण्याच्या कज्जेदलालीपेक्षां खोल व गूढ अशीं सामाजिक कारणेंहि त्यांच्या मुळाशीं असतात.

बंगालच्या फाळणीविरुद्ध झालेल्या चळवळींच्या मुळाशीं अशाच प्रकारचें एखादें खोल सामाजिक कारण होतें कीं काय? या प्रश्नाचें उत्तर देतांना आपण असा विचार करावा कीं, कर्झनसाहेबांना बंगाली लोकांचें कांहींतरी नुकसान करावें अशी कुवासना झाली होती, असें घेऊन चाललें तरी बंगाली लोकांना राग आला तो केवळ असल्या दुष्टपणानेंच आला असेल असें नाहीं. सर्व हिंदी लोकांवर व विशेषतः बंगाली लोकांवर "खोटें बोलणारे लोक" असा आरोप कर्झनसाहेबांनीं उघड केला; पण त्याचाहि बंगाली लोकांना जितका राग आला नाहीं तितका या फाळणीचा आला; व याचें कारण हेंच असलें पाहिजे कीं, फाळणी कर-

ण्यांत दुष्टपणा तर होताच, पण फाळणीपासून होणारें नुकसानहि तसेंच कांहीं विशेष होतें. बंगाल प्रांताची फाळणी केली म्हणजे केवळ एका प्रांताचे दोन प्रांत केले म्हणून त्यांस वाईट वाटलें असें नव्हे. बंगाल प्रांत म्हणजे अमुक एक हजार चौरसमैल असलाच पाहिजे असें कांहीं ठरलेलें नाहीं. अर्थात् बंगाल प्रांताचें क्षेत्रफळ कमी झालें म्हणून बंगाली लोकांना वाईट वाटण्याचें कारण काय ? एका लेफ्टेनंट गव्हर्नराचे दोन लेफ्टेनंट झाले यांत तरी बंगाली लोकांना राग येण्यासारखें काय असणार ! तसेंच नुसता बहार किंवा ओरिसा बंगाल्यांतून बाजूस काढला असता,–अथवा आपण क्षणभर असें समजूं कीं, सर्व बंगाल्यांतून फुल्लरसाहेबांना प्रिय असलेले म्हणजे मुसलमान तेवढे निवडून बाजूस घेऊन बंगाल प्रांताच्या आंत किंवा बाहेरहि त्यांचा एक सवता सुभा स्थापन केला असता, आणि बंगाली लोकांस नाहींत इतके राजकीय हक्क या नव्या वसाहतींतील लोकांस दिले असते–तरीहि बंगाली लोकांची तळपायाची आग मस्तकास हल्लीं गेली तशी गेली नसती. पण 'बंगाली भाषा बोलणाऱ्या' बंगाली लोकांचा जो एक गट पूर्वी बंगाल्यांत होता तो कर्झनसाहेबांनीं फोडला, आणि या प्रत्येक शकलास अर्धजीव केलें, याचाच राग बंगाली लोकांस मुख्यत: आला. पुष्कळांना बंगाली लोकांच्या या तक्रारीचें मर्म बरेच दिवस कळलें नाहीं. त्यांना वाटे कीं उभी किंवा आडवी वाटेल तशी रेघ मारून राज्यकारभाराच्या सोईकरितां एका मोठ्या प्रांताचे दोन प्रांत केले तर त्यांत वावगें तें मोठें काय झालें ? पण या वरपांगी साळसूद दिसणाऱ्या फाळणींत दोन मर्में होतीं हें त्यांच्या लक्षांत आलें नाहीं. एक मर्म असें कीं, बंगाल्यांतील हिंदूंवर मुसलमान वरचढ करून त्यांस कर्झनसाहेबांनीं निर्माल्यवत् करून टाकलें; व दुसरें असें कीं, सर्व बंगाली लोक एका लेफ्टेनंट गव्हर्नराच्या अमलाखालीं असल्यामुळें जे एकजीव झालेले होते, त्यांचे दोन भाग करून व त्यांना निरनिराळ्या दोन लेफ्टेनंट गव्हर्नरांच्या हाताखालीं देऊन त्यांच्यांतील सामान्यत्व काढून टाकलें. या दृष्टीनें पाहिलें असतां–कोत्या अर्थाची राजकीय दृष्टि बाजूस ठेवून विस्तृत अर्थाच्या राजकीय म्हणजे सामाजिक दृष्टीनें पाहिलें असतां–बंगालच्या फाळणीचा राग बंगाली लोकांस खरोखर कां आला हें कोणासहि सहज कळून येईल.

एकत्र असलेल्या भावाभावांना तिऱ्हाइतानें आपणांत भेद पाडणें याचें जसें वैषम्य वाटतें तसेंच, मूळ एकत्र असतां केवळ यदृच्छेनें दूर व विभक्तप्राय राहिलेल्या भावाभावांत फिरून एकत्रपणाचें सुख व आनंद भोगण्याची मनीषा होणें हेंहि स्वाभाविकच आहे. एकराष्ट्रीयत्वाचें मर्मच असें आहे कीं, धर्म, भाषा, चालीरीती, परंपरा व उद्दिष्ट हीं एखाद्या लोकांच्या अंगीं जितकी अधिक असतात त्या प्रमाणाणें त्यांची एकराष्ट्रीयत्वाची भावना प्रबल किंवा दुर्बल असते. वास्तविक वरचढ अशा राजशक्तीच्या योगानें एका दावणीस बांधले गेलेले, नाइलाजानें—केवळ वस्तुस्थितिपरिचयामुळें—एकराष्ट्रीयत्वाची भावना थोडीबहुत उदित होऊन आपलें राजकीय हित साधूं पहाणारे, व राष्ट्र या नांवाखालीं मोडणारे भिन्न समाज अनेकदां जगांत पहावयास सांपडतात, नाहीं असें नाहीं. परंतु लहान मुलें खेळांत ज्या मोकळ्या मनानें जोड्या करतात व गडी वांटून घेतात त्या मोकळ्या मनानें, मनुष्यांना आपापलीं राष्ट्रें बनविण्याची पूर्ण मोकळीक आहे अशी जर क्षणभर कल्पना केली, तर राजकीय उपाधींच्या कृत्रिम बंधनानें त्यांचे संघ किंवा त्यांचीं राष्ट्रें न बनतां, धर्म किंवा भाषा यांच्या अनुरोधानेंच तीं निर्माण होतील, यांत आम्हांस तर शंका वाटत नाहीं. भाषेपेक्षां धर्माच्या अनुरोधानें जाण्याचा मार्ग एकराष्ट्रीयत्वाच्या भावनेस अधिक प्रिय असतो. तथापि, केवळ धर्म एक असतांहि भाषेच्या अनुरोधानें राष्ट्राची पोट–राष्ट्रें बनणें ही त्या भावनेच्या सफलतेची पुढची पायरी होय. उदाहरणार्थ, सर्व युरोपांत एकच—म्हणजे ख्रिस्ती धर्म असतां—त्या एका खंडांत दहा वीस स्वतंत्र राष्ट्रें आज आहेत; व तीं स्वतंत्र आहेत इतकेंच नव्हे तर परस्परांचें शत्रुत्व व हेवा करणारींहि आहेत. शिवाय 'ख्रिस्ती धर्म एकच खरा पण रोमन क्याथॉलिक व प्रॉटेस्टंट अशा दोन भिन्न धर्मपंथानुरोधानें त्या राष्ट्रांची रचना झाली आहे' असेंहि म्हणतां येत नाहीं. इंग्लंड व जर्मनी दोन्हीहि राष्ट्रें प्रॉटेस्टंट आहेत; पण त्यांचे वैर असून, इंग्लंड म्हणजे प्रॉटेस्टंट व फ्रान्स म्हणजे रोमन क्याथॉलिक अशा या दोन राष्ट्रांची आज मैत्री आहे. अर्थात् युरोपांतील राष्ट्रांची घटना केवळ धर्म किंवा धर्मपंथ यांच्या अनुरोधानें झालेली नाहीं, तर स्थूल मानानें भाषे-

च्या अनुरोधानें झालेली आहे असेंच म्हणावें लागेल. आतां युरोपखंडांत असा कोणताहि देश नाहीं कीं, ज्यामध्यें इतर प्रत्येक देशांतील भाषा बोलणारे थोडे तरी लोक सांपडणार नाहींत. परंतु हें असें असणारच; कां कीं, सुधारलेलींच काय पण न सुधारलेलींहि राष्ट्रें ' सभोंवार भिंती व बुरुज बांधून राहतात किंवा परकी भाषा बोलणारा मनुष्य आला कीं, त्याला सरहद्दीच्या नाक्यावरून तसाच आल्यापावलीं माघारा परतवितात ' असें थोडेंच आहे ! पण या अपवादभूत गोष्टीनें कांहींच सिद्ध होत नाहीं. उलटपक्षीं, युरोपखंडांतहि ( म्हणजे सुधारणा व व्यापार यांच्या योगानें दरम्यानच्या—खऱ्या व मानीव दगडाच्या व भावनेच्या—भिंती निघून गेल्यामुळें आणि आपले नागरिकत्वाचे हक्क परक्या मनुष्यासहि देण्यास सर्व राष्ट्रें तयार असल्यामुळें दळणवळण चहूंकडे सर्रास पसरलेल्या राष्ट्रांच्या युरोपांतहि ) असेंच आढळेल कीं, प्रत्येक देशांत त्या देशाची खास भाषा बोलणाऱ्या लोकांची संख्याच इतर भाषा बोलणारांच्या संख्येपेक्षां शेंकडों हजारों पटीनें अधिक असते. इंग्लंडांत फार मोठा वर्ग इंग्रजी भाषा बोलणारांचा, फ्रान्सांत फ्रेंच बोलणारांचा, जर्मनींत जर्मन बोलणारांचा, असे भाषेच्या अनुरोधानेंच गट झालेले आढळतात तें कां ? अर्थात् भाषेचा मळलेला मार्गच राष्ट्रीयत्वाच्या अधिदेवतेस अधिक सोपा व श्रेयस्कर वाटतो म्हणून !

प्राचीन इतिहासांत राष्ट्रें फार लहान असत. रोम, स्पार्टा, कार्थेज हीं पुढें राष्ट्रांचीं नांवें झालीं खरीं; परंतु त्यापूर्वीं तीं नगरांचींच नांवें होतीं. परंतु लहानसहान राष्ट्रांचे हे दिवस जाऊन जगांत परस्पर दळणवळण वाढूं लागलें. युरोपियन राजे लोक, अलेक्झांडरप्रमाणें किंवा आमच्या इकडील पौराणिक राजांप्रमाणें, नुसता दिग्विजय करून व करभार घेऊन न थांबतां, अथवा महंमद गझनीप्रमाणें नुसत्या स्वाऱ्या करून लूट नेऊनच न थांबतां, परदेश जिंकून आपल्या राज्यास कायमचे जोडूं लागले, तेव्हां अर्थातच शहरांचीं नांवें राष्ट्रांस लावण्यास पुरेनाशीं झालीं आणि राष्ट्रांचा ' जनपद ' किंवा देश यांच्या नांवानें उल्लेख होऊं लागला. तथापि ' जनपद ' किंवा ' देश ' यांच्या स्वाभाविक मर्यादा ओळखण्याची अथवा ठरविण्याची रीत त्या देशांतील मुख्य भाषा बोलणाऱ्या लोकांच्या विस्तारावरून ठरविण्याचीच आहे. अलीकडे कायद्याचें धोरण असें आहे कीं,

राष्ट्राची राजसत्ता व राष्ट्राच्या मुलुखाची मर्यादा यांची व्याप्ति समान असावी. याचा अर्थ असा कीं, कायद्याच्या दृष्टीनें राजा किंवा 'सॉव्हरिन' हा अमुक लोकांचा राजा असें नव्हे, तर अमुक देशाचा राजा. मध्ययुगांत युरोपखंडांतील राजसत्तांची व्याप्ती विवक्षित जनपदांच्या व्याप्तीइतकी असे. या गोष्टीच्या उपपत्तीला इंग्रजींत "ट्रायबल सॉव्हरेन्टी" असें नांव आहे. उदाहरणार्थ, मध्ययुगांत 'फ्रेंचांचा राजा' अशी पदवी प्रचलित असे; ती बदलून आधुनिक काळांत 'फ्रान्सचा राजा' अशी पदवी प्रचलित झाली आहे. परंतु हल्लीं देखील 'फ्रान्सचा राजा' याचा कायदेशीर नसला तरी व्यावहारिक अर्थ 'फ्रेंचांचा राजा' असाच असतो याचें कारण उघड आहे. देशावरून राजसत्तेची व्याप्ति ठरविण्यास मुख्य अडचण अशी असते कीं, देशाच्या मर्यादा कृत्रिम रीतीनें वाटेल तशा बदलूं शकतात. परंतु देशाची मर्यादा वाढली म्हणून तिजबरोबर त्यांतील लोकहि वाढूं शकत नाहींत; व उलटपक्षीं देशाची मर्यादा कांहीं कारणांनीं एकदम कमी झाल्यास त्याजबरोबर लोकांची व्याप्ति संकुचित होऊं शकत नाहीं. एकोणिसाव्या शतकाच्या प्रारंभीं नेपोलियन बोनापार्ट यानें अवघ्या दहा वर्षांत युरोपखंडांत इतका मुलूख जिंकला कीं, फ्रान्स देशाच्या या वाढलेल्या मर्यादाक्षेत्रांत फ्रेंच जानपदांचीच भरती करावयाची म्हटलें तर, त्यास शंभर वर्षेंहि पुरलीं नसतीं ! याचप्रमाणें, एखादें दुर्बळ राष्ट्र परशत्रूकडून जिंकलें गेलें असतां त्याची क्षेत्रमर्यादा एकदम कमी होईल, पण त्यामुळें ती विवक्षित भाषा बोलणारे लोक कमी होणार नाहींत, हें हल्लीं इटॅलियन लोकांनीं तुर्की राज्यापासून तोडून घेतलेल्या ट्रिपोलीच्या उदाहरणावरून उघड दिसून येईल. अशा रीतीनें बाह्य कारणांनीं, एखादें राष्ट्र आणि तें राष्ट्र आपलें असें म्हणणारे लोक यांच्या व्याप्तीचें समीकरण ढळूं शकेल. परंतु ढळलेल्या या समीकरणाची घडी पूर्ववत् बसावी अशीच कोणत्याही राष्ट्रांतील लोकांची आकांक्षा असते; व त्याप्रमाणेंच त्या राष्ट्रांतील राजसत्तेचा प्रयत्न असतो. राजसत्ता प्रबळ होऊन तिला आपला मुलुख वाढवितां आल्यास या नवीन मुलखांत शक्य असेल तर होतां होईतों स्वकीयांचीच भरती व्हावी अशी तिला इच्छा होते, असें अलीकडील वसाहतीच्या उदाहरणां-

वरून दिसून येतें. तसेंच, राजसत्ता प्रबल झाली असतां, पूर्वी एके काळीं आपल्या ताब्यांत असून परक्या राजाच्या ताब्यांत गेलेला मुलुख व स्वकीय लोक परत मिळविणें हा सर्वोत्कृष्ट पुरुषार्थ आहे असेंहि मानिलें जातें. दोन शतकांपूर्वी जर्मनीचा राजा फ्रेडरिक दी ग्रेट हा प्रबळ होतांच पूर्वी आस्ट्रियानें घेतलेला जर्मन लोकवस्तीचा सायलेझिया हा प्रांत परत जिंकून जर्मनीस जोडण्याकरितां त्यानें कंबर बांधली. उलटपक्षीं सन १८७० सालीं जर्मनीनें फ्रान्सचा पराभव केल्यावर, लष्करी दृष्टीनें उपयुक्त असे फ्रेंच वस्तीचे अलसेस व लोरेन हे प्रांत आपल्या राज्यास जोडले तेव्हां, त्यांतील लाखों फ्रेंच प्रजाजन आपलीं घरेंदारें सोडून परत फ्रान्स देशांत जाऊन राहिले. जर्मनीच्या अमलाखालीं ते रहाते तर त्यांस रोज कोणी मारावयास काढले असतें असें नाहीं. पण जवळ जवळ राहणाऱ्या फ्रेंच लोकांना एका अमलाखालीं असल्यास अधिक सुख लागलें असतें-निदान अधिक सुख वाटलें असतें, हें तरी उघड होत आहे.

वरील स्थूल व संक्षित विवेचनावरून सधर्मीय, सजातीय, आणि सभाषीय-म्हणजे एकच भाषा बोलणाऱ्या-लोकांना होतां होईतों आपण एकाच अमलाखालीं असावें व राष्ट्र या नात्यानें आपणामध्यें एकात्मता राहावी असें स्वाभाविक रीतीनें वाटत असतें हें दिसून येईल. अर्थात् या बाबतींतलो ज्यांची आकांक्षा सफल झालेली नसेल, ते तेवढ्यापुरतें मनांत असमाधान पावत असणार हेंहि उघड आहे; व तीच गोष्ट बंगालच्या फाळणीनें सिद्ध केली. परंतु एक भाषा बोलणारे लोक निरनिराळ्या अमलाखालीं असल्याचीं आजच्या हिंदुस्थानांत दुसरींहि एक दोन उदाहरणें आहेत; आणि या उदाहरणांतील लोकांच्या मनाप्रमाणें त्यांची व्यवस्था करावयाची म्हटलें तर, बंगाल प्रांतासंबंधानें नुकतीच जशी अदलाबदल व पुनर्घटना करण्यांत आली तशीच हिंदुस्थानांतील इतर एक दोन भागांतहि करावी लागेल. वर सांगितलेलें एक भाषारूप राष्ट्रीयत्व-लक्षण घेतलें तर हल्लींच्या मुंबई इलाख्यांतून कांहीं कांहीं भाग तोडून ते दुसऱ्या इलाख्यांना जोडावे लागतील, व जे एक दोन भाग मुंबई इलाख्यांत हल्लीं समाविष्ट झालेले नाहींत ते त्यांत समाविष्ट करावे लागतील. सिंध प्रांत

मुंबई इलाख्यांतून काढून पंजाबास जोडावा लागेल; मुंबई इलाख्याच्या दक्षिण भागांतील कांहीं तालुके मद्रास इलाख्याकडे द्यावे लागतील; मध्य-प्रांतांतील सर्व वऱ्हाड व दुसरेहि एक दोन जिल्हे मुंबई इलाख्यास जोडावे लागतील; आणि मद्रास इलाख्याच्या अगदीं उत्तरटोंकाकडील कांहीं तालुके हल्लीं बहार प्रांतास जोडलेल्या ओरिसा प्रांताला चिकटवावे लागतील. तथापि, आम्हांला आज मराठी भाषा बोलणाऱ्या लोकांसंबंधानेंच मुख्यतः लिहावयाचें आहे; कारण १ मुंबई इलाख्यांतील महाराष्ट्र आणि २ नागपूरच्या कमिशनराच्या अमलाखालीं असलेला महाराष्ट्र यांची जरी कोणी मुद्दाम फाळणी केलेली नाहीं तरी वस्तुतः व यदृच्छेनें तरी कां होईना ही फाळणी झाल्यासारखीच आहे. ही महाराष्ट्राची फाळणी कोणाही राज्यकर्त्यानें मुद्दाम आकसानें केलेली नाहीं म्हणून व्यक्तिशः काय किंवा अव्यक्तिशः काय या फाळणीबद्दल महाराष्ट्राचा कोणावर राग आहे असें नाहीं. परंतु दोषाला जबाबदार धनी अमुक एक नसला तरी एका महाराष्ट्राचे दोन महाराष्ट्र होऊन राहिलेले आहेत ही गोष्ट कांहीं खोटी नाहीं व या स्थितीपासून होणारे तोटे निवळ मानीव नाहींत तर खरेच आहेत. महाराष्ट्राच्या फाळणीचा हा प्रश्न, कांहीं तरी नवीन चळवळ पाहिजे म्हणून, अथवा चित्तक्षोभाचें एक निमित्त गेलें तेव्हां त्याच्या जागीं दुसरें आणून ठेवल्याशिवाय आमच्या मनास समाधान होत नाहीं म्हणून आम्ही आज मुद्दाम उकरून काढीत आहों असें नाहीं. तर महाराष्ट्राच्या फाळणीचा हा प्रश्न कांहीं अंशीं बंगालच्या फाळणीपेक्षांही जुना आहे. बंगालची फाळणी होण्यापूर्वी, म्हणजे सन १९०३ सालींच वऱ्हाड-प्रांत निजामसरकाराकडून इंग्रज सरकारानें कायम भाडेपट्ट्यानें घेतला व तो नागपुरास जोडण्यांत आला तेव्हां हा प्रश्न वाटाघाटीस सरकारापुढें आला होता अशी आमची समजूत आहे. बंगालची फाळणी यानंतर दोन वर्षांनीं झाली हें या बाबतींत लक्षांत ठेवण्यासारखें आहे ! तात्पर्य, कोणत्याहि गोष्टीचें भांडण किंवा प्रत्यक्ष चळवळ नसली तरी, तिचे गुणावगुण व इष्टानिष्टता हीं अबाधितच असतात; आणि केवळ या अबाधित गुणावगुणांस व इष्टानिष्टतेस अनुसरून निर्विकार मनानें महाराष्ट्राच्या या फाळणीचा प्रश्न आम्ही लोकांच्या व सरकारच्या नजरेस आणीत आहों. ‘फाळणी’ या शब्दाला पूर्वीच्या

अनुभवामुळें कांहीं दिवसांपर्यंत चळवळीची उपाधी चिकटून राहणें अपरिहार्य आहे; तथापि चळवळीच्या उपाधीशिवाय प्रजेच्या सुखदुःखाची कोणतीहि गोष्ट सरकारच्या नजरेस आणण्यांत अर्थ नाहीं, किंवा चळवळीशिवाय सरकारचें लक्ष तिकडे जाणारच नाहीं, असें आम्हांस वाटत नाहीं. प्रस्तुत लेखाच्या आरंभीं दर्शविल्याप्रमाणें, बंगालच्या फाळणीसंबंधानें बंगाली लोकांचा मनःक्षोभ होण्यासारखीं बरींच अवांतर कारणें घडलीं व तें त्या कारणांचें कार्य घडलें ! पण कर्झनशाहीच्या झंझावातानें बंगालची आग भडकविली नसती तरी देखील, फाळणीबद्दल बंगाली लोकांनीं गाऱ्हाणें केलेंच असतें, व सरकारानेंही पण त्याचा विचार कदाचित् केला असता. "चळवळीला आम्हीं भीक घालीत नाहीं, तर जें योग्य व न्यायाचें असेल तेंच करितों" असें आपलें ब्रीद असल्याचें जाहीर करण्याकडे सरकारचा नेहमीं कटाक्ष असतो. यामुळें, चळवळ न करतां निर्विकारपणानें आपल्या नजरेस आणलेल्या गाऱ्हाण्यांचीहि दाद घेतों, हें सरकारास मधून मधून तरी लोकनिदर्शनास आणणें अगत्याचें आहे. सबब महाराष्ट्राच्या फाळणीच्या प्रश्नाचा विचार केवळ इष्टानिष्टतेच्या दृष्टीनें आम्ही म्हणतों तसा पुढेंमागें तरी सरकार करील अशी आम्हांस आशा वाटते.

मागील लेखांत दर्शविल्याप्रमाणें, हिंदुस्थानांतील निरनिराळ्या प्रांतांची रचना भाषेच्या दृष्टीनें पहातां असावी तशी नाहीं; पण याचें एक कारण असें आहे कीं, निरनिराळे प्रांत इंग्रज सरकारच्या हातीं निरनिराळ्या वेळीं आले. सर्व हिंदुस्थानचा गटचा गट असा एकदम इंग्रजांचे हातीं पडला नाहीं—अगदीं शेवटला प्रांत जिंकल्यास अर्ध शतकहि झालें असेल नसेल—यामुळें हिंदुस्थानच्या पुनर्घटनेचा प्रश्न सरकारच्या नजरेस अद्यापि सहजच आला नाहीं. हल्लींच्या ब्रिटिश मुलुखांपैकीं बंगाल व मद्रास हे प्रांत अठराव्या शतकांतच कंपनी सरकारच्या द्वारां इंग्रजी राज्यास जोडले गेले. बहुतेक सिंधखेरीज बाकीचा मुंबई इलाखा पेशवाई बुडाल्यावर, म्हणजे एकोणिसाव्या शतकाच्या पहिल्या पंचविशींत, खालसा झाला. मुंबई इलाख्यांत असलेला सिंध प्रांत १८४३ सालीं अमीराकडून जिंकून घेण्यांत आला. १८४० व १८५० यांच्या दरम्यान शीखांशीं युद्धें होऊन पंजाब इंग्रजांस मिळाला. १८५४ सालीं नागपूर प्रांतापैकीं बराच भाग इंग्रजां-

कडे आला. अयोध्या प्रांत बंडाच्या आधीं एक वर्ष जिंकला गेला. अशा रीतीनें बहुतेक हिंदुस्थान बंडाच्या सालाच्या सुमारास निरनिराळ्या वेळीं खालसा झालें होतें. हिंदुस्थानाबाहेरील भाग कांहीं यापूर्वी, व कांहीं यानंतर, हिंदुस्थानच्या राज्यास जोडण्यांत आले. ब्रह्मदेशांतील मुलूख जिंकण्यास एकोणिसाव्या शतकांतील पहिल्या पंचविशींत सुरुवात झाली; व १८८६ सालीं सर्व ब्रह्मदेश इंग्रजी अमलाखालीं आला. आसाम प्रांत पूर्वी दक्षिण ब्रह्मदेशाबरोबरच जिंकण्यांत आला होता.

हे निरनिराळे मुलूख ताब्यांत आल्यावर त्यांच्या रचनेंत मधूनमधून कारणपरत्वें फेरफार व अदलाबदल करण्यांत आली होती, नाहीं असें नाहीं; परंतु ती केवळ तात्पुरत्या दृष्टीनें. त्यांत जवळ जवळच्या अमुक अमुक प्रांतांतील लोक अमुक एक भाषा बोलतात, सबब त्यांना एकाच अमलाखालीं ठेवून त्यांच्या एकीकरणास मदत करावी, अशी त्यांत सरकारची दृष्टी नव्हती. किंवा उलटपक्षीं, अमुक एकच भाषा बोलणारे निरनिराळ्या भागांतील लोक एकत्र केल्यानें ते एकजीव व डोईजड होतील म्हणून त्यांस वेगवेगळ्या अमलाखालीं द्यावें, आणि त्यांच्या राष्ट्रीयत्वाच्या वाढीस विघात करावा अशीहि पण त्या वेळीं सरकारची बुद्धि नव्हती, हें आम्ही प्रांजलपणें कबूल करितों. उदाहरणार्थ, १८४३ सालीं सिंध प्रांत जिंकला तो मुंबई इलाख्यास जोडण्यांत आला—पंजाबास जोडण्यांत आला नाहीं—याचें कारण उघडच असें आहे कीं, त्या वेळीं पंजाब प्रांतच मुळीं इंग्रजांच्या ताब्यांत नव्हता, व मुंबई इलाखा होता. अर्थातच त्या वेळीं सिंध पंजाबास कसा जोडणार? अगदीं प्रथम एक वेळ आग्रा, अलाहाबाद आणि बंगाल हे सर्व मिळून एक प्रांत असे. त्या वेळीं अयोध्या प्रांत जिंकलेला नव्हता. पण पुढें बंगाल, बहार वगैरे वेगळे काढून आग्रा व अलाहाबाद मिळून एक प्रांत केला; व पुढें त्यासच अयोध्येचा प्रांत जोडण्यांत आला. ही तोड—जोड भाषेच्या दृष्टीनें आणि कारभाराच्या सोईच्या दृष्टीनें योग्यच होती. पण तोड—जोडीचा मुख्य हेतु कारभाराची सोय हाच काय तो होता. दिल्ली व आसपासचा मुलूख हा बंडापूर्वी आग्रा प्रांतांत (पूर्वीचा वायव्य प्रांत व हल्लींचा संयुक्त प्रांत यांत) मोडत असे. पण बंडानंतर तो पंजाबास जोडण्यांत आला; याचेंहि कारण

केवळ राज्यकारभाराची सोय. पूर्वी सागर व नर्मदा हे हल्लींच्या मध्यप्रांतांतले जिल्हे, आग्रा–अलाहाबाद प्रांतांत मोडत असत; परंतु सन १८६१ सालीं ते जिल्हे नागपुरास जोडून सर्वांवर मिळून एकच कमिशनरी अंमल चालू केला. वऱ्हाड प्रांत १९०३ पर्यंत एकटा स्वतंत्र व्यवस्थेखालींच होता. पण त्या सालीं निजाम–सरकारकडून या प्रांताचा कायम भाडेपट्टा घेतल्यानंतर, वास्तविक तो भाषेच्या दृष्टीनें सरकारनें मुंबई इलाख्यासच जोडावयास पाहिजे होता; परंतु मुंबई इलाखा आधींच मोठा व उलटपक्षीं नागपूर प्रांत लहान असून त्यास वऱ्हाड जोडला असतां झेंपण्यासारखा आहे, याच दृष्टीनें तो नागपुरास जोडण्याचा अखेर निश्चय झाला असावा, अशी आमची समजूत आहे.

सर्व हिंदुस्थान एकदम एक गट हातीं येऊन सुरुवातीसच त्याचे निरनिराळे प्रांत कसे तोडावे असा प्रश्न इंग्रज सरकारच्या पुढें असता, तर त्यांनीं प्रांतांची रचना हल्लीं आहे याहून कांहीं वेगळी केली असती. कारण, भाषावार प्रांतरचना करणें हें जितकें लोकांच्या दृष्टीनें तितकेंच अधिकाऱ्यांच्याहि दृष्टीनें सोईचें असतें. स्वाभाविक सरहद्दी याच सुयंत्रित राज्यव्यवस्थेस हितकर असतात; व या सरहद्दीबरहुकूम प्रांतांची रचना केलेली असली म्हणजे राज्यकारभाराचें काम जरा सोपें पडतें. आतां बंगालची फाळणी करणारा मनुष्य जसा अपूर्व तशी त्या फाळणीची पद्धतीहि अपूर्व होती; म्हणजे तिचा हेतु राज्यव्यवस्था सोपी करण्यापेक्षां बंगाली लोकांना कमीपणा आणून मुसलमानी लोकांना महत्त्व देण्याचाच अधिक होता. अर्थात् बंगालच्या फाळणीची सर्वच परिस्थिति अपवादात्मक होती. पण बंगालच्या फाळणीच्या मुळाशीं असलेल्या हेतूंचा आरोप, गेल्या शंभर वर्षांत प्रांतरचनेची जीं निरनिराळीं कामें सरकारच्या हातून झालीं त्यांपैकीं कोणत्याहि संबंधानें, सरकारवर सहसा करतां येईल असें म्हणवत नाहीं. सारांश, प्रांतांप्रांतांची रचना प्रथमच हवी तशी झाली नाहीं याचें कारण, केवळ ते प्रांत निरनिराळ्या वेळीं निरनिराळ्या परिस्थितींत व निरनिराळ्या राजांकडून सरकारच्या हातीं आले हेंच होय. तथापि, त्याजबरोबर हेंहि सांगितलें पाहिजे कीं, ही जुनी सबब मात्र यापुढें फारशी चालावयाची नाहीं. कारण यापुढें सरकारनें मनांत आणल्यास पूर्वीच्या प्रांतवार रचनेंतील दोष काढून

टाकण्यास त्यांना मुळींच अडचण पडणार नाहीं. गेल्या पन्नास वर्षांत सर्व प्रकारची पूर्ण शांतता असल्यामुळें, सरकारनें राज्यव्यवस्थेचीं धोरणें बांधून, खातीं निर्माण करून आणि आडाखे बसवून राज्यकारभाराचें काम इतकें सुयंत्रित करून ठेवलेलें आहे कीं, लॉर्ड कर्झन यांच्या कारकीर्दीत प्रत्येक खात्याचे 'डायरेक्टर जनरल्स' नेमून सर्व हिंदुस्थानचें खातेवार एकीकरण करण्याचा जो उपक्रम झाला होता तो खर्चाच्या दृष्टीनें अग्राह्य असला तरी, सिमल्यास आपल्या खुर्चीवर बसलेल्या एकट्या युरोपियन अधिकाऱ्याला आपल्या हाताच्या एका बोटावर सर्व हिंदुस्थान नाचवितां येतें किंवा यावें, ही जी अहंकारबुद्धि त्या धोरणाच्या मुळाशीं होती ती बऱ्याच अंशीं यथार्थ व सकारण होती हें कोणासहि कबूल केलें पाहिजे. कारण हिंदुस्थानांत 'सिव्हिलियन' लोकांनीं सुसूत्र रीतीनें राज्य करण्याची-आणि हिंदुस्थानांतील प्रजेनें 'सिव्हिलियन' लोकांच्या अमलाखालीं बिनबोभाट राज्य करून घेण्याची जी पात्रता दाखविली आहे ती कांहीं लोकोत्तरच होय यांत संशय नाहीं, हें पांचचारच उदाहरणांवरून सहज दिसून येईल. ब्रह्मदेश विस्तारानें युरोपांतील स्वीडन देशाएवढा आणि लोकसंख्येनें स्वीडनच्या दुप्पट असतां, एकटा लेफ्टेनंट गव्हर्नर त्याचा सर्व राज्यकारभार बिनतक्रार पुरा पाडतो! बंगाल प्रांत विस्तारानें फ्रान्सच्या पाउणपट पण लोकसंख्येनें फ्रान्सच्या दुप्पट असतां, फाळणीच्या चळवळीपर्यंत तेथील राज्यकारभाराचा बोभाटा सहसा ऐकूं येत नव्हता. संयुक्त प्रांताची लोकसंख्या ऑस्ट्रिया-हंगेरी देशांतील लोकसंख्येहून अधिक आहे. मद्रास इलाखा विस्तारानें आणि मुंबई इलाखा लोकसंख्येनें इंग्लंड, वेल्स व स्कॉटलंड या तिन्हींची बरोबरी करतो. पण राज्यव्यवस्था इतकी सुरळित चालत असल्यामुळेंच, हवी तशी प्रांतांची पुनर्रचना करणें सरकारनें मनांत आणल्यास अगदीं सोपें आहे; आणि म्हणूनच लोकांच्या हौसेप्रमाणें आणि आकांक्षेप्रमाणें भाषानिहाय प्रांतांची पुनर्रचना करण्याची जबाबदारी त्यांजवर येते. असो; आतां भाषेच्या दृष्टीनें हिंदुस्थानची वांटणी कशी काय झाली आहे हें आधीं थोडक्यांत पाहूं.

हिंदुस्थानांत एकंदर शंभरपासून सव्वाशेंपर्यंत निरनिराळ्या भाषा प्रचारांत आहेत. पण त्यांतील निम्याहून कमी जमेस धरून बाकीच्या विचा-

रांतून वगळल्या तरी चालतील. खानेसुमारीच्या आंकड्यांवरून असें दिसून येतें कीं, जी भाषा बोलणाऱ्या लोकांची संख्या सर्व हिंदुस्थानांत मिळून दहा हजारांहून कमी नाहीं अशा भाषा सुमारें साठच आहेत. नेटिव संस्थानें वगळलीं असतांहि ब्रिटिश हिंदुस्थानची अशी सुमारें पंचवीस कोट लोकसंख्या उरते; व तिच्या मानानें पाहतां एक लक्षाहून जिचे अनुयायी कमी भरतात अशी भाषाहि हल्लींच्या प्रकरणीं जमेस न धरली तरी चालेल. एक लक्ष आणि दहा लक्ष यांच्या दरम्यान ज्या भाषा बोलणारांची संख्या भरते अशा भाषा सुमारें वीस आहेत. दहा लक्षांपासून व पन्नास लक्षांच्या आंत भरणाऱ्या लोकसंख्येच्या भाषा सुमारें दहा आहेत. पन्नास लक्षांपासून एक कोटीपर्यंत लोकसंख्येच्या भाषा तीन चार आहेत; आणि एक कोटीहून अधिक लोक जी भाषा बोलतात, अशा भाषा फक्त सात आठ आहेत. अनुयायांच्या संख्येच्या अनुक्रमानें पाहतां, हिंदुस्थानांतील मुख्य भाषांची वर्गवारी खालीलप्रमाणें आहे. ( यापुढें प्रस्तुत लेखांत येणारे सर्व आंकडे १९११ च्या खानेसुमारीचे आहेत असें समजावें. ) (१) हिंदी ८½ कोटी; ( २ ) बंगाली ४½ कोटी; ( ३ ) तेलगू २ कोटी; ( ४ ) मराठी २ कोटी; ( ५ ) पंजाबी १¾ कोटी; ( ६ ) तामीळ १½ कोटी; ( ७ ) गुजराथी १ कोटी. एक कोटीच्या जवळ जवळ येणाऱ्या भाषांमध्यें कानडी ( ९८ लक्ष ), उरीया ( ९१ लक्ष ), या दोनच आहेत.

विस्ताराच्या दृष्टीनें मराठी–भाषेचा नंबर सर्व हिंदुस्थानांत चवथा लागतो. मराठीची प्रांतवार वांटणी अशा प्रकारची आहेः––मुंबई इलाखा १½ कोटी; दक्षिण हैद्राबाद म्हणजे मोंगलाई ४० लक्ष; वऱ्हाड २५ लक्ष नागपूर ( मध्य ) प्रांत २५ लक्ष; मद्रास ३ लक्ष; म्हैसूर ¾ लक्ष; बडोदे ½ लक्ष. हिंदुस्थानच्या इतर प्रांतांतहि मराठी बोलणारे लोक मिळणार नाहींत असें नाहीं, पण ते फारच थोडे; वायव्य ( आग्रा ) प्रांतांत १० हजार, कुर्ग प्रांतांत ५ हजार; अजमीर–मेरवाडा प्रांतांत २ हजार; बंगाल्यांत २ हजार; पंजाबांत १ हजार; अयोध्या प्रांतांत ५ शें; आसामांत १ शें. या अनेक प्रांतांत गेलेले मराठी भाषा बोलणारे लोक अर्थात् कांहीं कांहीं निमित्तानें तिकडे जाऊन राहिलेले होत. आग्रा–अलाहाबाद व अयोध्या प्रांतांत नोंद झालेल्या मराठी बोलणाऱ्या लोकांपैकीं कांहीं लोक

तरी खानेसुमारीच्या वेळीं यात्रेकरितां गेलेले महाराष्ट्रीय यात्रेकरू असतीलच तथापि बरेच लोक स्थायिक रहिवासीहि आहेत. त्याचीं कारणें दोन आहेत. एक असें कीं, या प्रांतांत प्रयाग, काशी, अयोध्या, मथुरा, गोकुळवृंदावन, हीं हिंदूंचीं प्रसिद्ध क्षेत्रें असल्यानें, जुन्या काळीं यात्रेस गेलेलीं बरींच कुटुंबें तेथेंच कायमची वसति करून रहात. दुसरें कारण ऐतिहासिक आहे. पेशव्यांच्या वेळीं मराठे लोक गंगायमुना नद्यांच्या आसपास रहात नव्हते, असें बहुधा कधीं झालें नाहीं. बुंदेलखंडांत मराठ्यांची सर्वांत मोठी वसाहत झालेली होती; व शिंद्यांच्या पराक्रमाची भूमि व जहागीर ही यमुना नदीच्या आसपास असल्यानें तेथें मराठ्यांची कायमची वसति होणें स्वाभाविकच होतें. मराठे व उत्तर हिंदुस्थान यांचा संबंध पेशवाई बुडाल्यानंतरहि टिकला होता. कारण बाजीरावसाहेबांनीं मराठी राज्याचें उदक इंग्रजांच्या हातीं घातल्यावर ते ब्रह्मवर्तास जाऊन राहिले. यामुळें अलाहाबाद प्रांतांत मराठी भाषा बोलणाऱ्या त्यांच्या अनेक आश्रित व ऋणानुबंधी कुटुंबांची कायमची वसति झाली. बंडानंतर ही वसति बरीच हलली; व बंडानंतरच्या धरपकडीपासून बचाव करण्याकरितां महाराष्ट्रीय मंडळी नेपाळ, आलमोरा, बंगाल, वगैरे दूरदूरच्या ठिकाणांत पसरली. बंगाल प्रांतांत, आगगाड्या, अकौंट ऑफिसें, शिक्षणसंस्था, वगैरेंच्या संबंधानें महाराष्ट्रीयांची वसाहत असली तर पूर्वींहून थोडीबहुत वाढतच असेल.

मद्रास इलाखा, म्हैसूर, कुर्ग वगैरे प्रांतांत मराठी भाषा बोलणारांची संख्या लाख पन्नास हजारांनीं मोजण्यासारखी भरते. याचेंहि कारण उघडच आहे; व तें असें कीं, पूर्वीं शिवाजीमहाराजांचे वडील शहाजी राजे यांस विजापूरच्या मोंगल बादशहांकडून कर्नाटकांत तंजावरकडे जहागीर मिळाली होती; तंजावरास मराठी राजघराणें स्थापलें गेलें होतें; आणि कर्नाटकी जहागिरींतील ज्या किल्ल्यानें संभाजीमहाराजांच्या वधानंतर, महाराष्ट्र मोंगलमय झालेल्या दिवसांत, राजाराममहाराजांचें कित्येक वर्षें संरक्षण केलें, व मराठ्यांची गादी बचावण्यास बिनमोल मदत केली, तो जिंजीचा किल्ला मद्रासेपासून फार दूर नाहीं. शिवाय कर्नाटकांतील मराठ्यांच्या स्वाऱ्यांस व अमलास नानासाहेब पेशव्यांच्या वेळेस जी सुरवात झाली ती जवळ जवळ बाजीरावशाहीपर्यंत चालू होती. असो; हल्लीं मद्रासेकडील दक्षिणी

मराठे बाह्य चिन्हांवरून सहसा ओळखूं येत नाहींत. तथापि कर्नाटकांत ज्यांच्या नांवांत ' राव ' हें पद येतें ते लोक प्रायः महाराष्ट्रीय वंशांतील आहेत असें स्थूलमानानें म्हणतां येईल. या लोकांना गेल्या दोन–अडीचशें वर्षांत तामिळ देशाचा वेष व तामिळ भाषा हीं अर्थातच आपलीशीं करावीं लागलीं. परंतु अद्यापि त्यांनीं मराठी भाषेची बानगी जपून ठेविलेली आहे. हे लोक घरीं मोडकें–तोडकें व अशुद्ध मराठी केव्हां केव्हां बोलतात. पण व्यावहारिक भाषेपेक्षां धार्मिक वाङ्मयाची चिकाटी अधिक बळकट असते; आणि स्त्रीवर्ग हा पुरुषापेक्षां अधिक सनातनप्रिय असल्यामुळें मराठी स्तोत्रें व धार्मिक काव्यें हीं मद्रासेकडील महाराष्ट्रीय कुटुंबांतील स्त्रियांच्या तोंडीं अद्यापिही वास करीत असलेलीं आढळतात. दिवाणबहादूर सर टी. माधवराव व दि. ब. आर. रघुनाथराव हे मद्रासी म्हणून गणले जाणारे प्रसिद्ध मुत्सद्दी वास्तविक महाराष्ट्रीय होत. राजा सर टी. माधवराव यांचें मराठी भाषेवर पुष्कळ प्रेम होतें; आणि मराठी भाषेंत त्यांनीं लिहिलेल्या कवितांचें एक लहानसें पुस्तकहि आहे ! त्यांच्याच प्रयत्नानें मद्रास युनिव्हर्सिटींत मराठी भाषेचा प्रवेश झाला अशी आमची समजूत आहे; आणि सांगण्यासारखी मौज म्हटली म्हणजे ही कीं, मुंबई युनिव्हर्सिटीमध्यें मराठीचा प्रवेश होण्यापूर्वी मद्रास-युनिव्हर्सिटींत मराठीचा प्रवेश झाला ! आतां मद्रासेकडील मराठी भाषा कालांतरानें फारच अशुद्ध झालेली आहे. ती इतकी कीं, मद्रास युनिव्हर्सिटींत मराठीच्या परीक्षेला विद्वान् परीक्षकांनीं घातलेले प्रश्न, केवळ भाषा या दृष्टीनें पाहतां इकडील मराठी शाळेंतील मुलांस अशुद्धाचें शुद्ध करण्याकरितां धडे म्हणूनहि खुशाल देतां येतील ! पण अशुद्धतेचा हा मुद्दा अर्थातच फार गौण आहे. मराठी भाषेचा विस्तार कोठें व किती आहे यापुरतेंच आपणांस आज पहावयाचें आहे. थेट उत्तरहिंदुस्थानापेक्षां दक्षिणहिंदुस्थानांत मराठीचा प्रसार अधिक किती व कां आहे हेंच वरील विवेचनावरून दर्शविण्याचा आमचा हेतु होता व तो बहुधा सफल होईल. पण या वरील सर्व विवेचनावरून महाराष्ट्राच्या एकीकरणासंबंधानें काय काय अनुमानें काढतां येण्यासारखीं आहेत याचा विचार पुढील लेखांत करूं.

विस्ताराच्या दृष्टीनें पाहतां हिंदुस्थानांतील प्रत्येक भाषेला तिचा

स्वतःचा म्हणून एक प्रदेश आहे; निदान हिंदीखेरीज बाकीच्या प्रत्येक भाषेसंबंधानें तरी हें विधान करतां येईल. हिंदीचा मात्र विस्तार इतका फैलावला आहे कीं, कोणताही एक प्रांत पुरण्याची तिची वेळ निघून गेली असून ती सर्व हिंदुस्थानास व्यापूं पहात आहे; आणि एकराष्ट्रीयत्वास मदत म्हणून तिला फैलावण्यास सर्व प्रांतांतील विद्वान लोक उत्तेजनहि देत आहेत. हिंदी भाषा मुख्यतः हिमालय व विंध्याद्रि या दोन पर्वतांमध्यें-ज्याला आर्यावर्त ही संज्ञा आहे त्या प्रदेशांत—बोलण्यांत येते. हिंदी बोलणाऱ्या ८½ कोटी लोकांपैकीं ९० शें म्हणजे ७½ कोटी आर्यावर्तांत आहेत. या ७½ कोटींपैकीं आग्रा, अलाहाबाद व अयोध्या या प्रांतांत ४⅘ कोटी असून २½ कोटी बंगाल्यांत व ⅜ कोटी नागपूर प्रांतांत आहेत. अर्थात् हिंदी भाषेचें स्वामित्व फारच विस्तीर्ण प्रदेशावर आहे; पण त्याच गोष्टी-मुळें सर्व हिंदी बोलणारांना एका अमलाखालीं ठेवावें हें म्हणणें मात्र सयुक्तिक नाहीं; कारण जवळ जवळ निम्या हिंदुस्थानच्या लोकांचा एकच प्रांत करणें राज्यव्यवस्थेस सोईचें होणार नाहीं हें आपलें आपणासच कबूल केलें पाहिजे; आणि हिंदी भाषा बोलणारांनाही आपल्या बंधुत्वाचा प्रदेश इतका विस्तारला आहे या गोड कल्पनेनें, एका अमलाखालीं राहण्याचें न साधणें ही हानि असली तरी ती इतर रीतीनें भरून आलीसें खचित वाटेल.

बंगाली भाषा बोलणाऱ्या ४½ कोटी लोकांपैकीं शेंकडा ९३ लोक खुद्द बंगाल्यांत आहेत. बंगाल व आसाम यांच्याबाहेर बंगाली बोलणाऱ्या लोकसंख्येपैकीं शेंकडा फार तर पांच लोक सांपडतील. बंगाली भाषा बोलणारांची सुमारें ४ कोट लोकसंख्या म्हणजे प्रचंड खरी, तरी ती अवघ्या सव्वा लक्ष चौरस मैलांत ठेंचून भरली आहे. यामुळें बंगाली लोकांना आपण एक राष्ट्र आहों असें नेहमीं वाटतें; व या एका राष्ट्राची विनाकारण दोन राष्ट्रें केलीं म्हणूनच त्यांना राग आला. बंगाली लोकां-प्रमाणेंच तेलगू भाषा बोलणारांची ही स्थिति आहे. २ कोटी तेलगू लोकां-पैकीं मद्रास इलाख्यांत शेंकडा ७३ असून, मोंगलाई व म्हैसूर या दोन संस्थानांत मिळून शेंकडा २६ आहेत. पण भाषावार प्रांतरचनेचा विचार करतांना आपण फक्त ब्रिटिश मुलखांतील प्रजेचाच विचार करावयास पाहिजे;

कारण भाषावार प्रांतांची पुनर्रचना करण्याकरितां ब्रिटिश सरकार व देशी संस्थानिक यांनीं मुलखांची अदलाबदल करावी हें जरी कल्पनेला अगम्य नसलें तरी व्यवहारांत तूर्त अशक्य आहे, म्हणून विचाराची ती बाजूच सोडून देणें प्राप्त आहे. असो; देशी संस्थानांत पसरलेली तेलगू लोकसंख्या सोडली तर शेंकडा ९८ इतके तेलगू लोक मद्रास इलाख्यांत एकत्र एकाच अमलाखालीं आहेत; सबब भाषावार प्रांतरचनेच्या बाबतींत तेलगू राष्ट्राची कांहीं तक्रार असण्याचें कारण नाहीं. पंजाबी लोकांची स्थिति तेलगूहूनहि अधिक बरी आहे. कारण एकंदर पंजाबी बोलणाऱ्या १$\frac{३}{४}$ कोटी लोकांपैकीं शेंकडा ९९॥ लोक खुद्द पंजाबांतच आहेत. पंजाबाबाहेर आहेत त्यांत पंचवीस हजार सिंध प्रांतांत आहेत, व त्याच्या खालोखाल आग्रा-अलाहाबाद प्रांतांत सिंधच्या निम्मे म्हणजे फक्त बारा साडेबारा हजार आहेत. अर्थात् शेंकडा ९९॥ पंजाबी पंजाबांत एकत्र एका अमलाखालीं असल्यामुळें भाषावार प्रांतरचना करण्यासंबंधानें पंजाबास हात लावण्याचें कारण नाहीं; व हात लावावयाचा झालाच तर सिंधप्रांत पंजाबास जोडावा म्हणजे पंजाब व सिंध दोन्ही प्रांतांस इष्ट अशीच गोष्ट घडून येऊन शेंकडा जवळजवळ शंभर इतके पंजाबी लोक एकराष्ट्रीयत्वाच्या कल्पनेप्रमाणें एकत्र होतील.

तामीळ भाषा बोलणाऱ्या १$\frac{१}{२}$ कोटी लोकांपैकींहि शेंकडा ९८ मद्रास इलाख्यांत व शेंकडा १ म्हैसुरांत आहेत; म्हणजे ब्रिटिश इलाख्यापुरतें बोलावयाचें तर शेंकडा जवळजवळ शंभर इतके तामीळ लोक एका अमलाखालीं एक राष्ट्र म्हणून नांदत आहेत. गुजराथी भाषा बोलणाऱ्या १$\frac{१}{४}$ कोटी लोकांपैकींही शेंकडा ९८ मुंबई इलाख्यांत आहेत. पैकीं शेंकडा ७८ ब्रिटिश मुलखांत व शेंकडा २० बडोदें राज्यांत आहेत. अर्थात् बडोदें संस्थान वरील विशिष्ट विचारसरणीमुळें बाजूस सोडलें तर, बहुतेक गुर्जर लोक एकराष्ट्ररूपच आहेत. मुंबई इलाख्याबाहेर गुर्जर लोक इतर कित्येक लोकांच्या मानानें बरेच पसरले आहेत. मद्रास इलाख्यांत $\frac{३}{४}$ लक्ष, मध्यप्रांत व वऱ्हाड मिळून $\frac{१}{२}$ लक्ष, मोंगलाईत $\frac{१}{४}$ लक्ष, आग्रा प्रांतांत ५ हजार वगैरे. परंतु इतक्या दूर पसरलेल्या इतक्या थोड्या लोकांना, आम्हाला व गुजराथेंतल्या गुर्जरांना एकत्र करा असें म्हणणें शक्य किंवा योग्य नाहीं.

ऊरिया बोलणारे लोक फार तर एक कोटि भरतील. यांपैकीं परवापर्यंत शेंकडा ६९ बंगाल्यांत, शेंकडा १६ नागपूर प्रांतांत, शेंकडा १४ मद्रास इलाख्यांत व शेंकडा १ इतर प्रांतांत असे ते वांटले गेले होते. हल्लीं बंगालची पुनर्रचना झाल्यापासून बंगाल्यांत समाविष्ट होणारे शेंकडा ६८ लोक यापुढें बहार प्रांतांत समाविष्ट होणार. पण कसेंही झालें तरी ऊरिया बोलणारांची लोकसंख्या थोडी असल्यामुळें तिचा स्वतंत्र असा प्रांत होऊं शकत नाहीं; यामुळें ती तितकी मोठी होईपर्यंत प्रांत-वार पुनर्रचनेंत तिचें गाऱ्हाणें फारसें कोणी ऐकणार नाहीं. मल्याळम् भाषा बोलणारांची संख्या अर्ध्या कोटीवर आहे. पण तिच्यापैकीं शेंकडा ९९ लोक मद्रास इलाख्यांतच आहेत. सिंधीचीहि गोष्ट तशीच आहे; कारण २५ लक्ष सिंधी बोलणाऱ्या लोकसंख्येपैकीं शेंकडा ९९ लोक सिंधप्रांतांतच आहेत.

पण मराठी, कानडी, उर्दू या भाषांची स्थिति वरच्याहून निराळी आहे; म्हणजे यांपैकीं प्रत्येक भाषा बोलणारी लोकसंख्या एकत्र एका अमलाखालीं राहत नसून पसरली आहे. मराठी बोलणाऱ्यांची वांटणी अशी झालेली आढळते-शेंकडा ५६ मुंबई इलाखा, १८ निजामचें राज्य, १२ वऱ्हाड प्रांत, ११ मध्यप्रांत, १½ मद्रास वगैरे इतर प्रांत. कानडी भाषा बोलणाऱ्या एक कोटि लोकांपैकीं शें० ३७ म्हैसूर प्रांतांत, ३१ मुंबई इलाख्यांत, १५ मद्रास इलाख्यांत, १५ निजामच्या राज्यांत, व २ इतर प्रांतांत अशी वांटणी झालेली आहे; आणि उर्दू किंवा मुसल-मानी भाषा बोलणारांपैकीं शें० ३३ निजामच्या राज्यांत, ३१ मुंबई इलाख्यांत, २३ मद्रास इलाख्यांत, ६ म्हैसूर प्रांतांत, ४ मध्यप्रांतांत, २ बडोदें प्रांतांत व २ कूर्ग प्रांतांत असे पसरले आहेत. उत्तरहिंदुस्तानचा उल्लेख वरील वाटणींत न येण्याचें कारण असें कीं, उत्तरहिंदुस्थानांतील मुसल-मान, पंजाबांत पंजाबी, आग्रा प्रांतांत हिंदी व उर्दू मिश्र, आणि बंगा-ल्यांत बंगाली अशा भाषा बोलतात. उत्तरहिंदुस्थानांतच मुसलमान लोकांची मुख्य वसति आहे. तथापि, त्यांस अमुकच एक प्रांत आपला असें म्हणतां येत नाहीं. पूर्व-बंगाल्यांत हिंदूहून मुसलमान अधिक आहेत खरें; तथापि ते सर्व प्रायः बंगालीच भाषा बोलतात; त्यांनीं धर्म मुसल-

मानी ठेवला तरी भाषा हिंदूंचीच पत्करली. पंजाबांत मुसलमानांची वस्ती हिंदूंच्या लोकसंख्येची बरोबरी करूं शकते. तथापि, त्यांची भाषा पंजाबीच आहे. उर्दूही ते बोलूं शकतात; पण 'फक्त उर्दू' बोलणाऱ्या मुसलमानांची अमुक एका प्रांतांत अमुक एक संस्था आहे असें कोठें दाखविलेलें आढळत नाहीं. अर्थात् मुसलमान लोकांना अमुक एक प्रांत आपला म्हणतां येत नाहीं. ज्यांची वाटणी हिंदी भाषेप्रमाणें सर्व उत्तर हिंदुस्थानभर झाल्यामुळें, व शिवाय ते संख्येनें थोडे असल्यामुळें, त्यांना एका अमलाखालीं एकवटणें शक्य नाहीं; व आपण एका अमलाखालीं असावें अशी त्यांची कधीं मागणीहि नव्हती. म्हणून कानडी व मराठी या भाषा पुरताच पुनर्रचनेचा प्रश्न उरतो. पण त्यांतूनहि पाहतां कानडी भाषा बोलणारांना एका अमलाखालीं करण्यास एक अडचण अशी आहे कीं, ती भाषा बोलणारांपैकीं शें० ५२ इतकी संख्या म्हैसूर व निजामशाही या वेगवेगळ्या दोन स्वतंत्र संस्थानांच्या अमलाखालीं आहे. व बाकी उरलेल्या शें.४८पैकीं २१ मुंबई इलाख्यांत व १५ मद्रास इलाख्यांत वाटण्यांत आलेली आहे; म्हणजे मद्रास व मुंबई या इलाख्यांतील कानडा लोकसंख्या एकत्र केली तरी ती एकंदरीच्या निम्याहून कमीच भरते. देशी संस्थानें सोडून दोन्ही ब्रिटिश इलाख्यांतील लोकसंख्या एका अमलाखालीं आणावयाची म्हटली तरी फक्त ४५ लक्ष लोकसंख्येचा स्वतंत्र प्रांत होऊं शकत नाहीं.

मराठीची गोष्ट मात्र या सर्वांहून विशेष व स्वतंत्र आहे; कारण मराठी बोलणारी शें० १८ इतकी संख्या निजामशाहींत, म्हणजे स्वतंत्र संस्थानच्या अमलाखालीं, म्हणून विचारांतून सोडून दिली तरी शें० ८२ इतकी संख्या खुद्द ब्रिटिश अमलाखालीं आहे. यांपैकीं सुमारें शें० २ इतकी संख्या दूर दूर पसरलेली सोडून दिली तरी जवळ जवळ शें० ८० इतकी लोकसंख्या मुंबई इलाखा, वऱ्हाड व नागपूर या एकमेकांस लागलेल्या प्रांतांमध्येंच आहे. ही सर्व संख्या एकत्र केली असतां तिचा स्वतंत्र प्रांत व स्वतंत्र राज्यव्यवस्थाहि होऊं शकेल इतकी ती मोठी आहे. आतां मुंबई इलाख्यांत या संख्येबरोबरच गुर्जर व कानडी लोक समाविष्ट झाले तरी तक्रार करण्याचें कारण नाहीं; कारण खरी तक्रार मराठी लोकांबरोबर

त्याच अमलाखालीं इतर भाषा बोलणारेहि लोक नसावे अशी नाहीं; तक्रार आहे ती इतकीच कीं, मराठी भाषा बोलणारांची सर्व लोकसंख्या एका अमलाखालीं असावी तशी ती नसतां विनाकारण दोन अमलाखालीं वांटली गेली आहे. मुंबई इलाख्यांत जितकी मराठी लोकसंख्या आहे, तिच्याबरोबर निम्मी नागपूर प्रांत व वऱ्हाड यांजमध्यें आहे; आणि हे प्रांत शिवेला शीव लागलेले असे आहेत. इतकी मोठी लोकसंख्या शिवेला शीव लागून असलेल्या प्रांतात इतक्या मोठ्या प्रमाणांत वांटलेली अशा प्रकारचें उदाहरण हिंदुस्थानांत दुसरें कोणतेंहि नाहीं. असलें उदाहरण १९०५ सालीं बंगालची फाळणी करून बंगाल्यांत निर्माण करण्यांत आलें होतें. परंतु बंगाली लोकांच्या चळवळीनें १९११ सालीं ती चूक रद्द करण्यांत आली. महाराष्ट्रीय लोक आपल्या फाळणीसंबंधानें 'चळवळ' करावी असें म्हणत नाहींत; तथापि बंगालच्या फाळणीपेक्षां ती पूर्वीची आणि तितकीच दोषपूर्ण असल्यामुळें सरकार ती आपण होऊन रद्द करतील, व चळवळीशिवाय आपण कोणतीही चूक दुरुस्त करण्यास तयार असतो' हें म्हणणें खरें करून दाखवितील अशी आम्हांस उमेद आहे.

मराठी भाषा ही प्रत्यक्ष संस्कृतापासून बनली असो किंवा प्राकृत भाषेपासून तयार झाली असो, तिचा विस्तार सर्व मध्यहिंदुस्थानभर होता व आहे हें निश्चित होय. मराठीची पश्चिम सरहद्द आरबी समुद्र, दक्षिण सरहद्द तुंगभद्रा नदी, पूर्व सरहद्द तेलंगण व ओरिसा प्रांत आणि उत्तर सरहद्द गुजराथ, राजस्थान व बुंदेलखंड–याप्रमाणें तिच्या सरहद्दी आहेत. यामुळें पोर्तुगीज, कानडी गुजराथी, हिंदी, ऊरिया वगैरे भाषांचे व मराठीचें मिश्रण या निरनिराळ्या सरहद्दीवर पहावयास सांपडतें. इंपिरियल गॅझिटियरकार म्हणतात कीं, वास्तविक आसामी भाषा व मराठी भाषा या इतक्या भिन्न दिसतात कीं, महाराष्ट्रीय व आसामी या लोकांना त्या परस्पर कळणार नाहींत; तथापि, देशी भाषांची अशी कांहीं गुंतागुंत असते कीं, ब्रह्मपुत्रा नदीचें कांठचें डिब्रुगड आणि आरबी समुद्रकिनाऱ्यावरील गोवा या दोन ठिकाणांमधील १५०० मैल प्रदेशांत कोठेंहि उभें राहिलें असतां, अमुक एक भाषा येथें संपली आणि अमुक एक भाषेस येथून

प्रारंभ झाला हें सांगणें अशक्य आहे. मराठीचा आसपासच्या भाषांशीं इतका निकट संबंध असला तरी, मराठीच्या खास म्हणून क्षेत्रमर्यादा ठरविणें जरूर आहे; आणि या मर्यादा कोणत्या हें आम्हीं वरील सरहद्दी सांगतांना दर्शविलेंच आहे. प्रस्तुत मुद्दा इतकाच आहे कीं, या विस्तीर्ण मर्यादेपैकीं अमुक एक भाग मराठी भाषेचा असें ठरवून तो सर्व राज्यव्यवस्थेच्या दृष्टीनें एका अमलाखालीं आणवितां येणें शक्य आहे कीं नाहीं?

आतां मुंबई इलाख्यांत महाराष्ट्र समाविष्ट होतो हें तर ठीकच आहे. परंतु मुंबई इलाख्याबाहेरहि एक महाराष्ट्र आहे ही गोष्ट मात्र अधिकाऱ्यांच्या व इतरांच्या लक्षांत सहसा येत नाहीं. हा दुसरा महाराष्ट्र वऱ्हाड व ( नागपूर ) मध्यप्रांत यांजमध्यें असून मुंबई इलाख्यापासून तो आज तुटून आहे; पण ऐतिहासिक दृष्ट्या हा दुसरा महाराष्ट्रच मूळचा जुना महाराष्ट्र होय. नर्मदा व कृष्णा या दोन नद्यांमधील मुलखास महाराष्ट्र म्हणजे मराठी बोलणारांचें राष्ट्र ही पूर्वापार संज्ञा आहे; परंतु हा सर्व मुलूख आज एका अमलाखालीं नाहीं. खानदेशच्या पूर्वेचा सुमारें ३७ हजार चौरस मैलांचा प्रदेश म्हणजे सर्व वऱ्हाड ( १७ हजार चौ. मै. ) आणि मध्यप्रांतांपैकीं नागपूरभागांपैकीं नागपूर, भंडारा, चांदा, वर्धा, ( २० हजार चौ. मै. ) हे चार जिल्हे—हा सर्व प्रांत वास्तविक महाराष्ट्रांतच गणण्याचा असून तो प्रत्यक्ष ब्रिटिश अमलाखालींच आहे. याशिवाय मोगलाईतील उत्तरेचा म्हणजे गोदावरीच्या कांठचा प्रदेश हा महाराष्ट्राचाच भाग होय. पण तो एका स्वतंत्र देशी संस्थानाच्या अमलाखालीं असल्यामुळें प्रस्तुत बाबतींत विचारांत घेण्याचें कारण नाहीं. नागपूर प्रांतांत प्रारंभीं गोंड लोकांचें राज्य होतें. सन १७४०-५०च्या दरम्यान भोंसले नामक मराठा घराण्यानें देवगड, छत्तीसगड व चांदा येथील राज्यें आपल्या ताब्यांत घेतलीं. भोंसले हे पेशव्यांचे कांहीं अंशीं प्रतिस्पर्धी होत; तथापि कित्येक प्रसंगीं त्यांनीं मराठ्यांशीं संगनमतानें राजकीय धोरण ठेवलें होतें. सन १८१८ सालीं पेशवाईचा शेवट झाला, त्याच सालीं आप्पासाहेब भोंसले यांस पदच्युत करण्यांत आलें. तथापि भोंसल्यांचें राज्य खालसा केलें गेलें नाहीं. सन १८५३ सालीं रघूजी भोंसले हे निपुत्रिक मरण पावल्यामुळें डलहौसीसाहेबांच्या त्यावेळच्या धोरणाप्रमाणें नागपूर प्रांत

बिनवारशी म्हणून खालसा करण्यांत आला. १८६० सालीं गोदावरी तीरावरील चांदा जिल्ह्याचे सहा तालुके निजामाकडून इंग्रजांस मिळाले ते नागपूर प्रांतास जोडण्यांत आले. त्यापैकीं भद्राचलं आणि राकपल्ली हे १८७४ सालीं मद्रास इलाख्यास जोडण्यांत येऊन बाकीचे चार तालुके अद्यापि नागपूर प्रांतांतच समाविष्ट आहेत व या चारहि तालुक्यांत महाराष्ट्रीयांची वस्ती आहे. यावरून हें उघड दिसून येईल कीं, महाराष्ट्र व नागपूर प्रांत हे निरानिराळ्या वेळीं व तुटक रीतीनें इंग्रजी अमलाखालीं आले. पण मध्यप्रांत मुंबई इलाख्यास न जोडण्याचें याहून एक बलवत्तर कारण असें दिसतें कीं, या दोन प्रांतांचे दरम्यान वऱ्हाड प्रांत असून वऱ्हाड प्रांत हा आपला आहे अशी ममत्व बुद्धि इंग्रज सरकारच्या मनांत १९०३पर्यंत—म्हणजे त्या प्रांताचा कायम भाडेपट्टा होईपर्यंत—उत्पन्न झाली नाहीं. अर्थात् अर्धवट स्थितींत लोंबत असलेला हा वऱ्हाड प्रांत मध्यें आडवा असतांना नागपूर मुंबईस कसें जोडतां येणार ? प्रांत एकमेकांस जोडावयाचे ते सारख्या प्रकारच्या स्थितींत असावे लागतात, व तसें नसल्यामुळेंच वऱ्हाड प्रांत नागपूर प्रांतास जोडावयाचा तो १९०३ पर्यंत न जोडतां स्वतंत्र व्यवस्थेखालींच ठेवण्यांत आला होता. पण १९०३ सालीं तरी ही सर्वच चूक एकदम दुरुस्त व्हावयास पाहिजे होती. कारण मध्यप्रांताच्या १८ जिल्ह्यांपैकीं फक्त ४ च जिल्हे मराठी भाषा बोलणारे, परंतु ते दूरचे, आणि दरम्यान वऱ्हाड, म्हणून ते मुंबईस जोडण्याचा प्रश्न पूर्वी निवर्ण शक्य नसले तरी, खुद्द वऱ्हाडच जेव्हां कायम भाडेपट्टयानें, म्हणजे गर्भित मालकी हक्कानें इंग्रजांच्या स्वाधीन झाला तेव्हां वरील दोन्ही अडचणी सरकारच्या मार्गांत नव्हत्या. कारण वऱ्हाड हा मुंबई इलाख्यास लागून आहे आणि सर्व वऱ्हाडचे सहाच्या सहा जिल्हे निव्वळ मराठी भाषा बोलणाऱ्या लोकांचेच आहेत.

वऱ्हाड सन १२९४ पासून दिल्लीच्या बादशहांच्या अमलाखालीं गेलें. सोळाव्या शतकाच्या प्रारंभापासून तें स्वतंत्र मुसलमानी राज्यांपैकीं एका राज्यांत म्हणजे इमादशाहींत सामील झालें. नंतर कांहीं वर्षे नगरच्या पातशाही अमलाखालीं गेल्यावर तें १७३० सालीं फिरून दिल्लीच्या मोंगलांच्या व १७२० सालीं निजामाच्या ताब्यांत गेलें, ते १८५३ पर्यंत

त्याच्या ताब्यांत होतें. १८५३ सालच्या तहानें वऱ्हाड इंग्रजांच्या ताब्यांत गेलें तरी त्याच्या उत्पन्नाचा हिशेब निजामास द्यावा लागे. १८५७ त ही हिशेबाची अडचण काढून टाकण्यांत आली, पण कर्ज देऊन टाकून निजाम कदाचित् हा प्रांत इंग्रजांकडून परत मागेल ही भीति शिल्लक होतीच; व प्रसिद्ध मुत्सद्दी सर सालरजंग यांनीं वऱ्हाड सोडवून घेण्याचा भगीरथ प्रयत्न चालविलाहि होता. १९०३ सालीं कायमच्या भाडे-पट्ट्यामुळें ही भीति नाहींशीं झाली. अर्थात् वऱ्हाड त्याच वेळीं मुंबई इलाख्यास जोडावयास पाहिजे होता. कारण भाषा व इतिहास यांच्या दृष्टीनें वऱ्हाड हा नागपूरपेक्षां महाराष्ट्रासच अधिक चिकटलेला आहे. मुसलमानी अमलाखालीं जाण्यापूर्वी वऱ्हाड प्रांत कल्याण येथील रजपूत राजे व देवगड (दौलताबाद) येथील मराठे राजे यांचे ताब्यांत जाऊन येऊन असे. औरंगजेबाच्या मरणानंतर फेरुकशेर बादशहाच्या कारकीर्दींत मराठ्यांनीं चौथाई व सरदेशमुखी वसूल करण्याचा हक्क ज्या सहा सुभ्यांवर मिळविला त्यांपैकीं वऱ्हाड हा एक होताच. पण त्याच्या पूर्वीहि बादशहांच्या ताब्यांत वऱ्हाड असतां बादशहाशीं स्पर्धा करून आपले जहागीरदार नेमून वऱ्हाडांतून खंडणी वसूल करण्याचें काम मराठ्यांनीं चालू ठेवलेंच होतें. मराठे हे मूळचे रहिवाशीच वऱ्हाड प्रांताकडचे. ते मागाहून गोदावरीच्या अलीकडे आले; व कृष्णानदीच्या कांठची मराठ्यांची वसाहत बरीच अलीकडची आहे. गोदावरीच्या उत्तरतीराला मराठ्यांची वसाहत होती अशा एका काळीं दक्षिणेकडील हल्लींच्या महाराष्ट्राचा मुलुख अरण्य-मय होता. धार्मिक किंवा ऐतिहासिकदृष्ट्या प्रसिद्ध अशीं स्थानें या जुन्या महाराष्ट्रांत आढळतात तितकीं नव्या व आधुनिक महाराष्ट्रांत आढळत नाहींत, ही गोष्ट डॉ. सर रामकृष्ण गोपाळ भांडारकर यांचा दख्खनचा इतिहास आणि गेल्या वीसपंचवीस वर्षांतील रा. राज-वाडेप्रभृति इतिहास संशोधकांचे शोध यांवरून उघड होते. आर्य लोक उत्तरेकडून विंध्याद्रीचे अलीकडे आल्यावर त्यांची पहिली वसाहत वैदर्भ म्हणजे वऱ्हाड या प्रांतांतच झाली. पूर्वीची वसाहत पूर्वपश्चिम अशी पसर-लेली होती. मोठमोठे व जुने मार्ग उत्तरदक्षिण नसून पूर्वपश्चिम जात. पश्चिम

किनाऱ्यापासून घाट चढून महाराष्ट्राचे हे मुख्य मार्ग गोदावरीच्या प्रदेशांतून पूर्व समुद्राकडे जात. हल्लीं आगगाडीच्या रस्त्यांचाच परिचय असल्यामुळें महाराष्ट्र व महाराष्ट्रांतील मार्ग हे आपणास उत्तरदक्षिण पसरलेले आहेत असें दिसतें, परंतु आगगाडीच्या पूर्वीच्या मार्गांच्या अनुरोधानें पहातां जुनें महाराष्ट्र हें नाशिक ते कऱ्हाड या रुंदीच्या पट्टीनें पूर्वोत्तर दिशेस वर थोडें झुकतें असें पूर्व समुद्राकडे पसरलें होतें. जुन्या महाराष्ट्रीय राजांच्या राजधान्या याच पूर्व पश्चिम टापूंत होत्या, हें जुनी ताम्रपत्रें व शिलालेख यांवरून उघड दिसतें. मुकुंदराज, जनार्दनस्वामी, एकनाथ ही सर्व मंडळी जुन्या महाराष्ट्रांतलीच होत. मराठे सरदार व राजे, शिवाजीच्या पूर्वजांसुद्धां, बहुतेक या जुन्या महाराष्ट्रांतलेच वतनदार इनामदार होते. तात्पर्य, अशा रीतीनें नव्या व जुन्या महाराष्ट्रांचा पूर्वी एकजीव होता; म्हणून हल्लीं ब्रिटिश अमलाखालींहि तीं दोन महाराष्ट्रें प्रत्यक्ष एकाच अमलाखालीं असणें जरूर आहे.

व्यावहारिक दृष्ट्या सर्व मराठी बोलणारे लोक एका अमलाखालीं असणें यांत लोकांच्या दृष्टीनें तर सर्व सोयच आहे. पण प्रजाजनांप्रमाणें अधिकाऱ्यांनाहि ही गोष्ट सोईची आहे काय? असा प्रश्न सहजच उपस्थित होतो; व ती सोईची असेल तरच या ठिकाणीं भाषावार प्रांतांची पुनर्रचना संभवणार! सबब राज्यकारभाराच्या दृष्टीनें सोय गैरसोय काय आहे हें प्रथम पाहिलें पाहिजे. मुंबई इलाख्याबाहेर पण मुंबई इलाख्यास अगदीं लागून असणाऱ्या महाराष्ट्रीय लोकांच्या वसतीचें क्षेत्र सुमारें २०+१७=३७ हजार चौरस मैल आणि लोकसंख्या २०+२५=४५ लक्ष आहे. हें सर्व क्षेत्र आजच्या मुंबई इलाख्यास जोडलें असतां त्याचें क्षेत्रफळ १ लक्ष २३ हजार+३७ हजार=१ लक्ष ६० हजार चौरस मैल, आणि लोकसंख्या अदमासें १ कोटी ९० लक्ष+४५ लक्ष म्हणजे फारच तर २$\frac{१}{२}$ कोटी होईल. अर्थात् हें एवढें क्षेत्र व ही एवढी लोकसंख्या मुंबई सरकारास राज्यकारभाराला फार अवजड होईल असें कोणासहि म्हणतां येणार नाहीं. कारण याहीपेक्षां लोकसंख्येनें व क्षेत्रविस्तारानें मोठे असे इलाखे आहेत हें खालील कोष्टकावरून उघड दिसून येईल.

| प्रांतांचें नांव | क्षेत्रफळ (चौ. मैल) | | लोकसंख्या | | अमलदाराचा दर्जा |
|---|---|---|---|---|---|
| | लक्ष. | हजार | कोटी | लक्ष | |
| ब्रह्मदेश | १ | ७० | ० | ९० | ले. गव्ह. |
| १ बंगाल– | | | | | |
| (फाळ. पूर्वीचा) | १ | ५१ | ७ | ५० | ले. गव्ह. |
| २ बंगाल } पूर्व– | १ | ०६ | ३ | १३ | ले. गव्ह. |
| (फाळ.नंतर) } पश्चि– | १ | ३५ | ५ | २७ | ले. गव्ह. |
| ३ बंगाल | | | | | |
| (फाळ. रद्द झा. नं.) | १ | ७० | ४ | २० | ले. गव्ह. |
| बहार ओरिसा व छोटानागपूर | १ | १३ | ३ | ५० | ले. गव्ह. |
| मद्रास | १ | ४२ | ३ | ८० | गव्हर्नर |
| मुंबई | १ | २३ | १ | ९० | गव्हर्नर |
| संयुक्तप्रांत | | | | | |
| (आग्रा–अलाहा.) | १ | ७ | ४ | ८० | ले. गव्ह. |
| मध्यप्रांत | | | | | |
| (नागपूर व वऱ्हाड) | १ | ४ | १ | ३० | चीफ कमिश. |
| पंजाब | ० | ९७ | २ | ० | ले. गव्ह. |
| आसाम | ० | ४९ | ० | ६० | चीफ कमिश. |

वरील कोष्टकावरून दुसरें असेंहि दिसून येईल कीं, हल्लीं असलेल्याच मुंबई इलाख्यास वऱ्हाड सर्व आणि नागपूर प्रांताचे चार जिल्हे जोडले तरी त्याचें क्षेत्रफळ ब्रह्मदेशाहून कमी, आणि लोकसंख्या बंगाल, मद्रास, संयुक्तप्रांत–आणि कदाचित् पंजाबहि–या चार प्रांतांहून कमी भरेल.

परंतु खरोखर भाषावार प्रांतरचना करावयाची तर पूर्वेस जशी मुंबई इलाख्यांत भर पडेल तसाच उत्तरेकडील एक भाग त्यांतून काढून घ्यावा लागेल. हा भाग म्हणजे सिंध प्रांत होय. सिंध प्रांताचें क्षेत्रफळ सुमारें ४८ हजार चौ. मै. असून त्याची लोकसंख्या सुमारें २६ लक्ष आहे. अर्थात् सिंध प्रांत मुंबई इलाख्यांतून काढल्यास मुंबई इलाख्याचा दर्जा लोकसंख्येच्या दृष्टीनें पूर्वींप्रमाणें म्हणजे सर्व हिंदुस्थानांत पांचवा राहीलच

पण क्षेत्रफळाच्या दृष्टीनेंहि तो दर्जा (१६०–४८=११२ हजार चौ. मै.) जवळ जवळ तितकाच खालीं राहील. ब्रह्मदेश व मद्रास हे तर या नवीन मुंबई इलाख्यापेक्षां क्षेत्रफळानें मोठे राहतीलच, परंतु नवीन बंगाल, बहार ओरिसा, संयुक्तप्रांत व हल्लींचा नागपूर प्रांत यांच्या फार तर जवळ जवळ नवीन मुंबई इलाखा येऊन बसेल; कारण त्याचें क्षेत्रफळ १ लक्ष आणि १ लक्ष १२ हजार चौ. मैलांच्या आंत राहील. मुंबई इलाख्यांतून सिंध प्रांत काढून त्याला मराठी भाषा बोलणाऱ्या लोकांचा प्रांत जोडल्यास एकंदरीनें नवीन बनणारा मुंबई इलाखा हल्लींपेक्षां क्षेत्रफळानें अधिक लहान व राज्यकारभारास अधिक सुटसुटीत असाच होईल.

| | क्षेत्र. | लोक सं. |
|---|---|---|
| | ल. ह. | को. स. |
| **हल्लींचा मुंबई इलाखा** | १ २३ | १ ९० |
| अधिक वऱ्हाड, व नागपूर | ० १७ | ० २७ |
| पैकीं चार मराठी जिल्हे | ० २० | ० २४ |
| | १ ६० | २ ४१ |
| उणें सिंध प्रांत | ० ४८ | ० २४ |
| **नवा मुंबई इलाखा** | १ १२ | २ १६ |

लोकसंख्येपेक्षां क्षेत्रविस्तार हाच राज्यकारभारास अधिक महत्वाचा प्रश्न आहे. कारण क्षेत्रविस्तार फार असल्यास अधिकाऱ्यांस स्वतः जाऊन सर्व मुलखाची पाहणी तपासणी करितां येत नाहीं. पण त्याच क्षेत्रमर्यादेंत लोकसंख्या खूप खेंचून भरली असली तरी त्रास होत नाहीं. बंगाल्या-खालोखाल लोकसंख्येनें संयुक्त प्रांतच सर्व हिंदुस्थानांत मोठा आहे. परंतु त्या प्रांताचें क्षेत्रफळ फक्त १ ल. ७ हजार असल्यामुळें त्या प्रांताचे दोन विभाग करण्याचा प्रश्न उद्भवण्याचा संभव नाहीं. त्याचप्रमाणें फाळणी रद्द झाल्यानंतरचा म्हणजे नवीन बंगाल यांतील लोकसंख्या ४ कोटीवर आहे, म्हणजे मुंबई इलाख्याच्या दुप्पट आहे; तथापि क्षेत्रफळ ७० हजार चौरस मैल असल्यामुळें राज्यकारभारास सोईस्कर असाच तो प्रांत मानला गेला आहे. तात्पर्य, सिंध न तोडतांहि जुना महाराष्ट्र मुंबई इलाख्यास

जोडला तरी त्याची लोकसंख्या जास्तींत जास्त २$\frac{१}{२}$ कोटि, व सिंध तोडला तर फक्त २$\frac{१}{४}$ कोटि होणार असल्यानें, लोकसंख्येच्या दृष्टीनें आम्ही सुचवित आहों ही प्रांतरचना विशेष गैरसोयीची होणार नाहीं; आणि क्षेत्र-विस्ताराच्या दृष्टीनें ती पूर्वींहून अधिक गैरसोईची होणार नाहीं. इतकेंच नव्हे तर उलट हल्लींहून अधिक सोईचीच होणार आहे.

बंगालची फाळणी रद्द करून राज्यकारभाच्या सोईकडे लक्ष पुरवून, बहार प्रांतास ओरिसा व छोटा नागपूर हे प्रांत जोडून, ले. गव्हर्नरी अमलाखालीं जो एक नवीन प्रांत हल्लीं सरकारनें निर्माण केला आहे त्यापेक्षां, आमच्या सूचनेप्रमाणें महाराष्ट्राची फाळणी रद्द झाल्यानें बनणारा मुंबई इलाखा, क्षेत्रफळ व लोकसंख्या दोन्ही दृष्टींनीं लहान होईल.

| | क्षेत्र. | लो. सं. |
|---|---|---|
| नवा बहार प्रांत | १ १३ | ३ ५० |
| नवा मुंबई प्रांत | १ १२ | २ १६ |

लांबीरुंदीच्या दृष्टीनें पाहतां सिंध धरून हल्लींचा मुंबई इलाखा पूर्व-पश्चिम ७६ पासून ६६ म्हणजे १० रेखांश, आणि उत्तरदक्षिण १३ पासून २८ म्हणजे १५ अक्षांश इतका पसरला आहे. पण सिंध तोडून व वऱ्हाड वगैरे जोडून जो मुंबई इलाखा होईल त्याचा विस्तार पूर्व-पश्चिम ७२ पासून फार तर ८० म्हणजे फक्त ८ रेखांश आणि उत्तर दक्षिण १३ पासून २३ म्हणजे १० अक्षांश इतकाच होईल. म्हणजे नवीन मुंबई इलाखा २ रेखांश आणि ५ अक्षांश इतक्यांनीं विस्ताराला कमी भरेल—अर्थात् तो राज्यकारभारास अधिक सोईचा होईल. हीच गोष्ट दुसऱ्या एका रीतीनें व्यक्त करावयाची तर असें म्हणतां येईल कीं, आजच्या मुंबई इलाख्याची उत्तरदक्षिण लांबी जी सुमारें १००० मैल आहे, ती नव्या प्रांतरचनेंत ६०० मैल होईल आणि पूर्वपश्चिम रुंदी आज जी ४०० मैल आहे ती नव्या प्रांतरचनेंत फार तर ६०० मैल भरेल.

सिंधप्रांत मुंबईपासून फार लांब असल्यामुळें अर्थातच त्याच्या राज्यकारभाराची हेळसांड होते. पुण्या—मुंबईस मुंबईचे गव्हर्नर दर वर्षांतून चार चार महिने असतात. पण सिंध प्रांतांत गव्हर्नरसाहेबांची स्वारी पांच वर्षांच्या मुदतींत फार तर एखादे वेळ गेली तर गेली! आणि गव्हर्नर-

साहेबांच्या नजरेस फारसे न पडणारे भाग मागसल्यास त्यांत काय नवल ? सिंधच्या अगदीं दक्षिण सरहद्दीवर, म्हणजे मुंबईला सर्वांत जवळ, असलेलें जें सिंधी शहर कराची तेथें मुंबईहून आगगाडीनें जाण्यास जवळ जवळ तीन दिवस लागतात. आणि समुद्राच्या प्रवासास तर विशेष अडचणी आहेत. कारण कराचीस जाणाऱ्या बोटी मुंबईहून आठवड्यांतून फक्त दोन वेळां सुटतात. पावसाळ्यांत जलमार्गानें जाणें अर्थातच फार धोक्याचें असतें. कराचीपासून पुढें उत्तरेस सर्व सिंधप्रांत बलुचिस्थानापर्यंत पसरला आहे. अर्थात् एक टोंक कुमठा होनावर व दुसरें टोंक जेकबाबाद, म्हणजे जवळ जवळ हिंदुस्थानच्या पश्चिम सरहद्दीचा बराच मोठा भाग मुंबई इलाख्याची पश्चिम सरहद्द हा आहे. एवढ्या मोठ्या व लांबच्या इलाख्याचा कारभार कोणाहि गव्हर्नरास कसा करितां येणार ?

सरकारी संबंध सोडला तर सिंध प्रांतांतील आणि मुंबई प्रांतांतील लोक यांचा परस्पर संबंध फारच थोडा येतो. याचें मुख्य कारण भाषाभिन्नत्व होय. सिंध प्रांतांतील २६ लक्ष लोकसंख्येपैकीं जवळ जवळ शें. ९९ लोक सिंधी भाषा बोलणारे आहेत. बाकीच्या मध्यें मराठी बोलणारे सुमारें १० हजार व गुजराथी बोलणारे ७५ हजार आहेत. सिंधांत गुजराथी बोलणारे ७५ हजार लोक असले तरी, गुजराथेंत सिंधी बोलणारे फारच थोडे लोक आहेत. पण सिंध व पंजाब यांचा परस्पर संबंध मात्र अधिक जवळचा आहे; कारण सिंधांत जितके पंजाबी भाषा बोलणारे (सुमारें २४ हजार) लोक आहेत तितकेच जवळ जवळ (म्हणजे २५ हजार लोक) पंजाबांत सिंधी बोलणारे आहेत. भाषाभिन्नत्व असल्यामुळें मुंबई व सिंध यांत जें अंतर पडतें त्यांत व्यवहाराभिन्नत्वामुळें भरच पडते. गुजराथ व महाराष्ट्र या प्रांतांत भाषा भिन्न असल्या तरी त्यांचें व्यापारी दळणवळण फार आहे. मुंबई शहरांत मराठी व गुजराथी सररास चालू असल्यामुळें मुंबई शहर हा या दोन प्रांतांस जोडणारा एक पूलच आहे. सिंध व गुजराथ जवळ जवळ असतांहि महाराष्ट्र आणि गुजराथ यांच्याइतके दळणवळण त्यांच्यांत नाहीं. व्यापाराप्रमाणें राजकीय बंधनानें राष्ट्रीयत्वाच्या भावनेस मदत होते खरी, तथापि राजकीय बाबतींतहि सिंध मुंबई इलाख्यापासून बराच तुटून आहे. मुंबई इलाख्याची एक प्रांतिक सभा एके वेळीं कराचीस भरली होती

खरी; परंतु तिला इकडून दहापांच प्रतिनिधीहि गेले नव्हते. मुंबईस भरलेल्या एका प्रांतिक परिषदेस एका सिंधी गृहस्थास अध्यक्ष नेमण्यांत आलें होतें खरें; परंतु त्या सभेस सिंधांतील दहापांच प्रतिनिधीहि मुंबईस आले नव्हते. "At none of the previous eight Conferences was Sindh represented not one delegate from that Province had taken part in any of the matters discussed at any of the Provincial Conferences" (कराची प्रांतिक सभेचा रिपोर्ट पहा) मुंबई-कायदेकौन्सिलांत सिंधचे दोन प्रतिनिधी असतात; पण कायदेकौन्सिलच्या कामांत सरकारच्या किंवा लोकांच्या दृष्टीनें सिंधचा फारच थोडा उल्लेख होत असतो. मुंबई हायकोर्टांत सिंधी असा एकहि वकील नाहीं; मुंबईच्या कॉलेजांतून सिंधी विद्यार्थी फार तर दहापांच असतात. मुंबई इलाख्यांतील बड्या सरकारी नोकरांच्या यादींत फार तर तीन चार नांवें सांपडतील. इकडील कांहीं कांहीं लोकांस नोकरीमुळें सिंधांत जावें लागतें. पण बहुतेकास तें काळेंपाणी असेंच वाटतें. पुर्वी मंडलीक, नूलकर, वैद्य, परमानंद, भांडारकर, देशपांडे, मोडक, कुंटे, राजवाडे वगैरे इकडील सुशिक्षितांच्या पहिल्या दुसऱ्या पिढींतले लोक सिंध प्रांतांत नोकरीस गेले होते; व पब्लिक वर्क्स' खात्यामुळें ही परंपरा अद्यापीहि मोडली नाहीं. तथापि, त्या लोकांपैकीं कोणीहि कधीं सिंधांत वसाहत करून राहिले नाहींत. सिंधांतून नोकरीकरितां इकडे येणाऱ्या लोकांचीहि तीच गोष्ट आहे. नोकरच काय, पण व्यापारी वर्गांतील लोकहि इकडचे सिंधांत किंवा सिंधांतले इकडे येऊन राहिल्याचीं फारशीं उदाहरणें नाहींत. आणि दूरचा पल्ला, आणि भाषा व रीतभात यांतील फरक यामुळें असें पुढेमागें होण्याची फारशी आशाहि नाहीं. १८९६ सालीं कराची येथें भरलेल्या प्रांतिक परिषदेच्या स्वागत कमिटीचे अध्यक्ष ना. अल्लाबक्षखान तळपुर यांनीं आपल्या भाषणांत या गोष्टीचा थोडक्यांत उल्लेख केला होता. ते म्हणाले!—"One great fact that strikes us most as the cause of all our political and general backwardness is the extremely isolated position of Sindh. Cribbed, cabinned and confined within our narrow limits, and under an administration which is not much influenced by the

march of events and public opinion in the Presidency, we move too slowly for the times, and our social material and moral progress is impeded."

दिल्ली ही हिंदुस्थानची राजधानी झाल्यामुळें कराची बंदरास यापुढें विशेष महत्व येण्याचा संभव आहे. हल्लीं मुंबईकडून जाणारें विलायतचें टपाल कराचीकडून दिल्लीस गेल्यास एक दिवसाचा तरी उशीर वाचेल. आणि कराची बंदराची भरभराट झाल्यास सिंध प्रांताच्या भरभराटीस मदत होईल. पण एका म्यानांत दोन तरवारी जशा नांदत नाहींत तशीच कराची व मुंबई हीं दोन महत्त्वाचीं बंदरें एकाच इलाख्यांत राहणें शक्य नाहीं. मुंबई इलाख्यापासून सिंध प्रांत तोडावा असें सर्वांचें एकमत आहे. आतां तो मुंबईपासून तोडल्यास पंजाबास जोडावा किंवा स्वतंत्र ठेवावा हा एक निराळाच प्रश्न आहे; पण तो विषय प्रस्तुत नाहीं सिंध हा स्वतंत्र प्रांत राहणें फारसें शक्य नाहीं, कारण तो बराच लहान आहे. पण तो स्वतंत्र न राहिला तरी मुंबईस जोडल्यापेक्षां पंजाबास जोडलेला निःसंशय बरा!

उलटपक्षीं वऱ्हाड प्रांत मुंबई इलाख्यापासून तुटून असल्यामुळें बरेच तोटे होतात. उभयतांची भाषा एकच आहे, हें वर दर्शविण्यांत आलेंच आहे. मुंबई इलाख्यांत शेंकडा ६० लोक मराठी भाषा बोलणारे आहेत. खुद्द मुंबई शहरांतहि लोकसंख्येपैकीं शेंकडा ६० लोक मराठी भाषा बोलणारे असल्यामुळें मुंबई इलाख्याची भाषा मराठी असें स्थूलमानानें म्हटलें असतां शोभण्यासारखें आहे. अर्थात् वऱ्हाड हा मुंबई इलाख्याचा भाग होणेंच बरोबर आहे. भाषा तीच असल्यामुळें वऱ्हाडच्या शाळा व हायस्कुलें हीं मुंबई इलाख्यांतील शाळाखात्याच्या ताब्यांत आणि मुंबई इलाख्याच्या युनिव्हर्सिटीस जोडणें हेंच बरोबर होईल. वऱ्हाडांतील पदवीधरांस हक्कानें वकिलीच्या सनदा मिळवावयाच्या असतील तर त्यांना हल्लीं अलाहाबाद युनिव्हर्सिटीची परीक्षा द्यावी लागते. पण भाषेच्या दृष्टीनें हा अन्याय आहे. उद्योगधंद्यासंबंधानेंहि वऱ्हाडचा व मुंबई इलाख्याचा एकजीव असणें जरूर आहे. कारण मुंबईचा मुख्य धंदा गिरण्यांचा व वऱ्हाडचें मुख्य पीक कपाशीचें. अर्थशास्त्राच्या दृष्टीनें कच्चा माल

आणि मालाची कारागिरी यांच्या चालकांचा जितका एक मिलाफ व एकजीव असेल तितकें इष्टच आहे. तात्पर्य भाषावर प्रांतरचना करणें हें लोकांना व अधिकाऱ्यांना दोघांनाहि सारखेंच सोईचें असते; आणि अधिकाऱ्यांची गैरसोय नसली तर एक भाषा बोलणारांना आपण एकाच अमलाखालीं रहावें अशी स्वाभाविक आकांक्षा असल्यामुळें अम्हांस एकाच अमलाखालीं ठेवा असें म्हणण्याचा हक्क येतो. जुना व नवा महाराष्ट्र यांना असा हक्क आहे. सबब आजपर्यंत त्यांची विनाकारण झालेली फाळणी रद्द होऊन त्यांचा एकजीव होण्यास सरकार मदत करील अशी आम्हांस आशा आहे.

---

# ७१. देशी भाषांचें पुनरुज्जीवन

गेल्या पन्नास वर्षांतील शिक्षणाचा प्रसार व त्यापासून झालेले परिणाम हे लक्षांत घेतले म्हणजे यापुढें इंग्रजी भाषेची वाढ पूर्वीसारखी न होतां लवकरच ती खुंटेल, अर्थात् आपल्या योग्य मर्यादेपर्यंत जाऊन थांबेल असें दिसतें. शिक्षणामुळें स्वाभिमानबुद्धि उत्पन्न झाल्याकारणानें देशी भाषांच्या उत्कर्षाविषयींची स्वाभाविक बुद्धि सुशिक्षित लोकांच्या मनांत प्रकट होऊन त्यांचें लक्ष व त्यांचे परिश्रम इंग्रजी भाषेकडून थोडेबहुत कमी पडतील. एवढेंच नव्हे तर इंग्रजी व देशी यांच्या सरहद्दीवरील झगड्यांत ते देशी भाषांचा पक्ष धरून इंग्रजीचें पाऊल थोडेंबहुत मागें हटविण्याचा प्रयत्न करतील हें उघड आहे. गेल्या पांच वर्षांत एकीकडे इंग्रजी शिकणाऱ्या मुलांची संख्या वाढली, हिंदुस्थानांत येणाऱ्या इंग्रजी पुस्तकांची संख्या वाढली, एकंदरीनें इंग्रजी भाषेचें ज्ञान असणाऱ्या लोकांची संख्या वाढली, व इंग्रजी भाषेच्या द्वारानें देशी भाषेंत येणाऱ्या ज्ञानभांडाराची किंमत वाढली हें खरें; पण असें असतांहि त्याचबरोबर दुसऱ्या बाजूस, इंग्रजी व्याख्यानें देण्याची व इंग्रजी लेख लिहिण्याची सुशिक्षित लोकांची इच्छा किंचित् कमी झाली, व देशी भाषांतून लेख लिहिणें व

भाषणें करणें, नवीन शब्दकोश रचणें व प्रेमामुळें अगर जरूरीमुळें संग्रहित कराव्या लागणाऱ्या विदेशी कल्पनांना होतां होईतों देशी पेहेराव देऊन—देशी भावनेचा आणि संस्काराचा उजळा देऊन—घेण्याची प्रवृत्ति वाढली, हीहि गोष्ट विसरतां कामा नये.

सन १८९४ सालीं कै. रा. ब. रानडे यांनीं मुंबई युनिव्हर्सिटीमध्यें मराठी भाषेच्यातर्फें जें सुंदर व पोक्त विचारांनीं भरलेलें भाषण केलें त्यामध्यें ते असें म्हणाले कीं, मराठी भाषेचा प्रश्न हा होमरूलच्या प्रश्नासारखा आहे. म्हणजे ज्याप्रमाणें इंग्रज लोकांच्या हाताखालीं कांहीं दिवस राजकीय शिक्षण मिळाल्यामुळें हिंदी लोकांना दिवसेंदिवस आपलीं कामें आपणच करण्याची इच्छा व पात्रता उत्पन्न झाली, त्याचप्रमाणें इंग्रजीभाषाशिक्षणाचे कांहीं दिवस गेल्यामुळें त्यांचें स्वभाषेविषयींचें प्रेम अधिक जागृत झालें. इंग्रजी भाषा शिकल्यानें मराठी भाषेचें प्रेम वाढलें असें म्हणणें हें कांहीं अंशीं विरोधाभासाचें एक उदाहरण आहे, परंतु तो अर्थात्च आभास होय. कारण, प्रत्यक्ष स्वराज्य असतां स्वभाषेचा उत्कर्ष म्हणून कांहीं करण्याची जी बुद्धि आपणांमध्यें पूर्वी, म्हणजे उदाहरणार्थ पेशवाईत जागृत झालेली नव्हती ती आज इंग्रजी राज्यांत उत्पन्न झाली आहे. याचा अर्थ पेशवाईत महाराष्ट्रीयांस मराठी भाषा आवडत नव्हती अगर दुसरी एखादी आवडत होती असा नव्हे; तर मराठी भाषेवर—मराठी राष्ट्रीयत्वाच्या मुख्य साधनावर—आज एकप्रकारचें संकट आल्यामुळें तिच्या रक्षणाविषयींच्या आपल्या प्रयत्नास जागरूकता येऊन तिजविषयींचें आपलें प्रेम अधिक व्यक्त झालें आहे, इतकाच अर्थ घ्यावयाचा. याच गोष्टीला प्रत्यंतरादाखल दुसरेंहि असें एक उदाहरण देतां येईल कीं, पूर्वी पेशवाईमध्यें शिवाजीचा उत्सव महाराष्ट्रांत करीत असल्याचें कोणी ऐकलें नाहीं. तो उत्सव आज महाराष्ट्रांत महाराष्ट्रीयांस करावासा वाटतो. याचाहि अर्थ नानासाहेब व माधवराव पेशव्यांस शिवाजी महाराजांची योग्यता कळत नव्हती असा नव्हे; तर आजच्या घटकेच्या महाराष्ट्रीयांना शिवाजीमहाराजांची योग्यता ध्यानांत ठेवण्याची तेव्हांपेक्षांहि अधिक जरूरी आहे हाच अर्थ ग्राह्य होय. ज्याप्रमाणें प्रत्यक्ष स्वराज्यांत होमरूलची अशी चळवळ होऊं शकत नाहीं, परराज्यांत अशा चळवळीच्या नांवाला कांहीं औचित्य असतें; त्याचप्रमाणें

इंग्रजी भाषेचें गंडांतर दृष्टीपुढें उभें राहिल्यामुळें देशी भाषांच्या सुधारणे-विषयीं हिंदी लोकांच्या मनांतून स्वाभाविकच उमाळा आला. शिवाय दुसरेंहि एक कारण आहे, तें हें कीं, इंग्रजी भाषेच्या संसर्गामुळें हिंदी ग्रंथ-संग्रह व वाङ्मय फैलावलें आहे, व यामुळें पेशवाईंत दीडशें वर्षांत मराठी भाषेची जी वाढ दिसून आली नाहीं ती गेल्या अवघ्या पन्नास वर्षांत दिसून आली, असें म्हणण्यास कांहीं हरकत नाहीं.

पण देशी भाषांचा उत्कर्ष म्हणजे इंग्रजीची हटकून पिछेहाट असेंहि नाहीं; आणि इंग्रजी व देशी भाषा यांच्या सकृद्दर्शनीं दिसणाऱ्या विरोधाचा विचार करतांना अगर त्यावर मत देतांना जी गोष्ट लक्षांत ठेविली पाहिजे ती हीच. एकाच म्यानांत एकाच वेळीं एकाहून अधिक सुऱ्या ठेवतां येत नाहींत असें जरी असलें, तरी प्रसंगाप्रमाणें निरनिराळ्या वेळीं एकाच म्यानांत निरनिराळ्या सुऱ्या ठेवतां येतात. मनुष्याचें मन व भाषा यांचीहि गोष्ट कांहीं अशीं अशीच आहे. मनुष्यास एकच भाषा येणें शक्य असतें किंवा एक भाषा चांगली आल्यामुळें अगर सरावांत ठेवल्यानें दुसऱ्या एखाद्या भाषेस हटकून उपाय झाला पाहिजे अगर गौणत्व आलें पाहिजे ही गोष्ट जर अनिवार्य असती, तर भाषांच्या प्रश्नास लढाईचेंच स्वरूप आलें असतें. पण वस्तुतः तशी स्थिति मुळींच नाहीं. एखाद्या मनुष्यास इंग्रजी चांगलें येत असलें म्हणून त्याच्या देशी भाषेचें ज्ञान कमी होतें अगर त्याला देशी भाषा लिहितां अगर बोलतां येतच नाहीं, असें होत असतें तर गोष्ट वेगळी. परंतु एक भाषा नेहमीं दुसऱ्या भाषेस उपकारच होते. इंग्रजी चांगलें आल्यामुळें ज्यास मराठी चांगलें येत नाहीं, अगर मराठी चांगलें आल्यामुळें ज्यास इंग्रजी चांगलें येत नाहीं, असा मनुष्य सांपडणें शक्यच नाहीं, हें कोणीहि सांगूं शकेल. ज्याला मूळ भाषा ग्रहण-शक्तिच कमी त्याला केवळ एकच भाषा शिकून तरी तींत कितीसें गहन नैपुण्य मिळणार ? उलटपक्षीं ज्याच्या मनाला भाषासंस्कार व वाङ्मयाची गोडी जातीचीच आहे त्याला अनेक भाषांचें ज्ञान हें केव्हांहि अपकारक न होतां उलट उपकारच होतें. अशी वस्तुस्थिति असल्यामुळें हिंदुस्थानांत आज कोणती एक भाषा जिवंत उरणार असा प्रश्नच मुळीं उद्भवत नाहीं, असें आम्हांस वाटतें. समाजाच्या कार्यक्षमतेप्रमाणें त्याला अनेक भाषांची

जरूरीच असते. निदान आजच्या स्थितींतील हिंदी समाजास तरी तशी गरज आहे, यांत शंका नाहीं आपण महाराष्ट्राचेंच उदाहरण घेऊं. आजच्या महाराष्ट्रीयांस एकच काय पण चार भाषांचीहि गरज आहे, हें सप्रमाण सिद्ध करतां येतें.

मराठी भाषा ही अर्थात् महाराष्ट्रीयांची जन्मभाषा असल्यामुळें तिचें महत्त्व वर्णन करण्याचें कारणच नाहीं. परंतु संस्कृत भाषा सर्वस्वीं काढून घेतली तर मराठी भाषा मुळीं उरणेंच शक्य नाहीं. अप्रबुद्ध, अडाणी, अशिक्षित लोकांना संस्कृत भाषेचें प्रत्यक्ष ज्ञान नसतें हें खरें. परंतु त्यांचा सर्व पूर्वेतिहास, त्यांचा धर्म, त्यांच्या दंतकथा व ते तोंडानें गुणगुणतात तीं गाणीं, तात्पर्य, अशिक्षित मनुष्याला केवळ सहज असें जें शिक्षण असतें तें सर्व संस्कृताच्या द्वारें आलेलें असल्यामुळें संस्कृत मराठीपासून विलग करणें शक्य नाहीं. ज्यांना आपण सुशिक्षित म्हणतों त्यांच्या संस्कृतीचा तर बराच भाग संस्कृत भाषेंतून येतो हें उघड आहे. वेद, उपनिषदें, काव्यें, नाटकें, इतिहास, पुराणें, दर्शनें व शास्त्रें या सर्वांमधून झिरपून आलेल्या संस्कृतीच्या प्रवाहांची एक नदी बनलेली असते. अर्थात् हीं उगमस्थानें सर्व आटलीं तर त्यांच्या संस्कृतीचा प्रवाहहि अवर्षणानंतर उन्हाळ्यांत वाहणाऱ्या नदीच्या जलरेखेप्रमाणें, अतिसूक्ष्म असेल हें अगदीं उघड आहे. शिवाय पाश्चिमात्य शास्त्रें, तत्व–ज्ञान वगैरेंचें ज्ञान झालेल्या मनुष्यासहि तें ज्ञान देशी कल्पनांच्या सांच्यांतून संग्रहित झालेलें असलें तरच मनःप्रकृतीस मानवतें. औषध इंग्रजी असलें तरी अनुपान देशीच लागतें; एरवीं तें गुणकारी होत नाहीं. तात्पर्य, संस्कृत ही जरी एका अर्थानें मृत भाषा असली तरी आमच्या देशी भाषांस जिवंत ठेवण्याइतका सजीवपणा तिच्या अंगीं आहे.

परंतु आजच्या स्थितींत केवळ मराठी व संस्कृत या दोन भाषांनींहि चालणार नाहीं. कारण महाराष्ट्रांतील समाजाच्या अंगांत व उपांगांत चालणाऱ्या व्यवहाराचा इंग्रजीशीं नित्य इतका निकट संबंध येतो कीं, इंग्रजी भाषेचें ज्ञान नसणारा मनुष्य जात्या कितीहि बुद्धिमान् असला तरी पाण्याबाहेर काढलेल्या माशाप्रमाणें त्यास तडफडावें लागतें. अथवा झोंपेंतून उठलेला मनुष्य एकदम उन्हाकडे पाहून जसा गांगरून जाऊन अस्वस्थ

होतो, तशीच स्थिति आज निव्वळ मराठी जाणणाराचीहि होते. देशांतलि बराचसा राज्यकारभार, व्यापार, कलाकौशल्य अगर एखादा उद्योगधंदा चांगला करावयाचा असल्यास आज इंग्रजीशिवाय त्याचें अडणारच. तसेंच ज्या कोणाला केवळ कूपमंडूकवृत्तीनेंच रहावयाचें नसेल, जगांतल्या निरनिराळ्या देशांत पैदा झालेलें उत्कृष्ट ज्ञान संपादन करावयाचें असेल, त्यालाहि इंग्रजी शिकल्याशिवाय गत्यंतर नाहीं. किंबहुना एका अँग्लो–इंडियन पत्रानें म्हटल्याप्रमाणें आज महाराष्ट्रांत पेशवाई असती तरी ' न वदेत् यावनीं भाषां ' या वचनावर रूढीचा हरताळ फासून राजकर्त्यांनीं व प्रजेनें विश्वसंस्कृतीच्या अपेक्षेनें इंग्रजीचा अभ्यास थोडाबहुत तरी चालू केला असता, असेंहि मानण्यास जपान व चीन यांच्या उदाहरणांवरून बरीच जागा आहे.

पण मराठी, संस्कृत व इंग्रजी या तिहींनींहि आज महाराष्ट्रीयांचें काम भागत नाहीं. कारण नवीन परिस्थितीमुळें सर्व हिंदुस्थान देश—पूर्वी आपला होताच तो—आतां आपलाच असा वाटूं लागला आहे. प्रांताप्रांतांतील दळणवळण वाढलेलें असून निरनिराळ्या शाखेच्या लोकांना परस्परांचे आचारविचार समजण्याची आकांक्षा उत्पन्न झाली आहे. अर्थात् सर्व हिंदुस्थानची मिळून एकच नसली तरी प्रांतानिहाय निरनिराळी कां होईना, परंतु दुसरी म्हणून एक भाषा लागणारच. ह्या दुसऱ्या भाषेचें स्थान हिंदी, बंगाली किंवा मराठी घेणार हा मुद्दा जितका वादग्रस्त तितकाच गौणहि आहे; पण सर गुरुदास बॅनर्जी यांनीं राष्ट्रीय शिक्षणावरील आपल्या पुस्तकांत अंदाज केल्याप्रमाणें कालांतरानें दरएक प्रांतांत दोन दोन देशी भाषा चालू राहतील. बंगालमध्यें बंगाली व उर्दू, संयुक्त–वायव्य प्रांतांत व पंजाबांत हिंदी आणि उर्दू, मुंबई इलाख्यांत मराठी आणि गुजराथी, आणि मद्रास इलाख्यांत तामील व तेलगू याच मुख्य देशी भाषा प्रचलित राहतील. आजच्या घटकेला हिंदी भाषेचा प्रसार जास्त आहे; परंतु तिजमधील वाङ्मय फार कमी आहे. बंगाली भाषा बोलणारे लोक फक्त चारच कोटि असले तरी वाङ्मयाच्या दृष्टीनें पाहतां ती भाषा हिंदुस्थानांतील सर्व भाषांच्या अग्रस्थानीं आज आहे. मराठी पुस्तकांचीं बंगालींत जितकीं भाषांतरें होतात त्यापेक्षां बंगाली पुस्तकांची मरा-

ठींत अधिक भाषांतरें होतात. गुजराथी भाषा व्यापारधंद्यास अधिक उपयोगी असली तरी इतिहास व राजकारण या दोहोंच्या दृष्टीनें मराठी हीच अधिक मान्य आहे. अशा रीतीनें कोणांत कांहीं तर कोणांत कांहीं गुण असल्यामुळें, मॉडर्न रिव्ह्यूंतील एका लेखकानें म्हटल्याप्रमाणें देशी भाषांमध्यें आजच्या घटकेस एक प्रकारची शर्यतच लागून राहिलेली आहे. ही शर्यत कोणती भाषा जिंकणार हा प्रश्न मनोरंजक असला तरी प्रस्तुत आपल्यास गौणच आहे. कारण यापुढें कित्येक शतकेंपर्यंत एक जन्मभाषा, एक संस्कृत भाषा, एक दुय्यम देशी भाषा आणि सर्व जगाशीं व्यवहार करण्याकरितां इंग्रजी ही चौथी भाषा अशा चार भाषा प्रत्येक सुशिक्षित मनुष्यास प्रायः येतील. परंतु सांगण्याचा मुख्य मुद्दा हा कीं, इंग्रजी भाषेला किती राजकीय महत्त्व असलें तरी, टाइम्सनें म्हटल्याप्रमाणें इंग्रजी भाषा ही सर्व हिंदी जनतेची आवडीची अशी भाषा होईल हें शक्य नाहीं, व एखाद्या देशी भाषेला नामशेष करून तिचें स्थान इंग्रजी भाषा बळकावील हें तर मुळीं स्वप्नांतहि आणण्याचें कारण नाहीं. इंग्रजी भाषेची उपयुक्तता कितीहि असली तरी तिच्या विस्ताराला कांहीं स्वाभाविक मर्यादा तर आहेच; परंतु वर एके ठिकाणीं दर्शविल्याप्रमाणें देशांतील राज्यकारभासंबंधानेंहि तिची वाढ बेसुमार होणें शक्य नाहीं, ही गोष्ट पायोनियरसारख्या अँग्लो इंडियन पत्रकारांना देखील आतां कळूं लागली आहे.

---

## ७२. महा० विद्यापीठ आणि राष्ट्रीय शिक्षण

( केसरी, ता. ३० मार्च १९२६ )

महाराष्ट्र–विद्यापीठाचा वाद आज वर्ष दोन वर्षे गाजत आहे. शिक्षण-विचारमंडळानें पुष्कळ चळवळ केली. सरकारनें कमिटी नेमिली. कमिटीनें पुरावा घेतला. शिफारस करण्यांत आली कीं, सर्व महाराष्ट्राकरितां म्हणून पुण्यास विद्यापीठ स्थापावें. वाद उरला तो थोडासा केवळ बोधभाषेपुरता. पुण्यास जाहीर सभा झाल्या वाद झाले. मुंबई युनिव्हर्सिटीनेंहि महाराष्ट्र-विद्यापीठाच्या योजनेला संमति दिली. लोकांना वाटलें, एक मोठें कार्य झालें.

केळकरांचा ठराव महाराष्ट्र–विद्यापीठासंबंधीं फक्त मत प्रदर्शित करण्याचा होता. त्या विद्यापीठाकरितां आज वर्गणी कोणी जमवीत नव्हता किंवा टिळक-विद्यापीठाकडे खर्च होणारें कोणतेंहि बल तिकडून काढून नव्या विद्यापीठाकडे लावावयाचा प्रश्न नव्हता. बरें, ठराव आणणारे व त्याला अनुकूल मत देणारे हे एका बाजूला आणि ठरावास विरोध करणारे दुसऱ्या बाजूला अशी तुलना केली असतां आज टिळक–विद्यापीठाला किंवा टिळक–महाविद्यालयाला प्रत्यक्ष मदत अशी कोण अधिक करतो किंवा पूर्वीं अधिक कोणीं केली, ह्याचा विचार तरी टीकाकारांनीं करावयास पाहिजे होता. पण कर्तृत्व किंवा सहानुभूति यांचीं कांहीं वेगळींच मापें असहकारितेच्या युगापासून या देशांत अमलांत आलेलीं आहेत.

पुण्यास शाळांवरील बहिष्काराची प्रथम चळवळ झाली तेव्हां विद्यार्थ्यांच्या शिक्षणाची तजवीज करण्याचा आग्रह कोणीं धरला? पुण्यांत जमलेल्या टिळक–स्मारकाच्या वर्गणीचा निम्मा भाग स्थानिक राष्ट्रीय शिक्षणाला मिळवून देण्याची मूळ खटपट कोणीं केली? जगन्नाथमहाराजांच्या बागेंतील जागा टिळक–महाविद्यालयाला मिळवून कोणीं दिली? त्यानंतर प्रदर्शनाकरितां ओवऱ्या बांधविण्याची खटपट कोणीं केली? त्या ओवऱ्यांचा उपयोग टिळक–विद्यापीठाला कोणीं करवून दिला? टिळक–महाविद्यालयातर्फे होणाऱ्या प्रदर्शनाला म्युनिसिपालिटींतून पैशाची मदत कोणीं करविली? टिळकस्मारक-मंदिराच्या इमारतीचा उपयोग विद्यापीठाला व महाविद्यालयाला कोणीं करवून दिला? विद्यालयाच्या इस्पितळासंबंधानें सहानुभूतीची मदत कोणीं दिली? विद्यालयाला व्यक्तिशः दिलेल्या वर्गणींत, शिकविण्याच्या कामीं, व विद्यालयाच्या कारभारांत वेळ मोडून लक्ष घालण्याच्या कामीं, सर्वांत अधिक मदत कोणीं केली? सांगली, नाशीक वगैरे ठिकाणीं मुद्दाम जाऊन टिळक–विद्यालयाकरितां व्याख्यानें कोणीं दिलीं? याहिपेक्षां विशेष सांगण्याची गोष्ट ही कीं टिळक विद्यालयांतून पदवी घेऊन बाहेर पडलेल्या पदवीधरांची एक वर्षभर आणखी शिकण्याची सोय करण्याकरितां पुस्तकांवर शेंकडों रुपये केसरीसंस्थेनें खर्च केले कीं दुसऱ्या कोणीं? तसेंच या स्कॉलरशिप्सकरितां ज्युबिली फंडांतून हजारों रुपयांची रक्कम कोणीं मिळवून देवविली? केळकरांनीं कीं टीकाकारांनीं? तात्पर्य, सहानुभूति व कळकळ ही मोजण्याला जर कांहीं प्रत्यक्ष

माप असलें तर त्यानें मोजण्यासारखी मदत टिळक–महाविद्यालयाला कोणीं केली केळकरांनीं कीं त्यांच्या टीकाकारांनीं ?

टिळक–विद्यापीठाकरितां श्री. चिंतामणराव वैद्य यांनीं मेहनत केली हें कबूल आहे. तथापि त्यांची गोष्ट सोडून दिली असतां संस्थेबाहेरच्या माणसांपैकीं या कार्याकरितां केळकरांहून अधिक मदत ज्यानें केली असेल त्याचें नांव टीकाकारांनीं खुशाल घ्यावें, असें त्यांना जाहीर आव्हान आहे. पण वर सांगितल्याप्रमाणें असहकारितेनें एक गोष्ट महाराष्ट्रांत साध्य झाली आहे कीं, कांहीं न करतां टाळ्याला जीभ लावून ध्येयवादित्याचें दिसण्यासारखें असें कांहीं तरी चढ्या आवाजानें बोललें म्हणजे तो मोठा कार्यकर्ता, मोठा असहकारी ठरतो. ‘ बहिष्कार ’ हा शब्द उच्चारल्याबरोबर दहा यज्ञांचें पुण्य लाभतें. मग हातून बहिष्काराचें एकहि कृत्य न का होईना !

असो, आतां राष्ट्रीय शिक्षण व महाराष्ट्र-विद्यापीठ यांच्या अंगच्या गुणांची तुलना करूं. महाराष्ट्र–विद्यापीठाच्या मूलभूत कल्पनेंत खालील गोष्टींचा समावेश मानला जातो. ( १ ) विद्यापीठांत लोकनियुक्त सभासदांचें प्रचंड बहुमत हवें. ( २ ) विद्यापीठाच्या महासभेला शिक्षणक्रम ठरविणें, पदव्या देणें वगैरे सर्व बाबतींत स्वतंत्र अधिकार असला पाहिजे. ( ३ ) पदवीधरांनाहि देण्याच्या पुढील शिक्षणक्रमाची त्यांत व्यवस्था केली जावी. ( ४ ) बोधभाषा व परीक्षेची भाषा ही देशी मराठीच असावी. (५) सर्व अधिकार हिंदी माणसाच्या हातीं राहील, युरोपियनांची लुडबूड त्यांत चालणार नाहीं अशी व्यवस्था असावी.

वरील शर्ती ज्यांत पुऱ्या होतील असलें महाराष्ट्र–विद्यापीठ आपणांस लाभण्याइतकें आपलें भाग्य कोठें आहे असें वाटेल तर कोणीं म्हणावें. गोष्ट प्रत्यक्ष घडेपर्यंत निराशावादाला सहज शेखी मिरवावयाला सांपडते. पण समजा असलें विद्यापीठ लाभलें–आणि असलें विद्यापीठ लाभावें इतकेंच आजच्या सभा व ठराव ठरवितात–तर मग तें महाराष्ट्रांतील जनतेस हवें कीं नको ! कीं त्याला राष्ट्रीय शिक्षणाचा शत्रूच मानावयाचें ? हें ठरविण्याची कसोटी एकच आणि ती हीच कीं, राष्ट्रीय शिक्षणांत तरी मूलभूत अशा कोणत्या कल्पना आहेत ?

राष्ट्रीय शिक्षणांतील मूलभूत कल्पना मुख्य या—( १ ) बोधभाषा देशी

मराठी, ( २ ) शिक्षणक्रमांत पूर्ण स्वातंत्र्य, ( ३ ) कारभारांत पूर्ण स्वातंत्र्य. आज ज्या राष्ट्रीय शिक्षणसंस्था काढल्या जातात त्यांचा उद्देश एक सर्वोत्कृष्ट नमुना लोकांपुढें ठेवून त्याकडे इतर सर्व संस्थांना खेंचण्याचा प्रयत्न करणें हाच आहे. राष्ट्रीय शिक्षणसंस्थांनीं सर्व शिक्षणक्षेत्र स्वतः आक्रमण करावयाचें नसतें. ती एक लहानशा क्षेत्रांत तयार केलेली उत्तम बियाण्यांची पैदास होय. या 'सीड–बेड' मध्यें ( बियाण्यांच्या वाफ्यामध्यें ) तयार होणाऱ्या बीजांनीं हळूहळू सर्व क्षेत्राचें आक्रमण केलें म्हणजे या सीड-बेडचें काम संपलें.

या उत्तम बियाण्यांनीं जितकीं अधिक क्षेत्रें आक्रमिलीं जातील तितकीं तीं त्या मानानें आपल्या ध्येयाच्या जवळ आलीं असें समजावें. डेक्कन कॉलेजापेक्षां फर्ग्युसन अधिक जवळचें, त्यापेक्षां न्यू पूना कॉलेज, व त्यापेक्षां टिळक-विद्यालय हा क्रम स्वाभाविकपणेंच मनांत येतो. पण यांत सर्वांत जवळचें तेवढेंच धरून बाकीच्यांकडे तारतम्य दृष्टीनेंहि आत्मीयत्वानें पाहावयाचें नाहीं ही कट्टर वृत्ति असहकारितेनें जन्मास आणली. पूर्वी राष्ट्रीय शिक्षण असलें तरी ही वृत्ति नव्हती. टिळकांचा राष्ट्रीय शिक्षणाभिमान तरी कट्टर मान्य करतातना ? मग त्याच टिळकांनीं जगन्नाथमहाराजांची जागा न्यू पूना कॉलेजाला मिळवून देण्याची खटपट केलीच कीं नाहीं ?

वर्तमानपत्रकर्ते किंवा राजकीय पुढारी राष्ट्रीय किंवा इतर शिक्षणसंस्थाना जें साह्य करणार तेंहि मर्यादित असतें. प्रत्यक्ष त्या संस्थांत कार्य करून खपणारे वेगळे व बाहेरून सहानुभूतीनें साह्य करणारे वेगळे. टिळक झाले तरी स्वतः समर्थ-विद्यालयांत जाऊन प्रत्यक्ष राष्ट्रीय शिक्षणाचें कार्य करणें त्यांना शक्यच नव्हतें व तसें साह्य त्यांचेकडून कोणीं अपेक्षिलेंहि नाहीं व न दिल्याबद्दल त्यांस दोषहि दिला नाहीं. लेख लिहून व व्याख्यानें देऊन बाहेरून करावयाची मदत त्यांनीं केली व कोणीहि वर्तमानपत्रकर्ता व राजकीय पुढारी तेवढीच मदत करूं शकेल.

बरें, महाराष्ट्राखेरीज इतर प्रांतांत राष्ट्रीय शिक्षणसंस्था फोफावल्या व महाराष्ट्रांतच तेवढ्या बुडत चालल्या असेंहि नाहीं. उलट महाराष्ट्राचें दारिद्र्य लक्षांत घेतां महाराष्ट्राचे राष्ट्रीय शिक्षणप्रयत्न नमुनेदार व अभिमानास्पदच ठरतील. आणि महाराष्ट्र विद्यापीठासारखी संस्था स्थापून प्रचलित शिक्षण

सुधारण्याच्या प्रयत्नांत या नमुन्याला कमीपणा नसून उलट त्याचेंच तें आक्रमण होय. मातृभाषेंतून शिक्षण द्या, सरकारी ताबा कमी करा, शारीरिक, लष्करी व धार्मिक शिक्षण द्या, धंदेशिक्षण वाढवा वगैरे ओरड प्रचलित शिक्षणाबद्दल करतांना "आमच्या राष्ट्रीय शिक्षणाच्या नमुन्याचें अनुकरण करा" असेंच आम्ही म्हणत असतों व त्यायोगें त्या नमुन्याची महती वाढवीत असतों. दुसऱ्याला घर स्वच्छ करून त्यांत सुधारणा कर असें सांगतांना "माझें घर पाहा कसें स्वच्छ व नमुनेदार आहे" अशी त्यांत प्रौढी असते. आणि सार्वजनिक रस्ते किंवा हमालवाडे स्वच्छ कसे ठेवावे यावर मत देण्यानें स्वगृहाविषयींचें कोणाचें प्रेम कमी झालें असें कोणीहि समजत नाहीं.

पण दुसऱ्याला सुधारण्यांत आपण बिघडतों असें ज्यांना वाटतें त्यांना काय म्हणावें ? त्यांना नसलेला आत्मविश्वास कसा येणार ? स्वतः करावयाचें नाहीं, दुसऱ्याला करूं द्यावयाचें नाहीं व यांतच आपण मोठें तत्त्वनिष्ठ अशी प्रौढी मिरवावयाची अशी वृत्ति बनल्यावर कसले तारतम्य व कसला विवेक ? दुसरे लोक सुधारूं लागले तर त्या लोकांना आनंद न होतां धास्तीच वाटते; कां तर, मग यांना फुकटची प्रौढी कशी मिरवावयाला सांपडणार ? आपणाला देशभक्त म्हणून मिरवतां यावें म्हणून, दुसरा कोणी देशभक्तीचें वळण गिरवूं लागला तर 'तूं देशद्रोहीच राहा, कां तर माझा मोठेपणा कायम राहिला पाहिजे !' असें सांगण्यांतलाच हा प्रकार झाला. किंबहुना आपल्या पाठीवर नवीन भावंड जन्मतांच मला जोडीदार मिळाला म्हणून हर्ष न मानतां पितृधनांत हा एक वांटेकरी आला म्हणून विषाद मानण्यांतलाच हा प्रकार नव्हे काय ? पण टिळक-विद्यापीठ व भावी महाराष्ट्र-विद्यापीठ यांचा इतकाहि निकट संबंध नसून, या भावी विद्यापीठास आशीर्वाद देणें म्हणजे शेजाऱ्याच्या घरच्या नववधूला 'अष्टपुत्रा सौभाग्यवती भव' असा आशीर्वाद देण्यासारखेंच आहे. तेवढ्या आशीर्वादानें देखील जर घरचा मुलगा रुष्ट होऊं लागला तर शेजारधर्महि जगांतून नष्ट व्हावा असाच त्याचा अर्थ होईल. पण तो कोण मान्य करील ?

---

# ७३. राष्ट्रीय शिक्षण व केळकर

( केसरी, ता. २० जुलै १९२६ )

गेल्या केसरीच्या अंकांत टिळक-महाविद्यालयाच्या आजन्म सेवकांनीं आपल्या सह्यांनिशीं एक पत्र छापून, त्यांत पुण्यांतील मुख्य राष्ट्रीय शिक्षण-संस्थांशीं श्री. केळकर यांचा किती जिव्हाळ्याचा संबंध होता व आहे याविषयीं प्रांजलपणें कबुली दिलेली आहे. तथापि या बाबतींत आणखीहि कांहीं लिहिण्यासारखें आहे. टिळक महाविद्यालयाच्या हल्लींच्या चालक मंडळाचें धोरण नेहमीं स्वतंत्र व कोणासहि न दुखवितां आपलें कार्य तेवढें करून घेण्याचें असणें हेंच योग्य आहे, व तेंच धोरण सदर चालक मंडळानें केसरींत छापलेल्या पत्रांत स्वीकारलेलें दिसतें. तथापि इतरांना असलें बंधन पाळण्याचें कांहींच कारण नाहीं. किंबहुना ज्या पद्धतीनें श्री. केळकर यांजवर व्यक्तिशः हल्ले करण्यांत येतात त्याच रीतीनें प्रतिपक्षावरहि हल्ले करणें स्वाभाविक व क्षम्यच ठरेल. किंबहुना असे हल्ले केल्याशिवाय त्यांनीं गत्यंतरच ठेवलें नाहीं. म्हणून आज या लेखाच्या द्वारें केळकरांच्या प्रतिपक्षीयांचा व राष्ट्रीय शिक्षणाचा संबंध कशा प्रकारचा होता व आहे हें स्पष्टपणें वाचकांच्या नजरेस आणावें असें योजिलें आहे.

श्री. केळकर यांनीं टिळक-महाविद्यालयाला प्रत्यक्ष मदत काय केली हें चालकमंडळानें केसरींतील पत्रांत दिलेंच आहे. पण त्यांचें इतर वर्तन कसें होतें याविषयींहि उल्लेख करणें अवश्य ठरतें. राष्ट्रीय शिक्षणाचा पुरस्कार सुरू असतां तो करणारा मनुष्य आपली मुलें—मुली कोणत्या शिक्षणसंस्थेंत पाठवितो ही एक बाब लक्षांत घेण्यासारखी असते. या दृष्टीनें पाहतां केळकर हे जितके या कसोटीस उतरले तितका त्यांच्या प्रतिपक्षीयांपैकीं कोण कोण उतरला हें किंचित् चौकशी करणारास सहज कळून येण्यासारखें आहे. बहिष्काराचे चळवळींत स्वतः पडण्यापूर्वीं केळकरांनीं आपल्या तीन मुलांपैकीं एकास इंटरमधून व दोघांस प्रीव्हियसमधून काढून घेतलें. त्यांतील एक व्यापारधंद्यांत शिरला आणि दोघांनीं टिळक-महाविद्यालयांतील वाङ्मय-विशारदाचा अभ्यास पुरा करून पदवी घेतली व फिरून त्यांनीं सरकारी अगर निमसरकारी शिक्षणसंस्थेंत प्रवेश केला नाहीं. याहिपेक्षां विशेष उल्लेखण्यासारखी गोष्ट ही कीं, केळकर हे प्रो. कर्वे यांनीं काढलेल्या भारत महिला-

विद्यापीठाचे सभासद झाल्यावर त्यांची मुलगी मॅट्रिक्युलेशनची परीक्षा पास झाली, तिला फर्ग्युसन कॉलेजमध्यें घालावी अशी स्नेहाच्या नात्यानें डॉ. परांजपे यांनीं आग्रहाची सूचना केली होती. तथापि केळकर यांनीं तिला महिला-विद्यापीठाच्या कॉलेजांत पाठविली. तेथें तिनें 'गृहीतागमा' ही पदवी घेतली व ती हल्लीं सदर विद्यापीठाला जोडलेली स्वतंत्र कन्याशाळा सातारा येथें चालवीत आहे. श्री. केळकर यांची ज्यांवर सत्ता चालणार अशीं हीं चारच मुलें होतीं, व वर सांगितल्याप्रमाणें बहिष्काराची चळवळ सुरू झाल्यानंतरच काय पण त्यापूर्वींहि कांहीं वर्षें त्यांनीं राष्ट्रीय शिक्षणाविषयीं या दृष्टीनें आपलें कर्तव्य पूर्ण केलें.

उलटपक्षीं या राष्ट्रीय शिक्षणाच्या चळवळींत पडलेल्या इतर कित्येक गृहस्थांचें वर्तन कसें होतें तें पाहण्यासारखें आहे. श्री. चिंतामणराव वैद्य हे जुन्या समर्थ विद्यालयाचे एक प्रमुख चालक होते व हल्लींच्या राष्ट्रीय शिक्षणाच्या चळवळींतहि ते आहेत. परंतु त्यांचा एकहि मुलगा पूर्वीं समर्थ विद्यालयांत गेला नाहीं किंवा नव्या चळवळींतहि त्यांनीं आपलीं मुलें राष्ट्रीय शिक्षणाकडे दिलीं नाहींत. त्यांचा धाकटा मुलगा बहिष्काराच्या चळवळीच्या दिवसांतच बॅरिस्टर होण्याकरितां त्यांनीं विलायतेस पाठविला. वडील मुलगा या चळवळीच्या वेळींच सरकारी इंजीनियरिंग कॉलेजमध्यें अभ्यास करीत होता व अखेर त्यानें बी. ई. ही सरकारी पदवी घेतली. याच्या उलट श्री. सदाशिव त्रिंबक केळकर व श्री. काणे, टिळक-महाविद्यालयातील जुने शिक्षक, हे दोन गृहस्थ इंजीनियरिंग कॉलेज सोडून बाहेर पडले. श्री. वैद्य यांनीं केळकरांप्रमाणेंच वर्ग शिकवून व पैशाची खटपट करून टिळक-महाविद्यालयाला बरीच मदत केली आहे व सहानुभूति दाखविली आहे हें खरें. पण स्वतःच्या मुलांची मदत त्यांजकडून झाली नाहीं.

दुसरे प्रमुख गृहस्थ श्री. शिवरामपंत परांजपे. यांचा धाकटा मुलगा मेडिकल कॉलेजांत होता. त्यानें पुढें तें कॉलेज सोडलें खरें. पण राष्ट्रीय शिक्षणाच्या कोणत्याहि शिक्षण-संस्थेंत तो दाखल झाल्याचें माहीत नाहीं. टिळक-महाविद्यालयांत वैद्यकशाखाहि होती ! श्री. परांजपे यांनीं टिळक महाविद्यालयांत शिक्षकाचें काम कांहीं दिवस केलें ही गोष्ट खरी. तथापि विद्यालयाला द्रव्यसाहाय्य वगैरे मिळवून देण्याचे कामीं त्यांनीं केळकरांच्या मानानें कांहींच

मदत केली नाहीं. उलट टिळक-स्मारक-ट्रस्टीच्या बोर्डांत त्यांचें नांव पूर्वी केळकरांच्या सूचनेवरून घालण्यांत आलें होतें, व त्या संस्थेचा उपयोग टिळक महाविद्यालयासहि व्हावयाचा होता, असें असतां त्यांनीं त्या बोर्डाचा राजीनामा दिला व टिळक-विद्यालय ही संस्था रजिस्टर झाली तेव्हां त्यांनीं तींतून आपलें अंग काढून घेतलें. संस्था रजिस्टर होते ही मात्र त्यांची सबब नव्हती, कारण इतर रजिस्टर्ड ट्रस्टचे ते सभासद आहेत.

पुण्यांतील राष्ट्रीय शिक्षणाचे आणखी एक कट्टे पुरस्कर्ते श्री. सितारामपंत दामले हे होत. केळकरांवर वेळीं अवेळीं टीका करणारांस यांनींहि हातभार लावलेला आहे. राष्ट्रीय शिक्षण ऐनजोरांत असतां त्यांनीं टिळक-महाविद्यालयांत अध्यापकाचें काम कांहीं दिवस केलें हें खरें असलें तरी लवकरच त्यांनीं तें काम सोडून दिलें. राष्ट्रीय शिक्षणाच्या ऐन चळवळीच्या भरांत हे त्याचा जाहीर पुरस्कार करीत असतां, ज्यांच्या शिक्षणाची सर्वस्वी जबाबदारी यांच्यावर होती त्या आपल्या बंधूच्या मुलांमुलींस मात्र त्यांनीं राष्ट्रीय शिक्षणाचा वाराहि लागू दिला नाहीं ही गोष्ट ध्यानांत ठेवण्यासारखी आहे. त्यांनीं विद्यालयासाठीं प्रत्यक्ष द्रव्यसाहाय्य किती दिलें व द्रव्यनिधि जमविण्यासाठीं किती प्रयत्न केले ही गोष्ट न सांगणेंच बरें !

श्री. द. रा. घारपुरे हे राष्ट्रीय शिक्षणाच्या बाबतींत केळकरांना नांवें ठेवणारांत अग्रगण्य. असें असतां खुद्द त्यांचा धाकटा भाऊ या चळवळीचे वेळींच मुंबई-युनिव्हर्सिटीच्या शिक्षणक्रमांत होता तो कांहीं त्यांनीं काढला नाहीं. न्यू पूना कॉलेजमध्यें लाईफ मेंबर म्हणून त्यांना जो पगार मिळत होता तो तितका पगार त्यांनीं टिळक-विद्यापीठाचे कार्यवाह म्हणून घेतला; व मौज ही कीं, कार्यवाह या नात्यानें त्यांनीं एकंदर जितका पगार घेतला तितकी तरी रक्कम त्यांनीं या संस्थेकरितां मिळविली कीं नाहीं याचीहि मोठी शंकाच आहे. पुढें महाविद्यालयाचे आजन्म सेवक होण्याचे त्यांनीं नाकारलें व आतां विद्यापीठालाहि सोडचिठी देऊन ते मुंबईस इतर म्हणजे व्यापारी धंदा करण्यास निघून गेले आहेत. घारपुरे यांना जर राष्ट्रीय शिक्षणाचा एवढा अभिमान होता तर त्यांनीं कार्यवाहाचें काम असें मध्येंच सोडून कां जावें ? व पूर्वीच्या या चळवळींत त्यांनीं स्वार्थत्याग तो तरी काय केला ? सवाशें रु. पगार चालूच होता. मुंबई युनिव्हर्सिटीच्या डिग्र्याहि त्यांनीं टाकून दिल्या नाहींत.

आणखी एका गृहस्थाचें नांव या बाबतींत अवश्य नमूद केलें पाहिजे. ते श्री. ना. सि. फडके हे होत. बहिष्काराची चळवळ सुरू झाली तेव्हां यांनीं श्री. घारपुरे यांच्याबरोबरच न्यू पूना कॉलेज सोडलें. त्यावेळीं प्रो. फडके यांच्या पगाराचें नुकसान न व्हावें, आणि राष्ट्रीय शिक्षणाचें काम त्यासकरतां यावें, म्हणून सवाशें रुपयांवर केसरी-मराठा संस्थेकडे संपादकवर्गांत केळकरांनीं त्यांस मुद्दाम सामील करून घेतलें. केळकर राष्ट्रीय शिक्षणाच्या बाबतींत गुळमुळीत बोलतात अशी तक्रार करण्यांत प्रो. फडके हे अग्रगण्य होते. पण मौज ही कीं, अवघ्या सहा महिन्यांच्या आंतच टिळक-महाविद्यालयांत शिकविणारे हे प्रोफेसर, व सरकारी शिक्षणसंस्थांवर बहिष्कार घालणारे हे धुरीण, मुंबई-युनिव्हर्सिटीस जोडलेल्या सरकारी-निमसरकारी कॉलेजांत कोठें तरी प्रोफेसर किंवा पोस्टखात्यांत मोठी नोकरी मिळावी म्हणून अर्ज करूं लागले आणि ही गोष्ट त्यांच्या सहकारी लोकांना कळतांच त्यांना आपल्या विसंगत वर्तनाचा खेद होऊन त्यांनीं आपण होऊन केसरी-मराठा कचेरींतील जागेचा राजीनामा दिला !

केळकरांना नांवें ठेवणाऱ्या, पण स्वतः राष्ट्रीय शिक्षणाकरितां कोणतेंच विशेष कार्य न केलेल्या, अशा लहानमोठ्या अनेक टीकाकारांचीं नांवें आणखी देतां येतील, पण ही यादी वाढविण्यापासून विशेष फायदा नाहीं. त्यांतल्या त्यांत जे विशेष प्रमुख टीकाकार त्यांचीच तेवढी या ठिकाणीं हजेरी घेतलेली आहे.

राष्ट्रीय शिक्षण बुडणें—तरणें ही गोष्ट केळकरांच्या एकट्याच्या हातची नव्हे. समाजांतील पुष्कळ लोकांनीं विद्यार्थी व पैसे पुरविले तरच राष्ट्रीय शिक्षण टिकेल. सरकारी मान्यता नसल्यामुळें राष्ट्रीय शिक्षणाच्या पदव्यांच्या किंमतींत खाजगी नोकरीच्याहि खात्यांत, कांहीं लोकांच्या दृष्टीनें आपणांकडून कमीपणा केव्हांहि राहतोच. पण समाजानें होईल तेवढी खटपट करून केल्यावर अपरिहार्य अशा या अडचणींचें कांहीं वाटत नाहीं. एकट्या केळकरांना व्यक्तिशः जबाबदार धरून त्यांच्या धोरणामुळें महाराष्ट्रांत राष्ट्रीय शिक्षणाचा नाश झाला असें जेव्हां कांहीं कांहीं लोक प्रतिपादितात, तेव्हां इतर गृहस्थांनीं आपलें कर्तव्य कसें काय केलें याची जाहीर रीतीनें चिकित्सा-

करणें प्राप्तच होतें. स्वतः कांचेच्या घरकुलांत बसणाऱ्या लोकांनीं दुसऱ्यावर दगड तरी फेकूं नयेत, पण केळकरांवर टीका करण्यांत प्रमुख कोण तर ज्यांनीं स्वतः कुचराई केली व जे तत्त्वाला जागले नाहींत किंवा ज्यांनीं स्वार्थत्याग केला नाहीं असेच लोक !

टीकाकारांचा कांगावखोर बाहणा असा कीं, केळकर राष्ट्रीय शिक्षणाविषयीं शिरा ताणून ठासून बोलत नाहींत व अतिशयोक्तीचीं विधानें करीत नाहींत म्हणून राष्ट्रीय शिक्षण बुडतें. या आक्षेपाचा हास्यास्पदपणा टीकाकारांच्या लक्षांत येत नाहीं याचें आश्चर्य वाटतें. बरें, केळकरांचे हे टीकाकार त्यांच्या मताप्रमाणें केळकरांची ही उणीव भरून काढीत असतां राष्ट्रीय शिक्षणाला जरूर तें उत्तेजन कां मिळूं नये ? तेहि स्वतःला पुढारी म्हणवितात ! आज महाराष्ट्रांत आपला शब्द चालतो व खरा होतो आणि केळकरांना कोणी विचारीत नाहीं, असें निदान परप्रांतस्थ लोकांना तरी छातीठोकपणें सांगण्याची त्यांची धाडसी तयारी असते. मग केळकरांनीं किंचित् सोडल्याबरोबर ढांसळून पडावे असे यांचे किंवा राष्ट्रीय शिक्षणाचे पाय ढिले कसे ? केळकरांना जर कोणी खरोखरी विचारीत नाहीं व त्यांचे टीकाकार हेच जर महाराष्ट्राचे खरे प्रतिनिधी, तर त्यांना केळकरांस बाजूला सारून राष्ट्रीय शिक्षण आपल्या पायावर उभें कां करतां येऊं नये ? पण दैवाची लीला ही कीं, जें एक राष्ट्रीय शिक्षणाचें महाविद्यालय महाराष्ट्रांत चालू आहे तें मुख्यतः केळकरांच्या मदतीवर चाललें असें त्याला वाहून घेतलेले लोकहि म्हणतात. आणि त्यांच्या बढाईखोर टीकाकारांच्या हातून चालविलेली महाविद्यालयाएवढी एकहि संस्था नाहीं ! राष्ट्रीय शिक्षणाविषयीं केळकर जपून बोलत असले तर उलट म. गांधींसारखे सर्वश्रेष्ठ पुढारी तरी अगदीं कसून व निश्चयात्मक लिहीत असतातना ? मग केळकरांच्या सौम्य भाषणाचा तेवढा जनताबुद्धीवर प्रतिकूल परिणाम कां व्हावा ? आणि गांधींच्या तीव्र उपदेशाचा अनुकूल परिणाम कां होऊं नये ? मेणाच्या स्पर्शानें वितळतो मात्र पण सूर्याच्या प्रखर किरणांनीं घट्ट बनूं शकत नाहीं असा जनताबुद्धि हा अजब पदार्थ तरी काय आहे ? किंवा त्याचा असाच अर्थ नाहीं काय कीं, न करणाराला जसें शनवारचें निमित्त, किंवा घरांतून बाहेर न पडूं इच्छिणाराला जसें मांजर आडवें गेल्याचें निमित्त, तसेंच केळकरांच्या भाषणा–लिहि-

ण्यांतील सावधगिरीचे शब्द किंवा मर्यादित स्वरूपाचीं त्यांचीं विधानें ही बोलघेवड्या राष्ट्रीय शिक्षणाभिमानी लोकांना फक्त एक निमित्त होतें.

राष्ट्रीय शिक्षणाला ज्या अडचणी आहेत त्या नैसर्गिक आहेत. त्या केळकरांनीं उत्पन्न केलेल्या नाहींत. या अडचणींमुळेंच महाराष्ट्रांत गेल्या चळवळींत स्थापित झालेल्या अनेक संस्था बुडाल्या, मध्यप्रांतांतील बुडाल्या, गुजराथेंतीलहि बुडाल्या. मद्रास, बंगाल, पंजाब, यू पी. प्रांतांत तर त्या निघाल्याच नाहींत. बिहार प्रांतांत निघाल्या पण त्याहि जवळ जवळ बुडाल्या. कर्नाटकांतीलहि बुडाल्या किंवा ज्या कोठें अजून उरल्या आहेत त्या जेमतेम जीव धरून आहेत. बरें, नुसतें द्रव्याभावामुळें नडलें म्हणावें तर तें खरें नाहीं. याला उदाहरण कर्वे यांनीं स्थापलेलें महिला विद्यापीठ. पंधरा लक्ष रुपयांची देणगी एकदम मिळाली, इमारती उत्कृष्ट, शिक्षकवर्ग अगदीं हवा तसा, असें असतां, मुली जितक्या याव्या तितक्या येत नाहींत अशी प्रो. कर्व्यांची तक्रार प्रसिद्ध आहे. महिला विद्यापीठाचे अधिकारी किंवा मुख्याधिकारीहि होण्याला माणसें मिळतात. पण आपल्या मुली त्या संस्थेंत पाठविणारीं माणसें मिळत नाहींत. या विद्यापीठाच्या ७०–७५ सभासदांपैकीं ज्यांच्या मुली इतर शाळा–कॉलेजांतून शिकत असतात पण महिला विद्यापीठांत येत नाहींत असे ( पांच–चारांशिवाय ) बहुतेक सगळेच भरतील ! गुजराथ विद्यापीठाला पैसा, इमारती या दृष्टीनें काय कमी आहे ! पण त्या विद्यापीठाची रड कशी आहे हें गेल्या केसरींत दिलेल्या माहितीवरून व पूर्वी छापलेल्या प्रो. आठवले यांच्या पत्रावरून वाचकांस कळून येईलच. केळकरांच्या निंदेचें खत–पाणी नित्य पडणारी चिंचवडची राष्ट्रीय शाळा, तिला गेल्या पांचचार वर्षांत सुमारें तीसचाळीस हजार रुपये मिळाले. असें असतां आज त्या शाळेंत शिक्षक अधिक कीं विद्यार्थी अधिक हा प्रश्नच आहे ! हें देखील केळकरांनींच केलें काय ? केळकरांच्या सौम्य सावधगिरीच्या बोलण्यानें तोटा होत असेल तर तो फार तर महाराष्ट्रापुरता. इतर प्रांतांत तर कांहीं केळकर असें सौम्य बोलून लिहून घाण करण्यास गेले नव्हते ना. ? मग तेथें ती घाण कां झाली ? तात्पर्य केळकरावर जे आक्षेप घेण्यांत येतात ते व्यक्तिद्वेषामुळें घेण्यांत येतात, त्याला दुसरें कारण नाहीं. आणि असे व्यक्तिशः व नांवानें हल्ले केले जातात म्हणूनच आज मुद्दाम इतर व्यक्तिनांवांचा स्पष्ट

उल्लेख करून टीकेचा उलट आहेर केला आहे. कोणाहि व्यक्तीसंबंधानें टीका करणें मनाला आवडत नाहीं. परंतु उत्तरास प्रत्युत्तर दिल्याशिवाय केळकरांचे बेहोष टीकाकार शुद्धीवर येणार नाहींत म्हणून आज हें अप्रिय काम केलें आहे.

---

# ७४. स. प. कॉ. प्रि. शहा यांचा राजीनामा

( केसरी, ता. २७ मे १९३० ).

सर परशुरामभाऊ कॉलेजचे प्रिन्सिपाल मि. एन्. एम्. शहा यांनीं आपल्या जागेचा राजीनामा देऊन शिक्षणप्रसारक मंडळीशीं संबंध तोडला ही बातमी आज बरेच दिवस बाहेर पडली आहे. त्यासंबंधानें येथील 'ज्ञानप्रकाशा'नें पुष्कळ अद्वातद्वा विधानें केलीं. परंतु मंडळींच्या मॅनेजिंग कौन्सिलला प्रि. शहा यांच्याशीं पत्रव्यवहार करून या प्रकरणाचा अखेर निकाल केल्याशिवाय स्वतः बाहेर कांहीं बोलतां येत नव्हतें; व स्वतः ते बोलेपर्यंत इतरांनींहि त्याविषयीं कांहीं लिहिणें योग्य नव्हतें म्हणून आम्हीं कांहीं लिहिलें नाहीं.

ज्ञानप्रकाशकारांनीं ज्या खोट्या बातम्या प्रसिद्ध केल्या त्या शिक्षणप्रसारक मंडळीला बेअब्रूकारक होत्या कीं नाहीं, याचा विचार मंडळी कायदेपंडितांच्या सल्ल्यानें जो काय तो करीलच. म्हणून त्यांच्या खोट्या विधानांना उत्तरें देऊन तीं खोडून काढण्याच्या भरीला आम्ही पडत नाहीं.

आम्ही इतकेंच म्हणतों कीं ज्ञानप्रकाशकारांनीं असल्या बातम्या प्रसिद्ध करण्याची घिसाडघाई केली. याचें कारण एकच दिसतें तें असें. गतवर्षी ज्ञानप्रकाशकारांच्या आवडत्या फर्ग्युसन कॉलेजमध्यें बखेडा होऊन त्याचा फार बोभाटा झाला व शेवटीं प्रि. कानिटकर यांना राजीनामा द्यावा लागला. तेव्हां ज्ञानप्रकाशकारांना प्रि. शहा यांचा राजीनामा ही एक बदला घेण्याची मोठी पर्वणी वाटली असेल. आणि खरोखरच पुण्यांतील दोन प्रमुख कॉलेजांच्या प्रिन्सिपालांचे राजीनामे थोड्या महिन्यांच्या अंतरानें दाखल व्हावे हा विलक्षण योगायोग खराच. पण आम्ही पुढें दिलेल्या हकीकतीवरून दिसून येईल कीं, या दोहों राजीनाम्यांची पार्श्वभूमिका वेगवेगळ्या प्रकारची आहे. फक्त एकच गोष्ट दोघांना सामान्य आहे ती ही कीं, दिवाणबहादुर गोडबोले हेच या दोन्ही कॉलेजांच्या नियंत्रण मंडळाचे प्रमुख सभासद आहेत;

व त्यांच्याच हातून या दोहों राजीनाम्यांवर अखेरचे शेरे पडण्याचा योग आलेला आहे. प्रि. कानिटकर यांच्या राजीनाम्यावर 'मंजूर' असा शेरा लिहितांना व शहा यांच्या राजीनाम्यावर 'नामंजूर' असा शेरा लिहितांना त्या त्या संस्थांना आपण न्यायच करतों आहों असें दिवाण बहादुरांना खरोखर वाटत असलें पाहिजे. फरक इतकाच कीं, कानिटकरांनीं राजीनामा दिला, यांत त्यांनीं शहाणपणा केला व शहा यांनीं राजीनामा दिला यांत त्यांनीं वेडेपणा केला, असा फरक गोडबोले यांना वाटला इतकेंच. दि. ब. यांचें वय, त्यांचा अनुभव, निर्विकार बुद्धीनें योग्य तेंच करण्याची त्यांची कार्यपद्धति व दोनहि शिक्षणसंस्थांवरील त्यांचें प्रेम—या गोष्टी लक्षांत घेतां त्यांनीं केलेला निकाल बरोबरच असला पाहिजे असें कोणीहि म्हणेल.

ता. ९ एप्रिल रोजीं प्रि. शहा यांनीं आपल्या प्रिन्सिपालच्या जागेचाच नव्हे तर लाइफ मेंबरशिपचाहि राजीनामा एकदम अभावितपणें लाइफ मेंबरांच्या बोर्डाकडे पाठविला. लाइफ मेंबर बोर्डानें त्याचा एकदम निकाल न करतां त्यांच्याशीं समक्ष चर्चा करण्याकरितां त्या वेळीं असलेले बोर्डाचे अध्यक्ष गो. स. गोडबोले व प्रो. करमरकर यांचें डेप्युटेशन पाठविलें. पण प्रि. शहा हे जो नकार एकदां घेऊन बसले तोच त्यांनीं अखेरपर्यंत टिकविला. समेटाचें असें कोणतेंच बोलणें ते बोलेनात. तक्रारींचा बरोबर खुलासा करीनात. रुजवातीला येईनात. राजीनामा दिल्यानें त्यांच्यावर मंडळीचें कर्ज देणें निघतें म्हणून सॉलिसिटरमार्फत जें काय बोलावयाचें तें बोलूं असें म्हणूं लागले व त्याप्रमाणें पत्रव्यवहार सुरू केला ! अर्थात् देण्याघेण्याचा प्रश्न कायद्यानेंच सुटणार तेव्हां तो सुटेल तसा व सुटेल तेव्हां सुटो. पण जूनमध्यें कॉलेज पुनः उघडणार, तेव्हां राजीनाम्याचा निकाल थांबवितां येत नाहीं म्हणून, लाइफ मेंबर बोर्डानें सर्व हकीकत लक्षांत घेऊन नामंजूर असा शेरा त्यावर मारला.

प्रि. शहा यांच्या या वर्तनासंबंधानें आतां विचार करूं. पहिली गोष्ट ही कीं, त्यांच्या अडचणी किंवा तक्रारी कांहींहि असल्या तरी त्यांनीं त्या प्रथम लाइफ मेंबर बोर्डापुढें—मांडावयास पाहिजे होत्या. पण बोर्डाचे एकंदर कागदपत्र पाहून व समक्ष खुलासे घेऊन दि. ब. गोडबोले यांनीं असा निकाल दिला कीं, "सदर कागदपत्रांत त्या अडचणींचा किंवा तक्रारींचा कोठेंहि

मागमूस लागत नाहीं." याचा अर्थ या तक्रारी शहा यांच्या मनांतच उद्भवल्या, मनांतच राहिल्या, व शेवटीं आपल्या मनानेंच त्यांनीं त्यांचा निकाल केला. हा सगळा मनपसंत कारभार करण्याला मोठा सोयीचा असेल पण तो जनरीतीला अनुसरून नाहीं. दहा लोकांचा जेथें संबंध आला त्या ठिकाणीं एखादद्दुसऱ्याचें पटत नाहीं असें होतें. किंवा कोणीएक दुसऱ्याविषयीं बेजबाबदारपणें अधिकउणें बोलतो अशी गोष्ट कोठेंहि घडतच असते. पण बोलणारा एक असला तरी न बोलणारे, किंवा एक जें बोलला त्याची माहितीहि नसणारे, दुसरे दहा असतात त्यांची वाट काय? या एकाच्या रागावर त्या दहासकट सगळ्या लाइफ मेंबर बोर्डावर प्रि. शहा यांनीं आपल्या राजीनाम्यांत शिंतोडे मात्र उडविले. पण आपल्या तक्रारी बरोबरीच्या या दहावीस लोकांपुढें मांडून, त्या प्रतिपक्षाच्या पदरांत पुराव्यासकट किंवा त्यांच्या कबुलीनें मांडून, बोर्डाकडून त्यांचा निषेध करवून घेण्याचें मनोधैर्य दाखविलें नाहीं, व स्वतःला झालेला 'अन्याय' सिद्ध केला नाहीं.

ही लाइफ मेंबर बोर्डाची गोष्ट झाली. पण मॅनेजिंग कौन्सिलमध्यें दि. ब. गोडबोले, न. चिं. केळकर, रा. ब. चितळे, कॉ. रानडे, नातूप्रभृति त्रयस्थ मंडळी असतां, आणि लाइफ मेंबर बोर्डाचा ठराव अयोग्य असतां तर तो फिरविण्याचा अधिकार कौन्सिलला असतां, त्याच्याहिकडे शहा यांनीं, राजीनामा देण्यापूर्वीं, आपली तक्रार नेली नाहीं. इतकेंच नव्हे तर लाइफ मेंबर बोर्डाकडून वर प्रकरण आल्यावर कौन्सिलचे अध्यक्ष गोडबोले यांनीं स्नेहभावानें सौजन्यानें समेट करण्याकरितां खाजगी पत्र शहा यांना पाठविलें, पण त्याला व्यक्तिशः उत्तर न देतां फिरून सॉलिसिटरचाच हवाला दिला, व सॉलिसिटरनें दिला तो जबाबहि उद्दामपणाचा दिला! या सर्व गोष्टी लक्षांत घेतां लाइफ मेंबर बोर्ड किंवा कौन्सिल यांच्याशीं शहा यांचें वर्तन झालें तें सर्वस्वीं रीत सोडून व निषेधार्ह असेंच झालें.

असो. प्रो. शहा व शिक्षणप्रसारक मंडळी यांचे संबंध काय होते याविषयीं बाहेर लोकांना फारशी माहिती नाहीं म्हणून ती देऊं. शहा हे मॅट्रिक खेरीज बी. ए. पर्यंतच्या सर्व परीक्षांत सर्व विद्यार्थ्यांत पहिले येत गेले. त्यांचा गणित विषय फार चांगला. विलायतेस जाऊन रँग्लर परांजप्यांप्रमाणें यश मिळवावें अशी त्यांना फार उत्कंठा. पण घरची गरिबी म्हणून तें जम-

ण्यासारखें नव्हतें. त्यांना सरकारी स्कॉलरशिप मिळूं शकली नाहीं, व धनिक लोकांकडून मदत मिळण्याचें चिन्ह दिसेना. इकडे त्याच सुमारास शि. प्र. मंडळीनें नवीन कॉलेज काढण्याचा विचार केला. अर्थात् शहासारखा विद्यार्थी रँग्लर होऊन कॉलेजला प्रोफेसर-प्रिन्सिपाल म्हणून लाभला तर चांगला ! म्हणून शहा यांना स्वतः सर्व खर्च सोसून विलायतेस अभ्यासाला पाठविण्याचें शि. प्र. मंडळीनें ठरविलें. अर्थात् दोघांचेंहि काम झालें. इतका खर्च करून पाठविलेला मनुष्य कायमचा लाभावा म्हणून त्यांना लाइफ मेंबर करून घेण्यांत आलें.

केंब्रिज येथें शहा यांनीं उत्तम यश मिळविलें व १९२१ सालीं ते परत आले. पण लाइफ मेंबरचा पगार सुमारें १४० रु. मिळणार तो आपल्यास पुरणार नाहीं, म्हणून "मला इतर लाइफ मेंबरपेक्षां अधिक पगार व घरभाडें इ० करितां कांहीं अधिक अलावन्स पाहिजे" अशी शहा यांनीं प्रथमच मागणी केली. वास्तविक तशी मागणी करण्याचा त्यांना अधिकार नव्हता. लाइफ मेंबर म्हटला म्हणजे सगळ्यांना सारखाच पगार असतो. मग कोणी अधिक विद्वान, कोणी कमी विद्वान, असा सूक्ष्म भेद करतां येत नाहीं. विलायतेला जाण्यापूर्वी शहा यांनीं वेगळ्या अटी प्रथमच घातल्या असत्या तर गोष्ट वेगळी. पण शहा यांनीं लाइफ मेंबर होण्याचें कबूल केल्यावर कांहींच प्रश्न उरला नाहीं. असो; परत येतांच शहा यांनीं रीतीला सोडून मागणी सुरू केली, व मंडळीनेंहि शहा हे प्रिन्सिपाल होणार म्हणून त्यांच्या कांहीं मागण्या मान्य केल्या. प्रथम त्यांच्या शिक्षणावर सुमारें १६ हजार रुपये खर्च झाले होते. शिवाय विशेष जोखमीकरितां म्हणून त्यांची १०००० रुपयांची पॉलिसी भरून ते परत येईपर्यंत मंडळीनें त्यावर सुमारें १९ शें रुपये हप्ते म्हणून भरले होते.

कराराप्रमाणें तेथील शिक्षण पुरें झाल्यावर "मला आणखी कांहीं दिवस राहूं द्या !" अशी विनंति शहा यांनीं केल्यावरून मंडळीनें खासगी वर्गणी करून त्यांना आणखी पांच हजार रुपये पाठविले ! परत आल्यावर "प्रि. चें काम करण्याला मला मनस्वास्थ्य लाभावयाचें तर माझ्या घरीं कुटुंबाला पांच हजार रुपये कर्ज झालें आहे तें तुम्ही फेडा" असें सांगितल्यावरून मंडळीनें तीहि गोष्ट पत्करली !

" मी प्रिन्सिपाल व्हावयाचा तर मला राहण्यास वेगळा बंगला कॉलेज-जवळ बांधून द्या " असें शहा म्हणाले तेंहि मंडळीनें मान्य केलें; व त्याकरितां १०००० रुपयांची मंजुरी दिली. बंगला बांधून होऊन शहा तेथें रहावयास जाईपर्यंत त्यांना दरमहा ५० रुपये घरभाडें, एक गडी, व दरमहा तीस रुपये-पर्यंत तांगाभाडें मंजूर करण्यांत आलें. यानंतर गणित विषयांतील पुस्तकें मासिकें यांची गोष्ट निघाली. वास्तविक एम्. ए. पर्यंतहि गणित विषयांत अभ्यास म्हटला तरी त्याकरितां गणित विषयाच्या पुस्तकांची लायब्ररी बेताच्या खर्चांत होऊं शकते. पण शहा हे बडे रँग्लर ! त्यांना या विषयाचें कदाचित् संशोधन पुढें करावयाचें असेल ! व तसें झाल्यास शिक्षण—प्रसारक मंडळाचें नांव होईल ! अशा बुद्धीनें मंडळीनें त्यांच्याकरितां हजारों रुपयांचीं पुस्तकें व मासिकें आजवर खरेदी केलीं. त्यांतील पुष्कळशीं फ्रेंच किंवा जर्मन भाषेंत आहेत. हें सांगण्याचें कारण असें कीं, या दोनहि भाषा कॉलेजांतील विद्यार्थ्यांना कळत नाहींत. अर्थात् पुष्कळसा पैसा शहा यांच्या व्यक्तिशः हौसे-खातर खर्च झाला, विद्यार्थ्यांच्या उपयोगाकरितां नव्हे.

इतकेंहि करून रँ. परांजपे यांना ' बॅक नंबर ' ( म्हणजे ते अभ्यास नाहीं म्हणून मागें पडले ) असें म्हणणाऱ्या शहांवर, युनिव्हर्सिट्यांच्या कमिट्यांपुढें वेळोवेळीं " मी गणित विषयासाठीं कांहीं करूं शकलों नाहीं " असें म्हण-ण्याचा ( म्हणजे आपल्या निरुद्योगीपणाची कबुली देण्याचा ) प्रसंग यावा हें आश्चर्य नव्हे काय ? शहांकरितां आणविलेल्या पुस्तकांपैकीं अनेकांचीं पानेंहि फाडलेलीं नाहीत हें पाहून एकदां एका विनोदी कंत्राटदारानें मंडळीला असें विचारिलें कीं " या पुस्तकांचीं पानें फाडण्याचीं टेंडरें तुम्हीं केव्हां माग-विणार ? मागवाल तेव्हां कळवा म्हणजे आम्हीहि टेंडर भरूं ! " तात्पर्य, मि. शहा हे प्रिन्सिपाल म्हणून सदैव राहावे या हेतूनें त्यांचा शब्द लाइफ मेंबर बोर्डानें कोणताहि केव्हांहि खालीं पडूं दिला नाहीं; व प्रि. आपटे यांनीं पेन्शन घेतल्यानंतर दर तीन वर्षांनीं होणाऱ्या दोन निवडणुकींत बोर्डानें शहा यांना एकमतानें प्रिन्सिपाल निवडलें. अशा रीतीनें मंडळीनें यांच्याकरितां वीस पंचवीस हजार रुपये खर्च केले.

उभयतांचा करार असा होता कीं, शहा हे लाइफ मेंबरशिपची वीस वर्षांची मुदत नोकरी करून पुरी करतील, तर ही सर्व रक्कम त्यांना मंडळीनें

साडली किंवा बक्षीस दिली असें समजावें. पण मध्यंतरीं त्यांनीं राजीनामा दिल्यास ती रक्कम त्यांनीं मंडळीला भरून द्यावी व तसा बॉंड लिहून द्यावा. या कराराचा ठराव ज्या सभेंत पक्का झाला, तिला शहा हे स्वतः हजर होते. तथापि त्यांनीं तो बॉंड पुढें केव्हांहि लिहून दिला नाहीं. आणि हल्लीं "राजीनामा देतांना मंडळीला असें कळविलें कीं, मीं आठनऊ वर्षे नोकरी केली म्हणून या सर्व रकमेपैकीं निम्मी रक्कम मला सोडावी व निम्मी रक्कम देण्याला मी नैतिक दृष्ट्या बांधला गेलेलों आहे असें समजतों." आणि वीस वर्षांचा नोकरीचा करार लिहून दिला असतां त्यांना ती जशी मध्येंच सोडतां आली; तसेंच हें नैतिक बंधनहि पाळावयाचें नाहीं असें त्यांनीं ठरविल्यास, मंडळीशीं कायदेबाजपणाचें भांडण भांडावें म्हणून त्यांनीं सॉलिसिटरमार्फत मंडळीशीं पत्रव्यवहार सुरू केला.

या संबंधानें मुद्द्याची अशी आणखी एकच गोष्ट सांगावयाची राहिली आहे. ती अशी कीं, आपल्या सगळ्या मागण्या मान्य होऊन आपण प्रिन्सिपाल झाल्यास शि. प्र. मंडळीला कर्ज झालें त्याच्या फेडीकरितां आपण कमींत कमी पन्नास हजार रुपये मिळवून देऊं, अशी शहा यांनीं शपथप्रमाण-वजा खातरजमा करून दिली होती. परंतु अखेरपर्यंत शहा यांनीं कॉलेजला एखादीहि मोठी रक्कम मिळवून दिली नाहीं. प्रि. परांजपे व कानिटकर यांनीं आपल्या संस्थेकरितां किती धांवपळ केली व किती वर्गण्या जमविल्या हें पाहिलें, आणि वरील गोष्ट लक्षांत घेतली म्हणजे शहा यांनीं संस्थेविषयीं आपलेपणा कितपत बाळगला होता हें सहज कळून येतें.

मंडळीचे लाईफ मेंबर होतांना, आपणाला किती वर्षें नोकरी करावी लागेल व आपणाला पगार किती मिळेल याची पूर्ण कल्पना शहा यांना होती. असें असतां त्यांनीं मंडळीच्या खर्चानें विलायतेस जाऊन विद्या संपादन करून परत येतांच नव्या गोष्टी काढाव्या हें कशाचें द्योतक होय? मंडळी-कडून विलायतचा खर्च घेतांनाच पुढील डाव मनांत ठेवून शहा हे लाइफ मेंबर झाले असतील तर त्यांनीं मंडळीशीं कपटाचरण केलें हें उघड ठरतें. पण कपटाचरणाचा गुन्हा कबूल करण्यापेक्षां "माझें मन बदललें, मत बदललें" असें सांगणें याची गुन्हेगारी कमी ठरते अशा समजुतीनें, शहा यांनीं दुसरा मार्ग अवलंबिला. त्यांनीं मंडळींना स्वच्छ सांगितलें कीं, 'मी स्पेशल पगार, भत्ता,

अलावन्स वगैरे मागतों यावरून मी त्यागवादी नसून भोगवादी आहे असें तुम्ही म्हणाला तर 'होय' मी खरोखरच आतां भोगवादी बनलों आहें, त्यांच्याच इंग्रजी शब्दांत सांगावयाचें तर असें "All this sounds, materialistic and I confess I am materialistic. I am changed, my views are changed, my circumstances are changed."

स्वतःबद्दल शहा यांनींच अशी कबुली दिल्यामुळें त्यांनीं हल्लींचा राजीनामा कां दिला याचा ग्रंथ लावणें ही फार सोपी गोष्ट होऊन बसली आहे. शहांचे उसने पाठीराखे ज्ञानप्रकाशकार यांनीं कांहीं खोटीं विधानें करून वाचकांस असें भासविलें आहे कीं, शहा यांना कांहीं लाइफ मेंबर लोकांनीं इतकें भंडावून सोडलें कीं, आपण वचनभंग केला असें कोणी म्हटलें तरी सोसवेल पण त्यांची ही छळणूक सोसवत नाहीं अशा वैतागानें शहा यांनीं राजीनामा दिला! पण इतर कांहीं गोष्टी बाहेर आल्या नसत्या तर ही मानभावीपणाची संपादणी कदाचित् साधली असती. पण आतां असें बाहेर आलें आहे कीं, सुरत येथील कॉलेजचे प्रिन्सिपाल गाडगीळ हे राजीनामा देऊन पुण्यास येऊन राहणार; यामुळें ती जागा रिकामी होणार. या संधीचा फायदा घेऊन शहा यांनीं कोणास कांहीं न कळूं देतां सुरत कॉलेजच्या अधिकाऱ्यांशीं बोलणें करून 'गाडगीळ यांचे जागीं तुमची नेमणूक करूं असें आश्वासन मिळविलें. या जागेवर त्यांचा पगार प्रथम सवापांचशें व नंतर दरवर्षी पंचवीस रुपयांप्रमाणें बढती मिळून पांच वर्षांत साडेसहाशें पर्यंत वाढावा असें ठरल्याचें बोलतात. ही गोष्ट एप्रिलच्या पहिल्या आठवड्यांत घडली व लगेच ता. ९ एप्रिल रोजीं त्यांनीं हल्लींच्या जागेचा राजीनामा दिला! यापूर्वीहि शहा यांनीं सर पुरुषोत्तमदास ठाकुरदास व बॅ. जयकर यांच्यामार्फत या जागेविषयीं अशीच खटपट केली होती. पण तो योग तेव्हां आला नाहीं. तो हल्लीं फिरून आला व साधलाहि!

शि. प्र. मंडळीकडून होणारा छळ खरोखरच ही नैतिक आत्महत्या करण्याइतका दुःसह झाला असता तर शहा यांनीं सुरतेची ही जागा मिळेपर्यंत वाटच पाहिली नसती. किंवा सुरतेस तरी ते त्यांच्या हल्लींच्या पगाराइतकाच पगार घेऊन जाते तर मग त्यांच्या विरुद्ध बोलण्याला कोणाला तोंडच नव्हतें.

पण वर सांगितल्याप्रमाणें शि. प्र. मंडळीची अडचण पाहून त्यांच्याकडून मिळविलेल्या मागण्या, सुरत कॉलेजवर जाण्याचा पूर्वीचा फसलेला प्रयत्न, व हल्लींचा हा साधलेला दुसरा प्रयत्न, हे सर्व लक्षांत घेतां, शहा यांची लोभ-बुद्धि हीच त्यांच्या स्वाभिमान बुद्धीपेक्षां अधिक प्रभावी ठरली असें म्हणणें प्राप्त होतें. शहांना लोभबुद्धि अनावर होऊन पुणें सोडून सुरतेस जावयाचें होतें तर ही गोष्ट त्यांना सुखासमाधानानें करितां आली असती, मंडळाचें कर्ज फेडण्याचाच काय तो प्रश्न; तो त्वयार्धं मयार्धं या न्यायानें कदाचित् सुटलाहि असता. किंवा सुरतेच्या जागेवर पगार मोठा तेव्हां त्यांतूनहि त्यांना ही रक्कम फेडतां आली असती. पण प्रांजलपणाचा त्याग करून कुत्सितपणाचा नाठाळपणाचा अंगिकार शहा यांनीं केला तेव्हां कोणालाहि स्पष्ट व सरळ बोलणेंच भाग झालें. त्यांनीं शि. प्र. मंडळीच्या एकंदर लाइफ मेंबर बोर्डा-वर जो छळवादाचा आरोप आणला तो सर्वस्वीं खोडसाळ आहे असें बोर्डाचें म्हणणें आहे. व ज्या मॅनेजिंग कौन्सिलांत दि. ब. गोडबोल्यासारखे निस्पृह लोक आहेत त्या कौन्सिलाकडे कधींहि तक्रार न देतां, उलट कौन्सिलनें मला न्याय दिला नाहीं असा बहाणा शहा यांनीं करणें हें त्यांना सर्वस्वीं न शोभण्यासारखें आहे. पण मुळांत जर तक्रारीला फारसा आधारच नाहीं तर शहा यांना त्या तक्रारी बोर्डापुढें किंवा कौन्सिलपुढें मांडून चर्चा करण्याचें धैर्य कोठून होणार? म्हणून त्यांनीं सुरतेकडे तोंड करून पुण्यावर लाथा झाडल्या. कारण नसतां प्रांतिक किंवा जातिविषयक अहंकाराचा आरोप कोणीं केला असतां कोणालाहि सहजच चीड येते. तेव्हां आतां शहा यांनीं उघडपणें पुढें येऊन त्यांचा छळ कोणीं कसा केला हें सविस्तर जाहीर करावें तरी एक, किंवा आपण स्वतः लोभबुद्धीला बळी पडून शि. प्र. मंडळाला नसता दोष लावण्याचें पाप केलें हें कबूल करावें तरी एक, याखेरीज तिसरा भलेपणाचा मार्ग नाहीं.

अशा विद्वान् माणसानें असा कांगावा करीत राजीनामा देऊन निघून जावें हा सहजच लोकांच्या तोंडीं टीकेचा विषय होऊन बसला. या कामीं भलेपणानें वागण्याचा मंडळीनें निश्चय केला म्हणूनच त्यांना कांहीं दिवस मूग गिळून बसावें लागलें. कारण मॅनेजिंग कौन्सिलाचा अखेर निर्णय व्हाव-

याचा होता. पण आतां सर्व गोष्टी चव्हाठ्यावर आल्या आहेत व आणखीहि येतील. शहा यांना जसें कायदेपंडित सल्लागार मिळतात तसेंच शि. प्र. मंडळीलाहि मिळतीलच व मग हें प्रकरण कोर्टांत जातें कीं काय हें दिसून येईलच. पण शि. प्र. मंडळीच्या बाजूचा, अनधिकृत असा का होईना, पहिला हप्ता तरी लोकांपुढें यावयास पाहिजे होता. तो या लेखानें आम्ही आज वाचकांपुढें मांडला आहे, अर्थात् पुन: लिहिण्याचा प्रसंग आल्यास लिहूंच.

---

# ७५. रानड्यांचें विज्ञानबोधक स्मारक

( केसरी, जानेवारी १९३५ )

परवां बुधवारीं कै. रानडे यांची पुण्यतिथि साजरी करण्याचे समारंभ एका पुण्यांत तीन ठिकाणीं झाले. तसेच ते बाहेरगांवींहि नेहमींप्रमाणें झाले असतीलच. पुण्यांत केवळ वेगवेगळ्या निमित्तांमुळेंच निरनिराळे समारंभ झाले. गोखले हॉलमधील समारंभ मामुली स्वरूपाचा लिबरल क्लबातर्फे झाला. त्यांत रानडे यांचें सामान्य गुणवर्णन झालें तें ठीकच होतें. दुसरा समारंभ खुद्द रानडे यांच्या वाड्यांत झाला. हा समारंभ विज्ञानाच्या एका विशिष्ट शाखेंत घडलेल्या प्रत्यक्ष व्यावहारिक कार्याला उद्देशून होता. तें कार्य रसायनशास्त्रासंबंधीं असून, ते करणारे गृहस्थ म्हणजे प्रो. दत्तोपंत लिमये हे रानडे यांच्याच स्मरणार्थ उभारलेल्या इन्स्टिटयूटचे मुख्य चालक आज अनेक वर्षें आहेत.

प्रो. लिमये यांना या इन्स्टिटयूटमध्यें अनेक रासायनिक प्रयोग करतां आले; व याशिवाय त्यांनीं स्वतःच्या घरीं लहानशी रसायनशाळा बनवून स्वतंत्र रीतीनें अनेक प्रयोग केले. या प्रयोगांत प्रो. लिमये यांनींच प्रथम उपयोगांत आणलेल्या कांहीं रसायनपद्धतींना जर्मनींतील रसायनशास्त्रसमितीकडून मान्यता मिळालेली आहे. त्यांनीं नव्या कृतीनें केलेले कांहीं पदार्थहि आज बाजारांत विकावयास आलेले आहेत. यासंबंधीं विशेष माहिती 'सह्याद्रि' मासिकाच्या गेल्या अंकांत वाचकांना मिळाली असेलच. येथें इतकेंच सांगा-

चयाचें कीं कै. रानडे हे अशा प्रत्यक्ष विज्ञानविषयक कार्याचे किती मोठे चहाते होते हें लक्षांत घेतलें असतां, प्रो. लिमये यांनीं हा समारंभ खुद्द रानड्यांच्याच वाड्यांत घडवून आणला ही गोष्ट विशेष उचित झाली असें म्हणतां येईल.

या व्यक्तिकार्याप्रमाणेंच रानडे इन्स्टिटयूटनें केलेलें कार्यहि आपल्या परीनें महत्त्वाचें आहे. तेथें होणाऱ्या कार्याला साधनें मर्यादित असल्यामुळें तिच्या चालकांच्या इच्छेप्रमाणें हवें तें व हवें तितकें काम संस्थेंत होऊं शकत नाहीं, यास इलाज नाहीं. तथापि चालू सालांतच सदर संस्थेचा ज्युबिलीसमारंभ संस्थेच्या जागेंतच होईल अशी अपेक्षा आहे. आणि तो समारंभहि रानडे यांच्या विज्ञानविषयक अभिरुचीला उचित असाच होईल.

तिसरा समारंभ टिळक-स्मारक-मंदिरांत झालेला. या समारंभाचें वैशिष्टय विज्ञानविषयक ग्रंथप्रकाशनांत होतें. हा विज्ञानबोध नांवाचा ग्रंथ श्री. श्रीपाद महादेव माटे यांच्या प्रयत्नानें तयार झालेला असून त्यांत निरनिराळ्या भौतिक शास्त्रांसंबंधानें किती चांगले शास्त्रीय लेख आले आहेत हें तें पुस्तक वाचणा-रांना कळून येईलच. प्रो. लिमये यांनीं करविलेला समारंभ फक्त एका रसा-यनशास्त्रासंबंधीं होता, तर श्री. माटे यांनीं समारंभानिमित्त प्रसिद्ध केलेल्या ग्रंथांत अनेक शास्त्रांचा समावेश झालेला आहे.

वास्तविक पाहतां कै. रानडे हे भौतिक शास्त्रांत प्रवीण नव्हते. किंबहुना त्यांनीं आपल्या विश्वविद्यालयाच्या परीक्षांकरितां अभ्यासिलेल्या विषयांत भौतिक शास्त्र हा विषय असला तर फारच थोडा असेल. कै. रानडे यांनीं घेतलेला ऐच्छिक विषय इतिहास होता, व त्यांत त्यांनीं नुसती पदवीच नव्हे तर आपल्या विद्वान् शिक्षकांकडून वाहवाहि मिळविली! तथापि रानडे यांची बुद्धि इतकी विशाल होती कीं, भौतिक शास्त्र किंबहुना एकंदरीनें विज्ञानशास्त्र याचें महत्त्व त्यांना माहीत होतें. इतिहासाप्रमाणें अर्थशास्त्र हाहि त्यांचा आवडीचा विषय होता; आणि ज्याला अर्थशास्त्राची महती कळते त्याला भौतिक सुधारणांच्या मुळाशीं व अर्थोत्पादनाच्या मुळाशीं असणारें जें विज्ञान-शास्त्र त्याची आवड मनांतून तरी असलीच पाहिजे.

धार्मिक व सामाजिक सुधारणा या विषयांच्या दृष्टीनें पाहतां विज्ञानाचें महत्त्व रानडे यांना कां वाटत असेल हेंहि सांगावयास नकोच. कारण त्यांच्या-

सारख्या धार्मिक बुद्धीच्या मनुष्याला आस्तिक्यवादाचें समर्थन करणारें भौतिक शास्त्राच्या परिणतीसारखें साधन हें महत्त्वाचें वाटल्याशिवाय राहिलें नसेल. सामाजिक सुधारणेच्या प्रगतीलाहि भौतिक शास्त्राची परिणति व तिचें प्रत्यक्ष कार्य हीं उपकारक होतात हा सिद्धांत केवळ तात्त्विक नसून सर्व जगाच्या अनुभवावर आधारलेला आहे. तात्पर्य, इतिहास, अर्थशास्त्र, धर्म, तत्त्वज्ञान व सामाजिक सुधारणा या विषयांतील रानडे यांचे प्रगल्भ विचार ज्याला विदित आहेत, त्याला रानडे व विज्ञान यांचा संबंध वेगळा सांगण्याचें कारण नाहीं.

' विज्ञानाची ' व्याख्या अनेकांनीं अनेक प्रकारें केली आहे. स्वतः रानडे यांनीं ' विज्ञान ' या शब्दाचा अर्थ विवेक, सदसद्‌विचार, मनानें केलेली मनाची परीक्षा असा केला आहे; तथापि सुखाची वृद्धि व दुःखाचा नाश हे या परीक्षेचे हेतु असें सांगतांना बरें व वाईट या शब्दांत मानसिक सृष्टीप्रमाणें भौतिक सृष्टीचाहि संबंध मानलेला आहे. " अंतश्चक्षूनें पाहिलें असतां सर्व सृष्टींत जर कांहीं दिसत असेल तर तें विज्ञान होय ! " " सृष्टी विज्ञानमय आहे " असे विचार त्यांच्या धर्मपर व्याख्यानांत आढळतात. विज्ञानबोधाच्या प्रस्तावनेंत लिहिल्याप्रमाणें " ज्ञानाच्या सर्व शाखा व उपशाखा यांजवर रानड्यांचा अत्यंत लोभ असे आणि थंड झालेल्या महाराष्ट्राला देशप्रेमाचा मूळ उबारा त्यांनींच उत्पन्न केला." मध्ययुगीन माधवाचार्यांप्रमाणें रानडे यांचे संबंधानेंहि " सर्वज्ञः स हि माधवः" असें म्हणण्यांत येतें त्याचा अर्थ खरोखरच सर्व शास्त्रोपशास्त्रांचा पूर्ण अभ्यास त्यांनीं केला होता असा घ्यावयाचा नाहीं, तर त्या शास्त्रोपशास्त्रांवर त्यांचा लोभ होता असाच घेतला पाहिजे. आणि गुणांचें महत्त्व कळल्याशिवाय कोणत्याहि गोष्टीवर कोणाचेंहि प्रेम किंवा लोभ जडूं शकत नाहीं. अर्थातच रानडे यांची विशेष योग्यता त्यांच्या खोल, व्यापक व पल्लेदार बुद्धीमुळें मानण्यांत येते.

विज्ञान म्हणजे भौतिकशास्त्र असा सामान्य अर्थ आहे. पण भौतिक म्हणजे जड आणि म्हणून कमी महत्त्वाचें, अशी समजूत करून घेण्याचें कारण नाहीं. आधुनिक शास्त्रज्ञांनीं, " जड हेंहि चैतन्यच आहे व एकजिनशी चैतन्याशिवाय जगांत दुसरें कांहीं नाहीं " असेंच ठरविलें आहे. शिवाय विज्ञान हें ज्ञानाचें प्रतिपक्षी नसून फार तर प्रतियोगी म्हणतां येईल. गीतेंत

ज्ञान म्हणजे अनेकत्वांतून एकत्व पाहणें व विज्ञान म्हणजे एकत्वांतून अनेकत्व पाहणें अशा व्याख्याच केल्या आहेत. याचा अर्थ विज्ञानाची ज्ञानाशिवाय व ज्ञानाची विज्ञानाशिवाय पूर्तता होणें शक्य नाहीं. तळमजला व दुमजला हे जसे एकाच घराचे दोन मजले व दोहोंलाहि एकमेकांतून प्रवेश, त्याचप्रमाणें ज्ञान व विज्ञान हीं होत, असेंहि म्हणतां येईल. उपनिषदांत ' विज्ञानं तनुते यः स कर्माणि तनुतेऽपि च ' असें म्हटलें आहे. यावरून विज्ञानाच्या फलश्रुतीच्या महत्त्वाची चांगली कल्पना येईल. कर्म हें प्रवृत्तीचें प्रतीक आणि यज्ञ हें त्यागाचें व निवृत्तीचें प्रतीक. यामुळें एका विज्ञानांत प्राणिमात्राचीं सर्व कर्तव्यें बसूं शकतात. यामुळें विज्ञान हें मोक्षाप्रमाणें अभ्युदयाचेंहि साधन होऊं शकतें.

हिंदू लोकांचा मोक्षाकडील ओढा जितका प्रसिद्ध आहे, तितका तो अभ्युदयाकडे नाहीं अशी ज्यांची समजूत आहे, त्यांना विज्ञानवाङ्मय सर्वथा आदरणीयच वाटेल. जगांतील इतर राष्ट्रांच्या बरोबरीला येऊन, स्वराज्य, स्वतंत्रता इत्यादि अभीष्टांची प्राप्ति करून घ्यावयाची असेल तर आतां विज्ञानावर या देशांतील जनतेनें विशेष भर दिला पाहिजे. श्री. माटे यांनीं ' विज्ञानबोधा'च्या प्रस्तावनेंत हा विषय जोरदार रीतीनें मांडला आहे. स्वराज्य व स्वातंत्र्य मिळविलेल्या राष्ट्रांच्या इतिहासांत क्रांतिपूर्वी विज्ञानवाङ्मय प्रसृत होऊन अधिकारसंक्रमणाची पूर्व तयारी झालेली आढळते. हिंदुस्थानांतहि ही क्रांति म्हणजे सत्तासंक्रमण व्हावें, अशी इच्छा असेल तर विज्ञानाची उपासना विशेष जोरानें झालीच पाहिजे.

---

## ७६. हिंदु राष्ट्राचें एकीकरण

( ता. २९ आक्टोबर १९१२ )

एका आठवड्यापूर्वी दिल्ली येथें ' पंजाब हिंदू सभे ' ची चवथी बैठक झाली. सभेचें काम दोन दिवस चालूं होतें. अध्यक्षस्थानीं ना. रायबहादूर शादिलाल, हायकोर्ट वकील लाहोर, या तरुण व तरतरीत गृहस्थांची योजना करण्यांत आली होती. सभेस सुमारें दीडशेंच प्रतिनिधि हजर होते; परंतु या

दांडिशींच प्रतिनिधींच्या रूपानें पंजाबांतील अवघा सुशिक्षित हिंदू समाज सभा-स्थानीं जमला होता असें म्हणण्यास हरकत नाहीं. अध्यक्षांच्या भाषणांत व सभेच्या कार्यक्रमांत राजकीय व सामाजिक असे विषय सरमिसळ आले होते. स्थूल दृष्टीनें पाहतां पंजाबच्या प्रांतिक सभेची ती एक बैठक झाली असें म्हणतां येईल. परंतु प्रांतिक सभा ही राष्ट्रीय सभेच्या अंगभूत असल्यामुळेंच ती सर्व ' हिंदी ' लोकांची मिळून सभा असते; व दिल्लीस भरलेली ही सभा ' हिंदू ' लोकांची होती एवढा त्यांत फरक. पण केवळ दृष्टि बदलल्यानें लहानसहान फरकांचेंहि महत्त्व कांहीं विशेष रीतीनें भासूं लागतें; व आजपर्यंत हिंदी अशा स्वरूपाचा जो थाट आमच्या चळवळींना होता तो सर्वस्वीं न लोपला तरी कांहीं वेळ बाजूस ठेवून ' हिंदू ' या नांवानें चळवळ करण्याची आज आम्हास गरज आहे, ही गोष्ट पंजाबच्या हिंदूसभेनें व्यक्त केली आहे यांत शंका नाहीं. ही गोष्ट कदाचित् सर्वथा इष्ट नसेल, व चार वर्षांपूर्वीपर्यंत हिंदी म्हणजे ईकारान्त हिंदू व हिंदू म्हणजे उकारान्त हिंदी या शाब्दिक भ्रमा-पलीकडे या दोन शब्दांत खरोखर कांहीं तफावत असेल असें कोणास फारसें वाटतहि नव्हतें. पण दुर्दैवानें म्हणा अगर सुदैवानें म्हणा, चार वर्षांपूर्वी आमच्या मुसलमान बंधूंनीं राजकीय हक्कासंबंधानें जी विशेष चळवळ केली तिजमुळें, हिंदू लोकांत आपोआपच अशी जागृति उत्पन्न झाली कीं, ' हिंदी ' या नांवाचा जरी आम्हांस अभिमान आहे व असला पाहिजे तरी ' हिंदू ' या नांवाचा अभिमानहि आपण सोडतां कामा नये. हिंदुस्थानच्या चालू इतिहासांत ही एक मोठ्या महत्त्वाची विचारक्रांति घडून आलेली आहे, हें आज निश्चित होय. या विचारक्रांतीचे परिणाम कोठवर जातील हें मात्र आज सांगवत नाहीं.

पण या विचारक्रांतीचे दृश्य परिणाम हिंदुस्थानच्या एका विवक्षित प्रांतां-तच कां दिसून यावे ? इतर ठिकाणीं ते कां दिसून येऊं नयेत ! हा प्रश्न सहज सुचणारा आहे. व त्याचें उत्तर असें आहे कीं, सर्व हिंदुस्थानांतील हिंदू लोकांना स्वस्वरूप ओळखून वागण्याची जरुरी आज उत्पन्न झाली आहे, तरी त्यांतल्या त्यांत उत्तर हिंदुस्थानांत व विशेषतः पंजाबांत ही गरज विशेष भासूं लागली आहे. याचें कारण हें कीं, पंजाबांत आमच्या मुसलमान बंधूंचे हातपाय दिवसेंदिवस अधिकाधिक पसरत जाऊन थोड्याच काळांत ते सर्व

आंथरूण आपण एकटेच व्यापून टाकतील, व हिंदु लोकांस थंडीवाऱ्यांत पोटाशीं पाय घेऊन जमिनीवर कुडकुडत पडावें लागेल कीं काय अशी भीति –खरी असो वा खोटी असो–पंजाबांतील हिंदू लोकांस वाटूं लागली आहे. पंजाब हिंदू सभेच्या अस्तित्वावरून ठरणारी ही गोष्ट ना. शादिलाल यांच्यासारख्या नेमस्त पुढाऱ्यानें दिल्लीस केलेल्या भाषणावरून निःसंशय सिद्ध होत आहे. या भाषणांत ते म्हणतातः––देशांतील एका विवक्षित वर्गास अधिक हक्क देऊं केल्यानें त्या वर्गास आपलें महत्त्व बेसुमार वाटूं लागणार; व तसें वाटूं लागल्यास, दुसऱ्या वर्गांना ' तुम्ही हातपाय जोडून स्वस्थ राहून तटस्थवृत्तीनें काय चाललें आहे तें पहात बसा ' असें सांगणें म्हणजे या दुसऱ्या वर्गास आत्महत्त्येचा उपदेश करण्यासारखेंच आहे ! व असला कोणाचा उपदेश आम्ही साफ ऐकत नाहीं असें जर कोणीं म्हटलें तर त्यांत त्यांची चूक नाहीं. तीन वर्षांपूर्वी जातिभेदमूलक असें जें राजकीय धोरण सरकारनें उचललें त्यामुळें अशी एक कांहीं बिकट परिस्थिति आज उत्पन्न झाली आहे कीं, तिचा प्रतिकार राष्ट्रीय सभेसारख्या संस्थेकडूनहि होणें आतां दुरापास्त आहे. राष्ट्रीय सभा सर्व ' हिंदी ' लोकांबद्दल बोलणार; तेथें हिंदू व मुसलमान असा भेद मुळांत नव्हता व आजहि नाहीं. पण इकडे खुद्द सरकारानेंच राजकीय सुधारणांचा पाया जातीभेदावर तीन वर्षांपूर्वी रचला, व झाली ही चूक तेवढ्यापुरतीच नसून ती यापुढें कायमहि होऊं पहात आहे ! अर्थात् राष्ट्रीय सभेवर सर्व भिस्त न ठेवतां हिंदू लोकांनीं मुसलमानांप्रमाणेंच आपल्या राजकीय हक्काचें संरक्षण करण्यास आपणच पुढें झालें पाहिजे. धर्मशाळेंत उतरलेले सगळे मुशाफर एकाच वेळीं झोंपी गेले असले तर सर्वांसच झोंप चांगली येईल. परंतु त्यांतला एखादा मुशाफर उठून मुद्दाम एकटाच जागत बसला आहे असें कळल्यावर बाकीच्या मुशाफरांना सुखानें झोंप कशी येणार ! आपले हक्क कमी झाले व ते दुसऱ्यास मिळाले असें पाहिलें तरी ' स्तब्ध ' बसा–आणि हीच गोष्ट एकदां नव्हे दोनदां नव्हे तर वारंवार घडून येऊं लागली तरीहि ' स्तब्धच बसा '–चळवळ करूं नका, असें हिंदू लोकांस सांगणें म्हणजे तुम्ही हिंदुत्वास पुढें मागें कायमचे मुकण्यास तयार व्हा असें सांगण्यासारखें नव्हे तर दुसरें काय ? ना. शादिलाल यांचा हा युक्तिवाद बरोबर आहे असें कोण म्हणणार नाहीं ?

आजपर्यंत, म्हणजे जोंपर्यंत जातिमूलक भेदभावाचा विटाळ सरकारनें आपल्या राजकीय धोरणास करूं दिला नव्हता, व राष्ट्रीय सभा ही देशांतील मुख्य व मध्यवर्ती संस्था असून तिचें वजन सर्व राष्ट्रावर पडत होतें, तोंपर्यंत पंजाब–हिंदूसभेसारखी जातिविशिष्ट सभा काढून तिजकडून स्वतःपुरत्या राजकीय हक्कांचा विचार करविणें हें कांहींसें अदूरदर्शीपणाचें लक्षण मानलें गेलें असतें तर नवल नव्हतें. परंतु मुसलमान बंधूनीं सर सय्यद अहमद यांच्या वेळेपासून राष्ट्रीय सभेपासून करारीपणानें तुटक राहून, अखेर धर्म व जाति यांच्या योगानें आधींच पडून राहिलेल्या दुहींत राजकीय भेदभावाची पाचर ठोकून राष्ट्राचीं शकलें पुरीं पाडल्यावर, अजूनहि नुसत्या राष्ट्रीय सभेची कास धरून राहणें व हिंदी या नांवाच्या मोहक पण पोकळ अशा राष्ट्रकल्पनेशीं खेळत बसणें, हेंच उलट अदूरदर्शीपणाचें लक्षण आहे असें ठरूं पहात आहे. व म्हणूनच निरनिराळ्या प्रांतांतील शहाण्या पुढाऱ्यांनीं आपल्या प्रत्यक्ष वर्तनानें या नवीन मतास पाठिंबा देण्यास सुरवात केली आहे असें कोणासहि उघड दिसून येईल. ‘ हिंदु ’ या जातिविशिष्ट नांवाचा पुकारा दिवसेंदिवस अधिकाधिक होऊं लागला असेल, पण त्याची बरीच जबाबदारी मुसलमान बंधूंकडे व कांहींशी सरकाराकडेहि येते. कारण हिंदू या नांवानें होणारा पुकारा हा खुद्द हिंदूनीं सुरू केलेला नसून कांहीं अंशीं मुसलमान बंधूनीं केलेल्या पुकाऱ्याचा तो प्रतिध्वनिच होय. मुसलमान व हिंदू या शब्दांचें शाब्दिक यमक जुळत नाहीं. पण मनोभावनेच्या दृष्टीनें त्यांचें यमक जुळतें ! एखाद्या गुहेमध्यें उभें राहून केलेल्या शब्दाचा ‘ पडसाद ’ पूर्वीच्या शब्दासारखाच असतो; पण मुसलमानांनीं ‘ आम्ही मुसलमान ’ असा शब्द उच्चारल्याबरोबर हिंदूंच्या तोंडांतून ‘ आम्ही हिंदू ’ असा भिन्नवर्णीय पडसाद उठणें हा चमत्कार असला तरी तो खरा स्वस्वरूपजागृति होण्यास पुष्कळ वेळां परेच्छाहि कारण होत असते. शाकुंतलांतील मातलीनें म्हटल्याप्रमाणें “ ज्वलति चलितेन्धनोऽग्निर्विप्रकृतः पन्नगः फणां कुरुते। तेजस्वी संक्षोभात्प्रायः प्रतिपद्यते तेजः।” म्हणजे “ जळण चाळविल्यानें अग्नि अधिक प्रदीप्त होतो; व दुसऱ्या कोणी अपकार करण्याची बुद्धि दर्शवितांच सर्प आपली फणा उभारतो. तात्पर्य, तेजस्वी मनुष्याचें तेज बहुधा क्षोभामुळेंच प्रगट होतें.” वरील सुभाषिताच्या आधारें आम्ही असें म्हणूं कीं, हिंदू राष्ट्राचें तेज अली-



कडे लुप्त झालें असून तें प्रदीप्त होण्यास कोणतेंहि अंतर्गत कारण पुरेना, म्हणूनच मोर्लेसाहेबांच्या राजकीय सुधारणांचा जातिभेदमूलक असा अम्मल होऊन मुसलमान बंधूंनीं आपलें राजकीय वर्चस्व आम्हांस उपदेशण्यास लागावें ही योजना भवितव्यतेच्या इच्छेनेंच घडून आलेली आहे! व या योजनेचा फायदा करून घेण्याची सात्त्विक इच्छा बाळगण्यांत आम्हीं कांहींहि वावगें करीत नाहीं. एरवीं, आम्हीं हिंदू असें दुरभिमानपूर्वक म्हणणें हा राष्ट्रद्रोह करणेंच होय अशा शंकेनें हिंदु हें नांव विसरून 'हिंदी' हें एकच नांव आचारविचारांत आणणारे शहाणे पुढारी, आजकाल स्वतःस हिंदु म्हणवून घेणें, एवढेंच नव्हें तर केवळ हिंदु–जातिविशिष्ट अशा सभा व संस्था स्थापणें, हें आपण एक पवित्र कर्तव्य करतों आहों असें मानूं लागले नसते. डॉ. राशबिहारी घोस, बाबू भूपेंद्रनाथ बसू, पंडित मदनमोहन मालवीय, बाबू शारदाचरण मित्र, लाला लालचंद, ना. शादिलाल वगैरे पुढारी गृहस्थ संकुचित किंवा अदूरदृष्टीचे असें कोणासहि म्हणतां येणार नाहीं; व अशा पुढाऱ्यांनीं हिंदु सभेसारख्या सभा स्थापून सर्व हिंदुस्थानास व्यापक अशी मध्यवर्ती 'हिंदुसभा' काढावी, अशी इच्छा प्रगट करण्याचा अर्थ काय हें कोणासहि न सांगतां समजण्यासारखें आहे.

हिंदु राष्ट्राचें एकीकरण करणें म्हणजे हिंदु म्हणविणाऱ्या लोकांच्या सर्व प्रकारच्या हितसंबंधाचें एकीकरण करणें होय. व या दृष्टीनें ना. शादिलाल यांच्या भाषणांत राजकीय, सामाजिक वगैरे सर्व गोष्टींचा उल्लेख केला गेला होता. पंजाबांतील हिंदुसमाजानें तेवढें एकत्र जमून फक्त सामाजिक विषयांची तेवढी वाटाघाट करावी आणि राष्ट्रीय गोष्टींचा विचार राष्ट्रीय सभेकडे सोंपवावा असें ना. शादिलाल यांचें मत नाहीं. कारण राष्ट्रीय सभा करूं शकेल त्याहीपेक्षां राजकीय गोष्टींचा अधिक सूक्ष्म विचार हिंदूंनीं आपल्या-पुरता करण्याची वेळ आली आहे. आपण पंजाबचेंच उदाहरण घेतलें तर मोर्लेसाहेबांच्या सुधारणांचा इतका चोहोंकडे बोलबाला झाला परंतु पंजाबच्या वांटणीस सुधारणा अशी कांहींच आली नाहीं, असें अध्यक्ष शादिलाल यांचें म्हणणें आहे. वरिष्ठ कायदेकौन्सिलांत पंजाबांतील हिंदु समाजाचा असा एकहि लोकनियुक्त प्रतिनिधि नाहीं. खुद्द पंजाबच्या प्रांतिक कौन्सिलांत सात मुसलमान सभासद असतां फक्त तीन हिंदू व दोन शीख आहेत.

म्युनिसिपॉलिट्यांकडून निवडून देण्याच्या जागांपैकीं एकहि जागा हिंदूंच्या हातीं लागली नाहीं ! व लोकसंख्येच्या प्रमाणानें लोकप्रतिनिधि कौन्सिलांत नेमले जावे असें असतां हिंदूंचे जितके प्रतिनिधि कौन्सिलांत नेमावयास पाहिजे होते तितके पंजाबसरकारनें नेमले नाहींत. पंजाबांत सरकारी खात्यांतूनहि हिंदू लोकांचें उच्चाटन हळू हळू होत आहे. अशी स्थिति असतां हिंदूंनीं गवगवा केल्याशिवाय स्तब्ध बसणें हें शहाणपणाचें कोण म्हणेल ? पंजाबांतील हिंदु लोकांवर कालांतरानें नामशेष होण्याचें केवढें संकट आलेलें आहे याची कल्पना इतर प्रांतांतील लोकांना फारशी होणार नाहीं. जातिभेदमूलक अशा या नवीन धोरणाचा अनुभव मुंबई इलाख्यांत आम्हांसहि आला आहे, नाहीं असें नाहीं. परंतु पुर्वीहून हल्लीं मुसलमान सभासदांची संख्या जेथें तेथें अधिक दिसून येऊं लागली तरी केवळ कौतुकाचें कारण आहे, भीतीचें कारण बनलें नाहीं. तसेंच जातवारीनें सभासद नेमण्याची पद्धति अत्यंत अनिष्ट असली तरी तिचे परिणाम आज पंजाबांत झाले आहेत तसे मद्रासेस होण्याचा मुळींच संभव नाहीं. यामुळें मद्रास इलाख्यांतील हिंदु लोकांना पंजाबांतील हिंदू लोकांच्या संकटाची बरोबर कल्पना होऊं शकणार नाहीं. अर्थात् हिंदु-सभा स्थापन झाली ती पंजाबांतच प्रथम झाली, इतर कोठेंहि झाली नाहीं.

पण केवळ पंजाबापुरती हिंदुसभा होऊन काम भागेल किंवा थोडे दिवसां-पूर्वीं निघालेल्या कल्पनेप्रमाणें सर्व हिंदुस्थानाकरितां म्हणून एक सभा आज नाहीं तरी उद्यां निघणें जरूर आहे कीं नाहीं हा प्रश्न रहातोच. तुर्कस्थानां-तील मुसलमानांवर आलेल्या संकटानें जर हिंदी मुसलमानांस सहानुभूति वाटते तर खुद्द हिंदुस्थानांतल्या एका प्रांतांतील हिंदू लोकांना प्राप्त झालेल्या चिंतेविषयीं दुसऱ्या एकाद्या प्रांतांतील हिंदु लोकांना सहानुभूति वाटल्यास काय नवल ? पण हा नुसत्या कोरड्या व लावालावीच्या सहानुभूतीचाहि प्रश्न नाहीं. कारण पंजाबांतील हिंदू लोकांना जी चिंता उत्पन्न झाली आहे तिच्या मुळाशीं जें राजकीय धोरण व जी राजकीय स्थिति आहे तेंच राजकीय धोरण व तीच राजकीय स्थिति इतर प्रांतांतील हिंदु लोकांसहि लागू आहे. हिंदू व मुसलमान यांच्या संख्येचें प्रमाण हिंदुस्थानच्या निरनिराळ्या प्रांतांत निरनिराळे असेल. परंतु सरकारच्या जातिमूलक नवीन धोरणानें व खुद्द मुसलमान बंधूंनीं उपस्थित केलेल्या अपल्या ‘ राजकीय महत्त्वा’च्या






हक्कानें हिंदुस्थानांतल्या कोणत्याहि भागांतील हिंदूंना, आपली आज स्थिति काय आहे व उद्यां कशी होणार असा विचार करावयास अप्रत्यक्ष रीतीनें भागच पाडलें आहे ! पंजाबांतील हिंदूसभेप्रमाणें दर प्रांतीं हिंदूसभा होवो वा न होवो; तरी पण आपण हिंदू म्हणजे कोण ? आपली पूर्वपरंपरा काय ? आपली आजची परिस्थिति कशी आहे ? व आपली भावी स्थिति काय होणार ? याविषयीं सर्व हिंदुमात्रांनीं आपापल्या ठिकाणीं विचार करून त्या विचारांचें एकीकरण केलें पाहिजे. हा प्रश्न केवळ राजकीयच आहे असें नाहीं; तर त्यास सामाजिक स्वरूपहि पुष्कळ आहे. व केवळ यामुळें ना. शादिलाल यांचें परवांचें भाषण हें एखाद्या राष्ट्रीय सभेचा अध्यक्ष व एखाद्या सामाजिक परिषदेचा अध्यक्ष अशा दोन अध्यक्षांच्या भाषणांचें मिळवून बनवलें आहे कीं काय असें वाटतें ! सुदैवानें " आधीं सामाजिक ? का आधीं राजकीय ? " असले एकांतिक, अन्य-व्यवच्छेदक व म्हणून असमंजसपणाचे, प्रश्न अलीकडे फारसे कोणी उपस्थित करीत नाहीं; आणि राजकीय व सामाजिक बाबींचा सरमिसळ विचार ना. शादिलाल यांनीं जसा केला तसाच तो करणें योग्य आहे.

---

## ७७. हिंदुत्वाची मीमांसा

( ता. १३ जानेवारी, १९१४. )

राजकीय दृष्ट्या हिंदुराष्ट्राचें एकीकरण करण्याची आवश्यकता पुष्कळ लोकांस भासूं लागली आहे. पण धार्मिक व सामाजिक दृष्टीनें हिंदूराष्ट्राचें एकीकरण झाल्याशिवाय राजकीय दृष्ट्या हिंदू राष्ट्राला जितका जास्तींत जास्ती फायदा मिळावयास पाहिजे तितका मिळणें शक्य नाहीं. पण केवळ राजकीय दृष्टीनेंच नव्हे तर सामाजिक व धार्मिक दृष्टीनेंहि हिंदूराष्ट्राचें एकीकरण करण्याची वेळ आली आहे असें मला वाटतें. 'एकीकरण' याचा अर्थ जे खरे वास्तविक आणि अनिर्वाह्य असे भेद असतील त्यांचा मागमूससुद्धां नाहींसा करणें असा नाहीं; तर असे भेद असतां त्यांतूनहि अभिन्नत्वाची भावना हुडकून काढणें व सर्वांस मिळून समान असें अधिष्ठान देणें. कित्येक

धार्मिक व सामाजिक भेद असे असतात कीं, त्यांच्या योगानें पडणारी फूट कधीं नाहींशी होऊंच शकत नाहीं. मद्यपी व मद्य न पिणारा, मांसभक्षक व मांसभक्षणनिषेधक यांची मैत्री किंवा गट्टी करूं म्हटलें तरी होणार नाहीं. उपास्यभेदानेंहि पुष्कळ वेळां असेच तट पडतात. तथापि 'एकमेवाद्वितीयम्' म्हणणारा वेदांती, ईश्वराचे ठिकाणीं लीन झाला असतां, भक्तिव्यंजित द्वैत अनुभवितोच. अद्वैतमतवादी श्रीमत् शंकराचार्य यांनीं ईश्वरास आळवितांना असें म्हटलें आहे:—

सत्यपि भेदापगमे नाथ तवाहम् न मामकीनस्त्वम् ।
सामुद्रो हि तरंगः क्वच न समुद्रो हि तारंगः ।।

सर्व ब्रह्ममय असें एकदां म्हटलें म्हणजे अमुक व अमुक, किंवा आमक्याचा अमुक असा भेदच उरूं शकत नाहीं. तथापि, ईश्वर व भक्त हे कांहीं कार्यापुरते तरी भिन्न आहेत असें मानलेंच पाहिजे. एवढेंच नव्हे तर, शंकराचार्य म्हणतात, या दोहोंपैकीं कुणाचा कोण असें म्हणण्याची वेळ आली असतां, 'माझा ईश्वर आहे' असें म्हणण्यापेक्षां मी ईश्वराचा आहे हें म्हणणेंच अधिक शोभेल. उदाहरणार्थ, समुद्र व तरंग हीं दोन्हीं एकच व अभिन्न आहेत. तथापि नामनिर्देश करण्याची वेळ आली असतां समुद्राचा तरंग, समुद्राची लाट हें म्हणणेंच, लाटेचा समुद्र या म्हणण्यापेक्षां अधिक शोभेल. राष्ट्राच्या दृष्टीनें पाहतां अगदीं याच्या उलट प्रकारची सरणी अवलंबावी लागते; म्हणजे धर्म व समाजरचना यांच्या योगानें तट पडलेल्या व निःसंशय वेगवेगळ्या अवयवांतूनहि ऐक्य हुडकून काढावें लागतें.

ब्रह्मसमाजिस्ट, आर्यसमाजिस्ट, प्रार्थनासमाजिस्ट, वगैरे पंथांचे अनुयायी; द्वैती—अद्वैती, विशिष्टाद्वैती वगैरे निरनिराळ्या मतांचे अनुयायी; शैव, वैष्णव, सौर, गाणपत्य, वगैरे विविध उपास्यांचे उपासक; वेद पौरुषेय मानणारे व अपौरुषेय तत्त्वप्रिय लोक; भक्ति, ज्ञान, कर्म, उपासना वगैरे भिन्न मोक्षमार्गांचें प्रतिपादक; पुनर्विवाह हवा म्हणणारे व नको म्हणणारे, आणि जातिभेद हा ईश्वरप्रणीत मानणारे व न मानणारे, अशा या सर्व प्रकारचे लोक निदान एका गोष्टींत तरी एक मताचे आहेत. व ती गोष्ट म्हटली म्हणजे स्वतःस हिंदु म्हणणें व त्या नांवाचा अभिमान बाळगणें ही होय. प्रामाणिक सुधारक, कळकळीचे लोकोपकारकर्ते, सामाजिक व धार्मिक अन्यायांचे कट्टे शत्रु, आणि

'वसुधैव कुटुम्बकम्' ही बुद्धि तत्त्वविचारानें मनांत पक्की बाणलेले उदारमतवादी—या सर्वांना हिंदु हें लहानसें नांव पटतें, पुरतें व मानवतें, हें एका दृष्टीनें आश्चर्य नव्हे काय? वास्तविक ईश्वराच्या घरीं सर्व धर्म व जाति सारख्या; अमुक एका धर्माच्याच उत्पादकाच्या कानांत ईश्वरानें गूढ अस्सल धर्मतत्त्वांचा उपदेश सांगितला ही समजूत चुकीची आहे. पुष्कळ वेळां आपल्या धर्मांतल्या कांहीं गोष्टींपेक्षां दुसऱ्या धर्मांतील कांहीं कांहीं गोष्टी मनुष्यास बऱ्या वाटतात; आणि अमुक एका धर्माचा आपण अभिमान धरतों या गोष्टीला पुष्कळ वेळां केवळ त्या धर्मांत आपण जन्मास आलों याहून अधिक सयुक्तिक असें कारण फारसें सांगतां येण्यासारखें नसतें. असें असूनहि एकंदरींत किती थोडे लोक जाणूनबुजून धर्मांतर करितात? व खानेसुमारींत जाति, धर्म व वंश यांचें नांव सांगण्याची वेळ आली असतां, दहा लाखांत किंवा कोटींतसुद्धां एखादाहि मनुष्य स्वकीय नामाभिधान सोडून परकीयनामाभिधान सांगणारा भेटत नाहीं. यावरून नांवाची आवड किती दृढ असते हें सहज लक्षांत येईल.

'हिंदु' हा शब्द उच्चारतांच हिंदु धर्माची कल्पना मनांत येते. आणि हिंदू हें नांव जितकें विशिष्ट धर्मकल्पना दर्शविणारें आहे तितकेंच जाति किंवा वंश दर्शविणारेंहि आहे. पण या दोन दृश्य विषयांची व्याप्ति वास्तविक समान नाहीं. हिंदु लोक व हिंदु धर्म या दोहोंमधील संबंध कार्यकारणभावाचा आहे. 'हिंदु लोकांनीं अनुसरलेला किंवा त्यांनीं आचारविचारांनीं बनविलेला तो हिंदुधर्म' हें केव्हांहि खरें. पण याच्या उलट 'हिंदुधर्म अनुसरणारे ते हिंदू' हें ऐतिहासिक दृष्ट्या तितकें खरें नव्हे. कारण हिंदु म्हणविणारांची संख्या शिरगणती केली असतां केव्हांहि निश्चित करण्यासारखी असते, व त्यांत वाद असूं शकत नाहीं; पण हिंदू धर्माची व्याख्या करणें हें केव्हांहि निर्विवाद होऊं शकत नाहीं. म्हणून हिंदु कोण हें ठरवितांना हिंदुधर्म म्हणजे काय हें आधीं ठरवून मग पहिल्या प्रश्नाचा निर्णय करूं असें म्हणून भागणार नाहीं.

आजपर्यंत झालेल्या अनेक विद्वान गृहस्थांच्या हातूनसुद्धां हिंदुत्वाचें अमुक एक लक्षण असें बांधलें गेलें नाहीं, याचें कारण त्यांचें बुद्धिमांद्य नव्हे; तर तें लक्षण बांधतां येणेंच कठिण आहे हें होय. खिस्त हा धर्मगुरु व बायबल हाच धर्मग्रंथ असें मानणें हें खिस्ती मनुष्याचें लक्षण म्हणतां येईल. तसेंच

महंमद पैगंबर हाच धर्मगुरु व कुराण हाच धर्मग्रंथ असें मानणें हें मुसलमान या ' पदार्था ' चें लक्षण म्हटलें तर तें कोणासहि पटेल. पण हिंदुधर्मांत मोक्ष मिळवून देणारा व तारक असा एकच धर्मगुरु नाहीं. येऊन जाऊन वेदांच्या ठिकाणीं प्रामाण्यबुद्धि ही एकच गोष्ट लक्षणोपयोगी अशी मिळते. पण तेवढ्या एकाच लक्षणानें जर भागतें तर निरनिराळ्या विद्वान् हिंदु गृहस्थांच्या ' हिंदु-धर्म ' व्याख्येंत वैचित्र्य खचित दिसून आलें नसतें. एवढें एकच लक्षण घेऊन अन्वय–व्यतिरेकानें हिंदुत्वाची व्याप्ति बरोबर ठरवितां आली असती तर मग कांहींच पंचाइत नव्हती, परंतु तशी वस्तुस्थिति नाहीं. नुसत्या हिंदु-धर्माचें लक्षण बांधतांना त्यास अन्योन्यव्यवच्छेदकत्व आणण्यासाठीं लो० टिळक यांस ' प्रामाण्यबुद्धिर्वेदेषु ' याच्या भरतीला ' साधनानां अनेकता ' व ' उपास्यानामनियमः ' या गोष्टी घालाव्या लागल्या. असें असतांहि हें लक्षण हिंदुधर्माचे मुख्य घटक व गुणधर्म दर्शविण्यापेक्षां, इतर धर्मांपासून त्याचें व्यवच्छेदन करण्यासच अधिक उपयोगी आहे. पण हिंदुधर्माचें अन्योन्यव्यव-च्छेदक लक्षण समजल्यानें ' हिंदू म्हणजे कोण ? ' या लौकिक प्रश्नाचें उत्तर मिळेलच असें नाहीं. मला तर असें वाटतें कीं, आजच्या घटकेची हिंदु या शब्दाची व्याप्ति बरोबर ठरविण्यास व्यवच्छेदक लक्षणापेक्षां वर्णनात्मक लक्ष-णाचाच अंगीकार केल्यास अधिक सोईचें होईल. वर्णनात्मक लक्षणांत आट-पशीरपणा जरा कमी असतो; तथापि, उत्कृष्ट तऱ्हेचें व्यवच्छेदक लक्षण बांध-तांना अतिव्याप्ति व अव्याप्ति टाळण्यासाठीं जो कांटेकोरपणा करावा लागतो व अखेर साधत नाहींच–त्याचा त्रास तरी रहात नाहीं. निदान तर्कशास्त्राचा धारवाडी कांटा ज्यांना हातीं घेतां येत नाहीं अथवा हातीं घेऊन ज्यांना तो बरोबर झेंपत नाहीं, अशा सामान्य लोकांना हिंदु म्हणजे कोण याचें ढोबळ वर्णनच अधिक पटण्याचा संभव असतो.

हिंदु ह्या शब्दाच्या व्याख्येच्या मार्गांतील अडचण काय आहे व तिच्या योगानें हिंदुत्वाचें लक्षण बांधण्यास हरकत कशी होते हें आपण कांहीं थोडीं उदाहरणेंच घेऊन पाहूं म्हणजे कळून येईल. अमुक एक मनुष्य व्यक्तिशः हिंदु आहे किंवा नाहीं हें पहावयाचें झालें तर त्यास फारशी अडचण पडत नाहीं. कारण हिंदुत्व हें प्रारंभीं जन्मसिद्धच असतें, त्यामुळें अमुक एक व्यक्तीचा विचार कर्तव्य असल्यास त्याचें आईबाप हिंदु होते किंवा नाहीं या प्रश्नाचें





उत्तर मिळालें म्हणजे मुख्य काम भागेल, पण सर्व काम भागणार नाहीं; कारण हिंदुत्वाची मिळकत वडिलार्जित असली तरी या जगांतील व्यक्तिस्वातंत्र्यामुळें ती स्वसंपादित असल्यासारखी नष्ट करून टाकतां येते. यामुळें हिंदु आईबापांचे पोटीं जन्म येणें ही जशी हिंदुत्वाची एका आंगची मर्यादा, त्याचप्रमाणें व्यक्तीनें परधर्म न स्वीकरणें आणि कोणत्याहि बाह्य व दृश्य अशा आचरणानें हिंदुत्वावरील सत्ता नष्ट न करणें ही दुसऱ्या आंगची मर्यादा म्हटली पाहिजे. परंतु आपणांस प्रस्तुत केवळ विवक्षित व्यक्तीचाच विचार करावयाचा नाहीं, तर सामान्यजाति-दृष्ट्या हिंदु कोणास म्हणावें याचाच विचार कर्तव्य आहे. व खरी अडचण काय ती अशा विचाराचे वेळींच येते.

हिंदुत्वाचें लक्षण बांधणें तें न्यायशास्त्रसिद्ध असें बांधणें कठिण आहे. परंतु केवळ वर्णनात्मक असें लक्षण करणें फारसें कठिण नाहीं हें आम्हीं वर सांगितलेंच आहे व तेंच आपण उदाहरणांनीं पाहूं. हिंदुत्वाचें वर्णन करतांना, काय करणारा तो हिंदु व अहिंदु होण्यास मनुष्यानें काय काय न केलें पाहिजे, असें अन्वय–व्यतिरेकरूप प्रश्न सहजच विचारावे लागतात. पहिल्या प्रश्नाचीं उत्तरें अनेक रीतीनें देतां येतील. वेद प्रमाण मानणारे ते हिंदु असें हिंदुत्वाचें सामान्य वर्णन होऊं शकतें. पण तेवढ्यानें भागत नाहीं हें मागील लेखांत आम्हीं सांगितलेंच आहे. शिवाय वेदप्रामाण्याच्या मार्गांत दुसरी एक अशी अडचण आहे कीं वेदांस प्रामाण्य येतें तें त्यांच्या अपौरुषेयत्वामुळेंच, व या मुद्यावर कट्टया म्हणविणाऱ्या हिंदूंचाहि मतभेद होऊं शकतो हें प्रसिद्धच आहे. उदाहरणार्थ कै. प्रो. जिनसीवाले हे वेद अपौरुषेय न मानणाऱ्यांपैकीं होते. म्हणजे वेदांच्या ठिकाणीं जरी त्यांची प्रामाण्यबुद्धि होती तरी ती अपौरुषेयत्वबुद्धिमूलक नव्हती. वेदांना पौरुषेय असें मानून देखील त्यांच्या ठिकाणीं एकाद्याची प्रामाण्यबुद्धि असूं शकेल, नाहीं असें नाहीं, परंतु धर्माच्या बाबतींतली प्रामाण्यबुद्धि पौरुषेय गोष्टींशीं संबद्ध अशी फारशी असत नाहीं. जातिभेद मानणारे ते हिंदु असेंहि हिंदुत्वाचें एक वर्णन करतां येईल, कारण हिंदु समाजाखेरीज इतर कोणत्याहि समाजांत जन्मसिद्ध व धार्मिक स्वरूपाचा असा जातिभेद आढळत नाहीं. पण या लक्षणास वरील लक्षणापेक्षांहि अधिक अडचण आहे. वेद अपौरुषेय मानणें ही गोष्ट कोणा हिंदु मनुष्यानें नाकबूल केली तरी ती

त्याच्या अंगीं इतर रीतीनें कदाचित् लावितां येईल. कारण वेद हे अत्यंत प्राचीन म्हणजे जवळ जवळ अनादिसिद्ध आहेत ही गोष्ट कोणाहि विचारी मनुष्यास कबूल करावी लागते, व अनादिसिद्धित्वापासून ईश्वर-निर्मितत्त्व हें फारसें दूर नाहीं. सर्वच चांगल्या गोष्टी ईश्वरप्रणीत आहेत व त्या अर्थानें वेद तरी ईश्वरप्रणीत म्हणण्यास कोणची हरकत? अशा प्रकारच्या युक्तिवादानें, व कल्पनेला अगम्य अशा प्राचीन काळावर नजर देऊन, वेदांचें-अपौरुषेयत्व मनुष्याच्या तोंडून निघूं शकेल. पण जातिभेदाची गोष्ट तशी नाहीं. कारण श्रद्धाळु व भाविक असेहि सर्वच हिंदुलोक जातिभेद हा जन्मसिद्ध व दुर्निवार्य आहे असें म्हणत नाहींत. वेदांविषयींच्या अपौरुषेयत्वबुद्धीपेक्षां जातिभेदाचें जन्मसिद्धत्व कबूल करणाऱ्या लोकांची संख्या खचित कमी भरेल, व या बाबतींत आर्यसमाजिस्ट लोकांचें उदाहरण अत्यंत समर्पक असें आहे. कारण ह्या लोकांची वेदांच्या ठिकाणीं प्रामाण्यबुद्धि किंबहुना अपौरुषेयत्वबुद्धि इतकी जागृत व प्रज्वलित असते कीं, या दृष्टीनें पाहतां इतर कोणताहि हिंदु त्यांची बरोबरी करूं शकणार नाहीं. जगांत असेल नसेल तें सर्व वेदांत हुडकून काढून दाखविणाऱ्या आर्यसमाजिस्टांची इतर लोक जेव्हां थट्टा करितात तेव्हां ती त्यांच्या बुद्धिमत्तेची यथार्थ थट्टा होऊं शकते ही गोष्ट निर्विवाद आहे; परंतु वेदप्रामाण्यबुद्धीच्या दृष्टीनें पाहतां आर्यसमाजिस्ट लोक त्यांच्या आक्षेपकांपेक्षांहि अधिक अस्सल हिंदु ठरतील हें विसरतां कामा नये. पण तेच आर्यसमाजिस्ट लोक जातिभेद मानीत नाहींत. आणि यामुळें जातिभेद मानणें हेंच जर हिंदुत्वाचें लक्षण म्हटलें तर त्यांच्याविरुद्ध एकदम पारडें फिरतें, व वेदांचें अक्षरान अक्षर प्रत्यक्ष ईश्वरनिर्मित मानणाऱ्या पण जातिभेद मानणाऱ्या या लोकांना हिंदु कां म्हणावें हा बिकट प्रश्न उत्पन्न होतो. पण याचें उत्तर आर्यसमाजिस्ट लोक हिंदु नव्हेत हें नाहीं, तर जातिभेद मानणें हें हिंदुत्वाचें चालचलाऊ व बऱ्याच अंशानें चालण्यासारखें लक्षण असलें तरी; जातिभेद मानणें हें हिंदुत्वास अनिवार्य आहे असें नाहीं, हेंच खरें उत्तर होय.

वरील ठळक उदाहरणांतील मर्म लक्षांत आलें म्हणजे मग इतर रीतीनें हिंदुत्वाचें वर्णन करणें कठिण जाणार नाहीं, कारण ह्याखालीं आम्ही देत आहोंत तीं वर्णनें जातिभेद मानण्याप्रमाणेंच अनिवार्य नाहींत. पण तीं

चालचलाऊ असून त्यांची अपवादक्षमता आपण विसरलों नाहीं तर तीं वर्णनें हिंदुत्वाची ओळख पटून देण्यास बरीच उपयोगी पडतील. जातिभेदाप्रमाणें आश्रमधर्म हाहि हिंदुत्वाचाच विशेष आहे. इतर कोणत्याही धर्मांत आपल्या इकडच्याप्रमाणें आश्रमव्यवस्था सांगितलेली नाहीं. श्रुतींचें अपौरुषेयत्व बाजूस ठेवलें तरी स्मृतिग्रंथ मानणें हेंहि एक हिंदुत्वाचें ठळक वर्णन होऊं शकतें. आणि खरोखर पाहूं गेलें तर धर्म हा आचारप्रभव व आचारात्मकच असतो, यामुळें हिंदुत्वाच्या लक्षणाचा श्रुतीशीं जितका संबंध आहे त्याहीपेक्षां स्मतिग्रंथांशीं अधिक निकट संबंध आहे. हिंदुत्वाचे विशेष असे जे आचार ते सर्व स्मृतिग्रंथांतच सांपडतात. स्मृतींच्या खालची पायरी म्हटली म्हणजे अर्थात् पुराणांची. परंतु हिंदुत्वाचें लक्षण होऊन बसलेल्या अनेक आचारांचें मूळ स्मृतींत न सांपडतां पुराणांतून सांपडतें असें सिद्ध करून देतां येईल. याच विचारसरणीनें दशावतार मानणारे ते हिंदु, सोळा संस्कारांची कल्पना मानणारे ते हिंदु, श्राद्धें, व्रतें, वैकल्यें आचरणारे ते हिंदु, अशींहि वर्णनें देतां येतील व तीं बऱ्याच अंशीं खरींही ठरतील. कोण काय पवित्र मानतो एवढयावरूनहि एखाद्या धर्माचें वर्णन करतां येतें. उदाहरणार्थ; गाय गायत्री व गंगानदी या तीन गकारात्मक गोष्टी अगर यांपैकीं वाटेल ती एखादीही गोष्ट जो पवित्र मानतो तो हिंदु असें वर्णन केलें तर तें चूक ठरण्याचा सहसा संभव नाहीं. गायत्रीमंत्राचा संबंध त्यांतल्या त्यांत ब्राह्मणत्वाशींच येतो, पण गोमाता व गंगामाता यांची मात्र गोष्ट तशी नाहीं. हिंदुत्वाच्या क्षेत्रमर्यादेच्या अगदीं टोंकाशीं असणाऱ्या शूद्र, अतिशूद्र लोकांचेंहि प्रेम या मातांवर वरिष्ठ जातींइतकें असतें, आणि लौकिक मातांची प्रीति व ममत्व हें मांडीवर बसलेल्या मुलाइतकेंच पाताळांत गेलेल्या मुलांवरही असूं शकतें त्याचप्रमाणें या धार्मिक मातांचीहि गोष्ट आहे.

याच्याही खालीं उतरलें तरी हिंदुत्वाचें वर्णन करण्यास कित्येक गोष्टी मिळूं शकतात. उदाहरणार्थ; डोक्यावर ठेवलेल्या बोटभर जटेमध्यें धर्मसर्वस्व कसचें ? पण शेंडी ठेवणारे ते हिंदु व शेंडी न ठेवणारे ते अहिंदु असें वर्णन केलें असतां तें सहसा चूक होणार नाहीं. कारण खरोखरच आम्ही हिंदु

लोक जशा प्रकारची शेंडी ठेवितो, तशा प्रकारची शेंडी जगांतील इतर कोणत्याही धर्माचे लोक ठेवीत नाहींत ही गोष्ट अनुभवसिद्धच आहे. विशेष प्रकारच्या केशरचनेनें विशेष प्रकारचें रूप दिसतें, व या दृष्टीनें पाहतां सर्व–क्षौरप्रिय मद्रासी हिंदु आणि डोक्यावर केस आणि तोंडावर दाढी ठेवणारा उत्तर हिंदुस्थानांतील हिंदू अगर बंगाली हिंदू या दोहोंच्या स्वरूपांत सकृद्दर्शनीं पुष्कळच फरक असतो. परंतु हा सर्व फरक जाऊन शिवाय अशाच स्वरूपाचा मुसलमान व उत्तर हिंदुस्थानचा हिंदु यांच्या दरम्यानचा भेदभाव बिनचूक व्यक्त करणारी जी बोटभर शेंडी तिच्यामध्यें खरोखर यदृच्छेनें कां होईना पण हिंदुत्वाचें सर्वस्वच सांठवून ठेवलें आहे असें म्हणतां येणार नाहीं काय ? जी गोष्ट शेंडीची तीच गंधाची. कारण गंध लावणें अगर न लावणें ही जरी धर्माची बाब आहे असें म्हणतां न आलें तरी ज्याच्या कपाळीं गंध दिसेल तो हटकून हिंदु म्हणावा, यांत केव्हांही चूक होणार नाहीं. कारण हिंदु नसून गंध लावणारा मनुष्य सर्व दुनियेंत मिळणारा नाहीं.

याच्याही खालीं जाऊन दोन तीन प्रकारांनीं हिंदुत्वाचें वर्णन देतां येण्यासारखें आहे. वर सांगितल्याप्रमाणें कोणचेंही हिंदुत्वनिर्णायक असें बाह्य आचरण न करणारा असा एखादा मनुष्य असला, परंतु तो जर साधारणतः हिंदु मानल्या जाणाऱ्या अशा एखादा उपास्याचा उपासक असला तर त्यास हिंदु म्हणावें कीं नाहीं अशा प्रश्नास अस्तिपक्षीच उत्तर द्यावें लागेल, तसेंच आचरणानें हटकून हिंदु असें ज्यांस म्हणतां येणार नाहीं असा एखादा मनुष्य "आपल्या जातीच्या सुधारणेचा इतिहास संस्कृत ग्रंथांमधून सांपडतो" इतकें म्हणणारा असला तरी त्याला हिंदुच म्हणावें लागेल. परंतु याच्याही पुढली एक पायरी आहे. अमुक कारणास्तव मी हिंदु असें ज्याचें त्यास सांगतां येत नाहीं अगर ज्याच्याबद्दल दुसऱ्यास सांगतां येत नाहीं अशा एखाद्या मनुष्याची आपण कल्पना करूं. पण त्या मनुष्यास तूं जातीचा कोण असें विचारिलें असतां जर त्यानें मी हिंदु असें उत्तर दिलें तर तेंच आपणांस ग्राह्य मानून त्याचें हिंदुत्व आपणास कबूल करावें लागेल. व हाच अर्थ थोड्याशा नीरस, रुक्ष पण व्यावहारिक भाषेंत बोलावयाचा तर आपणांस असें म्हणावें लागेल कीं खाने–सुमारीच्या वेळीं जो मनुष्य मी हिंदु आहें अशी नोंद करूं देईल त्याला हिंदूच म्हटलें पाहिजे. म्हणजे हिंदुत्व हें आचार-

सिद्ध किंवा विचारसिद्ध नसून फक्त मानीव आहे. आतां खानेसुमारीच्या नोंदणीच्या वेळीं मूळ हिंदु असतां तें विसरून विशिष्ट जात्यभिमानामुळें आम्ही शीख, आम्ही जैन, आम्ही वीरशैव, असें आकुंचित नांव स्वतःस घेऊन त्याच नांवानें आपली नोंद करण्याचा कित्येक जाति आग्रह धरीत असतील, नाहीं असें नाहीं. परंतु त्यामुळें त्यांचें हिंदुत्व नष्ट होतें असेंहि नाहीं. पण प्रस्तुत आपणांस त्यांच्याशीं कांहींएक कर्तव्य नाहीं. मुख्य प्रश्न हिंदु कोणास म्हणावें हाच आहे, व या शेवटच्या पायरीवर येऊन बोलावयाचें तर असें म्हणतां येईल कीं जो स्वतःस हिंदु म्हणवून घेईल तो हिंदु. अशा विचारसरणींत अनवस्थेचें बीज आहे असें सकृद्दर्शनीं वाटेल, पण खरोखर तसें नाहीं. कारण मनुष्यास आपली जात व आपला धर्म सांगावयाचा असतां ज्यावर त्याचा खरा जीव व खरें महत्त्व असतें त्याचाच उच्चार तो करतो. प्राण गेल्यानेंहि दुसऱ्याचा उच्चार करीत नाहीं, हें आम्हीं मागें दर्शविलेंच आहे; व ही गोष्ट जर खरी तर " योयच्छ्रद्धः स एव सः " या न्यायानें ज्या धर्मावर ज्याचें ममत्व त्या धर्माचा तो अनुयायी अशी पदवी घेण्यास त्याला कोणाची हरकत ? व ती त्याला नाकारण्यास कोणास काय अधिकार ? ममत्वाच्या कबुलीपेक्षां धर्माच्या अनुयायित्वाचा आणखी सबळ पुरावा तो कोणता मिळूं शकणार ? आम्ही म्हणतों अशाच तऱ्हेचा अभिप्राय रा. ब. चिंतामणराव वैद्य यांनीं लीडर पत्रांत पूर्वीं प्रसिद्ध केला होता. ते लिहितातः—

" I would lay it down that whoever believes that he is a Hindu or even professes to be a Hindu whatever may be his beliefs, in realty he is a Hindu. I would allow every person to be of the religion he believes himself to be. "

**टीपः**—वेदप्रामाण्याचा विचार करतांना म्हणजे वेदप्रामाण्यावर हिंदुत्वाची सर्व भिस्त ठेवितांना व जैन व लिंगायत ( वीरशैव ) वगैरे लोकांची आठवण आपण विसरतां कामा नये. जैन लिंगायत यांना विशिष्ट नांव मिळालें असलें तरी त्यांचा समावेश वास्तविक हिंदु लोकांतच झाला पाहिजे; कारण लिंगायत लोक हे जरी वेदच सर्वस्वीं प्रमाण मानणारे नसले तरी ते वेदनिंदक खास नव्हेत; व सूक्ष्मदृष्टीनें विचार करणारास असेंच दिसून येईल कीं, ब्रह्मसूत्रापर्यंत त्यांचा व इतर हिंदूंचा मार्ग एकच असून या सूत्रावरील केवळ भाष्यभेदामुळें पंथभेद उत्पन्न झाला आणि त्यास केवळ शिवोपासकत्वाची भर

पडली. परंतु उपास्य शिवेतर न मानण्यामुळें, वैष्णव, गाणपत्य किंवा सौर यांच्याप्रमाणें वीरशैव हेहि अहिंदु ठरत नाहींत. अथवा द्वैती अगर विशिष्टा-द्वैती लोकांप्रमाणें केवळ भाष्यभेदामुळें म्हणजे तात्त्विक विचारभेदामुळें ते अहिंदु ठरत नाहींत. जैन लोक, त्यांच्या वेद प्रमाण न मानण्यामुळें किंबहुना वेद निंदेमुळें, वीरशैवांहून अधिक दूर राहतात, परंतु जैनामध्यें व सामान्य हिंदू लोकांमध्यें धर्मपावित्र्याच्या दृष्टीनें उभय साधारण अशा अनेक गोष्टी सांपडतात, यामुळें त्यांनाही अहिंदू म्हणणें हें थोडेसें कठिणच आहे.

---

# ७८. सर्व–धर्म–परिषद्

( ता. १७ जानेवारी, १९१३ )

सर्व-धर्म-परिषदेची कल्पना खरोखरच फार उदात्त आहे; व इतर अनेक धर्मांचे अनुयायी जरी प्रसंगविशेषीं परधर्मांचें सहिष्णुतापूर्वक कौतुक करितात तरी, त्यांच्या आत्मनिष्ठ मूलभूत तत्त्वांकडे पाहिलें तर सहिष्णुता व दाक्षिण्य या गुणांची अपेक्षा असणारी सर्व–धर्म–परिषदेच्या पुरोहितत्वाची पात्रता त्यांच्या अंगीं असणें फारसें शक्य नाहीं. कारण हिंदुधर्माशिवाय दुसरा कोणताहि धर्म पहा; त्यामध्यें ईश्वरप्राप्तीचें साधन अमुक एक ठराविक असेंच सांगितलेलें आढळतें. ख्रिस्ती मनुष्याला ख्रिस्तावर विश्वास ठेवून बाप्तिस्मा घेतल्याशिवाय आत्मतारण होणें शक्य नाहीं अशी कडकडीत मर्यादा घातलेली आढळते. तीच गोष्ट मुसलमानी धर्माचीहि. हे धर्म सोडून इतर धर्मांतील लोकांचें काय व्हावयाचें या प्रश्नाचें उत्तर त्या धर्मांच्या कट्टया अनुयायांच्या तोंडून आलेलें कोणी ऐकिलें तर त्यांत फारसा उदात्तपणा दिसून येणार नाहीं. त्यांतल्या त्यांत संभावित व सुसंस्कृत मनाचे ख्रिस्ती व मुसलमान या प्रश्नाचें जें उत्तर देतात ते अधिक सौजन्यपूर्ण व कमी भयप्रद असतें हें खरें. तरी पण अमुक एका मार्गानें गेल्याशिवाय खरी ईश्वरप्राप्ति होणार नाहीं हा त्यांचा कटाक्ष कायमच असतो. हिंदु धर्माचें तसें नाहीं; कारण साधनांचें नानाविधत्व व उपास्यांविषयीं स्वातंत्र्य या गोष्टी हिंदुधर्मातच सांपडतील;

इतरत्र सांपडणार नाहींत. म्हणून सर्व–धर्म–परिषदेंत पुढाकार घेण्यास जर खरोखर कोणी लायक असतील तर ते हिंदुधर्मीय लोकच होत यांत शंका नाहीं. विद्वत्ता व बहुश्रुतपणा यांच्यामुळें अनेक ख्रिस्ती लोकांना तुलनात्मक धर्मविचाराची गोडी असलेली आढळून येते. परंतु सामान्येंकरून विचार केला तर ख्रिस्ती व महंमदी धर्मांना–म्हणजे ज्यांमध्यें उपास्य व साधन यांना मर्यादा आहे त्यांना–शाखांचें म्हणजे धर्मपंथांचें स्वरूप येत असून हिंदुधर्माला मात्र धर्माचें म्हणजे बुंध्याचें स्वरूप येतें ही गोष्ट निर्विवाद आहे. जातिभेदाच्या प्रत्यक्ष आचारामुळें ख्रिस्ती व मुसलमान समाजापेक्षां हिंदुसमाजांत प्रतिबंध, मर्यादा व विभाग हे अधिक असल्याचें दिसतें हें खरें. तथापि, धर्माची मूळभूत कल्पना म्हणजे ईश्वर व आत्मा यांचा जो नित्य संबंध त्याची व्यवस्था हिंदुधर्मांत जशी मनाला पटण्यासारखी म्हणजे स्वाभाविक व सोपपत्तिक दिसून येते तशी इतर धर्मांत दिसून येत नाहीं. हिंदु लोकांस कोणी वाटेल तर 'विचारांत उदार व आचारांत अनुदार' असें जातिभेदास अनुलक्षून म्हणावें; पण त्यांची तात्त्विक धर्मविचारांतील उदारता ही तरी कोणासहि नाकबूल करितां यावयाची नाहीं.

हिंदुधर्म हा उपद्यापी नाहीं, म्हणजे ख्रिस्ती वगैरे धर्माप्रमाणें परधर्मीय लोकांना आपल्या कळपांत कोणीकडून तरी ओढून आणण्याचा प्रयत्न तो धर्म करीत नाहीं, ही गोष्ट जगांत स्वतः हिंदुधर्माचा फैलाव अधिक होण्यास नडणारी आहे खरी; परंतु उपास्यांचा अनियम व साधनांची अनेकता हीं त्याचीं तत्त्वें ध्यानांत घेतलीं असतां हिंदुधर्माला परधर्मीयांना आपल्या कळपांत ओढण्याचें प्रयोजनहि रहात नाहीं. बहुश्रुत ख्रिस्ती मिशनरी लोक तुलनात्मक पद्धतीनें धर्मविचार करण्याचा प्रामाणिक प्रयत्न करितात; तरी पण इतर धर्म– अर्थात् ईश्वरप्राप्तीचीं इतर साधनें–चुकीचीं आहेत हा त्यांचा शेरा कायम रहातोच. हिंदुधर्माचें परिशीलन करण्यांत सर्व जन्म घालविलेले मिशनरी डॉ. वुइल्सन यांचें ' Hinduism is still the grandest embodiment of gentile error हें सूत्र प्रसिद्धच आहे. ख्रिस्तबाह्य सर्व धर्मांत हिंदुधर्म अत्यंत श्रेष्ठ पण धार्मिक चुकांचा तो मूर्तिमंत पुतळा होय, असा ह्या सूत्राचा अर्थ आहे. आणि इकडे स्वधर्मविषयीं पहावें तर ख्रिस्त हाच काय तो खरा तारक, सर्व सत्ता काय ती त्याजपाशींच, आणि म्हणून

त्याच्या नांवानें इतर सर्व धर्म मोडून खिस्तशाहीचेंच साम्राज्य जगावर केलें पाहिजे असा त्यांचा आग्रह ! " All power is given to me (Jesus) in heaven and on earth. Go ye therefore and disciple all nations baptizing them in the name of the Father and of the Son and of the Holy Ghost. " डॉ. वुइल्सन यांचा हा उल्लेख करण्याचें कारण इतकेंच कीं, सर्व–धर्म–परिषदेचें पुरोहितत्व करण्याचें काम जर कधींकाळीं कोणाकडे पात्रतेनें येऊं शकेल तर तें निरहंकारी व सहिष्णु अशा हिंदुधर्माकडेच येईल; इतर एककल्ली धर्मांकडे येणार नाहीं.

असो; विश्वबंधुत्वाच्या कल्पनेसारखी उदात्त कल्पना दुसरी कोणतीहि नाहीं. व या विश्वबंधुत्वाचा पाया जर कोठें घालावयाचा तर तो धर्म-विचारावरच घालावा लागेल. कारण धर्मभोळें मन फार नाजूक व चिरडखोर असतें हें जरी खरें, तरी आपल्या इतर मानवबंधूंना सहिष्णुतापूर्वक समबुद्धीनें वागविण्याचें मनुष्यानें मनांत आणिलें तर खरोखर परमार्थाइतकें संसारांत तें साधणार नाहीं. प्रापंचिक व्यवहारांत त्याला अधिक अडथळे येतील. विश्वबंधुत्व हें बोलावयाला फार सोपें, पण प्रत्यक्ष आचरणाला फार कठीण. कारण जगांत लोक सर्वच सारख्या सात्त्विक वृत्तीचे नसल्यामुळें, आपपर हित यांचा झगडा पदोपदीं उपस्थित होतो; व मग केवळ सात्त्विक विचारानें त्याचा निकाल लागेनासें होतें ! आपण दुसऱ्यास विचारस्वातंत्र्य व आचारस्वातंत्र्य देण्यास तयार असलों तरी तेंच स्वातंत्र्य आपणांस देण्यांत दुसरे तितके तयार नसतात. एकाच्या न्याय बुद्धीला दुसऱ्याच्या न्यायबुद्धीचा बरावर मुकाबला मिळत नाहीं किंवा मेळहि घालतां येत नाहीं. शिवाय न्यायबुद्धि व व्यक्तिस्वातंत्र्य असल्या उदात्त भावना गृहीत घेण्याची तरी भीड कशाला? कारण शुद्ध तामसी स्वार्थ-बुद्धीच जगांत बहुतेक सर्वत्र धुमाकूळ घालीत असते ही गोष्ट लपविण्यांत अर्थ नाहीं. यामुळें मनुष्यें जेव्हां प्रत्यक्ष भांडत नसतात अशा वेळींहि, तीं बंधुत्व-भावनेचा आस्वाद घेत असतात असें म्हणतां येत नाहीं. जी गोष्ट व्यक्तींची तीच गोष्ट राष्ट्रांची. परस्परांच्या दरबारीं राष्ट्रें आपापले वकील ठेवितात, कोणाशीं त्यांचे तह असतात, कोणाला ते आपले मित्र म्हणतात; वगैरे वगैरे गोष्टी जरी खऱ्या तरी या सामोपचारांत फारसा खरा सात्त्विक भाव नसतो. वादळापूर्वीची शांतता, किंवा एकमेकांस खालीं पाडून त्यांच्या

उरावर बसण्याच्या इच्छेनें कंबर कसून रंगणांत शिरलेल्या युयुत्सु मल्लांची पूर्व सलामी, याहून त्यांत जास्त अर्थ नसतो. पण पृथ्वी व संसारसुखाची साधनसामुग्री हीं मर्यादित असल्यामुळें कलह होणें अपरिहार्य आहे. सुदैवानें परमार्थाची मात्र तशी स्थिति नाहीं. बिनतारी तारायंत्राच्या योजनेप्रमाणें, हल्लीं जसें वाटेल त्या दोन मनुष्यांना इतर सर्व जगाचें व्यवच्छेदन करून आपाल्यापुरत्या व्यवहाराचें संदेशसाधन निर्माण करितां येतें, त्याप्रमाणें वाटेल त्या मनुष्याला थेट ईश्वराशीं आपल्या भक्तीचें किंवा इतर मोक्षसाधनांचें तारायंत्र भिडवून परमार्थ साध्य करितां येतो. समुद्रांत इतरांमुळें आपला समावेश होत नाहीं, किंवा समुद्रापर्यंत जाऊन पोंचण्याला आपणाला इतरांमुळें अडचण होते, अशी तक्रार पृथ्वीवरील कोणत्याहि नदीनें आजवर केलेली नाहीं; त्याचप्रमाणें धर्मसरितांचेंहि आहे. पितृभक्ति ही वस्तु समर्याद नसल्यामुळें, आपणास इतर पुष्कळ भाऊ आहेत म्हणून आपल्या पितृभक्तीला अडथळा होतो किंवा वाव सांपडत नाहीं हें जसें कोणास म्हणतां येत नाहीं, तसेंच ईश्वरभक्तीचेंहि आहे. तात्पर्य, ज्याला त्याला आपापला धर्म जरी प्रिय असला तरी विश्वबंधुत्वाच्या कल्पनेला जर कोठें अधिष्ठान मिळण्याचा संभव असला तर तो धर्मस्वातंत्र्यबुद्धींतच.

जगांत यापुढें पूर्वीप्रमाणें धर्मांचा एकमेकांकडून छळ होईल किंवा ही धर्मस्वातंत्र्यबुद्धीच प्रभावी होईल हें खात्रीनें कोणी सांगावें? पण धर्मस्वातंत्र्यबुद्धीचाच पगडा अधिक बसेल अशीं चिन्हें दिसतात खरीं. जगांत यापुढें मारामाऱ्या किंवा लढाया होणार नाहींत असें म्हणण्याचें धाडस कोणीहि करणार नाहीं. पण त्या धर्मांच्या खोट्या अभिमानामुळें तरी होणार नाहींत— ज्या काय व्हावयाच्या त्या ऐहिक विरोध व शत्रुत्व यांमुळेंच होतील—एवढी तरी गोष्ट त्यांतल्या त्यांत बरीशी दिसते. विश्वबंधुत्वाच्या भ्रमाचा भोपळा शेंकडों वेळां मध्येंच क्षुल्लक कारणानें फुटून मनुष्याची स्वार्थपरायणता नजरेस येईल; पण सत्याच्या प्रखर कातरीनें तुटावयाचा तर खोटा रुपयाच तोडला जाईल, खरा रुपया तरी वांचेल. धर्मस्वातंत्र्यबुद्धी मनुष्याच्या ऐहिक शत्रुत्वालाहि सर्वस्वीं आळा घालण्याइतकी जरी प्रबळ करितां आली नाहीं तरी खऱ्या मनानें भरलेली सर्व-धर्म-परिषद् पुढेंमागें कालांतरानें शक्य होईल अशी आशा तरी वाटते. सन १८९६ सालीं अमेरिकेंत शिकागो येथें सर्व-

धर्म–परिषद् भरली होती हें प्रसिद्धच आहे. पण पूर्वी सांगितल्याप्रमाणें धर्म-तत्त्वदृष्ट्या अशी परिषद भरविण्यांत पुढाकार घेण्याची खरी पात्रता हिंदू-धर्मालाच असल्यामुळें हिंदुस्थानांतील धार्मिक पुढाऱ्यांनीं हें ध्येय अहर्निश मनांत बाळगण्यासारखें आहे. आमच्यापुढें असलेलें सर्व–धर्म–परिषदेचें पुस्तक हें या महत्त्वाच्या प्रचंड कार्याच्या मानानें अर्थात् अत्यंत अल्पकार्य-कारी असें आहे. तथापि, त्यानें वाचकांच्या मनास होणारी सूचना किंवा व्यंजना ही बहुमोल आहे यांत शंका नाहीं. वेदश्रुतींचा बोध 'श्रुतिबोधा'च्या वाचकांस इतर काय मिळेल तो मिळेलच; परंतु प्रस्तुत पुस्तकाच्या द्वारानें सर्व–धर्म–परिषदेसारख्या लोकोत्तर व उदात्त कल्पनेची जागृति त्यांच्या मनांत झाली तर तो 'बोध' त्याहून विशेष महत्त्वाचा असें आम्ही तरी समजूं.

---

# ७९. अवतारकृत्याचा पोरखेळ

( ता. २२ एप्रिल १९१३ )

गेल्या ता. १९ नोव्हेंबरच्या केसरींत थिऑसॉफिकल सोसायटीच्या प्रेसि-डेंट मिसेस आनि बिझांट यांच्यावर मद्रासच्या हायकोर्टांत लागलेल्या दिवाणी फिर्यादीचा जो उल्लेख आला होता तो वाचकांस स्मरत असेलच. सदर फिर्यादीचा निकाल गेल्या मंगळवारीं होऊन मद्रास हायकोर्टचे एक न्यायमूर्ति मि. बेकवेल–यांनीं असा ठराव केला कीं, फिर्यादी नारायणय्या यांचे कृष्णमूर्ति–व नित्यानंद हे जे दोन अज्ञान मुलगे बाईनीं आपल्या ताब्यांत ठेवले आहेत ते त्यांनीं नारायणय्या यांस ता. २६ मेच्या पूर्वी परत द्यावे. या फिर्यादीचा निकाल अशाच रीतीनें व्हावयास पाहिजे होता व तो तसा झाला ही समाधानाची गोष्ट होय. कारण सदर मुकदम्यांत वादग्रस्त असे इतर मुद्दे जरी बरेच आहेत तरी मुख्य प्रश्न इतकाच आहे कीं, एखाद्या बापानें आपलीं अज्ञान मुलें दुसऱ्या एखाद्याच्या स्वाधीन केलीं व तीं तूंच संभाळ असें लिहूनहि पण दिलें, तरी पुढें कोणत्याहि कारणानें तीं त्याला आपल्या ताब्यांत परत मागतां येतात कीं नाहीं ? किंवा त्यांचा ताबा एकदा देऊन

टाकला तो टाकलाच? परत मिळणें शक्य नाहीं? मुलांचें पालनपोषण त्यांच्या आईबापांनींच करावें हा नियम नैसर्गिक प्रेमामुळें सिद्ध होत असल्यानें, कोणत्याहि देशाच्या कायद्यानें त्या नियमास कायदेशीर अधिकाराचें स्वरूप दिलेलेंच आढळून येईल. आतां इतर सर्व नियमाप्रमाणें हाहि नियम क्वचित् अपवाद—बाधित होऊं शकतो. म्हणजे समजा कीं, एखादे ठिकाणीं जर कोणी विक्षिप्त आईबाप सृष्टिनियमांस सोडून आपल्या मुलांचा दुष्टावा करूं लागतील, हाल व छळ करितील, किंवा लोभाला बळी पडून त्यांचें नुकसान करायला प्रवृत्त होतील तर, आईबापाहूनहि श्रेष्ठ अधिकार असणारें सरकार त्या कामीं हात घालील. पण वरीलपैकीं कोणताच प्रकार नसेल तेथें आईबापांचा नैसर्गिक हक्क हाच श्रेष्ठ ठरतो, व तो त्यांस वाटेल तसा बजावितां आलाहि पाहिजे. नाहीं तर एकाचीं मुलें आणि दुसरा त्यांचें हिताहित ठरविणार असें झाल्यास अनावस्था प्रसंग यावयाचा!

प्रस्तुतच्या मुकदम्यांत नारायणय्या व त्याचे मुलगे यांच्यामधील स्वाभाविक प्रेम संबंधास अपवादकारक अशी कोणतीहि गोष्ट घडून आली नव्हती. जें काय झालें होतें तें इतकेंच कीं, नारायणय्या यांच्या ताब्यांत न राहतां हीं मुलें आपल्या ताब्यांत राहिलीं तर त्यांचें शिक्षण व परमार्थिक कल्याण अधिक होईल असें बिझांटबाईस वाटलें; नारायणय्या हा स्वतः बाईचा अनुयायी असल्यामुळें ती गोष्ट त्यालाहि प्रथम पटली; व या अशा मनःस्थितींत नारायणय्यानें आपलीं मुलें बाईच्या ताब्यांत दिलीं. बाईनींहि त्या मुलांना प्रथम जवळ बाळगून व नंतर विलायतेंत ठेवून त्यांच्या शिक्षणावर पुष्कळ पैसा खर्च केला. पण पुढें ही त्याची मनःस्थिति टिकली नाहीं. बाईपेक्षां लेडबीटर नांवाच्या त्यांच्या एका थिऑसफिस्ट अनुयायाचा संबंधच मुलाशीं अधिक येऊं लागला. आणि लेडबीटरसाहेब थिऑसफिस्ट असले तरी अनीतिमूलक तत्त्वें प्रतिपादन करणारे, किंबहुना स्वतः त्या तत्त्वांचें आचरण करणारे आहेत, असा नारायणय्या यांस संशय येऊं लागला. तेव्हां यापुढें आपलीं मुलें बिझांटबाईच्या ताब्यांत ठेवण्यास नारायणय्या हे नाखूष होऊन त्यांनीं तीं परत मागितलीं. हा सर्व प्रकार अनपेक्षित असा घडला खरा. पण त्याला काय उपाय? अर्थात् बाईनीं मुलें मुकाट्यानें बिनबोभाट नारायणय्याच्या स्वाधीन करून ‘ तीं आणि त्यांचें नशीब ’ असें म्हणून स्वस्थ बसा-

वयाचें होतें. मुलांच्या पायीं नारायणय्याच्या चंचल स्वभावामुळें त्यांस विनाकारण बराच खर्च पडला होता खरा; व तो जर त्यांना कायदेशीर रीतीनें वसूल करून घेतां येण्यासारखा असता तर तो त्यांनीं बेलाशक वसूल करून घ्यायचा होता. फार काय पण नारायणय्याला दिवाणी तुरुंगांतहि बसवावयाचें होतें.

पण ही सरळ वाट सोडून देऊन, 'मी मुळीं मुलेंच ताब्यांत देणार नाहीं असा आग्रह बाईंनीं धरला; आणि मग हा आग्रह नीट दिसावा म्हणून त्यांनीं नसतीं कुभांडें रचिलीं. "हा बाप मुलांना नीट वागवीतच नव्हता; माझ्या वाइटावर असणाऱ्या थिऑसफीच्या शत्रूंनींच त्याला चिथविला आहे; फार काय, पण महाराष्ट्रांत बंड होणार होतें तें मीं थांबविलें या रागानेंच या फिर्यादीचा पाठपुरावा होत आहे" असे तारे आपल्या कैफियतींत तोडण्यास बाईंनीं कमी केलें नाहीं. एरवीं हजार कारणें असतीं तरीहि हरकत नव्हती; पण "लेडबीटरसाहेबांच्या नीतिमत्तेचा आपणास संशय येतो, ह्यांच्याशीं संबंध ठेवल्यानें माझीं मुलें बिघडतील, सबब मुलें परत द्या" अशी स्पष्ट तक्रार नारायणय्या यांनीं त्यांच्या कानीं घातल्यावर तरी बाईंनीं माघार घ्यावयाची होती. कारण एक तर लेडबीटर हे तरुण मुलांना वाईट वाईट संवयी लावण्यासारखीं मतें उघड प्रतिपादितात, याचा त्यांना जुना कां होईना पण प्रत्यक्ष अनुभव होता. दुसरें असें कीं नारायणय्याची शंका निराधार कां असेना, पण त्याला अशी शंका आली होती खरी, व येवढी गोष्टहि त्यांनीं मुलें परत मागण्याला व बाईंनीं ती देण्याला पुरेशी होती असें आम्हाला वाटतें. फौजदारी कायद्यांत असें एक तत्त्व आहे कीं, अमुक एक न्यायाधिशाकडून मला न्याय मिळणार नाहीं अशी आरोपीला जर खरोखरच भीति वाटत असली तर, (त्या भीतीला वस्तुतः कांहीं एक आधार नसला व न्यायाधीश निःपक्षपाती असला तरी) त्या खटल्याचा वर्ग दुसऱ्या न्यायाधिशाकडे प्रायः करावा. तेंच तत्त्व येथेंहि लागू होण्यासारखें आहे. येथें येऊन जाऊन प्रश्न काय तो मुलांच्या कल्याणाचा; व हल्लींच्या व्यवस्थेनें जर मुलांचें कल्याण होणार नाहीं. अशी बापास शंका वाटूं लागली होती तर त्याच्या ताब्यांत मुलें फिरून देणें जरूर होतें. बिझांटबाईंचीहि या मुलांच्या कल्याणाविषयींची बुद्धि तितकीच उत्कट असेल; पण अशा दुस्तर विरोधांत बाप तो

बाप आणि परका तो परका असें न्यायकोर्टानें ठरविल्यास त्यांत तक्रार करण्यासारखें काय आहे? परोपकार झाला म्हणून काय झालें? तो करण्याला कांहीं तरी रीत पाहिजे कीं नाहीं? परोपकार करण्याच्या सबबीवर पतीपासून पत्नी किंवा आईबापांपासून मूल बळजबरीनें हिसकावून घेण्याचा कोणासहि अधिकार पोंचत नाहीं. व हा नसता अधिकार गाजवूं पहाणाराला साधारण तारतम्य देखील नाहीं असेंच म्हणावें लागेल. फार काय अशा सबबीवर स्वत: बिझांटबाईच्या मुलीचें जर कोणी हरण करूं लागलें असतें, तर या वाघिणीबाई त्याच्या अंगावर किती त्वेषानें तुटून पडल्या असत्या याची कल्पना बाईच्या स्वभावाची माहिती असणारांना सहज करितां येईल!

पण ही विचारसरणी इतकी सरळ असतां बिझांटबाईस ती कां पटत नाहीं? हा प्रश्न कोणालाहि सहज सुचण्यासारखा आहे. पण त्याचें उत्तर आमच्या मतें असें आहे कीं, या कामीं केवळ अहंकारवश व विकारांध झाल्यानें बाईची विचारशक्ति जवळ जवळ नष्ट झालेली आहे! आणि विशेष खेदाची गोष्ट ही कीं या विकल–मनस्कतेनें धर्मासारख्या अत्युच भावनेच्या बाबतींत या बाईला पकडलें आहे. संसारांत गुरफटलेल्या माणसाला विकारवशता एकवेळ शोभते; पण बिझांटबाई व त्यांचे सांथीदार परमार्थाच्या ज्या लंब्याचवड्या गोष्टी बोलतात, त्यांना मात्र ती खास शोभत नाहीं. 'मिजास पातशाहाची, पण नांदणूक कैकाड्याची!' अखिल विश्वाला सुधारायला निघालेलीं हीं माणसें! आणि त्यांचाच हा वेडेपणा! आतां परमार्थाची जात प्रपंचापासून थोडीशी वेगळी असेल कदाचित्. पण परमार्थात झालें तरी काळें तें पांढरें व पांढरें तें काळें अशी सपशेल उलटापालट खचित् होणें संभवनीय नाहीं. ज्याला आपण सजीव सृष्टी व निर्जीव सृष्टी म्हणतों, त्यांत जसा असला तर फारच थोडा भेद आहे–त्या दोनहि सृष्टी जशा एकमेकांला लागून चिकटून आहेत–तसेंच प्रपंच आणि परमार्थ यांचेंहि आहे. परमार्थविचारांत कोणी शिरला म्हणजे त्याला तेवढ्याखातर शंभर खून माफ असें थोडेंच आहे! उलट आम्ही असें म्हणतों कीं सशास्त्र भट्टींत ज्याप्रमाणें धूर न होतां धुराचीं मूल द्रव्यें चांगलीं पिचून शुद्ध प्रकाश व उष्णता वाढवितात, त्याचप्रमाणें परमार्थाच्या भट्टींत शिरलेल्या मनांतले सर्व प्रकारचे दुष्ट विकार

व अहंकारादि तामस भावना पिचून जाऊन, त्यांपासून सात्विक भावना उलट अधिकच प्रज्वलित झाल्या पाहिजेत. पण आनीबिझांटबाईचें उलट आहे. त्यांच्यांत मानापमान, राग–लोभ, क्रोध–द्वेष हे अगदीं तुमच्या आमच्यासारखे जाज्वल्य आहेत; एवढेंच नव्हे तर कणिकमुनि किंवा मॅकिएव्हेल यांच्या अस्सल राजकारणाच्या विजयाला लागणारी वक्रता व खोडसाळपणा बाईच्या अंगीं भरपूर आहे हें आजपर्यंत अनेकदां अनुभवास आलेलें आहे. पण उच्चनीच भावनांची अशी सरमिसळ झाली म्हणजे ती केव्हांहि हास्यास्पद झाल्याशिवाय राहत नाहीं; व आनीबिझांटबाईंनीं हल्लीं इतकें जगाकडून आपलें हसें पूर्वी केव्हांहि करून घेतलें नव्हतें असें आमचें तरी मत आहे.

बिझांटबाईचें सर्व चरित्रच हास्यास्पदतेकडे झुकणारें आहे. त्या नास्तिक–श्रेष्ठाच्या आस्तिक–श्रेष्ठ झाल्या, आणि हा अवघा प्रवास साऱ्या पांच दहा वर्षांत ! पण आस्तिक–श्रेष्ठ बनल्यानें त्यांची महत्त्वाकांक्षा संपली नाहीं. जगांतलें सर्व ज्ञानविषय आपलेसे केल्यावर भूत व भविष्य यांना लगाम घालून त्यांनीं आपणाकडे खेंचलें. बिचारा हिंदुधर्म त्यांना शरण गेल्यानें त्याला त्यांनीं अभय वचन देऊन पाठीशीं घातलें, आणि पृथ्वीवरील हा दिग्विजय संपादन केल्यावर परमेश्वराच्या कारभाराकडे त्यांनीं सोईसोईनें लक्ष पोंचविलें. विश्वकुटुंबित्वाची उदात्त कल्पना परमेश्वरालाहि आजवर साध्य करितां आली नाहीं, ती सिद्ध करण्याचा संकल्प बाईंनीं सोडला ! आणि या सर्व पराक्रमाला मूर्त स्वरूप येऊन जगाची खात्री पटावी याकरितांच कीं काय, उपलक्षणादाखल एक लहानसें अवतारकृत्य करावयाचें त्यांनीं योजिलें. हिंदूंचा मैत्रेय आणि ख्रिस्त्यांचा येशू यांची गठडी वळून त्या दोघांनाहि एकाच शरिरांत कोंबून अवतार घेण्याची त्यांनीं आज्ञा केली ! आणि हा सर्व चमत्कार घडवून आणल्याचें धवल यश आपल्या डोळ्यांना याच जन्मांत दृष्टीस पडावें म्हणून हाताशीं सांपडलेला एक मद्रासी मुलगा घेऊन त्याच्या नांवानें भावी अवताराची द्वाहीहि फिरवून टाकली ! खरोखर थिऑसोफिकल आदिमायेच्या अवतारकृत्याचा हा भातकुलीचा खेळ पाहून कोणास आश्चर्य वाटणार नाहीं ? दुर्दैवी बिचारा नारायणय्या ! त्रेतायुगांतील दशरथाप्रमाणें शोक करावयास न लागतां, किंवा द्वापारांतील वसुदेवाप्रमाणें बंदिवास भोगावयास न लागतां,

या कलियुगांत अगदीं सुखासुखी एका नवीन अवताराच्या पितृपदाचा मान— आळशावर गंगा लोटावी त्याप्रमाणें—त्याजवर लोटून आला असतां तो अव्हेरण्याची बुद्धि त्याला झाली तेव्हां " दैव देतें व कर्म नेतें " हीच म्हण खरी नव्हे तर काय ?

वरील सर्व हकीकतीवरून नारायणय्या यांचा मुलगा कृष्णमूर्ति परत न देण्याचा बिझांटबाईचा हट्ट इतका कां हें दिसून येईल. मुलगा परत दिला म्हणजे आपलें सर्वच भांडवल गमावलें असें बिझांटबाईंना वाटत आहे. पण हा सर्व अट्टाहास केवळ अहंकाराचा होय. एखाद्या नवीन अवताराची काळजी बाईस आहे म्हणण्यापेक्षां तो अवतार आपल्या स्वतःच्या देखरेखीखालीं व्हावा याचीच काळजी बाईंना विशेष दिसते. 'आत्मनस्तु कामाय सर्वं प्रियं भवति' या उपनिषद्वाक्याचें हें एक उत्तम उदाहरणच म्हणावयाचें. पूजेकरितां पार्थीव करावयाचें, पण अभिमान असा कीं, तें पार्थीव मी माझ्या तळहाताच्या मळाच्या मृत्तिकेचें केलें आहे ! अशा अभिमानानें केलेली पूजा किंवा देवकार्य कितपत पुण्यफलप्रद होत असेल तें असो. हिंदुधर्म हा आपल्या परीनेंहि अवतार मानणारा आहे खरा; पण बिझांटबाईनीं हल्लीं चालविलेली ही अवताराची कारागिरी कांहीं अजबच होय यांत शंका नाहीं ! रामायणादि काव्यांतून पुढें अवतार होण्याचीं वर्णनें शुभसूचक शकुनांच्या द्वारें केलेलीं आपण वाचतों. परंतु काव्यांकडे काव्याच्या दृष्टीनेंच पहाणें जरूर असल्यामुळें, पुढें येणाऱ्या अवताराच्या जाहिराती आपल्या अंगावर चिकटवून नाचरेपणा करणारे भविष्यवादी ऋषी किंवा महात्मे त्या त्या वेळच्या खऱ्याखुऱ्या मानव सृष्टींत होते असें कोणी मानीत नाहीं. 'धर्मसंस्थापनार्थाय संभवामि युगे युगे' हें गीतावचन जरी प्रत्यक्ष ईश्वराचें मानलें तरी, बिझांटबाईच्या अवतारी कारागिरीच्या कृतीचा थांग त्यांत लागतो असें आम्हांस वाटत नाहीं. अवतारकृत्य हातून घडल्यावर मग त्यास अवतारी पुरुष म्हणणें हेंच मनुष्यस्वभावाला धरून आहे. श्रीराम—कृष्णादिकांच्या अवतारांचीं भविष्यें त्यांच्या जन्मापूर्वी झालीं होतीं असें वर्णन ज्यांत येतें तीं काव्यें वास्तविक रामकृष्णांच्या अवतारसमाप्तीनंतर रचलीं गेलेलीं आहेत, एवढी खूण मनांत बाळगली म्हणजे पुरे ! बिझांटबाई आपल्याकडून हिंदु अवतारकल्पनांचा आविर्भाव पुष्कळसा आणतात खऱ्या; पण शेवटीं त्यांचा झोंक, त्यांनीं

आपल्या जन्माबरोबर मातृस्तनांतून सेविलेल्या खिस्ती अवतारकल्पनांकडेच झुकतो हें कोणाहि सूक्ष्मदृष्टीनें पहाणारास कळेल. भविष्यकथनाचें याहून अधिक धाडसी उदाहरण मिळणें शक्य नसलें तरी, केवळ या धाडसानें लोक भेदरून जातील, आणि ऑक्सफर्ड येथें एका इंग्रजी शाळेंत इंग्रजी पढत असलेल्या मद्रासी मुलास ते मैत्रेय ऋषींचा व येशूखिस्ताचा जुळा अवतार मानण्यास तयार होतील ही आशा व्यर्थ होय. राजेसाहेबांची स्वारी कचेरीला यावयाची म्हणजे जसें आधीं शिंग्यानें शिंग फुंकलें पाहिजे व भालदार–चोपदारांनीं अलकाऱ्यालल्काऱ्या मारून सावधानतेचा इषारा दिला पाहिजे, तसेंच एखाद्या धार्मिक जगद्गुरूलाहि अवतार घेण्यापूर्वी आपल्या आगमनाचा पुकारा केल्याशिवाय गत्यंतर नसतें असें थोडेंच आहे! जगद्गुरूच्या आगमनाची तयारी ती काय करावयाची? खरा जगद्गुरू कित्येक आधुनिक जगद्गुरूंप्रमाणें बोलावणीं बोलावून पाद्यपूजा उकळीत नसतो; तर तो पराक्रमी सीझरप्रमाणें न सांगतां येतो, येतांच एका कटाक्षानें सर्व पाहून घेतो, आणि दृष्टिनिक्षेप आणि जय या गोष्टी त्याला एका क्षणींच करितां येतात. नाटकी युद्धांतील विजयाप्रमाणें किंवा नाटकी दरबाराप्रमाणें अवतारकृत्य हें आधीं ठरून खेळीमिळीनें होत नसतें. अवतारी पुरुषामध्यें ईश्वराचा अंश असतो ही गोष्ट तत्त्वतः थिऑसॉफिस्ट किंवा सनातनी या दोघांनाहि सारखीच मान्य आहे. पण अवतार म्हणजे काय, तो कसा होतो व तो काय करितो याविषयीं मात्र त्यांचें एकमत आहे असें म्हणतां येत नाहीं. ईश्वराचें लीलाप्रियत्व सर्वमान्यच आहे; तें कोण नाकबूल करील? पण लीला करण्याच्या कटांत 'मला' त्यानें सामील करून घेतलें आहे व यामुळें मी आणि माझे थिऑसॉफिस्ट अनुयायी यांच्याकडे या लीला–नाटकाचें सूत्रधारित्व, किंवा अगदीं आधुनिक भाषेंत बोलावयाचें तर 'स्टेज–मॅनेजरशिप' ईश्वरानें दिली आहे, असें म्हणण्याचा बिझांटबाईचा बहाणा पाहून पुष्कळांना हंसें व कांहीं थोड्यांना तरी राग आल्याखेरीज रहाणार नाहीं.

पण हा सर्व गुह्य विद्येच्या अंधाऱ्या तळघरांत शिरण्याचा परिणाम! ईश्वराला 'गूढप्रिय' म्हणणें हा त्याच्यावर केवळ नसता आरोप करणेंच होय. त्याला अंधकार इतका प्रिय असता तर इतकें तेज त्यानें जगांत निर्माणच केलें नसतें. पण खुल्या तेजांत उघड्या डोळ्यांनीं वावरतां येणें

प्रकृतिविशेषामुळें अशक्य असल्यामुळें दिवाभीत ज्याप्रमाणें नसेल तेथला आंधेर हुडकून काढतें, तोच प्रकार गुप्त–विद्येमध्यें डोकें खुपसणारांचा केव्हां केव्हां होतो. असो; पण सर्वसाधारण थिऑसफीवर टीका करण्याचा आमचा आज उद्देश नाहीं. 'थिऑसफी' या नांवानें कोणतेंहि मत निर्दिष्ट झालें म्हणजे तेवढ्यामुळें तें टाकाऊ असें आम्हीं केव्हांच म्हटलेलें किंवा मानलेलें नाहीं. थिऑसफी ही इतर अनेक विचारसरणीप्रमाणें धर्म व परमार्थ यांचा शोध करणारी एक विचारसरणी आहे. किंबहुना निरनिराळ्या अनेक विचारसरणींचा मेळ घालण्याची प्रशंसनीय महत्त्वाकांक्षा थिऑसफी धरते ही गोष्ट आम्हांला मान्य आहे. पण तात्त्विकाच्या उच्च प्रदेशावरून व्यावहारिकाच्या नीच प्रदेशावर येतांना प्रत्येक धर्मपंथाच्या नदीचें शुद्ध पाणी मार्गांतील अशुद्ध द्रव्यामुळें गढूळ व दूषित होतें, त्याचप्रमाणें थिऑसफीचेंहि झालें आहे. थिऑसफी या नांवाला जर कांहीं अलीकडे दूषण जडून गेलें असेल तर तें त्यांतील तात्त्विक विचारसरणीमुळें नव्हे; तर थिऑसफीच्या विकारवश अशा कित्येक पुढाऱ्यांच्या बाष्कळ थेरामुळेंच होय. थेट गंगोत्रीवर म्हणजे स्वर्गद्वारावर भरून घेतलेलें निर्मळ गंगोदक असलें तरी तें चामड्याच्या पिशवींतून प्यावयास दिलें तर अवमानित होणारच. तीच स्थिति थिऑसोफीच्या तात्त्विक विचारांची होणार कीं काय अशी आम्हांस भीति वाटते ! भौतिक शास्त्रांत आजपर्यंत कांहीं थोडे शोध लागले नाहींत व नवीन ज्ञान कांहीं थोडें पैदा झालें नाहीं. पण तें व्यक्तिमात्राच्या दोषानें दूषित होत नसल्यामुळें त्याची सर्वमान्यता आजवर टिकली व पुढेंहि टिकेल. अध्यात्मिक ज्ञान व शोध झाले तरी ते व्यक्तिमात्रापासून अलग राहूं नयेत किंवा ठेवतां येतच नाहींत, असें आम्हांस तरी वाटत नाहीं. निदान इतकें तरी खरें कीं, तें लोकांस मान्य होण्याला थिऑसफिस्ट लोकांचा व्यवहारांतला हा सर्व गोंधळ अनिवार्यच आहे असें नाहीं. कृष्णमूर्तिविषयक हल्लींचा हा दावा व मद्रास येथील कोर्टांतून चाललेल्या बेअब्रूच्या फिर्यादी या सर्व गोष्टींवरून थिऑसफिस्ट लोकांना बराच बोध घेतां येण्यासारखा आहे व तो घेऊन त्यांनीं सारासार विवेकबुद्धि आपणामध्यें जागृत असल्याचें लोकनिदर्शनास आणिलें तर दोघांचेंहि कार्य होईल. आनीबिझांटबाईनीं मांडलेला अवतारकृत्याचा पोरखेळ खुद्द थिऑसफीच्या अंतःकेंद्रांतील अनेक विवेकी मनुष्यांसहि

पसंत नाहीं. फार काय प्रस्तुत मुकदम्यांतच प्रतिवादी पक्षाप्रमाणें वादीपक्षाकडेहि मदतीला थिऑसफिस्टच होते ही गोष्ट लक्षांत घेतली असतां, केवळ बिझांटबाईविरुद्ध बोलणें म्हणजे थिऑसफीच्या विरुद्ध बोलणें नव्हे हें कोणासहि कबूल करावें लागेल. प्रस्तुतच्या प्रकरणावरून तरी शहाणे होऊन विचारी थिऑसफिस्ट लोक पुढें काय करावयाचें हें आपआपसांत सल्ला घेऊन लवकरच ठरवितील अशी आशा व्यक्त करून, लिहितांनाहि मनाला अप्रिय वाटणाऱ्या या विषयाची आम्ही रजा घेतों.

---

# ८०. आपले कोण आणि परके कोण ?

( तारीख १ जुलै १९१३ )

आपपर—भाव हा स्वभावसिद्धच आहे. जे आपले त्यांना जवळ करावे आणि जे परके त्यांना दूर ठेवावे हा सर्व सजीव सृष्टीचा मनोधर्म आहे. ज्याच्याजवळ स्वतःची सत्ता सांगण्यासारखें असें, चार पावलांनीं आक्रमिलेल्या उकिरड्याहून अधिक कांहीं नाहीं अशा कुत्र्यापासून, तों चतुरंगदळ नेहमीं सज्ज करून ठेवावें लागणाऱ्या सार्वभौमापर्यंत आपपर—भाव हा कुणालाहि सोडीत नाहीं. पण या दोघांनाहि, ‘ तुम्ही आपले कुणाला म्हणतां व परके कुणाला म्हणतां ? ’ असा प्रश्न केला असतां त्याचें सयुक्तिक व समर्पक उत्तर त्यांना सांगतां येत नाहीं. भावना बाळगणें सोपें असतें, पण तिचें ‘ व्याकरण ’ करणें कठीण आहे. कुत्र्याला आपपर भाव बाळगण्याचें वास्तविक काय कारण ? असेंच सकृद्दर्शनीं वाटतें. दरएक उकिरड्यावर चार चार कुत्रे बसले तरी गांवांतील सर्व कुत्र्यांना पुरून उरतील इतके उकिरडे कोणत्याहि गांवांत खचित असतील. पण आपणास नुसती बसावयापुरती जागा मिळाल्यानें कुत्र्यांचेंहि समाधान होत नाहीं. उकिरडा हें जसें त्यांचें स्वतःचें घर, वतन किंवा गांव, त्याचप्रमाणें ज्या आळींत तो उकिरडा असेल ती आळी हें त्यांचें खास अमलाचें राज्य, किंवा इंग्रजींत बोलायचें तर Sphere of Influence होय; व या

आत्मवर्चस्वाच्या प्रांतांत दुसऱ्या कोणी येऊं नये–निदान जे येतील ते आपले असावे परके असूं नयेत, व आले तरी आपल्या परवानगीनें यावे–अशाविषयीं कोणताहि कुत्रा नेहमीं दक्षता बाळगतो. परक्या आळीचा कुत्रा दिसला कीं, तो त्याच्यावर धांवून गेलाच. मनुष्याला कुत्र्याहून ज्ञान अधिक व त्याच्या संसाराचा विस्तारहि अधिक. अर्थात् त्याला आत्मवर्चस्वाचा प्रांत आंखून ठेवण्याची इच्छाहि अधिक असते. यामुळें लोकसंख्येनें गजबजलेल्या इंग्लंडांत अनिष्ट परक्या लोकांना प्रतिबंध करण्याचे कायदे आहेत यांत तर नवल नाहींच, पण दक्षिण–आफ्रिका, ऑस्ट्रेलिया, कानडा वगैरे वसाहतींत–जेथें हजारों मैलच्या मैल जमीन आज पड पडलेली आहे, व शेंकडों वर्षें ती वसाहतीनें भरून निघण्याचा संभव नाहीं तेथेंहि–परकीय प्रतिबंधाचे कायदे सुरू आहेत, इतकेंच नव्हे तर इतर कोणच्याहि देशापेक्षां ते अधिक कडक आहेत.

परकीय प्रतिबंधाचे असे ‘ कायदे ’ असतात हें ऐकून हिंदुस्थानच्या लोकांस कदाचित् आश्चर्य वाटेल; कारण हिंदुस्थानची बारादारी सदा सर्वांना खुली आहे. वाटेल त्या देशच्या वाटेल त्या दर्जाच्या मनुष्यानें इकडे यावें, रहावें, पैसा मिळवून परत जावें; इकडील लोकांस एखादा नवा चांगला गुण शिकविला तर मग कांहीं तक्रारच नाहीं, पण नसता दुर्गुण लावण्यासारखा तो मनुष्य असला तरीहि त्याला इकडे आम्हांस मज्जाव करतां येऊं नये हें आश्चर्य नाहीं का ? पण ही वस्तुस्थिति आहे खरी. “ तृणानि भूमिरुदकं वाक् चतुर्थी च सूनृता । एतान्यपि सतां गेहे नोच्छिद्यंते कदाचन ” या जुन्या वचनाप्रमाणें परक्याला हिंदुस्थानांत खायला, प्यायला व राहायला कांहीं कमी नाहीं व त्याच्याशीं आम्ही स्वभाव–दाक्षिण्यामुळें तर गोड बोलतोंच; पण मनांत आलें तरी त्याला टाकून किंवा अप्रिय बोलण्याचा आम्हांला कायद्यानें प्रतिबंध आहे; कारण जातीजातींत वैमनस्य उत्पन्न होण्यासारखी भाषा बोलूं नये असा सरकारचा सर्व लोकांना विशेषत: वृत्तपत्रकारांना–दटावण्याचा आग्रह आहे. या सर्व गोष्टींमुळें आपला कोण, परका कोण, असल्या भेदभावाचें आम्हांला इकडे पूर्ण अज्ञानच आहे म्हटलें तरी चालेल. आमच्या घरांत वाटेल तर आम्ही

परक्या मनुष्यास घेणार नाहीं; पण आमच्या देशांत परक्या मनुष्यांनीं— जगाच्या वाटेल त्या भागांतील वाटेल त्या मनुष्यांनीं—यावें किंवा नाहीं याविषयींचे कायदे करण्यास आम्हांस हवें तितकें स्वातंत्र्य नाहीं. आतां हिंदुस्थानांत असे कायदे करण्याची वेळच आली नाहीं असें कित्येक म्हणतील; व ही वेळ न येण्याचें कारण कदाचित् हेंहि असेल कीं, स्वतः परक्या लोकांनाच अजून हिंदुस्थानांत येऊन राहण्याची गोडी फारशी लागलेली नाहीं. इकडील हवा त्यांस मानवत नाहीं म्हणा किंवा स्वदेश सोडून इकडे येऊन राहण्यांत त्यांना कमीपणा वाटतो म्हणा, कांहींहि असलें तरी इकडे येऊन ते फारसे वसाहत करीत नाहींत हें खरें. परवाच लंडन टाइम्स पत्रानें असें लिहिलें होतें कीं, हिंदुस्थानांत जाणारे ब्रिटिश लोक तिकडील परिस्थितीच्या आहारीं जात नाहींत व पचनीं पडत नाहींत, हा ब्रिटिश राष्ट्राचा राष्ट्रीय दृष्ट्या एक मोठा फायदाच आहे ! या विधाना-वरून हें उघड दिसतें कीं, ब्रिटिश लोकांस स्वतःच इकडे येऊन राहणें पसंत नाहीं. तथापि, जे थोडे लोक येऊन राहतील त्यांच्यासंबंधानें आज हवे तसे कायदे नाहींत हें निर्विवाद आहे.

पण हा आक्षेप ब्रिटिशांखेरीज इतर परकीय लोकांसंबंधानें तरी अगदीं निरुत्तर आहे. कारण हिंदी लोकांना इतर कित्येक देशांत जो प्रतिबंध आहे, तो तेथें जाऊन कायमची वसाहत करून रहाण्यापुरताच आहे असें नाहीं; तर त्या देशांत केवळ प्रवेश करण्यालाहि आहे ही गोष्ट कांहीं खोटी नाहीं. दक्षिण–आफ्रिकेंतील वाटेल त्या फाटक्या तुटक्या गलिच्छ व्यसनी गोऱ्या वसाहतवाल्यासहि हिंदुस्थानांत वाटेल तेथें येऊन कायमचा रहिवासी होऊन राहतां येईल. पण त्याच दक्षिण आफ्रिकेंत हिंदी लोकांपैकीं ना. गुप्त, ना. सिंह, ना. चौबळ किंवा ना. आय्यर यांसारख्यांस–म्हणजे खुद्द हिंदी प्रधानमंडळाच्या सभासदांस–कांहीं विवक्षित व अपमानकारक शर्ती मान्य न करतां प्रवेश करण्यास मोकळीक नाहीं ! ना. गोखले यांस दक्षिण-आफ्रिकें-तील सरकारकडून पाहुणा या नात्यानें वागविण्यांत आलें होतें खरें; तरी पण त्यांचें तेथें जाणें हें एकप्रकारें तेथील कायद्याच्या विरुद्धच होतें. शिवाय त्यांचा जांवईथाटावर पाहुणचार झाला तरी त्याचें कारण हेंच कीं, ते केवळ शाळूसोबती–दो दिवसांचे पांथस्थ–सहज फेरी मारून

जाण्याकरितां आलेले, हें अधिकाऱ्यांस पक्कें माहीत होतें म्हणून. परंतु तेच, कल्पना करा कीं, तेथें गेल्यावर " आपण आलोंच आहों तर आतां येथेंच राहूं या " असें गोखले म्हणते तर, पंचतंत्रांतील 'चवथ्या जांवया' प्रमाणें अर्धचंद्र मिळून त्यांची तेथून खास बोळवण झाली असती ! व सन्मानार्थ त्यांच्या मागें चालणारा अधिकारीच त्यांच्या मागें लागून घालवून देणारा बेलिफ बनला असता ! कानडासारख्या प्रांतांत तर, गोखले एकदम हिंदुस्थानांतून जाऊं म्हणतील तर त्यांचा नुसता प्रवेश होणेंहि अशक्य होईल असें वाटतें.

हिंदुस्थान व इतर देश यांजमध्यें असा हा फरक कां असावा याचीं कारणें अगदीं उघड असल्यामुळें, त्यांचा विचार आम्ही आज करीत नाहीं. पण तो विचार केला तरी मुख्य अवघड प्रश्नांचा सर्व उलगडा होणार नाहीं. हिंदुस्थान स्वतंत्र नाहीं, हिंदुस्थान-सरकारहि परतंत्रच आहे. निदान हिंदुस्थानसरकाराचा राष्ट्रीय अभिमान त्यांच्या साम्राज्यविषयक अभिमानाच्या तेजांत सर्वस्वीं लोपून गेला आहे, आणि खुद्द ब्रिटिश सरकारास वसाहतींइतकें हिंदुस्थानचें ममत्व वाटत नाहीं, किंवा वसाहतरूपी मानसपुत्राला वरप्रदानानें दिलेली शक्ति डोईजड झाल्यामुळें, त्यांच्या कारभारांत ढवळाढवळ करतां येत नाहीं—कसेंहि म्हणा, हिंदुस्थानाला कोणी वाली नाहीं यामुळें त्याची ही अशी स्थिति असावयाचीच. पण जपानासंबंधानें तरी तसें म्हणतां येत नाहीं, कारण जगांतील चार पांच प्रमुख युरोपियन राष्ट्रांपैकीं एका राष्ट्राला जपाननें रणभूमीवर पूर्ण पराभूत केलेलें आहे. इंग्लंडसारख्या राष्ट्राला जपानकडून स्नेही म्हणून घेण्याचा अभिमान वाटतो व आज जपानशीं युद्ध म्हणजे केवळ प्राणसंकट असें अमेरिका वगैरे राष्ट्रांना वाटण्यासारखें आहे. असें असतां जपानी लोकांनाहि अमेरिकेसारख्या उदारमतवादी राष्ट्रांत जाऊन कायमचें रहाणें, घरें बांधणें व जमिनी मालकीच्या करणें हें अवघड होऊं लागलें आहे. कॅलिफोर्निया संस्थानांतील नवीन कायद्यानें उत्पन्न झालेला एतद्विषयक वाद कदाचित् सामोपचारानें मिटेल कीं नाहीं याविषयीं शंका वाटूं लागली आहे. याचें कारण काय असावें, असा प्रश्न सहजच उपस्थित होतो. अमेरिका, कानडा, दक्षिणआफ्रिका, ऑस्ट्रेलिया वगैरे राष्ट्रांकडून परक्यांना हा जो

प्रतिबंध होतो तो केवळ लोकसंख्या बेसुमार वाढेल या भीतीनें म्हणावा, तर तसें नाहीं. तसेंच जे लोक केवळ कमकुवत, म्याड, दुबळे, अशा-विषयीं मनाला एक प्रकारें तिरस्कार वाटतो, व केवळ अशा तिरस्करणीय लोकांना सहज प्रतिबंध करितां येईल म्हणून तो करून होईल तितकी गर्दी कमी करावी, असाहि या प्रतिबंधांत मुख्य हेतु दिसत नाहीं. वरील राष्ट्रां-तील लोकांना गर्दी खपेल पण ती स्वकीयांची असेल तरच खपेल; व एरवीं पाताळाई असली तरीहि जो जो म्हणून परका तो औषधालाहि नसला तरी चालेल, अशीच त्यांची खरी इच्छा आहे हें निर्विवाद होय. अर्थात् यावरून सहजच असें विचारावेंसें वाटतें कीं, या राष्ट्रांना आपले असे कोण वाटतात? पण या प्रश्नाचें उत्तर देणें बरेंचसें कठीण आहे; व जेव्हां स्वकीयपरकीयांतला हा भेद कांहीं तरी सकारण अशा शब्दांनीं कायद्यांत समाविष्ट करून त्या कायद्याचा अंमल करण्याचा प्रसंग येतो, तेव्हां ही अडचण विशेष भासते. धर्म, भाषा, वर्ण, चालीरीती, परंपरा इत्यादि अनेक गोष्टी स्वकीय–परकीय हा भेद ओळखण्यास उपयोगीं पडण्यासारख्या आहेत. पण त्यांतील कोणतीच एक गोष्ट किंवा अनेक गोष्टीहि एकत्र करून आपपर-भावाचा निर्णय करतां येत नाहींसें झालें आहे.

आपण दक्षिण आफ्रिकेचें उदाहरण घेऊं. दक्षिण–आफ्रिकेंतील लोकां-कडून एशिॲटिक लोकांना त्यांच्यामध्यें जाऊन राहण्यास प्रतिबंध होतो ही गोष्ट प्रसिद्धच आहे. पण 'एशिॲटिक' या शब्दाचा तरी अर्थ काय? हें दक्षिण–आफ्रिकेंतील कायदा करणारास अगर त्याची अंमलबजावणी करणारास आज निश्चितपणें सांगतां येत नाहीं! एशिॲटिक याचा असा अर्थ होतो कीं, एशियाखंडांत राहणारा. पण याच्यापलीकडे जाऊन वर्णानें काळा, धर्मानें खिस्ती नसलेला वगैरे सूक्ष्म अर्थ त्या शब्दापासून निष्पन्न होतात हेंहि मनास पटण्यासारखें आहे. पण यांपैकीं कोणताहि एक अर्थ घेऊन आज दक्षिण–आफ्रिकेंतील अधिकाऱ्यांकडून होणाऱ्या वर्तनाचें सम-र्थन करतां येत नाहीं. केवळ एशियांत राहणारा तो एशिॲटिक असें म्हणावें तर सीरिया प्रांतांतील म्हणजे एशियाच्याच एका प्रांतांतील खिस्ती लोकांना एशिॲटिक न म्हणतां युरोपियन म्हणावें असा दक्षिण–आफ्रिकें-तील कोर्टानें नुकताच निकाल दिला आहे. तसेंच पालेस्ताईन प्रांतांतले

अर्थात् एशिॲटिक-ज्यू यांनाहि युरोपियन समजण्यांत येऊन मज्जाव होत नाहीं. वास्तविक ज्यू हे मूळचे एशिॲटिक. पण ते सर्व जगभर पसरले असल्यामुळें आणि ज्या देशांत राहतील तेथील वर्ण व रीतभात ते उचलीत असल्यामुळें पुष्कळ वर्षें युरोपांत घालविलेल्या ज्यू लोकांना युरोपियन असें मानलें तर गोष्ट वेगळी. पण ज्यू हा ख्रिस्ती नाहीं व सीरिया प्रांत युरोपांत नाहीं. अर्थात् दोन्हि प्रकारांनीं सीरियन ज्यू हा आमच्याप्रमाणेंच एशिॲटिक ठरावा. पण तो युरोपियन ठरतो! व या ठरावाचें पोटांतलें गुप्त कारण कदाचित् असें असावें कीं, त्याचा वर्ण गौर आहे, सर्वसाधारण एशिॲटिक लोकांप्रमाणें काळसर नाहीं. बरें, नुसता गौरवर्ण हाच त्यांना प्रिय आहे, काळसर वर्ण म्हणूनच त्यांना आम्ही प्रिय नाहीं, असें म्हणावें तर तेंहि जमत नाहीं. कारण सीरिया प्रांतांत रहाणारे च वर्णानें अगदीं ज्यूइतके गोरे असे जे सीरियन मुसलमान त्यांना दक्षिण-आफ्रिकेंत जाण्याला मज्जाव आहे! एवढेंच काय पण ज्यू लोकांइतके गोरे व खुद्द युरोपखंडांत रहाणारे असे तुर्की मुसलमान असले तरी ते दक्षिण-आफ्रिकेंत संग्राह्य ठरत नाहींत. बरें, एशियांतील सर्वच ज्यू झाले तरी संग्राह्य ठरतात असेंहि नाहीं. कारण मुंबईतले बेनी इस्रे-लाइट, कोचीन प्रांतांत वसाहत करून राहिलेले यहुदी, आणि चिनांतील पिंवळटसर रंगाचे यहुदी हे सर्व सीरियन ज्यूप्रमाणें ज्यू असतां त्यांचा मात्र दक्षिण-आफ्रिकेंत प्रवेश होऊं शकत नाहीं. बरें, ख्रिस्ती धर्म हीच निर्णायक गोष्ट आहे असें म्हणावें तर एशिया-मायनर प्रांतांतील ख्रिस्ती लोकांना दक्षिण-आफ्रिकेंत जाऊं देतात, पण हिंदुस्थानांतील ख्रिस्ती लोक मात्र तेथें जाऊं शकणार नाहींत! दक्षिण-आफ्रिकेंतील लोकांचा हा केवळ वर्णविद्वेष आहे असें म्हणावें तर दक्षिण-आफ्रिकेंतील युरोपियन लोक स्वतः झाले तरी सर्वच खरोखर गोरे असतात असें म्हणतां येत नाहीं; आणि केवळ गौरवर्णावरूनच ठरवावयाचें तर काश्मिरी हिंदु, उत्तर हिंदुस्थानांतील मुसलमान, एकंदरीनें सर्व पार्शी वर्ग, किंवा काबूल-कंदहाराकडील अफगाण किंवा इराणी लोक हे दक्षिण आफ्रिकेंतील पुष्कळ वसाहतवाल्यांपेक्षां अधिक गोरे ठरतील. 'नेटल् मर्क्युरी' नामक पत्रांत मि. पोलॉक यांनीं नुकतेंच असें लिहिलें आहे कीं, ना. गोखले हे दक्षिण

आफ्रिकेंत हिंडत असतां त्यांच्याहून निःसंशय काळे असे हजारों वसाहत-वाले त्यांच्या समोर आलेले पाहून, गौरवर्ण हेंच वसाहतवाल्यांच्या आपलेपणाचें खरें मर्म कसें म्हणावें अशी त्यांस शंका पडली !

वरील विवेचनावरून हें उघड होतें कीं, आपलेपणा व परकेपणा यांतील मनास पटण्यासारखा किंवा सर्व परिस्थितींत लागू पडण्यासारखा भेदभाव कायदे-पंडितांनाहि शब्दांनीं व्यक्त करणें कठीण असतें. हा निर्णय मनच करूं शकतें. मोत्यांची परीक्षा करणारा हातांत मोत्यें घेतल्याबरोबर केवळ दृष्टीनेंच बरें किंवा वाईट असें म्हणून टाकतो; पण सूक्ष्म पाहूं गेलें तर या निकालाचें समर्थन करण्यासारख्या नियमबद्ध अशा खाणाखुणा कांहीं तरी सांपडतीलच. पण मनुष्याला आपलेपणा आणि परकेपणा ठरविण्याला इतक्याहि निश्चयात्मक खुणा सांगतां येतील कीं नाहीं, याची शंकाच आहे. अमेरिकेंत जाऊन राहणाऱ्या जपानी लोकांसंबंधानें ते कमी सुधारलेले आहेत किंवा ते वर्णानें काळे आहेत यांपैकीं कांहींच म्हणतां येत नाहीं. पण त्यांच्यावर असा आक्षेप घेण्यांत येतो कीं, त्यांचें मनच संकुचित असतें, त्यांच्या राष्ट्रीयत्वाची कल्पनाच जाज्वल्य आहे, ते येऊन राहिले तर आम्हांलाहि पचवून घेणार नाहींत आणि आपणहि पचले जाणार नाहींत. वेगळे राहतील ! जपानसारख्या प्रगतिप्रिय लोकांविषयीं जर ही ओरड तर हिंदुस्थानांतील लोकांचें सर्वच बाजूनें उणें ! त्यांच्याविषयीं ही ओरड झाल्यास नवल नाहीं. पण सांगण्याचें तात्पर्य, इतकेंच कीं, हिंदुस्थानांतील जातिभेदास नांवें ठेवणाऱ्यांना व साम्राज्यांतर्गत असलेल्या सर्व लोकांना केवळ साम्राज्याच्या अनुषंगानें साम्राज्याविषयीं सारखेंच प्रेम वाटावें व आपलेपणा उत्पन्न व्हावा अशी अपेक्षा करणाऱ्यांना, खुद्द साम्राज्याच्या पायाखालीं काय जळतें आहे हें दिसूं नये, हें आश्चर्य नव्हे काय ?

---

# ८१. हिंदु व मुसलमान

( तारीख १७ जानेवारी १९११ )

मुसलमान लोकांची हिंदुस्थानांतील वस्ती आज सुमारें आठ नऊ शतकांची आहे. या सर्वच काळांत हिंदु व मुसलमान या दोन जातींचा कायमचा दावा किंवा बेबनाव होता असें मुळींच नाहीं. निरनिराळ्या वेळीं निरनिराळी स्थिति होती. अगदीं प्रथम मुसलमान लोक हिंदुस्थानांत आले त्यांची आपणांस "लुटारू स्वारीवाले" अशी माहिती आहे; परंतु या स्वारीवाल्या लुटारूंच्याहि पूर्वी हिंदुस्थानांत फकीर वगैरे मुसलमान लोक धर्मप्रसारार्थ आले असावे असा पुरावा सांपडतो. या काळीं राजे हिंदु असतां, हिंदुधर्माच्या अंगभूत असलेला सात्विकपणा व परमतसहिष्णुता– किंवा राजकीयदृष्ट्या ठरणारें अदूरदर्शित्व–या राजांच्या अंगीं असल्यामुळें त्यांनीं या मुसलमान लोकांस देशांत येण्याची मनाई केली नाहीं. धर्मवेड्या लोकांना कोणत्याही देशांत थोडीबहुत शिष्यपरंपरा मिळतेच, या दृष्टीनें पहातां मुसलमानी फकीरांना हिंदु राजांच्या हिंदुस्थानांतहि त्या वेळीं थोडीबहुत शिष्यपरंपरा मिळाली होती. ११ व्या शतकानंतर तरवारीनें जरी कुराणास मदत केली, तरी ११ व्या शतकाच्या पूर्वी मुसलमानी तरवारीच्या आधीं मुसलमानी कुराणाचा फार थोड्याशा प्रमाणावर परंतु केवळ आपल्या बळावर इकडे प्रवेश झाला होता, ही गोष्ट निर्विवाद आहे. अकराव्या शतकापासून पुढें कांहीं दिवसपर्यंत मुसलमानांचे लुटारू स्वारीवाले हिंदुस्थानांत येऊन लूट मिळवून परत जात. पुढें बाराव्या शतकापासून हिंदुस्थानांतील मुसलमानांच्या वसाहतीस सरोस सुरुवात झाली. या वसाहतीच्या पहिल्या काळांत हिंदु व मुसलमान यांचें म्हणण्यासारखें धर्मवैर नव्हतें. निदान एवढें खास म्हणतां येईल कीं, याच काळाच्या सुमारास खुद्द हिंदु धर्मांतच सुधारणावादी पंथ निघाले असल्यामुळें, हिंदु व मुसलमानी दोन्ही धर्मांस समान असणाऱ्या अशा गोष्टी घेण्याकडे दोन्ही धर्मांची प्रवृत्ति असे. अकबर बादशहानें सर्व धर्मांचा निष्कर्ष काढून नवीन विश्वधर्म म्हणून हल्लींच्या ब्राह्मसमाजाप्रमाणें एक पंथ सोळाव्या शतकांत काढला असून त्या धर्मपंथास सरकारदरबारीं मान्यताहि येत चालली होती. परंतु

अशा तऱ्हेची कल्पना निघण्यास त्याच दृष्टीनें इतर प्रयत्न पूर्वींहि लोकांनीं केलेले असावे असें वाटतें; व ही गोष्ट कांहीं कांहीं उदाहरणांवरून सिद्धहि करतां येते. मुसलमान इतिहासकार फेरिस्त यानें तेराव्या शतकांतील मुसलमान साधू ख्वाजा मोहिद्दीन चिस्ती याजविषयीं असें लिहिलें आहे कीं, "या साधूच्या केवळ उदाहरणानें व उपदेशानें अजमीर येथील कित्येक हिंदु मुसलमान बनले व इतर कित्येकांनीं जरी महंमदी धर्मच स्वीकारला नाहीं तरी ते त्या साधूवर प्रेम करीत व त्याला देणग्या देत." उलटपक्षीं चवदाव्या शतकांतील एक उदाहरण एका बंगाली हिंदु साधूसंबंधाचें आहे. हा साधु मेल्यावर हिंदु व मुसलमान दोघेहि त्याच्या शरिराकरितां भांडूं लागले. दंतकथा अशी सांगतात कीं, भक्तांचें हें भांडण पाहून हा साधु तेथें प्रकट झाला व 'प्रेतावरील पांघरूण काढून आंत काय आहे तें पहा,' असें सांगून तो अदृश्य झाला. आंत पाहतात तों बरींचशीं सुंदर सुवासिक फुलें निघालीं; साधूच्या पंचभूतात्मक देहाचा तोच अवशिष्ट भाग असें समजून दोघांनीं तीं फुलें वांटून घेतलीं; हिंदूंनीं तीं चंदनाच्या चितेवर जाळलीं आणि मुसलमानांनीं तीं समारंभानें पुरून तिजवर कबरस्थान उभारिलें. अकबर बादशहाच्या वेळीं हिंदु व मुसलमान या दोघांसहि सारखींच पूज्य अशीं कित्येक क्षेत्रें बनलीं होतीं. एकाच डोंगरावर उमटलेल्या कांहीं खुणांना मुसलमान तीं महंमद पैगंबराचीं पावलें म्हणून मानीत, व विष्णुपद म्हणून हिंदु त्यांची पूजा करीत. या दोन उदाहरणांवरून एक गोष्ट सिद्ध होते कीं, प्रत्यक्ष आचारांत हिंदूला हिंदुत्व आणि मुसलमानास मुसलमानत्व सोडणें कठीण असलें तरी दोन्ही धर्मांचें रहस्य एकच आहे; व आचारवैचित्र्य हें अपरिहार्य असलें तरी बरेंचसें निरर्थक आहे, असें आपल्या सद्भावानें आणि चारित्र्यानें दाखवून देणारे आणि ज्यांच्यावर लोकांची श्रद्धा बसेल असे साधु किंवा साधुकल्प असे गृहस्थाश्रमी लोक केव्हांहि या मिश्र समाजांत आढळतात. अकबरानें योजिलेला 'विश्वधर्म' उदयास आला नाहीं ही गोष्ट खरी. तथापि त्याच्या वेळीं हिंदु व मुसलमान या मिश्र समाजांत असणारा एकीचा धागा त्याच्याचबरोबर लयास गेला नाहीं. अकबरानंतर गादीवर बसलेले बादशहा जहांगीर आणि शहाजहान यांचें लक्ष अकबराप्रमाणें धर्मविचाराकडे फारसें नव्हतें.

तथापि, इतर बाबतींत अकबरानें आपल्या अधिकाराचा सदुपयोग करून हिंदुमुसलमानांचें जें एकिकरण केलें होतें त्याची घडी तरी या दोघांनीं बिघडविली नाहीं. ही घडी औरंगजेबाच्या कारकीर्दींतच प्रथम बिनसली.

कित्येक लोकांच्या मतें औरंगजेब हा धर्मवेडा असला तरी क्रूर नव्हता. कांहीं थोड्या वर्षांपूर्वी प्रो. लेनपूल यांनीं हिंदुस्थानांतील मुसलमानी रियासतीचा इतिहास लिहिला; त्यांत त्यांनीं असें लिहिलेलें आहे कीं, "औरंगजेबासंबंधानें साधारणतः लोकांचें जें प्रतिकूल मत आहे तें राजपुत्र या अवस्थेंत त्यानें केलेल्या कृत्यांसच विशेष अनुलक्षून आहे. बादशहा या नात्यानें त्याचें वर्तन जरी युरोपियन प्युरीटन लोकांप्रमाणें धर्मवेडाचें असलें, तरी प्यूरीटन लोकांसारखा तो अत्याचारी नव्हता. कांहीं दिवसांमागें लखनौ येथें औरंगजेबाच्या फर्मानांचा एक संग्रह प्रदर्शनादाखल ठेवण्यांत आला होता. या फर्मानांपैकीं कित्येक सनदा असून त्यांच्या योगानें हिंदु देवस्थानें व हिंदु बैरागी, महंत यांच्या योगक्षेमाकरितां नवीन देणग्या दिलेल्या होत्या व जुन्या कायम केल्या होत्या." प्रो. लेनपूल यांच्या विधानांत थोडीशी अतिशयोक्ति आहे. औरंगजेब हा क्रूर नव्हता हें आज तारखेस कोणासहि कबूल होणार नाहीं. राजपुत्राच्या अवस्थेंत ज्याप्रमाणें त्यानें क्रूर कृत्यें केलीं, त्याचप्रमाणें बादशहा असतांनाहि केलीं. ऑलिव्हर क्रॉम्वेल हा जसा प्यूरिटन खिस्ती धर्मवेडा व राजकीयदृष्ट्या महत्त्वाकांक्षी मनुष्य होता, त्याच तोडीचा औरंगजेबहि होता. किंबहुना चार्लस राजाचा शिरच्छेद करविण्याच्या कामीं क्रॉम्वेल याच्या बाजूस न्यायाचा कांटा जितका झुकता होता, तितकाहि संभाजीचे डोळे काढून त्याचा शिरच्छेद करण्याच्या कृत्यांत तो औरंगजेबाकडे नव्हता. एकंदरीनें पाहतां औरंगजेबाच्या कारकीर्दींत राजकारणाला धर्मवेडाची जोड चांगलीच मिळाली होती; व या जोडीच्या आकर्षणामुळें हिंदु व मुसलमान यांच्यांतील जातिद्वेषास भरतें आलें होतें. औरंगजेबानंतर जे बादशहा झाले त्यांच्या कारकीर्दींत ही भरती अशीच टिकली नाहीं ही गोष्ट वेगळी; पण या बादशहांच्या अंगीं राजकारणांतील शहाणपण किंवा शौर्य तरी कोठें होतें ! तथापि, सांगण्याचा मुद्दा असा आहे कीं, खुद्द औरंगजेबासारख्या धर्मवेड्या व सक्त उद्योगी बादशहाच्या हातून हिंदुमुसलमान समाजाच्या

एकीकरणाला विघातक अशा कित्येक गोष्टी झाल्या, तरी त्याच्या हातून भंग न पावणाऱ्या अशा ज्या इतर कित्येक गोष्टी होत्या त्यांचा परिणाम या दोन समाजांवर जसा तेव्हां घडला तसा तो अद्यापीहि दिसत आहे.

तख्तनशीन एका व्यक्तीला समाजाचें बरेंच नुकसान करितां येतें. तथापि, कित्येक बाबतींत समाजाच्या कार्यांत उपद्व्यापी राजाचाहि हात शिरकूं शकत नाहीं. वास्तविक हिंदु व मुसलमान यांच्या अंगीं बरेचसे परस्पर विरोधी गुण पूर्वापार आहेत. हिंदूंना स्वदेश सोडून फारसे बाहेर पडण्यास आवडत नाहीं, किंबहुना विवक्षित मर्यादेच्या पलीकडे जाणें हें हिंदुधर्माचार्यांनीं पाप ठरवून त्यास प्रायश्चित्त सांगितलें आहे. उलट मुसलमानांस स्वाऱ्या, मुलुखगिऱ्या व वसाहती करणें हें फार प्रिय आहे. हिंदु लोक बहुशः हिंदुस्थानास चिकटून राहिलेले आढळतात, पण मुसलमान पहावे तों पूर्वेस चीनच्या सरहद्दीपासून पश्चिमेस स्पेनपर्यंत त्यांच्या मुलुखगिऱ्यांची व वसाहतींची मर्यादा एका काळीं पसरलेली होती. हिंदु लोक सालस, प्रेमळ व शांतताप्रिय असे आहेत; मुसलमान लोकांचे अंगीं यांच्या उलट गुण आहेत. अशी स्थिति असतांहि शेंकडों वर्षें एकत्र राहिल्यानें या दोन्ही लोकांनीं बऱ्याच गोष्टी एकमेकांपासून घेतल्या. आजमितीस चालीरीति, पोषाख, भाषा, व्यवहार इतक्या बाबतींत हिंदु व मुसलमान या दोघांना साधारण अशा गोष्टी कोणत्या आहेत याचा विचार करणारास आश्चर्यकारक प्रकार नजरेस पडतील. या विषयावर कोणी स्वतंत्र लेख लिहील तरीहि त्यास किती तरी सामुग्री मिळेल. जातिगुणासंबंधानें पाहतां हिंदु व मुसलमान यांच्यांतील भेदभाव कमी होण्यास प्रथम एक गोष्ट कारणीभूत झाली ती लक्षांत ठेविली पाहिजे. हिंदुस्थानांत वसाहत केल्यावर मुसलमान हे हिंदूंचे नुसते शेजारी होऊनच राहिले नाहींत. स्थायिक रहिवासी झाल्यावर अनेकांनीं हिंदु स्त्रिया आपल्या बायका केल्या; व आजमितीस हिंदुस्थानांत असे किती तरी मुसलमान सांपडतील कीं, ज्यांच्या अंगामध्यें हिंदु रक्त खेळत आहे. शेजारधर्मामुळें अनुकरणबुद्धीला नेहमीं नेहमीं वाव मिळतो. हिंदू व मुसलमान हे शतकेच्या शतकें एकत्र राहिल्यामुळें एकमेकांनीं एकमेकांच्या चालीरीती घ्याव्या यांत नवल नाहीं. 'मॉडर्न बेहार' नामक एका नूतन मासिक पुस्तकांत ना.

मझरअल–हक्क बॅरिस्टर यांनीं नुकताच एक लेख लिहिला आहे. त्यांत मुसलमान लोकांनीं हिंदूंपासून अनेक चालीरीती घेतल्या असल्याचें लिहिलेलें आहे. ते म्हणतात, " मुसलमानाच्या जन्मापासून मृत्यूपर्यंत होणाऱ्या अनेक व्यवहारांत व समारंभांत हिंदु अशा चालीरीती पावलोपावलीं दिसून येतात. उदाहरणार्थ, लहान मुलांस उद्देशून मुसलमान लोकांत जीं गाणीं म्हणतात त्यांत नंदलाल, सावळिया वगैरे कृष्णवाचक शब्द पदोपदीं आढळतात.

" अलबेलिने मुझे दर्द दिया
सावळियाने मुझे दर्द दिया "

गर्भधारणेपासून मूल जन्मेपर्यंत स्त्रियासंबंधानें करण्यांत येणारे समारंभ मुसलमानांनीं बहुतेक हिंदूंपासूनच घेतले आहेत. उष्टावण, नाककान टोंचणें वगैरे गोष्टी मूळ हिंदूंच्या. मुसलमानांच्या बहुतेक समारंभांत दुर्वा, हळद, तांदुळ, गुळ, नारळ, दहीं, तांबें, तेल वगैरे पदार्थ फार येतात; व बॅरिस्टर मजकूर यांच्या मतें ही चाल त्यांनीं हिंदूंपासूनच घेतली. लग्नसमारंभांत निका पढणें एवढाच काय तो मूळ मुसलमानी समारंभ. पण वधूवर पसंतीपासून लग्न उरकून जाईपर्यंत जे अनेक समारंभ चालू असतात त्यांतील कित्येक तर अस्सल हिंदी असून इतर कित्येकांत फक्त मुसलमानी पेहेराव दिलेला आहे. लग्नांत "शहानक" म्हणून दहिभात खाण्याचा एक विधि असतो. हा समारंभ जहांगीर बादशहाची रजपूत स्त्री जोधबाई हिनें प्रथम सुरू केला असें म्हणतात. त्याची हकीकत अशी आहे कीं, जोधबाई इनें नूरजहान आदिकरून कित्येक मुसलमान स्त्रियांस जेवावयास बोलाविलें आणि त्यांजपुढें दहिभाताचें वाडगें ठेवून असें सांगितलें कीं, ज्या स्त्रिया खऱ्या पतिव्रता असतील त्यांनींच तो भात खावा! नूरजहान हिचा मूळचा नवरा जहांगीर नव्हता, व यामुळें तिला फजीत पावून तेथून जावें लागलें. तेव्हांपासून मुसलमानी लग्नसमारंभांत अजूनहि बायकांचें दहिभाताचें जेवण करितात; व विशेष हा कीं अजूनहि या जेवणास पुनर्विवाहित किंवा अपवित्र आचरणाच्या स्त्रियांना बोलावीत नाहींत. स्त्रियांच्या भांगांतील शेंदराची टिकली आणि कपाळावरील कुंकुमतिलक हीं हिंदु व मुसलमान दोघांस साधारण आहेत. मुसलमानी लग्नसमारंभांत जीं गाणीं गातात तीं उर्दू भाषेंत नसून

हिंदी भाषेंत असतात, ही गोष्ट विशेष ध्यानांत ठेवण्यासारखी आहे. तिजा, चेहलम, बरसी हे मुसलमानी मृतविधी मूळ हिंदु आहेत. पतीच्या मृत्यूनंतर स्त्रीनें नुसत्या भूमीवर शयन करणें हा विधि मूळचा हिंदी असून मुसलमानांत तो अद्यापि चालूं आहे. पुनर्विवाह करण्यास मुसलमानी धर्माची नुसती परवानगीच आहे असें नव्हे, पण आज्ञाही आहे. बॅरिस्टर मजकुरांच्या म्हणण्याप्रमाणें पुनर्विवाह निषिद्ध मानणें ही भावना मुसलमानांनीं हिंदूंपासून घेऊन अद्यापि कायम ठेविली आहे. होळी, दिवाळी, दसरा, वसंतपंचमी हे हिंदूंचे सण बहुतेक मुसलमानांनीं उचलले होते; परंतु अलीकडे हिंदु मुसलमानांत बेबनाव झाल्यामुळें हिंदूंनीं जसें मोहरमांतून आपलें अंग काढून घेतलें तसें मुसलमानांनींहि या सणांतून आपलें अंग काढून घेतलें इतकेंच. पोशाखाचे बाबतींत मोठीं शहरें सोडून आंत गेलें म्हणजे चादर व धोतर हीं हिंदूंचीं वस्त्रें मुसलमानांनीं आपलींशीं केलेलीं आढळतात. भाषेंत हिंदूंनीं जसे पर्शियन शब्द घेतले आहेत तसेच मुसलमानांनींहि हिंदूंपासून घेतले आहेत. बॅरिस्टर मजकुरांच्या मतें ऊर्दू भाषा ही आज जी इतकी गोड लागते याबद्दल ती मुसलमानांइतकी हिंदूंचीही ऋणी आहे. धर्मासंबंधानें पाहातां हिंदूंमध्यें जसे पिरांना भजणारे आढळतात, तसेच हिंदु देवतांना भजणारे मुसलमानहि आढळतात. हिंदु लोक जसे अनित्य मनुष्यव्यक्तीकडे न पाहतां नित्य अशा गुणांकडे पाहातात त्याचप्रमाणें मुसलमानांनीं केले तर, बॅरिस्टर मजकूर म्हणतात, "मुसलमानी धर्मांत जो दुरभिमान दिसून येतो तो नाहींसा होईल." व्यवहारांत तर नांवाउपनांवांमध्यें हिंदी मुसलमानांत इतकी सरमिसळ झालेली आहे कीं, मुजुमदार, फत्तेबहादुर, जंगबहादुर, गंगादीन, मातादीन वगैरे नांवें लक्षांत घेतलीं असतां हिंदुमुसलमानांना शेजारपणा किती आंगवळणी पडून गेलेला आहे हें कोणासहि उघड दिसेल.

राजकीय बाबतींत पाहिलें तर हिंदूंची स्थिति ब्रिटिश अमदानीपेक्षांहि मुसलमानी अमदानींत थोडीशी अधिक बरी होती. हिंदु प्रजाजनासंबंधानें प्रथम मोंगल बादशहा शेरशहा यानें ज्या धोरणास सुरुवात केली व जें अकबरशहानें पूर्णतेला नेलें तें आजच्या ब्रिटिश मुत्सद्दीगिरीहून अधिक उदारपणाचें नव्हतें असें कोण म्हणेल? इंग्रज सरकार हिंदूहि नाहीं व

मुसलमानहि नाहीं; आणि इंग्रजांच्या जातींतूनच धर्मविषयक वेड आणि माथेफिरूपणा हल्लीं निघून गेला आहे; यामुळें धर्माच्या बाबतींत हिंदुस्थानांत तटस्थ राहणें हें इंग्रज राज्यकर्त्यांस पुष्कळ सोपें आहे. परंतु मुसलमानांच्या हाडामासांत धर्मवेड खिळलेलें असतें, व त्यांतूनहि सोळाव्या शतकांत तें चांगलेंच प्रदीप्त होतें. असें असतां अकबर व त्याच्याहि पूर्वी शेरशहा यांनीं धर्मसंबंधीं जी निःपक्षपातबुद्धि दाखविली ती निःसंशय वाखाणण्याजोगी होती. पण केवळ धार्मिक बाबतींत अशी बुद्धि दाखविली एवढीच काय ती त्यांची मुत्सद्दीगिरी होती असें नाहीं; तर खुद्द राजकीय बाबतींतहि तिचा प्रवेश झाला होता. अकबराला कदाचित् धर्मबुद्धीच कमी, म्हणून त्यांनीं हिंदूंस व मुसलमानांस समतेनें वागविलें असें कोणी म्हणेल. परंतु राजकीय बाबतींतहि त्यानें आपल्या प्रजेला व्यक्तिस्वातंत्र्य, व समान हक्क हे देऊन प्रजा या नात्यानें परस्परांवर बंधुप्रेम करण्यास शिकविलें होतें. त्याची समबुद्धि जाहीरनाम्याच्या शब्दांत होतीच होती; पण कृतींतहि उतरली होती. तो हिंदूंना मोठमोठ्या अधिकारांच्या हुद्यांवर नेमून त्यांजवर विश्वास टाकीत असे. त्यानें जिंकलेल्या अनेक प्रांतांवर हिंदूंना ‘ गव्हर्नर ’ देखील नेमण्यांत येई. राजा तोडरमल हा हिंदु त्याचा मुख्य मंत्री असून त्याजकडे सर्व फडणिशी दप्तराचा अधिकार असे. राजा मानसिंग याजकडे सेनापतीपद असून बंगाल व काबूल येथें या रजपुतानें मुसलमानी रियासतींत गव्हर्नरी केली. बॅरिस्टर मझरलहक्क म्हणतातः—“ अज्ञानी लोक ब्रिटिश सरकारच्या औदार्याबद्दल तारीफ करतात, तें ठीकच आहे; पण जोपर्यंत ना. गोखल्यांसारख्या गृहस्थास सर गाय बुइलसन यांच्या जागीं फडणीस नेमण्यांत येत नाहीं, व सर एडवर्ड बेकर यांच्या जागीं नामदार अल्ली इमाम यांसारख्या गृहस्थास गव्हर्नर नेमण्यांत येत नाहीं, तोपर्यंत ब्रिटिश मुत्सद्दीगिरीची ही वाखाणणी व्यर्थ होय. हिंदुस्थान सरकारचें सेनापतिपद एखाद्या हिंदी सरदारास देण्यांत येईल असें अद्यापि आपल्या स्वप्नींहि येत नाहीं. तात्पर्य, या बाबतींत इंग्रज मुत्सद्दीगिरी मुसलमानी मुत्सद्दीगिरीच्या मागें कमींत कमी पांचशें वर्षें आहे. पांचशें वर्षानंतर कदाचित् तिच्यानें बरोबरी करवली तर कोणास ठाऊक ” पहावयास गेलेंच तर हिंदु व मुस-

लमान यांजमध्यें बंधुत्व इतकें मुरून गेलें होतें, असें असतां हल्लींचा हा वाद कशानें उपस्थित झालेला आहे याचा विचार करूं.

मागील लेखांत सांगितल्याप्रमाणें हिंदु व मुसलमान या दोन जाती शेंकडों वर्षें हिंदुस्थानांत एकत्र नांदत असल्यामुळें, त्यांच्या मनांत परस्परांविषयीं बंधुप्रेम बरेंचसें उत्पन्न होण्यास सबळ कारण असून, कांहीं थोड्या दिवसांपूर्वीं पावेतों परस्परांना हें प्रेम वाटतहि होतें. परंतु आपण हिंदूंचे बंधु नसून त्यांचे 'वरिष्ठ' आहों अशा प्रकारची त्यांची खोटी समजूत अलीकडे झालेली असल्यानें, या नव्या राजकीय मन्वंतरांत हिंदूंशीं फुटून वागण्याची त्यांस इच्छा होऊं लागली आहे. ही समजूत मूळ केवळ स्वतः प्रेरणेनें किंवा दुसऱ्या कोणाच्या प्रेरणेनें झालेली आहे याचा विचार आम्हांस आज कर्तव्य नाहीं. समजूत कशीहि उत्पन्न होवो, ती झालेली आहे एवढी गोष्ट निर्विवाद होय. परंतु ही समजूत खोटी आहे असें जर आमच्या मुसलमानबंधूंच्या कोणीं लक्षांत आणून दिलें तर वस्तुस्थितीचा प्रकाश कदाचित् त्यांच्या मनावर पडेल, आणि हिंदूंहून अधिक हक्क मागून घेण्याची व या मागणीवर रण माजविण्याची जी दुर्बुद्धि त्यांस आज झाली आहे ती पालटेल असें वाटल्यावरून, वरील समजूत ऐतिहासिकदृष्ट्या कितपत खरी अगर खोटी आहे याचा थोडाबहुत विचार आजच्या अंकीं करण्याचें योजिलें आहे.

हिंदुस्थानांत मुसलमान आल्यापासून त्यांचा जो इतिहास येथें घडून आला त्यावरून पहातां त्यांनीं, केवळ नाकानें वांगीं सोलून, हिंदूंस जिंकल्याबद्दल हिणवावें अशांतला खरोखर प्रकार नाहीं. हा इतिहास स्थूलमानानें सन दहाशें पासून १७५७ पर्यंत म्हणजे सुमारें ७५० वर्षांचा आहे. परंतु या ७५० वर्षांत सर्व हिंदुस्थानभर मुसलमानांचें एकछत्री राज्य असें केव्हांहि नव्हतें. एवढेंच नव्हे, तर निरनिराळ्या मुसलमान बादशहांचा का होईना परंतु मुसलमानी असा अम्मल सर्व हिंदुस्थानभर एकसमयावच्छेदेंकरून केव्हांहि नव्हता. या ७५० वर्षांच्या कालावधींत प्रथम बरेच दिवसपर्यंत मुसलमानांचा हिंदुस्थानाशीं केवळ 'लुटारू स्वारीवाले' असाच संबंध आला होता. मुसलमानांची सर्वांत पहिली स्वारी सन ६६४ त मुलतानपावेतों झाली; पण स्वारीवाले लगेच परत फिरले. यानंतर

सिंधप्रांतावरची मुसलमानांची स्वारी सन ७११ च्या सुमारास झाली. त्यावेळीं हे स्वारीवाले एकदम परत फिरले नाहींत; परंतु पुढें अवघ्या चाळीस वर्षांतच मुसलमान गव्हर्नरास रजपुतांनीं हांकून दिलें. नंतर गझनी येथील तुर्की राजांच्या स्वाऱ्या सुरू झाल्या. परंतु सबक्तगीन याच्या कारकीर्दींत म्हणजे सन १००० च्या सुमारास सिंधु नदी हीच कायती मुसलमानांच्या अमलाची पूर्वदेशीय सरहद्द होती. या तुर्की घराण्यांतील शेवटला सुलतान महंमूद याची शेवटची म्हणजे बारावी स्वारी सन १०२४ मध्यें झाली, ती सौराष्ट्रांत सोमनाथापर्यंत झाली हें प्रसिद्ध आहे. परंतु गझनीपासून हजार मैल दूर असलेल्या सोमनाथापर्यंत महंमुदाचा कायमचा अंमल बसणें अर्थातच शक्य नव्हतें. महंमूद सोमनाथाच्या वेढ्यानंतर बारा महिन्यांच्या आंतच गझनीस परत गेला; व तेव्हांहि रजपुतांचें तोंड चुकवीत व ते भेटतील तेथें त्यांजकडून रट्टे खात व झगडतच त्यास परत जावें लागलें.

महमुदाच्या पश्चात् झालेल्या गझनीच्या सुलतानांनीं हिंदुस्थानांत अधिक प्रदेश केव्हांहि जिंकला नाहीं, एवढेंच नव्हे पण महंमुदाच्या वेळीं जिंकलेला बराचसा प्रदेश यांच्या हातून गेला; व गझनीचे कित्येक राजे हातचें राज्य गेल्यामुळें लाहोरास येऊन सुखवस्तु म्हणून रहात. पुढें ११९३ सालीं शहाबुद्दीन ऊर्फ महंमद घोरी यानें हिंदुस्थानांत मुसलमानी सत्ता स्थापण्याचा प्रयत्न फिरून सुरू केला. जिंकलेला प्रदेश ताब्यांत ठेवून त्यावर आपला कामगार नेमण्याची अशी पहिली व्यवस्था या सुलतानानें केली. पण लवकरच ( सन १२०६ त ) घोरी वंशाची समाप्ति हिंदुस्थानांत झाली. ११९३ सालीं घोरी वंशाची स्थापना दिल्लीस झाल्यापासून अल्लाउद्दीन खिलजीच्या वेळेपर्यंत मुसलमानी राज्याचा विस्तार अगदीं हळूहळू होत होता. "एखाद्या लाटेप्रमाणें क्षणांत राज्यचक्र सर्व मुलूखभर पसरल्यासारखें दिसे. पण पुढें क्षणांतच त्याचा इतका संकोच होई कीं, मागमूसहि सांपडणें कठीण." सन १२४५ च्या सुमारास राज्यक्रांति होऊं लागून व तुर्कांचा अंमल कमी होत जाऊन मोंगलांचा हिंदुस्थानांत शिरकाव झाला. मोंगल हे मूळचे मुसलमान नव्हत. ते प्रथमतः मूर्तिपूजक असून त्यांच्या अंगीं खऱ्या महंमदी धर्माचा

कडवेपणाहि नव्हता. मोंगल धर्मांत ब्राह्म, बौद्ध, खिस्ती वगैरे धर्मांचें मिश्रण झालें होतें. तेराव्या शतकांतील मोंगली धर्मांचें हिंदुधर्माशीं निकट साम्य होतें. त्यांचा जुना धर्म वैदिक धर्माशीं कांहींसा मिळता होता. तेराव्या शतकांत दक्षिणेकडे दूरवर अशी पहिली स्वारी अल्लाउद्दीन खिलजी यानें केली; परंतु त्याच्या मरणानंतर मुसलमानी राज्यांत बेबंदशाही झाली, व दक्षिणेंत मोठेंच बंड झालें. हिंदु राजांनीं आपलें स्वातंत्र्य परत मिळविलें आणि कर्नाटक व वारंगळ येथील राजांनीं मुसलमानांस इतकें मागें हटवीत नेलें कीं, दौलताबादेशिवाय एकही स्थळ दक्षिणेंत मुसलमानांच्या हातीं राहिलें नाहीं.

उत्तर हिंदुस्थानांत मुसलमानांचा खरा व कायमचा अंमल बाबराच्या वेळेपासून बसला. सन १५२६ सालीं तो पंजाबांत उतरला. त्या वेळीं उत्तर हिंदुस्थानांत अनेक लहानसहान मुसलमानी व हिंदु राजे यांचा सरमिसळ अंमल चालू होता. १५२६ सालीं पानिपत येथें मुसलमानांचा व १५२७ सालीं फत्तेपूर, शिकरी येथें रजपुतांचा पराभव करून बाबर यानें मोंगल बादशाहीची सत्ता स्थापित केली. परंतु पुढें बाबराचा मुलगा हुमायून याचेच पाय गादीवर टिकले नाहींत; व त्याचा नातू सुप्रसिद्ध अकबरशहा हा राज्यसूत्रें आपल्या हातीं घेईपर्यंत, म्हणजे १५६० पर्यंत, हिंदुस्थानांत मुसलमानी राज्यविस्तार करण्यास दिल्लीच्या बादशहास फावलें नाहीं. अकबरानें प्रथम रजपुताना, नंतर बंगाल व गुजराथ वगैरे प्रांत जिंकले. परंतु दक्षिण हिंदुस्थानांत तो स्वतः सैन्य घेऊन आला असतां, खानदेशाच्या अलीकडे त्याची सत्ता केव्हांहि स्थापित झाली नाहीं. अकबरनंतर जहांगीर व शहाजहान यांच्या कारकीर्दींत नवीन प्रदेश जिंकले गेले नाहींत. जहांगिराच्या कारकीर्दींत सन १६१५ सालीं ईस्ट इंडिया कंपनीचा प्रतिनिधी सर टॉमस रो याची शिष्टाई होऊन एका नवीन म्हणजे, ब्रिटिश सत्तेचा अरुणोदय झाला; आणि पुढें बारा वर्षांच्या आंतच म्हणजे, सन १६२७ सालीं, शिवाजीचा जन्म होऊन दक्षिणेंत अवशिष्ट असलेल्या मुसलमानी सत्तेस ग्रहण लागलें. दक्षिण हिंदुस्तानांत मोगल बादशाहीचा अम्मल जारी करण्याचा खरा प्रयत्न असा सुप्रसिद्ध औरंगजेब यानें केला; व सन १६८३ पासून १७०७ पर्यंत म्हणजे सुमारें २५ वर्षांच्या काला-

वर्षांत त्यानें दक्षिणेंतील सर्व मुसलमानी राज्यें धुळीस मिळविलीं. सन १६८९त संभाजी महाराज मरण पावल्यापासून राजाराम महाराज जिंजीहून परत येईपर्यंतच्या थोडक्याशा काळांत काय ती मुसलमानी सत्ता महाराष्ट्रांत स्थापित होण्याची थोडीशी भीति वाटत होती. पण याच काळांत मराठे सरदारांनीं स्वराज्याविषयीं अत्युत्कट भक्ति आणि शौर्य गाजवून औरंगजेब बादशाहास रडकुंडीस आणिलें. अखेर १७०७ सालीं शाहू महाराज सातान्यास गादी-वर बसून मराठ्यांचें राज्य कायम झालें, व इकडे औरंगजेब मरण पावल्यानें मुसलमानी राजसत्तेच्या नाशास सुरुवात झाली. औरंगजेबानंतर पुढें १८५७ सालपर्यंत दिल्लीस अनेक बादशहा झाले, परंतु ते सर्व केवळ नामधारी बादशाहा होते. हे सर्व केवळ बाहुल्यासारखे असून त्यांचीं सूत्रें कोणाच्याना कोणाच्या तरी परक्याच्या स्वाधीन असत. या दीडशें वर्षांतील सुमारें ५० वर्षें एकटा राज्य करणारा बादशहा शहाआलम यानें इंग्रज, अयोध्येचे वजीर, मराठे इत्यादि निरनिराळ्या लोकांच्या आश्रयांत काळ काढिला. दिल्लीच्या तख्ताची तर या काळांत पुष्कळच हलाखी झाली. इराणचा बादशहा नादिरशहा यानें सन १७३९ सालीं दिल्लींतील मयूरा-सन उचलून नेलें. सन १७६० सालीं सदाशिवरावभाऊ पेशवे यांनीं सैन्यास पैसा पुरविण्याकरितां दिल्लीचें रुप्याचें तख्त फोडिलें; व अखेर १८०३ सालीं इंग्रजांनीं दिल्ली घेऊन मुसलमानी राज्य खालसा केलें. शहाअलमनंतरचे नामधारी मुसलमान बादशहा इंग्रज सरकारकडून मिळ-णारी नेमणूक खाऊन दिल्लीस राहात असत. परंतु १८५७ सालीं बहा-दुरशहा हा बंडांत सामील झाल्याच्या आरोपावरून त्यास ब्रह्मदेशांत हद्दपार करण्यांत आलें; व हल्लीं तिकडे त्याचे वंशज अन्नास मोताद होऊन भटकत आहेत असें म्हणतात.

वरील हकीगतीवरून प्रथमत: हें लक्षांत येईल कीं, महंमद घोरी-पासून दिल्लीस मुसलमानी राज्य झालें तें सन १८०३ पर्यंत तेथें कायम होतें ही गोष्ट जरी खरी असली, तरी तेथपासून १६ व्या शतकापर्यंत मुसलमानी राजसत्ता केवळ दिल्लीच्या आसपासच स्थायिक होती. सर्व हिंदुस्थान देश व मुसलमानी सत्ता यांचा संबंध असा फार तर १०० वर्षें,

म्हणजे १६ व्या व १७ व्या शतकाच्या संधीस काय तो होता; पण अखेर ज्या वळणानें पाणी आलें त्याच वळणानें तें जाऊन, मुसलमानी बादशहांनीं ज्यांचें स्वातंत्र्य कांहीं थोडे दिवस हिरावून घेतलें होतें त्यांनींच तें या कालावधीच्या शेवटीं परत मिळविलें. मुसलमानी सत्ता सुरू होण्याच्या आधीं हिंदुस्थानांत हिंदूच राज्य करीत होते; दिल्लीस मुसलमानी अम्मल असतांहि खालीं अनेक स्वतंत्र हिंदू राज्यें होतीं; व मुसलमानी राज्य बुडाल्या-नंतरहि अनेक हिंदु राज्यें अस्तित्वांत राहिलीं होतीं. मुसलमानी अम-लाचें हिंदु अमलास खग्रास ग्रहण असें केव्हांहि नव्हतें. त्याचा स्पर्श व मोक्ष काल यांच्यामधील अवधी थोडा होता, व ग्रहण लागण्यापूर्वीचा हिंदी स्वराज्याचा चंद्र जसा जगानें निकोप बघितला तसाच हें ग्रहण सुटल्या-नंतरचा चंद्रहि जगास बघण्यास सांपडला. ज्यांना ऐतिहासिक दृष्टि नाहीं, ऐतिहासिक चित्रपटावरील देखावा 'यथादर्शन' शास्त्राबरहुकूम पाहण्याचें ज्ञान ज्यांस नाहीं, त्यांनाच मुसलमानी सत्ता व इंग्रजी सत्ता या हिंदुस्थाना-वर एकमेकांस भिडलेल्या अशा दिसतात, परंतु हें त्यांचें अज्ञान होय. सर आलफ्रेड लायल-हिंदुस्थानांतील एक माजी लेफ्टेनंट गव्हर्नर-यांनीं "एशि-आटिक स्टडीज्" या नांवाच्या आपल्या पुस्तकांत यासंबंधानें खालीं दिल्या-प्रमाणें उद्गार काढले आहेत. ते म्हणतात:-" हिंदुस्थानांत मुसलमानी सत्तेच्या मागोमाग आमची (इंग्रजी) सत्ता स्थापित झाल्यामुळें, आणि ढांसळ-लेल्या मुसलमानी राज्याच्या पायावरच आम्ही आपलें राज्य स्थापन केलें अस-ल्यामुळें पुष्कळ लोकांना असा भ्रम पडतो कीं, मुसलमानी सत्तेचा जो विध्वंस झाला तो आम्ही इंग्रजांनींच केला. पण ज्यांनीं इतिहास वाचला आहे त्यांना हें पक्कें माहीत आहे कीं, १८ वें शतक मध्यावस्थेस येण्यापूर्वींच मुसलमानी सत्तेचे तिळतिळ तुकडे होण्याच्या बेतांत होते. या राज्यांतील काळजापर्यंतचें सर्व रक्त कुजून जाऊन प्रत्येक शरीरावयवां-तील चिच्छक्ति नाहींशी झाली होती; व आम्ही इंग्रज जर वेळींच पुढें आलों नसतों तर 'गृध्ररूपी मराठ्यांनीं' मुसलमानी सत्तेचें हें मृत शरीर लचके तोडतोडून पार सर्व नाहींसें केलें असतें. आम्ही पुढें सरून मरा-ठ्यांस मागें हटविलें, त्या वेळीं आग्रा व दिल्ली या मुसलमानी राजधानींचीं शहरें अनाथ झालीं असून वाटेल तो त्यांत घुसत होता. दिल्लीचे जे बाद-

शहा म्हणवीत त्यांची गांठ कैदखाना, जुलूम व अपमान यांशीं नित्य पडे. या वेळीं सर्व पंजाब शीखांच्या हातीं गेलेला होता व जी कांहीं मुसलमानी सत्ता म्हणून पूर्वी होती ती येऊन जाऊन पंजाबांतच ! ज्या लढवय्ये हिंदु लोकांनीं मुसलमानांस पूर्णपणें पादाक्रांत केलें, आणि अफगाण लोकांस सिंधुनदापलीकडील त्यांच्या डोंगराळ मुलखांत परत जाऊन आश्रय धरून राहाणें भाग पाडलें, त्यांची कंबर मोडण्यास आम्हां स्वतःस (इंग्रजांस) किती प्रयास पडले हे महशूर आहेच. दक्षिणेंत निजामाचें राज्य होतें तें १८ व्या शतकाच्या अखेरीस आम्हीं इंग्रज पुढें आलों नसतों तर साफ बुडून गेलें असतें; व हेंच काय तें सर्व हिंदुस्थानांतील सर्वांत मोठें मुसलमानी राज्य ! " हिंदु लोकांनीं मुसलमानांपासून आपलें राजकीय स्वातंत्र्य १८ व्या शतकाच्या अखेरीस परत मिळवून वरती आपलें राजकीय वर्चस्व मुसलमानांवर प्रस्थापित केलें. याला सर आलफ्रेड लायल यांच्या ग्रंथांतील वर दिलेल्या उताऱ्याहून अधिक स्पष्ट असें दुसरें कोणतें प्रमाण पाहिजे ?

ही गोष्ट एकदर हिंदुसमाजासंबंधानें आम्हीं सांगितली. परंतु हिंदु जातींतील निरनिराळे वर्ग घेऊन विचार केला असतांहि हीच गोष्ट सिद्ध होते. हे वर्ग म्हटले म्हणजे बंगाली, शीख, रजपूत व मराठे हे होत. पैकीं बंगाल्यांतील हिंदु लोक मुसलमानांच्या अमलाखालीं सर्वांत अधिक वर्षें होते. या अमलास प्रारंभ बख्त्यार खिलजीनें बंगाल व बहार प्रांत काबीज केले तेव्हांपासून झाला; व तो सन १७५७ सालीं प्लासीची लढाई होऊन सुराज उद्दवल्याचा पराभव होईपर्यंत म्हणजे सुमारें पांच साडे-पांचशें वर्षें टिकला. तथापि, प्रतापादित्यासारखे स्वातंत्र्यप्रिय हिंदु बंगाल्यांत होऊन त्यांनीं कांहीं काळपावेतों स्वातंत्र्य भोगिलेंहि. शीख हे मूळचे हिंदुच; परंतु १५ व्या शतकाच्या अखेरीस गुरुनानक याच्या उपदेशामुळें त्यांचा एक स्वतंत्र पंथ उत्पन्न झाला. शीखांइतकें दुसऱ्या कोणासहि मुसलमानांनीं छळिलें नाहीं. पण शीखांइतकें दुसऱ्या कोणत्याहि हिंदु वर्गानें स्वत्वनिष्ठा व छळ सोसण्याचें सामर्थ्य दाखविलें नाहीं. मुसलमानांची प्रत्यक्ष वसती व प्रत्यक्ष अम्मल यांच्या कचाट्यांत सांपडल्यामुळें शीखांना आपलें स्वातंत्र्य परत मिळविण्यास बरींच वर्षें संधि मिळाली नाहीं. परंतु औरंगजेब मरतांच आपली खरी शक्ति ओळ-

खून गमावलेलें स्वातंत्र्य मिळविण्याचा त्यांनीं उपक्रम केला; व दक्षिणेंतील मराठ्यांच्या बरोबरीनें उत्तरेस शीखांनीं मुसलमानी अमलाची इमारत ढांसळून पाडण्याचें काम केलें. 'लाहोरचा सिंह' रणजितसिंग उदयास येण्यापूर्वीच शीखांनीं पंजाबांत स्वतंत्र राज्यें स्थापिलीं होतीं; व खुद्द रणजितसिंगानें तर उत्तरेस काश्मीर व पश्चिमेस पेशावर येथपर्यंत आपला अंमल मुसलमानांवर बसविला होता. रजपुतांचीहि या कामीं बहादर्रा विशेष आहे. शीखाप्रमाणेंच रजपूतहि मुसलमानी सत्तेच्या केंद्राजवळ असल्यामुळें त्यांस पुष्कळच त्रास सोसावा लागला. रजपुतान्यांत उदेपूर, जयपूर व जोधपूर हींच काय तीं प्रमुख रजपूत संस्थानें. पण या तीनहि संस्थानांत हिंदु स्वराज्य अजीबात नष्ट झालें, अगर या तीन दरबारच्या तख्तांवर मुसलमान राजा येऊन बसला, अशी गोष्ट कधींहि झाली नाहीं. सन १३०० पासून १८०० पर्यंत, म्हणजे दिल्लीस मुसलमानी सत्ता गाजत असलेल्या ऐनकाळांत, उदेपुरांत हिंदी राजांची परंपरा अबाधित चालली होती. रा. सरदेसाई यांनीं आपल्या पुस्तकांत लिहिल्याप्रमाणें "अल्लाउद्दीन, बाबर, अकबर, औरंगजेब वगैरे सर्व पराक्रमी पुरुषांनीं उदेपूरच्या राजपुरुषांपुढें अगदीं हात टेंकले. उदेपूरच्या सर्व राज्याचा नाश केला असें वाटून या पराक्रमी पुरुषांनीं आपली पाठ फिरविली नाहीं, तोंच उदेपूरचें राज्य पूर्ववत् चालू आहे असें त्यांस दिसे. मुसलमानांस हार जावयाचें नाहीं या निर्धाराबद्दल त्यांस अनेक वेळां जोहार करावे लागले, राजधानींचीं शहरें बदलावीं लागलीं व अनेक अकल्पित संकटें सहन करावीं लागलीं. परंतु ते मुसलमानांस हार गेले नाहींत." अकबरानें तर आपली शर्थ करून पाहिली; पण उदेपूरचे राणे त्यास वश झाले नाहींत. जयपूर व जोधपूर येथील रजपुतांनींहि असाच हट्ट दाखविला. मुसलमानी लाट देशभर न पसरण्यास मूळ खरी मदत रजपुतांचीच झाली.

मराठ्यांच्या विषयीं तर विशेष सांगण्याचें कारणच नाहीं. एक तर महाराष्ट्र मुसलमानी अमलाखालीं पूर्णपणें असें केव्हांच गेलें नाहीं. दौलताबादचें मराठी राज्य १३ व्या शतकांत बुडालें खरें, परंतु त्याच सुमारास विजयनगरचें राज्य स्थापित होऊन त्याचें स्वातंत्र्य सुमारें ३००

वर्षें टिकलें. इकडे ब्राह्मणी राज्यापासून फुटून निघालेल्या पांच राज्यांचा अंमल जरी महाराष्ट्रांत प्रस्थापित झाला होता, तरी शिवाजीच्या आधीं सुमारें शंभर वर्षांपासूनच मराठ्यांच्या स्वातंत्र्याचा अरुणोदयहि झाला होता. ब्राह्मणी-मुसलमान राज्य सन १५५६ सालीं मोडून त्याची आदिलशाही, कुतुबशाही, इमादशाही, निजामशाही आणि बरीदशाही अशीं पांच राज्यें झालीं. पैकीं बरीदशाही ही नांवाला १६४ वर्षें टिकलीं, परंतु हें राज्य अगदींच किरकोळ होतें. वऱ्हाडची इमादशाही फक्त ८८ वर्षें टिकली; परंतु या राज्याचा संस्थापक मुसलमानी धर्म पतकरलेला मूळचा तैलंगी ब्राह्मणच होता. अहंमदनगरची निजामशाही सुमारें दीडशें वर्षें (१४८९-१६३७) टिकली. परंतु हें मुसलमानी राज्य बहुतांशीं मराठे सरदारांच्याच जोरावर व सलोख्यावर टिकलें होतें; व अखेर अखेर तर शहाजी भोसले यानें या राज्यांतील नामधारी बाल शहा बाहुल्याप्रमाणें आपल्या मांडीवर घेऊन स्वतःच निजामशाहीच्या तख्तावर बसून सर्व राज्यसूत्रें खेळविलीं. विजापूरची आदिलशाही सुमारें दोनशें वर्षें टिकली, व विजयनगरचें राज्य बुडविण्यास ती कारणीभूतहि झाली. परंतु अखेर मोंगलांशीं लढण्यास विजापूरच्या बादशहास मराठे सरदारांची मदत घ्यावी लागली. शिवाय आदिलशाहीचा अंमल महाराष्ट्रांत असतां त्याशीं झगडून व यशस्वी होऊनच शिवाजी महाराजांनीं मराठी राज्य स्थापन केलें. गोवळकोंड्याची कुतुबशाही सुमारें १७५ वर्षें टिकली; परंतु तीहि मुसलमान राजे केवळ हिंदूस त्रास न देतां प्रजाहिततत्परतेनें वागल्यामुळें. दक्षिणेंत हीं जीं पांच मुसलमानी राज्यें झालीं होतीं तीं सर्व दिल्लीच्या मोंगल बादशहानें अखेर नामशेष केलीं; परंतु त्याच मोंगल बादशहाचें महाराष्ट्रापुढें मात्र कांहीं चाललें नाहीं, ही गोष्ट विशेष लक्षांत ठेवण्यासारखी आहे. कर्नाटकांत लहानसें मुसलमानी राज्य हैदरानें स्थापलें; परंतु मराठ्यांनीं तें प्रथम स्वतःच्या जोरावर व नंतर इंग्रजांच्या मदतीनें धुळीस मिळविलें. इंग्रजांचा अंमल सुरू होण्यापूर्वी हैद्राबादची निजामशाही व मराठे यांचा संबंध कसा होता याविषयीं विशेष सांगावयास नकोच. कारण सवाई माधवरावाच्या कारकीर्दींत खर्ड्याच्या लढाईंत पेशव्यांनीं निजामशाहीचा मोड करण्याची वेळ

आणली होती हें इतिहासज्ञांस माहीत आहेच. इकडे गुजराथेंत व खानदेशांत जो मुसलमानी अंमल होता तोहि शाहूराजाच्या कारकीर्दीपासूनच नाहींसा झाला होता. या सर्व हकीगतीवरून मुसलमानी सत्ता इंग्रज उदयास येऊं लागण्यापूर्वी हिंदूंनीं स्वतःच कशी नाहींशी केली होती, हें ऐतिहासिकरीत्या सिद्ध होतें.

---

## ८२. बुद्धजयंति

( ता. १६ मे १९११ )

धराबद्धपद्मासनस्थांघ्रियष्टि ।
नियम्यानिलं न्यस्तनासाग्रदृष्टिः ।।
य आस्ते कलौ योगिनां चक्रवर्ती ।
स बुद्धः प्रबुद्धोऽस्तु नश्चित्तवर्ती ।।
—श्रीशंकराचार्य.

निंदसि यज्ञविधेरहह श्रुतिजातं
सदयहृदयदर्शितपशुघातं
केशव धृतबुद्धशरीर । जयजगदीश हरे ।।
—गीतगोविंद.

बरोबर पंचवीसशें वर्षे झालीं; वैशाख शुा १५ स शाक्यकुळांतील अत्यंत श्रेष्ठ असा पुरुष जो सिद्धार्थ गौतम तो " बुद्ध " झाला; व तेव्हांपासून जगांतील श्रेष्ठ अशा धर्मांपैकीं एकाची म्हणजे बौद्धधर्माची स्थापना झाली. वास्तविक सिद्धार्थ गौतम या व्यक्तीच्या जन्मास २५०० हून अधिक वर्षें झालीं आहेत. तथापि, ज्या दिवशीं त्याला खरा आत्मसाक्षात्कार झाला, अनेक वर्षेपर्यंत तीव्र चिकित्सापूर्ण अशा मनानें हुडकीत असलेली भवचक्राची गुरुकिल्ली चिच्छक्तीच्या प्रेरणेनें ज्या दिवशीं त्याच्या हस्तगत झाली, तोच दिवस बुद्धावतार जयंतीचा मानण्यांत येतो. तत्पूर्वींचा गौतमबुद्ध हा तुमच्या आमच्याप्रमाणें केवळ एक संसारी पुरुष होता.

ख्रिस्त, महंमद वगैरेप्रमाणेंच बुद्ध हीहि एक खरी खरी ऐतिहासिक व्यक्ति होऊन गेली, व तिजविषयीं साधार अशी माहिती ग्रंथांतून मिळते. बुद्धाचा बाप शुद्धोदन शाक्य हा वास्तविक राजा असा नव्हता. कारण शाक्य जातींच्या लोकांत त्यावेळीं एकप्रकारची प्रजासत्ताक राजपद्धति असून, समाजाचा सर्व कारभार प्रातिनिधिक पद्धतीनें चालत असे. शुद्धोदनास प्रत्यक्ष राजपद असें नसलें तरी तो घरचा श्रीमान् व सुखी होता; आणि आपला प्रियपुत्र जो सिद्धार्थ याला त्यानें एखाद्या राजपुत्राप्रमाणें चैनींत व ऐषआरामांत लोळतां येईल अशा स्थितींत ठेवलें होतें. सांसारिक दुःख म्हणून कसें असतें तें आपल्या मुलाच्या दृष्टीसहि पडूं नये, अशी त्यानें विशेष खबरदारी घेतली होती. यशोधरा नांवाच्या सुंदर स्त्रीशीं सिद्धार्थाचें लग्न लहानपणींच लागलेलें असून राहूल नांवाचा एक अत्यंत कमनीय असा पुत्रहि त्याला होता. पण सिद्धार्थाचें लक्ष ऐहिक ऐषआरामांत गुरफटलेलें नसून जगाच्या स्थितीकडे लागलेलें होतें. प्रेमळ बापानें केलेल्या कडेकोट बंदोबस्तांतूनहि मानवी दुःखाचा थोडाबहुत मासला त्याच्या नजरेस मधून मधून पडल्याशिवाय रहात नसे; व प्रत्येक वेळीं हा मासला पाहतांच या दुःखाचें मूळ कशांत आहे? दुःखनिवारणार्थ चाललेला जगाचा प्रयत्न योग्य मार्गानें होत आहे किंवा भलत्याच अयोग्य मार्गाचें वळण त्याला लागलें आहे? ही त्याची विचिकित्सा वाढतच जाई. संसारांतलें त्याचें मन निघाल्यामुळें प्रतिक्षणीं संसारोपाधीचा जाच त्याला अधिकाधिक दुःसह वाटूं लागला. संसारपाश तोडल्याशिवाय आपल्या शंकांस समाधानकारक उत्तर मिळणार नाहीं, असा त्याचा कायमचा निश्चय झाला; व राहुलाच्या जन्मोत्सवासंबंधानें कपिलवस्तु नगरीच्या पौरजनांनीं केलेल्या एका विशेष समारंभाच्या ऐन दिवशींच गौतमबुद्धानें आपल्या **अलौकिक अशा वैराग्याचा मासला** जगास दाखविला. जगांत सामान्यतः वैराग्याला कारण दुःख हेंच असतें; आर्तभक्तांचीं उदाहरणेंच पुष्कळ. सुखांत लोळणाऱ्याला वैराग्य क्वचितच आठवतें. पण गौतमबुद्धाच्या वैराग्याला जगांत दुसरें उदाहरण मिळणें कठीणच. समर्थ रामदास स्वामी विवाहाकरितां पाटावर उभे असतां 'सावधान' या सूचक शब्दाचा इशारा तरी त्यांच्या कानीं पडला होता;

पण गौतमबुद्धाला जी वैराग्यजागृती मिळाली ती केवळ आत्मप्रेरणेनें. बुद्धाच्या 'महाभिनिष्क्रमणा' सारखा काव्यमय व उदात्त प्रसंग दुसरा मिळणार नाहीं. रामचंद्राला ऐन राज्यारोहणप्रसंगीं राज्य सोडून जावें लागलें खरें, पण त्याला मूळ कारण परेच्छा; स्वतः रामचंद्राची इच्छा नव्हे. रामचंद्राचा वनवास हें पितृभक्तीचें उदाहरण होय, वैराग्याचें नव्हे. गौतमानें सर्व संसारसुखाचा त्याग केला तो केवळ स्वतःच्या परमार्थज्ञानाच्या सात्विक इच्छेनें. उत्सवप्रिय मनुष्यांनीं वाडा गजबजून गेला आहे, नाचरंग चालला आहे, मंगलवाद्यें वाजत आहेत, सर्वत्र रोषनाई केलेली आहे, अशा दिवशीं गौतमबुद्धाचें मन मात्र ठिकाणावर नव्हतें. व्यग्र चित्तानें त्यानें सर्व दिवस घालविला आणि ऐनमध्यरात्रीं यशोधरा ही पुष्पशय्येवर राहुलाला कुशींत घेऊन गाढ निद्रिस्त असतां तिला जागी न करितां तो निघाला. आपल्या प्रियपत्नीला विरहदुःख कांहीं दिवस सोसावें लागणार; पण मनांत जी विचिकित्सा उत्पन्न झालेली आहे तिचें समाधान झाल्यानंतर परत येऊन तिला भेटून आपणास झालेल्या सम्यक् ज्ञानाचा गुरूपदेश तिलाहि करूं; अशा सदय भावनेनें गौतमबुद्ध त्या उभयतांस तेथेंच सोडून देऊन फक्त एका सारथ्याला घेऊन राजोद्यानांतून बाहेर पडला. रात्रभर प्रवास करून सकाळीं एका पवित्र नदीच्या तीरावर येतांच आपल्या तरवारीनें त्यानें आपले लांब सडक, व सुगंधी तेल लावून तुळतुळीत केलेले केंस कापले, अंगावरील सर्व अलंकार उतरले आणि ते सर्व सारथ्याबरोबर कपिलवस्तूस परत पाठविले. नंतर मागध देशची राजधानी जें राजगृह शहर तेथें जाऊन अलार व उद्रक या दोन पंडितांपासून हिंदू तत्त्वज्ञानाची माहिती त्यानें करून घेतली. अर्थात् शुष्क तत्त्वज्ञानानें त्याचें समाधान झालें नाहीं. तेव्हां योगसाधनानें तरी चित्तांत सम्यक् ज्ञानाचा प्रकाश पडेल या भरंवशानें, विंध्याद्री पर्वतांतील उरुवेलच्या निबिड अरण्यांत सहा वर्षेंपर्यंत त्यानें इतकें देहदंडन केलें कीं, शेवटीं उभा राहण्याची देखील शक्ति त्याच्या अंगीं राहिली नाहीं. हटयोगानें समाधान होईना तेव्हां त्यानें तोहि सोडून दिला. असाच विचार करीत करीत भटकत असतां व निरंजना नदीच्या तीरीं महावृक्षाखालीं बसला असतां एक दिवस त्याच्या मनांत **खऱ्या परमार्थज्ञानाचें तेज** प्रकाशमान झालें. ती सर्वरात्र त्यानें मनःसमाधीच्या एकां-





तिक सुखांत घालविली. दुसऱ्या दिवसापासून अपाल्यास मिळालेलें ज्ञान दुसऱ्यास शिकविण्यास त्यानें सुरुवात केली. वैराग्य, आत्मयज्ञ, उपास, तप इत्यादिकांनीं त्याच्या ठिकाणीं जें तेज उत्पन्न झालें होतें तें सम्यक् ज्ञानाच्या आनंदानें दुणावलें, आणि सर्व जग शहाणें करून सोडण्याच्या त्याच्या सात्विक निश्चयानें जगद्गुरूची पदवी नसली तरी पात्रता त्याच्या अंगीं आपोआप विनटली. येथपासून पुढें आपल्या अवतारसमाप्तीपर्यंत सुमारें चाळीस वर्षेंपर्यंत त्यानें उपदेशाचें पवित्र काम केलें; शेंकडों लोकांशीं युक्तिवाद केला; शेंकडों लोकांस कळकळीनें आळविलें, शेंकडों संघ स्थापले व जवळजवळ सर्व देशभर शिष्यमंडळ बनविलें. कोणत्याहि नवीन मताची शिष्यपरंपरा हिंदुस्थानांत कशी फैलावत जाते याचा ज्याला अनुभव आहे त्याला गौतमबुद्धानें केवळ आपल्या निम्म्या हयातींत प्रचंड धर्मक्रांति कशी घडवून आणली असेल याची कल्पना येईल. वास्तव, गौतमगुरूचा दिग्विजय प्रथम केवळ पांच शिष्य–सैनिकांसह कसा सुरू झाला, त्याला पहिल्याच यशाची प्राप्ति वाराणसीसारख्या सनातनप्रिय अशा वैदिक धर्माच्या क्षेत्रीं कशी झाली, त्याच्या अपूर्व धर्मोपदेशाच्या लाटेंत संशयग्रस्त संसारीजनचसे काय पण पूर्वपरंपरेनें पढलेले विद्वान् व बुद्धिमान् असे वैदिक, पंडित व पराक्रमी राजे कसे गडप झाले; चोर, जार, पतित, चांडाल वगैरे सर्व प्रकारचे मूढ व दुराचारी जनहि त्याच्या प्रसादतीर्थानें अंतर्बाह्य पुनीत होऊन सद्गुणी कसे बनले, वगैरे तपशील सांगत बसण्याचें कारण नाहीं. तसेंच या नव्या धर्मावतारानें निस्तेज झालेल्या असूयाग्रस्त अशा अनेक लोकांनीं गौतम बुद्धाचा पाडाव करण्याकरितां निंदा, अत्याचार वगैरे तामसी विद्या व पैशून्यकला खर्ची घातल्या तरी गौतमबुद्धाच्या यशाची यत्किंचितहि हानि न होतां अखेरपर्यंत त्याची कीर्ति वाढतच कशी गेली, हा कथाभागहि सांगत बसण्याचें कारण नाहीं. जगांत कोठेंहि जा, सख्या भावंडाचा तोंडावळा जसा सारखा असतो, तसेंच विभूतिमात्राचें चरित्रहि पुष्कळ अंशीं सारखें असतें.

असो; अशा रीतीनें आपलें आयुष्य सत्कार्यीं खर्चून व आपलें नांव अजरामर करून गौतमबुद्धानें आपल्या वयाच्या ऐंशीव्या वर्षी देह ठेविला. बुद्धानें प्रथम पांच शिष्यांस उपदेश करून आपल्या कामास सुरुवात

केल्याचें वर सांगितलें आहे. लवकरच या पांचाचे साठ झाले व साठाचे हजारों झाले; व आजमितीस बुद्धाच्या धर्माचे अनुयायी असे पन्नास कोट लोक पृथ्वीच्या पाठीवर आहेत! खुद्द बुद्धाच्या हयातींत कित्येक राजे-लोकांनीं बौद्धधर्माची दीक्षा घेतली होतीच. तथापि ख्रिस्ती शकापूर्वी सुमारें तिसऱ्या शतकाच्या सुमारास अशोकनामक जो हिंदी सम्राट् होऊन गेला त्यानें बौद्धधर्माचा स्वीकार करून चहूंकडे त्याचा प्रसार होण्याची अतोनात खटपट केली; खुद्द अशोकाचा पुत्र मिलिंद व त्याची मुलगी हीं दोघेंहि संन्यास स्वीकारून धर्मोपदेश करण्यास बाहेर पडलीं, त्यामुळें बौद्धधर्माच्या प्रसारास अत्यंत मदत झाली. पीतवस्त्र परिधान करणारे भिक्षु व धर्मोपदेशाच्या सात्त्विक आवेशांत संसारसुखाचा विसर पडलेल्या भिक्षुणी यांनीं थोडयाच काळांत चारी दिशा व **नवखंड पृथ्वी व्यापिली.** पूर्वेस ब्रह्मदेश, सयाम, चीन, जपान, उत्तरेस अफगाणिस्तान, तिबेट व हिमालयापलीकडील प्रदेश, दक्षिणेस सिलोन, जावा व पश्चिमेस खोतान, तुर्कस्तान, मध्य आशिया वगैरे ठिकाणीं बौद्धसंघ व विहार यांची स्थापना झाली. तथापि कर्मधर्मसंयोगानें बौद्धधर्माची जन्मभूमि जें हिंदुस्तान त्यांतूनच उत्पत्तिपासूनच एक हजार वर्षांच्या आंत त्याचें उच्चाटन झालें. बौद्धधर्माची वाढ जलद झाली. व विस्तार फार वाढला, यामुळें लवकरच त्यांमध्यें अनेक पंथ व मतांतरें उत्पन्न या सर्वांचा मेळ घालण्याचा प्रयत्न प्रथम प्रथम वजनदार बौद्धधर्मानुयायी राजे लोकांनीं केला. एकवाक्यता करण्याचा प्रयत्न करणारी पहिली परिषद बुद्धाच्या मरणानंतर लवकरच म्हणजे इ. स. पूर्वी ५४३ व्या वर्षी मगध देशाचा राजा अजातशत्रु याच्या कारकीर्दीत राजगृह येथें, बुद्धाचा ब्राह्मण पट्टशिष्य महाकाश्यप याच्या अध्यक्षतेखालीं, भरली होती. दुसरी परिषद यानंतर सुमारें शंभर वर्षांनीं वैशाली येथें भरली, व त्या प्रसंगीं एका परिषदेच्या दोन परिषदा होण्यापर्यंत मतभेदांची मजल गेली. तिसरी परिषद प्रसिद्ध सम्राट् अशोक मौर्य याच्या कारकीर्दीत इ. स. पू. २५० व्या वर्षी पाटणा शहरीं भरली व चौथी परिषद राजा कनिष्क यानें इ. स. ४० या सालीं भरविली. या सर्व परिषदांचा हेतु बौद्ध धर्माच्या ग्रंथांत सुव्यवस्था व विल्हेवारी लावणें व मतांतरांची एकवाक्यता करणें हा होता. तथापि, ती गोष्ट शक्य नसल्या-

मुळें उत्तरेकडची व दक्षिणेकडची अशा बौद्धधर्मांच्या वेगवेगळ्या परंपरा निर्माण झाल्या. कालांतरानें हजारों कोसांचें व हजारों वर्षांचें अंतर पडल्यामुळें उत्तर बौद्ध व दक्षिण बौद्ध यांची परस्पर ओळखही नाहींशी होऊन प्रत्येक परंपरेचा विस्तार व परिणति स्थानिक स्थितीप्रमाणें वेगवेगळ्या दिशांनीं होत गेली. सुदैवानें बौद्ध धर्माच्या पुनर्जीवनाचा काळ हल्लीं आलेला दिसतो. या पुनर्जीवनप्रसंगीं पूर्वीप्रमाणें एखादा धर्मदिग्विजयी अवतारी पुरुष निर्माण होणार किंवा कसें तें कोण सांगणार ? तथापि, एवढी गोष्ट खरी कीं, एकंदर जगावर जी एका नव्या विचारक्रांतीची छाया हल्लीं पडत आहे, तिच्या अनुषंगानें बौद्ध धर्माविषयीं तन्मतानुयायांची दृष्टि नवीन होऊन निरनिराळ्या बौद्धधर्मी देशांत पूर्वीहून परस्पर अधिक दळणवळण वाढेल, जुन्या बौद्ध वाङ्मयावर पडलेली राख फुंकली जाऊन त्यांतील ग्राह्यांश सतेज होऊन लोकनिदर्शनास येईल, आणि बुद्धाच्या जन्मभूमींत पूर्वकालीन विरोध विसरला जाऊन बौद्धधर्म हा कांहीं झालें तरी भारतीय धर्मांपैकींच एक पंथ आहे व या दृष्टीनें हिंदु लोकांचेंहि ममत्व त्याच्या ठिकाणीं असलें पाहिजे, ही भावना अधिकाधिक जागृत होईल, यांत शंका नाहीं. बौद्धधर्म व ब्राह्मणधर्म यांचा पूर्वी एके काळीं तीक्ष्ण विरोध होता, व अद्यापिहि त्या काळच्या भांडणाचा प्रतिध्वनि सर्वस्वीं निःशेष झालेला नाहीं. या कारणास्तव बौद्धधर्माविषयीं आज कोणास जें काय बोलणें तें जपूनच बोललें पाहिजे यांत शंका नाहीं. तथापि, आजच्या नवीन युगांत गौतमबुद्धाच्या २५०० व्या जयंतीच्या महोत्सवप्रसंगीं या दोन धर्मांतील परस्परसंबंध काय आहे, कोणकोणच्या बाबतींतला विरोध खरा म्हणजे सकारण व कोणच्या बाबतींतला विरोध खोटा म्हणजे निर्मूळ व निष्कारण आहे, याचा विचार कोणीं शांतमनानें केल्यास असली विचारसरणी ऐकून घेण्याइतकी सहिष्णुता तरी आजच्या ब्राह्मणधर्मांत खास आहे, अशी आमची समजूत आहे. धर्मदृष्ट्या पूर्वीचा काल विशेषी–करणाचा होता; तसा आज नसून आजचा काळ धर्मदृष्ट्या व राष्ट्रीयदृष्ट्या एकीकरणाचा आहे. अर्थात् जी जी म्हणून भारतीय वस्तु पुनरुज्जीवनोन्मुख असेल तिचा सत्कारपूर्वक परामर्ष घेणें हें राष्ट्रहितेच्छु भारतीयाचें काम आहे. या दृष्टीनें

पाहातां बौद्धधर्म हा अस्सल भारतीय आहे ही गोष्ट प्रथम लक्षांत घेतली पाहिजे.

वर जो बुद्धाचा अल्प इतिहास दिला आहे. त्यावरून बुद्धाचें कुळ, स्वतः त्याचा जन्म, त्याचें निर्वाण, त्यानें स्थापलेल्या धर्मपंथाचा जन्म व परिणति या सर्व गोष्टी भारतीय आहेत हें उघड आहे; व आज हिंदुस्थानांत त्या धर्माचा फारसा मागमूस राहिलेला नाहीं, तरी ज्या देशांत तो पूर्वीपासून आजवर प्रचलित आहे त्या म्हणजे चीन, जपान वगैरे देशांचे लोक हिंदुस्थानास अद्यापि पवित्र भूमि मानितात. या देशांच्या भाविक यात्रेकरूंची यात्रा हिंदुस्थानास आल्याशिवाय पुरी होत नाहीं; व पूर्वी ज्या ज्या वेळीं बौद्धधर्म व बौद्धवाङ्मय यांची जागृति करावी अशी चिनी व जपानी समाजांस इच्छा झाली त्या त्या वेळीं, मूळच्या पवित्र कुंडांतून तीर्थोदकाच्या रिकाम्या गिंड्या भरून घ्याव्या त्याप्रमाणें हिंदुस्थानांत प्रसिद्ध असलेल्या धार्मिक पंडितांस सन्मानपूर्वक पाचारण करून त्यांनीं स्वदेशीं नेलें व अशा रीतीनें सुमारें हजार-पांचशें वर्षेपर्यंत हिंदुस्थान व बौद्धधर्मीय देश यांच्या संगतीचा सांधा जुळत आलेला होता. गौतमबुद्ध हा भारतीय आहे एवढेंच नव्हे तर व्यक्तिशः तो अखिल भारतीयांस परमपूज्य होता व अद्यापिहि आहे. तसें नसतें तर शिरोभागीं दिलेल्या अवतरणांत खुद्द श्रीशंकराचार्य व जयदेव कवि यांनीं बुद्धाला अवतार मानून त्याची जी प्रशस्ति केली आहे तशी खास केली नसती. स्वतः गौतमबुद्धाच्या चरित्रांत अशी कोणती गोष्ट आहे कीं, तिजमुळें त्याच्या कट्टया निंदकासहि त्याला तिळमात्र नांव ठेवण्यास जागा मिळेल ? बुद्ध हें नांव घेतांच कित्येकांच्या मनांत जी अनादरलहरी उत्पन्न होते, तिचें खरें कारण स्वतः बुद्ध ही व्यक्ति नसून, त्याच्या धर्माचीं तत्त्वें व विशेषतः तद्धर्ममतानुयायांनीं कालांतरानें माजविलेला अनाचार हेंच होय, असें सूक्ष्म दृष्टीच्या मनुष्यास दिसून येईल. त्यांतल्या त्यांत पाहतां दुसरी गोष्ट सर्वस्वीं असमर्थनीय आहे; पण अविचारी अशा बौद्धमतानुयायांच्या मूर्खपणाबद्दल जर बुद्धास जबाबदार धरावयाचें तर जगांतला दुसरा कोणताहि धर्मसंस्थापक अशा संकटांतून सुटेल असें आम्हांस वाटत नाहीं. श्रीमच्छंकराचार्य हे बुद्धाप्रमाणेंच व्यक्तिशः पवित्र व सदाचरणी होते; पण शांकरपरंपरेंतहि

'घटाकाश', 'मठाकाश' वगैरे शब्दांचा स्वतःस अगर दुसऱ्यास न समजेल असा शुष्क गोंधळ माजवून 'कलौ वेदांतिनो भांति फाल्गुने बालका इव' अशा निंदेस पात्र झालेले विचित्राचारी असे लोक निर्माण झालेच नसतील काय? अहिंसा व दया यांचा उपदेश करणाऱ्या बुद्धाच्या नामधारी चिनी व जपानी अनुयायांत हिंसाच इतकी माजून राहिली आहे कीं, हे लोक आज मारून खात नाहींत असा प्राणीच जगांत नाहीं. पण याला बुद्धानें काय करावें? झुरळें मारून खाणाऱ्या चिनी लोकांच्या आचाराकरितां दयासागर बुद्धाला जर नांवें ठेवावयाचीं तर मनुस्मृतींत देहान्त प्रायश्चित्त सांगितलेलें पातक करणाऱ्या हिंदूंच्या अपराधाकरितां खुद्द मनूसच फांशीं चढविणें योग्य कां होणार नाहीं? 'शिष्यापराधे गुरोर्दंडः' कां?

दुसरा आक्षेप म्हटला म्हणजे बुद्धाच्या सिद्धान्तांसंबंधाचा. सनातन वैदिक धर्माभिमान्यांस बुद्ध-मतांत विषाद वाटण्यासारख्या मुख्य चार गोष्टी आहेत. एक निरीश्वरवाद, दुसरी अनात्मवाद, तिसरी यज्ञहिंसा-निषेध व चवथी चातुर्वर्ण्यनिंदा. पण यांतहि थोडासा विचार आहे. निरीश्वरवाद व अनात्मवाद हे दोन्ही बुद्धानें स्वतःच नवे निर्माण केलेले होते असें नाहीं. आपल्या खास वैदिक धर्मांत या दोन्ही वादांचें मूळ आहे. सांख्यमतवादी परमपूज्य कपिलमहामुनि हा निरीश्वरवादी होता; व अद्वैतवादी शंकराचार्य हे एका अर्थानें अनात्मवादी होते. सांख्य तत्त्व-ज्ञानांत ईश्वराशिवाय सृष्टिव्यवस्थेचा निर्वाह मानिलेला आहे. कपिलाचार्य फक्त प्रकृति व पुरुष हीं दोन तत्त्वें मानतात. ईश्वर मानीत नाहींत. सृष्टि उत्पन्न करणारा, दयेनें तिचें पालन करणारा, निग्रहानुग्रह-समर्थ, भक्तीस पावणारा वगैरे गुणविशिष्ट असा ईश्वर मानणें हेंच लौकिक आस्तिक्यतेचें लक्षण आहे; पण या दृष्टीनें पहावें तर कपिल काय किंवा शंकराचार्य काय या दोहोंनाहि 'आस्तिक' ही पदवी कितपत लावतां येईल याची शंकाच आहे. जो आत्मा—अर्थात् व्यक्तिमात्राचा—न मानल्याबद्दल बुद्धावर आम्हीं रागावतों तो आत्मा कपिल मानतात तरी! शंकराचार्य तोहि मानीत नाहींत; जीवात्मा परमात्म्याहून भिन्न नाहीं हेंच अद्वैतसिद्धान्ताचें मर्म असल्यामुळें जीवात्मा वेगळा उरतच नाहीं. शंकराचार्यांस आक्षेपक

लोक 'प्रच्छन्नबौद्ध' ही निंदाव्यंजक पदवी देतात त्याचें झालें तरी कारण हेंच होय. सांख्यमत निरीश्वरवादी असूनहि जर 'नास्ति साख्यसमं ज्ञानं' या स्तुतीस तें पात्र आहे तर निरीश्वरवादाबद्दल बुद्धाचा अनादर करणें योग्य होणार नाहीं. बुद्धाच्या अनात्मवादाविषयीं एक विशेष गोष्ट लक्षांत ठेवावयास पाहिजे; ती ही कीं, हा अनात्मवाद प्रयोजनपुरःसर नसून केवळ आनुषंगिक आहे. बुद्धाचा कटाक्ष आत्म्याचें अस्तित्व नाशाबीत करण्याकडे नव्हता; तर ज्या यज्ञयागांच्या योगानें हत्या माजली होती त्याविरुद्ध होता; आत्मा असिद्ध ठरवून त्यास कांहीं मिळावयाचें नव्हतें, तर वादग्रस्त आत्म्याच्या मोक्षसाधनार्थ प्रत्यक्ष हत्यादि पापात्मक अनाचार होत होते, ते त्यांस बंद करावयाचे होते.

यज्ञहिंसानिषेधाबद्दल बुद्धास नांवें ठेवण्यापूर्वीं दोन गोष्टींचा विचार होणें जरूर आहे. पहिली अशी कीं, यज्ञयागाचें स्तोम बुद्धाच्या वेळीं बेसुमार वाढलेलें असून, त्याविरुद्ध निषेधपूर्वक प्रतिक्रिया करणारा कोणी तरी धीट पुरुष निर्माण व्हावयास पाहिजे होता. व दुसरी अशी कीं, जो यज्ञहिंसेचा निर्बंध बुद्धानें आपल्या वेळीं केला त्याचाच अनुवाद आज हजारों वर्षें आपण करीत आहोंच कीं नाहीं? यज्ञहिंसा हाच जर वैदिकधर्माचा खरा आत्मा असता तर, श्रीमच्छंकराचार्यांनीं बौद्धमतखंडनपूर्वक दिग्विजय समाप्त केल्याबरोबर, प्रथम देशभर यज्ञवेदीच निर्माण करून होमधूमानें आणि 'वषट्कार' गर्जनेनें दशदिशा भरून धुंद करून टाकल्या नसत्या काय? यज्ञहिंसा हीच हिंदुधर्माच्या मतें मोक्षपदाची खरी गुरुकिल्ली असती तर वेदांतानंतर प्रेमल व परम कारुणिक अशा भागवतधर्माचा प्रसार कां झाला असता व तो लोकांस कसा पटला असता? आज आर्यसमाजिस्टांनीं वैदिकधर्माचें पुनरुज्जीवन करण्याच्या कामीं सर्वांत पुढें मजल मारली आहे, सर्व नित्यनैमित्तिक कर्मांचा त्यांचा ओनामा होमहवनानें होत असतांहि यज्ञहिंसा त्यांनीं वर्ज कां मानिली आहे? व आश्चर्य हें कीं, केवळ यज्ञसंबंधीं मांसभक्षण वैदिक धर्मानें विहित मानलें असतां, आर्यसमाजाच्या एका शाखेनें आत्मपुष्ट्यर्थ मांसभक्षण शिल्लक ठेवून त्याचा यज्ञसंबंध मात्र काढून टाकला! 'अश्वमेध' 'पलपैतृक' वगैरे गोष्टी कलियुगांत वर्ज्य करून ठेवण्यांत स्मृतिकारांचा

काय हेतु असेल बरें ! व या स्मृतिकारांनीं जें केलें तेंच अन्य रीतीनें गौतम बुद्धानें केलें असें म्हणण्यास काय हरकत ?

चातुर्वर्ण्यनिषेधासंबंधानें बुद्धाचा कटाक्ष ब्राह्मण्यास वरच्या पायरीवरून खालीं ओढण्याचा नसून खालच्या दर्जाच्या लोकांस वरच्या पायरीस नेण्याचा होता. या बाबतींत भक्तिमार्गाची व बौद्धमताची एकवाक्यता आहे. खऱ्या भक्तिपंथांत जातींची आडकाठी भगवद्भक्तजनांच्या मार्गांत येऊं शकत नाहीं. बुद्धानें झालें तरी ब्राह्मण्याची विशेष लक्षणें असे जे गुण त्या गुणांस केव्हांहि कमीपणा न देतां, बुद्धसंघांत प्रवेश होण्यास जातीची अडचण राहूं नये असें ठरविलें. भक्तिमार्गांत सेना न्हावी, गोरा कुंभार, चोखामेळा महार वगैरेंना ज्या कारणाकरितां मान देण्यांत येतो, त्याच कारणाकरितां बुद्धसंघांतहि अनेक हीन जातींच्या लोकांना घेऊन बुद्धानें गौरविलें होतें. सुविनीत भिक्षु हा मूळचा हलालखोर होता. उपाली हा मूळचा न्हावी होता. पण बुद्धसंघांत समाविष्ट होऊन त्याची योग्यता इतकी वाढली होती कीं, महाकाश्यपाच्या अध्यक्षतेखालीं भरलेल्या धर्म-परिषदेंत त्रिपीटक नामक बौद्धग्रंथसमूहापैकीं 'विनय' सूत्रें म्हणण्याचें काम त्याजकडे होतें. तात्पर्य, कोणासहि धर्मोच्छेदक किंवा नास्तिक म्हणणें फार सोपें आहे; पण तें म्हणण्यापूर्वी ज्यानें त्यानें आपण स्वतः असा विचार करावा कीं, हिंदुधर्माची साधारण व्याख्या काय आहे? त्या व्याख्येंत मी स्वतः कितपत येतों ? ज्यांना ज्यांना मी हिंदु हें पद लावतों ते ते त्या व्याख्येंत कितपत येतात ? हिंदुधर्माचीं सर्व अंगें सर्वकाळ सारखींच नित्य व अबाधित राहिलीं आहेत कीं काय ? नसल्यास कोणच्या अंगांत फेरबदल झाला आहे ! त्याच्या अनेक अंगांपैकीं कोणचेंहि एखादें अंग मान्य केल्यानें हिंदुत्वास बाध येऊं शकतो कीं काय ? अशा रीतीनें बाध येऊं लागल्यास आपणास व इतरांस हिंदुत्वाचें अधिष्ठान कितपत हक्कानें मागतां येईल ? 'हिंदु' नांवाच्या धर्मानें उत्पन्न केलेली ती हिंदुजात किंवा 'हिंदु म्हणविणाऱ्या जातीनें बनविलेला तो हिंदुधर्म ? निदान बुद्धाच्या आक्षेपकांनीं तरी हे प्रश्न विचार करण्यासारखें आहेत यांत शंका नाहीं. वर सांगितलेले दोष लक्षांत घेतले तरी बौद्धमतास फार तर अपभ्रष्ट हिंदुधर्म म्हणतां येईल; पण स्वभाषेच्या अपभ्रंशांचा स्वभाषेंतच जसा अंतर्भाव

होतो–अपभ्रष्ट स्वरूपामुळें त्यांच्या भाषेचें गोत्र बदलत नाहीं–त्याचप्रमाणें स्वधर्मांचे अपभ्रंशहि स्वधर्मांतच समाविष्ट मानावे लागतात. कारण अपभ्रंश हा कितीहि झालें तरी मूळ पायाच्या परंपरेवर रचलेला असतो. पुष्कळ वेळां भाषेप्रमाणें धर्मांची अपभ्रंशहि देशकालानुरूप योग्य व लोकांस इष्ट असा असतो; व म्हणून तो ग्राह्यहि होतो. बुद्धधर्मांचीं जीं विशिष्ट म्हणून अंगें आहेत तीं पुष्कळ अंशीं वैदिक धर्मग्रंथ व धर्ममतें यांतून घेतलेलीं आहेत. किंबहुना रामायणांतील 'यथा चोरस्तथा बुद्धः' या उल्लेखाचा ग्रंथ परवां डॉ. गर्द्रे यांनीं मार्मिकपणानें लावून दाखविला, त्याप्रमाणें लाविला असतां सकृद्दर्शनीं बुद्धाची जी निंदा तीच परिणामीं स्तुति ठरते. म्हणजे बुद्धानें आपला पंथ स्थापतांना जरी मताची चोरी केली असें मानिलें तरी ती चोरी वैदिक परंपरेंतील प्राचीनाचार्यांच्या मतांचीच होय. आज देखील जशी प्राचीनतमाचा आधार देऊन प्राचीन तर खोडून टाकण्याचा प्रयत्न कित्येक सद्बुद्धिप्रेरित समाजसुधारक करितात तसलाच प्रयत्न बुद्धाचाहि असावा, असें वाटतें. प्राचीनतर गोष्टींचा आधार घेणें हें जर धार्मिक भावनेशीं विसंगत नाहीं, तर प्राचीनतम गोष्टींचा आधार घेणें हेंहि तसेंच मानिलें पाहिजे कलिवर्ज्यासारख्या प्राचीनतर गोष्टी केवळ कालमानानुसार म्हणून प्राचीनतम गोष्टीविरुद्ध प्रवर्तित करितां येतात, त्याचप्रमाणें हेंच कालमान फिरून बदललें म्हणजे नवीन अशा प्राचीनतर गोष्टींचा निषेध होऊं लागून मन प्राचीनतम गोष्टीकडे धांवतें.

कोठेंहि धर्मचरित्रांत विशिष्ट गोष्टींची अतिशयोक्ति व तिजमुळें होणारी प्रतिक्रिया ही जोडी वारंवार आढळते. प्युरिटन व क्वेकर लोक यांनीं रोमन कॅथोलिक लोकांचा जो निषेध केला तो त्यांस स्वतःस बायबल नापसंत होतें म्हणून नाहीं ! तर कॅथोलिक लोकांच्या आचाराचा निषेध करतां येण्यासारखीं वचनें व विचारसरणी बायबलांतच आढळते म्हणून. बौद्धमत हेंहि सर्व वैदिकपरंपरा झुगारून देण्याकरितां म्हणून पुढें आलें नव्हते; तर त्या काळच्या अर्वाचीन वैदिक आचारांत म्हणजे यज्ञयागादिकांत एक प्रकारची अतिशयोक्ति झाली होती व त्याविरुद्ध प्रतिक्रिया (Protest) करणें जरूर होतें म्हणून. पण बौद्धमत हें केवळ प्रतिक्रियारूप नव्हतें तर

कोणाहि धार्मिक व समजंस मनुष्यास पटेल अशा तऱ्हेचा वैदिक परंपरेंतून एकत्र केलेला नीतिवाद अधिक ग्राह्य म्हणून त्यानें लोकांपुढें मांडला, तो लोकांस मानवला व त्यामुळेंच बौद्ध मताचा त्यावेळीं विजय झाला. बौद्धानें उपदेशाचें काम सुरू करतांच ब्राह्मण धर्मांतील मोठमोठीं धेंडें येऊन त्यास मिळालीं, याचें कारण तरी हेंच होय. सारीपुत्र, महामोगलान, महाकाश्यप, अशोकाच्या वेळीं सर्वश्रेष्ठ मानिलेला बुद्ध भिक्षु—तिस्सा हे सर्व ब्राह्मणच होते; व ते अप्रामाणिक किंवा धर्मलंड होते, असें म्हणण्यास आपल्यास अधिकार नाहीं. बौद्धमतांचीं मुख्य लक्षणें म्हटलीं म्हणजे अशीं आहेत. एक तर तें मत अत्यंत विनयसंपन्न आहे. मनुष्यानें मनुष्याशीं केलेला प्रांजल युक्तिवाद त्यांत भरलेला असून आपण ईश्वरप्रणित आहों, अर्थात् आपल्यास न मानील तो प्रत्यक्ष ईश्वराचा अपराधी आहे, अशी प्रौढी तें मत मारीत नाहीं. बुद्धानें सांगितलेलीं चार प्रकारचीं सत्यें, आठ प्रकारचे कर्मभाग, वगैरे गोष्टी अगदीं आधुनिक किंवा अगदीं प्राचीन अशा नीतिवेत्त्यांनाहि मान्य होण्यासारख्या आहेत; व हेंच त्याच्या यशाचें कारण. हें यश पुढें अनंत काल टिकलें नाहीं, ही गोष्ट वेगळी; व त्याचीं कारणेंहि वेगळीं आहेत. नदीच्या मुळांतलें निर्मल पाणी ज्याप्रमाणें तिच्या प्रवाहांत पुढें तसेंच टिकत नाहीं, त्याचप्रमाणें अनेक मतानुयायांच्या अप्रबुद्धपणामुळें बौद्ध मताचें निर्मल स्वरूपहि पुढें टिकलें नाहीं. वैराग्य, समबुद्धि, दाक्षिण्य, शुचिर्भूतता, विनय वगैरे बौद्ध मतांतले मूळचे गुण नष्ट होऊन सुमारें चारपांचशें वर्षांच्या आंतच हिंदुस्थानांत तरी बौद्ध मताचें वैशिष्ट्य नाहींसें झालें आणि बौद्ध मतवाले अनेक रीतींनीं हिंदु समाजाशीं मिळून एकजीव झाले. एक हजार वर्षांच्या अवधीनंतर जगद्गुरु श्रीशंकराचार्य यांनीं बौद्धमताचें जें खंडन केलें तेंहि वरील कारणामुळेंच होय. पण शंकराचार्यांनीं मारलेली लढाई ब्राह्मणी व बौद्ध धर्माच्या युद्धांतील पहिली नसून शेवटची होती, हें लक्षांत ठेवणें जरूर आहे. बौद्ध धर्माच्या किल्ल्यावर ब्राह्मणी धर्माचा झेंडा फिरून रोंवण्याचा मान शंकराचार्यांना यथायोग्य मिळाला खरा; पण या किल्ल्यातील तटबंदींत खिंडारें पाडण्याचें काम पूर्वींच दुसऱ्यांनीं केलेलें होतें.

बौद्ध धर्माच्या स्वरूपाची खरी परीक्षा करावयाची ती शंकराचार्यांनीं पाडाव केलेलें बौद्धमत व बौद्धाचार यांजवरून करावयाची नसून, खुद्द बुद्ध किंवा अशोक यांच्या वेळीं शंकराचार्यांच्या तोडीचे बुद्धिमान ब्राह्मण त्या मतास येऊन मिळाले व त्यांनीं बौद्ध दीक्षा घेतली, यावरूनच करावयाची आहे.

कसेंहि असलें तरी बौद्ध व ब्राह्मण यांची पांचव्या सहाव्या शतकांत भांडणें झालीं तीं त्या काळास योग्य होतीं. आज तीं भांडणें उसनी घेऊन भांडण्याचें किंवा त्याविषयींचें त्या काळचें वैषम्य आज आपण मनांत बाळगण्याचें कारण राहिलेलें नाहीं. शिवाय बौद्ध धर्माच्या पुनरुज्जीवनाचें धोरण, आजचा ब्राह्मणवर्ग जशा प्रकारचा धर्म प्रत्यक्ष पाळतो, त्याच्याशीं बरेंच जुळून आहे. बौद्धधर्मासंबंधानें लौकिक स्वरूपाचे कांहीं आक्षेप पुढें आणण्यांत येतात. कोणी म्हणतात, बौद्धमत हें क्षात्रगुणांचा नाश करणारें आहे. शांतिब्रह्मपद पावण्याची हांव धरणें म्हणजे सर्व प्रकारच्या ऐहिक महत्त्वाकांक्षेस रजा देण्यासारखें आहे. आमच्या मतें हा आक्षेप बरोबर नाहीं. बौद्धधर्माच्या वेळीं जितकें राजकीय स्वातंत्र्य आम्हांस होतें, तितकें बौद्धधर्माचा समूळ उच्छेद झाल्यावर आपणांमध्यें फार तर पांचसहाशें वर्षें टिकलें; व तेव्हांपासून आज हजार वर्षें म्हणजे ज्या कालांत आमच्या राजकीय स्वातंत्र्यावर वारंवार घाले पडले त्यावेळीं आम्हीं बौद्धधर्माचे कोठें अनुयायी होतों ? एकोणिसाव्या शतकाच्या प्रारंभीं इकडे आपण कडकडीत ब्राह्मणधर्म पाळीत असतां आपलें राज्य कां गेलें ? बौद्धधर्माचा उत्कर्ष शिखरास पोहोंचला होता अशा काळीं अशोक हा सर्व हिंदुस्थानावर साम्राज्य कसें करतां झाला; व आज जेथें जो कांहीं धर्म म्हणून आहे तो बौद्धधर्मच अशा जपानानें एवढें राजकीय यश कसें मिळविलें ? या निरनिराळ्या प्रश्नांचीं उत्तरें देतांना बौद्धधर्म हा क्षात्रगुणविध्वंसक आहे, या आक्षेपास उत्तर सहजच मिळणार आहे. तात्पर्य, बुद्धजयंतीसारख्या प्रसंगीं गौतमबुद्ध या अवतारी पुरुषाचे व त्याच्या विशिष्ट मताचे खरे गुण कोणते आहेत हें पाहणें व त्यावर नसते दोषारोप न करणें हेंच अधिक श्रेयस्कर होईल. कांहीं झालें तरी बौद्ध धर्म ही शाखा व ब्राह्मणी धर्म ही शाखा या दोन्ही एकाच भारतधर्मवृक्षाच्या खोडापासून निघाल्या

आहेत, व यामुळें ख्रिस्ती व महमदी धर्मापेक्षां तोच आपणास अधिक जवळ आहे. या दृष्टीनें या दोन धर्माहून बौद्ध धर्मावरच आमचें ममत्व विशेष असलें पाहिजे.

---

# ८३. जगद्गुरूंची गादी

( तारीख २६ सप्टेंबर १९११ )

गेल्या गुरुवारीं जगद्गुरु श्रीशंकराचार्य यांचें आगमन पुण्यास झालें त्या प्रसंगीं नागरिकांनीं त्यांचें योग्य स्वागत करून आपली धर्मबुद्धि प्रदर्शित केली. आजच्या पिढीच्या आठवणींत संकेश्वरकर मठाधिपतींची पुण्यास येण्याची ही तिसरी खेप होय. पहिली खेप सुमारें ४० वर्षांपूर्वी झाली. त्या वेळची आठवण ज्यांना आहे त्यांच्या सांगण्यावरून पाहतां तो थाट कांहीं अपूर्वच होता. श्रीमंत पंतप्रतिनिधी व श्रीमंत पंतसचीव हे खासे अनवाणी पालखीबरोबर चालत होते. या समारंभाच्या तुलनेनें पुढील दोन खेपेस झालेले समारंभ कदाचित् थोडे फिके वाटले असतील यांत शंका नाहीं. तथापि या स्थित्यंतरास धर्मबुद्धीच्या जागरूकतेपेक्षां इतर परिस्थितीच थोडीबहुत कारणीभूत असावी असें म्हणण्यास हरकत नाहीं. सुमारें सात वर्षांपूर्वी शंकराचार्यांची स्वारी पुण्यास आली तेव्हां लोकांमध्यें जो उत्साह होता त्याहून आज खचित कमी नाहीं; व तेव्हां श्रींच्या सत्कारार्थ जशी वर्गणी जमली तशी या खेपेसहि निःसंशय जमेल. पण कोणतीहि भावना स्वार्थत्यागानेंच खरी कसोटीस लागते हें जरी खरें असलें तरी ती ओळखण्याचीं अन्य गमकेंहि असतात. या दृष्टीनें पाहतां आचार्यांच्या गादीसंबंधानें इकडील हिंदु लोकांना अद्यापिहि पूर्ण अभिमान व अगत्य वाटतें असें म्हणणें धाडसाचें होणार नाहीं. याचें मुख्य कारण हेंच कीं, आचार्यपीठाची पूर्वपरंपरा उज्ज्वल व अभिमानास्पद आहे; परिस्थितीमुळें येणारा कमजास्तपणा किंवा होणारा चढउतार लक्षांत घेतला तरी ह्या संस्थेची परंपरा पुढें सतत चालावी अशी लोकांची मनापासून

इच्छा आहे; आणि अशा प्रकारची आकांक्षा सफळ होणें ही गोष्ट इतिहास व युक्तिवाद या दोहोंनाहि धरून असल्याची मनास खात्री पटते. आजमितीस गादीची स्थिति खालावलेली दिसण्यासारखी आहे यांत शंका नाहीं. ज्या धर्मसंस्थेच्या आत्म्यास व्यावहारिक उपाधींचा दोष जडत गेल्यामुळें गादीच्या अधिकारास निर्जीवपणा व कर्तव्यबुद्धीस मलीनता येते, तिच्या शिष्यवर्गाचा अगत्यवादहि कांहींसा शिथिल पडावा हें स्वाभाविक व अपरिहार्य होय. जशीं राष्ट्राच्या सांसारिक इतिहासांत तशीं त्याच्या धार्मिक इतिहासांतहि युगांतरें होत असतात. तथापि, बाह्य स्वरूप जरी निरनिराळ्या वेळीं निरनिराळ्या स्वरूपाचें भासलें तरी, जरेंतूनच फिरून तारुण्य मिळविण्याची धर्मबुद्धीस जी अलौकिक शक्ति आहे तिच्यामुळें तिचा कायम नाश असा केव्हांहि होत नाहीं. प्रकाश व उष्णता यांची गती आंदोलनाकृती म्हणजे लाटाकृती असल्याचें भौतिकशास्त्रानें सिद्ध झालेलें आहे; आणि धर्मबुद्धीहि उष्णता व प्रकाश यांच्याप्रमाणेंच चित्शक्तीची एक कला असल्यामुळें तिचीहि गति आंदोलनात्मक असावी असें अनुमान सयुक्तिकच होईल. धार्मिक भावना ही प्रवाहपतित असली तरी नदीच्या धबधब्याप्रमाणें प्रतिक्षणीं उत्तरकालीं अधिकाधिक अधोगति पावणारीच असते असें नाहीं. धर्मबुद्धीच्या ऱ्हासाची तक्रार आजकालची का आहे? प्रत्येक युगांत व प्रत्येक पोटयुगांत जुन्या पिढीनें नव्या पिढीविषयीं अशीच तक्रार केलेली आढळते. पण एक तर ऐतिहासिकदृष्ट्या धर्मबुद्धीच्या सतत अधोगतीची तक्रार खोटी ठरते; शिवाय परमेश्वरास जर न्यायी म्हणावयाचें तर खऱ्या धर्मबुद्धीचा सर्व सांठा कोणा एका जुन्याकाळीं विशिष्ट पिढीपुरताच निर्माण करून त्याच्या उपभोगाचा मक्ता त्या युगांतील लोकांसच देवानें दिला होता, आणि—मृत्युपत्रानें वारसाईचा हक्क समूळ रद्द करणाऱ्या श्रीमंत पण स्वेच्छाचारी बापाच्या अभागी मुलाप्रमाणें—आमच्या या नवीन पिढीच्या वांटयास धर्मबुद्धीच्या दैवीसंपत्तीचा एक अंशहि न आल्यामुळें तिला भीक मागत उपाशी फिरणें भाग पडलें आहे, असें म्हणणें सर्वस्वीं अप्रयोजकपणाचें होईल.

ईश्वरविषयक आदरबुद्धीच्या खालोखाल गुरुविषयक आदर येतो, पण तोहि ईश्वरविषयक पूज्यबुद्धीप्रमाणेंच नित्य व सनातन आहे. गुरुमहात्म्य-

वर्णनांत साधुसंतांनीं क्वचित् प्रसंगीं गुरूस परमेश्वराच्याहि वर नेऊन बसविलेलें आढळतें. चरित्रवर्णनकार नेहमीं करतात तशा प्रकारचीच जरी ही एक अतिशयोक्ति असली तरी, ईश्वरास मिळणारा मान व उपचार मनुष्यमात्र गुरूस आजवर देत आले आहेत यांत शंका नाहीं. आपल्या अंगचे दोष व अपूर्णता यामुळेंच दुसऱ्याच्या अंगचे गुण व सापेक्ष पूर्णता यांजविषयीं मनुष्यास आदर वाटतो म्हणून म्हणा—किंवा जगांत जें जें विभूतिमत् सत्त्व निर्माण होतें त्याच्या अंगीं सामान्य जनांस अंकित ठेवून त्यांजकडून सेवा घेण्याची शक्ति स्वभावसिद्धच असते म्हणून म्हणा, सेव्य-सेवक भाव हाच सर्व व्यवहारास अधिष्ठानभूत होऊन राहिला आहे. याच्यामुळेंच राजे निर्माण होऊन अधिकार चालवितात; आणि धर्मगुरु हे पीठें व परंपरा स्थापित करूं शकतात. पण या दोहोंत राजपरंपरेपेक्षां हीच अधिक टिकाऊ आहे असें आढळून येतें, व मानवी धर्मबुद्धीवरील सतत अधोगतीचा आरोप खोटा ठरविण्यास हा एक उत्कृष्ट पुरावा आहे. क्षात्रतेज किती झालें तरी भौतिक उपाधीवरच अवलंबून राहतें व म्हणून तें ब्रह्मतेजाहून अधिक डळमळीत असतें. धर्मगुरूंच्या गादीचा पाया मुख्यतः मनुष्यमात्राच्या अंतःकरणांत असतो; आणि भौतिक उपाधी त्याला अवश्य नसतात, इतकेंच नव्हे तर त्यांच्या योगानें धर्मपीठाच्या सुवर्णास हिणकसाचा डाग लागतो. दोहोंच्या सापेक्ष कमी अधिक टिकाऊपणाचें हेंच कारण होय. युरोपांत ख्रिस्तानंतर सुमारें ४० वर्षांनीं पीटर यानें जें धर्मपीठ रोम येथें स्थापित केलें त्याच्या एकोणिसशें वर्षांच्या इतिहासांत उत्कर्षापकर्षांचीं, चढउतारांचीं, भलेबुरेपणाचीं दहा वीस युगांतरें होऊन गेलीं तरी तें पीठ व त्याची परंपरा अद्यापि कायम आहे. उलट रोमच्या राजधानींत त्याच अवधींत किती निरनिराळीं राजकुलें होऊन गेलीं याची गणती करणेंच बहुधा कठीण. गेल्या ५०-६० वर्षांत प्रॉटेस्टंट धर्मपंथानें कांहीं विशेष दिग्विजय केलेला नाहीं; आणि या ५०-६० वर्षांपूर्वी या ख्रिस्ती धर्मगुरुसंबंधानें लिहितांना मेकॉले यानें असें जोरानें प्रतिपादिलें आहे कीं, रोमन क्याथॉलिक चर्च म्हणजे रोम येथील धर्मगुरुंचा सांप्रदाय क्षीण झालेला नसून उलट तो सतेज व पुष्टच झाल्यासारखा दिसतो. तीच गोष्ट आमच्या धर्मगुरुंच्या गादीची आहे.

आद्य शंकराचार्यांनीं मठांची स्थापना केल्यास जवळ जवळ १२०० वर्षें झालीं! या अवधींत राजकीय सत्तेच्या वाळूचे प्रचंड पर्वत दैवगतीच्या झंझावातानें इकडचे तिकडे करून टाकले. पण भरतखंडाच्या चार कोपऱ्यांत, केवळ सुईच्या अग्रावरील मातीप्रमाणें अल्पाधार अशा अधिष्ठानावर त्या महात्म्यानें रोवलेले आचार्यमठाचे हे अंकुर १२०० वर्षांच्या वावटळांस न जुमानतां व त्यांना तोंड देऊनहि अद्याप जिवंत राहिले आहेत; आणि ते यथाकालीं पल्लवितहि होतात. या १२०० वर्षांत लहानसहान राजकुलें तर राहोतच, परंतु हिंदु, मुसलमान व आंग्ल अशा तीन प्रचंड व सर्व भरतभूमीस आक्रमिणाऱ्या राजक्रांत्या होऊन गेल्या. राज्यैश्वर्याचे उल्कापात तर नित्य चाललेच होते; परंतु राजसत्तेचे सूर्यचंद्रहि नाहींसे झाले! तथापि श्रीशंकराचार्यांनीं स्थापिलेल्या मठांच्या मशाली मिणमिण कां होईनात, पण अजून पूर्वीच्या त्याच पाजळत व प्रकाश देत आहेत! हा कांहीं अंशीं लोकोत्तर चमत्कार नव्हे काय? व या चमत्कारास धर्मबुद्धीच्या नित्यत्वाखेरीज दुसरें कारण कोणतें असणार? या मठांनीं फौजा बाळगिल्या नाहींत, लढाऊ जहाजें बांधिलीं नाहींत, स्वाऱ्या लढाया केल्या नाहींत, तहनामे गुंफले नाहींत, फार काय पण पेढ्याहि वसविल्या नाहींत! तथापि मठांची परंपरा केव्हांहि नष्ट झाली नाहीं!

पण धर्मपीठांच्या चिरस्थायित्वासंबधानें रोमच्या गादीपासून जसा आपणास बोध मिळेल, तसाच धर्मपीठांविषयीं अश्रद्धा उत्पन्न होण्यास-किंवा त्यांची उपयुक्तता आणि लोकप्रियता वास्तविक आहे याहूनहि अधिक असावी तशी ती नसण्यास काय काय कारणें घडूं शकतात, याचाहि बोध आपणास मिळण्यासारखा असून तो घेणें आजच्या काळीं जरूर आहे. रोमची गादी स्थापित झाली तेव्हां ख्रिस्ती धर्मगुरुंच्या अंगीं जें वैराग्य व जो करारीपणा होता तो पुढें फार काळ टिकला नाहीं. तिसऱ्या चवथ्या शतकांत ख्रिस्ती धर्माचा छळ होण्याचें थांबलें. पण हा छळ थांबून स्वस्थता व शांतता येतांच पोपची गादी हें एक संस्थानच बनूं लागलें. धर्मगुरुंना नुसत्या धार्मिक सत्तेचीच नव्हे तर ऐहिक संपत्ती व बडेजाव यांचीहि हाव सुटली. धर्मदंडाचा मार राजदंडापेक्षांहि अधिक लागण्याचा तो जुना काळ असल्यानें, पोप लोकांनीं बहिष्काराचा उपयोग मनमुराद

केला, आणि राजकारणांतील शिरजोरपणाची हौस फेडून घेतली. पारमार्थिक कल्याणाच्या भांडारखान्याच्या किल्ल्या कमरेस लावून त्यांचें समाधान झालें नाहीं. पराक्रमी चक्रवर्ती राजांनीं दिग्विजय केला तरी, धर्मगुरूंच्या वरदहस्तानें आपल्या अंगाला अभ्यंगस्नान घडल्याशिवाय व मस्तकावर मुगुट चढल्याशिवाय आपण खरे कृतकृत्य होत नाहीं अशा प्रकारची भावना भोळे किंवा कपटी क्षत्रिय राजे दाखवीत गेल्यानें धर्मगुरुंना सहजच अहंकार उत्पन्न झाला. पृथ्वीवरील ईश्वराचे आपण प्रतिनिधी आहों अशा आढ्यतेच्या भावनेनें राजे लोकांस पृथ्वीचीहि वांटणी करून देण्याचा अधिकार त्यांनीं आपल्या हातीं घेतला. शास्त्रीय ज्ञानाचा प्रदेश खालसा करण्याकरितां त्यावर त्यांनीं स्वारी केली. खगोलस्थ ग्रहांनीं कोणत्या कक्षेंत कसें फिरावें याविषयीं आमचा परवाना काढला पाहिजे, असा हुकूम जरी पोप महाराजांनीं कधीं फर्माविल्याचें ऐकिवांत नाहीं, तरी सूर्य पृथ्वीभोंवतीं न फिरतां पृथ्वीच सूर्याभोंवतीं फिरते असें मत प्रतिपादन करण्याबद्दल त्यांनीं ग्यालिलियोस तुरुंगवास घडविला हें तरी निर्विवाद आहे. सरहद्दीबाहेरच्या प्रांतांत इतकी ढवळाढवळ करणारांनीं स्वराज्यांत नुसता धुमाकूळ माजवून दिल्यास त्यांत काय आश्चर्य ? खिस्त हा ईश्वराचा मानसपुत्र आणि रोमच्या गादीचा पहिला अधिकारी खिस्ताचा पट्टशिष्य; तेव्हां परंपरेच्या साखळीच्या एका टोंकास ईश्वर व दुसऱ्या टोंकास आपण स्वतः असा युक्तिवाद त्यांनीं केल्यास नवल कोणतें ? मोक्षाचा मक्ता तर त्यांना ईश्वरी सनदेनेंच मिळालेला होता, अर्थात् त्यांनीं मोक्षपदवीच्या पायऱ्या आणि चलनी नाण्यांचें कोष्टक यांचा मेळ घालून दिला. पोपच्या तिजोरींत मोहरा पडल्याबरोबर 'पेनी इन दि स्लॉट' यंत्राप्रमाणें स्वर्गद्वारकपाटाशीं दिव्य घटानाद व्हावा व तेथून मुक्तीचा परवाना सुटून पापी आत्म्याच्या ओंजळींत येऊन अचुक पडावा अशी कांहीं विलक्षण तारायंत्राची योजना पोपमहाराजांनीं केली होती ! पापापासून मुक्तता होणारांना ही सोय ठीकच होती. पण पुण्यवान निरुपद्रवी शिष्यवर्गाच्या मागचीहि धर्मगुरूंची उपाधी सुटत नसे. बायबलाचे देशी भाषेंत नुसतें भाषांतर करणारासहि देहांत शिक्षा व अधोगतीचा दंड होत असे. आणि धर्मवेड्या माथेफिरूंनीं पोपास विरोध करणाऱ्या प्रबळ राजांचा खून केला

असतां हे धर्मगुरु तें अवतारकृत्य मानीत व अशा कृत्यांचें अभिनंदनार्थ देवळांचीं शिखरें पाजळीत ! कित्येक पोप तर धर्मशास्त्रापेक्षां कामशास्त्रांतच अधिक प्रवीण होते असें म्हणतात; आणि मध्ययुगांतील युरोपच्या इतिहासांत, कोणा एका पोप महाराजांच्या गुप्त संततीनें केलेल्या अमानुष कृत्यासारखीं भयंकर व खंतिकारक कृत्यें रेनॉल्डच्या कादंबऱ्यांतहि वाचावयास सांपडत नाहींत.

पोपमहाराजांच्या गादीचे तुकडेहि होण्याच्या वेळा आल्या होत्या. अकराव्या शतकांत कांहीं दिवसपर्यंत एका पोपाचे तीन पोप झाले होते; व चवदाव्या शतकाच्या अखेरीस सुमारें ४० वर्षेंपर्यंत रोम येथें एक गादी व ॲव्हिगनॉन येथें एक गादी असे प्रत्यक्ष दोन तुकडे पडून शिष्यवर्गांना शुभाशीर्वाद देण्याचें गादीचें काम बाजूस राहून, या दोन धर्मगरूंनीं परस्परांवर शिव्याशाप बहिष्कार यांची नुसती धुळवड चालविली होती. पूर्वीं पोपमहाराज जसें आपलें वर्चस्व कायम राहण्याकरितां राजे लोकांत कलागती लावून देत त्याचप्रमाणें युरोपांतील राजे लोकांनींहि कांहीं काळ धर्मगुरूंच्या या दोन शकलांचे झुंज लावून दिलें होतें. एका पोपच्या बाजूस इंग्लंड, जर्मनी, इटली, हंगेरी वगैरे राष्ट्रें असून, तोतया धर्मगुरूच्या बाजूस फ्रान्स, स्पेन, स्कॉटलंड वगैरे राष्ट्रें होतीं. पण अखेर पंधराव्या शतकाच्या प्रारंभीं पिसा येथें सर्व राष्ट्रीय ख्रिस्ती परिषद भरून तिनें दोघांहि धर्मगुरूंना पदच्युत केलें आणि नवीनच एक पोप निवडून गादी पुढें चालविली, म्हणून ती टिकली. या भांडणाच्या काळांत ‘ दोघे कुत्रे एकाच हाडकांकरितां भांडतात तसे हे दोन पोप अधिकाराकरितां भांडत होते ’ असें ख्रिस्ती ग्रंथकारांनींच वर्णन केलें आहे. पण स्वतः धर्मगुरू व त्यांचे असत् शिष्य यांच्या आंगीं समंजसपणा राहिला नाहीं असें पाहून समाज जातीनें मध्यें पडला; आणि पोप निवडण्यास नवीन मतदार संघ व नियम यांची रचना त्यांनीं केली, यामुळें गादी बचावली. एकोणिसाव्या शतका अखेरपर्यंत राजकीय अधिकाराची पोपमहाराजांची हाव समूळ नष्ट झाली नव्हती, आणि इटालिअन राष्ट्रास स्वातंत्र्य व स्वराज्य मिळण्याच्या बाबतींत रोमच्या धर्मपीठाकडून कांहीं थोडा अडथळा झाला नाहीं ! पण त्यानंतर अलीकडे या धर्मपीठाची ऐहिक व राजकीय सत्तेची

बहुतेक सर्व उपाधी परेच्छेनें कां होईना पण नष्ट झाल्यामुळें गादीशीं विरोध करण्याचीं कारणें लोपलीं; आणि गादीविषयीं ख्रिस्ती समाजामध्यें पूर्वींहून थोडासा अधिकच अगत्यवाद उत्पन्न झाल्याचीं चिन्हें दिसत आहेत !

ऐहिक गोष्टींविषयीं सर्वस्वीं वैराग्य दाखवून केवळ समाजाच्या पारमार्थिक कल्याणवृद्धीकडे धर्मगुरू लक्ष घालूं लागल्यास त्यांच्या हातीं केवढी प्रचंड सत्ता आपोआप येते, हें युरोपांतील पोपच्या गादीप्रमाणें आपल्याइकडील धर्मपीठांच्या उदाहरणांवरूनहि कळून येण्यासारखें आहे. साधूसंतांसारखे फटिंग लोक समाजास जितका अधिक दूर लोटतील तितका समाज आपण होऊन अधिक जवळ येतो, हें नेहमींच आढळतें. तसेंच खुद्द आद्य श्रीशंकराचार्यांना सर्व भरतखंड वश होऊन मठसंस्थापना करतां आली ती वैराग्यपूर्ण अशा कडकडीत संन्यासाच्या बळावरच. सुदैवानें ख्रिस्ती धर्मपीठापेक्षां आमच्या धर्मगुरूंच्या मठास राजकीय उपाधीची जोड एकंदरीनें कमी झाली असल्यामुळें, त्यांच्या परंपरेच्या इतिहासप्रवाहांत रोमच्या गादीच्या इतिहासाहून गढूळपणा कमी आहे. गेल्या १२०० वर्षांत, म्हणजे आद्य श्रीशंकराचार्यांनीं दिग्विजय करून मठांची संस्थापना केल्यापासून दरम्यान, माधवाचार्य ऊर्फ विद्यारण्य यांसारखे केवळ सर्वज्ञ व प्रतिशंकराचार्यच असे उज्वल कीर्तीचे आचार्य होऊन गेले आहेत; आणि ऐहिक उपाधींत न गुरफटतां केवळ सद्धर्मप्रवर्तनावर नजर ठेवून चालल्यास हे मठ व ह्या गाद्या पुढेंहि शेंकडों वर्षें टिकतील, आणि मधून मधून तरी अलौकिक व्यक्ती गादीवर येऊन पूर्वींची उज्वल परंपरा कायम ठेवतील, अशी अभिमानपूर्ण उमेद बाळगण्यास हरकत नाहीं. कोणत्याहि धर्मांतील मनुष्यास ईश्वरापाशीं जाण्यास धर्मगुरूची मध्यस्थी नको असली तरी, समाजामध्यें विशिष्ट धार्मिक आचार व विचार कोणत्याहि नियमांनीं कां होईना परंतु चालू राहाण्यास एखादी मध्यवर्ती सुव्यवस्थित घटना असल्याशिवाय भागत नाहीं. थिऑसफिकल पंथ झाला तरी त्यास सोसायटी, प्रेसिडेन्ट, सभासद या गोष्टी लागतातच. आर्यसमाजानें तर हें घटनेचें तत्त्व कबूल करून यशस्वीहि करून दाखविलें आहे. प्रार्थनासमाजास सुद्धां घटनेची आवश्यकता

भासते; व सर्व परंपरा सोडून देणाऱ्या ब्राह्मसमाजासहि अध्यक्ष, प्रचारक वगैरे सर्व सोंगें लागतातच. समाजाच्या धार्मिक व सामाजिक आचारविचारांत यथाकाल योग्य सुधारणा होणें इष्ट असतें. पण त्या घडवून आणण्याच्या सुधारकी दृष्टीनेंहि धर्मपीठांची आवश्यकता आहेच आहे. कोणच्या म्हणून धर्माचारांचें कसलेंच बंधन न मानतांहि समाजांत मनुष्य नांदूं शकतो, नाहीं असें नाहीं. पण हें वर्णन लागू पडणाऱ्या व्यक्ती केव्हांहि फारच थोड्या असतात. बहुजनसमाजास नियमबद्धता प्रायः आवडते; आणि ज्याच्यावर आपली श्रद्धा आहे असा कोणी तरी मार्गदर्शक असल्याशिवाय त्यांचें चालत नाहीं. या दृष्टीनें पाहतां, ऐहिक उपाधींचा संसर्ग तोडून टाकून धर्म व विद्या यांच्याच केवळ परिपोषाकडे लक्ष घालणें हें जसें आमच्या धर्मपीठांचें आजचें कर्तव्य आहे, तसेंच हीं धर्मपीठें संभाळून ठेवणें व त्यांची परंपरा अखंड चालूं देणें हेंहि समाजाचें कर्तव्य आहे. शांकरदिग्विजयांतील कथा सर्वांस माहित आहेच. शंकराचार्य व मंडनमिश्र यांच्या वादानंतर श्रीशारदेनें कांहीं सांसारिक सवाल टाकल्यावरून आचार्यांनीं अमरक राजाच्या मृत शरीरांत प्रवेश केला; तेव्हां तो पवित्र आत्मा फिरून स्वदेहांत प्रविष्ठ व्हावा म्हणून आचार्यांच्या मृत शरीराचें रक्षण शिष्यांनीं जसें आस्थेनें केलें, तसेंच पुढील आशेवर भिस्त ठेवून आचार्यांच्या पीठांचें रक्षण करणें हें आजच्या शिष्य समाजाचें कर्तव्य आहे यांत शंका नाहीं. संस्था राहिल्यास तिची सुधारणा होईल व तिजकडून चांगलें कार्य होईल, अशी आशा तरी बाळगितां येईल.

---

# ८४. कानपूर येथील अ. भा. हिंदु-महासभा १९२६

( अध्यक्षीय भाषण. )

हिंदु-महासभेच्या या अधिवेशनाचें अध्यक्षस्थान मला देऊन आपण जो माझा सन्मान केला त्याबद्दल मी आपला आभारी आहें. या मानाचें केवळ मानाकरितां मला महत्त्व वाटत नसून आजकाल आपण

ज्या ज्ञातिविशिष्ट वादांत इच्छेनें वा अनिच्छेनें सांपडलों आहों, त्याविषयीं माझें मत सांगण्याची संधि मला त्यामुळें मिळाली या दृष्टीनेंच मी त्याला महत्त्व देतों. जातिविषयक भावनेला सहसा बळी पडणाऱ्यांतला मी नाहीं.

कोणत्याहि एकाद्या विशिष्ट ज्ञातीच्या प्रगति-परागतीपेक्षां देशाची राजकीय प्रगति मी जास्त महत्त्वाची समजतों. किंबहुना एका आयरिश कवीनें म्हटल्याप्रमाणें, खांद्यास खांदा लावून देशासाठीं लढणाऱ्या माझ्या शूर सोबत्याला आपलीं धर्ममतें जुळतात का असें विचारणें न्याय्य होईल का? किंवा माझ्या विश्वासू व पुरातन मित्राचा व आमचा देव वेगळा आहे येवढ्यासाठीं त्याचा त्याग करणें न्याय्य होईल काय? मी जातिद्वेषाच्या धुळवडींत मनापासून रंगलों आहें असें समजणाऱ्या माझ्या टीकाकारांस या माझ्या वृत्तीवर विश्वास ठेवा असें सांगणें मोठेंच धाडसाचें आहे. पण त्यांचें मत कांहींहि असो, माझी स्वतःची मनोवृत्ति स्पष्ट करून सांगणें हें माझें स्वतःसंबंधींचें कर्तव्य आहे असें मी समजतों. कोणत्याच तऱ्हेची जातिविषयक चळवळ देशांत असूं नये असें माझें व्यक्तिशः मत आहे. परंतु देशांत आज जी निष्ठुर परिस्थिति उद्भवली आहे तिजकडे दुर्लक्ष करणें गुन्हा ठरेल. मोठ्या चमत्काराची गोष्ट ही कीं, राजकीय सुधारणा दृष्टिपथांत येऊं लागतांच समाजांत ज्ञातिविशिष्ट मध्ययुगीन भावना प्रादुर्भूत झाल्या! विशेष खेदाची गोष्ट ही कीं, अज्ञानी लोकांत धर्मवेडाच्या लहरींनें जे दंगे होतात ते चिरस्थायी असत नाहींत; पण सुशिक्षित लोकांत शिक्षणाचा परिणाम म्हणूनच कीं काय कोण जाणे, या धर्मवेडाला शाश्वत कलहाचें स्वरूप येतें! शिक्षणाचा उपयोग धर्मद्वेषाच्या व जातिद्वेषाच्या भावनांना बौद्धिक आधार शोधण्यांत व्हावा हा एक मानसशास्त्रवेत्त्यांनीं विचार करण्यासारखाच प्रश्न आहे.

पण हा प्रश्न वाटतो तितका कांहीं गूढ नाहीं. थोडा खोल विचार केल्यास लगेच समजून येईल कीं, राष्ट्रीय समष्टीची जाणीव उत्पन्न होण्याला ज्ञातिविशिष्ट भावनांमधून समाजाला जाणें अवश्यच आहे. ज्ञातिविषयक जागृति ही राष्ट्रीय बुद्धि जागृत झाल्याचें द्योतक आहे असेंच मी म्हणेन. अगदीं सामान्य मनुष्याला देखील राजकीय हक्क व सवलतींचे फायदे दिसूं

लागल्यामुळें प्रत्येकाला आपल्या धर्माची व ज्ञातीची साहजिकच आठवण झाली. कारण त्यांतच आमच्या समाजाची बळकटी आहे असें वाटूं लागलें.

धार्मिक चळवळीचा जो इतका गाजावाजा आपण ऐकतों त्याच्या बुडाशीं पारलौकिक मुक्ति हा हेतु नसून ऐहिक सुखाची इच्छाच असते असें मी तरी म्हणेन. यांत कोणाहि धार्मिक माणसाचा अपमान करण्याचा माझा उद्देश नाहीं. माझें म्हणणें असें कीं, परमेश्वरप्राप्ति ही एकांतांत ध्यान करून कोणीहि साध्य करून घेईल. परंतु ऐहिक सुखसाधनांत आपल्या भागीदाराशीं जेव्हां संबंध येतो तेव्हां त्याच्यापुढें या जातिविषयक चळवळीचा देखावा करणें जरूर असतें. देशाच्या राजकारणावर जातिविषयक वादाची जी छाया पडलेली दिसते तिची उपपत्ति माझ्या मतानें अशी आहे. माझें हें म्हणणें कित्येकांना अगदींच कुत्सितपणाचें वाटेल. त्यावर माझा खुलासा असा कीं, मी हल्लींच्या जातिविषयक जागृतीची एकच बाजू—एक क्षणिक स्वरूप—येथें मांडलें आहे. केवळ धर्माकरितांच धर्मप्रसार करणारीं निःस्वार्थी माणसें असूं शकतात हेंहि मी जाणून आहें. रोमन बादशाहीच्या वेळचे अशा प्रकारचे ख्रिश्चन मिशनरी व इंडो-चायना व सिलोन इतक्या लांबवर बुद्धधर्माचा प्रसार करण्याकरितां गेलेले बुद्ध मिशनरी हीं पूर्वकालीन उदाहरणें आहेत. स्वामी विवेकानंदासारखे हिंदु मिशनरी कोणत्याहि ऐहिक फायद्याचा हेतु मनांत न धरतां, केवळ हिंदुधर्माच्या अद्वैत तत्त्वज्ञानाचें वैभव पटविण्यासाठीं अमेरिकेस गेलेले होते. मोंगल बादशहांच्या वेळीं शिखांनीं चालविलेला लढा अशाच केवळ धार्मिक स्वातंत्र्याकरितां होता. दिल्लीच्या राजदरबारीं राजकीय मानमरातब किंवा हक्क मिळवावे हा कांहीं त्यांच्यापुढें प्रश्न नव्हता. तसेंच प्युरिटन लोक ‘ मेफ्लॉर ’मध्यें बसून अमेरिकेस गेले तेहि तेथें कांहीं जास्त सुखसाधनें त्यांच्याकरितां वाढून ठेवलीं होतीं म्हणून गेले नव्हते, तर तेथें तरी पूर्ण धार्मिक स्वातंत्र्य मिळेल अशाच बुद्धीनें ते गेले. सारांश, केवळ धार्मिक भावना एखाद्या मनुष्यांत किंवा समाजांत असूं शकते. पण आज जी जातिविषयक चळवळ हिंदुस्थानांत चालू आहे ती मात्र या शुद्ध स्वरूपाची आहे असें मी म्हणूं शकत नाहीं. फार तर इतकें म्हणतां येईल कीं, खरी खरी धार्मिक भावना राजकीय भावनेहून भिन्न आहे. पण इन्द्रधनुष्यां-

तील रंगाप्रमाणें त्या वेगवेगळ्या दिसत असल्या तरी आजच्या स्थितींत त्या एकमेकींत इतक्या मिसळल्या आहेत कीं, प्रत्येकीची निरनिराळी सीमान्तरेषा ठरवितां येत नाहीं.

प्रस्तुतच्या जातिविषयक वादांत मुख्यतः तीन समाज सामील आहेत. प्रत्येक समाजापुढें त्याच्या कांहीं विशिष्ट अडचणी आहेत. मात्र या कलहांत कोणी कोणाची भूमिका घेतली आहे हें समजण्यासाठीं थोडा खोल विचार केला पाहिजे.

प्रथम हिंदी–ख्रिश्चन समाज विचारांत घेऊं. यांत ॲंग्लो–इंडियन, खुद्द इंग्रज व नेटिव्ह ख्रिश्चन यांचा अंतर्भाव होतो. पैकीं इंग्रज ह्या देशांत पूर्ण सत्ताधीश असल्यानें ख्रिश्चन धर्मप्रसारानें त्याच्या राजकीय हक्कांत कांहीं भर पडण्यासारखी नाहीं. लष्करी व औद्योगिक वर्चस्वाच्या जोरावर राजकीय सत्ता आपण हातीं ठेवूं शकूं असा त्यांचा विश्वास आहे; आणि या ख्रिश्चन प्रचारकांच्या चळवळीची केव्हां केव्हां त्यांना कीव येते. आपल्या सत्तेच्या जोरावर हिंदुस्थानास इंग्लंडवर औद्योगिक बाबतींत अवलंबून राहण्यास भाग पाडून आपल्या मालाला हिंदुस्थानाची अफाट बाजारपेठ मिळवावयाची व आपल्या जातीचा वरपगडा कायम राखून हिंदी लोकांना अंकित ठेवावयाचें इतकें शक्य झालें तर दहापांच हिंदू ख्रिस्ती धर्मांत आले काय किंवा गेले काय याची पर्वा त्यांनीं कां करावी! त्यामुळें ख्रिश्चन मिशनऱ्यांच्या कार्यपद्धतीविषयीं अनादर व्यक्त करणें त्यांना सोईचें असतें; आणि मिशनरीहि हिंदी जनतेच्या आकांक्षांविषयीं सहानुभूति दर्शवून व पुष्कळ वेळां त्यांच्या चळवळींत भाग घेऊन राज्यकर्त्यांना त्यांच्या अनादराचा मोबदला परत देतात! तरी देखील या इंग्रजांनीं स्वतःला स्वतंत्र प्रतिनिधित्वाचा हक्क राखून ठेवलाच आहे!

ॲंग्लो–इंडियनांबद्दल बोलावयाचें म्हणजे आधीं सरकारी नोकरींतून त्यांची यथास्थित वरणी लागलेलीच आहे. शिवाय इंग्रजांच्या बरोबर त्यांच्या इभ्रतीचा व निर्भयपणाचा अर्धा वांटा त्यांनाहि मिळत असतो. म्हणून ॲंग्लो–इंडियन देखील ज्ञातिविषयक चळवळीबरोबर धर्मवेडाचें विष पसरवीत नाहींत. या बाबतींत नेटिव्ह ख्रिश्चन लोकांची वृत्ति तारीफ करण्या-

सारखी आहे. एक तर ते ख्रिश्चन असल्यानें हिंदू व मुसलमान यांच्यांत त्यांना मिसळतां येत नाहीं व ते हिंदी असल्यानें गोऱ्या लोकांची सत्ता हक्क व सवलती यांचाहि त्यांना फायदा मिळत नाहीं. अशा स्थितींत आपलें संख्याबल वाढविण्याची आकांक्षा त्यांनीं बाळगावी हें स्वाभाविक आहे. तरीपण धर्मप्रसाराच्या बाबतींत इतर धर्मीयांचीं मनें न दुखविण्याची ते खबरदारी घेतात. त्यांनीं एक वेळ स्वतंत्र प्रतिनिधी मागितले असते तरी शोभलें असतें. पण त्यांनीं या मार्गाचें अवलंबन केलेलें नाहीं. बॅ. बॅप्टिस्टा व डॉ. दत्त यांसारखे त्यांचे पुढारी हे नेहमीं राष्ट्रीय भावनेला प्रथम स्थान देतात आणि वैभवसूर्याचा प्रकाश लाभण्याच्या बाबतींत स्वतःच्या योग्यतेवरच भिस्त ठेवतात.

पण या यादवींत पुढाकार घेणाऱ्यांचा उल्लेख करतांना मुसलमानांचा उल्लेख प्रथम करावयास पाहिजे. कारण या भांडणांत इतर जातींपेक्षां त्यांचाच हात अधिक गुरफटलेला आहे. हिंदुस्थान देशांतील सत्तेचा व सामर्थ्याचा विचार केल्यास ते हिंदूंइतकेच दीन आहेत. पण परदेशांत मुसलमानांचीं स्वतंत्र व प्रबल राज्यें अस्तिवांत आहेत आणि त्यांना पाश्चात्य राष्ट्रांकडून आंतरराष्ट्रीय राजकारणांत बरोबरीचा मान मिळतो. या मोठेपणाचीं किरणें येथील मुसलमानांवर पडली नसतीं तर यांना इतकें राजकीय महत्त्व आलें नसतें व यांचा प्रश्न इतका अवघडहि होऊन बसला नसता. हिंदुस्थानांतील नऊ-दशांश मुसलमान मूळचे हिंदूंचेच बाटून मुसलमान झालेले आहेत; व ख्रिश्चन लोकांप्रमाणें ते हिंदुस्थानांत समाधानानें राहिलेहि असते; पण बाहेरच्या मुसलमान राष्ट्रांतील घडामोडीमुळें त्यांच्यांत राजकीय चांचल्य उत्पन्न झालेलें आहे. यांतच मुसलमानी धर्माच्या परधर्मग्रासी वृत्तीची भर पडून परिस्थिति अधिकच नाजूक झाली आहे. मुलुखगिरी व धर्मप्रसार यांचा परस्परपोषक अन्योन्य संबंध मुसलमानांच्या इतिहासाखेरीज इतक्या प्रमाणांत इतरत्र कोठें पहावयास मिळावयाचा नाहीं. हिंदुस्थानांत मुसलमान ही सर्वांत मोठी अल्पसंख्यांक जात होऊन बसली आहे; शिवाय त्यांच्या आकांक्षा त्यांच्या लोकसंख्येच्या प्रमाणाबाहेर आहेत.

कायदेमंडळांतून परिणामकारक प्रतिनिधित्वाची मागणी करतांना

त्यांना केवळ आपल्या भूतकालीन बादशाहीची आठवण होत असून, भावी साम्राज्याचींहि स्वप्नें पडत असतात ! हीं स्वप्नें सरकारला तर विरोधी आहेतच. पण राष्ट्रीयत्वाच्या भावनेला विपरीत असल्यानें हिंदूंनाहि तीं विरोधक आहेत. अंगोरापासून सहारणपूरपर्यंत अप्रतिहत मुसलमानी वर्चस्व असावें असें त्यांना वाटतें, हें कोणालाहि नाकारतां येणार नाहीं. ही हद्द यापुढें लांबविणें हें तूर्त शक्य नाहीं. तरी केमालपाशासारखा मनुष्य जर पाश्चात्य राष्ट्रापासून पराजित तुर्कस्थानाची मुक्तता करूं शकतो तर अफगाणिस्थानासारखें संघटित राज्य हिंदी मुसलमानांच्या पाठीशीं असतांना त्यांना इस्लामचा दिग्विजय अशक्य कां वाटावा? आपलें स्वतःचें वैशिष्ट्य लोकांच्या नजरेंत ठसावें व आपलें सामर्थ्यहि केंद्रीभूत व्हावें यासाठीं मुसलमानांनीं आपले राजकीय हितसंबंध हिंदुस्थानच्या राष्ट्रीय हितसंबंधांपसून अलग केलें आहेत.

आतां हिंदुसमाज देखील आपल्या शुद्धि-संघटनादि चळवळींमुळें या ज्ञातिकलहांत भाग घेतांना दिसतो. पण या बाबतींत त्याचें वास्तविक धोरण काय आहे हें नीट समजून घ्यावयास पाहिजे. हिंदूंनीं केवळ आपल्या हिंदुसमाजासाठीं विशेष सवलतींची मागणी करून देशाच्या राजकारणाचा विचका केला असें कोणासहि म्हणतां यावयाचें नाहीं. हिंदुसंघटनेचा राजकारणाशीं प्रत्यक्ष संबंध कांहींच नाहीं. यावर कित्येकांचा आक्षेप येईल कीं, मतदारसंघ संमिश्र केल्यानें व इतर बाबतींत आहे तीच स्थिति राखल्यानें हिंदूंचें नुकसान कांहींच नाहीं, झाला तर फायदाच आहे. यालाहि असें उत्तर देतां येईल कीं, निदान दोन मोठ्या प्रांतांतून तरी हिंदु अल्पसंख्याक आहेत व सरहद्दीवरील प्रांत व सिंध येथें तर त्यांचे हाल कुत्रा खाणार नाहीं अशी स्थिति आहे. असें असूनहि या प्रांतांतल्या हिंदूंनीं आपण होऊन जातवार-सवलतीची मागणी केली नाहीं; एवढ्यानें तरी हिंदूंच्या राष्ट्रीय भावनेविषयीं शंका घेणाऱ्या कुत्सित आक्षेपकांचें समाधान व्हावें. शिवाय मुसलमानांच्या जातवार प्रतिनिधित्वाच्या मागणीला ते हरकत घेतात ती देखील विशेषतः ती मागणी अवास्तव आहे यासाठींच होय. जातवार प्रतिनिधित्वाचें तत्त्वच जरी त्यांना मान्य नाहीं, तरी पण मुसलमानांच्या समाधानासाठीं सर्व

प्रांतांना लागू पडेल अशी कोणतीहि तडजोड करण्यास ते कबूल आहेत. खरें पाहतां जातवार प्रतिनिधि निवडावयाचें ते मतदारसंघामध्यें त्या ज्ञातीचें जें प्रमाण असेल त्या प्रमाणांतच असावेत आणि मुसलमानांना जातवार प्रतिनिधित्व हवेंच असेल तर तें त्यांच्या मतदारसंख्येच्या प्रमाणांतच असावें असा आग्रह धरणें न्याय्य होईल. तरी देखील दिल्लीच्या ऐक्यपरिषदेंत हा आग्रह सोडून हिंदु पुढारी मुसलमानांना लोकसंख्येच्या प्रमाणांत प्रतिनिधि देण्यास कबूल झाले ! असें करणें म्हणजे वास्तविक अस्तित्वांत नसलेले सार्वत्रिक मताधिकाराचें अत्यंत व्यापक असें तत्त्व आज अंमलांत आणणेंच होय. मुसलमानांना दिलेल्या या सवलतीमुळें दोन प्रांतांत हिंदूंचें कायमचें अल्पमत राहील तरी देखील या अल्पसंख्याकांच्या संरक्षणासाठीं विशेष सवलतीची त्यांनीं मागणी केली नाहीं. हिंदूंचा एकच आग्रह आहे व तो त्यांनीं सोडूं नये मला असें वाटतें कीं, प्रत्येक प्रांतांतून त्या त्या प्रांताच्या विशिष्ट परिस्थितीप्रमाणें मुसलमानांनाच सोईस्कर होईल असा नवा नियम लागू करण्यांत येऊं नये. एकच नियम सर्वत्र लागू केल्यानें दोनहि पक्षांनीं एकमेकांना आपापले बांधव ओलीस ठेवल्यासारखे होतील. पंजाब, सिंध, बंगाल व सरहद्दीवरील प्रांत यांत मुसलमानांना बहुसंख्य असल्याचा फायदा मिळेल तर इतर प्रांतांतून तोच फायदा हिंदूंना मिळेल. एवढ्यानें प्रांतांप्रांतांमधून अल्पसंख्यांकांचा छळ होणार नाहीं याविषयीं हमी मिळाल्यासारखीच होणार आहे.

वरील विवेचनावरून हें समजून चुकलेंच असेल कीं, राजकीयदृष्ट्या दुष्परिणाम होईल असें वर्तन हिंदूंचें मुळींच नाहीं. मग असें कोणी विचारतील कीं, तर मग संघटनेची तरी आवश्यकता काय आहे ! याला उत्तर इतकेंच कीं संघटनेची चळवळ ही राजकारणांत काय किंवा धर्मकारणांत काय केवळ आत्मसंरक्षणाची चळवळ आहे. इतर परधर्मग्रासी धर्मांच्या आकर्षणामुळें हिंदुधर्माला लागलेली ओहोटी थांबविणें इतकाच या चळवळीचा उद्देश आहे. इतर धर्मांप्रमाणेंच हिंदुधर्मालाहि जगण्याचा अधिकार आहे. इतके दिवस हिंदुधर्म एकलकोंडा व अवर्धिष्णु असा राहिला, ही त्याची चूक झाली कीं काय, हा येथें प्रश्न नाहीं. आजहि मोठा जयिष्णु हिंदु देखील पूर्वी कधीं हिंदु नसलेल्या परधर्मीयांना हिंदु

करून घ्यावें असें सरास म्हणत नाहीं. दुर्दैवानें हिंदु मनाला ही कल्पनाच नास्तिकपणाची वाटते. एकलकोंडेपणा हा त्याचा स्वभावच होऊन बसल्यामुळें त्याला हिंदुसमाज संख्येनें फार वाढला तर तो विस्कळित होऊन जाईल अशी भीति पडून आपल्या ऐहिक व पारलौकिक कल्याणासाठीं आपण संकोचवृत्तीचाच अवलंब करावा असें त्याला वाटतें! शुद्धि हा देखील त्यांना धाडसाचाच प्रयोग वाटतो. यापुढें तरी हिंदु परधर्मांत जाऊं नयेत यासाठीं काळजी घेतांना सुद्धां तो आपली पुराणप्रियता सोडीत नाहीं व अस्पृश्य वर्गांना त्यांचे न्याय हक्क देण्यासहि तयार होत नाहीं! यावरून त्याच्या संरक्षणचळवळीची मर्यादा किती संकुचित आहे तें दिसून येतें. असें असून सुद्धां आमच्यांतलेच कांहीं शहाण्यासुरत्या हिंदूंनीं हिंदुधर्माच्या फाजील अभिमानामुळें, हिंदुस्थानाचें राजकारण बिघडविलें असा त्यांजवर आरोप करतात! इतर धर्मांचे लोक नुसतें संघटनच नव्हे तर त्याहिपेक्षां पुष्कळच जास्त भानगडी करीत असतांना हिंदूंनीं मात्र स्वतःच संघटनहि करूं नये हा कोठला न्याय? पण या असल्या साध्या प्रश्नालाहि सरळ उत्तर देण्याची हे टीकाकार तसदी घेत नाहींत. इतर धर्म हिंदूधर्माच्या काळजाला हात घालीत असतांना हिंदूवर मात्र परधर्मीयांच्या पायाला खडे खुपूं नयेत म्हणून पायघड्या घालण्याची जबाबदारी कोणत्या न्यायानें टाकतां? आमच्या या टीकाकारांनीं ख्रिस्ती व मुसलमान मिशनऱ्यांच्या चळवळीच्या निषेधपर चार शब्द तरी काढलेले कोणीहि दाखवून द्यावेत. ज्ञातिविषयक चळवळीचा निषेध करतांना त्यांनीं जर पक्षपात केला नसता तर त्यांचें म्हणणें थोडें तरी विचारार्ह वाटलें असतें. हिंदूंचा क्षणोक्षणीं जीवनऱ्हास होत चालला असतांना हिंदूंच्याच माथ्यावर याच्या सदुपदेशाची शिदोरी कां लादावयाची? मद्रासचे बिशप व्हाईटहेड-साहेब हे सांगतात कीं, हिंदु समाजापासून ख्रिश्चन समाज दोन हजार सावजांचा कर दर आठवड्याला वसूल करीत असतो. मुसलमानी धर्मप्रसाराची अशी विश्वसनीय माहिती मिळूं शकत नाहीं; तरी त्यांच्याहि सावजांची संख्या बरीच मोठी असावी हें आपणास तर्कानें जाणतां येतें. हिंदु प्रजेवर राज्य करणारे मुसलमानी संस्थानिकहि

आपल्या सर्व साधनसंपत्तीसकट या चळवळीचा पाठपुरावा करीत असलेले दिसून येतात.

म्हणून हिंदूंना माझें सांगणें आहे कीं, अशा स्वार्थी टीकाकारांच्या टीकेकडे त्यांनीं दुर्लक्षच करावें. स्वतः आपल्या स्वार्थी चळवळीचा त्याग न करतां हिंदूंच्या देशाभिमानाचा मात्र फायदा घेऊं पाहणाऱ्या या धूर्तांच्या जाळ्यांत हिंदूंनीं सांपडूं नये. आजवर झालेलें नुकसान लक्षांत घेऊन आतां तरी त्यांनीं डोळे उघडण्याचें धैर्य करावें. नांवाच्या स्वराज्या-करितां हिंदूंना आपला धर्म सोडावयाचा नाहीं. परधर्मीयांसाठीं आपण कोठवर आत्मार्पण करावयाचें यालाहि कांहीं मर्यादा असतात. आपल्या मातृभूमींत हिंदू बहुसंख्यांक आहेत हाहि त्यांचा एक गुन्हाच आहे असें मानणारेहि कांहीं टीकाकार आहेत हें पाहून मला आश्चर्य वाटतें ! परधर्मीय लोक हिंदुस्थानांत अल्पसंख्य आहेत हा काय हिंदूंचाच दोष ? आज कल्पनाचक्षूंत येऊं शकणाऱ्या कालमर्यादेंत तरी सध्यांचें प्रमाण उलट होईल असें तरी कोणी सांगूं शकतो काय ? मग या अल्प-संख्यांकांनीं धुसफुसण्याचें सोडून विवेकबुद्धीनें आहे त्याच स्थितींत समा-धान मानावें, यांतच त्यांचें कल्याण आहे. परधर्मीय अल्पसंख्यांकांच्या संरक्षणासाठीं जी कांहीं समंजस तडजोड कोणी सुचवूं शकतील ती कबूल करावयाला हिंदु केव्हाहि तयार आहेत, असें मी त्यांच्या वतीनें आश्वासन देऊं शकतों. परंतु इतरांना हिंदूंचा जर एखाद्या गुबगुबीत शेळीप्रमाणें आहारासाठींच उपयोग करावयाचा असेल तर त्याला मात्र आमची संमति मिळण्याची आशा कोणीं बाळगूं नये हेंहि मी तितकेंच निक्षून सांगतों. आपली आहे ती संस्था हरप्रयत्नांनीं कायम राखण्याचा व झालेलें नुक-सान भरून काढण्याचा हिंदूंचा हक्क इतर धर्मीयांनीं कबूल केला पाहिजे. याहिपुढें जाऊन मी हिंदूंना असें सांगेन कीं, आपल्या धर्माचा अभि-मान तुम्हास असावयास पाहिजे आणि त्याचा प्रसार करण्याची महत्त्वा-कांक्षाहि तुम्हीं बाळगली पाहिजे. पौरस्त्य आर्य–संस्कृतीचे हिंदु हेच रक्षक असून अहिंदूंना त्या संस्कृतीचा लाभ त्यांना हवा असल्यास–करून देणें हें त्यांचें कर्तव्यच आहे, असेंहि म्हणण्यांत अतिशयोक्ति होणार नाहीं. मात्र त्यांना इतकाच इशारा मी देऊन ठेवतों कीं, त्यांनीं खिस्ती व मुस-

लमानी प्रचारकांचे वाममार्ग केव्हांहि अवलंबू नयेत. याविषयीं जास्त कांहीं न बोलणेंच बरें. कपट किंवा जुलूम यासारख्या नीच उपायांचा अवलंब करण्यापेक्षां हिंदुधर्म रसातळास गेला तरी पत्करला. धर्माचें क्षेत्र हें नेहमीं पवित्रच राखलें पाहिजे.

आतां मला एवढेंच सांगावयाचें आहे कीं, हिंदुसंघटनेच्या चळवळीची आवश्यकता ज्यांना पटली आहे अशांपैकीं पुष्कळांना आपल्या मार्गांतील अडचणींची योग्य जाणीव नाहीं. त्यांतहि दुःखाची गोष्ट ही कीं, पुष्कळशा अडचणी आपणच आपल्या कृतीनें उत्पन्न करतों ! हिंदुसमाजानें आपले अंगभूत दोष व आगंतुक अन्याय काढून टाकल्याशिवाय तो संघटित व्हावयाचा नाहीं. संघटन संघटन असें नुसतें म्हणून कांहीं संघटन होत नसतें. हिंदुसमाजाच्या कूर्मवृत्तीमुळें त्यानें आपले अवयव आंखडून घेतले आहेत आणि अंतस्थ रोगांनीं त्याचें शरीरहि पोखरलें गेलें आहे. जातिभेदाचा अतिरेक होतां होतां जातीचा लहानपणा हाच एक अभिमानाचा विषय होऊन बसला आहे ! यामुळें प्रत्येक पोटजाती आपल्यापुरतें पाहूं लागली आहे. पुढारलेल्या वर्गांनीं मागासलेल्या वर्गास दूर ठेवलें व मागसलेल्यांनीं पुनः आपल्यांत भेद पाडून तोच कित्ता गिरविला ! शिवाय हिंदुधर्मांतर्गत निरनिराळ्या पंथांमधील कलहांच्या तीव्रतेमुळें समाजाला बाह्य संकटांचा प्रतिकार करण्याचेंहि भान उरलें नाहीं. द्वैती अद्वैती, व शांकर आणि माध्व, आर्यसमाजी व सनातनी, शाक्त व शैव या सर्वांनीं आपले क्षुद्र मतभेद मिटवून सर्वांवर कोसळूं पाहणाऱ्या संकटाला तोंड दिलें पाहिजे. इतर उपऱ्या धर्मपंथांपेक्षां स्थानिक हिंदुसमाजाचे हितसंबंध हिंदुस्थानाच्या भाग्याशीं अधिक निगडित झाले आहेत.

खिलाफतीवरील संकटाच्या वेळीं हिंदी मुसलमानांना सामुदायिक देशत्यागाची ( हिजरात ) कल्पना तरी करतां येत होती. परंतु हिंदुस्थानाबाहेर या अफाट जगांत आम्हां अगतिक हिंदूंना कोठेंच थारा नाहीं. इतर समाजांचे बाह्य जगांत पुष्कळ लागेबांधे आहेत, पण हिंदूंनीं बाह्य जगाशीं संबंध कधींच तोडून टाकला आहे. हिंदुस्थान हा हिंदुधर्माचा किल्ला, पण या किल्ल्याचे दरवाजे हे केवळ बाहेरूनच उघडतात व यामुळें हिंदुसमाजाच्या कोणत्याहि हितशत्रूला आंत येऊन धुडगूस घालतां येतो व

स्वतः हिंदूंना मात्र या किल्ल्याबाहेर पडून शत्रूचा वेढा उठवून लावतां येत नाहीं! चोहो बाजूंनीं कोंडमारा झालेल्या या समाजाला आतां एकच तरणोपाय व तो म्हणजे मान्याच्या सर्व जागा बळकट करणें, अंतस्थ कलह मिटवून आपसांत बंधुभाव वाढविणें; आपले पंगु बांधव शत्रूला बळी पडणार नाहींत अशी खबरदारी घेणें, सर्व शिबंदीमध्यें उत्साहाचा व अभिमानाचा आवेश उत्पन्न करणें आणि त्याबरोबर आपण क्षणभर जरी कचरलों तरी तेवढ्यानेंहि आपला सर्वनाश होईल याची जाणीव उत्पन्न करणें हा होय. हिंदूंना हिंदुस्थानांत स्वराज्य आणावयाचें आहे. इतकेंच नसून त्यांना त्या स्वराज्याचा उपभोगहि पण करून घ्यावयाचा आहे. यास्तव लखनौला लो. टिळकांनीं उदाहरण घालून दिल्याप्रमाणें त्यांनीं अल्पसंख्यांकांना योग्य त्या सवलती देण्यास तयार झालें पाहिजे; पण त्याचबरोबर लाला लजपतराय यांनीं परवां मुंबईला सांगितल्याप्रमाणें शक्य तर मुसलमानांच्या व इतरांच्या खांद्यास खांदा भिडवून आणि तें शक्य नसलें तर एकाकी व कदाचित् इतरांच्या जुटीविरुद्धहि स्वराज्याची लढाई तडीला नेण्यास सज्ज झालें पाहिजे. परंतु धर्मत्यागाशिवाय स्वराज्य मिळावयाचेंच नसेल तर तसलें स्वराज्य मिळविण्यांत अर्थ काय!

---

## ८५. अ. भा. हिंदु–महासभा, जबलपूर

( १९२८ सालीं जबलपूर येथें भरलेल्या हिंदुमहासभेच्या ११ व्या अधिवेशनांत केलेलें अध्यक्षीय भाषण. )

या अकराव्या हिंदु–महासभेच्या आधिवेशनाचें अध्यक्षस्थान मला दिल्याबद्दल मी फार आभारी आहे. हें अध्यक्षस्थान ही एक फार मानाची व अभिमानाची गोष्ट आहे असें मला वाटतें. या सन्मानास आपण लायक ठरावें अशी माझी महत्त्वाकांक्षा आहे. बॅ. विनायकराव सावरकर यांस अध्यक्षस्थानीं विराजित करण्याचा हिंदु–महासभेच्या व्यवस्थापकांचा मनोदय असल्याचें मला कळलें होतें. विनायकरावां-

सारखा कार्यकर्ता अध्यक्ष न लाभल्यामुळें व्यवस्थापकांची जी निराशा झाली असेल तींत मीहि अंशभागी आहे; कारण सरकारच्या अच्छेद्य नियंत्रणाखालीं असतांहि सावरकरांनीं हिंदुमहासभेच्या उद्देशांच्या सिध्यर्थ बहुमोल कामगिरी केलेली आहे.

ज्यांनीं हिंदुमहासभेची कल्पना प्रथम काढली त्यांनीं एक फारच दूरदर्शीपणाची गोष्ट केली आणि त्यांच्याविषयीं आपण कृतज्ञता दाखविणें हें आपलें पवित्र कर्तव्य ठरतें. हिंदुमहासभेच्या आधारस्तंभांपैकीं जे महाभाग आपणांत आज केवळ स्मृतिरूपानें वास करीत आहेत, त्यांच्या नांवानें तर्पण करणें जरूर आहे. अशांपैकीं न्या. लालचंद, लाला द्वारकादास, लाला मुर्लीधर, स्वामी श्रद्धानंद, पं. विशन नारायणदास यांचा प्रामुख्यानें उल्लेख करतों. त्याचप्रमाणें ज्यांनीं माझ्यापूर्वी हेंच अध्यक्षपद मंडित केलें होतें त्यांच्या स्मरणानेंहि मला स्फूर्ति प्राप्त व्हावी म्हणून मी कासीमबाजारचे महाराज, पं. मदनमोहन मालवीय, दिवाण माधवराव, डॉ. कुर्तकोटी, राजा रामपालसिंग, लाला लजपतराय, राजा नरेंद्रनाथ आणि डॉ. मुंजे यांना गौरवपूर्वक प्रणाम करतों. हिंदु समाज आणि हिंदी राष्ट्र यांच्या इतिहासांत एका नाजूक व महत्त्वाच्या गणल्या जाणाऱ्या परिस्थितींतून आपण आज जात आहोंत, आणि या वेळीं आपणास आपल्या पुढील प्रश्नांचा योग्य निर्णय लावण्यास परमेश्वरानें बुद्धिबल व शरीरबल द्यावें अशी त्याची प्रार्थना केल्याखेरीज माझ्याच्यानें राहावत नाहीं.

परस्परांशीं थोडेंबहुत विसंगत वाटणाऱ्या अशा विविध कार्यांत भाग घेणें सार्वजनिक कार्यकर्त्यांस अवश्य होतें. परंतु वस्तुतः अशा कार्यांत विरोध अगर विसंगतपणा मुळींच नसतो. राष्ट्र व विशिष्ट जात यांच्याकरतां कार्य करणें तें सुसंगत कसें ठरतें हें दाखवून देणें किंचित् कठीण आहे खरें. तथापि आपण हिंदु–महासभेच्या गृहस्थांनीं हें अनुभवानें सिद्ध केलें आहे, आणि कालगतीबरोबर ' जितकें जातिविशिष्ट तितकें सारें अराष्ट्रीय ' असें म्हणणाऱ्या लोकांचा वर्गहि कमी होणार हें उघड दिसतें. शिवाय अलीकडे असेंहि नजरेस येऊं लागलें आहे कीं, जातिसंबंधींच्या बाबतींत जे तटस्थपणाचा आव आणतात त्यांना बहुशः कोणीच अनुयायी नसतात. आपल्या एकांडपणांत त्यांना भला आनंद वाटो; पण नुसत्या

शारिरिक तटस्थपणामुळें एखाद्या जातीविषयीं मुग्ध पक्षपाताच्या अथवा दुसऱ्या जातीच्या न्याय्य हक्कांविषयीं दूषणीय बेफिकिरीच्या आरोपांतून ते अखेर मुक्त होऊं शकत नाहींत ते नाहींतच. शुद्ध राष्ट्रीय बाबतींत हिंदुमहासभेच्या अभिमान्यानें देखील आपण प्रथम कट्टे हिंदी आहों असेंच अभिमानपूर्वक म्हटलें पाहिजे. तथापि खरें बोलावयाचें तर, माणसाचे किंवा जातीचे सर्वच व्यवहार राष्ट्रीय राजकारणाच्या एकाच डब्यांत भरून दाबून ठेवतां येण्यासारखे नसतात. मनुष्य जोंपर्यंत आपणास हिंदु असें म्हणवितो तोंपर्यंत त्याला हिंदुसमाजाच्या कल्याणाची काळजी वाहिली पाहिजे व त्याकरतां खटपट केली पाहिजे. जेव्हां खरें सत्ययुग अवतरेल तेव्हां अर्थातच हीं धर्मांचीं व जातींचीं लेबलें आणि पट्टया अर्थात् नष्ट होतील; परंतु भविष्यत्कालीं काय होणार त्यावर नजर देऊन प्रस्तुत काय कर्तव्य आहे याचा विचार न करणें शहाणपणाचें होणार नाहीं. राष्ट्रसंघ हल्लीं निर्माण झाला असेल, तथापि राष्ट्रांच्या राष्ट्रीयत्वाची गल्लत झाली नाहीं. विश्वबंधुत्व व परमेश्वरपितृत्व या कल्पना अत्यंत मनोहर होत यांत संशय नाहीं. असें असूनहि थिऑसफी हिंदूंस अधिक चांगला हिंदु हो, मुसलमानांस अधिक चांगला मुसलमान हो, खिस्त्यांस अधिक चांगला खिस्ती हो, असेंच शिकविते. अखिल जगभर चालणारी एखादी सर्वसामान्य भाषा निघाली तरी तिच्या पोटांत सर्व राष्ट्रीय भाषा गडप होऊन जात नाहींत. मानव जाति जोंपर्यंत सामान्य व्यवहारांत एका विशिष्ट उच्च मनोभूमिकेवर जाऊन पोंचल्या नाहींत तोंपर्यंत ज्ञातिभावनेपासूनच्या अलिप्तपणाचा अभिनिवेश किंवा बाहाणा केल्यानें व्यक्तीचें काय अगर जातीचें काय, कोणाचेंच हित होत नाहीं. आत्मीयत्व हाच सद्गुणांचा पाया होय आणि योग्य आत्मप्रीति कर्तव्यनिष्ठेची माता होय. स्वतंत्र विचाराचा मनुष्य एका विशिष्ट धर्माचा किंवा जातीचा एकनिष्ठपणें अभिमान बाळगणाऱ्या मनुष्यापेक्षां कमी आत्महिततत्पर असतो असें मुळींच नाहीं. पुष्कळ वेळां तर जात्यभिमानाच्या अभावाच्या दिखाऊपणाखालीं कमालीचा स्वार्थीपणा दडून राहिलेला दृष्टोत्पत्तीस येतो. बाह्यतः जो सर्व धर्मांचा मित्र म्हणून मिरवतो तो कोणत्याच धर्माचा मित्र नसतो. त्याची सहिष्णुता बहुतकरून स्वतःच्या अविश्वासूपणाचें किंवा उच्छृंखलपणाचें

पांघरूण म्हणून अंगिकारलेली असते. उलटपक्षीं जातीविषयीं योग्य प्रेम एकनिष्ठपणाच्या नैतिक गुणास पोषक होतें व आपल्या जातभाईंच्या पराक्रमांविषयीं अभिमान उत्पन्न करतें. वैयक्तिक स्वार्थापेक्षां जातिनिष्ठे-मुळें त्यांची वागणूक अधिक उच्च प्रकारची होते व त्याला सांघिक स्वावलंबन शिकविलें जातें. गणितशास्त्रांत शून्याची फार किंमत समजतात. कारण त्याच्या योगानें त्या शास्त्रांतील गहन प्रश्न सोडविले जातात. त्याप्रमाणेंच एकाहून एक अधिक अशा चढत्या श्रेणीच्या जातिनिष्ठेपासून प्राप्त होणारी शिस्त मनुष्यास लागली तर विश्वबंधुत्व शक्य कोटींत खास येईल. १९२५ सालीं कानपूर येथील अधिवेशनाचा अध्यक्ष या नात्यानें केलेल्या माझ्या भाषणांत हिंदु लोकांनीं जात्यंधत्वाचा आरोप थोडासा स्वीकारूनहि जात्यभिमानानें संघटन कां केलें पाहिजे त्याचें विवेचन केलेंच आहे. अशा आरोपाच्या बुजगावण्यानें भिऊन जाऊन हिंदी लोकांनीं आपल्या प्रयत्नापासून ढळण्याचें कारण नाहीं. याचा अर्थ त्यांनीं राष्ट्रीयत्वाच्या व मायभूमीच्या अभिमानांत मागें पडावें असा नव्हे. परंतु ज्यांनीं जातिविषयक चळवळी स्वतः टाकल्या नाहींत त्यांच्याकडून आपल्या राष्ट्रीय भावनांच्या उद्रेकाचा दुरुपयोग करून घेतला जाऊं नये, याबद्दल त्यांनीं अवश्य खबरदारी घेतली पाहिजे. स्वराज्याच्या नांवानें आपलें अखंडत्व किंवा व्यक्तित्व हिंदी लोकांनीं नष्टप्राय करावें हें शक्य नाहीं. मी कानपूरच्या भाषणांत जें सांगितलें त्याचीच येथें पुनरुक्ति करतों.

" हिंदी लोकांचे पाय जितके या भूमींत रुजले आहेत तितके इतर जातींचे नाहींत. अलीकडील दंग्याधोप्यांत जरी प्रत्यक्ष आचरणांत आणतां आली नाहीं तरी मुसलमानांच्या डोक्यांत हिजरात किंवा देशत्यागाची कल्पना येऊन गेली. हिंदुस्थानाच्या बाहेर असा तुकडा तरी आहे का, कीं जो आपद्ग्रस्त हिंदी माणसाला माझा असें म्हणतां येईल ? इतर जातींची कार्यक्षेत्रें अफाट, त्यांचे संबंध जगभर पसरलेले, वाहतुकीचीं साधनें अमूप हिंदुसमाजाचा मात्र परकी राष्ट्रांशीं कांहींच संबंध नाहीं. त्यानें आपल्याला एका जागेंत स्वतः कोंडून घेतलेलें आणि त्या कोंडण्याच्या जागेंत देखील अशी व्यवस्था कीं, त्या जागेंतून बाहेर पडण्यास वाव नाहीं. पण एखाद्या उपटसुळाला आंत येऊन नंगा नाच घालण्यास मात्र

मोकळीक ! ” सर्व बाजूंनीं वेढलेल्या समाजास एक उपाय म्हटला म्हणजे तो हाच होय कीं, त्या समाजानें आपापसांत पूर्ण एकी करावी, आपल्यांतील दुर्बल, पंगु अशा लोकांची काळजी घ्यावी आणि सर्व लोकांना आशेनें प्रेरित करावें. असें न झालें तर रोकडा नाश हिंदु समाजापुढें ठेवलेलाच आहे. राजकीय स्वराज्य पाहिजे एवढीच हिंदी लोकांची आकांक्षा आहे असें नव्हे तर हिंदु राहून त्याचा वाटा त्यांना भोगण्यास मिळाला पाहिजे. हिंदुत्वाचा विक्रय करून स्वराज्य मिळवावयाचें असेल तर हिंदु लोकांना विचारच करावा लागेल.

हिंदु–महासभेचें कार्य दोन प्रकारचें आहे. शुद्धि आणि संघटन हे ते दोन प्रकार होत. हे शब्द अगदीं घरगुती होऊन बसले आणि त्या बाबतींतील कार्य समाधानकारक चाललें आहे असें म्हणावयास हरकत नाहीं. शुद्धीची चळवळ जवळजवळ हिंदुस्थानच्या सर्व टोंकांपर्यंत पोंचली आहे. तथापि हिंदी भाग व महाराष्ट्र यांच्याबाहेर तिचा जोराचा फैलाव झाल्याचें दिसत नाहीं. इतर प्रांतांना या चळवळींविषयीं काय वाटतें हें निश्चितपणें सांगतां येत नाहीं. तात्त्विक दृष्ट्या ते प्रांत या चळवळीच्या विरुद्ध असण्याचा संभव दिसत नाहीं. परंतु उत्साहानें त्या प्रांतांत या चळवळीचा पुरस्कार होत नाहीं खास. महासभेनें आपले प्रतिनिधि या प्रांतांत पाठवून तेथील स्थानिक पुढाऱ्यांशीं त्यांनीं चर्चा करावी असें मला वाटतें. महासभा आणि आर्यसमाज यांनीं या चळवळींत फार उत्कृष्ट कामगिरी केली आहे. आतांपर्यंत महाराष्ट्रांत व्यापक व सांघिक शुद्धीकरणाची फारशी कल्पना नव्हती पण नुकतीच गोवें प्रांतांत असें शुद्धीकरण मोठ्या प्रमाणावर झालें व अशा चळवळीची आणि तिच्या परिणामाची किंचित् कल्पना लोकांना आली आहे. आजपर्यंत हिंदी खिस्त्यांना परत हिंदुधर्मांत घ्यावें ही कल्पना सुचलीच नव्हती. एक तर मुसलमान झालेल्या हिंदी लोकांपेक्षां ते लोक कमी कडवे व निराळ्या परिस्थितींत वाढलेले असे समजले जातात; आणि खिस्त्यांची बाटविण्याची पद्धत वेगळी व मुसलमानांची वेगळी होती. खिस्ती मिशनरी हिंदी पुढाऱ्यांशीं चर्चा करीत बसत नाहींत. उलट उच्च तत्त्वज्ञान व तौलनिक अभ्यास यांच्या योगानें त्यांच्याबद्दल सहिष्णुता वाटते व गैरसमज होत नाहीं. ते लोक

अनाथ मुलें व संकटग्रस्त बायका यांनाच आपल्या धर्मांत ओढून घेण्याचा प्रयत्न करतात. धर्मांतराचीं त्यांचीं साधनें म्हणजे शिक्षण व साह्य हींच होत. अर्थात् दोनतीनशें वर्षांपूर्वी जे हिंदी ख्रिस्ती केले गेले त्यांची परिस्थिति भिन्न होती. मुसलमानांच्या अंगांत जें धर्मवेडाचें भूत संचारलेलें असतें तेंच त्या वेळीं ख्रिस्ती मिशनऱ्यांच्या अंगांत संचारलें होतें. महाराष्ट्राच्या दक्षिणोत्तर दोनहि सीमांवर १६-१७ व्या शतकांत पोर्तुगीज लोकांच्या वसाहती होत्या. पोर्तुगीज गोंवें, वसई या भागांत धर्मांतराची एक जंगी लाट उसळली. या धर्मांतराच्या पद्धतींत न शिरलेलेंच बरें. पुढें पोर्तुगीज सत्ता हिंदुस्थानांतून लय पावली व या धर्मांतर केलेल्या लोकांना राजकीय आत्मोन्नतीचा मार्ग उरला नाहीं. हे लोक म्हणजे मुख्यत: शेतकरी व नावाडी होते. या हिंदु ख्रिस्त्यांचे व अस्सल हिंदूंचें संबंध प्रेमाचें राहिले इतकेंच नव्हें, तर उत्तर-हिंदुस्थानांतील मलकाना रजपुतांप्रमाणें त्यांनीं आचारविचार हिंदूंप्रमाणेंच राखले. लग्नसमारंभ व उत्तरक्रिया या दोन गोष्टींतच त्यांच्यावर पाद्री लोकांचा पगडा होता. एरवीं, त्यांनीं आपापसांत हिंदु जाती राखल्या; आपल्या कुलदेवता पूर्वीच्याच कायम ठेवल्या. व्यवहारांतील त्यांची भाषाही हिंदु लोकांचीच राहिली. अशा स्थितींत हिंदु ख्रिस्त्यांच्या मनांत हिंदुत्वाचें बीज तगून राहावें व शेजारच्या हिंदूंच्या सहवासाच्या ओलाव्यानें त्यास पालवी यावी हें नैसर्गिकच होतें. नुकतीच गोव्यांत झालेली शुद्धीकरणाची चळवळ हें त्या बीजापासून उत्पन्न झालेलें फळ होय.

हिंदु-महासभेच्या शाखेखेरीज महाराष्ट्रांत विनायकबुवांचा ब्रह्मचर्याश्रम नांवाचा आश्रम सातारा जिल्ह्यांत मसूर गांवीं आहे. तरुण पिढींत रामदासी वाङ्मयाचा प्रसार करून व त्या पिढीचें मन शरीरबल-संवर्धनाकडे वळवून या संस्थेनें हिंदुधर्माची वाढ करण्याचें कार्य चालविलें आहे. गाजावाजा न करतां या आश्रमाचे प्रचारक खेडोपाडीं हिंडतात, तरुण व अशिक्षित जनतेशीं अगदीं निकट परिचय करून घेतात. उत्तर-हिंदुस्थानांतील शुद्धीच्या चळवळीकडे त्यांचें लक्ष आकर्षित झालेलें होतेंच, आणि ख्रिस्ती झालेल्या गोव्याच्या हिंदी लोकांच्या मनाच्या एका नाजूक कप्प्यांत आपणांस आपल्या हिंदुधर्मप्रसाराच्या कार्यास प्रवेश मिळतो असें दृष्टीस

पडतांच त्या आश्रमीय प्रचारकांस एक अकल्पित घबाडच लाभलें असें वाटलें. ताबडतोब कार्यास प्रारंभ झाला. हजारों गावडे हिंदुधर्मांत परावर्तित झाले आहेत. पोर्चुगीज सरकारनें दडपशाही सुरू केली हेंच त्यांच्या कार्यसिद्धीचें एक द्योतक होय. अर्थात् अंगावर शहारे उत्पन्न करणारी पूर्वीची धार्मिक दडपशाही व जुलूम–जबरदस्ती आतां पोर्चुगीज राज्यांतून गेली असून, तिचें स्थान राजकीय स्वायत्तता व धार्मिक सहिष्णुता यांनीं स्वीकारलें आहे. तरी स्थानिक मिशनऱ्यांच्या चिथावणीनें पोर्तुगीज सरकारनें शुद्धि-प्रचारकांस आपल्या हद्दीबाहेर घालवून दिलें, व त्यांना जास्त कडक उपाय पुढें योजण्यांत येतील अशी धमकीहि देण्यांत आली. या फुसक्या धाकदपटशानें पुढील काम थांबेल असें मला वाटत नाहीं. खिस्ताळलेल्या हिंदी लोकांच्या अंतःकरणांत एकदां हिंदुधर्मप्रेमाचें बीज पेरलें गेलें, त्याचा विस्तार व वाढ खुंटणें शक्य नाहीं. बाहेरून लागणारी मदतहि कमी पडेल असें नाहीं. वसईभागाकडील खिस्त्यांची परिस्थिति अधिक आशाजनक आहे व गोव्यानंतर या प्रचारकांची नजर वसईकडे वळेल असें म्हणण्यास हरकत नाहीं.

आतां मी व ले. असेंब्लींतील सभासदांनीं पोर्चुगीज गव्हर्नर जनरलकडे याविषयीं जो खलिता धाडला होता तो समग्र देतों. ( हा खलिता केसरींत पूर्वी आला आहे. )

या परावर्तनाच्या बाबींसंबंधीं बोलतांना मी मागें कानपुरास जें प्रतिपादन केलें त्याचाच पुनः उल्लेख करतों. ‘ परावर्तन करणें तें फसवेगिरीनें अथवा बळजबरीनें होतां कामा नये. ’ खिस्ती व मुसलमानी धर्म–प्रचारकांनीं हिंदु लोकांना जें आपल्या धर्मपंथांत ओढलें तें सर्वच निर्दोष व न्याय्य मार्गांनें केलें असें नव्हे. हिंदुधर्मास इतरांच्या कुटिल मार्गांच्या पुरस्कारानें कितीहि नुकसान सोसावें लागलें असेल तें असो, तथापि अशा मार्गांनीं धर्मांतर झालेल्यांपैकीं दूषणिक मार्गांनीं कोणीहि परावर्तित होऊं नये असें वाटतें. धार्मिक विश्वास ही अशी एक पवित्र भूमि आहे कीं तिचिर कोणत्याहि ऐहिक हेतूंचा व फायदाचा पाय पडून तिला विटाळ होऊं नये. मी इतकेंहि म्हणावयास तयार आहे कीं, एखादा कायदाच परावर्तनाकरितां व्हावयाचा असेल तर असा व्हावा कीं, मॅजिस्ट्रेटसाहेबासमोर

धर्मांतराचें किंवा परावर्तनाचें ज्या त्या गृहस्थानें ' डिक्लेरेशन ' करावें किंवा कबुलीजबाब द्यावा म्हणजे झालें. स्वधर्मांतून परधर्मात गेलेल्यांस शुद्ध करून परत मूळ धर्मांत आणणें हा हिंदु समाजाचा अबाधित हक्क आहे. जोंपर्यंत खिस्ती मिशनरी किंवा मुसलमान मौलवी आपला हात आवरीत नाहींत तोंपर्यंत हिंदु लोकांस तरी शुद्धि बंद करण्यास सांगण्याचा कोणास काय हक्क आहे ? मला ठाऊक आहे कीं, आपणांतच कांहीं भोंदू पंडितमन्य राष्ट्राभिमानी आहेत ते शुद्धि चळवळीच्या नांवानें खडे फोडतात. पण त्यांचें आश्चर्य वाटतें तें हेंच कीं त्यांचा उपदेश खिस्ती व मुसलमान धर्म-प्रचारकांना नसतो व त्यांची सारी राजकीय न्यायप्रियता गरीब बिचाऱ्या हिंदु लोकांच्या मात्र बोकांडी बसते !!

आपण आतां शुद्धीकरणाच्या दुसऱ्या बाजूकडे वळूं. पुष्कळांना शुद्धी-करणाचा अर्थ पूर्वकालीन हिंदूंनाच परत हिंदुधर्मांत घेणें असा वाटतो. माझ्या दृष्टीनें या शब्दाचा अर्थ इतका मर्यादित किंवा संकुचित नाहीं. जे पूर्वी केव्हांहि हिंदु नव्हते परंतु ज्यांची हिंदुधर्मांत प्रविष्ट होण्याची इच्छा आहे त्यांनाहि शुद्ध करून घेतां येतें. या ठिकाणीं नुकतीच नाशीक येथें घडलेली गोष्ट आपल्या नजरेसमोर आणणें मला अवश्य वाटतें. ही गोष्ट म्हणजे श्रीशंकराचार्य डॉ. कुर्तकोटी यांच्या हस्तें अमेरिकन कुमारी नॅन्सी मिलर हिचा हिंदुधर्मांत प्रवेश. अर्थात् या गोष्टीचा हिंदुस्थान, इंग्लंड, व अमेरिका या देशांत गवगवा फार झाला. यांचीं कारणें पुष्कळ असतील. तथापि त्या गोष्टीचें स्वयंभू महत्त्वच अतिशय दांडगें आहे. सर्व हिंदु समाजानें हें शुद्धीकरण मान्य केलें आहे. आणि खरोखरच श्रीशंकरा-चार्यांनीं हिंदुधर्माचें एक महान् आदितत्त्व प्रत्यक्ष व्यवहारांत आणून दाख-विण्यांत जी कल्पनाशक्ति व मनोधैर्य दाखविलें त्याबद्दल मी त्यांचें सन्मान-पूर्वक अभिनंदन करतों. श्रीशंकराचार्यांचेंच नांव धारण करणारे व त्यांच्या मानाची लालसा धरणारे इतर धार्मिक अधिकारी ही धर्माची गांठ सोड-ण्याचें भित्रेपणानें टाळीत होते तेव्हां श्रीशंकराचार्य धीटपणानें पुढें आले म्हणून तर त्यांच्याविषयीं आदरभाव द्विगुणित होतो.

या स्थळीं थोडें विषयांतर करून देखील आपण ज्या सनातन हिंदु-धर्माचे अनुयायी म्हणवितों त्याच्या अर्थाचें विवेचन करावेंसें वाटतें.

माझ्या मतें सनातन या शब्दाला दोन पैलू आहेत. सनातन याचा अर्थ जुनें व काल-संमानित असा आहे हें खास. पण स्थिर व टिकाऊ असाहि त्याचा अर्थ आहे. प्रोफेसर मॅकेंझीसाहेबांनीं एके ठिकाणीं म्हटलें आहे. "पुष्कळ परकी संस्कृतीशीं हिंदु लोकांचा संबंध घडला, आणि या संबंधांचा परिणामहि अर्थात् झालाच. पण हा परिणाम सामाजिक किंवा नैतिक ध्येयपरिवर्तनाच्या रूपानें दृष्टिगोचर झाला नाहीं. हिंदुधर्म हा नेहमीं व्यापक व संग्राहक स्वरूपाचा आहे. आणि त्याच्या अंगीं निर-निराळ्या व परस्पर विसंगत वाटणाऱ्या कल्पना व आचारविचार पचवून टाकण्याची एक अजब शक्ति आहे. हिंदुधर्म हा जुन्या व पडक्या इमल्या-सारखा आहे. त्या जुन्या इमल्याला अधिकाधिक दुरुस्ती आजपर्यंत झालेली आहे व पुढेंहि पुष्कळ काळपर्यंत दुरुस्ती होत राहील. पण दुरुस्ती किंवा जोडणी कितीहि केली तरी त्याचा मूळ गाभा किंवा सांगाडा कायम आहे आणि त्याच्या पायाला तर कशानेंच धक्का लागलेला नाहीं. हिंदुधर्म इतका जुना आहे कीं, त्याची सुरुवात केव्हां झाली व त्याची व्याप्ति किती आहे हें बिलकूल माहीत नाहीं, म्हणून तर तो सना-तन होय."

निवळ जुनेपणा हें एक मानाचें व अधिकारप्राप्तीचें कारण होऊं शकतें, नाहीं असें नाहीं. परंतु नुसत्या जुनेपणाच्या कवचानें धर्माचें सरक्षण होऊं शकत नाहीं. त्याला परिस्थितीचा फायदा घेऊन त्यापासून निर्माण होणाऱ्या टिकाऊपणाची जोड पाहिजे. प्रथमतः हें सांगितलें पाहिजे कीं, अहिंदूंना हिंदुधर्मांत घेऊं नये असें हिंदुधर्मशास्त्रांत कोठेंहि सांगितलें नाहीं. हिंदुधर्माचें मूलतत्त्व निवळ धार्मिक नसून ज्ञातिविषयकहि आहे. हिंदुधर्म म्हणजे केवळ कडक धर्म-तत्त्वांचा गाबाळ–ग्रंथ असें नव्हे. ती एकप्रकारची लोकशाही आहे. अगोदर हिंदुधर्म आणि मग हिंदु लोक अशी स्थिति नाहीं, तर हिंदु लोकांनीं हिंदुधर्म बनविला. बारीकसारीक बाबतींत देखील अनंत काल-पर्यंत एका विशिष्ट तत्त्वसंप्रदायानें हिंदु समाजावर अम्मल गाजवावा असा तो धर्म नाहीं. हिंदुधर्म रूढ होण्यापूर्वीं हिंदु लोक अस्तित्वांत होते व व म्हणूनच हिंदु म्हणविणाऱ्या समाजास कालोघाप्रमाणें धर्मांत थोडा-

फार फेरबदल करण्याचा वाजवी हक्क आहे. धर्माचें अत्यंत महत्त्वाचें कार्य म्हटलें म्हणजे समाज-धारणा हें जर खरें तर कोणत्याहि समाजाची धारणा या जगांत कायम ठशांच्या नियमावलीनें व वर्तन-पद्धतीनें होऊं शकणार नाहीं. प्रत्येक धर्माच्या पोटांत एकप्रकारचें स्थितिस्थापक यंत्र परमेश्वरानें निर्माण करून ठेवल्यासारखें दिसतें. आत्म-संरक्षणाची जाणीव प्राणिमात्रांत उपजतच असते व जेव्हां जेव्हां समाज एका बाजूला कलंडल्यासारखा व आसन्नमरण होतो तेव्हां हें यंत्र कार्य करावयास लागतें व पुनः तोल सांभाळला जातो. परिस्थिति-गुण-ग्राहकत्वाच्या अभावामुळें आपल्या समाजाचें किती नुकसान झालें आहे हें मी सांगत नाहीं. परंतु आजचे जाति-जातींतील तंटे हे त्या दोषाचे परिणाम होत. त्या तंट्यांपासून आपणांस धडा घेतला पाहिजे. आपल्या धर्माच्या विरुद्ध तेवढा तो कळीचा दरवाजा उघडला जात असल्यानें आपला धर्म शक्तिहीन व दुर्घटित झालेला आहे. सुदैवानें आपल्या धर्मांत शहाणपणाचा उदय होऊं लागला आहे. तीस वर्षांपूर्वी शिकागो येथील सर्व-धर्म परिषदेस ज्या उद्देशानें स्वामी विवेकानंद गेले त्याची निश्चयेंकरून होऊं घातलेली सिद्धि मिस् मिलरच्या शुद्धीकरणानें पूर्ण झाली असें म्हणावयास प्रत्यवाय नाहीं.

आतां संघटनेविषयीं विचार करूं. शुद्धि-चळवळ आपलें अंतिम केव्हां तरी गांठील; पण संघटनेची तशी गोष्ट नाहीं. तें क्षेत्र अत्यंत व्यापक आहे; त्यांतील सर्व अंगोपांगांची चर्चा करून मी आपला वेळ घेत नाहीं. संघटन म्हणजे संघशक्ति. हें साध्य करण्यासाठीं आपण अगोदर समाजाच्या आज विलग झालेल्या निरनिराळ्या घटकांमध्यें स्नेहभाव निर्माण केला पाहिजे. 'हिंदु' या शब्दांत सनातनी, आर्यसमाजी, जैन, शीख, बौद्ध, ब्राह्मो वगैरे वर्गांचा अंतर्भाव हिंदुसभेनें केला आहे हें योग्यच आहे. सनातनी व आर्यसमाजी यांच्यांतील लढा आज सुदैवानें मिटत आहे व तें अपरिहार्यच होतें. ( पुढें इतर शाखांतील संबंधाचा विचार करून व हे भेद कायम राखण्यास सरकारची शिरगणतीची पद्धतीच जबाबदार असल्याचें सांगून अध्यक्ष म्हणाले:—) ब्राह्मण-ब्राह्मणेतरांचा लढा आपण मिटविला पाहिजे. हें भांडण धार्मिक हक्कांसाठीं नसून ऐहिक उत्कर्षासाठीं आहे. शिक्षणाच्या प्रसारानें सामाजिक उच्चनीचता नष्ट होत

आहेच. ब्राह्मणाला जे खास हक्क आहेत त्यावर पाणी सोडण्यास त्या वर्गानें स्वतः पुढें झालें पाहिजे, कारण ते हक्क कायम राहण्याचें कारणच नाहींसें होत आहे. अस्पृश्यांचा प्रश्नहि असाच महत्त्वाचा आहे. अस्पृश्यता नष्ट करण्याचा प्रश्न प्रत्येक प्रांतांतील वरिष्ठ जातींनीं हातीं घेतलाच आहे. पण तो याहिपेक्षां अधिक जोमानें त्यांनीं हातीं घेतला पाहिजे. यासाठीं जरूर तर कायदाहि करावा. राष्ट्राच्या तिजोरींतून होणाऱ्या खर्चाचा फायदा स्पृश्यास्पृश्यांना सारखाच मिळाला पाहिजे. यासाठींहि जरूर तर कायदाहि करावा. देवळांत शिरण्याबाबत अस्पृश्यांना देवळांत किंवा गाभाऱ्यांत शिरतां येत नाहीं ही त्यांची मुख्य तक्रार नाहीं; ब्राह्मणवर्ग त्या बाबतींत आपला विशिष्ट हक्क सांगतो व बजावतो, ही त्यांची तक्रार आहे. तेव्हां ब्राह्मणांना जर देवळाच्या गाभाऱ्याचा पवित्रपणा राखावयाचा असेल तर त्यांनीं आपले विशिष्ट हक्क सोडावेत म्हणजे झालें. या बाबतींत माझी सूचना अशी आहे कीं, सार्वजनिक देवळांत मूर्तीपासून ठराविक अंतरावर कटघर तयार करावें, व तेथपर्यंत अस्पृश्यांसुद्धां सर्वांनीं जावें, त्यापुढें मात्र ब्राह्मणांनीं देखील जातां कामा नये. मुंबईस नुकतेंच समतामंडळाच्या विद्यमानें १००० अस्पृश्यांचें उपनयन झालें व त्यांना गायत्रीमंत्रहि देण्यांत आला ही गोष्ट खरोखरच छान झाली. पण स्पृश्यास्पृश्यांत समानता प्रस्थापित झाल्याची खरी कसोटी जर कशांत असेल तर ती देवदर्शनासंबंधीं सर्व निर्बंध काढून स्पृश्यांप्रमाणेंच अस्पृश्यांना देवदर्शन व पूजा यांचा लाभ घेतां यावा अशी सोय होण्यांत आहे.

हिंदु समाजांतील अंतःशाखांतील हे सर्व भेदाभेद दूर केले, तरच त्याच्या भक्कम पायावर समाजाची पुढील भव्य इमारत उभारतां येईल. त्यासाठीं शारीरिक, बौद्धिक, नैतिक आणि सांस्कृतिक उन्नति घडवून आणावी लागेल. नवीन पिढीसाठीं आपण सर्वत्र व्यायामशाळा स्थापाव्या. आयुधें व शस्त्रें मिळूं शकतील, त्यांचा तरुणांना उपयोग शिकवावा. परदेशगमनासंबंधींच्या जीर्णमतवाद्यांमधील सर्व खुळचट कल्पना काढून टाकाव्या व तरुण पिढींतील धाडसाला उत्तेजन द्यावें. पाश्चात्यांचें पुढें येण्याचें कारण हेंच आहे.

सामाजिक सुधारणेच्या क्षेत्रांत पुष्कळच काम व्हावयाचें आहे. ' आम-

च्यांत फक्त चारच वर्ण आहेत. आतां 'पुढें काय करावें' हा प्रश्न आपल्यापुढें दत्त म्हणून राहण्यापूर्वी आपणाला अनेक अंत:शाखा व अंतर्वर्ण एकमेकांत मिसळून टाकावयाचे आहेत. यासाठीं निदान अन्त:शाखीय विवाह तरी सुरू झाले पाहिजेत. असें झाल्यास योग्य वधूवरांची निवड करण्यास विस्तृत क्षेत्र मिळेल व सुप्रजा निर्माण होईल. आज या मार्गांत भाषेची मोठी अडचण वाटते. पण एकदां त्या दिशेनें समाजाचें पाऊल पडूं लागलें कीं, ही अडचण आपोआप दूर होईल व एकच राष्ट्रीय भाषा निर्माण होण्यास मदत होईल. त्याचप्रमाणें धार्मिक कृत्यें आणि तंत्रें यांच्यांत जास्त सुटसुटीतपणा कसा येईल, याचाही विचार करण्याची वेळ आतां येऊन ठेपलीच आहे. ईश्वरोपासनेचा सर्वांचा एक मार्ग असला तर त्यापासून कसा फायदा होतो, हें नव्यानें सांगावयास नको. तेव्हां आपल्यांतील प्रमुख विद्वानांनीं असा मार्ग काढला पाहिजे.

अध्यक्षांनीं नंतर दक्षिण-हिंदुस्थानाप्रमाणें उत्तर-हिंदुस्थानांतहि सर्वत्र गीता-दिन पाळावा व अखिल हिंदुस्थानाच्या सार्वत्रिक उत्सवदिनांत आणखी एका दिवसाची भर घालावी असें सांगितलें.

गोवध आणि मशिदीसमोर वाद्यें वाजविणें या प्रश्नाची चर्चा यापूर्वीच पुष्कळ झालेली आहे. या बाबतींत मी एवढेंच आतां म्हणतों कीं, या बाबतींत हिंदुसभेचें चढावाचें धोरण नाहीं. एवढें मात्र खरें कीं, उभयतांच्या ( civil ) हक्कांचें रक्षण झालें पाहिजे, असें हिंदुसभा नेहमींच म्हणत राहील; कारण जे हक्क अगोदरच प्रस्थापित झाले आहे, त्यांचें जतन करणें हें प्रत्येक लोकशाहीचें कर्तव्य आहे.

पाटणा येथें नुकत्याच झालेल्या हिंदु-महासभेच्या ठरावानें ही गोष्ट उघड झाली आहे कीं, हिंदुसभा जरी आपल्या योजनेला चिकटून असली तरी राजकीय मतभेद मिटविण्यासाठीं तडजोड करावयाला तिची तयारी आहे. उलट, जिना यांनीं मुसलमानांच्या तर्फे म्हणून पुढें केलेल्या मागणीला मात्र सर्व मुसलमान समाजाचा पाठिंबा नाहीं, इतकेंच नव्हें तर कांहीं मुस्लीम संस्थांनीं त्याविरुद्ध ठरावहि केले आहेत ! शिवाय, जिना यांनीं आपल्या योजनेबाबत अशी कडक अट घातली आहे कीं, माझी योजना एक आहे तशी तरी स्वीकारा, नाहीं तर अजीबात नाकारा !

त्यामुळें, त्यांच्या योजनेवर मत देणें हिंदुसभेला मोठें बिकट होऊन बसलें आहे ! तथापि, एका बाबतींत तिचें धोरण स्पष्ट आहे तें हें कीं, नवीन प्रांत किंवा कायदेमंडळें निर्माण करण्याच्या प्रश्नाची मतदारसंघाच्या प्रश्नाशीं सांगड घालण्यांत येऊं नये. हे दोनहि प्रश्न अगदीं स्वतंत्र समजले जावेत. पाटणा येथें हिंदु–सभेनें ऑल–इं. कॉं. कमिटीला अशी विनंति केली होती कीं, तिनें तूर्त हिंदु-मुसलमानांच्या या वादांत तोंड घालूं नये. पण ही सूचना कमिटीनें ऐकली नाहीं. मुंबईला, सिमल्याला व अगदीं अलीकडे मद्रासला या बाबतींत तिनें ठराव केले ! नंतर थोड्याच दिवसांनीं कलकत्त्यास भरलेल्या मुस्लीम लीगनें आपल्या ठरावाच्या योगानें या प्रश्नाला निराळेंच वळण दिलें ! सायमन कमिशन आल्यावर साहजिकच या प्रश्नाला जोरानें चालन मिळालें, व दिल्ली येथें उभय समाजांनीं स्वतंत्र रीतीनें व पुन: सर्वपक्षीय परिषदेंत या प्रश्नाची चर्चा केली. अखेर असें दिसून आलें कीं, कांहीं बाबतींत हिंदु-मुसलमानांचे मतभेद मूलगामी व तीव्र आहेत; व तेहि इतके कीं, उभय पक्षांना संमत होईल अशी समेटाची योजना तयार करणें ही गोष्ट अशक्यप्राय आहे ! बॅ. जिना हे, निदान आपल्या पक्षातर्फें तरी, निराळी अशी योजना घेऊन पुढें येतील तरच कदाचित् मुंबई येथें मेमध्यें भरणाऱ्या सर्वपक्षीय परिषदेंत कांहीं तरी तडजोड होऊं शकेल.

सर महंमद शफी यांच्या पक्षांतील मुसलमानांना ( १ ) वरपासून खालपर्यंत सर्व प्रातिनिधिक संस्थांत जातवार व जादा प्रतिनिधित्व हवें, ( २ ) लखनौच्या करारान्वयें मुसलमानांना मिळालेल्या सर्व सवलती कायम राहिल्या पाहिजेत. इतकेंच नव्हे तर बंगाल व पंजाब प्रांतांत अधिक सवलती हव्या आहेत, ( ३ ) प्रांतांच्या पुनर्घटनेमुळें किंवा त्यांना सुधारणा–कायदा लागू केल्यामुळें मिळणाऱ्या नवीन सवलती हव्या आहेत. ( ४ ) पात्रापात्रतेचा विचार न करतां नोकऱ्यांच्या खैरातींत हिंदूंच्या बरोबरीनें वांटणी हवी आहे !

बॅ. जिना यांच्या राष्ट्रीय बुद्धीनें प्रेरित झालेल्या पक्षाला संयुक्त मतदारसंघाची उपयुक्तता पटते. पण संयुक्त मतदार संघाच्या योजनेला मान्यता देणें म्हणजे हिंदूंना सवलत देणें आहे, असें त्याला वाटत असावें ! त्यामुळें

व मुसलमानांचे हितसंबंध रक्षण करण्याच्याहि बुद्धीनें या योजनेला मान्यता देण्याच्या बाबतींत त्या पक्षाच्या कांहीं अटी आहेत. या अटी किंवा मान्यतेची किंमत पुढीलप्रमाणें:—

( १ ) मतदारांच्या प्रमाणांत नव्हे तर लोकसंख्येच्या प्रमाणांत प्रातिनिधिक संस्थांत जागा राखून ठेवणें ! ( २ ) ज्या प्रांतांत मुसलमान बहुसंख्य आहेत त्या प्रांतांतहि त्यांच्यासाठीं जागा राखून ठेवणें ! ( ३ ) नवीन मुसलमानी प्रांत निर्माण करणें. उदाहरणार्थ, मुंबईपासून सिंध प्रांत वेगळा काढणें ! ( ४ ) वायव्य सीमाप्रांतांत सुधारणा-कायदा लागू करून मुसलमानांना अधिक राजकीय हक्क मिळवून देणें ! ( ५ ) हिंदी कायदेमंडळांत—असेंब्लींत—मुसलमानांचे ⅓ सभासद ठेवणें ! ( ६ ) प्रांताची पुनर्घटना करतांना मुसलमानांची जेथें बहुसंख्या आहे, तेथें तिला बाध न येईल अशी हमी देणें ! ( ७ ) विशिष्ट परिस्थितींत मुसलमानांना कायदेमंडळांत व्हेटोचा हक्क असावा अशी हमी देणें !

गेल्या फेब्रुवारींत दिल्ली येथें भरलेल्या हिंदु-महासभेच्या बैठकींत हिंदूंची मागणी पुढील ठरावांत व्यक्त करण्यांत आली:—

(१) सर्व प्रांतांत सर्व जातींना सारखा मताधिकार. (२) सर्व प्रातिनिधिक संस्थांत संयुक्त मतदारसंघातर्फे निवडणुकी. (३) अल्पसंख्य जातींसाठीं जरूर तर कांहीं ठराविक मुदतीपर्यंत फक्त प्रांतिक कायदेमंडळांत प्रौढ लोकांची ( Population ), कर देणारांची किंवा मतदारांची संख्या यांपैकीं कोणत्या तरी एका प्रमाणावर जागा राखून ठेवाव्या. (४) बहुसंख्य जातीसाठीं कोठेंहि जागा राखून ठेवूं नयेत. (५) राज्यकारभाराच्या व सांपत्तिक परिस्थितीच्या दृष्टीनें त्या त्या प्रांतांची वगैरे विशेष रचना लक्षांत घेऊन प्रांतांची पुनर्घटना करावी. (६) जातीय दृष्टीनें कोणत्याहि प्रांताची पुनर्घटना करूं नये. (७) सीमांत प्रांतांत, बलुचिस्थानांत व सरहद्दीवरील इतर जिल्ह्यांत राजकीय व न्यायविषयक सुधारणा एकदम अमलांत आणाव्या व पुढें सुधारणा कायदा लागू करावा. (८) नोकरांच्या बाबतींत जातवारीच्या तत्त्वाला वाव देऊं नये. (९) कोणत्याहि जातीसाठीं

कोणत्याहि कायदेमंडळांत ' हम करे सो ' या तत्त्वावर प्रतिनिधींचें प्रमाण राखून ठेवण्यांत येऊं नये.

या बाबतींतील राष्ट्रीय सभेचें धोरण पुढीलप्रमाणें सांगतां येईलः—

( १ ) सर्वत्र संयुक्त मतदारसंघ. ( २ ) लोकसंख्येच्या तत्त्वावर जरूर तर जागा राखून ठेवाव्या. ( ३ ) सर्व अल्पसंख्य जातींना सप्रमाण सवलती. ( ४ ) शीखांच्या पंजाबमधील जादा प्रतिनिधित्वाच्या न्याय्य मागणीला मान्यता. ( ५ ) प्रांतांची भाषावार पुनर्घटना. ( ६ ) सिंध आणि आंध्र, उत्कल व कर्नाटक या प्रांतांची ताबडतोब पुनर्घटना.

या तीनहि योजनांची तुलना केली असतां त्यांतील साधर्म्य—वैधर्म्याची कल्पना येऊन 'माझी योजना एक सगळी तरी मान्य करा, नाहीं तर अजीबात नाकारा,' हा जिनांचा हक्क समेटाला कसा नडतो आहे हें कळून येईल. जिनांची योजना व हिंदुसभेची योजना यांच्यांत तर वैषम्य आहेच पण, राष्ट्रीय सभेची योजना व जिनांची योजना यांच्यांत वैषम्याचे मुद्दे कांहीं कमी नाहींत ! मुसलमानांना सवलती देण्याची अगदीं तयारी करून बसलेल्या राष्ट्रीय सभेच्या दिलदार पुढाऱ्यांनाहि असेंब्लींत आमचे ⅓ प्रतिनिधी असावेत आणि ज्या प्रांतांत आमची बहुसंख्या आहे त्या प्रांतांतहि आमच्यासाठीं जागा राखून ठेवाव्या अशी मागणी जेव्हां मुसलमानांनीं केली, तेव्हां आपला उदारपणानें पुढें केलेला हात आंखडता घेणें इष्ट वाटलें ! जिना यांच्या योजनेची छाननी करून, त्यांत पटणारे व न पटणारे मुद्दे कोणते आहेत ते पाहूं.

( १ ) संयुक्त मतदारसंघाची योजना दोनहि पक्षांना मान्य आहे. जातवार निवडणुकीला हिंदूंचा प्रथमपासूनच विरोध होता. व आतां जिनांनींहि तिची निष्फलता मान्य केली आहे. संयुक्त मतदारसंघातर्फें निवडणुकी झाल्यास राष्ट्रीय बुद्धीचीं माणसें विजयी होतील हा राष्ट्रीय दृष्टीनें मोठाच लाभ होय. म्हणून उभयपक्षांना संयुक्त मतदार संघाच्या योजनेला मान्यता द्यावी.

( २ ) संयुक्त मतदारसंघ अमलांत आल्यास स्वजातीसाठीं जागा राखून ठेवण्याची मुसलमानांची मागणी तूर्त तरी योग्य आहे असें मला वाटतें. मात्र जागा राखून ठेवावयाच्या त्या लोकसंख्येच्या तत्त्वावर किंवा अल्पसंख्य जातीच्या कर देण्याच्या किंवा मताधिकाराच्या सामर्थ्यावर राखून

ठेवाव्या. वस्तुतः कारभाराचें सामर्थ्य हेंच मताधिकाराच्या पात्रतेचें गमक समजलें जावें. पण लोकसंख्येच्या तत्त्वावरहि मुसलमानांसाठीं जागा राखून ठेवण्याची हिंदूंनीं तयारी दर्शविली आहे व मी तरी मुसलमानांना ही त्यांनीं एक सवलतच दिली आहे असें समजतों.

( ३ ) बहुसंख्य जातीसाठींहि जागा राखून ठेवण्याची मुसलमानांची मागणी अगदीं वेडगळ आहे. राष्ट्रैक्याच्या तत्त्वावर घाव घालणारी ही मागणी असून मुसलमानांना आत्मविश्वास नाहीं असेंच ती दर्शविते.

( ४ ) मध्यवर्ती कायदेमंडळांत आपल्यासाठीं $\frac{1}{3}$ जागा राखून ठेवाव्या ही मुसलमानांची मागणीहि याच दृष्टीनें अगदीं गैर आहे. लोकसंख्येच्या तत्त्वावर जर जागा राखून ठेवावयाच्या तर त्या प्रमाणांत जें प्रतिनिधित्व मध्यवर्ती कायदेमंडळांत मिळेल तेवढ्यावर मुसलमानांनीं संतुष्ट रहावें.

( ५ ) सीमांत प्रांताला सुधारणा देण्याच्या बाबतींत आपला विरोध नाहीं हें असेंब्लींत आलेल्या ठरावाला अनुकूल मत देऊन हिंदूंनीं सिद्ध केलेंच आहे. मुसलमानांची या प्रांताला सुधारणा मागण्यांत निवळ जातीय दृष्टि असल्यामुळें हिंदूंनीं साहजिकच जातीय दृष्टीनें त्या मागणीला थोडा विरोध केला ! माझें स्वतःचें या बाबतींत असें मत आहे कीं, हा प्रांत पंजाबांतच सामील करावा.

( ६ ) सिंध प्रांत वेगळा करण्याचा प्रश्नहि याच स्वरूपाचा आहे. भाषेच्या, राज्यकारभाराच्या किंवा सांपत्तिक वगैरे दृष्टीनें जर सिंध प्रांत कोणी वेगळा करावा म्हटला तर तें इष्टच वाटेल. पण मुसलमान जे ही मागणी करतात, ती केवळ जातीय दृष्टीनें ! राष्ट्रीय सभेच्या पुढें राज्यकारभाराच्या खर्चाचा प्रश्न मुळींच नसल्यामुळें, तिनें चळवळीच्या सोयीसाठीं सात वर्षांपूर्वी भाषेच्या तत्त्वावर चुटकीसरशीं प्रांतांची पुनर्घटना केली, भाषावर प्रांतरचना व्हावी हें खरें. पण केवळ भाषेच्याच दृष्टीनें या प्रश्नाकडे न पाहतां राज्यकारभाराची सोय व खर्च याहि गोष्टी पाहिल्या पाहिजेत. सिंध, आंध्र, कर्नाटक व उत्कल यांचे निराळे प्रांत बनवावे या राष्ट्रीय सभेच्या योजनेला ज्यांनीं संमति दिली, त्यांनाहि खर्चाच्या दृष्टीनें ही पुनर्घटना कितपत इष्ट होईल याबद्दल शंकाच आहे ! अशा स्थितींत निवळ जातीय दृष्टीनें सिंधचा वेगळा प्रांत करणें किती वेडेपणाचें होईल.

या बाबतींत त्या प्रांतांतील अल्पसंख्य जातीचें मतहि लक्षांत घ्यावयास नको काय ?

( ७ ) जातवारीच्या तत्त्वावर नोकऱ्यांची वांटणी व्हावी, ही मागणी असमंजसपणाची आहे. सरकारनें हें धोरण मुसलमानांची हितदृष्टि मनांत वागवून अमलांत आणलेंच आहे. पण ही मागणी वस्तुतः अव्यवहार्य व म्हणून असमंजसपणाची आहे.

( ८ ) व्हेटोची मागणीहि अशीच आहे. पण मागणीचें स्वरूपच मुळांत स्पष्ट नसल्यामुळें तिच्याविषयीं मी अधिक कांहीं बोलत नाहीं.

मातृभूमीपेक्षां परकीय मुसलमानी राष्ट्राविषयीं अधिक भक्ति बाळगणाऱ्याच्या मुसलमानांच्या वृत्तीमुळें हिंदू–मुसलमानांच्या ऐक्याचा प्रश्न कसा बिकट झाला आहे हें मी कानपूर येथील आपल्या भाषणांत सांगितलेंच होतें. या प्रश्नावर माझ्यासारखेंच मत एका मुसलमान गृहस्थानेंहि प्रदर्शित केलें आहे हें सांगावयास मला आनंद वाटतो. प्रसिद्ध हिंदी कम्यूनिस्ट मि. शौकत उस्मानी यांनीं आपल्या 'पेशावरपासून मास्को' या पुस्तकांत असहकारयुगांतील खिलाफत चळवळीच्या काळांत स्वदेशाचा त्याग करून मुसलमानी राष्ट्रांत स्थायिक व्हावयास निघालेल्या हिंदी मुसलमानांच्या 'हिजरातां'तील अनुभवाचें मोठें विलक्षण वर्णन केलें आहे. ब्रिटिश राज्यावर असंतुष्ट झालेले कांहीं मुसलमान त्या काळांत इतर मुसलमानी राष्ट्रांत स्थायिक व्हावयास निघाले. सर्वच मुसलमानांना या 'हिजरातां-'त सामील होणें शक्य नव्हतें. पण, जे 'हिजरातां'त सामील झाले, त्यांची मात्र देशद्रोही मनोरचना या प्रसंगीं स्पष्ट दिसून आली. या 'हिजरातां'त सामील झालेल्या धर्मवेड्या मुसलमानांना जो धडा मिळाला, तो इतर मुसलमान विसरणार नाहींत, अशी मला उमेद आहे. त्यांना हें स्पष्ट कळून आलें कीं, हिंदुस्थानांत आपल्याविषयीं जें प्रेम आहे त्याच्या एक–शतांशही आपल्या धर्मबांधवांत किंवा इतर देशांत नाहीं ! मि. शौकत उस्मानी आपल्या पुस्तकांत वर्णन करतातः—

" खिलाफतभक्तांविषयींची अफगाण लोकांची मनोवृत्ति येथें वर्णन करणें अवश्य आहे. हिंदी मुसलमानांची ज्या खिलाफतीवर इतकी निष्ठा आहे आणि जिचें ते येवढें स्तोम माजवितात, तिच्याविषयीं अफगाण

लोकांना कांहींच वाटत नाहीं! खिलाफतीविषयीं ते सर्वथैव उदासीन होते; व कांहीं चिमूटभर लोक जी कळकळ दाखवीत ती केवळ ब्रिटिशांच्या विरुद्ध तिचा शस्त्रासारखा उपयोग करतां येतो म्हणून! अफगाण लोक केवळ राष्ट्रीय दृष्टी आहेत. त्यांचें राष्ट्र हेंच त्यांचें सर्वस्व! खिलाफतीवर तुमची निष्ठा आहेना! असा प्रश्न आम्ही विचारला असतां, आम्हाला जें तुच्छतापूर्ण उत्तर मिळे तें ऐकून आम्ही थक्क होत असूं. खिलाफत ही काय चीज आहे, हेंच त्यांना माहीत नाहीं! स्वदेशापेक्षां मक्कामदिनेवर जास्त प्रेम असल्याचा बहाणा करणाऱ्या आमच्या मुसलमान पुढाऱ्यांनीं अफगाणिस्थानांत जाऊन तेथील शेतकऱ्यांपासून देशाभिमानाचें शिक्षण अवश्य घ्यावें! आमच्या मौलानांनीं अफगाणिस्थान, तुर्कस्थान वगैरे मुसलमान देशांत मजबरोबर यावें आणि खिलाफत व धर्मभूमि (मक्का-मदिना) यांच्याविषयीं जी निष्ठा हिंदुस्थानांत प्रकट केली जाते, तिचा एक-शतांश तरी त्या देशांत आढळतो का मला दाखवावा! स्वदेशापेक्षां धर्मभूमीवर जास्त प्रेम करण्याची दुष्ट प्रवृत्ति मुसलमानांत बळावल्यामुळें त्यांना स्वदेशविषयक कर्तव्याची जाणीवहि उरलेली नाहीं."

असो, हिंदु-मुसलमानांच्या समेटाचा हा प्रश्न सुटावयाचा कसा? त्याला माझें उत्तर एवढेंच कीं, 'कांहीं दिवस वाट पहा'. पुढाऱ्यांना आतां परिस्थितीची योग्य कल्पना आहे तेव्हां आतां अनुकूल संधीची वाट पाहात तूर्त थांबणेंच योग्य होईल. आंतरराष्ट्रीय उलाढालीमुळें मुसलमानांची चढेल दृष्टि निवळून त्यांना स्वदेशाविषयीं अधिक प्रेम वाटूं लागेल; व दिवसेंदिवस वाढत चाललेली आपली राजकीय दुर्गति पाहून हिंदूहि ताळ्यावर येतील. हिंदूंनीं संयुक्त मतदारसंघाचें उगाच स्तोम माजवूं नये. देशाची प्रगति कौन्सिलावरच अवलंबून आहे असें नाहीं; व कौन्सिलांच्या हातीं सत्ताहि अगदीं थोडी आहे. कौन्सिलाबाहेरचेंच काम खरोखरी महत्त्वाचें आहे व तिकडेच हिंदूंनीं लक्ष वळवावें.

या वादांत एक गोष्ट निर्विवाद आहे. ती म्हणजे हिंदूंची परधर्मीयांच्या बाबतींतील अत्यंत सहिष्णु व उदार वृत्ति. हिंदु समाज सहिष्णु होता म्हणूनच मुसलमानांची संख्या सात कोटींपर्यंत व खिस्ती लोकांची दोन कोटींपर्यंत वाढली! शुद्धि-संघटनेची चळवळ सुरू झाल्यावरहि हिंदूंनीं छळानें

व बलानें शुद्धि घडवून आणल्याचें एकहि उदाहरण कधीं घडलेलें नाहीं! हिंदूंच्या हातांत अनेक प्रसंगीं राजसत्ता होती व त्यांनीं मनांत आणलें असतें तर ' शठं प्रति शाठ्यं ' हा न्याय अमलांत आणणें त्यांना कठीण नव्हते पण त्यांची परधर्मसहिष्णुता कधींच ढळली नाहीं! शिवाजीमहाराजांच्या राज्यांत मुसलमानी धर्मविषयींहि किती आदर बाळगला जात असे, यांचें वर्णन यदुनाथ सरकारांसारख्या परप्रांतीय इतिहासकारांनींहि मुक्तकंठानें केलें आहे. अशा स्थितींत स्वराज्यसंपादनाच्या कार्यांत इतर जातींनीं हिंदूंशीं जर सहकार्य केलें तर उत्तमच; पण न केलें तरीहि कांहीं वाईट नाहीं. सहकार्य हें चांगलें असलें तरी स्वावलंबन हेंच खरोखरी श्रेयस्कर आहे!

---

# ८६. बंगाल प्रां. हिंदु परिषद्

( १९२९ सालीं डाक्का येथें भरलेल्या बंगाल प्रांतिक हिंदु परिषदेंत केलेल्या अध्यक्षीय भाषणाचा सारांश. )

" ही आपली पांचवी प्रांतिक हिंदु परिषद आहे. कलकत्त्याचे प्रसिद्ध नागरिक रा. रामानंद चतर्जी यांनीं सुरत येथें भरलेल्या अखिल–भारतीय हिंदु महासभेचें अध्यक्षस्थान स्वीकारलें होतें. आतां मी पुण्याहून मुद्दाम येथें येऊन अशाच प्रकारचें कार्य करीत आहे. मुंबई व बंगाल या दोन प्रांतांत हिंदु समाजाच्या दृष्टीनें जो हा एकोपा दृष्टीस पडत आहे तो इतर सर्व प्रांतांतूनहि दृष्टीस पडणें आवश्यक आहे.

हिंदुधर्म व हिंदुसंस्कृति जगाच्या पाठीवर जर कोठें जीव धरून असेल तर ती एकट्या हिंदुस्थानांतच आहे. मुसलमान व खिस्ती या समाजांचें मात्र तसें नाहीं. मुसलमानी समाज हिंदुस्थानापासून तो थेट कॉन्स्टँटिनोपलपर्यंत पसरला आहे. आणि जेथें खिस्ती नाहीं असा एकहि देश जगांत आढळणार नाहीं. हिंदुधर्माशीं ज्याचें विशेष साम्य आहे असा बौद्ध धर्म हाच काय तो एक धर्म. तरी पण हें बंधन हिंदुस्थान व बौद्ध राष्ट्रें यांस एके ठिकाणीं आव-

रून धरण्यास म्हणण्यासारखें समर्थ नाहीं. आम्ही व बौद्ध राष्ट्रें हीं एका आशिया खंडांतील, यामुळें परस्परांचा परस्परांशीं जो जिव्हाळा उत्पन्न होईल तेवढाच.

हिंदु समाजानें आपला जगाशीं असलेला संबंध पूर्वीच तोडून टाकला आहे व तो एक प्रकारें आपल्याभोंवतालीं खंदक खणून बसला आहे. अशा या दुर्बल बनलेल्या समाजास ऐक्य हेंच सामर्थ्य संपादण्याचें साधन आहे. पण ही गोष्ट दुर्दैवानें हिंदु पुढाऱ्यांच्या लक्षांत येत नाहीं. त्यांना वाटतें कीं, 'हिंदु-धर्माचा पुरस्कार केल्यानें जातीविशिष्ट चळवळ सुरू केल्याचें आपणास पाप लागेल. हिंदु समाज हा हिंदुस्थानांतील सर्व समाजांत संख्येनें अत्यंत मोठा समाज आहे. तेव्हां त्यानें सर्व समाजांतील ऐक्य वृद्धिंगत करण्याकरितां आपण हिंदु आहोंत हें विसरून जावें.' हिंदु राजकीय पुढाऱ्यांपैकीं आपणांस अत्यंत श्रेष्ठ समजणाऱ्या कांहीं पुढाऱ्यांना हिंदुसभा अस्तित्वांत आहे हें कबूल करण्यांतहि कमीपणा वाटत असे. पण अलीकडे अलीकडे त्यांना ही सभा नाईलाजानें मान्य करणें भाग पडत आहे. पण त्यांच्या हें लक्षांत येत नाहीं कीं, मुसलमानांचीहि एक खिलाफत कमिटी आहे व ती परवापरवांपर्यंत राष्ट्रीय सभेच्या डोक्यावर मिरें वाटीत होती.

सद्यःस्थितींत हिंदु समाजानें पुढील दोन गोष्टींचा विचार करणें आवश्यक आहे--( १ ) हिंदु समाजास बळकट होऊन आत्मसंरक्षण करावयाचें असेल तर त्यानें आपली पुनर्घटना करणें जरूर आहे. व ती करीत असतां योग्य त्या सामाजिक सुधारणाहि त्यानें घडवून आणल्या पाहिजेत. ( २ ) हिंदु-स्थानाला राजकीय स्वराज्य मिळवावयाचें आहे. तें मिळवीत असतां हिंदु समाजाला अन्याय किंवा अपकार होऊं नये यासाठीं लोकमत तयार करणें आवश्यक आहे. हिंदु समाजाची अंतर्गत सुधारणा करणें हा प्रश्न हिंदूंचा हिंदूंनीच सोडविला पाहिजे. आणि तो सोडवीत असतांना विचारांचा सयुक्तिकपणा, मनुष्या मनुष्यांमधील न्यायासंबंधाची चाड आणि जगाच्या व्यवहारांत आर्थिक व राजकीय दृष्ट्या हिंदूंना जें स्थान मिळणें जरूर आहे तें स्थान मिळवून देण्याचा उद्योग हीं तीन सूत्रें मुख्यतः लक्षांत ठेविलीं पाहिजेत, व त्या दिशेनें आपला आज प्रयत्नहि सुरू आहे. ही झाली अंतर्गत सुधारणा. बाह्य सुधारणेची भिस्त राजकारणावर आहे. ही सुधारणा करतांना आपले

हितसंबंध इतर समाजाच्या हितसंबंधाशीं मिळते करून घेतले पाहिजेत. आणि ते मिळते करून घेत असतां युक्तिवाद, मतप्रचार, चळवळ व लोकमताची अनुकूलता इत्यादि साधनें हस्तगत केलीं पाहिजेत.

हिंदुसभेचा योगायोग असा आहे कीं, तिचे हेतु व उद्देश यांविषयीं गैरसमज व विपर्यास करण्यांत यावा. पण हा विपर्यास व गैरसमज दूर करणें हेंच हिंदुमहासभेचें व प्रांतिक हिंदुसभांचें मुख्य कर्तव्य आहे. मुंबईस दंगा–कमिटी नुकतीच नेमण्यांत आली होती. तिजपुढें झालेल्या कांहीं साक्षींत हिंदुसभेवर भलभलते आक्षेप घेण्यांत आले. त्या आक्षेपांस मुंबईच्या प्रांतिक हिंदुसभेचे अध्यक्ष रा. मुकुंदराव जयकर यांनीं चोख उत्तर देऊन हिंदुसमाजाची बहुमोल कामगिरी बजाविली आहे व याबद्दल मी त्यांस धन्यवाद देत आहें. रा. जयकर यांची ही मोठ्या कसोटीची वेळ होती. पण तिला ते पूर्णपणें उतरले. त्यांनीं हिंदूसभेचे उद्देश विशद रीतीनें मांडून आपल्या विधानांस लाला लजपतराय, डॉ. मुंजे, सर शंकर नायर, रामानंद चतर्जी इत्यादिकांच्या भाषणांतील भरपूर आधार दिले. ते म्हणाले, ‘ मुसलमानांनीं कित्येक हिंदूस गुप्तपणानें बाटविलें आहे. या कामांत फसवणूक, गैरवागणूक याहि प्रयोगांचा उपयोग केला आहे. हिंदु स्त्रियांना व मुलांना पळवून नेणें व हिंदु-स्त्रियांशीं जबरीनें निक्का लावणें असेहि प्रकार घडले आहेत. पण या पापांना मुसलमानी धर्मामध्यें मुळींच शासन सांगितलें नाहीं. हिंदु-स्त्रियांना बाटविलें व त्यांच्याशीं लग्न लाविलें म्हणजे सर्व पापांवर पांघरूण पडतें असें इस्लामी धर्म सागतो. हिंदुधर्मांतून एकहि मनुष्य परधर्मांत जाईल तर त्याबद्दल नापसंती-दर्शविण्याचा हिंदूंना हक्क पोहोंचतो.”

रा. जयकर यांचें म्हणणें असें कीं, अल्पवयी माणसें कोणत्याहि समाजांतील असोत, त्यांच्या धर्माचें अशा रीतीनें संरक्षण करणें हें सरकारचें कर्तव्य आहे. हिंदुसभा कम्युनिझमच्या विरुद्ध आहे. तिचा मजूर–चळवळीशींहि संबंध नाहीं. मजुरांत हिंदू आहेत कीं, मुसलमान आहेत इकडेहि तिला लक्ष देण्याचें कांहीं कारण नाहीं. वरील गोष्टीस अनुकूल असें भाषण एका तरी हिंदु पुढाऱ्यानें केलें आहे काय ? असा सवाल जयकर यांनीं चौकशी कमिटीस विचारला असतां तिला डॉ. मुंजे यांच्याखेरीज इतर कोणाचेंहि नांव सांगतां आलें नाहीं. राष्ट्रीय सभा आणि खिलाफत चळवळ यांनीं संगनमत

केलें, आणि उलेमा आपले फतवे काढून राजकारणांत लुडबडूं लागले. त्या वेळीं हिंदूंच्या बचावाकरितां मुंबईची हिंदुसभा अस्तित्वांत आली असें जयकर यांचें म्हणणें आहे. मलबारांत मोपल्यांनीं हिंदूंवर कहर केला हें सर्वांस विदित आहेच. मलबारांतील मोपल्यांचा हा दंगा खिलाफत चळवळींतूनच उगम पावला.

शुद्धीची चळवळ हिंदूंना तरी नवीन नाहीं. पुरातन कालीं हिंदूलोक परधर्मीयांस आपल्या धर्मांत घेत असत. पण तें धर्मांतर राजीखुषीचें असे. त्यांत जुल्मजबरदस्ती किंवा फसवणूक फसगत नसे. पण मुसलमानांचें पाहावें तर त्यांना हिंदु स्त्रियांस व मुलांस धर्मांतराकरतां पळवून नेण्यांत मुळींच दिक्कत वाटत नाहीं. रा. जयकर यांनीं चौकशी कमिटीस सरळ प्रश्न विचारला कीं, एकाहि मुसलमान स्त्रीला हिंदूंनीं धर्मांतराकरितां पळवून नेल्याचें उदाहरण मला दाखवा. पण तसें एकहि उदाहरण कमिटीला दाखवितां आलें नाहीं.

हिंदूंतील दोष एवढाच कीं, ते पुरेशी चळवळ करीत नाहींत व संघटना वाढवीत नाहींत. अनाथालयें यासारख्या संस्थांची हिंदूंना फार गरज आहे. हिंदूंच्या विरुद्ध तीन गोष्टी करण्यांत येत आहेत. एक तर सरकार देशाला खरें जबाबदारीचें स्वराज्य देत नाहीं. दुसरें असें कीं, सरकारी अधिकारी भेदनीतीचा अवलंब करतात आणि तिसरें हें कीं हिंदु मुसलमानांत कलह उत्पन्न झाल्यास सरकार मुसलमानांची बाजू घेतें. जयकरांच्या साक्षींतील इतका विस्तृत भाग मीं उधृत केल्यामुळें माझे यासंबंधानें वेगळे विचार मांडण्याचे श्रम वांचले आहेत.

सरकार मुसलमानांविषयीं सक्रिय सहानुभूति कां दाखवितें याचीं आणखी कांहीं कारणें आहेत. संख्येनें आणि गटांनीं हिंदूंचें महत्त्व कमी करण्याचा सरकारचा डाव आहे. कलाकौशल्य, उद्योगधंदे आणि व्यापार यांत जेथें मुसलमानांची सरशी असते तेथें सरकार मागासलेल्या हिंदूंस मुसलमानांच्या बरोबरीस येण्याकरितां कोणत्याहि प्रकारच्या विशेष सवलती देत नाहीं. पण उलट शिक्षण, विद्वत्ता, संशोधकपणा आणि कलाकौशल्य यांत हिंदू लोक मुसलमानांवर सरशी करतील तेथें मुसलमानांची जात मागासलेली आहे अशी सबब सांगून सरकार त्यांस शक्य तितक्या अधिक सवलती देतें. मुसलमानांस खूष करण्याकरितां ते संख्येनें कमी आहेत हें निमित्त पुढें करून सरकार त्यांस

अधिकाराच्या जागा देतें, मग त्यापायीं राज्यकारभार बिघडला तरी त्यांस त्याची पर्वा नाहीं. खानेसुमारीचा रिपोर्ट लिहितांनाहि खानेसुमारीचे अधिकारी असाच पक्षपात करतांना आढळतात. १९११ सालीं खानेसुमारी झाली त्या वेळीं सेन्सस् कमिशनरांनीं हिंदु समाजांत एकजीव कसा नाहीं हें दाखविण्याचा प्रयत्न केला आहे. त्यानें सेन्सस् सुपरिंटेंडेंटांना ज्या जाती किंवा वर्ग हिंदु समाजांत मोडतात व ज्या जाती आणि वर्ग हिंदु समाजाच्या कसोटीस कमी पडतात त्यांची यादी देण्यास सांगितलें होतें. हें सांगण्यांतला हेतु दुसऱ्या प्रकारच्या जाती किंवा वर्ग हे हिंदु नाहींत असेंच दाखविण्याचा नव्हे काय ? त्यांनीं विशिष्ट जाति हिंदू धर्माच्या नाहींत हे दाखविण्याकरितां पुढीलप्रमाणें कारणें दिलीं आहेत—( १ ) जें ब्राह्मणांचें वर्चस्व नाकबूल करतात ( २ ) ब्राह्मणांपासून किंवा हिंदु गुरूंपासून मंत्रोपदेश घेत नाहींत ( ३ ) वेदप्रामाण्य नाकबूल करतात ( ४ ) मोठमोठ्या हिंदु देवतांची पूजा करीत नाहींत ( ५ ) ज्यांचें उपाध्येपण चांगले ब्राह्मण पत्करीत नाहींत ( ६ ) ज्यांना उपाध्येच नाहींत ( ७ ) ज्यांचा हिंदु देवळांच्या गाभाऱ्यांत प्रवेश होत नाहीं ( ८ ) जे शिवल्यानें किंवा जे थोड्या अंतरावरून गेल्यानें विटाळ होतो ( ९ ) जे मृतास पुरतात ( १० ) गोमांस भक्षण करतात व गायीविषयीं आदर बाळगीत नाहींत.

या बारीक चौकशीचा अर्थ उघड आहे. जे हिंदु मुसलमानी संतांना भजतात त्यांच्या हिंदुत्वाबद्दल खानेसुमारीच्या रिपोर्टांत शंका घेतली जाते. पण कांहीं ख्रिश्चनहि ब्राह्मणांकडून कांहीं धार्मिक विधि करतात. त्यांच्या ख्रिश्चनपणाबद्दल मात्र शंका घेतली जात नाहीं. एका ठिकाणीं ब्राह्मण उपाध्याय नाहीं म्हणून हिंदुत्वाबद्दल शंका घेतली जाते. तर दुसऱ्या ठिकाणीं ब्राह्मण उपाध्ये असूनहि कांहीं जुने आचार सुटले नाहींत म्हणून 'ॲनिमिस्ट' म्हणून संबोधलेल्या लोकांचें हिंदुत्व मान्य करण्यांत येत नाहीं. खानेसुमारीच्या अधिकाऱ्यांनीं अगदीं अलिप्त असावयास पाहिजे. पण तेहि असा जातिविषयक पक्षपात करतात.

उलट कांहीं आपल्यांतलेच शीख, जैन, लिंगायत हे आपल्याला खानेसुमारींत हिंदु या सदरांत घालूं नये असें म्हणतात. ख्रिश्चन अगर मुसलमान यांच्यांत अनेक पंथ असले तरी कोणीहि आपल्याला ख्रिश्चन अगर मुसलमान

म्हणूं नका असें म्हणत नाहीं. जैन, शीख, लिंगायत यांना वेगळें राहाण्यानें कांहीं फायदा नसून सर्व हिंदुसमाजाचें मात्र ते या विभक्तिकरणानें नुकसान करतात. ही फुटून निघण्याची प्रवृत्ति हिंदुसमाजास घातक आहे व हिंदु-संघटन म्हणजे या सर्वांना मध्यवर्ती हिंदुसमाजाशीं निगडित करणें हेंच होय.

पण येवढ्यानेंच हें कार्य संपत नाहीं. हिंदुसमाजांतील पुढाऱ्यांनीं आपला बुद्धिवाद चालवून जुनाट व जीर्ण अशा हिंदुसमाजामधील दोष काढून टाकले पाहिजेत. कर्मठांशीं बुद्धिवाद करून त्यांची समाजसुधारणेस सहानुभूति मिळविली पाहिजे. प्रत्येक वर्गांतील व्यक्ती ही आपल्या पायावर उभी राहून समाजाची कार्यक्षम घटक बनली पाहिजे, काशीचे पंडित व मलबारांतील ब्राह्मण यांना आपण नव्या युगांत राहात आहोंत हें शिकविलें पाहिजे, हिंदू राजांना लोकसत्तेला मान देण्यास लाविलें पाहिजे, हिंदू श्रीमंतांनीं सामाजिक सत्कार्यास मदत केली पाहिजे व हिंदू मध्यम स्थितींतल्या माणसांनीं आपली बुद्धि चालवून जुन्या स्मृतींशीं व त्यांच्या आजच्या पुरस्कर्त्यांशीं वाद करण्यास भितां कामा नये. हल्लींचा जातिभेद इतका शिथिल झाला पाहिजे कीं, तो व्यवहारांत फारसा नडूं नये. चार मुख्य वर्गांतल्या पोटजाती नाहींशा करण्याचा उघड पुरस्कार केला पाहिजे. स्त्रियांना वारसाच्या बाबतींत पुरुषां-इतके हक्क मिळाले पाहिजेत. शिक्षण व सामाजिक जबाबदारी यांच्यावर पुरुषांइतकाच स्त्रियांचाहि हक्क असावयास पाहिजे. स्त्रियांना शारीरिक व स्वसंरक्षणाचें शिक्षण द्यावयास पाहिजे. सर्व जातींच्या लोकांना आर्थिक जीवनकलहामध्यें कोणताहि धंदा करण्यास मुभा असावी. अस्पृश्यता ताबड-तोब नाहींशी झाली पाहिजे. सर्वांना धार्मिक विचार व आचारस्वातंत्र्य दिलें पाहिजे. एकत्र सार्वजनिक प्रार्थना व पूजा व एकच धार्मिक तत्त्व-ज्ञानाच्या पुस्तकाचा स्वीकार करून हिंदुसमाज एकजीव केला पाहिजे. प्रत्येक हिंदुसमाजाचा घटक स्वतःचें व स्वतःच्या ज्ञातीचें संरक्षण करण्यास सिद्ध झाला पाहिजे. ब्रह्मविद्येप्रमाणेंच भौतिक विद्येलाहि महत्त्व दिलें पाहिजे. हेंच माझ्या मतें खरें संघटन व यांत इतर ज्ञातींशीं वितुष्ट आणणारें असें काय आहे हें कोणीहि दाखवून द्यावें. कोठेंहि कोणत्याहि क्षेत्रांत ‘ मी हिंदू आहे ’ हें हिंदूनें धैर्यानें सांगितलें पाहिजे. राजकीय क्षेत्रामध्येंहि त्यानें हें सांगण्यास कचरतां कामा नये.

नेहरूरिपोर्टसंबंधानें पुष्कळच चर्वितचर्वण झालें आहे. जबलपूरला १९२८ सालीं जे या बाबतींत हिंदुमहासभेनें ठराव केले तेच त्यापूर्वी सभेच्या अ. भा. कमिटीनें दिल्लीस मंजूर केले होते व तेच पुढें सुरतेला मंजूर केले. यांत हिंदूंनीं विचारपूर्वक आपलें म्हणणें मांडलें आहे. मध्यंतरीं १९२८ च्या ऑगस्टमध्यें सर्वपक्षीय परिषदेचा रिपोर्ट प्रसिद्ध झाला. त्या रिपोर्टांत व हिंदुसभेच्या निर्णयांत भेद आहेत; पण ते महत्त्वाचे नाहींत. नेहरूरिपोर्टानें स्वीकारलेलीं मुख्य तत्त्वें हिंदुसभेच्या ठरावाप्रमाणेंच आहेत. पण हिंदुसभेनें हीं तत्त्वें कोणत्याहि ज्ञातीचा उल्लेख न करतां सामान्यपणें मांडलीं आहेत, तर नेहरूरिपोर्टानें ज्ञातिशः विचार केला आहे. सुरतेच्या हिंदुसभेला तडजोडीसाठीं नेहरूरिपोर्ट स्वीकारण्याबद्दल आग्रह करण्यांत आला. ही तडजोड एका बाजूस हिंदुसभा व दुसऱ्या बाजूस कलकत्त्याच्या मुस्लीम-लीगनें पास केलेले ठराव यांच्यांत होती. नेहरूरिपोर्ट मान्य करावयाचा तर हिंदुसभेला दोन बाबतींत आपलें म्हणणें सोडावें लागत होतें. त्या बाबी अशा— ( १ ) संयुक्त मतदारसंघाला मुसलमानांची संमति मिळावयाची तर ती जातवार राखीव जागा देण्याच्या अटीवर व ( २ ) सिंध प्रांत विभक्त करणें. पण पुढें पंडित नेहरूंना असें आढळून आलें कीं, हिंदूसभेला नेहरूरिपोर्ट मान्य करावयास लावणें सोपें आहे, पण राष्ट्रीय मुसलमानांची देखील त्या रिपोर्टाला संमति मिळविणें कठीण आहे.

हिंदुसभा, कॉंग्रेस व मुस्लीम लीग यांच्या भूमिका मी जबलपूरच्या भाषणांत वर्णन केल्याप्रमाणेंच आजहि कायम आहेत. गेल्या दोन वर्षांच्या वादांत कांहीं नवा मार्ग सांपडला नाहीं. त्याच त्याच गोष्टींच्या पुनरुच्चारानें त्या त्या मनोवृत्ति तीव्र होत गेल्या आणि या सर्वांना एकत्र आणणारा असा हिंदुस्थानांत कोणीच राहिला नाहीं. श्री. सरोजिनी नायडू यांनीं मध्यस्थीचें काम पतकरलें आहे. पण त्यांच्या हातून अगर महात्मा गांधींच्या हातूनहि तें काम होईलसें दिसत नाहीं. अशा रितीनें एक प्रकारचा राष्ट्रीय पेंच उत्पन्न झाला आहे.

आणि हा सारा लखनौचा करार उस्तरण्याचा परिणाम ! लखनौच्या कराराला सुद्धां सर्व हिंदूंची आणि मुसलमानांची संमति नव्हती. पण बहुतेक राष्ट्रीय हिंदूंची व बहुतेक राष्ट्रीय मुसलमानांची त्यास संमति होती. पण आतां दहा वर्षांनंतर तेवढीहि एकी राहिली नाहीं. स्वतंत्र प्रतिनिधित्वाबद्दल मुसलमानांचा

ह्व्यास त्यांच्या अनुभवानें वाढत चालला आहे. लोकमान्य टिळक व लख-नौचा करार करणारे दुसरे लोक यांना दोष देणें सोपें असतें. पण त्याच्या जागीं दुसरा अधिक चांगला करार करणें हें तितकें सोपें नाहीं. हा सर्व घोटाळा संयुक्त मतदार–संघाच्या कल्पनेला फाजील महत्त्व दिल्यानें उत्पन्न झाला आहे. राष्ट्रीय दृष्ट्या संयुक्त मतदारसंघाचें महत्त्व आहे हें खरें, पण त्याचा अतिरेकहि होऊं शकतो. आणि आज संयुक्त मतदारसंघासाठीं मुसलमान मागत आहेत ती जबर किंमत देण्यापेक्षां मुसलमानांना भिन्न मतदारसंघ देऊन जुना लख-नौचा करार स्वीकारण्यास मी आतांहि तयार होईन. मुसलमानांच्या आजच्या धोरणामुळें जी हानी होत आहे, ती स्वतंत्र मतदार–संघांनेंहि होणाऱ्या हानी-पेक्षां अधिक आहे. म्हणून हिंदूसभेनें दिल्ली, जबलपूर, व सुरत या ठिकाणीं केलेल्या ठरावांना चिकटून राहावें असें माझें मत आहे. त्या ठरावांतील हेतु किंवा शब्द हे कोणत्याहि प्रकारें जातिनिष्ठ नाहींत.

स्वराज्य या शब्दांतील ‘ स्व ’ या शब्दाचें महत्त्व कित्येकांना कळत नाहीं. स्वराज्य म्हणजे राष्ट्रीय संस्कृति व धर्म यांचा मागमूस नाहींसा झालेलें काल्प-निक सबगोलंकारी राज्य नव्हे; किंवा जाती सोडून दिल्या तरी सुद्धां एखाद्या वेळीं राष्ट्रीय अभिमानाहूनहि वैयक्तिक अभिमानाची किंमत अधिक ठरते; आणि अशा प्रसंगीं ‘ मी म्हणजेच राष्ट्र असेंच कोणीहि उद्गार काढील. मी म्हणजेच राष्ट्र असें म्हणणाऱ्या व्यक्तीमुळेंच संघटित राष्ट्रें निर्माण होत असतात. कोणाहि हिंदूला अगर मुसलमानाला स्वराज्याकरितां परधर्म स्वीकारावयास सांगितला तर तो तयार होणार नाहीं आणि धर्माप्रमाणेंच इतर महत्त्वाच्या गोष्टींतहि हाच न्याय लागू पडतो.

स्वराज्यासाठीं कोणीहि आपल्या स्त्रियांच्या अब्रूची किंमत देण्यास तयार होणार नाहीं असें रामानंद चतर्जी यांनीं म्हटलें तें अगदीं यथार्थ आहे. राष्ट्रीयत्व ही अलीकडे एक फॅशन बनली आहे आणि ज्यांना जीविता-मधील इतर गोष्टींसंबंधानें कोणत्याहि प्रकारची भावना नाहीं ते सहजच ही फॅशन मिरवीत असतात. परमेश्वरानें जें मनुष्यत्व निर्माण केलें आहे तें केवळ राजकीय स्वराज्यांत संपत नाहीं. पण आज अशी स्थिति झाली आहे कीं, एकादें मधाचें पोळें ज्याप्रमाणें चाळवावें त्याप्रमाणें माशा उठल्या असून राष्ट्रीयत्वाच्या नांवानें हिंदूंचाच चावा घेत आहेत. जणूं काय मुसलमान

हे ज्ञातिनिष्ठ नाहींतच. असो, असें असलें तरी हिंदु व मुसलमान या दोघांनाहि मी असें म्हणेन कीं, "बंधूनो, एकमेकांच्या राष्ट्रीयत्वाचा अवास्तव फायदा घेऊन त्याचा उपयोग ज्ञातिनिष्ठेसाठीं करूं नका. जर खरोखरच दोघेहि ज्ञातिनिष्ठेनें अंध झालां असाल तर हें भांडण तिऱ्हाईत निःपक्षपाती इसमाकडे निर्णयार्थ सोंपवा. पण तिऱ्हाईत म्हणून सरकाराकडे जाण्यापेक्षां आपसांतच कांहीं तडजोड निघाली तर ती अधिक चांगली. ही तडजोडीची प्रवृत्ति दोघांमध्येंहि पाहिजे. पण आज तिची मुसलमानांतच अधिक वाण आहे."

---

## ८७. हिंदुमहासभेचें १४ वें अधिवेशन

( अध्यक्षीय भाषण, दिल्ली ता. २४ सप्टेंबर १९३२ )

" हिंदुमहासभेच्या या चौदाव्या अधिवेशनाच्या अध्यक्षपदाचा जो मान आपण मला दिला तो स्वीकारून मी आपल्या डोक्यावर मोठी जबाबदारी घेतली आहे, याची जाणीव मला आहे हें मी प्रांजलपणें कबूल करतों. १९१९ सालीं जबलपूर येथें भरलेल्या हिंदुमहासभेच्या अधिवेशनाचा मी अध्यक्ष होतों. त्या परिषदेपुढें जे महत्त्वाचे प्रश्न होते तेच या सभेपुढेंहि आहेत. आज ज्ञातिविषयक बाबतींत दिलेल्या निर्णयानें त्या प्रश्नांना फारच तीव्र स्वरूप आलें आहे. म्हणून आपण सर्वांनीं त्या प्रश्नांकडे काळजीपूर्वक व शांतपणें लक्ष द्यावें अशी माझी आपणांस विनंति आहे. ब्रिटिश सरकारातर्फे मि. रॅम्से मेक्डोनाल्ड यांनीं ज्ञातिविषयक बाबतींत जो निर्णय दिला आहे त्याच्याशीं प्रत्येक प्रांतांतील हिंदुसमाजाचा जिव्हाळ्याचा संबंध आला आहे. तथापि बंगाल, पंजाब, सरहद्द प्रांत आणि सिंध या प्रांतांतील हिंदुसमाजाला तर हा निर्णय फारच कठीण वाटत आहे. म्हणून मला अशी खरोखर इच्छा होती कीं, या अधिवेशनाचा अध्यक्ष म्हणून या प्रांतांतील एकादा प्रमुख हिंदु पुढारी नेमला जावा. परंतु ज्याअर्थी आपण मला आतां निवडलें आहे त्याअर्थी मी या सर्व प्रश्नांबाबत माझ्या जबाबदारीची जाणीव ठेवून माझें मत आपल्यापुढें मांडणार आहें.





१९२५ सालीं कानपूर येथें भरलेल्या हिंदु–महासभेच्या खास अधिवेशनाचा व १९२९ सालीं जबलपूर येथें भरलेल्या वार्षिक अधिवेशनाचा अध्यक्ष या नात्यानें भाषण करतांना मी हिंदु–महासभेचा इतिहास, तिचें धोरण, तिचें प्रचारकार्य वगैरे गोष्टींबद्दल साद्यंत हकीकत सांगितली होती. तिचा पुनरुच्चार मी आज करूं इच्छित नाहीं. तसेंच जबलपूर येथील माझ्या भाषणांत १९१६ सालीं लखनौ येथें हिंदु–मुसलमानांत जो करार झाला त्याच्याऐवजीं दुसरा कोणता नवा करार करावा याबद्दल आलेल्या निरनिराळ्या योजनांचा तपशीलवार उल्लेख व तुलना मीं केली होती. परंतु गोलमेज परिषदेमुळें व आतां १७ ऑगस्टच्या ज्ञातिविषयक निर्णयामुळें या प्रश्नाला निश्चित स्वरूप प्राप्त झालें आहे. म्हणून मी प्रथम त्या विषयाकडे वळतों.

मला प्रथमतः असें म्हणावयाचें आहे कीं, पंचांनीं पंचायत करून जो निकाल दिला जातो तसा हा निकाल नाहीं. ब्रिटिश सरकारनें आपल्या जबाबदारीवर दिलेला हा एक हुकुमवजा निर्णय आहे असें मी समजतों. गोलमेज परिषदेच्या किंवा सल्लागार कमिटीच्या ज्या सभासदांनीं बेसावधगिरीनें सरकारकडे ही पंचायत सोंपविली त्या सभासदांना या निर्णयाच्या बाबतींत तक्रार करण्यास साहजिकपणें जागा नाहीं. परंतु हिंदु–सभेची तशी गोष्ट नाहीं. गोलमेज परिषदेला आपले प्रतिनिधि पाठवा असें सरकारनें तिला केव्हांहि सांगितलें नाहीं आणि म्हणून १७ ऑगस्टचा निर्णय हिंदु–सभेला बंधनकारक ठरूं शकत नाहीं.

पंधरा वर्षांपूर्वी या तारखेच्या जवळपासच्या एका तारखेस राजकीय सुधारणांबद्दल हिंदुस्थानच्या त्या वेळच्या स्टेट–सेक्रेटरींनीं असाच एक जाहीरनामा काढला होता. त्यांत असें म्हटलें होतें कीं, सरकारच्या राज्यकारभाराच्या प्रत्येक खात्यांत हिंदी लोकांचें सहकार्य घेतलें जावें म्हणून निश्चित व्यवस्था करण्याचें सरकारनें ठरविलें आहे व अशा रीतीनें ब्रिटिश साम्राज्यांतील एक घटक म्हणून जबाबदारीचें स्वराज्य आस्ते आस्ते हिंदी लोकांना देणार होतें. पायरी–पायरीनें पुढें जाऊन प्रगति करावयाची असा त्यांत हेतु दिला होता. परंतु कोणत्या व किती प्रमाणांत हिंदी लोकांची या स्वराज्याच्या बाबतींत प्रगति व्हावी हें ठरविण्याचा अधिकार ब्रिटिश सरकारनें

आपल्या हातीं ठेवला होता. या कामीं अर्थात् लोकांचें सहकार्य सरकार घेणारच होतें. १९१७ च्या ऑगस्टच्या २० तारखेस जाहीरनामा काढून सरकारनें जें धोरण आंखलें त्या धोरणांतीलच १९३२ च्या १७ ऑगस्टला दिलेला ज्ञातिविषयक निर्णय ही एक पायरी आहे हें उघड आहे. यामधील काळांत सरकारनें लहान लहान सुधारणा केल्या असतील; परंतु प्रत्यक्ष जबाबदारीचा एक अंशहि सरकारनें अद्याप दिला नाहीं ही गोष्ट सर्वमान्य होण्यासारखी आहे. म्हणून असें म्हटलें पाहिजे कीं, नवीन राजकीय सुधारणा देण्यापूर्वी ज्ञातिविषयक निर्णय देऊन त्यांतील धोरणाबद्दलचीहि जबाबदारी सरकारनें आपल्या एकट्याच्याच शिरावर घेतली आहे.

गोलमेज परिषद बोलावून हिंदुस्थानच्या लोकांशीं आपण विचारविनिमय करूं व निरनिराळ्या समाजांच्या पुढाऱ्यांमध्यें ज्या बाबतींत एकमत होईल ती बाब आपल्यास बंधनकारक होईल असें सरकारानें म्हटलें होतें हें खरें. पण सरकारास हें पक्कें माहीत होतें व त्यांनीं आपल्या अंतःकरणांत अशी खूणगांठ बांधली होती कीं कोणत्याहि प्रश्नांवरे असें एकमत होणार नाहीं. किंबहुना मी असें म्हणेन कीं, असें ऐकमत्य होऊं नये म्हणून जरूर त्या सर्व कारस्थानी उपायांची तजवीज सरकारनें केली होती. उघड रीतीनें व गुप्त रीतीनें अल्पसंख्याकांना त्यांनीं उत्तेजन दिलें व मुसलमानांना तर इतकें डोक्यावर घेतलें कीं, त्यांनीं इतर अल्पसंख्याकांनीं आपल्या मागण्यांचा पारा फार उंच चढविला. ऐकमत्य झाल्याबरोबर तो निर्णय सरकारास बंधनकारक आहे या आमिषाला मोठे धुरंधर व्यवहारज्ञ पुढारी बळी पडले ही दुःखाची गोष्ट आहे. जेव्हां अशा तऱ्हेचा करार केला जातो त्या वेळीं करार करणाऱ्या लोकांना याची जाणीव असावयास पाहिजे कीं वाटाघाट करणारे दोघेहि एकदमच तरतील अगर बुडतील. एकट्या कोणासहि सुखरूप परत जाण्याची शक्यता नाहीं अशी जाणीव असली तरच असल्या वाटाघाटी यशस्वी होतात. नैराश्य आलें किंवा आपल्या स्वतःच्या हातींच कायमची निर्णय देण्याची शक्ति आहे हें माहीत असलें तरच अशा वाटाघाटींत ऐकमत्य होतें.

परंतु या ऐकमत्यानें ज्याचें नुकसान होणार आहे असा सत्ताधारी व त्रयस्थ मनुष्य बाजूस उभा राहून आपल्या हातीं असलेल्या अधिकारांच्या दानाची लालूच एका पक्षास देऊं लागला तर ऐकमत्य अशक्य आहे. कारण





बेकी होण्यांत व मतभेद उत्पन्न करण्यांत त्याचा फायदा असतो. त्रयस्थाला हें माहीत असतें कीं एकी व भांडणें होण्यांत त्याचा फायदा आहे. हिंदुस्थानां-तील राजकीय पुढाऱ्यांनाहि हा दुसऱ्यास कोडें घालण्याचा खेळ खेळता आला असता, नाहीं असें नाहीं. ब्रिटिश पार्लमेंटामध्यें जे पक्षोपपक्ष आहेत त्या सर्वांनीं अगदीं एकमतानें यापुढील सुधारणांचा हप्ता कोणत्या पद्धतीनें द्यावा हें ठरविल्यास आम्ही तो स्वीकारण्यास तयार आहोंत, उगाच गोलमेज परिषदेची धावाधाव कां करतां? असा उलटा पेंच हिंदी पुढाऱ्यांनाहि टाकतां येणें शक्य आहे. पार्लमेंटांतील कॉन्झरव्हेटिव्ह, लिबरल, लेबर आणि रॅडिकल या सर्व पक्षांतील लोकांचें अगदी निश्चित एकमत हिंदुस्थानच्या प्रश्नाच्या बाबतींत होणें तरी शक्य आहे काय, असा माझा त्यांना सवाल आहे. माझा हा सवाल पत्करून हिंदुस्थानचा राजकीय प्रश्न एकदा कायमचा मिटविण्याचें ते कबूल करतील असें मला वाटत नाहीं. सरकाराला बालंबाल खात्री होती कीं गोलमेज परिषदेला अल्पसंख्याकांचे पुढारी म्हणून जे लोक बोलाविले होते त्यांचें एकमत होणें शक्य नव्हतें व याचा भरपूर फायदा घ्यावा असेंच सरकारनें ठरविलें होतें. नुकतेच असेंब्लीमध्यें रा. ब. राजा यांनीं ज्ञातिविषयक निर्णयाच्या भ्रमाचा भोपळा फोडण्याचें श्रेय संपादन केलें व अशाच रीतीनें गोलमेज परिषदेंत ठरलेल्या इतर बाबींचाहि बोजवारा उडण्यास वेळ लागणार नाहीं.

तथापि या वेळीं मी ज्ञातिविषयक निर्णयासंबंधानेंच बोलणार आहे. इतर विषयासंबंधीं येथें बोलण्याचें कारण नाहीं. गोलमेज परिषद भरवून त्यांतून ज्ञातिविषयक प्रश्नावर तडजोड करण्याचा मार्ग सरकारनें स्वीकारला. पण हा मार्ग अनेक दृष्टींनीं संशयास्पद होता. यापेक्षां दुसरे अनेक मार्ग सुचवितां येण्यासारखे आहेत. मोर्ले-मिंटो-सुधारणा जाहीर करण्यापूर्वी म्हणजे १९०६–१९०७ मध्येंच हिंदु–मुसलमानांचा या बाबतींत झगडा चालू होता. आणि आपल्यास हें माहीतच आहे, कीं १९१६ सालीं लखनौ येथें हिंदु व मुसल-मान यांच्या पुढाऱ्यांनीं एकमतानें एक करार केला. सरकारनें तोच करार मान्य केला. आणि तोच पाया समजून त्यावर कायदेकौन्सिलांतील हिंदु–मुसलमानांच्या प्रतिनिधींच्या संख्येची उभारणी केली. ती व्यवस्था आजहि

कायम आहे; आणि या कराराला जर तह समजावयाचा असेल तर हा तह आम्ही मोडतों असें दोनहि पक्षांनीं आगाऊ जाहीर केलें पाहिजे; पण तसें झालेलें नाहीं. या दोन समाजांत ऐकमत्य व्हावें असें खरोखरीच सरकारास वाटत असतें तर त्यानें असें म्हटलें असतें कीं, " पाहा ! हा आमच्याजवळ पूर्वीचा सर्वसंमत झालेला करार आहे व तो अद्याप अमलांत आहे. तुम्ही असाच दुसरा करार करून आणा, मगच आम्ही हा करार बदलूं, एरवीं बदलणार नाहीं. " सरकारनें असेंहि केलें नाहीं. दोनहि पक्षांत जर हा करार यापुढें अमलांत ठेवणें प्रशस्त वाटलें नसतें तर ( खोटाच आविर्भाव आणून " तुम्ही एकी करा " असें म्हणण्याऐवजीं ) सरकारनें स्वतःच निकाल देऊन तो अमलांत आणला असता तर कांहीं बिघडलें नसतें.

उदाहरणार्थ, युरोपामधील निरनिराळ्या देशांतील अल्पसंख्यांकांचा प्रश्न राष्ट्रसंघानें स्वतः जबाबदारी घेऊन सोडविलाच कीं नाहीं ? या बाबतींत एक गोष्ट लक्षांत ठेविली पाहिजे ती ही कीं, अल्पसंख्यांकांची गुंतागुंत असलेला असा जगावेगळा हिंदुस्थान हा एकच देश नाहीं. महायुद्धानंतर नवीन नवीन राष्ट्रें उत्पन्न करून जर्मनीची सत्ता कमकुवत करण्याचा प्रयत्न जेत्यांनीं केला. पण त्याबरोबरच स्वसंमतीचें तत्त्व लावून जगांत लोकशाही निर्माण करण्याऐवजीं अल्पसंख्यांकांचे नवे नवे प्रश्न मात्र उत्पन्न झाले, म्हणूनच राष्ट्र-संघाला या अल्पसंख्यांकांच्या बाबतींत नवीन नियम घालून द्यावे लागले. हे नियम पाहिले तर आपल्याला असें आढळून येतें कीं जातवार प्रतिनिधित्व व स्वतंत्र मतदारसंघ निर्माण करण्याऐवजीं फक्त अल्पसंख्यांकांची संस्कृति, त्यांच्या चालीरीती व त्यांचें शिक्षण एवढ्याच गोष्टींचें संरक्षण व संवर्धन करण्याची त्यांना हमी दिली आहे. इंग्रज सरकारला अशा तऱ्हेचीच राष्ट्रीय प्रवृत्ति हिंदुस्थानांत उत्पन्न व्हावी अशी जर प्रामाणिक इच्छा असती तर त्यांनीं राष्ट्रसंघाचा कित्ता हिंदुस्थानच्या बाबतींतहि गिरविला असता. परंतु त्याऐवजीं त्यांनीं असा निर्णय दिला आहे कीं, त्यामुळें हिंदुस्थानचे निरनि-राळे असे कायमचे तुकडे पडतील ! खाजगी व्यवस्थेमध्यें व राहणीमध्यें अनेक भेद आहेत तेच राजकारणांत व सार्वजनिक बाबतींत कबूल करून हिंदुस्थानची कायमची चीरफाड करण्यांत आली आहे.

ब्रिटिश सरकारानें दिलेला हा निर्णय अनेक दृष्टींनीं घातुक आहे. गंमत

ही आहे कीं स्वतंत्र मतदारसंघ आपल्यास पाहिजे म्हणून मुसलमानांनीं हट्ट धरला तो या निर्णयानें तर पुरवलाच. पण हिंदी ख्रिस्ती, हिंदी बायका यांनीं स्वतंत्र मतदारसंघ मागितले नसतांहि ते त्यांच्यावर त्यांच्या इच्छेविरुद्ध लादण्यांत आले. सायमन–कमिशनच्या शिफारशींच्याहि पुढें हा निर्णय गेला आहे. कायदेमंडळांत बहुसंख्य समाजांना कायमचें व निश्चित बहुमत देऊं नये व तसेंच हिंदी ख्रिस्ती व अस्पृश्य वर्ग यांना स्वतंत्र मतदारसंघ देऊं नयेत असें सायमन-कमिशनचें स्पष्ट मत होतें; पण या निकालांत तेंहि मत झिडकारलें आहे. मुसलमानांच्या बाजूनें पंजाबसरकारनें ज्या मागण्या केल्या त्यांनाहि या निर्णयानें मागें सारलें. कारण पंजाबसरकारनें दोन जादा जागा देण्याची शिफारस केली असतां जातिनिर्णयानें सुमारें दहा जागा जास्त दिल्या आहेत. खरोखरच सरकारच्या मनांत अल्पसंख्यांकांना लोकसंख्येच्या प्रमाणानुसार प्रतिनिधि देण्याचें आहे असें गृहीत धरलें तर सरकारानें मुसलमान अल्पसंख्यांकांची जी सोय लावली आहे तीच इतर प्रांतांतील हिंदूंची लावावयास नको काय पण बंगाल किंवा पंजाब यांतील हिंदूंशीं सरकारनें अन्यायाचें आचरण कायमच ठेवलें आहे. अशा रीतीनें कोणत्याहि एका सर्वसामान्य धोरणानें पाहतां जातिनिर्णय समर्थनीय ठरत नाहीं. कांहीं विशिष्ट अल्पसंख्यांकांना पक्षपात दाखवावयाचा हा उघड उघड डाव आहे. त्याच्या बुडाशीं असाहि हेतु आहे कीं, सरकारच्या मतें अप्रिय किंवा जहाल अशी राजकीय चळवळ व राष्ट्रीय वृत्ति यांचें तेज प्रकट करणाऱ्या हिंदु जातीचे पंख शक्य तितके कापून टाकावे. सरकाराचा हेतु थोडक्यांत सांगावयाचा तर तो असा आहे कीं, कोणत्याहि प्रांतांत कार्यकारी मंडळावर ताबा ठेवण्याइतकें कायदेमंडळ समर्थ बनूं नये. गटाविरुद्ध गट उभे करून कोंबडी झुंजवावयाची आणि आपला लाभ तेवढा आपल्या पदरांत पाडून घ्यावयाचा असा हा कावा आहे.

पंजाबमधील हिंदूंना लोकसंख्येच्या प्रमाणांतहि प्रतिनिधित्व मिळालें नाहीं, मग 'भरतीच्या' (Weightage) जागांची गोष्टच नको. तेथील हिंदु मातबर व वजनदार आहेत. त्यामुळें तेथें संयुक्त मतदारसंघ व खुली मतदानपद्धति चालू केली असती तर अल्पसंख्य म्हणून तेथील हिंदूंची लंगडी पडणारी बाजू सावरली गेली असती. पण सरकारनें स्वतंत्र मतदारसंघ व मुसलमानांना घटनान्तर्गत बहुमत बहाल केलें ! बंगालमधील हिंदु हे शिक्षण, संस्कृति,

संपत्ति व प्रतिष्ठा या सर्व बाजूंनीं अग्रेसर आहेत. पण त्यांचीहि विल्हेवाट तीच. मध्यप्रांतांत तर सायमन–कमिशनच्यापेक्षांहि जास्त जागा जातिनिर्णयामुळें मुसलमानांच्या पदरांत टाकल्या आहेत. संयुक्त प्रांतांतील हिंदूंची तक्रार पूर्वीपासूनच अशी होती कीं, लखनौच्या करारानें मुसलमानांना 'भरतीच्या' जागा दिल्या. ती तक्रार दूर करण्याऐवजीं जातिनिर्णयानें वज्रलेप मात्र केली. मुंबई इलाख्यांतून सिंध वेगळा झाला तर मुसलमानांची संख्या इतकी थोडी राहील कीं, त्यांना दिलेल्या 'भरतीच्या' जागा अवास्तव ठरतील. त्या अवास्तव जागा आणि विभक्त झालेल्या सिंधमधील मुसलमानांचें प्राबल्य हे मुंबई इलाख्याच्या डोक्यावर ठेवलेले अन्यायाचे दोन डोंगरच होत. राजकारणाचा खेळ खेळतांना मुसलमानांनीं सरकारी जादूनें भारलेले फासे हातीं असल्यानें प्रत्येक डाव जिंकला यांत शंका नाहीं; परंतु सर्वपक्षीय परिषदेंत काय घडलें तें विचारांत घ्या.

त्या दृष्टीनें १९२५ सालीं दिल्ली येथें प्रथम हिंदु–मुसलमानांमध्यें बोलणें सुरू झालें. नंतर अस्पृश्य आले. युरोपियन, अँग्लो–इंडियन किंवा हिंदी खिश्चन हे आले, पण आपली बाजू मांडण्यापेक्षां हिंदु–मुसलमानांत समेट करण्यावरच त्यांनीं भर दिला. त्यांची ही उदासीन वृत्ति लंडन येथें मावळली आणि त्यांनीं अल्पसंख्यांकांचा करार घडवून आणला. लाला लजपतराय किंवा पं. मदन मोहन मालवीय यांसारख्या हिंदु–महासभेच्या नेत्यांनीं संयुक्त मतदारसंघाची योजना पुढें मांडली; तेव्हां जिनांनीं ती उचलून धरली, एवढेंच नव्हे तर स्वतंत्र मतदारसंघ हे तुम्हांला नुकसानीचे आहेत असें मुसलमानांना त्यांनीं सांगितलें. पण त्याबरोबरच आपल्या म्हणून कांहीं अटी घातल्या व त्या अमान्य ठरल्या. त्यांपैकीं कांहींना लालाजी व पंडितजी यांनीं विरोध केला व त्या विरोधाला कॉंग्रेसनेंहि पाठिंबा दिला. याचें प्रतिबिंब नेहरू रिपोर्टांत आढळतें. पण जिनांच्या १४ मागण्यांच्या गठ्ठयालाहि मागें सारणाऱ्या मागण्या करणारे दुसरे मुसलमान पुढारी पुढें आले. त्यांचें समाधान सायमन–रिपोर्टानेंहि झालें नाहीं. आपल्या मागण्यांची तार त्यांनी चढवीतच नेली. त्यांतच हिंदुस्थानसरकारचा खलिता प्रसिद्ध झाला. लंडनमध्यें कट्टर मुसलमानांना युरोपियनांनीं हाताशीं धरलें. त्यामुळें समेटाची आशा समूळ नष्ट झाली. मि. मॅक्डोनाल्ड यांचा धावा करण्यांत आला. हिंदु

पुढाऱ्यांनीं त्याच्या मांडीवर मान टाकण्याचें कबूल केलें. पण मुसलमान त्यांच्या उदार वृत्तीच्या देखाव्याला भ्याले आणि त्यांनीं हट्ट धरला कीं, ब्रिटिश मंत्रिमंडळानें जातिनिर्णय द्यावा. या मंत्रिमंडळांत हुजूर पक्षाचें प्राबल्य आहे हें लक्षांत ठेवलें पाहिजे.

या सर्वांची फलश्रुति म्हणजे सध्यांचा जातिनिर्णय. त्याचा कांटा मुसलमानांच्या बाजूला इतका झुकत आहे तरी ते नापसंतीची आरोळी ठोकीतच आहेत! त्याचा अर्थ इतकाच कीं, मिळालेलें घबाड ते हातातून जाऊं देणार नाहींत. तरीहि एक हिंदु पुढारी असें सुचवितात कीं, हिंदु–मुसलमानांनीं एक तडजोड करावी. आशावादाचें यापेक्षां ढळढळीत उदाहरण दुसरें कोणतें असेल? आतांपर्यंतच्या अशा प्रयत्नांत हिंदूंनीं आपला एक एक हक्क गमाविला नाहीं काय? आणि मुसलमानांनीं एक एक मागणी चढविली नाहीं काय? याचा अर्थ हिंदूंना खलबत करण्याचें कसब नाहीं असा नाहीं. तर त्यांची सारी उडी सरकारच्या हातून सत्ता हिसकून घेण्यावर आहे; आणि त्यासाठीं त्यांना हिंदु–मुसलमानांची एकी हवी आहे. हें धोरण ठीक आहे, पण त्यालाहि कांहीं मर्यादा आहेच. कॉंग्रेसचा सारा भार हिंदु पुढाऱ्यांनीं आपल्या शिरावर घेतला आहे आणि मुसलमान लोक मात्र महात्मा गांधी किंवा पंडित मोतीलाल यांसारख्या त्यांच्या हितकर्त्यांना दुष्मन म्हणून संबोधीत आहेत.

हा सर्व विचार जातिनिर्णयाच्या दृष्टीनें झाला. राज्यघटनेचा विचार अद्याप 'बहोत दूर' आहे. त्याचा कच्चा आराखडाहि अजून काढलेला नाहीं. पण त्याच्या आधीं जातिनिर्णय देण्याची कोण लगबग! जणूं कांहीं सारें ब्रह्मांड त्यांत भरलेलें आहे. त्यावरच इतका वेळ उत्साह खर्च झाला आहे कीं, बाकीचे मुख्य मुख्य मुद्दे कसे तरी गुंडाळून घेतले जातील कीं काय अशी भीति वाटते. यावरून वॉशिंग्टन आर्व्हिननें लिहिलेली एक गोष्ट आठवते. ती गोष्ट अशी कीं, कांहीं ठराविक काळांत मी टेकडीवरून उडी मारून जातों असें एका पहिलवानानें जाहीर केलें. पण त्याची सारी शक्ति त्या टेकडीपर्यंत धांवत येण्यांतच खलास झाली. तशी स्थिति हिंदुस्थानाची करण्याचा सरकाराचा डाव दिसतो.

नवीन राज्यघटना जेव्हां अंमलांत येईल तेव्हां कायदेमंडळाविषयीं हिंदु जातीनें आपलें काय धोरण ठेवावें याबद्दल मी आपले कांहीं विचार मांडतों.

कायदेमंडळाची रचना अत्यंत असमाधानकारक व सदोष होईल या गोष्टीची मला पूर्ण जाणीव आहे. लोकप्रतिनिधींमध्यें इतके गट पाडण्यांत येतील कीं, सरकारला कसून विरोध करणारा असा राष्ट्रीय पक्ष कित्येक वर्षें बनविणें कठिण होईल हेंहि मला कळतें. परंतु जर उद्यां प्रांतांना स्वायत्तता देण्यांत आली तर राज्यकारभाराचीं सर्व सूत्रें सरकारपक्षाकडून निघून लोकपक्षालाच आपल्या हातीं घ्यावीं लागतील. यामुळें साहजिकच निरनिराळ्या गटांना आपापसांत सहकार्य करावें लागेल. अशा स्थितींत सत्तेचा ताजवा हा अत्यंत नाजूक राहील. कायदेमंडळांना खरीखुरी जबाबदारी देण्यांत आल्यावर जातवार दृष्टि निवळत जाईल असें मला वाटतें. कित्येकांना माझा हा फाजील आशावाद वाटेल, परंतु माझी तरी निदान त्यावर श्रद्धा आहे.

आपल्या देशांत, कांहींहि कारणानें असो, लोकसत्तेचें युग अवतीर्ण झालें आहे खरें. एक गोष्ट मात्र खरी कीं, कर भरणारांचा मताधिकार पुष्कळच विस्तृत करण्यांत आला आहे. सरकारवरहि मात करण्याकरितांच कीं काय कॉंग्रेसनें व नेहरू-रिपोर्टानें मताधिकाराचें लोण वयांत आलेल्या सर्व स्त्री-पुरुषांपर्यंत नेऊन भिडविलें आहे. मताधिकाराची अशी संधि देण्यांत आल्यास भणंगालाहि थोड्याशा अनुभवानंतर स्वतःची जबाबदारी कळूं लागून तोहि आपल्या हिताला जपल्याशिवाय राहणार नाहीं. अशा रीतीनें वरिष्ठ कायदे-मंडळापासून तों तहत ग्रामपंचायतीपर्यंत कर भरणाऱ्यांना मतदानाचा समान हक्क राहील. आतां प्रत्येक मतदार हा राष्ट्रीय वृत्तीचाच असेल अशी कोणाची कल्पना असेल तर ती मात्र व्यर्थ आहे. त्यासाठीं मतदारांच्या अंगीं राष्ट्रीय वृत्ति बाणण्याचे प्रयत्न झाले पाहिजेत.

या दृष्टीनें विचार करतां कायदेमंडळाशीं असहकारिता करणें हें हिंदूंच्या दृष्टीनें फोलच नव्हे तर आत्मघातकीपणाचें ठरणार आहे. जोंपर्यंत निवडणुकीच्या नियमांत अशी अट नाहीं कीं, कांहीं ठराविक मतसंख्या पडेपर्यंत उमेदवार निवडला गेला असें धरलें जाणार नाहीं व ज्याअर्थी कोणत्याहि रीतीनें का होईना पण कायदेमंडळांतील जागा भरल्या जाणारच त्याअर्थी राष्ट्रीय दृष्ट्या निवडणुकींत भाग घेणें हेंच अधिक श्रेयस्कर ठरतें. मात्र या निवडणुकींना राज्यव्यवस्थेच्या कामीं डोळ्यांत तेल घालून व राष्ट्रीय वृत्तीनें लोकहिताचीं कामें करणारे असेच उमेदवार उभे करण्यांत आले पाहिजेत. मुख्य



प्रधानांनीं दिलेल्या जातीय निर्णयामुळें हिंदूंना अन्याय वाटणें साहजिकच आहे, परंतु मला हें कळत नाहीं कीं, कायदेमंडळावर बहिष्कार पुकारून तें या अन्यायांचें परिमार्जन कसें करून घेणार ? कायदेमंडळावर बहिष्कार घालावयाचा व त्याच कायदेमंडळानें केलेले कायदे मिनतवारीनें मानावयाचें या विसंगत धोरणाचा अर्थच मला कळत नाहीं. राज्यघटनेनुसार काम करणें म्हणजे राज्यघटनेचाच स्वीकार करणें होय, हें विधान माझ्या मतें तर्कदुष्ट आहे. देशांत जोंपर्यंत स्वतंत्र व समान राज्यसत्ता स्थापन झाली नाहीं, तोंपर्यंत हिंदूंनीं कायदेमंडळावर बहिष्कार घालणें म्हणजे आत्मनाश करणें होय. आजच हिंदूंची स्थिति शोचनीय आहे व तशांतहि त्यांनीं कायदेमंडळावर बहिष्कार घातला तर त्यांची अवस्था किती अनुकंपनीय होईल ! हिंदूंना केवळ राजकीय स्वराज्यच मिळवावयाचें आहे असें नसून, त्या स्वराज्यांत हिंदु राहून त्यांना त्यांचा योग्य हिस्सा मिळवावयाचा आहे. यास्तव हिंदूंनीं आपल्या सर्व मान्याच्या जागा अधिक मजबूत करून कोणत्याहि संकटाला तोंड देण्यासाठीं सुसंघटित व तत्पर राहिलें पाहिजे.

माझ्या मतें, आहे या जातिनिर्णयाच्या बाबतींतहि हिंदूंच्या हातून चूक होईल तर विनाशाची दरी त्याजपुढें आ पसरून उभीच आहे ! सर्व जातींचे इरसाल प्रतिनिधि कायदेमंडळांत घुसले असता हिंदूंनीं मात्र तेवढें त्यांवर बहिष्कार पुकारून आपले लायक प्रतिनिधि स्वजातीच्या हितरक्षणार्थ व अराष्ट्रीय वृत्तीच्या उच्छेदार्थ कायदेमंडळांत पाठविले नाहींत तर त्यांची किती दुर्दशा उडेल याची कल्पनाहि करवत नाहीं. कायदेमंडळांत शिरल्यावर मग परिस्थितीप्रमाणें स्वराज्य मागण्यासाठीं व सरकारपासून अधिक सत्ता मिळविण्यासाठीं इतर जातींशींहि संगनमत करण्यास कांहींच हरकत नाहीं. परंतु हिंदूंनीं हिंदु म्हणून कायदेमंडळांत गेलें पाहिजे एवढेंच आमचें म्हणणें. स्वराज्याचें ध्येय साध्य करण्याच्या कामीं हिंदु जातीनें इतर जातींना दिशा दाखवावी, इतकेंच नाहीं तर वेळप्रसंगीं सरकाराशीं झुंज देतांना त्यांचें नेतृत्वहि स्वीकारावें परंतु या सर्व गोष्टी करीत असतांहि इतर जाति राज्यकारभाराचा पुरेपूर फायदा घेत असतां हिंदु जातीनें मात्र त्यापासून अलिप्त राहतां कामा नये. त्यांनींहि राज्यघटनेपासून जितका जास्तींत जास्त फायदा करून घेतां येणें शक्य आहे, तितका करून घेतला पाहिजे.

# ८८. हिंदु-सभेविषयीं सारासार विचार

( केसरी, ता. २५ आक्टोबर १९३५ )

यंदाचें हिंदुमहासभेचें अधिवेशन पुणें येथें भरणार असल्याचें प्रसिद्धच आहे. त्याच्या कार्याला महाराष्ट्रांत पुष्कळ सहानुभूति व साहाय्य मिळत आहे आणि हें न पाहवूनच कीं काय, हिंदुमहासभेविषयीं म्हणजे त्या नांवाच्या मुख्य संस्थेविषयीं कित्येक लोकांकडून मुद्दाम गैरसमज पसरविण्यांत येत आहे. कांहीं कॉंग्रेसनिष्ठ म्हणून, कांहीं सनातनी म्हणून, कांहीं नवमतवादी लिबरल सोशालिस्ट किंवा कम्युनिस्ट म्हणून, किंवा कांहीं स्वतःचें म्हणून एखादें विशिष्ट तत्त्व किंवा धोरण नसतांहि पुण्यांतील ज्या पक्षाकडून यंदाच्या अधिवेशनाची तयारी होत आहे त्याच्याविषयीं विरोधी भाक्ति बाळगणारे म्हणून सरकार किंवा खुद्द मुसलमान लोक पुण्यांतील हिंदुमहासभेच्या अधिवेशनाला कोणत्याहि प्रकारें विरोध दाखवीत नसतां केवळ हिंदुसमाजांतीलच कांहीं लोकांकडून असा विरोध दर्शविला जावा या गोष्टीचें आश्चर्य वाटतें व खेद होतो. पण आहे ही गोष्ट घेऊन चालून, खऱ्याखोट्या विरोधी कोटिक्रमाला उत्तरें देणें, व भोळेपणाच्या गैरसमजुती दूर करणें, एवढेंच कर्तव्य हिंदुमहासभेच्या पुरस्कर्त्यांचें उरतें. म्हणून अशा पुरस्कर्ते लोकांपैकीं एक, व विशेषतः यंदाच्या अधिवेशनाच्या स्वागतमंडळाचा अध्यक्ष, या नात्यानें हें कर्तव्य करण्याकरितां संक्षेपतः खालील चार शब्द लिहीत आहे.

प्रथम हें सांगितलें पाहिजे कीं, हल्लींचा काळच असा आहे कीं, संघटनेशिवाय कोणतेंहि सार्वजनिक कार्य यशस्वी होऊं शकत नाहीं, आणि ही गोष्ट अनुभवानें पटल्यामुळें हिंदुस्थानांत आज अशी कोणतीहि जात, जमात किंवा समाज नाहीं कीं ज्यानें स्वतःची संघटना यथाशक्ति केलेली नाहीं; आणि मौज ही कीं, अशा कोणत्याहि इतर संघटनेला नांव ठेवलेलें ऐकू येत नसतां, बिचारी हिंदुमहासभा ही एकच संस्था अशी दिसते कीं, कोणींहि उठावें आणि तिच्याविरुद्ध बोलावें. पैकीं कोणी द्वेष करतो म्हणून, कोणी नितजसंबंधीं कोणत्याहि कार्याची आपल्यावर जबाबदारी पडेल ती टाळावी म्हणून, आणि कोणी धूर्त बुद्धिभेदकांच्या वावदुकीला बळी पडणारे भोळे गोळे म्हणून!

एक मुसलमान समाजाचेंच उदाहरण घेतलें तरी, तिनें आज एवढी संघ-



टना केली आहे कीं, ती खुद्द राष्ट्रीय सभेला जबरदस्त प्रतिपक्षी होऊन बसली आहे. १९१६ सालापासून मुस्लीम लीग, मुस्लीम कॉन्फरन्स व पुढें १९२० पासून खिलाफत-संघ, यांनीं बाहेर स्वतंत्र रीतीनें स्वकार्यसाधक चळवळ चालवून, शिवाय खुद्द कॅांग्रेसमध्येंहि शिरून ती जवळ जवळ काबीज केली. आणि इतकें प्रस्थ वाढविलें कीं, 'मुस्लीम बोले कॅांग्रेस हाले' असें होऊन गेलें. महात्मा गांधी यांचा मुसलमानांविषयींचा अलौकिक पक्षपात प्रसिद्धच आहे. उलट हिंदुमहासभामात्र कॅांग्रेसच्या लोकांना अशी नावडती ठरून राहिली आहे कीं, जो कोणी हिंदुमहासभेचा सभासद असेल तो, कॅांग्रेस-संघटनेंतील कोणतीहि जबाबदारीची जागा किंवा कार्यकारी मंडळांतील स्थान लाभण्याला अपात्र ठरावा, इतकी सिद्धता तात्त्विक नियमांनीं आतां होऊन राहिली आहे! सुदैवानें त्याची अंमलबजावणी अद्यापि कॅांग्रेसकडून सरकारी रीतीनें करण्यांत आलेली नाहीं. पण कॅांग्रेस-चालकांच्या मनांत काय आहे हें ओळखून, अनुयायांनीं तो बहिष्कार जवळ जवळ प्रत्यक्ष अंमलांत आणल्यासारखा केला आहे. या अनुयायांपैकीं विचारे कांहीं असे आहेत कीं, त्यांना हिंदुत्वाची चाड आहे आणि कॅांग्रेसच्या अन्यायी पक्षपाताची चीड आहे. तथापि त्यांना मनांतलें बोलून दाखविण्याचें धैर्य नसल्यामुळें तें हिंदुमहासभेच्या सहानुभूतीनें मनांतल्या मनांत झुरत असतात. एका बाजूस कॅांग्रेस व मुसलमान-संघटना, व दुसऱ्या बाजूस कॅांग्रेस व हिंदु-महासभा, यांच्यांतील संबंधाचें सत्यस्वरूप वरीलप्रमाणें वर्णन केल्यानंतर विद्यमान विपरीत स्थितीविषयीं अधिक बोलावयाचें उरत नाहीं; म्हणून जे कोणी सरळ पण भोळ्या मनाचे हिंदुमहासभा-द्वेष्ट्यांच्या वावदुकीला बळी पडतात, त्यांच्यापुरतेंच दोन शब्द लिहिणें कदाचित् उपयुक्त होईल म्हणून लिहितों.

हिंदुमहासभेचा जन्म मुस्लीम-लीगसारखा कॅांग्रेसला विरोधी पक्ष म्हणून झालेला नाहीं. तिची स्थापना करण्याच्या कामांत प्रथम लोक पडले ते केवळ याच बुद्धीनें पडले कीं, हिंदुसमाजावर बाहेरून इतर अनेक समाज जोराचे अतिक्रमण व हल्ले करीत आहेत, त्यांविरुद्ध कांहीं प्रतिक्रिया व्हावी व हिंदुसमाजाचें न्याय्य रीतीनें संरक्षण व्हावें. या चालकांत हिंदुत्वाचे अभिमानी पण कॅांग्रेसचेहि अभिमानी असेच प्रमुख पुढारी पंडित मदनमोहन मालवीय, लाला लजपतराय, यांच्यासारखे होते. त्यांच्या जोडीला प्रथम उत्तरेकडील प्रांतांतील

कांहीं मोठमोठे हिंदु जमीनदार व राईस होते. ते अर्थात् सरकाराशीं विनयशीलपणें वागणारे होते. पण पुढें पुढें हिंदुसभेचें राजकारणांतील राष्ट्रीय बाण्याचें धोरण प्रकट होऊं लागल्यापासून या जमीनदार वगैरेंनीं आपलें अंग हिंदुसभेंतून काढून घेतलें. यामुळें ज्यांना आपल्या राष्ट्रीय राजकारणी वृत्तीचा आणि हिंदुसमाजाच्या प्रेमाचा मेळ घालतां येतो असेच लोक हिंदु-महासभेचे चालक म्हणून उरले. तीच परंपरा आजवर चालू आहे ही गोष्ट, हिंदुमहासभेच्या अधिवेशनप्रसंगीं अध्यक्षपद लाभणारे गृहस्थ व सभेच्या अखिल भारतीय मंडळाचे सभासद यांचीं नांवें पाहिलीं असतां, कोणासहि कळून येण्यासारखें आहे. हिंदुमहासभेच्या घटनेंत किंवा आजपर्यंत तिनें केलेल्या सामान्य किंवा विशेष ठरावांत, सभेनें आपल्या राष्ट्रीय धोरणाला कमीपणा येईल असें पुरविलेलें एकहि गमक कोणाला दाखवून देतां येणार नाहीं. १९२४ सालापासून गेलीं अकरा वर्षें स्वराज्याच्या आकांक्षेनें हिंदुस्थानांत ज्या अनेक विधायक व विध्वंसक चळवळी झाल्या. हिंदुमहासभावाल्यांनींहि त्यांत भाग घेतलेला आहे. यामुळें राजकारणाच्या दृष्टीनें नांव ठेवण्यासारखें हिंदुमहासभेच्या कार्यक्रमांत कांहींहि दाखवितां येणार नाहीं.

अशा रीतीनें राजकारणविषयांत योग्य तेंच धोरण ठेवल्यावर, हिंदुमहासभेनें खुद्द हिंदु समाजाच्या हितरक्षणाविषयीं दक्षता ठेवली तर तिनें काय पाप केलें ? दिल्ली येथें सर्वपक्षीय परिषदा भरत त्या वेळीं व नंतर कम्यूनल ॲवॉर्ड पुढें आलें त्यावरील एकंदर चर्चेंत, हिंदुसभेनें हेंच मुख्य धोरण ठेवलें होतें कीं, देशांतील अल्पसंख्य लोकांना कोणत्याहि न्याय्यतत्त्वाप्रमाणें योग्य तें स्थान व संरक्षण अवश्य दिलें जावें, तथापि त्याकरितां केवळ जातवार मतदारसंघच बनविले पाहिजेत असें नाहीं. हिं. म. सभेच्या या म्हणण्याला खुद्द युरोपांतील राष्ट्रसंघाच्या सर्वसंमत व्यवस्थेनें व नियमांनीं पाठबळ व समर्थन मिळत आहे, ही गोष्ट राष्ट्रसंघाचे नियम कोणी वाचून पाहील त्याला तेव्हांच कळून येईल. कम्यूनल ॲवॉर्डच्या चर्चेंत हिंदुमहासभेनें खास हिंदु समाजाकरितां असें विशेष कांहींच मागितलें नसून, हिंदु समाज हा बहुसंख्य आहे या गोष्टीची पुरी जाणीव ठेऊन, अल्पसंख्यांकांना योग्य तो न्याय व कांहीं विशेष सवलतीहि देण्याला संमति दिली आहे.

इतकें सांगितल्यानंतर सामाजिक दृष्टीनें हिंदुसभेच्या कार्याचा थोडा विचार

करूं. कांहीं आक्षेपकांची रीत अशी दिसतें कीं, हिंदु समाज हा विस्कळित आहे, ह्यामध्यें ऐक्य नाहीं किंवा ऐक्य होऊं शकत नाहीं, असें भासून भलताच बाऊ करून दाखवावयाचा ! वास्तविक असा कोणताहि समाज नाहीं कीं ज्यांत हिंदुसमाजासारखे कांहीं पोटभेद नाहींत. परंतु हे वावदूक, इतर समाजांतील भेदाकडे दुर्लक्ष करून, आपल्या चिकित्सक बुद्धीचा फायदा दुर्दैवानें एकट्या हिंदुसमाजापुरताच राखून ठेवतात. मुसलमान शहाणे, त्यांनीं राजकारणावर मुख्य दृष्टि ठेवून, म्हणजे एकंदर मुसलमान समाजाच्या राजकीय हितावरच नजर रोखून आपल्यांतील भेद लोकांच्या दृष्टिआड केले आहेत आणि आम्ही हिंदु मात्र असे कीं, त्यांना आपल्यांतील भेदांचें पोटभेदांचें मोठें जड वाटतें. सुदैवानें हिंदुमहासभेनें, मुसलमानांप्रमाणेंच, राजकारणावर ( पण राष्ट्रीय वृत्ति न सोडतां ) मुख्य भर दिलेला असून, सामाजिक सुधारणेचीं कलमें तिनें उपांगभूत अशीं मानलीं आहेत. उदाहरणार्थ--सभेच्या घटनेंत तिच्या ध्येयाचें वर्णन खालील शब्दांनीं केलें आहे.--" हिंदु राष्ट्राची उन्नति व वैभव यांच्या प्राप्तीकरितां हिंदुधर्म, हिंदुसमाज व हिंदु संस्कृति यांचें अस्तित्व टिकवून त्यांचें संरक्षण व वृद्धि करणें हें हिंदुमहासभेचें ध्येय आहे." तसेंच तिच्या उद्देशांत खालील विधान आहे. " अखिल हिंदुसमाज एकजीव करण्याकरितां त्यांतील सर्व अंगोपांगांना संघटित करणें." मुसलमान हा शब्द उच्चारला असतां त्यांतील शिया, सुनी वगैरे पंथांवर भर न देतां संकीर्ण स्वरूपानें मुसलमान ही भावना मनांत येते. त्याप्रमाणेंच हिंदु हा शब्द उच्चारला असतां संकीर्ण हिंदु समाजाची भावनाच कोणाच्याहि लक्षांत यावी.

हिंदु या शब्दाची व्याख्या करणें थोडें कठिण आहे ही गोष्ट खरी. प्रथम हें लक्षांत ठेवलें पाहिजे कीं, हिंदु हें नांव स्वतः हिंदूंनीं आपणाला घेतलेलें नाहीं. तें परकीयांनीं त्यांना दिलेलें आहे. पर्शियन भाषा बोलणारे मुसलमान आम्हा हिंदु लोकांचा संबंध सिंधु नद यांतील सिंधू या शब्दाशीं जोडून सिंधू लोक असें म्हणत. पण ' स ' ऐवजीं ' ह ' हें अक्षर उच्चारण्याचा त्यांचा प्रघात केव्हां केव्हां असतो. उदाहरणार्थ, ' सप्त ' असें ते न म्हणतां ' हप्त ' असें म्हणत. त्याप्रमाणें सिंधुचे 'हिंदु' झालें. आम्ही स्वतःला नांव द्यावयाचें तर ' वैदिक ' किंवा ' आर्य ' किंवा भारत असें नांव दिलें असतें. ही तीनाहि

नांवें सार्थ आहेत. वेद हा ज्यांचा धर्मग्रंथ ते वैदिक. मूळ आर्यवंशांतील ते आर्य व भरत राजानें नामांकित केलेल्या भूमींतील लोक म्हणून भारत. तथापि कमींत कमी दीड हजार वर्षें पर्यंत हिंदु ' हें आमचें नांव वरील कारणामुळें कायम झालेलें आहे.

पण राष्ट्राची व्याप्ति हि, संस्कृति, भाषा किंवा भूमि यांपैकीं कोणत्याहि एकानेंच ठरत नाहीं, तर तिन्हींचेंहि तारतम्य लक्षांत घ्यावें लागतें. हिंदु-धर्माचे अनुयायी ते हिंदु असें म्हटल्यानेंहि हिंदु राष्ट्राची व्याप्ति निश्चित ठरत नाहीं. कारण हिंदुधर्म या शब्दाची कोणचीहि व्याख्या निर्विवाद नाहीं. या व्याख्येची अडचण परवापर्यंत, म्हणजे लोकमान्य टिळकांचे वेळेपर्यंत भासत असून ती नाहींशी व्हावी म्हणून त्यांनीं हिंदुधर्माचें लक्षण बांधलें तें असें--

" प्रामाण्यबुद्धिर्वेदेषु साधनानां अनेकता । उपास्यानाम् अनियमः हिंदु-धर्मस्य लक्षणम् " ।। याचा अर्थ " ज्या धर्मात वेद हे प्रमाण गणले जातात, ज्यामध्यें मोक्षसाधनाचे मार्ग अनेक व विविध आहेत. ( उदाहरणार्थ, ज्ञान, कर्म, भक्ति ), व ज्यांत उपास्य-दैवतें अनेक असून भक्ति करावयाची तर ती कोणत्याहि दैवताची होऊं शकते, तो हिंदुधर्म म्हणावा. हीं तीनहि उप-लक्षणें तात्त्विक परंतु एकत्र घेऊन चाललीं पाहिजेत. म्हणजे उपास्यें व मोक्ष-मार्ग यांविषयीं अनियम, तरी वेदांचे ठिकाणीं श्रद्धा किंवा ममत्व हें लक्षण अनिर्वाह्य ठरतें. याशिवाय टिळकांच्या या व्याख्या-श्लोकांत नाहीं असें एक पुरवणी लक्षण त्यांनीं त्याला मागाहून पूर्णतेकरितां जोडलें. तें असें कीं-- " हिंदुधर्मग्रंथांत जे संस्कार म्हणून सांगितले आहेत, ते ज्याचे झाले किंवा होत आहेत तो हिंदु." तथापि इतकें सूक्ष्मांत शिरूनहि सर्व अडचणी नाहींशा होत नाहींत. ख्रिस्ती किंवा मुसलमान धर्मांचें तसें नाहीं. कारण त्यांत एकच निश्चित उपास्य व एकच निश्चित संस्कार असा सांगितलेला आहे. म्हणजे 'सुंतेचा ' संस्कार झालेला, व महंमद पैगंबर हा ईश्वराचा दूत असून, त्याच्याशिवाय इतराकडून मोक्ष मिळणार नाहीं असें मानणारा तो मुसलमान; अथवा 'बाप्तिस्मा ' नांवाचा संस्कार ज्याचा झाला, व येशू ख्रिस्त हा ईश्वराचा पुत्र व मोक्ष देणारा असें जो मानील. तो ख्रिस्ती. या इतर दोन व्याख्यांप्रमाणें ज्याचा जन्मसंस्कार हिंदु विधीप्रमाणें होतो तो हिंदु असें एवढेंच म्हणून कदाचित् भागलेंहि असतें. कारण धर्मात समाविष्ट होण्याचा

विधि इतक्या लहानपणीं होतो कीं, मुलाला आपल्या बापाचेंहि ज्ञान नसतें, मग मोक्ष देणाराचें कोठून असेल? शिवाय हे संस्कार करणारे आईबापच असतात. यामुळें ज्यांच्या उदरीं जन्म झाला त्या आईबापांचा जो धर्म तोच त्यांनीं संस्कार केलेल्या, (किंवा कदाचित् न केलेल्याहि) मुलाचा धर्म, असें निष्पन्न होतें. किंवा असें समजूं कीं, मुलाचे आईबाप लहानपणीं वारले व त्याचा कोणताच संस्कार झाला नाहीं, तरीहि तें मूल हिंदु आईबापांचें होतें असें ठरल्यास तें मूल हिंदु असेंच ठरेल. पण याहीपुढें जाऊन असें समजा कीं, मुलाच्या जन्मसंस्काराचा पुरावा नाहीं, त्याच्या आईबापांची माहिती नाहीं, असें असतांहि जर एखादा मनुष्य त्याला समजूं लागल्यावर 'मी हिंदु आहे असें म्हणवून घेईल तरी तो हिंदूच ठरेल. अशा रीतीनें व्यवहार्य अशा दोनच व्याख्या उरतात. म्हणजे (१) हिंदु आईबापांच्या पोटीं जन्मलेला, व ज्यानें इतर कोणताहि धर्म त्यानंतर स्वीकारलेला नाहीं तोंपर्यंत तो हिंदु आणि (२) जो स्वतःला हिंदु म्हणवितो तो हिंदु! या सर्व अडचणी लक्षांत घेऊन, हिंदुमहासभेनें असा नियम केला आहे कीं, "अठरा वर्षें पुरीं झालेल्या कोणाहि हिंदू व्यक्तीस सभेचा सभासद होतां येते; व त्या नियमाचा खुलासा म्हणून असा केला आहे कीं, हिंदुस्थानांत उत्पन्न झालेल्या कोणत्याहि धर्माचें पालन करणारा तो हिंदू होय; आणि यांत सनातनी, जैन, शीख, आर्य-समाज, बौद्ध, व ब्राह्मो वगैरे सर्वांचा समावेश होतो." पैकीं सनातनी हिंदूबद्दल प्रश्नच नाहीं. आर्यसमाजिस्ट हे तीर्थें, मूर्तिपूजा व जातपात मानीत नाहींत, परंतु ते वेदांना प्रमाण मानतात व वैदिक संस्कार करतात म्हणून ते हिंदू ठरतात. जैन हे वेदांना प्रमाण मानीत नाहींत, तथापि त्यांचा धर्म मूळ हिंदुस्थानांतच जन्मला. बौद्धांची गोष्ट तीच समजावी. बौद्ध लोक हे तात्त्विक दृष्ट्या जाति मानीत नसतील, परंतु व्यवहारांत त्या पाळतात. कारण बुद्ध हा मूळ सनातनी हिंदूच होता. फक्त बौद्ध या नांवाचा एक नवीन पंथ त्यानें काढला. शीख हे मूळचे हिंदू असून, अवघ्या चारशें वर्षांपूर्वीं त्यांनीं निराळा पंथ काढून वेगळें नांव घेतलें. ब्राह्मो हे स्वतःला हिंदू म्हणवीत नाहींत अशी स्थिति कांहीं वर्षांपूर्वीं होती, पण ब्राह्मो समाजाच्या मूळ संस्थापकांनीं हिंदूत्व टाकून दिलें नव्हतें; व आजच्या पिढीचे ब्राह्मो समाजिस्ट स्वतःची गणना हिंदूंतच करतात.

वरील गोष्टी लक्षांत घेतल्या म्हणजे हिंदुमहासभेनें ठरविलेली हिंदु शब्दाची व्याख्या विचारपूर्वक केली आहे असें दिसून येईल. कोणतीहि व्याख्या म्हटली म्हणजे तींत अव्याप्ति किंवा अतिव्याप्ति हा दोष थोडाबहुत राहातोच. परंतु हा दोष सर्वस्वीं न टाळतां आला तरी, त्यांतल्या त्यांत अतिव्याप्तीचा दोष पत्करून, व्यापक व उदार अशाच दृष्टीनें हिंदुमहासभेनें ही व्याख्या ठरविली आहे, एवढें तरी कोणासहि कबूल केलें पाहिजे. आतां कोणत्याहि प्रकारच्या स्वार्थानें, मग तो व्यक्तिविषयक असो वा समाजविषयक असो, आपण हिंदु नाहीं असें कोणीं म्हटलें तर खुशाल म्हणावें. हिंदुसभेला मुद्दाम झिडकारणाराला जाऊन कवटाळण्याइतकी स्वाभिमानशून्य हिंदुसभा नाहीं. तिचें पाहणें इतकेंच आहे कीं, कोणास हिंदु म्हणवून घेण्याचा हक्क किंवा अभिमान वाटत असल्यास त्याचा तो हक्क नष्ट न व्हावा, किंवा त्याच्या त्या अभिमानाला बाध न यावा, अशी व्याख्या व धोरण ठरविलें जावें आणि तें तिनें वरील नियमानें केलें आहे असें म्हणतां येईल.

मी स्वतः हिंदु नाहीं किंवा मला हिंदुत्वाचा अभिमान नाहीं असें म्हणण्याची कांहीं अंशीं एक फॅशनच पडून गेली आहे! कांहीं कॉंग्रेसवाले या गोष्टीचें समर्थन असें करतात कीं, “स्वराज्याच्या दृष्टीनें खरी राष्ट्रीय वृत्ति म्हणजे मी प्रथम हिंदवासी आहे आणि नंतर इतर कोणी!” मोठ्या कार्याकरितां क्षुद्र अभिमान विसरून जाणें हें कांहीं फारसें वावगें नाहीं. पण वाईट इतकेंच वाटतें कीं, हे कॉंग्रेसवाले हिंदुमहासभेचा निषेध करण्यांत जो दिमाख दाखवितात तो दिमाख, त्या तीव्रतेचा मुसलमानांच्या संघटनेचा किंवा कम्यूनल ॲवॉर्डसारख्या राज्यघटनेचा निषेध करतांना त्यांजमध्यें दिसून येत नाहीं. सोशालिस्ट, कम्यूनिस्ट वगैरे नवमतवादी लोक त्याच्याहि पलीकडे जातात. कारण एकंदर जगांतील मनुष्यसमाज हेंच आमचें राष्ट्र असें ते म्हणतात. ही भावना खरोखर ज्याच्या मनांत बाणली असेल तो परमहंसच होय. आपण मनुष्येतर नाहीं इतकीच मर्यादा हे लोक मानीत असतील; पण या दृष्टीनें त्याचें ध्येय परमोच्च कोटीचें म्हणतां येणार नाहीं. कारण मनुष्यजातीच्या प्रेमापेक्षां प्राणिमात्राचें प्रेम हें वरच्या कोटीचें निःसंशय आहे. पण आमच्या साधुसंतांनीं किंवा धर्मग्रंथांनीं, सर्व प्राणिमात्रांवरच काय पण

यच्चयावत् भूतमात्रांवरहि प्रेम करावें असें परमोच्च ध्येय सांगितलें आहे. एक दुसऱ्याहून चांगलें तर त्या एकाहून तिसरें आणखी अधिक चांगलें, व त्या तिसऱ्याहून आणखी चौथें अधिक चांगलें असा क्रम सहजच लावतां येईल! म्हणण्याचें तात्पर्य इतकेंच कीं, विश्वबंधुत्वाच्या नात्यानें राष्ट्र-बंधुत्व हें किंचित् कमी असलें तरी निषिद्ध ठरत नाहीं. त्याप्रमाणेंच हिंदित्व हें हिंदुत्वाहून वरच्या प्रतीचें असलें तरी, त्याबरोबर हिंदुत्वाचाहि, म्हणजे सोयीकरितां किंचित् खालच्या दर्जाच्या अभिमानाचाहि, स्वीकार करणें हेंहि निषिद्ध ठरत नाहीं. राष्ट्राच्या दृष्टीनें पाहतां खालच्या दर्जाचा अभिमान सुटून वरच्या दर्जाचा अभिमान स्वीकारणें केव्हांहि अधिक श्रेयस्कर हें कोणीहि सांगेल. परंतु त्याच राष्ट्रांतील इतर घटक किंवा समाज जोंपर्यंत आपल्या जातीचा, धर्माचा दुय्यम अभिमान सोडीत नाहींत, किंबहुना त्याच्या आधारा-वर हिंदु समाजावर आक्रमण करूं पाहातात, तोंपर्यंत हिंदुत्वाचा अभिमान धरणें हें राष्ट्रीय दृष्ट्या कमीपणाचें आहे अशी खोटी भावना करून घेऊन हिंदुसभेला जे नांवें ठेवतात, ते हिंदुत्वाचा तर घात करतातच, पण राष्ट्रीय दृष्ट्याहि फारसें कांहीं साधीत नाहींत असें म्हणावें लागतें. एखाद्या गांवांतले सर्वच लोक हा गांव आपला असें तोंडानें म्हणतात. पण असें म्हणत अस-णारे इतर नव्वद लोक जर आपापल्या घराला कुलपें लावून, आपापलें सामान सांभाळून, वरती आपल्या घरांचीं कंपाउंडें हळू हळू वाढवीत अस-तील, तर बाकीच्या दहा घरवाल्यांनीं मात्र आपल्या घरांना कुलपें लावूं नयेत व आपापलें सामान संभाळूं नये असा उपदेश करणें हें बुद्धिशून्यतेचें किंवा ढोंगीपणाचें लक्षण ठरेल.

---

# ८९. अ. भा. हिंदुमहासभा, पुणें

(१९३५ सालीं पुणें येथें भरलेल्या अ. भा. हिंदुमहासभेच्या अधिवेशन-प्रसंगीं केलेलें स्वागताध्यक्षीय भाषण.)

"स्वागतमंडळातर्फे प्रतिनिधि, प्रेक्षक, पाहुणे या सर्वांचें मी मनःपूर्वक स्वागत करतों. शिवशाही, पेशवेशाही यांतील प्रसिद्ध वीर-मुत्सद्दी यांचें पुष्कळसें कार्य पुण्यांतच झालें. एकोणिसाव्या शतकांतहि अनेक कर्तृत्ववान हिंदु लोकांनीं पुण्याचें नांव हिंदुस्थानभर प्रख्यात केलें. उपयुक्त संघटित संस्थांची मायभूमिच पुणें ही ( महाराष्ट्रापुरती ) होऊन राहिली आहे. अशा या शहराला एखादें तीर्थ किंवा क्षेत्र असें समजून आपण या हिंदुमहासभेच्या यात्रेला आला यांत नवल नाहीं. महासभेच्या अधिवेशनाचें कार्य यशस्वी करणें व दरसालांतील घडामोडींसंबंधानें हिंदु समाजातर्फे योग्य असे प्रचलित विचार प्रकट करणें हें प्रतिनिधींच्या हातींच असतें. स्वागतमंडळाचें काम इतकेंच कीं त्यानें प्रतिनिधींच्या मुक्कामांत त्यांच्या सर्व सुखसोयी करून द्याव्या. म्हणून स्वागताध्यक्ष या नात्यानें मी फार थोडेंच बोलणार आहें; व तेंहि मुख्यतः महाराष्ट्राच्याच दृष्टीनें. महासभा ही आतां इतकी सुप्रतिष्ठित, प्रथितयश झाली आहे, आणि तिचे उद्देश जगाला इतक्या स्पष्टपणें कळून चुकले आहेत कीं, मला त्याविषयीं बोलण्याचें कारण नाहीं. कांहीं असमंजस लोक महासभेवर जे अनेक आक्षेप आणतात, ते निर्मूल असून, त्यांना उत्तर देण्याचीहि आतां आवश्यकता राहिलेली नाहीं.

पुष्कळ लोकांची अशी समजूत आहे कीं, महासभेचा जन्म उत्तर हिंदुस्थानांत झाला, तो तेथील विशेष विकट परिस्थितीमुळें झाला. ही समजूत बरीचशी खरी आहे. ( येथें केळकर यांनीं या विकट परिस्थितीचीं पांचसात ठळक उदाहरणें दिलीं. ) पण महाराष्ट्राच्या दृष्टीनेंहि येथील परिस्थिति बिकट व भीतिप्रद नाहीं, असें मात्र कोणीं समजूं नये. नुसते खानेसुमारीचे आंकडेच घ्या, त्यांवरून हें स्पष्ट दिसून येतें कीं, मुसलमान व खिस्ती समाजांचें फार मोठें आक्रमण हिंदू समाजावर महाराष्ट्रांत होत आहे. १९२१ ते १९३१ या दहा सालांत मुंबई इलाख्यांतील मुसलमानांची संख्या शेंकडा सतरा व खिस्ति लोकांची संख्या शेंकडा सव्वीस या प्रमाणानें वाढली असतां, हिंदूंची

मात्र शेंकडा बारा इतकीच वाढली. यावरून काय अनुमान निघतें ? मुसलमान व ख्रिस्ती लोकसंख्या केवळ स्वाभाविक, म्हणजे प्रजोत्पत्तीच्या कारणानें इतकी वाढणें शक्यच नाहीं. ती वाढण्याचें खरें कारण या दोन समाजांकडून हिंदु लोक बेसुमार बाटविले जातात हेंच होय. खुद्द सरकारी खानेसुमारीच्या अधिकाऱ्यानें देखील ही गोष्ट, किंचित् वळसा घेऊन का होईना, पण कबूल केली आहे. तो म्हणतो कीं, मुसलमानांचे हिंदु क्वचितच होतात. तसेंच जैन व स्पृश्य हिंदु जाति यांतील फार थोडे लोक धर्मांतर करतात, पण जे बाटविले जातात ते हिंदु समाजांतल्या खालच्या व अस्पृश्य वर्गांतील लोकच. तेच ख्रिस्ती व मुसलमान मिशनऱ्यांच्या हातीं सांपडतात. या गोष्टीवरून काय बोध घ्यावा हें हिंदु समाज व त्यांतूनहि सनातनी वर्ग यानें नीट लक्ष घालून पाहावें; व अस्पृश्य वगैरे जातींसंबंधानें आपली आत्मघातकी प्रवृत्ति सोडून द्यावी.

दुसरी गोष्ट मुसलमानांचें अतिक्रमण व त्यांजकडून होणारे दंगेधोप-अत्याचार. हे फक्त उत्तर-हिंदुस्थानांतच होतात अशी समजूत कोणीं करून घेऊं नये. १९२० सालापूर्वी मुंबई इलाख्यांत दंगे झाले ते फार थोडे होते. परंतु त्याच्या आठपट नऊपट इतके दंगे गेल्या अवघ्या पंधरा वर्षांत झाले. म्हणजे लक्षांत ठेवा कीं, ज्या कालावधींत म. गांधींनीं हिंदु-मुसलमानांचें ऐक्य करण्याची जिवापाड मेहनत केली व हिंदु पुढाऱ्यांनीं ऐक्याच्या मोहाला बळी पडून मुसल्मानांकरितां खिलाफतीचें संरक्षण करण्याचीहि चळवळ केली, त्याच पंधरा वर्षांत पूर्वीच्या शेंदोनशें वर्षांत झाले त्याच्या ८।९ पट दंगे इकडील भागांत झाले! त्याची नांवनिशी मजजवळ तयार आहे. पण मी ती सर्व येथें देत नाहीं. मुसलमानांच्या अतिक्रमणाचा उपद्रव किती निरनिराळ्या प्रकारांनीं होतो हें प्रसिद्ध असल्यामुळें मी तेंहि सांगत बसत नाहीं. या कामीं सरकारानें हिंदूंच्या हक्कसंरक्षणाकरितां कितीशी कसोशी केली हें जाणतें जग ओळखतें. पण सरकारला तरी दोष आम्ही कोणत्या तोंडानें लावावा ? कारण आम्ही तरी आत्मसंरक्षणाची कसोशी करण्याचा उद्योग कितीसा व संकटसमयीं धैर्य कितीसें दाखविलें ? मात्र अलीकडे ही गोष्ट लक्षांत येऊन, हिंदु लोकांची स्वयंसेवक-पथकें तयार होऊं

लागलीं आहेत. त्यांची दिशाभूल करण्याचा आमच्यातलेंच कांहीं शहाणे-सुरते प्रयत्न करतात! शांतताभंग थांबविण्याचा एक मार्ग म्हणजे हिंदूंनीं आत्मसंरक्षणाकरितां कंबर कसून उभें राहावें हाच शेवटीं खरा असून, तसें घडलें तर त्या बाबतींत सरकारची जबाबदारी आयतीच परस्पर थोडी हलकी होणार आहे. हें उघड दिसत असतांहि सरकार आमच्या स्वयंसेवक–पथकां-कडे अत्यंत संशयी डोळ्यानें पाहून त्यांना वहिमी लोकांप्रमाणें लेखतें. हीं सर्व संकटें वाटेंत असतांहि सुदैवानें हिंदु समाजांतील तरुण पिढी आत्म-संरक्षणाच्या या योजनेकडे आतां वळली आहे. अशा स्वयंसेवकांचें ब्रीद कविकुलगुरु कालिदासानें वर्णिल्याप्रमाणें 'बलमार्तभयोपशांतये' हेंच असावें, व तें आहेहि. तथापि त्याचाहि परिणाम अतिक्रमी परसमाजावर झाल्या-शिवाय राहात नाहीं. स्वयंसेवकदळें सज्ज झालेलीं पाहून त्यांना थोडी तरी मुकी दहशत बसतेच.

इतका वेळ मी मुसलमानांचें अतिक्रमण डोळ्यांपुढें ठेवून बोललों. तथापि ख्रिस्ती मिशनऱ्यांकडून होणारें अतिक्रमणहि कांहीं थोडथोडकें नाहीं. पण न्यायबुद्धीनें एक गोष्ट कोणालाहि कबूल केलीच पाहिजे. ती ही कीं, ख्रिस्ती लोकांचे धर्मप्रसाराचे मार्ग मुसलमानांच्या मार्गांहून फारच वेगळे आहेत. कारण ते मार्ग शिक्षण, परोपकार, आर्थिक उन्नति इत्यादि गोष्टींवर आधार-लेले असतात. ते धर्मार्थ दवाखाने काढतात, सर्व प्रकारचें शिक्षण देतात, अनाथगृहें चालवितात, औद्योगिक धंदे निर्माण करतात आणि या उद्यो-गांच्या द्वारें हिंदु लोकांचें मन वळवून त्यांना धर्मांतर करण्याचा मोह घालतात, यामुळें ख्रिस्ती मिशनऱ्यांकडून होणारें धर्मांतर हें पुष्कळसें आपखुषीचें असतें. मुसलमान मिशनऱ्यांप्रमाणें छळ, कपट, जुलूम-जबरदस्ती या स्वरूपाचें नसतें. यामुळें ख्रिस्ती मिशनऱ्याला आम्ही कोणत्या तोंडानें बोल लावावा? या बाब-तींत आत्मसंरक्षण करावयाचें तर हिंदूंनीं पुष्कळ पैसा खर्चून जनतेला उप-कारक अशीं कृत्यें व उद्योग स्वतःच करून धर्मांतर करणारांना ख्रिस्ती मिश-नऱ्यांच्या मोहांतून सोडविलें पाहिजे. पण ' मिजास बादशहाची आणि नांद-णूक कैकाड्याची ' अशी आम्हा हिंदूंची स्थिति झाली आहे. तोंडानें आम्ही ' कृण्वन्तो विश्वमार्यं ' अशी वढाईची धर्मदिग्विजयाच्या आकांक्षेची भाषा बोलतों, पण आमच्या हातांतून डोळ्यांदेखत घरच्या घरीं जे हिंदू लोक ख्रिस्ती,

मुसलमान मिशनऱ्यांकडून लोभवून, फूस लावून नेले जातात त्यांचें संरक्षण करण्यासारखें सोपें कामहि आमच्या हातून होत नाहीं ही किती लज्जास्पद गोष्ट आहे ?

कसेंहि असलें तरी या ख्रिस्ती लोकांच्या अतिक्रमणाविरुद्धहि संरक्षण हवेंच. हिंदू समाजानें आत्मसंरक्षणाचे प्रयत्न केलेच पाहिजेत. पण त्याबरोबर योग्य तो कायदेशीर इलाजहि कांहीं झाला पाहिजे. मग धर्मांतराची बाब कोणत्याहि समाजानें कोणत्याहि समाजाविरुद्ध केलेली असो. या बाबतींत एक सुप्रसिद्ध महाराष्ट्रीय डॉ. रँ. परांजपे यांनीं एक फार उपयुक्त व योग्य अशी सूचना केली आहे. ती अशी कीं कोणत्याहि समाजांतील वयांत न आलेल्या मुलाचें धर्मांतर कोणींहि कशाकरितांहि केलें असलें तरी तें बिलकूल बेकायदेशीर मानलें जावें. आणि वयांत आलेल्या सज्ञान मनुष्याचेंहि धर्मांतर कायदेशीर व्हावयाचें तर त्यानें मॅजिस्ट्रेटपुढें जाऊन, धर्मांतरदीक्षा होण्यापूर्वीं मी आपल्या खुषीनें धर्मांतर करीत आहे, मजला कोणीं फसविलेलें नाहीं, मजवर जुल्मजबरदस्ती झालेली नाहीं असा लेख शपथेवर लिहून दिला पाहिजे. वास्तविक रँ. परांजपे हे शुद्ध तर्कनिष्ठ पंथाचे आहेत. त्यांना कोणत्याच धर्माचें प्रेम किंवा पक्षपात नाहीं. ते हिंदू असतांही हिंदुधर्माला इतर कोणत्याहि धर्माइतकाच बरावाईट लेखतात. अर्थात् परांजपे यांची सूचना कोणा विशिष्ट समाजाचा फायदा करून देण्याकरितां केलेली नसून त्यांचा हेतु आहे तो इतकाच कीं, त्यांची ही सूचना अंमलांत आल्यास गैरशिस्त धर्मांतराचा घाला कोणत्याहि समाजावर पडणार नाहीं, आणि अशा घाल्यामुळें निरनिराळ्या समाजांत आज जें वितुष्ट व द्वेष वाढलेले दिसतात त्यांचें एक तरी कारण कमी होईल. तारतम्यानें पाहतां मी तरी असें म्हणेन कीं, मुसलमान मिशनऱ्यांकडून होणाऱ्या हल्ल्याच्या दृष्टीनें तरी ही सूचना अंमलांत येणें अवश्य आहे. कारण ख्रिस्ती मिशनऱ्यांप्रमाणें मुसलमान मिशनरी हे एखाद्या परोपकारी कृत्याचेंहि आमिष दाखवीत नाहींत व धर्मांतरितांच्या हिताचें काम करीत नाहींत. त्यांचें धोरण ' येन केन प्रकारेण ' हिंदू समाजांतील लोकांची संख्या कमी करून आपली भरती करावयाची एवढेंच असतें.

असो. " हिंदु सभा ही अराष्ट्रीय आहे व तिला सहानुभूति दाखविली म्हणजे हिंदी राष्ट्रीयतेला बाध आणणें होय " अशी एक हूल महाराष्ट्रांतीह

कांहीं असमंजस लोकांनीं पिकवून दिलेली आहे. यासंबंधानें थोडक्यांत तात्त्विक उत्तर असें आहे. मनुष्यजीवन म्हणजे एकंदरीनें मनुष्याचा सर्व बाह्य पदार्थांशीं व परिस्थितीशीं येणारा संबंध एवढेंच नसून, त्या सर्व संबंधांचा समन्वय शक्य तितक्या तत्त्वज्ञानी दृष्टीनें करणें हेंच जीवनाचें सार होय. जितके संबंध तितक्या निष्ठा असें सकृद्दर्शनीं दिसतें व या सर्व निष्ठा एकदम संभाळणें अशक्य म्हणून त्यांतली कोणती तरी एक सर्वश्रेष्ठ मानणें व त्याकरितां बाकी सर्व निष्ठांचा त्याग करणें हेंच योग्य असें कोणीं म्हटलें, तर तें मोहक वाटतें, पण तें खरें नाहीं. मनुष्याला या संबंधांचें तारतम्य पाहून अनेक निष्ठा एकाच वेळीं संभाळतां येतात. मी एकच साधें उदाहरण देतों. एखाद्या मुलाचा बाप व आजा दोघेहि जिवंत असतील तर त्यानें केवळ एकटा बाप मानावा कीं आजा मानावा असा प्रश्न करणेंच मूर्खपणाचें होईल. त्यानें बाप व आजा दोघांनाही त्यांच्या त्यांच्या रीतीनें मानलें पाहिजे. अन्नाचा एकच घांस असेल तर तो एकच दोन ठिकाणीं सबंध देतां येत नाहीं म्हणून त्यानें वाटेल तर बापाला अर्धा व आजाला अर्धा करून द्यावा. पण प्रेम हें असें दोन ठायीं वांटतां येत नाहीं व तें तसें वांटून देण्याचेंहि कारण नाहीं. प्रेम अविभाज्य असून, तें सर्वच्या सर्व अनेकांना एकाच वेळीं देता येऊं शकेल. ' पूर्णस्य पूर्णमादाय पूर्णमेवावशिष्यते ' हें उपनिषदांतील वाक्य प्रेमनिष्ठ मनुष्यजीवाला बरोबर लागू पडतें.

विश्वबंधुत्वाचें ध्येय हें कोणाला मान्य नाहीं ? परंतु व्यावहारिक दृष्ट्या ध्येय हेंहि हप्त्यांनीं किंवा मजल्यांनीं किंवा मुक्कामांनींच गांठतां येतें. आज आपण विश्वबंधुत्वाच्या मार्गावर प्रवास करीत असतां राष्ट्राच्या मुक्कामावर येऊन, राष्ट्रसंघासारख्या जागतिक संस्थेच्या प्रयोगांनीं पुढील अधिक उमद्या ध्येयमार्गाचा शोध करीत आहों तो अवश्य करावाच. पण तिकडे तोंड फिरलें म्हणून पूर्वीच्या मुक्कामांतील गृह, कुटुंब, धर्म, समाज इत्यादिकांचें प्रेम सोडून दिलेंच पाहिजे असें होत नाहीं, थिऑसॉफिस्ट लोक हे वस्तुतः विश्वबंधुत्वाचे उपदेशक असतांहि काय सांगतात ? ते म्हणतात " हिंदु लोकहो, हिंदूच राहा; पण अधिक चांगले हिंदु बना. " मुसलमान, खिस्ती, पारशी यांनाहि तोच उपदेश करतात; यांपैकीं प्रत्येकाला स्वधर्मांतच राहा पण तो धर्मच अधिक उन्नत व उज्ज्वल करा असें सांगणें हाच विश्वबंधुत्वाच्या सदुपदे-

शाचा उत्तम नमुना आहे. सांखळदंड हा कोणीहि तो तोडू नये म्हणूनच बनवावयाचा असतो. पण साखळदंड हाहि कड्या व दुवे यांनींच बनलेला असतो; आणि त्यांतील एखादी कडी किंवा दुवा जर कमकुवत ठरला म्हणजे त्याच्यांतील परमाणूंची संघटना भक्कम नसली तर तो जोरानें खेचल्यास या दुर्बळ दुव्याशींच तुटतो; मग इतर सर्व दुवे खंबीर असूनहि उपयोगी नाहींत. मनुष्यजीवनाच्या म्हणजे ह्यासंबंधीं अनेक निष्ठांच्या साखळदंडालाहि हेंच तत्त्व लागलें असें समजावें.

डॉ. अंबेडकर यांनीं धर्मांतर करण्याचा धाक घालून एक नवें भूत उत्पन्न केलें आहे. डॉक्टरसाहेब त्यांना वाटेल तें करण्याला पूर्ण मुखत्यार आहेत. पण जरब दाखवून आपलें काम करून घेण्याचें त्यांचें हें कृत्य पूर्वींच्या म. गांधींच्या प्राणांतिक उपोषणाइतकेंच अविचाराचें व असमर्थनीय आहे.

अस्पृश्यता–निवारण, दलितोद्धार या बाबतींत हिंदु जनता, निदान तिचे प्रमुख पुढारी, किती कसून आपले प्रयत्न करीत आहेत याची अंबेडकरांना जाणीव नसावी ही मोठ्या दुःखाची गोष्ट आहे. शिवाय त्यांनीं हेंहि लक्षांत ठेवावें कीं, त्यांचा हा डाव फुकट जाण्याचा संभव आहे. महाराशिवाय इतर जातींतले अस्पृश्य लोकच काय पण खुद्द महार वर्गांतलेहि बरेच लोक त्यांच्याबरोबर धर्मांतर करणार नाहींत. कदाचित् या लोकांना हें माहीत असावें कीं धर्मांतर करून परजातींत गेलें तरी तेथेंहि दुःखें कांहीं कमी नाहींत. इथलें दुःख डोळ्याला दिसतें, तिथलें आज दिसत नाहीं इतकेंच. खरी उन्नति होणें हें कोठेंहि कठिणच. केवळ जागा बदलून रोप लावलें म्हणून पळसाला तीनाऐवजीं चार पानें फुटत नाहींत.

अंबेडकरांना हें कळावें कीं भावी काळांत अस्पृश्योद्धार लवकरच झाल्याशिवाय राहत नाहीं. सामाजिक न्यायबुद्धीचा विजय होईलच होईल. शिवाय धर्मांतर करून दलितपणा घालविणें हें रणमैदानावरून पदरीं पराभव घेऊन पळून जाऊन शौर्याऐवजीं जीव बचावल्याची प्रौढी मिरवण्यासारखेंच आहे. तो पुरुषार्थ नव्हे ! पण डॉ. अंबेडकरांचें चुकतें म्हणून सनातनी करतात तेंच बरोबर असें मात्र ठरत नाहीं. कायद्याचें शस्त्र घातक; त्याचा उपयोग करूं नये हें म्हणणें ठीक असेल; पण उपदेश, बोध, मनोनुनय, यांच्या

साहाय्यानें सनातनी लोकांचेंहि मतपरिवर्तन करतां येण्यासारखें आहे, व तें होईल अशी आशाहि मला वाटते.

जातीय निर्णयाविरुद्ध ( कम्युनल ॲवॉर्ड ) महाराष्ट्राची तक्रार कायमच आहे. कांहीं लोकांना वाटतें कीं, त्याविषयीं यापुढें अधिक चळवळ न करावी, हाच शहाणपणाचा मार्ग होय. त्याचा आतां कायदा झाला, प्रकरण मिटलें ! पण तसें कसें होईल ? आजवर त्याचे दुष्परिणाम कल्पनाग्राह्य होते ते आतां प्रत्यक्ष अनुभवाला येऊं लागतील. जातीय निर्णयाचें प्रेत गाडलें गेलें म्हटलें तरी भुतेंहि किती उपद्रव देऊं शकतात हें जगाला माहीतच आहे.

हिंदु समाजानें परकीयांचें अतिक्रमण थांबविण्याकरितां काय केलें पाहिजे हें वर दर्शविलेंच आहे; परंतु समजा हें बाहेरचें अतिक्रमण थांबलें म्हणून हिंदुसमाजानें इतर कांहीं करावयाचें उरलें नाहीं असें मात्र होत नाहीं. त्यानें अंतर्मुख होऊन आपली सुधारणाहि केली पाहिजे. आज कूपमंडूकवृत्तीनें हिंदु समाजाला पछाडलें आहे. ती सोडून त्यानें बाहेर पडून चहूंकडे दृष्टि वळवून जगांत काय चाललें आहे व त्यांत घेण्यासारखें काय आहे हें तरी पाहिलें पाहिजे. जागतिक शक्ति कशा सैरावैरा वावरत आहेत हें ध्यानांत आणलें पाहिजे. कोणत्याहि समाजानें प्रगतिपथावर राहिल्याशिवाय त्याचें आतां जगांत निभावयाचें नाहीं. नव्यांतलेंहि पथ्यकर कोणतें हें समजून घेतलें पाहिजे. जरी आपल्या जुन्या संस्कृतींपैकीं सर्व चांगल्या गोष्टींचा व पूर्वजांपैकीं ऋषि, मुनि, द्रष्टे, दूरदर्शी, तत्त्वज्ञानी यांचा अभिमान कधींहि सोडूं नये, तथापि हेंहि लक्षांत ठेवावें कीं, त्यांचें शहाणपण त्यांच्या काळाला पुरण्यासारखें व पथ्यकर असलें तरी त्या काळच्या शिदोरीनें पुढील सर्व युगायुगांतराचा निर्वाह कसा होईल ? आमच्याप्रमाणें त्यांनाहि त्यांची जुनी पिढी नांवें ठेवीत होतीच. त्यांनीं आत्मप्रसाधनाचें तत्त्व श्रेष्ठ मानून आपल्या काळाला व परिस्थितीला योग्य तें करून हिंदू धर्माचें परिवर्तनक्षमत्व व स्वयं-निर्णयाचा अधिकार प्रस्थापित केला.

मला असें वाटतें कीं, एखाद्या आध्यात्मिक प्लँचेटवर या जुन्या काळच्या ऋषिमुनींना आमच्याशीं संवाद करण्याला बोलावून आणतां आलें तर उलट तेच आम्हाला म्हणतील कीं, "खुळ्यांनो, संशय–कर्दमांत काय लोळत बसलां आहांत ? तुमची आजची परिस्थिति आम्ही सूक्ष्मपणें पाहिली. तुम्हाला धार्मिक,

सामाजिक आचार-विचार बदलून पथ्यकरच पण सोयीचे असे करून घेतले पाहिजेत. आम्हाला सुधारणा करण्याचा हक्क जर आमच्या युगांत होता तर तुमचा तोच हक्क नव्या युगांत आम्ही मान्य करणार नाहीं अशी वेडी समजूत तुम्ही कां करून घेतली ? प्रामाण्यनिष्ठ आमचा अधिकार तुम्ही मानीत असाल तर तो तितक्यापुरता काढून घेण्याला आमची तयारी आहे. तुम्ही आमचे गुलाम का आहां ? तुम्ही आम्हाला यापूर्वीच बोलावून हें विचारलें नाहीं याचेंच आश्चर्य वाटतें ! आम्ही तुमच्या हिताकरितां सुविचाराचें धन तुमच्याकरितां मार्गे ठेवून गेलों, पण त्या धनाचे तुम्हीच आतां पूर्ण मालक आहां. अर्थात् तें धन आम्हीं जसें वेचलें, खर्च केलें, अगदीं तसेंच त्याच रकमांच्या चेकांनीं, त्याच कार्याकरितां खर्च करण्याचें नसतें बंधन तुम्ही मानणें हें मतिमंदत्वाचेंच लक्षण ठरेल. म्हणून आतां तरी उठा आणि कामाला लागा म्हणजे पुढच्या पिढीचे दूरदर्शी व ममताळू मुनि, ऋषि, गुरु तुम्हीहि ठराल.”

असो; या सतराव्या अधिवेशनाला माननीय पं. मदनमोहन मालवीय हे अध्यक्षपद घेण्याला लाभले हें तुमचें—आमचें महद्भाग्यच होय. त्यांच्या सान्निध्यानें तुम्हाआम्हाला योग्य तेंच करण्याची स्फूर्ति होईल व मार्ग दिसेल. पंडितजींना नुकतेंच पंचाहत्तरावें वर्ष लागलें, याबद्दल आपण त्यांचें अभिनंदन करूंया आणि प्रार्थना करूंया कीं, त्यांना उदंड आयुष्य लाभून, त्यांच्या हातून हिंदु धर्माची व हिंदी राष्ट्राची अशीच यापुढें सेवा करण्याकरितां ईश्वरानें त्यांना बळ द्यावें.

---

# १०. धर्मभावनांवरील टीकेचा गुन्हा !

( असेंब्लींत ता. १६ सप्टेंबर १९२७ रोजीं भाषण केलें त्याचा सारांश )

“ धर्माविरुद्ध होणाऱ्या अवास्तव टीकांपासून धर्माचें संरक्षण करण्याकरितां हें बिल पुढें आणलें आहे. तथापि हें पास होण्यापूर्वी त्यांत बरीच सुधारणा होईल अशी मला आशा आहे. सिलेक्ट कमिटीपुढें हें बिल गेलें असतांना सिलेक्ट कमिटीचा सभासद या नात्यानें माझी स्वतंत्र मतभेदपत्रिका

मी त्रिलास जोडली होती. याहि दृष्टीनें या बिलासंबंधीं मी माझें म्हणणें थोडक्यांत पण स्पष्टपणानें आपणांपुढें मांडणार आहे.

एखादा नवीन गुन्हा अस्तित्वांत आणणारें कलम पिनल कोडांत येऊं लागलें कीं त्याविरुद्ध माझे मनांत बंडखोरी उभी राहते. नालस्तीवर व विद्वेषकारक अशा लेखकांना पायबंद हवा; पण त्याबरोबर गुन्ह्याची निश्चित मर्यादा ठरवून अपवादांचा स्पष्ट नामनिर्देशहि केला पाहिजे. जेवढा गुन्हा तितकाच प्रतिबंध असावा; त्यापेक्षां दंडकाची अतिव्याप्ति असूं नये. रोग बरा पण औषध नको असें न व्हावें.

प्रथमतः या कायद्याच्या व्याप्तीमध्यें कोणकोणते लोक येतात हें पाहूं. कांहीं लोक असें असतात कीं, प्रत्यक्ष विद्वेषच पाहिला तर तो त्यांचे मनांत अत्यंत जळजळीत असतो. पण नुसता मनांत हवा तेवढा द्वेष असला तरी तो कायद्याच्या कचाट्यांत कसा येणार ? ज्याच्या मनांतील रागद्वेष शब्दांत अगर कृतींत उतरूं शकत नाहीं तो मनुष्य कायद्याचे दृष्टीनें अमर्षशून्यच म्हणावयाचा. कायदा त्याला स्पर्श करूं शकत नाहीं. पण दुसऱ्या प्रकारचे लोक असे असतात कीं, त्यांचा रागद्वेष शब्दांत अगर कृतींत उतरून प्रभावी होतो. प्रहार करण्याच्या बुद्धीबरोबर प्रहार करण्याचें धारिष्टहि त्यांचे अंगीं असतें ! अशा लोकांपासून कोणाच्या मनोभावना दुखावल्या गेल्या तर कायद्यानें अर्थात् मध्यें पडून धर्माच्याभोंवतीं आपली संरक्षक शक्ति उभी केली पाहिजे.

पण लोकांचा तिसराहि एक वर्ग आहे. हा म्हणजे सत्प्रवृत्त टीकाकारांचा. कोणतीहि सुधारणा घडवून आणण्याकरितां यांना आपल्या टीकेचें शस्त्र सतत चालू ठेवावेंच लागतें. पण तें करतांना कोणाच्या व्यक्तिविषयक नाजूक भावना दुखवाव्या अगर अन्यायानें टीकेचा हल्ला चढवावा अशी त्यांची इच्छा नसते. या लोकांचें कार्य प्रामाणिकपणानें व निर्वेध चालू राहण्याला यांना नवीन कायद्यापासून संरक्षण नको काय ? सिलेक्ट कमिटीनें बिलाचा जो अखेर मसुदा पास केला आहे त्यांत अतिव्याप्तीचा दोष घडला आहे व या वर्गाचें नवीन बिलापासून संरक्षण व्हावयास पाहिजे तितकें तें होत नाहीं, अशी माझी तक्रार आहे.

जगांतील सुधारणांचा एकंदर इतिहास पाहिला तर टीका व टीकाकार यांनीं त्यांत फार बहुमोल कामगिरी बजावली आहे व असेंब्लींत बसून नवे

कायदे करतांना या लोकांना निष्कारण पायबंद बसून त्यामुळें एकंदर सुधारणेचें कार्य थावूं नये इकडेहि आपण लक्ष दिलें पाहिजे. टीकेच्या व्याप्तीपेक्षां कायद्याची व्याप्ति, कार्य व उद्देश संकुचित असतो व तसाच तो असला पाहिजे. कायदाहि लोकांना शिक्षण देतो. पण तें अभावरूपी किंवा निषेधात्मक असतें. काय काय करूं नये इतकेंच फार तर कायदा सांगेल. चांगल्या गोष्टी हमखास घडवून आणण्याची 'प्रयोजक' शक्ति कायद्यांत नाहीं. अर्थात् लोककल्याण घडून यावयाचें तर तें समाजांतील व्यक्तींची इच्छा, शिक्षण व सुसंस्कृति यांवरच केव्हांहि अवलंबून राहणार ! टोलनाक्यावरील आडव्या दांड्याप्रमाणें सामाजिक व्यवहाराचे मार्गावर कायदा बसलेला असतो. कार्याकार्याची मर्यादारेषा त्यानें आंखून ठेवलेली असते. ती ओलांडून तुम्ही पलीकडे जाऊं लागलां कीं दंडरूपी टोल अगर दस्तुरी तुम्हास द्यावीच लागते. या मर्यादेला भिडण्यापूर्वी तुम्ही काय केलें व नंतर काय कराल हें तो दंड ( दांडा ) पाहात नाहीं.

कांहीं विशिष्ट वर्गांना अगर लोकांना रास्त टीका करण्याचा हक्क निसर्गसिद्ध असतो म्हणून त्यांना कायद्याचें संरक्षण मिळालेंच पाहिजे. उदाहरणार्थ, या संरक्षणाचे पहिले हक्कदार समाजांतील अश्रद्धावादी अगर सूक्ष्म शंकेखोर लोक हे होत. समाजामध्यें दृढमूल प्रस्थापित झालेल्या रूढीच्या अगर मतांच्या अभेद्य दुर्गावर हे लोक कधीं समोरून छातीठोक हल्ला चढवीत नाहींत. पण नदीच्या प्रवाहांत उभें असतां पायाखालील वाळू जशी कणाकणानें न कळत झरून जात असते, त्याप्रमाणें लोकमतामध्यें सूक्ष्मपणानें पण निश्चित फरक घडवून आणण्याचें या वर्गाचें काम चालू असतें; व थेंबाथेंबानें झिमझिम पडणाऱ्या पावसानें कालांतरानें का होईना पण सृष्टींत प्रचंड घडामोडी होतात, मैदानांच्या ठिकाणीं पर्वत होतात व पर्वतांचे जागीं मैदानें होतात, त्याचप्रमाणें या अश्रद्धावादी अगर शंकाप्रवृत्त लोकांच्या हातून सूक्ष्म रीतीनें का होइना पण परिणामी लोकमतामध्यें अत्यंत आश्चर्यकारक स्थित्यंतरें होतात.

यानंतर समाजशास्त्रवेत्त्यांचा वर्ग. हा वर्ग आपल्या निवांत खोलीमध्यें बसून परिश्रमपूर्वक आंकडे जमवीत असतो व खऱ्या हकीकती व गोष्टी टिपून ठेवीत असतो. लौकिक दृष्ट्या चांगल्या वाईट सर्वच गोष्टी त्याच्या

खातीं जमा असतात. त्याला ग्राम्य अशाहि आचारविचारांची नोंद करावी लागते. पण निर्विकार बुद्धीनें चालविलेल्या या आंकडेगिरींतून कांहीं तरी सिद्धान्त काढण्याची त्याची सर्व खटपट असते. अशा आंकडेशास्त्रज्ञांच्या पुस्तकांतील वाईट गोष्टींवर केवळ त्या गोष्टी नजरेस आल्यानें अमुक एका वर्गाच्या भावना दुखावल्या जातात म्हणून तुम्ही कांट मारूं लागलां तर सिद्धान्तवादी मनुष्य आपले सिद्धान्त कसे तयार करणार? म्हणून अंतिम दृष्टीनें या लोकांना कायद्याचें संरक्षण असणें अवश्य आहे.

यानंतरचा तार्किक लोकांचा वर्ग. या लोकांचा वर्ग नेहमीं कोठें तरी जाग्रत असतो म्हणूनच निरनिराळे संप्रदाय आणि त्यांचीं बंडें यांचा विनाश-काळ येतो. खऱ्या बौद्धिक युक्तिवादाच्या दारूगोळ्यापुढें भोळ्या भावना तटाच्या भिंतीप्रमाणें कोसळून पडूं लागतात.

नंतर गूढ संशोधनांत निमग्न असणारा तत्त्ववेत्ता यालाहि कायद्यानें आपल्या कक्षेंतून सोडलें पाहिजे. यतिधर्म अगर संन्यासधर्म ज्यानें घेतला त्याला ज्याप्रमाणें पूर्वीच्या काळीं कायद्यांचीं बंधनें लागू नसत, त्याचप्रमाणें याहि बाबतींत झालें पाहिजे. तत्त्ववेत्ता संसारांत बसला उठला तरी यती-प्रमाणेंच शून्यसंशोधन करीत असतो. व्यष्टीपेक्षां समष्टीवरच त्याची दृष्टि असते. एका कोणत्याहि वृक्षापेक्षां समग्र वृक्षारण्यच त्याचे दृष्टीस दिसत असतें. अर्थात् अशा लोकांकडून निघालेल्या सकृद्दर्शनीं व्यक्तिविषय अशा वाटणाऱ्या उद्गारांनीं, कोणाची बेअदबी अगर निंदानालस्ती झाली असें कां मानावें? गुन्हा करण्याचा उद्देशच ज्यांच्या मनांत नाहीं त्यांच्यावर गुन्हा कां लादावा?

यानंतर विनोदप्रिय व वक्रोक्तिप्रिय कुचेष्टेखोर लोक. यांच्या हातून होणारी मनुष्यजातीची सेवा फार श्रेष्ठ दर्जाची आहे, हें कबूल केलें पाहिजे. यांच्या विनोदाला थोडें वात्रटपणाचें स्वरूप असलें तरी अहंमन्यता, भोंदूपणा, भ्रामक समजुती, गर्व, अहंकार यांचीं जीं अनेक जाळीं व जळमटें समाजाच्या मनांत राहून गेलेलीं असतात तीं थट्टेखोरी व सूक्ष्म उपहास यांच्या फुंकरांनीं नकळत ते दूर करीत असतात. तसेंच वक्रोक्ति ही क्वचित् कठोर व निर्दय-पणाची असली तरी हें शस्त्र समाजाच्या हिताकरितांच धरणारानें दुहातीं धरलेलें असतें. रोगावर शस्त्रक्रिया करणारा डॉक्टर व लोकसमजुतीवर वक्रोक्तीचें शस्त्र चालविणारा विनोदी लेखक यांत फरक तो काय?

असो, या व अशा सदरांत पडणाऱ्या सर्व लोकांना कायद्यानें मुक्तद्वार ठेवलें पाहिजे. जगाच्या इतिहासांत सामाजिक व धार्मिक लढ्याचे असे प्रसंग वारंवार आले आहेत. प्रत्येक संकृतीच्या युगाबरोबर त्या संस्कृतीचे बेरेवाईट टीकाकारहि निर्माण झाले आहेत. त्यांच्या प्रयत्नामुळेंच आजपर्यंत, मनुष्य-जातीची धारणा व सुधारणा हीं झालीं आहेत. युरोपांतील प्रसिद्ध आडमुठा सुधारक लूथर यानें तत्कालीन पोपच्या सत्तेविरुद्ध बंड पुकारून चर्चच्या दारावर आपली प्रश्नपत्रिका प्रत्यक्ष खिळे ठोकून चढविली ! पण त्याच्याहि पूर्वी इरॅस्मस यानें आपल्या एका पुस्तकांत परलोकाचें काल्पनिक वर्णन करून, इहलोकीं मोठमोठे साधु व महात्मे म्हणविणारे लोक तेथें किती हालअपेष्टा सोशीत असतात याचें वर्णन केलेलें इतिहासज्ञांस माहीत आहेच. फ्रेंच राज्य-क्रांतीची गोष्ट घेतली तर रूसो हा बोलूनचालून अश्लील व आडमुठेपणानें हवे तसे टीकेचे कोरडे उडवीत असे. त्याच्या उलट व्हॉल्टेअर याची टीका मोठी सूक्ष्म, पायघोळ असे ! पण समाजाला उन्नतावस्थेप्रत आणून लोकांचें मन तयार करणें हें एकच कार्य दोघांनींहि घडवून आणलें.

आणि ज्या काळांत आपण राहतों त्या वर्तमानकाळांत तरी आपणाला हेंच दिसून येईल. महत्त्वाचे दृष्टीनें ज्याला "ऐतिहासिक" असें नांव यथार्थतेनें लावतां येईल अशा वर्तमानकालीन वादांचींहि उदाहरणें देतां येतील. येशू खिस्त हा ऐतिहासिक पुरुष होता काय ? श्रीकृष्णाची रास-लीला सदोष कीं निर्दोष होती ? महंमदाचें चारित्र्य कसें होतें ? बुद्धाचा अभक्ष्यभक्षणातिरेकानें मृत्यु झाला काय ? या व अशा धार्मिक विषयांवर रणें पडलीं होतीं. त्याचप्रमाणें बालविवाह, विधवाविवाह, संततिनियमन, अशा सामाजिक प्रश्नांचाहि उल्लेख करतां येईल. सदभिरुचि ज्याला म्हणतां येईल ती अशा प्रश्नांच्या ऊहापोहामध्यें सर्व ठिकाणीं हटकून पाळली जातेच किंवा जाईलच हें संभवत नाहीं. तथापि टीकाकारांची विशाल दृष्टि व सार्वजनिक हितबुद्धि लक्षांत घेतां इतर बारीक गोष्टी आपण विसरूं शकतों. व्यक्तिविषयक कोणाचें नुकसान केल्याशिवाय सद्भावनेनें असे वाद करतां येतात, मग आजमितीला असे सर्व टीकाकार नामशेष होऊन त्यांचा निर्वंश झाला असें कोणीं कां मानावें ?

सिलेक्ट कमिटीच्या मताला जी भिन्नमतपत्रिका मीं जोडली आहे तींत

मीं हेंच दर्शविलें आहे. व सद्भावनेनें टीका करणाऱ्या वर्गाला जें कायद्यानें संरक्षण मिळावयास पाहिजे तें नवीन कायद्यानें मिळणार नाहीं ही अडचण मीं दिग्दर्शित केली आहे. अशा दृष्टीनेंच आपण या बिलांत योग्य ते फेरफार करून नंतरच तें असेंब्लीनें पास करावें अशी माझी सूचना आहे.

---

# ९१. श्रीकपिलेश्वर गोवा येथील सभा

( अध्यक्षीय भाषण १९२६ )

आजचा प्रसंग मी अनेक दृष्टींनीं अपूर्व मानतों. गोवें प्रांतांतील एका विशिष्ट ज्ञातींतून वगळल्या गेलेल्या एका उपवर्गाला आपल्यावर पडलेल्या बहिष्काराची दुःसहता भासूं लागली. त्यानें त्या ज्ञातीकडे आपलें सामाजिक दुःख कळकळीनें निवेदन केलें. त्या ज्ञातीला सहानुभूति उत्पन्न होऊन तिनें तो बहिष्कार दूर करण्याविषयीं आपली इच्छा प्रदर्शित केली. या ज्ञातीच्या या दोन अंगांकडून फिरून एकजीव होण्याच्या प्रयत्नाला श्रीमच्छंकराचार्य यांनीं आपल्या अधिकाराचा योग्य उपयोग करून संमति दिली आणि हा बहिष्कार दूर झाल्याची गोष्ट ठरल्यास जगप्रसिद्ध करण्याकरितां आजची ही सार्वजनिक सभा भरत आहे. वर ज्या गोष्टींचा निर्देश मीं केला त्या माझ्या मतें हिंदु समाजस्थितीला उपकारक व उत्कर्षजनक अशा आहेत. अशा सुप्रसंगीं भरणाऱ्या सभेचें अध्यक्षस्थान मी घेऊन सभेचें कार्य करावें असें श्रीमच्छंकराचार्यांचें आज्ञापत्र मला आलें हा श्रींचा मजवर अनुग्रह झाला असेंच मीं मानतों. कारण हिंदु-समाजाच्या सुस्थितीला कारणीभूत होणाऱ्या अशा कार्यांत प्रमुखपणें भाग घेतां येणें याहून हिंदुमात्राला अधिक भाग्य कोणतें लाभणार ?

आजच्या सभेचें अध्यक्षस्थान स्वीकारण्याची आज्ञा श्रींकडून मला झाली यांत माझा बहुमान झाला हें तर खरेंच. परंतु माझ्यासारख्या एखाद्या व्यक्तीचा बहुमान करण्यापेक्षांहि अधिक उदात्त असाहि एक हेतु श्रींचा असावा असें मला वाटतें. तो हेतु हा कीं, महाराष्ट्राच्या नैर्ऋत्य दिशेच्या अगदीं एका कोपऱ्यांत ही जी इष्ट सामाजिक सुधारणा श्रींच्या कृपेनें व

स्थानिक जनतेच्या स्फूर्तीनें आज घडून येत आहे तिची प्रसिद्धी मजकडून सर्व महाराष्ट्रभर यथाशक्ति केली जावी; आणि आजच्या सभेचें कार्य केवळ ठरावानेंच नव्हे तर प्रत्यक्ष कृति व व्यवहार यांनीं फलित झालेलें पाहतांच मी तें एक एकंदर हिंदु समाजाला अनुकरणीय उदाहरण म्हणून त्याची शक्य तितकी प्रसिद्धी व पुरस्कार करीन. ही प्रसिद्धी करण्याचें एक साधन म्हणजे केसरी पत्राचें संपादकत्व. हें मला सुदैवानें लाभलेलें आहे; व त्या साधनांचा उपयोग या कामीं मी मोठ्या आस्थेनें व आनंदानें करीन.

या प्रकरणांतील जे कागदपत्र मला पहावयास मिळाले त्यावरून असें दिसतें कीं, कांहीं एका क्षुल्लक कारणामुळें पद्ये नामक पंचद्राविडान्तर्गत ब्राह्मण ज्ञातींतील कांहीं लोक सुमारें दोनशें वर्षांपूर्वी बहिष्कृत झाले व यदृच्छेनें त्यांना भट्टप्रभू हें नामाभिधान मिळालें. या दोनही ब्राह्मणवर्गांत गोत्रप्रवर, कुलदेवता धंद्यांचा प्रकार, व्रतानुष्ठानांचें आचारण, आहार-पानादिकरून मुख्य व इतर किरकोळ आचार आणि रीतरिवाज हीं सर्व अन्वयव्यतिरेकानें समान असल्याचें पुराव्यानें जवळ जवळ निर्विवादपणें शाबीत आहे. असें असतां बहिष्काराचें मूळ कारण शोधूं जातां कागदोपत्रीं किंवा इतर निश्चयात्मक पुराव्यानें तें कारण उमगत नाहीं. जें उगमतें तें फक्त एका दंतकथेवर अवलंबून आहे; व त्या दंतकथेंतहि इतकेंच आढळतें कीं, सुमारें दोनशें वर्षांपूर्वी या सत्तरीतील लोकांना श्रींच्या तीर्थप्रसादास निमंत्रण झालें असतां कांहीं लोक उशीरा येऊन पोंचल्यामुळें त्यांना मुख्य पंगत साधली नाहीं म्हणून त्यांना मागच्या पंगतींत जेवावें लागलें. या पंक्तिभेदाला उभय पक्षांच्या स्वभावदोषामुळें बहिष्काराचें स्वरूप आलें, व तो बहिष्कार दूर करण्याचा प्रयत्न पुढें लवकर न झाल्यामुळें तो बहिष्कार जवळजवळ वज्रलेप बनून भट्टप्रभूंचें मूळच्या ज्ञातींतून कायमचें उच्चाटन झालें. बहिष्कृत झालेल्या या समाजानें आपला वेगळेपणा ही प्रथम स्वाभिमानाची खूण म्हणून कदाचित् मानली असेल पण कदाचित् या बहिष्काराचा त्यांच्यावर जुलूम झाला असेल हेंहि संभवनीय आहे. तें कसेंहि असो, असें कोणतेंहि कारण या बहिष्काराचे संबंधांत कोणास दाखवितां येत नाहीं कीं, तो बहिष्कार पूर्वी पडला तेव्हां सयुक्तिक असला किंवा नसला तरी आजहि तो तसाच कायम रहावा. कारण समाजाची अशीं शकलें पडल्यानें हानि होते ती एकाच पक्षाची होते असें नाहीं, तर ती हानि उभय-

तांचीहि सारखीच हाते. कोणत्याहि बहिष्काराचें योग्य कारण म्हटलें म्हणजे पतितत्व, व तें विशेष प्रकारच्या पापाचरणामुळें किंवा समाजघातक अनिष्ट अशा आचारामुळें प्राप्त हातें. भट्टप्रभू या ज्ञातीच्या बहिष्काराला तो पडला तेव्हां असलें एकादें बलवत्तर कारण घडून आल्याचें दिसत नाहीं. आणि त्यांचा आजचा आचारविचार पाहावा तर तो निरपवाद व पद्धे ब्राह्मण वर्गाशीं समरस होण्यासारखाच असल्याचा पुरावा अनेक सद्‌गृहस्थांनीं दिलेला आहे. असें असल्यानें प्रस्तुतचा बहिष्कार निष्कारण व निरर्थक ठरतो आणि भट्टप्रभू वर्गाकडून तो बहिष्कार निघून जावा अशी इच्छा प्रदर्शित होऊन प्रत्यक्ष तशी अर्जरूपानें विनंति करण्यांत आल्यावरहि तो झाडून न टाकणें हा मोठाच सामाजिक अन्याय होईल.

हिंदु समाजांतील ज्ञातिबंधनें मोठीं कठोर असतात. तीं सहसा मोडून निघत नाहींत व शिथिलहि होत नाहींत असा अनुभव आहे. होईल तितकें एकानें दुसऱ्यापासून वेगळें व स्वतंत्र राहावें अशी प्रवृत्ति हिंदुधर्मीयांत बहुशः सनातनच आहे ही गोष्ट खोटी नाहीं. तथापि ही प्रवृत्ति अयुक्तिकपणें परमावधीस जाऊन समाजघात होतो असें दिसलें किंवा बहिष्कारामुळें उद्वेग-जनक परिस्थिति उत्पन्न होते असा समय आला तर या समाजाच्या मनांत तत्संबंधीं प्रतिक्रिया संभवते असा पूर्वापार अनुभव आहे. वंश, ज्ञाति, आचारविचार, संस्कृति व धर्माचरण यांची शुद्धता राखण्याची तीव्र इच्छा अबाधित राखीत असतांहि हिंदु समाजानें पतितपरावर्तनाची परंपरा अबाधित राखलेली आहे. जुन्या काळीं हिंदुस्थानांत आलेल्या कांहीं ग्रीक लोकांना हिंदुधर्माची दीक्षा देऊन त्यांना व्यवहारांत समाविष्ट करून घेतल्याचा दाखला आढळतो. अर्थात् जो धर्म म्लेंच्छ व यवन यांना स्वकीय बनवूं शकतो तो आपल्याच समाजांतील भ्रष्ट व पतित लोकांना फिरून स्थानापन्न करण्याची अनुज्ञा देईल यांत काय आश्चर्य ? आणि हल्लींप्रमाणें उपकारक अशीं ग्रामण्यें म्हणजे ग्रामस्थ लोकांच्या चळवळी घडून येऊन एक वेळ पडलेले बहिष्कार दूर झाल्याचीं अनेक उदाहरणें दाखवितां येतील.

ब्राह्मण समाजाची हल्लींची बिकट स्थिति लक्षांत घेतां ब्राह्मण समाजांत जी फूट पडलेली आहे ती अशा उपकारक ग्रामण्याची चळवळ करून भरून काढणें हें

समाजांतील पुढाऱ्यांचें कर्तव्य ठरतें. वेदशास्त्रसंपन्न पणशीकरशास्त्री यांच्या शब्दांनीं बोलावयाचें तर "कोणत्याहि कारणांनीं फुटून वेगवेगळे झालेले समाजाचे तुकडे प्रेममय वज्रलेपानें सांधून विस्कळित झालेला समाज सुसंघटित करण्याला सर्वांनीं झटावें. जुन्या ग्रामण्यांना चिकटून बसण्याची ही वेळ नाहीं. आज जवळ जवळ तीनशें लोकांचा भट्टप्रभूंचा समाज आम्ही हकनाहक बाहेर ठेवून आमचा स्वतःच्या समाज विकल आणि निर्बल करीत आहों. आपल्यांतीलच चाळीस घरें व आपल्या रक्तमांसाचे तीनशें लोक कुचंबत ठेवून त्यांची गैरसोय करून व आपलें सामर्थ्य क्षीण करून घेणें मुळींच शहाणपणाचें होणार नाहीं." प्रसंगोपात्त बहिष्कृत झालेला ज्ञातीखंड फिरून मन मोठें करून स्वकीयांत समाविष्ट करून घेणें हें दुर्बल मनाचें लक्षण नसून सुदृढ मनाचें व आत्मप्रत्ययाचें लक्षण आहे. जातीला जर गंगेची उपमा आपण देतों तर मनांत आणल्यास जातीला गंगेप्रमाणेंच जें अशुद्ध तेंहि शुद्ध करून घेण्याचा पराक्रम कां करतां येऊं नये ?

केवळ दयाबुद्धीनेंहि ही गोष्ट प्रस्तुत प्रकरणीं घडून येणें अपरिहार्य ठरते. तीनशें लोकांच्या या समाजानें बहिष्कृत स्थितींत दिवस कसे काढावेत? पंक्तिभोजनासारखें सामाजिक सुख नाहीं; व हें सुख भट्टप्रभूसारख्या निरपवाद आचाराच्या लोकांना कायमचें अंतरविणें यांत कोणाचा कोणता पुरुषार्थ साधतो ? पण पंक्तिभोजनाचा आनंद ही एक क्षुद्र गोष्ट मानला तरी बहिष्कृत झालेल्या या तीनशें लोकांच्या समाजानें आपल्या मुलांमुलींची लग्नें कशीं करावीं याचाहि विचार सदयबुद्धीनें व्हावयास नको काय ? कोणताहि समाज संख्येनें कांहीं मर्यादेपलीकडे संकुचित झाला म्हणजे योग्य समयीं मुलांमुलींची लग्नें होणें अशक्य होतें, व वय, कुटुंबस्थिति, पात्रापात्रता या गोष्टींचें तारतम्य संभाळून वधूवरांची निवड करतां न आल्यास पुढें कौटुंबिक दुःख वाढून ठेवलेलें असतें हें सांगावयास नकोच. कोंडवाड्यांत घातल्याप्रमाणें अतिसंक्षिप्त झालेल्या अशा किती तरी जातींचीं उदाहरणें महाराष्ट्रांत व विशेषतः गुजराथेंत दाखवितां येतील. तात्पर्य, राष्ट्रीय भावनेच्या मोठमोठ्या गोष्टी आपण बोलत असतां समाजामध्यें निष्कारण पडलेले तट ढांसळून टाकण्याची जर इच्छा आपणाला झाली नाहीं किंवा इच्छा होऊनहि क्रिया घडली नाहीं. ती राष्ट्रीय बुद्धि खोटी किंवा दिखाऊ असें म्हणावयास हरकत नाहीं.

हे तट ढांसळून टाकण्यामध्यें निवळ स्वेच्छाराची कोणाची बुद्धि असेल तर ती गोष्ट वेगळी. कोणीहि समंजस समाजसुधारक घेतला तर तो आपल्या समाजाची संस्कृति उच्च पदावरून ढांसळावी असें इच्छित नाहीं. तथापि समाजांत वर्ग, उपवर्ग, तट, हद्दी, कुंपणें वगैरे अस्वाभाविक प्रकार व तेहि निष्कारण घालणें किंवा कारण सरल्यावरहि राहूं देणें यांत समाजाचें संगोपन किंवा संवर्धन साधत नाहीं. उलट समाजांत जितकी फूट तितका समाज दुबळा राहतो. परस्परसहानुभूति व साहाय्यता कमी होते, निराधार अहंकार मनांत राहतो, व एकंदरीनें समाजाचें अनहित होतें. सामाजिक यंत्राची गति बाहेर फेंकण्याची नसावी तर आंत ओढून घेण्याची असावी. आपली पृथ्वी ही अत्यंत वेगानें परिभ्रमण करीत असते. तथापि तिच्या ठिकाणीं आकर्षण-शक्ति आहे म्हणूनच आपण सर्व स्थिर पदार्थ तिजवर राहतों व नांदतों. विषम संस्कृतीचे लोक एकदम एकजीव करणें हा जसा अविचाराचा एक प्रकार तसाच समान संस्कृतीचे लोक निष्कारण दूर ठेवणें हाहि अविचाराचा दुसरा एक प्रकार होय. आचारपरंपरा व रूढी यांची सर्वमान्यता प्रसिद्ध आहे. हिंदुधर्मशास्त्राचा तो पाया आहे. तथापि त्या हिंदुधर्मशास्त्रांतच असेंहि सांगितलें आहे कीं, योग्य कारण उपस्थित असतां आचार बदलण्यास प्रत्यवाय नाहीं. शिवाय बहिष्काराच्या शिक्षेविषयीं तर असें म्हणतां येईल कीं, शिक्षाविषयक आचार जितका जुना तितका तो बदलण्यास अधिक पात्र होतो. कारण अशी कोणतीहि शिक्षा नाहीं कीं जिला अंत नाहीं. किंबहुना, शिक्षेचा काल जसजसा अधिकाधिक वाढत जातो तसतशी दया, अनुकंपा, सहानुभूति या भावना उदित होऊन शिक्षा हा ज्यांचा परिणाम त्या रागद्वेषादि भावना कमी कमी होत जातात. स्मृतिग्रंथांतील प्रायश्चित्त-विभाग स्मृतिकारांनीं याच तत्त्वावर रचला आहे. तें मुख्य तत्त्व असें कीं, प्रायः असें कोणतेंहि पाप नाहीं कीं ज्याची निष्कृति प्रायश्चित्तानें होत नाहीं. महाराष्ट्रांतील शुद्धिसंस्काराचा इतिहास हीच गोष्ट सांगतो. कबुली दिलेल्या किंवा सिद्ध झालेल्या पातकासंबंधानें ही गोष्ट झाली. पण पुष्कळ सामाजिक बहिष्कार पापमूलक नसतात. त्यांना वरिष्ठानें दिलेल्या शिक्षेच्या स्वरूपापेक्षां बरोबरीच्या लोकांनीं आपसांतील भांडणामुळें एकमेकांना दूर राखल्याचेंच स्वरूप असतें. अशा ठिकाणीं कालांतरानें तें भांडण मिटावें व बहिष्कार बंद व्हावे हेंच सयुक्तिक

आहे. सत्य व्यवहार कोणता व असत्य कोणता याचा विवेक जागृत ठेवणें हा एक मोठा पराक्रम आहे.

प्रस्तुत बहिष्कारप्रकरणीं भट्टप्रभू जनतेनें आज दोन अडीचशें वर्षें बहिष्कारदुःख सोसून एकप्रकारची तपश्चर्याच केली; ती लक्षांत घेऊन तत्सजातीय अशा मोठ्या वर्गानें त्याला अभीप्सित वर मागण्याची आज्ञा केली; त्या आज्ञेनुसार आपणाला पंक्तिपावन व शरीरसंबंधार्ह करून घेण्याचा वर त्यानें मागितला; तो त्याला देण्याची त्यांच्या बंधुवर्गानें इच्छा प्रदर्शित केली. हा सर्वच कथाभाग अद्‌भुतरम्य वाटतो, व त्यापासून समाजसुधारणेविषयीं उत्साह बाळगणाऱ्यांना आशा वाटूं लागेल असें मी आनंदानें म्हणतों. मजकडे या विषयांसबंधानें जे कागदपत्र आले त्यांत इकडील समाजापैकीं कांहीं विद्वान् लोकांचे अभिप्राय मीं वाचले व ते वाचून मला फार आनंद झाला. कारण युक्तिसिद्ध समाजसुधारणेला लोकमान्यता मिळावयाची तर ती जुन्या पद्धतीच्या शास्त्रीपंडितांकडून मिळाली तरच मिळेल. जुन्या शास्त्रीपंडितांच्या आशीर्वादाशिवाय हें कार्य सिद्धीस जावयाचें नाहीं. वर उल्लेखिलेल्या अभिप्रायांत, शास्त्राधार घेऊन समाजघटनेचा युक्तिकलाप ठाकठीक बसविण्याचें काम अभिप्राय देणाऱ्यांनीं निःपक्षपातीपणानें व प्रांजल मनानें केलें आहे. समाजाच्या आचारांत अतिव्याप्ति व अव्याप्ति ही पदोपदीं घडत असते. परंतु मधून मधून पुढें येऊन युक्ति व आचार यांची समव्याप्ति सिद्ध करणें हें काम तत्कालीन विद्वानांचें आहे.

आजची ही सभा देखील या प्रांताचे अभिमानी विद्यमान शास्त्रीपंडित यांच्या साहाय्याशिवाय घडून आलीच नसती असें मला वाटतें; आणि या सभेचें हें उदाहरण इतर प्रांतांना अनुकरणीय वाटेल असें मी खात्रीनें सांगतों. पण याहून विशेष महत्त्वाचें साहाय्य श्रीमज्जगद्‌गुरु श्रीशंकराचार्य यांचेकडून झालें असेंच म्हटलें पाहिजे. श्रीशंकराचार्य हे संन्यासवृत्ति धारण करून, आमच्या सर्व व्यवहारोपयुक्त वस्तूंचा त्याग करून, समाजांत कालपरिस्थितीनें होणारें मालिन्य नाहींसें करण्याकरितांच बसले आहेत. त्यांना पक्षपात करण्याचें कारण नाहीं. अपेक्षित धार्मिक हक्क, नवीन कालांतील शिष्यांनाहि येणाऱ्या धार्मिक अडचणींचें दूरीकरण, या सर्व गोष्टी जशा

शास्त्रीय परिस्थितीनें शक्य असतील तशी वेळोवेळीं या विषयांची मागणी संघशः केली पाहिजे. जर मागणीच नाहीं तर त्यांनीं मठांत बसून नुसतीं आज्ञापत्रें काढून उपयोग काय? समाजाच्या गरजा विद्वानांपुढें समाजानें आणाव्या, त्यांचा विचार विद्वान् शिष्टांनीं करावा, साधकबाधक प्रमाणांची एकवाक्यता करून त्या श्रींकडे पाठवाव्या, श्रींनीं पुनः "अलुब्धधर्मकाम" विद्वान् सामाजिकांची त्या प्रकरणीं योजना करावी व त्यांनीं केलेल्या निर्णयाचा निर्विकार चित्तानें निकाल द्यावा. परस्परांची गरज परस्परांना आहेच व असें केल्यानें ती वाढत्या प्रमाणांत राहील याबद्दल आम्हांस मुळींच संशय वाटत नाहीं.

शंकराचार्यांच्या पीठाचा उपयोग जनतेस दोन प्रकारांनीं आहे—(१) संसारविरक्त लोकांकरवीं वेदान्त-ग्रंथांचा अभ्यास करविणें. (२) समाजाच्या धार्मिक, नैतिक, सामाजिक अडचणी ज्या ज्या वेळीं उत्पन्न होतील त्या त्या वेळीं तिऱ्हाईत इतकेंच नव्हे तर अधिकारी धर्मगुरु म्हणून त्या दूर करणें. याकरितांच जगद्गुरु संन्यासी असावा असा मठसंप्रदाय आहे. त्या संप्रदायाला अनुसरून श्रींकडून व्यवस्था झाली तर जनता जी प्रसंगविशेषीं स्वकर्तव्यपराङ्मुख होते ती होणार नाहीं. समाज व आचार्य हे एकमतानें परस्परांची कार्यक्षेत्रता ओळखून वागल्यास आजच्या या प्रसंगासारखे सुप्रसंग पुष्कळ येतील व "परस्परं भावयन्तः श्रेयः परमवाप्स्यथ" असें होऊन उभयतांसहि हितकारक होईल.

असो. वरील सर्व भाषण मीं केवळ प्रास्ताविक म्हणून केलेलें आहे आणि तेंहि मजपुढें आलेल्या कागदपत्रांच्या आधारावरच केलेलें आहे. त्यांत जी चूकभूल असेल ती कोणीं माझ्या नजरेस आणून दिल्यास तिचा स्वीकार करण्यास मी सिद्ध आहे. शिवाय ही गोष्ट माझ्या लक्षांत आहे कीं, मी या ठिकाणीं आलों तो केवळ या सभेचा नियोजित अध्यक्ष याच नात्यानें आलेलों आहे, प्रस्तुत प्रकरणीं अधिकृत न्यायाधीश म्हणून नव्हे. या प्रकरणीं न्यायाधिशाचा अधिकार व न्यायनिर्णय प्रत्यक्ष व्यवहारांत आणण्याचा अधिकार इकडील जनतेचाच आहे. तो अधिकार बजावण्याकरितांच आजची ही सभा भरविण्यांत आलेली आहे. तींत साधकबाधक विचारांची चर्चा कोणास करावयाची असल्यास त्याला संधि अवश्य मिळेल. शेवटीं विद्वान् शास्त्रीपंडितांची

मतें आणि सभेंतील वक्त्यांचीं भाषणें ऐकून ही सभा जो निर्णय देईल किंवा जो ठराव करील त्याप्रमाणें या प्रकरणीं इकडील जनतेचें मत आहे असें समजण्यांत येईल. श्रीशंकराचार्य हे फक्त सत्स्फूर्ति व आशीर्वाद देऊं शकतील. विद्वान् शास्त्रीपंडित हे शास्त्रार्थ सांगू शकतील. माझ्यासारखा एकादा त्रयस्थ मनुष्य लौकिक दृष्ट्या ग्राह्याग्राह्य काय हें सांगू शकेल. तथापि कोणतीही गोष्ट जनतेला ग्राह्य वाटून मनाला पटेल तरच ती अमलांत येऊं शकेल. इंग्रजींत अशी एक म्हण आहे कीं, " तुम्हाला घोड्याला पाणवठ्यावर नेतां येईल, पण पाणी पिणें न पिणें हें स्वतः घोड्यानेंच केलें पाहिजे. " या म्हणीप्रमाणें प्रस्तुत प्रकरणीं न्याय्य व समाजहितसाधक अशी जी गोष्ट असेल ती ही सभाच ठरवील, व या सभेला ज्या जनतेचे प्रतिनिधी आले आहेत तीच पार पाडील. इतकें बोलून यापुढें आतां सभेच्या रीतसर कामास प्रारंभ व्हावा असें मी सुचवितों.

---

# १२. हिंदुसंघटनेची आवश्यकता

( केसरी १९२४ )

गेल्या आठवड्यांत पुण्यास स्वामी श्रद्धानंद, पं. मालवीय, व डॉ. मुंजे यांचीं ' हिंदुसंघटन ' या विषयावर व्याख्यानें झालीं. या महत्त्वाच्या विषयावर या परप्रांतीय पुढाऱ्यांचे ताजे विचार पुण्यांतील हिंदुसमाजास ऐकावयास सांपडले याबद्दल येथील हिंदुसभेच्या चालकांचे आभार मानले पाहिजेत. खुद्द पुण्यांतील पुढाऱ्यांचे विचारांत व या त्रिवर्गांच्या विचारांत बिलकुल फरक नाहीं, ही गोष्ट डॉ. मुंजे यांच्या व्याख्यानाचे दिवशीं अध्यक्ष या नात्यानें श्री. केळकर यांनीं जें सविस्तर व सोपपत्तिक भाषण केलें त्यावरून दिसून आलीच आहे. तसेंच जी गोष्ट महाराष्ट्राची तीच इतर हरएक प्रांतांतील हिंदु पुढाऱ्यांची आज आहे असें आम्ही खात्रीपूर्वक सांगू शकतों, आणि तसें होणें अपरिहार्यहि आहे. प्रत्येक प्रांतांतील हिंदु-मुसलमान समाजांची लोकसंख्या वेगवेगळी असेल, किंवा हिंदु-मुसलमानांत होणाऱ्या प्रत्यक्ष मारामाऱ्यांसंबंधानें एक प्रांत दुसऱ्या प्रांतापेक्षां अधिक दुःखी असेल; तथापि मुसलमानांचा स्वभाव व हिंदु समाजाचा विस्कळितपणा या गोष्टी मात्र सर्व प्रांतांत सार-

ख्याच आहेत. तसेंच राजकीय दृष्ट्या कायदेकौन्सिलें, स्थानिक स्वराज्यसंस्था व सरकारी नोकऱ्या यांविषयीं मुसलमानांच्या आकांक्षा व हिंदुसमाजाच्या हित-संरक्षणाची जरूरी याहि गोष्टी सर्व प्रांतांत एकाच स्वरूपाच्या आहेत हें कोणासहि कबूल केलें पाहिजे.

मुसलमानांचा स्वभाव त्यांच्या धर्ममतांच्या वैशिष्टयामुळें तसा बनलेला असो, किंवा परदेशांतील मुसलमानानी राष्ट्रांच्या वैभवदर्शनामुळें ते शेफारलेले असोत, किंवा हिंदु समाजाच्या खालोखाल संख्याबल आपलेंच आहे म्हणून त्याची बरोबरी करण्याचा हाव त्यांना उत्पन्न झालेली असो; एक चमत्कार हटकून घडतो तो हा कीं, परस्पर विरुद्ध अशा परिस्थितींतही त्यांचें आचरण एकच प्रकारचें म्हणजे चढेलपणाचें घडलेलें दिसून येतें. कोहाट येथें मुसल-मानांची लोकसंख्या हिंदूपेक्षां दसपट अधिक आहे; शिवाय तो प्रांत सरहद्दीला लागून आहे; यामुळें तेथील मुसलमानांना हिंदूंची भीति वाटण्याचे कारण नाहीं; आणि मनुष्य निर्भय असला म्हणजे प्रतिपक्षाशीं वागण्यांत तो सहजच थोडा उदार किंवा सढळ हाताचा असतो, निदान त्यानें तसें असावें. पण कोहाट येथें काय प्रकार घडला हें प्रसिद्धच आहे. याच्या उलट नागपूर शहरां-तील प्रकार डॉ. मुंजे यांनीं आपल्या तोंडानें सांगितला. नागपुरास मुसल-मानांच्या पांचसहापट हिंदू आहेत, तरी तेथेंहि धाक हिंदूंनाच ! काश्मीरमध्यें राजा हिंदू पण प्रजा मुख्यतः मुसलमान म्हणून तेथें लोकसत्तावादाच्या आधारावर राजाविरुद्ध गवगवा; आणि दक्षिण हैद्राबाद राज्यांत मुसलमान प्रजेपेक्षां हिंदुप्रजा दसपट पण राजा मुसलमान म्हणून तेथें ' ना विष्णुः पृथिवीपतिः ' या तत्त्वावर निजामसरकाराच्या वागणुकीचें समर्थन ! तात्पर्य, मुसलमानांनीं चढेलपणानें वागावयाचें हें ठरवलेलेंच आहे, व या वर्तनाला कारण जेथें जें मिळेल तेंच त्यांना पुरतें. किंबहुना मद्यप्राशकाप्रमाणेंच त्यांचा युक्तिवाद दुहेरी व सोईचा असतो. आनंदाच्या वेळीं आनंद वाढविण्याकरितां दारू आणि दुःखाच्या वेळीं दुःखाचा विसर पडण्याकरितांहि दारूच ! जेथें मुसलमान संख्येनें अधिक तेथें ते अधिक म्हणून हक्कानें, आणि जेथें ते संख्येनें कमी तेथें ते दुबळे म्हणून दयाबुद्धीनें,—मिळून काय, सर्वत्र त्यांना त्यांच्या हिताच्या दृष्टीनें व लहरीनें वागूं दिलें पाहिजे अशी आज हिंदुस्थानभर स्थिति उत्पन्न झाली आहे !

धार्मिक बाबतींत हा दुहेरी युक्तिवाद कसा सफळ होतो हें दिल्ली येथील ऐक्यपरिषदेंत अनुभवाला आलेंच आहे. कारण या परिषदेंत जे दुतर्फी म्हणून ठराव झाले त्यांत गाई मारण्याच्या मुसलमानांच्या स्वाभाविक कायदेशीर हक्काचा स्पष्ट नामनिर्देश करण्यांत आला; परंतु रस्त्यांतून वाद्यें वाजवीत मिरवणुकी नेण्याच्या हिंदूंच्या हक्कांचा मात्र उल्लेख वगळला गेला. हक्क किंवा सवलत कोणतेंहि नांव दिलें तरी देवाण—घेवाण सारख्या प्रमाणावरच झाली पाहिजे. गुलबर्गा येथील मुसलमानांनीं देवळें जाळल्यापोळल्याबद्दल निषेध करण्याचा प्रश्न ऐक्यपरिषदेंत निघाला तेव्हां कोठल्याशा एका गांवीं कोठल्याशा एका मशिदीच्या बांधकामाला म्युनिसिपालिटीच्या नियमांनीं हरकत आली तिचाहि निषेध करावा अशी मागणी एका विद्वान् मौलवींनीं केली! आपल्या बाजूच्या दुसऱ्या तर्फेची तार फक्त इतकी सूक्ष्मपणें ढिली असली तरी ऐक्यपरिषदेचें गाणें बेसूर होतें असें म्हणून ती तार खेंचण्याला मुसलमान मौलवी प्रवृत्त होतात, आणि गोवधाच्या हक्कनोंदणी-बरोबर वाद्यवादनाच्या हक्कनोंदणीचा प्रश्न कोणीं काढला तर "जाऊं दे कीं, स्पष्ट शब्दच नसले म्हणून हक्क कोठें पळून जातो कीं काय?" असा उदार युक्तिवाद हिंदु पंडित करतात. यावरून न्यायबुद्धीप्रमाणेंच गाफिलगिरीचा कांटा कोणत्या बाजूस किती ढळतो आहे याचें अनुमान वाचकांस सहज करतां येईल.

पण धर्माच्या बाबतींतलें हिंदू-मुसलमानांचें ऐक्य जसें कांहीं तरी भलेंबुरें कागदावर चितारण्यांत आलें तसेंच इतर बाबतींतहि तें करण्याची जरूरी हल्लीं उपस्थित झाली आहे. हिंदू-मुसलमानांच्या तंट्याचें बीज नुसत्या धार्मिक बाबतींतच नाहीं तर प्रातिनिधिक संस्थांतील हक्कदारीच्या जागा व सरकारी नोकऱ्या यांतहि आहे ही गोष्ट ऐक्यपरिषदेच्याच वेळीं उघडकीस आली होती. कारण त्याचे आधीं कांहीं दिवस असेंब्लींतील मुसलमानांनीं आपला एक वेगळा संघ बनविला होता, व आपल्या मागण्या पुढें मांडण्याकरितां स्वतःचे पंच नेमून हिंदूंना आपले पंच नेमण्याविषयीं आव्हान करण्यांत आलें होतें. त्याप्रमाणें हिंदु सभासदांनींहि आपले पंच नेमलेले आहेत. या उभयपंचांची 'पंचायत' लवकर दिल्लीस भरून चर्चा होईलच. पण दरम्यान मुसलमानांनीं आपले हक्क उजळा देऊन पुनः एकवार साफ केले आहेत व ते मानले जावेत असा हिंदूंना त्यांचा आग्रह सुरू आहे. बंगाल्यांत दास यांनीं

आपल्यापुरता मुसलमानांशीं तह केला म्हणूनच बंगाल–कौन्सिलांतील स्वराज्य पक्षाची पहिली कुस्ती यशस्वी झाली. तो तह इतका सढळपणाचा आहे कीं, इतर प्रांतांतील हिंदू पुढारी दासबाबूंना त्याबद्दल नांवेंहि ठेवीत आहेत. तथापि यापुढें होणाऱ्या कुस्त्यांत स्वराज्य पक्षाला मिळावयाची मुसलमान सभासदांची मदत कितपत टिकेल याविषयीं धागधूगच वाटूं लागली आहे. इकडे बेळगांव येथें खिलाफत परिषदेचे अध्यक्ष डॉ. किश्लू यांनीं आपल्या जातीबांधवांची मागणी मुसलमानांच्या नित्य परिचयाच्या सौम्य शब्दांनीं जाहीर केली आहे ! ‘ लखनौ येथें झालेला हिंदू-मुसलमानांचा तह जाळून टाकला पाहिजे ’ असें त्यांचे ठांशीव शब्द प्रसिद्ध झाले आहेत. वास्तविक तो तह जाळून टाकण्याइतका मुळांत वाईट नाहीं; व त्यांत दुरुस्ती हवीच असेल तर मोजक्या शब्दांनीं त्याविषयीं फेरविचाराची मागणी केल्यास हिंदूंना राग येण्याचें कारण नाहीं. जो योग्य विचार तो ते करतीलच पण तहनाम्यांत दुरुस्ती करा असें म्हणण्याऐवजीं तहनामा जाळून टाका असें शब्द बोलण्यांत येतात हें आम्ही वर दर्शविलेल्या मुसलमानांच्या चेंढेलपणा-चेंच दर्शक नव्हे काय ?

असो. लखनौचा तह म्हणजे थोडक्यांत तो असा आहे—( १ ) नव्या कायदेकौन्सिलांतून अल्पसंख्यांक लोकांना आपले प्रतिनिधी हटकून निवडून देतां येतील अशी योजना व्हावी. ( २ ) मुसलमानांचे वेगळे मतदारसंघ प्रांतिक कायदेकौन्सिलापुरतें असावेत. ( ३ ) मुसलमानांना वेगळे मतदारसंघ दिल्यास त्यांनीं त्याच मतदारसंघांकडून निवडून यावें. इतर निवडणुकीस उभे राहाण्याचा त्यांस दुहेरी हक्क असूं नये. (४) प्रांतानिहाय मुसलमान सभासदांचें प्रमाण एकंदर लोकनियुक्त हिंदी सभासदांच्या संख्येंत पुढीलप्रमाणें असावें:— पंजाब ५० टक्के, संयुक्त प्रांत ३०, बंगाल ४०, बिहार २५, नागपूर प्रांत १५, मद्रास १५, व मुंबई ३३. ( ५ ) कोणत्याहि एखाद्या कौन्सिलांत धार्मिक स्वरूपाचा असा प्रश्न निघाल्यास कोणत्याहि विशिष्ट धर्माच्या कौन्सिल सभासदांपैकीं $\frac{3}{4}$ इतके लोक प्रतिकूल असल्यास तो प्रश्न विचारांत घेतला जाऊं नये.

वरील तहनाम्यांत त्यावेळच्या लोकसंख्येच्या मानानें पंजाब व बंगाल यांना निम्म्यापेक्षां थोडे अधिक सभासद लोकसंख्येच्या दृष्टीनें मिळण्यासारखे होते.

पण त्यांना तेथें फक्त ५० व ४० टक्के सभासद देण्यांत आले. परंतु इतर बहुतेक प्रांतांत त्याचा मोबदला मुसलमानांना भरपूर देण्यांत आला होता, व सर्व प्रांत एकत्र लक्षांत घेतां मुसलमानांना यथाप्रमाणाहून अधिक सभासद मिळाले होते. असें असतांहि जर या तहाची दुरुस्ती व्हावी असा मुसलमानांचा आग्रह असेल व ती केल्यानें त्यांचें समाधान होणारें असेल, तर तसें करण्यास हिंदू हरकत घेतील असें आम्हांस वाटत नाहीं. पण असेंब्लींत खुद्द जिनांसारखे नेमस्त विचाराचे मुसलमान पुढारी असें म्हणूं लागले होते (आणि अजूनहि त्यांचें तें म्हणणें कायम आहे असें वाटतें ) कीं, पंजाब व बंगाल यांत मुसलमानांना बरोबर लोकसंख्येच्या प्रमाणानें कौन्सिल–समासद मिळालेच पाहिजेत; पण ज्या इतर प्रांतांत त्यांना लोकसंख्येच्या प्रमाणाहून अधिक प्रतिनिधी देण्यांत आले आहेत, तेहि तसेच पुढें टिकले पाहिजेत ! अर्थात् दोन वेगवेगळ्या व केवळ मुसलमानांच्या सोयीच्या तत्त्वांचा अवलंब करून मुसलमानांची मागणी पुरी करावी असें जिना यांचें म्हणणें आहे ! पण कोणता समंजस किंवा स्वाभिमानी मनुष्य हें म्हणणें कबूल करील ? आधीं लखनौच्या तहांत मुसलमानांना जें थोडें दिलें तेंच प्रमाणाबाहेर, केवळ मोहबतीकरितां व दिलजमाईकरितां दिलें. हा तहनामा घडवून आणण्यांत लो. टिळक यांनीं बराच पुढाकार घेतला होता, व या प्रमाणबाह्य देणगीला त्यांनीं जाणून-बुजून संमति दिली होती. या विषयाच्या ठरावावर लखनौ येथें भाषण करतांना टिळकांनीं या गोष्टीचा उल्लेख केला होता. ते म्हणाले " हिंदूंनीं या तहनाम्यांत फाजील घस सोसली असें कित्येक लोकांना वाटत आहे व तें खरेंहि आहे. परंतु नोकरशाहीशीं आपणाला भांडावयाचें व तिच्या हातून अधिकार हिसकावून घ्यावयाचे आहेत; त्याअर्थीं सर्व स्वराज्याचे हक्क कोणत्याहि एका जातीला किंवा नुसत्या मुसलमानांनाच दिले तरीहि मी म्हणेन, ठीक आहे द्या पण हे अधिकार नोकरशाहीच्या हातून एकदांचे बाहेर निघोत म्हणजे मिळविली ! जातवार हक्काबद्दल भांडावयाचें तर आपण पुढें भांडूं; आज मुसलमानांना झुकत्या कांट्याचें माप दिलें तरी फिकीर नाहीं. " हें झुकतें माप मुसलमानांना मिळवून देणारे बॅ. जिना यांचें वर्णन कै. गोखल्यांच्या शब्दांनीं The best ambassador of the Hindu Moslem Unity म्हणजे हिंदु-मुसलमानी ऐक्याचा उत्कृष्ट वकील असें श्री. सरोजिनी नायडू

यांनीं लखनौच्या राष्ट्रीय सभेंतच केलें. लो. टिळकांच्या बोलण्याचा खरा आशय उघडच आहे. आणि म. गांधी हे देखील हल्लीं म्हणतात कीं, मुसलमान काय मागतील तें द्या, पण एकी बिघडवूं नका. यांतील मर्महि तेंच होय. परंतु आतां खुद्द जिना यांनींच या तहाला हरताळ फांसण्यास पुढें यावें हें कशाचें लक्षण बरें ? त्यांच्यासारख्या समतोल बुद्धीच्या वकिलालाहि पछाडण्याइतका मुसलमानांचा चढेलपणा गेल्या सात आठ वर्षांत वाढला इतकाच त्याचा अर्थ. साधेल तेथें संख्याबलाच्या जोरावर व न साधेल तेथें अल्पसंख्यांकांच्या लाडावर, असें जिनांचें हें दुहेरी माप आहे. लहान मुलांना भरवितांना आपण त्याला फसवून म्हणतों कीं, 'नको असेल तो घास आधीं खा व हवा असेल तो घास मागाहून खा' व अशा रीतीनें त्याला दोनहि घांस खावयास लावितों. त्याचप्रमाणें हिस्सेरशीचा अन्याय हिंदूंच्या गळीं कोणीकडून तरी उतरविण्याचा हा जिना यांचा प्रयत्न आहे. पण ही गोष्ट कबूल करण्याइतका हिंदु समाज भोळा असेल असें आम्हास वाटत नाहीं.

कसेंहि असो, वरील एका गोष्टीवरून मुसलमानांचा चढेलपणा व्यक्त झाला तरी ज्या समाजसंघटनेच्या जोरावर त्यांना हा पोरखेळ नाचवितां येतो त्या संघटनेची कल्पना तरी खचित हिंदूंना अनुकरणीय आहे. मग आपल्या सनातन दाक्षिण्याला अनुसरून ते चढेलपणा न स्वीकारोत पण संघटनेच्या नांवानें हिंदुसमाजांत आवळ्याएवढें पूज्य आहे हें किती थोड्या लोकांच्या लक्षांत येत असेल ? बहुतेक सर्व लोक शुद्ध पोकळ भ्रमावर तरंगत आहेत. एकीकडे मुसलमानांत खिलाफतीसारख्या धर्मविषयक संस्था निर्माण होत आहेत व मुस्लीमलीगसारख्या जुन्या राजकीय संस्थांचें पुनरुज्जीवन होत आहे आणि दुसरीकडे पहावें तों हिंदु-महासभेला कोणी विचारीतहि नाहीं. राष्ट्रीय सभेंत हिंदु लोक अधिक म्हणून मुसलमान लोक तिला हिंदूंची राष्ट्रीय सभा म्हणतात. आणि राष्ट्रीय सभा तर कांहीं वेगळ्याच लहरींत असून, हिंदु व मुसलमान यांच्या दरम्यान पूर्वीप्रमाणें निदान मध्यस्थ या नात्यानें वागण्याचेंहि टाकून देऊन तिनें घातुक वैराग्यवृत्ति स्वीकारली आहे. म्हणजे कौन्सिलांविषयींच जेथें बेफिकीर किंवा निंदाव्यंजक वृत्ति तेथें कौन्सिलांत कोणत्या जातीचे किती प्रतिनिधि असावेत याचा विचारच बोलावयास नको. मुळीं वांग्यांची भाजीच चातु-र्मास्यांत निषिद्ध म्हटल्यावर तींत तिखट, मीठ किंवा मसाला यांचें प्रमाण

काय असावें याची वायफळ चर्चा कोण करणार? तात्पर्य, अशा रीतीनें हिंदु समाजातर्फे म्हणून बोलण्याला खास त्याचा वकील किंवा निदान निःपक्षपाती त्रयस्थ असा कोणी उरला नाहीं, ही गोष्ट शोचनीय होय! हिंदु समाज केवळ संख्येनें मोठा म्हणून त्या श्रीमंतीचे तोटे त्यानें आणखी किती दिवस सोसावयाचे! आपल्यांतील लोक खिस्त्यांनीं किंवा मुसलमानांनीं बाटविले, बाटवूं देत. अस्पृश्य बंड करण्यास उठले, उठूं देत. शीख, जैन, यांना सवते सुभे स्थापण्यास उत्तेजन देण्यांत येऊं लागलें, लागूं दे. अशा रीतीनें चालढकल करून हिंदु समाजानें आजवर आपलें नुकसान करून घेतलेंच आहे. परंतु उरलेल्या हिंदु समाजाची तरी प्रतियोगी स्वरूपाची मागणी काय आहे हें एकमुखानें सांगण्याला देखील त्याला कांहीं साधन किंवा संघटना उरूं नये हें केवढें आश्चर्य! घराला आग लागली आणि जळते वासे आंगावर पडूं लागले तरीहि हिंदु समाज निद्रावश होऊन तोंडावर पांघरूण घेतच राहणार कीं काय?

पण सुदैवानें ही स्थिति बदलण्याचीं चिन्हें किंचित् दिसूं लागलीं आहेत. बेळगांव येथें हिंदुसभेच्या अधिवेशनप्रसंगीं धर्मसभेंत एकप्रकारचें राजकीय खातें उत्पन्न करून धर्म व राजकारण यांच्या संमिश्र प्रश्नावर हिंदु समाजातर्फे आपलें म्हणणें तयार करून मांडण्याकरितां एक कमिटी नेमण्यांत आली आहे; व तिचें चालकत्व लाला लजपतराय यांनीं आपणाकडे मोठ्या हौसेनें घेतलें आहे. तरी ठिकठिकाणच्या सर्व हिंदु पुढाऱ्यांना आमची अशी विनंती आहे कीं, त्यांनीं कायदेकौन्सिलें व स्थानिक स्वराज्यसंस्था यांत हिंदु, मुसलमान व इतर जाती यांचें प्रमाण कसें असावें, मतदारसंघांची योजना कशी करावी वगैरे गोष्टींची खासगी व जाहीर चर्चा करून आपलें म्हणणें लाला लजपतराय यांना होईल तितकें लवकर कळवावें. येत्या एप्रिलमध्यें हिंदु—महासभेचें अधिवेशन कलकत्ता येथें भरण्याचें ठरलें आहे व दरम्यानचे दोनतीन महिने लालाजी हे हिंदुस्थानाच्या निरनिराळ्या प्रांतांतून हिंदु समाजाचें मत समजावून घेण्यासाठीं दौरा काढणार आहेत असेंहि समजतें. तरी त्यांजकडून विचारणा झाली किंवा न झाली तरी ठिकठिकाणच्या पुढाऱ्यांनीं आपापलीं मतें त्यांना कळविण्याला विलंब करूं नये. तसें न झाल्यास कलकत्ता येथील हिंदु-महासभेपुढें हा प्रश्न चर्चेला निघून हिंदु समाजाची म्हणून एकादी एकमुखी

कैफीयत मुसलमानांच्या व सरकारच्या हातीं देण्याला सोयीचें होईल. हिंदु समाजाच्या संघटनेंतील हा प्रसंग नैमित्तिक होय व त्याचें विधान वर सांगितलेंच आहे. तथापि नित्याचें म्हणून संघटनेचें कार्य शिल्लकच असून तें करावें तितकें थोडेंच होणार. दिल्ली येथील ऐक्य परिषदेनेंहि शुद्धि व संघटन या चालू राहण्यास आपल्या ठरावांनीं एकप्रकारें संमतीच दिली आहे. म्हणून या चळवळींना मामुली हरकतहि येण्यासारखी नाहीं. पण कोणाची हरकत असो वा नसो, कोणत्याहि समाजाला स्वतःचें संघटन करण्याचा नैसर्गिक हक्कच आहे. हिंदु समाज तो हक्क यापुढें न बजावील तर त्याच्यापुढें मूर्तिमंत मृत्यु ठेवलेला आहे असें त्यानें खात्रीनें समजावें.

---

# ९३. डॉ. मुंजे यांस कांहीं सूचना

( केसरी, १९२७. )

अखिल भारतीय हिंदुमहासभेचे अध्यक्ष डॉ. बा. शि. मुंजे यांनीं पंजाब, संयुक्तप्रांत, बंगाल व गुजराथ या प्रांतांत हिंदुसभा व शुद्धिसंघटन यांच्या प्रचारार्थ यशस्वी रीतीनें दौरा केला व ता. १६ पासून महाराष्ट्रांत ते दौरा करणार आहेत. त्याचा कार्यक्रम आजच्या अंकांत दुसरीकडे दिला आहे. हिंदुसमाजाच्या उन्नतीकरितां डॉ. मुंजे यांनीं धैर्यानें अनेक संकटांना तोंड देऊन जे प्रयत्न चालविले आहेत, त्याबद्दल महाराष्ट्रीयांना अभिमान वाटत असून, महाराष्ट्रांतील दौऱ्यांत त्यांचा ठिकठिकाणीं योग्य सन्मान करून त्यांच्या कार्यास सहानुभूति दाखविली जाईल हें सांगणें नकोच. या दौऱ्याच्या बाबतींत आम्हांस स्नेहभावानें डॉक्टरसाहेबांस कांहीं सूचना प्रारंभींच करून ठेवाव्याशा वाटतात, त्या पुढें देत आहोंत व त्यांचा सार्वजनिक कार्याच्या दृष्टीनेंच ते विचार करतील असा आम्हांस भरंवसा आहे.

डॉ० मुंजे हे गुजराथेंतील दौरा आटोपून मुंबईस आल्यावर त्यांचें ब्राह्मण-सभेंत एक व्याख्यान झालें आणि आमच्या बातमीदारानें त्यांची मुलाखतहि घेतली. या दोहोंतहि त्यांनीं जे विचार प्रकट केले त्यावरून त्यांना कांहीं सूचना कराव्याशा वाटत असल्यामुळें त्या करीत आहों. व्याख्यानांतून व मुलाखतींतून जीं मतें डॉ. मुंजे यांनीं प्रतिपादन केलीं त्यावरून दोन

कल्पनांनीं डॉ. मुंजे यांच्या मेंदूंत कायमचें ठाणें दिल्याप्रमाणें दिसतें. त्यांतली पहिली कल्पना ही कीं, हिंदु हे सर्वत्र दुबळे, भित्रे व स्वधर्माविषयीं उदास आहेत आणि त्या कल्पनेच्याच अनुषंगानें आलेली दुसरी कल्पना अशी कीं, आपला निवृत्तिपर वेदान्त, निर्मांसभोजन, बालविवाह यांचा हिंदु लोकांवर असा अनिष्ट परिणाम झाला आहे. या दुसऱ्या मुद्यावर मुंबईस ब्राह्मणसभेंत त्या दिवशींचे अध्यक्ष न. चिं. केळकर यांनीं उत्तर दिलेंच होतें. तथापि त्याचा सविस्तर विचार करण्याचें आम्हीं योजिलें आहे. डॉ. मुंजे यांच्या या दोनहि कलमांतून सत्याचा अंश फार थोडा आहे. हिंदु हा दुबळा आणि स्वधर्माविषयीं उदास आहे यांत संशय नाहीं. पण तो भित्रा आहे कीं काय याविषयीं शंका आहे. आणि हिंदूंच्या दुर्बलतेचीं जीं कारणें म्हणून डॉक्टरसाहेबांनीं सांगितलीं आहेत त्यांतलीं निवृत्तिपर वेदान्त आणि बालविवाह हींहि कांहींशीं वादग्रस्तच असलीं तरी निदान निवृत्तमांसत्व हें आजच्या हिंदूंच्या दुर्बलतेचें कारण आहे कीं काय याविषयीं पुष्कळांसच संशय वाटत आहे.

या दुहेरी शंकेंतून प्रथम ‘ भित्रे ’ पणाच्या आरोपाची चिकित्सा करूं. आजमितीला हिंदु लोक दुबळे झाले आहेत आणि ते स्वधर्माविषयीं उदासीनहि आहेत. पण त्याला अनेक कारणें आहेत. तथापि भित्रेपणा हें त्याचें कारण खास नव्हे. दुबळेपणा अगर उदासीनपणा हा नैसर्गिक स्वभाव नसून तें कार्य आहे आणि कार्य हें कारणावर अवलंबून असल्यानें कारण दूर होतांच कार्यहि नाहींसें होतें. हिंदु समाज आज दुबळा व उदासीन असण्याचें कारण त्यांतील विघटना हेंच होय आणि त्यावर उपाय म्हणूनच शुद्धि–संघटनेची चळवळ चालू आहे. पण हिंदु समाज हा भित्रा आहे असें जें डॉक्टर साहेबांचें मत झालें आहे तें खरें असल्यास तें मोठेंच चिंताजनक मानलें पाहिजे, कां तर ‘भित्रेपणा’ हा स्वभावसिद्ध दोष असल्यानें ‘ स्वभावो दुरतिक्रमः ’ या न्यायानें हा दोष घालविणें दुरापास्त ठरेल आणि निदान संघटनेसारख्या बाह्योपचारानें तरी तो नाहींसा होणार नाहीं. पण डॉक्टरसाहेबांची ही मीमांसाच बरोबर नाहीं असें आम्हांस वाटतें. जेथें तेथें हिंदु लोक सरकारापुढें किंवा मुसलमानांपुढें हार खातात यावरून हिंदु हे जात्याच भीरु आहेत असें डॉक्टरसाहेबांनीं ठरविलेलें दिसतें. पण हें अनुमान यथार्थ नाहीं.

भित्रा मनुष्य हा कायमचाच भित्रा असतो. त्याचा स्वभाव आज भित्रा, उद्यां शूर, परवां पुनः भित्रा असा रोजच्यारोज झटपट पालटूं शकत नाहीं. अर्थातच ज्यांच्या हातून केव्हांना केव्हां तरी शौर्याचें, धाडसाचें, धीरोदात्तपणाचें कृत्य झालें असेल तो भीरु मानतांच येत नाहीं; आणि हिंदु समाजानें आपल्या अंगचे हे गुण केव्हांच दर्शविले नाहींत असें स्वतः डॉ. मुंजे हेहि म्हणूं शकणार नाहींत.

डॉक्टरसाहेबांनीं हिंदूंच्या कपाळावर मारलेला भीरुत्वाचा शिक्का जितका अन्यायमूलक आहे तितकाच त्याच्या प्रतियोगित्वानें मुसलमानांना मिळालेला शूरत्वाचा छापहि खोटा आहे. मुसलमान लोक हिंदूंना अडवितात, त्यांच्याशीं दंडेली करतात, अत्याचारहि करतात ह्या सर्व गोष्टी खऱ्या असल्या तरी त्या मुसलमानांच्या शौर्याच्या निदर्शक नव्हेत. आपणास कोणी दडपता नाहीं, आपण करूं ती पूर्व दिशा, हिंदूसमाजाकडून प्रतिकार होत नाहीं आणि सरकार डोळे उघडीत नाहीं अशी जोंपर्यंत मुसलमानांना खात्री वाटते तोंपर्यंत त्यांचे हे चाळे चालतात. त्यांनाहि दटावणारा भेटला कीं त्यांचे हातपाय लटपटतात आणि त्यांची दंडेली आपोआप नाहींशी होते; मग तो दटावणारा हिंदु असो अथवा युरोपिअन असो. प्रतिकार करणारा भेटला तरी सुद्धां वाटेल ती आपत्ति सोसून स्वकर्तव्य चालूच ठेवावयाचें ही धैर्याची खरी कसोटी होय. तिला हिंदु लोक जितके उतरतात तितके मुसलमान उतरत नाहींत. मुसलमानांच्या प्रत्येक दंग्याच्या बुडाशीं आपल्यावर कांहीं घोरपड ओढवणार नाहीं, ओढवलीच तर आपण तींतून सहज निसटून जाऊं ही भावना असते. उघड्या डोळ्यांनीं संकटाच्या वणव्यांत उडी घ्यावी हिंदूंनींच. अशा वृत्तीचे मुसलमान आजवर फार थोडेच आढळले आहेत. आणि यामुळेंच पराकाष्ठेच्या राजकीय चळवळींत मुसलमानांचें नांव क्वचितच आढळून येतें. सहा वर्षांपूर्वी असहकारितेच्या भरांत ३०।४० हजार देशभक्त तुरुंगांत गेले. त्यांत मुसलमानांचें प्रमाण किती होतें तें पाहिल्यास किंवा आजवरचा राजकारणाचा इतिहास पाहिल्यास शूर कोण आणि भित्रा कोण याचा आपोआपच निर्णय लागतो. मुसलमानांच्या वर्णनांत क्रौर्य दिसतें; पण क्रौर्य म्हणजे शौर्य नव्हे. अत्यंत क्रूर मनुष्यहि भित्रा असूं शकतो आणि अत्यंत सहिष्णु मनुष्यहि शूर असूं शकतो.

मुसलमानांचें क्रौर्य हेंच शौर्य मानलें गेल्यानें त्यावरूनच डॉ. मुंजे यांनीं त्याच्याशीं मांसाशनाचा जो संबंध जोडला आहे तोहि या विचारसरणीनें निराधार ठरतो. मांसाशनानें क्रौर्य अंगीं येऊं शकेल, पण खरें शौर्य कांहीं मांसाशनावर अवलंबून नाहीं. किंबहुना शारीरिक शक्ति व शौर्य यांच्यांत सम अगर व्यस्त असें कोणतेंच प्रमाण बसवितां येत नाहीं. कारण शौर्य हा मनाचा धर्म असून तो शारीरिक बलावर अवलंबून नसतो. धैर्य जर मनगटाच्या दणगटपणावर अवलंबून असतें तर अबलांच्या हातून केव्हांच धैर्याचीं, शौर्याचीं व धाडसाचीं कार्यें घडून आलीं नसतीं. पण इतिहासपुराणांत तर पुरुषांच्या बरोबरीनें किंबहुना पुरुषांहून अधिकत्वानें स्त्रियांचीं नांवें धैर्य-शौर्यादि गुणांनीं अजरामर होऊन बसलीं आहेत. अर्थातच धैर्य जर शारीरिक ताकदीवर अवलंबून नाहीं तर मग मांसाशनानें धैर्य येतें आणि निवृत्त-मांसत्वानें हिंदू भित्रे झाले ही अनुमानपरंपरा खरी कशी ठरणार! मनाच्या गुणाची वृद्धि करण्याला मानसिक खाद्यच पाहिजे त्याला शारीरिक खाद्याचें अनुपान काय कामाचें ?

शारीरिक बल वाढविण्याला तरी मांसाशन जरूरीचें आहे कीं काय हाहि मुद्दा वादग्रस्तच आहे. डॉक्टर लोकांतहि त्यासंबंधानें एकमत नाहीं आणि सृष्टींतहि तसा निर्विवाद अनुभव दृष्टीस पडत नाहीं. मांसाहारी प्राणी क्रूर असतात; पण तें बलिष्ठ असतातच असें नाहीं. हा सर्वसामान्य व तात्त्विक विचार सोडून आजकालच्या हिंदुस्थानांतल्या स्थितीकडेच पाहिलें तरी डॉ. मुंजे यांना त्यांच्या विधानाला कितीसा आधार मिळेल ? हिंदु समाज निवृत्त-मांस म्हणून तो भित्रा असें ठरविण्यापूर्वी असा विचार केला पाहिजे कीं, हिंदूंतले शेंकडा किती लोक निवृत्तमांस आहेत ? आणि जेवढ्यांनीं मांस वर्ज्य केलें तेवढेंच दुबळे झाले आहेत आणि जे मांसावर यथेच्छ ताव मारतात ते मात्र धैर्याचे पुतळे असून त्यांच्यावर मुसलमानांचे अत्याचार सोसण्याचा प्रसंग कधींच आला नाहीं कीं काय ? पारशी समाज हा तर धर्मतः निवृत्तमांस नाहीं ना ? मग तो समाज आजमितीला शारीरिक दृष्ट्या दुबळा आहे का दणगट आहे ? अर्थातच मांसाशनानें अंगांत बळ येतें व धैर्य येतें म्हणून मांसाहार करा असा उपदेश करण्यापूर्वी हिंदुस्थानांतले किती लोक मांसाहारी आहेत व किती लोकांनीं मांस वर्ज्य केलें आहे आणि ज्यांनीं शुद्ध संस्कृतीचें परिणत

स्वरूप म्हणून मांसाशनावर बहिष्कार घातला तेवढ्या लोकांना ती उच्च संस्कृति सोडून पुन: तामसी स्वरूपाचें क्रौर्य उत्पन्न करणारें मांस खा, असा आग्रह करण्यासारखी परिस्थिति आज देशांत आहे कीं काय, याचा डॉक्टरसाहेबांनीं निर्विकारपणें विचार करावा.

डॉक्टरसाहेब हे हिंदू-संघटनेसाठीं दौरा काढीत आहेत. हिंदु समाजांत आज जे शेंकडो तट पडले आहेत त्यांच्यांतलें विघटन नाहींसें करून संघटन करणें हाच हिंदु लोकांना बलिष्ठ करण्याचा उपाय आहे. अशा पवित्र कार्याच्या वेळीं हिंदुधर्मांतील कित्येक जातींच्या मनाला लागणाऱ्या आणि शास्त्रदृष्ट्या वादात्मक अशा भलत्याच विषयाला प्रामुख्य दिल्यानें संघटनेच्या ऐवजीं आणखी जास्त विघटनच होण्याचा संभव आहे. जातिभेद मोडण्यासाठीं घिसाडघाई करून सुधारकांनीं जातींची संख्या वाढविली, त्याप्रमाणें डॉ. मुंजे यांनीं मांसाशनाचा वाद वाढवून हिंदूधर्मीयांतील फूट अधिक वाढविण्याला कारणीभूत होऊं नये. हिंदु समाज आज जो दुबळा दिसतो तो त्याला कोणी त्राताच नाहीं म्हणून तसा झाला आहे. निसर्गतः हिंदु लोक भित्रे नाहींत. त्यांनीं आपल्या अंगचें तेज यापूर्वीं अनेक वेळां दाखविलें आहे; आणि सध्यांच्या राजकारणांतहि ते आपले गुण दाखवतील. मात्र त्यांच्या गुणांचें चीज करण्याइतकी गुणग्राहकता आणि सक्रिय सहानुभूति समाजाच्या पुढाऱ्यांत पाहिजे, अर्थातच हें कार्य संघटनेनें होऊं शकेल. परंतु हिंदु समाजाचे पुढारी जर हिंदु लोक स्वभावतःच भित्रे आहेत आणि सर्वांनीं मांसाशन सुरू केल्याखेरीज त्यांच्यांतला हा भित्रेपणा नाहींसा होणार नाहीं असले अवास्तविक अपसिद्धान्त उराशीं बाळगतील तर हिंदु लोकांतलें निराशेचें वातावरण निवळून आशेचे किरण प्रकाश पावूं लावण्याऐवजीं तें वातावरण अधिकच अंधरकारमय होईल, याचा डॉ. मुंजे यांच्यासारख्या पुढाऱ्यांनीं अवश्य विचार करावा. हिंदुसमाजाला उपदेश करण्यांत डॉ. मुंजे यांचा हेतु चांगला आहे, हें आम्हांस माहीत आहे. पण नुसता हेतु चांगला असून भागत नाहीं. उपाययोजनाहि यथोचित झाली पाहिजे. डॉक्टरसाहेबांची उपाययोजना संशयास्पद असल्यानें त्यांना ही सूचना करावी लागत आहे.

---

# १४. देवालयांची सद्यःस्थिति

( १९३३ सालीं गणपति–उत्सवानिमित्त प्रो. द. वा. पोतदार यांचें “ देवालयांची सद्यःस्थिति ” या विषयावर व्याख्यान झालें; त्यावेळचें अध्यक्षीय भाषण. )

श्री. केळकर आपल्या भाषणांत म्हणाले, “ देवालयांचें वैभव वाढण्याचें मुख्य कारण आपण हिंदु लोक सगुण मूर्तीचे उपासक आहों हें होय. ‘ यथा देहे तथा देवे ’ अशी आपली भावना असल्यामुळें व्यक्तिमात्राला जें कांहीं लागतें तें सर्व देवाला लागतें व जें कांहीं देवाला समर्पण करावयाचें तें उत्तम दर्जाचें असलें पाहिजे अशी आपली समजूत असल्यामुळें गांवांतील एखाद्या श्रीमंताच्या घरांत बांधणीच्या व सुखसोयीच्या दृष्टीनें जें वैभव पाहावयास सांपडणार नाहीं तें देवालयांत पाहावयास सांपडतें. व्यक्तिशः दाता हा घरापेक्षां देवालय बांधण्यांत अधिक पैसा खर्च करतो. हल्लीं देवळांची जी इतकी दुर्दशा झालेली दिसते त्याचें कारण पाहूं.

पहिलें आणि प्रमुख कारण असें कीं, पूर्वीच्या देवळांना जो सार्वजनिकपणा होता तो हल्लीं नष्ट होऊन देवळें खासगी मालकीचीं झालीं आहेत; आणि अशी खासगी मालकीचीं देवळें आहेत म्हणूनच त्यांची निगा राखण्यांत येत नाहीं. तींच पंचांच्या देखरेखीखालीं किंवा सरकारी मदतीवर चालणारीं देवस्थानें पाहिलीं तर व्यवस्थेच्या दृष्टीनें जमीनअस्मानाचें अंतर दिसतें. येथील बेलबाग किंवा पर्वती हीं देवस्थानें जर कोणा एका व्यक्तीच्या मालकीचीं असतीं तर हल्लीं आहे तसें व्यवस्थित स्वरूप त्यांना कधींच राहिलें नसतें. हल्लीं पुजाऱ्यांची प्रवृत्ति अशी झाली आहे कीं, देवालय सार्वजनिक आहे असें भासवावयाचें, पण हक्क मात्र सार्वजनिक स्वरूपाचे न ठेवतां खासगी मालकीचे ठेवावयाचे. ज्या वेळीं सार्वजनिक देवळें सर्वांना खुलीं असावींत अशासंबंधींचा कायदा असेंब्लींत आला त्या वेळीं देवालयांवर हें मोठेंच संकट आलें असें वाटून कांहीं देवळांचे मालक मजकडे हें संकट कसें टाळावें याविषयीं सल्ला विचारण्यास आले. मी त्यांना एकच सल्ला दिली; आणि ती अशी कीं, ज्यांना आपलें देऊळ सार्वजनिक करावयाचें नसेल त्यानें आपल्या देवळावर ‘ हें देऊळ

खासगी आहे ' अशी पाटी लावून ठेवावी किंवा अमुक दिवशीं देवळाचे दरवाजे बंद ठेवण्यांत येतील असें जाहीर करून आपली खासगी मालकी प्रस्थापित करावी. पण ही सल्ला त्यांना रुचली नाहीं; आणि याचें कारण असें कीं, एकदा का देऊळ खासगी म्हणून जाहीर केलें कीं बाहेरचे लोक आंत यावयाचे बंद होणार आणि आपली मिळकत बुडणार !

प्रो. पोतदार म्हणतात कीं, सर्व देवालयांची सुधारणा करावयास पाहिजे आणि या बाबतींत हिंदुमहासभेच्या पुढाऱ्यांनीं पुढाकार घेतला पाहिजे. देवालयें सुधारावींत याविषयीं लोकांना कळकळ वाटते, उपायहि सुचतात; पण आज देवळांचें सार्वजनिक स्वरूप नष्ट झाल्यामुळें जरी कोणी चंग बांधून सुधारणा करावयाचें ठरविलें व त्या केल्या तरी त्या टिकणार कशा ? कारण देऊळ पडलें एका व्यक्तीच्या मालकीचें. बरें पोतदार सुचीवितात तसें हिंदु-महासभेनें हें काम हातीं घ्यावें असें म्हणावें तर त्यांतील बहु-संख्य सभासद आर्यसमाजी आहेत. त्यांना तुमच्या सगुण, साकार मूर्तींची व देवळांची आस्था कां वाटावी ? तात्पर्य, देऊळ सुधारण्याचा व त्याला पूर्वीचें पावित्र्य, गांभीर्य प्राप्त करून देण्याचा मार्ग म्हणजे देवालयांच्या मालकांनीं स्वार्थावर पाणी सोडून देवालयाचा प्राकार बंदिस्त करणें, देवा-लयांत खासगी बिऱ्हाडांना जागा न देणें हाच आहे; आणि या बाबतींत जर कायदा झाला तर तो देऊळ सुधारण्यास अधिक उपयोगी पडेल यांत शंका नाहीं. किंवा नवीन पिढींतील मालकांना अशा तऱ्हेचें शिक्षण देऊन त्यांना देवालयसंस्थेचें महत्त्व पटवून दिलें पाहिजे आणि अशा तऱ्हेची शिकवण त्यांना पटेल असें वाटतें. कारण तरुण पिढी ही अधिक आस्तिक्य-बुद्धीची आहे. ''

---

## १५. जैन हे हिंदु कीं अहिंदु ?

" हिंदुमहासभेच्या येत्या अधिवेशनाचा मी स्वागताध्यक्ष असल्यामुळें मीच, गांवांतील हिंदु पंथांतील इतर मंडळींना बोलावून त्यांचे जर कांहीं आक्षेप किंवा शंका असल्या तर त्या दूर करावयास पाहिजे होत्या; पण माझी अशी समजूत आहे कीं निदान पुण्यांत तरी असा आक्षेपवर्ग

फारसा नाहीं. बाहेरगांवीं मी जे नुकतेच दोनतीन दौरे काढले, त्यांत तेथील आक्षेपांचें निरसन केलें. मी जो आपणांस ठराव वाचून दाखविला त्यांत जैनधर्मीय लोकांचा विशेष संबंध असल्यामुळें, त्यांच्यापैकींच कोणी तरी तो मांडावयास पाहिजे होता. पण या ठरावांत कायदेमंडळाच्या अध्यक्षांच्या निर्णयाचा संबंध असल्यामुळें, म्हणजे थोडीफार कायद्याची बाजू असल्यामुळें, ठराव मांडण्याचें काम मजकडे आलेलें दिसतें. मुंबई कायदेमंडळाच्या गेल्या बैठकींत ‘ हिंदु चॅरिटी बिल ’ ज्या वेळीं वादाकरितां आले त्या वेळीं, अध्यक्षांनीं “ हें बिल बोलून चालून हिंदूंकरितां आहे त्यांत जैनांचा संबंधच येत नाहीं; जैन हे हिंदु नाहींत ” असा अध्यक्षांनीं अज्ञानानें म्हणा किंवा जैन हे हिंदूच आहेत असें सांगणारा जैन प्रतिनिधी तेथें कोणी नव्हता म्हणून म्हणा, निर्णय दिला. आतां हा निर्णय बदलून घेण्याकरितां म्हणून जैनांनी चळवळ केली पाहिजे. हिंदु चॅरिटी बिल ज्या वेळीं तयार करण्यांत आलें त्या वेळीं बिलांतच हिंदु कोणास म्हणावें ही व्याख्या, निदान व्याप्तीचें वर्णन ठरवावयास पाहिजे होतें. जैन स्वतःला जर हिंदु समजत असतील, आणि इतर हिंदु लोक जर जैनांना हिंदू म्हणण्यास तयार असतील, तर जैन हे हिंदूच आहेत यांत काय संशय ? कांहीं शब्दच असे असतात कीं, त्यांची व्याख्या करणें महाकठीण असतें. त्यांची वर्णनावरून व्याप्ति समजावी लागते. अशापैकींच हिंदु हाहि एक शब्द आहे. असले प्रश्न व्याख्या करून सुटत नसतात परस्पर समजुतीनें ते सोडवावयाचे असतात.

आम्हीं हिंदूंनीं पुष्कळ म्हटलें कीं जैन हे हिंदू आहेत, पण समजा उद्या जैनच जर आम्ही हिंदु नाहीं असें म्हणू लागले तर आमची शोभा काय राहिली ? तेव्हां या बाबतींत स्वतः जैनांनींच प्रामुख्यानें पुढाकार घेतला पाहिजे. आणि इतःपर अशीहि एक प्रथा पाडली पाहिजे कीं, आपली आपण जात सांगावयाची तर मी कोकणस्थ–ब्राह्मण–हिंदु मी श्वेतांबर–जैन–हिंदु, मी दिगंबर–जैन–हिंदु, मी दक्षिणी–मराठा हिंदु, लिंगायत हिंदु असें तिचें वर्णन करावयास पाहिजे. अशा प्रकारें हिंदु हा शब्द सर्वसामान्यपणें यावयास पाहिजे. जैन समाज संघटित आहे, सधन

आहे. त्यानें कायदेमंडळांतील एखाद्या प्रतिनिधीतर्फे असा एकादा प्रश्न उत्पन्न करावा कीं, त्या ठिकाणीं जैन हे हिंदु कीं अहिंदु या मुद्द्यावर चर्चा होईल आणि बाहेरूनहि अशा वेळीं सर्व जैन समाजानें संघटित प्रयत्न करून आम्ही हिंदु आहों असें जाहीरपत्रक काढावें. असें झालें म्हणजे अध्यक्षांना आपली चूक समजून येईल, व ते आपला पूर्वीचा निर्णय फिरवून जैन हे हिंदु आहेत, असा निर्णय देतील. अशा तऱ्हेचा प्रयत्न जैनांहून इतर हिंदूंनीच केला तर त्यांच्यावर स्वार्थाचा दोषारोप येण्याचा संभव. पण एखाद्या विशिष्ट कार्याकरितां म्हणून आम्ही तुम्हांला हिंदु म्हणून जवळ करतों असे नाहीं, तर तुम्ही जैन हे हिंदु आहां अशीच आमची भावना आहे म्हणूनच तुम्हांस आम्ही हिंदु मानतों."

---

# ९६. हिंदुधर्मशास्त्रसंशोधनपरिषद् १९२९, पुणें

( स्वागताध्यक्षीय भाषण )

"ही परिषद् 'ऑल–इंडिया हिंदु लॉ रिसर्च व रिफॉर्म असोसिएशन' मार्फत भरविण्यांत येत आहे. या असोसिएशनतर्फे, ती स्थापन करणाऱ्या शिक्षणप्रसारक मंडळीच्या मीमांसा विद्यालयातर्फे आणि या संस्थेचे प्रवर्तक वे. शा. सं. किंजवडेकरशास्त्री यांच्यातर्फे मी सर्वांचें स्वागत करतों. हिंदु लॉ रिसर्च असोसिएशनच्या शाखा नागपूर, अलाहाबाद व कलकत्ता या ठिकाणीं स्थापन झाल्या आहेत. पण संस्थेचें मुख्य केंद्र आणि मीमांसा विद्यालय हीं पुण्यासच असल्यामुळें ही परिषद पुण्यासच भरविण्यांत येत आहे. या विषयासंबंधानें आस्था बाळगणाऱ्या सर्व सद्‌गृहस्थांना भाग घेतां यावा म्हणून ही परिषद् केवळ असोसिएशनच्या सभासदांपुरतींच न ठेवतां सर्वांना खुली ठेवली आहे. परिषद् भरवावयाची ती अशा तऱ्हेची भरवावी याबद्दल पुष्कळ सभासदांची अनुमति मिळाल्यावरच ही परिषद् भरविण्यांत येत आहे.

या परिषदेचा पहिला उद्देश असोसिएशनला नियमबद्ध स्वरूप देऊन

ती रजिष्टर करणें हा आहे. असें संघटित स्वरूप देऊन संस्थेच्या कार्याला कायदेपंडित व न्यायाधिकारी यांच्याप्रमाणेंच हिंदुधर्मशास्त्रासंबंधीं आस्था बाळगणाऱ्या सामान्य हिंदु जनतेचीहि सहकारिता पाहिजे आहे.

संस्थेच्या नांवामुळें कित्येकांच्या मनांत कांहीं पूर्वग्रह उत्पन्न होतात. ( रिसर्च ) संशोधन या शब्दाला कोणी बिचकत नाहीं. पण ( रिफॉर्म ) सुधारणा हा शब्द तसा नाहीं. त्यामुळें कित्येकांना असें वाटतें कीं, ही संस्था म्हणजे सर हरिसिंग गौर यांच्यासारख्या उपव्यापी व बेफाम सुधारकांचा एक कायदेबाज कंपू आहे. यासारखीं कांहीं बिलें असेंब्लीमध्यें प्रविष्ट करण्याचा प्रयत्न इतरांकडून झाला आणि अशा स्वरूपाचीं कांहीं बिलें या असोसिएशनच्या सेक्रेटरींनीं मतें मागवण्यासाठीं प्रसृत केलीं. या दोन गोष्टींचा धागा जुळवून लोकांनीं आपला असा ग्रह करून घेतला कीं, ही संस्था म्हणजे सनातन हिंदु समाजावर कायदेशीर बाँब फेकण्याचा एक कारखाना होय. यासंबंधीं प्रथम मला हें सांगावयाचें कीं संस्थेचे जे उद्देश नमूद केलेले आहेत, त्यांत अशीं बिलें आणण्यासंबंधानें एक शब्दहि नाहीं. अशीं बिलें तयार करून संस्थेच्या कोणीं सभासदानें तीं लोकांत प्रसृत करण्याचा अगर कायदेमंडळांत संमत करून घेण्याचा प्रयत्न केल्यास त्याची जबाबदारी त्या त्या व्यक्तीपुरती असते. संस्थेनें आपल्या जबाबदारीवर असें कोणतेंहि बिल आणलेलें नाहीं व पुढेंहि संस्थेंत चर्चा होऊन स्पष्ट निर्णय मिळाल्याखेरीज संस्था कोणत्याही बिलाची जबाबदारी घेणार नाहीं. बिलाप्रमाणेंच कोणत्याहि विशिष्ट कल्पनांचें अगर सूचनांचें समाजांत प्रतिपादन आणि प्रसार करण्याचा सभासदांचा व्यक्तिशः हक्क काढून घेतलेला नाहीं. पण संस्था त्याबद्दल जबाबदार नाहीं. संस्थेचें मुख्य काम हिंदुधर्मशास्त्राचें संशोधन हें आहे. शिवाय रिफॉर्म हा शब्द नांवांत असला तरी उद्देशांच्या मसुद्यांत तो नाहीं. मीमांसाशास्त्राच्या अभ्यासाला उत्तेजन देऊन, मूळ संस्कृत शास्त्रग्रंथ प्रसिद्ध करणें व ते विश्वविद्यालयाच्या अभ्यासक्रमामध्यें प्रविष्ट करणें हीं संस्थेचीं मुख्य कार्यें आहेत.

पण संशोधनाचें विधायक व विध्वंसक असें दुहेरी कार्य असतें. संस्थेंमध्यें संशोधनकार्य करणारा प्रामाणिक संशोधक ग्राह्य सुधारणा व पुनरुज्जीवन या बाबतींत जनतेचें लक्ष वेधून घेईलच. परिस्थितीच्या दृष्टीनें

पाहतां पुनरुज्जीवनाचीहि आवश्यकता आहे. ब्रिटिश न्यायाधीशांच्या हिंदु-धर्मशास्त्रविषयक अज्ञानामुळें ते घोटाळ्यांत पडले. हें अज्ञान प्रिव्ही कौन्सिलानेंहि कबूल केलें आहे. यामुळें हिंदु कायद्यानुसार न्यायदानाचें बाबतींत ब्रिटिश कोर्टांनीं भयंकर घोटाळा करून ठेवला आहे. हा घोटाळा कायदेमंडळामध्यें कायदे केल्याशिवाय कसा दूर होणार? राजकीय बाबतींत कायदेमंडळाचें प्रातिनिधिकत्व आपण मान्य करतों तर सामाजिक बाबतींत तें कसें अमान्य करतां येईल? पूर्वी जेव्हां कायदेमंडळें प्रातिनिधिक नव्हती त्यावेळीं सरकारी कायद्यानें सामाजिक गोष्टींत ढवळाढवळ करण्याच्या आम्हीच विरुद्ध होतों. पण आज असेंब्लींत लोकप्रतिनिधींचें बहुमत आहे व हिंदूंचेहि यथाप्रमाण प्रतिनिधी आहेत. यांत आणखी सुधारणा करण्यास जागा नाहीं असें मी म्हणत नाहीं. पण आहे या स्थितींतहि या असेंब्लीनें हिंदु लॉसंबंधाचा कोणताहि कायदा अगर सुधारणा करतां कामा नये असें म्हणतां येणार नाहीं. पूर्वीच्या युगांत राजाच्या ब्राह्मण धर्माध्यक्षांच्या स्फूर्तीनें अशा सुधारणा होण्यास जागा होती. पण आतां तो काळ राहिलेला नाहीं. आजची बदललेली स्थिति लक्षांत घेऊन तिचाच फायदा घेतला पाहिजे. शास्त्राचा अर्थ योग्य शास्त्रीय पद्धतीनें लावतां येत नसल्यामुळें ब्रिटिश न्यायकोर्टांनीं जे घोटाळे केले ते काढण्यासाठीं कायदे करण्याचा असेंब्लीचा अधिकार मान्य केला म्हणजे मग सुधारणेचा अधिकारहि मान्य करावयास पाहिजे. आणि अर्थ करण्यांत झालेल्या चुका जशा संशोधनानें सांपडतील त्याचप्रमाणें आजच्या परिस्थितीशीं जुन्या काळचें शास्त्र जुळत नाहीं व अपुरें पडतें असेंहि दिसून येईलच. हिंदुधर्मशास्त्र हें रूढीचें प्राबल्य मान्य करतें आणि स्मृतींनीं तत्कालीन रूढीचें यथार्थ दिग्दर्शन केलें आहे असा त्यांचा आपण गुण गातों. नवी परिस्थिति ही शास्त्राच्या कोंडींत कायमची बांधलेली राहील अशी अपेक्षा करणें चुकीचें आहे. अर्थात् पुनरुज्जीवनाबरोबरच पुनर्घटनेबद्दलच्या कल्पना सुचविणें असा संशोधनाचा दुहेरी कार्यभाग होणारच व हे दोनहि उद्देश हिंदुधर्मशास्त्रसंशोधन व सुधारणा करणाऱ्या संस्थेनें आपल्या डोळ्यापुढें ठेवले पाहिजेत.

---

## १७. गोव्यांतील परिस्थिति

गोव्यांतील शुद्धीकरण मोठ्या प्रमाणावर पार पाडलें, त्यामुळें लोकांना त्यासंबंधीं थोडा अविश्वास वाटे. पण इतिहासकालींहि रजपुतांचे गांवच्या गांव बाटविल्याचा पुरावा मिळतो. गोव्यांत शुद्ध करून घेतलेल्यांची संख्या रजिस्टर बुकांत ६००० नोंदली आहे. दहापांच वर्षें तिकडे या बाबतींत विचार चालू आहे. पण ह्या प्रचंड शुद्धीकरणाचें खरें श्रेय चारशें वर्षेंपर्यंत हिंदुधर्माबद्दल ममत्व ठेवणाऱ्या गावड्यांना आहे. तेथें रिपब्लिक आहे तेव्हां राजाचा असा धर्म नाहीं असें सांगण्यांत येतें, पण कॅथॉलिक पंथास पक्षपाताचा फायदा मिळतो. शुद्धीकरणास विरोध आहे तो सुशिक्षित खिस्ती ब्राह्मण वर्गाचा आहे. गावडे हे प्राय: शेतीवर राहणारे लोक. त्यांच्या शुद्धीकरणास जमीनदार आड येतात. शिष्टमंडळ पणजीस गेलें तेव्हां त्यांना शुद्धीभूत गावड्यांची एक भजनी दिंडी सामोरी आली. लग्न व मृत्यु याखेरीज गावड्यांचा संबंध पाद्री लोकांशीं येत नाहीं. त्यांची संस्कृति व धर्मभावना हिंदु आहेत. दुसरीकडे पाहिलें तर गोवा, काश्मीर व मलबार हे तीन प्रांत सृष्टिसौंदर्याबद्दल प्रख्यात आहेत. पूर्वबंगालहि सुपीक आहे. पण हे प्रांत तितके हिंदु राहिलेले नाहींत. येथें शेंकडा दहा घरेंहि हिंदूंचीं नाहींत. जमीनदार हिंदु पण खंडकरी मुसलमान. प्रयत्न केल्यास गोवा प्रांत परत हिंदुधर्मांत सुलभतेनें येईल. कारण खिस्ती धर्म जबरदस्तीनें त्यांचेवर लादला आहे. ही जाणीव इतिहासाच्या आधारें तेथील उच्चवर्णीयांना करून दिली तर त्यांना त्या धर्माची शरम वाटेल. प्रत्येक गांवांत शुद्धिभूतांच्यासाठीं व्यायामशाळा व व आखाडे काढले पाहिजेत. लष्करी शिक्षण दिलें पाहिजे. मला स्त्रियांना एवढेंच सांगावयाचें आहे कीं, संसाराची कीर्ति वाढविणें तुमचें काम आहे आपल्या मुलांत हिंदुधर्माचा अहंकार उत्पन्न करा. युरोपाप्रमाणें इकडेहि स्त्रियांनीं लष्करी शिक्षण संपादावें. त्यांच्यासाठीं शारीरिक शिक्षणाचे निराळे आखाडे काढावेत. लाठी, कट्यार, तरवार यांचें शिक्षण संपादावें व पुरुषवर्गाप्रमाणेंच स्वधर्मरक्षणाचे कामीं झटावें. समारोपादाखल म्हणावयाचें तर मी म्हणेन कीं हिंदुसभावाल्या लोकांवरील आक्षेपांना गोव्यांतील

शुद्धीकरण हें एक उत्तर आहे. गोव्यांत भाषा, धर्म, चालीरीती सर्व महाराष्ट्राच्या. त्यांचें मराठी भाषेवरील अकारण प्रेमहि प्रशंसनीय. छळ सोसूनहि स्वखर्चानें ते लोक मराठी शिकतात. धर्महि तेथें तोच म्हणून येथें आपण ममत्वाच्या दृष्टीनें स्वामित्व स्थापिलें पाहिजे. आपणांस हिंदु राहून स्वराज्य पाहिजे आहे. सरकाराशीं आमचें भांडण राजकीय आहे, व मुसलमान खिस्ती यांशीं धार्मिक भांडण आहे. स्त्रियांना मला इतकेंच सांगावयाचें आहे कीं, शुद्धीकरण हा प्रेमाचा प्रश्न आहे. काशीचे पंडित कांहींहि म्हणोत पण एखादा मुलगा फसगतीनें बाटला तर त्याला त्याची आई दूर लोटील काय! गोव्यांतील ही चळवळ जोरांत चालू ठेवून आपला धर्म कायम ठेवणें हेंच आपलें कर्तव्य आहे.

---

# १८. सोन्यामारुती--तडजोड

( १९३७ सालीं सोन्यामारुती–प्रकरणांत पुणें–डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेट-साहेबांस पाठविलेलें पत्र. )

पुणें, ता. २७ जून, १९३७.

मे. जिल्हा कलेक्टर व डि. मॅ. यांसः—

वि. वि. आपलें तारीख २५ चें पत्र पोंचलें. त्यांत सोन्या मारुतीच्या देवळासंबंधीं जो तंटा हल्लीं आहे तो कांहीं तडजोडीनें मिटणें शक्य आहे कीं काय याविषयीं चर्चा करण्याकरितां आपण मला निमंत्रण केलें आहे पण उत्तरीं मी कळवितों कीं, मी तुम्हांला भेटण्यास येऊं शकत नाहीं याबद्दल मला वाईट वाटतें. पण त्याचीं माझीं कारणें खालीं लिहिल्याप्रमाणें आहेतः——

या देवळाच्या ट्रस्टीमंडळापैकीं मी नाहीं आणि तडजोडीसंबंधानें कोणत्याहि प्रकारच्या सूचना स्वतः करणें किंवा दुसऱ्या कोणी केल्यास त्याची चर्चा करणें याविषयीं मला अधिकार नाहीं. तुम्हांला जर खरोखरच असें वाटत होतें कीं, पुण्यांतील केवळ एक खासगी नागरिक या

नात्यानें या प्रकरणीं माझ्याशीं चर्चा करण्याचा कांहीं उपयोग आहे तर तुम्ही यंदाचा हा हुकूम काढून प्रकरण इतक्या हातघाईवर आणण्यापूर्वी मला निमंत्रण करावयास पाहिजे होतें.

पण आतां तसला तो हुकूम तुम्ही काढला, मी तो तोडला, मला अटक झाली, मजवर खटला भरला गेला, मला दंड झाला आणि मी तो भरला. अशा रीतीनें आतांपर्यंत तुमची माझी सर्व फिटास फिट झाली आहे. मग तुम्हाला येऊन भेटण्याबाबत मी तुमचें काय लागतो ? मला तुमची भेट घेण्याचें कारण नाहीं.

पण आतां या पत्रानें तुम्हाला प्रांजलपणें हें सांगण्याची परवानगी घेतोंच कीं तुमचा हुकूम अत्यंत अविचारीपणाचा आणि जुलमी होता. आणि देवळाच्या आंतील घंटा वाजविण्यापुरता तर तो हास्यास्पदहि होता!

गतवर्षी ह्या बाबतींत तुम्ही हिंदु समाजाच्या हक्कावर आक्रमण केलें, आणि केवळ मेहरबानी म्हणून उत्सवाच्या एका दिवसांत फक्त कांहीं थोडे तासपर्यंत पूजाविधि करण्याची सवलत दिलीत. देवळाच्या बिचाऱ्या ट्रस्टींनीं मुकाट्यानें तेंहि कबूल केलें. पण अगदीं आयत्यावेळीं तोहि हुकूम तुम्हीं परत घेतला ! म्हणजे ही दिलेली सवलतहि काढून घेतली ! आतां या विषयीं कदाचित् कोणी म्हणेल कीं, एकदम अकल्पित रीतीनें दंगा सुरू झाल्यामुळें तुम्हांला ही गोष्ट करावी लागली, पण मनाची अशी समजूत करून घेतांनाहि ही गोष्ट उरतेच कीं, तुम्ही स्वतः दिलेला हुकूम अमलांत येण्याकरितां जो भरपूर पोलीस बंदोबस्त हवा तो ठेवणें हें तुमचें कर्तव्य असतां तुम्ही तो ठेविला नाहीं हा तुमचाच दोष होय.

बरें त्यानंतर आतां सबंध एक वर्ष गेलें. रीतीप्रमाणें यंदाहि मे महिन्यांत देवळाच्या ट्रस्टींकडून सवाद्य पूजेच्या परवानगीची मागणी करण्याचा अर्ज येणारच हें माहीत असतां, या अवधींत त्याचा पूर्व विचार तुम्ही काय केला ? अखेरपर्यंत त्यांना कांहीं एक सुगावा लागूं न देतां तुम्ही झुकविलेंत आणि शेवटच्या क्षणीं हुकूम काढलांत त्यानें तुम्ही गतवर्षीच्या तुमच्या अन्यायावरहि मात केलीत. कारण गतवर्षी सवाद्य पूजा करण्याची एक दिवसापुरती तरी परवानगी दिली होतीत, तीहि यंदा काढून घेतली ! अशी निदान एक दिवसाची परवानगी देणें हें जर गतवर्षी रास्त

होतें तर यंदाच तें अयोग्य कसें ठरलें ? शिवाय गतवर्षी आयत्या वेळीं दंगा अचानकपणें उद्भवला ही सबब तरी तुम्हाला सांगतां येण्यासारखी होती. पण यंदा तीहि स्थिति नव्हती. कारण गतवर्षीचा अनुभव लक्षांत घेऊन यंदा दंगा होईल तर त्याचा बंदोबस्त आगाऊ विचारपूर्वक करण्याला तुम्हाला भरपूर वेळ होता. आणि बंदोबस्ताला तुमच्याजवळ भरपूर साधनें होतीं.

अशी स्थिती असतां यंदाहि ही परवानगी देऊं नये असें तुम्हाला वाटलें म्हणजे मग यापुढें केव्हांहि ती परवानगी देऊं नये असेंच तुम्हाला वाटणार असें सरळ अनुमान निघत नाहीं काय ? यंदां मंदिरांतील छोटी घंटा वाजविण्यास प्रतिबंध केला तो हास्यास्पद होता ही गोष्ट तुमच्या नजरेला आली. आणि लोक असें बोलतात कीं, तेवढ्यापुरता प्रतिबंध काढून घेतल्यानें जर सत्याग्रह थांबविला जाण्याचा प्रयत्न यशस्वी होण्याचा संभव असेल तर तो करून पाहावा असें तुमच्या मनांत मध्यंतरी एकदां आलें होतें. पण तसेंहि कांहीं न घडतां तुम्ही अखेरपर्यंत तो हुकूम जारी ठेवला, खटले भरण्याचा तडाखा चालविला आणि लोकांना शिक्षा देण्यापर्यंत मजल नेलीत. असें करून तुम्हीं स्वाभिमानी सत्याग्रह्यांकडून सुमारें दोन हजार रुपये उकळले. या कृत्यामुळें सरकारचा पोलिस बंदोबस्त ठेवण्याला जो थोडा अधिक खर्च लागला असेल तो तुम्ही परस्पर वसूल केला याबद्दल सरकारचें जमाबंदी खातें तुमचे फार आभारी झाले असेल. पण असें करण्यानें तुम्ही हिंदु समाजाच्या अपमानाच्या जखमेवर अन्यायाचें मीठ चोळलेंत असेंच होत नाहीं काय? आतां असा विचार आपण करूं कीं देवळाच्या ट्रस्टींना सवाद्य पूजा करण्याचा हक्क एक आहे तरी किंवा नाहीं तरी. दोघांपैकीं एक घेऊन चाललेंच पाहिजे. हा हक्क त्यांना नाहीं असें ठरलें तर पुढचें सर्व बोलणेंच खुंटलें. आणि गतवर्षी तुम्ही जी मेहरबानगीची थोडीशी झुळूक दाखविलीत तीहि निष्कारण होती म्हणावयाची. पण दुसरेपक्षीं ट्रस्टींना हा हक्क आहे असें ठरलें तर तो हक्क बजावूं देण्याविषयीं योग्य ती सर्व तजवीज सरकारनें स्वतः अंगावर घेऊन सरळपणें पार पाडलीं पाहिजे. तसें न करतां 'तडजोडी'चें नांव करून त्या खोडयांत ट्रस्टींना अडकवूं पाहाणें हें योग्य होणार नाहीं. या तडजोडींना मी खोडा म्हणतों याचें कारण असें कीं, तडजोडीचाच विचार म्हटला म्हणजे त्यांत उभय-

पक्षीं कांहीं देणें घेणें सोडणें हें आहेच. आणि दुर्दैवानें हल्लीं असे चमत्कारिक दिवस हिंदूंना आले आहेत कीं, अशा कोणत्याहि देवघेवींत बिचाऱ्या हिंदूंच्या हक्कांचाच तेवढा कान एक तसूभर जादा छाटला जावा ! म्हणून मी म्हणतों कीं, तुम्हीं ही तडजोडीची म्हणून वाटाघाट काय काढली ! आणि तडजोड करून ठरविण्यासारखें त्यांत काय आहे ? हिंदु व मुसलमान यांच्या परस्परविरोधी हक्कांचें भांडण आणि त्यापासून उत्पन्न होणारा प्रश्न, हा सरकारपुढें आजच पहिल्यांदाच आणि फक्त पुण्यासच उद्‌भवला आहे काय ? अशा प्रकारचीं उदाहरणें व हा प्रश्न सोडविल्याचे दाखले सरकारच्या दप्तरीं काय थोडे आहेत ? मग ते विचारांत घेऊन सरकारनें स्वतःच स्वतंत्र असा निर्णय कां देऊं नये ? वादांतील मशिदीजवळून किंवा आसपास इतर हरप्रकारचीं वाद्यें वाजतात, आवाज, गोंगाट होतात, त्यांतील कांहीं स्वतः मुसलमानहि करीत असतील. हें सर्व मशिदीच्या मुसलमानांना चालतें. पण बिचाऱ्या हिंदूंनीं एक दिवस आपल्या ह्या देवळाजवळ सवाद्यपूजेचा आपला हक्क सांगितला तर तो तेवढा मुसलमानांना निषिद्ध व असह्य कां वाटावा ? आणि तो आग्रह सरकारनें कां चालू द्यावा ? मुसलमानांतील कोणी चार गुंड दंगा माजविण्याचें मनांत आणितात एवढ्याचकरितां पुण्यांतील सार्वजनिक रस्त्यावर हिंदूंना वाद्यें वाजविण्याची कायमची बंदी व्हावी ही योग्य आहे काय ? मग हिंदूंनीं आपले कायदेशीर हक्क तरी कसे बजवायचे ? आणि आपल्या संग्रहीं बंदोबस्ताचीं भरपूर साधनें असतां सरकारनें हिंदूंच्या या हक्कांना प्रतिबंध करावा. यावरून, सरकारांत कोणी तरी मुसलमानांचे पक्षपाती आहेत, किंवा सरकारांत कोणी, चार मुसलमान गुंडांना भिण्याइतके, नादान आहेत असें कोणी म्हटलें तर काय ? बरें उलट हिंदू समाज पहा. त्यांतील कोणी सरकाराला पुण्यांतच काय पण या इलाख्यांत कोठेंहि अशा बिकट अडचणींत कधीं घातलें आहे काय ? कायदा पाळून शांततेनें वागण्याचें हेंच बक्षीस हिंदूंना मिळावें काय ?

मी तुम्हांला हें सर्व लिहिलें याबद्दल तुम्हीं मला माफ करा. पण कांहीं सरकारी अधिकाऱ्यांचें धोरण असें पक्षपाती, अन्यायी आणि केवळ इभ्रतीला बळी पडणारें आहे असें ज्याला प्रामाणिकपणें वाटत असेल त्या कोणीहि मीं लिहिलें याहून कमी लिहिणें शक्य नाहीं. शेवटीं मला असें

म्हणावयाचें आहे कीं, सरकाराला या प्रकरणीं जर कांहीं तडजोड करूनच हा प्रश्न सोडवावा असें वाटत असेल, तर निदान त्यांनीं ही तडजोड तुमच्यावर तरी सोंपवूंच नये. कारण तुमचें वर्तन या प्रकरणीं बहुशः पक्षपाताचें झालें आहे. आणि हल्लींचा हा बखेडा तुमच्या अविचारामुळेंच उत्पन्न झालेला आहे यांत शंका नाहीं.

---

## ९९. हुंड्यावर बहिष्कार

( ता. ३ मार्च १९१४ )

कोणतीहि गोष्ट मनास पटावयाची तर ती उपदेशापेक्षां उदाहरणानेंच अधिक पटते असा सामान्य नियम आहे. हा नियम लहान मुलांच्या शिक्षणाची व्यवस्था करणारांना माहीत असतो; आणि शिशुशिक्षणांत तोंडाळ उपदेशापेक्षां क्रियात्मक उदाहरणेंच जास्त उपयोगांत आणलीं जातात. पण लहान मुलांच्या शिक्षणापुरतांच काय तो हा नियम लागू पडतो असें मात्र नाहीं. कारण जरठ समाज हाहि शिक्षणाच्या कामीं बालबुद्धिच असतो; म्हणजे त्याला उदाहरणें, दाखले व प्रयोग यांचीच शिकवणी पटते, नुसत्या उपदेशाला तो मुळींच जुमानीत नाहीं. हें अबाधित सत्य समजून देण्याकरितांच कीं काय, कुमारी स्नेहलतादेवीच्या आत्मयज्ञाचा प्रकार नुकताच कलकत्त्यास घडून आला! वरपक्ष मागतो तितका हुंडा देण्यास आपल्या बापाजवळ पैसे नाहींत; त्याकरितां तो वडिलार्जित घर गहाण टाकण्यास तयार झाला; पण याहि योजनेनें हवी ती रक्कम जुळण्याची आशा दिसेना, यामुळें त्याला अत्यंत खिन्नता आली; अखेर हा सर्व प्रकार पाहून, बापास पडलेल्या संकटांतून आत्मघातानेंच त्याची सुटका करण्याच्या निश्चयानें स्वतःच्या वस्त्रास आग लावून घेऊन या लोकोत्तर प्रेमशूर मुलीनें आपला प्राण दिला, ही कथा आतां जगजाहीर झाली आहे. इतकेंच नव्हे, तर बंगाली राष्ट्रासंबंधानें भावी पिढ्यानपिढ्या लोकांच्या तोंडीं रहाणाऱ्या अद्भुत गोष्टींच्या संग्रहांत या कथेचा आतां कायमचा

संग्रह होऊन चुकला आहे. या आत्मयज्ञानें बंगाली समाजावर–किंबहुना सर्व हिंदुसमाजावर–जो परिणाम थोडक्या काळांत घडविला तो ध्यानांत घेण्यासारखा आहे. स्नेहलतादेवीनें आपल्या उदाहरणानें जें कार्य केलें तें शेंकडों सामाजिक परिषदांनीं झालें नसतें.

लग्नाकरितां हुंडा बेसुमार मागण्याच्या वाईट चालीविरुद्ध स्नेहलता-देवीनें सात्त्विक प्रतिकाराची सीमा पोंचविली ! प्रखर अग्नीमध्यें कोंवळी सुकुमार देहलता दग्ध करून स्नेहलतेनें आपली उज्ज्वल पितृभक्ति व्यक्त केली. आणि स्त्रियांच्या स्वाभाविक सौजन्यास व नम्रपणास अनुसरून समाजाची प्रत्यक्ष निंदा न करितां अप्रत्यक्षपणें त्यास शहाणपण शिकविलें ! याचा परिणाम असा झाला कीं, सर्व बंगाली समाजाला सत्प्रवृत्तीच्या विजेचा धक्का बसून तात्पुरती कां होईना पण जागृति आली; मोठमोठ्या जाहीर सभा भरून हुंडा–पद्धतीविरुद्ध ठराव पास झाले; हुंडा–पद्धत नामशेष करण्याच्या हेतूनें संघ ( लीग ) स्थापित करण्यांत आले; तरुण अविवाहित विद्यार्थ्यांनीं आपल्या लग्नांत हुंडा घेऊं देणार नाहीं अशा शपथा वाहिल्या; स्नेहलतादेवीचें स्मारक करण्याचें ठरलें; प्रौढ पुढाऱ्यांनीं तर या कामास वर्गण्या दिल्याच, पण विवाहित तरुण विद्यार्थ्यांनींहि आपल्या लग्नांत आईबापांनीं घेतलेल्या हुंड्याच्या ऐवजापैकीं अवशिष्ट राहिलेल्या व त्या हुंड्याच्या स्मृतीनें दुःख देणाऱ्या हातांतल्या आंगठ्या स्मारक–फंडास देऊन आपल्या औदार्याबरोबर आपली औचित्य बुद्धिहि प्रगट केली ! आज बंगाली पत्रांतून पहावें तर हुंड्याच्या निंदेचा नुसता पाऊस पडत आहे. आजच्या घटकेस हुंडा घेणारा एखादा अधम बाप बंगाल्यांत कोणाच्या दृष्टीस पडला तर लोक कदाचित् त्याचे फाडून राई–राई एवढे तुकडे करतील कीं काय असेंहि एखाद्यास वाटेल. खरो-खर सालोसाल भरणाऱ्या शंभर सामाजिक परिषदांनीं इतकें काम झालें नसतें !

पण हा उत्साह कडेपर्यंत असाच टिकेल आणि बंगाली कुलीन ब्राह्मणांपुरती कां होईना, हुंड्याची जाचक मारवाडी पद्धति निर्मूळ होईल, अशी अपेक्षा करणें बहुधा धाडसाचें होईल ! बंगाली लोकांना वंगभंग रद्द करतां आला, पण हुंड्याची रक्कम पदरीं नसल्यानें नित्य होणारा विवाह-

भंग त्यांना रद्द करतां येईल कीं नाहीं कोणास ठाऊक ! लॉर्ड मोर्ले यांनाहि त्यांनीं प्रतिज्ञा मोडावयास लाविलें; पण हुंडा उकळण्याचा निश्चय केलेल्या प्रत्येक बापाचा संकल्प त्यांना मोडावयास येईलच असें नाहीं ! याचें कारण हेंच कीं, आपण जितकें आपलें स्वतःचें शत्रुत्व करतों तितका दुसरा कोणीहि करूं शकत नाहीं. कांहीं कांहीं वाईट सामाजिक रूढीचा जुलूम राजकीय जुलमापेक्षांहि अधिक जाचक व अधिक टिकणारा असतो. कित्येक राजकीय सुधारणा होण्यापेक्षां कित्येक सामाजिक सुधारणा दृष्टोत्पत्तीस येण्याला अधिक काळ लागतो तो याचमुळें; व राजकीय सुधारणा करण्याच्या खटपटीस हात घालण्याला सामाजिक सुधारणा होईपर्यंत थांबलेंच पाहिजे असें नाहीं, हें जें म्हणतात तेंहि याच कारणानें ! वंगभंग रद्द करण्यापेक्षां स्वदेशीचें व्रत पाळून तें सिद्धीस नेणें हें एका दृष्टीनें लोकांच्या स्वाधीनचें अधिक होतें. पण बंगाली लोकांना वंगभंगावरचा वज्रलेप चळवळीच्या नित्य घर्षणानें पुसून काढून टाकतां आला तरी स्वदेशी व्रताची सिद्धि शेंकडा शंभर त्यांस करितां आली नाहीं. या बाबतींत बंगाली लोक हे दोषारोपाकरितां आम्हीं निवडून काढतों असें मात्र नाहीं. त्यांचा उल्लेख केवळ उपलक्षणात्मक आहे. कारण जी गोष्ट बंगालची तीच महाराष्ट्राची, तीच पंजाबची, तीच मद्रास इलाख्याची.

हुंडा घेणें न घेणें हेंहि सर्वस्वीं ज्याच्या त्याच्या खुषीवर असतें. सरकार दारूचें दुकान आपल्या जाण्यायेण्याच्या मार्गांत ठेवतें यामुळें आपणांस मद्यपानाचा मोह पडतो ही जी सबब मद्यप्याला सरकाराविरुद्ध आणावयास सांपडते, तीहि हुंडा घेणाराला नाहीं. हुंडा घ्यावा असा सरकारचा कायदा किंवा नियम नाहीं. हुंड्याच्या पैशाचा उपयोग इतर पुष्कळ असेल, पण हुंड्याच्या पैशानें ज्याची सरकार चावडी भागविली जाते असा कोणीहि नसेल; तसेंच हुंडा न घेण्याबद्दल कोणास त्याची जात वाळींत टाकीत असेल असेंहि शक्य नाहीं. असें असतां हुंडा घेण्याची चाल इतकी माजूं शकते कीं, तिच्यामुळें कोंवळ्या मुलींनाहि आपल्या बापांची कींव येऊन त्यांना प्राण द्यावेसें वाटतें, हें आतां उदाहरणानें सिद्धच आहे ! अर्थात् आपखुषीइतकी कडक सक्ति दुसरी कोणतीच नसते; किंवा ‘ आत्मैव रिपुरात्मनः ’ या सत्य सिद्धांताचें याहून अधिक

समर्पक असें समर्थन कोणतें करतां येणार ? म्हणून फिरून एकवार आम्ही म्हणतों कीं, ज्यांनीं वंगभंग दुसऱ्याच्या हातून रद्द करविला त्यांनाहि हुंडा हा स्वतःपुढें हात टेंकावयास लावील ! तसें न झालें तर आम्हांस आनंद तर होईलच; पण महदाश्चर्यहि वाटेल !

हुंड्याची पद्धति सर्वस्वी नाहींशी होण्याला खरोखर फार मोठ्या अडचणी आहेत. त्यांतली मुख्य अशी कीं, हुंड्याला बहुतांशीं ऐच्छिक व्यवहाराचें स्वरूप येतें, व यामुळें त्याचा जाच झाला तरी वास्तविक त्याबद्दल कोणास फारशी तक्रार करतां येत नाहीं. हुंड्याचा पूर्वपक्ष मांडावयाचाच तर असा मांडतां येईलः—विविक्षित मुलग्याला कोणी मागणी घालावी, तो आपला जांवई व्हावा जशी कोणी इच्छा धरावी, तेव्हांच हुंड्याची जरूरी उत्पन्न होते. अर्थात् मागितलेला हुंडा देतां येत नसेल तर त्या मुलग्याची आशा सोडावी, दुसरा मुलगा पहावा म्हणजे झालें, असें सरळ उत्तर आपोआप येतें. अमुक इतक्या शिक्षणाचाच व अमुक इतक्या गृहस्थितीचाच मुलगा जांवई असावा असें कोठें ठरलेलें आहे ? बरें मुलीच्या भावी सुस्थितीकरितां जर तसा जांवई पहावयाचा, तर तिच्या सुखाला पडेल ती किंमत देण्यास मागें कां घ्यावें ? मुलग्यांना सुस्थिति येण्याकरितां कर्ज काढूनहि जर आपण त्यांची विद्या करतो तर मुलींना चांगलीं घरें मिळण्याकरितांहि तसाच पैसा कां खर्च करूं नये ? आणि साधारणतः हिशेबहि असाच बसतो कीं, एका मुलग्याचें युनिव्हर्सिटीचें शिक्षण पुरें होण्याला जितका पैसा लागतो तितकाच पैसा युनिव्हर्सिटीचें शिक्षण पुरें झालेला जांवई मिळण्यास लागतो. आतां मुलगा असेल तर हा खर्च प्रत्यक्ष त्याच्यावर अनेक रकमांनीं मिळून होतो; व मुलगी असेल तर तोच खर्च तिच्या भावी पतीवर एका रकमेनें होतो. मुलगा घरीं राहिल्यानें त्या खर्चाचें आपणास कांहीं वाटत नाहीं. पण मुलगी ही बोलूनचालून 'देणी' च असते; ती दिलीच पाहिजे. कालिदासानें म्हटलेंच आहे कीं, 'अर्थोहि कन्या परकीय एव !' मग तिच्याकरितां कराव्या लागलेल्या खर्चाचें वाईट कां वाटावें ? शिवाय मुलगी ही स्वतः सुशिक्षित असली किंवा नसली तरी नवऱ्याची जी पदवी तीच तिला हुंड्यामुळें एकदम बिनप्रयत्नानें प्राप्त होते. मुलग्याकरितां ज्या पदव्या व जे पगार पैसा देऊन मिळवूं म्हटलें

तरी मिळूं शकणार नाहींत, ते धनिक बापाला मुलीकरितां हुकमी खरेदी करतां येतात असें म्हटलें तरी चालेल. हुंड्यावर एक पैहि खर्च न करतां जांवई चांगला सुशिक्षित, प्रतिष्ठित व मुलीचें पोट सुखानें थाटानें भरील असा मिळावा अशी अपेक्षा बापानें तरी कां करावी ? अर्थात् ही सामान्य स्थितीच्या आईबापांची व वधूवरांची गोष्ट झाली.

विशेष कारणावरून ही स्थिति बदलून मुळीं बापाला हुंडाच पडणार नाहीं; किंवा उलटपक्षीं बाप यथाशक्ति हुंडा देण्यास तयार असतांहि अधिक देतां येत नाहीं म्हणून मुलीचें लग्न होण्याची पंचाईत पडेल. उदाहरणार्थ मुलगी विशेषच सुंदर असेल व त्यांतल्या त्यांत तो आपली मुलगी बिजवराला देण्यास तयार असेल, तर गरीब सासऱ्याला खूप श्रीमंत किंबहुना संस्थानिकसुद्धां जांवई मिळूं शकेल. आज पहावें तों मुलीच्या हातांत उलटी अंबारी व उद्यां पहावें तों सुलट्या अंबारींत मुलगी, असे प्रकार पुष्कळ आढळतात. अर्थात् येथें हुंड्याची वार्ताहि नाहीं. शिवाय सर्वसाधारण-रीत्या असें विधान करितां येईल कीं, मध्यम स्थिति सोडून जसजसें वर जावें तसतसें उत्पन्नाच्या मानानें हुंड्याचें प्रमाण कमी कमी होत जातें. जेथें घराण्याचें प्रेम किंवा पूर्वापारचा ऋणानुबंध असतो, अथवा ज्यांत पुनर्विवाह झालेले आहेत अशा कुटुंबांप्रमाणें किंवा कांहीं विशेष कारणानें वाळींत पडलेल्या कुटुंबांप्रमाणें, कृत्रिम कारणांनीं आपलेपणा व ऋणानु-बंध उत्पन्न होतो, अशा घराण्यांत हुंड्याचा प्रश्नच उत्पन्न होत नाहीं. याच्या उलट ज्या जातींत लोकसंख्या फारच कमी, व मुलगी अविवाहित ठेवण्याची वयोमर्यादाहि अतिशय संकुचित, तेथें हुंड्याचें प्रमाण वाढत जाऊन फारच जाचक होतें. इकडचे पारशी, परभू, बंगाल्यांतील कुलीन ब्राम्हण वगैरे वर्गांत हुंड्याची जाचणूक फार होते. ती इतकी कीं, मुलींचीं लग्नें तरी होतात किंवा नाहीं याचीच पंचाईत येऊन पडते. या दोन एकांतिक स्थिति सोडून दिल्या असतां उरलेल्या मध्यम स्थितींत म्हणजे जेथें वरांची संख्या थोडी नसते, व मुलींचीं लग्नें फार लवकरहि होत नाहींत किंवा त्या फार दिवस अविवाहित वाढविल्याहि जात नाहींत, तेथें हुंडा घेतला जातो; पण तो जाचक होण्याइतका नसतो. हुंड्याचा जाचकपणा गेला म्हणजे त्याला निवळ व्यवहाराचें स्वरूप राहतें; आणि समानगुण असे वर

मिळत असतां त्यांतल्यात्यांत ज्याची श्रीमंती अधिक त्याला जसा कोणीहि सासरा आपली मुलगी आधीं देईल, त्याचप्रमाणें समानगुण अशा वधू मिळत असतां जिच्या बापाकडून अधिक हुंडा मिळेल तीच वधू कोणचाहि सासरा आधीं पत्करील, यांत आश्चर्य वाटण्याचें कारण नाहीं.

आतां पैशाच्या व्यवहाराचें बोट असें मध्यें शिरकलें म्हणजे हळूहळू तारतम्य सुटत जाऊन द्रव्यदृष्टीच इतर दृष्टीपेक्षां अधिक प्रभावी होऊं शकेल. पण हुंडा घेणें किंवा देणें हें धार्मिक दृष्ट्या निखालस पाप आहे, व हा मूळ पाया सुटला म्हणजे असेंच व्हावयाचें. स्मृतींत सांगितलेल्या लग्नविधींत ' हुंड्या ' च्या मागणीचा समावेश होऊं शकत नाहीं, व कन्याविक्रयाइतकेंच पुत्रविक्रय हेंहि स्मृतींच्या हेतूप्रमाणें पाप ठरण्यास हरकत नाहीं. पण धर्माची दृष्टि सोडून विवाहविधीला व्यवहाराच्या पायावर आणून ठेवल्यानंतर हुंड्याबद्दल कुरकुरण्यास समाजाला कितपत अधिकार पोंचतो कोणास ठाऊक ? व याचें प्रत्यंतर नेहमीं चाललेल्या व्यवहारांत दिसून येतच आहे. लहान मुलींचे पैसे घेऊन ती पोक्त वरास विकणाऱ्या अधम बापाला कृपण कृपण म्हणून सर्व समाज अजूनहि दूषण देईलच; किंवा व्याह्याला अतिशय नडवून त्याचें वाटोळें करून हुंडा उकळणाऱ्या सासऱ्याला, ' खिडींत गांठणाऱ्या चोराप्रमाणें आजहि लोक अपराधी मानतील यांत शंका नाहीं. पण असलीं एकांगीं उदाहरणें सोडून दिलीं तर समाजांत हुंडा न देणारे व न घेणारे सासरे हजारांत १० तरी मिळतील कीं नाहीं याची शंकाच आहे. बिचारे जुन्या पद्धतीचे लोक असतात ते हुंड्याला ' हुंडा ' हें उघड उघड नांव ठेवून तरी तो घेतात; पण सुधारक–ब्रुव लोकांची सर्व हातचलाखी किंवा कौशल्य हुंड्याला कोणतें चांगलें रूप किंवा कोणतें चांगलें नांव द्यावें यांतच पाहून घ्यावें. पुष्कळ सुधारक लोक हें कौशल्य दाखवून स्वतःस व दुसऱ्यास फसवूं पाहातात; पण तत्त्वतः ते हुंडाच घेत असल्यामुळें त्यापासून कोणाचीच फसवणूक होत नाहीं.

बिचारे जुने भाविक लोक लग्नाच्या यादींत ' वरदक्षणा ' असा शब्द लिहून हुंडा घेत. पण सुधारक पहावें तर यादींतून किंवा तोंडी करारांतून हुंडा हा शब्द मात्र वगळतात; पण हुंड्याचे पैसे, दागिने, देणग्या, मानपान

अशा स्वरूपानें आधीं ठरवून घेतात. कित्येक सासू–सासरे तर इतके ' सुधारणा ' प्रिय असतात कीं, असा हुंडा घेऊनच्या घेऊन "हुंडा दिला असें म्हणाल तर खबरदार " असा धाक घालून वधूपक्षीय व्याह्याला तोंड बांधून बुक्क्यांचा मार देतात. सुशिक्षित जांवईहि देणग्या मागण्यांत मोठे तरबेज झाले आहेत. प्रथम रुसण्याची बोली करावयाची नाहीं. पण सुशिक्षित जांवई सुद्धां एखादे दिवस रुसल्यास त्याचें कौतुकच होतें; यामुळें कोणी जांवई मौल्यवान हिऱ्याची आंगठी, कोणी सोन्याचें घड्याळ, कोणी बायसिकल, कोणी मोटार, कोणी नुसता विलायतेला जाण्या-येण्याचा खर्च, असल्या भोळ्या मागण्या करून हुंड्यापेक्षांहि जास्त पैसे काढतात; आणि ते देण्याची पाळी आली म्हणजे, प्रत्यक्ष हुंड्याचें गहूं आधीं बोली करून दिलेले पुरवले, पण त्या गव्हांची ही अशी कणीक करून देणें नको, असें सासऱ्यांना वाटतें ! एका जावयानें तर निव्वळ श्लेषालंकारानें हुंडा उकळला म्हणतात. त्यानें सासऱ्यास फक्त एक ' बुक ' बक्षिस मागितलें. आपला जांवई विद्याप्रिय आहे असें पाहून सासऱ्याला प्रथम धन्यता वाटली. पण ' तुम्हांला कसलें बुक पाहिजे ? ' या प्रश्नास जेव्हां ' एक हजार रुपये भरलेलें बँक बुक ' असें उत्तर मिळालें तेव्हां त्याची धन्यताबुद्धि लोपून ' दे माय धरणी ठाय ' असें झालें ! मुलीचे पैसे घेण्यांत असले फसवाफसवीचे प्रकार तरी होत नाहींत. मुली विकणारा बाप व्यवहाराला ' चोख ' असल्यामुळें तो आधीं सर्व पैसे पदरांत घेतो, आणि मगच मुलीच्या गळ्याला दावें लावूं देतो ! कारण त्याला हें माहीत असतें कीं आपल्या हातांतला मुलीचा हुकूम, लग्नाचा डाव मांडून विवाहाच्या अक्षता वधूवरांच्या डोक्यावर पडेपर्यंत काय तो खरा. तें होतांच दुसरा व्याही किंवा जांवई सांगेल तोच हुकूम सुरू होणार !

तात्पर्य, हुंडा घेण्याचा प्रकार असा असल्यामुळें केवळ सभा भरवून तो सर्वस्वीं बंद पडेल असें आम्हांस तरी वाटत नाहीं. स्नेहलतादेवीचा संगमरवरी पुतळा उभा केला तर त्याच्या योगानें कलकत्ता–युनिव्हर्सिटीच्या चौकाला शोभा येईल. पण त्याजकडे येतां जातां दृष्टि फेकणाऱ्या विद्यार्थ्यांच्या हातांत आहे काय ? कॉलेज स्क्वेअरमध्यें किंवा फर्ग्युसन कॉलेजांत भरलेल्या सभेंत विद्यार्थ्यांनीं हुंडा न घेण्याच्या शपथा घेतल्या; पण त्यांनीं

शपथा घेऊन काय होणार ? या सभांना जातांना त्यांच्या आईबापांनीं स्वतः आधीं शपथा घेऊन मग मुलांना सभेस जाण्याची परवानगी दिली असती, तर त्यांत कांहीं थोडा अर्थ होता. कारण, लग्नाची वेळ आली असतां मुलग्यांना विचारून कधीं कोण देण्याघेण्याचें ठराव करतो ? बरें हे मुलगे स्वतः बाप होऊन उद्यां आपल्या मुलग्यांचीं लग्नें करावयास निघतील तोंपर्यंत या शपथा त्यांच्या लक्षांत राहतील काय ! राहिल्या तर फार चांगलें; पण स्नेहलतेच्या मूठभर चितेच्या आगीनें क्षणांत तापलेलें वैराग्याचें भांडें किती वेळ निवावयाचें थांबेल, हा प्रश्नच आहे !

हुंड्याची पद्धति बंद व्हावी असें सर्वांसच इष्ट वाटत आहे; तथापि, तो हेतु साधण्याकरितां चोहोंकडून जे अनेक उपाय सुचविण्यांत येत आहेत ते मात्र सारखेच फलप्रद होतील असें नाहीं, व त्यांतील कित्येक तर निवळ भोळेपणाचे आहेत. प्रथमतः या दुसऱ्याच प्रकारच्या उपायांचा आपण विचार करूं, बंगाल्यांतील कित्येक लेखकांनीं असें सुचविलें आहे कीं, हुंडा देणें व घेणें हें दोनहि अपराध ठरवून सरकारानें कायद्याच्या सक्तीनें ही चाल मोडावी ! ‘ नायक ’ नांवाच्या बंगाली पत्रानें तर असेंहि सुचविलें आहे कीं, ज्या मुलाकरितां हुंडा घेतला गेला तो मुलगा त्यापुढें जन्मभर आपल्या बायकोचा व सासऱ्याचा विकत घेतलेला गुलाम झाला असें कायद्यानें ठरवावें ! अर्थात् या सूचनेंत विनोदाचा भाग बराच आहे. तरी पण हुंड्याची चाल मोडण्याकरितां सरकारास कायदा मागावा असें गंभीरपणानें प्रतिपादिलें गेलें तरी तें कोणीहि समंजस मनुष्य कबूल करणार नाहीं. ज्या देशांत सती व संमतिवय अशाविषयींच्या कायद्या-विरुद्ध लोकमत प्रबळ आहे तेथें हुंड्याविषयीं कायदा करा हें म्हणणें कोण ऐकेल ? आणि खरोखर जर हुंड्याकरितां कायदा हवा, तर उद्यां लग्न-समारंभाविषयीं असेच आणखी किती तरी कायदे लागतील ! लग्नसमा-रंभांत फाजील खर्च होतो, भाडोत्री वाजंत्र्यांच्या कर्णकटु वाद्यांनीं त्रास येतो, वरातीच्या वेळीं उडविलेली खवट दारू नाकातोंडांत शिरून खोकला येतो, व विड्या तोडण्याच्या प्रसंगीं बालवधूवरांस करवल्यांनीं घाबरविल्या-मुळें त्यांच्यावर एखादे वेळीं अकालीं दंतव्रण होण्याचा प्रसंग येतो, वगैरे

नाजूक संकटांचें निवारण करण्यासहि सरकाराजवळ कायदा मागावा लागेल ! तात्पर्य, हुंड्याकरितां सरकारांत दाद मागणारांच्या मनोदौर्बल्याचें आम्हांस हंसूच येतें.

दुसरे कोणी असे सुचवितात कीं हुंडा घेतल्यास नवऱ्या मुलांनीं, 'आपण लग्नास उभे राहणार नाहीं' अशा, व पुरोहितांनीं 'आपण लग्न चालविणार नाहीं' अशा शपथा घ्याव्या. यांपैकीं नवरे मुलगे हे तरुण, उल्हासी, उत्साही व स्वभावतः सत्प्रवृत्त असल्यामुळें त्यांच्या शपथांनीं कित्येक वेळां काम होईल; पण जिच्याशीं जन्माची गांठ पडावयाची ती मुलगी काळी गोरी कशी काय हें एक वेळ पाहाण्यास मिळण्याइतकीसुद्धां सवलत नवऱ्यामुलांस ज्या समाजांत अद्यापि हटकून मिळत नाहीं, तेथें हुंड्याविरुद्ध बंड करण्याच्या क्रांतिकारक चळवळीस मोकळीक कोठून मिळणार ? शिवाय, नवरे मुलगे स्वतंत्र असले तरी हुंडा घेणें हें पाप आहे असें मानण्याइतके सर्वच साधु कोठून मिळणार ? विलायतेंत जेथें वधूवर—पसंतीची पूर्ण मोकळीक आहे तेथेंहि 'नवरीपेक्षां डावरीला' भुलूनच जर अनेक लग्नें होतात तर इकडे सुद्धां 'हुंडा' पाहून 'मुंडावळी' बांधण्यास तयार होणारे वर मिळाल्यास नवल नाहीं ! पुरोहित शपथा घेतील ही तर आशाच नको; कारण खरा भिक्षुक हा भिक्षुकीची निंदा कशी करील ? शिवाय पुष्कळ वेळां हुंडयाच्या वसुलाच्या प्रमाणावरच पुरोहिताच्या दक्षिणेच्या मुशाहिऱ्याचें 'स्केल' अवलंबून असतें.

मुलीच्या विवाहाचें वय बदलणें हाहि एक उपाय म्हणून सुचविण्यांत येतो. पण मौज ही कीं, या बाबतींत अगदीं परस्परविरुद्ध असे उपाय सुचविण्यांत आले आहेत. कारण कोणी म्हणतात कीं, 'मुली लग्नाच्या मोठ्या कराव्या; म्हणजे लवकर लग्नें करण्याची सामाजिक बळजबरी कमी झाली तर होऊन, हुंडा न घेणारा किंवा फार कमी घेणारा व्याही मिळेपर्यंत मुलीच्या बापाला वाट पाहतां येईल.' पण कलकत्त्यास भरलेल्या सभेंत त्याच्या अगदीं विरुद्ध मत प्रदर्शित करण्यांत आलें; व तें असें कीं, 'मुली लग्नाच्या न वाढवितां बालविवाहच करावे. कारण अगदीं लहानपणापासून लग्नाच्या योजनेंत आईबाप राहिले म्हणजे कोठें तरी बेताचा सवदा पटून कार्य उरकून जाईल, आणि मुलगी वाढल्यानें गळ्यास तात

लागते ती लागणार नाहीं. ' कोणतेंहि एक कार्य घडवून आणण्यास असे परस्परविरुद्ध दोनहि उपाय उपयोगीं पडणें शक्यच नाहीं, व व्यवहारांत पहावें तर मोठ्या मुलींच्या लग्नाला हुंड्याची जितकी अडचण पडते तितकीच लहान मुलींच्या लग्नालाहि पडते. अर्थात् हुंडयाची चाल नाहींशी करण्याकरितां बालविवाह सुरू करणें म्हणजे खरूज जाण्यासाठीं नायटे पत्करणें असेंच होय. कारण बालविवाहामुळें बालविधवा अधिक होतील त्याची वाट काय? बरें, मुली मोठ्या केल्या तरी हुंडा हटकून चुकतो असेंहि नाहीं. पार्शी, परभू वगैरे वर्गांत मुलीच्या लग्नाला वयाची मर्यादा सक्त नाहीं, तरी हुंडयाच्या अडचणीमुळें मुलींना जन्मभर कुमारिकाच रहावें लागतें कीं काय अशीहि भीति कित्येकांना पडते; व अतिरिक्त प्रौढ विवाहापासून होणारे सर्व तोटे होतातच.

याशिवाय दुसरेहि कित्येक उपाय सुचविण्यासारखे आहेत. ते असें कीं, मुलींना शिक्षण देऊन सुज्ञ कराव्या म्हणजे प्रौढ व सुशिक्षित मुलींना प्रौढ वर बिनखर्चानें मिळतील. या उपायांत असलेंच तर थोडेंसें तथ्य आहे. हुंडयाऐवजीं मुलीच्या शिक्षणावर खर्च होणारच; पण त्या एकाच खर्चांत शिक्षण मिळेल, बालवैधव्याचा संभव कांहींसा टळेल, व अभिमत वरप्राप्ति होईल. पण आज जरी प्रौढ व सुशिक्षित वधू तुरळक थोडया म्हणूनच कदाचित् हुंडयाची अडचण भासणार नाहीं, तरी याच उपायावर सर्वस्वीं भिस्त टाकतां येणार नाहीं, हें विलायतेंतील उदाहरणावरून वर दर्शविलेंच आहे. पोटजातींत विवाह सुरू करून वधूवरपसंतीचें क्षेत्र वाढवावें हाहि एक उपाय या बाबतींत सुचतो. याहि उपायांत बरेंच तथ्य आहे. निदान ज्या जातींत लोकसंख्या फारच थोडी असल्यामुळें हुंडयाचा जाच आजकाल असह्य झाला आहे, व ज्यांतील बापावर स्नेहलतेच्या बापासारखें संकट येऊं शकतें, त्या जातीपुरता तरी पोटजातीच्या विवाहामुळें हुंड्याच्या चालीवर पुष्कळच परिणाम घडेल यांत शंका नाहीं. पण असे विवाह करण्यास तयार झालेल्यांनाहि सर्वस्वीं हुंडा चुकतो असें नाहीं. असे विवाह प्रायः उत्साहामुळें व वधूवरपक्षाच्या घराण्यांतील विशेष ऋणानुबंधनामुळेंच घडून येतील व हुंडयाचा जाच होणार नाहीं हें खरें. तथापि त्या योगानें हुंडयाचें व्यवच्छेदन निश्चयानें होईलच असें नाहीं. लग्नकार्यांत खर्च कमी

करणें हाहि एक उपाय कित्येकांनीं सुचविला आहे; व याचा अर्थ असा कीं, जवळच्या पैशानें वधूच्या बापानें काय होईल ती हुंड्याचीच भर करावी व कार्याच्या बाकी सर्व खर्चांत छाटाछाट करावी. पण खरें म्हटलें तर हुंड्याविरुद्ध हा उपायच होऊं शकत नाहीं; कारण हुंड्याच्या मागणीची अशा रीतीनें भरपाईच केल्यावर हुंड्याचें निर्मूलन कसें होणार? शिवाय लग्नकार्यांतील कांहीं खर्च अपरिहार्यच असतात. व विशेष अडचण अशी कीं, जे व्याही हुंडा चोपून मागणी करून घेण्याइतके लोभी किंवा असमंजस असतात, ते जेवणावळी, बँड, दारू, ओट्यांचे नारळ येथपर्यंत लक्ष घालून त्याबाबत व्याह्यास करारानें बांधून घेण्याइतकेंहि असमंजस प्रायः असतातच. पुष्कळ व्याही स्वतःस मिळालेल्या हुंड्याप्रमाणेंच प्रतिव्याह्यानें केलेल्या उधळपट्टीवरून स्वतःचा बडेजाव झालासें मानणारे भेटतात. जणुं काय या विवाहाकडे स्वर्गांतून पहाणाऱ्या उभय पक्षांच्या पितरावळींचा बहुमान लग्नघरांत सावडल्या जाणाऱ्या पत्रावळींच्या संख्येवरच अवलंबून आहे!

या बाबतींतील आणखी एक उपाय सांगून उपायचिंतनाचें हें प्रकरण पुरें करूं. तो उपाय असा कीं, आईबापांनीं मुलीच्या अंगावर पडणाऱ्या दागिन्यांची हाव सोडावी म्हणजे त्यांच्या मागचा हुंड्याचा त्रास चुकेल. याहि सूचनेंत सत्याचा थोडासा अंश आहे. कारण हुंड्याचा उपयोग पुष्कळ वेळां नवीन दागिने करण्याकडे होतो. वधूच्या अंगावर दागिने घालणें हा तिच्या सासऱ्याच्या इभ्रतीचा प्रश्न असतोच. तथापि, पुष्कळ वेळां लोकांच्या अपवादापेक्षां सुनेच्या आईबापांच्या अपवादाची भीतिच सासऱ्याला फार वाटते. हुंडा घेतला म्हणून व्याह्यास नावें ठेवणारे किती आईबाप इतके समंजस निघतील कीं, व्याह्यानें हुंडा न घेतां केवळ आपल्या खऱ्या ऐपतीप्रमाणें मुलीच्या अंगावर अक्षरशः 'साखळीपाटली' च घातली तर त्यांचें तोंड आंबणार नाहीं? दागिने न घातल्याबद्दल वरपक्षाची निंदा केल्यामुळें द्वेष वाढून व्याह्या-विहिणींच्या स्नेहाचा सत्यनाश झालेलीं किती तरी उदाहरणें सांपडतील! मुलींच्या आईबापांची कींव वाटते खरी; पण त्यांतील कित्येक असे खमंग असतात कीं, त्यांचें वेळीं अवेळीं नाक दाबून तोंड उघडलें तरच ठीक. त्यांना जर एखादा भोळा व सज्जन व्याही भेटेल, आणि "देण्याघेण्याच्या गोष्टी या ज्याच्या त्याच्या मोठे-

पणाच्या आहेत, पोटचा गोळा देईल तो सोन्याच्या तोळ्याला मार्गे घेणार नाहीं " असें तत्त्वज्ञान लढवील तर, त्याला ते गोता दिल्याशिवाय कधींहि रहावयाचे नाहींत. आणि 'नुसती हळकुंड बांधून मुलगी दिली, अन् दूधभात जेवायला घातला' ही जी केवळ म्हण आहे ती अक्षरशः खरी केल्याशिवाय ते सोडणार नाहींत. हुंड्याला मागणीचें व करारांचें जें कित्येक वेळां स्वरूप येतें तें अशा आईबापांच्या उदाहरणामुळेंच. मुलाचे आईबाप होण्याऐवजीं मुलीचे आईबाप झाल्यानें मनुष्यस्वभाव बदलत नसतो, हें हुंडा घेणाऱ्या सासऱ्यांची निंदा करणारांनीं लक्षांत ठेविलें पाहिजे. या स्वभावाचा प्रत्यंतर पुरावा हाच कीं, हुंडा देण्याची वेळ आली असतां कांगावा करणारे आईबाप हुंडा घेण्याची वेळ आली असतां तो प्रतिष्ठितपणानें हक्कानें चोपून घेतात. आतां कोणालाहि मुलगे तर मुलगेच आणि मुली तर मुलीच असें क्वचितच होत असल्यामुळें, मुलां–मुलींची संख्या गंजिफांतील देणीघेणीच्या पानांप्रमाणें जवळ जवळ सारखीच वाटून जाते. यामुळें घरच्या सर्व मुलांमुलींचीं कार्यें झालीं म्हणजे देण्याघेण्याची बेरीज–वजाबाकी होऊन अखेर हिशेब बहुधा एकच येतो. पण तो हिशेब देण्याघेण्याशिवायच झाला तर बरें नव्हे काय? पण हें कोणाच्या फारसें लक्षांत येत नाहीं.

हुंडापद्धतीला आळा बसण्यासंबंधानें जे उपाय सुचण्यासारखे आहेत त्यांचा हा जो वर विचार झाला त्यावरून असें दिसून येईल कीं, प्रत्येक उपायांत गुणकारितेचा थोडथोडा अंश आहे; पण सर्वस्वीं निर्दोषी व पूर्ण गुणकारी असा त्यांतील एकहि उपाय नाहीं. आतां हे सर्व उपाय एकाच वेळीं निरनिराळ्या दिशांनीं सारखेच अमलांत रहातील तर हुंड्यास बराच आळा पडेल यांत शंका नाहीं. पण मनुष्यस्वभावांतर्गत लग्नविषयक मूळ समजुतींत जेव्हां खरी सुधारणा होईल तेव्हांच हुंडा नाहिंसा होईल, तोंपर्यंत होणार नाहीं. ज्यांत संख्या अगदींच थोडी अशा कांहीं गुजराथी पोट-जातींत किंवा बंगाली कुलीन ब्राह्मणवर्गांत, जेथें हुंड्याचा कहर आहे व अविवाहित रहाण्याच्या भीतीनें मुली बापास कर्जबाजारी करतात अगर स्वतःस जाळून घेतात, अथवा एकेक नवरा चार चार पांच पांच लग्नें करून मुलींना कोणीकडून तरी 'विवाहित' या सदराखालीं घालतो,-तेथें

त्या पोटजातीबाहेर मुली देणें हाच सामाजिक जुलमाचें तुंबलेलें पाणी फोडण्यास खरा मार्ग आहे. वैद्यशास्त्राच्या परिभाषेनें या उपायाला ‘ स्पेसि-फिक रेमिडी ’ म्हणतां येईल. याहून खालच्या प्रतीचा व सर्वसाधारण उपाय म्हटला म्हणजे मुलींना शिक्षण देणें. कारण तसें केल्यानें लग्नाची वयो-मर्यादाहि आपोआप वाढत जाऊन हल्लींच्या केवळ आकुंचित वयोमर्यादेमुळें मनास जी कांचणी उत्पन्न होते ती नाहींशी होईल. शपथा वगैरे घेण्याचा गुण अर्थात् क्षणिक होय. पण वर्षोवर्ष लग्नास येणाऱ्या पिढीच्या मुलग्यांना हुंड्याविरुद्ध शपथा घेण्यास उद्युक्त करण्याकरितां स्वतःस जाळून घेणाऱ्या ‘ स्नेहलतां ’ चां परंपरा कशी लाभणार ? तात्पर्य, खरा, नित्य व टिकाऊ उपाय म्हटला म्हणजे ‘ लग्न हा शुद्ध धार्मिक विधि आहे; त्याला उभय-पक्षीं हौसेची आणि मोकळ्या मनाची कबुली लागते; आणि देण्या-घेण्याच्या करारांनीं त्या विधीच्या शुद्धतेस कमीपणा येतो ’ अशी धार्मिक दृष्टिच प्रचलित झाली पाहिजे अथवा धार्मिक बुद्धीपेक्षां व्यावहारिक सारा-सार विचार हाच कित्येकांस अधिक पटेल, पण त्यांना झालें तरी मुलां-मुलींचीं लग्न करणें म्हणजे एक नवीन घर जोडणें, नवीन स्नेह व ऋणा-नुबंध संपादन करणें आणि स्वतःच्या व भावी पिढीच्या कौटुंबिक सुखाच्या नवीन नवीन इमारतींचे पाये भरणें होय, अशी बुद्धि उपजत गुणानें तरी जन्मली पाहिजे किंवा शिक्षणामुळें आली पाहिजे. ती येईतोंपर्यंत वरील बहुतेक उपाय थोडथोड्या अंशानें गुणकारी असले तरी पोटांत दुखतें म्हणून पायास मलमपट्टी लावण्यासारखें, किंवा फारच झालें तर विष-बाधेनें आलेल्या ज्वरामुळें दुखणाऱ्या डोक्यास कोलनवॉटर लावण्यासारखें आहे. त्यांच्या योगानें क्वचित् रोगचिन्हांचा उपशम झाल्यासारखें वाटेल; पण बीज नाहींसें होणार नाहीं.

---

# १००. पुनर्विवाहासंबंधीं सारासार विचार

(ता. २५ जुलै १९१०)

बंगाल्यांतील प्रसिद्ध ब्राह्मण पंडित ईश्वरचंद्र विद्यासागर यांच्या खटपटीमुळें ता. २५ जुलै १८५६ रोजीं, विधवापुनर्विवाह कायदेशीर ठरविण्याचा कायदा हिंदुस्थानच्या कौन्सिलानें मंजूर केला. तो दिवस आजच्यासारखा कांहीं समारंभ करून साजरा करण्याचा क्रम या शहरीं आज पुष्कळ वर्षें चालू आहे. यंदा या समारंभाच्या प्रसंगीं, 'तुम्ही भाषण कराल काय?' अशी विनंति आपले मित्र रा. रामचंद्र भिकाजी जोशी यांनीं मला दहा बारा दिवसांपूर्वीं केली व ती मीं बऱ्याच नाखुषीनें कबूल केली. याचें कारण उघडच आहे. यापूर्वीं अशा सभांस पुणें येथें मी दोन चार वेळां हजर होतों; तथापि अशा सभेच्या ठिकाणीं मुख्य भाषणच मला करावें लागेल अशी कल्पना मला पूर्वीं कधींहि आली नव्हती. माझी सर्वच परिस्थिति अशा गोष्टीस प्रतिकूल आहे. सामाजिक सुधारणा ही इतर चार लोकांप्रमाणें, मलाहि जरी इष्ट वाटत असली तरी त्या बाबतींत मी आजपर्यंत विशेष विचार अगर वादविवाद केलेला नाहीं. समाजशास्त्राचें माझें अध्ययन थोडें आहे. शिवाय, माझा मुख्य व्यवसाय जरी वर्तमानपत्रकाराचा आहे, तरी राजकीय बाबीइतकें सामाजिक बाबीसंबंधानें माझ्या हातून आजपर्यंत लिहिणें झालेलें नाहीं; कारण आजच्या स्थितींत सामाजिक सुधारणा ही अवश्य हवी असें जरी मला वाटतें तरी राजकीय सुधारणा आणि ती घडवून आणण्याची खटपट ही त्यांतल्यात्यांत लोकांकडून अधिक नेटानें झाली पाहिजे असें माझें मत आहे. कदाचित् हें मत आपणांपैकीं कित्येकांस नापसंत असण्याचा संभव आहे; तथापि मला वाटतें तें सांगितलें याची माफी असावी; पण सर्व बाधक गोष्टींत मुख्य ही कीं, इतर कित्येक गृहस्थांप्रमाणें सामाजिक सुधारणेच्या कामीं झीज सोसून आपली कळकळहि माझ्या हातून अद्यापि फारशी व्यक्त झालेली नाहीं. तात्पर्य, पुनर्विवाहासारख्या वादग्रस्त व कठीण विषयावर आजच्यासारख्या प्रसंगीं अधिकारयुक्त वाणीनें बोलण्यास माझ्या अंगीं कोणत्याच दृष्टीनें पात्रता आहे असें माझें मन मला सांगत नाहीं.

असें असतां रा. जोशी यांच्या विनंतीवरून पुनर्विवाहाच्या विषयावर भाषण करण्याकरितां आज आपल्यापुढें मी उभा राहिलों याचें कारण एकच आहे व तें हें कीं, मी भाषण करण्याचें नाकारल्यामुळें माझ्या मतासंबंधानें ज्या कोणाचा अनुकूल अगर प्रतिकूल कोणत्याहि प्रकारचा गैरसमज होण्यासारखा असेल तो न व्हावा, आणि प्रस्तुत विषयासंबंधींचें माझें कर्तव्य या निमित्तानें तरी थोडेंबहुत हातून घडून यावें. जगांत आपण सर्वच सर्वप्रसंगीं शंभरनंबरी सत्यवक्ते नसतों; आणि व्यवहारदृष्ट्या पुष्कळ प्रसंगीं स्वतःचे विचार व्यक्त करण्यापेक्षां ते व्यक्त न करून दाखविणें यांतच एकंदरीनें खरा शहाणपणा अगर मुत्सद्देगिरी असेल. तथापि, मनाचें खरें समाधान जर कशांत आहे असें म्हणाल तर ते आपले विचार व्यक्त करून दाखविण्यांतच असतें याबद्दल शंका नाहीं. आतां एखाद्याच्या विचारास किंमतहि जितक्याच तितकीच असेल; व म्हणून अशा मनुष्यानें आपले विचार बोलून दाखविले काय अगर आपल्याच मनांत ते गुरफटून ठेविले काय, दोन्हींचीहि फलश्रुति समाजाच्या दृष्टीनें पाहतां सारखीच ठरेल. आणि पुनर्विवाह या विषयावरील माझे विचार वर दर्शविलेल्या किंमतीचेच आहेत असें मला वाटतें. तथापि, कोणाहि मनुष्याचे सार्वजनिक विषयावरील विचार ही एक प्रकारें त्याच्या ताब्यांत असलेली सार्वजनिक मिळकतच आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं; व "ही मिळकत कोणत्या स्थितींत आहे ती दाखवा" असा समाजांतील एकानें दुसऱ्यास सद्धेतूनें प्रश्न केला असतां ती दाखविणें हें त्याचें कर्तव्य आहे. बरें, विचार बोलून दाखविणाराचाहि त्यापासून तोटा होत नाहीं; फायदाच होतो. कारण कोणाचेहि विचार मनांतल्या मनांतच जोंपर्यंत घुटमळत असतात तोंपर्यंत त्यास कांतीव स्वरूप येत नाहीं. हें स्वरूप ते विचार मनांतून बाहेर पडतांनाच येतें. जीभ किंवा लेखणी यांना कुरुंदाच्या सहाणेची उपमा देण्यास हरकत नाहीं. या सहाणेवर घांसून बाहेर पडतांना मनाचें व त्यांतील विचारांचें तादात्म्य हळूहळू सुटत जातें; व आपणच आपल्या स्वतःच्या टीकाकाराचें थोडेंबहुत काम करावयास लागतों. विचार बाहेर पडल्यावर, ते अर्थातच सार्वजनिक होतात. मग उरलेलें टीकेचें काम समाजांतील लोक करतात. आणि अशा रीतीनें आपल्या विचारांच्या

किंमतीची आणेवारी कळण्यास आपणास मदत होते. मौन हें एका दृष्टीनें ' सर्वार्थसाधक ' आहे खरें; परंतु मौनापासून एक अर्थ मात्र साधत नाहीं, व तो हा कीं, आपल्या विचारांचें लोकांकडून होणारें परीक्षण. राजकीय विषयांत कित्येक वेळां कित्येकांस नाइलाजास्तव मौन धरावें लागतें; परतु सामाजिक व धार्मिक विषयांत मौन धरण्याचें खरोखर कोणासच कारण नाहीं. या बाबतींत आपणांस कोणी निग्रहानुग्रही नियंता नाहीं म्हणून नव्हे–तर आपणांस या बाबतींत बहुतेक पूर्ण स्वराज्य आहे म्हणून. समाज हाच समाजाचा राजा; समाज ही समाजाची प्रजा; समाज हेंच समाजाचें पार्लमेंट; आणि समाज हेंच समाजाचें न्यायमंदिर. समाजांतील प्रत्येक मनुष्यास ज्याच्या त्याच्या ऐपतीप्रमाणें, कायदा बनविणें, न्याय निवडणें व त्यांची अंमलबजावणी करणें, यासंबंधाचे अधिकार केवळ जन्मतः व कोणीहि नेमणूक न करतां अगर अधिकारपत्र न देतां प्राप्त होतात. यास्तव या बाबतींत केवळ मौन धारण करणें हें बरोबर होणार नाहीं.

तथापि, यावरून पुनर्विवाहाच्या कार्यास आपली सहानुभूति व्यक्त करण्यास मी आजच प्रथम तयार झालों आहे असें मात्र नाहीं. १८९४ सालीं प्रो० कर्वे हे साताऱ्यास या बाबतींत लोकमत समजून घेण्यास आले होते, त्या वेळीं माझी या कार्यास सहानुभूति आहे असें मीं लिहून दिलें होतें. १८९६ सालीं मी ' विधवाविवाह–निषेधप्रतिबंधक ' सभेचा ' साहाय्यकर्ता ' सभासद झालों. विधवाविवाहांच्या पानसुपाऱ्यांना मी कित्येक वेळां गेलों आहे. तीन चार वर्षांपूर्वी पुनर्विवाहावरील एका नाटकग्रंथाचें ' पुस्तकपरीक्षण ' करतांना मीं पुनर्विवाहासंबंधानें अनुकूल मत व्यक्त केलेलें होतें. या व्यक्तिविषयक गोष्टी सांगण्याचें एरवीं मुळींच कारण नव्हतें, व त्या गोष्टीस एरवीं कांहीं महत्त्वहि नाहीं. परंतु, माझ्या विशेष प्रकारच्या परिस्थितीमुळें मला त्या सांगाव्याशा वाटल्या व त्या सांगितल्याबद्दल आपण मला क्षमा कराल अशी आशा आहे.

पुनर्विवाहाच्या कार्यास याहून अधिक मदत माझ्या हातून झालेली नाहीं हें मी प्रांजलपणें कबूल करितों आणि याचें एक कारण वर दर्शविण्यांत आलेंच आहे. तथापि, आणखीहि असें आहे कीं, एखाद्या गोष्टी-

विषयीं सहानुभूति असूनहि तिचें प्रत्यक्ष काम हातून होणें न होणें कांहीं अंशीं स्वभावावर व रुचिभेदावर अवलंबून आहे. जगांत सार्वजनिक स्वरूपाचीं शेंकडों कार्यें असतात; व त्यांचें कार्य निरनिराळ्या लोकां-कडून होतच असतें. परंतु केवळ रुचिभेदामुळें कोणी कोणतें तर कोणी कोणतें उचलीत असतो. याला कारण सांगतां येणें शक्य नाहीं. विवक्षित मनुष्याच्या स्वभावांत त्रिगुणांपैकीं अनेकांचें मिश्रण विवक्षित प्रमाणानेंच कां होतें याचें कारण जो सांगूं शकेल तोच वरील गोष्टीचेंहि सांगूं शकेल. हें सर्व मी मलाच उद्देशून म्हणत नाहीं. तर माझ्यासारख्या म्हणजे पुनर्विवाहास सहानुभूति असतांहि ज्यांच्या हातून त्या कार्यास विशेष प्रत्यक्ष मदत होत नाहीं असें दिसतें अशा शेंकडों लोकांसंबंधानें हें मी बोलतों. सर्वांसच सर्व गोष्टी करतां येणें शक्य नसतें. स्वार्थ नसतां केवळ परार्थदृष्टीनें एखादें-अर्धें काम करणारांना ही आवडनिवड टाळतां येत नाहीं. म्हणून कोणाहि मनुष्याच्या हातून एकंदरीनें पाहतां परार्थसाधक थोडेंबहुत कृत्य होतें कीं नाहीं इतकेंच पहावें. तो अमुकच करतो पण अमुक करीतच नाहीं यावर फारशी दृष्टि ठेवूं नये, निदान दोष देऊं नये. असें न करतां केवळ नडविण्याच्या अगर नांव ठेवण्याच्या दृष्टीनेंच आपण पाहूं लागलों तर कोणीहि त्यांतून सुटणार नाहीं. वैदिकाला म्हणावें तूं पंडित कां झाला नाहींस ? व पंडिताला म्हणावें तूं वैदिक कां नाहीं झालास ? प्रो० कर्व्यांना म्हणावें कीं, ‘ तुम्ही राजकारणांत मुळींच पडत नाहीं म्हणून तुम्हीं फुकट, ’ व लो० टिळकांना म्हणावें कीं, ‘ पुन-र्विवाहाच्या कामीं जर तुम्हीं आपल्या वर्तमानपत्राचे रकाने खर्ची घातले नाहींत तर तुम्हीं आजपर्यंत सार्वजनिक हित तें काय साधलें ? ’ ‘ प्राणि-दुःखनिवारक ’ संस्थेचा चिटणीस वर्गणी मागावयास आला म्हणजे त्याला विधवांच्या दुःखांचें वर्णन करून घालवून द्यावा; आणि ‘ विधवादुःखनिवारक ’ सभेचा चिटणीस वर्गणी मागावयास आला म्हणजे त्याला म्हणावें कीं, ‘ अहो, विधवा काय मनुष्यप्राणी आहेत; त्यांना कांहीं पोट भरण्याचें काम करतां तरी येईल; पण पांजरपोळांतल्या मुक्या जनावरांनीं काय करावें ? ’ तात्पर्य, एकाची दुसऱ्यास व दुसऱ्याची तिस-ऱ्यास अशी सबब काढून वाटेल त्याला नडवितां अगर नांव ठेवितां येईल.

The Better is the enemy of the Good ही इंग्रजी म्हण आपण ऐकिलीच असेल; परंतु एक तर सर्वांस सर्वच गोष्टी सारख्या उत्साहानें करतां येणें शक्य नसतें. उत्साह हा स्वभावत:च एकदेशीय असतो. त्याची सर्व ठिकाणीं सारखी वांटणी करतां येत नाहीं. आपल्या उत्साहाचा विषय हुडकून काढितांना मनुष्य अभिरुचि आणि परिस्थिति याप्रमाणें त्याची निवड करीत असतो; व या रुचिभिन्नतेमुळें आयताच श्रमविभागहि होतो हें लक्षांत ठेविलें पाहिजे. जें काय हवें तें इतकेंच कीं, सार्वजनिक कार्याच्या निरनिराळ्या खात्यांत काम करणाऱ्या मनुष्यांचें चित्त परस्पर-शुद्ध पाहिजे. आपण अंगिकारलेल्या कृत्याबद्दल जसा अभिमान व आवेश, तशीच दुसऱ्यानें रुचिभेदामुळें उचललेल्या कामाबद्दल आपली सहानुभूति असावी, आणि प्रसंगविशेषीं निरनिराळ्या शाखांत काम करणारीं मनुष्यें एकत्र यावीं, व त्यांनीं खांद्यास खांदा लावून काम करण्यास तयार असावें इतकें असलें म्हणजे पुरें. समाजाच्या खेतींत गुंतलेले आपण सर्व सारख्याच किंमतीचे नसलों तरी सारख्याच जरूरीचे शेतकरी आहों. कोणाचें काम नांगरणी–वखरणीचें तर कोणाचें बीं पेरण्याचें, किंवा कोणाचें पाणी लावण्याचें असेल. सार्वजनिक काम करणाऱ्या लोकांना एखाद्या दवाखान्यांतील कार्यकारी लोकांची ही उपमा शोभेल. कोणास रोगचिकित्सा, तर कोणास शस्त्रवैद्यक येतें; कोणी रोगांचें निदान ठरविण्यांत गुंतलेला असतो, तर कोणी औषध घोंटीत असतो; कोणी भूल देत असतो, तर कोणी शस्त्रक्रिया करीत असतो; कोणी मलम लावीत असतो तर कोणी रोग्यांचें औषधपाणी व पथ्याचें तयार करीत असतो. यांपैकीं प्रत्येकाची किंमत कमजास्त असेल, व सुज्ञ समाज ज्याची जी किंमत योग्य तीच ठरवीत असतो. परंतु सांगण्याचा मुद्दा इतकाच कीं, एकाच दवाखान्यांत वावरणाऱ्या अशा या लोकांनीं मिळून–मिसळून वागलें पाहिजे; दुसऱ्यांचें उणें तें केवळ पूर्ण करण्यापुरतेंच लक्षांत आणलें पाहिजे. एकमेकांचीं तोंडेंहि कधीं न दिसतील इतक्या उंच भिंती एकमेकांमध्यें घालून काम करूं म्हटलें तर कसें होणार?

आज विधवापुनर्विवाहाचा जो विचार मी आपणापुढें करणार आहे तो केवळ ‘ सारासार ’ दृष्टीनें. ही दृष्टि पक्षाभिमानाची नसून सार–ग्राह-

त्वाची आहे. हर्बर्ट स्पेन्सर यानें सत्यान्वेषण करण्याची जी रीति सांगितली आहे ती कोणाहि विचारी मनुष्यास पसंत होण्यासारखी आहे. तो म्हणतो, कोणत्याहि पक्षांत सत्य हें थोडेंबहुत असतेंच; तें सर्व एकाच पक्षांत केव्हांहि सांपडत नाहीं. याचें कारणच असें कीं कोणत्याहि विषया-संबंधाचे सिद्धांत त्याजकडे ज्या दृष्टीनें पहावें त्या दृष्टीनें बदलतात. एकच वस्तु निरनिराळ्या परिस्थितींत निरनिराळी दिसते; व तिच्या सर्व बाजू व्यापकपणें लक्षांत घेऊन सर्वांस लागू पडणारा असा सत्य सिद्धांत थोड्या शब्दांत मांडणें हें मनुष्याच्या शक्तीच्या बाहेरचें काम आहे. एकाच हत्तीचें पांच आंधळ्या मनुष्यांनीं निरनिराळें वर्णन केल्याचें मूर्धाभिषिक्त उदाहरण वेदांतचर्चेंत नेहमीं देतात तें इतर विषयांच्या चर्चेंतहि घेण्या-सारखें आहे. विधवाविवाहाचा विचार शास्त्र व रूढि, समाज व व्यक्ति इतक्या निरनिराळ्या दृष्टींनीं करावयाचा असतो; व या प्रत्येक दृष्टीनें पाहूं गेलें असतां अर्थात् सत्य सिद्धांतहि थोडाबहुत निरनिराळा निघतो. सारा-सार विचार म्हणजे अशा अनेक बाजूंनीं निघणाऱ्या सत्य सिद्धांतांच्या एकीकरणाचा प्रयत्न.

विधवाविवाहासंबंधानें शास्त्रीय दृष्टि ही अर्थात् सकृद्दर्शनीं अत्यंत मह-त्त्वाची दृष्टि वाटते. परंतु आज सुमारें ५०।६० वर्षें या प्रश्नाचा या दृष्टीनें विचार होत आला असूनहि, त्याचा समर्पक निर्णय झाला नाहीं हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. आणि यापुढें शेंकडों वर्षें गेलीं तरी निवळ शास्त्रदृष्ट्या सर्वसंमत असा त्याचा निर्णय होईल कीं नाहीं याची शंकाच आहे. असा निर्णय होण्यास अडचणीहि अतिदुस्तर आहेत. सर्व प्रकारच्या सांसारिक व पारमार्थिक धर्मचोदनांचें मूळ धर्मशास्त्रांत सांपडतें अशा समजुतीनें हिंदुसमाज हा या मूळास सदोदित कवटाळून बसलेला असतो. हिंदुसमाजाहून अधिक पुराणप्रिय असा दुसरा कोणताहि समाज आढळणार नाहीं; परंतु तें सनातन मूळ प्रत्यक्ष व्यवहारांत पावलोंपावलीं सोडून आपण किती दूर जातों याविषयीं हिंदुसमाजाइतका कानाडोळा करणारा समाजहि दुसरा सांपडणें शक्य नाहीं. ‘ शास्त्र ’ हा आपणास दोन अक्षरीं लहानसा सुटसुटीत शब्द वाटतो खरा. परंतु आपल्या पुराणांतील मायावी शंबरा-सुराप्रमाणें किंवा युरोपियन पुराणांतील Proteus प्रमाणें शास्त्र हें अत्यंत

चपळ व प्रतिक्षणीं आपलें स्वरूप बदलविणारें आहे. त्याची व्याप्ति–त्याचा निश्चितार्थ–ठरविणें हें अत्यंत दुर्घट कर्म होय. भारतांत म्हटलें आहे कीं, धर्माचें स्वरूप कसें आहे तर—

अणीयान् क्षुरधारायाः गरीयान् अपि पर्वतात् ।

... ... ... ... ... ...

गंधर्वनगराकारः प्रथमं संप्रदृश्यते ।

अन्वीक्ष्यमाणः कविभिः पुनर्गच्छत्यदर्शनं । १ ।

याचा अर्थ असा कीं, धर्म हा शस्त्राच्या धारेहून सूक्ष्म पण पर्वताहूनहि स्थूल आहे. दुरून आकाशांत गंधर्व नगरी भव्य अशी दिसते, परंतु बुद्धिमान् पुरुष तिच्या स्वरूपांत खोल शिरून पाहूं लागले म्हणजे ती दिसेनाशी होते.

या सर्वांचीं कारणें दोन आहेत. एक तर मूळ एका शास्त्रास किंवा मतास लवकरच अनेक शाखा फुटतात; व दुसरें असें कीं या अनेक शाखांचा विस्तार कितीहि मोठा वाढला तरी नसत्या एकवाक्यतेची कल्पना करून त्या सर्वांची एकत्र गांठ मारण्याचा प्रयत्न केलाच पाहिजे अशी धर्मशास्त्राधिष्ठित देवतेची अत्यंत सक्ति असते. यामुळें हंसूं येण्यासारखे प्रकार घडून येतात. आजकालच्या कायदे कौन्सिलांनीं सावकाशपणें हव्या तितक्या विस्तारानें, स्वतःचीं उदाहरणें व टिपणें देऊनहि, रचलेल्या कायद्याचे अर्थ करतांना जर हंसूं येण्यासारखीं अनिश्चिततेचीं उदाहरणें घडून येतात, तर ज्या काळीं सूत्ररूपानें लिहिण्याची पद्धति सुरू होती त्या काळीं रचलेल्या धर्मनिबंधासंबधानें असें व्हावें यांत कांहींच आश्चर्य नाहीं. आजकाल नवीन कायदा होणें तो आधीं मसुदा तयार होऊन प्रसिद्ध केल्यावर अनेकांनीं अनेक वेळ वाचून मग मंजूर होतो. परंतु कायदा होतो न होतो तोंच त्याची दुरुस्ती करण्याचे प्रसंग आलेले आपण कैक वेळां पाहातों. सरकारी पब्लिक वर्क्स खात्याच्या कामाप्रमाणेंच, सरकारी कायदेकानू करण्याच्या खात्यामध्येंहि, इमारत एका टोंकास बांधून संपते न संपते तोंच दुसऱ्या टोंकाकडून तिची रिपेरी–दुरुस्ती–करण्याची पाळी येऊन ठेपते! कायदा व त्याचा अर्थ यांची जणूं काय निरंतर शर्यत लागलेली असते. अर्थ हा पुढें पळत असतो, आणि कायद्यावर मात

करण्यास युक्त्या योजणारे स्वार्थतत्पर व कल्पक पक्षकार, त्यांनीं द्रव्य देऊन तर्कट करण्याच्या कामगिरीवर मोकळे सोडलेले मीमांसानिपुण बाताडे कायदेपंडित, व आपल्या लहानमोठ्या मनाच्या मापानें पक्षकारांच्या पदरांत न्याय ओतणाऱ्या मापाड्या न्यायमूर्ति–ही सर्व मंडळी कायद्याच्या अर्थास कायद्याला सोडून पुढें पळण्यास नकळत नित्य चिथावीत, उत्तेजन देत व मदत करीत असतात. यामुळें माणसाची सावली ज्याप्रमाणें ऐन मध्यान्हीस फक्त एक क्षणमात्र बरोबर त्याच्या पावलाखालीं पडते, एरवीं चारहि प्रहर त्याच्या अंगाला सोडून केव्हां जवळ तर केव्हां लांब गेलेली दिसते, तीच गोष्ट कायद्याचे शब्द व कायद्याचा अर्थ यांचीहि आढळून येईल. कांचेच्या कारखान्यांत जशीं कांचेचीं फुटकीं भांडीं वितळावयाला, किंवा रफूगाराच्या दुकानीं फाटलेलीं वस्त्रें रफू करावयाला नित्य येतच असतात, त्याप्रमाणें फुटलेले, तुटलेले, भंग पावलेले असे कायदे कौन्सिलपुढें नीट करण्याकरितां पुनः पुनः आणिले जात असतात. बरें, कायद्यांच्या कारखान्याचें काम इतक्या झपाट्यानें चालू आहे म्हणून पक्षकारांस कधीं समाधान झालें असें घडतें काय ? नाहीं. सातासमुद्रांपलीकडे प्रिव्ही कौन्सिलच्याहि वर न्यायकोर्टाची इमारत वाढवून आणखी चार मजले कोणी बांधले तरीहि ते त्यांस हवेच आहेत !

सरकारी कायद्यांची व न्याय कोर्टांची जेथें ही दशा तेथें धर्मशास्त्रांतील वचनांची काय ओढाताण व किती दुर्दशा होत असेल याचा विचार करणें अगदीं सोपें आहे. धर्मशास्त्रासंबंधानें मूळ समजूत अशी कीं, त्यांतील शास्त्रवचनें त्रिकालाबाधित आचाराकरितां निर्माण केलेलीं आहेत. तीं पुष्कळ वेळां सूत्ररूपानें त्रोटक लिहिलेलीं असतात. आजच्या स्मृति जरी श्लोकबद्ध आहेत तरी अगदीं पहिल्या पहिल्या स्मृति सूत्रबद्ध असाव्या असा कित्येकांचा तर्क आहे. यामुळें एकाच ब्रह्मसूत्रांतून द्वैताद्वैतप्रतिपादक असे चार पांच वेदांत पंथ जसे निघाले, किंवा एका श्रुतींतूनच ज्याप्रमाणें शैव, वैष्णव, शाक्त, गाणपत्य वगैरे उपासनामार्ग निघाले, त्याचप्रमाणें धर्मशास्त्राच्या सूत्रांतूनहि अनेक आचारमार्ग निघावे यांत आश्चर्य नाहीं. धर्मशास्त्रांत मूळ ग्रंथ एकपट तर त्यावरील टीका, व्याख्या, भाष्यें इत्यादिकांचा ग्रंथ शतपट वाढलेला असतो. व एका बाजूनें मूळ ग्रंथाचें जितकें

स्पष्टीकरण करण्यास, तितकेच दुसऱ्या बाजूनें त्याच्या अर्थामध्यें घोंटाळा उत्पन्न करण्यास तो कारणीभूत होतो. हा ग्रंथसमूह प्रमाण मानण्याची आपली मनापासून फार इच्छा असते. परंतु तसें प्रत्यक्ष घडण्यास अतिशय अडचणी असतात. श्रुति ही मूलाधार खरी; परंतु तिजमध्यें सर्व विषयांसंबंधानें व्यापक अशा धर्मचोदना सांपडत नाहींत. शिवाय श्रुतींतहि शाखा असल्यानें सर्वच श्रुति सारखी प्रमाणभूत मानली जात नाहीं. श्रुतींच्या खालोखाल स्मृति येतात. परंतु स्मृतिग्रंथ इतके आहेत, कीं त्यांची एकवाक्यता करणें कठीण आहे. मूळ स्मृतींच्या संख्येपासूनच अडचण. अग्निपुराण, गरुडपुराण यांत व याज्ञवल्क्य स्मृतींत २० स्मृति सांगितल्या आहेत. हेमाद्रि ३२ सांगतो. भारतांत २८ उपस्मृति असल्याचें लिहिलें आहे. वीरमित्रोदय १८ मुख्य व १८ उपस्मृति असल्याचें सांगतो. मयुखाप्रमाणें पहातां ९७ स्मृति आहेत. यानंतर त्यांच्या कालनिर्णयाची अडचण येते. व स्मृति केवळ जसजशी अधिक जुनी तसतशी ती अधिक प्रमाण हेंहि म्हणणें टिकत नाहीं. पाराशरस्मृति ही मनुस्मृतिपेक्षां अलीकडची आहे, परंतु हल्लीं कलियुग असल्यानें पाराशरस्मृतीच प्रमाण मानावी असें वचन आहे. शिवाय सर्वच स्मृति सारख्या बलवान नाहींत. त्यांत प्रबळ दुर्बळ एवढेंच नव्हे तर वृद्ध, तरुण, बृहत्, लघु हा भेद केला जातो. "स्मृतिद्वैधं तु यत्र स्यात् तत्र धर्मौ उभावपि" या वचनानें वेळ मारून नेल्यासारखी होते, खरी परंतु खऱ्या विरोधामुळें उत्पन्न झालेल्या शंकेचें बरोबर समाधान होत नाहीं. शिवाय नुसत्या स्मृतींच्या एकवाक्यतेनेंहि काम भागत नाहीं. कारण कल्प, तंत्र, पुराण, आचार, रूढि, अर्थशास्त्र, व्यवहार या सर्वांचा मेळ स्मृतींशीं घालावा लागतो. 'स्मृतितुल्यानि पंचरात्राणि' असेंहि वचन आहे. तंत्रांची संख्या ६७ किंवा ११४ आहे असें म्हणतात. पुराणांची संख्या १८ पासून ६८ पर्यंत जाते. पुष्कळ पुराणें धडधडीत आधुनिक आहेत; व तीं सर्व प्रमाण मानणें म्हणजे निव्वळ अनवस्थाप्रसंग. अशा तऱ्हेच्या विविधागम शास्त्रांतून प्रत्येक बाबतींत समर्पक व स्पष्ट धर्मचोदना काढून दाखविणें कठीण असलेंच पाहिजे.

बरें कायद्याचें हें साहित्य सर्व ठीक असलें तरी त्याचा अर्थ सांगणारा

ही कोणी तरी मानवी व्यक्तीच असणार. अप्रतिष्ठित असा तर्क व बलवान् असे पूर्वग्रह यांच्यामुळें त्यानें दिलेला निर्णय सर्वसंमत कसा होणार ? प्रत्येकाचे पूर्वग्रह वेगळे व ज्याची त्याची तर्कपद्धतीहि वेगळी. The measure of Equity varies with each chancellor's foot अशी इंग्रजी कायद्यासंबंधानें एक म्हण आहे, तीच धर्मनिर्णयांतहि लावितां येईल. राजकीय कायद्याच्या निर्णयांतहि अशीच अडचण असली तरी न्यायकोर्टांच्या परंपरा असून अखेरचें म्हणून एक न्यायकोर्ट असतें; व न्यायकोर्टांचे निकाल सक्तीनें का होईना पण ऐकणें भाग पडतें. धर्मशास्त्राची गोष्ट तशी नाहीं. धर्मगुरूंची परंपरा असल्यामुळें गादीनशीन सर्व व्यक्ति सर्वकाल सर्वशास्त्रपारंगत विद्वान नसतात. अर्थात् ते आश्रित वर्गापैकीं एखाद दुसऱ्या शास्त्र्यावर अवलंबून असणार. शिवाय खुद्द धर्मगुरु व त्यांचे सल्लागार यांच्याबद्दल लोकांत आदर असावा असे ते असतातच असेंहि नाहीं. पेशवाईंत पुनर्विवाहाच्या शास्त्रार्थाचा वाद निघाला तेव्हां काशीकडे धांव घ्यावी लागली, व त्या वेळच्या शंकराचार्यांनीं आपला खासगी द्वेष धर्मनिर्णयाच्या कामीं आणला. याच्या उलट मिरजेस पुष्कळ वर्षेंपर्यंत खुद्द शंकराचार्यच बहिष्कृत होते.

आजपर्यंतच्या धर्मशास्त्राच्या वादांस द्वंद्वयुद्धाचेंच स्वरूप होतें असें म्हटलें असतां चालेल. शंकराचार्य व मंडनमिश्र यांच्या वादामध्यें खुद्द सरस्वती सरपंचाचें काम करण्यास मिळाली तशी प्रत्येक शास्त्रार्थाच्या वादांत ती अवतीर्ण व्हावी इतकी सरस्वतीस फुरसत किंवा आमची पुण्याई तरी कोठें आहे ! व्यक्तीच्या बुद्धिबळावर किंवा यशापयशावर कोणत्याहि सिद्धांताचें सत्यासत्य अवलंबून ठेवणें हें मनास वास्तविक कसें पटणार ? बौद्ध व शाङ्करमतवादी यांच्या वादांचा निर्णय तर कैक वेळां केवळ पैजा लावून झाला; व आपल्या भक्तांच्या पैजा पार पाडण्यास प्रत्यक्ष भगवंताला त्या कामीं मन घालावें लागलें. पण धर्मभ्रष्ट मानल्या गेलेल्या या विसाव्या शतकांत तें कसें होणार ? धार्मिक वादाचें वैय्यर्थ्य गेल्या पन्नास वर्षांत आपल्या इलाख्यांत जे मोठे दोन वाद झाले त्यांवरूनहि दिसून येण्यासारखें आहे. १८७० सालच्या पुनर्विवाहाच्या वादांत मतभेद झाला; व हा मतभेद असा आहे कीं, ज्युरींत अशा प्रकारचा मतभेद झाला असतां आरो-

पंचाची फिरून चौकशी कोणा न्यायाधिकाऱ्यास करावीशी वाटती तर ती करतां आली असती. कारण या वादांतील एका पंचानें दिलेल्या अभिप्रायाबद्दलच त्या वेळीं जबरदस्त वाद उत्पन्न झाला होता, व तें किरकोळ बाबींतलें भांडणच मूळच्या भांडणाहून अधिक माजलें. दुसरा वाद पुण्यांतील ग्रामण्याच्या वेळचा. या वादांत वादी प्रतिवादींतच अर्ध-शुक्ल, शुक्ल, अर्ध-कृष्ण, कृष्ण असे चार पक्ष उत्पन्न झाले; न्यायाचें काम सोंपविलेल्या अधिकाऱ्यांवर वाटेल त्या प्रकारचे आरोप आणण्यांत आले; व अखेर श्रींनीं निर्णय दिल्यानंतरहि वादींनीं तो मान्य केला नाहीं. शंकराचार्योनीं झाला तरी यथाशास्त्र निर्णय दिला तरच तो आम्ही मानूं, अशी तक्रार पुढें आली. त्यानंतर अलीकडे खुद्द श्रींच्या श्रीचीच कसकशी दुर्दशा झाली हें सर्व लोकप्रसिद्ध आहेच. तात्पर्य, राजकीय कायद्याच्या निर्णयासंबंधाच्या सर्व नडी धर्मशास्त्रांतील निर्णय करण्याच्या मार्गांतहि आहेतच; परंतु शिवाय धर्मशास्त्राच्या निर्णयाची अंमलबजावणी करतां येत नाहीं, व नेहमीं वाद केले तरी ते फुकट जातात, ही अडचण विशेष आहे.

ही शास्त्रनिर्णयाची अडचण आजकाल आम्हांसच भासते असें नाहीं. महाभारतांतील अनुशासनपर्वांत धर्मराजानें अशाच प्रकारची शंका काढलेली आहे. श्रुति, आचार, तर्क या सर्वांचा मेळ खरोखर बसतोच असें नाहीं, असें धर्मालाहि दिसून आलें होतें. तो भीष्मास म्हणाला—

“ पुनरेव हि मे बुद्धिः संशये परिमुह्यति ।
अपारे मार्गमाणस्य परं तीरमपश्यतः ।।
वेदः प्रत्यक्षमाचारः प्रमाणं तु त्रयं यदि ।
पृथक्त्वं लभ्यते चैषां धर्मश्चैकः कथं त्रयं ! ” ।।

धर्माला तीन प्रमाणें असतील व त्या तीन प्रमाणांचा परस्पर मेळ नसेल तर धर्महि तीनच होतात कीं नाहीं ? ही धर्मराजाला आलेली शंका स्वाभाविक होती. तिला भीष्मांनीं आपणाकडून उत्तर म्हणून दिलें, परंतु माझ्या मतें तें समाधानकारक नाहीं. भीष्म म्हणाले—“ धर्माला तीन रूपें दिसतात खरीं; परंतु तीं केवळ दांडग्या व दुष्ट लोकांनीं आणलेलीं व भासविलेलीं असतात. परंतु खरा धर्म एकच असतो. ”

५०

पण एक तर अनेकत्वाचा भ्रम उत्पन्न करणारीं माणसें नेहमीं दुष्ट बुद्धीनेंच भ्रम उत्पन्न करतात असें नाहीं, तर सद्बुद्धिप्रेरित विचारांनींहि भ्रम उत्पन्न होतो. शिवाय दुसरें असें कीं, भ्रम उत्पन्न करणाराची बुद्धि दुष्ट असली तरी त्यानें उत्पन्न केलेल्या भ्रमांतून पार पडून खरा धर्म दिसत नाहीं त्याला काय उपाय ! आपल्या अंगांत निर्णय करून घेण्याची ताकद नसली तर भ्रम उत्पन्न करणारावर रागावून काय होणार ?

असो; समाधानकारक शास्त्रनिर्णय जर कठीण आहे तर मग मनुष्यानें वागावें तरी कसें ? असा प्रश्न अर्थातच उत्पन्न होतो. व त्याचें उत्तर आपल्याच धर्मग्रंथांतून जें सांपडतें तें मात्र त्रिकालाबाधीत असून सर्वमान्य होण्यासारखें आहे. हें उत्तर असें आहे कीं, धर्मबुद्धीनें धर्माचा योग्य विचार करून मग मनुष्यास स्वतःच्या बुद्धीस योग्य दिसेल तसें वागावें ; केवळ भ्रम दुस्तर आहे म्हणून थांबूं नये. " प्रायेणाऽनृतवादित्वात् पुंसां भ्रांत्यादिसंभवात् । चोदनानुपलब्धेः च श्रद्धामात्रात् प्रमाणता " ॥ या वचनांत बराचसा सत्यांश आहे असें म्हणावें लागतें. मनुष्याच्या मनाची श्रद्धा हेंच अखेर सर्वोत्कृष्ट प्रामाण्यसाधन ठरतें व या प्रमाणावरच जगाच्या सुधारणेची नेहमीं भिस्त असते. आपल्या धर्मग्रंथांतून जितकें शास्त्राला तितकेंच आचाराला, म्हणजे शिष्टाचाराला, महत्व दिलेलें आहे ही गोष्ट कोणाहि चौकस मनुष्यास तेव्हांच दिसून येईल. व आचाराला महत्त्व देणें याचा अर्थच असा कीं शास्त्र हें सुद्धां वेळोवेळीं बदलणें जरूर असतें. आणि हें फेरबदल ज्या त्या काळाची बुद्धिमान्, विचारी व नीतिमान् अशीं पुढारी मनुष्यें घडवून आणीत असतात. शास्त्र इतकें विविध व गहन असल्यामुळें व्यक्तीच्या सदसद्विवेक बुद्धीला महत्त्व किंबहुना अग्रस्थान देण्याशिवाय केव्हांहि गत्यंतर नव्हतें. व्यक्तिमतस्वातंत्र्याचें माहात्म्य पूर्वाचार्यांनीं मानलें असल्याविषयीं वचनें वाटेल तितकीं सांपडतात. " शास्त्राद्रूढिर्बलीयसी " हें वचन सर्वप्रसिद्धच आहे. व हें वचन शास्त्रांत विकल्प असेल तेव्हांच लागतें असें सर्वांशीं नाहीं. मनुस्मृतींत त्रिकालाबाधित A priori-Deductive असे धर्मनियम सांगितले आहेत असें म्हणण्यापेक्षां त्यांत कालवश व चलनशील असे Inductive आचारच नमूद केले आहेत, हें म्हणणें अधिक शोभेल.

देशधर्मान् जातिधर्मान् कुलधर्मान् च शाश्वतान् ।
पाषंडगणधर्मांश्च शास्त्रेऽस्मिन् उक्तवान् मनुः ॥

कुलधर्म हे अर्थात् भिन्न आचारामुळेंच पडले असले पाहिजेत हें उघड आहे. महाभारतांत तर आचाराचें महत्त्व अत्यंत समर्पक रीतीनें वर्णिलेलें आहे. 'आचार हाच धर्माचा आधार आहे. धर्माचें स्वरूप आचारानें ओळखावें' असें त्यांत स्पष्ट सांगितलें आहे.

सर्वागमानां आचारः प्रथमं परिकल्प्यते ।
आचारप्रभवो धर्मः धर्मस्य प्रभुरच्युतः ॥

'बृहस्पति' म्हणतो—

यद्यदाचर्यते येन धर्म्यं वाऽधर्म्यमेव वा ।
देशस्याचरणं नित्यं चरितं तद्धि कीर्तितम् ॥

स्मृतिकार देवल म्हणतो—

आदौ तावत् देशधर्मो विचिंत्यो ।
देशे देशे या स्थितिः सैव कार्या ॥
लोकद्विष्टं पंडिता वर्जयंति ।
देवज्ञोऽतो लोकमार्गेण यायात् ॥

मनु म्हणतो—

यस्मिन् देशे य आचारः पारंपर्यक्रमागतः ।
वर्णानां सांतरालानां स सदाचार उच्यते ॥

अर्थात् हे सदाचार सर्व कांहीं सर्वदा सारखेच नव्हते. प्रत्येक काळ हा संक्रमण काळ असतो. व त्या काळामध्यें श्रेय व प्रेय यांचें द्वंद्वयुद्ध एकसारखें सुरू असतें. त्या काळचें जें जुनें तें त्याच्या पूर्वीच्या एके काळचें नवें असतें व आज जें नवें म्हणून दिसतें तेंच कालांतरानें जुनें होणार. प्रत्येक काळांत लोकमताची धांव शास्त्राच्या व रूढ आचाराच्याहि पुढें एक गहूंभर असतेच; मात्र त्या काळच्या पुराणाभिमानी लोकांना नवीन आचारांचें प्रवर्तन खपत नाहीं व यामुळें प्रत्येक काळांत धर्माच्या अवनतीची तक्रार असलेली आढळून येईल. 'नवीन पिढी धर्मभ्रष्ट' अशी ओरड आजच नाहीं तर शेंकडों वर्षें चालूच आहे. अनादर व अप्रीति काय ती येऊन जाऊन वर्तमानकालाबद्दल. एडमंड बर्क यानें म्हटल्याप्रमाणें

To complain of the age we live in, to murmur at the present possessors of power, to lament the past, to conceive extravagant hopes of the future, are the common dispositions of the greatest part of mankind, and indeed the necessary effects of the ignorance and the levity of the vulgar. Such complaints and humours have existed in all times. आज आमच्या दृष्टीनें भारतांत वर्णिलेला काल हेंच सुवर्णयुग असावें. परंतु खुद्द भारतकालीन लोक तरी आपल्या वर्तमानकालावर कोठें खूष होते ? आदिपर्वाच्या ६४ व्या अध्यायांत एका जुन्या सुवर्णयुगाचें वर्णन आहे त्यांत मात्र धर्माची अवनीति होत नसे !

स्वकर्मनिरताश्चासन् सर्वे वर्णा नराधिप ।
एवं तदा नरव्याघ्र धर्मो न ऱ्हसते क्वचित् ॥
आदि० अध्याय ६४–२४.

प्रेमाच्या ओघाप्रमाणेंच धर्मावनतीच्या अपवादाचाहि ओघ नेहमीं वरून खालच्या पिढीकडे वाहत असतो. पण मुलाला ज्याप्रमाणें कालांतरानें बाप व आजा होतां येतें, त्याचप्रमाणें आज धर्मभ्रष्टतेचा आरोप आलेली नवीन पिढी कालांतरानें जुनी होईल व स्वतःस बरें म्हणवून घेईल अशा विचारानें समाधान मानून घेणें जरूर आहे. समाजाच्या आयुष्याचा प्रवाह नदीच्या प्रवाहासारखा आहे. त्यांत उभें राहणाऱ्याच्या पायाखालची वाळू नेहमीं वाहून जात असते व नवी वाळू पायाखालीं येत असते. व हा सर्व व्यक्तिमताच्या स्वातंत्र्याचा व लोकमतप्रवर्तनाचा परिणाम. नदीच्या उगमाप्रमाणें रूढीचें मूळ व्यक्तीच्या मनांत असतें. लोकमतप्रवर्तनाचा परिणाम असा होतो कीं, रूढीला प्रारंभीं अपवाद सोसावा लागतो. परंतु रूढि हाच समाजाच्या वेळोवेळच्या शहाणपणाचा खरा आरसा आहे. रूढीचें प्रवर्तन करणारास प्रारंभीं त्रास पडतो हें खरें; तथापि, त्याची भरपाई पुढील पिढ्यांच्या सुखासमाधानानें व आशीर्वादानें होते. रूढि व शास्त्र यांचा संबंध भाषा व व्याकरण यांच्या संबंधाप्रमाणें आहे. भाषा ज्याप्रमाणें व्याकरणापुढें नित्य धांवत असते त्याप्रमाणेंच रूढि ही शास्त्रापुढें धांवत असते. भाषेकरितां व्याकरण आहे. व्याकरणाकरितां भाषा नाहीं. तीच गोष्ट शास्त्र व रूढि यांनाहि लागू आहे. आचारविचारांच्या परिणतीमुळें भाषेमध्यें उत्पन्न होणारे अपवाद ज्याप्रमाणें व्याकरणाच्या सर्व-

साधारण नियमांहून अधिक प्रबळ असतात, त्याचप्रमाणें रूढीहि शास्त्राहून प्रबळ असते. स्मृति ह्या व्याकरणाप्रमाणें Passive होत. व पूर्वी जशा आचारांना धरून नवीन नवीन स्मृति झाल्या तशाच यापुढेंहि होणार नाहींत कशावरून? धर्माचें चरित्र आजच संपलें आहे असें कोण म्हणेल? नवीन स्मृतिकारास धर्माचाराचें नवीन व्याकरण लिहिण्यास आज भरपूर साहित्य खचित तयार आहे. समाजाचें नशीब असेल तर स्मृतिकार होण्यासारखें ज्यांचें ज्ञानबल, तपोबल, शील, आचार वगैरे आहेत असे पुरुष कां न निर्माण होतील?

शास्त्रार्थासंबंधाचा हा सामान्य विचार जरासा लांबला. तथापि, तो लक्षांत आला म्हणजे पुनर्विवाहाच्या प्रश्नास कसा लागू करावयाचा हें सहजच दिसून येईल. पुनर्विवाहाच्या वादग्रस्त मुद्यावर सर्वसंमत असा शास्त्रार्थनिर्णय मिळेल अशी अपेक्षा करणें व्यर्थ होय. गेल्या ५०।६० वर्षांत असा निर्णय मिळविण्याचा फक्त एकच रीतसर प्रयत्न झाला पण तो व्यर्थ गेला. १८९३ सालच्या ग्रामण्यांतील निर्णय ज्या कारणाकरितां त्यांतील वादीस संमत झाला नाहीं तशाच कारणांकरितां १८७० सालीं झालेला पुनर्विवाहाच्या वादांतील निर्णय विधि–पक्षास संमत झाला नाहीं. अशा प्रश्नासंबंधानें वाद करण्यास लागणारी ईर्षा जरी आजहि आम्हां पुष्कळांमध्यें आहे तरी त्याचा सत्यनिर्णय समजून घेण्याइतकी निर्विकारता, व निर्णय झाल्यावर तो मानण्याइतका करारीपणा किती थोड्या लोकांत आढळून येईल? याकरितां विधवाविवाह सशास्त्र अगर अशास्त्र आहे याचें उत्तर परक्याकडून मिळविण्याच्या भानगडींत पडण्यांत अर्थ नाहीं. निश्चयात्मक सर्वसंमत निकाल मिळाला तर हवा आहे. पण तो मिळण्याचा संभव नाहीं इतकेंच कायतें, अशा स्थितीचाहि विचार स्मृतिग्रंथांत केलेला आहे.

"श्रुतिः स्मृतिः सदाचारः स्वस्य च प्रियमात्मनः।
सम्यक् संकल्पजः कामो धर्ममूलमिदं स्मृतं" ॥

हें याज्ञवल्क्य स्मृतींतलें वचन आहे. त्यामध्यें श्रुतिस्मृति याशिवाय सदाचार, स्वमन तुष्टि व सम्यक्–संकल्पज काम अशीं आणखी तीन धर्ममूलें सांगितलीं आहेत. हीं तिन्हां अर्थात् मूळ श्रुतिस्मृतींवर रचलेलीं पाहिजेत. परंतु वर दर्शविल्याप्रमाणें जेथें नुसत्या श्रुतिस्मृतीवरून काम

भागत नाहीं, निर्णय होण्यास अडचण पडते, तेथें शिष्ट जनांचा आचार, तो विविध असतां आपल्या मनाची पसंति, आणि इतक्यांनींहि काम न भागेल तेथें सम्यक् संकल्पजः कामः—म्हणजे परमार्थ बुद्धीनें व शुद्ध मनानें विचार करीत असतां सत्संकल्पानें उत्पन्न होणारी मनकामना—म्हणजे अंतः-स्फूर्ति—इचा आश्रय मनुष्यास करावा लागतो. नीतिशास्त्रांत सात्त्विक मनः-फूर्ति म्हणजे Intuition हींच सर्व नीतिमूलामध्यें श्रेष्ठ म्हणून मानलेली आहे. व त्याचें कारण असें कीं सात्त्विक विचाराच्या स्थितींत मनुष्याचें मन प्रायशः अनंत चित्शक्तीशीं एकात्मता पावतें व त्यास अशा स्थितींत सुचणारे विचार एका अर्थी ईश्वरप्रणीतच असतात. श्रुति व स्मृति या जशा स्वतःप्रमाण तसेंच विचारी मनुष्याचें मनहि विचारानंतर स्वतःप्रमाणच असतें. स्वतः आपणाखेरीज बाकी सर्व जग मात्र "स्वतःप्रमाण" मानणें हें दुर्बळतेचें लक्षण नव्हे काय ?

विधवाविवाहासंबंधानें अनुकूल व प्रतिकूल दोन्ही प्रकारचीं स्मृति-वचनें पाहणारास हें दिसून येईल कीं, सशास्त्र अगर अशास्त्र यांपैकीं कोणत्याहि प्रश्नास त्यांतून समर्पक (Absolute) उत्तर मिळणार नाहीं; जें काय निश्चयात्मक असें सांगतां येईल तें इतकेंच कीं, कित्येक वचनें लिहिलीं गेलीं त्या वेळीं तो लोकसमत होता व दुसरीं कित्येक वचनें लिहिलीं गेलीं त्या काळीं तो लोकांना असंमत होता व आजच्या घट-केला विधवाविवाह सशास्त्र आहे कीं नाहीं या प्रश्नाचें उत्तर 'तो आज लोकांस संमत आहे कीं नाहीं ? या प्रश्नाच्या उत्तरांतच आहे. तो लोक-संमत असेल तेव्हां सशास्त्र आहे व लोकसंमत नसेल तेव्हां अशास्त्र आहे. हें उत्तर दिसतांना थोडें चमत्कारिक दिसतें; परंतु त्याचा अर्थ इतकाच घ्यावयाचा कीं, लोकांची समति हेंच सशास्त्रतेचें मुख्य लक्षण होय व कित्येकांच्या मतें तें या घटकेला जरी थोडेंसें अस्पष्ट व अपुरें असलें, तरी कदाचित् लवकरच लोकांची अनुकूलता वाढल्याबरोबर, तें सर्वांगपूर्ण भर-पूर लक्षण पुनर्विवाहामध्यें विनटेल. आजपर्यंतचा आचाराचा इतिहास पहा, म्हणजे सशास्त्र तें अशास्त्र व अशास्त्र तें सशास्त्र लोकांनीं कसें करून टाकलें आहे ! निदान अशास्त्र गोष्टींची अशास्त्रता व्यावहारिकरीत्या कशी घालवून टाकिली आहे हें दिसून येईल. मांसभक्षण, मद्यप्राशन, बारा

तऱ्हांचे पुत्र, आठ तऱ्हांचे विवाह, नियोगानें पुत्रोत्पादन, पशुवधात्मक यज्ञ, सतीसारखे आचार, देवापुढचीं आत्मघातासारखीं घोर कृत्यें, अनेक पतित्व, अनेकभार्यात्व या वअशा प्रकारच्या गोष्टी जेव्हां एका वेळीं प्रचारांत होत्या तेव्हां त्या अर्थात् सशास्त्र मानल्या गेल्या असतीलच. आजमितीस या बहुतेक गोष्टी, त्या पूर्वी एक वेळ अस्तित्वांत होत्या या सबबीवर स्पष्ट शब्दांनीं अशास्त्र म्हणण्यास आपण तयार नाहीं हें खरें; परंतु आजच्या लोकाचाराच्या कसोटीवर घांसून पाहतां त्या अशास्त्रच ठरतील. याच्या उलट पुष्कळ गोष्टी पूर्वी अशास्त्र अशा स्पष्ट शब्दांनीं ठरलेल्या असतांहि आज लोक त्या करीत आल्यानें त्या जवळजवळ सशास्त्र ठरल्या आहेत. अशास्त्र असूनहि प्रायश्चित्त घेतल्यावांचून त्या करतां येतात तर त्या सशास्त्रच नव्हेत तर काय? जें कृत्य उघड जाणूनबुजून एकसारखें वाटेल तितके वेळ करितां येतें, व ज्याबद्दल सद्धर्माभिमानी लोक कोणत्याहि तऱ्हेचा आक्षेप घेत नाहींत त्यास गुन्हा तरी कसें म्हणतां येईल? योग्य वेळीं ब्राह्मणानें संध्यावंदनविधि न करणें याबद्दल कोणी कोणास कधीं प्रायश्चित्त दिलें आहे? म्लेंच्छांची भाषा आपण दररोज आवडीनें शिकत आहों एवढेंच नव्हे तर, पूर्वी प्रायश्चित्तार्ह मानलेल्या भाषेच्या ज्ञानाच्या मिळकतीवर आज किती हिंदु घराण्यांमध्यें धर्मविधि चालू आहेत? क्रयविक्रयादि शेंकडों निषिद्ध धंदे आम्ही ब्राह्मण लोक आज बेलाशक करीत आहों कीं नव्हे? मद्यस्पृष्ट व अभक्ष्यदूषित औषधें आज जीं आपण घेतों तीं आपण पूर्वी घेतलीं असतीं काय? ब्राह्मणानें बाजारचा वाटेल तो पदार्थ घेऊन खावा अशी व्यवहारामध्यें अप्रत्यक्ष परवानगी जवळजवळ सर्व हिंदुस्थानांत आज आहे कीं नाहीं? शूद्रस्पृष्ट जल सोडा वॉटर—वगैरे पदार्थ आपत्तीचा मागमूसहि नसतां ब्राह्मण लोकहि चैनीकरितां घेतात कीं नाहीं? आगगाडी, आगबोट यांतून होणाऱ्या दररोजच्या प्रवासानें स्पर्शास्पर्शविचार कितीसा शिल्लक उरूं दिला आहे? कांदा व लसूण यांजवर स्मृतिकारांचा किती कटाक्ष आहे? असें असतां आज तीं खाल्ल्याबद्दल कोणकोणास प्रायश्चित्त देतो? ब्राह्मणांनीं कुसीद म्हणजे व्याजबट्ट्याचा व्यापार करणें हें शास्त्राप्रमाणें पाहतां पाप आहे. असें असतां व्याजबट्ट्याच्या पैशावर घरोघर नैवेद्य वैश्वदेव प्रत्यहीं चालू आहेत कीं नाहींत?

मद्यपी मनुष्याला पंक्तीला घेण्यास आपण कितीशी कांकूं करितो ! संन्यास वगैरे गोष्टी कलिवर्ज्य म्हणून स्मृतींत सांगितल्या असतां त्या आपण निषिद्ध मानितों काय ! वर्णाश्रमधर्म व संस्कार हे आपणांमध्यें आज किती प्रमाणानें शिल्लक आहेत ! ब्राह्मणांनीं द्रव्य घेऊन विद्यादान करावें, अगर द्रव्याकरितां अहिंदूची सेवा करावी व त्यांच्या दास्यांत निरंतर रहावें याला कोणत्या स्मृतीचा आधार सांपडेल ! संस्कारासंबंधानें आपली दृष्टि व वागणूक कितीतरी औपचारिक व दिखाऊ झाली आहे ! 'के-स्तु' म्हटलें म्हणजे संध्येची थट्टा होते; परंतु ब्राह्मणाचा चार महिन्यांचा वेदाध्ययनविधि आपण श्रावणीच्या दिवशीं ब्राह्मणद्वारां निमिषार्धात उरकून टाकतोंच कीं नाहीं ! वानप्रस्थाश्रमाचें नांवाशिवाय आतां काय बाकी राहिलें आहे ! तात्पर्य, जिकडे पाहावे तिकडे, ज्यांना आपण श्रौतस्मार्त धर्माचार म्हणतों, त्यांची ही अशी वाताहत चहूंकडे दिसते.

यावर कोणी असें म्हणेल कीं, दहा निषिद्ध गोष्टी आपण करीत असलों तर ज्या आज करीत नाहीं अशांची भर त्यामध्यें कां घालावी ? शंका बरोबर आहे. आणि पापाला पापाची भर घातल्यानें पुण्य जोडतें असें कोणीच म्हणत नाहीं. दोन निषेधांनीं किंवा नकारांनीं एक विधि किंवा रुकार निर्माण होणें ही गोष्ट फक्त व्याकरणांतच संभवते. परंतु वरील उदाहरणें देण्याचा हेतु इतकाच कीं, ज्यांच्या निषेधाबद्दल वाद नाहीं असले आचार जर आपण रूढ होऊं दिले आहेत, तर ज्यांच्या सशास्त्रतेविषयीं असला तर केवळ वादच आहे अशा विधवाविवाहाचा आचारहि रूढ होऊं देण्यास आपण हरकत कां घ्यावी ? बरें, वर सांगितलेले निषिद्ध आचार आपण केवळ आपत्तीमुळें आपद्धर्म म्हणून करितों असेंहि नाहीं. व जरी आपण आपत्तीहि गृहीत घेऊन चाललों, तरी 'सोडावॉटर' पिऊन तहान भागविण्याच्या आपत्तीपेक्षां, जिच्या संसाराची होळी झालेली आहे अशा विधवेच्या संसारसुखाच्या आकांक्षेची आपत्ति खचित बलवत्तर होय हें कोणीहि कबूल करील ! मद्यप्राशन हें पंचमहापातकांत गणलें गेलें असतां तें सेवन करणाऱ्या मनुष्यास आपण पंक्तिपावन करण्यास मागें सरत नाहीं. परतु ज्याच्या सशास्त्रतेविषयीं स्मृतींतून वचनें काढून दाखवितां येतात, जो सशास्त्र असल्याबद्दल पेशवाईत परशुरामभाऊ पटवर्धनांच्या

मुलीच्या पुनर्विवाहाचे बाबतींत व फिरून १८५६ सालीं विधवाविवाहाचा कायदा होण्याच्या प्रसंगीं खुद्द काशीच्या पंडितांनीं शास्त्रनिर्णय दिला, त्याच्या सशास्त्रतेविषयीं १८७० सालच्या वादांत निदान चार शास्त्र्यांनीं अनुकुल अभिप्राय दिला—तो केलेल्या मनुष्यास मात्र आपण पंक्तिपावन करून घेत नाहीं हा केवढा विसंगतपणा ! विधवाविवाह सशास्त्र आहे असें म्हणणाऱ्यांमध्यें सर्वजण धर्मभ्रष्टतेस प्रवृत्त झालेल्या कलिमूर्तीच आहेत असें नाहीं. सशास्त्रतेचा अभिप्राय देणाऱ्या गृहस्थांत कित्येक धर्मश्रद्धावान् पंडित होते ही गोष्ट लक्षांत घेतली पाहिजे. विठोबाअण्णा दप्तरदार धर्मबुद्धीच्या एका पारड्यांत घातले व दुसऱ्या पारड्यांत स्वामी दयानंद, केशवचंद्र सेन, गुरु नानक, गुरुगोविंद, ईश्वरचंद्र विद्यासागर किंवा विष्णुबोवा ब्रह्मचारी यांपैकीं एकेकटे घातले तर कांटा कोणीकडेच झुकण्याचें कारण नाहीं. ज्या पक्षास डॉ० भांडारकरासारखे विद्वान, सदाचरणी व उत्कृष्ट, गृहस्थाश्रमी पंडित; दिवाण बहादुर रघुनाथराव, नरेंद्रनाथ सेन व कृष्णस्वामी अय्यर यासारखे धर्मनिष्ठ, ज्ञानवृद्ध गृहस्थ; किंवा प्रो. गोखले, सर टी. माधवराव, न्या. तेलंग व रानडे यांसारखे विचारी लोक आहेत तो पक्ष केवळ कलिविडबंनाचाच प्रकार असेल असें म्हणणें धाडसाचें होईल.कित्येकांस असा भ्रम असतो कीं,पुनर्विवाहासारख्या गोष्टींचें समर्थन, ज्यांस राष्ट्राची राजकीय उठाठेव अगर चळवळ खपत नाहीं असेच रिकामटेकडे मवाळ लोक करतात; पण हें म्हणणें यथार्थ नाहीं. कारण राजकीय चळवळींत ज्यांनीं नांव केलें आहे अगर थोडीबहुत झीजहि सोसून आपली कळकळ व्यक्त केली आहे, असें ज्या कांहीं विशिष्ट चिन्हांवरून निःसंशय मानण्यांत येतें, अशीं चिन्हें धारण करणारांचीहि सहानुभूति विधवाविवाहास आहे. लाला लजपतराय, बिपिनचंद्र पाल, सुरेंद्रनाथ बानर्जी, वऱ्हाड व मध्यप्रांतांत ज्यांस जहाल हें नांव लावण्यांत येतें असे कित्येक पुढारी, तसेंच इकडे प्रोफेसर विजापूरकर, बाळासाहेब देशपांडे वगैरे विधवाविवाहाचे पुरस्कर्ते अगर हितचिंतक आहेत. खुद्द महाराष्ट्रांत म्हणजे मराठी भाषा वापरणाऱ्या प्रांतांत विधवाविवाहास संमति देणाऱ्या मंडळीची याद प्रो. भाटे यांनीं नऊ वर्षांपूर्वीं प्रसिद्ध केलेली माझ्या पहाण्यांत आहे; व सदर याद वाचणारास तिज-

मध्यें सच्छील, देशाची प्रीति बाळगणारे, समाजाची सेवा करणारे, विचारी, बुद्धिमान् असे किती तरी लोक सांपडतील ! या सर्व गृहस्थांवर, विधवा-विवाहास संमति देऊन देश अगर धर्म बुडविण्यासच बुद्धिपुरःसर प्रयत्न केल्याचा आरोप आणिल्याशिवाय विधवाविवाहासंबंधानें झालेली त्यांची अनुकूलता प्रामाणिकपणाची नाहीं असें कोणासहि म्हणतां येणार नाहीं. प्रो. कर्वे यांनीं १८९४ सालीं कागदावर कोष्टकें मांडून विधवाविवाहास सर्वस्वीं प्रतिकूल असण्यापासून तों पुनर्विवाहित लोकांस पंक्तीस घेण्यास तयार असलेल्या लोकांपर्यंत विविध मतांचा चित्र-पट काढण्याचा उद्योग केला होता, तो पुढें कोणत्या कारणानें थांबला हें मला माहीत नाहीं. तथापि, त्याच हेतूस अनुसरून सुशिक्षित लोकसमा-जाची खानेसुमारी आज कोणी घेईल तर पुनर्विवाहाच्या पक्षास बहुमत मिळेल, अशी माझी समजूत आहे. पुनर्विवाहास प्रतिकूल असणाऱ्या लोकांप्रमाणेंच अनुकूल असणाऱ्या लोकांनाहि ईश्वरानें थोडीफार समाज-हितबुद्धि दिली असेलच; व माझ्या समजुतीप्रमाणें सुशिक्षित समाजांतील बहुमत जर पुनर्विवाहास अनुकूल असलें तर नवीन आचार प्रवर्तन होण्याची मुख्य सामग्री सिद्ध झाली असें म्हणण्यास हरकत नाहीं.

आतां नवीन शिक्षण व पुनर्विवाहास अनुकूलता या दोन गोष्टींचा असा काय निकट संबंध असेल कीं ज्याच्या योगानें हा नवीन आचार अनाचार नाहीं असें सुशिक्षितांस वाटावें ? माझ्या मतें हा संबंध असा आहे कीं समाज व व्यक्ति यांच्याविषयीं कांहीं नवीन कल्पना नवीन शिक्षणानें उत्पन्न झाल्या आहेत, हें कोणासहि नाकबूल करतां यावयाचें नाहीं. पुनर्विवाहाकडे सुशि-क्षित लोक व्यक्तिस्वातंत्र्याच्या दृष्टीनें पाहतात. त्यांना असें वाटतें कीं, ज्याप्रमाणें राजकीय त्याचप्रमाणें सामाजिक बाबतींत बरें कोणतें, वाईट कोणतें हें आपल्या मनानें ठरवून त्याप्रमाणें वागण्याची परवानगी व्यक्तीस असावी. एखाद्या विधवा स्त्रीस जर सर्व जन्म संन्यस्त वृत्तींत काढणें अशक्य किंवा कठीण वाटलें तर तिला फिरून संसारांत शिरण्यास समा-जानें मोकळीक ठेवावी व तिचा छळ होऊं नये; व पुरुषांना पुनर्विवाह करण्यास समाज ज्या सवलती देतो त्या सवलती स्त्रियांसहि समाजानें देणें हेंच न्यायाचें होईल. पुनर्विवाह करण्याची परवानगी दिली म्हणजे बाकी

कांहीं सुधारणा करण्याचें उरलें नाहीं, अथवा राजकीय हक्कांची पोतडी सरकारनें आमच्याकरितां बांधून ठेविली आहे ती पुनर्विवाहास सुरुवात झाली कीं लगेच सरकार आमच्या स्वाधीन करणार आहे असें कोणीच समजत नाहीं. तर फक्त तेवढ्या बाबतींत आपल्या हातून घडणारा अन्याय आपण होऊन दुरुस्त केला हें समाधान आपल्या मनास मिळेल. आपल्या देशावर हल्लीं मतस्वातंत्र्याच्या कल्पनेची भरती आली आहे हें जर खरें असेल, तर त्या भरतीच्या लाटा जशा राजकीय प्रदेशांत त्याचप्रमाणें सामाजिक व धार्मिक प्रदेशांतहि पसराव्या हें स्वाभाविक आहे. समुद्राला भरती आली म्हणजे मग समुद्राशीं संबंध असलेल्या सर्व खाड्या, नद्या, नाले यांच्यामधून एकसारखेंच पाणी फुगतें. त्याचप्रमाणें समान हक्क व स्वातंत्र्यबुद्धि यांची भावना मनांत एकदां जागृत झाली म्हणजे मग ती अमुक एका बाजूलाच वळावी, दुसऱ्या बाजूला मात्र वळूं नये, अशी अपेक्षा करणें व्यर्थ होय.

तात्पर्य, या सर्व गोष्टी लक्षांत घेतल्या असतां असें दिसून येईल कीं, शिक्षणाबरोबर पुनर्विवाहाशीं सहानुभूतीचें क्षेत्र हळूहळू वाढत जाईल, व सुशिक्षित समाजाच्या द्वारानें एकंदर जनसमाजाची सहानुभूतीही मिळण्यास यापुढें फारसा काळ लोटणार नाहीं. मात्र पूर्वी प्रो० कर्वे यांनीं केलेल्या उपक्रमानुसार वेळोवेळीं लोकमताची खानेसुमारी घेऊन त्यापासून निघणारे सिद्धान्त प्रसिद्ध करण्याची कांहीं तरी व्यवस्था चालू राहिली पाहिजे असें मला वाटतें. आणि ही खानेसुमारी घेतांना स्त्रीवर्गाचें मतहि तींत नमूद करण्याची कांहीं सोय व्हावी अशी मी विशेष सूचना करतों. या ठिकाणीं सुशिक्षित हा शब्द मी व्यापक अशा अर्थानें योजिला आहे. शिक्षण म्हणजे नुसतें इंग्रजी शिक्षण नव्हे तर त्यामध्यें जुन्या पद्धतीच्या उच्च संस्कृत शिक्षणाचाहि समावेश होतो. जुन्या पद्धतीनें शिक्षण पावलेला सर्वच समाज पुनर्विवाहास प्रतिकूल आहे असें मला वाटत नाहीं. शांतपणानें व आदरबुद्धीनें आपण त्यांच्याशीं चर्चा करूं गेलों असतां, जुन्या पद्धतीनें शिक्षण पावलेले लोकहि तात्त्विकदृष्ट्या पुनर्विवाहास संमति देण्यास तयार होतात असा माझा स्वतःचा थोडासा अनुभव आहे. मात्र अशा लोकांस आपली संमति व्यावहारिकरीत्या व्यक्त करून दाखविण्यास

नवीन पिढीपेक्षां अधिक अडचण वाटते ही गोष्ट खरी. पण याचें कारण असें आहे कीं, जुन्या चालीरीतींचा संस्कार नवीन पिढीपेक्षां त्यांच्या मनावर स्वाभाविकपणेंच अधिक असणार. भूतदयेच्या दृष्टीनें जुनी पिढी नवीन पिढीपेक्षां कमी होती असें मुळींच नाहीं. परंतु केवळ जुन्या संस्कारांच्या दृढतर बंधनामुळें त्यांचा उत्साह व्हावा तितका फलद्रूप होत नसे. नवीन पिढीस या बाबतींत कालाचा फायदा मिळत आहे इतकेंच काय तें. प्लेगासारख्या आपत्तीमुळें हा उत्साह फलद्रूप झाल्याचें निदान एक तरी ठळक उदाहरण मला माहीत आहे. पुण्यांतील मालवणकरशास्त्री–जे या आठवड्यांतच वारले ते-सन १८७० सालच्या पुनर्विवाहाच्या वादांत विधिपक्षाचे कट्टे प्रतिपक्षी असून त्या कामीं त्यांस तुरुंवासहि सोसावा लागला होता. परंतु अलीकडे प्लेगनें केलेल्या दुर्दशेमुळें ते पुनर्विवाहाच्या विधिपक्षास उघड येऊन मिळाले होते. आजच्या घटकेस सुशिक्षित परंतु आदरशील मुलगे व जुन्या पद्धतीनें शिक्षण पावलेले परंतु प्रेमळ आईबाप अशा जोड्या पुष्कळ घरीं असतील. आणि अशा घरांत आईबाप व मुलीमुलगे सुखदुःखाच्या गोष्टी सांगत बसलीं असतां, पुनर्विवाहाचा प्रश्न मुलांनीं जर शांतपणें आईबापांपुढें मांडिला, तर प्रो. कर्वे यांच्या चित्रपटांतील तात्त्विक संमतीच्या कोष्टकांत पडण्यास योग्य असे विचार जुन्या पिढीच्या या लोकांकडूनहि निघतात असा अनुभव चौकस मनुष्यास सहज मिळणार आहे. परंतु दुर्दैवानें पुनर्विवाहासंबंधानें पुष्कळ वेळां होतो तो वितंडवाद होतो; खरी चर्चा अशी फार थोडी होते.

आतां यापुढें एकच बाब सांगण्याची राहिलेली आहे, पण ती महत्त्वाची आहे. पुनर्विवाह कोणत्या मर्यादेंत केला असतां त्यास सत्सुधारणा म्हणतां येईल या प्रश्नाचें उत्तर एखाददुसऱ्या वाक्यांत सांगतां येईल असें मला वाटत नाहीं. शास्त्राच्या दृष्टीनें पाहतां पुरुषसंसर्ग न घडलेल्या विधवेचा पुनर्विवाह करण्यास बहुतेक सर्व स्मृतिकारांची संमति आहे. कित्येक अपवादभूत वचनें ही मर्यादा सप्तपदीपर्यंत मागें आणतात. कित्येक तशीच अपवादभूत वचनें ही मर्यादा पुढें गर्भसंभवापर्यंत नेतात. याच्याहि पलीकडे ही मर्यादा नेणारीं वचनें मुळींच नाहींत असें नाहीं. पंडित ईश्वरचंद्र विद्यासागर यांनीं व विष्णुशास्त्री पंडित

यांनीं पुनर्विवाहाच्या वयास फक्त मनाखेरीज दुसरी मर्यादा नाहीं असें ठरविलेलें आहे. परंतु वर दर्शविल्याप्रमाणें पुरुषसंसर्गाची मर्यादा हीच बहुमतास संमत आहे. कांहीं वर्षांपूर्वी रा० दाजी आबाजी खरे व रा० ब० चिंतामणराव वैद्य यांनीं हीच मर्यादा सशास्त्र आहे असें शास्त्रवचनांवरून सप्रमाण सिद्ध करून दिलें होतें. रा० खरे यांचें जें मत तेंच मत कै० रा० सा० मंडलिक यांचें होतें असें मीं ऐकिलें आहे, परंतु याबद्दल मला पक्की माहिती नाहीं. पराशरस्मृतींत विधवा–विवाहास परवानगी दिलेली आहे, याबद्दल मुळींच शंका वाटत नाहीं. तथापि पुनर्विवाहास प्रतिकूल असणारे लोक यास उत्तर असें देतात कीं, पराशरस्मृति जरी विशेषतः कलियुगाकरितां धर्मप्रवर्तन करणारी असली, तरी पुढें 'कलिवर्ज्यां'मध्यें पुनर्विवाह निषिद्ध केला गेला आहे. कलिवर्ज्यासंबंधानें पाहतां प्रथम असें दिसतें कीं, तें प्रकरण पुराणांतर्गत आहे, स्मृतींत आलेलें नाहीं. हरिवंश पुराणांत असें सांगितलें आहे कीं, जनमेजयानें यज्ञ केला त्या काळीं इंद्रानें यज्ञकर्मांत स्त्रीविषयक असा कांहीं अत्याचार केला तेव्हां लोकमताचा मोठा क्षोभ होऊन धर्मवेत्त्या महाजनांची परिषद् भरली, व त्यांनीं देशकालवर्तमानाकडे लक्ष देऊन यापुढें कित्येक गोष्टी वर्ज्य व्हाव्या म्हणून ठरविलें. "अग्निहोत्रं गवालंभं संन्यासं पलपैतृकं। देवराच्च सुतोत्पत्तिः कलौ पंच विवर्जयेत्" या त्या वर्ज्य गोष्टी होत. हरिवंशांत सांगितलेलें कलिवर्ज्याचें हें मूळ खरें अगर खोटें कसेंहि मानिलें तरी एवढी गोष्ट निर्विवाद दिसतें कीं, हिंदुधर्माच्या इतिहासांत अशी एक वेळ आली कीं, त्या वेळीं वरील गोष्टी वर्ज्य कराव्या असें लोकमत बनलें होतें. प्रायः ही वेळ म्हणजे बौद्धधर्माच्या उच्छेदानंतर वैदिक धर्माची फिरून जुळवाजुळव करण्याची होती; त्या काळीं बुद्धांनीं आपल्या आचरणानें ज्या गोष्टींची थट्टा करून सोडली होती,त्या अर्थात् वर्ज्य करण्यांत आल्याच; परंतु बुद्धाच्या चळवळीनें वैदिक धर्मांत जे दोष लोकांस दाखविले, ते लोकांस पटून तेहि वर्ज्य करण्यांत आले असावे. परंतु एकतर कलिवर्ज्य–प्रकरण हें एकाद्या तात्पुरत्या हुकमाप्रमाणेंच योजिलेलें असावें असें वाटतें. व्हाइसरॉयसाहेबांस एखादें तात्पुरतें ऑर्डिनन्स ( Ordinance ) काढण्याचा अधिकार असतो, तशा प्रकारें जनमेजयाच्या धर्मसभेनें किंवा दुसऱ्या एखाद्या

सभेनें हें काढिलेलें असावें; परंतु त्याचें उल्लंघन होण्यास लवकरच सुरुवात झाली असली पाहिजे. उदाहरणार्थ, संन्यास हा कलिवर्ज्य ठरलेला असतांहि आद्य शंकराचार्यांनीं संन्यासव्रत घेऊनच वैदिक धर्माची पुनस्संस्थापना केली. आज पुनर्विवाहाच्या पुरस्कर्त्यांस कलिवर्ज्याचा आधार देऊन नडविण्यांत येतें, त्याचप्रमाणें शंकराचार्य वादास आले असतां, मंडनमिश्रानें कलिवर्ज्य गोष्ट करणाऱ्या धर्मभ्रष्टास मी ओळखीत नाहीं असा, म्हणजे कायद्याच्या दृष्टीनें ज्याला प्राथमिक ( Preliminary objection ) आक्षेप असें म्हणतां येईल तो घेऊन, आचार्यांना धुडकावण्याचा प्रयत्न केला, परंतु तो टिकला नाहीं. आज पुनर्विवाहासंबंधीं लोकमत समुदित असेल तर त्याच्याहि मार्गांतील कलिवर्ज्याचा आक्षेप निघून जाण्यास हरकत नाहीं. पुनर्विवाह कलिवर्ज्य ठरविण्यास लोकांचा इंद्रियनिग्रह कमी असें एक कारण कल्पिण्यांत येतें; परंतु वास्तविक पाहतां इंद्रियनिग्रह कमी असल्यास विवाहाच्या द्वारें मिळणाऱ्या नियमित संसारसुखाची प्रशस्त योजना करून देणें हेंच त्याचें खरें निराकरण नव्हे काय ! शिवाय विशेष कारणामुळें का होईना, परंतु धर्मवेत्त्यांच्या एका सभेनें जर कलियुगाकरितां असलेल्या स्मृतींत फेरबदल केला तर तसा फेरबदल पुढील एका काळीं धर्मवेत्त्यांच्या दुसऱ्या एखाद्या सभेंत कां करतां येऊं नये ! असो. शास्त्रनिर्णय करण्यास लागणारें मीमांसेचें अगर धर्मग्रंथांचें पुरें ज्ञान मला नाहीं हें मी कबूल करितों, तथापि मीं अनुकूल–प्रतिकूल वचनांचे जे दोन चार संग्रह पाहिले आहेत त्यावरून पुरुषसंसर्गाची मर्यादा हीच विशेषतः पूर्वाचार्यसंमत असावी असें मला दिसतें. तथापि सशास्त्र–अशास्त्र याविषयींची कल्पना मीं मागें विस्तृतपणें दिलीच आहे. या मर्यादेच्याहि पलीकडे जाणें हें व्यावहारीक रीत्या आवश्यक असेल तर अशा प्रकारें ही मर्यादा पुढें नेली असतां ती रूढ होईल, आणि स्मृतिकारांच्या वर्गांतील बहुजनमतास ती मर्यादा अमान्य असल्यामुळें भासणारी तिची अशास्त्रता लोकगंगेच्या प्रवाहांत धुतली जाऊन सशास्त्र होईल. तात्पर्य, पुरुषसंसर्गाच्या मर्यादेच्या आंतील पुनर्विवाह सशास्त्र असून, ते करणारे समाजास सर्वस्वीं व्यवहार्य असलेच पाहिजेत. या मर्यादेचें अतिक्रमण करून झालेला पुनर्विवाह लोकसंमत होणें अगर न होणें हें त्याच्या विशेष

परिस्थितीवर अवलंबून राहील. शास्त्राचा विचार बाजूस ठेऊन, इतर रीतीनें सदभिरुचिपूर्ण लोकांस तो मान्य होण्यासारखा असल्यास केवळ त्याचें औपचारिक अशास्त्रत्व कोणीहि फारसें लक्षांत घेणार नाहीं असें वाटतें.

नव्या व जुन्या दोन्ही प्रकारच्या लोकांस आपल्या वर्तनास शास्त्रानुकूलता असल्याची भावना सुखदायक असते. ही भावना विद्यमान काळच्या सुशिक्षित जनसमाजाचें एकमत निदान प्रचंड बहुमत तयार होईल तर ती उत्पन्न होण्यासारखी आहे. अशा तऱ्हेचें एकमत किंवा बहुमत होण्यास पुनर्विवाहाची मर्यादा पुरुषसंसर्गापर्यंत ठेविली तर ती गोष्ट शक्य आहेसें वाटतें. आजच्या स्थितींत सुशिक्षित समाजाचे तीन वर्ग करतां येतील. अगदीं कांहीं थोड्या लोकांच्या वर्गास पुनर्विवाह हा कोणत्याहि स्थितींत अशास्त्र व निंद्यच वाटेल. दुसरा एक लहानसा वर्ग असा आहे कीं, ज्यास स्त्रीच्या पुनर्विवाहास वयाची मर्यादा घालण्याचें कारण वाटत नाहीं व कोणत्याहि वयांत तो केला तरी त्यास शास्त्राची अडचण नाहीं असें ते म्हणतात. परंतु तिसरा एक वर्ग आहे तो मोठा आहे. तो म्हणतो कीं, पुरुषसंसर्ग हीच पुनर्विवाहाची खरी मर्यादा आहे व त्या मर्यादेंत तो सशास्त्रहि आहे. माझ्या मतें आज या तिसऱ्या वर्गाचें म्हणणें सुरुवातीस घेऊन चालण्यास हरकत नाहीं. या वर्गाच्या मताप्रमाणें पुनर्विवाहित स्त्रीपुरुष वैदिक कर्मास अधिकारी असून व्यवहार्यहि आहेत. या मर्यादेपलीकडेहि जाऊन पुनर्विवाह करणाऱ्या लोकांच्या कृत्याचा विचार परिस्थिति पाहून समाजानें करावा हें योग्य आहे. तथापि वाटेल त्या वयांतील पुनर्विवाह लोकमतानें सशास्त्र ठरण्यास अद्यापि अवधि आहे. तोंपर्यंत वर सांगितलेल्या सम्यक्–संकल्पाच्या आधारावरच स्त्रीपुरुषांना पुनर्विवाहास तयार होतां येईल. या मार्गात अडचणी थोड्या अधिक आहेत व लोकव्यवहार्यता तितकी सुलभ नाहीं. तथापि आपद्धर्मातील सर्वच प्रसंगीं ज्यानें त्यानें आपापली परिस्थिति पाहून मर्यादेबाहेर पाऊल टाकण्यास पण त्याजबरोबर त्या गोष्टीचे साधारण परिणाम भोगण्यास तयार राहिलें पाहिजे. व्यवहारदृष्ट्या पुनर्विवाहाचे बाबतींत तडजोडीनें काम भागण्याचा संभव असल्यास अशा धोरणानें ती बहुधा

यशस्वी होईल. आज पुनर्विवाहासंबंधानें मुख्य प्रश्न बालविधवांच्या दुःखनिवारणासंबंधानेंच आहे हें लक्षांत ठेविलें पाहिजे. संतश्रेष्ठ तुकाराम यानें सम्यक्–संकल्पज कामाचें महत्त्व आपल्या एका अभंगांत वर्णिलें आहे.

चित्त ग्वाही तेथें लौकिकाचें काई । स्वहित ते ठायीं आपणापें ॥ १ ॥
मनासि विचार तोचि साच भाव । व्यापक हा देव अंतर्बाहीं ॥ २ ॥
शुद्धभावा नलगे सुचावा परिहार । उमटे साचार आणिके ठायीं ॥ ३ ॥
तुका म्हणे भाव शुद्ध हें कारण । भाट नारायण होईल त्यांचा ॥ ४ ॥

शुद्धभावाचीं मोठीं मनुष्यें मनानें जो धर्म सांगतील तो आचरावा असें स्मृतींतहि सांगितलें आहे. ( महाजनो येत गतः स पंथाः –भारत. )

विद्वद्भिः सेवितः सद्भिः नित्यमद्वेषरागिभिः ।
हृदयेनाभ्यनुज्ञातो यो धर्मः तं निबोधत ॥ ( मनुः )

विद्वान्, द्वेषरहित, सात्त्विक, विचारी असे महाजन सांगतील तो धर्म पाळण्याला स्मृतींची परवानगी आहे. आचारावरून स्मृति व श्रुति अनुमानित होतात व म्हणूनच कोणताहि सदाचार धार्मिक व सशास्त्र ठरतो असा एक धर्मकारांचा संकल्प आहे. पण तो आजहि मान्य होण्यास हरकत नाहीं. कारण आजच्याहि लोकांस होतां होईतों हिंदुधर्मानें व शास्त्रानेंच चालावयाचें आहे. अगदीं स्वतंत्र विचारांचा सुधारक झाला तरी त्यास आहे ही सामाजिक व धार्मिक परंपरा घेऊन चालूनच त्यांत इष्ट तो थोडा फार फरक करावयाचा असतो. रा. ब रानडे यांनीं एकदां मार्गे म्हटल्याप्रमाणें:—

The true reformer has not to write upon a clean slate. His work is more often to complete the half written sentence. We cannot break with the past altogether. For it is a rich inheritance and we have no reason to be ashamed of it. But while respecting the past we must ever seek to correct the parasitical growths that have encrusted it. ( 1892 )

महाराष्ट्रांतील सुधारणावाद्यांना मुळीं जुना धर्मच नको असता तर त्यांनीं ब्राह्मो लोकांप्रमाणें सर्वच सोडून दिलें असतें. परंतु अद्यापि कोणतीहि सुधारणा करावयाची असतां तिचा विचार शास्त्रदृष्ट्या शक्य तितका

होतो ही धर्मभ्रष्टतेपेक्षां धर्मभक्तीचीच खूण अधिक आहे. न्या. मू. तेलंग कोणत्याहि सुधारणेला जुन्याचा निदान पाया तरी पाहिजे असें स्पष्ट प्रतिपादीत असत. रा. ब. रानडे व दिवाणबहादूर रघुनाथराव यांचाहि शास्त्रसंमतीकडे विशेष कटाक्ष होता. रा. सा. रानड्यांनीं ग्रामण्याच्या प्रकरणांत शंकराचार्यांकडे शुद्ध करून घेण्याविषयीं अर्ज केला; त्याचा अर्थ त्यांना होतां होईतों समाजबंधन मानावयाचें होतें, व लोकांना आपल्या-बरोबर घेऊन जावयाचें होतें असाच असावा. प्रायश्चित्तांत सर्वांची सार-खीच श्रद्धा असेल असें नाहीं. पण प्रायश्चित्त घेणें यांतच समाज व धर्मपरंपरा यांजपुढें विनयशील व आदरशीलपणानें वागण्याच्या बुद्धीचा उत्कृष्ट पुरावा आहे. ही विनयबुद्धि जोंपर्यंत कायम आहे तोंपर्यंत तरी अशा सुधारणावाद्यांच्या म्हणण्याचा विचार शांतपणें झाला पाहिजे. आचारा-वरून श्रुतिस्मृति अनुमित करतां याव्या याबद्दल कोणाचाच वाद नाहीं. परंतु वाद इतकाच कीं, पूर्वीं निरनिराळ्या काळीं ज्याप्रमाणें समाजाच्या पुढाऱ्यांस नवीन आचारप्रवर्तन करवितां आलें, रूढि पाडतां आली, त्याचप्रमाणें शालिवाहनाच्या एकोणिसाव्या शतकांतहि पुढाऱ्यांना तो नवीन आचारप्रवर्तनाचा हक्क असावा. “ कांहीं संशय निघाल्यास त्याचा विचार करून शिष्टांनीं निर्णय सांगावा ” असें तैत्तिरीय उपनिषदांत एक वचन आहे. त्यासच अनुसरून नवीन पिढीच्या पुढाऱ्यांनीं पुनर्विवाहादि प्रश्नांवर निर्णय द्यावा. हा निर्णय देण्यासारखे शिष्ट खरोखर आजहि समाजांत असलेच पाहिजेत व आहेतहि. खरें कलियुग अवतरण्यास अद्यापि तीस हजार वर्षांचा काल आहे. तो आल्यावर मग सर्व समाजांत एकहि शिष्ट उरणार नाहीं, व फिरून कृतयुगाचा उदय होईपर्यंत समाज भ्रष्टस्थितींत पिचत राहील असें हवें तर आपण समजूं. पण तेव्हां श्रुतिस्मृति यांचें अनुमानिक मूळ हुडकीत तरी कोण बसणार ? यथा यक्षः तथा बलिः जसा काल तसा समाज. पण आज अजूनहि श्रुतिस्मृतीविषयींचा समाजाचा आदर लोपला नाहीं तोंपर्यंत लोकमतानें जो आचार ठरेल त्यावरूनहि त्यांचें स्मृतिमूल अनुमित आहे असें मानावें. स्मृतिकारांपैकीं आश्वलायन, बौधायन, कात्यायन, नारद व बृहस्पति यांनीं तरी आचारास—रूढीस—शास्त्रापेक्षां अधिक मान दिला आहे.

धर्मशास्त्रविरोधे तु युक्तायुक्तो विधिः स्मृतः ।
व्यवहारो हि बलवान् धर्मस्तेनावहीयते ।।

असें बौधायन स्मृतींत वचन आहे. टीकाकारांपैकीं विज्ञानेश्वर, जीमूतवाहन वगैरे याच मताचे आहेत. विज्ञानेश्वरानें याज्ञवल्क्याच्या व्यवहाराध्यायावर ' लोकसिद्धस्यैवानुवादकान्येव प्रायेण अस्मिन् प्रकरणे वचनानि ' असा शेरा दिला आहे. श्रुतिपेक्षां स्मृति, स्मृतीपेक्षां पुराणें, पुराणांपेक्षां आचार अशा परंपरेनें वास्तविक धर्माची वाढ लोकमताच्या प्रभावामुळें होत आलेली आहे. यांपैकीं पूर्वपूर्व अधिक बलवान् असा जरी धर्मकारांचा ' संकेत ' असला तरी प्रत्यक्ष पाहूं गेलें असतां उत्तरोत्तरच अधिक बलवान् आहेत असें आढळून येतें, असें कै. मंडलिकांनीं आपल्या धर्मशास्त्रावरील पुस्तकांत दाखविलें आहे.

वाटेल त्या वयांत विधवेनें पुनर्विवाह करणें हें तात्त्विकदृष्ट्या सशास्त्र आहे असें म्हणणारे लोकहि खऱ्या जरूरीशिवाय–म्हणजे केवळ अतिरिक्त संसारसुखाच्या आसक्तीमुळेंच–होणाऱ्या पुनर्विवाहास गौणच मानतील व मानितात यांत शंका नाहीं. आपल्या इलाख्यांत गेल्या चाळीस वर्षांत झालेल्या पुनर्विवाहांची छाननी करणारास ही गोष्ट दिसून येईल कीं, त्यांपैकीं कमींतकमी शेंकडा ८०।८५ इतक्या विवाहांतील विधवांना कौमार्यावस्थेमध्येंच दुर्दैवानें वैधव्य आलेलें होतें. निदान माझी माहिती अशी आहे. यावरून पुनर्विवाहाच्या पुरस्कर्त्यांनाहि समाजांतील इतर लोकांप्रमाणेंच शुद्धाचाराची चाड आहे हें दिसून येईल. आजच्या समाजाच्या सर्वस्वीं अनियंत्रित स्थितींतहि पुनर्विवाहाच्े कामीं केवळ स्वैराचारप्रवृत्त होऊन अपवादास्पद अशा प्रकारचे पुनर्विवाह करणाऱ्या व्यक्ति क्वचित् सांपडतील. गोत्र, प्रवर वगैरेंच्या बाबतींतहि हे लोक काळजी बाळगतात, यावरून विवाहाच्या एकंदर स्वरूपांत त्यांस घोंटाळा माजविण्याची इच्छा नसून फक्त कांहीं विवक्षित मर्यादेंतच विधवाविवाह सशास्त्र असल्यामुळें घडून यावा व सशास्त्र नसला तरीहि रूढीनें तो सशास्त्र ठरवावा, इतकाच काय तो त्यांचा कटाक्ष असतो.

कै. प्रो. माधवराव गोळे यांनीं ' हिंदुधर्म आणि सुधारणा ' या नांवाच्या आपल्या सुंदर पुस्तकांत हिंदुधर्मांतील विद्यमान आचारविचारांचें

स्वरूप शक्य तितक्या उज्ज्वल दृष्टीनें मांडण्याचा अत्यंत मार्मिक प्रयत्न केलेला आहे. सदर पुस्तकांत विधवांची थोरवी व त्यांची श्रेष्ठतम कर्तव्यें यांचा हृदयंगम चित्रपट रेखून, साधारणतः कोणत्या परिस्थितींत व मर्यादेंत विधवाविवाह इष्ट नाहीं, अगर शक्य नाहीं ही चर्चा ग्रंथकारानें प्रपंचित केली आहे. परंतु सदरहु भाग रसोद्ग्राहि दृष्टीनें वाचूनहि मला एक गोष्ट दिसून आली ती ही कीं, विधवाविवाहाच्या बऱ्याच पुरस्कर्त्यांनीं, प्रो. गोळे यांनीं सांगितलेल्या या सुधारणेच्या बहुतेक मर्यादा प्रत्यक्ष आचारांत पाळलेल्या आहेत. उदाहरणार्थ, ज्या विधवेस मातृधर्माची दीक्षा मिळालेली असेल तिनें पुनर्विवाहाचा विचार करणें योग्य नाहीं, असें प्रो. गोळे यांचें मत आहे. पण हें मत, मला वाटतें विधवाविवाहाच्या पुरस्कर्त्यांनाहि सर्वस्वीं मान्य आहे व आजपर्यंतचें त्यांचें वर्तनहि तसेंच आहे. पहिल्या मुलाबाळांचा प्रेमपाश मनावर असतां पुनर्विवाहास तयार झालेल्या विधवेचें गेल्या चाळीस वर्षांत एकतरी उदाहरण सांपडेल काय ? तसेंच ज्या विधवेस दत्तकपुत्र घेऊन त्याचा लळा लागण्याचा संभव आहे, अशी विधवा तरी पुनर्विवाहास कशाला प्रवृत्त होईल ? ज्या विधवेला औरस संतति नाहीं, अगर जी दत्तकहि घेत नाहीं अशी विधवा देखील विशेष परिस्थितींत पुनर्विवाहविन्मुखच राहील. म्हणजे उदाहरणार्थ, जिचें सासरीं किंवा माहेरीं कुटुंब भरलेलें आहे, माणसें प्रेमळ आहेत व खाण्यापिण्याची ददात नाहीं; किंवा जिला चांगलें शिक्षण मिळून मनाच्या आवडीचें काम करण्यास मोकळीक अगर ऐपत असून त्या कामांत मन रमविण्याची जिला संधि आहे; किंवा जिची प्रवृत्ति भाविक व कर्मठ असून जिचें मन तीर्थयात्रा, पोथीपुराण, जपजाप्य यांजमध्यें गुंतण्यासारखें असेल; किंवा जिच्या आधारावर एखाद्या कुटुंबांतील चार माणसें अवलंबून आहेत व आपल्या एखाद्या प्रेमळ आप्तइष्टाचा संसार व्यवस्थित व सुखाचा करून देण्याच्या कामीं स्वतः आधारशिला होण्याची जिला हौस अगर आकांक्षा असेल—तात्पर्य इतर कोणत्याहि मार्गानें स्वावलंबी—अगर आपखुषीनें परावलंबी—राहून समाधानानें काळ घालवितां येणें जिला म्हणून शक्य असेल ती होतां होईतों पुनर्विवाहाच्या मार्गाकडे ढुंकूनहि पहाणार नाहीं. अशा स्त्रिया पुनर्विवाहोन्मुख होण्याचा प्रयत्न करणें हें अर्थातच वाईट आहे.

परंतु तसें फारसें कोणी करीतहि नाहीं. ' घर विधवा कीं लाव पुनर्विवाह ' अशा शब्दांनीं पुनर्विवाहाच्या पुरस्कर्त्यांचें जें निंदाव्यंजक वर्णन केलें जातें, तें सर्वस्वीं खरें आहे असें नाहीं. जगांत असून विरक्तपणानें राहणें हेंच विधवांचें आद्य कर्तव्यच होय; तोच खरा मार्ग, तेंच अंतिम ध्येय, तोच उत्कृष्ट सद्धर्म, तेंच साधुलक्षण होय, हें कोणीच नाकबूल करीत नाहीं. जिला दुर्दैवानें वैधव्य आलें असतांहि संन्यासदीक्षा उत्कृष्ट रीतीनें पार पाडतां येईल अशा खंबीर मनाच्या योगिनीच्या उज्ज्वल दैवी संपत्तीचें कोण कौतुक करणार नाहीं ! आर्य लोकांच्या इतिहासांत आजन्म अविवाहित राहिलेल्या स्त्रियांचीं उदाहरणें नाहींत असें नाहीं. गार्गी, धारिणी, सुलभा, मैत्रेयी वगैरे स्त्रिया आजन्म कुमारी व योगिनी राहिल्या. त्यांचें अनुकरण करून विधवांनाहि संन्यासदीक्षा पाळणें केवळ अशक्यच आहे असें नाहीं. अहिल्याबाई होळकरणीसारख्या करारी विधवाविभूतींना संसाराच्या मोहांत फिरून पाडण्याचा उपदेश कोण अधम करील ! जो करील त्यास कोण हंसणार नाहीं !

परंतु पुनर्विवाहाचा जो प्रश्न आहे तो खंबीर मनाच्या स्त्रियांबद्दल मुळींच नाहीं. तो फक्त वर वर्णन केलेल्या अनेक प्रकारच्या परिस्थितीपैकीं एकहि जिला अनुकूल नाहीं अशा कमकुवत मनाच्या अबलांसंबंधानें आहे, व अशांनींहि पुनर्विवाह करणें तोहि केवळ आपद्धर्म म्हणून. " आपद्धर्म म्हणून शिष्टाचाराची पुनर्विवाहाकडे करडी नजर मात्र राहणार नाहीं " अशी कबुली प्रो. गोळे यांनीं दिली आहे. इतर उपाय ज्या ठिकाणीं थकतील म्हणजे पुनर्विवाह केल्यावांचून विधवेचें आयुष्य स्वाभिमानी स्वावलंबनाच्या स्थितींत जाण्यासारखें नसेल—तेथें तरी समाजानें प्रेमळ सहानुभूति दाखवावी, एवढेंच काय तें विधवाविवाहाच्या पुरस्कर्त्यांचें म्हणणें आहे. अशा रीतीनें समाजाच्या अनुकंपेस योग्य असणाऱ्या विधवांची संख्या अगदींच क्षुल्लक असती, तर पुनर्विवाहाचा प्रश्न नेटानें पुढें आलाच नसता. परंतु दुर्दैवानें तशी स्थिति नाहीं. कारण, सन १९०१ सालच्या खानेसुमारीवरून पाहतां ब्राह्मण जातींत पांच वर्षें वयाच्या आंतील साडेपंधरा हजार विधवा आहेत, पंधरा वर्षांच्या आंतील सव्वातीन लाख आहेत व तीस वर्षांच्या आंतील साडेपंचवीस लाख आहेत. आतां

पुनर्विवाहास पुरुषसंसर्गाची मर्यादाच युक्त आहे असें घेऊन चाललें, तरी आज तीन साडेतीन लाख बालविधवा समाजांत आहेत हें उघड होतें; व या सर्वांची संन्यासदीक्षा नीट रीतीनें पार पडेल असें मानणारा " स वै मुक्तोऽथवा पशुः " या कोटींतीलच असला पाहिजे. या तीन साडेतीन लाख विधवांपैकीं, संन्यासव्रतास खरोखर अनुकूल अशी परिस्थिति कितींची असेल ? ज्यांना ही स्थिति आहे अशा वगळल्या तरी ज्यांचें हें व्रत पार पडणें शक्य नाहीं व यामुळें ज्यांचा जन्म परदास्य, दुःख, अनाचार वगैरेंमध्यें जाणार त्यांच्याबद्दल समाजानें विचार जरूर करावयास पाहिजे कीं नाहीं ? समाजांतील आचार–पावित्र्याची ज्यांना खरी कळकळ आहे, त्यांनीं या हजारों विधवांस पुनर्विवाहाची परवानगी देणें हेंच अधिक युक्त नव्हे काय ! विधवाविवाह हा किती झाला तरी गौणच म्हणून तो करूं देणें ही एक आपत्ति म्हणजे भयप्रद संकट आहे, असें जरी मानिलें तरी हजारों अगर लाखों निराश्रित, अशिक्षित व मनुष्यस्वभावपूर्ण अशा विधवांवर समाजानें केवळ सक्तीनें संन्यासव्रत लादणें म्हणजे खरोखर अल्पापत्ति कोणती व महदापत्ति कोणती याचा विवेक करण्याची आपली बुद्धि नष्ट झाली आहे, याचें तें द्योतक होय. संन्यासव्रत हें उच्चतम खरें; परंतु तें जेव्हां ऐच्छिक व आनंदानें पत्करलेलें असेल तेव्हांच तें खरें भूषणप्रद होईल.

विधवाविवाहास समाजानें आपली संमति दाखविली, व पुनर्विवाहित लोकांवरील आपलें बहिष्काररूपी अस्त्र माघारें घेतलें तर तो आचार स्वैरगतिक होऊन बोकाळेल अशी भीति वाटण्याचें कारण नाहीं. पुनर्विवाहाचें स्वाभाविक गौणत्व, तो केल्यानें येणारा कमीपणा हा शास्त्रार्थांचा वाद माजवीत बसणाऱ्या पुरुषांपेक्षां स्त्रियांस अधिक भासत असला पाहिजे हें कोणीहि सहृदय मनुष्य कबूल करील. स्त्रीजातीच्या चारित्र्याची काळजी स्त्रियांपेक्षां पुरुषजातीस जास्त आहे, असें म्हणणें हें फक्त वृथागर्वी, अविचारी दांभिकांसच शोभतें; व हें म्हणणारी पुरुषव्यक्ति जेव्हां स्वतः चारित्र्यभ्रष्ट असते, तेव्हां तर या दांभिकपणाची कमालच होते. स्वतः विधवा स्त्रियांसहि पुनर्विवाह हें सर्वोत्कृष्ट ध्येय वाटतें असें नाहीं, हें इतर रीतीनेंहि दाखवितां येईल. आपण खुद्द लंडन शहराचेंच उदाहरण घेऊं. लंडन शहराची सुमारें ५५ लक्ष लोकसंख्या आहे. यापैकीं दरसाल सुमारें

८० हजार स्त्रीपुरुषांचीं म्हणजे चाळीस हजार लग्नें होतात. त्यांपैकीं सुमारें ३५ हजार लग्नें प्रथमवर व कुमारिका यांमध्यें होतात. १६०० लग्नें प्रथमवर आणि विधवा यांमध्यें होतात. विधुर आणि कुमारिका यांच्यामध्यें सुमारें अडीच हजार होतात. आणि विधुर आणि विधवा यांमध्यें सुमारें १५०० लग्नें होतात. म्हणजे प्रथमवराशीं व विधुरवराशीं-दोन्ही मिळून पुनर्विवाह करणाऱ्या विधवांची संख्या सुमारें तीन हजार भरते. म्हणजे एकंदर विधवांपैकीं फक्त शेंकडा ७।८ विधवाच कायत्या पुनर्विवाहोन्मुख असतात. विलायतेंत विधवाविवाहास कधींच प्रतिबंध नव्हता ही गोष्ट लक्षांत घेतली असतां शेंकडा फक्त ७ च विधवा पुनर्विवाह करण्यास तयार होतात याचा अर्थ उघड आहे. संन्यासवृत्तीनें पतिप्रेमाचें स्मारक निरंतर जागरूक ठेवणें हें, ज्यांच्या मनोभावना कोमल व नाजूक असतात आणि ज्यांची मनोवृत्ति प्रेमळ असते, अशा स्त्रियांना भूषणच होतें. परंतु ज्या थोडया विधवा पुनर्विवाहास तयार होतात त्यांपैकीं केवळ कामकारतः प्रवृत्त होणारी एखादी, तर सदाचारपूर्ण व नियमबद्ध असें संसारसुख भोगण्याची आकांक्षा बाळगणाऱ्याच पुष्कळ. आपल्या हिंदुसमाजाची परंपरा पाहिली असतां कोणाचीहि अशी आत्री होईल कीं, विधवाविवाहास समाजानें संमति दिली तरी तिचा फारसा दुरुपयोग होण्याचा संभव नाहीं. शिवाय या संमतीचा उपयोग करून घेण्याचें कारणहि दिवसेंदिवस झालें तर कमीच होईल, वाढणार नाहीं. कारण हळूहळू बालविवाहाची चाल कमी होऊन आपणामध्यें प्रौढविवाहाची चाल व त्याचप्रमाणें स्त्रीशिक्षण हीं दोन्हीं वाढत जाण्याचीं चिन्हें दिसत आहेत व तसें झाल्यास पुनर्विवाहास योग्य अशा जितक्या गतभर्तृका आज समाजांत दिसून येतात, तितक्या कालांतरानें दिसणार नाहींत. पतिसमागम घडलेल्या विधवेशीं पुनर्विवाह करणें जितकें पुरुषास तितकें स्त्रियांसहि न आवडण्यासारखें आहे. शिवाय साधारणतः वयाच्या पंचवीस–तिसाव्या वर्षापर्यंत ज्यांना संन्यासव्रत झेपलें व पार पडलें, त्यांना त्यानंतर पुनर्विवाहाचा मोह उत्पन्न होण्याचा संभव नसतो; व आपलें स्वातंत्र्य गमावून वरती लोकांकडून वाईट म्हणून घेण्यास त्या नाखुष असतात. तात्पर्य, समाजानें संमति दिली तरी पुनर्विवाहाच्या प्रसारास वर सांगितल्याप्रमाणें मनुष्यस्वभाव व समाज–

परिस्थिति यांच्या स्वाभाविक मर्यादा आहेतच; परंतु त्या मर्यादेच्या आंत समाजाची अनुमति मिळाली असतां, नाइलाजास्तव पुनर्विवाह करून, नियमित संसारसुखाचा अनुभव घेण्यास व अशा रीतीनें स्वतःवरचें व समाजावरचें अनाचाररूपी संकट टाळण्यास ज्या विधवा तयार असतील, त्यांना ती परवानगी—बहिष्कार वगैरे कडक धार्मिक दंडाशिवाय—देणें हेंच न्यायास अनुसरून आहे.

विधवेला अविवाहित राहतां आलें तर फारच उत्तम. पण पुरुषालाहि तोच नियम लागू झाला पाहिजे. ' मृते भर्तरि या नारी ब्रह्मचर्यव्यवस्थिता स्वर्गं गच्छत्यपुत्रापि ' हें मनुस्मृतींतलें वाक्य सांगून बालविधवांच्या विवाहास विरोध करणारांनीं

एवं चरति यो विप्रः ब्रह्मचर्यं अविप्लुतः ।
स गच्छत्युत्तमं स्थानं न चेह जायते पुनः ॥

हेंहि मनूचेंच वचन दाखवून एक स्त्री मरण पावल्यानंतर फिरून लग्न करणाऱ्या पुरुषास कां दोषी ठरवूं नये ? आजच हातीं आलेल्या इंदुप्रकाशांत अशी बातमी वाचली कीं, बाबू कांजीलाल नांवाच्या एका एम. ए. बी. एल. असलेल्या ५३ वर्षांच्या कलकत्ता हायकोर्ट वकिलानें बारावर्षांच्या वयाच्या मुलीशीं दुसरें लग्न केलें. ही बातमी देऊन इंदुप्रकाशाच्या विनोदी बातमीदारानें त्यावर खालील टीका केली आहे.

" If a man loses his wife at the age of 55, he begins from the beginning, and marries a child aged 10 or 12. Poor child, she becomes a widow at 16 ! Among Bengali Hindus there is no marriage for love. It is always marriage for money or caste, or the father's frowns. Love takes place after the marriage, 5 years after the marriage, when the bride and bridegroom become old and familiar to each other. This may be a ' pucca ' love and familiarity dose not breed contempt. But the idea is certainly queer that the man aged 55 should be loved with his white locks by a girl of 9 or 10 who should kiss in a grand-daughter-like fashion and respect. "

अशा तऱ्हेची प्रवृत्ति हाणून पाडण्याचा जोंपर्यंत समाजांत नेटानें प्रयत्न होत नाहीं तोंपर्यंत बालविधवेपुढें मात्र ब्रह्मचर्याचें पुराण

वाचणें हा निवळ दांभिकपणा होईल. समाजाची जर राजसवृत्ति घालवावयाची असेल तर आधीं सात्विकवृत्ति आणण्याची खटपट सर्व बाजूंनीं सारखी झाली पाहिजे. पुरुषांस न्याय एक व स्त्रियांस एक असें होऊं लागलें म्हणजे मग धार्मिकपणाच्या सबबीवर समाज किती दिवस झुलत रहाणार ?

---

# १०१. विशिष्ट विवाहाचा कायदा

( ता० १८ एप्रिल १९११. )

सुमारें दीड महिन्यापूर्वीं नामदार बाबू भूपेंद्रनाथ बसू यांनीं विवाहविधी-संबंधानें एक कायद्याचें बिल वरिष्ठ कायदेकौन्सिलापुढें आणिलें. या बिलाचें नांव 'विशिष्ट विवाहाचा कायदा' असें भूपेंद्रबाबू यांनीं ठेवलेलें आहे. विशिष्ट याचा या ठिकाणीं अर्थ "रूढीस अगर चालीरीतीस सोडून" असा होय. रूढ चाली-रीतीस सोडून इतर रीतीचा अवलंब करणें हा ज्या विवाहाच्या अंगचा विशेष म्हणजे व्यवच्छेदक—आहे अशा विवाहांना कायदेशीर स्वरूप देणें हा या बिलाचा मुख्य हेतु आहे. या नवीन बिलांत स्वतंत्र अशीं कलमें मुळींच नाहींत असें म्हटलें तरी चालेल. बिलांत विधायक असें एकच मुख्य कलम आहे व तें असें कीं, १८७२ सालच्या 'सिव्हिल मॅरेज ॲक्ट' नांवाच्या कायद्यांतील कांहीं शब्द वगळले जावे. पण या एकेरी कलमाचें स्वारस्य कळण्याकरितां प्रथम सिव्हिल मॅरेज ॲक्ट म्हणजे काय, हें सांगितलें पाहिजे.

इंग्रजी शिक्षणाचा इकडे प्रसार झाल्यापासून जातिभेदाविषयीं ज्यांच्या मनांत शैथिल्य उत्पन्न झालें आहे अशी सुशिक्षित लोकांची पिढी निर्माण होण्यास सुरुवात झाली. एकेश्वरी मताचा आणि मूर्तिपूजानिषेधाचा प्रसार सुरू झाला; ब्रह्मसमाजाचे उत्पादक बाबू राममोहन रॉय यांनीं सतीची चाल बंद करण्याविषयीं सरकारांत खटपट केली; १८५६ सालीं पंडित ईश्वरचंद्र विद्यासागर यांनीं विधवाविवाह कायदेशीर करण्याकरितां कायदेकौन्सिलाकडून

कायदा करविला. याच विचारपरंपरेस अनुसरून १८७२ सालीं ब्रह्मसमाजिस्ट लोकांच्या खटपटीनें व बऱ्याच अंशीं या समाजिस्टांच्या सोईकरितांच 'सिव्हिल मॅरेज अॅक्ट' नांवाचा कायदा झाला. या कायद्यानें असें ठरविलें गेलें कीं, कोणत्याहि जातीच्या व धर्ममताच्या स्त्रीपुरुषांनीं "आम्हांस कोणताच धर्म अगर कोणतीच जात नाहीं" असा लेख लिहून दिला असतां व रजिस्टरापुढें जाऊन आपलीं नांवें नवराबायको म्हणून नोंदविलीं असतां, त्या लग्नास कायदेशीर स्वरूप आहे असें मानण्यांत येईल. हा कायदा होण्याच्या काळीं हिंदुस्थानांत अशी स्थिति होती कीं, कांहीं सुरशिक्षित हिंदुलोकांस जुनें धर्मबंधन आवडेनासें झालें होतें, आणि इतर अनेक रूढ धार्मिक आचारांप्रमाणें वैवाहिक धर्मविधींच्या रूढ आचारांचाहि त्यांस कंटाळा आला होता. वेदप्रामाण्य, जातिभेद, श्रौतस्मार्त धर्मसंस्कार हीं सर्वच झुगारून दिलीं म्हणजे वस्तुतः हिंदुधर्मच झुगारून देण्यासारखें आहे; परंतु तो काळच असा होता कीं, 'आम्हांस कोणीं हे हिंदू नाहींत असें म्हटलें तरी चालेल, जातीच्या नांवाशीं आम्हांस कांहीं कारण नाहीं, आमच्या स्वतःच्या मताप्रमाणें नियमबद्ध अथवा अनियमित वर्तन करण्यास व आपल्या बुद्धीप्रमाणें जो धर्म म्हणून वाटेल त्याचें परिपालन करण्यास मोकळीक असली म्हणजे झालें!' असें कित्येक सुशिक्षित लोकांस वाटूं लागलें होतें. सन १८७२ सालचा कायदा अशा स्वेच्छाचारी लोकांच्या सोईकरितां व त्यांच्या खटपटीनें करण्यांत आला होता. परंतु तसें करतांना सर्व हिंदुसमाजास बाधक असें कांहींहि आपल्या हातून होऊं नये अशी सरकारची इच्छा असल्यामुळें, या नवीन कायद्याचा फायदा घेऊन व जुन्या रूढींचा अव्हेर करून विवाहाच्या कामीं नवीन रूढींचें प्रवर्तन करणारांनीं 'आम्ही कोणत्याच धर्मास चिकटून नाहीं अथवा कोणत्याहि अमुक जातीचे राहिलों नाहीं' असा इकरार किंवा शपथ त्यांनीं लेखी घ्यावी, अशी अट त्या कायद्यांत घालण्यांत आली होती.

सुदैवानें ही स्थिति आज पालटली आहे. एकेश्वरी मतांत केवळ उपपत्तिदृष्ट्या वावगें असें कांहीं नाहीं. ब्रह्मसमाजाचा कटाक्ष धर्मतत्त्वाविरुद्ध नव्हता, तर धर्मपंथाविरुद्ध होता. "वाटेल त्या धर्मांत जें काय चांगलें म्हणून सांपडेल तें आम्ही घेऊं, अमुक एका परंपरेस चिकटून एकच पंथ स्वीकारल्यानें इतर पंथांतल्या चांगल्या गोष्टी स्वीकारण्यास जो एक संकोच होतो तसा आम्ही होऊं देणार नाहीं"—या

तात्त्विक दृष्टींत नांव ठेवण्यासारखें फारसें कांहीं नाहीं. परंतु अशा नितांत तात्त्विक दृष्टीनें बनविलेल्या धर्माचा पाया व्यावहारिक रीत्या किती संकुचित असतो ही गोष्ट ब्रह्मसमाजिस्टांच्या नजरेस कालांतरानें आली. आपल्या धर्म-पंथाचा प्रसार फारसा होत नाहीं; आपला पंथ कितीहि शुद्ध केलेला असला तरी लोकांस तो पसंत होत नाहीं; साधारण प्रतीच्या मुमुक्षूचें समाधान विवर्ण व नीरस अशा धर्ममतांनीं होऊं शकत नाहीं, व यामुळें आपला पंथ वाढत नाहीं, खुरटून राहातो; असें ब्रह्मसमाजिस्टांच्या प्रत्ययास आलें. पारमार्थिक दृष्टीप्रमाणें लौकिक दृष्टीचीहि बाधा ब्रह्मसमाजास झाली; कारण मनाच्या खऱ्या निर्विकारतेप्रमाणें ऐहिक सुखोपभोग भोगण्याच्या स्वेच्छाचारबुद्धीनेंहि लोक ब्रह्मसमाजाचा आश्रय करूं लागले. एकट्या हिंदुधर्माच्या कानांतच ईश्वरानें एकंदर धर्मतत्त्व सांगून टाकलें आहे असें मानतां येत नाहीं, या केवळ सात्त्विक प्रेरणेनेंच हिंदुधर्माचें बंधन न माणारा कोणी दिसल्यास त्याजविषयीं कदाचित् आदरहि उत्पन्न होण्याचा संभव आहे. परंतु हिंदुधर्म हा आपल्या ऐहिक सुखाच्या आड येतो म्हणूनच केवळ तो झुगारून देऊन धार्मिक अरा-जकतेच्या शून्य प्रदेशांत भुताप्रमाणें अनिरुद्ध व मनःपूत संचार करणाऱ्यां-विषयीं आदर तर नाहींच, पण उलट अनादर व अप्रीति वाटणें साहजिक आहे; ही गोष्टहि आतां ब्रह्मसमाजिस्टांच्या नजरेस आली.

पण ब्रह्मसमाजिस्टांना आपलें हिंदुत्व नष्ट होऊं नये अशी उत्कंठा लाग-ण्यास आणखी एक बलवत्तर कारण घडून आलें आहे तें असें. ब्रह्मसमाजिस्ट झाले तरी त्यांना संसाराची उपाधी सुटलेली नाहीं. धर्मांतून उठून गेलें तरी चालतें, पण समाजांतून उठून जातां येत नाहीं; व राष्ट्रांतून तर उठून जातां येत नाहींच नाहीं. ब्रह्मसमाजिस्टांना हिंदुधर्माचीं कवचकुंडलें फेंकून देणें ही गोष्ट सोपी होती; हिंदुधर्माची मुद्रा कपाळावरून पुसून टाकण्यांत त्यांना कांहीं धोका नव्हता. पण दुसरें जें नांव धारण करण्याविषयीं त्यांना हौस वाटली असती तें नांव मिळणें ही गोष्ट मात्र त्यांच्या हातची नव्हती. ब्रह्म-समाजिस्टांचें हिंदुत्व सुटलें तरी त्यांस इंग्रज होणें शक्य नव्हतें. इंग्लंडसारख्या देशांत राहून अनेक पिढ्या गेल्यानंतर व दरम्यान इंग्रजांशीं पिढ्यान् पिढ्या शरीरसंबंध होत गेल्यास हिंदुत्वाचें मूळ तुटून त्यावर कदाचित् विलायती कलम होणार ! पण ब्रह्मसमाजिस्ट हा जोंपर्यंत हिंदुस्थानांत रहाणार तोंपर्यंत

स्वतःच्या हिंदुधर्मास तुच्छ मानण्याखेरीज दुसरा कोणताहि अधिकार, किंवा खानेसुमारींत आपली स्वतंत्र नोंद व्हावी याखेरीज दुसरें कोणतेंहि स्वातंत्र्य त्यांस मिळणें शक्य नाहीं. समाजिस्ट हा किंतीहि सुशिक्षित, सुधारलेला व विद्वान् असला तरी हिंदुस्थानांत तो नेटिव्हच ! ब्रह्मसमाजिस्टांनीं आपला सवता सुभा स्थापल्याच्या योगानें हिंदुस्थानांत पूर्वी जे शंभर तट व पंथ होते त्यांत आणखी एकाची भर पडली. पण अशा रितीनें झालेली ही हिंदुस्थानांतील पंथांची व तटांची वाढ असली तरी एकंदरीनें हिंदी राष्ट्राच्या शक्तीची ती वाढ खास नव्हे, हेंहि ब्रह्मसमाजिस्ट लोकांच्या नजरेस येऊं लागलें. हिंदू हें नांव धारण करण्यापासून जरी पारलौकिक मोक्ष मिळत नसला, तरी हिंदू हें नांव राखण्यापासून आपल्या समाजाचा व राष्ट्राचा कांहींना कांहीं तरी उपयोग खास आहे, ही गोष्ट ब्रह्मसमाजिस्टांच्या लक्षांत आली.

पक्षाभिमान हा रावापासून रंकास चुकला नाहीं; तेव्हां असल्या पक्षपाती जगांत ' आम्ही कोणत्याच पक्षाचे, पंथाचे अगर जातीचे नाहीं ' असें म्हणणें म्हणजे आपलें सर्व अधिष्ठानच नाहींसें करून, केवळ त्रिशंकुसारखें अधांतरीं लोंबत राहाणें होय, या गोष्टीचा त्यांच्या मनावर प्रकाश पडला. ब्रह्मसमाजिस्टांना येऊन जाऊन भुरळ घातली पाश्चात्य विद्येनें. पण पाश्चात्य देशांकडे पाहिलें तरी तेथेंहि देशाचा, जातीचा, धर्माचा, धर्मपंथाचा व परंपरेचा अभिमान कोणत्या ना कोणत्या तरी रूपानें नुसता जागृतच नव्हे तर जळजळीत पसरलेला आहे, हें पाहून ब्रह्मसमाजिस्टांची भुरळ निघाली. प्रत्यक्ष परमेश्वरालाहि मायेचा बाजार भरवितांना नाम व रूप यांच्याशिवाय चाललें नाहीं, तर मग या स्वार्थपरायण जगांत नांवाचा अभिमान टाकून कसें होणार ? ' हिंदु ' या नांवासारखेंच ' ब्राह्मो ' हें झालें तरी एक नांवच आहे. पण ' ब्राह्मो ' या नांवानें आपल्या मनाचें समाधान होत असलें तरी जगाचें होत नाहीं; आणि म्हणून त्यापासून व्यावहारिक फायदाहि नाहीं. ब्रह्मसमाजिस्टांना धनदौलत, राजकीय हक्क, दरबारी बहुमान वगैरे गोष्टींची आवड नसती तर ' ब्राह्मो ' या नवीन नांवासच चिकटून राहून कदाचित् त्यांचें समाधान झालें असतें. पण राजकीय हक्कांच्या वांटणींत ' ब्राह्मो ' या नांवाला विशेष किंमत तर नाहींच, पण हिंदू धर्मांतून फुटून निघाल्यानें अल्पसंख्यांकत्वाचा

दोष आणि तोटा दोघांनाहि सोसावा लागणार! तात्पर्य, कोणतें तरी एक नांव हवें, मग तें 'हिंदु' हेंच नांव काय वाईट? मनाला समाधान देणाऱ्या स्वाभिमानाच्या दृष्टीनें पाहतां 'हिंदु' हें नांव आजकाल हिंदुस्थानांत इतर सर्व नांवाहून अधिक गुणकारी नाहीं काय? हिंदुधर्मरूपी प्रचंड वृक्षाच्या मुळ्या अनेक युगांच्या टाळू फोडून कालाच्या हृदयांत शिरलेल्या आहेत. या वृक्षाचें पोषण होण्यास वेदासारख्या पवित्र व अमृतमय जलाशयाचें पाणी अखंड मिळत आलेलें आहे. या प्रचंड वृक्षाला जरी अनंत शाखा फुटलेल्या असल्या, तरी प्रत्येक शाखेवर हिरव्यागार पालवीच्या छायेंत अनेक प्राणिकुलें सुखासमाधानानें नांदून त्यांनीं ऐहिक व पारलौकिक श्रेय मिळविलें आहे. असा हा बेसुमार वाढलेला वृक्ष वादळाचे तडाख्यांत केव्हांहि मुळींच न सांपडणें शक्य नाहीं; परंतु बुद्धधर्मावर प्रेम करणारे इंग्रज कवि सर एडविन आर्नोल्ड यांनीं गाइल्याप्रमाणें, हिंदु धर्म परदेशाहून येणाऱ्या वादळाला क्षणमात्र मान लववितो खरा, पण वादळाचा जोर किंचित् कमी होतांच फिरून तो आपलें डोकें, धुक्यांतून निघालेल्या पर्वतशिखराप्रमाणें, वर उचलून गंभीर व निश्चल असा उभा राहावयाचा तो राहातोच! हिंदुधर्मांत दोष असतील, पण निर्दोष असा दुसरा धर्म तरी कोणता आहे? व असें जर आहे तर जो काय बरावाईट हिंदु धर्म तोच आपला असें म्हणून त्यांत राहावयास कोणती हरकत? झाला तर नफाच होईल, तोटा होणार नाहीं.

अशा तऱ्हेच्या विचारसरणीनें ब्रह्मसमाजिस्ट लोकांस आपणांस हिंदू म्हणवून घेण्याचा फिरून अभिमान उत्पन्न झाला आहे. या विचारसरणीस थोडेंसें द्राविडी प्राणायामाचें स्वरूप आहे खरें! झोंपेंत अंगावर पाणी टाकून 'तूं कोण?' असें विचारल्याबरोबर 'मी हिंदु' असें उत्तर देणाऱ्या हिंदूइतकें हिंदुत्वाशीं तादात्म्य ब्रह्मसमाजिस्ट हा पावलेला नसेल. तथापि, वर दर्शविलेली त्याची विचारसरणी जशी अबाधित तशीच प्रामाणिकहि आहे; व अशा विचारपरंपरेनें का होईना ब्रह्मसमाजिस्ट हा हिंदु राहूं इच्छितो, याबद्दल आपण त्याची अवमानना न करितां त्याचें अभिनंदनच केलें पाहिजे. देशाभिमानाच्या गुणांत सर्वसाधारण स्वार्थाची जितक्या अंशानें भेसळ असते, त्याहून ब्रह्मसमाजिस्टाच्या या विचारपरंपरेंत ती भेसळ खास अधिक

नाहीं. कोणत्याहि कारणानें का होईना हिंदु समाजावरचें संकट टळलें; व भेदबुद्धि सर्वांत अतिशय प्रबळ झालेले आमचे समाजिस्ट बांधवहि परत फिरले. तेव्हां अर्थातच हिंदुसमाजाचीं शकलें होण्याचा प्रसंग यापुढें नाहीं, प्रसंग असेलच तर हरप्रयत्नानें हिंदुसमाजाचें एकीकरण कशानें होईल या विचाराचा आहे, या गोष्टीची आम्हीं मनाशीं गांठ बांधून ठेवण्यास हरकत नाहीं. ना. बसू यांनीं पुढें आणलेल्या बिलाचा हेतु सकृद्दर्शनीं विवाह–विधीसंबंधानें व्यक्तिमात्रास अधिक स्वातंत्र्य मिळवून देण्याचा जरी आहे, तरी हें बिल पुढें आणण्यास त्यांच्या मनांत जी प्रेरणा झाली ती हिंदुत्वाच्या अभिमानानें झाली याविषयीं काडीमात्र शंका नाहीं. व हें मर्म लक्षांत घेतलें असतां त्यांच्या बिलाच्या मसुद्याचा विचार शांत मनानें करण्यास आपणांस मदत होईल. सदर बिलाच्या पहिल्या वाचनाच्या वेळीं सरकार-तर्फे ना. जेंकिन्स यांनीं भूपेंद्रबाबूंस टोमणा देऊन असें म्हटलें कीं, ब्राह्मो लोकांना कोणीकडून तरी स्वतःस हिंदु म्हणून घेतां यावें असा या बिलाचा हेतु आहे. जेंकिन्स साहेबांनीं केलेली बिलाची ही निंदा हिंदु धर्माभिमान्यांस एका दृष्टीनें गोडच वाटेल !

सन १८७२ चा कायदा जे कोणी ख्रिस्ती, यहुदी, हिंदु, मुसलमान, पारशी, बौद्ध, शीख अगर जैन ह्यांपैकीं कोणत्याहि धर्ममताचे नसतील, अगर यापुढें नाहीं असें म्हणण्यास तयार असतील अशांनाच लागू आहे. तथापि सदर कायद्याखालीं वाटेल तें लग्न नोंदलें जात होतें असें नाहीं. किंबहुना असेंहि म्हणतां येईल कीं, या कायद्याखालीं लग्नें नोंदविणारावर, केवळ पूर्वीच्या आपल्या धर्मांशींच नव्हे, तर वर सांगितलेल्या अनेक धर्मां-पैकीं प्रत्येकानें विवाहसंबंधांत ज्या गोष्टी निषिद्ध म्हणून सांगितलेल्या आहेत, त्या सर्वांचा निषेध पाळण्याची अनेक गुणित जबाबदारी त्याजवर असे. उदाहरणार्थ, या कायद्याखालीं लग्न नोंदविणारास पूर्वीच्या लग्नाची बायको अगर नवरा जिवंत असतां फिरून लग्न करतां येत नाहीं. वधूवरांचें वय अनुक्रमें १४ व १८ यांच्या खालीं असतां कामा नये व तें २१ च्या आंत असेल तर त्यांनीं आपापल्या पालकांची संमति मिळविली पाहिजे. वरीलपैकीं कोणत्याहि धर्मानें ठरविलेला सपिंड संबंध वधूवरांमध्यें नसला पाहिजे. जी काय या कायद्यानें सवलत ठेविली होती ती एवढीच कीं,

वरील बंधनें पाळलीं असतां वधूवरांच्या विवाहास दुसरा कोणताहि प्रचलित कायदा अगर रूढी यांची आडकाठी न येतां लग्न कायदेशीर ठरविण्यांत येईल. अर्थात् या कायद्यानें सपिंडसंबंधाचें बंधन कायम ठेविलें होतें; परंतु हिंदुधर्मानें असगोत्रत्व व अभिन्नवर्णत्व हीं जीं दुसरीं बंधनें विवाहास लावून दिलेलीं आहेत तीं न जुमानतां केलेलें लग्न १८७२ च्या कायद्याप्रमाणें कायदेशीर ठरत असे. पण जगांत मोबदल्याशिवाय कांहींएक घडत नाहीं; आणि या कायद्याप्रमाणें लग्नें नोंदविणारास असगोत्रत्व व अभिन्न–वर्णत्व या बंधनांपासून जरी स्वातंत्र्य मिळण्यासारखें असलें तरी त्याचा मोबदला म्हणून स्वधर्माला सोडचिठ्ठी द्यावी लागत असे! ऐहिक आणि पारमार्थिक लाभ व सुख यांचें द्वंद्व पुढें उभें राहिलें असतां कोणास जवळ करावें व कोणास दूर करावें हें ठरविण्यास मनुष्याच्या मनाची विशिष्ट रचनाच कारणीभूत असते. सदरहू कायदा झाल्यापासून आजपर्यंत जे केवळ धर्मबुद्धीनें पूर्वीपासूनच ब्राह्मो बनले होते अशांनीं या कायद्याचा फायदा घेतलाच; पण पूर्वी विशिष्ट धर्मानुयायी असलेले व ब्राह्मो नसलेले अशा कित्येकांनींहि आपल्या हौसेची बायको मिळावी म्हणून पूर्वापार चालत आलेला आपला धर्म सोडून आयत्या वेळीं ब्राह्मो बनून या कायद्याखालीं लग्नें नोंदवून घेतल्याचीं उदाहरणेंहि आहेत! असो; १८७२ सालच्या कायद्यामध्यें मागें सांगितल्याप्रमाणें सर्व धर्मांची सोडचिठ्ठी लिहून घेण्याचें कारण असें होतें कीं, विवाहाच्या बाबतींत ज्यांस स्वतंत्रता पाहिजे त्यांस तर ती द्यावयाची, पण कोणत्याहि धर्मांत हात घालावयाचा नाहीं असें त्या वेळीं सरकारचें धोरण होतें. असगोत्रत्व व अभिन्नवर्णत्व यांचीं बंधनें न जुमानतां जो लग्न नोंदवून घेईल तो हिंदु राहणारच नाहीं असें लोकमत त्या वेळीं होतें व तें सरकारनें मानिलें; पण हें लोकमत हल्लीं कांहींसें बदललें आहे, म्हणजे हिंदुधर्मशास्त्रानें विवाहविधीवर घातलेलीं कांहीं कांहीं बंधनें एखाद्यानें न मानितां सन १८७२ च्या कायद्याच्या अटीस अनुसरून विवाह केला तर तेवढ्यानें तो मनुष्य विशिष्ट धर्मापासून-निदान हिंदुधर्मापासून तरी–भ्रष्ट झाला आहे असें मानण्याचें कारण नाहीं. पूर्वीप्रमाणें पुढेंहि 'हिंदू' या नांवाखालीं त्याचा समावेश व्हावा, असें ना. भूपेंद्रबाबू यांस वाटत आहे; व हें लोकमत आधारास घेऊन त्यांनीं सन १८७२ च्या कायद्याची इल्लींची दुरुस्ती सुचविली आहे.

ब्राह्मो लोकांची 'हिंदू' हें नांव न घालवूं देण्याची बुद्धि आम्हांस अभिनंदनीय वाटते. तथापि, वर दर्शविल्याप्रमाणें गेल्या चाळीस वर्षांत लोकमतामध्यें खरोखर कितपत फरक पडला आहे व वैवाहिक स्वातंत्र्यास चिकटून राहणाऱ्या हिंदूंचें हिंदुत्व राहणें वास्तविक कितपत व कोणत्या अर्थानें शक्य आहे, याचा विचार आतां करूं.

विशिष्ट विवाहाचा कायदा दुरुस्त करणारें हल्लींचें बिल बरें अगर वाईट हें ठरविण्यापूर्वी त्याचे पुरस्कर्ते भूपेंद्रबाबू हे त्यासंबंधानें काय म्हणतात तें पाहणें जरूर आहे. हा कायदा सकृद्दर्शनीं हिंदुस्थानांतील सर्व जातींस लागू होण्यासारखा आहे. पण खुद्द भूपेंद्रबाबूंचा हेतु त्याचा अंमल निदान हिंदु धर्मापुरता तरी व्हावा असा आहे; व इतर जातींस तो नकोच असला तर तो हिंदु लोकांसच लागू होईल, अशा अर्थाचे स्पष्ट शब्द घालून त्याची व्याप्ति जरूर तितकी कमी करण्यास त्यांची कबुली आहे. हिंदुसमाज झाला तरी तो सर्व अशा कायद्यास मान्यता देईल कीं नाहीं, याची शंकाच आहे. पण सर्व हिंदु समाजानेंहि संमति द्यावी, या हेतूनें भूपेंद्रबाबूंनीं आपल्या भाषणांत चर्चा केली आहे. ते म्हणतातः—हिंदुलोकांमध्यें विवाह हा एक संस्कार आहे व तो संस्कार अनादिकालापासून चालत आलेल्या कांहीं विधींप्रमाणें करण्यांत येतो. तथापि, कालांतरानें या विधींमध्यें हळूहळू फेरबदल झाले आहेत. हिंदु-धर्मांत मतवैचित्र्य फार; जैन, बौद्ध, शीख हे मूळचे हिंदूच, पण त्यांनीं मूळ हिंदुधर्मापासून केवळ मतांतर केलेलें असून त्यांच्या लग्नविधींत पुष्कळ फरक पडला आहे. याशिवाय इतर वर्गांच्या हिंदुधर्मीयांमध्येंहि जुन्या रूढ चाली व नवीन मतें यांच्या दरम्यान हळूहळू विसंवादित्व उत्पन्न झालें आहे. ब्राह्म-समाजाच्या लोकांनींहि इतरांप्रमाणेंच नवा पंथ स्थापून विवाहाच्या बाबतींत जातिबंधन व कांहीं रूढ विधि यांना फांटा दिला. पण अशा नवीन मता-प्रमाणें झालेल्या विवाहाच्या कायदेशीरपणाबद्दल शंका उत्पन्न झाली. म्हणून इंग्रजी धर्तीवर इकडेहि लग्नाचा कायदा करावा असें ठरून माजी सरकारी कायदेपंडित सर हेनरी मेन यांनीं प्रथम मसुदा केला. प्रथमतः हा कायदा ख्रिस्ती लोकांना तेवढा लागू करूं नये असें ठरलें; कारण लग्नासंबंधानें त्यांचा स्वतःचा असा एक कायदा होता. पण इतर जातींनींहि गिल्ला केल्यामुळें पुढें असें ठरविण्यांत आलें कीं जे कोणी आपण कोणत्याहि विशिष्ट धर्ममताचे

नाहीं असें लिहून देण्यास तयार असतील त्यांसच या नवीन कायद्याचा फायदा घेतां येईल. पण ही गोष्ट ब्राह्मो लोकांच्या मनास टोचूं लागली. ब्राह्मो धर्म झाला तरी काय तो हिंदुधर्मांतलाच एक पंथ आहे; ब्राह्मी लोकांना झालें तरी वेद व उपनिषदें हीं पवित्र वाटतात व त्या ग्रंथांपासूनच त्यांना दैवी मनःप्रेरणा होते. ब्राह्मी पंथ निघण्यापूर्वी हिंदूधर्मांत जसे अनेक पंथ होते, तसाच हाहि एक आहे इतकेंच. प्रत्येक पंथाच्या अनुयायांस आपला तेवढा पंथ इतरांहून अधिक शुद्ध आहे असें वाटावें हा मनुष्यस्वभावच आहे. पण एखाद्या पंथांत विशिष्ट कारणांनीं विशेष लक्षणें उत्पन्न झालीं म्हणून तो पंथ सर्वस्वीं धर्मबाह्य झाला असें हिंदुधर्मानें केव्हांच मानलेलें नाहीं. धर्मात नवीन पंथ निर्माण होणें म्हणजे कदाचित् एकप्रकारें धर्माची वाढ होणेंच आहे. शिवाय ब्राह्मो लोकानीं जे नवीन म्हणून आचार सुरू केले, त्यांना पूर्व युगींच्या आचारांत आधार व दाखला नाहीं असेंहि नाहीं ! विजातीय विवाह एका विशिष्ट पद्धतीनें पूर्वी होत असत. दरम्यान् ते बंद पडले, अर्थात् फिरून ते सुरू व्हावे असें ब्राह्मो लोकांचें म्हणणें आहे. पण ब्रिटिश न्याय-कोर्टांनीं केवळ रूढ चालीरीतीवरून कायदेशीरपणा ठरविण्याचें धोरण अंगी-कारिल्यामुळें, विजातीय-विवाह हे मूळ स्मृति ग्रंथांप्रमाणें सशास्त्र असूनहि रूढीमुळें किंवा रूढीच्या अभावामुळें अशास्त्र ठरूं पाहात आहेत. गेलेली रूढी फिरून चालू करतां येईल; पण या गोष्टीस दिवस फार लागणार; नवीन लोकमतास कायद्याचें पाठबळ मिळालें असतां रूढी पाडण्याचें काम त्वरित होईल. असा कायदा करून विजातीय विवाहांस उत्तेजन दिल्यानें हिंदु लोकांच्या धर्मसमजुतींत सरकारानें हात घातला असें होणार नाहीं. कारण रूढिबाह्य विवाह कायद्यानें कायदेशीर ठरविला तरी तो करणारास वाटेल तर पतित मानण्याचा व त्यास बहिष्कृत ठेवण्याचा सनातन व पुराणप्रिय हिंदु समाजाचा जो हक्क आहे त्यास या कायद्यानें मुळींच बाध येत नाहीं. पुन-र्विवाहाच्या कायद्यानें पुनर्विवाह कायदेशीर ठरविला तरी, समाजानें वाटेल तर पुनर्विवाहित स्त्रीपुरुषांवर बहिष्कार घालण्याचा हक्क कांहीं काढून घेतला नाहीं. तीच गोष्ट रूढिबाह्य विवाहाचीहि होईल. पण भूपेंद्रबाबू म्हणतात कीं, ब्राह्मो लोकांना अस्पृश्यत्वाचे किंवा बहिष्काराचें जें भय वाटत नाहीं, तें भय लग्न बेकायदेशीर ठरण्याचें वाटतें. विवाहांचा 'कायदेशीर' पणा अगर 'बेकायदेशीर'

पणा ठरविणें हें काम धर्माचें नाहीं, तर सरकारचें आहे. सन १८५० च्या २१ व्या कायद्यानें धर्मांतर करणाऱ्या लोकांचें राजकीय स्वत्व राखिलें; तसेंच या नवीन कायद्यानें करावें म्हणजे झालें. समाजांत राहून बहिष्काराचा त्रास सोसावा लागेल तर तो आम्ही सोसूं; पण कालांतरानें तरी आमचें मत ग्राह्य मानण्यास आमच्या समाजाचें मन आम्ही वळवूं. विशिष्ट विवाह आज लोकप्रिय नसला तरी उद्यां होईल. तोंपर्यंत आम्ही समाजांत बाजूला राहूं व तसें राहिल्यानें धर्माचें कांहीं एक नुकसान होणार नाहीं. पण आज आम्ही हिंदुधर्मांतूनच निघून गेलों म्हणजे सर्व अवतारच खुंटला. अस्पृश्य हिंदु जातीची नोंद खानेसुमारींत 'हिंदु' या रकान्याबाहेर करण्याचें सरकारानें सुचवितांच लोकांस राग आला, व तो यथायोग्यहि होता. ब्राह्मो लोक धर्मविचारांत जरासे पुढें असले तरी ते सुशिक्षित व वजनदार असे आहेत. अर्थात् त्यांना हिंदु समाजांतून बाहेर लोटून देण्यांत समाजाचें हित नाहीं. सन १८७२ च्या कायद्याची, भूपेंद्रबाबू हल्लीं सुचवीत आहेत त्याप्रमाणें दुरुस्ती केल्यास ब्राह्मो लोक–किंबहुना विजातीय विवाह करणारे पण हिंदुत्वाचा अभिमान धरणारे सर्वच लोक–यांजवरचीहि हिंदुत्वास मुकण्याची ही आपत्ति तरी टळेल असें भूपेंद्रबाबूंचें म्हणणें आहे.

भूपेंद्रबाबूंच्या बिलाचें स्वरूप वर दिल्याप्रमाणें असून सरकारकडून हल्लीं त्यावर मतें घेण्याचें काम सुरू आहे. या बिलास कांहीं हरकत आहे असें आम्हांस तरी वाटत नाहीं. खुद्द सन १८७२ चेंच बिल आमच्यापुढें असतें तर कदाचित् गोष्ट वेगळी होती. विशिष्ट विवाहाचा सर्वच प्रश्न त्या वेळीं वादग्रस्त रीतीनें लोकांसमोर आला असता. पण आजच्या बिलाचें कार्य संकुचित व इष्टहि आहे असें आमचें मत आहे; आणि हिंदुत्वावर हल्लीं चहूंकडून कसा घाला घातला जात आहे हें लक्षपूर्वक पाहतील त्यांनाहि आमच्याप्रमाणेंच वाटेल. भूपेंद्रबाबूंच्या बिलास प्रतिकूल मत देणें म्हणजे केवळ सद्बुद्धीनें विशिष्ट सामाजिक सुधारणा करूं इच्छिणारास हिंदुसमाजांतून घालवून देण्यास मत देण्यासारखें आहे. ज्यांना पूर्वी 'हिंदु' या नांवाचा अभिमान वाटत नव्हता त्यांना तो हल्लीं वाटूं लागला आहे व अशा क्रांतीच्या वेळीं दरवाजे खुले करून घरचीं मुलें आपण परत घरांत घेतलीं पाहिजेत. त्यांना

बाहेर घालविल्यानें हिंदुसमाजाचा तोटा आहे हें विसरतां कामा नये. या बिलानें हिंदुधर्माचा फायदा होणार आहे, हें सरकारास व मुसलमानांस कळून चुकल्यामुळेंच बिलाच्या पहिल्या वाचनाच्या वेळीं वरील दोघांकडून त्यास विरोध करण्यांत आला; व हें बिल अखेर बहुमतानें नामंजूर होण्याचाहि संभव दिसतो. तथापि, हिंदुसमाजानें तरी त्यास पाठबळ देऊन आपलें कर्तव्य केलें पाहिजे, मग इतरांच्या प्रतिकूलतेनेंच काय होणें असेल तें होईल!

हिंदुधर्माच्या चालीरीतींत व धर्मांत सन १९११च्या बिलानें हात घातल्या-सारखा होतो ही कोणाची कल्पना असेल तर ती बरोबर नाहीं. १८७२ च्या कायद्यानें हिंदुधर्मांत जो हात घातला गेला, हिंदु समाजावर त्या कायद्यानें जो आघात केला व त्याच्या बळकटीस जें वैगुण्य आणलें त्याची झाली तर दुरुस्तीच भूपेंद्रबाबूंच्या हल्लींच्या बिलानें होण्याचा संभव आहे. विशिष्टविवाह–म्हणजे विजातीय विवाह, किंवा रूढविधींमध्यें सुधारणा करून होणारे विवाह–सनातन धर्माभिमान्यांस सर्वस्वीं प्रिय नसतील, पण प्रस्तुतच्या बिलाचा विषय तो नाहीं; तो विषय म्हटला म्हणजे ब्राह्मो लोक झाले तरी ते हिंदुत्वास मुकावे कीं काय–हिंदुत्वास मुकण्याची त्यांजवर सक्ति व्हावी कीं काय–एवढाच आहे; व या प्रश्नाचें उत्तर 'होय' असें आजच्या स्थितींत कोणीहि समंजस व दूरदर्शी हिंदु देईल असें आम्हांस वाटत नाहीं. सन १८७२ च्या कायद्याचीच मुळीं जरूरी होती कीं काय, हा प्रश्न वेगळा. वर सांगितल्याप्रमाणें सन १८७२ च्या कायद्याचेंच बिल जर आज लोकांपुढें असतें तर त्यांनीं असें म्हटलें असतें कीं, "हें बिल आम्हांस नको; या बिलाच्या योगानें कायद्यानें धर्मांत अप्रत्यक्ष रीतीनें हात घातल्यासारखें होत आहे; थोड्याशा सुधारकांस आपल्या सुधारणा प्रिय वाटत असतील तर त्याकरितां थोडीशी अडचण व थोडासा त्रासहि सोसण्यास त्यांनीं तयार झालें पाहिजे; जर तुमचे विशिष्ट विवाह जातींत ते आजकाल रूढ नाहींत एवढ्याकरितांच निंद्य मानले जातात, तर ते वंद्य होण्यासारखी रूढी पाडण्याचें तुमच्याच हातीं आहे. तुम्ही खटपट करा. कोणती समाजसुधारणा तिच्या पुढाऱ्यांनीं प्रथम स्वतः त्रास व लोकाप-वाद सोसल्याशिवाय आजपर्यंत रूढ झाली आहे? रूढ नसलेल्या पद्धतीनें केलेले विवाह कित्येक हायकोर्टांनीं बेकायदेशीर मानले ही गोष्ट खरी, पण कायदेशीरपणा येण्यास जर रूढी पडणें–विवक्षित गोष्टीचा पुनःपुनरुच्चार

होणें—एवढीच अट असली, तर जनमत तयार नसतां कायद्याकडे धांव घेऊन समाजबाह्य मदतीवर भिस्त टाकून समाजांत नांदण्यांत फारसें भूषण नाहीं—त्यांत राहून आपल्या उदाहरणानें व उपदेशानें जनमत बनवून रूढी पाडण्यांतच अधिक भूषण आहे "—असें लोकांनीं म्हटलें असतें व त्या वेळीं तें बरोबर झालेंहि असतें.

पण हल्लींचा वाद सर्वच निराळा आहे. सन १८५२ सारखा कायदा नवीन करण्याचा तो वाद नाहीं. तसा असता तर आम्हींहि त्यास विरुद्ध मत दिलें असतें. अथवा तो कायदा रद्द होण्याचाहि आज प्रश्न नाहीं. कारण ज्या कोणास तो कायदा नको असेल अशा कोणी तो रद्द करण्याचा उपक्रम केलेला नाहीं, व केला तरी सिद्धीस जाण्याचा संभव नाहीं. पण सन १८७२ सालीं पास होऊन राहिलेला कायदा धड सनातन धर्माभिमान्यांस हवा तसा नाहीं, व धड समाजसुधारकांस हवा तसाहि तो नाहीं. आहे तो अर्धवट आहे. त्याच्या योगानें विशिष्ट विवाह कांहीं थांबत नाहींत; पण तसें करणारे मात्र आपल्याच कबुलीनें पण आपल्या इच्छेविरुद्ध हिंदुत्वास मुकतात व हिंदु समाजास कमकुवत करतात. घातक असें विष मात्र त्या कायद्यानें समाजाच्या शिरांत ओतलें गेलें; पण त्या विषावर जो उतारा त्याचबरोबर ओतावयास पाहिजे होता तो मात्र सन १८७२ च्या कायद्यानें मागें ठेवला. ना. भूपेंद्रनाथ यांच्या बिलाचा हेतु आज तो उतारा समाजशरीरांत घालण्याचा आहे. यास्तव त्याला विरोध करणें हें समाजविघायक होईल. सन १८७२ चा कायदा करून घेण्यास त्या वेळचे ब्रह्मसमाजिस्ट कबूल होते; तो कायदा तसाच रहा-वयाला ते आज कबूल नाहींत. या दृष्टीनें पाहतां भूपेंद्रबाबू म्हणतात, त्या-प्रमाणें लोकमत बदललें आहे यांत शंका नाहीं.

अशा रितीनें भूपेंद्रबाबूंचें बिल अगदीं जरूरीचें आहे; व हिंदुसमाजाचा राजकीय दूरदृष्टीनें विचार करणाऱ्या प्रत्येक हिंदूनें त्यास संमति दिली पाहिजे हें उघड ठरतेंच. पण प्रस्तुतच्या बिलापलीकडे जाऊन विशिष्ट विवाहाच्या एकंदर प्रश्नाचाहि सामाजिक दृष्ट्या थोडाबहुत विचार करणें जरूर दिसतें. कारण साधारण मनुष्यास कायद्याची सूक्ष्म दृष्टि नसते; वडाची साल पिंपळास लावण्याची त्याची प्रवृत्ति असते; लागू गोष्टी कोणत्या, गैरलागू कोणत्या हें त्यास नीट समजत नाहीं; फार काय पण खुद्द वरिष्ठ कायदे कौन्सिलांतील कित्येक

सभासदांनीं भूपेंद्रबाबूंच्या बिलावर नसते दुर्गुण लादून त्याचें स्वरूप भयंकर आहे असें भासविलें. यास्तव विशिष्ट विवाहाचा प्रत्यक्ष संबंध या बिलाशीं येत आहे असें घेऊन चाललें तरी, धर्मदृष्ट्या कोणते विवाह सशास्त्र आहेत, कोणते अशास्त्र आहेत, विवाहाच्या बाबतींत लोकमत पूर्वी कसें होतें व हल्लीं कसें आहे, याचें थोडेंबहुत विवेचन केल्यास तें आजच्या स्थितींत उपयोगी पडेल असें वाटतें.

हिंदुधर्मशास्त्राप्रमाणें विवाह हा गृहस्थाश्रमांतील एक मुख्य विधि आहे. ब्रह्मचर्याश्रम पाळून गुरुगृहाहून अध्ययन संपवून परत आलेल्या प्रत्येक हिंदूनें विवाह करून गृहस्थाश्रमांत शिरावें असा नियम शास्त्रकारांनीं घालून ठेवलेला आहे. पण विवाहाच्या रीतीस कांहीं बंधनें आहेत. याज्ञवल्क्य–स्मृतींत हीं बंधनें खालील श्लोकांत सांगितलीं आहेत.

अविप्लुतब्रह्मचर्यो लक्षण्यां स्त्रियमुद्वहेत् ।
अनन्यपूर्विकां कांतामसपिंडां यवीयसीम् ॥

यांतील सर्वच बंधनें मोडतां न येणारीं आहेत असें मात्र नाहीं. उदाहरणार्थ, लग्नसमयीं वर हा अविप्लुत ब्रह्मचर्य–म्हणजे ज्याचें ब्रह्मचर्यव्रत मोडलें नाहीं असा असावा असें सांगितलें आहे. तथापि, एखाद्या वराकडून ब्रह्मचर्यव्रताचें उल्लंघन झालेलें असलें तरी त्यानें केलेला विवाह इतर रीतींनीं योग्य असेल तर केवळ या कारणानें फुकट जाणार नाहीं. तसेंच वधू ही ' लक्षण्या ' म्हणजे बाह्याभ्यंतर सुलक्षणांनीं युक्त अशी असावी असें सांगितलें आहे. तथापि एखादी कुमारिका कुलक्षणा असली तरी त्यामुळें तिचा विवाह अशास्त्र ठरतो असें नाहीं. वधू ही ' कांता ' म्हणजे प्रेम वाटण्यास योग्य अशी असावी असेंहि सांगितलें आहे. तथापि, हें बंधन सर्वस्वीं अनिर्वाह्य आहे असें नाहीं. एखादी कुमारी कमनीय नसली तरी एखादा तुल्यगुण वर तिला पसंत करील; व तें लग्न अशास्त्र होणार नाहीं. तसेंच मनुस्मृतींत तिसऱ्या अध्यायाच्या प्रारंभीं जे वधूगुण व कुलगुण म्हणून सांगितले आहेत तशा गुणांची वधू न मिळाली, अथवा जे व्यक्तिदोष व कुलदोष म्हणून सांगितले आहेत तशा दोषांनीं युक्त अशी वधू दुर्दैवानें एखाद्याच्या गळ्यांत पडली तरी त्या गोष्टीनें तो विवाह अशास्त्र ठरत नाहीं.

साधारणतः धर्मशास्त्रांत अनिर्वाह्य विधि व निषेध यांचेंच मुख्यतः विवेचन असावें. परंतु मनुस्मृतींत जे कुलदोष व वधूदोष म्हणून सांगितले आहेत, ते इतके बारीकसारीकहि आहेत कीं ते सर्व टाळणें कठिणच आहे. उदाहरणार्थ,

नोद्वहेत् कपिलां कन्यां नाधिकांगीं न रोगिणीं
नालोमिकां नातिलोमां न वाचाटां न पिंगलां
नर्क्षवृक्षनदीनाम्नीं नान्त्यपर्वतनामिकां
न पक्ष्यहिप्रेष्यनाम्नीं न च भीषणनामिकां

जी कन्या कपिल रंगाची आहे, जिला अवयव अधिक आहेत, जिला मुळींच केश नाहींत किंवा फार केश आहेत, जी वाचाट आहे, पिंगळ्या डोळ्यांची आहे, नक्षत्र, वृक्ष, नदी, अंत्यज, पर्वत, पक्षी, सर्प, नोकर, इतक्यांपैकीं एखाद्याचें वाचक असें जिचें नांव आहे, किंवा वरीलपैकीं कशाचेंहि वाचक असें नांव नसतांहि जिचें नांव उच्चारमात्रेंकरून भयंकर आहे अशा कन्येशीं लग्न करूं नये. हे निर्बंध, आणि वय, गोत्र, वर्ण व पिंड यांविषयीं निर्बंध हे सर्व सारख्या दर्जाचे आहेत असें कोणीहि समजत नाहीं, हें उघडच आहे. जी गोष्ट वधूला लागू तीच वरालाहि लागू आहे. यमस्मृतींत

कुलं च शीलं च वयश्च वित्तं
विद्या च रूपं च सनाथता च ।
एतान् गुणान् सप्त परीक्ष्य देया
कन्या बुधैः शेषमचिंतनीयं ॥

असें सांगितलें आहे. परंतु या वरगुणांवर विवाहाची सशास्त्रता अवलंबून नाहीं. विवाह ठरविण्याच्या आधीं वराच्या आईबापांचें कुल नीट पाहावें, बुद्धिमान् अशा वरास ' बुद्धिरूपशीललक्षणसंपन्ना ' व ' अरोगा ' अशी कन्या द्यावी, असें आश्वलायनगृह्यामध्येंहि सांगितलेलें आढळतें. तथापि कुलपरीक्षा, वधूपरीक्षा, वरपरीक्षा वगैरेविषयीं स्मृतिग्रंथांतून आलेलीं वचनें अर्थवाद, शिफारस, उपदेश अशाच स्वरूपाचीं असतात. त्याचप्रमाणें तिथिवार, नक्षत्र, मुहूर्त वगैरे विवाहकालसंबंधीं गोष्टीहि वरीलप्रमाणेंच आहेत, म्हणजे अनिर्वाह्य अशा नाहींत. या सर्वांत सरस व नीरस असा भेद बुद्धिपुरःसर केलेला असतो व त्या भेदावर पुण्यपाप, शुभाशुभ, यशापयश वगैरे फळेंहि अवलंबून असतात असें समजलें जातें खरें. परंतु या सरस—नीरस भेदांचा

सशास्त्र-अशास्त्र या भेदांशीं अन्वयव्यतिरेकानें संबंध जोडतां येत नाहीं. सहृदयता, सदभिरुचि, सोय, सुख, प्रेय, श्रेय, या सर्वांच्या मर्यादा आणि सशास्त्रतेच्या मर्यादा यांचा छेद नेहमीं एकाच बिंदूवर पडेल असें नाहीं.

वरील किरकोळ गोष्टींशिवाय विवाहविधीसंबंधानें दुसऱ्यास कांहीं गोष्टी अधिक महत्त्वाच्या आहेत. त्या म्हटल्या म्हणजे वधूचें विवाहकालचें वय, वधूवरांचे वर्ण म्हणजे जाती व त्यांचा परस्पर पिंडसंबंध. या गोष्टींविषयींचे नियम मात्र अधिक कडक आहेत. उदाहरणार्थ, कन्या सुलक्षण नसली तरी ती विवाहास सर्वस्वीं अयोग्य किंवा तिचा विवाह अशास्त्र ठरत नाहीं हें वर सांगितलेंच आहे; पण याज्ञवल्क्यानें सांगितल्याप्रमाणें ती अनन्यपूर्विका नसेल म्हणजे दान अगर उपभोग यांनीं ती पूर्वदूषित असेल, तर अशा स्त्रीशीं केलेला विवाह सशास्त्र अगर अशास्त्र होतो किंवा काय हें ठरविणें तितकें सोपें नाहीं. जिचा पूर्वी एक वेळ लौकिकदृष्ट्या विवाह झालेला होता अशा स्त्रीचा विवाह म्हणजे पुनर्विवाह सशास्त्र आहे कीं अशास्त्र आहे या गोष्टीचा वाद आज पिढ्यानुपिढ्या चालत आलेला आपण पहात आहों. आपण दुसरेंहि एक उदाहरण घेऊं. याज्ञवल्क्यस्मृतींतील वरील श्लोकांत वधू ही यवीयसी म्हणजे वराहून अल्पवयाची अर्थात् धाकटी असावी असा नियम दिसतो. परंतु कित्येक वैश्य वगैरे जातींत वरापेक्षां वधू अधिक वयाची असली तरी चालते. तो विवाह केवळ त्या कारणानें रद्द होत नाहीं हें प्रसिद्ध आहे. ब्राह्मण जातीमध्यें असा प्रश्न कदाचित् आजपर्यंत उपस्थितच झालेला नसेल असें वाटतें. परंतु वधूवरांच्या सापेक्ष वयप्रमाणाविषयींचा हा निर्बंध कोणत्या दर्जाचा आहे हें त्या बाबतींत एखादें वादग्रस्त उदाहरण घडून येईपर्यंत निश्चित ठरणार नाहीं. स्मृतिग्रंथांमध्यें उच्च नीच महत्त्वाचे निर्बंध एकत्र गोंविले गेल्यामुळें असा प्रकार होणें साहजिकच आहे. स्पष्ट व व्यवच्छेदक स्वरूप दिलेल्या आधुनिक कायद्यांच्या कलमांच्या अर्थाबद्दलहि जर आज मोठमोठे वाद माजलेले आपण पाहतों, तर ज्या वेळीं सूत्ररूपानें अर्थात् संक्षेपानें लिहिण्याचा प्रघात होता, व धर्मशास्त्रकारांनीं श्लोकबद्ध ग्रंथरचना करण्याचें अंगीकारल्यामुळें पदांचा क्रम व वाक्यरचना हीं गणमात्रा साधण्यापेक्षां गौण मानण्यांत येत असत अशा वेळीं व अशा रीतीनें लिहिलेल्या धर्मग्रंथांच्या अर्थाबद्दल संशय उत्पन्न व्हावे, व क्वचित् प्रसंगीं एकवाक्यतेच्या

भरीस भरलेल्या कुशाग्रबुद्धीच्या टीकाकारांकडून अशा संशयांचें निरसन न होतां ते संशय उलट पल्लवितच व्हावे, यांत कांहीं आश्चर्य नाहीं.

असो; वधूचें निरपेक्ष वय व वधूवरांचें सापेक्ष वय याहूनहि वर्ण व सापिंड्य यांचें हिंदुधर्मशास्त्रांत अधिक महत्त्व मानलें गेलें यांत शंका नाहीं. परंतु त्यांतहि थोडासा विवेक आहे; म्हणजे असवर्ण अशा वधूवरांचा विवाह विशिष्ट परिस्थितींत चालूं दिला जातो, व त्यासंबंधाचें थोडेंसें विवेचन पुढें आम्हांस स्वतंत्र करावयाचेंच आहे. परंतु चालू बाब पूर्ण करण्याकरितां आम्हांस एवढेंच सांगावयाचें आहे कीं, वर्णनिर्बंधापेक्षांहि सापिंड्यनिर्बंध हा अधिक अनिर्वाह्य मानला जातो. सापिंड्य हाहि शब्द बिलकूल वादग्रस्त नाहीं असें नाहीं. परंतु सापिंड्यनिर्बंध हाच हिंदुधर्मशास्त्रदृष्ट्या सर्वांत अधिक महत्त्वाचा असें ठरतें. मुसलमान, पारशी, यहुदी वगैरे लोकांतहि एकप्रकारचें सापिंड्यबंधन मानलें जातें; पण तें आमच्याहून फारच संकुचित आहे. मुसलमान, पारशी वगैरे लोकांत सख्ख्या चुलत भावंडांचीं लग्नें होतात; परंतु हिंदुसमाजांत इतक्या निकट नात्याच्या मुलामुलींचीं लग्नें होत नाहींत. हिंदु-धर्मांतहि क्षत्रियांमध्यें मामे–आते भावंडांचा विवाह होतो; व देशस्थ ब्राह्मणांच्या एका शाखेंत मामाभाची व मामेआतेभावंडें यांचे विवाह होतात. पण अर्थात् हें शास्त्र नव्हे, रूढी आहे. व 'शास्त्रात् रूढिर्बलीयसी' या न्यायाचें तें एक ठळक उदाहरण होय. परंतु हिंदु लोकांत एकंदरीनें सापिंड्य-बंधनच विशेष पाळिलें जातें यांत शंका नाहीं. किंबहुना असेंहि म्हणतां येईल कीं, सापिंड्याच्या बाबतींत सनातन हिंदुधर्मशास्त्र व अगदीं आधुनिक शास्त्राचें मत यांची एकवाक्यता होते. जगांतील कोणत्याहि देशांत अमुक एका नात्याच्या स्त्री-पुरुषांनीं परस्पर विवाह करूं नये–अर्थात् असा विवाह केला असतां तो अशास्त्र येवढेंच नव्हे तर बेकायदेशीरहि होतो–असें कायद्यानें ठरविलेलें आढळतें.

हिंदुस्थानच्या सन १८७२ सालच्या तिसऱ्या ॲक्टाच्या दुसऱ्या कलमांतहि सापिंड्यनिर्बंधास सर्वांत अधिक महत्त्व दिलेलें आहे. लोकांस आपला पूर्वापार धर्म, चालीरीती व विवाहविधींचे रूढ नमुने यांस सोडचिठ्ठी देण्याची जो कायदा परवानगी देतो तो कायदा देखील सापिंड्याच्या कांहीं पायऱ्या विवाहोन्मुख स्त्रीपुरुषांस सर्वस्वीं अनुल्लंघनीय असें ठरवितो. सदरहू कलमांत

असें ठरविलें आहे कीं, ५ व्या पिढीच्या पूर्वजांच्या द्वारानें ज्यांचा सापिंड्य-संबंध सिद्ध होतो, अशा स्त्रीपुरुषांचें लग्न कायदेशीर मानलें जाणार नाहीं. तसेंच ज्या स्त्रीपुरुषांचा पूर्वज व वंशज असा प्रत्यक्ष संबंध येतो तेथें तीं परस्परांपासून किती पिढ्यांनीं दूर आहेत हें मुळीं पहावयासच नको ! कारण तो संबंध सर्वथा वर्ज्य आहे. व जी गोष्ट प्रत्यक्ष पूर्वज व वंशज यांचा तीच त्या पूर्वजांशीं अगर वंशजांशीं भाऊ अगर बहीण हें नातें असलेल्यांचीहि समजावी असें या कायद्यांत सांगितलें आहे. अर्थात् सूक्ष्म विचार करणारास असें दिसून येईल कीं, वर सांगितल्याप्रमाणें देशस्थांतली मामाभाचीचीं किंवा इतरांचीं आते-मामेभावंडांचीं लग्नें रूढीबलामुळें सशास्त्र व कायदेशीर होत असलीं तरी सन १८७२ च्या कायद्याप्रमाणें तीं बेकायदेशीर ठरतील व नोंदलीं जाणार नाहींत; व अशा विवाहापासून झालेल्या संततीस कायदेशीर संततीचे अधिकार व हक्क मिळणार नाहींत. सन १८७२च्या कायद्यानें वधूवरांस जें स्वातंत्र्य दिलें आहे तें सापिंड्याची ही बाब वर्ज्य करून इतर गोष्टींत दिलेलें आहे. म्हणजे उदाहरणार्थ, एकाच गोत्रांतील अगर समान प्रवर असलेल्या कुळांमधील पांचांपलीकडील पिढ्यांतील स्त्रीपुरुषांचे विवाह सन १८७२ सालच्या कायद्याप्रमाणें नोंदविले असतां कायदेशीर ठरतील. तसेंच कोणत्याहि वर्णांतील स्त्रीपुरुषांनीं इतर कोणत्याहि वर्णांतील पुरुषस्त्रीशीं केलेलीं लग्नें सन १८७२ च्या कायद्यानें कायदेशीर ठरतात. असो. वर्ण व गोत्रप्रवर यांचेंच बंधन जेथें नाहीं तेथें विवाहविधीच्या रूढपद्धतीचें बंधन न मानल्यास त्यांत आश्चर्य मानण्याचें कारण नाहीं.

वरील विवेचनावरून वाचकांच्या हें लक्षांत आलेंच असेल कीं, भूपेंद्र-बाबूंच्या बिलांत मुख्य वादग्रस्त अशी जी गोष्ट आहे, ती सवर्णत्व व विवाह-विधीच्या रूढ अशा चालीरीति या बंधनांच्या उल्लंघनासंबंधाची आहे. या दृष्टीनें पाहतां सनातनधर्मवादी या कायद्यास हरकत घेतीलच हें उघड आहे. पण या कायद्याखालीं लग्न रजिस्टर करणारांस काडी मोडून घेण्याचा हक्कहि मिळतो, या दृष्टीनें समाजसुधारकहि या कायद्यास प्रतिकूल असणें शक्य आहे. अर्थात् असला हा कायदा समूळ रद्द होणें सर्वस्वीं इष्ट आहे. परंतु हें म्हणणें वेगळें आणि ना. बसू यांनीं योजलेली दुरुस्ती होऊं नये हें म्हणणें वेगळें. सन १८७२ चा कायदा प्रचलित अशा कित्येक धर्ममतांस विरोधी आहे हें खरें; पण तसें

असतांहि नवीन मतवाद्यांची इच्छा हिंदुधर्मांत राहाण्याची असतां त्यांजवर तो धर्म लेखी कबुलीनें सोडण्याची सक्ति होणें हें आम्हांस पसंत नाहीं. सुधारक झाले तरी त्यांस हिंदुसमाजांत होतां होईतों नांदूं देण्यास कोणींहि हरकत घेण्याचें कारण नाहीं. आमच्या धर्मांतले पतित झाले तरी ते आमचेच आहेत. राष्ट्रीय-दृष्ट्या हिंदु इसम पतित व बहिष्कृत झाला तरी तो हिंदूच राहणार. बहिष्कृत असूनहि समाजांत तो राहील तर पुढेंमागें शुद्ध होईल किंवा त्याच्या पुढच्या पिढ्या शुद्ध होतील. पण जो हिंदुधर्म म्हणजे अर्थात् हिंदुसमाज या दोहोंना सोडून गेला तो कायमचाच गेला हें विसरतां कामा नये.

ना. बसू यांच्या बिलासंबंधाच्या वादास अलीकडे बरेंच स्वरूप आलेलें असून त्यांतील मुख्य मुद्दे व पोटमुद्दे यांचा पुष्कळसा कीस निघालेला आहे. सुदैवानें प्रस्तुत बिलाचें स्वरूप संमतिवयाच्या बिलासारखें नसून, केवळ एका विशिष्ट वर्गास तें उपकारक असल्यानें, त्याच्या गुणदोषांविषयीं मतभेद असला तरी त्वेष येण्यासारखें त्यांत कांहीं नाहीं. यामुळें वादांत मतस्वातंत्र्य व सहिष्णुता यांचा बराच मेळ पडलेला आढळून येतो. सदरहू बिलासंबंधानें गेल्याचें मागील रविवारीं मुंबई येथें जाहीरसभा भरली होती. परंतु आमच्या मतें, ना. बसू यांचें बिल ज्याप्रमाणें एकांगी आहे, त्याचप्रमाणें मुंबईच्या या सभेच्या विचाराची दिशाहि उलट बाजूस पण एकांगीच आहे, असें म्हणावें लागतें. १८७२ च्या कायद्याच्या दुरुस्तीनें सर्व हिंदुसमाजाच्या हितास मोठाच धक्का पोहोंचतो असें ज्यांचें मत आहे, त्यांनीं या मूळ कायद्याच्या विरुद्ध सभेंत किंवा ठरावांत एक ब्रहि काढूं नये, ही गोष्ट अत्यंत आश्चर्यकारक आहे ! सन १८७२ चा कायदा फार थोड्या लोकांच्या सोयीकरितां केलेला असून त्यानेंच हिंदुसमाजाच्या हितास एका दृष्टीनें धक्का लाविला ही गोष्ट सभावाल्या मंडळीस माहीत नाहीं असें कोण म्हणेल ? बरें, ज्या थोड्या लोकांकरितां हा कायदा करण्यांत आला तो प्रजाजनांच्या सदसद्विवेकबुद्धीस व मतस्वातंत्र्यास पूर्ण मोकळीक मिळावी म्हणून—मग ते लोक कितीहि थोडेअसले तरी चालतील—अशी विचारसरणी जर १८७२ च्या कायद्यासंबंधानें पतकरली, तर त्या कायद्याची दुरुस्ती व्हावी असें म्हणणाऱ्या प्रजाजनांच्या सदसद्विवेकबुद्धीस व मतस्वातंत्र्यास आज तरी तोच मान कां मिळूं नये ! मग ते लोक थोडे असले म्हणून काय झालें ? हिंदु धर्म लेखी कबुलीनें सोडण्याची सक्ति त्यांच्यावर कां व्हावी ?

शिवाय अशी सक्ति करण्यास हक्क तरी कोणास पोहोंचतो ? खरोखर सनातन हिंदुधर्माचीं तत्त्वें काय, हें ठरविणें व याविषयीं एकवाक्यता होणें हें केवळ तात्त्विकदृष्ट्या जरी कठिण नसलें, तरी निदान आजच्या घटिकेस व्यावहारिक रीत्या पुष्कळच बिकट आहे यांत शंका नाहीं; व या तात्त्विक सनातन धर्मतत्त्वांस सोडून जे आचारविचारांत कधीं वागत नाहींत, त्यांनीं ना. बसू यांच्या बिलास विरोध करणें शोभेल. अशा लोकांस ही आपली वाणी टिकविण्यास कदाचित् समाज सोडून अगदींच एका बाजूस जाऊन एखाद्या योग्याप्रमाणें, वानप्रस्थाप्रमाणें किंवा संन्याशाप्रमाणें अलग रहावें लागेल ती गोष्ट वेगळी. परंतु अशा लोकांना ना. बसू यांच्या बिलासच काय, पण आजच्या हिंदु समाजाच्या अनेक आचारांसहि नांवें ठेवण्याचा अधिकार पोहोंचेल व समाजापासून अलग राहिल्यानें तो अधिकार बजावितांहि येईल. पण ना. बसू यांच्या बिलास विरोध करणाऱ्या लोकांत, नुसत्या मुंबईच्या सभेचेंच एक उदाहरण घेतलें तरी, इतकी पंचमेळ खिचडी दिसून येते कीं, अशा लोकांनीं हिंदुत्वाचीं मुख्य अंगें ठरविण्याचा, एवढेंच नव्हे तर यांपैकीं एखादें अंग कदाचित् ज्यांस मान्य होणार नाहीं अशा लोकांस हिंदुत्वांतून कायमचें हद्दपार करण्याचाहि अधिकार आपल्या हातीं घेतलेला पाहून हंसू मात्र आल्याशिवाय रहात नाहीं. राजदंड हा दिसण्यांत मोहक दिसतो, व तो हातीं धारण केल्यानें अंगीं येणारी सत्ताहि मोहक आहे यांत शंका नाहीं. परंतु राजदंड हातीं शोभण्यास आधीं अंगांत राजतेज असावें लागतें, याची वाट काय ? ना. बसु यांचें बिल मंजूर झाल्यास फार तर परजातींतील स्त्रीशीं लग्न केलेल्या एखाद्या मनुष्यास ' मी हिंदुधर्मांचा नाहीं ' असें लिहून देण्याचें भाग पडणार नाहीं. अथवा सन १८७२ च्या मूळ कायद्यांत पतिपत्नीस घटस्फोटाची परवानगी ठेवलेली असल्यामुळें, वर सांगितल्या प्रकारें स्वतः हिंदू म्हणवून घेणारें एखादें जोडपें कायदेशीर घटस्फोटहि करवून घेईल, असें आपण घेऊन चालूं. आधीं ना. बसु यांच्या बिलाचा मुख्य हेतु असल्या अनर्थावह गोष्टीस उत्तेजन देण्याचा नाहीं हें तर आहेच. परंतु क्वचित् प्रसंगीं असले अनर्थ होतील असें घेऊन आपण चाललों तरी आज हिंदुसमाजामध्यें कित्येक लोक ज्यास ' सुधारणा ' म्हणतात पण दुसरे कित्येक लोक ज्यास ' भ्रष्टाकार ' म्हणतात असे अनर्थ होत आहेत त्यांची वाट काय ?

कोणच्याहि काळीं हिंदू जातींतील बहुमतास जें संमत तेंच हिंदुत्व हें उघड आहे. या दृष्टीनें पाहतां आज विधवा-विवाह, गोमांसभक्षण, मद्यपान याहि गोष्टी अहिंदुत्वदर्शकच नाहींत काय ? व हें जर खरें तर, ना. बसू यांच्या बिलास विरोध करणाऱ्या कित्येक लोकांस मुंबईच्या या जाहीरसभेंतूनच काय परंतु हिंदुसमाजांतून हद्दपार करावयास पाहिजे ! खरें बोलावयाचें तर आजच्या बहुमताप्रमाणें सनातन व अस्सल हिंदुधर्माच्या तत्त्वांत वेदांच्या ठिकाणीं अपौरुषेयत्व व प्रामाण्यबुद्धि ठेवणें, जातिभेद मानणें, स्मृतिग्रंथांत सांगितलेलें 'पीनल कोड' वगैरेंचा अवश्य समावेश होतो, हें उघड आहे. पण जव्हेर बागेंत जमलेल्या लोकांच्या पुढाऱ्यांपैकीं किती लोक हीं तत्त्वें सर्वांशीं मान्य करणारे होते, याचा विचार केला म्हणजे मोठी मौज वाटते ! शास्त्रग्रंथांच्या शब्दांचा वकिली पद्धतीनें कीस काढून व खोट्या एकवाक्यतेचें प्रस्थ माजवून आपणास प्रिय असलेल्या तेवढ्या समाजसुधारणांचें सनातन हिंदुत्व ठरवूं पहाणें ही फक्त कुशाग्रबुद्धीची लीला झाली. पण हिंदुसमाजांतील बहुजनमताप्रमाणें पाहतां या लोकांस हिंदुसमाजरूपी ग्रामांत स्थान मिळणें शक्य नाहीं; अशा लोकांनीं हिंदुसमाजरूपी शहराबाहेरच्या महारवाड्यांतच राहिलें पाहिजे; व तेंच स्थान त्यांस योग्य, असें आजचें हिंदुबहुजनमत म्हणणार. आतां एका बाजूनें हिंदुसमाजांतील बहुमत झालें तरी तें पंगू आहे, त्यास आपला पूर्ण अधिकार बजावण्यास व्यावहारिक अडचणी पुष्कळ आहेत ही एक गोष्ट व दुसरी गोष्ट अशी कीं, हिंदु धर्माच्या अनुयायांनीं बनविलेला तो हिंदु समाज असें नसून हिंदु म्हणवून घेणाऱ्या समाजानें वेळोवेळीं बनविलेला तो हिंदु धर्म, अशी स्थिति असल्यामुळें समाजांतील अल्पमतवाद्यांसहि काळाचा एकप्रकारें पाठिंबा असतो; म्हणून ते या 'म्हारवड्यांत' कोंडले न जातां समाजाच्या गांवांतच कमीअधिक मोकळिकीनें नांदत असतात. पण अशी जर वस्तुस्थिति आहे, तर एखाद्या ब्राह्मणानें परजातीच्या स्त्रीशीं विवाह केला म्हणून त्याचें तेवढें मात्र उच्चाटन हिंदु धर्मांतून व्हावें, अशी सक्ति करण्याचा अधिकार स्वतः भ्रष्ट असणाऱ्या या लोकांस कसा पोहोंचतो, हें आम्हांस तरी कळत नाहीं.

असले विवाह होणें इष्ट आहे असें आम्ही म्हणत नाहीं, हें सांगितलेंच पाहिजे असें नाहीं. परंतु " आज समाजानें अनिष्ट मानिलेली अशी एखादी गोष्ट करणारानें हिंदुधर्म लेखी इकरारानें आधीं सोडवावा व मग ती करावी "

या म्हणण्यास तात्त्विक युक्तिवादाचें अधिष्ठान भरपूर असलें, तरी इतर कित्येक सामाजिक 'सुधारणांच्या' जोडीला लावून पाहतां हा करारीपणा खास अन्यायमूलक आहे व व्यावहारिक दृष्ट्या तो तडीसहि जाणार नाहीं, असेंच दिसून येईल. बरें, दुरुस्त झालेल्या सन १८७२ च्या कायद्याचा क्वचित् फायदा घेणाऱ्या लोकांस हिंदुसमाजानें अंतर्व्यवस्थेंत बहिष्कृत करूं नये, असें कोणीं म्हटलेलें नाहीं; व कोणीं तसें म्हटलें असतें तरी समाज आपल्या बहिष्कार वगैरे अस्त्रांचा उपयोग करणार नाहीं, असें कधीं होणारहि नाहीं. प्रश्न एवढाच कीं, अशा लोकांवर हिंदुधर्म सोडून आम्ही गेलों अशा लेखी कबुलीची सक्ती करावी कीं काय, एवढाच आहे; व इतर कित्येक सुधारणावादी हिंदु लोकांची ज्या रीतीनें संभावना होते त्याच रीतीनें याहि लोकांची व्हावी एवढेंच काय तें म्हणणें आहे. वादच निघाला तर साफ असें विचारतां येईल कीं, जातिभेद न मानणें, मद्यमांससेवनादि प्रायश्चित्तें असलेलीं अगर नसलेलीं पातकें 'सुधारणा' म्हणून अनेकवार करण्याचा प्रघात ठेवणें, पुनर्विवाहादि गोष्टी करणें व स्मृतिग्रंथांत सांगितलेलें एकंदर पीनलकोड धाब्यावर बसवून वर्णाश्रम–धर्माचा उच्छेद करणें वगैरे गोष्टींचें आचरण व समर्थन ज्यांच्या हातून घडतें अशांच्या गुन्हेगारीपेक्षां, परजातीय स्त्रीशीं लग्न करून परंतु पतिपत्नीधर्म पाळून जर एखादा हिंदु राहिला तर त्याची गुन्हेगारी अधिक कां मानण्यांत यावी? गुन्हेगारी मानली तरीहि मानली जावो, त्यास कडकडीत बहिष्कार समाजानें खुशाल घालावा. पण खरोखर आपल्या मनानें त्यानें हिंदुधर्म सोडला नसतां तसें त्याजकडून लिहून घेतलें जावें यांत कोणचें शहाणपण किंवा कोणचा पुरुषार्थ? जो पूर्वींचाच धर्मलंड असेल त्याजकडून माझा अमुक धर्मावर विश्वास नाहीं, असें विजातीय विवाहाच्या वेळींच तेवढें लिहून घेतल्यानें त्यास स्वतःस कोणची शिक्षा झाली? किंवा इतरांस कोणता धाक बसला? बरें, विजातीय विवाह करणाऱ्या एखाद्या मनुष्याच्या मनांत हिंदुधर्माचीं तत्त्वें खरोखरच बाणलीं तर, माझा हिंदुधर्मावर विश्वास नाहीं असा लेख त्याकडून लिहून घेतल्यानें खरेपणा तो काय राहिला? बहुमत समाजास असली एखादी व्यक्ति आपल्यांत नसावी असेंच जर खरोखर वाटत असेल, तर केवळ वरील लेखी इकरार लिहून न घेतल्यानें तो समाजांत कितीसा गोंधळ

घालूं शकणार ? व दुसरेपक्षीं कित्येक बंगाली ब्राह्मो लोकांप्रमाणें केवळ विवाहाच्या बाबतींत जातिनिर्बंध न मानणाऱ्या परंतु हिंदु–राष्ट्रीयदृष्ट्या इतर रीतीनीं सर्वस्वीं लायक अशा लोकांस ते स्वतः आम्ही हिंदु आहों असें अभिमानानें व प्रांजलपणानें म्हणत असतां, 'आम्ही हिंदुधर्म पाळीत नाहीं' असा इकरार त्यांजकडून लिहून घेण्यापासून हिंदुसमाजानें झाले तरी विशेष काय मिळविलें ?

तात्पर्य, सन १८७२ चा मूळ कायदा खुशाल राहूं देऊन त्याजविरुद्ध एक ब्रहि न काढतां तो कायदा मूठभर लोकांकरितां होता असें म्हणून, आज मात्र ना. बसू यांच्या दुरुस्तीच्या वेळीं एकंदर हिंदुधर्माचा व हिंदुसमाजाचा कृत्रिमसंबंध त्याच्याशीं जोडण्यांत आल्यानें, वर दर्शविल्याप्रमाणें आचार-विचारांचा घोंटाळा व अनवस्था प्राप्त होत आहे. मूठभर लोकांस झालें तरी धर्मांतर करण्यास परवानगी देणें हें समाजास घातक असतां, त्यांस समाजांत राहिल्यानें एरवीं त्रास होईल तो होऊं नये–खुशाल उजळ माथ्यानें वागतां यावें–हें मात्र तुम्हांस मान्य होतें; व धर्मांतर केल्यानें त्यांस अडचण पडूं नये, यांच्या सर्व व्यवहारास कायदेशीर अधिष्ठान मिळावें म्हणून सन १८७२ च्या सारखा कायदाहि करून देण्यास तुमची तयारी आहे. पण ज्या सदसद्विवेकबुद्धीला व मतस्वातंत्र्याला प्रतिष्ठितपणें धर्मांतर करण्यास किंबहुना आपली धर्मलंडता जगजाहीर करण्यास मोकळीक मिळते, त्या सदसद्विवेक-बुद्धीस व मतस्वातंत्र्यास, बहिष्कृत रीतीनें का होईना परंतु समाजांत राहून व हालअपेष्टा सोसून पुढेंमागें समाजाच्या अनुमतीनेंच डोकें वर काढण्यास परवानगी नसावी व सद्‌बुद्धीनें ती कोणीं मागितली असतां तिला सनातन धर्माभिमानाच्या नांवाखालीं इतर रीतींनीं धर्मभ्रष्ट असणाऱ्या सुधारकांनीं विरोध करावा यासारखें दुसरें आश्चर्य नाहीं. सन १८७२ चा मूळचा कायदा काय किंवा ना. बसूंची दुरुस्ती काय, दोन्हींच्या बाबतींत अस्सल हिंदुधर्मनिष्ठ, कर्मठ पुराणपरंपरेंत नखशिखांत मुरलेला धर्माभिमानी गृहस्थ विरोध करणारच. त्यास फारच झालें तर तुमची व्यापक राष्ट्रीय हितबुद्धि नाहीं, एवढेंच म्हणतां येईल. परंतु त्याचें वर्तन सर्वस्वीं सुसंगत आहे असेंच म्हणावें लागेल. परंतु विधवांचीं लग्नें लावणारे व मद्यमांस भक्षण करणारे हे मात्र खरे हिंदु–धर्माभिमानी, यांसच खरें धर्मरहस्य कळलें,

हिंदुसमाजाच्या हितास खरोखर पोषक काय व खरोखर घातक काय याचें खरें ज्ञान असल्या लोकांसच तेवढें आहे; आणि यांपैकीं एकाहि गोष्टीचा मागमूस ब्राह्मो वगैरे लोकांत नाहीं ! ते जर, ' आमचा विश्वास हिंदुधर्मांतून गेला नाहीं, आम्हांस हिंदु म्हणवून घेण्यासच अभिमान वाटतो, त्याअर्थी आमच्याकडून निरर्थक, खोट्या व अपमानकारक कबुल्या लिहून घेऊं नका,' एवढेंच मागत आहेत तर त्यांचें न ऐकतां त्यांस काव्या मारून हिंदुत्वांतून हद्दपार करावें हा कोठचा न्याय ?

---

# १०२. पुणें मद्यपाननिषेधक सभा

सर्व जातींच्या व मतांच्या पुढारी मंडळीच्या साहाय्यानें ' पुणें, मद्यपाननिषेधक सभा ' १९०७ सालीं स्थापन करण्यांत आली. मद्यपाननिषेधाची आजकाल जी थोडीबहुत गलबल ऐकूं येत आहे तिचें अधिष्ठान वरील सभा आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. गेल्या पांच सहा वर्षांत अबकारी खात्यांत जी खळबळ व सरकारच्या दरबारांत जी जागृति उत्पन्न झाली आहे त्यांना ही संस्था बऱ्याच अंशानें कारणीभूत आहे, हें कोणीहि चौकस मनुष्य कबूल करील. दारूचीं दुकानें कोठें व किती असावीं व त्यांनीं किती वेळ दारू विकावी, याबद्दल कलेक्टरांनीं ज्यांचा सल्ला घेतलाच पाहिजे अशा, लोकमत अंशतः तरी दर्शविणाऱ्या, स्थानिक अबकारी कमिट्या सरकारनें १९०८ सालीं स्थापन केल्या, त्यांस या सभेचे प्रयत्नच कारणीभूत झाले आहेत. दारूचा खप फार व्हावा यांकरितां दुकानदारांच्या लांड्यालबाड्यांस उत्तेजन देणारी लिलांवाची पद्धति रद्द होऊन ठराविक फीची पद्धति सुरू झाली, हेंहि ह्या सभेच्याच खटपटीचें कांहीं अंशीं फळ आहे.

सन १९०७ सालीं पुणें लष्करच्या हद्दींत, आठशें हातांच्या टप्प्यांत, दारूचीं दुकानें कमींत कमी बारा होतीं; व दोन दुकानें तर एकाच पटांगणांत सदैव उघडीं होतीं ! ही गर्दी आज थोड्या तरी प्रमाणानें कमी होऊन, पांच वर्षांपूर्वीं पुणें जिल्ह्यांत देशी दारूचीं ६६ दुकानें होतीं तीं आज ५२ वर आलीं आहेत. दुकानांच्या मागच्या बाजूनें दुकानांत शिरण्यास अनेक दरवाजे

होते; दुकानांतून चोरून दारू पिण्यास जागा होत्या; दुकानांतून हॉटेलें होतीं; त्यांतील कित्येकांतून बायका पदार्थ विकण्यास बसलेल्या असत; उघड वाईट चालीच्या बायकांची वस्ती कित्येक दुकानांना अगदीं लगट करून होती; व दुकानदारांना दिवसारात्रीं वाटेल त्या वेळीं दारू विकण्यास सांपडत असे. हा सर्व प्रकार आज बहुतेक बंद झाला असून, विक्रीची वेळ सकाळीं नऊ वाजल्यापासून रात्रींचे साडेआठ वाजेपर्यंत आणून ठेवण्याची व्यवस्था झाली आहे. जिल्ह्यांत दोन ठिकाणीं जत्रांचे वेळीं दारूचे हंगामी गुत्ते उघडण्यांत येत असत ते आतां सरकारनें बंद केले आहेत. वरील सर्व गोष्टी करण्याची आवश्यकता सरकारचे मनांत बिंबविण्याकरितां सभेस फार दगदग करावी लागली; परंतु ही सगळी खटपट करण्यांतला मुद्दा हाच कीं, दारूचा खप कमी व्हावा, निदान त्याला आळा पडावा. पांच सहा वर्षांच्या मागच्या सरासरीपेक्षां पुणें जिल्ह्यांतील दारूच्या खपाची अलीकडच्या वर्षांची सरासरी कमी आहे असें सभेस सांगता येत नाहीं याबद्दल दुःख होतें, व एकप्रकारें शरमहि वाटते. तथापि स्पष्टीकरणार्थ थोडेसें जास्त लिहिण्याची जाणत्या सद्गृहस्थांची आम्ही परवानगी मागतों. पुणें जिल्ह्याच्या लगतचे अहमदनगर, सोलापूर, सातारा व नाशिक चार जिल्हे घेऊं. पुणेंजिल्ह्यांत मोहाच्या फुलांची पैदास नाहीं. तशाच स्थितीचे वरील बहुतेक जिल्हे असून लगतचे आहेत. त्यांपैकीं सन १९१२ अखेर भरणाऱ्या तीन सालांत, दारूच्या खपाची सरासरी वार्षिक वाढ नगर जिल्ह्यांत शेंकडा ५·८ ग्यालनांनीं झालेली आहे; सोलापूर जिल्ह्यांत वाढीचें प्रमाण १३·८; नाशिक जिल्ह्यांत १९; सातारा जिल्ह्यांत २४·३; व पुणें जिल्ह्यांत २·७ असें आहे. सन १९१२–१३ सालचा पुणें जिल्ह्याचा खपाचा आंकडा समजला आहे. तो त्याच्या मागच्या सालापेक्षां बराच म्हणजे ९००० ग्यालनांनीं कमी आहे. या प्रत्यक्ष प्रमाणावरून पुणें जिल्ह्यांतील दारूच्या खपास आळा पडण्यास पुणें–मद्यपाननिषेधक सभेचा प्रयत्न कांहींतरी कारणीभूत झाला आहे, असें म्हणण्यास हरकत नाहीं.

वरील परिणामावरून अशी आशा वाटते कीं, जोराचा सतत प्रयत्न झाल्यास, थोड्या काळांत खपाची वाढ कायमची नाहींशी करितां येईल; व तेवढी जरी आम्ही खरोखरी करूं शकलों तरी मद्यपानाचा निःपात करण्याच्या

महायुद्धाची पहिली लढाई जिंकली असें होईल; व पुढें युद्ध खेळण्यास दुप्पट अवसान येईल. परंतु हें कार्यसुद्धां अत्यंत कठीण आहे. हें व्यसनच असें आहे कीं, हें एकदां व्यक्ती किंवा राष्ट्रास चिकटलें म्हणजे आपोआपच वाढत असतें. मद्यरूपी भयंकर शत्रूस एकदां घालवून द्यावें अशी आमच्यासारख्या राष्ट्रास स्फूर्ति एकाद्या वेळीं उत्पन्न झाली तरी त्याला स्वतःचे पाय नसल्यामुळें त्याचा प्रयत्न लंगडाच पडतो. तथापि, परमेश्वर सद्धेतुप्रेरित प्रयत्नांना यश देतो, या भावनेनें आपण आपले प्रयत्न चालू ठेवलेच पाहिजेत.

जें कार्य सभा करूं इच्छिते आहे, तें अत्यंत बिकट आहे. कर्तुमकर्तुं शक्ति सरकारपाशीं; परंतु त्यांच्यापासून औषध मिळतें तें रोग नष्ट होण्याच्या प्रमाणानें न मिळतां रोग्याच्या किंवा त्याच्या आप्ताच्या मागणींतल्या जिवंतपणाच्या प्रमाणानें मिळतें. तेव्हां होईल तितक्या जिवंतपणानें व चिकाटीनें सरकारपाशीं मागण्या केल्या पाहिजेत. दारूच्या खपाच्या मानानें दुकानदारांची किफायत; दारू कमीजास्त खपेल त्या मानानें त्यांची मिळकतहि कमीजास्त; व दारूचा दुकानदार तर वाटेल त्या मार्गानें तिचा खप करणार. हा प्रकार दारूचें व्यसन कमी होण्यास पहिल्या प्रतीचा घातक आहे. 'दारूचा खप कमी व्हावा अशी आमची इच्छा आहे; त्यापासून होणाऱ्या उत्पन्नाचा आम्हांला लोभ नाहीं–' असें सरकार स्वमुखानें म्हणत आहे; व त्यांच्या अंगीं सर्व सामर्थ्य असतां त्यांच्या डोळ्यासमोर दारूचा खप एकसारखा आज शंभर वर्षे वाढत आहे. वसूल खात्याकडे दारूचा कारभार देऊं नका, अशी विनंति प्रजा एकसारखी करीत असतां तिकडे सरकार लक्ष देत नाहीं. एकंदर उत्पन्नांत खोट न यावी, झाली तर वाढच व्हावी, इतक्याच बेताबातानें दारूवर कर बसविण्यांत येत आहे. लोकांच्या डोळ्यांसमोर गुत्ते नसावेत, अशी सरकारानें वारंवार इच्छा प्रदर्शित केली असूनहि बहुतेक गुत्ते दोन दोन तीन तीन मिनिटांच्या चालीच्या अंतरावर आहेत. बहुजनसमाजानें मागणी केली नसतां कांहीं जागीं अद्याप गुत्ते बसविण्यांत येत आहेत. अबकारी खातें सुरूं होतांना जितकी अंमली दारू दुकानांतून ठेवण्यांत येत असे त्यापेक्षां अधिक जालीम दारू आज सरकार दुकानावर ठेवण्याची परवानगी देत आहे. अडाणी लोकांनीं दारूबाज होऊं नये, अशी सर्वथैव इच्छा असतांहि आपल्याबरोबर कित्येक सोबत्यांना झिंगवून शिल्लक उरेल इतकी दारू कोणीहि एकट्या पिणारास देण्याची

सरकारची अद्याप परवानगी आहे. दारूचा खप वाढविण्यास दारूचे व्यापारी कायदेशीर सवलतींचा दुरुपयोग करून सिद्ध असतांना त्यांच्यावर तोड काढणें कठीण आहे. सरकारनें गुत्ते ठेवूं दिले आहेत; तेव्हां दारू पिऊं नका म्हणणें म्हणजे एकप्रकारें सरकारच्या विरुद्धच चळवळ करणें अशी सामान्य लोकांची समजूत झालेली आहे. तिला तोंड देऊन, लोकांचीं मनें व्यसनपराङ्मुख करण्याचें कार्य करण्यास सिद्ध होणारे किती प्रकारचे किती उपदेशक हवे आहेत याची आज कल्पना करणेंच बरें ! सभेपाशीं आज एक व्याख्यानद्वारें उपदेश करणारा व दुसरा गाणीं म्हणून उपदेश करणारा असे दोन मनुष्य आहेत. सभेची सांपत्तिक स्थिति हीन आहे, तरीपण आजपर्यंत दरमहा किमानपक्ष २५।३० रुपयांचा खर्च एकसारखा होत आला आहे. उपदेशसामुग्रीसह उपदेशकांची संख्या जितकी वाढेल तितकी थोडीच आहे. दारूचें व्यसन कमी व्हावें अशी खरोखर इच्छा असेल तर सरकारवर सर्व भिस्त टाकणें चुकीचें आहे. आपली लढाई आपल्यासच लढली पाहिजे; व ती दारूची वाढ हटेल एवढ्या प्रमाणावर तरी चालविली पाहिजे. व्याख्यानकार, भजनकार, नाटककार, गायक आपापल्या उपकरणांसह एकसारखे जिल्हाभर बारा महिने हिंडत राहिले पाहिजेत. त्यांनीं आपापल्या कर्तबगारीप्रमाणें मद्यपाननिषेधक संघ जमविले पाहिजेत. हें सर्व घडवून आणण्याची पुणें-मद्यपाननिषेधक सभेची उमेद आहे. मॅजिक लँटर्नच्या आपल्या समाजास उपयोगी पडतील अशा उत्तम कांचा तयार करावयाच्या आहेत; उत्तम फोनोग्राफ त्यांच्या इतर साहित्यासह पाहिजे आहेत व त्यांचा उपयोग चांगल्या रीतीनें करील असा एक स्वतंत्र लायक मनुष्य नेमण्याचें संस्थेच्या मनांत आहे. परंतु नवे जुने सर्व खर्च चालविण्यास वार्षिक एक हजार रुपयांची तरी मदत पाहिजे, अशी सभेची आजची अपेक्षा आहे; व महाराष्ट्रांत मद्यपाननिषेधाचें नमुनेदार काम चालावें, अशी हजारों सद्गृहस्थांची सदिच्छा असेल अशी सभेची खात्री आहे. तेव्हां मद्यास स्पर्शहि न करणारे व वर्षाची निदान एक रुपाया वर्गणी देणारे, एक हजार गृहस्थ एवढ्या महाराष्ट्रांत सांपडणार नाहींत, असें सभेस वाटत नाहीं. ही सभा आज पुणें जिल्ह्यापुरतें काम करीत आहे. पण तें प्रयोगादाखल आहे. हा

प्रयोग यशस्वी व्हावा, ह्यांत सबंध महाराष्ट्राचें हित आहे. करितां मराठी भाषा बोलणाऱ्या कोणत्याहि सद्गृहस्थानें या संस्थेचा निदान सभासद होऊन, हिच्यांत अधिक व्यापक कार्यक्षमता उत्पन्न करावी अशी विनंति आहे. ह्या सभेंत आज पुण्यांतील सर्व पक्षांचे व जातींचे पुढारी गृहस्थ आहेत. डॉ. एच्. एच्. मॅन, प्रिन्सिपॉल ॲग्रिकल्चरल् कॉलेज व कॅप्टन एच्. स्टीन ह्यांच्यासारखे सरकारी मोठे हुद्देदार युरोपियन गृहस्थ ह्या संस्थेचे सभासद आहेत. विद्यार्थ्यांनाहि ह्या सभेचे सभासद होतां येतें. तेव्हां सर्वांनीं सभासद होऊन किंवा अन्यद्वारानें हिला साहाय्य करावें अशी पुनः विनंति आहे, व तिचा सर्वत्र आदर होईल, अशी आशा आहे.

---

## १०३. विषारी नागिणीचा दंश

गेले तीनचार महिने हिंदुस्थानविषयक एका ग्रंथानें इंग्लंड व अमेरिका यांत नुसता धुमाकूळ घातला. छापखानेवाल्यांनीं कागदाचे गठ्ठे सोडले, पुस्तकविक्यांनीं पैशाच्या थैल्या सोडल्या, वाचकांनीं धीर सोडला आणि हें सर्व कशामुळें घडलें ? तर एका गोऱ्या कातडीच्या स्त्रीनें लाज सोडली म्हणून ! या स्त्रीचें नांव ' मिस् मेयो ' व तिच्या ग्रंथाचें नांव ' भारतमाता '. पण या दोनहि नांवांत विसदृशता ठेंचून भरली आहे. मेयो हें नांव हिंदुस्थानांतील लोकांना पूर्वपरिचित आहे. त्या नांवाचे एक उदार मतवादी गृहस्थ १८७० च्या सुमारास हिंदुस्थानचे व्हाइसरॉय होऊन आले होते. वरिष्ठ सरकार आणि प्रांतिक सरकार यांच्या जमाखर्चाची फाळणी त्यांनीं प्रथम केली आणि आज असणाऱ्या निम्याशिम्या आणि पुढें मिळणाऱ्या संपूर्ण प्रांतिक स्वातंत्र्याचा पाया त्यांनीं घातला. इंग्रजींत या कारभाराच्या योजनेला ' डिसेंट्रलायझेशन ऑफ प्रॉव्हिन्शिअल फायनान्स ' असें नांव आहे. हे लॉर्ड मेयो अंदमान बेटांची तपासणी करण्यास गेले असतां शेरअली नामक एका काळेपाण्यावरील वहाबी कैद्यानें त्यांचा खून केला ! या दोनहि गोष्टींमुळें लॉर्ड मेयो यांचें नांव हिंदुस्थानाच्या लोकांना परिचित व प्रियहि आहे. उलट मिस् मेयो यांचेंहि नांव हिंदी लोकांच्या स्मरणांत अखंड राहील. पण तें त्यांनीं आपल्या

पुस्तकांत हिंदुस्थानाच्या अब्रूचा भयंकर रीतीनें खून केला आहे म्हणून ! लॉर्ड मेयो यांच्या मनांत हिंदुस्थानांतील लोकसत्तेचा पाया घालावयाचा होता. मिस् मेयो यांच्या मनांत हिंदुस्थानच्या लोकांच्या पायांत पारतंत्र्याच्या बेड्या कायमच्या राहण्यास मदत करण्याचें आहे !

आतां अशा पुस्तकाला ' भारतमाता ' असें नांव ग्रंथकर्त्रीनें कां द्यावें ? तर त्याचें एक उत्तर असें कीं, चित्ताकर्षक नांव ठेवल्यानें पुस्तक खूप खपावें म्हणून. भारतमाता ! किती पवित्र नांव ! पण आंतील अपवित्र मजकूर पाहातां विरोधाभासाचें एखादें अधिक समर्पक उदाहरण सांपडणें अशक्य असें वाटतें. कारण या ग्रंथकर्त्रीच्या मनांत वाचकांना शेवटीं असें सांगावयाचें आहेसें दिसतें कीं, " हें पाहा जिच्या मुलांमध्यें इतकी अनीतिमत्ता, इतका भ्रष्टाकार, इतका मूर्खपणा अवतरलेला आहे अशी ही हिंदमाता, भारतभूमि, दुरून तुम्हाला मोठी आदरणीय, कीर्तिमती, भावनारम्य दिसते; आणि अशा आईचीं मुलें म्हणून तुम्हांला हिंदी प्रजेबद्दल कौतुक व सहानुभूति वाटते आणि तिला आज नाहीं उद्यां राजकीय स्वातंत्र्य द्यावें असें तुम्हा भोळ्या लोकांच्या मनांत येतें. पण खरा प्रकार मीं या ग्रंथांत वर्णन केला आहे तो वाचून पाहा म्हणजे ही हिंदमाता नव्हे, तर ती अनीतिकर्दमांत लोळणारी व मुलांचें लेंढार प्रसवणारी अशी एक म्हातारडी डुकरी आहे आणि तिची प्रजा म्हणजे तिच्या अंगावर लोळणारीं व उगीच शेपट्या हलवीत उकीरडे फुंकीत हिंडणारीं डुकरें होत. कसलें त्यांचें कौतुक करतां ? " आतां ज्या ग्रंथकर्तीला हिंदुस्थानाबद्दल इतकें वाईट लिहावयाचें होतें तिनें कृपा करून तत्सदृश यथार्थ वर्णनपर असें दुसरें एखादें नांव तरी ग्रंथाला द्यावयाला पाहिजे होतें. पण द्वेषबुद्धीची करामतच अशी असते. तिला उघड घाल्यापेक्षां गुप्त घालाच अधिक प्रिय असतो. अस्सल द्वेषबुद्धि समोरून तोंडावर वार करीत नाहीं. ती अंधारांत गुप्त छापा घालील. निदान वार करावयाचा तो पाठीवर तरी करील. ग्रंथाला नांव ' भारतमाता ' असें सोज्ज्वल देऊन आंत हिंदी समाजाची घाणेरडी निंदा खचून भरावयाची, हें कृत्य म्हणजे सैतानी कलेचा तो एक विलासच होय. आणि पूर्वी सांगितल्याप्रमाणें मोहक नांव देऊन ग्रंथ अधिक खपावा ही स्वार्थी दृष्टीहि त्यांत आहेच.

पण त्यांतल्या त्यांत स्वार्थी दृष्टीपेक्षां दुष्ट बुद्धीची दृष्टीच या ग्रंथाच्या

उत्पत्तीला अधिक कारणीभूत झालेली आहे. ग्रंथकार बाई ही कोणी एखादी समाजशास्त्रांतील संशोधक नाहीं. आरोग्यशास्त्रावर म्हणूनहि तिनें हा ग्रंथ लिहिलेला नाहीं. त्यांत कोणत्याहि एखाद्या उच्च ध्येयाचा ध्यास नाहीं किंवा तत्त्वचिकित्सेची तळमळहि नाहीं. बरें, केवळ चार पैसे मिळावेत येवढ्या-करितांच हा खटाटोप आहे असें म्हणावें तर केवळ तसेंहि दिसत नाहीं. कारण ग्रंथ पुष्कळ खपावा या स्वतः ग्रंथकर्त्रीच्या इच्छेपेक्षां त्याचा प्रसार करण्याकरितां इतर कित्येकांचा प्रयत्नच अधिक होत असल्याचें प्रत्ययाला आलें आहे! आणि बाईला ग्रंथाकरितां माहिती पुरविण्यांत इंग्रज सरकारचे अधिकारी व अँग्लो–इंडियन लोकांचे दूत फार खपले असें लोक उघड बोलतात. ग्रंथकर्त्रीनें आपला हेतु राजकीय असल्याचें जें ध्वनित केलें आहे त्याला या अवांतर गोष्टींवरून पुष्टीच येते. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे चिरोलसाहेबांना 'हिंदुस्थानांतील अस्वस्थता' हा ग्रंथ लिहिण्याला मुंबईसरकार व कोल्हापूरकर छत्रपति यांच्याकडून जशी मदत झाली, तशी व त्याच हेतूनें हा प्रस्तुतचा ग्रंथ लिहिण्याला मिस् मेयो या बाईला सरकाराकडून व संस्था-निकांकडून मदत झालेली आहे. राजकीय मतप्रसार हाच या ग्रंथाचा मूळ हेतु आहे. व तें मतहि हेंच कीं, हिंदुस्थानचे लोक कोणतेहि अधिकार देण्याला योग्य नाहींत!

पण मुख्यतः याच दृष्टीनें हें पुस्तक लिहिलें गेलें याला आणखी एक प्रत्यंतर असें आहे कीं, याच बाईनें यापूर्वी 'आइल्स ऑफ फिअर' म्हणजे 'भीतिद्वीप' नांवाचें एक पुस्तक फिलिपाईन बेटांतील लोकांसंबंधाचें लिहिलेलें प्रसिद्ध आहे. त्यांतहि फिलिपिनो लोकांची अशीच मनसोक्त नालस्ती तिनें केलेली आहे. फिलिपाईन बेटांत स्वातंत्र्याची चळवळ सुरू आहे, व स्वातं-त्र्याच्या मागणीचा प्रश्न निघाला कीं पात्रतेचा प्रश्न त्याबरोबर निघतो हें प्रसिद्ध आहे. फिलिपिनो लोक अनेक दृष्ट्या नादान आहेत असें दाखविलें म्हणजे त्यांच्या स्वातंत्र्याच्या मागण्या अर्थातच असंबद्ध ठरणार! अशा रीतीनें फिलिपिनो व हिंदी या दोघां राष्ट्रांचा अकारण द्वेष या बाईनें साधला आहे. अकारण म्हणण्याचें कारण असें कीं, या बाईचें व्यक्तिशः नुकसान या दोहों राष्ट्रांपैकीं एकाहिकडून झालेलें नाहीं. मग ही बाई चांगली लेखिका आणि परनिंदा हा विषय तिचा हातखंडा असें पाहून तिला या कामीं कोणीं पैसे

देऊन प्रवृत्त केली असो, किंवा स्वत: तीच इतकी उच्छृंखल उपद्व्यापी कीं हें आवडतें काम म्हणून तिनें आपल्या स्फूर्तीनेंच चालविलें असो. दुसरा प्रकार खरा असला तर ही बाई म्हणजे एक पांढऱ्या रंगाची विषारी नागीणच म्हटली पाहिजे. पण पहिला प्रकारहि असंभवनीय नाहीं. कारण इंग्रज सरकार मतप्रसाराच्या कामीं अमेरिकन बायांचाहि उपयोग करीत असल्याचा आम्हांला अनुभव आहे. पूर्वी १९१५ सालीं इंग्रजसरकारानें अमेरिकन लोकांचे म्हणून कांहीं अभिप्राय हिंदी राज्यकारभारासंबंधानें चोपडयाच्या रूपानें प्रसिद्ध केले होते. तसेंच कोल्हापुरास एक मिशनरी म्हातारी बाई होती ती परत गेल्यावर तिनें या कारभाराला दिलेलें सर्टिफिकेट सरकारनें छापलें होतें.

अब्रू नसलेल्या मनुष्यानें बेअब्रूला फार जपावें, किंवा दिवाळखोर व्यापाऱ्यानें शेणाची पणती लावून ठेवण्याचा प्रसंग पुढें येणार असतां आधीं मोठा भपका करावा, त्याप्रमाणें इंग्रज सरकार परदेशांत आपल्या बेअब्रूला फार जपत असतें. आणि तेथें आपल्यातर्फें मतप्रसार करून हिंदी लोकांची बेअब्रू होईल अशा प्रयत्नांना उत्तेजन देत असतें. आम्हांला तर असें वाटतें कीं, या बाईला इंग्रज सरकारनें हें ‘ भारतमाता ’ पुस्तक लिहिण्याला पैसे व उत्तेजन दिलें असावें. कारण ही बाई हिंदुस्थानांत येऊन गेली तेव्हां हिंदुस्थानसरकारच्या अनेक अधिकाऱ्यांनीं, विशेषत: प्रसिद्धी खात्याच्या अधिकाऱ्यांनीं, तिला वाटेल ती माहिती पुरविली. हें पुस्तक प्रथम अमेरिकेंत प्रसिद्ध झालें. लगेच त्याची आवृत्ति इंग्लंडांत निघाली. पुस्तक छापून होण्याचें आधींच त्यांतील उतारे प्रसिद्ध होऊं लागले. प्रमुख वर्तमानपत्रांत त्याचें परीक्षण येण्याला आगाऊच सुरुवात झाली. पुस्तकविक्र्यांच्या दुकानांवर तोबा झडूं लागला. क्लब व चहापानें यांतून चर्चेला दुसरा विषय उरला नाहीं. आगगाड्या व आगबोटी यांवर प्रवाशांनीं करमणुकीला कोणतें पुस्तक बरोबर न्यावें हें ठरून गेल्यासारखें झालें. आणि हें सर्व कशामुळें ? तर त्या पुस्तकांत हिंदुस्थानाच्या लोकांची जी मनसोक्त, अभद्र, बाष्कळ, अश्लील शब्दांनीं निंदा केली आहे तिजमुळें ! हिंदुस्थानच्या लोकांची निंदा करण्याला व वाचण्याला इंग्रज लोक मनानें किती तयार असतात हें या पुस्तकावरून फार चांगलें कळून आलें म्हणावयाचें !

इतकें सांगितल्यावर केसरीच्या वाचकांना सहजच अशी जिज्ञासा उत्पन्न होणार कीं, या पुस्तकांत असें आहे तरी काय? म्हणून आम्हांलाहि ती थोडीशी पुरविली पाहिजे. पण ती पुरविण्यापूर्वी एकदोन सावधगिरीचे शब्दहि लिहिणें जरूर आहे. अशाकरितां कीं, त्यांच्या मनाची विशेष रितीनें अशी आधीं तयारी करून न ठेविली तर एकदम त्यांच्या मनाला धक्का बसावयाचा. पण तो धक्का पुस्तकांतील विधानें खरीं असून त्यांनीं हिंदुस्थानची बेअब्रू रास्त रीतीनें बाहेर काढली म्हणून नव्हे, तर केवळ त्यांच्या अश्लील-तेनें व गलिच्छपणानें ! हल्लीं मराठी वाचकांपुढें अश्लील वाङ्मयाचा प्रश्न आहे. त्या दृष्टीनें आमचें आम्हांलाच प्रथम असें विचारावेसें वाटलें कीं, या बाईवर टीका करण्याकरितां तरी आम्ही पुढें देणार त्या कांहीं विधानांचा उच्चार केसरीनें करावा कीं नाहीं. पण शेवटीं मनानें असा निर्णय केला कीं, हीं विधानें आम्हीं केवळ अवतरणें म्हणून घेत आहों, तीं आमचीं स्वतःचीं नव्हत. आणि तीं अवतरणें दिल्याशिवाय वाचकांना मिस् मेयोच्या पुस्त-काची खरी कल्पना येणार नाहीं, आणि हिंदुस्थानचे हितशत्रु राजकारणाच्या युद्धांत कसल्या कसल्या घाणेरड्या, निंद्य, तिरस्करणीय साधनांचा उपयोग करूं शकतात याचें यथार्थ ज्ञान लोकांना एरवीं होणार नाहीं.

त्याचबरोबर दुसरीहि गोष्ट आधींच सांगून टाकणें श्रेयस्कर वाटतें ती ही कीं, आम्हाला स्त्रीदाक्षिण्याची कल्पना मान्य असली तरी या बाईच्या पुस्त-काचा समाचार घेतांना आम्ही ही दाक्षिण्याची कल्पना क्षणभर जाणूनबुजून दूर ठेवणार आहों. स्त्रीला दाक्षिण्यबुद्धीनें वागवावें हें बरोबर. पण केव्हां? ती स्वतः सभ्य स्त्रीप्रमाणें वागत असेल तेव्हां. ती स्वतःच जर आपला स्त्रीपणा विसरेल, आणि चार अक्षरें लिहितां येतात येवढ्या हक्कावर पुरुषांची अमर्यादा करण्याला तयार होईल, तर तिनें दाक्षिण्यानें वागवून घेण्याचा आपला हक्क गमावला असें सहजच आपोआप ठरतें. स्त्रीदाक्षिण्य या शब्दांत स्त्री हा अनुयोगी शब्द महत्त्वाचा असून दाक्षिण्य हा शब्द निवळ प्रतियोगी ठरतो. जेथें स्त्रीत्व नष्ट झालें तेथें दाक्षिण्याची जबाबदारीहि संपली. या वादाचा आपल्या पौराणिक वाङ्मयांत निर्वाह झालेलाच आहे. श्रीरामचंद्रानें ताटका राक्षसीचा वध केला, तसेंच श्रीकृष्णानें पूतनेला ठार मारिलें अशाहि ठिकाणीं स्त्रीजातीच्या पक्षपाती तत्त्ववेत्त्यांनीं शंका काढली होती कीं, स्त्रीवध

हा अशिष्टाचार झाला. पण त्याचा परिहार असा करण्यांत आला आहे कीं, स्त्रिया या जेव्हां आततायी बनतात तेव्हां त्या स्त्रीजातिभ्रष्ट ठरतात व त्या ठिकाणीं धर्मयुद्धांतला स्त्रीविषयक विशेष नियम पाळण्याचें बंधन कोणावर नाहीं.

त्याचप्रमाणें नरकासुर वधाचीहि अशीच एक गोष्ट आहे कीं, नरकासुराचा वध करण्याला जेव्हां श्रीविष्णु गेले व त्यांनीं आपलें शार्ङ्गधनुष्य सज्ज केलें तेव्हां नरकासुराच्या स्त्रीनें पतीचा जीव वांचविण्याकरितां नेसण्याचें वस्त्र सोडून दिलें व नग्न होऊन ती विष्णूपुढें उभी राहिली. हेतु हा कीं, नग्न स्त्री पाहूं नये, पुरुषानें नेत्र मिटावें किंवा मुख फिरवावें. या शिष्टाचाराला अनुसरून श्रीविष्णु नेत्र मिटतील किंवा तोंड फिरवतील, आणि अशा रीतीनें आपल्या पतीचें संरक्षण होईल. परंतु या प्रसंगावधानी स्त्रीप्रमाणें श्रीविष्णूलाहि शिष्टाचाराचा धर्माधर्म कळत होता, म्हणून त्यानें नेत्र न मिटतां किंवा तोंड न फिरवितां आपलें शरसंधान चालू ठेवून नरकासुराचा वध केला. मिस् मेयो बाईचें पुस्तक ज्यांनीं वाचलें असेल त्यांना हें तेव्हांच दिसून येईल कीं, ही बाई ईश्वरनिर्मित लक्षणांनीं स्त्री असली तरी निर्मात्या ईश्वराला मूर्ख ठरविण्याच्या निश्चयानें ती मर्यादा सोडून नंगी बनली आहे व पुरुषजातीवर तिनें ताण केली आहे! तसेंच हा तिचा नंगेपणा नरकासुराच्या स्त्रीप्रमाणें आत्मसंरक्षणार्थ नसून, पूतना किंवा ताटका या राक्षिसणीप्रमाणें परघाती, अत्याचारी, आतयायी स्वरूपाचा आहे. म्हणून तिच्यासंबंधानें लिहितांना आम्ही या बाईची भीडमर्यादा ठेवण्याचें कारण नाहीं. येथें 'आततायिनमायांतं हन्यादेवाविचारयन्' हेंच शास्त्र अनुसरण्याचा आम्हीं विचार केला आहे. आणि इतकी प्रस्तवना करून पुढील लेखांत मिस् मेयो या बाईच्या पुस्तकांतील कांहीं मासलेवाईक विधानें वाचकांपुढें ठेवून आम्ही त्यांवर थोडीशी टीका करणार आहों असें सांगून हा प्रास्ताविक लेख पुरा करतों.

---

# १०४. गोऱ्या नागिणीचे कांहीं फूत्कार

( केसरी, ता. ८ नोव्हेंबर १९२७ )

मिस् मेयो बाईचें पुस्तक राजकीय हेतूनें लिहिलेलें आहे व तें लिहिण्याला इंग्रज सरकारानें उत्तेजन दिलेलें असून पैशाचीहि मदत केलेली आहे असें आम्हीं मागील अंकीं म्हटलें होतें, हें वाचकांना स्मरत असेलच. त्याचें प्रत्यंतर चार दिवसांपूर्वींच आणखी मिळालें. मुंबईच्या दोन पत्रांनीं असें उघड लिहिलें आहे कीं, विलायतेहून नुकत्याच आलेल्या एका हिंदी गृहस्थानें याविषयीं अस्सल बातमी आणली आहे. तो म्हणतो, " विलायत—सरकारनें या पुस्तकाच्या पांच हजार प्रती विकत घेऊन वाटल्या. " यासंबधानें पुढें तिकडे व इकडे प्रश्नोत्तरें होऊन कदाचित् कांहीं खुलासा मिळेल. पण सरकारानें खरें लपविण्याचा कितीहि प्रयत्न केला तरी वरील बातमींत बरेंच तथ्य आहे असें दिसतें. पाणी खचित कोठें तरी मुरतें आहे म्हणूनच आजपर्यंत प्रसिद्ध झालेल्या अशा वदंतांना सरकारानें खडखडीत उत्तर दिलें नसावें. तें कसेंहि असो. मागील लेखांत कबूल केल्याप्रमाणें मिस् मेयो बाईच्या पुस्तकांतील अभद्र आरोपाचे कांहीं उतारे सटीक देणें प्राप्त आहे म्हणून ते आज देतों. मात्र ते वाचावयास लावल्याबद्दल वाचकांनीं क्षमा करावी.

बाई म्हणते, " परदेशच्या लोकांना हिंदुस्थानाविषयीं आज इतकेंच माहीत आहे, कीं हिंदुस्थानांत गांधी म्हणून कोणी आहे आणि शिकारीला वाघहि पुष्कळ मिळतात ! " गांधी व हिंस्रपशू यांची ही सांगड घातलेली पाहून कोणाला भिण्याचें फारसें कारण नाहीं. कारण हे " बोलाचेच वाघ " आहेत. आणि ते खरोखरीचे असले तरी गांधींना कसली भीति ? त्यांनीं आपल्या अनत्याचारीपणानें वाघांचा हिंस्रपणा काढून टाकला असता. अंद्रोक्लिजाच्या गोष्टींतल्या सिंहाप्रमाणें ते गांधींचे पाय चाटू लागले असते, किंवा पूर्वीं दुष्ट रोमन लोकांनीं पहिले पहिले खिस्ती उपाशी ठेवून पिंजऱ्यांत कोंडलेल्या सिंहापुढें सोडले तेव्हां खिस्ताच्या पुण्याईनें सिंहांनीं त्यांना न खातां त्यांच्या पायाशीं लोळणच घेतली. तसें मिस् मेयो बाईचे हे वाघहि गांधींच्या आध्यात्मिक निग्रहामुळें दमन पावले. पण बाईचा हेतु हीं दोन नांवें एकत्र लिहिण्यांत असा दिसतो कीं, हिंदुस्थानांत गांधीसारखे कांहीं 'वेडपे' लोक आणि

वाघासारखीं 'क्रूर' जनावरें याशिवाय परक्या माणसाला करमणूक करील असें इतर कांहीं नाहीं ! आणि इतर जें कांहीं आहे तें इतकें गलिच्छ आहे कीं, त्याच्याकडे परक्या लोकांनीं नाकाला पदर लावूनच पाहिलें पाहिजे.

बाई म्हणते—हिंदुस्थान ही मूर्तिमंत दुःखभूमि आहे. हीं दुःखें जशीं आधिभौतिक तशीं आध्यात्मिकही आहेत. ही दुःखपरंपरा हिंदी माणूस जन्माला येण्यापासून सुरू होते व तो मरेपर्यंत ती कायम टिकते. या दुःखपूर्ण समुद्रांत तो अगदीं बाळपणापासून बुडत असतो. हिंदी मुलीला वयाच्या आठव्या वर्षापासूनच आपल्यावरील नवऱ्याच्या हक्काची जाणीव होते. आणि लहान मुलीच्या हातांत लहान मुलें दिसतात तीं कित्येक वेळां स्वतःचींच मुलें असतात. नवरा मात्र जवळजवळ तिच्या वयाचा असेल किंवा केव्हां केव्हां ती आठ वर्षांची तर नवरा पन्नास वर्षांचाहि असेल. अशा स्थितींत मुलें होतात तीं केवळ पाप्याचीं पितरें असतात. अंगांत हाड नाहीं, हाडांवर मांस नाहीं, मासावर तेज नाहीं. पण त्यापेक्षां एक विशेष गोष्ट मिस् मेयो बाई सांगते ती ही कीं, हीं मुलेंहि बहुधा आईबापांपासून जडलेल्या उपदंशाच्या विकारानें जन्मतःच ग्रासलेलीं असतात. तसेंच लहानापासून वृद्धापर्यंत स्त्री-पुरुषांच्या गळयांत विषयोपभोगाची स्मृति जागृत राहावी म्हणून शिवलिंग बांधून देतात ! पण धर्मलक्षण म्हणून जननेंद्रिय अंगावर नित्य बाळगण्याचा हक्क एकट्या शैवांनाच नाहीं. तो हक्क वैष्णव झाले तरी कां गमावतील ? वैष्णवहि लहानपणापासून कपाळावर जननेंद्रियाची खूण मिरवितात ! शिवलिंग हें पुरुषांच्या जननेंद्रियाचा प्रतिनिधि व वैष्णवाच्या मुद्रा व त्रिपुण्ड्र यांनीं स्त्री-जननेंद्रियें जाणावयाचीं असतात.

हीं चिन्हें अंगावर सतत धारण करवून शिवाय अगदीं बाळपणापासून मुलांना देवदेवतांमधील शृंगारचेष्टांचीं बीभत्स वर्णनें ज्यांत तपशीलवार भरलीं आहेत अशीं गाणीं त्यांजकडून म्हणवितात आणि त्यांचे अर्थहि त्यांना नीट समजावून सांगतात. यामुळें प्रजोत्पत्ति किंवा विषयोपभोगाची लालसा तृप्त करून घेणें हीच धर्माची आज्ञा आहे असें त्यांना कां न वाटावें ? एवढेंच काय पण येऊन जाऊन धर्म काय तो हाच असेंहि त्यांना सहजच वाटतें. बाईंना हें लिंगपुराण समजून सांगणारा कोणी मिस्किल मिशनरी मिळाला होता कीं काय न कळे. पण बाईच्या संशोधक परिश्रमाचें कौतुक वाटून तिला

थोडी मदत करावी असें आम्हालाहि वाटू लागलें आहे. म्हणून आम्ही तिला असें सुचवितों कीं तिच्या विवेचनांत एकच गोष्ट कमी आहे ती घालून पुढील आवृत्तीत आपल्या विवेचनाला तिनें समर्पकता आणावी. ती गोष्ट ही कीं, हिंदुधर्माची व्याख्याच मुळीं ‘ चोदनालक्षणो धर्मः ’ अशी आहे व तिचा अर्थ काय हें बाईना कोणीहि सांगू शकेल !

हिंदूंच्या या धर्मरहस्याचा पुरावा मेयो बाईला हिंदुस्थानांत देवळाच्या शिखरावर किंवा उत्सवमूर्तीच्या रथावर कोरलेल्या चित्रांतहि सांपडला आणि जे देवळावर ते विलासी राजवाड्यांच्या दरवाजावर आढळल्यास काय नवल ? संभोगविषयक चौर्‍यांयशीं आसनांशिवाय या बाईला हिंदी चित्रकलेंत किंवा शिल्पकलेंत कांहीं आढळलें नाहीं. हे जसें बाहेर तसेंच देवघरांत गाणीं किंवा स्तोत्रें म्हणणाऱ्या स्त्रियांच्या तोंडी संस्कृत लावण्या येत असल्यास काय नवल ? तात्पर्य ‘ Procreation is my religion ’ असें म्हणणाऱ्या एका गौरकाय चार्वाकाप्रमाणें प्रजोत्पत्ति हाच हिंदी लोकांचा सांगोपांग धर्म होय याशिवाय त्यांत कांहीं नाहीं असें बाईनें लिहिलें आहे !

पण आणखीहि ऐका. हिंदुस्थानच्या अनेक भागांत लहान मुलगा गोरागोमटा असला कीं तो विलासी पुरुषांच्या दिमतीला देण्यांत येतो ! आणि मुलगी म्हटली कीं ती अखण्ड सौभाग्यवती म्हणून देवस्थानाकडे सोपविण्यांत येतें ! बाई म्हणते, “ तुम्हाला कदाचित् शंका येईल कीं आईबापांना या गोष्टींचें वाईट वाटत असेल तर तसें नव्हे. आपल्या मुलाला कोणीं सुंदर पोऱ्या म्हटलें तर त्यांत त्यांना बहुमानच वाटतो ” शिवाय असले हे खेळ केवळ कांहीं थोड्या किंवा विशिष्ट वर्गांत असतील असेंहि कोणी समजूं नये अशी बाईनें सावधपणाची सूचना दिली आहे. ती लिहिते, “उच्च जातीचे व उच्च दर्जाचें स्त्रीपुरुषहि सरसकट या गोष्टी करतात. लहान मुलींना झोप चांगली लागावी म्हणून आणि लहान मुलाचे ठिकाणींहि अकाली पुरुषत्व यावें म्हणून— पण यापुढें या स्पष्टवक्त्या बाईलाहि बोलवेनाच म्हणून तिनें तोंडाला पदर लावल्याचा ‘ भाव ’ पुस्तकांत केला आहे. बाई म्हणते, “या गोष्टी सांगावांगीच्या नाहींत बरें ! तर सर्वांत श्रेष्ठ असे डाक्टर सांगतात कीं प्रायः जें प्रत्येक मूल त्यांच्या नजरेखालीं आजवर आलें, व कोणत्याहि कारणानें आलें तरी त्यांच्या ठिकाणीं वरील भलत्या बीभत्स आचाराच्या खुणा स्पष्ट दिसतात. ”

वरील शब्द आम्ही बाईचे जसेच्या तसे घेतले आहेत म्हणून त्यांतील 'प्रायः प्रत्येक' हे शब्द वाचकांनीं विशेष ध्यानांत ठेवावे. याचें कारण असें कीं उडत्या पाखराला जमिनीवर क्वचित् कीडमुंगी दिसेल त्याप्रमाणें समाजनिरीक्षणांत या बाईला कोठें कोठें अपवादरूपानें हिंदी समाजांतले हे दोष आढळले अशी तिच्या वाचकांची समजूत होईल, ती चुकूनहि न व्हावी म्हणून "प्रत्येक" हें निश्चितार्थक विशेषण बाईनें वरील वर्णनांत मुद्दाम घातलें आहे.

तात्पर्य, बाळपणीं आई-बापांनीं मुद्दाम वाईट संवयी लावल्या म्हणून व प्रौढपणीं त्या स्वतःला आवडल्या म्हणून हिंदी स्त्रीपुरुषांचा जन्म त्या संवयीच्या नित्य अभ्यासांत जातो. मौज ही कीं, या आरोपाचें समर्थन या बाईनें खुद्द गांधींचें उदाहरण देऊन सजविलें आहे. गांधी यंगइंडियांत लिहीत असलेल्या आत्मचरित्रांत आपला विवाह फार लहानपणीं झाला व आपणाला स्त्रीचा परिचयहि लहानपणीं झाला आणि आपले कांहीं दिवस विषयासक्तीच्या वेडांत गेले असें त्यांनीं प्रांजलपणानें लिहिलें आहे. पण हें उदाहरण देतांना 'वदतो व्याघातः' या नांवाचा दोष बाईच्या पदरीं पडला आहे. कारण ज्या गांधींचें हें उदाहरण म्हणून तिनें दिलें तेंच आज साठीला पोंचलेले आहेत. त्यांनीं कमींत कमी तीस वर्षे विलक्षण शारीरिक परिश्रम करून व मेंदूला झिजवून सगळ्या जगाला आश्चर्य करण्याला लावण्यासारख्या चळवळी केल्या आणि पाश्चात्य लोकांकडूनहि विभूति, महाविभूति म्हणवून घेतलें. या गोष्टीनें बाईच्या मूळच्या सिद्धान्ताचेंच खण्डण होत नाहीं काय? पण तें असो. बाईचेंच शिमगापुराण पुढें चालवूं. ती म्हणते, "हिंदुस्थानच्या एका टोंकापासून दुसऱ्या टोंकापर्यंत बहुधा प्रत्येक पुरुष तीस वर्षांच्या आंत म्हातारा होतो. एवढेंच नव्हे तर प्रत्येक दहा पुरुषांपैकीं सात किंवा आठ लोक पंचवीस पासून तीस वर्षांच्या आंतच नपुसक बनलेले असतात!"

मागील अंकांत बाईला आम्ही नंगी म्हटलें तें उगीच नव्हे हें वाचकांच्या आतां लक्षांत येईल. बरें, या विधानाला आधार काय? तर वर्तमानपत्रांतील कामोद्दीपक औषधांच्या आणि जादूटोण्यांच्या जाहिराती. बाईच्या वरील सिद्धान्तावर टीका काय व कशी करावी हेंच आम्हांला समजत नाहीं. आम्हाला अडचण इतकीच पडली आहे कीं, वर्तमानपत्रांतल्या जाहिराती या पुष्कळशा वयोवृद्ध होऊं घातलेल्या लोकांकरितां त्या असतात. विशीपासून तिशीच्या

अमलांतील लोकांकरितां त्या असतात अशी इकडे तरी कोणाची समजूत नाहीं; मग बाईला वर्तमानपत्रांतील जाहिरातीशिवाय विशीतिशीच्या तरुणासंबंधानें वरील धाडसाचें विधान करण्याला आधार काय ? डॉक्टरी पुरावा म्हणावा तर त्याचाहि बाईनें निर्देश केलेला नाहीं. तेव्हां हें संशोधन बाईनें कोणत्या साधनानें केलें ? वैद्यविद्येंतील धाडसी संशोधक अनेक वेळां आत्मप्रत्ययानें मतें बनवितात. विशिष्ट रोगाचे जंतु कोणी आपल्या स्वतःच्या अंगांत घालून पाहतो. साप विंचवावर कोणीं औषध काढलें तर संशोधक हा तो प्राणी स्वतःला डसवून घेतो. तसा कांहीं प्रकार मिस मेयो इनें हिंदुस्थानांत किंवा विलायतेंत करून पाहिला कीं काय न कळे. किंवा या कामीं आपला अनुभव सांगण्याला परोपकारी डॉक्टराप्रमाणें बाईच्या परोपकारी स्नेही-सोबतिणी कोणी पुढें आल्या होत्या कीं काय ? इतकी चिकित्सा करण्याचें कारण आक्षेप कसा अगदीं कोरीव कातीव आहे ! वय विशीतिशीच्या आंत आलें ! आणि प्रत्येक दहांतलें सातापासून आठापर्यंत तरुण, आणि तेंहि बाईच्याच स्पष्ट शब्दांनीं म्हणावयाचें झालें तर ' Impotent ' ( नपूसक ) असा सिद्धान्त तिहेरी तपशिलानें अगदीं हिशेबी असा मांडण्यांत आला आहे. म्हणून या आकडेशाहीला आधार काय अशी पृच्छा करणें सहजच प्राप्त होतें. बाईनीं पुढील आवृत्तींत तरी या सात्त्विक शंकेचें निवारण करावें. तिनें आपल्या विधानांना सरसकट सर्वत्र आधार दिल्यानें या हिशेबी विधानांचाहि आधार विचारावासा वाटतो. कारण वरील आकड्यासंबंधानें स्वतः बाईच असें लिहितें कीं, These figures are not at random. " मी दिलेले आकडे उगीच कांहीं तरी भरकटलेले नाहींत. अर्थात् त्यांची नोंद कुणाच्या वहीच्या पानांत तर कुणाच्या मनांत असली पाहिजे !

बालविवाहाबद्दल बाईनें लिहिलें, तथापि उपदंशादि संसर्गजन्य रोगाविषयीं बोलतांना तरी बाई युरोप व अमेरिका लक्षांत घेऊन हिंदुस्थानविषयीं जरा जपून बोलेल असें वाटलें होतें. पण तेंहि घडलेलें नाहीं. तिच्या लिहिण्याचा झोक असा कीं, हे रोग हिंदुस्थानांत शेंकडा शंभर टक्के असतात व त्याचें प्रत्यंतर म्हणून तिनें एका बड्या हिंदी गृहस्थाचें उदाहरण नांव न घालतां दिलें आहे तें असें कीं—" त्या गृहस्थाच्या मुलीचें लग्न व्हावयाचें होतें, तेव्हां त्यानें आपल्या भावी जावयाला असें सांगितलें कीं, ' तुम्हाला

उपदंशादि कांहीं विकार नाहीं हें सिद्ध करण्याकरितां ब्रिटिश डॉक्टराचें सर्टिफिकीट हजर करा. ' बालविवाह प्रचलित होता तेव्हां भावी जावयाकडून पुस्ती काढून घेत हे लोकांना माहित आहे. पण पत्रिकापूजनाबरोबर उपदंश—मुक्ततेच्या सर्टिफिकीटाचें पूजन आधीं गोऱ्या डॉक्टराला फी भरून करावें लागतें ही नवलकथा या बाईनें तुमच्या देशासंबंधीं म्हणून सांगितली हें, वाचकांनी लक्षांत ठेवा.

बाई पुढें म्हणते, " सासरे बोवांनीं ही गोष्ट योग्यच केली. कारण असला विकार तो स्वतः निंद्य मानीत होता असे नव्हे. पण समजा, उद्या आपल्या मुलीला मूल होत नाहीं याचा दोष नवऱ्यानें आपणावरून काढून तिच्यावर घातला आणि मुलगी परत आली तर तिच्या पोटगीवर जन्मभर जो खर्च पुढें करावा लागणार त्यापेक्षां लग्नाच्या आधींच गोऱ्या डॉक्टरालाच थोडीशी फी दिलेली बरी. " अहाहा ! व्यवहाराच्या दृष्टीनें किती हा सोपा हिशेब ! फक्त सासरे लोक अशी सर्टिफिकिटें इकडे मागतात एवढेंच सिद्ध व्हावयाचें राहिलें, पण वरच्या वर्णनासंबंधानें एक गोष्ट आम्हाला विचारावीशी वाटते ती ही कीं, सर्टिफिकीट द्यावयाचें तें गोऱ्याच डॉक्टराकडूनच कां ? याचें उत्तर कोणीहि असेंच देईल कीं, गोऱ्या डाक्टरांना या विद्येची अधिक माहिती म्हणून ! हिंदुस्थानावर चिखल फेकतांना शेवटीं त्याच्या अंगावर तो किती पडेल तो पडो पण त्यानें आपले हात आधीं भरतात हें बाईच्या लक्षात कसें आलें नाहीं कोण जाणे ? भावी जावयाकडून हें सर्टिफिकीट मागणारा कोण अवलीया असेल तो असो. सर्व विद्येंत इंग्रज लोक श्रेष्ठ असें मानणारा व गोऱ्या लोकांना देव समजणारा तो कोणी एखादा श्वानवृत्तीचा लाङ्गूलचालक असेल. त्यानें आपला विक्षिप्तपणा तर प्रगट केलाच पण गौरकाय समाजाबद्दल उपदंशादि विकाराविषयीं त्याचें मत काय हेंहि पण त्यानें न कळत प्रगट केलें नाहीं काय ? बाईच्या हातांत हत्यार म्हणून त्यानें विंचू दिला असेंच झालें म्हणावयाचें. कारण तो बाईला आधीं चावणार मग इतरांना !

असो. हा अप्रिय विषय आजच संपवितां येता तर बरें वाटलें असतें. पण हें काम अर्धेंच सोडणें बरे नव्हें म्हणून आणखी एकाद्दुसरा लेख लिहून हा विषय पुरा करूं.

---

# १०५. मिस् मेयोबाईचें शिमगापुराण

( केसरी ता. २२ नोव्हेंबर १९२७ )

हिंदी लोकांवर या बाईनें दोन परस्परविरोधी असे आरोप आणले आहेत. एक आरोप असा कीं हे लोक अतिशय विषयलंपट आहेत, व दुसरा असा कीं पुरुषत्वहीन आहेत! आणि हे दोनही आक्षेप सिद्ध करण्याकरितां एकांतिक स्वरूपाचीं अशी कांहीं खरी व कांहीं काल्पनिक उदाहरणें बाईनीं पुस्तकांतून पेरलीं आहेत. पूर्वीच्या लेखांत या दुसऱ्या आरोपासंबंधानें उल्लेख होता म्हणून त्याचीच परिसमाप्ति प्रथम करूं. बाई लिहितात कीं, " आपल्याला अपत्ययोग नाहीं असें आढळून आलें तर हिंदुस्थानांतील पति निराश होत नाहीं. कारण संतति निर्माण करण्याचे इतर मार्ग त्याला मोकळे असतात. पैकीं एक मार्ग असा कीं, बायको यात्रेला पाठवावी किंवा देवळांत पाठवावी. आणि तिच्याबरोबर थोडाबहुत पैसा द्यावा म्हणजे काम आपोआप होतें. कारण ती घरीं परत येते ती संतति होण्याच्या तयारीनेंच येते. कित्येक जातींत तर लोक संतति होण्याची निराशा होण्यापर्यंतहि वाट पाहात नाहींत. ते तिच्या प्रथम ऋतुकालींच तिला देवळांत पाठवतात. दिवसभर ती देवळांत बसली म्हणजे सहजच पुष्कळ लोकांच्या दृष्टीस पडते. तिनेंहि दिवसा देवासमोर मुलाची प्रार्थना करावी आणि रात्रीं देवळाच्या आवारांत शयन करावें. असें झालें म्हणजे दुसरे दिवशीं सकाळीं देवानें केलेल्या अद्‌भुत चमत्काराची शुभ वार्ता तिला पुजाऱ्याला किंवा इतरांना सांगतां येते. आणि पुजारीहि तिला म्हणतो कीं, " अंधारांत तुला नेमकी हुडकून काढून कृपा करणारा प्रत्यक्ष ईश्वरच असला पाहिजे ! " मग ती घरीं येते व मूल वर्षाचें झालें म्हणजे पुनः देवळांत जाऊन देवाला निरनिराळे पदार्थ वाहते व त्याबरोबर मुलाच्या केसाची एक बट देवाला देते. ईश्वरी प्रसादाची ही परंपरा चालविणारे पुजारी धडधाकटच पाहून नेमीत असतील यांत आश्चर्य नाहीं. या सर्व गोष्टी न कळत होतात असेंहि नाहीं. सर्वांना त्याची पूर्ण माहिती असते. पण धर्मभावनेनें सर्वांचाच संतोष होतो. "

आतां हिंदी लोकांच्या विषयलोलुपतेसंबंधानें व नीतिसंबंधानें बाई काय म्हणतात तें पाहू. " ऋतु-प्राप्तीच्या आधीं लग्न हें हिंदुधर्मांत झालेंच पाहिजे. आणि लग्न झालें असलें म्हणजे मग पतीला ऋतु-प्राप्तीची मर्यादा पाळण्याचें कारण नाहीं. का कीं, केवळ विवाहानें पतीला नवरे-पणाचे हक्क स्त्रीवर उत्पन्न होतात. बरें, लग्नें लहानपणीं करण्याची इतरहि कारणें आहेत. सामायिक कुटुंबामध्यें मुलें-मुली पुष्कळ असावयाच्या आणि तीं एकत्र ठेविलीं म्हणजे गोंधळ होणारच. म्हणून होतां होईल तों लवकर ज्याचा त्याचा विवाह करून दिला म्हणजे घरचा धनी चिंतामुक्त होतो. पण लग्नाशिवाय इतरहि एक मार्ग असा आहे कीं, ज्याच्या योगानें मुलींना लहानपणींच वेगळ्या करतां येतात ! हा मार्ग म्हणजे त्यांना मुरळ्या किंवा देवदासी बनवून देवस्थानाच्या स्वाधीन करणें हा होय. अशा रीतीनें पाच वर्षांच्या मुली पुजाऱ्याच्या ताब्यांत राहतात आणि श्रीमंत यात्रेकरू यात्रेला येतात तेव्हां त्यांच्याकडून पैसे काढण्याला या मुलींचें साधन त्यांना फार चांगलें उपयोगी पडतें. पांचव्या वर्षांतील जर ही गोष्ट तर मोठेपणीं त्या उपवर झाल्या म्हणजे कांहीं बोलावयासच नको. पुजाऱ्यानें तिच्या कपाळावर देवस्थानाचा छाप मारावा, तिला बाहेर उनाडक्या करण्याला पाठवावें व तिनें पैसे मिळवून पुजाऱ्याला परत आणून द्यावे असा धंदा सुरू आहे. प्रत्यक्ष तिच्या पोटगीला कितीसे पैसे द्यावे लागणार ! मिळून सगळी धन पुजाऱ्याचीच. " पण या सर्वांहून मोठी सगळ्यांत आठवण ठेवण्यासारखी गोष्ट मेयोबाई प्रतिपादून सांगते कीं, "जे आईबाप आपल्या मुली अशा रीतीनें देवाला वाहतात त्यांना त्याचें वरती भूषण वाटतें. इतकेंच नव्हे, तर घरचे श्रीमान् व जातीनें श्रेष्ठ असलेले लोकहि या गोष्टी करतात ! समाजालाहि ही गोष्ट इतकी आवडते कीं, ही चाल बंद करण्याकरितां जर सरकार प्रयत्न करील तर अनेक प्रांतांतून बंडें होतील ! एखाद्या श्रीमंत जमीनदारानें आपल्या मुलीचें लग्न केलें म्हणजे तिच्याबरोबर आंदण म्हणून लहान मुली तिच्या सासरच्या घराण्याकडे पाठवतात. " पडदा-इस्पितळांतले कांहीं अनुभव म्हणून बाईनें दिले आहेत. त्यांत किती तरी आश्चर्यकारक गोष्टी आहेत. १३ वर्षांची आई एवढेंच नव्हे तर तिला जुळीं मुलें झालेलीं ! तिच्या काळजाला

विकार व दमा झालेला. एक पाय अधू झालेला. अशा स्थितींत तिचा ५० वर्षांचा नवरा तिला बाळंतपण संपण्याआधींच आपल्या हक्कबजावणी-करितां मागून नेण्याला येतो व त्याचेबरोबर तिला घरीं न पाठविली तर इस्पितळांच्या अधिकाऱ्याशीं भांडावयाला तयार होतो. व त्यानेंहि काम न झालें तर तो कोर्टांत फिर्याद करतो. साडेनवव्या वर्षीं मूल झालेली बाई आपण पाहिली असें मिस् मेयो लिहिते ! आणि बाईचा सिद्धान्त असा कीं, युनिव्हर्सिटींत शिकत असणारा प्रत्येक विद्यार्थी, उपदंशाच्या विकारानें ग्रस्त असतो !

या गोष्टी पडदा-इस्पितळांतील झाल्या. पण घरच्या पडद्यामागें काय चालतें याहि गोष्टी बाईला दिव्य ज्ञानानें समजल्या आहेत. पडद्याची पद्धत पडण्याचें कारण बाईनें असें सांगितलें आहे कीं, उत्तर हिंदुस्थानांत अकरा वर्षांच्या मुली देखील प्रत्यक्ष आईची नजर त्यांच्यावर नसेल तर घरांत एकदोन प्रहरभरहि मोकळ्या सोडण्याची सोय नाहीं. घरचे किंवा बाहेरचे पुरुष त्यांना भ्रष्ट केल्याशिवाय राहावयाचे नाहींत. शेतकरीवर्गांत तर ही मर्यादा आणखी खालीं येते. ११ वर्षांची १० वर्षें होतात. आणि एका दुपारची मजल एक तासावर येते. शेतकरीवर्गांत पडदा असत नाहीं ही गोष्ट अर्थात् प्रसिद्ध आहे. आणि शेतकरीवर्गांत आईची नजरहि सदैव मुलीवर राहणें शक्य नाहीं. वास्तविक कोणत्याच वर्गांत नाहीं, आणि शेतकऱ्यांत तर मुळींच नाहीं. यावरून बाईचा सिद्धान्त असा कीं, कोणत्याहि दिवशीं एक तासापलीकडे आईच्या दृष्टीआड झालेल्या मुली शेकडा शंभर भ्रष्ट असतात असेंच का म्हणाना ? घरीं न ठेवतां मुली कोणी शाळेंत पाठविल्या तरी तेथेंहि त्यांचें रक्षण होत नाहीं. कारण शेतानें कुंपण खावें त्याप्रमाणें शिक्षकच मुलींना भ्रष्ट करतात ! ''

पण यापेक्षां अधिक उतारे देण्याचें कारण आहे असें वाटत नाहीं. दिलेल्या उताऱ्यांवरूनच हिंदी समाजासंबंधानें बाईचें मत एकंदरीनें कळून येणार आहे. पण त्यावरून हेंहि कळून येईल कीं, सामाजिक लग्नव्यवहार व नीति यासंबंधानें ज्या बाईनें वरील प्रकारचीं वर्णनें दिलीं तिनें हिंदुस्थानांतील लोकांच्या इतर सामाजिक चालीरितीवर किती टीका केली असेल व त्यांना किती

हास्यास्पद ठरविलें असेल ! पण सामाजिक नीति व व्यवहार यांवर टीका करण्याकरतांच हें पुस्तक लिहिलें आहे अशी समजूत कोणी करून घेईल तर ती चुकीची होईल. कारण वरील प्रकारचीं वर्णनें ही केवळ चौकट असून, पुस्तकांतील खरा मुद्दा राजकारणाचा आहे. तो असा कीं, असले मूर्ख अजागळ पापी चांडाळ लोक हिंदुस्थानांत भरले आहेत. ते स्वराज्य मागणार काय व सरकारनें तें त्यांना द्यावें तरी कसें ? पुस्तकाचें आद्यन्त वरील वर्णनात्मक आहेत. पण गाभ्यामध्यें सुधारणांच्या कायद्याचीहि मेयोबाईनें सविस्तर खोल चर्चा केली असून, स्वराज्य मागण्याचे व देण्याचे मुद्दे पदोपदीं खोडून काढले आहेत. अशा पुस्तकावर टीका कशी करावी हा मोठाच बिकट प्रश्न आहे. राजकारणाची चर्चा पुस्तकांत असली तरी त्याला उत्तर द्यावें इतक्या महत्त्वाची ती नाहीं. बाईनें कितीहि आव आणला तरी तिला हिंदी राजकारणाचे ओचे ठोही कळलेलें नाहीं हें अगदीं उघड आहे. आणि सामाजिक मुद्यावर उत्तर द्यावयाचें म्हटलें तरीहि अप्रयोजकताच पदरीं येणार. कारण अतिशयोक्ति करणारा मनुष्य स्वतःलाच खोटा ठरवीत असतो. शिवाय विषयही असा कांहीं नाहीं कीं, ज्यांत टीका रंगविण्याला कोणालाहि हौस वाटेल. बाईचे वरील उतारे देणें हाच मुळीं शिष्टाचाराचा उपमर्द झाला. स्वच्छ पाण्यांत हौशी मनुष्याला डुंबावेसें वाटतें, पण चिखल हा कांहीं डुंबण्याकरितां नाहीं. त्यांतून पाय जितका लवकर निघेल तितका चांगला असेंच कोणासहि वाटत असते. तथापि दुर्दैवानें असले आक्षेपहि उत्तर दिल्याशिवाय अगदींच मोकळे सोडतां येत नाहींत. आणि साप पाहिला म्हणजे मग तो ठेचल्याशिवाय सोडणें हें मनुष्याच्या स्वभावांत सहसा नसतें.

बाईला आमचें काय कोणाचें काय पहिलें उत्तर ' अरे तर कां रे ' या स्वरूपाचें असणार. पण असत्य उगाळून प्यालेल्या या बाईला केवळ आकडेशाहीनें उत्तर देणें अशक्य आहे. विशी-तिशीच्या आंतील दहापैकीं आठ हिंदी पुरुष नपूंसक असतात असा जो आरोप बाईनें केला आहे त्याला हिशेबी उत्तर देतां येईल असे आकडे कोणत्याहि सरकारी किंवा खासगी रिपोर्टांत नमूद असतील असें आम्हांला वाटत नाहीं. तसेंच

इस्पितळांतील दप्तरें अथवा डॉक्टर लोकांच्या टेबलावरील चिकित्सेचे कागद घेतले तरी त्यांतूनहि कांही साधन उत्तरादाखल मिळणें शक्य नाहीं पण पुराव्याच्या कायद्याप्रमाणें पाहिलें तरी वरील सिद्धान्त सिद्ध करण्याचा बोजा आधीं बाईवरच पडतो. तिनें तरी हें विधान कोणत्या आधारावर केलें ? आणि तो आधार जोंपर्यंत ती देत नाहीं तोंपर्यंत ती कसेंहि खोटें बोलण्याच्या धाडसाला न भिणारी साहसी स्त्री आहे एवढेंच म्हटल्यानें काम होणार आहे. बाईचा हा आरोप इतका धडधडीत खोटा आहे कीं, तो हिंदुस्थानांतच काय पण जगाच्या कोणत्याहि भागांत खरा ठरणेंच शक्य नाहीं. म्हणून या बाबतीपुरतें 'अरेस कां रे' असें उत्तरहि आम्हाला देणें शक्य नाहीं. पण इतर कित्येक आरोपांसंबंधानें ते सर्वस्वीं शक्य आहे हें कसें तें आम्ही एकच मुद्दा घेऊन दाखवितों. कित्येक वाईट संवयी हिंदुस्थानांतील मुलांना आहेत असें विधान बाईनें केलेलें आहे. पण मौज ही कीं, आपल्या स्वतःच्या देशांत काय स्थिति आहे ही गोष्ट आपल्याला जशी काय माहीतच नाहीं असा बाईचा बाहाणा आहे! आणि कोणी हटकून विचारलें तर खोटें बोलण्याची दिक्कत बाईला नसल्यामुळें ती कधींहि असेंच उत्तर देईल कीं, "छेः छेः, आमचा देश फार सोवळा! असल्या गोष्टी आमच्यासारख्या स्वतंत्र कर्तृत्वसंपन्न शाहण्या देशांत कोठें असतील कीं काय ? तशा असत्या तर आम्ही स्वराज्य मिळविलें असतें कसें किंवा टिकविलें असतें कसें!" पण दारूचा पर्वत असला तरी तो सगळ्याचा सगळा पेटवून उडवून देण्याला जशी एक ठिणगी पुरते त्याप्रमाणें बाईच्या या बाहण्याचा पर्वत जमीनदोस्त करण्याला खुद्द अमेरिकेंतील एकाच शास्त्रज्ञाचा एक उतारा आम्ही देतों. डॉ. केलॉग एम्. डी. नांवाच्या गृहस्थानीं 'Man the master-piece' या नांवाचा एक शास्त्रीय ग्रंथ लिहिला आहे. त्यांत त्यांनीं केलेलीं कांहीं विधानें खालीं दिलीं आहेत. ते म्हणतात, "या घातक संवयी आमच्या अमेरिकेंत इतक्या सरसकट माजलेल्या आहेत कीं अपवाद हे हुडकूनच काढावे लागतील. आमच्या शाळेंतील बारा वर्षांच्या वरचीं कोठलींहि मुलें घेतलीं तरी ज्याला या घातक संवयीचें ज्ञान नाहीं असा एक तरी सांपडेल कीं नाहीं याची शंकाच आहे." बाईप्रमाणें डॉ. केलॉग यांनींहि आपला सिद्धान्त आक-

ज्यांनींच मांडला आहे हें लक्षांत ठेवावें! ते म्हणतात, " आमच्या प्राथमिक शाळा या दुर्गुणाची आगरेंच आहेत. तेथें अनेक प्रकारच्या व्यसनांची उत्पत्ति होते. प्राथमिक शाळाचशा काय, पण कडेवर घेतलेल्या मुलांना दुष्ट दाया असल्या वाईट संवयी शिकवितात. कित्येक युरोपियन देशांत लहान मुलाचें रडणें थांबविण्याकरितां त्यांच्या दाया या संवयीचा उपयोग करितात. रशियामध्यें या संवयी सरसकट मुलगे व मुली या दोनहि वर्गांतील मुलांत आढळून येतात." उपदंशाच्या विकारासंबंधानें बाईला उत्तर देण्याचें कारणच नाहीं. सामान्य डॉक्टर लोकांना व इतर लोकांना ही गोष्ट माहीत आहे कीं, या रोगासंबंधानें इंग्लंड-अमेरिका वगैरे देश हिंदुस्थानला गुरुस्थानीं शोभण्यासारखे आहेत. याहि संबंधानें डॉ. केलॉग लिहितात, " आमच्या इकडील मोठ्या शहरांतील एका प्रमुख आरोग्यसंरक्षक अधिकाऱ्यानें मला सांगितलें आहे कीं, एकंदर लोकसंख्येपैकीं ५ लोकांना तरी हा विकार आहे असें घेऊन चालण्यास हरकत नाहीं; मग तो कोणत्याहि स्वरूपांत असो. " आम्हीं वर लिहिलें तें कदाचित् मूळच्या इंग्रजी शब्दांनींच अधिक पटण्यासारखें आहे म्हणून डॉ. केलॉग यांच्या पुस्तकांतील मूळ इंग्रजी उताराच आम्ही येथें देतों.

" The exceptions may be very small when compared with the great multitude who often at the very threshold of life, are introduced to this degrading vice. In Russia the practice is universal among the young of both sexes. Probably there is not one boy in fifty above twelve years of age in attendance at our public schools who does not know more or less of this degrading vice.

" Primary schools are often nurseries of vice and the author has had good reason for believing that in some schools of this class, vice has prevailed so extensively that scarcely a single pupil has escaped its blighting infiuences. Sometimes children yet in arms, even nursing infants, are taught the vile practice by wicked and ignorant nurses. In some European countries they habitually resort to this means of quieting troublesome infants.........

"Upon this vice (prostitution) are rounded more than twenyt

thousand brothels which exist in this land of Christianity! We are informed by a very reliable authority that there are at the present time no less than fifty thousand fallen women in England alone who are devoted to a life of shame. A prominent Sanitary officer of one of our large cities, affirms that not less than 1/5 of the entire population of the city is tainted with venereal disease in some form or other."

'Man the Master—Piece', Pp. 324—369.

ही स्थिति १८९४ सालीं. मग या गेल्या ३३ वर्षांत मजल किती पुढें गेली असेल तें पाहा!

---

## १०६. शारदा–बिलासंबंधीं सारासार विचार

( केसरी, ता. १ ऑक्टोबर १९२९ )

सोमवार ता. २३ रोजीं सायंकाळीं ७ वाजतां शारदबिलाचें तिसरें वाचन असेंब्लींत होऊन तें प्रचंड बहुमतानें पास झालें. आणि त्या बिलाची चर्चा कौन्सिल ऑफ स्टेटमध्यें लगेच सुरू होऊन तेथेंहि तें मंजूर झालें. आतां व्हाइसरॉयांची संमति मिळतांच त्या बिलाला कायद्याचें स्वरूप येऊन बसेल, व त्याची अंमलबजावणी ता. १ एप्रिल १९३० पासून सुरू होईल याविषयीं आतां मुळींच शंका नाहीं. दरम्यान येत्या हिवाळ्यांत दिल्लीस असेंब्लीचें नेहमींचें मोठें अधिवेशन होणार आहे; त्या वेळीं नवीन झालेला हा कायदा रद्द व्हावा अशा अर्थाचें बिल कोणाहि सभासदाला पाठवितां येईल; परंतु असें बिल बहुधा कोणी आणणार नाहीं, आणलें तरी त्याच्या चर्चेला बॅलटच्या सोडतींत जागा मिळेलच असें नाहीं; जागा मिळाली तरी खासगी बिलाला दिवस फार थोडे मिळतात, आणि सिमल्याच्या बैठकीपूर्वी व खुद्द त्या बैठकींत प्रविष्ट होणाऱ्या इतर खासगी बिलांचा नंबर वर लागलेला असल्यामुळें याला पुढें येण्याला संधि मिळणार नाहीं. पण सर्वांत महत्त्वाची गोष्ट म्हटली म्हणजे इतक्याहि संकटांतून निभावून हें बिल पुढें येऊं शकलें अशी कल्पना केली

तरी आज अनुकूल प्रतिकूल मतांच्या संख्येंत जें मोठें अंतर पडलेलें दिसतें तें कमी तर होण्याचा संभव नाहींच, पण उलट तें अंतर वाढलेलेंच दिसून येईल.

सांगण्याचा मुद्दा हा कीं, चालू असेंब्लींतच काय, पण पुढील निवडणुकीनंतर बनणाऱ्या नव्या असेंब्लींतहि शारदा-बिलानें हा झालेला नवा कायदा रद्द होण्याचा संभव आहे असें आम्हांला फारसें वाटत नाहीं. १८९१ सालीं संमतिवयाचा कायदा झाला. तेव्हांची व आज बालविवाहप्रतिबंधाचा हा कायदा होत आहे तेव्हांची स्थिति यांच्यांतील एक घटक स्थिर व दुसरा घटक चल असल्याचें दिसून येईल. अगदीं खेड्या-पाड्यांतले अशिक्षित व नगरवासी यांपैकीं कट्टे पुराणमतवादी या दोघांनाहि संमतिवयाचा कायदा जितका नको होता तितकाच हा लग्न-वयाचा कायदाहि आज नको आहे ही गोष्ट अगदीं उघड होय. सामा-जिक मनःस्थितींतील स्थिर घटक म्हणून जो वर सांगितला तो हा होय. आणि चल घटक म्हणून जो म्हटला तो समाजांतील सुशिक्षित लोकांचें मत हा होय. १८९१ सालीं संमतिवयाचा कायदा झाला तेव्हां मोठी चळवळ झाली खरी; पण ती त्या वेळीं सुशिक्षितांनींच केली होती. त्यांनीं पुढाकार घेतला नसता तर ती चळवळ झालीच नसती. पण आज ४० वर्षांच्या अवधीनें या सुशिक्षित वर्गाच्या स्वतःच्या मतांतच पुष्कळ फरक पडला आहे. व तोच हल्लींच्या शारदा-बिलाच्या प्रसंगीं दिसून आला. हा फरक पडण्याचें एक कारण असें कीं, सामाजिक सुधारणे-विषयीं यथाक्रम प्रगति होत असून, धर्मशास्त्राविषयीं आदरबुद्धि ठेवूनहि त्याकडे पाहण्याची सुशिक्षित समाजाची दृष्टि बदलली आहे; व तीहि केवळ बंडखोरीच्या बुद्धीची नसून, धर्मशास्त्राच्या संशोधनानें पुराणमत-वादापेक्षां प्रगतिमतवादाला अनुकूल व उपकारक अशाच गोष्टी पुढें आल्या व सिद्ध झाल्या आहेत म्हणून बदलली आहे.

आतां प्रश्न उत्पन्न होतो तो हा कीं, या नवीन मतांचा समाजांत अंमल कसा व्हावयाचा? त्याचे प्रकार दोन. पैकीं एक सार्वजनिक चर्चा व मतप्रतिपादन. या गोष्टी वर्तमानपत्रादिकांतून व सभापरिषदांतून सुरू आहेतच व त्यामुळें पुष्कळ कार्य घडत आहे. तसेंच सामाजिक परिस्थिति

हा जो समाजाला शिक्षण देणारा दुसरा गुरु तोहि आपलें कार्य करून हें स्थित्यंतर घडवून आणीत आहे. गरज ही जशी मनुष्याला नव्या युक्त्या सुचविते, त्याप्रमाणें गरज म्हणजे अनिर्वाह्य परिस्थितिहि मनुष्याला कोणत्याहि नवीन घटनेशीं व आवरणाशीं समरस होण्याला शिकवीत असते. ' जेथें नाहीं नाहीं म्हणूनहि कांहीं चालतच नाहीं तेथें नाहीं नाहीं म्हणून तरी उपयोग काय ' हा मंत्र लोकांच्या तोंडीं आपोआप येतो व तोच घोळघोळून पाठ होऊन जातो. पूर्वी आपल्या अंगांतील विरोधशक्तीचा जो अभिमान वाटत असतो तो जाऊन त्याऐवजीं आपण परिस्थितीशीं मिळतें कसें घेतों व बेमालूम सांधा कसा जोडतो याविषयीं आपल्या बुद्धीच्या कौशल्याचाच अभिमान अधिक वाटूं लागतो ! ही गोष्ट स्त्री-शिक्षण, लग्नवयाची मर्यादा, स्पर्शास्पर्शभेद, उच्चनीच वर्णभेद, व्यक्ति-स्वातंत्र्य, परदेशगमन इ. सामाजिक सुधारणेच्या अनेक अंगांसंबंधानें अनुभवाला येऊं लागलेली आहे. आणि याचाच परिणाम आम्हीं वर सांगितल्याप्रमाणें असा कीं, १८९१ सालच्या संमतिबिलाच्या चळवळींत जी तीक्ष्णता दिसून आली ती आज विवाहमर्यादेच्या कायद्याविषयीं दिसून आलेली नाहीं.

पण या स्थित्यंतरासंबंधानें आणखीहि एक महत्त्वाचें कारण सांगावयाच उरलें. तें असें कीं, कायदेमंडळांत घडविल्या जाणाऱ्या सामाजिक कायद्यासंबंधानेंहि लोकांची दृष्टि कांहीं अशीं बदलली आहे. सामाजिक सुधारणा ही तत्त्वतः समाजानें आपल्या इच्छेनें व आपल्या हातानें घडवून आणण्याची गोष्ट आहे. हें मत केव्हांहि यथार्थ व आजहि सर्वसंमत असेंच आहे. तरी देखील एखादी सुधारणेची बाब प्रत्यक्ष कायद्याच्या साहाय्यानें घडवून आणण्याचा उपक्रम म्हणा किंवा, वाटेल तर उपद्व्यापहि म्हणा, कोणी करण्यास सरसावला तर त्याविषयीं पूर्वी लोकांना जितकी अप्रियता वाटत होती तितकी आज वाटेनाशी झाली आहे. याचें कारण हेंच कीं, कायदेमंडळें पूर्वींहून अधिक प्रातिनिधिक स्वरूपाचीं झालीं आहेत. कायदेमंडळ हें कायदा करण्याचें यंत्र. या यंत्राची कळ किंवा किल्ली पूर्वीं सर्वस्वीं सरकारच्या हातीं होती, ती आतां थोडीबहुत तरी लोकप्रतिनिधींच्या हातीं आली आहे. तेव्हां तिचा उपयोग करून आपल्या हेतुसिद्धीला जर

त्या यंत्राची मदत घेतां आली तर घ्यावी म्हणून कोणीं तसा प्रयत्न केल्यास दुसऱ्याला त्यास फारशी नांवें ठेवतां येत नाहींत. एक आणेली तोंडांत टाकल्याबरोबर प्लॅटफॉर्म-तिकीट बिनचूक पुढें करणारें यंत्र स्टेशनवर उभें केलेलें असतां, त्यांतून आपल्या हातानें घेतां येणारें तिकीट टाटून त्याकरितां तिकिट ऑफिसांत जाऊन 'तिकीट-बाबू' पुढें तोंड वेंगाडून, तिकीट मागून वेळ घालविणें कोणाला बरें वाटेल ? तात्पर्य, कायदेमंडळाचें यंत्र चालविण्यांत कोणाची दुष्टबुद्धि नाहीं इतकी मनाची खात्री पटल्याबरोबर, त्याला विरोध करण्याची इच्छा असली तरी तिच्यांतील वैरभाव निघून जातो, व प्रातिनिधिक स्वरूपाच्या या संस्थेंत जो कायदा घडविला जाईल तो नाखुषीनें का होईना पण मान्य करणें हें ओघानें प्राप्त होतें. "कायदेमंडळांत लोकप्रतिनिधी नाहींत, तें यंत्रतंत्र सर्वस्वीं सरकारच्या हातीं आहे" या भरीव पायावरच संमतिबिलाच्या विरोधांत तेव्हांच्या चळवळींतलि लढाऊ लोकांनीं आपल्या तोफांचे मोर्चे रचले होते. पण आज तो आधार गेल्यामुळेंच तशी चळवळ जाणत्या सुशिक्षित लोकांकडून तरी होऊं शकत नाहीं.

आतां "कायदे-मंडळें प्रातिनिधिक स्वरूपाचीं झालीं असलीं तरी सामाजिक किंवा धार्मिक समजल्या जाणाऱ्या बाबतींत त्यांनीं हात घालूं नये. कारण त्यांतील सभासद एकजिनसी म्हणजे एका धर्माचे किंवा वर्गाचे नसतात; त्यांची घटना संमिश्र असते; आणि विदेशी सरकार हा त्यांतला एक महत्त्वाचा घटक असतो; अर्थात् कोणत्याहि एका धर्माच्या किंवा जातीच्या चाली, रीति, रूढि, धार्मिकसंप्रदाय व समजुती यांना बाध आणण्यासारखा कायदा तेथें व्हावयाचा म्हणजे, "अल्पमतवाल्यांवर बहुमतवाल्यांचा केव्हांहि जुलूमच होणार" हा आक्षेप शिल्लक उरतो. पण असें म्हणून तरी काय होणार ! कारण हिंदुस्थानांत एकजिनसी धर्म किंवा जात अजून निर्माण झालेली नाहीं, पुढेंहि ती निर्माण होण्याचा फारसा संभवहि नाहीं, आणि आज मागतों तें स्वराज्य उद्यां मिळाल्यावरहि विदेशी व विधर्मी एकहि प्रतिनिधी कायदे-मंडळांत राहणार नाहीं असें बहुधा होणार नाहीं. अर्थातच मिश्रघटनेचें कायदेमंडळ पूर्ण एकजिनसी बनेपर्यंत, समाजाच्या सुधारणेला त्याचा उपयोग करून

घ्यावयाचाच नाहीं असें म्हणणें म्हणजे ओढ्याचें पाणी सगळें वाहून गेल्यावरच कोरडया पायानें ओढा ओलांडून जाऊं असें म्हणण्यासारखें आहे. पण तें काय उपयोग ! ओढा आटेल तेव्हां आटो, पण तो आटण्याच्या आधींहि थोडेबहुत पाय बुडवून, भिजवून, परतीराला जाऊन पुढचा मार्ग आक्रमिलाच पाहिजे.

विद्यमान कायदेमंडळांत हिंदुसमाजाला लागणारा कोणताहि कायदा करावयाचा तर हिंदुसमाजाच्या मताधिक्यानेंच तो पास व्हावा, किंवा मुसलमान–समाजाला लागणारा कायदा, मुसलमान–सभासदांच्या मताधिक्यानेंच पास व्हावा, हें म्हणणें दिसण्यांत सयुक्तिक दिसतें. पण देशांतील सर्व वर्गांच्या म्हणजे राष्ट्राच्या संकीर्ण हिताहिताचा विचार करून, स्थूल बुद्धीनें जो कायदा करणें योग्य वाटेल तो करतां यावा अशाकरितांच कायदेमंडळें निर्माण करण्यांत आलेलीं आहेत. अर्थात् कोणत्याहि धर्मांच्या किंवा जातीच्या लोकांना स्वमतनिदर्शक असे सभासद जितके अधिकांत अधिक निवडून देतां येतील तितके निवडून दिल्यावर मग, कायदेमंडळांत कोणता कायदा व्हावा न व्हावा याविषयींचा निर्बंध कोणत्याहि एकटया धर्मांच्या किंवा जातीच्या लोकांना घालतां येणार नाहीं.

पण प्रस्तुत शारदा–बिलासंबंधानें पाहतां तरी वरील आक्षेप फारसा लागू पडत नाहीं. कारण या बिलाचा उपसर्ग होत असला तर तो हिंदुस्थानांतील कोणत्याहि एकाच वर्गाला होणारा नसून, यच्चयावत् सर्व वर्गांना सारखाच होणारा आहे. कोणाला तो उपसर्ग अधिक लागेल कोणाला तो कमी लागेल ही गोष्ट वेगळी. रायसाहेब हरबिलास सारदा यांनीं हें बिल प्रथम पुढें आणलें, तेव्हां तें हिंदुसमाजापुरतेंच होतें. व त्याचें तें स्वरूप तितकें मर्यादितच राहिलें असतें तर, या बिलावर कोणीं मतें द्यावीं, कोणीं देऊं नयेत असल्या सूक्ष्म विचाराला थोडाबहुत सकारण व योग्य असा अवसर राहिला असता. पण कायदेमंडळाच्या हातीं तें बिल गेल्यावर सिलेक्ट कमिटीनें त्याचें हें एकांगीं स्वरूप काढून टाकून तें या देशांतील सर्व लोकांना लागावें असें बनविलें. कारण बालविवाह जर रूढ असला व तो अनिष्ट मानला तर, तो बंद होण्यापासून मिळणारा लाभ देशांतील सर्वच लोकांना सारखा मिळावा, आणि त्या रूढीवर

नियंत्रण पडावयाचें तर तें सर्वच वर्गांवर सारखें पडावें, अशी दृष्टी सिलेक्ट कमिटीनें चालविली व ती सर्वथा योग्य होती. आणि यामुळेंच बिलाच्या दुसऱ्या वाचनाच्या वेळीं हें बिल मुसलमानांना लागू होऊं नये, हिंदूंना लागू होऊं नये. अशाविषयीं एकेक सूचना पुढें आली असतां तिला फारच थोडे अनुवादक मिळाले. एवढेंच काय पण हिंदू व मुसलमान जातींच्या सभासदांतहि उपसूचनांना विरोध झाला. तात्पर्य, कायदेमंडळाचें प्रातिनिधिक स्वरूप, व त्यामार्फत इष्ट त्या सामाजिकहि सुधारणा राष्ट्रीय दृष्टीनें घडवून आणण्याचा अधिकार, या गोष्टी ठळकपणें पुढें आल्या, व शारदा-बिल मंजूर झाल्यानें त्या सिद्धहि झाल्या, असें म्हणण्यास हरकत नाहीं.

आतां या यंत्राचा उपयोग वाटेल त्या किरकोळ किंवा भलत्यासलत्या गोष्टीला केवळ आपली हौस पुरविण्याकरितां कोणी सभासद करून घेऊं शकेल अशी एक भीति यांतून उद्भवली जाणें साहजिकच आहे. परंतु थोडा सूक्ष्म विचार केला असता, ती फारशी सकारण नाहीं असेंच कोणालाहि दिसून येईल. कारण उपक्रम, कार्यक्रम व उपसंहार या तीनहि दृष्टींनीं खाजगी सामाजिक बिलें कायदे-मंडळापुढें येण्याला स्वाभाविक असे बरेच निर्बंध आहेत, व इतक्या निरनिराळ्या जाणत्या लोकांवर जुलूम करणें तर राहोच, पण त्यांना चकविणें, फसविणें, भ्रम पाडणें, नजरबंदी करणें या गोष्टीहि फारशा सोप्या नाहींत, निदान शारदा-बिला-संबंधानें तरी तसें घडलें असें म्हणतां येत नाहीं. कारण तें असेंब्लीपुढें व जनतेपुढें आज सुमारें दोन वर्षें आहे. तें दोन निरनिराळ्या सिलेक्ट कमिट्यांपुढें गेलें. त्यांतील प्रत्येक कलमाचा कीस निघाला. व वाद-विवादांत ज्याला जितका विरोध करणें शक्य किंवा इष्ट वाटलें तितका करण्याला पूर्ण अवसर मिळाला. अर्थात् हें बिल मंजूर करण्याचा असेंब्लीला पूर्ण अधिकार होता. इतकेंच नव्हे तर, तिनें केला तो निर्णय उघडया डोळ्यांनीं जाणूनबुजून केला ही गोष्ट निर्विवाद आहे.

बरें, ज्या गृहस्थानें हें बिल पुढें आणलें तो व्यक्तिशः अराष्ट्रीयबुद्धीचा नाहीं. सनातनी चालीरीतींचा अभिमान बाळगणारा आहे. हिंदुसमाज हा अनेक गुणांनीं इतर समाजापेक्षां श्रेष्ठ आहे असें ग्रंथरूपानें साधार प्रतिपादन करणारा आहे. विदेशी कोणत्याहि चोचल्यांचा पगडा त्याच्या

मनावर बसलेला नाहीं व हिंदुसमाजाच्या उत्कर्षाला व सुदृढपणाला कायद्याची मदत मिळवून देण्याकरितां आपण निमित्तमात्र व्हावें या निर्लेप बुद्धीनेंच त्यानें हें बिल पुढें आणलें व त्याच्या दैवयोगानें अनुकूल साधनें मिळून तें पासहि झालें. इतक्या गोष्टी लक्ष्यांत घेतल्या म्हणजे तो किंवा त्याचें बिल यांच्याविषयीं कोणालाहि हेवादावा वाटण्याचें कारण नाहीं. उलट त्याचें अभिनंदन करावें असेंच वाटेल. त्याचें काम त्यानें केलें. असेंब्लीचें काम असेंब्लीनें केलें. इतक्याउप्पर समाजाला युक्तायुक्त वाटेल तें करण्याला समाज मोकळाच आहे.

तथापि प्रस्तुतच्या कायद्यांत काय काय दोष आहेत तें दाखवून देणें आणि मुख्यतः कायद्याचा अंमल सरकारानें कशा प्रकारें करावा व लोकांनींहि त्यासंबंधानें कोणतें धोरण ठेवावें इतकीच गोष्ट सांगण्याची उरते. म्हणून त्याविषयीं जे लिहावयाचें तें पुढें लिहूं.

मागील लेखांत हें सांगितलेंच आहे कीं, शारदा–बिल आतां पास झालें, तें तूर्त तरी रद्द होण्याचा संभव नाहीं. त्याचा अंमल पुढील चैत्रापासून सुरू होणार, म्हणून त्याविषयीं धोरण ठरविण्याला प्रत्येकानें आतांपासून लागलें पाहिजे. हें धोरण निश्चित अनेक प्रकारचें असूं शकेल. उदाहरणार्थ कोणी म्हणेल, " बिल गुणांनीं तर वाईट आहेच, पण असलें बिल लोकांवर लादण्याचा कायदेमंडळ झालें म्हणून त्याला काय अधिकार? अर्थात् कायदे-मंडळानें करावयाचें तें केलें, आपणाला काय करावयाचें तें आपण करूं. येऊन जाऊन थोडा फार दंड, किंवा फारच झालें तर आठपंधरा दिवसांची साधी कैद. मग त्यांत एवढें भिण्यासारखें काय आहे? नैसर्गिक हक्कावर व धार्मिक आचारावर सरकारला अतिक्रमण करूं दिल्यापेक्षां असा थोडासा त्रास सोसला तर काय हरकत! म्हातारी मेल्याचें दुःख नाहीं, पण काळ सवकतो. राजकारणांत इतक्या लोकांनीं सत्याग्रह केला, तर धर्माखातर आपणहि कां करूं नये ? "

दुसरा कोणी म्हणेल, " बिल वाईट आहे, व असलें बिल लोकांवर लादण्याचा कायदेमंडळाला अधिकार नाहीं. म्हणून तें उलथून टाकण्याचा प्रयत्न झाला पाहिजे. लोकांकडून निवडून घेऊन कायदे–कौन्सिलांत

जातांना बरें वाटतें; पण त्यांच्या मताप्रमाणें कायदेकौन्सिलांत मत द्याव-याची वेळ आली, म्हणजे मग आपलें तेंच खरें, मतदारांना कोण विचारतो ? बरें म्हणावें, पण येवढ्यानें काय झालें ? फिरून निवडणुकी एक वर्षानें आहेत. तेव्हां पाहून घेऊं. तोंपर्यंत बिलाला प्रतिकूल लोकमत आपण तयार करून ठेवणार ! पण कायदा अमलांत आहे तोंपर्यंत तो पाळलाच पाहिजे ! न पाळून काय करणार ? दुर्दैवानें हा कायदा मोड-ण्याचा सत्याग्रह करावयाचा म्हणजे आपल्या मुलीचें लग्न हट्टानें चौदा वर्षांच्या आंत करावयाचें. पण हट्टानें करण्यासारखी कांहीं ही गोष्ट नाहीं. सहजासहजीं मुलींचीं लग्नें तेरा चौदा वर्षांपर्यंत होत नाहींतच. मग हट्टानें आधीं करावयाचीं म्हणजे दुसऱ्याला अपशकून करण्याकरितां आपलें नाक कापून घेण्यासारखें आहे. आमची हरकत तत्त्वाची आहे; आणि ज्या खालच्या किंवा विशिष्ट वर्गांत लग्नें लहानपणीं करतात किंवा करावीं लागतात त्यांच्यावर जुलूम होणार म्हणूनच आमची ही चळचळ. आमचें स्वतःचें सुखदुःख त्यांत फारसें नाहीं. ”

तिसरा कोणी म्हणेल, “ कायदा झाला तेव्हां तो पाळलाच पाहिजे. पण जो पाळील त्यांचें तरी त्यांत काय नुकसान आहे ? आम्ही पांढरपेशे लोक आपल्या मुलींचीं लग्नें तेरा चौदा वर्षांपर्यंत ठेवूं लागलों ते आम्ही, आमचीं मुलें-मुली, शाळेंत जाणारें, शिकणारे, शिक्षणानें मिळणाऱ्या नोकऱ्या धरणारे आहों. आम्हांला काय, बिल पास झालें काय न झालें काय सारखेंच. पण खरी अडचण अशिक्षितांची, धर्म—समजुतींनीं पछाड-लेल्या इतर वर्गांची आहे. व या बिलाचा प्रथम प्रथम तरी त्यांना जाच झाल्याशिवाय राहणार नाहीं. पण असल्या गोष्टी निमित्तानेंच घडत असतात. बिल पासच झालें तर आतां त्याचा फायदा येऊन तें या वर्गांना समजून सांगावें, त्यांची समजूत घालावी. त्यांना बालविवाहाचे दुष्परिणाम समजून सांगावे. आणि बिलाचा जाच त्यांना ज्या रीतीनें कमी होईल असें करावें हाच उत्तम मार्ग. झालेलें बिल रद्द करण्याच्या खटपटीपासून काय फायदा ? खटपटच करावयाची तर बिलांत इष्ट अशा सुधारणा घडवून आणण्याची खटपट करावी, व त्याकरितां लोकमत बनवावें, हेंच अखेर श्रेयस्कर. त्यांच्या शिक्षणाची वाण आपल्या मतप्रसारानें भरून

काढावी. पांढरपेशे प्रौढविवाह करतात ते कांहीं आपण वाईट गोष्ट करतों अशा बुद्धीनें नव्हे. ''

चवथा कोणी असें म्हणेल कीं, '' बिल पास झालें फार चांगलें झालें. बिल कडक व जाचक तर नाहींच, पण उलट थोडेंसें नरमच आहे. खटले करण्याच्या मार्गांत बंधनें फार घातलीं आहेत. लग्नाचें वय १४ ठेवलें तें पंधरा ठेवलें असतें तरी बरें झालें असतें. अनेक वर्षें सुधारणेचा उपदेश सुरू आहे. पण होतें आहे कुठें ! कायदेमंडळांत आढयतेनें कांहीं लोक सांगत होते कीं, मी आपल्या मुलीं-नातींचीं लग्नें चौदाच्या आंत केलींच नाहींत. पण स्वतः त्यांचींच लग्नें मागच्याच पिढींत कितव्या वर्षी झालीं हें नाहीं त्यांनीं सांगितलें ! बरें आम्हाला शिक्षण तरी मिळालें म्हणून आम्हीं सुधारलों. पण शिक्षणावर सरकारची अवकृपा आणि आम्हीं खासगी प्रयत्नानें खर्चानें शिक्षण एका पिढीतच नाहीं पण चार पिढयांत तरी कितीसें फैलावणार ? तात्पर्य, कायद्याशिवाय बालविवाह थांबणें शक्य नाहीं. आणि कायदा पदरांत पडला हा तरी केवढा अपूर्व दैवयोग ! बिल पुढें आलें तेव्हां ६७ लोकांनीं अनुकूल मतें दिलीं पण बिल पुढें आणणारा त्यांतला एकच होता ! ''

अशा रीतीनें स्पष्टीकरणार्थ म्हणून थोड्याशा विस्तृत खुलाशानें शारदा बिलाच्या कायद्याच्या बाबतींत तीन-चार प्रकारचीं धोरणें कशीं संभवतात हें सांगितलें. या चारांपैकीं आम्हां स्वतःला तिसऱ्या प्रकारचें धोरण पसंत आहे. बिलांतील तत्त्व म्हणजे चौदा वर्षांपर्यंत लग्नवयाची मर्यादा वाढविणें हें आम्हाला मान्य आहे. ही गोष्ट सार्वत्रिक व्हावी असेंहि आम्हाला वाटतें. पण केवळ शिक्षणाच्या वाढीवर भिस्त ठेवून किंवा प्रस्तुतच्या सुधारणेच्या विषयीं मतप्रसारावर भिस्त ठेवून भागणार नाहीं, तर आयता कायदा झाला आहे त्याचा फायदा मतप्रसाराला घ्यावा. असला कायदा करण्याचा अधिकार हल्लींच्या प्रातिनिधिक कायदेमंडळांना आहे असें आमचें मत आहे. तथापि कायदा ही कांहीं मोठ्या हौसेची किंवा सर्वोत्तम गोष्ट नव्हे म्हणूनच सगळ्या असेंब्लींत असलें बिल आणणारा एकी एकी एकच मनुष्य निघाला. बिल पुढें आणण्याची हौस फक्त एकालाच आली, तरी बिल पुढें आलें ही फार चांगली गोष्ट झाली. तिचा फायदा घ्यावा असें

कांहींना वाटलें, तर मनाला सर्वस्वीं सोळा आणे पटत नाहीं खरें पण बिलाला नाहीं म्हणावें तरी पंचाईत, कारण त्यांत भावी पिढीचें हितच आहे असें कित्येकांना वाटलें. असो. बिलाला आमची स्वतःची तत्त्वतः कांहीं हरकत नाहीं. तरी पण बिलांत अनेक ढोबळ दोष आहेत, म्हणूनच हें सर्वच्या सर्व आहे असें बिल आम्हांला मान्य नाहीं. बिलांत अजून कोणते दोष उरले आहेत हें सांगावयाचें झाल्यास बिलाच्या दुसऱ्या वाचनाच्या वेळीं पुढें आलेल्या कोणत्या सूचना आम्हांस मान्य वाटतात व ज्या अमान्य करण्यानें असेंब्लीनें बिलाला अनिष्ट स्वरूप दिलें त्यांचा निर्देश केला असतां पुरें होईल.

बिल केव्हांपासून अमलांत यावें ? ही तारीख १९३० ची एप्रिल १ ली असें सिलेक्ट कमिटीच्या रिपोर्टांत म्हटलें आहे. या रिपोर्टाची तारीख १४ सप्टेंबर १९२८ अशी आहे. व पूर्वीच्या अदमासाप्रमाणें हें बिल गतवर्षींच्या सप्टेंबरांतच पास व्हावयाचें. अर्थात् कायदा झाल्यापासून त्याचा प्रत्यक्ष अंमल सुरू होण्याला पंधरा महिन्यांची तरी नोटीस लोकांना पाहिजे असें उघड ठरतें. आणि हेंच धोरण अमलांत आणण्याकरितां १९३१ च्या जानेवारीपासून कायद्याचा अंमल व्हावा अशी उपसूचना केळकर यांनीं दिली होती व ती सरकारालाहि योग्य वाटली असावी. कारण सगळ्या बिलांपैकीं या एकट्या उपसूचनेवर ‘ सरकारी सभासदांनीं मनाला वाटेल तसें मत द्यावें ’ अशी सरकारनें मुद्दाम परवानगी दिली होती. पण उपसूचना हट्टानें नामंजूर करण्यांत आली. नवा कायदा आणि तोहि लग्नमर्यादेसंबंधींचा, आणि त्यांतहि तुरुंगवासापर्यंत शिक्षा सांगितलेल्या असला कायदा लोकांपर्यंत जाऊन त्यांची समज पडायला वर्ष दीड वर्ष नको काय ?

फौजदारी कायद्याच्या स्वरूपाचा हा नवा कायदा म्हणून तो कोणत्याहि एकाच जातीला लागू नये हें ठीक. पण लोकनियुक्त कायदेमंडळें म्हणून जर असेंब्लीचें महत्त्व तर प्रांतिक कायदेमंडळेंहि अशींच लोकनियुक्त आहेत. म्हणून हा कायदा प्रांतिक कायदेमंडळांची संमति घेऊन मग अमलांत आणला जावा अशी अमरनाथ दत्त यांनीं एक उपसूचना आणली होती. तिचा योग्य व पूर्ण विचार व्हावयास पाहिजे होता. नाग-

पूर व मद्रास या दोन कायदेमंडळांनीं शारदा बिलाला अनुकूल असे ठराव केले आहेत. आणि पंजाब, संयुक्तप्रांत, आसाम, मुंबई इत्यादि प्रांतांनीं तसेंच ठराव केले असते असें आम्हास वाटतें. येऊन जाऊन बंगाल व बिहार या प्रांतांतच काय झालें असतें सांगवत नाहीं, पण हा किंचित् धोका सोसूनहि प्रांतिक कायदे कौन्सिलांना त्यांचें मत अजमावण्याचा मान दिल्यास कांहीं बिघडलें नसतें. उलट कायदे मंडळांनीं मान्यता दिल्यामुळें विरुद्ध चळवळीला आळा पडला असता हा फायदाच होय असें आम्ही समजतों. तात्पर्य, विचार करण्यासारखी ही दुसरी एक उपसूचना होती.

मान्य होण्यासारखी पण न झालेली तिसरी सूचना म्हटली म्हणजे लग्नाच्या मुलीचें वय १४ न ठरवितां १३ ठरवावें ही बेळवी यांची. ही मान्य होण्यासारखी असें म्हणण्याचें कारण हेंच कीं, बिलांत १४ हें लग्नवय ठरविलें असून पंडित मदन मोहन वगैरे लोक हें वय १२ असतें तर बिलाला संमति देते. अर्थात् १२ व १४ ह्या दोहोंच्या दरम्यान १३ हें वय स्वीकारून सर्वांची एकवाक्यता करण्याचा प्रयत्न झाला असता तर तो कदाचित् यशस्वीहि झाला असता. पण हरबिलास शारदा व सरकार यांनीं सिलेक्ट कमिटीच्या रिपोर्टाच्या बाहेर पाऊल टाकावयाचें नाहीं असें जें एकदां ठरविलें त्यामुळें हा समेट घडून आला नाहीं. शारदा यांच्या पहिल्या बिलांत १२ या मर्यादेचा एका रीतीनें उल्लेख झालाहि होता. पण सिलेक्ट कमिटीचा रिपोर्ट सोडला तर सरकार आपलें अंग काढून घेईल अशा भीतीनें शारदा ह्यांनीं १४ वर्षांचा हट्ट सोडला नाहीं. १४ ऐवजीं १३ हें वय ठरविण्यांत दुसरा फायदा असा होता कीं, पिनल कोडांत संमतिवयाचें जें कलम आज आहे त्यांत १३ हेंच वय सांगितलें आहे. अर्थात् लग्नाचें व संमतीचें वय हीं दोनहि एकच म्हणजे १३ हीं ठरतीं तर तें तत्त्वाच्या दृष्टीनेंहि योग्यच झालें असतें.

त्यानंतरची सामुदायिक उपसूचना म्हटली म्हणजे मुलीच्या वयाच्या पुराव्यासंबंधानें. याविषयीं शेषा अय्यंगार यांची सूचना अशी होती कीं, मुलीचें व मुलाचें वय लग्नांत किती होतें असा प्रश्न न्यायकोर्टांत उपस्थित झाला असतां आई-बापांनीं ॲफिडेव्हिट म्हणजे सत्यप्रतिज्ञा करून वय

अमुक आहे असें जर लिहून दिलें तर, इतर बलवत्तर पुराव्याच्या अभावीं तें अॅफिडेव्हिट हाच पुरावा म्हणून कोर्टानें ग्राह्य मानावा. ह्या नव्या कायद्याच्या अंमलबजावणींत मुख्य अडचण येणार आहे ती वय ठरविण्याची. बरें आईबाप खुशाल खोटें लिहून देतील असें म्हणावें तर खोट्या प्रतिज्ञेच्या गुन्ह्याला पिनल कोडांत २ वर्षेंपर्यंत दंड व शिक्षा ठरविलेली आहे. उलट शारदा बिलाच्या कायद्याप्रमाणें ठरविलेल्या वयाच्या आंत लग्न करण्याच्या गुन्ह्याला शिक्षा फार तर १ महिन्याची व दंड फार तर १००० रु. हा फरक आईबापांना माहीत असल्यामुळें ते दोन धोक्यापैकीं कोणता सोसण्यास अधिक तयार होतील हें कोणीहि सांगेल. या उपसूचनेचें कारण असें कीं, जन्माच्या नोंदीचीं रजिस्टरें सर्वत्र नसतात व असतात तीं पुष्कळ सदोष असतात. अर्थात् आईबापांनीं सत्यप्रतिज्ञा करून लिहून दिलेलें वय हें कोर्टानें सुरवातीस घेऊन चालण्यास हरकत नाहीं.

यानंतरची उपसूचना अशी कीं, बिलाच्या विधायक कलमांत, पिनल कोडांतील नेहमींच्या परिचयाचे शब्द म्हणजे "आरोपीला माहीत असून किंवा जाणूनबुजून किंवा आपण गुन्हा करतों अशी त्याची खात्री असण्यास योग्य कारण असेल तर" इ. शब्द स्पष्ट घालण्यांत यावेत. याचा अर्थ आपण गुन्हा करतों हें ज्ञान आरोपीला होतें हें शाबीत करण्याचा बोजा प्रथम आरोपीवर न पडतां फिर्यादीवर पाडावा. पण ही साधी गोष्ट देखील शारदा-बिलाच्या समर्थकांनीं मान्य केली नाहीं.

यानंतर अनेक सभासदांच्या अनेक सूचना या बिलांतील गुन्ह्याची शिक्षा कमी करण्यासंबंधींच्या होत्या. बिलांत सांगितलेली ऐनजिनशी तुरुंगवासाची सजा ही समूळ काढून टाकावी असें कित्येकांचें म्हणणें होतें. दुसऱ्या कित्येकांचें म्हणणें असें कीं, १००० रु. च्या ऐवजीं ५०० रु. व ५०० रु.च्या ऐवजीं २५० रु. किंवा २०० रु. इतका दंड अशी फार तर शिक्षा असावी. कारण बिलाचा हेतु लोकांवर एकदम सक्ती अगर गहजब करण्याचा नसून, त्यांना किंचित् धाकदपटशानें बालविवाहापासून निवृत्त करणें हा कायद्याचा खरा हेतु. म्हणजे दिसण्यांत तर शिक्षा असावी पण तिचा हेतु शिक्षण देण्याचा असावा. व त्यांत वावगें काय होतें हें आम्हांस तरी समजत नाहीं. पण या अर्थाच्या सर्व उपसूचना

नापास झाल्या. तसेंच आईबाप किंवा पालक यांनीं जाणूनबुजून मुलामुलींचें लग्न ठरीव वयोमर्यादेच्या आंत केलेलें नसेल, पण त्यांच्या हातून असलें लग्न थांबविण्याचा प्रयत्न कोर्टाला पटेल इतक्या कसोशीनें न झाला तरीहि ते शिक्षेस पात्र होतात असें जें कलम आहे ते काढून टाकावें; अशा कित्येक उपसूचना होत्या पण त्याहि नामंजूर झाल्या. हल्लींच्या दिवसांत मुलांनीं आईबापांची आज्ञा मानूं नये, स्वतंत्र बुद्धीनें वागावें, आणि दुसरीकडून कोर्टानें म्हणावें कीं, तुम्ही योग्य ती खबरदारी घेतली नाहीं ! असा दुहेरी अन्याय आईबापांवर होण्याचा संभव या कायद्यानें वाटतो ! यानंतर आणखी एक उपसूचना अशी कीं, या बिलांतील कलम नं. ५ हें आईबाप व पालक यांखेरीज लग्न लावणारा उपाध्याय, व्यवस्थापक, घरचा कामकरी अशा लोकांनाहि लागेल. पण ही खरोखरच बिलाची अतिव्याप्ति होय. स्वतः सज्ञान मुलगा व आईबाप व पालनकर्ता इतक्यांना जबाबदार धरल्यानें आपला हेतु तडीस गेला असें बिलाच्या उत्पादकांनीं व समर्थनकारांनीं मानण्यास तयार झालें पाहिजे. कारण मुलामुलींच्या वयाचें ज्ञान उपाध्याय अगर खटपट्या मॅनेजर यांना पक्कें माहीत असण्याचें काय कारण ? अगदींच आठ दहा वर्षांची बाहुली लग्नाला काढली तर या लोकांना कदाचित् ती १४ वर्षांच्या आंत आहे असें कळणार, व तेंही अगदीं आयत्या वेळीं. पण साधारण प्रौढ मुलगी असली व तिच्या वयांत कमजास्त असलें तर तें ह्या लोकांना कसें कळणार ? तसेंच गुन्हेगार व गुन्हेगारांचे साथीदार यासंबंधींचा नेहमींचा पिनल कोडांतील सिद्धांत या गुन्ह्याला लावावयाचा म्हटला तर उपाध्यायानें उपाध्येपणा करण्यास, सभेच्या ब्राह्मणांनीं मंत्र म्हणण्यास, मॅनेजरानें कोठी रचण्याकरितां कंबर बांधण्यास माघारच घेतली पाहिजे. कारण न जाणो उद्यां मुलीचें वय १४ हून कमी होतें अशी कोणी फिर्याद मांडल्यास नसती आपत्ति यावयाची.

तात्पर्य, अशा रीतीच्या अनेक उपसूचना पुढें आल्या होत्या आणि सामोपचारानें, म्हणजे सर्वांना शक्य तितकें खूष ठेवून, हें बिल पदरांत पाडून घ्यावें अशी जर बिलाच्या पुरस्कर्त्यांची इच्छा असती तर त्यांनीं यांतील कित्येक सूचना मान्य केल्या असत्या. पण बहुमताचा जोर दिस-

तांच त्यांच्या अंगीं बिनसुर्वतखोरपणा शिरला. म्हणून त्यांनीं कोणाची पर्वा न करतां सिलेक्ट कमेटीकडून बिल जसें आलें तसें तें शब्दशः पास करून घेतलें व यामुळें बिल प्रत्यक्ष अमलांत येतांना अशिक्षित व खेड-वळ लोकांना पुष्कळ त्रास होणार आहे.

बिलाला विरोध करणारांपैकीं कित्येकांची तक्रार सुशिक्षित किंवा पुढार-लेल्या वर्गातर्फे नसून अशिक्षित किंवा मागसलेल्या वर्गातर्फे होती. अशा लोकांतच बालविवाह होतात. त्यांच्यावरच ह्या बिलाचा अंमल होणार म्हणून एका अर्थानें त्या बिलापासून त्यांचें कल्याण होईल असें म्हटलें तरी खटले होतील ते मुख्यतः त्यांच्यावरच होतील, व उपसूचना आण-णारांचा हेतु त्यांना बिलापासून शिक्षण मिळावें असा असला तरी वर सांगितल्याप्रमाणें जाच होऊं नये असाहि होता व ही गोष्ट असेंब्लींतील बहुमतानें सहानुभूतीनें लक्षांत घेतली असती तर फार चांगलें झालें असतें असें आम्हांस अजूनहि वाटतें.

शारदा बिलाचें तत्त्व मान्य असलें तरी त्यांतील हल्लींच्या सर्व कल-मांसह तें जसेंच्या तसें मान्य झालें पाहिजे, हें कसें सिद्ध होतें तें आम्हांस समजत नाहीं. या बिलाचा फायदा जसा पुढारलेल्या वर्गाला नाहीं तसाच त्याचा जाचहि त्या वर्गाला नाहीं. कारण पुढारलेल्या वर्गात आधींच मुलींचीं लग्नें चौदा वर्षांच्या पुढें होतात. अर्थात् कायदा कितीहि कडक झाला तरी त्याचा जाच कशाला होईल ? दुसरें पक्षीं या बिलाचा फायदा जरी मागसलेल्या वर्गाला होणार तरी त्याचा जाचहि त्याच वर्गाला होणार. या बिलांतील कांहीं कांहीं कलमांना नाराज होऊन ज्यांनीं अखेर, म्हणजे हीं कलमें सुधारण्याचा सर्व प्रयत्न निष्फळ झाल्यावर बिलाच्या तिसऱ्या वाच-नाच्या वेळीं, प्रतिकूल मत दिलें त्यांपैकीं निदान कांहींच्या तरी मनांत, या बिलाचा जाचकपणा हीच गोष्ट मुख्यतः वावरत होती हें उघड आहे. कित्येकांनीं तसें स्पष्ट बोलून दाखविलेंहि. अर्थात् बिलाच्या जाचकपणाची त्यांची ही तक्रार खरी कीं खोटी याचा विचार झाला पाहिजे. पुढारलेल्या लोकांनीं आपण या बिलांतून सुटतो येवढ्यावर त्यांतील दोषांची उपेक्षा करितां कामा नये.

ज्या लोकांना हें बिल लागणार व जाचक होणार त्यांत अशिक्षित वर्गाचाच मुख्य भरणा आहे. तेव्हां या वर्गापर्यंत या बिलाची बातमी पोंचणार कशी ? व ती पोंचण्याला योग्य ती मुदत दिल्याशिवाय, त्यांच्या डोक्यावर हें बिल जाऊन आदळलें व आपला अंमल करूं लागलें तर त्याची वाट काय ! या बिलाची समजूत लोकांना करून देणें हें कर्तव्य कोणाचें ? बालविवाहापासून होणाऱ्या दुष्परिणामांचें ज्ञान अशिक्षितांना करून देण्याचें काम सुशिक्षित पुढाऱ्यांचें हें कबूल. परंतु नवा गुन्हा निर्माण करणारा व त्याला कैद व दंड अशी शिक्षा ठेवणारा फौजदारी कायदा झाला तर त्याची माहिती लोकांना करून देणें हें सरकारचें कर्तव्य नव्हे काय ? व हें कर्तव्य सरकार कसें करणार ? सरकारी ग्याझेटांत कायद्याची भाषांतरें छापूनच कीं काय ? सरकारी गॅझेटें वाचणारे लोक देशांत कितीसे आहेत ? फार काय वर्तमानपत्रें वाचणारेहि लोक कितीसे आहेत ? तसेंच या नव्या कायद्याचा अंमल प्रथम तरी कसा होणार, म्हणजे सौम्य कीं कडक ? याविषयीं सरकारनें कांहीं धोरण ठरविलें आहे काय ? हे प्रश्न सहज सुचणारे आहेत, व बिलावरील वादविवादांत ते विचारण्यांतहि आले होते. परंतु होममेंबर हा सर्व वेळ मूग गिळून बसले ! त्यांनीं कोणताच खुलासा केला नाहीं. हेंहि एक कारण कांहीं लोकांना बिलाविरुद्ध मत देण्याला झालें.

नव्या कायद्याची माहिती खेड्यापाड्यापर्यंत पक्की न पोंचली तर त्याचा दुहेरी तोटा होईल. कायदा व्हावयाचा तो होऊनहि जुन्या पद्धतीप्रमाणें बालविवाह होत राहतील तर तो सामाजिक तोटा होय. बरें, कायद्याच्या अज्ञानामुळें होणाऱ्या अशा विवाहाकरितां लोकांवर खटले होऊन अविचारानें दंड किंवा शिक्षा होऊं लागतील तरीहि तो तोटाच होय. कारण कायद्याविषयीं लोकांच्या मनांत विद्वेष उत्पन्न होईल. हे दोनहि तोटे न व्हावे याला उपाय म्हणजे नवा कायदा जो झाला त्याची माहिती कांहीं काळपर्यंत या खेड्यापाड्यांतील लोकांना एकसारखी देत राहणें. या बाबतींतलें आपलें कर्तव्य वर्तमानपत्रें करतीलच. पण सरकार स्वतः काय करणार ? याविषयीं रा. केळकर यांनीं असेंब्लींत सरकारला मारलेला टोमणा योग्य असून मर्मभेदक होता. ते म्हणाले, " महायुद्धाच्या वेळीं

सरकारनें वॉरलोन खपविण्याकरितां, ते लोकांच्या गळ्यांत बांधण्याकरितां, जितका मतप्रसार ( प्रोपेगँडा ) केला तितका जरी हा कायदा समजावून देण्याकरितां सरकारनें केला तरी तो मी पुष्कळ म्हणेन. वॉरलोन भरल्या-मुळें खेड्यापाड्यांच्या लोकांचा जितका फायदा झाला असेल त्यापेक्षां या कायद्यान्वयें त्यांनीं बालविवाह न केला तर अधिक फायदा होणार नाहीं काय ? " पण यालाहि होममेंबरांनीं कांहीं उत्तर दिलें नाहीं !

रा. केळकर यांनीं या बाबतींत दुसरीहि एके विधायक सूचना अशी केली कीं, "नव्या कायद्याचा अंमल सुरू होण्याला थोडी अवधी द्या. त्या सुमाराला पुढील खानेसुमारीचा योग अनायासेंच येत आहे. खाने-सुमारीचें काम इतके करून होण्याचें असतें कीं, ठरलेल्या दिवशीं गणतीदार येऊन भेटला बोलला नाहीं असें एकहि घर सगळ्या देशांत निघणार नाहीं. ओसाड मारुतीच्या देवळावरहि गणतीदाराकरितां नंबर टाकलेला असतो. आणि रात्रीं चुकून कोणी मनुष्य तेथें कदाचित् असेल अशा समजुतीनें असल्या नंबरी इमारतींतहि त्याला आपला कंदील घेऊन शिरून पाहावें लागतें. अर्थात् नवा झालेला कायदा काय आहे याचें थोडक्यांत तात्पर्य, किंबहुना यापुढें चौदा वर्षांच्या आंत मुलींचीं लग्नें करूं नका, कायदा झाला आहे, खटला होईल, दंड होईल, तुरुंगांत जावें लागेल, तर संभाळा, असें तो गणतीदार सांगत गेला तरी सहजच सर्व देशभर कायद्याचा प्रसार होईल. ओसाड देवळांतल्या ब्रह्मचारी मारुतीला या दवंडीचा फायदा न होवो, पण त्याच्या आश्रयाला येऊन निजणाऱ्या फिरत्या प्रवाशाला तरी फायदा खचित होईल. " कायद्याच्या अंमलबजावणीला मुदत देणें व खानेसुमारीचा फायदा घेणें या दोनहि बाबतींत होम मेंबर क्रेरार यांनीं कांहीं एक खुलासा केला नाहीं !

शारदा बिलाचा अंमल प्रारंभीं सौम्य होणार का कडक होणार या-संबंधानेंहि सरकारनें योग्य वेळींच आपलें धोरण ठरविलें पाहिजे. १४ वर्षांच्या आंत मुलींचें लग्न करणें हा कायद्यानें गुन्हा ठरविला असला तरी सामान्यतः त्याला अनैतिक असें स्वरूप नाहीं. म्हणून कायद्याचा अंमल सामान्यतः सौम्यच व्हावयाला पाहिजे. बिलांत अपवाद म्हणून कांहींच ठेवलेला नाहीं. बडोदें राज्यांतील कायद्यांत, विशेष परिस्थितीमध्यें मॅजि-

स्टेटकडे अर्ज करून कायद्यांत सांगितलेल्या वयोमर्यादेच्या आधीं, मुला-मुलींचीं लग्नें करण्याची सवलत मिळण्याचें एक कलम आहे. आणि या सवलतीचा लोक दुरुपयोग करतात असें तेथें तरी दिसून आलेलें नाहीं, म्हणून शारदा बिलांतहि तशाच सवलतीचें एखादें कलम घालावें अशी उपसूचना पंडित नीळकंठदास याजकडून आणण्यांत आलीहि होती. पण वाळल्याबरोबर ओलेंहि जाळण्याच्या भरांत बिलाच्या पुरस्कर्त्यांनीं तिला मान्यता दिली नाहीं म्हणून ती नामंजूर झाली. इतर कित्येक देशांच्या कायद्यांत मुलींच्या हिताकरितां अशी सवलत ठेवलेली असते. पण शारदा बिल मंजूर करून घेण्यास हुरळलेल्या सभासदांनीं इकडे लक्ष दिलें नाहीं. अशा प्रकारची एक दुरुस्ती स्वतः सरकारच येत्या दिल्लीच्या बैठकींत पुढें आणणार असल्याचें मागाहून सांगण्यांत आलें आहे. पण ती दुरुस्ती कशी काय सुचविली जाते हें प्रत्यक्ष पाहिल्यावर त्यासंबंधानें लिहितां येईल.

अशा रीतीनें बिलांत सवलत अशी कांहींच न ठेवल्यानें त्याच्या फौजदारी कलमांचा अंमल प्रथम सौम्यपणानेंच झाला पाहिजे. या अंमलाविषयीं न्यायकोर्टांतहि दुमत असूं शकतें. कांहीं न्यायाधीश असे म्हणणारे निघतील कीं, पहिल्याच झटक्यासरसे कांहीं लोकांना जबर दंड झाले किंवा तुरुंगवास सोसावा लागला, म्हणजे त्यांचें उदाहरण पाहून इतरांना चांगलाच धाक बसेल आणि कोणत्याहि युद्धांत पहिली लढाई जिंकली कीं निम्में काम होत असतें. दुसरे कांहीं न्यायाधीश असें म्हणणारे निघतील कीं, या कायद्यांतला गुन्हा अज्ञानजन्य होय, अनीतिजन्य नव्हे. म्हणून प्रथम प्रथम थोडथोडे दंड करून त्यानें काम भागत नाहीं असें ठरेल तरच मग कडकपणा स्वीकारणें योग्य. आमच्या मतें ही दुसरी विचारसरणीच अधिक बरोबर आहे. म्हणून ज्यांनीं कायदा करविला त्यांनींच त्याच्या अंमलबजावणीचें धोरण ठरवून, जाहीरच करावयाचें नसलें तरी खासगी रीतीनें तरी, न्यायकोर्टांना कळवून ठेवणें जरूर आहे. कारण सर्वत्र अंमल सारखाच झाला पाहिजे. न्यायकोर्टें स्वतः समंजस नसतात असें आम्ही म्हणत नाहीं. पण निश्चित मध्यवर्ती धोरण ठरल्यास त्यांच्या समंजसपणास मदत होईल इतकेंच आमचें म्हणणें आहे.

असो. तारीख १ आक्टोबर रोजीं गव्हर्नर जनरल यांनीं शारदा बिलाला संमति दिल्याचें जाहीर झालें आहे. अर्थात् तो आतां कायदा होऊन बसला आहे. कोणी कांहीं म्हटलें किंवा केलें तरी तो सध्यांच्या परिस्थितींत तरी रद्द होण्याचा संभव नाहीं. फार तर त्यांतील कलमांची किरकोळ दुरुस्ती होऊं शकेल, व ती व्हावी असें आमचें म्हणणें आहे. कायदा रद्दच व्हावयाचा तर तो पुढील निवडणुकीनंतर होण्याचा संभव; कारण तेव्हां मतदारांना हवें तर एकजात सर्व नवीन सभासद निवडून देण्याची संधि येईल. परंतु सर्वच्या सर्व कायदा उलथूनच पाडावा असें वाटण्याइतकें प्रबळ लोकमत उत्पन्न होण्यासारखें कायद्यांत विशेष कांहीं नाहीं असें आतांपर्यंत झालेल्या थोड्याशा चळवळीवरून वाटतें. शिवाय ६७ अनुकूल व १४ प्रतिकूल इतकें मोठें जें अंतर मतनोंदणींत पडलें तें पुढील निवडणुकीनंतरहि तुटण्याचा फारसा संभव नाहीं. हें खरें कीं, अशा बिलाच्या कामीं सरकारनें तटस्थ राहावें, कोणत्याहि एका बाजूला मत देऊं नये, हें म्हणणें योग्य आहे. व रा. केळकर व इतर १–२ सभासद यांनीं तसें स्पष्ट सुचविलेंहि होतें. तरी याविषयीं पूर्वी एकदां स्वीकारलेलें धोरण सरकार यापुढें सोडून देईल असें वाटत नाहीं. पण सरकारी सभासद सोडून दिले तरी उरलेल्या सभासदांत लोकनियुक्त सभासदांची संख्या जितकी प्रतिकूल त्यापेक्षां अनुकूल असणारांची संख्या अधिक भरली व ती तुटण्याची असली तर त्यांत कांहीं थोडी कूस असेल. तात्पर्य, वरील सर्व कारणांकरितां झालेला कायदा पुढच्या चैत्रापासून अमलांत येणार. व यापुढेंहि त्यांत फार तर किरकोळ सुधारणा होणार, असें समजून आपल्या प्रतिकूल अभिप्रायासह का होईना पण अज्ञ लोकांना या कायद्याची पूर्ण समजूत देणें हेंच सुशिक्षित व पुढारलेल्या वर्गाचें आतां कर्तव्य ठरतें.

सामाजिक चालीरीती व धार्मिक समजुती यांमध्यें हात घालण्यासारखे कायदे सरकारनें सहसा करूं नयेत. खाजगी सभासदांनींहि होतां होईतों अशा स्वरूपाचीं बिलें कायदेमंडळांतून आणूं नयेत. कोणी आणण्याची परवानगी मागितल्यास गव्हर्नर जनरल यांनीं प्रथम सामान्यपणें तरी लोकमत अजमावून मगच त्यांना संमति द्यावी. आणि संमति दिली तरी प्रत्यक्ष

मतनोंदणीच्या वेळीं सरकारी सभासदांना तटस्थ ठेवावें तात्पर्य धर्मसमजुती व सामाजिक चालीरीती अशाविषयीं कायदाच व्हावयाचा तर तो ज्या समाजाला लागू होणार त्या समाजांतील लोकनियुक्त सभासदांच्या बहुमतानेंच मंजूर व्हावा. या सर्व गोष्टी कोणाहि सुज्ञ मनुष्यास मान्य होण्यासारख्या आहेत. असल्या सूक्ष्म विचारांत शिरणाऱ्या लोकांना वेडे म्हणणारे लोक खरोखर स्वतःच वेडे असतात. आणि केवळ आपल्या खोलींत न बसतां समाजांत जाऊन आपल्या एककल्ली मताचा प्रचार ते करूं लागतील तर, त्यांना खऱ्या अडचणी काय असतात. हें कळून येईल. एक 'बालविवाह वाईट' एवढें म्हटल्यानें त्याच्या प्रतिबंधाकरितां वाटेल तसलीं कलमें घातलेल्या बिलाला कोणीहि संमति दिलीच पाहिजे असें म्हणणें स्वतःच वेडेपणा पदरीं घेण्यासारखें आहे. अशा विषयांत कायदेमंडळांचा उपयोग करणें जरूरच असेल तेथें तो अवश्य करावा. त्याला कोणी नाहीं म्हणत नाहीं. पण आम्ही या व मागील लेखांत दाखविल्या त्या प्रकारच्या अवांतर गोष्टी लक्षांत घेणें हेंहि कायदेमंडळांतील लोकप्रतिनिधींचें काम आहे.

---

## १०७. जयकरांच्या विद्याधनाच्या बिलावरील आक्षेप

(केसरी, २६ जुलै १९३०)

गेल्या आठवड्यांत जयकर यांचें विद्याधनाचें बिल असेंब्ली व स्टेट कौन्सिल या दोनहि कायदे-मंडळांत मंजूर झालें. त्याला आतां पक्क्या कायद्याचें स्वरूप आलें आहे तेव्हां बिलाची फलश्रुति काय, त्याचे परिणाम काय होतील, व हिंदु कुटुंबांतील सहभागी 'को-पार्टनर' लोकांनीं काय बोध घ्यावा याचें थोडक्यांत विवेचन करण्याचें योजिलें आहे.

बिलांतील मुख्य कलम असें आहे कीं, समाईक हिंदु कुटुंबांतील एकाद्या भागीदाराच्या शिक्षणावर समाईक मिळकतींतून कितीहि पैसे खर्च झाले असले तरी, पुढें त्या विद्येपासून मिळणारा सर्व पैसा ही त्याची

खास स्वकष्टार्जित मिळकत अशी समजली जाऊन ती विभागणीला पात्र होणार नाहीं. याशिवाय इतर किरकोळ कांहीं गोष्टी या बिलांत आहेत. पण त्यांचा विचार करण्याचें कारण नाहीं.

मग प्रश्न असा कीं, वरील कलमानें हल्लींच्या स्थितींत काय फरक झाला? याचें उत्तर कोणीं न दिलें तरी वर दिलेल्या मुख्य कलमांतील शब्दांनींच तें परस्पर मिळणारें आहे. म्हणजे, या बिलाचा कायदा होण्या-पूर्वी अशी स्थिति होती कीं, जर एखाद्या हिंदूचें शिक्षण म्हणजे विद्या घरच्या कुटुंबाच्या समाईक मिळकतींतून झाली असेल, तर त्या विद्येपासून मिळणारा पैसा ही देखील त्या अविभक्त कुटुंबाची समाईक मिळकत अशीच समजली जाईल. म्हणजे विद्यासंपन्न झालेला हा हिंदु व त्याच्या अविभक्त कुटुंबांतले इतर भागीदार यांना त्या विद्येनें मिळालेल्या पैशांत सारखीच वांटणी मिळेल. ही गोष्ट आतां या बिलानें बदलून टाकली.

हल्लीं हिंदुधर्मशास्त्राप्रमाणें, कुटुंबांतील लोकांच्या जोंपर्यंत वांटण्या झाल्या नाहींत तोंपर्यंत, त्या अविभक्त कुटुंबाच्या मुख्याला म्हणजे चाल-काला कुटुंबांतील वाटेल त्या मुलाला हवें तें उच्च शिक्षण हवा तितका पैसा खर्च करून देतां येतें त्याला मर्यादा नाहीं. तसेंच आजच्या हिंदु-धर्मशास्त्राप्रमाणें अशा खर्चानें अशी विद्या मिळविणाऱ्या मुलाला आपल्या सोयीप्रमाणें वाटेल तेव्हां सुलभतेनें वांटणी मागतां व करून घेतां येते. आणि या होणाऱ्या वाटणींत त्या मुलावर खर्च झालेली रक्कमहि वांटणींत त्याच्या एकट्याच्या हिश्शाला न घालतां समाईक मिळकतींतून ती खर्च झाली म्हणून ती सर्वांनीं सारखीच सोसली पाहिजे. असें असल्यामुळें, उरलेल्या मिळकतींतहि या मुलाला इतरांबरोबर समान वांटणी मिळ-ण्याचा हक्क बजावतां येतो.

अर्थात् या दोन गोष्टींत नवीन बिलानें कांहींहि फरक केलेला नाहीं. पण जींत फरक दिसून येतो अशी एक तिसरी गोष्ट म्हणजे स्थिति आहे ती अशी. वरीलप्रमाणें हा विद्यासंपन्न मुलगा प्रत्यक्ष वांटणी करून घेत नाहीं, किंवा आपण यापुढें विभक्त राहणार अशी नोटीसवजा इच्छा प्रकट करीत नाहीं तोंपर्यंत, खुद्द त्याच्यावर वांटणीची फिर्याद करून त्यानें मिळविलेला पैसा हाहि समाईक असें धरून त्याची वांटणी इतरांना मागतां

येते. हा विद्यासंपन्न मनुष्य अशी वांटणी होण्या–मागण्यापूर्वींच निवर्तला तर हिंदुधर्मशास्त्राप्रमाणें त्याच्या मुलांना बापाचा हिस्सा मिळेल. पण मुलगा नसून फक्त त्याची विधवाच मागें असेल तर तिला केवळ अन्न-वस्त्राचा व राहाण्याच्या जागेचा हक्क मिळतो. तिच्या नवऱ्याची सर्व इस्टेट कुटुंबांतल्या इतर भागीदारांना मिळते !

जयकर यांनीं जें बिल आणलें तें या तिसऱ्या गोष्टीला किंवा स्थितीला उद्देशूनच आणलेलें आहे. अविभक्त कुटुंबाच्या चालकाला हव्या त्या मुलाच्या विद्येला हवा तितका पैसा खर्च करतां यावा ही गोष्ट जयकर यांना हवी आहे. या मुलानें कुटुंबाचा हवा तितका पैसा खर्च करून, विद्या मिळवितांच वांटणीला उभें राहून, आपल्या विद्येनें मिळालेला सर्व पैसा गिळंकृत करावा हेंहि त्यांना मान्य आहे. पण विद्या मिळवून आलेला मनुष्य पुढें जो पैसा मिळवील तो सर्वच्या सर्व त्याच्या एकट्याच्या मालकीचा व्हावा, त्याचें कायदेशीर स्वरूप स्वकष्टार्जित असें ठरावें, त्याच्या-मागें त्याच्या बायकामुलांना ती सर्व मिळकत निर्वेध अशी मिळावी, आणि त्याच्या मरणापूर्वी किंवा नंतर वांटणीचा दावा कोणीं आणला तर एक पै देखील इतरांना मिळूं नये. आणि सर्वांत मुख्य गोष्ट ही कीं, त्याच्या विद्येवर खर्च झालेल्या रकमेची एक पै देखील त्याला किंवा त्याच्या बायका–मुलांना परत देण्याचें कायदेशीर बंधन उरूं नये असा फरक जयकरांनीं घडवून आणला आहे.

मग एवढी ही क्रांति घडवून आणण्याचें कारण काय ? याला जयकरांचें उत्तर असें आहे कीं, विद्याधनाचें कायदेशीर स्वरूप अनिर्णीत असल्यामुळें फिर्यादी-अर्यादि होऊन फार खर्च होतो, व एखादे प्रसंगीं या विद्यासंपन्न मनुष्याच्या विधवेला सर्व संपत्तीला मुकावें लागून केवळ अन्नवस्त्राची धनीण होऊन निराश्रित व्हावें लागतें.

पण जयकरांनीं यांत विद्यासंपन्न मनुष्याच्या बायकोच्या दृष्टीनें सर्वस्वी पाहिलें; परंतु त्याच्या कुटुंबांतील लोकांकडे मुळींच पाहिलें नाहीं हें उघड आहे. विद्यासंपन्न मनुष्याला जर वाटेल तेव्हां वांटणी करून मागतां येते व त्या वांटणींत त्याच्या हिश्शांत विद्येचा खर्च वजाहि होत नाहीं तर, त्याच्या हातांत कुटुंबांतील इतर लोकांना बुडविण्याचें एवढें साधन होतेंच, मग तें

पुरें झालें नाहीं काय ? मुलानें बॅरिस्टर होण्याला घरचे हजारों रुपये खर्चावें, व ज्या दिवशीं वकील–पटावर नांव नोंदण्याचा अर्ज हायकोर्टा-कडे करावयाचा त्याच दिवशीं दिवाणी कोर्टांत वांटणीचा दावा नोंदवावा, येथपर्यंत मार्ग जयकरांच्या बिलापूर्वीच कृतघ्न हिंदूला मोकळा होता. पण जर चुकून किंवा मुद्दाम त्यानें हा वांटणीचा हक्क बजावला नाहीं, व कृतघ्नतेबरोबर निपुत्रकत्वहि त्याच्या पदरांत पडलें तर त्याच्या एकट्या विधवेची सर्व धन व्हावी, व कुटुंबांतील इतर मनुष्यें उपाशीं मेलीं तरी चालतील येथपर्यंत या बिलानें आपल्या स्त्रीदाक्षिण्याची मजल नेली आहे !

दिल्ली येथें गेल्या असेंब्लींत जेव्हां हें बिल पुढें आलें तेव्हां सिलेक्ट कमिटींत मतभेद झाला. कमिटींतील इतर सभासदांचें मत एका मुद्द्यावर जयकर यांच्यासारखेंच होतें. तो हा कीं, विद्याधन हें सामान्यतः ज्याचें त्यालाच सर्व मिळावें, त्यांत वादाला जागा राहूं नये, व विद्यासंपन्न लोकांच्या विधवांनाहि परावलंबी व निराश्रित व्हावें लागूं नये. परंतु दुसऱ्या एका मुद्द्यावर मतभेद झाला. तो हा कीं, हल्लींच्या हिंदु-धर्मशास्त्राप्रमाणें असलेलें विद्याधनाचें स्वरूप जर बदलावयाचें, म्हणजे तें स्वकष्टार्जित असें नवा कायदा करून निःशंक रीतीनें ठरवावयाचें, व स्वतः विद्यासंपन्न मनुष्य व त्याचीं बायकामुलें यांच्यामागें इतर भाऊबंदांनीं उशीरा आणलेल्या वांटणीच्या फिर्यादीची भीति कायद्यानें सर्वस्वीं नाहींशी करावयाची, तर निदान असें तरी एक कलम बिलांत घालावें कीं, पुढें विद्याधन मिळविणाराच्या मूळ विद्यार्जनावर जी रक्कम समाईक मिळकतींतून खर्च झाली असेल ती तरी परत देण्याला कायद्यानें त्याला भाग पाडावें. सिलेक्ट कमिटीचे एक सभासद रा. केळकर यांनीं भिन्न-मतपत्रिका लिहून अशा प्रकारची सूचनाहि केली होती. इतर कित्येक सभासदांनीं व लॉमेंबर सर बी. एल्. मितर यांनाहि केळकरांच्या सूचनें-तील तत्त्व मान्य होतें; पण सिलेक्ट कमिटीच्या एकदोन बैठकी झाल्या तरी ही सूचना कोणत्या शब्दांत बसवावी हें निकालांत निघेना. पण पुढें दिल्लीची बैठक संपली, व केळकर यांनीं आपल्या जागेचा राजीनामा दिला, व त्यांची उपसूचना असेंब्लींत एम्. के. आचार्य यांनीं मांडली, ती नामंजूर झाली. दिवस अखेरीचे, कायदे–मंडळ बरखास्त होण्याचा

जवळ जवळ आदला दिवस, अशा वेळीं अशा विषयांत लक्ष कोण घालतो ? स्टेट कौन्सिलमध्यें दादासाहेब खापर्डे यांनीं केळकर यांच्याच मुद्दयावर बिलाला विरोध करून उपसूचना मांडली; तीहि नामंजूर झाली. तात्पर्य, बिलाचें मुख्य तत्त्व मान्य असलें तरी तें न्यायदृष्टीनें सोळा आणे व्यवहार्य करण्याला ज्या इतर गोष्टी करावयाच्या त्या न केल्यामुळें, शारदा-बिलाप्रमाणें या बिलावरहि हिंदुसमाज नाखूषच राहील. शारदा-बिलावर मुख्यतः सनातनी समाज नाखूष होणार; या बिलावर सुशिक्षित समाज व कायदेपंडित यांपैकींहि पुष्कळ नाखूष होतील.

स्मृतिग्रंथांकडे पाहिलें असतां विद्याधन हें ज्याचें त्यालाच मिळावें असें दिसतें ही गोष्ट खरी. पण स्मृतीच्या आधारानें चालणाऱ्या सनातनी कुटुंबांत अस्सल हिंदुत्वबुद्धीहि इतकी जागरूक होती कीं, कुटुंबें प्रायः अविभक्तच राहत. वांटण्या सहसा होत नसत; व कुटुंबांतील वडील बंधु आपल्या धाकट्या भावांचें पालन, पोषण, शिक्षण प्रत्यक्ष बापाप्रमाणें करीत असत. आपल्या शिक्षणावर खर्च झालेला पैसा आपला म्हणून सर्व आपण खाऊन जावा, आपल्या विधवेनें सर्व विद्याधन नवऱ्याचें स्वकष्टार्जित म्हणून खाऊन जावें व स्वतःच्या जिवाची चैन करावी, आणि कुटुंबांतील मागाहून येणाऱ्या होतकरू मुलांना हांका मारीत बसवावें, अशी हिंदु कुटुंबांतील चाल कधींहि नव्हती. म्हणून जयकर यांच्या बिलानें विष तेवढें ठेवलें, उतारा घालवून टाकला असा अर्थ होतो.

मुलाला विद्या देण्यावर खर्च झालेला पैसा हा पुढें मिळविलेल्या विद्याधनापेक्षां बराचसा कमी असणार असें गृहीत धरूनच प्रस्तुतचा हा वाद करावा लागतो. कारण तसें नसेल तर कोण कोणाशीं भांडणार ? पण सामान्यतः वाद उत्पन्न होतो तो विद्याधन पुष्कळ असेल तेथें. किंबहुना या दोहोंतलें प्रमाण यथायोग्य दर्शवावयाचें तर असें म्हणतां येईल कीं, विद्येवर झालेला खर्च हा शेतांत पेरलेल्या बियाण्याइतका असला तर पुढें उत्पन्न झालेलें विद्याधन हें त्या बियाण्यापासून निघालेल्या पिकाइतकें असतें. आणि अशी वस्तुस्थिति असेल तेथें शिक्षणावर झालेला खर्च विद्यासंपन्न मनुष्यानें कुटुंबाला परत करावा असें म्हणण्यांत अन्याय मुळींच नाहीं, सर्वस्वीं न्यायच आहे. बियाणें व पीक ही उपमा शब्दशः घेतली

तर व्यवहारांत असें आढळेल कीं, खंडीभर पिकलेल्या धान्यांतून पायली दोन पायली बियाणें दिलेलें परत मागितलें असतां, तेंहि परत न देईल इतका कृतघ्न शेतकरीहि मिळणार नाहीं. पण इतका कृतघ्न होण्यास मनानें तयार असणाऱ्या दुःस्वभावी सुशिक्षिताला तसें करण्यास हें बिल मदत करणार; यांत न्याय कोठें उरला!

कल्पनाच करावयाची तर सारख्या तोलाचीं उदाहरणें दोनहि बाजूंस घेतां येतील. ( १ ) नवरा सिव्हिलियन होऊन पुष्कळ पैसा मिळवून मेला. त्यानें आपल्या हयातींत कोणास कांहीं कोणास कांहीं देऊन दायादां-वर उपकार केले. पण त्याचाच उलट फायदा घेऊन व वांटणी झाली नव्हती म्हणून दायादांनीं त्याच्या विधवेला अन्नवस्त्राची धनीण बनविलें व तेंहि वेळीं न देतां रडत बसविलें. आतां त्याच्याबरोबर उलट उदाहरण पाहा. ( २ ) कुटुंबाची मध्यम स्थिति आहे; पण थोरला मुलगा फार हुषार दिसला म्हणून बापानें जवळचा बहुतेक सगळा पैसा खर्चून मोठ्या आशेनें त्याला विलायतेस पाठविलें. मनांत हेतु हा धरला कीं, हा सिव्हि-लियन होऊन परत आला म्हणजे आपल्या पाठच्या लहान भावांना संभा-ळील, त्यांचें शिक्षण करील व त्यांच्या विशेष गुणांचा परामर्ष घेऊन त्यांतल्या एखाद्याला परदेशालाहि पाठवील. पण इकडे बाप निवर्तला, कर्जाचें ओझें कुटुंबावर बसलें, धाकटे भाऊ अनाथ झाले, पण सिव्हि-लियनसाहेब आले मडम बायको करून! ती कशाला घेऊं देते याला धाकट्या भावांचा परामर्ष ! झालें, सिव्हिलियनसाहेबांनीं पत्रद्वारें नोटीस देऊन आल्यादिवशींच आपण विभक्त झाल्याचें कळविलें आणि मग इकडे बाकीच्या कुटुंबाची वाताहत झाली व सिव्हिलियन राजाराणी चैनींत राहूं लागली.

वरील दोन उदाहरणें आजवर जरी फारशीं घडलीं नसलीं तरी यापुढें दिवसेंदिवस तीं अधिकाधिक अनुभवाला येणार. शिवाय त्यांतल्या त्यांत पाहिलें तर, हल्लींचें हिंदुधर्मशास्त्र टाळण्याला विद्यासंपन्न मनुष्याला जितक्या पळवाटा आहेत, तितक्या पळवाटा त्या धर्मशास्त्राची कांटेकोर अंमल-बजावणी करूं पाहाणाराला नाहींत. उदाहरणार्थ, विद्यासंपन्न मनुष्याला बायकोला स्त्रीधन म्हणून, देणगी म्हणून, हवें तितकें द्रव्य देऊन अशा

रीतीनें टाकतां येतें कीं, जें वांटणीला पात्र होऊं शकत नाहीं. तसेंच बिनामी व्यवहार करून पैसा डोळ्याआड लपवून त्याला भाऊबंदांची फसवणूक करतां येते. याच्या उलट मयताचा सर्व पैसाअडका हातीं घेऊन त्याच्या विधवेला हांका मारीत बसविणें हें भाऊबंदांना सहजच किती तरी अवघड होऊन बसतें. अशा स्थितींत जयकरांना आपल्या बिलानें न्यायच करावयाचा होता तर तो कांटेकोर दुतर्फी न्याय करणेंच अवश्य होतें. म्हणजे आधुनिक विद्यासंपन्न मनुष्य व त्याची बायको यांचें हित जें काय तें ठरवून तें पक्कें साधूं देण्याकरितां बिल मांडावें; पण त्यांत कुटुंबांतील इतर माणसांचेंहि हित पक्कें ठरवून तें बुडूं न देण्याचीहि व्यवस्था त्यांत जयकर यांनीं करावयास पाहिजे होती. पण जयकर पडले स्त्रियांच्या हक्कांचे वाली. त्यांना पुरुषांच्या हक्कांची कशी आठवण होणार! कदाचित् ते असेंहि म्हणावयाचे कीं, आज हजारों वर्षें स्त्रियांनीं अन्याय सोसला तसाच त्यापुढें हजारों वर्षें पुरुषहि अन्याय सोसूं देत, म्हणजे मग समानता प्रस्थापित होईल! असला आडमार्गांतलाच युक्तिवाद कोणी करील तर त्याला आमच्याजवळ उत्तर नाहीं हें आम्हीं कबूल करतों. तथापि केळकर यांच्या उपसूचनेचे शब्द जर पसंत नव्हते, पण त्यांतलें तत्त्व जर मान्य होतें, तर सरकारी लॉमेंबर व स्वत: जयकर यांनीं स्वतःला वाटतील ते योग्य शब्द घालून तें तत्त्व अमलांत आणावयास पाहिजे होतें. सोळा आणे योग्य शब्द मिळत नाहींत, म्हणून ऐनजिनसी तत्त्वच बुडवा असें म्हणणें न्यायालाच काय पण कायद्याच्या व्यवहारालाहि धरून नाहीं.

असो. बिल पास झालें तें तर आतां परत येत नाहीं. तेव्हां यापुढें अविभक्त हिंदु कुटुंबांतील आईबापांनीं काय करावें एवढाच प्रश्न विचार करण्याचा उरतो. त्याविषयीं आम्हाला अशी भीति वाटते कीं, असला कायदा डोळ्यांसमोर असतां यापुढें कोणीहि आईबाप घरचा सर्व किंवा बहुतेक पैसा कोणत्याहि एका मुलाच्या विद्येवर खर्चणार नाहींत व तो खर्चणें झाला तरी आधीं मुलांची वाटणी करून ठेवतील, व मग ज्याच्या त्याच्या हिश्शाचे पैसे ज्याच्या त्याच्या शिक्षणाकरितां खर्च करतील. अथवा आजपर्यंत जे करार करण्याचा प्रघात पडला नव्हता ते करण्याचा प्रघात यापुढें पडूं लागेल, व समाईक कुटुंबें मोडून तीं विभक्त होण्याच्या

प्रवृत्तीला विशेष प्रगति मिळेल. जुनी कुटुंबपद्धति शाबूत ठेवून त्याबरोबर विद्यासंपन्न मनुष्याला सर्वच्या सर्व विद्याधन बहाल करावें ही गोष्ट व इतर कुटुंबाचें नुकसान न होणें ही गोष्ट या दोनहि केळकर यांच्या उपसूचनेनें साधण्यासारख्या होत्या. वांटणी करावयाची असतां आज विद्येचा खर्च विद्या मिळविणाराच्या हिश्शांत मजुरा घालीत नाहींत, तो यापुढें घातला जावा असें कलम बिलांत सहज घालतां आलें असतें. पण जयकर यांच्या बिलानें हिंदुधर्मशास्त्रांत हात तर घातलाच, पण तो फक्त विद्यासंपन्न मनुष्याचें हित साधून देण्याकरितांच घातला. म्हणजे ही सर्व बाजूंनीं न्यायाची अशी सुधारणा न होतां हल्लींच्या हिंदुधर्मशास्त्रांत निष्कारण ढवळाढवळ करण्याचें पाप मात्र माथीं बसलें ! जयकर यांची आधुनिक दृष्टि घेतली तरी तिला न्यायाचा आधार नको काय ? सुधारणा म्हटली म्हणजे ती कोणाला तरी हटकून अन्याय करणारीच कां असावी ! आजच्या काळांत जुन्या अविभक्त कुटुंबपद्धतीचा पुरस्कार फारसा कोणी करीत नाहीं; व समाजाची आर्थिक स्थितीच अशी बनत चाललेली आहे कीं, ती पद्धति यापुढें फार काळ टिकणें इष्ट वाटलें तरी शक्य नाहीं. पण ही पद्धति मोडावयाची तर स्त्रियांचे हक्क उजवून पुरुषांच्या हक्काच्या डोक्यांत दगड घातलाच पाहिजे असें नाहीं.

---

# १०८. स्त्री--पुनर्विवाह

( पुण्यांतील वार्षिक-दिन १९३५, अध्यक्षीय भाषण )

प. वा. विष्णुशास्त्री पंडित यांच्या चरित्राचें मला फार कौतुक वाटतें. सामाजिक इतिहासाच्या दृष्टीनें या छोट्या पुस्तकास फार मोठें महत्त्व आहे. सुधारणेच्या दृष्टीनें एका अत्यंत कर्तृत्ववान् गृहस्थाचा इतिहास-ग्रंथ तयार झाला हें उत्तमच; पण या ग्रंथामुळें महाराष्ट्राचाहि फार मोठा फायदा झाला आहे. म्हणून या चरित्रलेखकाचें मी मनःपूर्वक अभिनंदन करतों.

आजच्यासारख्या सभांना बरेच लोक केवळ करमणुकीखातर येतात,

अशी आतां श्रीमती सोनुताई काळे यांनीं जी टीका केली, ती मला मुळींच मान्य नाहीं. मी ती केव्हांच कबूल करणार नाहीं. येवढेंच काय, पण येथें आलेली प्रत्येक व्यक्ति या कार्याची कळकळ बाळगून सहानुभूतीनें येथें आली आहे. येथून जातांना कित्येक मंडळी टिपें गाळून जातात.

प्रो. पटवर्धन यांचें व्याख्यान समाजाच्या संशोधनास कारणीभूत होईल असें झालें आहे. यापेक्षांहि खरी स्थिति समजून घ्यावयाची असेल त्यांनीं या मंडळाचे चिटणीस श्री. पाटणकर यांच्याजवळ खाजगी रीतीनें चार तास बसून बोलल्यास त्यांस समजून येईल. त्याचप्रमाणें ते या कानाचें त्या कानाला न कळतां व कोणाचेंहि नांव गांव न सांगतां समाजांत काय चाललें आहे त्याची माहिती देतील. मुंबईच्या श्रद्धानंद महिलाश्रमाच्या चालकांनीं सर्व इतिहास लिहून ठेविला आहे, तोहि पाहावा. समाजाचे डोळे उघडण्याच्या दृष्टीनें तो सर्व इतिहास त्यांतील नांवें वगळून प्रसिद्ध होणें जरूर आहे.

प्रो. पटवर्धन यांनीं आपल्या व्याख्यानांत स्त्रियांच्या अडचणी सांगितल्या. पण उभयपक्षीं यांत उडी घेण्यास कांहीं धोका नाहीं हें समजून येईपर्यंत चिकित्सा करण्याची प्रवृत्ति असते, ती कांहीं अयोग्य नाहीं व तशी चिकित्सा करणारास मी दोष देण्यास तयार नाहीं.

आईबाप आपल्या मुलींना स्वजातीय व स्वप्रांतीय तरुणांशीं परिचय करून देण्यास तयार असण्याऐवजीं परप्रांतीय किंवा परधर्मीय तरुणांशीं होणाऱ्या ओळखीकडे दुर्लक्ष करतात, असें जें प्रो. पटवर्धन यांनीं सांगितलें तें मला मान्य नाहीं.

प्रो. फडक्यांनीं एका गोष्टींत एक सुशिक्षित मुलगी आपल्या ड्रायव्हर बरोबर पळून गेल्याचें दाखविलें आहे. आणि "तुम्हीं मला माझ्या बरोबरीच्या तरुणांशीं परिचय करून दिला नाहीं म्हणून मी ड्रायव्हरबरोबर गेलें" असें तिनें स्वतःचें समर्थन केल्याचें त्यांनीं दाखविलें आहे. तें मला पटत नाहीं. जे आईबाप ड्रायव्हरशीं परिचय व्हायला मोकळीक देतात ते चांगल्या तरुणांशीं परिचय व्हायला बंदी करतील असें वाटत नाहीं. प्रो. पटवर्धन यांनींही जे मुद्दे मांडले, ते लागू असले तरी शाबीत झालेले नाहींत येवढेंच मला सांगावयाचें आहे.

हल्लीं प्रणयाला प्राधान्य देऊन मनोविश्लेषण करणाऱ्या अनेक कादंबऱ्या व कथा लिहिल्या जातात. त्यांची विशेष जरूरी आहे असें मला वाटत नाहीं. कारण त्या क्रमप्राप्त गोष्टी आपोआप होतच असतात. त्यांऐवजीं विधवांचें मनोविश्लेषण करणाऱ्या कादंबऱ्या व कथा लिहिल्या जाव्यात असें मला वाटतें. ज्याच्या दुःखाला वाचा फुटत नाहीं, किंवा तिकडे सहसा कोणाचें लक्ष वेधलें जात नाहीं अशांचीं दुःखें समाजापुढें मांडणें आज जरूर आहे. त्या दृष्टीनें विधवांचे अनुभव जास्त जास्त प्रसिद्ध व्हायला हवेत.

विधवा-विवाहाचा कायदा झाला, लोकांनीं तो मान्य केला, पण विधवांचे विवाह होण्यास या कायद्याचा उपयोग झाला नाहीं. फक्त जे विवाह होतात किंवा होतील, त्यांस कायदेशीरपणा येण्यास या कायद्याचा उपयोग झाला, आणि याखेरीज जास्त कार्य या कायद्यानें होणें शक्य नाहीं.

स्त्रियांच्या हक्कांसंबंधीं अनेक प्रश्न अद्याप शिल्लक आहेत. तेव्हां अशा प्रकारचे कायदे यापुढें अधिक होण्याचा संभव आहे व या कायद्यामुळेंच हे प्रश्न सुटतील असें माझें मत आहे. लग्न, दत्तक, वारसा व पालनकर्तृत्व हे चार मोठे प्रश्न आहेत. या प्रश्नांसंबंधीं आज तरी समाजाला कांहीं अधिकार नाहीं. सर्व अधिकार कोर्टाच्या हातीं आहेत. व कोर्टें तर हिंदुसमाजशास्त्र तितकें जाणत नाहींत. प्रीव्हि कौन्सिल सात हजार मैलांवर आणि तेथें कित्येक वेळां या धर्मशासनबाबत ‘ वांग्याचें भूत ’ बनविलें जातें. पण प्रिव्हि कौन्सिलनें केलेला ठराव बदलण्याचा अधिकार कायदेमंडळास आहे. तेव्हां यापुढें सर्व कांहीं कायदेमंडळाच्या हातीं जाणार आहे. विधवाविवाहाच्या या कायद्यानें या प्रश्नाला शक्य ती मदत केली आहे. पण यापेक्षां अनेक प्रश्न यापुढें उद्भवणार आहेत. डॉ. देशमुख यांचें विधवा, कन्या व माता यांच्या हक्कांसंबंधींचें बिल मला थोड्या तपशिलाशिवाय मान्य आहे. विधवा व माता यांच्या हक्कांचें जरूर संरक्षण व्हावें पण त्यांतील कन्येचा भाग मला मान्य नाहीं. कारण कन्या ही दुसऱ्या कोणत्या तरी घरांत विधवा किंवा माता होणारच असते. तेव्हां त्या घरांत तिच्या हक्कांचें संरक्षण होतेंच.

हे सर्व प्रश्न कायदेमंडळामार्फतच आपणांस सोडवून घ्यावे लागणार

आहेत. मात्र हिंदुधर्मासंबंधीं जे प्रश्न असतील त्या वेळीं फक्त हिंदु सभासदांनींच त्यांत भाग घ्यावा असें मी म्हणेन. सबंध राष्ट्राचें कार्य असेल तेव्हां सर्वधर्मीयांनीं मतें द्यावीं, पण सामाजिक किंवा धर्मशास्त्राचा प्रश्न असेल तेव्हां त्या समाजांतील सभासदांनींच भाग घ्यावा असें मी म्हणेन.

विधवाविवाहाचा हा कायदा बहुसंख्य हिंदु समाजाकरितां करण्याची जरूरीच नव्हती. कारण त्यांनीं त्यापूर्वींच तें केलें होतें. परंतु उच्च संस्कृतीवर हक्क सांगून, तिची धारणा करतां येत नाहीं, अशा अल्पसंख्यांक समाजासाठीं हा कायदा करावा लागला. आतां समाज हाच समाजाचा खरा अधिकारी होणार आहे. कायद्याचा अधिकार कायदेमंडळास नाहीं हें म्हणणें खोटें आहे. देशांत कोणाचें मत प्रभावी आहे हें पारखून घेण्याचे दिवस आतां आले आहेत.

या विधवाविवाहाच्या बाबत कायद्याची अनुकूलता असूनहि, विशेष प्रकारें पाऊल पुढें पडलें नसलें, तरी पण त्यासाठींच समाज जास्त चिकित्सक व्हायला हवा आहे; आणि म्हणून अशा प्रकारचीं व्याख्यानें व सभा होणेंहि योग्यच आहे.

---

## १०९. ‘ जुनें व नवें ’

[ बुधगांव येथील सार्वजनिक गणेशोत्सवामध्यें, मंगळवार ता. ३ सप्टेंबर १९३५ रोजीं सायंकाळीं महादेवाच्या मंदिरांत, झालेलें व्याख्यान. ]

बुधगांव संस्थानांत येऊन व्याख्यान देण्याचा योग आल्याबद्दल मला फार आनंद वाटतो. माझें बालपण मिरजेस गेलें; त्यावेळेपासून मिरजमळा संस्थानाबद्दल पुष्कळ ऐकत होतों. म्हणून मी बुधगांवांत येऊन व्याख्यान देण्याचें आमंत्रण स्वीकारिलें. अलीकडे मला व्याख्यान देणें हा जुलूम वाटूं लागला आहे. पण आपणा सर्वांची ओळख होण्याची ही एक संधि व पद्धत आहे म्हणून व्याख्यान देण्याचें कबूल केलें. माझ्यापुढें आज समाजांतील सर्व वर्ग आहेत, म्हणून जुनें व नवें हा विषय मुद्दाम घेतला आहे.

येथें स्त्रीपुरुष व विद्यार्थी आहेत. इतकेंच नव्हे तर खुद्द राजा व प्रजाहि आहेत. ह्या मिश्र समाजास उद्देशून हा विषय पसंत केला आहे.

'जुनें व नवें' हे शब्द साधे असून सर्वांना कळण्यासारखे आहेत. पण हे जरी साधे असले तरी त्यांत परस्परांचें वैर इतकें आहे कीं, जगांतील सर्व भांडणें ह्या दोन विरोधी शब्दाभोंवतीं गोळा झालीं आहेत. जुनें व नवें ह्यांतील भांडण आपल्यापुढें नेहमींच उभें असतें. ह्या विरोधाच्या द्वंद्वामधून निश्चयी माणसाखेरीज इतरास बाहेर पडतां येत नाहीं. ह्यांतील चांगलें कोणतें व वाईट कोणतें हें ठरविणें अवघड असतें. त्यांचा अर्थहि असाच सापेक्ष आहे. त्या दोहोंचा संबंध निकट असल्यानें ह्यांतील एक कोठें संपतें व दुसरें कोठें सुरू होतें हें सांगणें कठीण आहे. त्याला उपमाच द्यावयाची झाली तर इंद्रधनुष्याची देतां येईल. सातरंगी इंद्रधनुष्यांतील कोणता रंग कोठें संपतो व दुसरा कोठें सुरू होतो हें सांगतां येत नाहीं, त्याचप्रमाणें जुनें व नवें यांचें आहे.

एकमेकांस जोडून येणाऱ्या सहा ऋतूंतील चांगला ऋतु कोणता हें सार्वत्रिक रीतीनें व निश्चितपणें सांगणें जसें कठिण, तसेंच जुनें व नवें ह्याबद्दल आहे. प्रत्येक ऋतूंतील गुणदोष प्रसिद्धच आहेत. बालपण, तारुण्य वार्धक्य ह्या तीन स्थितीमधील चांगला काल कोणता ? प्रत्येक स्थितीमध्यें चांगलेपणा व वाईटपणा आहे. त्यांचा तारतम्य दृष्टीनें निर्णय करता न आला तर संशयात्म्याची स्थिति हास्यास्पद होते. तर्कशास्त्रांतील गाढवाच्या ठरीव उदाहरणांत, सारख्या आकर्षकतचे दोन गवताचे भारे सारख्या अंतरावर ठेवल्यास दोनहि भाऱ्यांच्या मोहांत निश्चय न होऊन गाढव मरेल हें उत्तर असतें ! तसेंच उत्तर संशयात्म्याच्या बाबतींत आहे.

जुन्या नव्यांचा विचार करीत असतांना दोन द्वंद्वें मुख्यतः डोळ्यापुढें उभी राहतात. त्यांतील ( १ ) जुनें संपतें कोठें व नवें कोठें सुरू होतें हें एक व ( २ ) त्यांपैकीं चांगलें कोणतें व वाईट कोणतें हें ठरविणें दुसरें द्वंद्व होय. मनुष्यस्वभावामध्यें साहजिक प्रवृत्ति अशी असते कीं, जुनें तें सोनें; आणि नव्याविषयीं संशय असतो. मनुष्य हा कांहीं उपजत बुद्धि घेऊन येतो; त्यानंतर प्रत्येक नवी गोष्ट त्याच्या सन्निकर्षांत आल्यास

त्यास नवा अनुभव येतो. जुन्याबद्दल असमाधान असलें अगर नवें लोभवीत असलें, तरी मनुष्य नव्याबद्दल संशयी असतो व त्याला भितो. पण अशा चिकित्सक संशयबुद्धींतूनच सत्य ज्ञानाचा उद्भव होत असतो. अनुभवानें व करून पाहिल्यानेंच सृष्टीच्या ज्ञानांत भर पडते. सगळें जीवन अशा अनुभवानें व ज्ञानानें भरलेलें आहे. जुन्याचें नवें होणें हें कांहीं वेळां आपल्या हातीं असतें, पण कांहीं वेळा तें आपोआप घडतें. त्यास तीन कारणें देतां येतील.

आठवणीला कृत्रिम मदत म्हणून **नवी सृष्टि, दृष्टि व तुष्टि** हे सयमक शब्द-प्रयोग मी मुद्दाम योजिले आहेत. खरें पाहिलें असतां नवी 'सृष्टि' कधींहि निर्माण होत नाहीं. सृष्टि आहे तीच असते. पण तिचे नवे गुणधर्म आपल्या अनु-भवाला येणें याचें नांव नवी सृष्टि. तोपर्यंत ती अज्ञातच राहते. जुन्या सृष्टीला नव्या व्यवहाराचें वळण मिळालें कीं नवी सृष्टि निर्माण झाली असें आपण म्हणतों व आनंदानें सुखसोयीकरितां तिचा उपयोग करतो. या रीतीनें जुन्यांत बदल करून आपण प्रत्यहीं नवें करून घेतच असतो. जुनें बदलून घेणें हा नवा आचार. आतां नव्या दृष्टीसंबंधीं विचार करतांना आपणास असें आढळेल कीं, वस्तु तीच असतां फक्त तिजकडे पाहण्याची दृष्टी बदलली कीं नवी सृष्टि उत्पन्न होते. बापाचा मुलगा तोच, पण तो सज्ञान झाला कीं त्याच्याकडे पाहण्याची दृष्टि बदलावी असा शास्त्राचा उपदेश आहे. त्याला मित्र म्हणून वागविण्यांत यावें असें वचन आहे. दिल्लींत कोणी दोघे प्रसिद्ध पितापुत्र बसले असतां बापानें आपल्या काडीनें मुलाची सिगरेट पेटविली हें मी पाहिलें आहे. ह्याचें कारण इतकेंच कीं, पुत्राबद्दल नवी दृष्टि! लग्नाच्या मुलाला कित्येक मुली दाखवितात; पण लग्न झाल्यानंतर त्याच मुलीकडे पाहण्याची त्याची दृष्टि बदलते कीं नाहीं! सांगण्याचा अर्थ इतकाच कीं, सृष्टि तीच पण पाहण्याची दृष्टि बदलली एवढेंच.

आतां नवी तुष्टि अथवा हृष्टि ह्यासंबंधीं विचार करूं. तुष्टि म्हणजे सुखाची कल्पना. माणसाची सुखाची कल्पना नेहमीं एकच असत नाहीं. उदा. हातीं संपत्ति असण्यानें सुख वाटतें अशी कल्पना असते. पण वैराग्य प्राप्त झाल्यास ती कल्पना बदलते. ह्या बाबतींत पाहिलें तर सृष्टि तीच

दृष्टि तीच, पण तुष्टि मात्र बदलली. सुखाची नवीन कल्पना निर्माण होते म्हणूनच आचार बदलतो. नव्या कल्पनेंत इष्टपणा वाटूं लागतो. ह्या तीनहि कसोट्या आपल्या व्यवहाराला लावून पाहिल्या म्हणजे आपल्या व्यवहारांत नव्याजुन्यांनीं कसा गोंधळ माजला आहे व त्यांतून मार्ग कसा काढावा हें समजेल. धार्मिक, राजकीय अगर सामाजिक या सर्वांत नित्य नवें होत असतें. धार्मिक बाबतींत नवें पटावयाला फार वेळ लागतो. वास्तविक धर्मामध्यें सर्वस्वीं नवा आचार येत नाहीं. तें एक रहाटगाडगें अथवा सायकल ( चक्र ) आहे.

ईश्वरासंबंधीची कल्पना जशी पूर्वीं होती तशीच पुन: आज होत असल्याचें दिसून येईल. मध्यंतरीचा संशयित आस्तिक्यबुद्धीचा अगर पाखंडीपणाचा कांहीं काळ वगळला, तर नवी पिढी धर्मलंड झाली अगर होईल असें बिलकूल वाटण्याचें कारण नाहीं. मध्यंतरीचा अज्ञेयवादाचा काल हा विस्तवावरील राखेप्रमाणें होता एवढेंच. आधिभौतिक शास्त्रानेंच ईश्वराबद्दलच्या कल्पना अधिक दृढ होत चालल्या आहेत असें म्हटल्यास चालेल. तीच स्थिती सामाजिक कल्पनांची. प्रौढ विवाह व आहार ह्या गोष्टी अगदीं जुन्या काळांत होत्या तशाच आजच्या काळांतहि पुढें येत आहेत. मध्यंतरीं त्या लोपल्या होत्या. जुन्या काळांत बालविवाह झाल्याचें उदाहरण मिळणार नाहीं. त्यावेळींहि प्रीतिविवाह व गांधर्व-विवाह होते व आजहि तसें विवाह होत आहेत. जो सुज्ञ असेल तो कालाच्या ह्या लपेटी व परिवर्तनें ओळखील, व नव्याचें अर्थात तारतम्यानेंच ग्रहण करील.

भारतकाळींसुद्धां नव्याजुन्यांचा हा विरोध होताच. एका प्रसंगीं जुन्या धर्माचें वर्णन करतांना धर्मराजानें तें ' सुवर्ण युग ' म्हणून केलें आहे. पण तें नक्की केव्हांचें हा मात्र खुलासा नाहीं. धर्मराज देखील आपल्या विद्यमान स्थितीला चांगली म्हणत नव्हता ! ! पण विद्यमान स्थितीबद्दलचें असमाधान सुविचारानें घालवून देण्यास शिकलें पाहिजे. कारण जुनें जर चांगलें तर त्या वेळचें प्रौढविवाह, प्रेमविवाह, आहार वगैरे चांगला कीं वाईट ? मग ते आज जर घडले तर ते ' अवश्यमेव वाईटच ' काय म्हणून ? म्हणून ' सुवर्ण युग ' केव्हांचें ह्या भानगडींत फारसें न पडतां आपल्या विवेकानें बरें वाईट ठरवून, नवें प्राप्त झालें तें घेणें हेंच उचित

होय. सत्प्रवृत्त विवेकाच्या ऊर्मीनें ठरवून एखादी गोष्ट स्वीकारणें हीच आपल्यापुरती तरी सुवर्णयुगाची कल्पना ! सुवर्णयुग मागें नव्हतें व पुढेंहि नाहीं. सामाजिक जीवन तर फारच चंचल. गंगेत उभें असतां पायाखालील वाळू निसटून जात असावी तसें सामाजिक आचाराचें आहे. तें पाहून पारखून स्वीकारणें हें काम आपलें आहे. केवळ नवें म्हणून टाकून देण्यांत अर्थ नाहीं. ह्या बाबतींत वेषभूषा व संस्कृति यांचीं किती तरी उदाहरणें देतां येतील !

राजकारणाची स्थितीहि तीच. दिवसेंदिवस प्रजास्वातंत्र्य व लोकस्वातंत्र्य पुढें येत आहे. फार जुन्या काळांतहि तेंच होतें. लोकशाहीच्या कल्पना जुन्या काळीं रूढ असलेल्या दिसून येतात. वैदिक काळीं व त्यानंतरच्या कांहीं ऐतिहासिक काळीं लोक आपला राजा निवडीतच असत. त्या काळांतले हल्लींच्या रिपब्लिकचे दाखले अनेक मिळतात. लोकांकडून पसंतीचा निर्णय घेऊनच दशरथ राजानें रामाला राज्यावर बसविण्याचें नियोजित केलें. पूर्वींच्या काळीं राजाला लोकमताप्रमाणें वागावयास लावण्याची अगर त्यास शासन करण्याची पद्धतीहि होती. इंग्लिश लोकांनीं आपल्या जुलमी चार्लस राजाला मारला हा अलीकडला इतिहास असेल. पण वैदिक काळीं वेन राजाचा त्याच्या प्रजेनें शिरच्छेद केला ही पुरातन काळीं भारतभूमींतच घडलेली गोष्ट आहे. निवडणुकीची पद्धति पूर्वी होती हें गुणसंस्थेवरून दिसून येतें; मग असें जर होतें तर नव्याला बुजण्याचें कारण काय ? गुरें मोटारीला बुजतात; पण माणसेंहि नव्याला बुजतात हें आश्चर्य नव्हे काय ? डेमॉक्रसी अथवा लोकशाही जर येते आहे तर प्रजा व राजा यांनीं तिला बुजण्याचें कारण नाहीं. अमकी एक राज्यपद्धति चांगली असें आज निश्चितपणें सांगणें अवघड आहे. कारण आज डेमोक्रसीच्या ऐवजीं डिक्टेटरशिपचाच धडा पाश्चिमात्य देशांत गिरवलेला दिसून येतो. लंगडींत पाय दमल्यावर मुलें ज्याप्रमाणें नवरा मागून घेतात त्याप्रमाणें दमलेल्या डेमॉक्रसीनें हा डिक्टेटरचा नवरा तर मागितला नसेल ना ? ह्याचा अर्थ जुनें तेंच नव्या रूपानें अवतरतें हाच अनुभव राजकारणांत वारंवार आढळतो. कांहीं वर्षांनीं तेंच जुनें ठरल्यावर त्यासच आपण चांगलें म्हणूं लागतों. हा मनुष्य-धर्म आहे.

विवेकबुद्धि खंबीर व सत्प्रवृत्त ठेवून नव्याचा स्वीकार खुशाल करावा म्हणजे जुन्याच सृष्टीमध्यें सुखाचे नवे झरे आपणांस सांपडूं लागतील. जुन्याचें किंचित नवें करणें त्यालाच आपण सुधारणा म्हणतों. वास्तविक सुधारणा म्हणजे जुनेंच नव्याचें रूप घेऊन येतें. फक्त रूपांतर घडतें. घाटामध्यें प्रवास करीत असतां त्याच त्या जागेवर फिरून आल्याचा भास होतो. फक्त उत्क्रांतीतत्त्वानुसार मनुष्य थोड्या उच्च भूमिकेवर level असतो सुधारणा म्हणजे जगांत कांहीं अगदीं नवी गोष्ट आणणें नव्हे. ती एका विशिष्ट सायकलनें ( क्रमानें ) येत असते. उदाहरणार्थ, प्रौढविवाह चांगला म्हटला म्हणून तो अगदीं अनियमित प्रौढ वयापर्यंत ताणावयाचा नाहीं. नाहीं तर पाश्चिमात्य देशांतील सुधारणाप्रमाणें, पोक्त वयाच्या चर्चिलनीं आपल्या पुनर्विवाहेच्छु आईचें कन्यादान करावयाचें ही स्थिती याव-याची !! ९२ वर्षांचा नवरा व ८५ वर्षांची वधू हें उदाहरण इंग्लं-डांत घडलेलें आहे. त्याचें कटिंग मी ठेवलें आहे. त्याचें कारण विचारतां " एकटें निजावयाला भीति वाटते म्हणून त्यांनीं लग्न केलें " असें सांग-ण्यांत आलें.

सांगण्याचा इत्यर्थ असा कीं, प्रौढविवाहाची अतिशयोक्ति झाली कीं बालविवाह करावा म्हणावयाची प्रतिक्रियेची वेळ यावयाचीच ! प्रतिक्रिया करावयापुरत्याच अशा सुधारणा येतात. आजच आपल्या समाजांत देखील मुलांना लग्न लौकर करा असें म्हणावयापर्यंत प्रौढ विवाहाची वाईट मजल येत चालली आहे. सांगण्याचा अर्थ इतकाच कीं समाजानें बॅलन्स किंवा साम्यावस्था ठेवण्याची सुधारणा पत्करावी. अरिस्टॉटलचा सुवर्णमध्य बिंदु साधणें ही सुधारणा. राजकारणांतहि तेंच. व राजानेंहि लोकशाहीचा स्वीकार स्वागतपूर्वक करावयास पाहिजे. राजांनाहि एकतंत्री पद्धतींचा कंटाळा आला असेल. ते तरी नाहीं ती जबाबदारी किती दिवस घेणार ! कारण लोकांवर कारभार सोपवून त्यांना खुशाल मजा पहात बसतां येईल. लोकशाहींत सुद्धां लोकांवर जबाबदारी पुष्कळ पडते ! डेमॉक्रसी ही तोल संभाळण्याची कृति आहे त्यास कोणीहि भिण्याचें कारण नाहीं. आपल्या संस्थानिकांनीं लोकसभेच्या तोंडावर पगारी कारभारी फेकून विनोदबुद्धीनें प्रजेची गंमत पहात बसावयाची संधी आली आहे

असें म्हणण्यास हरकत नाहीं. मात्र अधिकारदान करतांना राजांनीं दुःखाची बुद्धि ठेवूं नये. प्रजेनेंहि अधिकार घेतांना कृतज्ञताबुद्धीनें घ्यावे म्हणजे माझ्या मतें आपलीं संस्थानें ही डेमॉक्रसीच्या प्रयोगास उत्कृष्ट स्थानें होत. अशा तऱ्हेनें नव्या जुन्याची सांगड संस्थानांत घालावी. नव्याला काय म्हणून बुजावें ? त्याचें स्वागत करावें. फक्त खणखणीत विवेकबुद्धि जागृत ठेवावी, म्हणजे त्यांत सर्व सुख सांठविलेलें आहे. हें संस्थान म्हणून मुद्दाम हा विषय मांडला. संस्थानें राहावीं असें म्हणणारा मी आहे हें आपणांस अवगत असेलच. नव्या जुन्यांचा मिलाफ येथें दिसून येतो. तो येथें सहज घडणेंहि शक्य असतें. ब्रिटिश इंडियांत तो मिलाफ घडून येण्यास शेकडों वर्षें लागतील. माझ्या कादबरींत मी संस्थानांत स्वराज्य ताबडतोब देवविलें आहे !

या देही या डोळा स्वराज्याचा अनुभव संस्थानांत येणें शक्य आहे. पण ब्रिटिश हिंदुस्थानांत तसें निश्चितपणें सांगतां येत नाहीं. संस्थानांतील राज्य आंगठीच्या खड्यासारखें असतें. अधिकारदान सत्प्रवृत्त असलें तर त्यांत उभयपक्षीं एक प्रकारचा आनंद आहे. म्हणून संस्थानाबद्दल आशा वाटते. संस्थानें हीं जुन्या वैभवाचें चिन्ह म्हणून त्यांच्याबद्दल अभिमान वाटतो, याचें कारण तीं आपल्या पूर्वजांच्या पूर्वपराक्रमाचीं चिन्हें आहेत. तसेंच तीं विवेकबुद्धीनें नव्याचें अवलंबन करूं लागलीं म्हणजे त्याबद्दल आदरहि वाटेल.

त्यानंतर श्री. केळकर यांनीं हरिवंशाची बखर यांतील कांहीं उतारे, कांहीं प्रसंग व कांहीं उदाहरणें दाखवून आपल्या पटवर्धन संस्थानिकांच्या पूर्वजांमध्यें स्वाभिमान, स्वावलंबन, साधेपणा, राजनिष्ठा वगैरे गुण कसे जाज्वल्य व उत्कट होते हें विशद केलें, व म्हणून पटवर्धनी संस्थानाबद्दल आपणास अभिमान व निष्ठा वाटतें असें सांगितलें. अशांच्या वंशजांनीं नव्याजुन्याचा मिलाफ करून आपल्या प्रजेचें हित साधावें, प्रेम संपादन करावें व प्रजेनें कृतज्ञतापूर्वक निष्ठा ठेवावी, असें सांगून भाषण संपविलें.

---

# ११०. बालविवाह, प्रौढविवाह व सुधारणा

( १९२९ सालीं सनातन धर्म-मंडळातर्फे झालेलें व्याख्यान )

माझें व्याख्यान शारदा बिल व्याख्यानमालेंत ठेवणारांनीं ठेवलें पण त्याचा व शारदा बिलाचा अर्थाअर्थी फारसा संबंध नाहीं. आणि पूर्वी झालेल्या इतर व्याख्यानांचा तरी कितपत संबंध होता ? गो. मा. चिपळूणकर यांच्या व्याख्यानांतील सहशिक्षण, समशिक्षण इत्यादि गोष्टी मुलीचें लग्नवय १२ असलें काय किंवा १४ असलें तरी एकच. तळवलकर यांच्या वैदिक वैवाहिक ध्येयाचीहि तीच गोष्ट. गो. म. जोशी यांनीं शास्त्रज्ञान व तत्त्वज्ञान खूप ओतलें. पण शारदा बिलाशीं प्रत्यक्ष त्याचा काय संबंध ? रा. जोशी यांनीं अशा विषयांचा अभ्यास फार चांगला केलेला दिसतो. अभ्यास हवा, मग मतें कशींहि असोत. गोळे यांनीं केलेल्या बालविवाहाच्या समर्थनापेक्षां जोशी यांचें समर्थन अधिक चांगलें आहे. त्यांनीं स्वतंत्र पुस्तकच लिहावें. पुराणमतवाद्यांनीं त्यांचें पुस्तक छापण्यास पैशाची मदत केली तर त्यांनीं शारदा बिलाविरुद्ध कांहीं तरी खरी सक्रिय चळवळ केली असें मी म्हणेन.

असो. असेंब्लींत मी स्वत: शेवटीं बिलाविरुद्ध मत दिलें. कारण त्याचीं कलमें आहेत तशीं मला मान्य नाहींत. पण विरुद्ध मत दिलें हें मी तोंडदेखलेपणानें सांगत नाहीं. कारण लग्नवयाच्या बाबतींत माझा व पुराणमतवाद्यांचा मतभेद आहे. कायदा पास झाला असा नको, पण लग्नाचें वय चौदा असावें असें माझें मत आहे. परंतु जोशी यांनीं संमतिवय–कमिटीवाल्यांचा जो कट म्हणून सांगितला त्यांत मात्र मी नाहीं. कारण बिलाच्या चर्चेत मी एका बाजूला समेटाकरितां म्हणून १२ व १३ या वयांना अनुकूल मत दिलें, व उलटपक्षीं १५ व १६ या वयांच्या सूचनेविरुद्ध मत दिलें. म्हणून संमतिवय–कमिटीवाल्यांचा कट कांहींहि असो, मी तरी १४ वर्षांचे पुढें जाण्याला तयार नाहीं हें उघड ठरतें. असें असूनहि, प्रौढविवाहाकडे माझें मत 'गुप्तपणें अधिकाधिक झुकण्याची प्रवृत्ति आहे असें म्हणावयाचें, तर जोशी यांनीं परवां प्रत्यक्ष स्वतः तोंडानें बारा हें योग्य वय असें सांगितलें असतां त्यांचीहि गुप्त प्रवृत्ति ( tendency )

त्याखालीं ११-१०-९ अशी वाढत जाणार आहे असा आक्षेप मीं त्यांच्यावर घेतला तर कसें होईल ? तात्पर्य, जो कोणी बोलेल त्याजवर तरी विश्वास ठेवावा. त्याला गुप्त कट किंवा भलतीच प्रवृत्ति चिकटवूं नये.

ज्या कोणाला हें बिल रद्द करून घ्यावयाचें असेल त्यांनी तें खुशाल करून घ्यावें. नवीन निवडणुकीच्या वेळीं मी व श्री. बेळवी यांच्या जोडीला आणखी जितकीं प्रतिकूल मतें कोणाला मिळवून येतां येतील तितकीं घ्यावीं. असली आज्ञा स्वीकारून मी निवडणुकीला उभा राहीन किंवा नाहीं तो माझा विचार. पण सनातन धर्मवादी म्हणविणारांनीं खटपट तर करावी ! परंतु मुंबई व पूर्वबंगाल प्रांत यांत मिळून आणखी चार दोन मतें अधिक मिळाली तरी असेंब्लींतील एकंदर मतांच्या संख्येचा विचार करतां हा क़ायदा रद्द होणार नाहीं असें मात्र मला खास वाटतें व तें मी स्पष्ट सांगतों. बंगालचा एक कोपरा सोडला असतां, नर्मदेच्या उत्तरतीराला या कायद्याला सामान्यपणें प्रतिकूलता नाहीं. आपल्याला येथें दिसणार नाहींत अशा पुष्कळ गोष्टी मला असेंब्लींत दिसून आल्या. मीं प्रतिकूल मत तरी नोंदलें; पण माझ्याहून सनातन–धर्मावर अधिक श्रद्धा ठेवणारे माझ्या शेजारी बसलेले मित्र अणे व मुंजे केवळ तटस्थ राहिले ! व आपल्या प्रांतांत परत गेल्यावर त्यांनीं या कायद्याविरुद्ध चळवळ केली नाहीं ! तसेंच मारवाडी समाज हा कट्टा पुराणमतवादी मानीत होतों. पण १९२४ सालीं असलें बिल प्रथम पुढें आणणारे रंगिलाल जजोदिया व त्यानंतरचे हरबिलास शारदा हे दोघेहि मारवाडीच आहेत ! या गोष्टींनीं आपण योग्य तो बोध घ्या. माझें म्हणणें इतकेंच कीं, हा कायदा कोणाला आवडो कोणाला न आवडो, पण पूर्वी तळवलकर यांनीं सांगितल्याप्रमाणें आजचें लोकमत स्पष्ट दाखविणारा तो एक मैलाचा दगड, आहे इतकें तरी मानलेंच पाहिजे.

पूर्वी श्वेतकेतू यानें स्त्रीपुरुषसंबंधाच्या स्वातंत्र्याच्याविरुद्ध घोषणा केली, किंवा अंधतमा यानें अनेक पतित्वाविरुद्ध घोषणा केली, म्हणून त्याच क्षणीं त्या दोन जुन्या रूढीविरुद्ध एकदम त्याच दिवसापासून अभावित असें नवें मत निर्माण झालें असें ठरत नाहीं. शुक्राचार्योनीं स्वतःला वाईट अनुभव आल्यामुळें हात वर करून " जो विप्र आजपासुनि मद्य-

प्राशन करील तो पापी ॥ " अशी घोषणा केली व दंडक घालून दिला, म्हणून कांहीं त्यांच्यापूर्वी एकहि ब्राह्मण मद्यपानानिवृत्त नव्हता किंवा त्यांच्यानंतर एकहि ब्राह्मण मद्यपानप्रवृत्त राहिला नाहीं असेंहि ठरत नाहीं. युगांतर व मतांतर हें क्रमानेंच होत असतें. एका क्षणाला होत नाहीं. खाडिलकर यांच्या कीचकवधांत तंबाखू चघळणाऱ्या आचाऱ्यांच्या गुरुजींनीं तंबाखूची चिमूट तोंडांत टाकून हातावर हात मारून कलियुग या क्षणीं अवतरलें असें सांगितलें आहे ! पण सामाजिक मतांतील युगांतर असें काय एका विशिष्ट क्षणीं होत असतें ? मैलाचा दगड निश्चित आंकडा दाखवितो, पण त्या मैलाची मजल पूर्वी एक मैल भरतच येत असते.

शारदा बिल हें हल्लींच्या काळाचें मत दर्शविणारें नाहीं असें ज्याला म्हणावयाचें असेल त्यानें खुशाल म्हणावें. पण या बाबतींत कायदे-मंडळें प्रातिनिधिक नाहींत ही गोष्ट मात्र मी कबूल करणार नाहीं. आम्ही १४ वयाची मर्यादा सांगितली व मानतों. जोशी हे आपली मर्यादा १२ म्हणून कबूलच करतात. तेव्हां येऊन-जाऊन फरक काय तो दोन वर्षांचा राहिला ! लग्नें ठरविण्याला कांहीं काळ सहजच लागतो. म्हणून १४ ही मर्यादा मान्य करणारांच्या गळ्यांत खटपटीची म्हणून दोन अधिक वर्षें बांधून, त्यांना सोळा या मर्यादेचें अनुवादक ठरवावयाचें, तर बारा वयाची मर्यादा कबूल करणारांच्या हिशेबांत तशींच दोन वर्षें घातलीं म्हणजे शारदा बिलांतील बरोबर १४ ही वयोमर्यादा आलीच कीं नाहीं ?

१४ वर्षांच्या मुलींना जर नवरा शोधावयाला दोन वर्षें लागतात, तर बारा वर्षांच्या मुलीला तरी नवरे कोठें वाढून तयार ठेवले आहेत ? हें येथें जमलेल्या लोकांनींच अनुभवानें सांगावें. आज कॉलेजांतून मुलालाच जाऊन विचारा म्हणजे वय १२ म्हटलें कीं तो नाकच मुरडतो. तेव्हां आधीं कॉलेजांतून जाऊन तरुण मुलांचीं मनें लवकर लग्नें करण्याकडे वळवा, आणि मग उरलेली शक्ति शारदा बिलाला विरोध करण्याकडे खुशाल खर्च करा ! लग्नाच्या मुलांचीं वयें वाढत आहेत म्हणूनच लग्नाच्या मुलींचीं वयें वाढत आहेत ही गोष्ट सनातनी म्हणविणारांना

झाली तरी नाकबूल करण्यांत काय अर्थ ! जोशी यांनीं शास्त्रांचें पुष्कळ आधार दिले, इंग्रज ग्रंथकारांचे उतारे वाचले, दशांशचिन्ह व अपूर्णांक एथपर्यंत त्यांनीं गणित करून फळ्यावर मांडलें, पण त्याचा माझ्या मनावर परिणाम झाला नाहीं. कारण माझ्या ढोबळ सारासार विचारी दृष्टीला यांतलें कांहींहि लागत नाहीं, व कांहींच पटत नाहीं. तसेंच संमतिवय–कमिटीच्या रिपोर्टावर जी टीका कित्येकांनीं येथें केली तिच्या-शींहि स्वतः मला कांहीं कर्तव्य नाहीं. कारण स्वत: मी त्या रिपोर्टाच्या परिशिष्टांतील आयत्या एकत्रित केलेल्या खानेसुमारीच्या आंकड्याशिवाय दुसरें कांहींच वाचलें नाहीं.

पण एकंदरीनें माझ्यापेक्षां खरी अडचण बालविवाहाचें समर्थन कर-णारांनाच आहे ! कारण ते असल्या कामीं नसते युक्तिवाद पुढें आण-तात. कोणी म्हणतो बालविवाह चांगला. कां ? तर वैदिक वैवाहिक ध्येयाप्रमाणें विवाहाचा हेतु केवळ संतानोत्पत्ति इतकाच आहे ! कोणी म्हणतो, विवाहाच्या ध्येयांत सुख व आनंद यांचा समावेशच होत नाहीं. जणूं कांहीं “ दारानपत्याय तपोऽर्थमायु: ” याप्रमाणेंच अक्षरशः सगळें जग चालतें ! तसें तें चालेल तर, जोशी यांच्या मागणीप्रमाणें राष्ट्रहिताकरितां सात संतानांचा कारभार दिल्यावर मग तरी पतिपत्नींनीं वानप्रस्थाश्रम स्वीकारावा कीं नाहीं ? जोशी यांच्या हिशेबाप्रमाणें तीन वर्षांचा पाळणा धरिला असतां बालपणीं विवाह झालेल्या स्त्रीला पस्तिसाव्या अगर चाळि-साव्या वर्षाला तरी वानप्रस्थाश्रम घेण्याला हरकत नसावी. पण किती स्त्रिया तो घेतात ? किंवा “ पृथक् शय्या च नारीणां अशस्त्रवध उच्यते ” या न्यायानें किती पुरुष आपल्या स्त्रियांचा असला वध करीत असतील ?

पण वैवाहिक स्थितींत संतानोत्पत्तीप्रमाणें आनंद किंवा सुख हाहि एक हेतु असूं शकतो असें न म्हणण्याचें खरें कारण हें कीं, तसें ठर-ल्यास वधूवरपसंतीची, अल्प मर्यादित का होईना, पण पसंति–नापसंतीची संधि वधूवरांना असावी असें आज मानलें जातें हें कबूल करावें लागेल ! अर्थात् पांचव्या सातव्या वर्षी मुलामुलींचें लग्न केलें म्हणजे पसंति-नापसंतीचा प्रश्नच उरत नाहीं, व व्यक्तिस्वातंत्र्यविरुद्ध समाजसत्ता या वादांत पुढें येणाऱ्या व्यक्तिस्वातंत्र्याचा सहजच निरास होतो ! आणि

हा निरास करतांना आधुनिक इंग्रज ग्रंथकारांची मदत घेतां येते ! पण ती घेतल्यानें इतर गोष्टी गळ्यांत पडतात त्यांची वाट काय ? कांहीं मनुष्य-जीवशास्त्रवेत्ते असें म्हणतात कीं, मुलींच्यामध्यें फार अल्पवयांतहि काम-वासनेचीं शारीरिक चिन्हें प्रकट होतात; आणि जोशी यांनीं तर असें प्रतिपादन केलें कीं, अशीं चिन्हें दिसूं लागतांच योग्य तजवीज झालेली नसल्यास स्त्रिया कुमार्गगामी होतात. पण या दोनहि गोष्टी एकत्र कबूल केल्या असतां बारा वर्षांची मर्यादा जागेवरच उरत नाहीं ! व या पाश्चात्य पंडितानीं जी अत्यंत अल्प वयाचीं उदाहरणें, कामवासना दिसूं लाग-ण्याचीं म्हणून, सांगितलीं त्याच्यापूर्वी ही विवाहमर्यादा नेऊन ठेवावी लागते.

कारण केव्हां काय होईल याचा नेम नाहीं ! याला विनोदबुद्धीनें मी एक उदाहरण सांगतों. चाळीस वर्षांमागें एका दक्षिणी संस्थानिकानें वृद्ध-पणीं दुसरें लग्न केलें. आतां आपल्यांत जुना रिवाज असा कीं, रजो-दर्शनाबरोबर मखर घातलेंच पाहिजे. तेव्हां संस्थानिकमहाशयांना त्यांच्या सचिवांनीं असा पोक्त सल्ला दिला कीं, नव्या बाईसाहेब केव्हां कोठें जातील व त्यांना केव्हां कोठें ऋतु प्राप्त होईल याचा नियम नाहीं. म्हणून त्यांच्या हिंडण्याफिरण्याच्या वाटेवर व त्यांच्या देवालयांतहि ठिक-ठिकाणीं मखरें बांधून ठेवावीं ! म्हणजे ऋतु तर प्राप्त झाला व मखर मात्र नाहीं, असली आपत्ति सनातन धर्मावर कोसळण्याची थांबेल !

मुलींचीं लग्नें पांचव्या किंवा सातव्या वर्षीं करण्याची जरूरी असल्या युक्तिवादानेंच ओघानें येते. पण त्याबरोबर दुसरीहि गोष्ट आली. स्त्री-शिक्षणाची शाळा नको, स्त्रीशिक्षणविषयक पुस्तकेंहि नकोत. अर्थात् चिपळूणकर यांचें सहशिक्षण, समशिक्षण, असले अडचणीचे विषय आपो-आपच विचारांतून निघाले ! शाळागृहांच्या ऐवजीं बोहोली बांधलीं म्हणजे झालें !

अगदीं अल्पवयांत, एकाद्या शास्त्रवेत्त्याच्या मताप्रमाणें, कामवासनेचीं लक्षणें संभवतील, आणि लग्न झालें नसलें तर वासनाशांतीचें प्रशस्त साधन नसल्यामुळें कुमारिका दुःखांत पडतील किंवा अनीतीच्या आड-मार्गाला जातील, असा प्रश्न सूचित करणारांना दुसरा असा प्रश्न कोणी

कां न विचारावा कीं, " अहो ! तुमचें हें उदाहरण आधीं अपवादात्मक. त्यांतून त्या मुलींना लवकरच लग्न होण्याची आशा, असें असतां तिची इतकी कींव व दया आल्यामुळें जर तुम्ही बालविवाहाचें समर्थन करतां, तर ज्यांना जन्मांत कोणतीच आशा उरलेली नाहीं, त्या बालविधवांची कींव याच जीवशास्त्राधारें तुम्हांला कां येऊं नये ? " पण म्हणे समाज हा केवळ आपल्या मताच्या व ध्येयाच्या जोरावर त्यांतील पुष्कळांना कुमार्गगामी न होतां आपलें दुःख सोसण्यास समर्थ करूं शकतो व त्याचें नियंत्रण करतो ! होय. तर मग लहान मुलींवर, बारा–चौदा वर्षांच्या होईपर्यंत तें नियंत्रण समाजाला कां करतां येऊं नये ! देहधर्म म्हटला तर कुमारी किंवा बालविधवा दोनहि सारख्याच होत. तात्पर्य, प्राणिशास्त्राचा आधार अर्धवट आणि सोयीपुरता हे लोक घेतात. बालविवाहाच्या समर्थनार्थ जीं उदाहरणें सांगतात; तीं अपवादात्मक असलीं तर तीं सांगून भेसूर चित्रें काढून समाजाला भेवडावणें हें अयोग्य आहे. व त्या उदाहरणांनीं एखादा नियम सिद्ध होत असेल तर तो कुमारिकाप्रमाणें बालविधवांनाहि लागू पडेल त्याची वाट काय ?

तात्पर्य, सामाजिक सुधारणा म्हणजे काय, ती कशी होत असते व तिजकडे कोणत्या दृष्टीनें पाहावें लागतें याचें ज्ञान नसल्यामुळें, बालविवाहाचें समर्थन व शारदा–बिलाचा निषेध या गोष्टी कोठें कोठें घडत आहेत. "

---

# १११. धर्म, नीति, कला व अश्लीलता

( सोमवार ता. २६ नोव्हेंबर १९३४ रोजीं महाराष्ट्र-वाङ्मय-परिषदेंत पास झालेल्या ठरावांपैकीं अश्लीलतेच्या ठरावावर रा. न. चिं. केळकर यांचें जें मननीय भाषण झालें त्याचा सारांश. )

" हा ठराव मजकडे दिला नसता तर कदाचित् बरें झालें असतें; कारण या सभेच्या चालकांना सर्वस्वीं अपेक्षित असेंच भाषण मजकडून होईल कीं नाहीं याची शंका वाटते. ठरावांत लिहिल्याप्रमाणें

अश्लीलत्वाचा उच्छेद व्हावा ही गोष्ट मलाहि इष्ट वाटते. पण प्रस्तुत ठरावाच्या भाषेवरून कदाचित् असा समज होण्यासारखा आहे कीं, अश्लीलता आणि अनीति किंवा अधार्मिकपणा या गोष्टी एकाच तोलाच्या किंवा समव्याप्त असाव्या. तशी कोणाची समजूत नसेल तर ठीकच; पण असेल तर ती बरोबर नाहीं हें मला सांगितलें पाहिजे. म्हणून या सभेच्या कामापुरत्या मी चारदोन व्याख्या तातपुरत्या म्हणून सांगतों. त्या अशा.

**धर्म**—( ऐहिक अभ्युदयकारक ) समाजांतील निरनिराळ्या वर्गांचे हक्क व कर्तव्यें यांचा समन्वय व धारणा करणारी व्यवस्था.

**नीति**—समाजहितसाधक व माणुसकीच्या कल्पनेस मूलभूत, अशा कल्पनांचा सांभाळ करणारें नियमबद्ध आचरण.

**कला**—उपयुक्तता, सरसता, सौंदर्य यांच्या हार्दिक भावना प्रगट करण्याची विद्या.

**अश्लीलता**—अनौचित्य किंवा संस्कृतिच्युति यांच्यामुळें लज्जा, विषाद, किंवा तिरस्कार उत्पन्न करण्यासारखें, विशेषतः विषयवासनेसंबंधीं, विचारांचें प्रगटीकरण.

या व्याख्या लक्षांत घेतल्यास धर्म, नीति, कला यांचा व अश्लीलतेचा अवश्य किंवा नित्य संबंध नाहीं असें दिसून येईल. म्हणजे अश्लीलता आहे पण तेथें धर्म, नीति, कला यांचा उच्छेद कृतीनें किंवा हेतुनेंहि नाहीं असें आढळूं शकेल. उलट या तिहींनाहि उच्छेदकारक अशीं मतें अश्लीलतेचा यत्किंचितहि दोष पदरीं न घेतां एखादा कोणी कुशल वक्ता किंवा लेखक प्रतिपादूं शकेल ! मीं असे लोक पाहिलें आहेत कीं, ज्यांना कोणचेंहि मतस्वातंत्र्याचें उच्च तत्त्व प्रतिपादावयाचें नसतां ते उगाच सहजासहजीं जणूं काय भाषेंत जोर येण्याकरितां अश्लील लिहून बोलून जातात. पण मी सांगितलेल्या अश्लीलतेच्या व्याख्येप्रमाणें, त्यांना औचित्य काय हें कळत नाहीं किंवा आपल्या हातून संस्कृतच्युतीचा दोष घडला हें कळत नाहीं इतकाच त्याचा अर्थ असतो. विद्वान् सच्छील असेहि लोक अजाणतां म्हणजे केवळ संवयीनें ग्राम्य व अश्लील बोलणारे माझ्या पाहण्यांत आहेत. उलट मी स्वतःच एका ‘ संततिनियमन ’ या विषयावरील जाहीर व्याख्यानाला कांहीं अटीवर अध्यक्ष होण्याचें

कबूल केलें; त्यावेळीं तो वक्ता पाऊण तासाच्या भाषणांत एक अक्षरहि अश्लील बोलला नाहीं व मी अर्धा तास बोललों त्यांत मीहि आक्षेपार्ह कांहींच बोललों नाहीं. या सभेला शेंकडों स्त्री-पुरुष व मुलें हजर होतीं; व माझी अशी खात्री आहे कीं, सभेचें सर्व काम होत असतां कोणालाहि लाज वाटून दुसरीकडे पाहावेसें होण्यासारखा एकहि शब्द श्रोत्यांच्या कानावर पडला नाहीं ! आतां हट्टानें आग्रहानें, उच्छृंखलतेचा हक्क बजावणारे म्हणून कांहीं लेखक किंवा वक्ते अश्लील लिहितात बोलतात; व योग्य नियंत्रण शब्दांना घालणें शक्य असतांहि घालीत नाहींत. उत्तान भाषेंत उडी घेऊन कड पोंचविणें हा पुरुषार्थच मानतात. ही खेदाची गोष्ट आहे, म्हणून त्याच्या निषेधाला कोणीहि हरकत न घेतां उलट मदतच करावी.

पण या बाबतींत नवमतवादी लोकांच्या तर्फेंहि एक गोष्ट सांगण्यासारखी आहे ती अशी. त्यांचें म्हणणें असें कीं, सामाजिक, धार्मिक, नीतिविषयक किंवा चालीरीतिविषयक नवीन मतें प्रतिपादन केलेलीं कांहीं लोकांना खपत नाहींत; व या प्रतिपादनाच्या ऐनजिनसी भाषेलाच ते अश्लील म्हणतात. एक तर हें वरील व्याख्येप्रमाणें बरोबर नाहीं; व शिवाय यांत वडाची साल पिंपळाला लावल्यासारखें होतें. मनांत एक असतां त्यांचें उट्टें दुसऱ्यावर म्हणजे वडयाचें तेल वांग्यावर काढल्यासारखें अन्यायाचें होतें. धर्म किंवा नीति यांत सुचविलेला फेरबदल हा समाजहितविध्वंसक आहे असें कोणास वाटेल तर त्यानें त्याविरुद्ध अवश्य चळवळ करावी, लोकमत प्रगट करवावें. पण तें अश्लील असलें नांव ठेवून धोपटूं नये. मग तें स्त्री-पुरुष संबंधाविषयीं असलें तरी अश्लील ठरत नाहीं. अश्लीलता केवळ लैंगिक संबंधांतच अवतरते असें नाहीं, तर व्याख्येंत सांगितल्याप्रमाणें माणुसकीला मुलभूत असलेल्या गोष्टीविषयीं देखील अश्लील भाषा वापरून बोलतां येईल. उलट धर्म, नीति या गोष्टी सनातन मानल्या तरी त्रिकालाबाधित नसतात. त्यांत फेरबदल सुचविण्याचा हक्क प्रत्येक मनुष्यमात्राला असतो. तो इतरांना मान्य करावाच लागतो. काल अध्यक्षानींच आपल्या भाषणांत रामायणकालीं असलेल्या नीतीच्या कल्पना भारतकालीं उरल्या नाहींत किंवा बदलल्या

असें सांगून सर्वच भारतीय विभूतींची, श्रीकृष्णासुद्धां, हजेरी घेतली ! शुद्ध सनातनी मताप्रमाणें त्यांचेंहि भाषण अश्लील या सदराखालीं पडण्याचा संभव आहे !

नवमतवाद्यांची दुसरी तक्रार अशी कीं, कालिदास दंडीसारखे संस्कृत कवी वाटेल तितके अश्लील लिहून गेले, त्याची तक्रार कोणी केली नाहीं. तसेंच अण्णा किर्लोस्करादि नाटककारांनीं काय थोडें अश्लील लिहिलें ? सौभद्रांतील नारदाच्या तोंडचें ' पांचहि बंधू एक वधूशीं ' इ. किंवा श्रीकृष्णाच्या तोंडचे ' कुचभल्ली वक्षाला ' असल्या उत्तान शृंगारविषयक शब्दांना कोणीं हरकत घेतली किंवा त्याविरुद्ध चळवळ केली ? पण त्या नाटकांतली स्त्री सनातनी होती ! हल्लीं नवमतवादी ज्या स्त्रियांचीं वर्णनें करतात त्या स्त्रिया नवीन सामाजिक हक्क सांगणाऱ्या आहेत ! म्हणून त्या भयंकर ! व त्यांच्यासंबंधीं उत्तान उद्गार अश्लील ! पण हा उघड अन्याय होय. पूर्वी नसलेले अधिकार स्त्रियांनीं मागणें किंवा त्यांच्याकरितां ते दुसऱ्यांनीं मागणें यानें आपल्या मनाला थोडा धक्का बसतो ही गोष्ट खरी. पण म्हणून तें लिहिणें, बोलणें कांहीं अश्लील नव्हे. सुधारणेंत केवळ अतिशयोक्तीची दुरुस्ती असते, तर क्रांतीमध्यें ऐनजिनसी सत्तेचीच अदलाबदल असते. म्हणून मनाला धक्का बसणारच. पण त्याचा निषेध करण्याचा मार्ग प्रतिकूल लोकमत उत्पन्न करणें, किंवा काल अध्यक्षांनीं सांगितल्याप्रमाणें, उन्मत्त लेखकांना चुचकारून गोंजारून त्यांना योग्य वळण लावणें हा आहे. केवळ अश्लीलता ही इतकी क्षुद्र गोष्ट आहे कीं, तो केवळ व्यक्तिगत दोष, ती त्याच्याच संस्कृतीची हानी, असें म्हणून उपेक्षा करून सोडून द्यावी. नीतिविचारामध्यें मनुष्य प्रत्यक्ष काय करतो, कशा रीतीनें करतो व कोणत्या हेतूनें करतो इतक्या गोष्टींचा विचार करावा लागतो. सामान्य अश्लीलता ही गोष्ट केवळ स्वभावदोषात्मक ( टेंपरमेंटल ) म्हणून सोडून देण्यासहि हरकत नाहीं. मात्र तीच गोष्ट बुद्धिपुरस्सर चढेलपणानें समर्थन करकरून कोणी करील, तर तो समाजाचा शत्रु खुशाल मानावा व त्याला योग्य तें शासन करावें. ”

---

# ११२. ब्राह्मण समाजाचें संघटन

( रविवार ता. २७ सप्टेंबर १९२५ ( दसरा ) रोजीं ब्राह्मण-सभेच्या विद्यमानें मुरारबागेच्या सभागृहांत झालेल्या व्याख्यानाचा सारांश. )

विजयादशमीच्या दिवशीं सरस्वतीपूजन व सीमोल्लंघन आणि शस्त्रपूजन हे समारंभ होतात. पैकीं सरस्वतीपूजन हें ब्राह्मण समाजापुरतें पाहिलें असतां अनादि आहे. मुंबईत सीमोल्लंघनाला जागा नाहीं असें अध्यक्षांनीं सांगितलें. समुद्रवलयांकित शहरांत असें होणारच ! पण प्रत्यक्ष सीमोल्लंघना-पेक्षां एक वेगळ्या प्रकारचें सीमोल्लंघन ब्राह्मणसमाज आज शेंकडों वर्षें करीत आला आहे. कारण मुलुखगिरी व शस्त्रपूजन हीं ब्राह्मणांनीं केल्याचा पुरावा ऐतिहासिक कालीं तर मिळतोच, पण पुराणांतहि मिळतो. आपद्धर्म म्हणून या गोष्टी ब्राह्मणांनीं केल्या असें मानलें तर हा आपद्धर्म शेंकडों वर्षें या समाजावर येऊन पडला आहे असें म्हटलें पाहिजे !

विद्याभ्यासाप्रमाणें राज्यकारभार व शस्त्रग्रहण म्हणजे वीरवृत्ति या गोष्टी ऐतिहासिक कालांतील ब्राह्मण शेंकडों वर्षें करीत असतां, त्यासंबंधानें हल्लीं क्वचित् कोणास शंका येते. ब्राह्मण–ब्राह्मणेतर वादामुळें ब्राह्मणांचें खरें कर्तव्य काय असाहि वाद पुण्यांतील कांहीं ब्राह्मण वक्त्यांतच झाल्याचें मी नुकतेंच वाचलें. या वादांतील एका पक्षाला 'भिक्षापक्ष' असें नांव दिलें तर दुसऱ्या पक्षाला 'लक्षसंचयपक्ष' असें नांव द्यावें लागेल पण हीं दोनहि मतें एकांतिक असून माझ्या मतें ब्राह्मण-कर्तव्याविषयीं खरा सत्पक्ष म्हणजे 'संतोषयुक्त स्वावलंबन-पक्ष' हा होय. मोठ्या सार्व-जनिक कार्यांकरितां ब्राह्मणानें हवा तेवढा मोठा पदर पसरून वाटेल तितकी भिक्षा मागावी. पण स्वतःच्या आणि उपजीवी जनाच्या उदर-पोषणार्थ ब्राह्मणानें कधींहि भिक्षा मागूं नये, तर इतराप्रमाणेंच कोणतीहि शास्त्रोक्त वृत्ति स्वीकारून आपला चरितार्थ स्वावलंबनाच्या तत्त्वावर चालविला पाहिजे असें माझें मत आहे. स्वतःकरितां भिक्षा मागणें ही गोष्ट ब्राह्मणालाहि अत्यंत लाजिरवाणी होय. उलटपक्षीं संतोष सोडून अपरिमित द्रव्यसंचय करीत बसणें ही गोष्ट देखील ब्राह्मणाला कमीपणा

आणणारी आहे. 'असंतोषात् द्विजा नष्टाः संतोषाच्च महीभृतः'; हें वचन मला मान्य आहे. हें वचन सर्व द्विजांना लागू असलें तरी तें मुख्यतः ब्राह्मणांनाच अधिक लागू पडतें.

स्मृतिकारांनीं ब्राह्मणाचें वैशिष्ट्य किंवा श्रेष्ठत्व प्रतिपादिलें असलें तरी तें भिक्षावृत्तींत किंवा परावलंबित्वांत आहे असें नाहीं. शिवाय ब्राह्मण क्षत्रिय व वैश्य या त्रिवर्गांना समान असे किती तरी अधिकार आहेत; हें आपण सामान्यतः विसरतों. धर्म चार प्रकारचे असतात. वर्णधर्म, जाति-धर्म, कुलधर्म, व आश्रमधर्म. पैकीं रूढीमुळें कुलधर्म बरे वाईट निर्माण होतात, पण त्यामुळें ' मी मोठा तूं लहान' असा कलह माजण्याचें कारण नाहीं. वर्णधर्म हे शब्द गुणद्योतक होत. त्यांचा जन्माशीं कांहीं संबंध नाहीं. म्हणून ब्राह्मणांत क्षत्रिय वृत्तीचा मनुष्य, वैश्यांत ब्राह्मणवृत्तीचा, व क्षत्रियांत वैश्यवृत्तीचा मनुष्य निर्माण होऊं शकतो, व त्याला अंगच्या गुणाप्रमाणें मान्यताहि मिळते. त्यानें जातिगुणाविरुद्ध कर्म केलें असें म्हणून कोणी त्यास नांवें ठेवीत नाहींत. संतशिरोमणि तुकाराममहाराज यांनीं वाण्याचा धंदा टाकून ते तुकाविप्र बनले म्हणून त्यांनीं तो आपद्धर्म स्वीकारिला असें नव्हे व स्वधर्मत्याग केला असें तर नव्हेच नव्हे !

आपल्या संतमालिकेंतील अनेक व्यक्ती ब्राह्मणेतर असतां त्यांनीं ब्राह्मण-वर्गाकडूनहि पूज्यता मिळविली, यावरूनच वर्णधर्म हे जन्मावर अवलंबून नाहींत तर ते मनुष्याधिकाराच्या कक्षेंत पडतात हेंच सिद्ध होतें. आश्रम-धर्म हेहि ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य या तिघांनाहि सारखेच ग्राह्य व सेवनीय आहेत. ब्रह्मचर्य गृहस्थाश्रम व वानप्रस्थाश्रम हे तीनच काय पण संन्यास हा देखील त्रिवर्गांना सारखाच विहित आहे. कलिवर्ज्याचा अनागोंदी हिशेब लक्षांत न घेतला तर, ब्राह्मणानेंच तेवढा संन्यास कां घ्यावा व क्षत्रिय व वैश्य यांनीं तो कां घेऊं नये याविषयीं संयुक्तिक प्रमाण सांपडत नाहीं. हिंदुत्वाचें मुख्य लक्षण विशिष्ट संस्कार हें होय. आणि ब्राह्मण क्षत्रिय व वैश्य हे तीनहि वर्ग संस्काराचे समान अधिकारी आहेत. गर्भा-धान, जातकर्म, नामकरण, चूडाकरण, उपनयन, दीक्षा, यज्ञकर्म, विवाह, पंचयज्ञ, भोजनादि दान, श्राद्ध, पितृतर्पण, देवतर्पण वगैरे संस्कार तीनहि

वर्णांना सांगितले आहेत. क्वचित् फरक आहे तो तपशिलांत आहे. उदाहरणार्थ, उपनयनविधींत अजिन, उपवीत, दंड, भिक्षा वगैरे बाबतींत वर्णानुक्रमानें कांहीं फेरफार सांगितले आहेत इतकेंच; व जाती या कोणी जन्मसिद्ध मानल्या तरी परस्परोपकारित्वामुळें चार वर्णांची मिळून जणूं काय एक अखंड जुडी बांधली जावी अशा प्रकारची व्यवस्था स्मृति-ग्रंथांत आढळते.

त्रिवर्णांना सारखे अधिकार कोणते हें पूर्वी सांगितलेंच. त्यांतल्या त्यांत ब्राह्मण व क्षत्रिय यांची जोडी तर स्मृतिकारांनीं थेट भावाभावां-सारखी मानली आहे. ब्राह्मण व क्षत्रिय यांचा उत्कर्ष व यांची वृद्धि परस्परांच्या सहकारितेवर अवलंबून आहे; आणि सर्व प्रजांचें धारण, संगोपन, व रक्षण यांची कामगिरी ब्राह्मण व क्षत्रिय या दोघांवर मिळून सोंपविली आहे असेंच स्मृतिग्रंथांवरून दिसून येतें. चातुर्वर्ण्यव्यवस्था जर कोणीं मानिली तर ती सर्व मिळून एक व्यवस्था आहे हें लक्षांत ठेवलें पाहिजे. हें विसरून चालावयाचें नाहीं. याचा अर्थ असा कीं, ब्राह्मण व ब्राह्मणेतरवर्ग या सर्वांकडून जोंपर्यंत आपआपले शास्त्रोक्त धर्म पाळले जातील तोंपर्यंतच ती व्यवस्था, व तसें न होईल तर ती अव्यवस्था किंवा निराळी व्यवस्था. उदाहरणार्थ, ब्राह्मणानें भिक्षावृत्ति किंवा उंच्छ-वृत्ति स्वीकारूनच जगावें असें म्हटलें, तर क्षत्रियानें प्रजासंरक्षणाचें व वैश्यांनीं दानधर्माचें कर्तव्य केलेंच पाहिजे. तरच ब्राह्मणांनीं उंच्छवृत्तीला चिकटून राहणें शक्य होईल. पण प्रस्तुत काळांत सर्वच वर्णांनीं आपले धर्म स्वेच्छेनें सोडून ही व्यवस्था मोडली आहे. याचें कारण माझ्या मतें असें कीं, ही व्यवस्था अमलांत राहण्याचा जो मूळ आधार तोच सर्वस्वीं नष्ट झालेला आहे.

मुसलमानांच्या स्वाऱ्या होऊन त्यांची बादशाही भरतखंडांत स्थापिली गेली व पुढें ' गण्डस्योपरि पिटिका संवृत्ता ' या न्यायानें खिस्ती लोकांचें अधिराज्य हिंदुस्थानावर आलें. अशा स्थितींत जुन्या ध्येयात्मक वर्णधर्माला किंवा जातिधर्माला चिकटून कोण कसा बसणार ? रघुवंशांत वर्णिल्या-प्रमाणें, वरतंतुशिष्य कौत्स हा गुरुदक्षिणेची भिक्षा मागण्याकरितां क्षत्रिय राजाकडे गेला असतां, राजानें किती बारीकसारीक गोष्टीविषयीं कुशल प्रश्न

विचारून परामर्श घेतला हें पाहिलें म्हणजे चातुर्वर्ण्यात्मक सुव्यवस्थेचें खरें काव्य कल्पनेंत उतरतें. पण कोणता मुसलमान बादशहा किंवा खिस्ती गव्हर्नर ब्राह्मण अतिथीला आज असले कुशल प्रश्न विचारतो! स्वधर्मीय राजा असला म्हणजे अशा गोष्टी थोड्याबहुत घडूं शकतात हें क्षत्रियकुलावतंस श्रीशिवाजीमहाराज यांच्या उदाहरणावरून दिसून येतें. पण स्वदेशी अधिराज्य ज्या दिवशीं भरतभूमींतून नष्ट झालें, त्या दिवसापासूनच आपद्धर्माला सुरुवात झाली व तो अजूनहि चालूच आहे. शाक्त संप्रदायांतील एक वचन आहे कीं, "प्रवृत्ते भैरवे चक्रे सर्वे वर्णा द्विजातयः निवृत्ते भैरवे चक्रे सर्वे वर्णाः पृथक् पृथक्॥" परधर्मी अधिराज्य हें उपमेपुरतें एक भैरव-चक्रच होय. याचा लाक्षणिक अर्थ भीषण परिस्थिति इतकाच घ्यावा. हें चक्र प्रवर्तित झाल्यापासून सर्व वर्ण जवळ जवळ एकच होत आले आहेत. कोणताहि वर्ण आपला शास्त्रोक्त धर्म पाळीत नाहीं. त्याला आपद्धर्माचा स्वीकार करावा लागला आहे.

आपद्धर्मांत ब्राह्मणांनीं प्रथम क्षत्रिय-धर्म स्वीकारून पाहवा, व त्यानेंहि न भागेल तर नंतर वैश्यधर्माचाहि अंगिकार करावा, अशी शास्त्राची सवलत आहे. यामुळें ब्राह्मणाच्या नित्य वृत्तीशिवाय ग्राम-नगररक्षण, शस्त्रास्त्रधारण, कृषि, गोरक्षण, वाणिज्य वगैरे गोष्टी करण्यास त्याला प्रतिबंध नाहीं. हा सिद्धान्त आपण व्यवहारानेंहि खरा करून दाखवूं लागलों आहों! पण जी गोष्ट ब्राह्मणाची तीच इतर वर्णीयांचीहि आहे. क्षात्रकर्म क्षत्रियाचें पुष्कळसें लोपलें. त्याला वाव उरला नाहीं. वैश्यांनीं शिक्षण मिळविण्याला व नोकरपेशा पत्करण्याला सुरुवात केली आहे. ज्यांना आपण शूद्र मानतों ते खरोखरच शूद्र ठरतात, कीं कांहीं उच्चवर्ण त्यांना लाभतो याचाहि विचार झाला पाहिजे. शिवाय शूद्रांनीं नुसती सेवाच करावी हें म्हणणें आतां कोण मानील? शूद्रांना धनसंचय वर्ज्य म्हणून स्मृतिग्रंथांत सांगितलें आहे. पण एकादा शूद्र बुद्धिवान् व मेहनती निघून तो श्रीमान् झाला तर या दिवसांत किंवा केव्हांहि त्याच्या धनसंचयाला प्रतिबंध करतां येईल काय? व तें करणें न्यायाचें होईल काय? तात्पर्य, वर्णाश्रमधर्माची गलत झाली आहे, व नव्या आर्थिक व राजकीय परिस्थितींत ती अपरिहार्यहि आहे. हल्लीं समाजाचा खरा पाया म्हटला म्हणजे स्वावलंबनी व्यक्ति

हाच होय, व नव्या युगांत स्वावलंबन म्हटलें म्हणजे तें साधण्याला जुन्या वर्णधर्मांना सर्वस्वीं चिकटून बसून चालावयाचें नाहीं.

कोणत्याहि वर्णांतील मनुष्यानें जरूर ती मेहनत करून आपलें व उपजीवी लोकांचें पालनपोषण केलें पाहिजे. ब्राह्मणांनीं भिक्षा मागावयाची हें तत्त्व निवडक किंवा संन्यस्त ब्राह्मणांपुरतेंच मानावयाचें कीं सरसकट सर्व समाजापुरतें? ब्रह्मचर्याश्रमांत म्हणजे विद्यार्जनकालांत भिक्षा शोभेल व कोणी ती घालील. पण उद्यां लग्न करून ब्राह्मण गृहस्थाश्रमी बनला तरी त्यानें बरोबर बायको घेऊन भिक्षेला जावें, आणि पुढें मुलें झालीं म्हणजे त्यांचेंहि लटांबर बरोबर घेऊन भिक्षेला निघावयाचें कीं काय? ब्राह्मणसमाजाची खानेसुमारी महाराष्ट्रांत ४।५ लक्ष तरी असेल; मग इतके सर्व भिकारी भीक मागत सुटले तर त्यांना भिक्षा कोण व किती घालील? गरीबीचें व्रत मुद्दाम पाळणारा एखादा उच्च विचारांचा मनुष्य निघेल, पण तोहि स्वाभिमानी असेल तर निदान आपली उपजीविका भिक्षेवर करण्याला शरमिंदा झाल्याशिवाय राहणार नाहीं. तसेंच ब्राह्मणसमाजरक्षणाकरितां त्यानें लोकांचे तोंडाकडेच पाहावयाचें कीं काय? क्षत्रियांनीं ब्राह्मणांचें रक्षण करावें हें तत्त्व बाजूस राहून कुंपणानें शेत खावें त्याप्रमाणें प्रकार घडूं लागला, तर शेतानें स्वतः आत्मरक्षणाचा उपाय योजलाच पाहिजे. इतर सर्व जाती आपापलें नांव घेऊन उघडपणें संघटन करूं लागल्या असतां ब्राह्मणसमाजानें आपलें संघटन कां करूं नये? पण ब्राह्मणसमाजांत संघटन व्हावयाचें तर त्यांनीं आपल्यांतील सर्व पोटभेद नाहींसे करून व्यापक दृष्टीनें वागावयास शिकलें पाहिजे.

कोणाचेंहि श्रेष्ठत्व हें दुसऱ्यांनीं मानण्यावर अधिक अवलंबून असतें, व त्या श्रेष्ठत्वाच्या अहंकाराला दुसऱ्याच्या भावनेच्या उपमर्दानें अधिकच वाईट रूप येतें. आपद्धर्माच्या सबबीवर इतर वाटेल ते धंदे करावयास लागून शिवाय इतर वर्णांच्या धर्मविधींमध्यें पुरोहितत्व करण्याचा हक्क ब्राह्मण सांगूं लागेल, व पुरोहिताला न बोलावलें तरी दक्षिणा तरी दे असा वृत्तीचा संबंध जोडूं पाहील, तर तो हक्क म्हणून कायदेशीर ठरला तरी, ती दक्षिणेची मागणी निंद्यच ठरेल. दुसऱ्याच्या धर्मकृत्यांत पडण्याचा-त्याच्या व त्याच्या ईश्वराच्या दरम्यान अंतराय होऊन उभें राहण्याचा-ब्राह्मणाचा

हक्क तरी कसला ? विद्यासंपन्न असल्याकारणानें आपण होऊन कोणी आदरानें धर्मकृत्य चालविण्यास बोलाविलें तरच ब्राह्मणानें जावें, पण अनाहूत जाऊं नये, व न बोलावलें असतां हक्कहि सांगूं नये. धार्मिक कृत्य सफळ होणें न होणें हें जो जसें मानील तसेंच तें होईल.

स्वार्थत्याग हाच इतर रीतीनेंहि संघटनेचा पाया होय ! व हा स्वार्थत्याग झाला तरी ज्या कृत्रिम भेदांनीं दुबळेपणा आला व सामाजिक हिताची दृष्टि संकुचित झाली ते काढून टाकणें इतकाच होय. जपानांतील खानदानीची मिजास भोगणाऱ्या सरदारांनीं जेव्हां आपली खोटी श्रेष्ठत्वबुद्धि टाकिली व विशिष्ट हक्क सोडून देण्याची तयारी दाखविली तेव्हांच जपानांत राष्ट्रीयत्व हें पायावर उभें राहिलें. ब्राह्मणवर्गानेंहि तोच कित्ता गिरविला पाहिजे. उलट पक्षीं हल्लींच्यासारख्या बिकट प्रसंगीं ब्राह्मणाला परावलंबी व परोपजीवि हो असें सांगणें म्हणजे त्याला आत्मघाताचा उत्कृष्ट उपाय सांगणेंच होय !

---

## ११३. संततिनियमन व वैवाहिक जीवन

( वरील विषयावर ता. २६ जानेवारी १९३५ रोजीं पुणें, टि. स्मा. मंदिरांत श्री. कुळकर्णी यांचें व्याख्यान झालें. त्या प्रसंगीं अध्यक्ष या नात्यानें केलेलें भाषण. )

व्याख्याते रा. कुलकर्णी यांनीं ' वैवाहिक जीवन व संततिनियमन ' असा सजोड विषय घेतला, यामुळें त्यांतील दोनहि गोष्टींची चर्चा होणें अपरिहार्य होतें. संततिनियमन हा माझा मुख्य विषय नाहीं असें त्यांनीं म्हटलें तरी, संततिनियमन हें साध्य व त्याचें साधन म्हणून वैवाहिक जीवनाची चर्चा त्यांनीं केली. आणि त्यांनीं ही चर्चा उपस्थितच केली म्हणून त्यांचें माझें मत जुळतें कोठें व मतभेद कोठें आहे, हें स्पष्ट करून सांगणें वावगें होणार नाहीं. त्यांनीं स्वत: जरी आपल्या युक्तिवादाची साखळी नीट मांडून दाखविली नाहीं तरी, त्या साखळींतील दुवे, त्यांचे म्हणून, मी मांडून दाखवितों ते असे-( १ ) समाजहितदृष्ट्या हिंदु-

स्थानाची लोकसंख्या फाजील वाढत आहे ती कमी झाली पाहिजे. (२) जाणूनबुजून संततिनियमन केल्याशिवाय ही लोकसंख्येची वाढ कमी होणार नाहीं. ( ३ ) संततिनियमन होण्याचें एक मुख्य साधन हें कीं, स्त्री–पुरुषसंबंधांत प्रतिषेध किंवा नकार यशस्वी करण्याला, अधिकारानें व हक्कानें, स्त्रीला पात्रता प्राप्त झाली पाहिजे. ( ४ ) ही पात्रता प्राप्त होण्याला भारतीय स्त्रियांना आर्थिक स्वातंत्र्य व स्वावलंबन अधिक मिळालें पाहिजे. ( ५ ) वरील गोष्ट घडली म्हणजे स्त्री व पुरुष यांचा संबंध बराचसा तोडून संततिनियमन साधतां येईल.

रा. कुलकर्णी यांनीं एक गोष्ट आज व्याख्यानांत सांगितली नाहीं. पण मीं ती त्यांजकडून ऐकिली आहे. ती ही कीं, हा संबंध तोडण्याकरितां स्त्री–पुरुषांनीं वेगवेगळ्या ठिकाणीं नोकऱ्या पत्कराव्या, व ती एका गांवांत असली तरी स्त्रियांचे क्लब वेगळे व पुरुषांचे क्लब वेगळे असें करून सर्व दैनंदिन व्यवहार होईल तितका वेगळा ठेवावा ! आतां या सर्व विचारसरणींत मतैक्य व मतभेद कोठें होऊं शकतो हें पाहूं.

हिंदुस्थानाला दारिद्रय प्राप्त झालें आहे. त्याच्या धनोत्पादनाच्या शक्तीच्या मानानें लोकसंख्येचें प्रमाण फाजील वाढतें आहे. ही गोष्ट कदाचित् निर्विवाद समजूं.

या सामुदायिक हिताशिवाय एक व्यक्तिहित किंवा वर्गहित लक्षांत घेतां येतें. व त्या दृष्टीनें लोकसंख्येच्या वाढीचें नियंत्रण म्हणजे संततिनियमन अगदींच निर्विवाद ठरतें. तें हित म्हणजे स्त्रियांचें आरोग्य. या दृष्टीनें पाहतां या विषयाची चर्चा करण्याचा खरा अधिकार स्त्री–वर्गालाच प्राप्त होतो. प्रसूतीची आपत्ति पुरुषवर्गाला नाहीं; व तिचे परिणाम व दु:ख भोगण्याचें जर एकट्या स्त्रीवर्गाच्या नशिबीं येतें, तर आपणाला प्रसूति म्हणजे संतति हवी कीं नको हें ठरविण्याचा व त्या ठरावाची अंमलबजावणी करण्याचा अधिकार स्त्रियांनाच असला पाहिजे हें उघड आहे. मग प्रश्न असा कीं, स्त्रियांचा हा हक्क मानला तरी स्त्रियांच्या इच्छेप्रमाणें प्रसूति टाळण्याचीं साधनें कोणतीं ? व जो मतभेद दिसून येतो तो या साधनाविषयींच दिसून येतो.

हीं साधनें दोन प्रकारचीं म्हणजे एक नैसर्गिक व दुसरी कृत्रिम. नैस-

र्गिक साधन म्हणजे ब्रह्मचर्य हें उघड ठरतें, व साधन म्हणून त्याच्या उपदेशाला कोणीच हरकत घेत नाहीं. मग इतर उपदेशाप्रमाणें तो किती अंशांनीं सफळ व्हावयाचा तो होवो. नैसर्गिक साधनांची चर्चा उघडपणें होते तशी कृत्रिम साधनांची चर्चा उघडपणें होणें कठिण असतें. किंबहुना ती उघडपणें करणें चांगलेंहि नाहीं. स्त्रीला जशी मर्यादा किंवा पडदपोशी ही भूषणास्पद मानिली जाते, तशीच प्रसूतिप्रतिबंधक साधनांच्या जाहीर चर्चेलाहि मर्यादा घातली, संभाळली किंवा पडदपोशी राखिली, तर या विशिष्ट नवमतप्रकाराविषयीं लोकांचा जो पूर्वदूषित ग्रह आहे, त्याची बाधा तितकीशी होणार नाहीं. शिवाय शास्त्रीय चर्चेची कितीहि ऐट आणिली तरी, या कृत्रिम साधनांची जाहीर चर्चा करणारा व ऐकणारा दोघांनाहि खजील व्हावें लागतें. म्हणून ही चर्चा समवयस्क मित्रांमध्यें किंवा विश्वस्त सल्लागाराबरोबर झालेली अधिक बरी. कृत्रिम साधनांविषयीं जो एक आक्षेप घेण्यांत येतो तो हा कीं, त्या साधनांचा दुरुपयोग होतो. पण चांगल्या साधनांचा वाईट उपयोग होण्याच्या उदाहरणांनीं जग भरलेलेंच आहे. येथें अर्थात् वैद्यकशास्त्र सुटून नीतिशास्त्रविचाराला प्रारंभ होतो. शिवाय व्याख्याते कुलकर्णी यांनीं देखील वैद्यकीय स्वरूपाच्या कृत्रिम साधनांचा मुद्दा चर्चेतून अजिबात वगळला, तेव्हां तो अर्थात् बाजूलाच पडतो. आपणहि त्याची अधिक चर्चा करण्याचें कारण नाहीं.

पण रा. कुलकर्णी यांनीं वैद्यकीय नाहीं अशा एका वेगळ्या कृत्रिम उपायावर भर दिला, तो अर्थशास्त्रीय म्हणतां येईल. त्यांचा उपाय हा कीं, स्त्रियांना आर्थिक स्वातंत्र्य प्राप्त करून द्यावें, व स्त्री-पुरुषांनीं बहुतेक काळ वेगळे वेगळे राहून आपली संगति शक्य तितकी कमी करावी. पण मी प्रांजलपणें सांगतों कीं, रा. कुलकर्णी यांचा हा उपाय सर्वस्वीं निष्फल होय असें माझें मत आहे. त्यांचा उपाय काल्पनिक व अव्यवहार्य आहे. तो कधींहि अमलांत येऊं शकणार नाहीं व त्याचा उपयोग होणार नाहीं. ते सुचवितात ही व्यवस्था कुटुंबनाशाची परमावधि होय. विवाहित स्त्रीपुरुषांनीं एकत्र कुटुंब म्हणून संसार करावयाचा नाहीं तर मग विवाह तरी करावयाचा कशाला ! आणि लग्नसंस्था मोडून, राष्ट्रांतील सरकारनें

अनिर्वाह्य संतति जगवून वाढविण्याकरितां, मुलांचे पांजरपोळ सरकारी खर्चानें चालविण्याची कल्पना कित्येक सामाजिक तत्त्वज्ञांनीं कागदावर रंगवून मांडलेलीच आहे ! मग कुलकर्णी यांनीं विवाहसंस्था नको असेंच स्वच्छ कां म्हणूं नये ? आणि जर विवाह करूनहि बारमास पुरुषांचे क्लब वेगळे व स्त्रियांचे क्लब वेगळे ठेवावयाचे, तर समाजाच्या एकापुढील एक पिढ्या निर्माण कशा व्हावयाच्या ? समाज जिवंत राहण्याकरितां जरूर तितकेच स्त्री–पुरुष–संबंध सरकारी हुकुमानें किंवा कायद्यानें घडवून आणण्याकरितां, पंचांगें किंवा डायऱ्या बनवावयाच्या कीं काय ? कौटुंबिक जीवनांत कुलकर्ण्यांच्या दृष्टीनें निरुपद्रवी ठरेल असें जें स्त्रीपुरुष-साहचर्य त्याला तरी निदान त्यांनीं हरकत कां घ्यावी ?

आणि खरें पाहिलें तर या कौटुंबिक जीवनांतील सार म्हणजे हें साहचर्यच होय. आपली जुनी संयुक्त कुटुंबव्यवस्था हळूं हळूं नाहींशी होत चालली आहे. नव्या परिस्थितींत ती मोडणें हें बरेचसें अपरिहार्यहि आहे. कायदा, सामाजिक परिस्थिति, शिक्षण, स्वातंत्र्यबुद्धि व अभिरुचि इत्यादि गोष्टींनीं यापुढें जुन्या पद्धतीचीं मोठीं अविभक्त कुटुंबें चालू राहणें शक्य नाहीं. किंबहुना मुलामुलींचीं लग्नें झाल्यावर त्यांनीं वेगळीं घरें करून राहणें हें सोयीच म्हणून शिफारस करण्यासारखेंहि आहे. परंतु भौतिक शास्त्रांतील परमाणु हा जसा अविभाज्य ठरतो, त्याप्रमाणें विवाहित स्त्री-पुरुष यांची जोडी, म्हणजे या दोघांपुरतें व या दोघांनीं बनणारें कुटुंब, हा समाजघटनेंतील अविभाज्य परमाणूच केव्हांहि राहील असें वाटतें. पण यांची ही जोडी न फोडतां आली तरी, तो बेसुमार संतति निर्माण करण्याचा परवाना आहे असें नव्याप्रमाणें जुनें शास्त्रहि सांगत नाहीं. निदान आमच्या शास्त्रांत "पृथक् शय्या तु नारीणां अशस्त्रवध उच्यते" या वचनाप्रमाणेंच "दारान् अपत्याय तपोर्थमायुः" अशा अर्थाचें वचन सांपडतें. विवाहित स्त्रीपुरुषांना पृथक् शय्या निषिद्ध म्हणून सांगितली तरी, विवाहाचा हेतूच केवळ अपत्यउत्पादन होय हेंहि सांगितल्यानें, त्या संयुक्त शय्येच्या दुष्परिणामावर योग्य तें निवृत्तिपर नियंत्रण आपोआपच पडतें कीं नाहीं ?

हें नियंत्रण केवळ स्त्रियांना आर्थिक स्वातंत्र्य मिळवून दिल्यानें पडेल,

हें म्हणणें तर्कशुद्ध नाहीं. संततिउत्पादन करण्याचे कामीं अधिक दोषी कोण ? म्हणजे कोणावर कोणाचा जुलूम होतो ? हें ठरविणें शक्य असलें तरी, स्त्रियांच्या अंगीं पतीचा प्रतिषेध करण्याची पात्रता व सामर्थ्य केवळ त्यांना एखादी स्वतंत्र नोकरी असली, किंवा त्यांच्या नांवचें एखादें बँक-बुक ठेविलें तर त्यानें येईल काय ? किंवा घरच्या हिशेबाची वही लिहितांना, बायकोच्या सर्वप्रकारच्या घरकामाच्या मजुरीकरितां नोकरीकरितां तिचा पगार मनानें ठरवून, हिशेबी जमा धरून, तो तिला दाखवीत गेल्यानें ती प्रतिषेधाची प्रतिकाराची पात्रता येईल काय ? कदाचित् या प्रतिषेधाची प्रतिकाराची आवश्यकता उभयपक्षींहि असेल ! व ती कौटुंबिक प्रेम ममता इत्यादि गोष्टींत जशी स्त्रियांना येईल तशी त्यांची म्हणून मिळकत करून दिल्यानें येणार नाहीं. स्त्रियांचें आर्थिक स्वातंत्र्य हा सामाजिक अर्थशास्त्रांतील केवळ एक तात्त्विक व कांहींसा पंडितगिरीचा सिद्धान्त ठरतो. आमच्याइकडे ती कल्पना नवी म्हणून चित्ताकर्षक वाटो; परंतु दोन वर्षांपूर्वी प्रसिद्ध झालेल्या एका इंग्रजी ग्रंथांत याविषयीं मला काय आढळलें तें सांगतों. तें असें आढळतें कीं, इंग्लंडांत आजच्या स्थितींत नवऱ्यानें मिळविणें व स्त्रीनें त्याचा योग्य व्यय करून संसार दक्षतेनें करणें यांत स्त्रीला स्वाभिमानहानि वाटत नाहीं.

या माहितीचें मला तरी आश्चर्य वाटलें नाहीं. कारण इंग्लंड झालें तरी तेथेंहि कुटुंबव्यवस्था गृहीत धरली आहे. अर्थात् त्या कुटुंबांतील पति व पत्नी हे आपला संसार दोघांचा मिळून आहे असें मानीत असतील, तर स्त्रियांनीं कुटुंबाच्या पिशवींतील पैसा स्वतःकरितां खर्च करणें याला पति माघार येणार नाहीं. उलट आपणाकरितां कांहीं वेगळी व्यवस्था असावी किंवा आपण आर्थिकदृष्ट्या परतंत्र आहों, असें पत्नीला हृदयशल्य वाटूं नये हें अगदीं स्वाभाविक आहे. टाइम्समध्यें प्रसिद्ध होणारीं पॉपचीं चित्रें पाहा किंवा तिकडील इतर सामाजिक वाङ्मय वाचा ! त्यांत पुरुषांच्या खर्चिकपणापेक्षां स्त्रियांचा उधळेपणाच संसाराला अधिक जाचक होतो, असा ध्वनि निघालेला ऐकूं येईल.

तात्पर्य, संसारसुख हा शास्त्रापेक्षां कलेचाच विषय अधिक ठरेल. म्हणजे तात्त्विक सिद्धान्तांनीं काम भागणार नाहीं; तर कलेच्या कुशल

नाजूक हातानेंच तें कार्य सिद्ध होईल. मनुष्याच्या वृत्ति हें संसारचित्र रंगविण्याला उपयोगी असे रंग आहेत. हें चित्र चांगलें रंगण्यांत प्रेम, ममता इत्यादि सात्त्विक गुणांचे रंगच काम देतात. ही कला या गुणांनीं ज्या कुटुंबांत साधते त्यांत आधीं कोणी जुलूमजबरदस्ती करीत नाहीं; व दुसरा कोणी ती झाली अशी मानीत नाहीं. उलट जेथें प्रेम व ममता यांच्या अभावामुळें वैवाहिक सुखाची कला साध्य होत नाहीं, तेथें स्त्रीला आर्थिक स्वातंत्र्य मिळून तरी तें तिला कितपत सुख देईल ? प्रेमळ पति हा पत्नीला न कळतहि तिच्या आर्थिक स्वातंत्र्याची खबरदारी घेतो. तिच्या स्वाभिमानी जीतिवाची काळजी करितो. आणि खरी प्रेमळ पत्नी ही माझी तरतूद अमूक एक वेगळी करा असें पतीच्या जीवमानांत म्हणत नाहीं. पतिपत्नींच्या दरम्यान न्यायाची अंमलबजावणी प्रेम व ममता यांनीं होईल ती कायदेशीर व्यवस्थेनें होणार नाहीं. कदाचित् पतिपत्नी-संबंध प्रेमाच्या अभावामुळें नष्ट व्हावे अशी इच्छा झाल्यास मात्र कायद्याची जरूरी असते; व ती मदत आतां मिळण्याची सोय अधिकाधिक होऊं लागली आहे. पण मौज ही कीं, नुकत्याच झालेल्या एका प्रकरणांत एका कुलीन स्त्रीनें पतीच्या जुलमाला कंटाळून घटस्फोट मागितला नाहीं, तर पतीनें ब्रह्मचर्याचें व्रत स्वीकारलें म्हणून ! संततिनियमनवाल्यांनाहि हें दृश्य पटण्यासारखें नाहीं. त्याचें कारण असें कीं, नियमन म्हणजे 'अतिरेकावर नियंत्रण'. आणि पूर्वी सांगितल्याप्रमाणें व्यवहारांत नियंत्रण हें योग्य मर्यादेपुढें यशस्वी होणें ही कला आहे, तें नुसतें शास्त्र नव्हे. नियमनशास्त्रच हवें असेल तर तें हिंदु-धर्म-ग्रंथांतूनहि हवें तितकें पुरेसें याविषयीं सांपडेल. नवमतवाद्यांना केवळ वैवाहिक स्थितींतील अशा नियंत्रणाचा उपदेश करावयाचा असेल तर त्यांना तो त्या शास्त्राचा आधार घेऊनहि करतां येईल. मात्र त्या शास्त्रानें पत्नीकरितां वेगळें बँक-बुक ठेवून तिला तें दाखविणें हा संततिनियमनाचा उपाय म्हणून सांगितलेला नाहीं.

नवमतवाद्यासंबंधानें या बाबतींत लोकांचा एक समज होतो. तो असा कीं, त्यांना जें संतातिनियमन पाहिजे ते वैवाहिक स्थितींतील नव्हे, तर अवैवाहिक स्थितींतील ! अशा गोष्टींचा उघड उपदेश सहजच निंदास्पद ठरतो; व एक करूं जाता भलतेंच होतें. या दुसऱ्या प्रकारच्या लोकांनीं

आपलें विचारस्वातंत्र्य पणाला लाविलेलें दिसतें. एरवीं ते आपल्या अशा विचारांची निदान योग्य पडदपोशी तरी राखते. आज होत आहे तें असें कीं, विद्यमान वैवाहिक स्थितीच्या व्यवस्थेंत जी इकडे तिकडे थोडीबहुत सुधारणा पाहिजे ती न सुचवितां, कधीं काळीं शेकडों वर्षांनीं प्रत्ययास येणारी, किंवा न येणारीहि, गोष्ट आज अमलांत आणूं पाहाणारे हे लोक स्वतःचे हसें मात्र करून घेतात ! यामुळें अशा विषयांतील ललितवाङ्मय हें या जगासंबंधीं आहे असें वाटतच नाहीं. त्यांत कोणाला रम्यता वाटली तर ती केवळ कल्पनेची वाटते. आणि जी रम्यता प्रत्यक्ष समाजजीवनाला धरून असत नाहीं तिच्याविषयीं प्रेम कसें वाटावें ! उलट कांहींना विषादच वाटतो. शिवाय राजकारणांत स्वातंत्र्य हें ध्येय जसें निर्विवाद ठरतें, आणि त्याशीं असलेल्या आजच्या परतंत्र स्थितीचा विरोध पाहून दुःख वाटलें तरी या ध्येयाची उपासना योग्य ठरते, तसें कोणत्याहि सामाजिक सुधारणेविषयीं नाहीं. अमुक एकच सामाजिक सुधारणा हें त्रिकालाबाधित निर्विवादित ध्येय होत नाहीं. राजकारणांत स्वातंत्र्याच्या ध्येयाला पर्याय खपत नाहीं. पण समाजसुधारणेंत एक सुधारणाप्रकार दुसऱ्या प्रकारचा पर्याय होऊं शकतो. अशा कांहीं सूक्ष्म दृष्टीनें संततिनियमनवाले कांहीं बोलतील लिहितील तर त्यांचें म्हणणें लोकांना अधिकाधिक पटेल.

---

## ११४. दर्शनी चित्रांनीं ताळ सोडला !

परवां माझे हातीं 'यशवंत' मासिकाचा ताजा अंक आला. त्यावरील दर्शनी चित्र पाहातांच तो केराच्या टोपलींत फेकून द्यावासा वाटला ! परंतु आंतील कांहीं मजकूर वाचनीय दिसल्यामुळें मीं बाकीचा अंक ठेवून चित्र असलेलें मुखपृष्ठ फाडून टोपलींत टाकलेंच.

मी नेहमीं कोणाच्याहि कृत्यावर सद्हेतूनें पांघरूण घालणारा, निदान त्याच्या हेतूला वाईट न म्हणतां कदाचित् त्याची ती चूक असेल अशा दृष्टीनेंच पाहणारा आहे. म्हणून यशवंत मासिकाच्या ताज्या अंकावरील चित्रासंबंधानें मीं अशी कल्पना केली कीं, मासिकाच्या संपादकांना असलें चित्र वाचकांच्या हातीं देण्याची इच्छा जाणून बुजून कशी होईल ! अर्थात् चित्र निवडतांना, किंवा तें छापावयास देतांना, किंवा शेवटीं मासिकावर डकवितांना, कांहीं तरी मोठी चूक न कळत झाली असावी. एरवीं शरिराच्या दर्शनी भागावरील सर्व पदरच्या पदर कंबरेपर्यंत खालीं टाकून देऊन, वक्षःस्थळाचें दर्शन देणारें हें स्त्रीचें चित्र कसें छापलें गेलें असतें ?

दुसरी एक कल्पना अशी कीं, श्रीकृष्ण व राधा यांचें मला वाटतें रविवर्म्यानें काढलेलें असें एक चित्र आहे कीं, त्यांत असाच राधेचा पदर खालीं पडलेला आहे. तेंहि चित्र अश्लील या सदराखालीं येण्या-सारखेंच आहे. पण त्यांत कलेच्या दृष्टीनें चित्र तरी इतकें चांगलें आहे कीं, कलेच्या गुणांत अश्लीलतेचा दोष बुडून गेला असें मानावें असें वाचकाला वाटे. पण त्या चित्राचें अनुकरण अशा रीतीनें करणें हें आधींच गौण; व त्यांतूनहि तें खरोखरी अनुकरण असल्यास साधलेंहि नाहीं. देवदेवतांचीं चित्रें पाहातांना ' न देवचरितं चरेत् ' इतकी तरी बुद्धि कायम असते. पण देवचरित व कलावैभव या दोहोंचा उतारा नसलेलें व केवळ अश्लील-विषमय असें गचाळ चित्र यशवंत मासिकावर घालून तें स्त्रीपुरुषांच्या हातीं देण्यांत आलें आहे याबद्दल कोणीं कितीहि रागानें निषेध केला तरी तो पुरेसा होणार नाहीं ! रत्नाकराच्या 'ओलेती'च्या चित्रावर ताण करण्याकरितां यशवंतानें जर हें चित्र दिलें असेल तर हा चुरशीचा सामना आतां थांबावा अशी वाचकवर्गातर्फे त्यांना मी नम्र विनंति करतों, व ती मान्य करण्याची त्यांनीं कृपा करावी. बिचारी ओलेती पाठमोरी तरी होती! आणि त्या चित्रातर्फें असें म्हणतां येईल कीं कोणी न पाहील अशा ठिकाणीं आंग धुऊन ती विनयशील रीतीनें वागत असतां चुकून वाचकाच्या दृष्टीला पडली ! ओलेतीच्या चित्रावर टीका झाली ती कांहीं बरोबर होती. पण तिच्या समर्थनपर आलेल्या उत्तरां-तहि थोडासा ग्राह्यांश होता. पण त्या प्रकरणांतील आक्षेप व समर्थन यांची

वजाबाकी करून शिल्लक काय उरतें याचा न्याय-निवाडा आज मी करीत नाहीं. तर त्या चित्राचें समर्थन करणाऱ्या स्त्रियांना व गृहस्थांना याहि चित्राविषयीं त्यांनीं आपले विचार फिरून एक वेळ प्रकट करावे अशी विनंति करतों.

---

## ११५. ' मध्यम-वैश्य-वर्ण. '

(पुणें येथें ता. ५ सप्टेंबर १९११ रोजीं दिलेलें व्याख्यान)

" प्रस्तुत विषय प्रस्तुत स्थलाला उचित म्हणून मीं पसंत केला आहे. व्यापारपेठेंत गुजरींच्या वेळीं दुसरा कोणता विषय सुचणार ? अन्य वेळींहि या पेठेंत क्षत्रियांच्या शस्त्रांचा खणखणाट किंवा ब्रह्मकर्मरत ब्राह्मणांच्या पळीपंचपात्रीचा खडखडाट ऐकूं येत नाहीं; तर चलनी नाण्यांचा छणछणाटच ऐकूं येतो. मुंबईच्या गिरणीच्या धुराचा प्रत्येक कण कोळशाचा व काळा खरा, परंतु परिणामदृष्टीनें तो प्रत्येक सोन्याचा पिंवळा कणच मानिला पाहिजे. त्याचप्रमाणें रविवार पेठेंतील गुजरीची गडबड व्याख्यानास व्यत्यय करणारी असली तरी व्यापाराच्या घडामोडीची दर्शक असल्यामुळें ती इष्टच आहे.

वैश्यवर्णास मी मध्यम वर्णच म्हणतों. कारण त्याच्या एका अंगास ब्राह्मण व क्षत्रिय हे दोन वर्ण असले तरी कांहीं दृष्टींनीं तो एकच वर्ण आहे; व दुसऱ्या बाजूस शूद्र वर्ण आहे. वर्णांच्या उत्पत्तीबद्दल दोन प्रकारच्या उपपत्ती आहेत. चारही वर्ण अनादि व जन्मसिद्ध आहेत ही एक व हा भेद अनादि जन्मसिद्ध नसतां कालांतर व विशिष्ट कर्मपरंपरा यांनीं तो रूढ झाला ही दुसरी. वचनेंच पाहूं गेलों तर दोन्ही बाजूंचीं सांपडतात. शांतिपर्वांत (अ. १८८-८९) भृगु व भरद्वाज यांच्या संवादरूपानें कर्मांमुळें वर्णभेद होतो असें सांगितलें आहे.-न विशेषोस्ति वर्णानां सर्वं ब्राह्ममिदम् जगत् । ब्रह्मणा पूर्वसृष्टं हि कर्मणा वर्णताम् गतम् ॥ वायुपुराणांत असें म्हटलें आहे कीं, पूर्वीं कृतयुगांत पुण्य व पाप या दोन्ही

प्रकारच्या कर्मांविषयीं अप्रवृत्ति असून वर्णाश्रमव्यवस्था नव्हती व अर्थात् संकरहि नव्हता. कसेंहि असलें तरी पुढें भेद झाला ही गोष्ट खरी. पुरुषसूक्तांतील विराटपुरुष–देहाच्या चार निरनिराळ्या स्थानांपासून चार वर्ण झाल्याचा उल्लेख सिद्धच आहे. वेदांतील एका उषासूक्तांत चातुर्वर्ण्यभेदाचा ध्वनि निघतो; त्यांत ब्राह्मण हा कीर्तिप्रिय, क्षत्रिय राज्य-वैभवप्रिय, वैश्य धनसंपत्तिप्रिय, व शूद्र सेवापर मानला असून उषा ही येऊन या चारहि वर्णांस आपापल्या कामास प्रवृत्त करते असा अर्थ त्यांतून काढतां येण्यासारखा आहे. असो. पहिल्या दोन वर्णांचीं कर्मे निरंतर पृथक्‌च राहिलीं होतीं असें नाहीं. या बाबतींत अनेक स्थित्यंतरें घडून आलीं. क्षत्रिय व ब्राह्मण यांचीं पुष्कळ भांडणेंहि झालीं. यज्ञकर्म आणि वेदाध्ययन यांचा अधिकार ब्राह्मण व क्षत्रिय दोघेहि द्विज असल्यानें दोघांसहि सारखा होता. परंतु यज्ञसंबंधीं विशेष अधिकार व ब्रह्मविद्येतील गुरुत्व कोणाकडे असावें याविषयींचीं तीं भांडणें होतीं. ब्रह्मविद्येमध्यें क्षत्रियहि कांहीं कमी नव्हते. विश्वामित्र, जनक, धर्मराज, श्रीकृष्ण, बुद्ध हे सर्व क्षत्रियच होते. ऐतरेय ब्राह्मणामध्यें या वादाच्या मनोरंजक उपकथा वाचावयास सांपडतात. परंतु एकंदरीनें यज्ञकर्म व ब्रह्मविद्या यांसंबंधींचें वर्चस्व या झगडण्यामध्यें अखेर ब्राह्मणांकडे आलें हें उघड दिसतें. " ब्राह्मण व क्षत्रिय यांच्यापासून यज्ञ पळून दूर जाऊं लागला. ब्रह्म व क्षत्र यांनीं तो आपल्यास मिळविण्याकरितां आपापलीं आयुधें घेऊन त्याचा पाठलाग केला. रथ, घोडे, चिलखत, धनुष्यबाण, वगैरे क्षत्रिय आयुधें पाहून यज्ञ घाबरून दूर पळाला तो क्षत्रियांस आवरेना, परंतु ब्रह्माणानें त्यास गाठिलें; व त्याच्या हातीं फक्त यज्ञकर्मसंबंधींच उपकरणें आहेत, याहून दुसरीं हत्यारें नाहींत, असें पाहून यज्ञ ब्रह्माच्या हस्तगत झाला व त्याजवळ कायम राहिला. " या कविकथानकाचें तात्पर्य उघडच आहे. दुसरेपक्षीं श्रीपरशुरामासारख्या ब्राह्मणांनींहि वेळोवेळीं हातीं शस्त्र धरून क्षत्रियांचीं कर्मे केलीं परंतु अखेर ब्राह्मणाकडे ब्रह्मविद्या, क्षत्रियाकडे शस्त्रविद्या हाच भेद रूढ व कायम झाला. क्षत्रियांस यज्ञ करावयाचा झाल्यास त्याच्या सांगतासिद्धीस ब्राह्मणांस बोलवावें; व ब्राह्मणांच्या ब्रह्मकर्मास राक्षसांपासून पीडा होऊं लागली म्हणजे त्यांनीं क्षत्रियांस आपल्या संरक्षणास

बोलवावें, असें पर्यवसान झालें. युरोपखंडांतहि ब्रह्मविद्यावाले व क्षत्रिय यांचें असेंच भांडण असे. मध्ययुगापर्यंत हें भांडण सर्रास चालू होतें. इंग्लंडचा पहिला हेनरी राजा यास खिस्ती ब्राह्मण थॉमस ए बेकेट यानें सत्तेच्या भांडणांत इतकें भंडावून सोडलें कीं, ' अरे या भटापासून माझें कोणी रक्षण करणारा नाहीं काय ? ' असे उद्गार राजानें काढले व चार राजनिष्ठ सरदारांनीं बेकेट याचा खून करून राजास जाचांतून सोडविलें ! हें भांडण इटली देशांत एकोणिसाव्या शतकापर्यंत चाललें होतें; व खिस्ती धर्मगुरु जो पोप त्याची ऐहिक महत्त्वाकांक्षा हीच इटालिअन राष्ट्राच्या एकीकरणास व पुनरुज्जीवनास अखेरपर्यंत आड आली. असो; कालांतरानें उभयतांच्या या निरनिराळ्या कर्मांत विशिष्टीकरणामुळें व चिरपरिचयामुळें नैपुण्य आलें; आणि सामान्य श्रमविभागाच्या दृष्टीनेंहि ती एक सोयच झाली. वर्णभेद आहे असा कोणास मानावयाचाच झाला तरी त्याच्या योगानें समाजाचे जे भाग होतात ते जी. आय्. पी. रेल्वेच्या जुन्या कंपार्टमेन्टाप्रमाणें नसून हल्लींच्या मेलगाडींतील कंपार्टमेन्टाप्रमाणें आहेत. श्रीमंत व गरीब हे आपल्या ऐपतीप्रमाणें निरनिराळ्या जागीं बसलेले दिसतील. परंतु पहिल्या, दुसऱ्या व तिसऱ्या वर्गांस आगगाडी ऐनवेगानें चालली असतांहि जरूर तर एकमेकांतून खुशाल वावरतां येतें व ज्याची त्याची म्हणून वेगळी जागा असली तरी संकट व अपघात या प्रसंगीं एका क्षणांत हातांत हात घालून परस्परांस मदत करणें त्यांना अशक्य नसतें. ब्राह्मण व क्षत्रिय या वर्णांप्रमाणें ब्राह्मण व वैश्य यांजमध्यें पूर्वीं केव्हां तंटा झाल्याचें दिसून येत नाहीं. राष्ट्रांतील संपत्ती निर्माण करणें व राखणें हें दिसण्यांत महत्त्वाकांक्षा नसणारें परंतु समाजास अतिशय उपयुक्त असें काम वैश्यवर्ण अनंतकाल करीत आला आहे. वैश्य वर्ण हा कधीं फार चढलाहि नाहीं व कधीं फार पडलाहि नाहीं. तो नित्य व नेमस्त असून पशुरक्षण, कुसीद ( व्याजबट्टा ), वणिक्पथ ( व्यापार ) वगैरे गोष्टी करीत राहिला आहे. या दृष्टीनें त्यास राष्ट्रीय महत्त्व सदैव आहेच. परंतु हिंदुस्थानांतील परिस्थिति अलीकडे अगदीं बदलून गेल्यामुळें वैश्यवर्णाचें महत्त्व वाढलेंहि आहे. आजच्या या नव्या परिस्थितींत क्षत्रिय वर्णाचा लोप, कित्येक म्हणतात त्याप्रमाणें, झाला नसला

तरी, क्षत्रिय वृत्तीच्या गुणांच्या उपयोगाचें कारण इंग्रजी राज्यांत सर्वस्वीं नाहींसें झालें आहे ही गोष्ट निर्विवाद आहे. देशांत एकछत्री राज्य होऊन शांतता नांदत आहे; व परचक्र येणार असलें तरी त्याचें निवारण व देशांतील शांततेचें संरक्षण करण्याचें काम राज्यकर्त्यांनीं सर्व आपणांकडे घेतलें आहे! युरोपियन शिपायांच्या बागनिटा व हिंदुस्थानच्या सरहद्दीपलीकडील परके काळे लोक यांच्या बंदुका यांजवर आमच्या रक्षणाचा बराच भाग सरकारनें परस्पर सोंपविला आहे. दूरदृष्टीनें पहातां ही स्थिति कांहीं चांगली नाहीं; कारण क्षात्रतेज व शस्त्रनैपुण्य यांची व आमची फारकत झाल्यास तें आम्हांलाहि वाईट, व ज्या राजकर्त्यांस परचक्र आलेंच तर देशांतील राजनिष्ठ लोकांची मदत घ्यावी लागेल त्यांच्याहि दृष्टीनें तें वाईट आहे. तें कसेंहि असो, पण क्षत्रियवर्ण हिंदुस्थानांत आज लुप्तप्राय झाला आहे ही गोष्ट खरी. ब्राह्मणवर्णाचा ऱ्हास कांहींसा प्रसंगप्राप्त असला तरी कांहींसा ऐच्छिकहि आहे. स्मृतिग्रंथांतून सांगितलेलीं ब्राह्मणांचीं कर्में सुटत चाललीं हें केवळ परिस्थितीस महत्त्व देणाऱ्या लोकांच्या दृष्टीनें यथायोग्यच असलें तरी, ब्राह्मणत्वाच्या उज्ज्वल ध्येयाचा अभिमान बाळगण्याच्या दृष्टीनें तें गैर आहे. ब्राह्मणांनीं ब्राह्मणेतर वर्णांची कर्मदीक्षा घ्यावी, अथवा पूर्वीप्रमाणें दरिद्री पण विद्वान् राहून निरपेक्षरीतीनें समाजसेवा करावी, या परस्परविरोधी गोष्टींचा निर्णय करण्याची आणीबाणीची वेळ ब्राह्मणांवर आज आली आहे. पण येथें सांगण्याचा मुद्दा हा कीं, वरील दोन्ही वर्णांचें वैशिष्ट्य नाहींसें होऊन तिसऱ्या म्हणजे वैश्य वर्णास हल्लीं विशेष महत्त्व आलें आहे; व हें लक्षांत घेऊन कृषि, व्यापार वगैरे आपल्या कर्तव्यांत जरूर तें विशेष नैपुण्य वैश्य वर्णानें दाखवावें, अशी समाजाची अपेक्षा आहे. वैश्य वर्णाचें प्रत्यक्ष ब्रह्मविद्येंत नैपुण्य नसलें तरी, विषयगत (Objective) धर्मबुद्धीच्या सफलतेस त्यांची नेहमीं फार गरज असते. धर्म व अर्थ हे परस्परावलंबी आहेत. भारतांत वनपर्वामध्यें याचा विचार केलेला असून "सर्वथा धर्ममूलोर्थो धर्मश्चार्थपरिग्रहः । इतरेतरयोर्हनीतौ विद्धि मेघोदधी यथा" असा सर्वमान्य निर्णय सांगितलेला आहे. यथाधर्म कर्में होण्यापासून अर्थोत्पादनास मदत होते; व अर्थापासून हरतऱ्हेची व्यावहारिक धर्मबुद्धि सफळ होते. खुद्द धर्मबुद्धि मनोबाह्य असली तरी देवळें,

गोशाळा, अन्नसत्रें, औषधालयें, निराश्रितगृहें वगैरे परोपकारमिश्रित धर्मकृत्यें चालण्यास सर्वांतोपरि पैशाची गरज असतेच. अशा रीतीनें पहातां निरनिराळे वर्ण हे परस्परांस व एकंदरीनें समाजास उपकारकच होत. शरिरांत जशीं निरनिराळीं इंद्रियें व अवयव तसेच समाजास वर्ण होत. प्रत्येकाचे विशिष्ट गुण व अवगुण हे आहेतच. समाजास जहाजाची उपमा दिली असतां, ब्राह्मण व क्षत्रिय यांस शिडाची अवजाराची व वैश्य वर्णांस जहाजाच्या गाभाऱ्याची उपमा शोभेल. श्वेतवर्ण असें शीड वाऱ्यानें भरलें म्हणजे तें सुंदर दिसतें; व जहाजास एका किनाऱ्याहून दुसऱ्या किनाऱ्यावर जाण्यास लागणारी शक्ति पुरवितें. पण एखादे वेळीं वादळ झालें असतां शिडांत वारा भरून जहाज अनावर होऊन फुटण्याचाहि संभव असतो. ब्राह्मण व क्षत्रिय हे वर्ण शक्तिमान व महत्त्वाकांक्षी असल्यामुळें समाजाचें नेतृत्व त्यांच्याकडेच राहतें पण जहाजाच्या गाभाऱ्यास स्वतःची गति नसली तरी ज्याकरितां जहाजास शीड लावावयाचें व समुद्रावरच्या सफरी करावयाच्या ती मौल्यवान् संपत्ति याच गाभाऱ्यांत सांठविलेली असते, हें विसरतां कामा नये. आजच्या बदललेल्या परिस्थितींत देशांतील सांपत्तिक स्थिति सुधारण्याची जबाबदारी वैश्य वर्णाकडे आलेली आहे. ती पार पडण्यास इतर वर्ण यथाशक्ति साहाय्य देतीलच. परंतु वैश्य वर्णानें मात्र प्रसंग ओळखून देशाकरितां आपली काय असेल नसेल ती करामत करावयाची वेळ आली आहे.

---

# ११६ मालिनी--स्वयंवर

( केसरी, १९२७ )

महाराष्ट्रांतील प्रख्यात विद्वद्वर्य कै. डॉक्टर भांडारकर यांची नात मालिनीबाई पाणंदीकर यांनीं नुकताच जो गुलाबखान या मुसलमान गृहस्थाशीं विवाह केला, त्यामुळें हिंदुसमाजावर मोठाच आघात झाला असून ती आतां

एक सार्वजनिक चर्चेची बाब होऊन राहिली आहे. डॉक्टर भांडारकर व प्रार्थनासमाजाचे पुरस्कर्ते यांचा उद्देश हिंदुसमाजांत सुधारणा घडवून आणण्याचा होता; पण हिंदुत्व नष्ट करण्याचा खचित नव्हता ! यामुळें डॉक्टर भांडारकर यांच्या आत्म्यास या विवाहामुळें काय वाटेल याची कल्पना करणें अप्रस्तुत असलें तरी मालिनीबाईंच्या आप्तांना काय वाटत आहे हें सर्वांना माहीत आहे. " न हिंदुर्न यवनः " असली ही बकाली सुधारणा आपलें शेंपूट तोडून घेतलेल्या कित्येक मानभावी लोकांना रुचली असली तरी, हिंदुधर्माभिमानी खऱ्या प्रार्थनासमाजिस्टांनाहि ती कितपत आवडेल याची शंकाच आहे. परधर्मीयांशीं पदरजोड करणारी व हिंदुत्वाला मालिन्य आणणारी ही सुधारणा (?) एकांतिक अशा कट्ट्या सत्यशोधकांनाहि पसंत पडणार नाहीं, मग कट्ट्या हिंदुधर्माभिमान्यांच्या जिव्हारी ती शल्यासारखी झोंबली असेल यांत नवल काय ?

व्यक्तिस्वातंत्र्याच्या दृष्टीनें कोणी मनुष्य काय वाटेल तें करावयास मुखत्यार असेल तर त्यावर टीका करण्याचा समाजालाहि हक्क राहील. धार्मिक बाबतींत हिंदुसमाजाचें जीवित आज धोक्यांत आलें असतां, हिंदुधर्माचें पुरस्कर्ते व पुढारी यांचे अमानुष रीतीनें खून होत असतां, आणि हिंदु स्त्रियांच्या अब्रूची विटंबना होत असतां, एका सुप्रसिद्ध पुढाऱ्याच्या पौत्रीनें आपण होऊन स्वयंवराची माळ एका मुसलमानाच्या गळ्यांत घालावी हें हिंदुसमाजाचें लांछन कोण कसें धुवून काढणार ? व्यक्तीला वाटेल तें करण्याचें मात्र स्वातंत्र्य आहे, आणि समाजाला स्वतःविरुद्ध झालेल्या अत्याचाराचा निषेध करण्याचें स्वातंत्र्य नाहीं काय ? असल्या स्वाभिमानशून्य बेमुर्वतखोर कृत्याचा निषेध करण्याचा हक्क हिंदुसमाजास अलबत पोहोंचतो ! कित्येक पत्रकारांनीं या स्वयंवराचे मोठ्या फुशारकीनें समर्थन केलें आहे !—काय म्हणे " हिंदुसंघटनेपेक्षां ' हिंदु—मुसलमानसंघटना 'च अधिक हितपरिणामी आहे. निवडीचें क्षेत्र जितकें विस्तृत होईल तितकें व्यक्तिस्वातंत्र्याच्या व राष्ट्रीय भावनेच्या विकासाच्या दृष्टीनें श्रेयस्कर आहे !"

वरील लेखकांच्या विकृत विचारसरणीचें मुळींच आश्चर्य वाटत नाहीं. कारण त्यांची गेल्या ४०।५० वर्षांच्या सामाजिक वादांत पूर्वपरंपराच तशी आहे. त्यांच्या एकांतिक व अव्यवहार्य वादपद्धतीमुळें पूर्वीहि

समाजाचे व त्यांचें कधीं पटलें नाहीं व पुढेंहि फारसें पटेल असें वाटत नाहीं. समाजाची आजची वस्तुस्थिति, शक्याशक्यता, तारतम्य व व्यवहार या गोष्टी सोडून कसें चालेल? सुधारणा करावयाच्या असतात त्या तात्विक अनुमानापेक्षां वस्तुस्थितीकडे पाहूनच करावयाच्या असतात. आकाशांतील तार्‍यांकडे पाहून भूमीवर मार्ग आक्रमण करणारा मनुष्य विहिरींत अगर खड्डयांतच पडेल. व्यक्तिस्वातंत्र्याच्या तत्त्वामुळें पांचशें वर्षांनंतर हिंदुसमाजाचें स्वरूप काय होईल याची काळजी आज कशाला? मेकॉलेनें एके ठिकाणीं म्हटल्याप्रमाणें 'the serpent became the man and the man became the serpent' अशी स्थिात पुढें होणार असली तरी आज तसा विचार करणें हें व्यवहारशून्यपणाचें होईल. पोटजातींचें एकीकरण, हिंदुसंघटन याच गोष्टी आज परिस्थितीमुळें मान्य व रूढ होऊं शकतील. पण उद्यां कधीं काळीं भिन्नधर्मीय विवाहहि पचतील, रुचतील, व रूढ होऊं लागतील असें क्षणभर मान्य केलें तरी आज अशा गोष्टीबद्दल एकाद्याचें अभिनंदन करून सुधारणेच्या प्रगतीबद्दल नाचूं लागणें बाष्कळपणाचें नाहीं काय?

"मालिनीबाईंनीं आपला निश्चय शेवटास नेला हीच गोष्ट त्यांच्या मनोधैर्याबद्दल आदरबुद्धि उत्पन्न करणारी आहे" असें ज्ञानप्रकाशकारांनीं म्हटलें आहे. पण खरेंच पाहिलें तर यांत मालिनीबाईचें कसलें मनोधैर्य? खरें धैर्य ज्ञानप्रकाशकारांनीं दाखविलें त्याबद्दल त्यांचेंच अभिनंदन करणें जास्त युक्त आहे! मालिनीबाईच्या कृत्याच्या बुडाशीं स्वार्थ तरी होता; व स्वार्थाकरितां क्वचित् मनोधैर्य दाखविणें इष्ट व अवश्य असेल तर तें दाखविण्यास एखादा तयार होतोहि. पण खरेंच पाहा, ज्ञानप्रकाशकारांना अभिनंदन करून कोणता स्वार्थ साधावयाचा होता? उलट असें कीं, सर्व सुबुद्ध-निर्बुद्ध, सुधारक-दुर्धारक जग एका अबलेवर हत्यार उपसून तयार असतां तिच्या कृत्यांतील एकहि अवगुण न दाखवितां त्यांनीं तिची जाहीर रीतीनें पाठ थोपटली, हें केवढें मनोधैर्य!!

सुधारणा म्हणजे व्यक्ति व समाज यांचें एक तत्कालीन विशिष्ट समीकरण होय. केवळ बेगुमान व्यक्तिस्वातंत्र्य म्हणजे सुधारणा नव्हे. समाजाचें 'बहुमत' आपणाकडे वळवून घेणें किंवा तसा प्रयत्न करणें हेंच

समाजसुधारणेचें बीज आहे. समाजाचा अभिमान धरून समाजांत राहाणारांनाच खरे सुधारक म्हणतां येईल. समाजाला लाथ मारणारांना आम्ही हिंदुसमाजाची सुधारणा करतों म्हणण्याचा हक्क काय? सुधारणेचें हें बीज राष्ट्रीय पक्षानें ओळखलें आहे. बहुजनसमाजाविषयींची बुद्धि हाच समाजसुधारणेचा महत्त्वाचा घटक असून, राष्ट्रीय व नेमस्त यामध्यें मूलतः विचारसरणींत फरक यामुळेंच झाला आहे. पूर्वींच्या काळीं सुधारकपक्षाची सुधारणा घडवून आणण्याची पद्धत इतकी गर्ह्य होती कीं, त्यामुळें त्यांचें वर्तन उपहासास्पद होई. इतकेंच नव्हे, पण खऱ्या सुधारणा समाजांत रूढ होण्यासहि त्यामुळें अडथळा झालेला आहे. टिळकांनीं पूर्वी एकदां केसरींत लिहिल्याप्रमाणें "सोम्याची पोरगी कांहीं तरी भूलथापीनें गोम्याच्या पदरीं बांधणें ही कांहीं खरी सुधारणा नव्हे. पुण्यास जेव्हां स्त्रीशिक्षणासाठीं इंग्रजी पद्धतीनें चालविलेल्या शाळांची योजना झाली तेव्हांच या संस्था अशा पद्धतीनें चालविल्यास ख्रिस्ती मिशनऱ्यांची त्यांत मोठी सोय होईल असें सुधारकांस बजावण्यांत आलें होतें. लोक व टीकाकार मूर्ख आहेत अशा सबबीवर त्यांनीं या सावधगिरीच्या उपदेशाची उपेक्षा केली; आणि ठेंच लागल्यावरहि ते अजून पुरे सावध झाले नाहींत हें महाराष्ट्रांत कोणास नव्यानें सांगावयास नको." टिळकांच्या या उद्गारांची आजहि सत्यता पाहावयाची असल्यास ज्ञानप्रकाशकारांचा अग्रलेख हें अगदीं ताजें उदाहरण होय.

पंधरा वर्षांपूर्वी हिंदुविवाहासंबंधीं कायद्यांत बरेच अडथळे होते. पण आजच्या घटकेला कायदेशीर रीतीनेंहि हिंदुधर्मामध्यें अशी काय आडकाठी आहे कीं ज्यामुळें मालिनीबाईंना हिंदु राहूनच हिंदु गृहस्थाशीं लग्न लावतां आलें नसतें? कायद्याची हरकत नसतां आज त्यांनीं विनाकारण 'मीं हिंदु नाहीं' असें लिहून दिलें ही पुढच्या धर्मांतराची पहिली पायरी किंवा प्रथम तयारी आहे असें लोक साहजिक मानणार. ज्यांना मनोधैर्य नसतें तेच असलीं मधलीं विश्रांतिस्थळें अगर धर्मशाळा हुडकीत असतात. पोटजातींतील विवाह हे यापूर्वींच कायदेशीर मानले गेले असून अनुलोमविवाह कायदेशीर आहे असा निकाल नुकताच १९२२ सालीं 'बाई गुलाब विरुद्ध जीवनलाल' या खटल्यांत मुंबई हायकोर्टानें दिला आहे.

मनोधर्य दाखविण्याला हिंदूंचा इतका विस्तृत समाज काय अपुरा होता, म्हणून मालिनीबाईनीं वाडवडिलांचा धर्म अरुंद, अपुऱ्या, जुन्या कपड्या-प्रमाणें फेंकून देऊन एका मुसलमानाशीं निका लावला !

सरतेशेवटीं एकच बाब राहिली ती म्हणजे धर्मांतराची व त्यामुळेंच आज हिंदु लोकांच्या मनांत काहूर उत्पन्न झालें आहे. प्रेमाकरितां आज लग्न झालें तर उद्यां प्रेमाकरितां धर्मांतर होण्याला हरकत कोणती ! व उद्यां मालिनीबाई या मुमताझ बिबी होणार कीं नाहीं तें दिसतच आहे ! अनियमित स्वेच्छचारापेक्षां कोणत्याहि तऱ्हेचें का होईना पण लग्नबंधन बरें, याखेरीज एकहि गुण जमेच्या बाजूस धरण्यासारखा या लग्नांत दिसत नाहीं याचें वाईट वाटतें. खरें प्रेम म्हणजे काय याची शहानिशा करण्यांत अर्थ नाहीं. पण हिंदूंच्या एवढ्या समाजांत मालिनीबाईंना प्रेम करण्यास योग्य असा एकहि तरुण मिळाला नाहीं त्याअर्थी या स्वाभिमानशून्य प्रेमाची जात कांहीं वेगळीच असली पाहिजे यांत शंका नाहीं ! धर्मांतरा-मुळें बाटलेल्या एखाद्या हिंदूचें पतितपरावर्तन करुन त्याच्याशीं मालिनीबाईनीं विवाह केला असतां तर त्यांच्या मनोधैर्यापुढें कोणीहि मान लवविली असती. पण डॉ. भांडारकरांसारख्या थोर गृहस्थाच्या कुळांत जन्म व शिक्षण घेण्याचें सद्भाग्य लाभलेल्या एका कुमारिकेनें आपल्या जबाबदाऱ्या, हल्लींची परिस्थिति, आपल्या कृत्याचे समाजावर व स्त्रीशिक्षणावर होणारे परिणाम यांचा अल्पहि विचार न करतां आपल्या मनाच्या किंवा प्रेमाच्या लहरीस महत्त्व दिलें यांत व्यक्तिस्वातंत्र्य नसून हा निवळ स्वेच्छाचार आहे असेंच साताऱ्च्या 'ऐक्य' या सुधारक व नेमस्त पत्रानेंहि म्हटलें आहे. सामाजिक सुधारणा फुकाफुकी घडत नसतात. सुशिक्षित गृहस्थांवर आपल्या सच्चीरत्रानें सुधारणा लोकांच्या गळीं उतरविण्याची जबाबदारी असते. ती त्यांनींच लाथेनें दूर झुगारून दिली तर मग अज्ञ समाजास त्यांनीं कोणत्या तोंडानें हंसावें !

---

# ११७. समाज आणि राजकारण

(ता. १२ नव्हेंबर १९२४ रोजीं नागपुरच्या राजाराम लायब्ररींत, श्री. न. चिं. केळकर यांचें " समाज आणि राजकारण " या विषयावर डॉ० खरे यांच्या अध्यक्षतेखालीं व्याख्यान झालें. त्याचा सारांश)

मी आज राजकारणावर बोलणार नाहीं. पण मी जें कांहीं सांगणार आहे, त्यांत मानलें तर राजकारण आहे, न मानलें तर नाहीं. तरी मी प्रचलित राजकारणावर मात्र बोलणार नाहीं. आणि त्यावर बोलावयाला आज तें तसें ' वाहतें ' हि नाहीं; तें सध्यां तुंबून कुजलें (stagnant) आहे. मी समाज आणि राजकारण यांवर बोलणार आहे. आह्मां राजकारणांत पडणाऱ्यांची स्थिति मोठी चमत्कारिक होते; तिचें ठराविक शब्दांत वर्णन करतां येत नाहीं. आम्हांला तीन प्रकारचे अनुभव येतात. (१) लोक आम्हांला अधिक मान देतात; (२) ते अधिक भितात; व ( ३ ) आम्हांला अधिक त्याज्य अगर अस्पृश्य लेखतात. पण या तिहींतहि अतिशयोक्ति आहे आणि हें अयोग्य आहे. सामाजिक अगर इतर कार्यकर्त्यांपेक्षां आमच्यांत अधिक असें कांहीं नाहीं. पण एका दृष्टीनें आमचें कार्य अधिक महत्त्वाचें वाटतें; कारण, तें कार्य करण्यास फारसे लोक पुढें येत नाहींत व म्हणून आम्हांला मान अधिक मिळतो. वाटल्यास याला कृतज्ञता म्हणा; वाटल्यास गुणग्राहकता म्हणा. हें कार्य करीत असतां, जीं अवघड मानलेलीं संकटें येतात तीं सोसण्याची त्यांची तयारी नसते; व म्हणून राजकारणांत पडणारांना अधिक मान मिळतो. पण उलटपक्षीं समाजांत त्यांस लोक अधिक भितात. टिळकांस लोकांनीं देवपदास पोहोंचविलें; पण उलट त्यांस समाजांत थोडा त्रासच सोसावा लागला. टिळकांस हा अनुभव त्यांच्या मुलीच्या लग्नाच्या वेळीं आला. ती मुलगी टिळकांची एवढ्याचसाठीं तिला पत्करण्यास कोणी तयार होईना ! तेव्हां सांगण्याचें तात्पर्य इतकेंच, कीं लोक राजकीय कार्यकर्त्यास निष्कारण भितातहि. घरचेंच उदाहरण देतों. मी आणि माझे बंधु; हे बंधु सरकारी नोकरींत होते. त्यांना माझ्याशीं संबंध ठेवूं नका असें सरकारनें सांगितलें. पण असा

संबंध तोडतां येणार नाहीं, असें त्यांनीं स्पष्ट कळविलें. अखेर त्यांच्या घरीं मी जाऊन राहिलों म्हणजे राजकीय चळवळ करूं नये, अशी त्यांच्यांत मझ्यांत तडजोड झाली. कांहीं लोकांना वाटे चांगलें रामराज्य चालू आहे; कशाला उगीच अप्रीति संपादा. पण आतां ही स्थिति बदलून सर्व चळवळींच्या गाड्या एका यार्डांत आल्या आहेत. राजकारणी लोकांचा वर्ग निराळा नसतो व नसावा. नाहींतर पक्षपात होतो. आमचें म्हणणें एवढेंच, कीं आम्हांला देता ती मान्यता थोडी कमी करा आणि आमच्या तुरुंगवासाचेहि वांटेकरी व्हा. नाहींतर पेशव्यांच्या सुतकाचे जसे वांटेकरी असत तसें व्हावयाचें ! यांना सुतक आलें, कीं त्यांनीं तें पाळावयाचें. आम्हांला देव्हारा नको आणि सुतकहि नको; आपपरभाव ठेवूं नका. आणि आतां ही स्थितीहि पालटली आहे, व त्याला स्वतः सरकारनेंच मदत केली. नव्या सुधारणा आल्या, तेव्हां सरकारनें मतदानाचा हक्क सर्वांसच दिला. त्यांतून हा सरकारी नोकर, हा सरकारी अधिकारी, असा भेद करून कोणास वगळलें नाहीं. आतां सरकारी नोकरांसहि राजकारणांत पडावें लागतें. माझ्यासारखा उमेदवार निवडणुकीस उभा राहिला, तर तो काय बोलेल ? आणि मतदार सरकारी नोकरहि आहेत. ते राजकारण ऐकतीलच. जो चांगला उमेदवार, त्यालाच ते निवडतील ना ? मग यांतहि राजकारण आलेंच व त्यापासून ते अलिप्त राहूं शकत नाहींत. आज सरकार जर मतदारीचा हक्क देतांना कांहीं भेदाभेद पाहात असेल तर फक्त **एकच** पाहतात. आणि तो म्हणजे हा पुरुष, कीं ही स्त्री, हा होय. सरकार तुम्ही बी. ए.; तुम्ही विद्वान् म्हणून तुम्हांला कांहीं मतदानाचा हक्क देत नाहीं. तुम्ही कांहीं कर देत असाल. तर तुम्हांला तो हक्क मिळेल. नाहींतर तुम्ही आणि स्त्रिया, दोन्हीहि सारखेच; सरकारला एरवीं स्त्री–पंडित समानच आहेत. आतां जुनी दृष्टि बदलली; तुम्हांला एक गोष्ट सांगतों. कशी ती पहा. एक गृहस्थ होता; प्रोफेसर कीं प्रिन्सिपॉल तें मी सांगत नाहीं; पण, त्यांनीं डायरेक्टर साहेबांना आपलें कॉलेज पहावयाला निमंत्रण दिलें; तेव्हां त्यांस या साहेबापुढें उभे रहावें लागलें. पण लगेच जेव्हां हे गृहस्थ दिवाण झाले

तेव्हां तो साहेब ' मला तीन महिन्यांची सुटी हवी ' असा अर्ज घेऊन त्यांच्यापुढें उभा झाला. काल एकसारखा अशा प्रकारें बदलत आहे. पूर्वी राष्ट्रीय शिक्षणाचा मोठा प्रश्न होता. पण आज लोकलबोर्डें व म्युनिसिपालिटया सर्वस्वीं तुमच्या ताब्यांत येत आहेत. तेव्हां राष्ट्रीय शिक्षणाचा प्रश्नच यापुढें उरणार नाहीं. तसेंच आतां व्यक्तिमहात्म्याचे दिवसहि जात चालले. गोखले पूर्वी कौन्सिलांत कार्य कां करूं शकले नाहींत ? कारण लोक समाजनिष्ठ नव्हते; त्यांना कौन्सिलांत लोकांचा पाठिंबा नव्हता. त्यामुळें गोखले कसे गोड बोलतात, त्यांच्या सोनेरी चष्म्यांतून त्यांच्या बुद्धिमत्तेची प्रभा कशी फांकते, वगैरे असल्याच गोष्टींचें तेवढें कौतुक करावें लागे. आज तशी स्थिति राहिलेली नाहीं. लोकांस अधिक हक्क मिळाले आहेत. सर्व चळवळींच्या गाड्या एका यार्डांत आल्या आहेत. समाज आणि राजकारण यांचा अन्योन्यसंबंध आहे. तारतम्यानें वागून कार्य केलें पाहिजे. हा समाज–सुधारक म्हणून वाईट, असें म्हणून भागत नाहीं; तसेंच हा राजकीय चळवळींत पडतो, म्हणून अस्पृश्य, असें म्हणूनहि भागणार नाहीं. आज सरकारनेंच मतदानाचा हक्क देऊन राज्य-कारभारावर दाब पाडण्याचा हक्क सरकारी नोकरांसुद्धां सर्वांस दिला आहे. तेव्हां त्याचा त्यांनीं निर्भयपणें उपयोग केला पाहिजे. हें राजकारण, म्हणून चांगलें व श्रेष्ठ, आणि हें सामाजिक कार्य म्हणून त्याचा दर्जा कमी हा राजकीय चळवळींत पडतो म्हणून श्रेष्ठ व म्हणूनच अस्पृश्यहि असे भेद करण्याचे दिवस आज राहिलेले नाहींत. काळ बदलला आहे. त्याप्रमाणें वागावयास लागा.

---

## ११८. ब्राह्मणसंघ व पंडित–परिषद्

( ता. २९ ऑगष्ट १९२२ रोजीं गायकवाड–वाड्यांतील गणपतीपुढें झालेलें व्याख्यान. )

आज ब्राह्मणसंघासारखी एकादी संस्था पाहिजे किंवा कसे, व असल्यास त्याला काय कारणें झालीं असावींत ? आज ब्राह्मणवर्गसंक्रमणा-

वस्थेंत आहे. त्याजवर आंतून बाहेरून सगळीकडून हल्ले होत आहेत. आज यासारख्या संस्थेची तीन दृष्टीनें जरूर आहे. ब्राह्मणांवर तीन संकटें सध्यां आहेत. एक सरकारचा रोष. याबद्दल ब्राह्मणवर्गानें विशेष विषाद न मानतां सरकारचा रोष हा भूषण मानून आपल्या जनसेवेची ती एक-प्रकारची कबुलीच आहे असें समजावें. दुसरें, ब्राह्मणेतरांत ब्राह्मणांविषयीं दिसून येणारा अनादर. याबद्दलहि आत्मसंरक्षणापलीकडे ब्राह्मणांनीं जाऊं नये. आतां असा ब्राह्मणांविषयीं अनादर कां दिसून येत आहे याचा अंतर्मुखदृष्टीनें विचार केल्यास ब्राह्मणांमध्येंच आज काल ब्राह्मण्याचा लोप होऊं लागला आहे. तें पुन्हां प्रस्थापित करणें हें तिसरें कारण संघाच्या आवश्यकतेला आहे. आतां असा संघ उत्पन्न झाल्यास त्याजपुढें कोणचें कार्य येऊन पडतें याचा विचार केला पाहिजे संघानें सरकारदर-बारीं किंवा ब्राम्हणेतरांत दिसून येणाऱ्या ब्रह्मद्वेषाविषयीं कांहीं कार्य करावयाचें नसून तिसरें म्हणजे पुन्हां ब्राह्मण्याचें पुनरुज्जीवन करणें हें कार्य मात्र त्याजपुढें शिल्लक राहतें. जग दिवसेंदिवस बदलत चाललें आहे; त्याबरोबर राहावयाचें असल्यास ब्राह्मणांनीं प्रगतिपर बनलें पाहिजे. अंतरबाह्य स्थितीचें समीकरण म्हणजेच प्रगति अशी माझी स्वतःची व्याख्या आहे. असें प्रगतिपर व्हावयास त्यांना बऱ्याच नवीन गोष्टी आत्म-सात् करावयाला पाहिजेत. म्हणजेच एकप्रकारची सुधारणा करणें अवश्य आहे. गेल्या ४० वर्षांचा सामाजिक सुधारणेचा इतिहास तरी काय हेंच दाखवितो. प्रगतीपर होण्याची समाजाची धडपड म्हणजेच समाजसुधारणा. आतांपर्यंतचा सुधारणेचा इतिहास सांगावयाचा म्हणजे त्यांनीं केलेले मार्ग दाखविले म्हणजे झालें. प्रथम इंग्रजी शिकलेल्या पहिल्या पिढीला समा-जांतले अन्याय दूर करण्याला कायद्याचा आश्रय घ्यावा असें वाटलें. काय-द्यानें चुटकीसरशी सुधारणा घडवून आणतां येईल अशी त्यांची समजूत होती. पण त्यांचा तो प्रयत्न फसला. संमतिवयाच्या बिलाच्या चर्चेच्या वेळीं हा प्रश्न समाजापुढें जोरानें आला; व परकी सरकारला आमच्या चालीरीतींत, आचारविचारांत हात घालण्याचा अधिकार नाहीं असें ठरलें. दुसरा मार्ग लो. टिळकांनीं दाखवून दिला तो म्हणजे स्वावलंबी सामाजिक सुधारकांचें विनयशील बंड हा होय. या मार्गाप्रमाणें समाजांतील चार

कर्त्या लोकांनीं जमून अमुक एक गोष्ट इष्ट ठरवून त्याप्रमाणें वागण्याच्या शपथा घ्यावयाच्या व तसें वागण्याचें चुकल्यास दंड भरण्यासहि स्वतांला बांधून घ्यावयाचें. यांत समाजाच्या विरुद्ध जाण्याची तयारी म्हणून याला बंड म्हटलें; पण पुनः यांत सुधारकांचा उच्छृंखलपणा नाहीं म्हणून हें विनयशील बंड ! मागें तुळशीबागेंत एक सभा भरून टिळकांनीं एक सुधारणांचा मसुदा तयार केला होता. पण त्यावर त्यांच्याशिवाय दुसरी कोणी सहीच केली नाहीं. पुढें पहिल्या कायद्याच्या आधारावर अगदीं उलट असा शंकराचार्यांचें आज्ञापत्र हा उपाय लोकांनीं शोधून काढला. पण ज्या मनुष्याला परकी सरकारच्या कायद्याचा जुलूम नको आहे, त्याला शंकराचार्यांच्या आज्ञापत्राचाहि जुलूम सहन होणार नाहीं. शिवाय माझ्या मतें त्यांना आमचे आचार ठरविण्याचा अधिकार नाहीं, शंकराचार्य हे कायदे करणारे नव्हत, तर कायदे बजावणारे आहेत. त्यांना आचार ठरविण्याचा अधिकार नाहीं. ठरवलेल्या आचाराप्रमाणें लोकांना वागण्याला सांगण्याचा अधिकार आहे. तेव्हां आतां शेवटचा मार्ग-म्हणजे पंडित-परिषदेपूर्वींदेखील धर्मांच्या बाबतींत एखादा संशयग्रस्त प्रश्न उत्पन्न झाला म्हणजे चार विद्वान् लोक जमवून त्यांचा या बाबतींतील निर्णय मानीत असत. तसें आतांहि समाजाची घडी पुनः नीट बसवण्याकरितां त्यांनीं पुढें यावें अशी माझी त्यांना विनंति आहे. त्यांच्या मनांत आदर बुद्धि आहे; त्यांच्याविषयीं जनतेंत श्रद्धा आहे; परमेश्वरानें त्यांना बुद्धिमत्ता दिलेली आहे व आम्हां इंग्रजी शिकलेल्या लोकांत नसलेलें धर्मग्रंथांचें ज्ञान त्यांच्या ठायीं भरपूर आहे. तेव्हां अशा पंडितांनीं आतां पुढें यावें व इंग्रजी शिकलेले लोक सुचवितील त्यावर विचार करून निर्णय द्यावा. काळ आतां पालटलेला आहे. ब्राह्मणसंघ व पंडित परिषद याचा असा परस्पर संबंध असावा. तरी पंडितांनीं आम्हांला मार्ग दाखविण्याकरितां पुढें यावें. आपला पुढारीपणाचा हक्क त्यांनीं गमावूं नये. आम्ही त्यांना अनुसरायला तयार आहोंत.

याला प्रत्यंतर खिस्ती धर्मांतल्या हायर क्रिटिसिझमचें. तिकडे आतां बायबलाचा एकहि भाग लोक मानीतनासे झाले असून प्रत्येक प्रकरण विद्वानांनीं खोडून काढलें आहे. व आतां याला शेवटीं धर्मशास्त्रांनींहि संमती दिली आहे.

# ११९. महाराष्ट्राचें धार्मिक वैशिष्टय

( ता. २१ फेब्रुवारी १९२४ रोजीं, दिल्ली येथील महाराष्ट्रीय स्नेह-समाजानें दासनवमीचा उत्सव साजरा केला, त्याप्रसंगींचें भाषण. )

हिंदुस्थानला राजकीय इतिहासाप्रमाणें धार्मिक इतिहासहि आहे आणि तो तितकाच महत्त्वाचा आहे. प्रत्येक प्रांताची धर्मोन्नतीची परंपरा त्या त्या प्रांतांतील लोकांच्या मनोरचनेप्रमाणें बनलेली असते. आजचे अध्यक्ष हे राजकीय कार्यांत प्रसिद्ध असले तरी पूर्वीं धार्मिक गोष्टींबद्दलच त्यांनीं अधिक विचार केलेला आहे. आपल्याला बंगालमधील धार्मिक इतिहासाबद्दल माहिती ते सांगतील. पण ती त्यांच्याकडून घेण्याचे आधीं मोबदला म्हणून आपल्या महाराष्ट्र प्रांतांतील धार्मिक विचारांची माहिती त्यांना सांगितली पाहिजे. पैसा टाकला कीं ठराविक वस्तु देणाऱ्या विक्रय-यंत्रा- ( पेनी इन दि स्लॉट ) प्रमाणें मी प्रथम माझ्या भाषणाचा पैसा यंत्रांत टाकतों व त्यांतून येणारी वस्तु तुम्ही आम्ही घेऊं.

महाराष्ट्रीय धार्मिक मनःप्रवृत्ति ही बंगाली धार्मिक मनःप्रवृत्तीहून भिन्न आहे, आणि हल्लीं या दोहोंतील दळणवळण पूर्वींपेक्षां वाढलें असलें तरी परस्परांच्या मनःप्रवृत्तीची खरी जाणीव फारच थोड्यांना असते. गेल्या तीन वर्षांत राजकारणांतील बंडखोरीनें महाराष्ट्रीयांची व्यवहारकुशलता निदर्शनास आली आहे. असहकारितेच्या अव्वल अमदानींत सन १९२१ सालीं महात्मा गांधी पुण्यास आले असतां त्यांनीं “ महाराष्ट्रीयांत श्रद्धेचा अभाव आहे ” असे उद्‌गार काढल्यावर त्याच वेळीं सर्व लोकांसमक्ष त्यांना मीं असें जाहीर रीतीनें सांगितलें कीं, “ महाराष्ट्रांतहि एकप्रकारची श्रद्धा आहे, आणि अशी श्रद्धा असल्याशिवाय रानडे, टिळक व गोखले यांसारखीं माणसें महाराष्ट्रांत झालीं नसतीं. महाराष्ट्राचा महात्माजींच्या कार्यक्रमावर विश्वास बसत नसला तर त्याचें कारण त्या कार्यक्रमाची अव्यवहार्यता हेंच होय. ” तेव्हांपासून महात्माजी महाराष्ट्रास ‘ व्यावहारिक ’ असें नांव देऊं किंवा ठेवूं लागले आहेत ! महाराष्ट्राचा व्यावहारिकपणा राजकारणांत चालू शकतो यांत नवल नाहीं. कारण राजकारण हें सारखें बदलत जाणारें व अनिश्चित असल्यामुळें त्यांत व्यवहारचतुरस्रतेस वाव पुष्क-

ळच आहे. पण धर्मासारख्या श्रद्धेच्या विषयांतही महाराष्ट्रीयांनीं हेंच व्यवहारचातुर्य दाखविलेलें आहे, याचें पुष्कळांस नवल वाटेल.

परलोकांतील गोष्टींचा विचार करीत असतांहि महाराष्ट्रीय लोकांची व्यवहारदृष्टि सुटत नाहीं. महाराष्ट्रीय संत हे स्वतः त्यागाच्या व ऐहिक गोष्टींच्या संन्यासाच्या उच्च कोटीला गेलेले असले तरी त्यांनीं संन्यासाचा एकमार्गी उपदेश कधींहि केलेला नाहीं. श्रीसमर्थ रामदास हे त्यांपैकींच एक प्रमुख होत. बंगाल्यांतील लोक महाराष्ट्रीयांपेक्षां अधिक भावनाप्रधान आहेत. उलट महाराष्ट्रीय हे बुद्धिप्रधान आहेत. एकादा बंगाली व्यावहारिक बुद्धींत महाराष्ट्रीयांपेक्षां तीक्ष्ण असेल; किंवा भावनेच्या भरारींत एकाद दुसरा महाराष्ट्रीय बंगाल्यासहि कदाचित् मागें टाकील. पण हे क्वचित् दिसणारे अपवाद दृष्टीआड करून सामान्यतः विचार केल्यास महाराष्ट्रीय हा व्यावहारिक व बंगाली हा भाविक असेंच वर्गीकरण केलें पाहिजे.

महाराष्ट्रांतील वारकरी हे भक्तीच्या उत्कटतेनें बंगाली लोकांच्या जवळ जवळ येतात. पण भक्तीच्या भावनेंत परमोच्च कोटीपर्यंत जाणारे वारकरीहि भावनेचा उद्रेक ओसरला म्हणजे व्यवहाराच्या अधिष्ठानावर उतरतात. म्हणूनच पूर्वकाळीं धारकऱ्यांत वारकरीहि होते. महाराष्ट्रीय भक्ति केव्हांहि ज्ञानयुक्त असते. बंगाली भक्त सदैव भोळा भक्तच राहतो. तो ज्ञानाच्या किंवा बुद्धीच्या पायरीवर येत नाहीं. शंकराचार्यांच्या अद्वैताचा महाराष्ट्रीय मनावर पगडा विशेष आहे आणि या अद्वैतांत भक्तीपेक्षां ज्ञानाचें महत्त्व विशेष आहे. अद्वैती हा भक्तीच्या कितीहि कोटीस पोंचला तरी त्याचें ज्ञान किंवा विवेक हा त्याच्या बरोबर राहतो. शंकराचार्यांनीं हिंदुस्थानच्या चारहि टोंकाला मठ स्थापून हिंदुस्थानचीं चार नाकीं, सैन्याच्या सरहद्दीवरील ठाण्यांप्रमाणें, धार्मिक दृष्टीनें रोखून ठेविलीं. शंकराचार्यांच्या अद्वैताप्रमाणेंच समर्थांच्या चळवळीचें सामर्थ्यहि महाराष्ट्रीय मनांत विंबलें आहे.

उत्तरेंतील बंगाली व मधले महाराष्ट्रीय याप्रमाणेंच दक्षिणेंतील तामील लोकांनाहि विशिष्ट धार्मिक परंपरा आहे. भक्तिमार्गाचा ते अवलंब करीत असले तरी भक्तीच्या उत्कटतेपेक्षां, आचारधर्माच्या कडकपणाकडे त्यांचें

विशेष लक्ष आहे. बंगाली व महाराष्ट्रीय यांच्यापेक्षां मद्रासी हा धार्मिक आचाराचीं अनेक बंधनें अधिक श्रद्धापूर्वक व हौसेनें पाळतो. आणि ही प्रवृत्ति केवळ जुन्या लोकांतच नव्हे तर सुशिक्षित व इंग्रजी विद्या शिकलेल्या लोकांतहि दिसून येते. सन १८९८ सालीं झालेल्या मद्रास कॉंग्रेसनंतर लोकमान्य टिळकांनीं आपल्या मद्रासी मित्रमंडळींस मेजवानी दिली. त्या मंडळींत बहुतेक चांगले सुशिक्षित लोक होते. पण मेजवानींत अय्यर व अय्यंगार यांचीं पानें निरनिराळीं, एकमेकांस अगदीं न दिसण्यासारखीं, मांडून प्रत्येक विभागावर निरनिराळ्या वाढप्यांची योजना करावी लागली. अजूनहि मद्रासेकडे इतर प्रांतांपेक्षां अधिक कर्मठपणा आढळून येतो.

हे प्रांताप्रांतांतील धर्मप्रवृत्तीचे भेद कां उत्पन्न झाले याचीं कारणें बिनचूक सांगतां येणें कठीण आहे. या भेदांचें तात्त्विक कारण न सांगतां आलें तरी ऐतिहासिक कारण सांगतां येतें. हे भेद आजचे नसून शेंकडों वर्षांपासून चालत आलेले आहेत. जैन धर्मगुरु किंवा बुद्ध यांच्यापेक्षां शंकराचार्यांचा महाराष्ट्रीय मनावर अधिक परिणाम झाला. महाराष्ट्रीय साधुसंतांनीं संन्यासाचा सार्वत्रिक व अतिरिक्त असा उपदेश केव्हांहि केला नाहीं. ते स्वतः संन्यासी असले तरी समाजांत कांहीं थोड्या प्रमाणांतच संन्यासी समावूं शकतात हा विचार महाराष्ट्रीय साधूंनीं सोडला नाहीं. कै. न्या. रानडे यांनीं मराठ्यांच्या उत्कर्षावरील पुस्तकांत शिवाजीनें केलेल्या राजकीय स्वातंत्र्याच्या प्रयत्नाचें बीज धार्मिक साधूसंतांनीं राष्ट्राची मनोभूमि तयार करून तींत पेरलें असें म्हटलें आहे. आणि ही महाराष्ट्रीय संतमंडळी व्यावहारिक होती म्हणूनच त्यांना असली गोष्ट करतां आली. मराठ्यांनीं हिंदुस्थानांत स्वतंत्रतेची लाट उत्पन्न करून ती दिल्लीला नेऊन भिडविली, याचें प्रत्यंतर हेंच कीं, इंग्रजांनीं अखेर हिंदुस्थान जिंकलें तें मराठ्यांपासून जिंकलें, मोंगलांपासून नव्हे असें खुद्द इंग्रज इतिहासकारांनीं म्हटलें आहे. आणि या राजकीय स्वातंत्र्याच्या प्रभावी लाटेस महाराष्ट्रीय साधुसंत चालना देऊं शकले, याचें कारण त्यांची व्यवहारज्ञता होय. रामदास व शिवाजी हे दोघेहि केवळ स्वयंस्फूर्तीनें पण निरनिराळ्या साधनांनीं राष्ट्रीय मुक्ति साधीत होते. एकाच ध्येयानें प्रवृत्त झालेल्या या विभूतींची पुढें गांठ पडून त्यांच्यांत परस्परांविषयीं आदर व स्नेहभाव उत्पन्न झाला

ही अगदीं साहजिक गोष्ट आहे. या दोघांच्या प्रयत्नांनीं तलवारीचा धर्म व टाळ-मृदंगाचा धर्म हे समरस झाले. याचें श्रेय महाराष्ट्राच्या विशिष्ट व्यावहारिक मनःप्रवृत्तीसच दिलें पाहिजे.

नंतर रामदासांच्या व्यवहार व परमार्थ यांची सांगड घालणाऱ्या पुढील ओव्या व्याख्यात्यांनीं दासबोधांतून वाचून दाखविल्या व त्यांचें विवेचन केलें:—

आळस उदास नागवणा । आळस प्रेत्न बुडवणा ॥
आळसें करंटपणाच्या खुणा । प्रगट होती ॥
ज्याचा ज्याचा जो व्यापार । तेथें असावें खबरदार ॥
दुःश्चितपणें पोर । वेढा लावी ॥
कांहीं मेळवी मग जेवी । गुंतल्या लोकांस उगवी ।
शरीर कारणीं लावी । कांहीं तरी ॥
ऐसा जो सर्व सावध । त्याला कैंचा असेल खेद ॥
विवेकें तुटला संबंध । देहबुद्धीचा ॥
( द. ११ रा. स. ३. ओं. १२, १९, २५, २७. )

नंतर आजहि ही प्रवृत्ति महाराष्ट्रांत कशी दिसून येते हें व्याख्यात्यांनीं दाखविलें. ते म्हणाले, विवेकानंद व रामकृष्णपरमहंस या गुरुशिष्यांच्या जोडीपैकीं महाराष्ट्राचा ओढा शिष्याकडे अधिक आहे, याचें कारण शिष्याची कर्मयोगाकडील प्रवृत्ति हें होय. लो० टिळकांचें हिंदुधर्मलक्षण हेंहि महाराष्ट्रीय मनःप्रवृत्तीचें केलेलें लक्षण आहे. वेदप्रामाण्यबुद्धि हें श्रद्धेचें लक्षण, पण साधन व उपास्य या बाबतींत पूर्ण व्यक्तिस्वातंत्र्य ही जोडगोळी व्यावहारीक मनानें बनविली आहे."

---

# १२०. पुण्यांतील कीर्तन--परिषद् १९२८

( अध्यक्षीय भाषण. )

यंदाच्या कीर्तनपरिषदेच्या अध्यक्षस्थानाचा बहुमान आपण मला दिला याबद्दल मी आपला फार आभारी आहें. हें काम जबाबदारीचें तर खरेंच. तथापि या विषयाचा अधिकारी म्हणून नव्हे, परंतु कीर्तन संस्थेबद्दल मला अतिशय प्रेम व आदरभाव वाटतो तो व्यक्त करण्याकरितांच मी हें अध्यक्षस्थान स्वीकारलें. केवळ तोंडदेखलें बोलण्याकरितां हे सहानुभूतीचे शब्द आपणापुढें बोलतों असें आपण मानूं नये; कारण कीर्तन-परिषदेचें अध्यक्षस्थान स्वीकारण्याचें निमंत्रण येण्यापूर्वीं बरेंच दिवस वाईचे बाळासाहेब साठे यांच्या एका कीर्तनविषयक पुस्तकाला मी प्रस्तावना लिहिली आहे. त्यांत कीर्तनसंस्थेविषयीं असलेला माझा आदरभाव मी नमूद केला असून शेवटीं असें म्हटलें आहे कीं, 'चांगलें नाटक व चांगलें कीर्तन यांतून सरस निरस पसंत करावयाची वेळ आली तर मी कीर्तनालाच महत्त्व देईन ' आमच्या गीतामंडळाचे सदाशिव शास्त्री भिडे यांनीं मुंबईस पूर्वीं हरिकीर्तनालय या नांवाची संस्था काढली होती. तसेंच केसरीचे माझे सहसंपादक केतकर यांनींहि कीर्तन मासिक एक वर्षभर चालविलें होतें. यावरून आमच्या पक्षांतल्या मंडळींची कीर्तन या संस्थेबद्दल किती आस्था व आदरभाव आहे हें आपणांस दिसून येईल.

' हरिदास ' 'व कीर्तन करणारा' हे शब्द हल्लीं समानार्थक वापरतात. पण पूर्वीच्या वाङ्मयांत केवळ ' हरीचेदास ' किंवा इतर विभक्ति लावलेला हा शब्द उपयोगांत आणला जात असे असें वाटतें. उदाहरणार्थ, तुकारामाच्या अभंगांत 'तुका म्हणे हरिच्या दासा । शुभ काळ दाही दिशा' ॥ ' आम्हा हरिच्या दासा कांहीं । भय नाहीं त्रैलोकीं ॥' ' हरिच्या दासा सोपें वर्म । सर्व धर्म पाउलें ॥' वगैरे अभंगांतून हरीचे दास म्हणजे कीर्तनकार असा अर्थ विवक्षित नाहीं. हरिदास म्हणजे कथेकरी या अर्थानें हा शब्द तुकारामानंतर गेल्या ३०० वर्षांच्या ऐतिहासिक वाङ्मयांतच आढळतो असें मला वाटतें. असो. हा प्रश्न जास्त संशोधन होण्यासारखा आहे.

परंपरा ही कोणालाहि प्रिय असते; व परंपरा जितकी प्राचीन तितकी

साहजिकच ती कोणालाहि अभिमानाची गोष्ट होणें हें स्वाभाविक आहे. हरिदास हे आपली परंपरा मुनिश्रेष्ठ नारदापासून मानतात. हरिदासांचा हाच आद्य पूर्वज. औचित्य व मार्मिकता या दृष्टीनेंहि ही परंपरा फार सार्थ आहे असें मला वाटतें. कारण श्रीकृष्णाप्रमाणेंच नारदाचेंहि चरित्र फार नमुनेदार होतें. व्यवहार आणि परमार्थ यांची उत्कृष्ट सांगड जशी श्रीकृष्णानें घातली, त्याप्रमाणें ती नारदानेंहि आपल्या चरित्रानें बोलून दाखविली. स्वत: पाहिलें तर ब्रम्हचारी, परंतु हातांत एकतारी घेऊन व तोंडानें फक्त एक हरीचेंच नाम घेऊन सर्व जगाचें राजकारण नारदानें करून दाखविलें. तो देवांचा मित्र होता तसाच त्यांच्या शत्रूंनाहि तो आपला मित्रच वाटत असे. तीनहि लोकांत त्याला कोठेंहि मज्जाव नव्हता. त्यानें फक्त स्वत: लग्न केलें नाहीं; पण राजकारण, व्यवहार व परमार्थ या त्रिवर्ग संसारांतील कोणतीहि गोष्ट त्यानें करावयाची शिल्लक ठेवली नव्हती. त्यानें भावाबहिणींत, नवराबायकोंत व मित्रामित्रांतहि कलह लाविले, तर वैऱ्यावैऱ्यांत ते लावलेच असतील हें सांगावयाला नकोच! पण ही सर्व कलहप्रियतेची उलाढाल त्यानें केली ती सुष्टांचें परिपालन व दुष्टांचें निर्दालन या तत्त्वाकरितांच केली. आणि हें सर्व करीत असतां त्याच्या स्वतः जवळ किंवा स्वत:चें काय होतें तर फक्त एकतारी आणि तोंडांत एक हरीचें नांव. संगीताच्या एका षड्जांत ज्याप्रमाणें स्वरसप्तकाचे सातहि सूर येतात, अगर रवीच्या एका किरणापासून इंद्र धनुष्याचे सातहि रंग पृथक्करण करून दाखवितां येतात, त्याप्रमाणें एक वीणा आणि एक हरिनाम यांच्या बळावर केवळ परमार्थच काय पण तीनहि लोकांचा त्रिगुणात्मक व्यवहार नारदानें करून दाखविला. यामुळें सर्व पौराणिक वाङ्मयांत श्रीकृष्णाप्रमाणेंच नारद ही व्यक्ति मला फार आवडते व हरिदास हे आपली परंपरा थेट नारदापर्यंतच भिडवितात त्यांत फार औचित्य आहे. कारण यापुढें हरिदासांनाहि हेंच करावयाचें आहे.

हरिदास म्हणजे कीर्तनकार हें नांव तुकारामानतर प्रचारांत आलें असावें हें वर सांगितलें. ज्ञानेश्वरींत हरिदास हें नांव एका पेशाचें वाचक या अर्थानें लिहिलेलें आढळेल असें वाटत नाहीं. तथापि स्वत: कीर्तन संस्था ही जुनी आहे. प्रथम त्याचें स्वरूप नुसतें एकतारी अगर वीणा

घेऊन भजन करणें इतकेंच असे. त्यानंतर आनुषंगिक म्हणून भजनांतून निरूपण व निरूपणांतून हल्लींचें कीर्तन अशी प्रगति झाली असावी. ज्ञानदेवापर्यंत मुख्यतः ग्रंथरचना संस्कृतांतच होत असे; पण बहुजनसमाजालाहि उपदेश करून त्याला आपल्या पोटांत घ्यावें ही सार्वजनिक बुद्धि त्या काळीं उदित झाली; म्हणूनच ज्ञानदेवानें आपला ग्रंथ मराठी भाषेंतून लिहिला. पण मराठींत ग्रंथरचना झाली तरी तिची व्याप्ति मर्यादितच असणार ! तुकाराम-ज्ञानदेवाच्या काळीं फक्त हस्तलिखित पोथ्या असत; आजच्यासारखी छापखान्याची कला त्यावेळीं नव्हती. अर्थात् लोकांत अध्यात्मिक ज्ञान व शिक्षण यांचा प्रसार करण्याचा संतमंडळाचा हेतु कीर्तनानेंच पुरा होऊं शकेल. नुसतेंच हरिनाम स्मरण करावयाचें असतें तर एकतारी घेऊन तें कोठेंहि एकाद्या कोपऱ्यांत बसून त्यांचें त्यांना करतां आलें असतें. पण लोकसंग्रह व लोकविजय हा संतांचा हेतु त्यायोगें साध्य झाला नसता. न्यायमूर्ति रानडे यांनीं म्हटल्याप्रमाणें शिवाजीनें हिंदवी स्वराज्य स्थापन केलें खरें. पण लोकांच्या मनोभूमिकेची मशागत नांगरणी, पेरणी हीं सर्व या संत मंडळींनीं अशाप्रकारें आधींच तयार करून ठेविली होती. शिवाजी साक्षर होता कीं निरक्षर होता याबद्दल अजूनहि इतिहास संशोधकांत वाद आहेत. "शिवाजीला संस्कृत चांगलें येत होतें व संभाजीनें तर संस्कृतमध्यें काव्यरचनाहि केलेली आहे" असें कोणी कोणी प्रतिपादन करतात. पण स्वतः मला हें खरें वाटत नाहीं. शिवाजी महाराजांना महाभारत वगैरे ग्रंथ आपलेआपण लावून वाचतां येत असतील अगर संभाजीला संस्कृत काव्य करतां येत असेल असें मला वाटत नाहीं. राजे लोकांच्या नांवावर एखादें काव्य अगर ग्रंथ गौरवानें प्रसिद्ध करण्याचा कविसंप्रदाय सर्रास नसला तरी तो एक दरबारी संप्रदाय आहेच. तत्कालीन राजे लोकांना प्राचीन संस्कृताचें ज्ञान व संस्कृत ग्रंथांतील अध्यात्मिक ज्ञान परंपरेनें कीर्तनामधूनच घ्यावयास सांपडे.

रामदास स्वतः कीर्तन करीत होते कीं नाहीं हें नक्की माहीत नाहीं. तथापि तुकाराममहाराजांचें कीर्तन ऐकण्यास मोठ्या भक्तीनें जात हें प्रसिद्ध आहे. तुकारामाचे अभंग काढून पाहिले तर त्यांतील अनेक कल्पना पूर्वींच्या

अध्यात्मक संस्कृत वाङ्मयांतील कल्पनांशीं तंतोतंत जुळतात; व हें ज्ञान अशा परंपरेनें सर्व समाजांत पसरून देण्याचें कार्य या कीर्तनसंस्थेनें केलें. त्या वेळच्या मराठी वीरांनीं स्वराज्य मिळविलें हें खरें, पण देशांतील लोकांची मनोभूमिका तयार करण्याचें मोठें काम त्या कीर्तनकार संत मंडळीनें केलें. या यशांत त्यांचा मोठा वांटा आहे हें कबूल केलें पाहिजे.

पेशव्यांच्या काळीं कीर्तनाला शास्त्री व पंडित यांच्या विद्येची जोड मिळून कीर्तनकारांच्या संस्थेची पुष्कळ भरभराट झाली. पारसनीस यांच्या 'शंभर वर्षांपूर्वीचें पुणें' या पुस्तकांत १७२५ सालीं शनवारवाड्यांत गणपतीच्या उत्सवांत कोण किती गुणी जन आले होते त्यांची यादी दिली आहे. पृष्ठ ११३ वर असें म्हटलें आहे कीं, 'या गणपतीच्या उत्सवांत शनवारवाड्यांत १८१ हरिदास जमले होते व त्यांना २१५५ रुपये बिदागीदाखल देण्यांत आले. याशिवाय वस्त्रें, शेले, पागोटीं वगैरे वेगळीं दिलीं. गवई ३९ आले होते त्यांना ३२९ रुपये देण्यांत आले. नर्तक्या व गाणारणींचे ताफे एकंदर ४३ होते. त्यांना बिदागी १०२६ रुपये देण्यांत आली. गुरव, पखवाजी वगैरे ४३ असून त्यांची बिदागी १२१ रुपये झाली. वाजंत्र्यांचे २५ ताफे होते. त्यांना २४० रुपये देण्यांत आले." या उताऱ्यावरून नर्तकींना जास्त बक्षीस मिळालें कीं हरिदासांना जास्त बिदागी मिळाली हें आपणास पाहावयाचें नाहीं. पण स्वराज्य भरभराटींत असतांना १८१ हरिदासांची त्या उत्सवांत वर्दी लागली, तर दोन-तीन संमेलनांत हजर असलेल्या कीर्तनकारांचा आकडा ८० पर्यंत गेला होता. यावरून आजची स्थिति लोकाश्रयांच्या दृष्टीनें अगदींच वाईट नाहीं हें कबूल करावें लागेल. स्वराज्य व परराज्य या गोष्टीमुळें या बाबतींत फारसा फरक झालेला नाहीं. एकटा राजा तरी देऊन देऊन किती देणार! आज मुंबईचा एखादा भाटया काय थोडें देतो? पण राजाश्रय असतांना बिदागीकडे लक्ष देऊन हरिदासांनीं जें कार्य केलें तें आतां लोकाश्रयाकडे न पाहातांहि त्यांनीं लोकांकरितां केलें पाहिजे, हेंच मला विशेष सांगावयाचें आहे.

पेशव्यांच्या काळीं हरिदासी संस्थेची स्थिति भरभराटली, पण त्याचबरोबर हरिदास, पोवाडेवाले, शाहीर, तमासगीर व गोंधळी यांची एक

प्रकारें चुरसहि लागली असें इतिहासावरून दिसतें. चुरस अशाकरितां कीं, रसिक लोकांवर छाप पाडून त्यांचें पुढारीपण घेण्यांत व आपल्याभोंवतीं जास्तींत जास्त लोकसमुदाय जमा करण्यांत कोण अधिक यशस्वी होतो ? लोकशिक्षणाचें कार्य व देशहितबुद्धि हीं एकच; पण लोकविजयामध्येंहि एक पुढारी जसा दुसऱ्याचा वरचष्मा सहन करीत नाहीं, अथवा थोडीशी ग्राम्य परंतु समर्पक अशी उपमा द्यावयाची तर एका कुत्र्याला ज्याप्रमाणें दुसरीकडचा कुत्रा आपल्या आवारांत शिरलेला खपत नाहीं, त्याचप्रमाणें या गोंधळी शाहिरांना आपल्या सामर्थ्याचा असा अभिमान असे कीं, लोकांचा फड जमला व या चुरशीच्या सामन्यांत हरिदासापेक्षांहि जनतेवर आपण अधिक छाप पाडली तर त्यांना मोठी धन्यता वाटत असे. ही चुरस जातीजातींतील नव्हती तर एका पेशाची व धंद्याची दुसऱ्या पेशाविरुद्ध व धंद्याविरुद्ध होती. कारण हरिदासांत जसे ब्राह्मण होत तसेच तमासगीर व शाहीर गोंधळी यांतहि अनेक ब्राह्मण होते. पण स्पर्धा अशाकरितां कीं, "हरिदास जास्त शिकलेला असला म्हणून काय झालें ? पण माझ्यांतहि कवित्व आणि वक्तृत्व असें आहे कीं, समाजाचें अनुरंजन करून हरिदासाचा मी नक्षा उतरवीन." अशिक्षित मनुष्याला आपल्यापेक्षां जो जास्त सुशिक्षित त्याचेबद्दल नेहमीं मत्सर वाटतो हें साहजिक आहे; व हरिदास हे तमासगीर व गोंधळी यांचा द्वेष करीत असें जरी इतिहासांत सांपडत नसलें, तरी शाहीर व गोंधळी लोक आपल्या कवनांतून हरिदासाकडे कोणत्या दृष्टीनें पाहात याबद्दल पुष्कळ पुरावा सांपडतो. उदाहरणार्थ, पेशवाईअखेर झालेला शाहीर परशुराम म्हणतो: —

"अटीतटीच्या जडणा घडणा परशुराम नित करी । चंग रंग दंग ऐकुनि झाले पळाले हरदास तरी ।।" दुसरा शाहीर बाळा लक्ष्मण याचा काल सवाई माधवरावाच्या कारकीर्दीच्या अखेरीचा. हा आपल्या काव्यांत म्हणतो, "बाळा लक्ष्मण गातो पोवाडा हमेश बसून । करडगांव त्याचें ठिकाण ।। आइक रे शाहीर तुझी कलगी आहे थोर । हरदास मनामधिं झुर ।।" तसेंच शाहीर मरी पिपाजी, काळ पेशवाईअखेर, म्हणतो, 'गुणी दादाचें कवन खाशी । जैशा मोत्यांच्या राशी' ।। हा धाक हरिदासाशीं

मनामधिं झुरती ॥ '' या काव्यांत हरिदासांना शाहिरांचा धाक पडला आणि ते मनामध्यें झुरूं लागले असें म्हटलें आहे. चौथा शाहीर रामा हणमा, काळ अवल इंग्रजी, यानें हरिदासावर कवन केलें तें असें " अशी केदाराची तऱ्हा । त्याचें गाणें बहु शिरा ( उत्तम )। फिरला हरदासाचा म्होरा । तुझा उतर खालीं तुरा।'' या काव्यांत तर " शाहीराचें गाणें असें उत्तम वठलें आहे कीं हरिदासांचा म्होराच फिरला '' असें सांगितलें असून, दिग्विजयानें शाहिरानें " तुझा तुरा खालीं उतर '' असें हरिदासास आव्हान केलें आहे. यानंतरचा शाहीर हिरा बाबाजी, याचा काळ अलीकडचा म्हणजे सुमारें तीसचाळीस वर्षांपूर्वीचा. याच्या काव्यांत असें वर्णन आहे कीं, " हिरा बाबाजीनें केलें कवित्व हरदासवळ भ्याली । लक्ष्मण गातो लडिवाळ नव्या चाली. '' केव्हां केव्हां तर या दोन धंद्यांची सरहद्द एकमेकांत मिळून ते सरमिसळ झाले होते असें आढळतें. दोन राज्यांच्या सरहद्दीवर बाजारबुणग्यांची तर गांठ पडतेच; पण केव्हां केव्हां राजांचीहि गांठ तेथेंच पडते. त्याप्रमाणें या दोन धंद्यांतील कांहीं प्रमुख लोकांमध्यें तर पूर्ववयांत एक व उत्तरवयांत एक मिळून शाहिरी व हरिदासी हे दोनहि धंदे एकत्र आले होते. राम जोशी लावणीकार व कीर्तनकार अशी त्याची कीर्ति सजोड होती. तीच गोष्ट अनंत फंदी परशुराम याची.

हा प्रकार पेशवाईनंतरच्या काळांतहि पाहावयास मिळाला. कारण हरिदासी कायम राहिली आणि तमाशांची जागा संगीत नाटकांनीं घेतली. कै. गुरुजी म्हणतात, "राशिनकर यांचे मागें असलेल्या लखोबामुळें कथेस गाणारणी स्त्रियांची फार गर्दी असे. यावेळीं पौराणिक नाटकें बहरांत आलीं असून चैरंगी गोप, कात्यायनी व्रत, समयांचा नाच इत्यादि शृंगारपूर्ण रसांचा धुमाकूळ चालला होता. त्यांस मुलांची गरज लागे. हरिदासांनाहि सुस्वर गायक लागत. तेव्हां हरिदासांनीं मुलें तयार करावींत आणि नाटककारांनीं तीं पळवावींत असा क्रम बरेच दिवस चालला होता. किर्लोस्कर कंपनींतील सुप्रसिद्ध नट मोरोबा वाघोलीकर हे मोरशास्त्रीबुवांचे मागें असत. लखोबा वाघ आणि मोरोबा हे लावणीच्या छंदांत पडले आणि हे उभय हरिदास निकामे झाले '' असें कीर्तनप्रसंगीं सांगत असत.

मोरोबा वाघोलीकर कीर्तनकारांची पाठ संभाळीत असतां हळूच नाटकांत जाऊन स्वतःच पार्टी बनले. आजहि गायन समाज व संगीत नाटक यांच्यांतहि असेंच तादात्म्य झालेलें आपणाला आढळत नाहीं काय ?

असो. याप्रमाणें कीर्तन संस्थेच्याच संप्रदायाची परंपरा इतिहासांत दिसते व ती पुढेंहि अखंड चालेल. पेशवाईत गणपत्युत्सवाच्या वेळीं हरिदासांचा जो सन्मान झाला व या संस्थेला जो राजाश्रय होता त्यापेक्षां आजची स्थिति फारच वाईट आहे असें नाहीं. आजच्या काळीं हरिदासांची संख्याहि फारशी कमी नाहीं. मात्र संत या अर्थानें हरिदासांचा संप्रदाय चालू राहिला आहे असें म्हणतां येत नाहीं. कारण खऱ्या संतास संप्रदाय नसतो व परंपराहि नसते. नवा संत निर्माण होतो तो आपल्या वंशक्षयाची भीष्म प्रतिज्ञा करूनच जन्मास येतो; व त्याचा अवतार संपला कीं त्याचा वंशहि संपला. त्याची स्मृति मात्र जागेवर राहते. पण 'संत' या अर्थानें नसला तरी कीर्तनकार या संस्थेचा संप्रदाय अखंड चालेल. कारण त्यांचें लौकिक प्रयोजन शिल्लकच आहे. इतकेंच नव्हे तर पूर्वी स्वराज्याच्या काळीं स्वसंस्कृतीचा प्रसार या दृष्टीनें त्यांचें जें प्रयोजन होतें तें आजच्या काळांत जास्तच भासूं लागलें आहे. विद्वान्, बुद्धिवान, स्वार्थत्यागी व लोकशिक्षणाचा प्रसार करणारे हरिदास जर आजच्या काळीं ठिकठिकाणीं तयार होतील तर ते महाराष्ट्रीय जग जिंकतील.

या संस्थेची सुधारणा कशी करावी या प्रश्नाचें उत्तर देतांना प्रथम हें सांगतों कीं, एकनाथ "सगुण चरित्रें परम पवित्रें हरिची वर्णावी" या पदांत कीर्तनमर्यादा 'संताच्या घरची' सांगितली आहे. दासबोधाच्या १४ व्या दशकाच्या ४ थ्या समासांत हरिदासाला सर्वच बाजूंनीं फारच चांगला उपदेश केला आहे.

पण आधुनिक नमुनेदार हरिदासाच्या अंगीं कोणते गुण कोणत्या मर्यादेंत असावेत हें थोडक्यांत सांगतों.

( १ ) उत्तम हरिदासांत वक्तृत्व इवें पण वावदुकी नको. कित्येक हरिदास निरूपण करतांना वावदुकी करून कल्पनांचा इतका ब्रह्मघोटाळा करून ठेवितात कीं, श्रोत्यांच्या मनांत अखेर जागेवर कांहींच शिल्लक

राहात नाहीं. वक्तृत्व हें वक्त्याला आवश्यक होय. पण वावदुकी न होऊं देण्याची खबरदारी हरिदासानें घेतली पाहिजे.

( २ ) हरिदास गवई असेल तर दुधांत साखर पडल्यासारखें होईल. पण त्याला गाणें येत असलें तरी तें वस्तादी गवयाइतकें नको ! कारण त्यामुळें कीर्तनांतील निरूपणाचा मूळ हेतु सुटून त्याला जलशाचेंस्वरूप येतें. कीर्तनाला गाणें आवश्यक असलें तरी कीर्तनांत निरूपणाचेंच स्थान मुख्य, गायन हें त्याचें गौण अंग होय. गायन ही धनीण नव्हे,दासी आहे.दासीचा गळा गोड असला तरी धनीणीनें 'म्हण ग गाणें' म्हटल्यावरच दासी तें म्हणतें. निरूपणाचा कंटाळा जाण्याइतकेंच गाणें असावें, फार असूं नये. कित्येक हरिदास मी असे पाहिले आहेत कीं त्यांच्या पूर्वरंगास निरूपणाच्या बहारींत श्रोत्यांना गाण्याची आठवणहि होत नाहीं. नारायण-बुवा फलटणकर यांच्या कीर्तनांत जर गाण्याशिवाय कांहीं नव्हतें, तर उलट कृष्णाबुवा श्रीगोंदेकर यांच्या कीर्तनांत गाणें मुळींच नसतां त्यांचे निरूपण तल्लीनता अधिक उत्पन्न करी.

( ३ ) हरिदासास अभिनय हवा पण नटाइतका नको याचें कारण असें कीं कीर्तनाचें गांभीर्य एरवीं राहणार नाहीं. (४) विनोद असावा परंतु तो विदूषकी अगर ग्राम्य नसावा. (५)तसेंच उपमादृष्टांतासह हरिदासास गोष्टीहि चटकदारपणानें सांगता आल्या पाहिजेत पण त्यांत अतिशयोक्ति नसावी. कारण " एकदां राजपुत्रावर निर्जन अरण्यांत शत्रूंनीं घाला घातला असतां घोड्याच्या कमरेला पायाचा विळखा घालून राजपुत्र घोड्यासकट वडाच्या पारंबीला धरून वर चढला " अशाहि हास्यास्पद गोष्टी कित्येक हरिदास सांगतात. पण अशानें सर्वच कीर्तनाची थट्टा होते. ( ६ ) हरिदासी गोष्टीप्रमाणें 'हरिदासी कोटि' हाही शब्द भाषेंत रूढ झाला आहे. यावरून हें दूषण किती सार्थ आहे हें तुम्हीच पाहा. कोटींत विनोद व विद्वत्ता असावी. नुसत्या शाब्दिक कोट्या करण्याच्या भरीस हरिदासांनीं पडूं नये. (७) हरिदास अतिशय विद्वान पाहिजे हें तर खरेंच पण, चंपूग्रंथांतील वाक्यें घडाघड श्रोत्यांपुढें पाठ म्हणून दाखविण्यापेक्षां त्यानें इतर रीतीनें आपल्या बहुश्रुततेचा फायदा लोकांस द्यावा. हरिदासलोक चंपु पाठ म्हणूं लागले म्हणजे मला दिवे नसलेल्या बोगद्यांत आगगाडी शिरल्यासारखें वाटतें.

असो. यानंतर कांहीं वादग्रस्त बाबींचा उल्लेख करतों. कारण मागील कांहीं कीर्तन–संमेलनांतून ह्या प्रश्नांची थोडीशी चर्चा झाली होती.

( १ ) पहिला म्हणजे, हरिदासाची जात कोणती असावी ? ब्राह्मणाखेरीज इतरांनीं हरिदास बनूं नये असें कित्येकांनीं दर्शविलें आहे, पण तें मला मुळींच मान्य नाहीं. सन्तचरित्रांत व संत मालिकेंत सर्व ज्ञातींचें लोक जर आढळतात तर अमक्यांनीं कीर्तन करावें व अमक्यांनीं कीर्तन करूं नये अशी मर्यादा घालणें रास्त होईल काय ? परमेश्वराचें नाम गाण्याचा स्त्रीशूद्रापासून तो ब्राह्मणापर्यंत सर्वांना सारखाच अधिकार आहे. एखाद्यानें कीर्तन केलेलें तुम्हांस मान्य नसलें तर तुम्ही त्या कीर्तनाला जाऊं नका. पण ब्राह्मणाशिवाय इतर कोणी कीर्तन करूं नये हें म्हणणें बरोबर होणार नाहीं. ह. प. धोंडिबुवांच्या कीर्तनाला ब्राह्मणासुद्धां सर्व प्रतिष्ठित लोक जातातच कीं नाहीं ? उत्तम कीर्तन करतां येणें हें बुद्धीचें काम आहे. बुद्धि व विद्या जातीवर अवलंबून नसते.

( २ ) स्त्रियांनीं कीर्तन करावें कीं नाहीं हा दुसरा प्रश्न. पण मला वाटतें स्त्रियांनीं कीर्तन करण्याला कोणतीहि हरकत असूं नये. आज स्त्रियांमध्यें शिक्षण वाढलें, त्यांना मतदारीचे हक्क मिळाले, व स्त्रिया कौन्सिलमध्येंहि जाऊं लागल्या. इतकी त्यांची संस्कृति सुधारली असतांना स्त्रियांनीं निदान स्त्रियांच्या पुढें उभें राहून कीर्तन केलें तर त्यांत काय बिघडलें ?

( ३ ) हरिदासाला नित्यनैमित्तिक आचार यांचें बंधन असावें कीं नाहीं या प्रश्नाबद्दल मला असें वाटतें कीं, आचाराच्या श्रेष्ठतेकडे हरिदासांनीं जरूर लक्ष द्यावें. कारण त्याशिवाय त्यांच्या उपदेशाचा ठसा पडणार नाहीं. पण हरिदास हा स्नानसंध्या व 'ब्रह्मकर्म' करणारा असला पाहिजे या म्हणण्यानें ब्राह्मणच असला पाहिजे असा अर्थ निघतो म्हणून असलें बंधन घालूं नये.

( ४ ) आचाराप्रमाणेंच हरिदासानें भाषा शक्य तितकी शुद्ध व सुबोध अशी ठेवावी. परंतु व्युत्पत्तिप्रियता अगर पाठांतर यांचें त्यांनीं अवडंबर माजवूं नये. हरिदासास परभाषा येणें हें मी दूषण समजत नाहीं. क्वचित् त्याच्या निरूपणांत एखादा इंग्रजी शब्द आला तरी हरकत नाहीं.

" स्त्रीरत्नं दुष्कुलादपि " किंवा " अमेध्यादपि काञ्चनं " हें वाक्य हरिदासानें लक्षांत ठेवावें. आपल्या मनांतील कल्पना क्वचित् परकीय भाषेच्या शब्दांची मदत घेऊनहि श्रोत्यांच्या मनांवर ठसवितां आली तरी माझ्या मतें कांहींच हरकत नाहीं.

( ५ ) हरिदासानें कीर्तनांत गातांना नव्या उत्कृष्ट चाली घालाव्यात. जुने ओबडधोबड हरिदासी थाट आतां काढून टाकावे. पदें जुनीं असलीं तरी चालतील, एवढेंच नव्हे तर पदें शक्य तोंवर जुनींच म्हणजे साधुसंतांचींच असावीं. परंतु चाली मात्र नव्या पाहिजेत. पण त्याबरोबरच हेंहि सांगितलें पाहिजे कीं, कथेंतील मुख्य भाग निरूपण हा आहे, नव्या गायकीचालीं नव्हत, ही दृष्टि सुटून उपयोगाची नाहीं. नाहींतर गायन हेंच कीर्तनाचें मुख्य अंग झालें म्हणजे पूर्वीच्या अनुभवाप्रमाणें गाणारीं मुलें नाटकमंडळ्या ओढून नेतील व बिचारा हरिदास मात्र उघडा पडेल. तुकारामाचे अगर इतर संतांचे अभंग उत्कृष्ट व काव्यमय आहेत. त्यांत पहिल्या प्रतीची जिवंत प्रतिभा आहे. शिवाय हे अभंग असेहि आहेत कीं ते वाटेल त्या रागांत व वाटेल ती चाल लावून गायनाच्या पद्धतीनें म्हणतां येतात. नवीं पदें करूं नयेत असें मी म्हणत नाहीं पण जुन्या पदांना व अभंगांना नव्या चाली लावून ते प्रचलित केले तर पूर्वीच्या कवनांचा सहज जीर्णोद्धार होण्यासारखा आहे इतकेंच.

( ६ ) हरिदासांनीं शक्यतोंवर पौराणिक व ऐतिहासिक कालांतील आख्यानें लावावींत. फारतर आख्यान अगदीं काल्पनिक असलें तरी चालेल, पण अगदीं ताज्या आधुनिक कालांतील आख्यानें मात्र कधींहि लावूं नयेत. हा केवळ सदभिरुचीचा प्रश्न आहे असें मी मानतों.पौराणिक नाटकांत पोषाक देतांना शक्य तितका कोणीं न पाहिलेला व अलीकडच्या काळांत बहुधा कोठेंहि प्रचलित नसलेला देतात याचेंहि मर्म हेंच आहे.

(७) निरूपणांत सद्यःस्थितींतील राजकारणाचे दाखले उघड देऊं नयेत. श्रोत्यांच्या कल्पनाशक्तीला थोडी तरी जागा ठेवावी. राजकारणाचाच उपदेश करण्याचीं ठिकाणें व प्रसंग वेगळे आहेत. प्रचलित राजकारणाला आधारभूत असलीं वचनें महाभारतांतून वाटेल तेवढीं सांपडतात; प्रत्यक्ष अलीकडच्या राजकारणाचा उल्लेख टाळून उपदेशकारास आडपडद्यानें तीं हवीं

तशीं सांगतांहि येतात.या बाबतींत अण्णासाहेब परांजपे हे पौराणिक निरूपणें ज्या पद्धतीनें करतात ती पद्धत हरिदासांनीं विशेष लक्षांत ठेवावी. १८९७ सालच्या शिवाजीच्या उत्सवांत. " असंतोषः श्रियो मूलम् " या वचनाचा आधार घेऊन शिवरामपंतांनीं पुराणांत राजकारण सांगितलें होतें. त्या पुराणानें राजकीय मनोभूमिकेची जमीन खणून निघाली. भाविक लोकांच्या मनोभावनेंत क्रांति झाली. हरिदासांनीं राजकारणाचीं तत्त्वें लोकांस शिकवावयाचीं तर त्यांनीं नेहरू रिपोर्ट किंवा गव्हर्मेंट ऑफ इंडिया ॲक्टच सांगावयास नको. राजकारणाचीं मूलभूत तत्त्वें हीं थोडीं असून सर्व लोकांना समान आहेत. प्राचीन ग्रंथांतील अवतरणें घेऊन कोणालाहि त्यावर सहज आधुनिक कार्यास योग्य असें निरूपण करतां येण्यासारखें आहे.

(८) यानंतर सर्वांत महत्त्वाची गोष्ट म्हणजे हरिदासानें बिदागी घ्यावी कीं नाहीं ? पण माझ्या मतें हरिदासानें अवश्य बिदागी घ्यावी. ती घेण्यांत कांहींहि पाप नाहीं. पोट कोणास सुटलें आहे ? इतर धंद्याप्रमाणें हाहि एक धंदाच आहे. धंदा असला तरी तो धर्मोपदेशकाचा धंदा म्हणून उच्च धंदा आहे हें काय थोडें झालें ! मी बाहेर दौऱ्यावर गेलों म्हणजे कारणपरत्वें लोकांस असें सांगत असतों कीं, मी केसरीचा संपादक झालों म्हणून त्यामुळें तुमच्यापेक्षां कोणी मोठा देशभक्त आहे असें तुम्ही मानूं नका. तुम्ही उद्योगधंदा करतां तसा मीहि लिहून पोटाला मिळवितों. केसरीचे दहा कॉलम मीं लिहिले तर त्यांतले पांच कॉलम मी चरितार्थ चालविण्याकरितां लिहितों. इतर पांच कॉलम वाटल्यास हौसेकरितां लिहितो असें म्हणा. एकजणानें खुद्द टिळकांबद्दल एकदां असा प्रश्न विचारला कीं, " काय हो, टिळक जर एवढे देशभक्त तर ते केसरीला वर्गणी काय म्हणून ठेवतात ?" विचारणारा भोळा वेडा होता; पण यावरून हीच गोष्ट लक्षांत घेतली पाहिजे कीं, पोट हें सर्वांच्याच पाठीमागें लागलें आहे तें कोणास सुटत नाहीं. ज्यांना संसार नसेल त्यांना आज या गांवांत तर उद्यां त्या गांवांत फिरून भिक्षावृत्तीनें चरितार्थ करतां येईल. पण गृहस्थाश्रमी असलेल्या सर्वांनाच हें शक्य होईल काय ! तुकारामानें या बाबतींत मर्यादा फार कडक घातली आहे:—

आशाबद्धवक्ता । भय श्रोतियाच्या चित्ता ॥
जेथें कीर्तन करावें । तेथें अन्न न सेवावें ॥
बुका लावूं नये भाळा । माळ घालूं नये गळा ॥
तट्टांवृषभांसि दाणा । तृण मागों नये जाणा ॥
तुका म्हणे द्रव्य घेती । देती तेही नरका जाती ॥

तुकारामानें घालून दिलेल्या या मर्यादेंत, हरिदास परगांवीं गेला तर घोड्याकरितां त्यानें चंदीसुद्धां मागूं नये असें म्हटलें आहे, मग बिदागी घेण्याची गोष्ट दूरच ! यानें अर्थात् चिक्कू धनिकांची सोयच झाली आहे ! हरिदासाकडून तीन तीन तास कीर्तन करून घ्यावें व शेवटीं बिदागीच्या वेळीं तुकारामाचा हा अभंग पुढें टाकून मोकळें व्हावें म्हणजे झालें ! असो. बिदागी घ्यावी पण ' यत्स्वल्पमपि तद्बहु ' किंवा ' अमृतं यद-याचितं ' हें वचन हरिदासांनीं आपणांपुढें ठेवावें. हरिदासांना फिरत्या मोफत वाचनालयाची उपमा येण्यांत येते, पण मोफत वाचनालय वाच-कांना फुकट असलें तरी तें चालवण्यास ग्रंथ वर्तमानपत्रें हीं विकत घेण्याला खर्च पडावयाचा तो पडतोच ही गोष्ट विसरतां कामा नये.

आमच्या मालाकार भोपटकरांचें थोडेसें अनुकरण करावयाचें तर " **सन्त पन्त व महन्त** " असे हरिदासांचे तीन सयमक वर्ग पाडतां येतील. तुकारामाप्रमाणें निस्स्वार्थबुद्धीनें प्रेरित होऊन उपदेश करणारे ते संत, चरितार्थाची काळजी नसतांना श्रीमंत औंधकर अगर बाळा-साहेब मिरजकर यांच्याप्रमाणें हौसेनें कीर्तन करणारे ते पंत, व धंदेवाईक हरिदास ते महंत ! धंदेवाईक हरिदासांना महंत हें विशेषण शोभण्याचें कारण असें कीं, महंताप्रमाणें त्यांना ( १ ) शिष्य करितां येतात, ( २ ) बिदागी घेतां येते व ( ३ ) विशेष प्रकारचा पोषाक करावा लागतो. ' **निवृत्तिपर, प्रवृत्तिपर व वृत्तिपर** ' असेंहि हरिदासांचें वर्गीकरण करतां येईल. यांपैकीं तुम्हांला कोणतें आवडेल तें घ्या.

हरिदासानें रुक्ष निवृत्तिपर किंवा दुःखवर्णनात्मक निरूपण फारसें करूं नये. निरूपण प्रवृत्तिपरच असावें. आजच्या काळीं तरी प्रवृत्तिपर उपदेशाची फार गरज आहे. कीर्तन संस्था ही जानपद आहे व असावी. योग्य प्रवृत्तिमार्गाचा उपदेश हरिदास करूं लागतील तर फार मोठें कार्य होणार आहे. पण प्रवृत्तीचा

उपदेश करतांना समोर बसलेल्या श्रोत्यांची निंदा अगर अवहेलना कदापीहि करूं नये. त्यानें अपेक्षित परिणाम न होतां हटकून उलट परिणाम होतो. रामदास म्हणतात कीं, सगुण मूर्तीसमोर असल्यास हरिदासानें निर्गुण कथा करूं नये. गाभाऱ्यांत विटेवर कमरेवर हात ठेवून उभा राहिलेला परमेश्वर तुम्ही मानतां, पण त्याचेहि अलीकडे सभामंडपांत जनतारूपी सगुण व साकार परमेश्वर आहे ही गोष्ट वक्त्यानें लक्षांत ठेवावी. जनीं असलेला जनार्दन उगवून घेण्याची संधि हरिदासांना आली आहे व ती त्यांनीं बरोबर उगवून घ्यावी.

कीर्तन हें अन्य उपदेशमार्गापेक्षां श्रेष्ठ आहे. कीर्तनाची महति फार मोठी आहे. वैकुंठ सोडुनि धांवे चक्रपाणी । कीर्तनाचा ध्वनि ऐकोनियां ।। असें कीर्तनाचें महत्त्व वर्णन केलें आहे. अर्थात् तें कीर्तन खालीं लिहिल्या प्रकारचें असेल तेव्हां म्हणजे "प्रल्हादस्तालधारी तरलगतितया चोद्धवः कांस्यधारी । वीणाधारी सुरर्षिः स्वरकुशलतया रागकर्ताऽर्जुनोभूत् ।। इंद्रोऽवादीत् मृदङ्गं जयजयसुकराः कीर्तने ते कुमाराः । यत्राग्रे भाववक्तासरसरचनया व्यासपुत्रो बभूव ।। पण अशा तऱ्हेचें स्वर्गीय कीर्तन ऐकण्याचें कोणा मानवाच्या नशिबांत असणार ? असो; शिक्षणाचें काम हरिदासांनींच केलें पाहिजे. हरिदासानें बिदागी घेण्यांत कांहींहि पाप नाहीं, पण एक सूत्रवाक्य मात्र हरिदासानें लक्षांत ठेवावें तें हें कीं, "आतां तुझें नाम गात असे गीतीं । म्हणोनि मानिती लोक मज" ।। हरिदासाच्या सर्व उपदेशाचें चीज याच ध्येयानें होणार आहे. असो. सरतेशेवटीं कीर्तनसंस्थेचा अखंड संप्रदाय चालावा व हिंदुसंस्कृतीचा प्रचार व लोकशिक्षणाचें कार्य या संस्थेच्या हातून व्हावें अशी आशा प्रदर्शित करून मी आपलें भाषण संपवितों.

---

# १२१. काशीनिर्णयांनीं आलेली अडचण

( केसरी ता. १५ जानेवारी १९२९ )

काशी येथील ब्राह्मणसंमेलनांत कोणते विषय चर्चेला व निर्णयाला निघाले होते ते प्रथम पाहूं. हे विषय असे—( १ ) स्त्रीपुरुषांच्या विवाहाची कालमर्यादा कोठपासून कोठपर्यंत शिष्टसंमत आहे व ऋतुप्राप्तीनंतर विवाह झाल्यास त्या गोष्टीचा निर्वाह कसा करावयाचा ? ( २ ) ब्राह्मणादि जातीमधील पोटजातींत परस्पर विवाहसंबंध होणें इष्ट आहे कीं नाहीं ? ( ३ ) विधवाविवाह व विवाहसंबंध-परित्याग शिष्टसंमत आहे कीं नाहीं ? ( ४ ) अस्पृश्यत्व हें जन्मामुळें येतें कीं कर्मामुळें येतें ? म्लेंच्छ व अंत्यज यांच्यामध्यें कांहीं तारतम्य मानावयाचें कीं काय ? भागवतधर्मदीक्षेनें जातिहीनत्व जाऊं शकतें काय ? ( ५ ) देवलस्मृति, जिचा संबंध शुद्धिकार्याशीं आहे, ती प्रमाण मानावी कीं नाहीं ? ( ६ ) म्लेंच्छसंसर्गासंबंधानें प्रायश्चित्ताची मर्यादा कोणती ? ( ७ ) व्रात्यसंस्कार किती पिढ्यांपर्यंत करतां येतो ? ( ८ ) चातुर्वर्ण्य हें जन्मसिद्ध आहे कीं कर्मसिद्ध आहे ? ( ९ ) धर्मज्ञ कोण ? व धर्मपरिवर्तन होऊं शकतें काय ? व झालें तर तें कसें व किती ? इत्यादि.

वरील प्रश्न पाहिले म्हणजे जुन्या मताचे व नव्या मताचे लोक यांच्यामध्यें जी वादभूमि आहे ती बहुधा सगळीच्या सगळी या प्रश्नांनीं आक्रमण केली आहे. काशी येथें धर्मगुरूंनीं केलेले निर्णय इतके स्पष्ट व निस्संदेह आहेत कीं ते मान्य करावयाचे तर त्यामुळें आज सगळाच्या सगळा ब्राह्मणसमाज, व ब्राह्मणच काय पण इतर कांहीं वर्गहि, पतित चांडाल या सदराखालीं कायमचे जाऊन बसतील ! इतकेंच नव्हे तर सामाजिक सुधारणा म्हणून कांहीं करावयाची तर तिला अनंत कालपर्यंत सवड किंवा आशा नाहीं असें ठरतें; व ही आपत्ति उघड दिसत असतां निर्णयांनीं येणाऱ्या अडचणींचा परिहार मात्र त्यांत कांहींच सांगितला नाहीं.

अर्थात् हे निर्णय नवीन मताच्या लोकांना तर मान्य होणार नाहींतच

परंतु जुन्या मतांच्या लोकांनाहि आज मान्य होऊं शकणार नाहींत. कारण ते कितीहि धर्मगुरुनिष्ठ असले तरी आपल्या भोंवतालची जगांतील परिस्थिति व स्वतःच्या समाजाची स्थिति या गोष्टीविषयीं त्यांना डोळे झांकून घेतां येत नाहींत. काशी संमेलनाच्या चालकांनीं धर्मगुरूचे निर्णय मिळविण्याचा घाऊक व्यापार केला! पण दुर्दैवानें तो त्यांना बाधक होणार हें त्यांनीं लक्षांत ठेविलें नाहीं. कारण एखाद दुसऱ्या गौण मुद्या-संबंधानें, म्हणजे ज्याच्याविषयीं समाजांतील आचार अद्यापि रूढ व शिष्ट-संमत झाला नाहीं, अशा एकाद्याच मुद्यासंबंधानें धर्मगुरूंचे निर्णय लोक-मताच्या विरूद्ध गेले असते तर धर्मगुरूंचा अनुनय करून कालांतरानें त्यांची अनुज्ञा मिळवावी पण आज आहे ती स्थिति मान्य करावी असें त्यांना वाटलें असतें. पण येथें सर्वच मुद्यांवर बोळा फांसला गेला!

धर्मगुरूंच्या निर्णयावर आक्षेप घेण्याचा प्रसंग कठीण खरा. पण त्याला आतां इलाज नाहीं. आपलें महत्त्व हें ज्याचें त्यानेंच रक्षिलें पाहिजे. धर्म-गुरु झाले तरी त्या सर्वांची पात्रता विद्वत्तेच्या दृष्टीनें सारखीच असते असें नाहीं. नुसता शास्त्रार्थ सांगणें ही गोष्टहि पुष्कळशी विद्वत्तेवर अवलंबून असते. आणि त्यांतूनहि जेव्हां शास्त्रार्थ सांगण्याची पात्रता नाहीं व समाज-स्थितीहि ओळखण्याची पात्रता नाहीं अशी सजोड अपात्रता एखाद्या धर्मगुरूच्या ठिकाणीं आढळते, तेव्हां त्याच्या निर्णयाविषयीं अनादर न दर्शविणें हें काम फार कठीण होतें.

उलटपक्षीं केवळ धर्मगुरूंच्या निर्णयांना कोणी नापसंती दाखविल्यानें तो धर्माभिमानशून्य किंवा नास्तिक ठरतो असें नाहीं. महाराष्ट्रच घेतला तर आज वे. शां. पाठकशास्त्री, नारायणशास्त्री मराठे, चित्रावशास्त्री, लक्ष्मणशास्त्री जोशी, महादेवशास्त्री दिवेकर या मंडळींना नास्तिक म्हण-ण्याची कोणाची छाती आहे? धर्मगुरु कुर्तकोटी यांच्यासंबंधानें तर बोला-वयासच नको. त्यांची विद्वत्ता सर्वश्रुत सर्वमान्य आहे. तात्पर्य, नास्तिक या शब्दाचा उपयोग प्रतिपक्षी शिवीसारखा कोणावर करूं लागतील तर त्या शब्दाचेंच महत्त्व नाहींसें होईल हें लक्षांत ठेवावें.

'नास्तिक' याचा अर्थ 'वेदनिंदक' असा आहेच. पण 'वेदप्रामाण्य न मानणारा' असा अर्थ घेतला तरी देखील, उपरिनिर्दिष्ट समयज्ञ शास्त्री-

वर्गच काय पण त्याच्याहून अधिक धिटाईनें नवीन मताचा पुरस्कार करणारे गृहस्थहि नास्तिक ठरूं शकत नाहींत. किंबहुना स्वतःस हिंदु म्हणवून घेणारा कोणीहि नास्तिक होऊंच शकत नाहीं. कारण लो. टिळकांनीं 'प्रामाण्यबुद्धिर्वेदेषु' अशी जी हिंदुधर्माची एका अंगानें व्याख्या केली आहे ती हिंदुमात्रास मान्यच आहे. फक्त वेदांचें प्रामाण्य काय, कसें व किती इतकाच प्रश्न उरतो.

थोडें बारीक दृष्टीनें पाहिलें तर असें दिसून येईल कीं, जुन्या पद्धतीच्या शास्त्री-पंडितांइतकाच नव्या दृष्टीच्या विद्वानांनाहि वेदांचा अभिमान असतो. व वेदप्रामाण्यबुद्धीहि त्यांची कमी नाहीं. परंतु वेदांचा अभिमान कशाबद्दल बाळगावयाचा व वेदप्रामाण्य म्हणजे काय याविषयीं मात्र दोघांचा अर्थ कदाचित् थोडा भिन्न असेल. धर्मदृष्टीची परीक्षा राजनिष्ठेच्या परीक्षेसारखी कांहीं अंशीं करितां येते. अस्सल राजनिष्ठा म्हणजे 'ना विष्णुः पृथ्वीपतिः' या न्यायानें राजा म्हटला कीं तो देवच असें समजून त्याची आज्ञा मानणारे, एवढेंच नव्हे तर तें कर्तव्य करण्यांत आनंद मानणारे, असे मनुष्य कोणत्याहि राज्यांत जसे थोडेच सांपडतात, तसेंच वेदवाक्य हें अगदीं ईश्वरवाक्य असें मानून, त्याप्रमाणें वागणारे सश्रद्ध व तत्त्वनिष्ठ असेहि थोडेच आढळतील. राज्यांत खोटे किंवा भोंदू 'राजनिष्ठ' अनेक असतात; म्हणजे ते राजावर जी निष्ठा दाखवितात ती स्वार्थ साधण्याकरितां. पण त्यांचा स्वार्थ बुडाला कीं, ते राजालाहि नांवें ठेवण्याला माघार घेत नाहींत. त्याचप्रमाणें वेदावर आपली श्रद्धा आहे असा बहाणा स्वतःची मान्यता राखण्याकरितां करणारे, पण स्वतःची गैरसोय झाली कीं वेदालाहि नांवें ठेवणारे लोक धर्माच्या राज्यांत अनेक असतात.

राजसंस्थेविषयीं सामान्यतः आदर बाळगणारे पुष्कळ. कारण ती संस्था परंपरापुनीत आहे. त्याचप्रमाणें वेदपद्धतीचीहि परंपरा जुनी असल्याकारणानें तिच्याविषयीं अनुकूल ग्रहानें अभिमान बाळगणारे लोक हिंदुस्थानांत पुष्कळ आहेत. राजसंस्थेविषयीं आदर बाळगणारे परंतु व्यक्तीच्या अधिकाराला व हक्काला महत्त्व देणारे लोक जसे राजकारणाच्या क्षेत्रांत आढळतात, त्याचप्रमाणें वेदाचे अधिकार मान्य करतांना त्याचबरोबर व्यक्ति-

स्वातंत्र्य व बुद्धिस्वातंत्र्य यांची जाणीव असणारे कांहीं लोक धर्मक्षेत्रांतहि आढळतात. राजाज्ञा अमान्य केली तर जे परिणाम भोगावे लागतील ते परिणाम भोगण्याला तयार असणारे लोकहि राजकारणांतील अनवस्था वाचविण्याकरितां नमते घेऊन वागणारे आढळतात. त्याचप्रमाणें ग्रामण्य-बहिष्कारादि सोसण्याची तयारी असतांहि, एकट्यानें समाजांतून फुटून जाण्यांत अर्थ नाहीं, आणि समाजाची काळजी न करतां आम्ही मनःपूत वागूं तर अनवस्था होईल, असें मानणारे लोक संक्रमणाच्या कालीं राजकारणाप्रमाणें धर्मांतहि आढळतात.

'बंडखोरांची' संख्या दोनहि राज्यांत कमीच. पण बंडखोरालाहि ज्याप्रमाणें राज्यपद्धतीचा अभिमान नसला तरी आपल्या देशाचा अभिमान असतो, त्याप्रमाणें श्रुतिस्मृति यांनीं सांगितलेला धर्म अपुरा पडतो म्हणून त्याचें परिवर्तन करण्याला सज्ज झालेला बंडखोर सुधारकहि नेहमीं व हटकून वेदाची अवमानना करणारा असतोच असें नाहीं. तात्पर्य, केवळ दुष्टपणा किंवा विक्षिप्तपणा यानें प्रवृत्त झालेला, व स्वकीयांचा अभिमान नष्ट होऊन परकीय तेवढें चांगलें अशा विपरीत कल्पनेचा, मनुष्य जसा कोणत्याहि राज्यांत क्वचितच मिळतो, त्याप्रमाणें वैदिक धर्माच्या राज्यांतहि, परधर्माच्या किंवा परसंस्कृतीच्या प्रेमानें बहकलेला व हिंदुधर्म बुडविण्याची प्रतिज्ञा करून निघालेला माथेफिरू विक्षिप्तहि एखादाच आढळणार !

म्हणून जुन्या शिष्टपंडित लोकांनीं नव्या विचाराच्या पिढीवर धर्मद्वेषाचा किंवा धर्मद्रोहाचा आरोप करतांना स्वतःच पूर्ण विचार करावा. कारण आमची अशी खात्री आहे कीं, हे जुने शास्त्री–पंडित देखील मूळच्या वैदिक धर्मापासून इतके च्युत झालेले आहेत कीं, त्यांनाहि कोणी पतित म्हटलें तर त्याचें साधार समर्थन करतां येईल. परिस्थितीच्या पाशांत एखादा मनुष्य यदृच्छेनें कोणा दुसऱ्याहून अधिक गुरफटला जावो, परंतु 'श्रुतिस्मृत्युक्त अस्सल धर्माचारी' ही खरी कसोटी लावली असतां जुने शास्त्री–पंडित झाले तरी त्या कसोटीला किती उतरतील हा प्रश्नच आहे. त्यांना वाटतें कीं, 'आम्ही वेदप्रामाण्य मानणारे आहों' असें म्हटलें कीं, मग आम्हाला १०० गुन्हे माफ होतील. पण नव्या विचाराचे लोकहि वेदप्रामाण्य कोठें मानीत नाहींत ? पण ते वेदप्रामाण्य तोंडानें

मानीत असतां, आपले आचार हल्लींच्या परिस्थितीशीं मिळते घेण्याकरितां शास्त्रांचा अर्थ आपल्या बुद्धीनें हवा तसा लावण्याचा अधिकार हा जर शास्त्री–पंडितांना आहे तर तो नव्या मताच्या लोकांना कां नसावा ? इतकाच काय तो प्रश्न आहे.

उलट कदाचित् असेंहि म्हणतां येईल कीं, शुद्धि–संघटन, पतित–परावर्तन, अहिंदूंचें हिंदूकरण वगैरे चळवळींत जे हिंदु पुढारी आज अग्रभागीं दिसतात ते जितके खरे हिंदुधर्माप्रमाणें वागणारे, निदान धर्मरक्षणाची लाळजी घेणारे, आहेत तितके जुने शास्त्रीपंडितहि नाहींत. कारण धर्मालाहि शरीर, मन, आत्मा वगैरे गोष्टी आहेतच. पण हिंदु या नांवानें निर्देश केला जाणारा समाजच जर उद्यां नष्ट झाला तर हिंदु धर्म कोणत्या आधारावर जगणार ? व गेल्या ५-७ शतकांत भरतखंडांतील धष्टपुष्ट असा हिंदुसमाज जो रोडावला व चिपाडासारखा बनला त्याचें कारण हे पुराणमतवादी शास्त्रीपंडितच होत. "हिंदुस्थानांत मुठभरच का होईना, पण ते आमच्या मताप्रमाणें अस्सल वैदिक धर्माप्रमाणें वागणारे हिंदु असतील व राहतील तर तितकेच आम्हाला पुरेत," असें म्हणणाराहि एखादा वावदूक शास्त्रीपंडित भेटेल. पण शुद्ध वैदिक धर्माची ऐट मारणाऱ्या या शास्त्रीपंडितांनीं विधर्मी मुसलमानांच्यायोगानें बुजबुजलेल्या पंजाब प्रांतांतल्या एखाद्या गांवीं जाऊन राहावें, किंवा १–२ वर्षांपूर्वी जेथें सत्यसमाजिस्ट लोकांचे दुष्ट अत्याचारी खेळ चालू होते, अशा महाराष्ट्रांतल्या एखाद्या गांवीं त्यांनीं जाऊन राहावयाचें होतें, म्हणजे त्यांना संख्याबलाशिवाय धर्मरक्षण कितपत होतें तें कळून येईल !

---

## १२२. हनुमान--जयंतीची सभा

( केसरी, १९३२ )

हनुमानजयंतीनिमित्त जशीं कीर्तनें होतात तसेंच आजचें व्याख्यानहि आहे. शिवाजीमहाराजांच्याविषयीं पुष्कळ माहिती आजवर व्याख्यानद्वारां आणि पुस्तकद्वारां बाहेर पडलेली आहे, तशीच मारुतीरायांच्याविषयीं

नवीन कल्पना, नवीन माहिती जर कोणीं काढली तर तिचा जनतेला पुष्कळ उपयोग होण्यासारखा आहे. इमर्सन म्हणतो कीं, ‘ कोणताहि महान् आत्मा जगांतून सर्वस्वीं नष्ट होत नाहीं. तर जातांना तो आपलें मोठेपण दुसऱ्या आत्म्याच्या स्वाधीन करून जातो. ’ श्रीशिवाजीमहाराज काय, मारुतीराय काय किंवा भीम, रामदास झाले काय सर्व महात्मेच होत.

संस्कृतीचे मुख्य मार्ग दोन असतात. एक आधिभौतिक व दुसरा आधिदैविक. शिवाजीमहाराजांचें चरित्र आधिभौतिक किंवा ऐतिहासिक आहे; आणि मारुतीरायांचें चरित्र आधिदैविक किंवा पौराणिक आहे. संस्कृतीचा तिसरा मार्ग म्हणजे काव्य. इतिहास, काव्य व पुराण हे ज्ञानदानाचे तीन मार्ग होत. पण इतिहास आणि काव्य यांमध्यें फार फरक आहे. इतिहास हें काव्य होऊं शकणार नाहीं; तसेंच काव्य हें इतिहास होऊं शकत नाहीं. पण पुराणांत मात्र या दोहोंचीहि मिसळ झालेली दृष्टीस पडते. अर्धा इतिहास आणि अर्धें काव्य यांचें मिश्रण म्हणजे पुराण.

ऐतिहासिक ज्ञान हें मागल्या पिढीपेक्षां पुढील पिढीला अधिक होत असतें. सकृद्दर्शनीं हें विधान थोडें चमत्कारिक दिसतें पण तें खरें आहे. उदाहरणार्थ असें पाहा. शिवाजीमहाराजांचा अस्त होऊन आज तीनशें वर्षें झालीं. बखरकारांनीं शिवाजीची बखर त्यांच्या मरणानंतर १५० वर्षांनीं लिहिली. आणि या बखरकारांच्या पूर्वीं १५० वर्षें शिवाजीचा जन्म झाला होता. आज इतिहास–संशोधक–मंडळीहि शिवाजीची माहिती उपलब्ध करीत आहे. मग असें जर कोणीं विचारलें कीं, शिवाजीची माहिती १५० वर्षांपूर्वीं लिहिणाऱ्या बखरकारांना अधिक असेल कीं आज तीनशें वर्षांनंतर शिवाजीचा इतिहास लिहिणाऱ्या संशोधक मंडळींना अधिक असेल ! वरवर विचार करणारा असें उत्तर देईल कीं, शिवाजीची अधिक माहिती बखरकारांनाच असणार. पण खोल विचार करतां हें उत्तर चूक ठरतें. आज संशोधन करणाऱ्या गृहस्थांनाच शिवाजीची विश्वसनीय खरी माहिती अधिक आहे. बखरकारांनीं ऐकीव दंतकथा लिहून ठेवल्या. त्यावेळीं कागदपत्र वाचून ज्याला इंग्रजींत ‘ फॅक्ट फाईंडिंग ’ म्हणतात तशी माहिती लिहून ठेवण्याची पद्धतच नव्हती.

या वरील विधानाच्या पुष्टीकरितां दुसरें उदाहरण द्यावयाचें झालें तर माझें स्वतःचेंच देतां येईल. माझ्या पणजोबांना आमच्या वंशवृक्षाची जेवढी माहिती होती त्यापेक्षां अधिक माहिती आज मला आहे. आणि याचें कारण असें कीं आज शेंदीडशें वर्षे पणजोबांनीं रद्दी म्हणून बाजूस टाकून दिलेलें कागदांचें बाड परवां माझ्या हातीं लागलें आणि त्यावरून आमच्या वंशवृक्षाची अधिक विश्वसनीय माहिती मिळवून मीं पणजोबांच्या डोक्यावरून उडी मारून पलीकडे गेलों. ही ऐतिहासिक दृष्टि उत्तरोत्तर अधिक वाढत आहे. झालेल्या गोष्टी आहेत तशा सांगणें हा इतिहासाचा आत्मा आहे. आणि प्रत्येक गोष्ट झाली त्याच्यापेक्षां अधिक रंगवून खुल-वून सांगणें हा काव्याचा आत्मा आहे. आणि पुराणाचा आत्मा म्हणजे दोघांचा संयोग. इतिहास आणि काव्य या दोन कल्पना अशा कांहीं एकत्र करावयाच्या कीं, तो इतिहासच घडला अशा आविर्भावानें त्या सांगावयाच्या म्हणजे तें पुराण झालें.

रामायण हें काव्य आहे कीं इतिहास आहे असा एक प्रश्न मध्यंतरीं निघाला होता. रामायण हा इतिहास आणि काव्य यांचें मिश्रण आहे. ज्या गोष्टी मनाला आकलन करतां येतात तो इतिहास आणि आकलन करतां येत नाहींत तें काव्य, आणि जर या नियमाच्या कसोटीला लावून रामायण लिहिलें तर तो इतिहासच होईल. जसें पर्वताला पंख फुटले व ते उडू लागले हें काव्य. पण राम लंकेला गेले ते ज्या ठिकाणापर्यंत नौका चाल-विणें शक्य होतें तोंपर्यंत नौकेंत बसून, व ज्या ठिकाणीं डोंगराची किनार वर आलेली होती अशा ठिकाणावरून चालत जाऊन त्यांनीं समुद्र ओलां-डला व लंका गांठली असें वर्णन केलें असतें तर तें मनाला पटलें असतें व तो इतिहासहि झाला असता. पण असें यथार्थ वर्णन जर कवीनें केलें असतें तर मग कविकल्पना ती काय राहिली? कारण कवि म्हटला कीं, त्याच्या कल्पनेची भरारी पाताळांतील शेषाच्या टाळूपासून तों थेट ध्रुवाच्या डोक्यापर्यंत असावयाची. राम हीं अक्षरें लिहिलेले दगड समुद्रांत सोडले आणि ते तरूं लागून राम त्यांच्यावरून चालत गेले हें रामायणांतील वर्णन वाचलें कीं, येथें कविकल्पनेची भरारी आहे असें वाटतें. आणि हें वर्णन ऐतिहासिक दृष्टीनें रामायण वाचणाऱ्या मनुष्याच्या मनाला बोचतें.

असेंच मारुतीरायांना पौराणिक स्वरूप प्राप्त होण्याचें कारण ही कविकल्पनाच. असल्या कल्पना सत्य मानण्याचें कारण २–३ हजार वर्षांपूर्वी आपण सर्व आधिदैविक दृष्टीचे होतों. म्हणजे ज्या त्या वस्तूंत देव आहे असें मानणारे होतों. ज्याप्रमाणें एकहि अक्षर असें नाहीं कीं ज्यांत कांहीं मंत्र नाहीं आणि एकाहि झाडाची मुळी अशी नाहीं कीं जी औषधी नाहीं, तशी एकहि वस्तु अशी नाहीं कीं जो देव नाहीं. हनुमान हा ऐतिहासिक पुरुष असतां त्याच्या चरित्रांत काव्यकल्पना घालून त्याचें पुराण बनविलें.

ध्येयाच्या दृष्टीनें या पौराणिक कथेकडे पाहिलें तर त्यांत दोष नाहीं. सत्पुरुषाचें ध्येय कसें असावें असें जर कोणी विचारील तर आम्हीं मारुतीरायाकडे बोट दाखवूं. शक्ति, नीति, भक्ति या तीन गुणांनीं युक्त असा पुरुष दुसऱ्या कोणत्याहि पुराणांत हुडकूं गेलें असतां सांपडणार नाहीं. ग्रीक पुराणांत सॅम्सन नांवाचा एक मारुतीसारखा अत्यंत बलवान् पुरुष आहे. पण दोघांत फरक इतका आहे कीं मारुतीरायांच्या शक्तीचा उपयोग निर्बलांचें संरक्षण करण्यांत त्यांना आधार देण्यांत झाला, तर सॅम्सनच्या आततायी शक्तीचा उपयोग त्याच्या स्वतःच्या मृत्यूंत झाला. तसेंच नीतींत आणि गुरुभक्तींत मारुतीरायासारखा पुरुष, ग्रीक काय, रोमन काय, किंवा दुसऱ्या कोणत्याहि पुराणांत सांपडणार नाहीं हें मी खात्रीनें सांगतों. ज्याच्या ठिकाणीं भक्ति नाहीं नीति नाहीं आणि ज्याच्या ठिकाणीं हे दोन गुण असूनहि तो निर्बल आहे अशा तऱ्हेचे पुरुष इतर पुराणांतून आढळतात. पण या तिन्ही गुणांचा समन्वय ज्याच्या ठिकाणीं आहे असा फक्त मारुतीच. हा पुरुष आपल्या पुराणांत आहे ही सुदैवाचीच गोष्ट समजली पाहिजे. प्रत्येक तालमींत जशी मारुतीची मूर्ति असते, तसेंच प्रत्येक तालमीवर 'बलमार्तभयोपशांतये' हें ब्रीदवाक्य लिहून ठेवलें पाहिजे. म्हणजे शक्तीचा उपयोग निर्बलांचें संरक्षण करण्याकडे केला पाहिजे हें प्रत्येक तालिमबाज माणसानें लक्षांत ठेवलें पाहिजे.

---

# १२३. गीतेंतील कांहीं विरोधाभास

( ता. २७ नोव्हेंबर १९३३ रोजीं गीताधर्ममंडळींत दिलेलें प्रवचन )

वेदांतशास्त्रांत चिदाभास, न्यायशास्त्रांत हेत्वाभास, आणि अलंकार-शास्त्रांत विरोधाभास हे तीन आभास प्रसिद्ध आहेत. आणि त्यांच्या परिहाराची रीतीहि तज्ज्ञांना ठाऊकच असते. हेत्वाभास हा जसा बुद्धिमांद्याचा परिणाम, तसाच उलट विरोधाभास हा बुद्धीच्या चापल्याचा म्हणजे प्रतिभेचा परिणाम असतो. आणि हेत्वाभास हा जर दोष, तर विरोधाभास हा गुण किंवा अलंकार ठरतो ! " नंतर साहित्यशास्त्रांतल्या विरोधालंकाराची एकदोन लक्षणें सांगून आणि पांचचार उदाहरणें देऊन श्री. केळकर पुढें म्हणाले—" गीतेसारख्या ग्रंथांत 'अलंकार' कसे असतील अशी शंका येते; पण कृष्णभगवान् हे रणांगणावर एका ठरीव संख्येच्या मात्रांच्या वृत्तांत कर्मयोग श्लोकबद्ध लिहावयाला तयार झाले, तेव्हां अलंकार साधणें ही फक्त कवित्वबुद्धीची पुढची स्वाभाविक पायरीच होय. तोंड उघडून विश्वरूप दाखविण्यापेक्षां एखादा अर्थालंकार साधणें हें खचित कमी अद्भुत होय ! ज्ञानेश्वरादि, साधुसंत गीतेवर टीका लिहावयाला बसले आणि पहिल्या प्रतीचें काव्य त्यांनी निर्माण केलेंच ना ! गीतेंत एका ठिकाणीं तर विरोधाभास अलंकार साधून आपण कशी गंमत केली (!) अशा बुद्धीनें अर्जुनाला भगवंतांनींच म्हटलें कीं, "पंचभूतें व मी यांच्या संबंधांत तुला उलट सुलट वाटेल त्या शब्दांनी मी विधानें करून दाखविलीं आणि तीं सर्व खरींहि आहेत ! मग ( पश्य मे योगमैश्वरम् ) पहा बरें मी किती कुशलपणानें विरोधाभास साधला तो ! "

गीतेवरील भाष्यांत श्रीशंकराचार्यांनीं चमत्काराकडे अलंकाराच्या दृष्टीनें पाहिलें नाहीं. त्यांच्या संन्यासाश्रमाच्या गांभीर्याला अर्थात् तें योग्य होतें. पण लो. टिळकांनीं आपल्या भाष्यांत लौकिक बुद्धि ठेवून कांहीं कांहीं शब्द गीतेनें गमतीनें मौजेनें घातलें आहेत असा अभिप्राय प्रकट केला. असो. गीतेंत कित्येक शब्द—उदाहरणार्थ प्रकृति योग हे अनेक अर्थानें वापरले आहेत. तो प्रथम विरोधाभासच वाटतो. पण प्रत्यक्ष श्लेषबुद्धि नसेल तर, शब्दांच्या अनेकअर्थत्वाचा उपयोग करण्याला विरोधा-

भास म्हणतां येत नाहीं. तसेंच 'ऊर्ध्वमूलमधःशाखम्' या श्लोकांत विरोधाभास आहे. पण गीतेनें तो फक्त अद्भुत अलंकार केला आहे हें 'अश्वथम् प्राहुः अव्ययम्' यांतील 'प्राहुः' या शब्दावरून दिसून येतें. म्हणून तोहि सोडून, स्वतः गीतेनेंच निर्माण केलेल्या विरोधाभासाची मी उदाहरणें देतों असें म्हणून रा. केळकर यांनीं खाली विरोधाभासांचा उल्लेख केला.

(१)–(६-२३) 'तं विद्यात्' इ० यांत योग तोच वियोग व वियोग तोच योग असें म्हटलें आहे. पण त्याचा परिहार सोपा आहे. कारण पातंजल योगशास्त्रांत योग याचा अर्थ पदार्थाला 'जोडून घेणें' असा नसून, पदार्थापासून ओढून सोडवून घेणें असा आहे. योग म्हणजे चित्ताचें निरोधन. तें होण्याला विषयांपासून चित्त काढून घ्यावें लागतें व एकाग्र करावें लागतें. पण तेंहि ईश्वराच्या चिंतनानेंच असें नव्हे. तर वाटेल त्या आवडत्या वस्तूच्या चिंतनानेंहि ! गीतेंत योगशास्त्राला धरून योग शब्दाचा पांचचार वेळां उपयोग केला आहे. तो सोडला असतां, योग याचा अर्थ सामान्यतः कर्मसाधन, कर्मपद्धति, कर्मगुण-युक्ति-कौशल्य असाच होतो. (२)–(९-४ ते ६) 'मया ततमिदम्' इ० तीन चार श्लोकांत भूतें व आपण स्वतः यांचा उलट सुलट संबंध भगवंतांनीं शक्य तितक्या विरोधाभासक शब्दांनीं सांगितला आहे. पण सांख्यांप्रमाणें भूतें हे प्रकृतीचे विकार, आणि वेदान्ताप्रमाणें भूतें हीं मायेनें निर्माण होतात, हा सिद्धान्त मानला म्हणजे भूतें हीं ईश्वरांत आहेत व नाहींत हीं दोनहि विधानें खरीं ठरतात. (३)–(३-२८) 'गुणा गुणेषु वर्तंते' या श्लोकांत विधानाचें निरर्थकत्व असेंच फक्त विरोधाभासाचें मर्यादित स्वरूप आहे. पण 'वर्तन्ते' या शब्दाचा अर्थ आहेत किंवा राहतात असा साधा न करतां, 'खेळ करतात' असा मार्मिक अर्थ केला म्हणजे ग्रंथ चांगला लागतो. येथें केळकरांनीं सांख्यशास्त्राचा गुणसिद्धान्त व परिणामवाद हे सांगून सांख्यसूत्र ५९ व पंचदशी यांतील रंगभूमि व नर्तकी यांचे दृष्टान्त सांगून, 'वर्तंते' म्हणजे 'विलासरूप वर्तन करतात' अशा अर्थानें विरोधाभासाचा परिहार केला.

(४)–(२-४२,४३;११-५३) यांतील यज्ञकर्मनिंदा व यज्ञकर्म-

स्तुति हें विरोधाभासाचें उदाहरण देऊन, ' नान्यदस्तीतिवादिनः ', ' एवम् प्रवर्तितं तम् चक्रम् ', ' यज्ञो ज्ञानं तपश्चैव पावनानि मनीषिणाम् । एतान्यपि तु कर्माणि संगं त्यक्त्वा फलानि च ' इत्यादि गमकांनीं परिहार सांगितला. (५)–(४-१८) 'कर्मण्यकर्म यः पश्येत्' इ. येथें विरोधाभास अगदीं स्पष्ट आहे. पण ईशोपनिषदांतील ' कुर्वन्नेवेह कर्माणि ' आणि अष्टावक्र गीतेंतील ' निवृत्तिरपि मूढस्य ' आणि खुद्द गीतेंतील ' कार्यमित्येव ' ( १८-९ ) या श्लोकांचीं गमकें सांगून परिहार केला. ( ६ )—( १३-२१ ते २३ ) ( ९-३० ) ' सर्वथा वर्तमानः ' ' अपि चेत् सुदुराचारः ' इ. हाहि एकप्रकारचा विरोधाभास म्हणून सांगून, मोक्षपात्रतेचीं लक्षणें भगवंतांनीं क्रमानें कशीं विस्तृत केलीं आहेत हें सांगून, व ' विशेषानुग्रहश्च ' या ब्रह्मसूत्राचा उल्लेख करून, एकदां ज्ञान गृहीत धरल्यावर विरोधाभासाचा परिहार आपोआप होतो असें सांगितलें. ( ७ )– ( ४-६;३-४३ ).

'अजोपि सन् आत्मानम् सृजामि,' ' आत्मानम् आत्मना संस्तभ्य ' हीं विरोधाभासाचीं उदाहरणें देऊन, त्यांचा परिहार मन व आत्मा यांच्या शास्त्रीय स्वरूपाच्या अनुरोधानें केला. आपलीच आपण उत्पत्ति करणें किंवा आपलेंच आपण स्तंभन करणें या गोष्टी विपरीत भासतात. परंतु यंत्रशास्त्रांतील ' जिरॉस्कॉप ' ( स्वयंतोलकयंत्र ) आणि ' क्रँकव्हील ' म्हणजे ' गतीचें परावर्तकचक्र ' यांचीं उदाहरणें देऊन विरोधाभासाचा परिहार केला. आणि शेवटीं सांगितलें कीं, कोणताहि ग्रंथ वाचतांना अडचणीवरून उडी मारून न जातां अडखळून पडावें; आणि मग अडचणी बाजूला काढून निघून जावें; असें केल्यानेंच ग्रंथ समजतो असें सांगून प्रवचन संपविलें.

---

# १२४. गीतेंतील नीतिशास्त्र

( मंगळवार ता. १० डिसेंबर १९३५ रोजीं सायंकाळीं ६ वाजतां पुणें येथील लो. टिळक-स्मारक-मंदिरांत गीताजयंत्युत्सवांतील समारोपाचें प्रवचन. )

प्रत्येक ग्रंथाचें तात्पर्य काय हें सांगतां येतें. त्याप्रमाणें गीतेचें तात्पर्य खालीलप्रमाणें सांगतां येईल:—

१ अज्ञानी मनुष्यानें कर्म करून ज्ञान मिळवावें.

२ ज्ञानी मनुष्यानेंहि लोकसंग्रहार्थ कर्म करावें.

३ कर्म हें कोणाला सुटतच नाहीं, मग आपण होऊन तें केलेलें काय वाईट ?

४ मात्र कर्म करणें तें समबुद्धि ठेवून निर्विकारपणें आणि स्वार्थी दृष्टीनें फलाची आसक्ति न ठेवतां करावें.

५ कर्म कोणतें करावें हें ज्याचें त्यानें विवेकबुद्धि चालवून ठरवावें.

६ पण त्यानें आपला स्वभाव व प्रकृति हीं लक्षांत घेऊन ठरवावें हेंच श्रेयस्कर.

७ कोणतें परसापेक्ष कृत्य चांगलें व कोणतें वाईट हें ठरवितांना आत्मौपम्यबुद्धीचा उपयोग करावा.

८ कर्म करतांना विशिष्ट प्रकारची मनःस्थिति ठेवावी व संभाळावी.

वास्तविक अर्जुन फक्त एक विवक्षित गोष्ट करण्यास तयार नव्हता. ती म्हणजे कुलघातक युद्ध. याचा अर्थ त्यानें सर्वच कर्मांचा त्याग केला होता असें नाहीं. उदाहरणार्थ—कृष्ण त्याला फिरून एखादा दिग्विजय करावयाला नीघ असें म्हणता तर तो निघाला असता; व अहिंसा हा क्षत्रियगुण असें न म्हणतां त्यानें रणांगणावर वाटेल तितके प्रतिपक्षीय वीर स्वर्गाला पाठविले असते. त्यानें पूर्वी एक वेळ संन्यासहि घेतला होता. पण तो त्रिदंडी असून प्रसंग येतांच 'मोडुनि दंडा फेकुन देइन भिकार भगवीं वस्त्रें, मशकापरि तीं उडविन सारीं यादवचमु शस्त्रास्त्रें', असें म्हणून संसारसुखाचा जो मुख्य आधार म्हणजे आपल्या वधूचा हात तो आपल्या

हातांत घेऊन रैवतक पर्वताच्या गुहेंतून तो बाहेर पडला. दुसरी एखादी सुभद्रा मिळवावयाची असती तर तें नाट्यकर्म तो पुनः करता.

तात्पर्य एक विवक्षित गोष्टच करण्याला अर्जुन तयार नव्हता. पण तीच गोष्ट त्यानें त्यावेळीं करणें हें त्याचें कर्तव्य होतें, इतकेंच अर्जुनाला पटवून देऊन कृष्णाला तें घडवून आणावयाचें होतें. तें त्यानें अखेर घडवून आणलें. तथापि ही एक साधी गोष्ट घडवून आणण्याला कृष्णाला सगळ्या विश्वाला वळसा घालावा लागला, आणि सगळ्या नीतिशास्त्राचा व तत्त्वज्ञानाचा खल करावा लागला. शेवटीं अर्जुनानें कृष्णाची गोष्ट मान्य केली. तो म्हणाला " माझा संदेश व मोह गेला. मला स्मृति प्राप्त झाली. तेव्हां आतां तूं सांगितल्याप्रमाणें करतों. "

या श्लोकांतील ' स्मृतिः लब्धा ' या पदांचा अर्थ शंकराचार्य असा करतात–" स्मृतिश्च आत्मतत्त्वविषया अज्ञानसंमोहनाशः आत्मस्मृतिलाभः एव। करिष्ये वचनं तव इत्यत्र अहं त्वत्प्रसादात् कृतार्थः। न मम कर्तव्यं अस्ति इत्यभिप्रायः। एवं परिसमाप्तः शास्त्रार्थः "

याच पदांचा अर्थ लो. टिळक करतात तो असाः–" तुमच्या प्रसादानें मोह नष्ट झाला आणि मला कर्तव्यधर्माची स्मृति झाली. मी आतां निःसंदेह होऊन राहिलों आहे. तुमच्या म्हणण्याप्रमाणें युद्ध करितों. "

टिळकांच्या मतें शंकराचार्यांनी मूळ पदांच्या अर्थाची ओढाताण केली आहे. " अर्जुनानें पुढें युद्ध केलें. पण या युद्धकर्माचा व तेथपर्यंतच्या शास्त्रार्थाचा अर्थाअर्थी संबंध नाहीं. अर्जुनानें पुढें युद्ध केलें पण तें कृष्णाचा शब्द खालीं पडूं देऊं नये म्हणून केलें. स्वतःचें कर्तव्यकर्म म्हणून नव्हे " असें शंकराचार्यांनीं दर्शविलें आहे. टिळकांचें म्हणणें "अर्जुनानें पुढें युद्ध केलें तें त्याला स्वतःच्या कर्तव्याची जी जाणीव फिरून झाली तिच्या आधारावर, तिजवरील विश्वासानें, आत्मप्रयत्नानें केलें, केवळ कृष्णाचा शब्द मानावा म्हणून नव्हे." कृष्णाला नीतिशास्त्राचें ज्ञान होतें तें अर्जुनाला पूर्वी असलें तरी त्याला त्याचा क्षणमात्र विसर पडला होता खरा. पण तो विसर गेल्यावर अर्जुनानें केलें तें त्याला स्वतःच्या विवेकबुद्धीला पटलें म्हणून! कारण कृष्णानें डोकेंफोड करून सांगितलेल्या

नीतिशास्त्राचा सिद्धान्तच असा होता कीं, मनुष्याच्या स्वभावाला जुळेल व विवेकबुद्धीला पटेल तेंच त्यानें कर्तव्य समजून करावें, दुसऱ्याचें ऐकून करूं नये. तात्पर्य, युद्ध करण्यांत अर्जुनाच्या दोन गोष्टी साधल्या. ( १ ) आत्मतुष्टि, ( २ ) मित्रवचनाचा बहुमान. पण त्यांतल्या त्यांत पहिलीच गोष्ट अधिक महत्त्वाची.

या दृष्टीनें पाहतां गीतेंतील मुख्य विषय सर्वकर्मस्वीकार व सर्वकर्मसंन्यास यांच्या विरोधाचा परिहार असा नाहीं. तर मनुष्य प्रवृत्तिमार्गी असला तरी त्यांतल्यात्यांत त्यानें हें अमुक करावें कीं तें अमुक करावें, ही दुकल सोडविण्याचा आहे. ‘ तयोस्तु कर्मसंन्यासात् कर्मयोगो विशिष्यते ’ हें सांगितल्यावर कर्मस्वीकार विरुद्ध सर्व कर्मसंन्यास हा वाद सिद्धान्त–प्रस्थापनेनें मिटला. त्याचा उल्लेख गीतेच्या पुढील भागांत फारसा येतच नाहीं. पण पुढें जी सर्व चर्चा आहे ती कर्मयोगाचें शास्त्र सांगण्याची आहे. कर्मयोगाचें शास्त्र म्हणजेच नीतिशास्त्र. हें शास्त्र सांगण्याची तत्त्वज्ञानी लोकांची रीत अशी असते कीं मनुष्यानें अमुक करावें, अमुक करूं नये. डू अँड डोंट या आज्ञांची यादी ते सांगत नाहींत. तर नीतीच्या सर्वमान्य कल्पनांची व उपपत्तीची ते छाननी करतात, आणि नैतिक वर्तन म्हणजे काय याचा फक्त नियम किंवा फॉर्म्युला ते बनवितात. आणि तो नियम किंवा फॉर्म्युला लावून मग कोणतेंहि उदाहरण ज्याचें त्यानें सोडवावें. गणितशास्त्रांत निश्चित व अनिश्चित दोनहि प्रकारचे मूल्यदर्शक आंकडे व अक्षरें घेऊन, त्यांचीं उदाहरणें, समीकरणें बनविलेलीं असतात. तसेंच नीतिशास्त्राचें आहे. अंकगणितांत रीतिच मुख्यतः सांगतात व ती लावून उदाहरणें सोडवितां येतात. अंकगणितांत १, २, ३ या आंकड्यांना निश्चित मूल्य आहे, मग त्यांनीं दर्शविलेली वस्तु कोणतीहि असो. बीजगणितांत मूल गणकांना आंकड्यांइतकाहि निश्चितपणा नसतो. त्यांतील अक्षरें वाटेल ती इष्ट संख्या व त्यानंतर त्या संख्येइतके वाटेल ते पदार्थ दर्शवूं शकतात. अंकगणितांतील एक म्हणजे एकच, मग तें फळ असो वा मनुष्य असो. बीजगणितांत क्ष ज्ञ या अक्षरांत वाटेल तो आंकडा इष्ट म्हणून धरतां येतो. क्ष म्हणजे इष्ट मानाल त्याप्रमाणें दोन किंवा दोनशें फळें म्हणा, मनुष्यें म्हणा किंवा आणखी

कांहीं म्हणा. तसेंच कांहींसें नीतितत्त्वांच्या फॉर्म्युल्यांचें किंवा समीकरणांचें असतें

उदाहरणार्थ, ‘ पंडिताः समदर्शिनः ’ हा नीतिशास्त्रांतला एक तात्त्विक फॉर्म्युला होईल. त्याचा अर्थ पंडितानें, शहाण्या मनुष्यानें, समताबुद्धि ठेवावी. पण ब्राह्मण, गाय, बैल, हत्ती, चांडाळ या सर्वांसंबंधानें समताबुद्धि ठेवावयाची तरी ती प्रत्यक्ष व्यवहारांत कशी आचरावी हा प्रश्न शिल्लकच राहातो; आणि तो पंडितानें विवेकबुद्धीनेंच सोडविला पाहिजे. म्हणून कुत्र्याला मांस, हत्तीला रोडगा व ब्राह्मणाला धान्याचे पदार्थ खावयाला घातले तरी पंडितानें समता संभाळली असेंच ठरेल. क्षुधिताला अन्नदान देणें हें परोपकाराचें भूतदयेचें म्हणून नैतिक कृत्य मानलें तर निरनिराळे तीन पदार्थ तिघांना दिल्यानें त्याच्या समाताबुद्धीला बाध येत नाहीं; त्याचें कृत्य नीतीचेंच ठरेल.

आधुनिक तत्त्ववेत्ते नीतिशास्त्राचा विचार दोन तऱ्हांनीं करतात. एक तऱ्हा अशी कीं नीतीच्या म्हणून मानलेल्या प्रत्येक स्थूल तत्त्वाची परिणति कसकशी होत गेली हें ऐतिहासिकदृष्ट्या पाहावें. या रीतीनें जुन्यातून नवें कसें निघालें हें पाहणें बोधप्रद होतें. या रीतीनें केलेलें नीतितत्त्वांचें परीक्षण सर्वव्यापी व निर्विकार असून, नीतितत्त्वें हीं अस्थिर व प्रगमनशील असतात हें दिसून येतें हा फायदा असतो. जुन्या काळीं मनुष्यव्यवहार हा अधिक वस्तुनिष्ठ असे. आधुनिक काळीं तो अधिक आत्मनिष्ठ व मनोनिष्ठ झाला आहे. नीतिविचारांत विरोधाचे प्रश्न आले असतां पूर्वीच्या लोकांनीं ते कोणत्या धोरणानें सोडविले हें समजल्यास आज तसल्या प्रश्नांची उत्तरें देणें कदाचित् अधिक सोपें होते. नीतिविचाराची दुसरी तऱ्हा पृथक्करणाची. ती अशी. नीतिविषयक प्रश्न किंवा सिद्धान्त घेऊन, त्याचें मानसिक व आध्यामिक मूळ शोधित जाणें. हा शोध ऐतिहासिकदृष्ट्या नव्हे तर तात्त्विकदृष्ट्या. स्वभाव, इच्छा, वासना, चारित्र्य, हेतु, सुखदुःख, चांगलें–वाईट, सद्गुण–दुर्गुण, सदसद्विवेकबुद्धि इत्यादिकांत नैतिक तत्त्व कोणतें व कां हें स्वतःच्या मनानें ठरविणें.

माझ्या मतें गीतेंतील नैतिक विचाराची तऱ्हा पहिली नसून दुसरी आहे. गीतेंतलें गुह्यज्ञान सांप्रदायिक पद्धतीनें प्रथम कोणापासून कोणाला,

मग कोणापासून कोणाला मिळालें इतकेंच मोघम सांगितलें आहे. पण दुसऱ्या पद्धतीनें केलेली चिकित्सा भरपूर आहे. या चिकित्सेचें तात्पर्य असें. मुख्य सिद्धान्त हा कीं मनुष्यानें स्वकर्तव्य करणें ही नीति. तें न करणें, न करून नुसतें गप्प बसणें हें अनीतिपर आहे असेंहि स्पष्ट म्हटलेलें आहे. अर्जुन कर्तव्यपराङ्मुख होतोसा पाहून तें कर्म अनार्यजुष्ट, अकीर्तिकर, अनुपपन्न, लघुता आणणारें, पुरुषार्थाला लांछन आणणारे असें म्हटलें आहे. म्हणजे त्याला लौकिक दूषणें दिलीं आहेतच, पण अस्वर्ग्य आहे, पापपर आहे असेंहि धार्मिक दूषण दिलें आहे. तथापि एकंदरीनें नीतिकर्तव्याचा विचार करतां श्रुतिस्मृत्युक्त धर्मविचारांचें मिश्रण फारसें केलेलें नाहीं. अध्यात्मविचार केला आहे, तो नीतितत्त्वनिर्णयाकरितांच केला आहे, पापपुण्याच्या दृष्टीनें केलेला नाहीं.

मनुष्यानें काम्य कर्में सोडावीं, पण नित्य नैमित्तिक कर्में सोडूं नयेत. मात्र त्यांच्या फलाची आशा धरूं नये. कर्मफलाची आशा न ठेवणें हाच त्याग होय. निष्काम कर्म करणें ही नीति. कर्मसंन्यासापेक्षां कर्मफलत्याग हा श्रेष्ठ. चतुर्थाश्रमरूपी संन्यास न घेतां उरल्या तीन आश्रमांतील कर्में निष्कामबुद्धीनें करीत राहणें हेंहि तितकेंच चांगलें. यज्ञ, दान, तप हीं कर्में अवश्य करावीं. मोहानें कर्मांचा त्याग करणें तर तामसच, पण कर्म दुःखकारक म्हणून सोडणें हा राजस त्यागहि अयोग्य. कर्म करून त्याच्या फलाचा त्याग करणें हाच खरा सात्त्विक त्याग होय. कर्म करणारानें मी कर्मकर्ता अशी अहंकारभावना ठेवू नये. कर्म करणारानें आपलें सामर्थ्य किती, आपण करतों यापासून काय परिणाम होतील, याचा पूर्ण विचार करावा. कर्म करणें तें धैर्यानें व उत्साहानें करावें. त्याविषयीं शोक किंवा हर्ष नसावा. गीतेच्या दुसऱ्या अध्यायांत स्थितप्रज्ञाच्या वर्णनांत सांगितले ते सर्व कार्यकर्त्यांचे नैतिक गुण होत. अध्याय १८ श्लोक २८ मध्यें कार्यकर्त्यांच्या अंगचे दोष कोणते हे सांगितले आहे. सात्त्विक बुद्धीनें कार्य व अकार्य यांतला भेद कळतो त्याचप्रमाणें सात्त्विक स्वरूपाची धृति हा नैतिक गुण होय. कर्तव्यें हीं स्वभावजन्य गुणामुळें प्रत्येकाची वेगवेगळीं होऊं शकतात. म्हणून स्वभावगुणावरूनच कर्म करावें. स्वभावगुणानें प्राप्त किंवा जन्मप्राप्त असें वाटेल तें कर्म करणें यांत दोष नाहीं. कर्मांची परि-

समाप्ति हीच ब्रह्मप्राप्ति समजावी. ईश्वरावर निष्ठा ठेवणें ही कर्मसिद्धीला मदतच होते, इत्यादि. अध्याय दोन व अध्याय अठरा हे वाचले असतां त्या दोहोंत मिळून नीतिवैद्यक ग्रंथांतील औषध व पथ्य यांची माहिती मिळते.

गीतेंत संन्यास व कर्मयोग यांच्या लढ्याइतकाच महत्त्वाचा प्रश्न, कर्मयोगी मनुष्यापुढें हें करूं कीं तें करूं असा जो प्रश्न उत्पन्न होतो तो, तोहि महत्त्वाचा आहे. पहिला प्रश्न मनुष्याच्या जन्मांत एकदां केव्हां तरी सुटावयाचा असतो. पण दुसऱ्या प्रकारचा प्रश्न त्याला संसारांत पदोपदीं उत्पन्न होणारा आहे. प्रवृत्तिमार्गी मनुष्यालादेखील हें करूं कीं तें करूं हा प्रश्न पुष्कळदां अडचणीचाच होतो. त्याला उत्तर वर सांगितल्याप्रमाणें हें कीं, मनुष्यानें आपला स्वभाव व प्रकृति, आपली परंपरा व परिस्थिति, हीं सर्व लक्षांत घेऊन, मात्र निर्विकार निःस्वार्थी बुद्धीनें आपला निर्णय आपण करावा. दुसरा प्रश्न नीतिशास्त्राला त्याग अधिक संमत ( मात्र त्याग म्हणजे संन्यास नव्हे ) कीं भोग अधिक संमत असा असतो. येथेंहि भोग म्हणजे केवळ स्वतःकरितां भोग नसून समाजाकरितां भोग म्हणजे सुखप्राप्ति असा अर्थ असला, तरी प्रश्न उरतोच. कारण सुख आपणाकरितां कीं लोकांकरितां असा प्रश्न नसला तरी लोकांकरितां झालें तरी सुखाचा उपदेश न करतां त्यागाचाच कां करूं नये असें सहज विचारतां येईल.

आधुनिक पाश्चात्य नीतिशास्त्र–ग्रंथांत त्याग व भोग यांच्यामधील मध्यम मार्ग संमत होत चालल्याचें दिसतें. त्याला त्यांचा शब्द ‘ सेल्फ–रियलायझेशन ’ हा आहे. त्याला संस्कृत प्रतिशब्द ‘ आत्मानुभव ’ सुचतो, पण तो इतर कल्पनांनीं आधींच आक्रमिलेला आहे. म्हणून ‘ आत्मप्रसादन ’ किंवा ‘ आत्मप्रसाधन ’ असा शब्द मी सुचवितों. गीताभ्यासी लोकांना तो पटला तर चालू होईल. त्याचा अर्थ हाच कीं आत्मा म्हणजे व्यक्ति; म्हणजे त्याची बुद्धि, भावना वगैरे सर्व कांहीं. या सर्वांचेंच प्रसाधन निरनिराळ्या वेळीं करण्याची त्याला वासना होईल. पण निर्विकारत्व, निःस्वार्थित्व व समत्वाची-अध्यात्माची प्रतीति आणून देण्याला उपकारक असें आत्मौपम्य, यांच्या पथ्यांनीं तें प्रसाधन त्यानें केलें म्हणजे तेंच नीतीचें आचरण ठरेल. स्वभाव व प्रकृति यांचें दुर्दमत्व गीतेंत इतकें

ठासून सांगितलें आहे कीं, तें वाचून मनुष्याला दैववादी बनावें असें वाटेल. परंतु त्याबरोबरच विवेचक बुद्धियोग व समत्वदर्शी बुद्धियोग यांचेंहि महत्त्व तितकेंच ठासून वर्णिलेलें गीतेंत आढळतें. पण अर्थात् गीतेंत तत्त्वें सांगितलीं असलीं तरी प्रत्यक्ष व्यवहार ज्याच्या त्याच्या बुद्धीनेंच घडला पाहिजे, व या बाबतींत गीतेनें व्यक्तिमात्राला पूर्ण मुभा दिली आहे. गीतेंत रोग औषध व अनुपान हीं तीनहि सांगितलीं असल्यामुळें ' घरचा वैद्य ' हा ग्रंथ जसा, तशीच गीता ही मनुष्याला उपयोगी पडणारी आहे. आतां अशा रीतीनें कर्म करून त्याच्या मिळणाऱ्या फलावर आसक्ति ठेवूं नये तर मग त्या फलाचें काय करावें असा प्रश्न सहज सुचतो. त्याचें उत्तर सर्व कर्म ईश्वराला अर्पण करावें असें गीतेनें लिहून ठेवलें आहे.

---

# १२५. श्रीरामदास व दासबोध

( रविवार ता. १६ फेब्रुवारी १९३६ रोजीं पुणें येथील विश्राम–मंडळानें नेने यांचे वाड्यांत बांधलेल्या ' विश्रामधाम ' नांवाच्या दिवाणखान्याच्या उद्घाटनसमारंभप्रसंगीं ' रामदास व दासबोध यांचें वैशिष्ट्य ' या विषयावर झालेलें प्रवचन. )

हें विश्राम–मंडळ सेवानिवृत्तांच्याकरितां आहे. सेवानिवृत्ति म्हणजे सर्वस्वीं सेवात्याग नव्हे. तर फक्त नोकरींत असतांना करावी लागणारी एकप्रकारची सक्तीची सेवा सोडून आपणास आवडेल तें काम करणें असा अर्थ मी सेवानिवृत्ति याचा करतों. उच्च कोटीला पोहोंचलेल्या ज्ञानी मनुष्यानेंहि कर्म करावें असें लो. टिळकांनीं आपल्या गीतारहस्यांत स्पष्टपणें लिहिलें आहे. मग ज्ञानी मनुष्यानेंहि जेथें कर्म करावें तेथें धन–सेवानिवृत्तांनीं निरपेक्ष लोकसेवा करावी असें सांगणें हें केव्हांहि उचितच ठरेल. पुण्यामध्यें जनहिताचीं कामें करणाऱ्या अनेक संस्था आहेत; त्या संस्थांवर देखरेख करण्याचें काम विश्राम–मंडळांतील सभासदांनीं अवश्य करावें. सार्वजनिक संस्था व धन–सेवानिवृत्त असलेली आपण मंडळी यांचा जर मिलाफ झाला तर सहकार्याचें तें एक आदर्श उदाहरण होईल.

असो. अशा तऱ्हेनें पेन्शनर्स व सार्वजनिक संस्था यांची परस्परांना किती जरूरी आहे हें मी आपणास सांगितलें. आतां मी मुख्य विषयाकडे वळतों.

रामदास ही व्यक्ति व त्यांचा दासबोध हा उच्च प्रतीचा ग्रंथ या दोनहि दृष्टींनीं आज मी विचार करणार आहे. रामदासांचें चरित्र आपणा सर्वांस माहीतच आहे. त्याची मी पुनरावृत्ति करीत नाहीं, पण जातां जातां एवढेंच सांगतों कीं, समर्थ रामदासस्वामींनीं अवघ्या बाराव्या वर्षी लग्नाचे वेळीं बोहल्यावरून पळून जाऊन आपल्या निष्ठुर ध्येयवादित्वाची ओळख सर्वांना करून दिली. त्यांनी जनतेला अध्यात्मज्ञान दिलें. गुप्तपणानें संचार करून त्या काळानुरूप देशसेवाहि केली. त्यांनीं बहात्तर मठ व अकरा मारुति यांची स्थापना केली. मठांच्या योगानें रामदासांची शिष्यपरंपरा आपणांस दिसते. पण रामदासांचा गुरु कोण होता हें आपणांस माहीत नाहीं, यावरून त्यांना मिळालेलें ज्ञान हें पढिक नसून स्वयंस्फूर्त होतें असें म्हणावयास हरकत नाहीं. धुळ्याचे समर्थभक्त श्री. शंकर श्रीकृष्ण देव यांनीं आपल्या डोळ्यांपुढे एक विवक्षित कार्य ठेवून त्यांनीं तें किती तडीस नेलें आहे हें पाहिलें, म्हणजे त्यांचें जाहीर अभिनंदन करावेसें वाटतें. त्यांनीं समर्थ–वाङ्मय जमवून प्रसिद्ध करण्याचा जो उद्योग केला आहे व हल्लीं करीत आहेत त्याबद्दल मी त्यांचें जाहीर अभिनंदन आजच्या प्रसंगानें करतों. श्री. देव यांना समर्थांचें जें वाङ्मय मिळालें तें समर्थांनीं स्थापन केलेल्या मठांतून मिळालें ही गोष्ट विशेष लक्षांत ठेवण्यासारखी आहे. असो. आतां दुसरा मुद्दा शिवाजी व रामदास यांच्या परस्परसंबंधाचा.

एकाचें श्रेय काढून ते दुसऱ्याला द्यावयाचें व त्याला पहिल्यापेक्षां अधिक श्रेष्ठ ठरवावयाचें, अशा तऱ्हेचा विनाकारण प्रयत्न आपणांस सर्व-सामान्यपणें दिसून येतो. शिवाजी श्रेष्ठ कीं रामदास श्रेष्ठ हा वाद बरेच दिवस चालू आहे. एक मनुष्य दुसऱ्या मनुष्याला उच्चपद प्राप्त करून देऊं शकत नाहीं. गुरूनें शिष्याच्या मस्तकावर हात ठेवून त्याला ज्ञान-संपन्न करणाऱ्या गुरुशिष्यांची परंपरा असते हें मला मुळींच पटत नाहीं. रामदास आणि शिवाजी यांत उपकृत कोण व उपकारी कोण याचा वाद-विवाद करून, शिवाजी किंवा रामदास यांपैकीं श्रेष्ठकनिष्ठ ठरविण्याचा प्रयत्न करणें चूक आहे. कारण रामदास व शिवाजी या दोघांचीहि

कार्यक्षेत्रें अगदीं भिन्न स्वरूपाचीं होतीं. कोणतींहि चांगलीं कार्यें सुरू असलीं म्हणजे त्यांची यदृच्छेनें गांठ पडते, व कांहीं काळ तीं दोन्हीहि एकच आहेत असें भासतें. पण तेवढ्यामुळें, अशा कार्यकर्त्यांत गुरु-शिष्यांचा संबंध कसा येईल !

खरें कर्तृत्व हें परावलंबी असूंच शकत नाहीं. मठस्थापनेचे सायास समर्थांनीं किती केले हें आपणास माहीत आहेच. त्यांत त्यांना शिवाजीची मदत नव्हती. श्रीशिवाजीमहाराजांनाहि या स्वराज्यस्थापनेच्या कामीं किती संकटांना तोंड द्यावें लागलें हें इतिहास दाखवितो. या स्वराज्यस्थापनेच्या कार्यांत शिवाजीमहाराजांना रामदासांची प्रत्यक्ष मदत कितपत झाली असेल हें सांगतां येत नसलें तरी दोघांचें ध्येय एक होतें व म्हणूनच परस्परांना परस्परांचें सहाय्य झालें असें म्हणतां येईल. श्रीसमर्थरामदासांना धर्मकारणांत यश मिळालें व श्रीशिवाजीमहाराजांना राजकारणांत यश मिळालें, याचें श्रेय ज्याच्या त्याच्या गुरूला नसून स्वतःच्या त्याच्या कर्तृत्वाला आहे. हेंच तत्त्व गणिताच्या भाषेंत मांडावयाचें झालें तर पुढीलप्रमाणें मांडतां येईल. "ज्याची कल्पना त्याचा उद्योग + दुसऱ्याची सहानुभूति अगर मदत = यशःप्राप्ति किंवा सिद्धि." शिवाजीनें साधुसंत सज्जन यांना मान दिला व परामर्ष घेतला. रामदासांनीं राजकारणी पुरुषांना आशीर्वाद दिला. तात्पर्य आशीर्वाद व निर्भयतादान यांच्या संयोगानें त्या काळीं हिंदवी स्वराज्याची स्थापना झाली.

कोणत्याहि ग्रंथाची योग्यता किंवा किंमत ठरविणाऱ्या लोकांमध्यें चार-पांच वर्ग कल्पितां येतात. ते असे–भाविक, चिकित्सक, यथार्थवादी, भावार्थी, व वितंडवादी. आतां यांपैकीं प्रत्येक वर्गाचें लक्षण काय आहे हें पाहूं. (१) भाविक-हा ग्रंथांत कांहीं चुका असल्या तरी त्या चुकाच नाहींत असें प्रतिपादून, सर्व ग्रंथच्या ग्रंथ इतकेंच काय पण त्यातलें अक्षर न् अक्षर बरोबर आहे असें मानतो. रामदासांचे भाविक भक्त रामदासांना सर्वज्ञानी मानतात. त्यांच्या दासबोध ग्रंथांत जर एखादा वाक्यप्रयोग व्याकरणाच्या दृष्टीनें चुकीचा असला तर तो चूक न म्हणता त्यालाच व्याकरण शुद्ध म्हणतील ! इतकेंच नव्हे तर दासबोधाचीं कितीहि पारायणें केलीं तरी त्यांत असलेलें गुप्त ज्ञानाचें भांडार कोणालाच आजपर्यंत हातीं

लागलें नाहीं व पुढेंहि हातीं लागणार नाहीं, असें सांगतील. ( २ ) दुसरा वर्ग चिकित्सकांचा. या वर्गांतले लोक ग्रंथांत जेवढा भाग चांगला वाटेल तेवढ्यालाच फक्त चांगलें म्हणतील; व वाईटाला वाईट म्हणण्याला भिणार नाहींत. चिकित्सक म्हणेल कीं, दासबोधांत ज्ञानेश्वरासारखें काव्य नाहीं, एकनाथासारखी विद्वत्ता नाहीं, तुकारामासारखा प्रेमळपणा नाहीं तरी पण दासबोधांत रामदासांनीं त्यांच्या काळच्या लोकस्थितीचें वर्णन जसें यथार्थ दिलें आहे, आणि संसार व लोकस्थिति यांतील मर्म जसें दाखविलें आहे तसें ज्ञानेश्वरांना, तुकारामांना किंवा एकनाथांनाहि दाखवितां आलें नाहीं. यथार्थ लोकस्थितिवर्णन व ऐहिक–परमार्थिक यांतील मर्मदर्शन हें दासबोधाचें वैशिष्ट्य आहे. ( ३ ) तिसरा वर्ग यथार्थवाद्यांचा. या वर्गांतले लोक भिडस्त असतात. ते असें म्हणतील कीं, दासबोधांतील अमुक एका ओवीचा अर्थ आमच्या दृष्टीनें असा असा लागतो, मग तो तुम्हांला इष्ट वाटो अगर अनिष्ट वाटो. ( ४ ) चवथा वर्ग भावार्थी लोकांचा. या वर्गांतील लोक मुद्यार्शी गांठ घालतील. ते म्हणतील कीं तुम्हाला शब्दांशीं काय करावयाचें आहे ? त्यांतलें तात्पर्य पाहा म्हणजे झालें. पण अशी भीड तरी कां धरावी ? साधुसंत झाले म्हणजे त्यांना काव्यव्याकरणाचीं सर्व बंधनें माफ असतात असें थोडेंच आहे ? वास्तविक परमेश्वराला मानवी भाषा नाहीं. पण तोच परमेश्वर जर मराठी भाषेंत लिहू बोलू लागेल तर त्याला व्याकरणाचीं शुद्धाशुद्धतेचीं बंधनें पाळावयास नकोत काय ? ईश्वर व साधुसंत इतर अर्थानें 'मुक्तछंद' असतात तसेच उपदेशिक वाङ्मयांतही कां असावे ? श्रीव्यासांना गीता सांगतांना संस्कृत भाषा व अनुष्टुप् छंद यांचा आश्रय अनिर्वाह्य झाला, तर त्या संस्कृतांतील व्याकरणाच्या चुका ( खऱ्या असतील तर ) दाखविणाऱ्या प्रो. राजवाड्यांना दोष कां द्यावा ? जो पेशा आपण पत्करतो तो नीट संभाळण्याची जबाबदारी आपल्यावर येतेच. सारांश, कर्मांत जसें नैष्ठिक वर्तन असावयास पाहिजे, तसेंच काव्यशास्त्रांतहि नैष्ठिक वर्तन ठेवावयास नको काय ? ( ५ ) आतां शेवटचा वर्ग म्हटला म्हणजे वितंडवाद्यांचा. ते दासबोधाला वाङ्मय म्हणणार नाहींत आणि तत्कालीन वर्गकलह त्यांत कोठें आहे असें विचारतील ! इतकेंच काय, पण रामदासांना दासबोधाच्या द्वारें मुद्दाम भांडवलशाहीचा

पुरस्कार केला असेंहि म्हणावयास कमी करणार नाहींत ! मी स्वतः भावार्थवादी पण चिकित्सकहि आहे; दोष दाखवूनहि ग्रंथांतील मर्म घेणारा आहे.

दासबोधांत अद्वैतवेदांतापासून गुरुमंडळयापर्यंत सर्व गोष्टींचें विवेचन आहे. त्या काळचे धार्मिक आचारविचार, राजकारण, लोकव्यवहार यांवर टीका आहे. बहुप्रजाजननामुळें होणाऱ्या तापत्रयाचें "लेकुरें उदंड जहालीं । तों ते लक्ष्मी निघून गेली । बापुडीं भिकेस लागलीं " अशा तऱ्हेचें आजच्या काळालाहि जुळणारें यथार्थ वर्णन दासबोधांत आहे ! ! दासबोधासारख्या ग्रंथांत खालील चार गोष्टींपैकीं काय काय आहे असें विचारणें अयोग्य नाहीं. ( १ ) तात्त्विक भूमिका किंवा तत्त्वसिद्धांत ( २ ) स्वानुभूति ( ३ ) नैष्ठिक नीति व ( ४ ) सदाचार. माझ्या मतें या चारहि गोष्टी दासबोधांत ठळक आहेत. नीति व सदाचार यांच्या संबंधांत तीनशें वर्षांपूर्वीच्या रामदासांचें मत व गेल्या कांहीं वर्षांपूर्वीपर्यंतचें महाराष्ट्र समाजाचें मत सारखेंच होतें हें सिद्ध करून देतां येईल. स्वानुभूतीसंबंधानें कोणाच्याहिबद्दल बाह्य पुरावा देणें कठिण असतें. तथापि मी इतकेंच विचारीन कीं, रामदासासारख्या निःस्पृह तापसाला जर स्वानुभूति थोडीफार तरी नव्हती असें म्हटलें, तर ती असणारा मनुष्य सांपडावा तरी कसा ? किंवा ओळखावा तरी कसा ? म्हणून समर्थांची स्वानुभूति मी गृहीतच धरतों. त्यांच्या ग्रंथांतील तात्त्विक भूमिका सांप्रदायिक अद्वैत वेदांत्याची आहे. म्हणजे भक्तिविशिष्ट अद्वैत ध्येयाची आहे. तुकाराम कोठें कोठें मी व ईश्वर एकच इतक्या उत्कटतेला पोंचतो. पण रामदासानें ईश्वराविषयीं सेव्य-सेवक भाव कोठेंच सोडलेला नाहीं. म्हणून त्यांना पूर्ण अद्वैती न म्हणतां भक्तिविशिष्ट अद्वैती असें मी म्हणेन.

आज दासबोध वाचून दाखविण्यास वेळ नाहीं. तथापि लोकभ्रम, बुवाबाजी, संसारतापत्रय, गुरुचिकित्सा, राजकारण, सिद्धांच्या म्हणजे कर्मयोग्यांच्या खुणा, इत्यादीसंबंधानें दासबोधांतील समासचे समास वाचनीय व मननीय वाटतील इतके ते मार्मिक आहेत. लोकस्थितीचीं अशीं वर्णनें इतर कोणत्याहि प्राचीन मराठी कवींत सहसा आढळणार नाहींत.

शेवटीं मला एक विशेष गोष्ट सांगावीशी वाटते ती ही कीं, लौकिक मतसंचारामध्यें प्रकट मतप्रसाराइतकेंच गुप्त मतप्रसाराला रामदासांनीं महत्त्व दिलेलें आढळतें. जुन्या काळचें चित्र नव्या काळीं तंतोतंत पाहावयास कसें मिळणार ? परंतु मसुराश्रमांतील ब्रह्मचाऱ्यांचा मेळा व त्यांतील प्रमुखांचें काम पाहिलें म्हणजे, जुन्या रामदासी मंडळाची मला आठवण होते. मात्र मसूरकरांची एक गोष्ट त्यावेळीं नव्हती. ती म्हणजे त्यांचे छापखाने व मासिक पुस्तकें व त्यांतून केलेला जाहीर मतप्रसार, ही होय. कारण खरा रामदासी हा सर्वस्वीं अदृश्य नव्हे, पण गुप्त संचार व मतप्रसार करणारा असावा असें मला नेहमीं वाटतें. आधुनिक राजकारणपद्धतीला मी नांवें ठेवीत नाहीं. त्यापद्धतींत छापखाने व सभागृहें यांचा जो उपयोग करून घेतला जातो तो योग्य असून कांहीं लोकांनीं त्याचा अवलंब अवश्य करावा व लोकमताचें बळ वाढवावें. पण समाजाला ध्येयवादी सुविचाराची, तशीच व्यावहारिक तारतम्याच्या सुविचाराची, सामुग्री पुरवणारे कांहीं विचारवंत व गुप्तपणें काम करणारे लोकहि पाहिजे असतात. दहा तासांच्या अभ्यासानंतर जर एक तास मनन केलें तर मेंदूला शांती मिळून, शिवाय नवी बॅटरी भरून घेतल्याप्रमाणें पुढें दहा तास काम करण्याला चैतन्यशक्ति लाभते, असें अनुभविक लोक सांगतात. त्याचप्रमाणें उघड मत प्रसाराबरोबर गुप्त मत प्रसाराचा एक कप्पा व खातें सार्वजनिक कार्यकर्त्यांनीं जर चांगलें संभाळलें तर तेंहि असेंच उपयोगी पडेल. गुप्त मंडळी म्हटली म्हणजे लोकांना बाऊ वाटतो तसा वाटण्याचें कारण नाहीं. गुप्त मंडळी म्हणजे ती अत्याचारप्रवर्तकच असा अर्थ नाहीं. अभ्यासाचें मनन हें जसें अत्याचारी नव्हे, तशीच आपले संकेत बाहेर कळूं न देतां काम करणारी गुप्त मंडळी दूषणीय ठरत नाहीं.

राजकारणांत झालें तरी उघड बोलण्याला सीमा असावी. असो. यावरून मनुष्यानें गुप्तपणें लोकसंग्रह कसा करावा याचें वर्णन दासबोधांतल्याइतकें सरस व समर्पक दुसऱ्या कोणत्याहि मराठी कवींत मला वाचावयाला मिळालें नाहीं. रामदासाविषयीं ही एक विशेष गोष्ट म्हणून सांगून व मला आगाऊच सेवानिवृत्त समजून विश्राम–मंडळांत स्थान दिल्याबद्दल आभार मानून मी माझें प्रवचन पुरें करतों.

# १२६. मध्यमक्रमाचें तत्त्वज्ञान

[ ता. १५ सप्टेंबर १९३७ रोजीं गायकवाड वाड्यांत दिलेल्या व्याख्यानाचा सारांश ]

आजच्या व्याख्यानाचा विषय नवा नाहीं. केवळ त्याचें नांव अपरिचित आहे. गीतेमध्यें प्रतिष्ठित प्रज्ञता किंवा सिद्धावस्था याचें जें वर्णन आहे त्यांतील कांहीं 'मध्यमक्रम' या शब्दांतून निघतें. इंग्रजी भाषेच्या द्वारें परिचित झालेला Golden mean हा शब्द याच अर्थी आहे. तो शब्द मूळ एका ग्रीक शब्दाचा अनुवाद आहे. सुप्रसिद्ध ग्रीक तत्त्ववेत्ता ॲरिस्टॉटल यानें हें सुवर्णमध्याचें तत्त्व नैतिक आचरणांत प्रमुख असें मानिलें आहे. असें हें एकच तत्त्व आर्यवैदिक तत्वज्ञान आणि ग्रीक तत्त्वज्ञान या दोहोंमध्यें कसें सांपडावें याचें कित्येकांना आश्चर्य वाटतें. पण तसें वाटण्याचें कारण नाहीं. फक्त भौतिक विज्ञानामध्यें शोधांचा क्रम एकानंतर एक असा लावतां येतो. पण तत्त्वज्ञानांत अनेक ज्ञानी लोकांनीं निरनिराळ्या देशांत स्वतंत्र रीतीनें तेच सिद्धांत मांडावे असें घडतें. कारण मनाचे धर्म आणि तत्त्वज्ञानाची जिज्ञासा हीं स्वयंसिद्ध व स्वयंस्फूर्त असतात. मात्र त्यांतल्यात्यांत 'सुवर्णमध्य' या शब्दानें एक-बिंदुनिष्ठ स्थिति दर्शविली जाते, तर 'मध्यमक्रम' या शब्दानें गतिमानता किंवा स्पंदन दर्शविलें जातें. हा या संस्कृत शब्दांत मला विशेष गुण वाटतो. हा संस्कृत शब्द प्रो. माधवराव पटवर्धन यांनीं मला सुचविला. तो रघुवंशाच्या आठव्या सर्गांत अज राजाच्या राजनीतिवर्णनांत आढळतो. तो श्लोक असा:—

न खरो नच भूयसा मृदुः ।
पवमानः पृथिवीरुहानिव ॥
स पुरस्कृतमध्यमक्रमः ।
नमयामास नृपाननुद्धरन् ॥

याचा अर्थ असा—उपकारक वायु जसा वृक्षांना केवळ हालवितो आणि नमवितो पण मुळासकट उपटून टाकीत नाहीं, त्याप्रमाणें अज राजानें आपल्या मांडलिकांना समूळ स्थानभ्रष्ट न करतां फक्त नमविलें; आणि

असें करतांना त्यानें अतिशय प्रखरता किंवा अतिशय मृदुता या दोहोंतील मध्यममार्ग किंवा मध्यमक्रम स्वीकारला. अर्थात् मध्यमक्रम हाच कोणाहि कर्मयोग्यानें अनुसरण्याचा युक्त मार्ग होय. आणि हें तत्त्व राजनीती-प्रमाणें नीतीच्या इतर प्रकारच्या आचरणांनाहि लागू पडतें.

आर्य व ग्रीक तत्त्वज्ञान या दोहोंमध्यें हें एकच तत्त्व आढळल्यामुळें कांहीं लोक असा वाद उलटसुलट घालीत बसतात कीं, हें ग्रीकांनीं आर्यांपासून घेतलें किंवा आर्यांनीं ग्रीकांपासून घेतलें. टिळकांनीं गीता-रहस्याच्या प्रस्तावनेंत, ग्रीकतत्त्वज्ञानांत व गीता म्हणजे आर्यतत्त्वज्ञान यांत समानसिद्धांत कांहीं कसे आढळतात याचें दिग्दर्शन केलें आहे. पण अमक्यांनी अमक्यापासून अमूक घेतलें असा वाद मांडला नाहीं. गांधी चरित्रकार रोमीरोलाँ यांनीं कांहीं वर्षांपूर्वी असें विधान केलें कीं, तत्त्व-ज्ञान हें आर्यांनीं ग्रीकांपासून घेतलें. हें म्हणणें विवेकानंद समितींतील एका गुरुबंधूनें खोडून काढलें आहे. पण मलाहि या वादांत येथें शिराव-याचें नाहीं. एकच ज्ञानतत्त्व दोन दूरदूरच्या ठिकाणीं स्वतंत्र रीतीनें कसें प्रगट होऊं शकतें व मान्य होतें याच्या कौतुकानेंच माझें समाधान होतें.

मध्यमक्रमाच्या तत्त्वाची सकृद्दर्शनीं थट्टा करतां येते हें मला माहीत आहे. एकांतिक ध्येयवाद्यांनीं ग्रीक ॲरिस्टॉटलच्या सिद्धांताची अशीच थट्टा केलेली आहे. तसेंच मध्यम ह्या शब्दाचा मराठी रूढार्थ ' कमी गुणाचा' असा होतो, व तेंच दूषण मध्यमक्रम या तत्त्वालाहि कोणी लावूं शकेल. मध्यमक्रमाची थट्टा करावयाची तर अशी करतां येईल. एकानें दुसऱ्याला विचारावें कीं, " मी तुझ्या तोंडांत चार मारूं कां आठ मारूं ! " या प्रश्नाचें उत्तर मध्यमक्रम तत्त्वाप्रमाणें "सहा तोंडांत मारा" असेंच येणार ! तसेंच कोकणांत देवाला कौल लावून विचारतात कीं, " झाडाला मुळा-पासून तोडूं कां चार हात ठेवून तोडूं ? " याचें उत्तर मध्यमक्रम तत्त्वा-प्रमाणें दोन हात ठेवून तोड हेंच ठरेल ! पण ही निव्वळ थट्टा, निव्वळ बाष्कळपणा होय. कारण वरील दोन्ही उदाहरणांत " मी तोंडांत मुळींच मारून घेणार नाहीं " आणि " झाड मुळींच तोडूं नये " असेंहि यथार्थ-पणें उत्तर देतां येईल ही गोष्ट थट्टा करणारे लोक विसरतात.

मध्यमक्रमासंबंधानें प्रथम ही एक गोष्ट लक्षांत ठेविली पाहिजे कीं,

निखालस वाइटाशीं निखालस चांगल्याचा कोणीकडून तरी मेळ घालणें किंवा तडजोड करणें असा त्याचा अर्थ नाहीं. ईश्वरानें सैतानाशीं कधींच तडजोड केली नाहीं. अवतारकृत्यांतहि ईश्वरानें दुष्टांशीं तडजोड न करतां त्यांचा संहारच केला. मध्यमक्रम म्हणजे निखालस वाइटाशीं समेट किंवा तडजोड असा नसून, जें सामान्यतः चांगलें म्हणून गणलें जातें त्यांतच मर्यादा संशोधन करून, युक्त म्हणून तारतम्यानें काय ठरविलें जाऊं शकेल त्याचें आचरण असा अर्थ आहे. कोणाची समजूत अशी असेल कीं, सद्गुण म्हटल्या जाणाऱ्या आचरणांत श्रेष्ठ–कनिष्ठ भाव, उत्तम–मध्यम भाव असूंच शकत नाहीं तर ती बरोबर नाहीं. आणि तसें नाहीं म्हणूनच मध्यमक्रम हा शब्द सकारण व युक्त ठरतो. याचें एक उदाहरण द्यावयाचें तर मी असें म्हणेन कीं, यज्ञ, दान व तप या गोष्टी तर चांगल्याच ना? त्यांना वाईटाच्या सदरांत कोण घालूं शकेल? तथापि सद्गुणदर्शक अशा या तिन्ही गोष्टींच्या आचरणांतहि मर्यादा पालन, तारतम्य, सारासार विचार हीं येतातच. आणि ही गोष्ट गीतेच्या सतराव्या अध्यायांत स्पष्ट केली आहे. यज्ञ, दान, तप यांतहि सात्त्विक राजस व तामस असे भेद असतात; आणि ते पात्रापात्रादि विचारानें किंवा कर्तृबुद्धीनें सिद्ध व व्यक्त होतात, असें म्हणण्यांत गीतेनें चांगल्या गोष्टींतहि दर्जे किंवा प्रती लावल्याच कीं नाहीं? निखालस चांगली गोष्ट व निखालस वाईट गोष्ट यांतील मध्यबिंदु असें सामान्य वर्णन मध्यमक्रमाचें केलें तर तें अगदींच चूक ठरणार नाहीं. पण त्याचें खरें शास्त्रीय वर्णन "सद्गुणाच्या आचरणांतहि तारतम्यानें सुचणारें मर्यादादर्शन" याच शब्दांनीं करतां येईल.

आतां मर्यादा दर्शनरूप मध्यमक्रम हें तत्त्व कसें निष्पन्न होतें तें पाहूं. या तत्त्वाचें स्थान धर्मचर्चेंत व नीतिचर्चेंत ओघानें येतें. येथें नीति= व्यावहारिक धर्म, आणि धर्म=पारमार्थिक नीति हीं समीकरणें मानून, म्हणजे धर्म व नीति एकच समजून वरील गोष्ट मी सांगणार आहें. प्रथम हें लक्षांत ठेवावें कीं, धर्मनिर्णय ही अत्यंत कठिण गोष्ट आहे. (येथें व्याख्यात्यांनीं दहा-वीस संस्कृत वचनें वाचून दाखवून, स्वतः धर्माचार्यांनींच धर्मनिर्णयाच्या कामीं आपण हात टेकल्याची कबुली कशी दिली आहे हें दाखविलें. आणि ग्रंथाचें तात्पर्य किंवा खरें मर्म निश्चित करण्या-

संबंधीं किती निरनिराळे अडथळे येतात हें सोदाहरण सांगितलें. ) धर्म-निर्णय कठिण ठरल्यानंतर तो निर्णय कोणीं करावा ? असा प्रश्न सहज उत्पन्न होतो, आणि त्याचें खरें उत्तर ' या कामीं मनुष्यानें परावलंबी न होतां स्वावलंबी व्हावें ' असें ठरतें. पण स्वावलंबनाचा किंवा स्वयं-निर्णयाचा अधिकार कोणी आपल्या हातीं घ्यावयाचा तर त्याला दोन अटी असतात. एक आधीं शक्य तितकें तद्विषयक ज्ञान त्यानें प्रामाणिकपणें परिश्रमपूर्वक मिळविलें पाहिजे. तथापि दुसरीहि अट अशी कीं, त्या ज्ञानाच्या साधनानें कर्तव्यनिर्णय करतांना मनुष्यानें अध्यात्मबुद्धीचा-आत्मौ-पम्याचा स्वीकार करून, स्वतः निःस्वार्थी, शांतचित्त, शुद्धवासनी, पूर्व-ग्रहविवर्जित झालें पाहिजे. गीतेंतील आणखीहि कांहीं शब्द सांगावयाचे तर कर्मयोग्यानें ( मात्र लाक्षणिक अर्थानें ) निराश्रय, अनिकेतन, सर्वा-रंभफलत्यागी असेंहि असावें. इतकें पथ्य संभाळलें म्हणजे मगच बुद्धि शुद्ध होते, तिजमध्यें समत्व येते. मग ती जो निर्णय करील तो निर्दोष होतो, बिनचुकहि होतो. पण कदाचित् विशिष्ट परिस्थितींत तो बिनचुकच न ठरला तरी कर्त्याला त्याचा दोष लागत नाहीं. गीतेमध्यें समत्व-बुद्धीचा मनुष्य, प्रतिष्ठित प्रज्ञ, स्थितप्रज्ञ, अशा कर्मयोग्याचें जें वर्णन दिलें आहे तें लक्षांत घेतलें असतां त्यांतूनच हें निष्पन्न होतें कीं, अशाच मनु-ष्याला बुद्धियोग चालविण्याचा, व्यवसाय बुद्धि चालविण्याचा, पूर्ण अधि-कार प्राप्त होतो.

पण त्यानंतर सांगण्याची महत्त्वाची गोष्ट ही कीं, शेवटीं अशा अधि-कारी बुद्धीनें केलेल्या निर्णयांत तारतम्यभाव हेंच साधन अनिर्वाह्य आणि महत्त्वाचें ठरतें. पण तारतम्य म्हणजे तरी काय ? त्याचें वर्णन निश्चित शब्दांनीं एका वाक्यांत कोणी करूं शकणार नाहीं. परंतु तारतम्यांत सामान्यतः खालील गोष्टींचा समावेश मी करीन—

१ जगांत क्रियेप्रमाणें प्रतिक्रियाहि करावी लागते व ती सदोष होत नाहीं.

२ निःस्वार्थी बुद्धीनें परहित साधतांना बहुतांचें बहुत कल्याण कसें होईल ही दृष्टि त्यांतल्या त्यांत ठेविली असतां तें योग्य ठरतें.

३ परहित साधतांना मोठ्याकरितां लहानाचा बुद्धिपुरस्सर त्याग करतां येतो.

४ विरोधक गोष्टींचा मेळ शक्य तितका करूं पाहणें चुकीचें होत नाहीं.

५ जें जें म्हणून आत्यंतिक त्याचा त्याग सहजच करावा लागतो. आणि हें करणें म्हणजेच मध्यमक्रम स्वीकारणें असें ठरतें.

नंतर फिरून रघुवंशांतील श्लोकाकडे वळून अज राजानें मध्यमक्रमाचा स्वीकार केला तो सकारण कां होता, याविषयीं व्याख्यात्यांनीं खालील दोन अवतरणें खुलाशादाखल सांगितलीं. कामंदकी नीतींत हें वचन आढळतें.

मृदुश्चेत् अवमन्येत तीक्ष्णात् उद्विजते जनः ।
तीक्ष्णश्चैव मृदुश्चैव प्रजानाम् स च संमत: ॥

याच अर्थी भारतांतील वचनः—

तीक्ष्णादुद्विजते लोको मृदुः सर्वत्र बाध्यते ।
एवं बुद्ध्वा महाराज मा तीक्ष्णो मा मृदुर्भव ॥

हीं दोन वचनें उपलक्षणात्मक मानिलीं असतां, तारतम्यांतर्गत वरील पांचहि घटक कसे सिद्ध होतात हें लक्षांत येईल. परंतु तीच गोष्ट इतर उदाहरणें घेऊन अधिक विशद करतां येईल. म्हणून मी दोन दोन आत्यंतिक क्रम घेऊन त्यांतील मध्यमक्रम कोणता हें दर्शवितों; तो असा:—

| | एक टोंक | मध्यमक्रम | दुसरें टोंक |
|---|---|---|---|
| १ | मृदु | मध्यमक्रम | प्रखर |
| | | ( रघुवंशांतील शब्द ) | |
| २ | भित्रा | धैर्यवान् | फाजील धाडसी |
| ३ | कृपण | उदार | उधळ्या |
| ४ | निष्क्रिय | महत्त्वाकांक्षी | हावरा |
| ५ | स्वाभिमानशून्य | विनयी | गर्विष्ठ |
| ६ | घुम्या | मितभाषी | वटवट्या |
| ७ | सदादुर्मुख | विनोदानंदी | विदूषक |
| ८ | हांजीहांजी-खोर-गोंडा घोळणारा | न्यायनिष्ठुर मित्रभावी | भांडखोर |
| ९ | शुद्धिसांड | धडस्मरणाचा | शतावधानी |

| | | | |
|---|---|---|---|
| १० | चंचल | निष्ठावंत | हेकट |
| ११ | उपवासी | मिताहारी | उदरंभरी |
| १२ | परागतिक | उदारमतवादी | क्रांतिकारक |
| १३ | कपटी | कामापुरतें सत्य बोलणारा | उथळमनी |
| १४ | सैल, ढिला | निश्चयी | हट्टी, आग्रही |
| १५ | स्वार्थसुखवादी | आत्मप्रसाधनवादी | संन्यासवादी |
| १६ | एकतंत्री राज्यसत्ता | थोडया पण जाणत्या निःस्वार्थी लोकांच्या हातीं राज्यसत्ता. | निरर्गल प्रजासत्ता |

अशींच इतरहि अनेक उदाहरणें देतां येतील. शेवटीं एका आक्षेपाचा विचार करावा लागतो तो असा. कित्येकांच्या मतें मध्यमक्रमाचें तत्त्व ध्येयवादाच्या उज्ज्वल तत्त्वज्ञानाला विरोधी किंवा घातक ठरेल. त्यांच्या मतें ध्येय हें आत्यंतिक या सदरांत पडत असलें तरी, तेंच उज्ज्वल म्हणून आदर्शभूत मानावें लागतें. पण मध्यमक्रमाचा विचार मीं याच दृष्टीनें केला आहे कीं, ध्येय ही गोष्ट केवळ कल्पनारूप; पण ती प्रत्यक्ष आचरणांत कृतींत उतरवावयाची तर तेथें तारतम्य येतेंच. तें सुटत नाहीं. धर्म हा ध्येयात्मक खराच; पण त्यांतहि सूक्ष्मधर्म आपद्धर्म असे भेद किंवा अपवाद मान्य केले जातात. तीच गोष्ट नीतिविषयक सद्गुणांनाहि लावतां येते. केवळ ध्येयाचें उज्ज्वल नांव घेतल्यानें आत्यंतिकतेमध्यें असणाऱ्या दोषांचा परिहार होऊं शकत नाहीं.

शेवटीं फिरून एकवार व्याख्यान–विषयाचा समारोप खालील वाक्यांत करतां येईल.

१ धर्म–( नीति–) निर्णय गहन आहे.

२ पण निर्णय हा शेवटीं करावाच लागतो.

३ तो करतांना मनुष्यानें परावलंबी होऊं नये.

४ आत्मनिर्णय हाच श्रेष्ठ.

५ पण तो करणारानें कांहीं अटी कांहीं पथ्य संभाळलें पाहिजे.

६ त्या अटी पाळल्या म्हणजे कर्म निर्दोष ठरतें.

७ पण निर्दोष असेंहि कर्म व्यवहारांत उतरवितांना सारासार विवेक आणि तारतम्यपालन हें करणें चुकत नाहीं.

८ तारतम्य करावयाचें तर त्यांत आत्यंतिकाचा त्याग करावा लागतो, व या त्यागाचें युक्तिवादानें समर्थन करतां येतें.

९ आत्यंतिकाचा त्याग करणें म्हणजेच चांगल्या गोष्टींतहि असणारें मर्यादादर्शन; आणि त्याचेंच नांव मध्यमक्रम.

क्रम हा शब्द स्थितिवाचक नसून गतिवाचक आहे असें प्रथमच सांगितलें. परंतु ही गति म्हणजे अखंड एकापुढें एक अशी नसून स्पंदनात्मक गति अशी समजावयाची आहे. स्पंदनात्मक गतीचें म्हणून उदाहरण रेडियमच्या कणाचें कांहींसें देतां येईल. हा कण स्वतःचें स्थान न सोडतां बाहेर फेकलेल्या एकामागून एक कमी जास्त प्रमाणाच्या लहरींनीं आपलें कार्य करतो. पण त्याहूनहि समर्पक उदाहरण म्हटलें तर घड्याळांतील लंबकाचें होय. तो एकदां या बाजूला तर एकदां त्या बाजूला जातो. आणि त्यामुळेंच चक्रांना गति मिळते. या प्रत्येक आंदोलनांत त्याला मध्यबिंदूला स्पर्श करून जावें लागतें. पण मध्यबिंदु हाच श्रेष्ठ मानून लंबक त्यालाच चिकटून राहील तर गतिच थांबेल. म्हणून मध्यबिंदूवर स्थगित तर व्हावयाचें नाहीं, पण किंचित् व थोडक्यांत आजूबाजूला जाऊन आपला कर्मयोग साधावयाचा तो लंबक साधतो. आणि हा मध्यबिंदु व त्याच्या लगतचें, एका व दुसऱ्या बाजूचें, सूक्ष्म लंबनक्षेत्र हीं सर्व मिळून मध्यमक्रमाची व्याप्ति सिद्ध होते.

---

## १२७. पुणें वेदशास्त्रोत्तेजक सभा

( वार्षिक सभेचे अध्यक्ष या नात्यानें संस्कृत भाषेंत केलेलें भाषण. )

अयि वेदशास्त्रप्रवीणाः वैदिकसंस्कृतिप्रणयिनः पंडितशास्त्रीणः सभासदमहाशयाश्च । अद्य पुण्यपत्तनस्थ वेदशास्त्रोत्तेजकसभायाः, वार्षिक परीक्षानिर्णयोत्पन्ने, पारितोषिकप्रदानप्रसंगे, युष्माभिः दीयमानेन बहुमानास्पदेन, अध्यक्ष-

पदेन अहं अतीव अनुगृहीतः अस्मि । केवलं लौकिकविद्यापरामर्षिणः गृहस्थस्य मे एषः सत्कारः अनपेक्षितः अनर्हः च । न कोऽपि यजमानः हविष्यान्नं अदीक्षिताय ददाति । तथापि अकारणस्फुरितस्नेहानां उदारमनसां सर्वमपि संभवति शोभते च । पुनः गीर्वाण भाषा प्रेमविषये न कोऽपि मां अतिशयितुं शक्नोति । तथापि गीर्वाणवचसः प्रत्यक्ष व्यवहारे अद्यावधि न मया विशेषः परिश्रमः कृतः । चत्वारिंशत्—वर्षेभ्यः प्राक् आंग्लपाठशालायां आंग्लपद्धत्या च अर्जितं मे गीर्वाणभाषाज्ञानं, अद्य दूरात् ऐंद्रजालिकमिव केवलं कौतुकास्पदं आभाति । न सर्वथा व्यवहारक्षमं । न वा अत्रांतरे मया संस्कृतलेखन व्यवसायः कदापि संवर्धितो रक्षितो वा । राजाज्ञया चिरदूरापसारितस्य गृहस्वामिनो अपि मनः नव प्रवेशसमये विस्मयचकितं स्खलन शीलं भवति । तथैव सर्वथा स्वकीये अपि गीर्वाण भाषा प्रबंध विषये, मम लेखनशलाका पदे पदे विभ्राम्यति तथापि सुगूढमपि संस्कारबीजं प्रसंगवशात् प्रीतिजललवेन अपि किं न अंकुरितं भवेत् ? । एवमेव अद्य युष्मत्प्रसादात् गीर्वाण भाषाम् आश्रित्य वेदशास्त्र संवर्धनविषये किंचित् वक्तुमिच्छामि । मम वाक्स्खलनं प्रमादाः वा सर्वथा युष्मद्भिः कारुणिक भावेन क्षंतव्याः इति प्रार्थये ।

प्रथमं तावत् यशस्विनां परीक्ष्याणां अवश्यमेव परामर्षः कर्तव्यः । सः परामर्षः नाम अभिनंदनमेव । यतः तैः स्वबुद्धि बलोडुपेन, श्रमपूर्वकाभ्यास क्षिपण्या, चिकित्सक मर्मज्ञ कृत परीक्षा सरित् सम्यक् उत्तीर्णा । तेषां अध्ययन क्लेशायासस्य तुलनया पारितोषिक मूल्यं अत्यंतं क्षुद्रमेव । तथापि तदेव तेषां दूरतर विद्यासमुद्र यान यात्रार्थे अवश्यं उत्साहवर्धकं भवेत् । एतत् परीक्षासरित्–मुखेन, तेषां केवलं गीर्वाण भाषा सागरप्रवेशः साधितो भवति । न परं तेन पुनः सर्वार्थ कृतकृत्यता संभवति । अतः युष्मदनुज्ञया तेभ्यः एनमेव शुभादेशं ददामि । यत् तैः न कदापि इतऊर्ध्वं गीर्वाण भाषाभ्यासः त्याज्यः । ' प्रारब्धस्यांतगमनं द्वितीयं बुद्धिलक्षणं ' इति व्यावहारिक नीतिवचनं सुप्रसिद्धमेव । सागर प्रवेशानंतरं न कोऽपि सुज्ञः यशः प्रार्थी, किंबहुना केवलं जीवरक्षणार्थी नाविकः, विरमति विश्राम्यते वा । न कोऽपि उधृत क्षिपणिः, स्वैर समीरणवशो भूत्वा, परतीरं सुरक्षितेष्टनौकाश्रयं वा उपगंतुं शक्नोति । अस्मिन् विपरीत कालावसरे एतेषां परी-

क्ष्याणां गीर्वाण भाषाध्ययन व्यवसाय: कौतुकास्पद: श्लाघ्य: च । अथ भविष्यकाले गीर्वाणभाषाया: अध्ययनं हि वर्धमानमेव भविष्यति इति मे निष्ठा । परंतु प्रतिकूल कालावसरे केनाऽपि कृता तस्या: सेवा सपर्या वा, सा अवश्यं विशेषकीर्तिगौरवकारिणी भवति । स्मरामि च एतद्विषये पंडित कविरायस्य जगन्नाथस्य सुप्रसिद्धा काव्योक्ति:—

" तोयैरल्पैरपि करुणया भीमभानौ निदाघे । मालाकार व्यरचि भवता या तरोरस्य पुष्टि: । सा किम् शक्या जनयितुमिह प्रावृषेण्येन वाराम् । धारासारैरपि विकिरता विश्वतो वारिदेन " । मातृसेवा न कदापि विफलीभवति । विशेषत: तु विपद् क्लेशखिन्नाया: मातु: ।

आस्तां नामेदम् । एतेषां परीक्ष्याणां मध्ये अपि मम सहृद् महाशयानां वाटवे नामधेयानां सविशेषं अहं अभिनंदनं कर्तुम् इच्छामि । यत: तै: मोहमय्यधिष्ठित विद्यापीठस्य 'मास्टर ऑफ आर्ट्स्' नामकं उपपदं लब्ध्वा, गुरुपदवीं प्राप्य, अध्यापनमार्गे सुप्रतिष्ठितै: अपि, स्वयंस्फूर्त्या परीक्ष्यभावम् आस्थाय सुविशेष प्रकारेण नम्रताभाव: प्रकटीकृत: । न तत् तेषां किंचिदपि साहसं । यत: तै: केवलं लीलया एव पारितोषिकं विजयाकृष्टं । परं तै: यत् गीर्वाण भाषारति: सोदाहरणं प्रकटीकृता सा तरुण शिष्य वर्गाणां अवश्यं मार्गदर्शिका भविष्यति । एवमेव पारितोषिक दातॄणां फडके महाशयानां अपि, साभाराभिनंदनं अवश्यं कर्तव्यं भवति । यत् तै: एवं स्वमातामहानां उदारचरित परंपरा सुरक्षिता दृश्यते ।

इत्युक्त्वा, अहं वेदशास्त्रोत्तेजन विषये किंचित् वक्तुं समीहे । तत् भवद्भि: सावधानं श्रोतव्यं ।

अस्मिन् जगति सर्वमेव अवस्थावशं दृश्यते । विद्या हि तथा मन्वंतर युगांतर कलिता भवति । न का अपि विद्या अखंड–प्रगति मार्गावलंबिनी दृष्टा । संस्कृत विद्याया अपि एवमेव अवस्था परिवर्तन अनुभूतं । तरंगानुबंधि तरंगा इव तस्या: स्थित्यंतराणि जातानि । गंगा सिंधु प्रभृति सरित् जलप्रवाह: इव तया विद्यया पुरा पूर्वदिक् तट: आलिंगित: । संप्रति तु भवितव्यता विलासेन सा पश्चिमतटवाहिनी संदृश्यते न तत् तथापि कस्यापि खेदकारणं भवतु । अखिल जगत् गोलमुखं यथाक्रमं प्रकाशयतां नीयमानां रविशशि द्युति: इव, आर्यसंस्कृति: अधुना आंग्लशार्मण्यादि जनपदमुखे

चकास्ति । तद्देशीय पंडितैस्तु, प्रेमचिकित्सा संगमेन, महत्प्रयास परिवर्धित संशोधनेन च, संस्कृत विद्यायाः कान्यपि गूढानि महार्हानि रत्नानि प्रकटीकृतानि दृश्यंते । एषः तु तत्पक्षे कृतज्ञता प्रेरितः दाक्षिण्याचारः प्रत्युपकारश्च । परं न तेन अस्माकं कर्तव्यं यत्किंचिदपि लघु भवति । स्वकीयविद्यायाः एतादृश परकीयकृत मान्यता दर्शनेन गुणमूल्य प्रत्यभिज्ञान दर्शनेन च, भरतखंडवासिनां आर्याणां विद्यारक्षण वर्धनविषये यत् कर्तव्यं तत् अवश्यं परिवर्धते एव । तत् कथं अस्माभिः निर्वहणीयं इति महति प्रश्ने समुत्पन्ने सति, अहं एवं युष्मत्पुरतः प्रश्रयपूर्वकं निवेदयामि ।

पाश्चात्य संस्कृत्या अभिभूतानां अस्माकं, आंग्लभाषा व्यवसाये कश्चित् पक्षपातः अपि अपरिहार्य एव । स न तु केवलं अखिल पाश्चात्य ज्ञानभांडारविवर प्रवेशद्वारं इव स्वेच्छया स्वीकृतो भवति । परं च गतस्वराज्य सत्ता विभवानां पराधीनानां भारतीयानां सर्वव्यवहारशरणबुद्ध्या अपि । एवं हि सर्वथा करुणास्पदायां अवस्थायां अपि, सुविवेकः लाभमार्गं दर्शयति एव । लोके अस्मिन् न कः अपि सकल विदित वेदितव्यः भवति । ज्ञानार्जनस्य द्वे पद्धती निष्ठे वा सभवतः । एका तु सर्वविषयस्पर्शिनी, अपरा च विशिष्टविषयावगाहिनी । न तयोः अन्यतरया सर्वथा हानिः सर्वथा लाभो वा । तद्यथा, सर्वविषयस्पर्शिनी बुद्धिः ज्ञानकासारपृष्ठ संचारिणी भूत्वा, कमलपुष्पावचयं लीलया कर्तुं शक्नोति । अन्या च गहनावगाहन शक्त्या ज्ञान समुद्रतलं अपि आक्रम्य सुमुक्तावचयं करोति । संकीर्ण कार्यदृष्ट्या तु एतत् उभयमपि समान श्रेयस्करं भवति ।

उभयनिष्ठानुसारिणः अभ्यासकाः स्वे स्वे कर्मणि अभिरताः, ज्ञानवर्धनदृष्ट्या समाजोपकारिणः एव भवंति । तद्दिष्ट ज्ञानार्जन मार्गे, तं तं अभ्यासिनं तत्प्रकृतिः एव नियोजयति । हटात् आकृष्टः स्वरुचिविरोधी व्यवसायः न कस्यापि कल्याणप्रदो भवति । विशिष्ट विषयाभ्यासी एकाग्रतां लभते स्वस्मृतिसामर्थ्यं च वर्धयति । परंतु स्वविषय चतुःसीमा बहिर्निर्गतः सन्, जलोत्धृतः मत्स्यः इव एकदेशीयः पन्डितः, अशरणः भ्राम्यति, आत्मानं हास्यास्पदतां वा क्वचित् नयति । एते विशिष्ट विषयाभ्यासिनः तु मूर्तिमंतः चलनवलनात्मकाः सहृदयाः ग्रंथराजाः इव जनपदपूजां अर्हंति । तथापि संकुचितदृष्ट्या चातुर्याभावेन वा, एते पंडिताः व्यवहारसिद्धौ अक्षमाः

भवंति। अन्ये तु सर्व विषय परामर्षिणः, न कस्यचित्अपि विषयस्य हृदयं ग्रहीतुं शक्नुवन्ति। परंतु अस्मिन् नवयुगे विविध विपुल ग्रंथवाचन साहाय्य बलेन, न केवलं विवादपटवः अपि च सारासार परामर्षिणः भवंति, स्वजीवयात्रां विद्याजीवयात्रां च यशस्विन्यौ कुर्वन्ति।

प्राचीन पंडितेषु केऽपि वैयाकरणाः केऽपि मीमांसकाः केऽपि वेदान्तिनः इति तेषां पृथक् अभ्यास दर्शकानि नामानि आसन्। परं च तानि नामानि शब्दतः एव अल्पमर्यादा सूचकानि भवंति। अधुना विश्वविद्यालयीनाः विद्यार्थिनः अपि, स्वल्पमायेण सर्व विषय परामर्षकाः भवंति। एतेषां आधुनिकानां पंडित ब्रुवानां मुखात्, सुगंधजलवर्षि छिद्रशतालंकृत रौप्यपात्रमुखात् इव, ज्ञानजल सहस्रधारा पतनं दृष्ट्वा प्राचीन पंडितः सर्वथा विस्मयचकितः भवेत्। न परं तत् यथार्थं विस्मयकारणं। प्रत्युत प्राचीन पंडित दर्शितं, पाताल तलविमर्शि अगाध विशिष्ट विषयज्ञानं दृष्ट्वा, एतादृश आधुनिक पंडितस्य अपि विस्मय कारणं भवेत्।

अनेन प्रकारेण ज्ञानार्जनस्य द्विविधा पद्धतिः निष्ठा वा परस्पर विस्मयकारका भवतु। परं न तत्र कोऽपि आवश्यक विरोध हेतुः गम्यते। जलचरं स्थलचरात् बिभेति, स्थलचरं जलचरात् बिभेति एतादृशः एव अत्र भ्रामकः विरोधः सर्वथा अनुपपन्नः। समष्टि स्वरूप समाजहित दृष्ट्या तु, उभयविध पांडित्यस्य साहचर्यं पृथक् संभवमपि कल्याणप्रदं एव। तस्मात् तदुभयविधं पांडित्यं प्रयत्नेन अपि रक्षितव्यं। तयोः द्वयोः सर्व विषय परामर्षि पांडित्यं, अधुना परिस्थित्या स्वयमेव रक्षितं भवति। अतः यत् विशेष विषयावगाहनात्मकं पांडित्यं, तत् एकदेशीयं अपि, वेदशास्त्रोत्तेजक सभादि संघटनैः आर्यविद्याभिमानिनः स्वार्थत्यागपूर्वकं रक्षितुं अर्हन्ति।

अथ किं नाम वेदाः? किं नाम शास्त्राणि? यत् पाठशालादिभिः तदुत्तेजक सभाभिः च प्रयत्नतः रक्षितव्यानि। धर्मार्थकाम संसिद्धौ कः तेषां उपयोगः? एतौ प्रश्नौ, नास्तिकब्रुवे अपि आधुनिके काले, सर्वथा प्रत्युत्तर सुलभौ एव मन्ये। वेदास्तु अखिल 'हिंदु' धर्ममूलं स्यात्। वेदप्रामाण्य बुद्धिः एव आद्यं हिन्दु ब्रुव व्यक्तिलक्षणं। धर्मस्य तु लक्षणं अनेकविधं भवति। 'चोदनालक्षणो धर्मः' इति, यज्ञयागादि विशिष्ट धर्माचार व्यवहार निर्वाहक आज्ञा विधान गौरवदर्शकं लक्षणं। "यतोऽभ्युदय निःश्रेयसः सिद्धिः"

इत्यत्र, उभयलोकगत इष्ट स्थिति परामर्षकं, तत्सिद्धिदान पात्रता दर्शकं लक्षणं। "आचारः प्रथमो धर्मः आचारः परमो धर्मः" अथवा "विद्वद्भिः सेवितः सद्भिः नित्यं अद्वेष रागिभिः। हृदयेणाभ्यनुज्ञातो यस्तं धर्मं निबोधत" इति लक्षणद्वयं, शिष्टसंमत सामाजिक सदाचारमहत्व दर्शकं, व्यक्तिगत कार्याकार्य विवेचक बुद्धिमहत्त्व दर्शकं च।

एवमेव विदेशीय पंडितैः तत्त्वसंशोधकैः यानि धर्मलक्षणानि वर्णितानि तान्यपि आदरणीयानि एव भवंति। तद्यथा। "ईश्वरोपदिष्टानां मनुष्य कर्तव्यानां संग्रहो धर्मः" इति इमॅन्युएल कँट महाशयाः। "ईश्वरोपदिष्टेति प्रतिबोधवती नीतिः" इति फिच महाशयाः। "सर्वे गुणसंपन्ने परमात्मनि प्रीतिः धर्मः" इति स्पायनोझा महाशयाः। "श्रेष्ठ सामान्य कनिष्ठेति त्रिविधायां ईशनिर्मित्यां सादरा श्रद्धा धर्मः" इति गटे महाशयाः। "अविज्ञातेऽपि ईश्वरे निष्ठा प्रेम–भावना शरण्यबुद्धिः भीतिः कृतज्ञता पारलौकिक कल्याण प्रार्थना, इत्यादि घटनासमुच्चयो धर्मः" इति डार्विन महाशयाः। एतापि, एतद्दृशानि अन्यानि च, स्वकीय परकीय कृतानि धर्मलक्षणानि, तुलनया परामृशतः विवेकिनः धर्मसामान्य लक्षण निर्णयः सुलभः एव।

एतादृशः धर्मः लोकसमाजं रक्षति। परं च 'धर्मो रक्षति रक्षितः' इति न्यायेन विचिकित्सा संभवति, यत् कथं लोकसमाजेन धर्मस्य रक्षणं संपादितं स्यात्। तर्हि तस्य एकमेव उत्तरं संभवति यत् लोकसमाजः सर्वत्र अपि अवस्थावशः भवति। सः पुनः प्रगति शीलः परिणतिक्षमः इति ज्ञात्वा तदवस्थानुकूलाः, व्यवहारनिर्वाहक्षमाः, धर्माज्ञाः, सनातन धर्मरहस्य अविरोधेनैव सनातनधर्मनिष्ठैः शिष्टैः समाजधुरीणैः धर्मगुरूणां साशीर्वादानुमतिं प्रार्थयित्वा, विघोषयितव्याः। एतस्मिन् कृते सति वेदप्रामाण्यबुद्धिः न ऱ्हसति न दुष्यते च। वेदप्रामाण्यं हि न केवलं शब्दमात्र प्रामाण्यं नापिच तत् त्रिकालांतरे सर्वथा एकस्वरूपं भवति। कौतुकं, अभिमानबुद्धिः, निर्विकल्पं प्रेम, ममत्वं, इत्येतेऽपि वेदप्रामाण्य हेतवः संभवंति युगे युगे। किं पुनः मान्यतार्हाः अपि भवन्ति। केवला शब्दप्रामाण्यबुद्धिः अनेकविध गंडान्तरैः आकुलीभूता शक्यते। शास्त्रस्य तु मुख्यं लक्षणं इदं एव यत् वेदप्रामाण्यबुद्धेः विशिष्ट समाज परिस्थित्या च

एकवाक्यतां अनुरूपत्वं च शास्त्रं संपादयति। प्रतियुगांतरं शास्त्रकाराणां हि कौशल्यं, अस्मिन्नेव प्रामुख्येन दृष्टं, यत् श्रुतिप्रतारणविना, तैः लोकसमाज व्यवहारः श्रुतिविसंवादित्वरूप विपदः सुरक्षिता।

प्रतियुगान्तरं सदाचार परिवर्तनं भवति एव। न एतद्विना युग लक्षणानि ईदृशानि भिन्नानि संभवति। श्रुत्यां एकरूपायां सत्यामपि, आचारधर्मभेदात् विना कथं कृतयुगं कृतयुगं स्यात् कलियुगमपि कलियुगं स्यात्। यज्ञयागादिविषयः, प्रथम युगेन धर्मस्य प्रधान लक्षणमिव स्वीकृताः। परंतु द्वितीये एव वैदिके युगे, 'प्लवाह्येते अदृढाः यज्ञरूपाः' इत्यादि उपनिषद्वचनैः ते एव विषयः अवमानिता दृश्यंते। कलिवर्ज्य प्रकरणात् तु आचारपरिवर्तन संभवः स्पष्टतमः भवति। न प्रतिष्ठित जन वाक्प्रयोग विषयक परिवर्तनात् विना, उत्सर्गानां अपवादबाधा शास्त्रशुद्धा इव वैयाकरणाः स्वीकुर्वंति " नैवेश्वरः आज्ञापयति न चापि धर्मसूत्रकाराः पठंति अपवादैः उत्सर्गाः बाध्यंतां इति" इति महाभाष्यकाराः वदंति। अपवादाः न खलु 'अपवादाः' नाम दूषणशब्दः। आचारापवादो नाम केवलं भिन्नरूढाचारः भिन्नशिष्टाचारः एव। यथा व्याकरणशास्त्रे तथैव धर्मशास्त्रे अपि द्रष्टव्यं। उपनिषत्सु स्मृतौ स्मृतौ च कर्मविषये वृत्तविषये विचारवंतानां धर्मकामानां ब्राह्मणानां भ्रम निरास कर्माधिकारः प्रशंसितः दृश्यते। तत्सर्वं कलियुगे अपि प्रयुज्यते।

अस्तु नाम। अन्यच्च। शास्त्राणां वेदैः सह अंगांगिभावः सुविदितः। पुनः शास्त्राणामपि परस्पर उपोद्बलकत्वं प्रसिद्धं। इतिहासपुराणानि तु वेदशास्त्र समुपबृंहणसाधनं। अस्ति अत्र विज्ञानस्य हि आवश्यकं स्थानं। ज्ञान विज्ञानयोः युतिः नैकोऽपि विघटयितुं समर्थः। केनोपनिषदि ' न तत्र चक्षुर्गच्छति ' इत्यादि श्लोके ' न विद्मः न विजानीमो ' इत्यादि सहेतुक शब्दभेदेन अध्यात्मज्ञानादिव भौतिक विज्ञान महत्त्वं हि सूचितं भवति। श्रीमद्भगवत् गीतासु पुनः विज्ञानस्य योग्यता सम्यक् वर्णिता एव। एतेषां सर्वेषां अपि तर्कानुसंधानं आवश्यकं। वेदः अपि न लौकिकार्थहीनः अनर्थको वा। " स्थाणुरयं किल भारवाहः अधीत्यवेदं न विजानाति यो अर्थं " इत्यादि प्रखर दूषण शब्दानां हेतुः स्पष्ट एव। तत् अर्थज्ञानं हि पुनः न केवलं पूर्वपक्ष उत्तरपक्ष द्वारेण पंडितानां युद्धपराक्रमाय वा अजिंक्य पत्र संपादनाय। तर्हि अभ्युदय निःश्रेयसा-

कांक्षिणां, वेदप्रामाण्यबुद्धियुतानां लोकानां उपदेशाय एव भवति। "एकः शब्दः सम्यक् ज्ञातः सम्यक्प्रयुक्तः च स्वर्गलोके कामधुक् भवति" इति प्रतिज्ञा। तत्तथा सम्यक भवतु। परंतु इह भूलोके अपि शब्द शब्दार्थयोः महत्त्वं न अवगणनीयं प्रत्युत आवश्यकतरं एव। तात्पर्यार्थेन तु इदं विज्ञापयामि, यत् सर्वमपि उपरि निर्दिष्टं धर्ममूलभूतं वैदिक वाङ्मयं गीर्वाण भाषायां संग्रहीतं अस्ति। अतः सा गीर्वाण भाषा सर्वोपायेन रक्षितव्या वर्धितव्या च।

प्रथमं तावत् एतत् अवश्यं स्वीकरणीयं भवति यत् गीर्वाणभाषा न सर्वथा मृता। परं परम गुप्तचैतन्यबलेन वरिवर्तिनी। आर्य संस्कृति महाद्रुम संजीवन समर्थः स एव एको रसः। सर्वासामपि मातृवियुक्तानां देशभाषाणां मातामही भूत्वा, लुप्तस्तन्या अपि, अपत्यवत्सलतया, अदृश्य दुग्धपानेन ताः अद्यापि परिपालयति। गीर्वाण भाषाश्रयेण विना न एका अपि देशभाषा स्थातुं शक्नोति। तथापि स्वयमेव, अनेकविधानि नूतन संसारगृह कर्माणि पारयितुं न शक्नोति तपस्विनी। दौहित्ररूपो अद्यतनानां आर्याणां समाजः, गीर्वाण भाषाकरधरः सन् अपि, तस्याः गलितरदनायाः क्लिष्टार्थ कलितानि मुख स्फाटन गलितानि, प्रौढ दीर्घ वचांसि न समर्थः अभिज्ञातुम्।

एतद्विषये न प्रत्यवायः शब्दगणस्य। बहवः संस्कृत शब्दाः चिरपरिचिताः एव। अन्येऽपि कोशसंशोधनसुलभाः। परं प्रथमं तावत् व्याकरण काठिन्यं महद्भयदर्शनं परिपंथि भवति। अनंतरं प्रौढपरिचितानामपि मार्गे पदसंधिप्रकारः दुर्लंघ्य पर्वतः इव समुत्तिष्ठति। एतदुपाधिद्वयं यथाशक्ति परिहर्तव्यं इति मे मतिः। यदि गीर्वाणभाषायाः संजीवनं व्यवहारक्षमत्वं च इष्यते, प्रासादिक पद वाक्य रचनाप्रकारः सर्वथा असंधिः अनुष्ठातव्यः भवति।

अनेक नूतन विषय विभ्रांत चित्तानां, उद्योगपराङ्मुखानां, प्राचीन वाङ्मयादि विषये समुदासीनवृत्तीनां, आधुनिकानां गीर्वाणभाषा संमुखत्वं संपादयितव्यं चेत् सर्वः प्रबंधः, कदली फल दलवत् लीलया आवरण दूरीकरणक्षमः भवितुमर्हति। न पुनः नारीकेलफलवत् गहनप्रवेशः। विछिन्नपदं, विग्रहित विग्रहं वाक्यं, विवृतद्वारं इव गृहं, सुलभप्रवेशं अत एव आकर्षकं भवति। संधिस्तु शास्त्रीय दृष्ट्या अपि बहुधा ऐच्छिकः एव। लेखन प्रसंगे तु सः सर्वथैव अनुपपन्नः। त्वर्यमाण भाषणप्रसंगे पदानुबंधि

पदानां मुखोच्चारे स्वतः सिद्धः संधिः स्वाभाविकः सन्, उच्चारश्रवणव्यवहारे परिसमाप्त प्रयोजनः भवति। लेखनं हि नाम स्वरूपतः त्रुटितमेव। तस्मिन् संधिबंधनं अनावश्यकं किंबहुना कृत्रिमं गम्यते। निरर्थक संकेतपरिपालन दोषविष्टं च भवति। संहिता काले अपि प्रायः असंधिरूपेण स्थितिः आसीत्।

" संहिता एकपदे नित्या। नित्या धातूपसर्गयोः॥
नित्या समासे वाक्ये तु। सा विवक्षामपेक्षते॥ "

श्रुतं हि यत् व्याकरणमहाभाष्यं उपनिषदादिग्रंथाः प्रायः असंधिलिखिता एव भवंन्ति।

अस्तु नाम। संधिसमासैः परिभाषया वा, क्लिष्टीकृतात् संस्कृतप्रबंधात्, सामान्यः जनः खिद्यन् इव अपसरति। अतएव गीर्वाणभाषायाः पुनरुज्जीवनं कर्तुमिच्छद्भिः तस्याः प्रसादयुक्तः एव नवावतारः सर्वप्रयत्नैः संपादयितव्यः

मध्ययुगीनकाले पंडितकरगता गीर्वाणभाषा अतिजड कठिनरूपं अलभत। तस्याः प्रचलितत्व लोपस्य एव बहुधा एषा प्रतिविकृतिः स्यात्। अधुनापि सः प्रचलितत्व लोपः तथा एव वर्तते। एवमपि, परभाषायाः दुर्दमनशीलं आक्रमणं लक्षयित्वा, प्रचलित विद्यमान देशभाषाणामपि संरक्षणार्थं गीर्वाणभाषायाः सुगमीकरणं सुलभीकरणं सत्वरं सुस्वीकरणीयं भवति। विशेषतः च वर्तमान युगसमयः भौतिकशास्त्र विकाससंकुलः इति सर्वमान्यमेव। अन्यथा च विविधविचारसंमर्दः, आधुनिक विदुषां मानसात् बहिः निर्गंतुं विलंबाक्षमः इव यतते। विनिर्गमकाले यदि, देशभाषासहज विकारसहिता संस्कृताश्रिता उचित परिभाषा न लभ्यते चेत्, आङ्ग्ल यवनादि भाषाणाम् विजिगीषा अचिरादेव सौकर्येण च यशस्विनी भविष्यति, इत्येतस्मिन् न संदेहावकाशः। विविध आर्य संस्कृतिरचित पुराशास्त्रीयग्रंथेषु भूमिगत रत्नखंडवत् हेमकणवत् उचितपरिभाषा निर्वाहकः शब्दगणः प्रचुरः प्रसृतः च। अत्रापि योजक एव दुर्लभः। यथा अर्थशास्त्रीय चलनपद्धत्याम् हैमं रजतात्मकं च द्विविधं चलनं संभवति प्रभवति च, तथैव भाषा व्यवहारेऽपि हैमोपम्यं संस्कृतं रजतोपम्यं प्राकृतं शब्दचलनं परस्पर उपबृंहितं परभाषा परिभवे अवश्यमेव सुयशो लभेत।

अन्यथा तु संस्कृत श्रीवैभवं, जडकठिन भाषाकवच संलग्नं, भूमिगत गुप्त विवरगतम् इव धनं वृथाभिमानवर्धकं अचलनशीलं नित्यनैमित्तिक संसार कार्यार्थे अनिर्वाहकं भवेत् । दिव्यज्ञान सुधापि यदि लोहपत्रबद्धमुखे भाजने संगृहीता, न किंचित्करा भवेत् । घटसर्प गृहीतगलो दैवहीनः अमृतेन किं करिष्यति ।

अथवा समुचितमाह सुभाषितकारः यथा " सूत्रैः पाणिनिनिर्मितैः बहुतरैः निष्पाद्य शब्दावलिं । वैकुंठस्तवमक्षमां रचयितुं मिथ्याश्रमाः शाब्दिकाः ।। पक्वान्नं विविधं श्रमेण विविधापूपाम्न्यसूपान्वितं । मंदाग्नीननुरुंधते मितबलानाघ्रातुमप्यक्षमान् । "

जनता जनार्दनसेवा विषये गीर्वाणभाषायाः अक्षमत्वं, वैकुंठस्तवाक्षमत्वं च, एकमेव । इत्यलम्.

---

# १२८. तत्त्वज्ञान

( मंगळवार ता. १८ सप्टेंबर १९३४ रोजीं सायंकाळीं ६॥ वाजतां गायकवाडवाड्यांत केसरी-मराठा संस्थेतील श्रीगजाननापुढें "तत्त्वज्ञान" या विषयावर झालेल्या भाषणाचा थोडक्यांत सारांश )

" धर्म, अर्थ व राजकारण हे विषय समाजाच्या सर्व थरांपर्यंत जाऊन पोहोंचले आहेत. हल्लींच्या राज्यघटनेंत मतदारसंघ विस्तृत केला गेल्याकारणानें राजकारण तेथपर्यंत जाऊन भिडलें आहे. धर्माचीहि तीच अवस्था. पूर्वी धर्म विशिष्ट अशा थोड्या लोकांच्या हातीं होता. आतां ती स्थिति पालटून जातीवर व समाजावर हल्ले होऊं लागले आहेत. समाजांतील खालचे लोक वरिष्ठ समाजावर हल्ले चढवीत आहेत. कम्युनिस्टांनीं अर्थशास्त्र खालपर्यंत नेऊन पोहोंचविलें आहे. भौतिक शास्त्राचा परिचयहि सर्वत्र झाला आहे; लोकशाहीच्या तत्त्वाला धरून अशाच या गोष्टी होत आहेत.

तसाच प्रकार तत्त्वज्ञानाचा कां नसावा, असें मनांत येऊन हा विषय

मीं मुद्दाम योजला आहे. या विषयांत आपणांस अवगाहन करतां येणार नाहीं असा कांहीं तो गूढ नाहीं. आतांपर्यंत तत्त्वज्ञान हा विषय सामान्य माणसाच्या आटोक्याबाहेरचा म्हणून समजला जाई. ‘ वेदांती ’ ‘तत्त्वज्ञानी’ म्हणून एक प्रकारची उपेक्षेची, अधिक्षेपाची गोष्ट म्हणून समजली जाई. हें ज्ञान सामान्य आहे असें पटलें म्हणजे त्यांतील गूढपणा आपोआप नाहींसा होईल.

तत्त्वज्ञान हा विषय केवळ पांडित्याचा नाहीं. आपल्या जीविताशीं चिकटलेला असा तो विषय आहे. आपल्या लहानपणीं आपणहि तत्त्वज्ञ होतों असें आपणासहि आढळून येईल. लहान मुलांच्या तोंडीं अशा गोष्टी नेहमीं येतात. जास्त तूप मागतांना गाय व्याली नसेल तर हंडा तूप व्यायला असेल असें मुलगा सहज म्हणतो. एक लहान मूल पाण्याला बांगी म्हणे व पावसाला “ बांगीबुवा ” म्हणे. म्हणजे ज्यांचा कार्यकारणभाव समजत नाहीं, त्यांचें वर्णन कांहीं तरी अतिमानुष करावयाची उपजत वृत्तिच असते. जुन्या ऋषींनीं केलेली सृष्टिचमत्काराचीं वर्णनें अशींच आहेत.

कार्यकारणभावाशिवाय जगांतील कांहींच गोष्ट घडत नाहीं, ही गोष्ट लहान मुलेंसुद्धां सांगतात. हें असें कां झालें तर ‘ उगाच ’ असेंहि मूल म्हणतें. म्हणजे त्यालाहि कोठें कार्यकारणभाव नाहीं हें समजतें. अलीकडे भौतिक शास्त्रांतहि कार्यकारणभावाला गंचाडी मिळूं लागली आहे.

‘ गाईला आत्मा नाहीं, ’ म्हणजे मनुष्याला आत्मा आहे ही तत्त्वज्ञानाची गोष्ट मला इंग्रजी पाहिलें पुस्तक वाचतांना समजली. स्वर्ग व नरक या संबंधाची कल्पना जशी तत्त्वज्ञान्यांनीं केली तशी आपल्या दृष्टीनें लहान मुलेंहि त्यांची कल्पना करतात. म्हणजे तेहि अजाणता तत्त्वज्ञानच बोलतात. ‘ देवाशपथ ’ ह्याची गोष्टहि अशीच. त्यांत अनेक गोष्टी अंतर्भूत होतात लहानपणीं मुलानें ते शब्द उच्चारले ते अजाणता; पण त्यांतहि तत्त्वज्ञान नाहीं असें कोठें आहे?

“ मेन कॅन मेक ए बॉक्स, कॅन दे मेक ए ट्री ?’ या प्राथमिक इंग्रजी पुस्तकांतल्या गोष्टींतहि असेंच किती तरी गूढ तत्त्वज्ञान भरलें आहे. कारण परंपरा हुडकत जातां जातां तत्त्वज्ञान्यांना कोठें तरी थांबावेंच लागतें. लहानपणींसुद्धां जें तत्त्वज्ञान आपण सहज बोलतों तें आतां कां

समजूं नये ? ' दिलें दान घेतलें दान पुढच्या जन्मीं मुसलमान ' या गोष्टींतहि असेंच तत्त्वज्ञान भरलें आहे असें दिसून येईल. कारण देणें ही उत्कृष्ट गोष्ट मान्य केली व तें परत घेऊं नये ही दुसरी गोष्टहि मनाला पटली. तसेंच पुनर्जन्मासहि त्यांत मान्यता दिली गेली. अशा तत्त्वज्ञानाच्या अनेक गोष्टी त्यांत आढळून येतात.

ज्या गोष्टी आपणास समजत नाहींत, त्यांची उपपत्ति लावून घेण्याची वृत्ति बालपणापासूनच असते. आभाळ गडगडतें म्हणजे ' म्हातारी हरभरे भरडते ' ही बालपणींची गोष्ट आज शास्त्रज्ञांना मान्य होणार नाहीं. परंतु त्यांनीं ठरविलेला सिद्धांत तरी कायम राहील हें कोणी सांगावें ? दिवसानुदिवस ज्ञानांत भर पडत आहे हें खरें; तथापि आजचें ज्ञान उद्यां खोटें ठरणार नाहीं असें कशावरून ? यावरून बालक, शास्त्रज्ञ व तत्त्वज्ञ हे सर्व एकाच मार्गानें जात आहेत ही गोष्ट ध्यानीं येईल व असा हा विषय खालच्या थरापर्यंत जाण्याजोगा आहे.

यांतील तत्त्व फार गूढ नाहीं. तें सोप्या रीतीनें मांडण्याजोगें आहे. वस्तुवर्णन, चिकित्सा, प्रमाण व प्रयोजन या चार मुख्य गोष्टी तत्त्वज्ञानांत अंतर्भूत होतात. जें ज्ञान जीवनाला सुखावह होत नाहीं तें ज्ञानच नव्हे असें कांहीं म्हणतात. कांहीं म्हणतात सत्यज्ञान होणें हेंच खरें ज्ञान. अशा अनेक विचारसरणी रूढ आहेत. पण तत्त्वज्ञानाचा सामान्य व्यवहार जाणता व अजाणता सारखा सुरूच आहे. सत्याचें ज्ञान = तत्त्वज्ञान ही व्याख्या सर्वमान्य चावार्कालाहि देखील मान्य आहे. तुपाऐवजीं तो तेल पिणार नाहीं. वेदांती तर ज्ञान हाच मोक्ष मानतात समाजांतील सर्वांना सत्यज्ञान म्हणजे काय हें समजतें; परंतु सत्यज्ञान होणें मात्र अवघड आहे. त्याच्या मार्गांत विघ्नें फार आहेत.

सत्यज्ञान म्हणजे सर्वांगीण ज्ञान. आपणाला ज्ञान होतें तें एकांगीण होतें, अर्थात् तें सत्य नसतें. एका पातळींत असलेल्या पदार्थांत जवळचा पदार्थ मोठा दिसतो व लांबचा लहान दिसतो, यावरून तो लहानच आहे असें म्हणूं लागलें तर तें सत्य होणार नाहीं. चित्रांतील दर्शनी भाग दिसतो, मागचें कांहींच दिसत नाहीं. इंद्रियजन्य ज्ञानांत हा असाच कमीपणा आहे. त्यांत सर्वांगीण ज्ञान नाहीं. पुतळा पाहिल्यावर त्यांत

यथार्थ दर्शन होतें. परंतु त्यांतहि सर्व ज्ञान एकदम होत नाहीं. सर्वांगीण ज्ञानाचें उदाहरण म्हणून 'तळहातावरचा' आवळा* हें देतात. परंतु त्यांतहि जेथें हाताला आंवळा चिकटला तेथील ज्ञान होतच नाहीं, तें कमी पडतेंच.

परंतु असें एकांगी ज्ञान असतांहि व्यवहार करावा लागतो. म्हणून त्यांत दोष असणें स्वाभाविक असतें. सर्वांगीण ज्ञानाची हाव धरली तर ती सिद्धीस जात नाहीं. ज्ञान सत्य मानलें जातें तें संकेतानें. संपूर्ण ज्ञान एकदम होत नसतें. रॅलेनें समक्ष पाहिलेला इतिहास लिहिला तो त्यास सिद्ध करतां येईना म्हणून जाळला. आपणहि इतिहास सत्य मानतों तो संकेतानें. रॅलेप्रमाणें प्रत्येकानें इतिहासाकडे शंकित भावानें व सत्य-ज्ञानाच्या दृष्टीनें पाहिलें तर त्याला पूर्ण व सत्यज्ञान होणार नाहींच, पण अर्धवट ज्ञानाचा इतिहास जाळून टाकला तर तो अर्धवट ज्ञानासहि मुकेल.

भौतिक शास्त्रांतहि पूर्वींचे सिद्धान्त आतां राहिले नाहींत. हिंदी तत्त्वज्ञानांत एकमत नाहीं. सर्वांना एक गोष्ट एकसारखी दिसत नाहीं. विश्वासाच्या गोष्टींत एकवाक्यता कशी होणार? 'Each claiming truth, but truth disclaiming all' अशी स्थिति आहे! सत्यज्ञान कोणालाच होणें शक्य नाहीं; मग सत्याचे प्रयोग (!) कोणी कितीहि करो. मनुष्याची ज्ञान-शक्तिच मर्यादित आहे एका ईश्वराखेरीज सत्यज्ञानी कोणीच नाहीं; पण म्हणून कोणी थांबून उपयोगी नाहीं. जेवढें मिळेल तेवढ्या ज्ञानावर सुरुवात करावयास पाहिजे.

सत्य हें ऋजु आहे असें म्हणतात, पण तें खरें नाहीं. सत्य वक्र आहे. वक्र रेषेला सरळ रेषा भिडवितांच येत नाहीं. तत्त्वज्ञान व सत्यज्ञान यांत असाच फरक आहे. मनुष्यकृत तत्त्वज्ञान सत्यज्ञानाजवळ जाईल, पण त्यास पूर्णपणें भिडणार नाहीं.

ज्याची मानसिक शक्ति जास्त परिणत झाली आहे त्याला सामान्य मनुष्याच्या मंदगतीनेंच जावयास पाहिजे असें नाहीं. परंतु त्यामुळें त्याच्या हातीं सत्य लागलें असें मात्र नव्हे. समाधि लावणाऱ्या साधुसंतांनासुद्धां त्या काळच्या भौतिक शास्त्रज्ञापेक्षां जास्त ज्ञान प्राप्त झालें नाहीं, ही गोष्ट त्यांच्या ग्रंथांवरून दाखवितां येईल. त्यांची रीत वेगळी असेल, पण उत्तर मात्र एकच.

तत्त्वज्ञान म्हणजे सत्यज्ञान. तें जर इतकें अवघड तर त्या मार्गालाच जा कशाला ? असा प्रश्न येतो. याला उत्तर असें कीं, प्रयत्नांत मनुष्याला आनंद असतो म्हणून मनुष्य व्यासंग करतो. सत्यान्वेषण हा प्रयत्न व त्या प्रयत्नांत आनंद असतो. हा आनंद सत्, चित् व आनंद या तिहींत सामावतो आहे. ब्रह्मांश जो मनुष्य तो हा आनंद प्राप्त करून घेण्यासाठीं प्रयत्न करीत असतो. अस्तित्व हें दुय्यम; त्याला चैतन्याची जोड लागते, किंबहुना चैतन्यानें अस्तित्वाला गोडी येते. सत्, चित्, आनंद या तीन गुणांची चढती पायरी आहे. हे तीनहि गुण मनुष्यांत आहेत. या आनंदांतहि अनेक प्रकार आहेत, त्यांतहि इंद्रियापलीकडे जाऊन शक्ति चालवून आनंद घेणें हा खरा आनंद. हा आनंद म्हणजे बुद्धियोगाचा आनंद. अन्न, प्राण, मन, विज्ञान व ज्ञान असे पंच कोश आत्म्याभोंवतीं आहेत. विज्ञानयुक्त ज्ञान तें तत्त्वज्ञान व हें मिळविण्यांत खरा आनंद मनुष्याला मिळतो.

अनेक अडचणी असतांहि मनुष्य ज्ञानाच्या मार्गे लागतो याचें कारण त्यांत आनंद आहे. आजपर्यंत हजारों वर्षें हें तत्त्वसंशोधन ऋषींनीं केलें. याचें कारण आनंदप्राप्ति. विज्ञान म्हणजे सगुण परमेश्वराची उपासना. ज्ञान हें निर्गुणाशीं एकरूप करणारें; परंतु ही गोष्ट सर्वांनाच साध्य होत नसल्यानें विज्ञान या गोष्टीकडे सामान्य मनुष्य जातो. अनेकांतून एकत्व पाहणें म्हणजे ज्ञान व एकत्वांतून अनेकत्व कसें निर्माण झालें हें पाहणें म्हणजे विज्ञान, अशी व्याख्या गीतेनें केली आहे.

बुद्धिच हें काम करूं शकते. ज्ञान व विज्ञान हे एकाच ब्रह्मोपासनेचे दोन भाग आहेत. व बुद्धि दोहोंचाहि परामर्ष घेऊं शकते. ज्ञानाचें फल आनंद हें होय. शुद्ध ज्ञानाला मोक्ष मिळतो म्हणून सांगितलें आहे हें खरें असेल; पण विज्ञानी मनुष्याला तत्त्वज्ञान शोधतांना निदान सगुणोपासना तरी लाभेल.

प्रत्येक शास्त्र आपल्या परीनें मर्यादित असतें, परंतु तत्त्वज्ञानाची गोष्ट मात्र तशी नाहीं. विज्ञानाचा परिणाम व्यवहारोपयोगी आहे. त्यापलीकडची पायरी ज्ञानाची. आपण जें मिळवितों त्या सर्व विज्ञानाचा तरी नेहमीं उपयोग होतो किंवा करावा लागतो असें नाहीं.

# १२९. स्वामी विवेकानंदांचें चरित्ररहस्य

( शुक्रवार ता. १९ जुलै १९३५ रोजीं फर्ग्युसन कॉलेजांत विवेकानंद सोसायटीच्या विद्यमानें झालेलें व्याख्यान. )

"स्वामी विवेकानंद या थोर व्यक्तीविषयीं भाषण करण्याचा योग प्रो. दामले यांनीं मला आणून दिला, याबद्दल मी आभारी आहें. आतांच एका विद्यार्थ्यानें भाषणांत सांगितलें कीं, अत्यंत गहन निराशेची अशी लाट आज तरुण पिढीवर आली असून, तिची बाधा न व्हावी म्हणून विद्यार्थिवर्ग अनेक करमणुकींच्या मार्गांचें अवलंबन करीत आहे ! रास्त प्रकारची व फारसा खर्च न पडणारी करमणूक करणें हा, निराशेची आठवण बुजविण्याचा, एक मार्ग आहे खरा. तथापि माझ्या मतें तरुण विद्यार्थिवर्ग स्वामीविवेकानंदासारख्या विभूतीच्या चरित्राचें मनन करील तर त्याची निराशा जाईल. इतकेंच नव्हे तर, त्याच्या हातून राष्ट्रोपयोगी कार्यहि हौसेनें होईल.

तीस–पसतीस वर्षांपूर्वींचा काळ लक्षांत घेता त्या वेळच्या तरुण पिढीच्या धार्मिक व आध्यात्मिक मनोरचनेचे एक प्रतीक म्हणून विवेकानंदांचें उदाहरण देण्याजोगें आहे. खुद्द बंगाल्यांत त्यापूर्वीं राममोहन रॉय, केशवचंद्र सेन, यांसारखे धर्मप्रचारप्रवीण लोक होऊन गेले. पण माझ्या मतें स्वामी विवेकानंदांची मनोरचना त्यांच्याहून अधिक स्पृहणीय व अधिक यशस्वीहि ठरली. राममोहन रॉय हे अत्यंत विद्वान् व धर्मांचा तुलनात्मक अभ्यास करणारे होते. परंतु त्यांचें बहुतेक कार्य विध्वंसक रूपाचें व्हावें लागलें. तें कार्य म्हणजे हिंदूंच्या सामाजिक दोषांचें प्रखर आविष्करण परंतु हिंदुस्थाननें पाश्चात्य संस्कृति स्वीकारावी इतकाच मोघम उपदेश त्यांनीं केला. केशव चंद्रसेन हे भक्तिमार्गी असून प्रार्थनासमाज स्थापन करण्यास त्यांनीं मदत केली. परंतु प्रार्थनासमाज ही धार्मिक संस्था यशस्वी कां होऊं शकली नाहीं याचीं कारणें महाराष्ट्रांतील लोकांना विदितच आहेत.

मी कदाचित् असेंहि म्हणण्याचें धाडस करीन कीं, विवेकानंदांचें गुरु रामकृष्ण परमहंस यांच्यापेक्षां देखील विवेकानंदांचें यश अधिक मोठें. विवेकानंद न होते तर कदाचित् रामकृष्ण परमहंसांची कीर्ति इतकी न

पसरती. गुरूची सर्व आध्यात्मिक तपस्या समाधि लावून आत्मसाक्षात्कार घेण्यांत खर्च झाली. परंतु तिनें व्यवहाराला फारशी मदत केली नाहीं. रामकृष्णांना मी उज्ज्वल दीपाची किंवा मशालीची उपमा देईन, तर विवेकानंदांना त्या मशालीनें चेतविलेल्या दावानलाची म्हणजे वनविध्वंसक अग्नीची उपमा देईन ! रामकृष्णांनीं स्फूर्ति दिली, विवेकानंदानीं कार्य केलें. मग शिष्याचें यश जर अधिक तर, गुरूचीं स्तोत्रें अशा शिष्यानें गावीं व अधिक नामस्मरणपूर्वक कोणतेंहि कार्य करावें, याची जुळणी कशी होतें, असें कोणी विचारील, तर त्याला उत्तर हें कीं, गुरूचें स्तोत्र गाणें हा गुरूला शाबासकी देण्याच्या धिटाईचा एक विनयाचा प्रकार आहे. शाबासकी वडील माणसानें लहानाला द्यावी ही अनुलोम पद्धति खरी. परंतु कांहीं कांहीं शिष्य आपणाकडे लहानपणा घेऊन गुरूलाच मोठा करून दाखवतात. असा कीं, खरोखर हे त्याला ' शाबासकी ' देत आहेत! याविषयीं ना. गोखल्यांना आपले गुरु म्हणणाऱ्या म. गांधींचें उदाहरण सहज सुचण्यासारखें आहे.

असो. विवेकानंदांचें चरित्र आपण पुष्कळांनीं वाचलेंच असेल. जन्म १८६२ सालीं. मृत्यु १९०२ सालीं. मिळून अवघ्या ४० वर्षांत त्यांनीं लोकयात्रा संपविली. त्यांचे वडील एक वकील ( ॲटर्नी ) होते. परंतु आज हे संन्यासी झाले होते. मध्यंतरी एक किंवा अनेक पिढ्या टाकून मागील पूर्वजांचे कांहीं गुण पुढील वंशजामध्यें आढळतात, असें म्हणतात, त्यांचें हें उदाहरण असेल काय ? बी.ए. च्या परीक्षेला तत्त्वज्ञान या विषयाचा अभ्यास करीत असतां विवेकानंदांनीं पत्रद्वारें हर्बर्ट स्पेन्सर यांच्याशीं वादविवाद केला. तथापि कॉलेजांतून बाहेर पडतांना स्वतः ते अज्ञेयवादीच राहिले. पण पुढें कायद्याच्या अभ्यासाला लागण्यापूर्वींच त्यांची व रामकृष्ण परमहंस यांची गांठ पडली. गुरूला आवडता शिष्य भेटला. शिष्याला आवडता गुरु भेटला व त्याच्या जीवनचक्राला वेगळी दिशा लागली. हिमालय, तिबेट वगैरे भागांत कांहीं थोडें योगसाधन केल्यावर स्वामीजी हिंदुस्थानांत संचारार्थ निघाले.

१८९२ किंवा ९३ सालीं ते मुंबईपुण्याच्या बाजूला आले होते. पण तेव्हां ते मुळींच प्रसिद्ध नव्हते. या वेळीं मी सातारा येथें एल्‌एल्. बी.

चा अभ्यास करीत होतों. उन्हाळ्याच्या सुटींत साताऱ्चीं कांहीं वकील मंडळी महाबळेश्वरला गेली होती; ती परत आल्यावर सांगूं लागली कीं, " कोणी एक तरुण तेजस्वी बंगाली संन्याशी आम्हांला भेटला. त्याचें इंग्रजी वक्तृत्व अत्यंत सुंदर व मोहविणारें असून, तत्त्वज्ञानविषयक विचार फारच उमदे व शहाणपणाचे भासले. साताऱ्यास येण्याविषयीं आम्हीं त्याला निमंत्रण केलें आहे." पण अखेर ते आले नाहींत; यामुळें त्यांना समक्ष पाहण्याचा योग मला लाभला नाहीं.

असो. हा संचार करीत करीत स्वामी दक्षिणेकडे त्रिवेंद्रम् येथें व तेथून मद्रासला गेले. शिकागो ( अमेरिका ) येथें भरणाऱ्या धार्मिक विश्वपरिषदेची बातमी तिकडे नुकतीच आली होती व अशा परिषदेला आर्यतत्त्वज्ञान शिकविण्यास हिंदी प्रतिनिधि पाठवावयाचा तर हा फार योग्य असें ठरवून, कांहीं धनिक लोकांनीं त्यांना अमेरिकेस जाण्याला द्रव्यसाहाय्य दिलें.

सीझरच्या पराक्रमाचें वर्णन करतात त्याप्रमाणें स्वामीजींनीं अमेरिकेंत मिळविलेल्या यशाचें वर्णन 'गेला, पाहिलें, जिंकलें' या तीनच शद्बांनीं करतां येण्यासारखें आहे! तेथील पत्रांनीं त्यांना 'जन्मसिद्ध अजिंक्य वक्ता' असें शिफारसपत्र दिलें. आणि यापुढें अमेरिकन लोकांनीं हिंदुस्थानांत खिस्ती धर्मोपदेशक मिशनरी पाठवावे तरी कशाला असा प्रश्नहि केला! अमेरिकेची ही शंका अद्यापि कायमच आहे. थोड्या वर्षांपूर्वी अमेरिकन मिशन सोसायटीतर्फें मिशनरी नसलेल्या (लेमेन) अशा गृहस्थांचें एक शिष्ट-मंडळ मुद्दाम याच महत्त्वाच्या प्रश्नाचा विचार करण्याकरितां हिंदुस्थानांत आल्याचें पुष्कळांना माहीत असेल. या शिष्टमंडळानें पुण्यांतील इतर कांहीं गृहस्थांप्रमाणें मुलाखतींत माझे विचार समजून घेतले. तेव्हां मीहि त्यांना हेंच सांगितलें कीं, "खिस्ती धर्माच्या जाळ्यांत हिंदी सावजें पकडण्याकरितां मिशनरी पाठवावयाचे असतील तर ते यापुढें तुम्हीं पाठवूं नयेत. त्यांत तुमची निराशा होईल. पुढच्या पिढींत या देशांत धर्म म्हणून कांहीं उरेल कीं नाहीं अशी शंका कोणी घेतात ती घेवोत. मला तसें वाटत नाहीं. पण येवढें निश्चित वाटतें कीं, यापुढें खिस्ती धर्माला सुशिक्षित हिंदी लोक किंवा सुसंस्कृत हिंदी लोक धर्मांतर करणारे मिळणार नाहींत. दुष्का-

ळासारख्या आपत्तीमुळें तुम्हांला लोक बाटवावयाला मिळतील तितकेंच. तथापि अमेरिकन मिशनकडून निरक्षेप जनतासेवेचें जें उदाहरण घालून देण्यांत येतें त्याचें आम्हीं हिंदी लोकहि कौतुक करतों. सुदैवानें सांस्कृतिक देवघेवीच्या बाजारांत किंवा चौकांत (कारण बाजार हा शब्द वाईट आहे) निरनिराळ्या देशच्या लोकांची गांठ यापुढें अधिकच पडत जाईल. म्हणून तुम्ही या दृष्टीनें मिशनरी पाठवीत जा. त्यांच्याकडून आम्ही जनतेच्या सक्रिय सेवेचीं तत्त्वें शिकूं, व आर्यधर्माचीं तत्त्वें त्यांना मोबदल्यादाखल शिकवून परत पाठवूं. ''

असो. स्वामीजींच्या अमेरिकेंतील विजयाची खूण हीच कीं, ते येतांना कांहीं अमेरिकन व इंग्रज शिष्यच बरोबर घेऊन आले व ती परंपरा अजूनहि सुरू आहे. त्यांनीं व त्यांच्या गुरुबंधूंनीं अमेरिकेंत स्थापलेली वेदान्त सोसायटी अजून कार्य करीत आहे. अमेरिकेहून परत आल्यावर स्वामीजींनीं कोलंबोपासून हिमालयापर्यंत दौरा काढून जीं व्याख्यानें दिलीं तीं अत्यंत वाचनीय आहेत. १८९७ ते १९०० या साळांत स्वामीजींनीं अलमोरा, बेलूर वगैरे ठिकाणीं मठांची स्थापना केली; व जनताजनार्दनाची सेवा हाच मुख्य कार्यक्रम त्या मठांतून संन्याशांच्या सांप्रदायाकडून सुरू केला. निष्क्रिय भक्तिमार्गाचें ध्येय टाकून देऊन, कर्मयोगी संन्याशाचें ध्येय आपल्या मठवासी गुरुबंधूंकडून मान्य करवून घेण्याला स्वामीजींना किती प्रयास पडले, पण अखेर त्यांनीं ती ध्येयक्रांति कशी घडवून आणली, हें रोमारोलाँ यांनीं लिहिलेल्या स्वामीजींच्या चरित्रांत तुम्हांला वाचावयास मिळेल. १९०० सालीं स्वामीजींनीं युरोपअमेरिकेकडे पुन्हा एकदा संचार केला. पण परत आल्यावर ते फार दिवस जगले नाहींत. हातीं घेतलेलें कार्य अपुरें असताच, पण त्याला योग्य दिशा लावून, त्यांनीं चिरसमाधि घेतली.

स्वामीजींचें हें चरित्र थोडक्यांत असें आहे. पण त्यापासून आपण काय बोध घ्यावा हा प्रश्न शिल्लक उरतोच. म्हणून माझ्या समजुतीप्रमाणें त्याचें उत्तर देऊन मी आपलें भाषण संपविणार आहे.

स्वामी विवेकानंद यांना दैवी संपत्ती पुष्कळच लाभलेली होती. नुसतें त्यांचें स्वरूप पाहिलें तर भव्य कपाळ, गरगरीत पाणीदार डोळे, मोह

पाडणारें वक्तृत्व, तीव्र बुद्धिमत्ता, अतुल उत्साह, आणि लौकिक अलौकिक विद्यांचा अभ्यास, या गोष्टी लक्षांत घेतां ते कोणत्याहि उद्योगधंद्यांत यश मिळवितें यांत शंका नाहीं. निदान बंगाली तरुणांच्या आवडीचा, व त्यांना वश असणारा वकिलीचा धंदा व राजकारणाचा उद्योग यांत ते पडते तरी उच्च दर्जाला पोचले असते. स्वामीजी वारले तेव्हां वंगभंगाची चळवळ सुरू झालेली नव्हती; परंतु लॉर्ड कर्झन यांनीं आपलें स्वरूप प्रगट केलें होतें. अर्थात् स्वामीजी राजकारणांत पडते तर बाबू अरविंद घोस यांच्या प्रमाणे ते खचित नांव करते. पण पुष्कळांना हें माहीत नाहीं कीं, प्रचलित राजकारण ही फार हलकी गोष्ट असे ते मानीत! आणि राजकारणांत त्यांनीं पडावें अशा सूचना त्यांना झाल्या असतांहि त्यांनीं नकारच दिला. कारण "देशभक्ति ही केवळ राजकारणांतच साठविलेली आहे असें नाहीं. तिची उपासना करण्याचे इतर अनेक मार्ग मोकळे आहेत," असें ते मानीत. मात्र राजकाणाविषयींची अनादरबुद्धि त्यांनीं देशभक्तीला लाविली नाहीं. ते वेदान्ती होते तरी देशभक्त होते. याचें कारण, जग उलथण्याची अंगीं शक्ति असली तरी ती प्रभावी करण्याला जो आधार लागतो, तो देशभक्तीवर टेकून व स्थिर होऊनच मिळतो असें त्यांना वाटे. या आधाराला इंग्रजींत 'फल्क्रम' हा शब्द आहे. असें सांगतात कीं, ग्रीक गणितशास्त्रज्ञ आर्किमेडिस यानें, सर्व भूगोलच्या भूगोल म्हणजे पृथ्वी उचलून फेकून देतां येईल अशी लिव्हर, म्हणजे पहार बनवितां येईल असें गणितानें ठरविलें; पण त्याला पंचाईत ही पडली कीं, त्या लिव्हरचें टोक भूगोलाखालीं घालून तो उलथून टाकतांना ती लिव्हर किंवा पहार टेकून धरावयाची कशावर ? स्वामी विवेकानंद यांनीं मनाशीं असें ठरविलें कीं, आपण आर्यधर्म जगाला शिकविण्याचें व पटविण्याचें महत्कार्य करूं, पण त्याला देशभक्तीचा आधार घेतल्याशिवाय भागावयाचें नाहीं.

असो. स्वामीजींनीं राजकारण टाकलें तथापि धर्मप्रसार करण्याचें ध्येय त्यांनीं स्वीकारलें, तरी त्याकरितां संन्याशी होण्याचीच काय गरज होती ? खुद्द गुरु रामकृष्ण परमहंस हे विवाहित होते. पूर्वींचे अनेक धर्मप्रसारकहि गृहस्थाश्रमी होते. मग स्वामीजींनीं संन्यासच कां पत्करला ? याला माझें उत्तर असें कीं, गीतेंतील कर्मयोग जरी त्यांना मान्य होता, तरी संन्याशी

बनल्यानें कर्मयोगी अधिक यशस्वी होतो असेंच त्यांना वाटत असावें. शंकराचार्यांच्या मतें संन्यासदीक्षा ही ज्ञानाची खूण, व ज्ञानोत्तर कर्म करण्याचें कारण नाहीं. उलट टिळकांचा कर्मयोगी हा गृहस्थाश्रमी असूं शकतो. पण या दोनहि बाजू एकेरी होत. एकींत संन्यासावर जोर तर दुसरींत कर्मयोगावर जोर. किंबहुना संन्यासाविषयीं अप्रीति. पण स्वामी विवेकानंद यांनीं या दोहोंचा मेळ घालून संन्यास आणि कर्मयोग हीं एकत्र केलीं. गीतेमध्यें ' संन्यासः कर्मयोगश्च निश्रेयसकरावुभौ ' या श्लोकांत संन्यास याचा अर्थ कर्मसंन्यास होय. हें पुढच्याच चरणांतील ' तयोस्तु कर्मसंन्यासात् ' या पदानें स्पष्ट होतें. पण माझ्या कार्यापुरता संन्यास याचा अर्थ चतुर्थाश्रम असा मुद्दाम घेऊन, मी पुढीलप्रमाणें श्लोक बनवून त्यांत स्वामी विवेकानंदांच्या चरित्राचें रहस्य आहे असें म्हणेन. तो श्लोक असा, ' संन्यासः कर्मयोगश्च निश्रेयसकरावुभौ । तयोस्तु सम्यक् संयोगः शर्करामिश्रितम् पयः' ॥ गृहस्थाश्रम हा संभाळण्याला वास्तविक संन्यासापेक्षांहि कठीण असें कांहीं जाणते लोक म्हणतात. कदाचित् स्वामीजींनीं ही अडचण ओळखून दोन्ही गोष्टींसंबंधानें चांगल्यांतल्या चांगल्याचा म्हणून स्वीकार केला असावा. अर्थात् असली निष्ठा किंवा विवेक सांगून येत नाहीं. तो जातीचाच लागतो. आणि त्यावरूनच मनुष्याच्या तत्त्वज्ञानाची परीक्षा होते.

मनुष्याचा आयुष्यक्रम ही त्याचें तत्त्वज्ञान ओळखण्याची एक खूण होय. तत्त्वज्ञान म्हणजे दुसरें तिसरें कांहीं नाहीं, तर संकीर्ण उपलब्ध अनुभवांचा समन्वय होय. पण अनुभवाची वाट न पहातां पूर्वजन्मसंस्कारानेंहि कित्येक लोक जीवनाचा ग्रंथ लावितात व त्याविषयीं तत्त्वज्ञान बनवितात. जीवनाकडे दोन वेगवेगळ्या दृष्टींनीं पाहणारे लोक तत्त्वज्ञान्यांत आहेत. एक त्यागवादी व दुसरे भोगवादी. भोगवादी लोक हे जगत् व जीवन हें सत्य मानणारे, व प्राथमिक स्वरूपांत तरी द्वैती असतात. योग्य व न्याय्य प्रकारचीं सुखें भोगणें हा जीवनाचा हक्कच आहे असें ते मानतात. सुख भोगण्याला जीवन पाहिजे अर्थात् तें सांभाळलें रक्षिलें पाहिजे. म्हणून ते उद्योगवादी असतात आणि उद्योगांत मधूनमधून अपयश पदरांत पडलें तरी शेवटीं इष्ट तेंच प्रभावी होईल अशी आशा ते निरंतर

बाळगतात. इंग्रजींत याला 'हेडॉनिझम' असें म्हणतात व त्यांतच 'फिलॉसॉफिक ॲक्टिव्हिझम'चा समावेश उपांग म्हणून होतो. याला 'भोगदर्शन' असें वाटेल तर आपण नांव देऊं; मात्र हें केवळ चार्वाकाचें तत्त्वज्ञान नव्हे. याच्या उलट सिद्धान्त त्यागाचा. इंग्रजींत त्याला 'ॲसेटिसिझम' म्हणतात. या मताच्या लोकांना जगत् व जीवन हें तत्त्वतः खरें नाहीं, मायामय आभासमय आहे असें वाटतें; व त्याच्या खरेपणाचा अनुभव आला तरी तो दुःखमयच असणार असा त्याचा सिद्धान्त असतो. माया असेल तर ती शक्य तितकी दूर करणें हाच मोक्ष. जीवन दुःखमय असणें ही मायेचा निरास करण्याला एक प्रकारची मदतच होय ! कारण दुःखानें वैराग्य उत्पन्न होणार. म्हणून ते देहासंबंधीं अत्यंत निंदास्पद शब्द बोलतील. त्याची हेळसांड करतील. या देहाच्या पिंजऱ्यांतून आत्मरूपी पोपट जितक्या लवकर उडून जाऊं शकेल तितकें बरें असें मानतील एवढेंच नव्हे तर त्याकरितां पिंजऱ्याचें दार उघडण्याचा अर्थात् देहघाताचा प्रयत्नहि ते करतील. आणि अशा लोकांना पुढील आशा बाळगण्याचें काय कारण ? अर्थात् ते नुसते दैववादीच नव्हे तर, निराशावादी असतात. त्यागवृत्ति दर्शविणारे इंग्रजी व मराठी शब्द जवळजवळ एका अर्थाचे किती तरी सांगतां येतील. उदाहरणार्थ ॲंकोराइट, हर्मिट, मंक, सेंट, सेज, साधु, बैरागी, गोसावी, योगी, ऋषी, यति, संन्यासी इ. यांतील कोणताहि एक शब्द तंतोतंत दुसऱ्याशीं अर्थानें मिळणारा नाहीं. तरी ते एका विशिष्ट वृत्तीचेच द्योतक आहेत, म्हणजे निवृत्तीचे. यांतील कोणता शब्द विवेकानंदांना लावावा ? मला वाटतें संन्यासी हा सर्वसाधारण शब्दच त्यांना लावणें बरें, पण त्यांनीं आश्रम या अर्थी संन्यासाचा स्वीकार केला होता, कर्मसंन्यास या अर्थानें नव्हे.

त्यांच्या भाषणांतून उपदेशांतून दोन शब्दांची जोडी पदोपदीं आढळते. ते त्यांचे ब्रीदवाक्याचेच शब्द होत. रिनन्सिएशन (त्याग) व सर्व्हिस (सेवा) हे ते शब्द होत. पण लक्षांत ठेवण्याची गोष्ट ही कीं, त्याग हा स्वतःच्या व्यक्तीपुरताच त्यांनीं स्वीकारला होता. आणि आपणाव्यतिरिक्त जग हें भोगाचे अधिकारी आहे असें ठरवून त्याची सेवा करावी म्हणजे त्याला योग्य ते भोग व सुखें प्राप्त करून द्यावीं व दुःखापासून त्याची सुटका

करावी, असें सजोड तत्त्वज्ञान त्यांनीं निश्चित केलें होतें. स्वतःकरितां त्याग व दुसऱ्याला भोगप्राप्ति असें म्हटलें म्हणजे त्यागवाद व सुखवाद या शब्दांचा समन्वय होतो व सिद्धान्त प्रतिसिद्धान्त अशा विरोधाच्या चौकटींत ते बसत नाहींत. याच समन्वयबुद्धीनें त्यांनीं हिंदुस्थानला एका प्रकारचा व युरोप-अमेरिकेला वेगळ्या प्रकारचा उपदेश केला. त्याचें मर्म हेंच कीं, हिंदुस्थानानें आहे याहून अधिक भोगवृत्ति स्वीकारावी, व युरोप-अमेरिकेनें आहे याहून अधिक त्यागवृत्ति स्वीकारावी, हा तो उपदेश होय. उघडच आहे कीं, जें आहे तें+जें नाहीं तें=संपूर्णत्व. सोप्या शब्दांत सांगावयाचें तर वासना या दुःखमूल खऱ्या; पण त्यामुळें सर्वच वासना निषेधार्ह किंवा निंदास्पद ठरत नाहींत. वासनांतहि सद्वासना व असद्वासना असा भेद आहेच. म्हणून स्वतः निःस्वार्थीपणा व संन्यास स्वीकारून सद्वासनांवर आधारलेले भोग व सुखें जगानें भोगावीं, असा उपदेश करण्याला स्वामी विवेकानंदासारख्या विभूतींना सहजच योग्यता प्राप्त झाली होती.

---

# १३०. हीन जाति व त्यांची उन्नति

( केसरी, ता. ३० ऑगस्ट १९१० )

हिंदुसमाजाच्या सुधारणेसंबंधानें जे वादग्रस्त म्हणून प्रश्न आहेत, त्यांत जातिभेद हा अत्यंत महत्त्वाचा असून, नवीन शिक्षण मिळूं लागल्यापासून त्याजविषयीं आज पन्नास पाऊणशें वर्षेंपर्यंत एकसारखा वाद सुरू आहे. तथापि अद्यापि तो प्रश्न कुणासहि समाधानकारक रीतीनें सुटला आहे, असें म्हणवत नाहीं. याचें एक कारण आमच्या मतें असें आहे कीं, रोटीव्यवहार व बेटीव्यवहार हे जे जातिभेदाच्या प्रश्नांतील मुख्य दोन मुद्दे, ते भवति–न भवतीस पुढें काढून प्रथम बरेच दिवस वाद करण्यांत आला होता. परंतु तात्त्विकदृष्ट्या वादाची ही पद्धति कितीहि बरोबर असली तरी व्यावहारिक दृष्ट्या या दोहोंहून कमी प्रतीचे मुद्दे वादांत पुढें करणें

फार सोईचें असतें. रणांगणामध्यें युद्ध करण्याची रीति या दुसऱ्या पद्धतीस धरून असते, हें सर्वांस माहीत आहेच. उभय पक्षांचा एक एक मुख्य योद्धा निवडून त्यांच्या द्वंद्वयुद्धाच्या निकालावर उभय सैन्याच्या यशापयशाचा निकाल करणें ही जी प्राचीन युद्धपद्धति, तिचा स्वीकार आधुनिक काळच्या युद्धामध्यें करीत नाहींत. तसेंच आधुनिक युद्धामध्यें पूर्वीप्रमाणें प्रतिपक्षांच्या सेनाधिपतींची मुलाखत होऊन युद्धास सुरुवात होते, असेंहि नाहीं. युद्धांत या सेनापतींचे जीव अर्थातच सर्वांहून अधिक मौल्यवान असे मानले जातात; व या व्यक्तींस होतांहोईतों लढाऊ सैन्याच्या मागें सुरक्षित ठेवण्यांत येतें. लढाईस प्रत्यक्ष तोंड लावणें व युद्धाचा निकाल लागेपर्यंत जरूर ती हाणामार करणें हें सर्व शिपाईप्याद्यांवर व त्यांजवरच्या दुय्यम अधिकाऱ्यांवर सोंपविलेलें असतें. एखाद्या सैन्याचा नाश झाला, तरी मुख्य सेनापति हस्तगत झाला असें क्वचितच घडतें. एका पक्षाच्या वांट्यास अपयश निश्चित आलें तरी उभयपक्षांच्या मुख्य सेनापतींची समक्ष गांठ अशी बहुधा तहाचे वेळींच पडते; व अर्थात् त्या वेळीं ते बहुधा सर्व शत्रुत्व विसरून जाऊन सलोख्यानें हातांत हात घालण्यास उद्युक्त अशा मनःस्थितींतच असतात. शिपाईप्याद्यांपैकीं दहा पांच कमी जास्त खपले तरी त्याचा विधिनिषेध कोणी मानीत नाहीं. किंबहुना उभयपक्षांस हातघाईवर आणण्यास जो क्रोध कारणीभूत झालेला असतो, त्याचा उपशम प्रथम आपल्या ढाली व नंतर आपल्या माना देऊन करणें, हेंच त्यांचें कर्तव्य व हाच त्यांचा मुख्य उपयोग असतो.

केवळ सद्धेतूनें प्रेरित होऊन व वादापासून खरोखर कांहीं व्यावहारिक फायदा निष्पन्न झाला तर करावा या दृष्टीनेंच जो मनुष्य वादास प्रवृत्त होतो, तो वर सांगितलेल्या व्यावहारिक युद्धपद्धतीचें अनुकरण केल्याशिवाय प्रायः राहत नाहीं. धर्म अगर समाज यांविषयीं वाद करण्याचा प्रसंग आला असतां खरा सुधारणेच्छु मनुष्य अत्यंत गहन व नाजुक असे जे मुद्दे असतात ते सहसा वादविवादास पुढें न आणण्याची खबरदारी घेतो. कारण अशा मुद्यांचें स्थान बुद्धीपेक्षां अंतःकरण हेंच अधिक असतें. यामुळें एक तर त्यांजवर बुद्धि सर्वस्वीं चालूं शकत नाहीं; आणि चालूं शकली तरी अंतःकरणाची ओढ वेगळ्याच दिशेनें असल्यामुळें बुद्धीची

पावलें वेडींवांकडीं पडूं लागतात. समाजसुधारणेपैकीं जातिभेद हा विषय घेतला तर रोटीव्यवहार व बेटीव्यवहार हे दोन मुद्दे लोकांस सहजच इतक्या प्रचंड महत्त्वाचे वाटतात कीं, त्यावर सरळ मनाचा व प्रांजलपणाचा वाद करण्यास ते कचरतात; व हल्लीं असलेल्या प्रकारच्या जातिभेदाचें तात्विक समर्थन प्रत्येक बाबींत करतां येणें शक्य नाहीं, असें जरी एक वेळ त्यांच्या तर्कशक्तीनें त्यांस सांगितलें, तरी प्रत्यक्ष व्यवहारांत होणारा 'सबगोलंकाररूपी' हिडीस राक्षस मनोनेत्रांपुढें उभा राहिल्याबरोबर तर्कशक्तीनें दिलेला कबुली–जबाब परत घेण्याची त्यांची प्रवृत्ति आपोआप होते. या सबगोलंकारापासून पुढें उत्पन्न होणारी 'राक्षसी' प्रजा त्यांचे डोळ्यांस कल्पनेच्या द्वारानें आधींच भासमान होऊं लागते, व यामुळें मंत्रतंत्र वगैरे आपल्या मनःसिद्धीचे अपप्रयोग करून कोणीकडून तरी प्रतिपक्षास ते निरुत्तर करण्याचा प्रयत्न करतात. परंतु संकीर्ण बेटीव्यवहार अगर संकीर्ण रोटीव्यवहार, असला प्रचंड मुद्दा वादास न काढितां स्पर्शास्पर्शदोष यासारखा गौण मुद्दा पुढें आणिल्यास वर सांगितलेल्या मंत्रतंत्राचें, अर्थात् आडरानांत शिरून केलेल्या वेड्यावांकड्या युक्तिवादाचें कारण उरत नाहीं. आपमतलबी किंवा आग्रही मनुष्यासहि झालें तरी आपण मनानें उदार आहों असें दुसऱ्यास दाखविण्याचा प्रसंग आला असतां तो प्रियच वाटतो. द्रव्यलोभी निष्ठुर मारवाड्याशीं रुजुवात घेऊन हिशेब चुकता करण्याची वेळ आली असतां तुम्ही व्याजमुदलाच्या रुपयांची गोष्ट जर काढली नाहीं तर आणे पैची सूट तो आपखुषीनेंहि देईल.

अलीकडील कांहीं वर्षांत जातिभेदासंबंधाचा तात्त्विक वादविवाद कमी होऊन, प्रत्यक्ष व्यवहारांत जातिभेदाची तीव्रता कमी होण्यास काय होईल ती थोडीबहुत सुधारणा घडवून आणण्याची बुद्धि जागृत झाल्यामुळें, मुख्य जातिभेदाऐवजीं पोटजातींचें ऐक्य व हीन जातिसंबंधानें स्पर्शास्पर्शविचार हे मुद्दे सभांतून व खासगी रीतीनें लोकांच्यापुढें येऊं लागले आहेत; व हे मुद्दे ज्या प्रमाणानें गौण त्या प्रमाणानें त्याजवर एकवाक्यता होण्याचा संभवहि अधिक दिसून येऊं लागला आहे. मुख्य जातिभेदाचे विषयास जें गहन धार्मिक स्वरूप आहे तें पोटजातींच्या एकीकरणास किंवा स्पर्शास्पर्श-विचारास नाहीं. या दोन विषयांस धर्मापेक्षां व्यवहाराचेंच स्वरूप अधिक आहे; व निव्वळ

धर्माचे बाबींत ज्या सवलती दुसऱ्यास देण्यास आपण तयार होत नाहीं, त्या व्यवहाराचे बाबतींत देण्यास आपण प्रसंगविशेषीं तयार होतों. उदाहरणार्थ, जातिनिर्बंध मोडण्याचा प्रश्न निघाला असतां सायुध व सशक्तिक अशा अधर्माचें उग्र स्वरूप आपल्या डोळ्यांपुढें दिसूं लागतें; व मग " वर्णव्यवस्था म्हणजे जातिभेद नव्हे; चातुर्वर्ण्य परमेश्वरानें निर्माण केलें असलें तरी तें गुण व कर्म यांजवर अवलंबून ठेवलेलें आहे, केवळ जन्मावरच अवलंबून ठेवलेले नाहीं; ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य या तिघांसहि द्विज हें एकच नांव असून त्यांस धर्मसंस्कारांचा बहुतेक सारखाच हक्क दिलेला आहे; पूर्वकालीन आर्यांच्या इतिहासांत बेटीव्यवहार व रोटीव्यवहार यांजविषयींचे निर्बंध हल्लींच्या इतके व्यापक व कठीण नव्हते; तसेंच हिंदु, मुसलमान व ख्रिश्चन हीं सर्वच एका ईश्वराचीं लेकरें आहेत, व वेदान्तांतील अद्वैत ज्याच्या मनांत खरें बाणलें आहे त्यास हल्लींच्या तीव्र जातीभेदाचें समर्थन करणें कठीण जातें "–वगैरे गोष्टी कितीहि मनांत आल्या तरी अधर्मपुरुष–दर्शनानें आपणांस उत्पन्न झालेली भीति कमी होत नाहीं. परंतु हा मुख्यजाति-भेद वादास न घेतां ब्राह्मणांतील पोटजाति, क्षत्रियांतील पोटजाति, वैश्यांतील पोटजाति असा प्रश्न घेतला असतां धर्माची भीति तितकी न वाटतां, प्रामाणिकपणाचा युक्तिवाद करण्यास व कांहीं देऊन व कांहीं घेऊन वाद मिटवितां आल्यास तो मिटविण्यास आपण तयार होतों. ब्राह्मणांतील पोटजाति मोडण्यास शंकराचार्यांसारख्यांची अनुज्ञा, समाजांतील पुढाऱ्यांची निदान तात्त्विक संमति व अगदीं अलीकडच्या काळांतील कांहीं दाखले इतकी सामग्री अनुकूल असल्यामुळें या प्रश्नावर उघड चर्चा करण्यास लागणारें धाडस अंगीं असणारे बरेच लोक समाजांत सांपडणें आज शक्य झालें आहे.

स्पर्शास्पर्शासंबंधानें पाहतां आगगाड्या, आगबोटी वगैरेंच्या योगानें बदललेली परिस्थिति व प्रायश्चित्त वगैरेंचा सोपेपणा या गोष्टींच्या योगानेंहि बरीच मदत झालेली आहे. स्पर्शा–स्पर्शाचा प्रश्न व सोंवळ्याओंवळ्याचा प्रश्न यांची बहुधा समव्याप्तिच आहे, असें म्हटलें तरी चालेल. दोन्हीमध्यें सयुक्तिकपणाचें बीज थोडेंबहुत आहेच; व आज नवीन दिशेनें जो

प्रयत्न व्हावयास पाहिजे त्यामध्यें हें बीज नष्ट होणार नाहीं, अशी खबरदारी घेणें जरूर आहे. हें बीज म्हटलें म्हणजे स्वच्छता, शुद्धि, निकोपपणा, निर्मळता यांचें संरक्षण करणें हेंच होय; आणि या वरील गोष्टींना जेणेंकरून बाध येणार नाहीं अशाच रीतीनें या गोष्टींतील सुधारणांचा अंमल व्हावयास पाहिजे. मागें एका विद्वान् सुधारणावादी गृहस्थानें लिहिल्याप्रमाणें " ज्या सोंवळयाओंवळयाचा स्वच्छतेशीं संबंध आहे, तें अवश्य रक्षणीय आहे. व स्वच्छताहि नको, असें म्हणणें म्हणजे एकप्रकारें ' महिष ' वृत्तीविषयीं प्रेम प्रगट करण्यासारखें होय. " सोंवळयाओंवळयाप्रमाणें स्पर्शास्पर्शाच्या मुळाशीं असलेली जी शुचिर्भूतता ती केव्हांहि हवी आहे; फक्त सोंवळयाओंवळयाप्रमाणेंच स्पर्शास्पर्शाचें फाजील स्तोम मात्र नको. परंतु स्पर्शास्पर्शाचा भेद वाढविणारांनीं अगर तो कायम ठेवूं इच्छिणारांनीं ज्याप्रमाणें लक्षांत ठेवावयास पाहिजे, त्याचप्रमाणें हा भेदभाव नष्ट करण्याकडे ज्यांची प्रवृत्ति आहे, त्यांनींहि तें लक्षांत ठेविलें पाहिजे, व अभेदभावाची अतिशयोक्ति करून शुचिर्भूततेच्या मुळावर कुऱ्हाड घालतां कामा नये. हें सांगण्याचें कारण असें कीं, स्पर्शास्पर्शाचें स्तोम माजविणारांची टर करण्याची जितकी प्रवृत्ति नवीन विचाराच्या लोकांमध्यें दिसून येते, तितका स्वच्छतेचें उन्मूलन करणाऱ्या सुधारणेची टर करण्याकडे दिसून येत नाहीं. चार चार महिने न धुतलेल्या व म्हणून कीट वाढलेल्या धाबळींत आपलें सोवळें सांठविलें आहे असें मानणारांची जितक्या उत्साहानें आपण थट्टा करतों, तितका उत्साह, घामाची घाण येत असलेला शर्ट अंगांत घालून जेवावयास बसणाराची थट्टा करतांना आपणांमध्यें दिसून येत नाहीं. वास्तविक मांसाहाराच्या बबरजीखान्यांतील घाणीपुढें शाकाहारी हिंदूंच्या स्वयंपाकघरांतील घाण पासंगासहि पुरावयाची नाहीं ! असें असतां बटलर व बबरजी यांनीं आयत्यावेळीं ताटें वाढून आणतांना अंगावर चढविलेल्या कडक परिटघडीकडे पाहून बबरजीखान्यांतील घाणीकडे कानाडोळा करणारे किती तरी शहाणेसुरते लोक सांपडतील ! स्पर्शास्पर्श्यासंबंधानेंहि सार व असार यांचा असाच विपर्यास केलेला पुष्कळ ठिकाणीं आढळून येतो. महारमांगांच्या स्पर्शाबद्दल वरिष्ठ जातींचे कित्येक लोक जो तिटकारा दाख-

वितात त्याहून आगगाडीच्या डब्यांत बाकावर अंगास अंग लावून बसणाऱ्या नेटिवांबद्दल गोरे लोक जो तिटकारा दाखवितात तो खचित् कमी नाहीं. अंत्यजानें स्पर्श केलेली वस्तु घेण्याचें जसें कर्मठ ब्राह्मण नाकारतात, तसेंच एखाद्या बंगल्यांत पूर्वी एखादा नेटिव गृहस्थ राहिलेला होता, असें कळतांच गोरे लोक तेथील वास्तुदेवतेवर बहिष्कार घालितात, ही गोष्ट प्रसिद्धच आहे. गोरे लोकांचें हें जातिवेड व ब्राह्मणांचा फाजील जात्यभिमान या दोहोंत नामविभेदाहून अधिक फरक तो कोणता ?

या बाबतींत आणखी एक गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे ती ही कीं, स्पर्शास्पर्श्यांचा विचार करावयाचा असतां ज्या जातींना अस्पर्श्य म्हणून मानलें जातें त्यांनीं हा वाद ह्याच शब्दांनीं पुढें मांडून, भेदभाव नाहींसा करावा अशा प्रतिपादनाच्या भानगडींत पडूं नये. कारण, या बाबतींत सुधारणेचें पाणी वळणावळणानें वरून खालींच येणें अधिक श्रेयस्कर आहे. गोष्ट तीच, युक्तिवाद तोच; तथापि अस्पर्श्य जाती स्पर्श्य मानावी असा आग्रह वरिष्ठ मानलेल्या जातींनीं स्वत: धरण्यांतच एकप्रकारचें भूषण व औचित्य आहे. एखाद्या सिद्धान्ताच्या प्रतिपादनापासून झाला तर प्रतिपादकाचाच थोडाबहुत तोटा आहे असें सकृद्दर्शनीं दिसण्यासारखें असेल, तरच प्रतिपादकाच्या हेतूविषयीं कोणत्याहि प्रकारचा संशय अगर वहीम उरत नाहीं. पुराव्याच्या कायद्यांतहि एक तत्त्व असें आहे कीं, एखाद्या पक्षकारानें आपल्या हितसंबंधास विरोधी अशीं जीं विधानें केलीं असतील तेवढींच मात्र पुराव्यास ग्राह्य धरावयाचीं; व तीं खरीं आहेत असें अनुमान करून चालावयाचें. मनुष्यस्वभावाची साक्ष या वरील गोष्टींत पटण्यासारखी आहे; व जी गोष्ट न्यायमंदिरांतील वादास लागू, तीच सामाजिक बाबतींतील वादविवादास लागू करण्यास कांहीं हरकत नाहीं. श्रीमंतानें गरीबास जवळ बोलावलें तर तो त्याच्या मनाचा थोरपणा असें म्हणतात. निकट समागमाची गरीबाची इच्छा तितकीच प्रबल असेल; परंतु तो होऊन जवळ गेल्यास त्यानें उद्दामपणानें लगट केली असें म्हणतील. स्पर्श्य व अस्पर्श्य जातींस श्रीमंत व गरीबांचा दाखला आम्ही आढ्यतेनें देतों, असें मात्र समजण्याचें कारण नाहीं. कनिष्ठ मानलेल्या जाती जेव्हां स्पर्श्यास्पर्शभेद नाहींसा व्हावा असें म्हणतात, तेव्हां ते वरिष्ठ जातीचें अमुक एक प्रकारें हित

व्हावें अगर केवळ धर्ममूलक अशी एखादी वेडी समजूत हिंदुसमाजांतून नाहींशी व्हावी, एवढाच त्यांचा हेतु असतो असें मानणें चुकीचें होईल. समाजांतील कांहीं जातींस अस्पृश्य मानिल्यानें वरिष्ठ जातींस जो अभिमान वाटतो तो यथार्थ आहे अगर नाहीं, अथवा तो अभिमान त्यांना खरोखरच श्रेयस्कर आहे किंवा कसें, हा प्रश्न वेगळा; परंतु जें हातभर अंतर ठेवण्यांत वरिष्ठ जातींस भूषण वाटतें तें आपणास तोडतां आलें तर आपणांस तें भूषणास्पद व श्रेयस्कर आहे, असें कनिष्ठ जातींस वाटतें यांत मात्र शंका नाहीं. स्पर्श्यास्पर्शभेद मोडल्यास आपणा स्वतःस विवक्षित लाभ आहेत असें कनिष्ठ जातींस वाटतें हें उघड आहे. समबल व समगुण अशा दोन व्यक्तीमध्यें अगर पक्षांमध्यें बहिष्कार फारसा टिकत नाहीं. कारण, अशा बहिष्कारापासून लोकांच्या दृष्टीनें कोणाचा मान अगर कोणाचा अपमान होऊं शकत नाहीं, व अशा स्थितींत बहिष्कारास बहिष्कारापेक्षां केवळ 'भांडणाचा एक प्रकार' हेंच नांव अधिक शोभेल. पण खरोखर बहिष्कार म्हणजे भांडण नव्हे. आपण श्रेष्ठ व दुसरा कनिष्ठ, म्हणून या दुसऱ्याशीं आपण संपर्क न ठेविला तर दुसऱ्यास त्याच्या योग्य पायरीवर ठेवलेंसें होईल, व संपर्क ठेविल्यास आपणा स्वतःस कमीपणा येईल, अशा समजुतीनें जें अंतर ठेवणें त्यासच बहिष्कार म्हणतात. आणि या दोन हेतूंपैकीं दुसऱ्याचें अवलंबन करून वरिष्ठ जातींनीं कनिष्ठ जातींवर एक प्रकारचा बहिष्कारच टाकिलेला आहे. यास्तव हा बहिष्कार निघण्यास कनिष्ठ जातींनीं स्पर्श्यास्पर्श्यभाव हा भ्रममूलक आहे, असें म्हणून लगट करूं पाहणें बरोबर नाहीं. एक तर अशी लगट करणें हें स्वाभिमानसंपन्नतेचें लक्षण आहे असें कोणी मानणार नाहीं; आणि दुसरें असें कीं, अशी लगट केल्यानें उद्दिष्ट कार्यभाग तडीसहि जाणार नाहीं. ही स्वाभिमानाची बाब विशेष महत्त्वाची आहे, असें आम्हांस तरी वाटतें. या लगटीचा अर्थ वरिष्ठ जाती विपरीत करतील, हें अत्यंत संभवनीय आहे; व या लगटीमुळें अंतर तुटावें तें न तुटतां त्याचा उलट परिणामहि होईल ! हें अंतर तोडण्यास निराळ्या मार्गानेंच गेलें पाहिजे; व त्या मार्गानें गेलें असतां कनिष्ठ जातींच्या स्वाभिमानास धक्का न लागतां इष्ट सुधारणाहि घडून येईल.

हा मार्ग कोणता, हें सांगण्यापूर्वी स्पर्श्यास्पर्श्यभेदाचा थोडासा लौकिक-दृष्ट्या आपण विचार करूं. आजच्या स्थितींत स्पर्श्यास्पर्श्यभेदाचा दिसून येण्यासारखा कडकपणा जर कोठें राहिला असेल तर तो मुसलमान, ख्रिस्ती वगैरे हिंदुधर्मबाह्य, व महार, मांग, धेड वगैरे हिंदुधर्मांतर्गत परंतु अंत्यज मानिलेल्या जातींसंबंधानें आहे, हें उघड आहे. पैकीं मुसलमान लोक हिंदूंनीं आपणांस अस्पर्श्य मानिल्याबद्दल कधीं तक्रार करितात, असें आढळत नाहीं. त्यांच्यांत स्वाभिमान अधिक आहे म्हणून म्हणा, अगर त्यांचा धर्म वेगळा असल्यानें हिंदूंनीं आपणांस बरोबरीचे लेखावें अशी त्यांची अपेक्षाच नसल्यानें म्हणा, आमच्या मुसलमान बंधूंकडून स्पर्श्यास्पर्श्यतेचा वाद पुढें आणलेला आढळून येत नाहीं. तिसरेंहि एक कारण आहे; व तें असें कीं, मुसलमान लोक हिंदूंचे एक वेळचे जेते असून जित हिंदु लोकांवर त्यांनीं कोठें कोठें शेंकडों वर्षें राजकीय अंमल गाजविला; व सरकारदरबार वगैरे ठिकाणीं उच्च दर्जाच्या हिंदुमुसलमानांचा व्यवहारसंबंध पुष्कळ दिवस येत गेल्यामुळें या स्पर्श्या-स्पर्श्यभावांतील अपमानाचें बीज जाऊन जेवढें धर्माचें तेवढें काय तें बीज शिल्लक राहिलें. ख्रिस्ती लोकांचीहि गोष्ट मुसलमानांप्रमाणेंच आहे. शिवाय ख्रिस्ती लोकांत शिक्षणाचा प्रसार बराच असल्यामुळें त्यांना सुस्थिति आलेली असते, यामुळें हिंदूंनीं आपल्यास क्वचित् अस्पर्श्य मानिल्याबद्दल ह्यांनां फारशी दिक्कत अगर अपमानहि वाटत नाहीं. वर समबल व सम-गुण अशा दोन प्रतिपक्षांमधील परस्पर बहिष्कारासंबंधीं जें मर्म सांगण्यांत आलें आहे, तें ख्रिस्ती व हिंदु यांच्यांतील भेदभावास लागू पडतें. पण महार, मांग, धेड वगैरे वर्गांची गोष्ट मुसलमान व ख्रिस्ती लोक या दोहों-हून थोडी वेगळी आहे. म्हणजे एकीकडे तर हिंदु धर्मांत त्यांचा समावेश झालेला असून संस्कारपरंपरेमुळें वरिष्ठवर्ग हा त्यांस गुरुस्थानीं व मान्य असा वाटतो; व त्यांनीं आपणांस जवळ करावें, अशी त्यांची खरोखर इच्छा असते. परंतु वरिष्ठवर्ग अद्यापि त्यांस जवळ करीत नाहीं; व मुसल-मान, ख्रिस्ती यांसारखी त्यांची सुस्थिति नसल्यामुळें–किंवा वेळ आली तर आपणच उलट वरिष्ठ वर्गांवर बहिष्कार घालूं असें म्हणण्याची ताकद अंगीं अद्यापि न आल्यामुळें–झालेला अपमान मनास लागण्याच्या स्थितींत

ते आहेत. यामुळें त्यांच्यामध्यें थोडेंबहुत शिक्षण पावलेले असे जे लोक निर्माण होतात त्यांना स्पर्श्यास्पर्श्यभेदाचा हा प्रश्न पुढें काढावासा वाटतो. त्यांना असें वाटतें कीं, आम्ही अंत्यज, आम्ही निराश्रित, आम्ही जित, असे असल्यामुळेंच केवळ आम्हांस अस्पर्श्य मानितात. परंतु ही समजूत बरोबर नाहीं. कित्येकांचें म्हणणें असें दिसतें कीं, अंत्यज लोक हे निराश्रित, त्यांचा कोणी वाली नाहीं. म्हणून त्यांना अस्पर्श्य मानण्यांत येतें. परंतु हें म्हणणें बरोबर नाहीं. कारण या म्हणण्यामध्यें कार्यकारणाचा विपर्यास अगदीं पूर्णपणें केला जातो. अंत्यज लोक निराश्रित आहेत म्हणून अस्पर्श्य आहेत असें नाहीं. तर अस्पर्श्य आहेत म्हणून ते निराश्रित मानले जातात. कित्येकांच्या मतें अंत्यज लोक हे जित लोक असल्यामुळें वरिष्ठ जातींचे हिंदु लोक आपण जेते या अभिमानानें त्यांच्याशीं संबंध ठेवीत नाहींत. परंतु हीहि उपपत्ति बरोबर नाहीं. श्रेष्ठ जातींचे लोक हिंदुस्थानांत येण्या-पूर्वी, ज्यांस आज आपण अंत्यज म्हणत आहोंत त्यांची वस्ती येथें होती. व श्रेष्ठ जातींनें त्यांस जिंकलें असें जरी एक वेळ गृहीत धरून चाललें, तरी ते जित व हे जेते यांचा धर्म एक कसा झाला, व धर्म एक झाल्या-वरहि मग स्पर्श्यास्पर्श्यभाव कसा राहिला, याचें समाधानकारक उत्तर मिळत नाहीं. दुसऱ्या एका दृष्टीनें पाहतां स्पर्श्यास्पर्श्यांचा भेदभाव हा जित व जेते यांच्यामधील भेदभावापेक्षां अधिक बलवत्तर आहे; आणि याचें कारण या पहिल्या संबंधास धर्मबुद्धीचें पाठबळ आहे, हें होय. उदाहरणार्थ, हिंदुस्थानांतील प्रजाजनांपैकीं एखाद्या कर्मठ मनुष्यास आपलें देवघर विटाळल्यानें खुद्द गव्हर्नरसाहेबांच्या मुलाखतीचा मान मिळणार असेल, तरी तो तो मान घेण्यास तयार होणार नाहीं. राजदरबारीं जाऊन ज्याच्या पायां पडावें लागतें, अशा परधर्मी मनुष्यास आपली ओटी ओलांडून जाऊं देण्याचें धार्मिक प्रजाजनास मोठें संकट वाटेल, व तें टाळण्याकरितां तो इतर अनेक प्रकारचीं संकटें सोसण्यास तयार होईल, अशी अपेक्षा करणें वावगें होणार नाहीं. कै. ना. मंडलिक पूजेस बसले असतां खुद्द गव्हर्नरसाहे-बहि अवचित आले असते तर त्यांस बाहेरील दिवाणखान्यांत तिष्ठतच बसावें लागलें असतें. परंतु तोच एखादा गरीब वैदिक अगर भिक्षुक त्यांची गांठ घेण्यास गेला असतां त्याचा वेळ न जातां त्यास देवघरांत बसावयास पाट

मिळाला असता. धारवाड येथील हयग्रीवाचार्य या गरीब ब्राह्मणानें जेते लोकच देवघरांत शिरल्याबद्दल विहिरींत उडी घेऊन आत्महत्या केली ना ! तात्पर्य, जित प्रजेंतहि जातीच्या अभिमानाची गोष्ट कांहीं वेगळी आहे.

स्पर्श्यास्पर्श्यभेद मूळ उत्पन्न होण्याचें कारण कांहींहि असलें तरी मध्यंतरी त्यास गहन धार्मिक स्वरूप आलें होतें, व सुमारें शेंदोनशें वर्षांमागें या भेदभावाचा कडेलोट झाला होता, यांत शंका नाहीं. परंतु अलीकडे परधर्मीयांचें अधिराज्य, आगगाडी, आगबोट वगैरे दळणवळणाचा व संकीर्ण व्यवहाराच्या साधनांचा प्रत्यहीं उपयोग होत गेल्यामुळें, आणि शिक्षण व नवीन विचार यांचा फैलाव झाल्यामुळें हा भेदभाव आपोआप शिथिल होत चाललेला आहे. परंतु हा समूळ नष्ट होणें अगर न होणें हें तात्त्विक विवेचनाखेरीज अगर चिकित्सेखेरीज इतर कित्येक गोष्टींवर मुख्यतः अवलंबून आहे असें आम्हांस वाटतें; व या गोष्टींचा विचार पुढील लेखांत करूं.

हीन जातींच्या उन्नतीच्या प्रश्नासंबंधानें निवळ तात्त्विक विवेचनाचा फारसा उपयोग होत नाहीं,हें मागील लेखांत आम्हीं दर्शविलेंच आहे.तात्त्विक विवेचनास आम्ही कमी किंमत देतों असें नाहीं. परंतु आज तात्त्विक वाद निघाला असतां पुष्कळ लोक या भेदभावाचें समर्थनच करूं इच्छितील; व कित्येक थोड्या लोकांनीं हा भेदभाव समर्थनार्ह नाहीं असें उत्तर दिलें, तरी त्या नुसत्या उत्तराचा फारसा व्यावहारिक उपयोग नाहीं. रणांगणांतील युद्धाप्रमाणें वादांतहि धर्मसमजुतींवर तोंडासमोरून हल्ला करणें कधींहि श्रेयस्कर होत नाहीं; बाजूनें हल्ला चढवून प्रतिपक्षाला तोंड फिरवावें लागेल असें केल्यानें यश मिळण्याचा अधिक संभव असतो. धर्मशरीराचे पाय म्हटले म्हणजे रूढ आचार हेच होत, आणि पायच फितुर झाले म्हणजे ते नेतील तिकडे देहास जावें लागतें. अर्थात् स्पृश्यास्पृश्यविचार करतांना या बाबतींतील धर्मसमजूत पालटण्याचा वाद माजवीत न बसतां हा भेदभाव आचारांत नाहींसा होण्याची रूढि कशी पडेल, याचाच विचार अधिक अगत्याचा आहे. रूढि हा लोकसंमत व्यवहाराच्या पुनःपुनरुक्तीचा परिणाम आहे. अस्पृश्य मानलेल्या जातींस इतर जातींनीं स्पृश्य करण्यास त्या दोहोंमधील व्यवहार वाढला पाहिजे; व व्यवहारसंबंध वाढ-

ण्यास अनुयोगी–प्रतियोगीभूत ज्या व्यक्ति त्यांची परस्पर आकर्षणशक्ति वाढली पाहिजे. अर्थात् ही ' आकर्षण–शक्ति ' कशी वाढेल या प्रश्नाचें जें उत्तर तेंच, हा स्पृश्यास्पृश्यभेद नाहींसा कसा होईल या प्रश्नाचेंहि आहे असें समजावें.

हीं आकर्षणकारणें अमुक एकाच प्रकारचीं असतात असें नाहीं, हें निरनिराळीं उदाहरणें देऊन दाखवितां येण्यासारखें आहे. सौंदर्य, स्वच्छता, बुद्धिमत्ता, सत्ता, संपत्ति, सच्छील, धार्मिकपणा, मान्यता व व्यावहारिक उपयुक्तता हीं या आकर्षक कारणांचीं उपलक्षणात्मक उदाहरणें म्हणून देण्यास हरकत नाहीं. शरीरसौंदर्य हें आकर्षकतेचें कारण होऊन कृत्रिम भेदभावाच्या मर्यादा नाहींशा करण्यास कारणीभूत कसें होतें याचें उदाहरण पुराणांतरीं मत्स्यगंधेचें होय. मत्स्यगंधा ही मासे मारणाऱ्या व मासे खाणाऱ्या कोळ्याची कन्या; परंतु ती अप्रतिम लावण्यवती असल्यामुळें क्षत्रिय राजाच्या राज्ञीपदास योग्य झाली. दुसरें एक चमत्कारिक उदाहरण रावबहादूर चिंतामणराव वैद्य यांनीं प्रसिद्ध केलेल्या ' बंडाच्या इतिहासा'च्या पुस्तकांत दिलेलें वाचकांस आढळून येईल. झाशी येथील एका दशग्रंथी विद्वान् ब्राह्मणास अत्यंत नीच मानलेल्या अशा एका जातींत उत्पन्न झालेल्या पद्मिनीगुणविशिष्ट स्त्रीसंबंधानें अनिवार मोह उत्पन्न होऊन त्यानें तिला स्त्रीप्रमाणें घरांत वागविल्याबद्दलची हकिकत सदरहू पुस्तकांत दिलेली आहे. हीं उदाहरणें देण्यांत, एखाद्या अलौकिक शरीरगुणाच्या अंगींहि धर्मबंधनाहून अधिक बळ कसें येऊं शकतें, व त्यामुळें स्पृश्यास्पृश्य भेद नाहींसा कसा होऊं शकतो, हें फक्त तात्त्विकरीत्या सुचविण्याहून दुसरा हेतु नाहीं. राजसत्तेच्या अंगीं स्पृश्यास्पृश्यभेद समूळ नष्ट करण्याचें नसलें तरी तो पुष्कळसा शिथिल करण्याचें सामर्थ्य आहे यांत शंका नाहीं. महाराचा स्पर्श झाला असतां स्नान करणारे सर्वच कर्मठ लोक गव्हर्नरसाहेबांचा हस्तस्पर्श झाल्यावर स्नान करतील असें नाहीं. संपत्ति ही वाटेल तें करूं शकते; व अस्पृश्य मानलेल्या जातींतील एखाद्या मनुष्यावर लक्ष्मीची जर कृपा भरपूर झाली, तर त्याला सामाजिक अपमानाचें दुःख फारसें सोसावें लागत नाहीं धार्मिकपणा अंगीं असल्यास अस्पृश्य मानलेल्या व्यक्तीचा आपल्यास स्पर्श होणें हा एक आपल्यावर

उलट अनुग्रहच आहे, असेंहि उच्च वर्णांतील लोकांस वाटणें संभाव्य आहे, हें चोखामेळा व रोहिदास या दोन संतांच्या उदाहरणांवरून कबूल करावें लागेल. मनुष्याचे अंगीं मान्यता इतर अनेक प्रकारांनींहि येऊं शकते. समजा, एखादा अत्यंज उद्यां मोठा कवि निर्माण झाला, अगर त्याचे अंगीं कल्पकतेचा विकास होऊन इकडील सृष्टि तिकडे करण्यासारखा त्यानें एखादा शोध लाविला किंवा यंत्र निर्माण केलें तर, त्याजवरील निव्वळ अपृश्यतेचें लांछन फार दिवस टिकणार नाहीं, हें म्हणणें कोणासहि संमत होईल. एवढा मोठा अलौकिक गुण बाजूस राहो, पण साधारण सुशिक्षणाचे अंगींहि मान्यता उत्पन्न करून देण्याची शक्ति पुष्कळच आहे, याचा अनुभव आपणांस नेहमीं येतो. एखादा अशिक्षित अंत्यज दाराशीं आला असतां त्यास आपण दाराशींच उभा करितों. परंतु तोच सुशिक्षित अंत्यज असला तर त्यास आपण घरांत घेऊन खुर्ची देतों.

सुशिक्षणाचा असाच कांहीं विलक्षण प्रभाव असतो कीं, त्याच्या योगानें उच्चनीच व लहानथोर हे सर्व कृत्रिम भाव लोपून जातात, व मनुष्यामनुष्यांमध्यें एकप्रकारचा बंधुभाव उत्पन्न होतो. शिवाय सुशिक्षित मनुष्य सहसा अस्वच्छ रहात नाहीं; त्याजमध्यें बुद्धीचा विकास व विद्येचें तेज निर्माण होतें, व त्याची उपयुक्तताहि वाढते. अर्थात् एका सुशिक्षणानें इतकीं सर्व आकर्षण—कारणें उत्पन्न होतात यास्तव अयोग्य स्पृश्यास्पृश्यभेद नाहींसा करावयाचा असेल तर अत्यंज जातीचें सुशिक्षण वाढणें हाच मुख्य व खरा उपाय आहे. अस्पृश्यता जाऊन स्पृश्यता येण्यानेंचसें काय, पण अन्य रीतीनेंहि त्यांची सामाजिक व सांपत्तिक स्थिति सुधारण्यास विद्या हीच उपयोगी पडणारी आहे; म्हणून अस्पृश्य मानलेल्या जातींनीं व त्यांच्या पुरस्कर्त्यांनीं शिक्षणावरच मुख्य भिस्त टाकली पाहिजे. कारण शिक्षण, सत्ता, संपत्ति अगर इतर कोणताहि विशेष गुण अंगीं नसतां अस्पृश्य जातीस जवळ घ्या असें म्हणणें यांत जरी मोठासा गुन्हा नसला तरी तें फारसें शक्य नाहीं. कारण हा प्रश्न किरकोळ एक दोन किंवा थोड्याशा व्यक्तींचा नसून सर्व समाजाचा आहे. केवळ दांडगाईनें स्पृश्यास्पृश्यभेद मोडून दाखविणें हें समाजांतील

फक्त दहापांच तत्वज्ञान्यांना अगर पांचपंचवीस बाडग्या लोकांना शक्य आहे; परंतु एकंदर समाजांतील बहुमतानें जोंपर्यंत कोणतीहि सुधारणा स्वीकृत केली जात नाहीं, तोंपर्यंत ती रूढ होत नाहीं. तोंपर्यंत या दहापांच तत्त्वज्ञान्यांनीं हा भेद मोडला व त्यांस लोकांनीं विशेष नांवें ठेविलीं नाहींत तरी त्यांस समाजबाह्य होऊन राहावें लागतें. ज्यांस आम्ही बाडगे हें नांव दिलें आहे, त्यांच्या उपद्यापानें तर तत्त्वज्ञान्यांच्या खटपटीपेक्षां केव्हांहि कमीच फलप्राप्ति होणार. असा समाज त्यांस बाडगे मानणार, एवढेंच नव्हे तर त्यांनीं केलेल्या कृत्यांचें समर्थन करण्याचें धैर्य त्यांच्या स्वतःच्या अंगीं नसल्यामुळें ते आपलें कृत्य उघडपणें कबूल करण्यास कचरणार. व त्यांच्या कृत्याबद्दल गवगवा झाला असतां ते आपल्यास प्रायश्चित्त वगैरे घेऊन आपल्या कृतीचे आपणच खंडन करणार. व सर्वांत वाईट गोष्ट ती ही कीं, ज्यांना आम्हीं बाडगे ही संज्ञा दिली आहे, त्यांच्या कृत्यास उदात्त असा कोणताहि मूळ हेतु नसून केवळ सुखाची लालसा हाच त्यांचा हेतु असतो ! स्पृश्यास्पृश्यभेद हा अयुक्तिक आहे, हें सिद्ध करण्याकरितांच केवळ जो तो भेद मोडून दाखवितो, त्याची गोष्ट वेगळी; त्याला तत्त्ववेत्ता म्हणण्यास तरी हरकत नाहीं. परंतु केवळ सौख्याच्या लालचीनें जे तसें करितात त्यांनीं तत्त्वज्ञानाचा कितीहि आव आणिला तरी तो व्यर्थ होय.

तात्पर्य, बहुजनसमाजानें स्पृश्यास्पृश्यभेद नाहींसा करावा अशी जर इच्छा असेल तर अस्पृश्य मानिलेल्या जातींमध्यें वर वर्णन केलेले गुण आले पाहिजेत. ते गुण येईपर्यंत, हा भेदभाव मोडत नाहीं, असा गवगवा करणें फुकट आहे. विशेषतः तोंपर्यंत अस्पृश्य मानिलेल्या जातींनीं स्वतः स्पृश्यास्पृश्यतेचा वाद काढणें श्रेयस्कर नाहीं. हा भेदभाव आजकालचा नाहीं. तर शेंकडों वर्षांच्या संस्कारपरंपरेनें तो दृढ झालेला आहे; व तो नाहींसा होण्यासहि कदाचित् शेंकडों वर्षें लागतील, असें म्हणणें वावगें नाहीं. लाट उठण्यास जितका वेळ लागतो, तितकाच ती लाट उठल्यावर खालीं बसण्यास लागतो. भांडें तापण्यास जितका उशीर लागतो, तितकाच तापलेलें भांडें निवण्यास लागतो, हीहि अनुभवसिद्ध गोष्ट आहे. शिवाय दुसरें असें कीं अस्पृश्य मानलेल्या जातीसुद्धां अशा प्रकारच्या भेद-

भावापासून स्वतः सर्वस्वीं अलिप्त असतात, असेंहि नाहीं. ज्यांना कोणतीच गोष्ट अस्पृश्य अशी नाहीं, त्या लोकांनीं सर्वच गोष्टींसंबंधानें स्पृश्यास्पृश्यभेदभाव नाहींसा करून टाकावा, असें म्हणण्यांत फारसा अर्थ नाहीं. ‘ वरच्यास हात व खालच्यास लाथ ’ हा प्रकार मध्यम जातींमध्यें दिसून येतो. ज्यांना वरची म्हणून एखादी जात अगर वर्ग असतो, त्यांस आपला समावेश त्या वरिष्ठ वर्गांत होण्याविषयीं जितकी उत्कंठा असते तितकी आपल्या खालच्या वर्गास आपणांमध्यें समाविष्ट करून घेण्याबद्दल असते काय, याचा ज्याचा त्यानें आपल्या मनामध्यें विचार करून पाहावा. सर्व मजले मोडून एकच मजला व्हावा, असें प्रतिपादन करण्याची व त्या प्रतिपादनाप्रमाणें आचरण करण्याची जोंपर्यंत आपल्या स्वतःच्या मनाची तयारी झालेली नाहीं, तोंपर्यंत विश्वबंधुत्वाच्या गोष्टी दुसऱ्यांशीं वायफळ बोलण्यांत व वरिष्ठ वर्गास ते अपमतलबी म्हणून नांवें ठेवण्यांत अर्थ तो कोणता ? मराठे लोक ब्राह्मणांस नांवें ठेवतील, परंतु अंत्यजांचे पंक्तीस बसण्याची स्वतः मराठ्यांची तयारी नसते. महार लोक ब्राह्मण व मराठे या दोघांसहि नांवें ठेवतील; परंतु ते स्वतः धेड वगैरे लोकांच्या हातचें पाणीहि घेत नाहींत, असें म्हणतात ! धेडांना अस्पृश्य अशी जात कोणतीच नसेल तर त्यांना मात्र वरील आक्षेप न लागतां आपल्याहून वरच्या सर्व जातींस नांवें ठेवितां येतील ! परंतु केवळ विश्वकुटुंबित्वाच्या उदार बुद्धीनें ते तसें करितात, असें कोणीहि म्हणणार नाहीं.

स्पृश्यास्पृश्यतेचा विचार करतांना अंत्यज जातींचे लोक कोणते धंदे करतात, हेंहि साधारणतः पाहणें जरूर आहे. विश्वकुटुंबित्वाच्या कितीहि गोष्टी सांगितल्या तरी गंध्याचा धंदा व खाटकाचा धंदा, हे दोन्हीहि सारखेच मानावे, अगर दोन्ही धंदे करणारांच्या अंगीं समाजाकर्षक शक्ति सारखीच आहे, असें कोणीहि समंजस मनुष्य म्हणणार नाहीं. कित्येक लोक असा युक्तिवाद करितात कीं, अंत्यज लोक जे धंदे करतात ते जर कोणी तरी केलेच पाहिजेत, तर अंत्यजांनींच ते केले तर काय वावगें ? व ते तसें करीत असतांहि त्यांना स्पृश्य मानण्यास काय हरकत आहे ? आमच्या समजुतीनें हा युक्तिवाद बरोबर नाहीं. कृतज्ञतेनें स्वच्छतेची जागा भरून येऊं शकत नाहीं, व केवळ आपल्या पोटाकरितां अस्वच्छ धंदा करणारां-

बद्दल कृतज्ञताहि पण वाटत नाहीं. तसेंच हे अस्वच्छ धंदे केवळ सांपत्तिक अडचणीमुळें ते करतात, असेंहि म्हणणें बरोबर नाहीं. इतर— म्हणजे असले धंदे न करणारे—लोक उपाशी मरतात असें थोडेंच आहे ? अंत्यज लोकांइतकेच अशिक्षित असून त्यांच्याहून अधिक स्वच्छ धंदे करून पोटास मिळविणारे लोक किती तरी आहेत ! वरिष्ठ वर्गांनीं धर्म या नांवाखालीं मोडणाऱ्या कोत्या समजुती व मिथ्या अहंकारबुद्धि सोडून देऊन अस्पृश्य मानिलेल्या वर्गांबद्दल सहानुभूति व प्रेम बाळगलें पाहिजे, यांत तर शंका नाहीं; परंतु अंत्यज वर्गांनेंहि वरिष्ठ वर्गास आपल्या पदवीस ओढूं अशी हांव धरण्यापेक्षां, स्वच्छता, शिक्षण वगैरे गुणांनीं आपण त्यांच्या बरोबरीचे होऊं अशी महत्त्वाकांक्षा बाळगणें अधिक श्रेयस्कर होईल. अशा तऱ्हेची महत्त्वाकांक्षा बाळगून त्याप्रमाणें जेव्हां त्यांच्या हातून वर्तन घडून येऊं लागेल त्यावेळीं वरिष्ठ वर्गाच्या कोत्या समजुतीबद्दल त्यांस नांवें ठेवण्याचा हक्क आपोआपच त्यांस प्राप्त होईल.

दुसरीहि एक गोष्ट अस्पृश्य मानलेल्या जातींच्या पुढाऱ्यांनीं आमच्या मतें लक्षांत ठेवावयास पाहिजे. ती ही कीं, आजच्या स्थितींत हजारों अंत्यज लोक ख्रिस्ती धर्म स्वीकारतात. ही गोष्ट हिंदु पुढाऱ्यांच्या डोक्यावर हाणून ' तुम्ही यापुढेंहि आमची उपेक्षा कराल तर आणखीहि हजारों लोक हिंदुधर्म सोडून जातील, ' असें दटावतात. परंतु हें बरोबर नाहीं. धर्मांतरामुळें हिंदु समाजाची हानि फार होत आहे यांत शंका नाहीं; व हिंदुसमाजाच्या पुढाऱ्यांचे अद्यापिहि डोळे न उघडतील तर ती अशीच होत जाईल, हीहि गोष्ट निर्विवाद आहे. तथापि ज्यांना शिक्षण नाहीं अशा लोकांच्या हातून ऐहिक फायद्याच्या हेतूनें धर्मांतर झालें तर त्यांना फारसें नांव ठेवतां येणार नाहीं, परंतु अस्पृश्य जातींचे पुढारी या नात्यानें जे बोलूं इच्छितात, त्यांना तरी ऐहिक फायद्याकरितां धर्मांतर करण्यामध्यें कमीपणा किती आहे हें कळावें, अशी लोकांची अपेक्षा असते. अंत्यज लोकांनीं धर्मांतर करणें हें हिंदु समाजावर आपल्या दुःस्थितीबद्दल सूड घेण्याचा उत्तम उपाय या दृष्टीनें कदाचित् समर्थनीय होईल. परंतु जर ते हिंदुसमाजांतील अवयव असें स्वतःस म्हणवून घेतात व हिंदुधर्माचा अभिमान आहे असें म्हणतात, तर केवळ ऐहिक फायद्याकरितां धर्मांतर

करणें हें लांछनास्पद आहे, असें त्यांना कबूल करावें लागेल. शिवाय हेंहि लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, केवळ धर्मांतर केल्यानें ख्रिस्ती समाजांत अंत्यज लोकांस विशेष मान मिळतो असें नाहीं. धर्मांतर केल्याबरोबर धर्मदीक्षा देणारा पाद्री अंत्यजास आपली मुलगी विवाहास देण्यास तयार होईल तर कदाचित् गोष्ट वेगळी; परंतु तशी वस्तुस्थिति नाहीं. ख्रिस्ती समाजांतहि खरी मान्यता मिळण्यास सुशिक्षण किंवा मान्यतेचीं वर सांगितलेलीं इतर कारणें असल्याशिवाय चालावयाचें नाहीं. उलटपक्षीं, हें सुशिक्षण अंगीं आल्यास ती मान्यता त्यांस हिंदुसमाजांत आजहि मिळण्यास कांहीं प्रत्यवाय आहे, असें आम्हांस वाटत नाहीं. अकोला येथें एका सुशिक्षित अंत्यजानें शाळा काढली आहे. तेथें रा. टिळक हे तीन वर्षांपूर्वी मोठ्या खुषीनें पानसुपारीस गेले होते. तसेंच थोड्या दिवसांपूर्वी वऱ्हाडांतील मोहप्पा गांवचे एक सुशिक्षित महार गृहस्थ पुण्यास आले, त्या वेळीं त्यांचें व्याख्यान सार्वजनिक सभेनें आपल्यामार्फत आपल्या दिवाणखान्यांत करविलें असून, ते अगर इतर वक्ते यांजमध्यें कोणत्याहि बाबतींत यत्किंचितहि फरक करण्यांत आलेला नव्हता, व सदरहू प्रसंगीं कित्येक महार लोक श्रोतृवृंदांत येऊन नेहमींच्या श्रोतृवृंदांच्या जागीं बसलेले होते; व व्याख्यानानंतर एक दोघां महार गृहस्थांचीं भाषणेंहि झालीं. सन १९०८ च्या मे महिन्यांत पुणें शहरांत मद्यपाननिषेधाची चळवळ झाली; त्या वेळीं पिकेटिंगच्या खटल्यानंतर सरकारी अधिकाऱ्यांच्या धोरणाचा निषेध करण्याकरितां रेमार्केटांत जी जाहिरसभा भरली, तिजमध्यें लष्करच्या एका महार गृहस्थाची वक्ता या नात्यानें योजना करण्यांत आली होती. शिवाय सर्वसाधारणपणें असेंहि म्हणतां येईल कीं, सुशिक्षित असा कोणताहि अंत्यज आजकाल कोणाहि समंजस हिंदु गृहस्थाचे घरीं गेला असतां त्यास घरच्या बैठकीवर बसवून घेऊन अगर खूर्ची देऊन संभाषण करण्यास तो माघार घेणार नाहीं.

वास्तविक काल हा सर्व जातींना व वर्गांना समान पदवीस आणून पोंचविण्यास समर्थ आहेच. कारण गेल्या पन्नास वर्षांत सामाजिक व धार्मिक चालीरीतींत आपोआप बराच फरक पडलेला आहे. खरें म्हटलें तर ह्या अवधींत कोणी नवीन स्मृतिकार उत्पन्न होऊन त्यानें स्पर्शा-

स्पर्शांचीं बंधनें जीं आज इतकीं शिथिल झालीं आहेत, तीं तशीं करण्यास अनुज्ञा दिली आहे, असें मुळींच नाहीं. तथापि फरक मात्र पुष्कळच पडलेला आहे यांत मुळींच शंका नाहीं. परंतु हें सांगून सर्व हवाला कालावरच द्यावा, असें म्हणण्याचा आमचा मुळींच हेतु नाहीं. आम्ही असेंच म्हणतों कीं, हरतऱ्हेच्या सुधारणा प्रत्येक व्यक्तीनें आपली जबाबदारी ओळखून घडवून आणून काळास आपल्या कृतीनें कलाटणी दिली पाहिजे. समाजांतील ' व्यक्तिस्वातंत्र्य ' व व्यक्तिकर्तृत्व ' हीं दोन्हीं वगळलीं असतां, ' काल ' म्हणून बहुधा कांहींच राहत नाहीं. कालास कोणतीहि गोष्ट करणें इष्ट असलें तरी व्यक्तिसत्तेच्या आधीन तो सर्वस्वीं आहे. काल येतो हें खरें; परंतु व्यक्तींनीं आणल्याशिवाय तो येऊं शकत नाहीं. पण वरिष्ठ जातींच्या लोकांस स्पृश्यास्पृश्यभेदाचें कामीं त्यांच्या कर्तव्याची जाणीव करून देणें हें जितकें जरूर आहे, तितकेंच अंत्यज जातींनाहि, त्यांच्या उन्नतिमार्गाची खरी दिशा कोणती व ती दिशा लावण्यास वरिष्ठ वर्गाच्या प्रेमबुद्धीची अपेक्षा न धरतांहि त्यांनीं काय केलें पाहिजे, यांविषयीं त्यांना उपदेश करणें जरूर आहे.

---

## १३१. अस्पृश्यांचा देवालय-प्रवेश व सत्याग्रह

( केसरी, आक्टोबर १९२९ )

पुण्यांतील श्रीपर्वतीचे देवालयावर सत्याग्रही वीरांचा हल्ला होणार असल्याची बातमी वाचक आज कित्येक दिवस ऐकतच आहेत. आणि या हल्ल्याचा दिवस उद्यांचाच ठरला असल्याकारणानें त्यांतून काय निष्पन्न होतें हें आतां लवकरच कळून येईल. या सत्याग्रहाच्या कटापूर्वी पुष्कळ वर्षे पुण्यांत कॉंग्रेस-कमिटीच्या वतीनें, अस्पृश्यता-निवारक-मंडळाच्या वतीनें आणि कळकळीनें व आत्मस्फूर्तीनें काम करणाऱ्या कित्येक व्यक्तींच्या प्रयत्नानें, अस्पृश्यतानिवारण व अस्पृश्योद्धार यांचें काम पद्धतशीर रीतीनें सुरू आहे. आणि या कामीं मतपरिवर्तनामुळें होणारी टिकाऊ सुधारणा निरनिराळ्या रूपानें हळुहळू दिसून

येऊं लागली आहे. तथापि केवळ ' जहाल सक्रिय सुधारक ' म्हणवून घेण्यांतच इतिकर्तव्यता मानणाऱ्या कांहीं लोकांना, तिखटाची फक्की मारून स्वतः ठसका लागून घाबरें झाल्याशिवाय आणि दुसऱ्यांना काळजीनें घाबरें केल्याशिवाय बरेंच वाटत नसतें त्याला काय करणार ? असो. पण हे मतस्वातंत्र्याचे दिवस असल्यामुळें आम्ही व्यक्तिशः कोणाच्याहि धोरणावर टीका करण्याच्या विशेष भरीस न पडतां, पुढें आलेल्या या प्रश्नावर सामान्यपणें सुचणारे विचार वाचकांपुढें मांडणार आहोंत.

श्रीपर्वती देवस्थानावर सत्याग्रहाचा हल्ला करण्याची कल्पना थोडीशी उष्टी आहे असेंच प्रथमतः म्हणावें लागतें. कारण पुण्यास स्थापन झालेल्या सत्याग्रहमंडळाच्यातर्फे रा. भोपटकर आणि रा. माटे यांनीं पर्वती संस्थानाच्या ट्रस्टींना उद्देशून जें विनंतिपत्र काढलें तें केसरीच्या ता. २७ ऑगस्टच्या अंकांत प्रसिद्ध झालेलें वाचकांच्या लक्षांत असेलच. या विनंतिपत्रांत त्यांनीं ट्रस्टींना इतकीच विनंति केली कीं, अस्पृश्य हिंदूंना संस्थानाच्या देवळांत प्रवेश करण्याची त्यांनीं परवानगी द्यावी. आणि या विनंत्यनुरूप त्यांनीं ट्रस्टींशीं खासगी वाटाघाटहि सुरू ठेवली आहे. पण कित्येकांना असली वाटाघाट व विनंति भेंड्याच्या भाजीसारखी मिळमिळीत वाटली. त्यांची तिखटाची भूक तिनें भागण्यासारखी नव्हती. कित्येकांना आपली महत्त्वाकांक्षा सफळ व्हावी म्हणून दुसरा कोणी जें करतो त्याच्यापुढें जाऊन हातभर उडी मारून दाखविण्याची डोंबारी बुद्धि सुचली. आणि इतर कित्येकांना वाटलें कीं ट्रस्टींनीं चुकून परवानगी दिलीच तर त्यांत अस्पृश्यतानिवारक मंडळांतील लोकांची प्रतिष्ठा वाढेल, आपल्याला काय लाभ ? म्हणून या लोकांच्या प्रयत्नांना स्वार्थी, कांगावखोर, पोकळ बहाणा करणारे असलीं विशेषणें ठेवून, आपल्या ' पराक्रमा'च्या जोरावर अस्पृश्यतानिवारणाची मिळकत संपादण्याचा ' उमदा ' विचार त्यांनीं मनांत आणला.

पण असल्या आत्मघातकी प्रयत्नांनीं मूळ कल्पनेला मात्र थोडासा धक्काच बसला, व उद्दिष्ट सुधारणेचें पाऊल पुढें पडण्याऐवजीं थोडेसें मागेंच पडेल अशी भीति वाटते. याचीं तीन प्रकारचीं प्रत्यंतरें या आठवड्यांतच आलीं. एक असें कीं, जें काम नखानें व्हावयाचें त्याला

कुऱ्हाड लावण्यांत येणार असें दिसल्यानें, आणि सत्याग्रह करूं म्हणणारांनीं आपल्या मागण्यांची मर्यादा प्रगट न केल्यानें, पर्वती संस्थानाच्या ट्रस्टींना हक्क, कायदा, सरकारी मदत असल्या उंचवट्याच्या जागांवर चार पावलें मागें जाऊन तेथून आपला बचाव करण्याची बुद्धि झाली. आणि अस्पृश्यतानिवारक मंडळाशीं एरवीं ट्रस्टींनीं सामोपचार बुद्धीनें जी वाटाघाट केली असती तिजपासून ते निवृत्त झाले. दुसरें प्रत्यंतर असें कीं, स्वतः अस्पृश्यतानिवारक मंडळाला पुढें येऊन "या सत्याग्रहाशीं आमचा संबंध नाहीं" असें जाहीर करावें लागलें, व पर्यायानें पर्वतीच्या ट्रस्टींशीं वाटाघाट करण्याच्या त्यांच्या कार्यांत व्यत्यय आला. पर्वतीचे ट्रस्टी आणि रा. भोपटकर व माटे यांचीं या विषयावरील पत्रें गेल्या अंकांत आम्हीं छापलींच आहेत. पण याहून तिसरें प्रत्यंतर असें कीं, खुद्द अस्पृश्यवर्गांतीलच पुष्कळसे लोक या सत्याग्रहाच्याविरुद्ध आहेत व त्यांचीं पत्रेंहि आजच्या अंकांत छापलीं आहेत. या सर्वांवरून हें उघड दिसेल कीं, सामोपचार सोडून सत्याग्रहाचा, आणि तोहि अमर्याद सत्याग्रहाचा पुरस्कार कांहीं लोकांनीं केल्यामुळें अस्पृश्यतानिवारणाच्या या कार्याला थोडी-बहुत प्रतिक्रिया सोसावी लागत आहे.

क्रिया व प्रतिक्रिया हीं बरोबर असतात असें एक शास्त्रीय तत्त्वच आहे. यामुळें इतर गोष्टी बाजूस राहून पर्वती देवस्थान खासगी कीं, सार्वजनिक हाच प्रश्न एकदम पुढें आला आहे. आणि असला प्रश्न पुढें आला कीं, त्याला कायदा व न्यायकोर्टें यांशिवाय इतर कोणी निर्णयात्मक उत्तर देऊं शकत नाहीं हें उघड आहे. देवळांतील अस्पृश्यतानिवारण, या तत्त्वाच्या मुळाशीं एक गोष्ट गृहीत धरलेली असते कीं, खासगी मिळकत, जागा, देवस्थान यांच्या व्यवस्थेंत हात घालण्याचा मालकाशिवाय किंवा अधिकृत व्यवस्थापकांशिवाय इतर कोणास कांहीं हक्क पोंचत नाहीं. फक्त सार्वजनिक गोष्टीपुरताच अस्पृश्यतानिवारणाचा वाद आहे; व हें निवारणकार्य आज सरकारी निमसरकारी रस्ते, इमारती, शाळा, बाजार, पाणवठे, वाहतुकीचीं किंवा विश्रांतीचीं स्थानें, वस्तुसंग्रहालयें, दवाखाने यांच्या संबंधांत सुरूच आहे. परंतु देवस्थानांची गोष्ट तशी नाहीं. कारण सरकारी व निमसरकारी असें देवस्थान असतच नाहीं. असतें तें प्रायः

खासगीच असतें. निदान खासगी देवस्थान म्हणजे काय व सार्वजनिक देवस्थान म्हणजे काय, याचा निर्णय करून घेण्यासंबंधानें कोर्टांतून फारसा फिर्यादी व वरिष्ठ कोर्टांचे फारसे निर्णय आजवर झालेले नाहींत.

सरकारी व निमसरकारी देवस्थानें हल्लीं असूं शकत नाहींत हें वर सांगितलेंच. पण सार्वजनिक फंड उभारून बांधलेलीं देवस्थानेंहि थोडीं असतात. असले फंड उभारण्यांत पुढाकार घेणारी व्यक्ति खासगी रीतीनें काम करते, तिला अनेक लोक वर्गणी देतात, पण त्या वर्गणीचा उपयोग अमुकच प्रकारें व्हावा असें बंधन वर्गणी देणारे लोक सहसा घालीत नाहींत, व तसा लेख वगैरे कांहीं कायदेशीर होत नाहीं. परवां श्रीसिद्धारूढ-स्वामींच्या मिळकतीसंबंधानें असला किचकट वाद उपस्थित झाल्याचें प्रसिद्धच आहे, व तशीच आणखीहि कांहीं उदाहरणें देतां येतील.

ही झाली अर्धवट सार्वजनिक देवस्थानांची गोष्ट;पण पुष्कळशीं देवळें प्राय: खासगी स्वरूपाचींच असतात. तीं खासगी पैशांतून बांधलेलीं असतात. त्यांची नेमणूक खासगी मिळकतींतून बांधून दिलेली असते. पुजारी सेवेकरी नेमणें काढणें याचे अधिकार मालकाकडेच असतात. कित्येक वेळां मालक स्वतः देवस्थानच्या आंवारांत राहतो, व देवळाचा म्हणून दिसणाराहि भाग भाड्यानें देऊन त्याचे उपन्नांतून देवस्थानाचा कांहीं किंवा सर्व खर्च भागवितो. म्युनिसिपालिटी अगर गांवचे कागद यांत देवस्थानाची सर्व स्थावर मिळकत खासगी मालकाच्या नांवानें दाखल असते, व पिढी बदलल्यास या कागदांत वारसाईच्या हक्कानें डोईबदल होतो. अशा देवळांचा रीतसर उत्सर्ग किंवा स्वत्वनिवृत्ति झाली असली, व ट्रस्ट-डीड वगैरे होऊन सार्वजनिकपणा आला असला, तरच देवस्थान खरें सार्वजनिक होतें. पण अशा गोष्टी सहसा होत नाहींत. परंपरेवरच सर्व कांहीं भागविलें जातें. पण अशा रीतीनें सार्वजनिक स्वरूप खरें आलें नसलें तरी, एक प्रकारच्या वहिवाटीनें कित्येक देवस्थानांना सार्वजनिक स्वरूप आल्याचा 'भास' होतो. त्याचें कारण असें कीं, एकट्या मालकाच्या उपयोगाकरितां देवघर पुरतें, त्याला देऊळ बांधण्याचें प्रयोजन नसतें; म्हणून देऊळ बांधिलें असतां चार लोकांनीं यावें जावें, कथा-

कीर्तन, निरूपण, नैमित्तिक पूजा–अर्जा, उत्सवसमारंभ व्हावेत अशी मालकांची सहजच इच्छा असते. यामुळें लोकांनीं अशा खासगी देवळांचा सार्वजनिक उपयोग केल्यासारखा भास होतो. पण तो खरा कायदेशीर सार्वजनिकपणा नव्हे. कारण मालकानें देवळाचें द्वार बंद करावयाचें मनांत आणल्यास त्याला कोणी प्रतिबंध करूं शकत नाहीं.

असो. वरील विवेचन करण्याचें कारण इतकेंच कीं, अस्पृश्यांच्या देवालयप्रवेशाविषयीं ज्या स्वैर कल्पना वावरतातशा दिसतात त्यांच्या सफलतेची संकुचित मर्यादा दाखवून द्यावी. आज खुद्द पुणें शहर घेतलें तर येथें सुमारें तीनशें देवळें असतील. पण त्यांतली सार्वजनिक अशी खरोखर किती असतील याची कच्चीपक्की चौकशीच करावी लागेल. बहुधा हीं सर्व देवळें जुन्या पिढींत बांधलेलीं आहेत. त्यावेळीं अस्पृश्यता-निवारणाचा प्रश्न हल्लींइतका पुढें आला नव्हता. अर्थात् त्या देवस्थानांच्या योजनेंत अस्पृश्यांना प्रवेश करूं देण्याची कल्पना किंवा कलम असणें शक्य नाहीं. या तीनशेंपैकीं कांहीं देवालयें सार्वजनिक ठरलीं तरी त्यांच्या वहिवाटदारींत अस्पृश्यप्रवेशाला साधक अशीं गमकें फारशीं मिळणें शक्य नाहीं. म्हणजे केवळ कायद्याच्या मुद्यावर हा प्रश्न समाधानकारक सुटेल असा संभव आम्हाला दिसत नाहीं.

मग कोणी म्हणेल कीं, हा प्रश्न सुटण्याची आशाच नाहीं. ! तर तसें नव्हे. हा प्रश्न सुटण्याची आम्हाला आशाच आहे, इतकेंच नव्हे तर पुण्यांतील देवळें खासगी असलीं किंवा ठरलीं तरीदेखील, अस्पृश्यप्रवेशाचा प्रश्न सुटेल असा आम्हाला भरंवसा आहे. पण तो कसा सुटेल हें अगदीं सूत्ररूपानें सांगतां येण्यासारखें नसल्यामुळें त्या मुद्याचें विवेचन पुढील अंकावर टाकणें प्राप्त आहे.

—( २ )—

देवालयांतून अस्पृश्यांचा प्रवेश व्हावयाचा तर तो सत्याग्रहापेक्षां सामोपचारानेंच होणें अधिक संभवनीय कां वाटतें, याचें एक महत्त्वाचें कारण मागील लेखांत आम्ही दिलेंच आहे. तें कारण असें कीं, आजमितीला विद्यमान असलेलीं बहुतेक सर्व देवालयें मालकीहक्काच्या दृष्टीनें खाजगी स्वरूपाचीं आहेत. यापुढें जीं देवालयें बांधलीं जातील त्यांची

गोष्ट कदाचित् वेगळी होईल. त्यांपैकीं कांहीं बोलून चालून सार्वजनिक स्वरूपाचीं म्हणून बांधलीं जातील. आणि तीं बांधणारे लोक देश-काल-परिस्थिति लक्षांत घेऊन, आणि अस्पृश्यनिवारणाचें न्याय्य तत्त्व मनाला पटून, भावी व्यवस्थापकांना किंवा वारसांना अशी आज्ञा लिहूनच ठेवतील कीं, अमुक एका मर्यादेपर्यंत तरी अस्पृश्यांचा प्रवेश आमच्या देवालयांतून व्हावा ही गोष्ट सार्वजनिक म्हणून उद्देशिलेल्या देवालयांनाच काय पण खाजगी म्हणून उद्देशिलेल्या देवालयांसंबंधानेंहि घडण्याचा संभव आहे.

तिसराहि एक प्रकार असा कीं, धर्मकृत्यें म्हणून यापुढें कांहीं देवालयें कित्येक गांवांतून मुद्दाम अस्पृश्यतानिवारणासाठींच बांधण्यांत येतील. म्हणजे स्पृश्य व अस्पृश्य हा भेद मोडण्याकरितांच हीं देवालयें वर्गणीनें बांधण्यांत येतील, व संकीर्ण देवालयप्रवेशाचा हेतु पहिल्या दिवसापासूनच अमलांत येऊं लागेल. आणि कोणाला सामोपचारानेंहि विनंत्या करण्याचें कारणच पडणार नाहीं. परंतु आज बहुतेक देवालयें खाजगी स्वरूपाचीं व जुनीं, आणि अस्पृश्यतानिवारणाची कल्पना नवी व उत्साह नवा, अशी विसंगतीची जोड पडल्यानें, आजच्या घटकेला हा प्रश्न सुटण्याला सत्याग्रहापेक्षां सामोपचाराचाच अवलंब करणें अधिक उचित आहे.

पण कोणत्याहि हेतूनें या कामीं फाजील उत्साह दाखविणाऱ्या व केवळ हुल्लड करणाऱ्या लोकांना उद्देशून वरील परिस्थिति निदर्शनास आणल्यावर, मागील लेखांत दर्शविल्याप्रमाणें, आजच्या खाजगी देवस्थानांच्या मालकांना व व्यवस्थापकांनाहि उद्देशून आम्हांस कांहीं लिहितां येण्यासारखें आहे. म्हणून ते आज लिहितों. आणि तें एका वाक्यांत सांगावयाचें तर असें कीं, " कांहीं एका मर्यादेपर्यंत अस्पृश्यांना देवालयांत प्रवेश व देवदर्शन करूं देण्याला त्यांनीं आतां मोकळ्या मनानें पुढें यावें. " ' कांहीं एका मर्यादेपर्यंत ' हे शब्द आम्हीं अत्यंत विचारपूर्वक योजलेले आहेत. म्हणजे ते जितके अस्पृश्यांना उद्देशून तितकेच स्पृश्यांनाहि उद्देशून योजले आहेत.

ही मर्यादा घालण्यांत आमचे हेतु दोन. एक असा कीं, देवालयाचा अगदीं आंतला गाभारा व प्रत्यक्ष देवालयांतील मूर्ति यांचा पवित्रपणा व स्वच्छता राहणें केव्हांहि इष्ट आहे, म्हणून थेट तेथपर्यंत जाऊन मूर्तीस

स्पर्श करण्याच्या व त्यावर पाणी वगैरे घालण्याच्या बाबतींत, अस्पृश्यांनाच काय पण स्पृश्यांनाहि प्रतिबंध असावा असें आम्हाला वाटतें. पवित्रपणा हा मानीव असला तरी स्वच्छता ही प्रत्यक्ष व शारीरिक आहे. म्हणून देवाची मूर्ति किंवा ती असलेला देवालयाचा गाभारा, यांत एखाद्या ठराविक व नियमबद्ध मनुष्याखेरीज कोणाचाहि प्रवेश होऊं नये. असा शारीरिक निर्बंध घातल्यास त्यापासून मानीव पवित्रतेला मदतच होईल व बळकटी येईल.

आपल्या घरच्या देवघरांसंबंधानेंहि आपण असेंच कांहीं निर्बंध घालीत व पाळीत नाहीं काय ? सदरेवर बसून करावयाच्या गोष्टी आपण देवघरांत वर्ज्य मानतों; व घरचे लोक सगळेच एका दर्जाचे असतां, म्हणजे स्पृश्या-स्पृश्य हा भेद नसतां, त्यांपैकीं कोणी कोणत्या स्थितींत देवालयाचें दार उघडून प्रत्यक्ष स्पर्श करावा किंवा करूं नये याविषयीं आपण होऊनच निर्बंध घालतों, व आपण होऊनच ते आनंदानें पाळतों. या दृष्टीनें प्रथम घरांतलें देवघर व फिरून देवघरांतला देव्हारा असा प्रत्यक्ष भेद आपण पवित्रपणा राखण्याकरितां म्हणून करतों. तसाच खाजगी किंवा सार्वजनिक स्वरूपाच्या देवालयांसंबंधानेंहि करावा असें आमचें स्पष्ट मत आहे. कोणी म्हणेल कीं, हें नवें बंधन अस्पृश्यांकरितां म्हणूनच सुचविण्यांत येत आहे. पण खरी स्थिति तशी नाहीं. स्पृश्यांनींहि देवाच्या मूर्तीला प्रत्यक्ष शिवण्या-संबंधानें बंधन असावें असें आमचें पूर्वीपासूनच मत आहे, व पुष्कळ देवस्थानांतून अशी वहिवाट पूर्वीपासून असल्याचेंहि आम्हाला माहीत आहे.

देवाच्या मूर्तीला प्रत्यक्ष स्पर्श केल्यापासून तो करणाराला अधिक बरें वाटत असेल. पण बिचाऱ्या देवाच्याहि दृष्टीनें यांत थोडेसें पाहिलें पाहिजे! स्वच्छता राहण्याला संसर्ग कमी करणें हाच पहिला व मुख्य उपाय होय. आणि देवाला प्रत्यक्ष स्पर्श करण्याला न मिळाल्यामुळें धार्मिक भावनेच्या समाधानांत जर किंचित् कमीपणा येत असेल, तर देवळाच्या गाभाऱ्यांत स्वच्छता व पवित्रपणा अधिक राखला जाईल या भावनेनें दुसऱ्या प्रकारचें समाधान व मोबदला मिळाला असें होईल. देवादेवांतहि कांहीं देव गोडवे असतात, व ते भजकपूजकाला आपल्या अंगाला हात लावूं देतात किंवा गळामिठी घालूं देतात. पण उलट कांहीं देव तुसडे, तिरसट,

माणूसघाणे असतात, व ते भाविक पूजकालाहि चार हात दूरच ठेवतात ! ही दुसऱ्या प्रकारची वृत्तीच सर्व देवांनीं यापुढें सरसकट स्वीकारावी अशी आमची त्यांना प्रार्थना आहे. कारण असें केल्यानें त्यांच्या परिस्थितींत स्वच्छता नांदेल व पवित्रपणाचें वातावरण अधिक निर्माण होईल.

नांदेड येथील शीख मंदिरासंबंधानें आम्ही तेथें गेल्या वेळीं असें सांगण्यांत आलें कीं, प्रख्यात गुरु गोविंदसिंग यांची समाधी गाभाऱ्यांत बांधल्यापासून नंतरच्या इतक्या वर्षांत, वेळोवेळचे विद्यमान पुजारी सोडून दुसऱ्या कोणीहि त्यांत आजवर पाऊल घातलें नाहीं. खास हिंदूंच्याहि कित्येक देवस्थानांतून अशीच वहिवाट आहे. गाभाऱ्याच्या उंबऱ्याअलीकडे एखाद्या ठराविक मर्यादेजवळ कोणी उभे राहिल्यास त्याला देवदर्शन घडण्याला अडचण पडणार नाहीं; व देवाला उद्देशून ज्या वस्तु कोणाला अर्पण करावयाच्या त्या ठराविक पुजाऱ्याच्या हातीं देऊन देवाला अर्पण झालेल्या पाहिल्यास विचारी माणसाच्या समाधानांत कांहीं कमी पडूं नये.

अशी मर्यादा घातल्यानें देवळाच्या गाभाऱ्याची म्हणजे मुख्य देवस्थानाची स्वच्छता व पवित्रपणा हीं साधतात, त्याचप्रमाणें दुसऱ्या बाजूसहि त्याचे अनेक फायदे आहेत. व सर्वांत मुख्य हा कीं, या मर्यादेपर्यंत वाटेल त्याला जाऊं दिल्यास वरील स्वच्छता पवित्रपणा यांना बाध न येतां, भजकपूजकांमध्यें आज जो भेदभाव व विषमता आढळून येते ती नाहींशी करणें सोपें होईल. मर्यादा सुचविण्याचा हाच आमचा दुसरा हेतु. देवळांतहि खाजगी व सार्वजनिक भाग असा किंचित् स्थलभेद योग्य तारतम्यानें केल्यास, देवापरी देवाचें व माणसापरी माणसाचें काम होईल. देवाचें काम म्हटलें तरी एक प्रकारें तेंहि आपलेंच काम, म्हणजे स्वच्छता व पवित्रपणा राहणें. आणि आपलें काम म्हणजे बोलून चालून आपलेंच काम. म्हणजे हिंदुधर्मीयांतील अन्यायी व उद्वेगकारक विषमता काढून टाकणें.

ही विषमता ज्या वर्गांना पक्षपात करते त्यांच्या अंगावर धार्मिकतेचें किंवा पुण्याचें मूठभर अधिक मास ती चढवीत नाहीं. पण ज्या वर्गांविरुद्ध या विषमतेचा अंमल होतो त्यांच्या मनाला ती खोल जखम करते यांत मात्र शंका नाहीं. ही विषमता घालविण्याकरितां कोठें ब्राह्मणांचे

तर कोठें ब्राह्मणेतरांचेहि विशेष हक्क आज उपभोगांत असलेले काढून घ्यावे लागतील. पण ते काढून घेतल्यानें, व या गोष्टीला ब्राह्मण व ब्राह्मणेतर यांनीं संमति दिल्यानें, एक फार मोठें कार्य होणार आहे. कारण स्वार्थत्याग ही एक दैवी किमया आहे. व तिच्या योगानें विद्वेषी भावनांच्या विषाचें प्रेममय भावनेच्या अमृतांत रूपांतर होतें असा अनुभव आहे. एकच उदाहरण द्यावयाचें तर तें जपानचें देतां येईल. इतिहासज्ञांना हें माहीत आहे कीं, पूर्वी जपानांत 'सॅमुराय' लोकांना विशेष हक्क होते. ते त्यांनीं आपखुषीनें सोडून दिल्याबरोबर त्या राष्ट्रांत ऐक्याचें चैतन्य एकदम संचारलें.

आणि देवदर्शनाच्या बाबतींत ब्राह्मण किंवा ब्राह्मणेतर यांनीं आपापले विशेष हक्क सोडून देऊन, अस्पृश्यांसुद्धां ते सर्व जर देवालयांत एकाच ठरीव स्थानापासून देवदर्शन करूं लागतील तर हिंदू समाज एकजीव होण्याला, त्याचें संघटन होण्याला, फार सोपें जाईल. देवाला प्रत्यक्ष स्पर्श करून त्याची पूजाअर्चा करण्याचें सुख हें कांहीं विशेष असलें तर तें घरच्या खाजगी देवघरांत वाटेल तितकें अनुभवितां येण्यासारखें आहे. पण बाहेरच्या म्हणजे सार्वजनिक किंवा अर्ध सार्वजनिक देवालयांतहि या सुखाचा अभिलाष धरणें यांत धर्मभावनेचें खरें बीज नसून, मानवी अहंकाराचेंच तामस बीज आहे. देवासमोर उभें राहून माणसानें इतरांना विषमता भासवून स्वतःसंबंधानें चढ्याहक्काचा वाद सांगणें हें देवाला तरी कसें आवडेल ! निदान हल्लीं ते देवाला आवडेनासें झालें आहे, म्हणूनच अलीकडे कांहीं वर्षांपासून देवालयप्रवेशाची ही नवी चळवळ या देशांत सुरू झाली असें आम्ही समजतों. असो.

अशा रीतीनें स्पृश्य वर्गांनीं आपल्या हक्कांना बंधन घालण्याची तयारी दाखविल्यास तें बंधन अस्पृश्यांवरहि ओघानेंच पडणारें आहे. त्याचें अतिक्रमण करण्याचें मग त्यांना शोभणार तर नाहींच, पण सुचणारहि नाहीं. येऊन जाऊन प्रश्न इतकाच उरेल कीं, त्यांना सभामंडपांत ठराविक मर्यादेपर्यंत इतरांबरोबर येऊं द्यावें कीं नाहीं ? व याचें नकारार्थी उत्तर कोणीहि देऊं शकणार नाहीं. कारण अस्पृश्य झाले तरी ते हिंदूच आहेत,

आणि हिंदुहिंदूंनीं आपापसांत 'देवदर्शना'च्या बाबतींत विषमता ठेवावी हें कोणत्या देवानें सांगितलें आहे ?

महाराष्ट्रांतील संतमालिका लक्षांत घेतली तर त्यांत अस्पृश्य वर्गातले साधूसंत किती तरी आहेत ! आणि या व्यक्ती साधूसंतांच्या पदवीला जाऊन पोंचल्या म्हणूनच त्यांना विशेष हक्क प्राप्त झाले, असें म्हणणाऱ्या ब्राह्मण ब्राह्मणेतराला उलट विचारतां येईल कीं, " बाबा तूं जो हा आपल्यापुरता चढाव विशेष हक्क सांगतोस तो तूं तरी त्या साधुसंताच्या पदवीला कोठें पोंचलेला आहेस ?" अर्थात् तुझ्या हक्काचा आधार विशिष्ट जातींतील जन्म इतकाच होय. पण देवांपुढेंहि जर हा हक्क तूं मिरवूं लागलास तर तो यापुढें टिकणें शक्य नाहीं. तूं तर आपल्याच हातानें यापूर्वी अनेक रीतींनीं आपलें वैशिष्ट्य काढून टाकलें आहेस. तुझ्या जातींतीलहि गुण किंवा कर्मे तुझ्या ठिकाणीं राहिलेली नाहींत. मग तूं स्वतःला कितीहि मोठें मानलेंस तरी तो तुझा मोठेपणा दुसरें.लोक काय म्हणून मानतील?"

बरें नाहीं म्हणावें तर देवळाच्या सभा-मंडपांत अस्पृश्यांना येऊं देण्याची वहिवाट कोठेंहि नाहींच असें नाहीं. कोंकण प्रांतातले लोक मोठे शिवाशिवीचे वेडे असें आपण समजतों. पण कोंकणच्या कोणत्याहि देवळांत खुद्द सभामंडपांतच स्पृश्याशेजारी अस्पृश्याकरितां म्हणून एक ठरीव भाग आंखून दिलेला असतो, व यांच्या त्याच्या दर्म्यान मर्यादा म्हणून एखादें आडवें लाकूड बांधलेलें असतें. पण स्पृश्य व अस्पृश्य यांतील प्रत्यक्ष अंतर चार दोन वितींचेंहि नसतें. एकाच पंक्तीला बसलेले ब्राह्मण रांगोळीच्या पट्ट्यानें, किंवा वेगळ्या पाटानें किंवा पानाभोंवतीं पाणी फिरविल्यानें जितके एकमेकापासून वेगळे ठरतात, तितकेच कोंकणच्या सभामंडपांत स्पृश्य आणि अस्पृश्य हे या मर्यादेनें 'वेगळे' बसतात. मग कोंकणच्या देवळांतून खुद्द सभामंडपांत अस्पृश्य बसल्यानें जर कोंकणचे ब्राह्मण ब्राह्मणेतर किंवा कोंकणचा देव विटाळत नाहीं, तर अस्पृश्यांनीं सभामंडपांत उभे राहिल्यानें देशावरचे ब्राह्मण ब्राह्मणेतर किंवा देव हे तरी कां बाटावे ?

---

# १३२. रा. केळकर व सहभोजन

( केसरी १९३२ )

[ सर्व्हंट्स ऑफ इंडिया सोसायटीमध्यें निरनिराळ्या जातींच्या पुढारी लोकांना आमंत्रण देऊन एका विशिष्ट हेतूनें कांहीं चालकांनीं एक सहभोजन घडवून आणलें. या भोजनाला नरसिंह चिंतामण केळकर हे गेले होते. त्यासंबंधानें राष्ट्रीय पक्षाचे मित्र व सनातनी पक्षाचे एक पुढारी वैद्य पंचानन कृष्णशास्त्री कवडे यांनीं उपवास सुरू केला असें प्रसिद्ध झालें होतें. त्यासंबंधानें पुणें येथील ' सकाळ ' पत्रांत प्रसिद्ध झालेला खुलासा.]

प्रतिनिधि—वै. कवडेशास्त्री यांनीं उपोषण सुरू केल्याचें आपण वाचलेंच असेल.

केळकर—होय, वाचलें.

प्रति.—त्याला आपणहि एक कारण आहां. आपण सहभोजनाला गेला म्हणून पापनिवृत्ति होण्यासाठीं शास्त्रीबोवांनीं उपोषण सुरू केलें आहे.

केळकर—माझ्या जुन्या किंवा नव्या कोणच्याहि पापाच्या क्षालनाकरितां जर शास्त्रीबोवा उपवास करीत असतील तर ते माझ्यावर त्यांचे उपकार होतीलच; पण हल्लीं भुईमुगाचा हंगाम सुरू असल्यास कोणत्याहि प्रकारच्या उपवासामुळें स्वतः त्यांचेवरहि तो उपकार निराळ्या रीतीनें होण्याचा संभव आहे! आतां विनोद सोडून दिला, आणि उपोषणांत कांहीं पुण्याई असली, तर ती माझ्याकरितां त्यांनीं खर्च करावी इतका त्यांचा व माझा स्नेह खचित आहे. पण दुर्दैवानें, त्यांच्या उपवासानें निवृत्त होण्याइतकीं, माझीं मतें आतां ऐलतीरावर राहिलेलीं नाहींत. मी सहभोजनाच्या पैलतीराला गेल्यानें अतिक्रम किंवा अत्याचार झाला असें त्यांना वाटणें स्वाभाविक आहे. कारण ते स्वतः आचारधर्म कडकरीतीनें पाळतात. पण गेल्या निदान पंधरा वर्षांचा काळ लक्षांत घेतां, मी अस्पृश्यांच्या पंक्तीला बसलों ही अगदीं नवीन किंवा प्रथमच गोष्ट घडली असें म्हणतां येत नाहीं. होमरूल लीगच्या चळवळींत ख्रिस्ती व मुसलमान यांच्याशीं आमच्यापैकीं पुष्कळांच्या पंक्ती मुंबईस झालेल्या आहेत. कॉंग्रेसच्या प्रसंगानें तर त्यानंतरच्या दहा वर्षांत कोणीं कोणाच्या पंक्तीला बसावें याचा

विधिनिषेधच राहिला नव्हता. अर्थात् अशा पंक्तीचें जेवण हें कांहीं त्याची हौस म्हणून माझें तरी घडलेलें नाहीं. कारण हें सर्व नैमित्तिकच होतें; व तोच प्रकार परवांच्याहि सहभोजनाचा झाला. पूर्वी सर्व्हंट्स ऑफ इंडिया सोसायटींत १९०७ सालीं मी मि. हेनरी नेव्हिन्सन यांच्या पंक्तीला बसल्याचें मला आठवतें. तशाच प्रकारचें नैमित्तिक जेवण परवा तेथें झालेल्या सहभोजनाचें होतें. 'हिंदू अस्पृश्य' माझ्या पंक्तीला असल्याचा जे गवगवा करतात, ते ख्रिस्ती, युरोपियन, पार्शी, मुसलमान किंवा 'अस्पृश्येतर ब्राह्मणेतर' यांच्या पंगतसंगतीचा तितका बोभाटा करीत नाहींत. तेव्हां या सहभोजनाच्या प्रसंगीं मी हजर न राहणें म्हणजे येऊन जाऊन हिंदूंतले अस्पृश्य तेवढे मला अपंक्त असें म्हणण्यासारखें उघडच झालें नसतें काय? केवळ अस्पृश्यांशीं पंगत करणें हें जर धर्मदृष्ट्या पाप असेल, तर मग मी परधर्मीय व्हाइसरॉयांच्या पंक्तीला जेवलों तें पाप या सहभोजनाच्या पापाइतकें किंबहुना अधिकच खचित भरेल. तथापि मी हें मात्र सांगतों कीं, अस्पृश्यतानिवारणाचा जो प्रश्न हल्लीं निघाला आहे, त्यांत सहभोजनाचा प्रचार किंवा उपदेश करणारांपैकीं मी नाहीं. माझ्यापासून वेगळ्या स्थितींतील सनातनी लोकांना ती मजल अर्थात् फारच दूरची किंबहुना अतिक्रमणाचीच वाटेल. म्हणून अशा रीतीनें त्यांना इरेला घालून त्यांच्या प्रामाणिकपणाच्या मर्यादेचा अंत कोणी पाहूं नये. मात्र सनातनी लोकांनाहि आतां अस्पृश्यतानिवारणाचें तत्त्व पटूं लागलें आहे हें खास. आणि म्हणूनच त्यांनीं निदान सार्वजनिक प्रसंगीं व सर्व सार्वजनिक स्थळीं स्पृश्यास्पृश्य भेदाभेद न मानला तर त्यांनीं सत्यतत्त्वाला तितका तरी कारभार दिला म्हणून मी समाधानच मानीन.

पं. मदन मोहन मालवीय झाले तरी आज याहून अधिक काय करीत आहेत? कारण अस्पृश्यता घालवावी असा सपाटून उपदेश करीत असतांहि, ते माझ्यासारख्या दक्षिणी ब्राह्मणाच्या हातचें पाणी पिण्यासहि तयार होतील कीं नाहीं याची शंका वाटते. म्हणून हल्लींची चळवळ करणारांनाहि दुसऱ्या बाजूनें माझें असें सांगणें आहे कीं, एरवीं सुद्धां असें सहभोजनाचे प्रसंग वारंवार येणाऱ्या माझ्यासारख्या मनुष्याला जरी त्यांनीं सहभोज-

नाला बोलाविलें, तरी त्यांनीं सनातनी लोकांना तसा आग्रह करूं नये, व त्यांनीं त्यास मान्यता दिली नाहीं तरी त्यांना नांवें ठेवूं नयेत.''

---

## १३३. तामस बुद्धीचें निंद्य प्रदर्शन

( केसरी १९३६. )

॥ अधर्मं धर्ममिति या मन्यते तमसावृता ॥
॥ सर्वार्थान् विपरीतांश्च बुद्धिः सा पार्थ तामसी ॥

—भगवद्गीता

अविवेकाच्या झटक्यांत तामसी बुद्धीच्या आधीन होऊन येवले येथील परिषदेंत डॉ. आंबेडकरांनीं धर्मांतराची जाहीर घोषणा करून वावटळ उठविली. या वावटळींतील धुरोळ्यानें दाही दिशा धुंद होऊन अस्पृश्य वर्गांतील डॉ. आंबेडकरांच्या अनुयायांना खरा मार्ग दिसेनासा झाला आहे आणि या वावटळींत न सांपडलेल्यांनीं त्यांना योग्य मार्ग दाखविण्याचा प्रयत्न केला तरी तो पटवून घेण्याइतकी त्यांची बुद्धि ठिकाणावर राहिलेली नाहीं. अधर्मालाच धर्म मानणें आणि प्रत्येक गोष्टीकडे उलट्या बाहुल्यांनीं पाहणें हें तामसी बुद्धीचें लक्षण होय. अशा तामसी अहंकाराच्या तडाख्यांत स्वतः सापडून आपल्या अनुयायांनाहि त्यांतच गुरफटविण्याचा डॉ. आंबेडकर यांचा प्रयत्न चालू आहे व पुण्यांत नुकतींच झालेलीं अस्पृश्य युवक परिषदेंतील भाषणें व ठराव हें त्याचेंच फल होय.

येवले येथील वावटळीमुळें निर्माण झालेल्या भोंवऱ्यांतदेखील आपला धरबंध सुटूं न देतां, दृष्टि साफ ठेवून, आपल्या कर्तव्याचा विचार करण्यासाठीं अस्पृश्यतानिवारकांनीं प्रथम आपली सभा भरविली आणि आपल्या कार्याचा आराखडा आंखून घेतला. त्यानंतर हिंदुमहासभेचें यशस्वी अधिवेशन झालें आणि त्यांत अस्पृश्यतानिवारणाचा संकल्प पुनश्च जाहीर होऊन त्याची बजावणी करण्याकरितां जरूर ती तरतूदहि करण्यांत आली. या दोनहि ठिकाणीं दोनहि टोंकांच्या विरोधकांकडून सभेचें मत आपापल्या बाजूस खेंचण्याचा प्रयत्न झाला नाहीं असें नाहीं. तथापि तामसी किंवा

राजसी बुद्धीचा विजय न होतां अखेरीस सात्त्विक बुद्धीचाच जय झाला आणि कार्याकार्याच्या योग्य मर्यादा संभाळल्या जाऊन, भयाभयाचा विचार होऊन निर्भय व श्रेयस्कर असाच मार्ग आंखण्यांत आला.

पण ज्यांची अस्पृश्यता घालविण्यासाठीं हा सगळा खटाटोप करण्यांत येत आहे त्या अस्पृश्य वर्गाला तो प्रयत्न पटला तरच या सर्व खटाटोपाचें चीज होणार हें उघड आहे. येवले येथें आंबेडकरांनीं धर्मांतराच्या घोषणेचा बाँबगोळा फेकल्यावेळेपासून अस्पृष्ट वर्गांतीलच अनेक पुढाऱ्यांनीं हा अत्याचाराचा मार्ग हितप्रद होणार नाहीं असें निस्संदिग्धपणें जाहीर केलें आहे. डॉ. आंबेडकरांच्या विचारसरणीची छाप ज्यांच्यावर पडली आहे, किंवा आंबेडकर आपले पुढारी आहेत, तेव्हां त्यांच्या मताला विरोध करणें हें आपल्या अनुयायित्वाला शोभणार नाहीं अशा भिडस्त भावनेनें ज्यांचें मत दबलें आहे, अशा कित्येकांनीं आंबेडकरांच्या घोषणेला दुजोरा देण्याचे ठराव कांहीं ठिकाणीं केले यांत शंका नाहीं. तथापि अस्पृष्ट समासमाजांतला बहुसंख्य व विचारी वर्ग असा बेहोष झालेला नाहीं व स्पृष्ट वर्गाकडून होणाऱ्या प्रयत्नांवरील त्याची श्रद्धाहि डळमळलेली नाहीं. असे अनेक विचारी पुढारी हिंदु महासभेच्या अधिवेशनाला उपस्थित होते. त्यांनीं आपलीं गाऱ्हाणीं खुल्या दिलानें कार्यकर्त्यांपुढें मांडलीं; आपल्या आकांक्षांची परिसीमा बोलून दाखविली आणि सद्यःस्थितींत प्रथमारंभ म्हणून कमींत कमी काय केलें पाहिजे याची स्पष्ट कल्पनाहि दिली. अर्थातच त्यांच्या विचाराच्या अनुरोधानेंच हिंदु महासभेपुढील ठरावांची योजना तयार होऊन त्या ठरावांना अस्पृश्यांतर्फे त्यांनीं दुजोरा दिला. सात्त्विक बुद्धीचें वैशिष्ट्यच हें कीं, तिला जशी प्रवृत्तीची तशी निवृत्तीचीहि यथार्थ कल्पना असते. काय केलें पाहिजे हें जसें तिला नेमकें कळतें त्याप्रमाणेंच काय टाळलें पाहिजे हेंहि तिला बिनचूक समजतें.

अस्पृश्यतानिवारणाचा ठराव करतांना त्याच्याबरोबरच जात्युच्छेदनाचा ठरावहि कां मंजूर केला नाहीं असा जो कित्येकांचा आक्षेप आहे, त्याचा परिहार याच विचारसरणींत आहे. अस्पृश्यता हें हिंदुधर्माचें एक अविभाज्य अंग आहे, म्हणून हिंदुधर्म टाकल्याखेरीज अस्पृश्यता नष्ट होणार नाहीं. ही कल्पना जशी भ्रममूलक आहे, तशीच जात्युच्छेद झाल्याविना

अस्पृश्यता जाणार नाहीं ही कल्पनाहि भ्रान्तिष्टपणाची आहे. अस्पृश्यता सर्वथैव नाहींशी होऊनदेखील समाजांत अनेक स्पृश्य जाती राहूं शकतील. स्पृश्य समाजांत आजमितीला जशा अनेक जाती आहेत, त्याचप्रमाणें अस्पृश्य समाज स्पृश्य झाल्यावर त्या स्पृश्य जाती इतर स्पृश्य जातींच्या बरोबरीनें हिंदु समजांत राहू शकतील, यांत अशक्य किंवा अनैसर्गिक काय आहे ? जातिभेद कायम राहणें इष्ट आहे काय व अपरिहार्य आहे काय आणि जातिभेद मोडावयाचाच असेल तर तो कोणत्या क्रमानें मोडावा. प्रत्येक दुवा आपल्या शेजारच्या दुव्यास जोडीत जावें, का एका टोंकाचा दुवा दुसऱ्या टोंकाच्या दुव्याला एकदम जोडणें बरें, हा अगदीं स्वतंत्र विचाराचा प्रश्न आहे. जात्युच्छेद व अस्पृश्यता-निवारण हे दोनहि अगदीं अलग अलग विचार असून प्रत्येकाच्या मुळाशीं असलेलें तत्त्व वेगळें आहे आणि त्याचें साध्यहि वेगवेगळेंच आहे. तेव्हां अस्पृश्यतानिवारणाचें साध्य डोळ्यापुढें ठेवून तन्निवारणार्थ उपाययोजना करीत असतां जात्युच्छेदाच्या प्रश्नाची त्याच्याबरोबर गल्लत करणें हें कार्यबाधक न होतां कार्यविघातकच होणार आहे. क्षयरोग्याला क्षयांतून मुक्त करण्यासाठीं औषधयोजना करीत असतां त्या रोग्याचें नकटें नाक चाफेकळीसारखें करण्यासाठीं शस्त्रक्रिया कां करीत नाहीं, आणि ज्याअर्थीं तुम्ही नकटें नाक सरळ करण्याची शस्त्रक्रिया करीत नाहीं, त्याअर्थीं तुम्हाला हा रोगी क्षयांतून बरा व्हावा असें मनापासून वाटतच नाहीं असें म्हणणें जितपत सयुक्तिक, तितपतच हिंदुमहासभेनें जात्युच्छेदाचा ठराव पास केला नाहीं म्हणून तिची अस्पृश्यतानिवारणाची कळकळ दिखाऊ आहे असें म्हणणें सयुक्तिक ठरेल.

परंतु असा दूरदूर विचार न करतां किंबहुना श्रीशंकराचार्य ( डॉ. कुर्तकोटी ) यांनीं शिष्टमंडळामार्फत कळविलेल्या सूचनेचा विचारहि न करतां, डॉ. अंबेडकर यांनीं पुण्यांतील युवक परिषदेमार्फत आपल्याला पाहिजे तसले ठराव करून घेतले आणि आपल्या भाषणांत हिंदु धर्माची, सनातन्यांची आणि अस्पृश्यतानिवारकांचीहि गालिप्रदानपूर्वक यथेष्ट निंदा करून आपल्या पोटांतील सगळें विष बाहेर ओकून टाकलें ! हेंच एकटें भाषण काय, पण या परिषदेंतील ठरावांवर झालेलीं बहुतेक सर्व भाषणें म्हणजे तामसी बुद्धीचें निंद्य प्रदर्शन होतें. स्वागताध्यक्ष आणि परिषदाध्यक्ष

यांचीं भाषणें छापील होतीं व तीं बरींच कडक असलीं तरी तीं गलिच्छ अगर निंदाप्रचुर नव्हतीं. एवढे दोन अपवाद सोडल्यास बाकीचा सर्व शिमगाच होता !

पण आम्हाला या परिषदेंतील असभ्य भाषेशीं कांहीं कर्तव्य नसून त्या परिषदेंत जी विचारसरणी मांडली गेली तिचा दुष्परिणाम अस्पृश्य वर्गाच्या नजरेसमोर मांडावयाचा आहे. गुलामगिरींतून बाहेर पडण्याची इच्छा ही केव्हांहि अभिनंदनीय होय. तथापि ' दुरून डोंगर साजरे ' दिसतात, पण जवळ जातांच काट्यांनीं वाभाडे काढतात. हा जगांतील अनुभव अस्पृश्य वर्गांनीं विसरूं नये. हिंदु धर्मांतील आजची त्यांची स्थिति कितीहि अनुकंपनीय असली तरी ती स्थिति सुधारण्याचे जे अटोकाट प्रयत्न होत आहेत व यापुढें अधिक निकरानें जे प्रयत्न केले जाणार आहेत, त्याबद्दल यत्किंचितहि कृतज्ञता न दर्शवितां व भलेपणाचा एक शब्दहि न उच्चारतां केवळ उतावीळपणानें व उच्छृंखलपणानें अंधारमय खड्ड्यांत उडी घेणें हें त्यांचें त्यांनाच भोंवणार आहे. मराठेशाहीवर असंतुष्ट होऊन राष्ट्रद्रोह करून कंपनी सरकाराकरितां रक्त आटविल्याचें चीज शेंसवाशें वर्षांत परकी सरकारनें काय केलें तें दिसतच आहे ! आणि उद्यां धर्मद्रोह करून मुसलमान अगर खिस्ती झाल्यावर त्यांच्याकडून कशी संभावना होईल हेंहि अनुमानानें जाणतां येणार आहे ! ब्रिटिश सरकारनें अस्पृश्य वर्गासाठीं जितक्या जागा देण्याचें ठरविलें त्याच्याहून किती तरी अधिक जागा डॉ. मुंजे यांनीं राजा–मुंजे पॅक्टनें देऊं केल्या होत्या आणि पुणें करारानें तर त्याच्याहि पुढें जाऊन जागांची नुसती खैरात केली. पण हिंदु समाजाच्या या उदार धोरणासंबंधानें व कळकळीसंबंधानें अवाक्षरहि न उच्चारतां हिंदु समाजाला शिव्यांची लाखोली वाहून डॉ. अंबेडकर यांनीं धर्मांतराचा सौदा आरंभिला आहे.

तत्त्वतः हिंदुधर्मापेक्षां इतर कोणताहि धर्म श्रेष्ठ आहे कीं काय, परधर्मांत जातिभेद व उच्चनीच भाव नाहींत कीं काय आणि धर्मांतर केल्यावर म्लेंच्छ किंवा खिस्ती लोक सगळ्या अस्पृश्यांना डोक्यावर घेऊन फुलासारखे वागविणार आहेत कीं काय इत्यादि प्रश्नांचा खोल विचार न करता नुसतें दिग्दर्शन केल्यानेंहि त्याचें उत्तर मिळण्यासारखें आहे. पण

हा तात्त्विक विचार बाजूस ठेऊन नुसत्या नागड्या स्वार्थाच्या दृष्टीनें विचार केला तरी डॉ, अंबेडकरासारख्या हिशेबी माणसाला एवढें कळावयास पाहिजे कीं, उंटासारखा पाहुणा घरांत शिरून घर डोक्यावर घेऊं लागेल तर त्या पाहुण्याचा आदर होण्याऐवजीं त्याच्या पाठींत बडगाच बसेल ! मुसलमानांकरितां अगर खिस्त्यांकरितां राखून ठेवलेल्या कौन्सिलांतील जागांत किंवा नोकऱ्यांत डॉ अंबेडकर व त्यांचे अनुयायी हिस्सा बळकावूं लागले म्हणजे ' कोठून ही पीडा आमच्यांत आली ' असेंच त्या त्या धर्मांतील लोकांस वाटूं लागेल व नंतर ते या पाहुण्यांना कसें वागवतील याची कल्पनाच केलेली बरी.

---

## १३४. संस्कृतीची मीमांसा

( केसरी. )

संस्कृति हा शब्द फार व्यापक आहे. त्यांत काय येतें व काय येत नाहीं हें सांगणें कठिण आहे. पण सामान्यपणें म्हणतां येईल कीं, कोणत्याहि विषयांतील उत्तमोत्तम विचार याचें नांव संस्कृति. त्याला लोकरीच्या अंगावरील फुलाची उपमा देतां येईल. कोणत्याहि विषयांतील भौतिक ज्ञान हें लोकरीच्या कापडाच्या आडव्याउभ्या जाड धाग्यासारखें आहे. आणि कोणत्याहि लोकरीचे सारखेच जाड किंवा सारखेच पातळ धागे काढतां येतील. पण सगळ्या प्रकारच्या लोकरीवरील फूल एकाच प्रतीचें नसतें आणि लोकरीच्या किंमतींत जो फरक पडतो तो या फुलाच्या गुणामुळेंच !

कांहीं लोकरीच्या कापडावरील फूल राठ असतें आणि त्याच्यामध्यें उबदारपणा कमी असतो. पण उत्तमोत्तम काश्मिरी शाल घेतली तर तिच्यावरील फूल हाताला मखमलीसारखें मऊ लागतें; अशा लोकरीलाच इतकी ऊब असते कीं, तिचा कपडा घातल्यानें कसल्याहि थंडीचें निवारण होतें. त्याप्रमाणें कोणत्याहि वस्तूवर जें स्वाभाविक तेज किंवा तजेला असतो, तसाच उत्तम विचारांनीं मनुष्याच्या मनाला येत असतो.

किंवा संस्कृति म्हणजे वृक्षावरचें पिकलेलें फळ म्हणतां येईल. कारण झाडावर पिकलेल्या फळामध्यें त्या वृक्षाचे सगळे उत्तम गुण उतरतात. त्याप्रमाणें संस्कृतीमध्येंहि मनुष्याच्या मनाचे उत्तम गुण उतरलेले असतात. मग तें मन पुष्कळ शिकलेलें असो, किंवा थोडें शिकलेलें असो. अशिक्षित मनुष्य झाला तरी त्याच्या ठिकाणीं उत्तम शरीरप्रकृति, सुविचार, सद्बुद्धि, सभ्यपणा हे स्वाभाविक गुण असूं शकतील. शिक्षणामुळें इतकेंच होतें कीं, मनुष्याला आपले विचार चांगल्या रीतीनें प्रगट करून दुसऱ्याशीं सुलभतेनें व्यवहार करतां येतो, विद्येचा म्हणून जो विषेष आनंद तो स्वतःला घेतां येतो आणि दुसऱ्याला देतां येतो.

तसेंच विद्येच्या भरीला सामाजिक परंपरा आणि आनुवंशिक पूर्वसंचित या गोष्टीहि उपयोगी पडतात. रानटी लोक घेतले तरी त्यांच्यांतहि एक प्रकारचा सभ्यपणा किंवा सत्प्रवृत्ति असत नाहीं असें नाहीं. पण त्यांची राहणी, त्यांचा आचार आणि सुधारलेल्या लोकांची राहणी व आचार, यांमध्यें पुष्कळच फरक पडतो, व त्याचें कारण समाजाचें पूर्वसंचित. शिक्षणानें स्वच्छता, सौंदर्य, ठाकठीकपणा, सुखसोईची जाणीव इत्यादि गुण मनुष्याला प्राप्त होतात. यांचाहि संस्कृतींत समावेश होतो. पण संस्कृति आणि नीति हीं दोनहि एकच नाहींत म्हणून तीं दोनहि एकाच ठिकाणीं आढळून येतील असें नाहीं. असंस्कृत रानटी समाजांत सभ्यपणाप्रमाणें खऱ्या नीतिच्याही कल्पना कांहीं आढळतील. उलट अमेरिकेसारख्या अत्यंत सुशिक्षित व पुढारलेल्या देशामध्यें कित्येक नीतीच्या कल्पना मनाला न पटण्यासारख्या आढळतात. आणि स्वार्थ व दुष्ट बुद्धि यांचा तर सुशिक्षितांतहि कडेलोट दिसून येईल.

नव्या तरुण पिढीची संस्कृति पूर्वीसारखी एकजिनसी राहाणें यापुढें शक्य नाहीं. हिंदी व हिंदु संस्कृतीचें जें जुनें रूप तें यापुढें बदलणार आहे. भौतिक विद्या पुष्कळच वाढणार असून नवी राहणी अधिक टापटिपीची सुखसोईची होईल. परंतु सामाजिक चालीरीति इतक्या बदलतील कीं, त्यांस नमुन्याला हिंदु समाजाच्या जुन्या परंपरेंत सहसा दाखला मिळणार नाहीं.

सामाजिक नीतीच्या कल्पनाहि पुष्कळ बदलतील. परंतु मनाच्या

विकासामुळें जी संस्कृति प्रगट होते ती यापुढें पूर्वीपेक्षां अधिक खुलून दिसेल यांत शंका नाहीं. गेल्या पांचशें वर्षांत किंवा पांच हजार वर्षांत हिंदु लोकांचा बाहेरच्या जगांशीं जो संबंध आला नव्हता तो पुढील अवघ्या पन्नास वर्षांत येण्याचा संभव आहे. यामुळें त्याच्या संस्कृतीचें स्वरूप प्रादेशिक न राहतां जागतिक होईल; आणि तसें झाल्यास हिंदु-समाजाला वाईट वाटण्याचें कारण नाहीं. जगांत जगण्याची पहिली अट अशी असते कीं, जगाच्या रीतीनें मनुष्यानें थोडें बहुत राहावयास शिकलें पाहिजे. आणि या नव्या राहणींत जे फेरफार होतील त्यांचा स्वीकार एखाद्या आपत्तीप्रमाणें न करतां खुषीनें व आनंदानें केलेला बरा. कोणत्याहि स्थितींत चांगलें काय हें मनुष्याला फार खोल विचारानेच निवडून काढतां येतें. आणि प्रत्येक नव्या जुन्या स्थितींत त्या त्या कालानुसार चांगलें म्हणून कांहीं असतेंच म्हणून नवें युग अवतरणारच, कालमान बदलणारच, स्थित्यंतर होणारच! मग त्यांतील आपल्या दृष्टीनें जेवढें चांगलें तेवढें घेण्याचा प्रयत्न मनुष्यानें केला म्हणजे त्याचें कर्तव्य संपलें. काळाला खीळ घालणें ही गोष्ट त्याच्या हातचीं नाहीं. पण स्वतःच्या मनाला खीळ घालणें—म्हणजे चांगल्यावाईटाच्या विवेकाच्या दृष्टीनें येथपर्यंत जाऊं, याच्या पलीकडे जाणार नाहीं, असें विवेकबुद्धीनें ठरवून इच्छाशक्तीच्या बळावर तें अमलांत आणणें—हें तरी त्याला करतां येईल.



# प्रस्तावना

या ग्रंथाची भूमिका तो वाचणाऱ्याच्या लक्षांत तेव्हांच येईल, म्हणून त्याचें वेगळें विवेचन करीत नाहीं.

या देशांतील नागरिक सर्व हिंदूच आहेत असें नाहीं. इतर अनेक जातींचे व धर्मांचेहि आहेत. आणि त्या सर्वांमध्यें हिंदुस्थानचा नागरिक या नात्याचा समान धर्म असून, त्या सर्वांनीं परस्पर शुद्ध बंधुभाव धरला तरच राष्ट्राला ऊर्जितदशा येईल.

तथापि, या ग्रंथाच्या नांवांत हिंदी हा शब्द न घालतां हिंदु हा शब्द घातला याचें कारण इतकेंच कीं, या ग्रंथांतील विषय 'कुटुंब-व्यवस्था' इतका मर्यादितच आखून घेतला आहे; आणि तो विषय सर्व जातींच्या व धर्मांच्या नागरिकांना एकाच भाषेनें व एकाच विचारसरणीनें पटवून देता येण्यासारखा नाहीं. ग्रंथांतील विषयाचें विवेचन मुख्यत: हिंदु समाजाला धरून आहे, हें वाचकांच्या लक्षांत येईल.

या ग्रंथाचे पुढील दोन विभाग अनुक्रमें 'राष्ट्रविभाग' आणि 'विश्वविभाग' असें लिहिण्याचें योजिलें आहे. त्यांनाहि तरुण हिंदु नागरिक हेंच नांव द्यावें लागेल. तथापि या सर्वच विभागांत हिंदु नागरिक हे अखिल भारतीय नागरिकाचें उपलक्षण आहे असें समजावें म्हणजे झालें.

या ग्रंथांत 'आन्हिक' हा विभागदर्शक शब्द नवीन उपयोगांत आणला आहे. त्याचा हेतु असा आहे कीं तरुण वाचक, सामान्यत: न कंटाळतां एका दिवसांत जेवढा विषय वाचील तितक्याचा एका आन्हिकांत समावेश व्हावा.

दिवसेंदिवस कोणत्याहि ग्रंथविवेचनांत संक्षेप व सोपेपणा हे जितके अधिक येतील तितके इष्ट आहेत. कारण वेळ थोडा व उद्योग फार अशी समाजाची स्थिति झाली आहे. युरोपियन देशांत तर लोकांचे वाचनाचे श्रम वाचविण्याकरितां विद्युत्-यंत्राच्या साहाय्यानें, संभाषणाच्या रूपानें, सहज चार गोष्टी बोलल्याप्रमाणें, गंभीर विषयांचेंहि विवेचन सुमारें अर्धा पाव तास हजारों लोकांना एकदम ऐकविण्यांत येतें. आपल्या इकडे त्या यंत्रसाधनाचा उपयोग तितका अजून करितां येत नाहीं. तथापि, या नव्या पद्धतींतील संक्षेप व साधेपणा यांची कल्पना मनाला बरी वाटून या ग्रंथांतील विषयाची रचना या आन्हिकांच्या रूपानें केली आहे.

पुणें ता. २०।२।१९३४ न. चिं. केळकर.

# तरुण हिंदु नागरिक

## कुटुंब–विभाग

### आन्हिक १ लें

### मी कोण व तूं कोण ? : अहंकार व अभिमान

कोणीहि विचारी मनुष्य स्वतःला व दुसऱ्याला वरच्यासारखा प्रश्न केव्हां केव्हां विचारतोच. वेदांती लोक तर असा प्रश्न नेहमीं उपस्थित करतातच; परंतु अगदीं थेट वेदांतांत शिरून तसा प्रश्न स्वतःला करण्याचें व्यवहारी मनुष्याला कारण नाहीं. "कोण मी कैसा, कोठुनि आलों, हें मज कांहीं न कळेरे" ही भजनांतली ओळ प्रत्येकाच्या कानावर केव्हां तरी आलीच असेल. तीच ओळ, कदाचित् निरनिराळ्या शब्दांनीं, विचारी, ज्ञानी लोक आज हजारों वर्षें स्वतःला विचारीत आले आहेत. परंतु त्यांना जर त्या प्रश्नाचें उत्तर समाधानकारकपणें देतां आलें नाहीं, तर सामान्य मनुष्य तरी तें कसें देणार ? म्हणून वेदांती दृष्टीनें "मी कोण ?" या प्रश्नाचा विचार मनुष्यानें व्यवहारांत सोडून द्यावा.

तथापि लौकिक दृष्टीनें देखील "मी कोण ?" हा प्रश्न अत्यंत महत्त्वाचा ठरतो. कारण मनुष्याचें सर्व जीवन व लौकिक संसार हा त्याच्या अहंकारावरच उभा असतो. आणि "मी कोण ?" या प्रश्नाचें उत्तर ज्याचें त्यानें दिलें, म्हणजे त्यानें आपणापुरता हा अहंकार निश्चित ठरविला असें होतें. अहंकाराच्या बीजावर अनेक पुटें बसून, किंवा अनेक कवचें चढून, तो मोठा होतो, फुगतो. ज्याला जी स्थिति दैवानें लाभेल त्याप्रमाणें तो फुगा मोठा किंवा लहान असेल; म्हणजे 'मी राजा, बादशहा' असें स्वरूप एकाच्या अहंकाराच्या फुग्याला येईल, तर 'मी केवळ एक अनाथ भिकारी आहें, अंगावरच्या वस्त्राशिवाय माझी मालमत्ता किंवा वैभव कांहींच नाहीं,' असें मर्यादित स्वरूप दुसऱ्या एखाद्याच्या अहंकाराच्या

फुग्याला राहील. परंतु दोन्हीही मुळांत अहंकारच. ते प्रत्येक व्यक्तीच्या ठिकाणीं बीजरूपानें राहाणारच.

पेपरमिंटाच्या गोळ्या लहानमोठ्या व रंगीबेरंगी तुम्हीं आम्हीं पाहिल्याच आहेत. आपण त्या तोंडांत घालून चघळूं लागलों म्हणजे आंतून एकएक नव्यानव्या रंगाचें पूट किंवा कवच निघतें. तेंही झिरपलें म्हणजे दुसरें निघतें. गोळी हळुहळू लहान होत जाते. आणि शेवटीं साखरेचे सर्व कण नाहींसे झाले म्हणजे आंतून बडीशेपेचा एक दाणा निघतो. किंवा दुसरें उदाहरण घेऊं. समुद्रांत मोती बनतें तें कसें हें कोणालाही माहीत असेलच. मुळांत एखादा बारीक रेतीचा कण असतो; त्यावर कालवरूपी प्राण्याच्या आत्मरक्षणबुद्धीमुळें शिंपल्याच्या रसाचे थरावर थर चढून बसतात; आणि त्यांवर मोत्याची जिल्हई व तेज चढतें. पण मुळांत हा कठीण कण, खुपणारा कण, असल्याशिवाय मोती बनत नाहीं. त्याचप्रमाणें अहंकाराचा कण सुद्धां, तो कणखर असा असला, तो सुख होण्याइतकाच खुपला, तरच त्याच्यावर व्यक्तिमात्राच्या संसाराचा डोलारा उभारतां येतो.

अहंकार या शब्दाला एक वाईट अर्थ आहे. पण तो लक्षांत न घेतां, अहंपणा म्हणजे केवळ व्यक्तित्व असा अर्थ घेतला असतां, त्यांत वाईटाचा भाग कांहींच नाहीं असें सशास्त्र रीतीनें म्हणतां येतें. हा शुद्ध शास्त्रीय अहंकार म्हणजे तें एक सृष्टितत्त्वच आहे; आणि तो मुळांत आधारभूत नसेल, तर व्यक्तीची चैतन्यात्मक रचनाच बनणार नाहीं. अथवा केवळ शरीरानें बनलीच तर ती व्यवहाराला उपयोगी पडणार नाहीं. व्यावहारिक अहंकार नसलेल्या व्यक्तीचें उदाहरण म्हणजे पूर्ण वेडा माणूस. त्याला आंग खाजविण्यापुरती किंवा देहधर्म करण्यापुरतीच काय शुद्ध असेल ती. एरव्हीं त्याच्या मनांत जसा एका विचाराचा दुसऱ्या विचाराशीं मेळ नसतो, त्याप्रमाणें जीवनव्यवहारांतील एका कृत्याचा दुसऱ्या कृत्याशीं मेळ नसतो. पण असा पूर्ण वेडा मनुष्य सोडून दिला तर प्रत्येक मनुष्य अहंकारमय व अहंकारनिष्ठ असतोच; व तो तसा असलाहि पाहिजे. अशा अहंकारापासूनच किंवा अहंकारनिष्ठ व्यक्तीपासूनच, सगळ्या मनुष्यसमाजाची उत्पत्ति आहे. तेव्हां आतां आपण आपला अहंकार इतरांपासून कसा

प्रगट करणार ! याविषयीं आपणाजवळ काय साधन आहे ! तर अर्थात् प्रारंभीं नाम व रूप ! वेदांतांतील ब्रह्माला देखील जेव्हां 'अनेक होण्या'चा खेळ खेळावासा वाटला, तेव्हां त्याला नाम व रूप यांचाच आश्रय करावा लागला. म्हणूनच भिन्न पदार्थांना भिन्न नांवें व भिन्न रूपें मिळालीं. मुळांत एकच व एकजिनसीच ब्रह्म असतां, या खेळांत अखेर वेगवेगळे-पणा इतका साधला आहे कीं, जगांतील कोट्यानुकोटी वस्तूंपैकीं कोणतीही एक वस्तु दुसऱ्या कोणत्याहि वस्तूसारखी तंतोतंत असतच नाहीं. कांहीं-तरी सूक्ष्म असा वेगळेपणा हा राहातोच. अनुभवानें त्या वेगळेपणाचा परिचय होऊन वेगळेपणाच्या खुणा ध्यानांत राहातात, व त्या खुणांवरून एक व्यक्ति दुसरीहून वेगळी अशी निवडून काढतां येते. प्रथमदर्शनीं आपल्याला सगळे गोरे युरोपियन लोक एकासारखे एक वाटतात. पण स्वतः त्यांचे त्यांना तसें कधीं वाटत नाहीं. आणि आपणहि थोड्याशा परिचयानें हा इंग्रज, हा फ्रेंच, हा जर्मन, हा रशियन, हा आर्मीनियन असे वेगवेगळे लोक हुडकून काढूं शकतों. आम्हांला चिनी माणसें क्वचित् दिस-तात म्हणून तींहि एकासारखीं एक वाटतात. पण ३५ ते ४० कोटी चिनी लोक न ओळखून काढण्याइतके एकासारखे एक असतील काय ! मुळींच नाहीं. अनेक धनगरांचीं मेंढरें रानांत मिसळलीं तरी जो तो धन-गर आपलें मेंढरू हटकून हुडकून काढतोच.

जी गोष्ट रूपाची, तीच नांवाची. रूप हें सृष्टिनिर्मित असतें, म्हणून रूपांत वेगळेपणा राखण्याची खबरदारी स्वतः सृष्टिच घेते. पण नांवांत वेगळेपणा राहण्याची खबरदारी कांहीं युक्तिप्रयुक्तीनें आपणालाच घ्यावी लागते, व ती आपण घेतोंहि. प्रिय वाचका, स्वतः तुझेंच उदाहरण तूं घे. आणि नीट पहा बरें ! सगळ्या जगांत अगदीं थेट तुझ्याच नांवाचीं माणसें किती आढळतील ! मला नाहीं वाटत दहापांचहि आढळतील; व तीं आढळलीं तरी तुझ्याच जातींत किंवा पोटजातींत आढळतील. आणि तींहि इतक्या लांबलांब ठिकाणीं असतील कीं, व्यवहारांत तीं एकत्र येऊन त्यांमुळें गोंधळ होण्याचा संभव फारच कमी असतो. आपणा दक्षिणी हिंदुलोकांत व्यक्तिनामें हीं देवांचीं ठेवण्याची रीत आहे. म्हणून रामा, गोविंदा, वामन, या नांवांच्या व्यक्ती कदाचित् तुझ्या प्रांतांत हजारोंनीं

मोजतां येतील. पण व्यक्तीच्या नांवाला त्याच्या बापाच्या नांवाची जोड दिली कीं, ही हजाराची संख्या एकदम घटून शेंकड्यांतही उतरणार नाहीं. गोविंद या नांवाचे लोक हजार निघाले तर गोविंद वामन या जोडनांवाचे लोक शंभरही नसतील. आणि याच्यापुढें जाऊन व्यक्तीचें नांव व बापाचें नांव यांच्या जोडीला कुलनाम किंवा आडनांव लावलें म्हणजे मग तर मुळींच बोलावयासच नको! कायदेकौन्सिलांच्या किंवा म्युनिसिपालिट्यांच्या मतदारांच्या याद्या घेऊन त्या सहज चाळून पहाव्या, म्हणजे नांवासारखें नांव आढळणें फार दुर्मिळ असें दिसून येईल. व्यक्तीचें नांव, बापाचें नांव, व आडनांव अशीं तीनही घेतलीं तरी तीं एकच असें एक गमतीचें उदाहरण पुण्यास पहावयास सांपडलें. पण त्या ठिकाणीं आजाचें नांव चौथें भरीला घातल्याबरोबर त्या दोन व्यक्तींचा घोटाळा नाहींसा झाला. हें असलें दुर्मिळ उदाहरण जमेला धरूनहि असें म्हणतां येईल कीं, विशिष्ट दोन किंवा तीन शब्द एकत्र केले म्हणजे नांवाच्या दृष्टीचा वेगळेपणा पूर्णपणें सिद्ध होतो. गणितांत ज्याप्रमाणें एकाचा आंकडा किंवा एक हा अंक व त्यापासून मग वाटेल तेवढी संख्या, त्याप्रमाणें अशा रीतीनें नामरूपानें व्यवहारांत निश्चित वेगळी झालेली एक व्यक्ति व त्याच पद्धतीनें मग सगळा जगांतला समाज !

शास्त्रीय दृष्टीनें अहंकाराची ही उपयुक्तता सांगितली. पण यानंतर प्रश्न असा कीं, ' मी कोण ? ' हें नामरूपानें वेगळें ठरल्यावर भावनेच्या रूपानेंहि अहंकाराचा व्यावहारिक उपयोग आहे कीं नाहीं ? या दृष्टीनें अहंकार या शब्दाचा अर्थ ' अभिमान ' असा आपण घेऊं, व फिरून तोच प्रश्न कीं प्रथम मनुष्यमात्रानें स्वतःच्या व्यक्तीचा अभिमान तर धरलाच पाहिजे ! पण या पलीकडे जाऊन आपला अभिमान सोडून इतर अभिमान त्यानें धरणें योग्य होईल कीं नाहीं ? कारण एका बाजूस तो केवळ एकट्या स्वतःच्या व्यक्तीपुरताच अभिमान धरील तर तो फुकट जाईल; त्यापासून कांहीं कार्य होणार नाहीं. उलट दुसऱ्या टोकाला जाऊन जगांतील यच्चयावत् मनुष्यमात्राचा मी अभिमान धरीन असें जर तो म्हणेल, तर तेंहि वेगळ्या कारणाकरतां फुकट जाईल. त्यापासूनहि कांहीं लाभ होणार नाहीं. मनुष्य हा स्वार्थी असतो हें उघडच आहे. तो

सर्वांच्या आधीं आपला जीव जगवील, किंवा सर्वांच्या आधीं आपला अभिमान धरील, असें सकृद्दर्शनीं वाटतें व बहुतांशीं तें खरेंहि असतें. म्हणून त्याचें विवेचनच करावयाला नको. परंतु मनुष्य हा केवळ स्वार्थीच असतो असें नाहीं. भावनावश झाल्यानें कदाचित् तो स्वार्थी होण्याऐवजीं परार्थीहि होऊं शकेल. याविषयीं उलटसुलट उदाहरणें देतां येतील. बिरबलाच्या गोष्टींत, " सबसे जीव प्यारा " हें सिद्ध करण्याकरतां बिरबलानें हौदांत एक वानरी तिच्या मुलासह सोडली; आणि हौदांत हळुहळू पाणी भरण्यास सुरवात केली. वानरीच्या गळ्याला भिडण्याइतकें पाणी वर चढे-पर्यंत तिनें आपलें मूल प्रथम खांद्यावर व मग डोक्यावरही ठेवलें, व त्याचा प्राण वांचविण्याचा प्रयत्न केला. पण स्वतः तिच्याच तोंडांत पाणी शिरून जीव गुदमरूं लागला तेव्हां, तेंच मूल पायांखालीं घालून त्याच्यावर ती उभी राहिली म्हणे ! हेतु हा कीं ओंठाजवळचें पाणी चार बोटें खालीं उतरून आपला तरी प्राण वांचावा. ही झाली एका दृष्टीची गोष्ट. पण मुलाकरतां आईबाप, किंवा आईबापाकरतां मुलें, किंवा मित्राकरतां मित्र, किंवा धन्याकरतां चाकर, किंवा राष्ट्राकरितां व्यक्ति, आपला जीव देण्याला तयार होते अशीं उदाहरणेंही आढळतातच. याच्याहि पलीकडे जाऊन सतीचें उदाहरण घेतलें तर तेथें दुसऱ्याचा जीव वांचविण्याची आशा नसते; पण गेलेला नवऱ्याचा जीवच पत्नीला इतका प्यारा असतो कीं, तो परत येत नाहीं, तरी त्याबरोबर आपलाहि जीव जावा म्हणून सती आत्मयज्ञ करते. यावरून हें सिद्ध होतें कीं, सामान्य स्थितींत अहंकारामुळें मनुष्य जरी आपलाच अभिमान धरील, तरी विशिष्ट परिस्थितींत तो आपणाहून इतरांचाहि अभिमान धरूं शकेल. आणि या इतरांची क्रमानें रांग लावली तर ती खालीलप्रमाणें लागेल:—स्वतः मनुष्य, नंतर त्याचे अगदीं जवळचे आप्त, नंतर त्याचें कुळ किंवा घराणें, नंतर त्याची जात, नतर त्याचा गांव, नंतर त्याचा प्रांत, नंतर त्याचा देश, व नंतर सर्व देश किंवा राष्ट्रें समाविष्ट झालेली पृथ्वी किंवा मनुष्यसमाज. या शिडींतील कोणत्या पायरीवर पाय ठेवून मनुष्यानें म्हणावें कीं, या ठिकाणचा मीं अभिमान धरला तोच बरोबर आहे, योग्य आहे ! म्हणजे याच्या खालीं उतरून मी अभिमान धरीन तर तो कृपणपणा होईल, माझी दृष्टि क्षुद्र

ठरेल ! आणि त्याच्यावर चढून मी अभिमान धरीन तर मला तो सक्रिय करतां येणार नाहीं ! म्हणजे तो अभिमान मला उदार हें नांव मिळवून देईल तरी परिणामाच्या दृष्टीनें निष्फळ, निरुपयोगी ठरेल. तेव्हां विचार कर कीं, मनुष्यानें या चढत्या ओळींत कोठें उभें राहून, पाय रोवून, मीं योग्य अभिमान धरला असें म्हणावें ?

माझ्या प्रश्नाचें उत्तर देतांना " मी मनांत फार गोंधळलों " असें वाचका, तूं म्हणशील त्याचें मला आश्चर्य वाटत नाहीं. तुझ्यासारखेच गोंधळलेले किती तरी लोक मीं पाहिले आहेत. आणि मी स्वतःहि गोंधळून जातों. याचें प्रत्यंतर हेंच कीं, केव्हां केव्हां गमतीनें डोळे मिटून मी हा प्रश्न मला स्वतःला विचारतों तेव्हां, निरनिराळीं उत्तरें दिलेलीं स्मरतात.

अहंकाराचे दोन अर्थ मागें तुला सांगितलेच. पैकीं " सृष्टी उत्पन्न करणारी शक्ति " म्हणजे " आपण व इतर यांचा वेगळेपणा मनांत प्रस्थापित करणारी शक्ति " असा त्याचा अर्थ घेतला, तर त्याबद्दल सर्वांचें एकमत असतें. कारण बरें किंवा वाईट असें नांव ठेवून मतभेद होण्याला या प्रकारच्या अहंकारासंबंधानें वावच नाहीं. हा अहंकार ईश्वर-निर्मित आहे, म्हणून तो घेऊन चालल्याशिवाय गत्यंतरच नसतें. या अहंकारासंबंधानें तत्त्वज्ञानी असें म्हणतात कीं, हा अहंकार मूळ ईश्वर उत्पन्न करतो. त्यामुळें मनुष्याला व्यक्तिरूपानें आपण इतर सर्वांहून वेगळे आहों असें वाटतें हें खरें. तथापि त्या अहंकाराचें कार्य पूर्ण झाल्यावर, किंवा त्यापूर्वींदेखील, तो अहंकार आपला आपण नष्ट करण्याची शक्ति ईश्वरानें मनुष्याला दिली आहे. म्हणून ज्याला हा वेगळेपणा नकोसा वाटत असेल, किंवा ज्याला मुक्ति मिळविण्याची इच्छा झाली असेल, त्यानें हा अहंकार हरप्रयत्नानें नष्ट करावा. म्हणजे मनुष्य या जन्मांत मुक्त होतो, किंवा देहबंध तुटल्यावर तरी त्याला परमार्थाची मुक्ति मिळते.

पण हा सगळा विषय धार्मिक स्वरूपाचा किंवा तत्त्वज्ञानाचा, म्हणून तो बाजूला ठेवूं आणि अहंकाराचा जो दुसरा अर्थ तो घेऊं. या अर्थानें अहंकाराला ' अभिमान ' असें म्हणतात. आणि अभिमान हा चांगल्या प्रकारचा असेल तसाच तो वाईट प्रकारचाहि असेल हें उघडच नाहीं

काय ! अर्थात् या दृष्टीनें पाहतां अहंकार तत्त्वज्ञानांतून निघून नीतिशास्त्रांत येऊन बसतो. नीतिशास्त्र म्हणजे, मनुष्य जें काय करतो तें बरें किंवा वाईट हें ठरविण्याचें शास्त्र. धर्माच्या दृष्टीनें जसें पुण्य व पाप हे शब्द लावतात, तसेंच नीतीच्या दृष्टीनें बरें व वाईट हे शब्द लावतात. हें बरें किंवा वाईट ठरविण्याची खूण सामान्यपणें एकच. ती म्हणजे कोणतेंहि काम मनुष्य करतो तें चांगल्या बुद्धीनें करतो कीं वाईट बुद्धीनें करतो ? पण फिरून ' चांगला ' व ' वाईट ' हे मोघम शब्द आले तेव्हां त्यांचाहि खुलासा असा कीं, मनुष्य आपल्या ज्ञानाप्रमाणें जें इतरांच्या उपयोगी पडणारें असें असेल तें आणि तेंही फिरून निःस्वार्थी बुद्धीनें करतो तें चांगलें; आणि जें याच्या उलट तें वाईट. यांपैकीं जें वाईट तें करण्याचा अभिमान वाईटच हें सांगावयालाच नको. कांहीं लोकांवर ईश्वराची अवकृपा असून त्यानें त्यांना दुष्ट बुद्धि दिलेली असते. यामुळें दुसऱ्यांना उपद्रव देण्याचीं कृत्यें करण्यांतच त्यांना हौस वाटते; व ती हौस पुरवितां पुरवितां आपलें व लोकांचें अहित करण्यांत ते जन्म घालवितात. खून करणें, दरोडे घालणें, सूड घेणें, दुसऱ्यावर संकट आणून त्याची मौज पाहाणें, असलीं कामें करण्यांत " मी इतरांहून श्रेष्ठ आहे " असा एक प्रकारचा ' अभिमान ' च त्यांच्या ठिकाणीं उत्पन्न होतो. अर्थात् अहंकाराचें हें वाईट, विकृत, भेसूर असें स्वरूप होय.

आतां चांगला 'अभिमान' तो कसा असतो हें पाहूं. या चांगल्या अभिमानांत सर्वांत खालच्या पायरीचा अभिमान म्हटला म्हणजे, दुसऱ्याला उपद्रव न देतां, अपहार न करितां, केवळ आपल्यापुरतें कल्याण आपण करून सुखी होण्याचा अभिमान. अशाच प्रकारच्या कनिष्ठ पण चांगल्या अभिमानाचे पुष्कळसे लोक आपणाला पाहावयाला सांपडतात. जगांत अतिशय चांगल्या लोकांची संख्या जशी कमी, तशीच अतिशय वाईट लोकांचीहि संख्या कमीच. पुष्कळशी संख्या या मध्यम वर्गांतील लोकांची असते. म्हणजे दुसऱ्यांना उपद्रवकरणारेहि नव्हेत, पण दुसऱ्यावर उपकार करणारेहि नव्हेत. आपलेंच कल्याण करणारे, पण निरपवाद रीतीनें करणारे.

चांगल्या अभिमानाची ही कनिष्ठ पायरी सोडून थोडें वर जाऊं

म्हणजे असें आढळेल कीं, स्वार्थापलीकडे जाऊन परोपकार करणारांच्या मध्येंहि दोन प्रकार असतात. पैकीं एक राजस अभिमान्यांचा, आणि दुसरा त्याहून श्रेष्ठ म्हणजे सात्त्विक अभिमान्यांचा. राजस अभिमानी हा परोपकारच करील व त्याकरितां अवश्य तर स्वार्थहि कांहीं बुडवून परोपकाराच्या भरीला घालील. परंतु "हें सर्व मीं केलें" असा अभिमान मनांत धरील किंवा प्रकटहि करील. पुष्कळशा परोपकारी कृत्यांना स्वतःच्या स्मारकाचेंच रूप लोकांनीं दिलेलें आढळेल ! फारतर हें स्मारक ते आपला गुरु, आपले आईबाप, आपले मित्र, किंवा आपलें घराणें यांच्या स्मरणार्थ करतील पण तें स्मारक 'मीं अमक्यानें केलें' असेंहि प्रकट करतील. म्हणजे एक वळण किंवा वळसा घेऊन कां होईना पण, अहंकारच प्रकट करतील. धर्मशाळा, पाणपोया, ग्रंथालयें, वाचनालयें, सदावर्तें, दवाखाने, देवळें, सभामंडप, देवळांच्या पायऱ्या इत्यादि अनेक कामें लोकोपयोगार्थ परोपकारबुद्धीनेंच धनिक लोक करतात. परंतु त्यांत स्वतःचें नांव गोवल्याशिवाय राहात नाहींत. म्हणजे त्या परोपकाराच्या मुळांत स्वतःची कीर्ति, स्वतःचा लौकिक व्हावा अशी स्वार्थी बुद्धि असते हें उघड आहे. आतां कीर्तीची चाड ही स्वार्थी असली तरी अन्यायमूलक नाहीं. लौकिक दृष्टीनें कीर्ति मिळविणें हा पुरुषार्थही मानला जातो. आणि जगांतील बहुतेक परोपकार हें मनुष्याच्या राजस अभिमानाचें फळ होय.

शेवटीं याहीवरची चांगल्या अभिमानाची पायरी म्हणजे सात्त्विक अभिमानाची. अशा अभिमानाचें सहज पटणारें उदाहरण म्हटलें म्हणजे गुप्तदान करणारांचें. आणि जगाला कुत्सित बुद्धीनें कोणी कितीही नांवें ठेवलीं तरी, त्या जगांत गुप्तदान करणारे लोक पूर्वीं होऊन गेलेच व आजहि नाहींत असें नाहीं. अर्थात् त्यांची संख्या थोडी असेल आणि त्यांत नवल नाहीं. कारण सर्वोत्तम कोटींतील लोक केव्हांहि थोडेच असावयाचे. पण वाणगीपुरतां का होईना, सात्त्विक अभिमान म्हणून जगांत कांहीं आहे ही गोष्ट आनंद मानण्यासारखी नव्हे काय ? या गुप्तदान करणाऱ्या लोकांनाहि मनाचें समाधान हा मोबदला मिळतोच असें कोणी म्हणेल. पण त्याला नांवें ठेवतां येत नाहींत. कीर्तीची इच्छा आणि शुद्ध मनः समाधान साधण्याची इच्छा यांत नैतिक दृष्ट्या फरक आहेच कीं नाहीं !

असो. अहंकार व अभिमान याचें हें थोडेंसें तात्त्विक विवरण केल्यावर आतां पूर्वी विचारलेल्या नक्की प्रश्नाकडे वळतों. प्रियवाचका, अभिमान धरण्यासारख्या पदार्थांची चढत्या पायऱ्यांची शिडी मीं तुझ्यापुढें उभी केली; यापैकीं कोणत्या पायरीवर चढून तूं बसणार, स्थिर होणार ? व हेंच स्थान बसण्याला योग्य असें म्हणणार ? या प्रश्नाचें तूं उत्तर देणारच कीं, "देशभिमाना" ची पायरी हीच या शिडींतील लौकिक दृष्ट्या सर्वांत उत्तम पायरी, तेंच सर्वांत उत्तम स्थान. हें उत्तर देण्याला तुला इतकाहि वेळ कां लागावा हें समजत नाहीं. कारण सर्व लौकिक जगांत आज देशाभिमान हाच शुद्ध हवेंत वावरतो, खेळतो आहे. ध्येयवादी, तेजस्वी तरुण पिढी ही कांहीं कांहीं बाबतींत आपल्या देशाच्याही पलीकडे जाऊन पाहूं लागली आहे हें सुचिन्ह होय. तथापि स्वाभिमानाची गांठ ते प्राय: देशाच्या नांवानें ठोकलेल्या खुंटींशींच घालतात.

असें होण्याचें कारण व्यवहाराच्या चढत्याउतरत्या मांजणींत मध्यम माप हेंच सोयीचें असतें. गरीब मनुष्याला देखील पै व टक्के हे त्याज्य वाटतात, निदान तो ते आपल्या हिशेबांत धरीत नाहीं. उलट लाखो-पती धनिक लोक घेतले तरी त्यांचा सगळा व्यवहार हजार, दहा हजार रुपयांच्या नोटांनीं होऊं शकतो असें नाहीं. कोळवें, निळवें हीं मापें हातीं घेण्याला गरीब माणासालाही आवडत नाहींत. उलट खंडीचें माप हें कागदावर मांडून करण्याच्या धाऊक व्यापारांतच उपयोगी पडतें. म्हणून पैशाच्या व्यवहारांत जसा रुपया, किंवा गल्ल्याच्या व्यापारांत जसा शेर किंवा अधोली, त्याचप्रमाणें चांगल्या अभिमानाच्या व्यवहारांत देश हें मोजमापाचें किंवा गणनेचें सोयीचें साधन म्हणून मनुष्य स्वीकारतो. एकीकडे समाजांत राहिल्याशिवाय मनुष्याचें भागत नाहीं, म्हणून त्याला कांहीं दृष्टींनीं तरी केवळ व्यक्तीचा क्षुद्र व किरकोळ अभिमान टाकून देऊन आपल्या समाजाचा अभिमान धरावा लागतो. दुसऱ्या बाजूला त्याला सारें जग दिसतें; आणि चांगलेंच चिंतावयाचें व करावयाचें तर तें सगळ्या जगाचेंच कां करूं नये अशी थोर, उमदी, उदार आकांक्षा त्याच्या मनांत येऊं शकते. परंतु सर्व जग घेतलें तर तें अफाट. त्याची ठाशीव संघटना नाहीं. त्याचा शास्ता, नियंता एक नाहीं. यामुळें तें आपल्याच काय

पण आपल्या समाजाच्याहि ताब्यांत येऊं शकत नाहीं. आणि त्या अफाट क्षेत्रांत मनुष्याला आपल्या मनांतील गोष्ट अमलांत आणतां येत नाहीं. तसेंच स्वभाववैचित्र्य, बुद्धिवैचित्र्य, यांच्यामुळें आणि व्यावहारिक परिस्थितीमुळें, हितविरोध जागजागीं उत्पन्न होणार; त्यांची तोंडमिळवणी करणें कठीण जाणार. अशाहि दृष्टीनें मनुष्य जगाचा नाद अभिमानाच्या दृष्टीनें सोडून देऊन तो आपल्या देशावर येऊन ठरतो.

देश याचा अर्थ आधुनिक युगांत राष्ट्र असा आहे. आणि राष्ट्र म्हणजे तेंच कीं, ज्यामध्यें कांहींतरी एकमुखी राजकीय सत्ता नांदते व प्रभावी असते. येथेंही फिरून दोन टोकांना दोन प्रकारचे लोक आढळतात देशाचें, राष्ट्राचें नुकसान झालें तरी चालेल पण आपलें हित साधलें म्हणजे झालें असे पाहाणारे लोक जसे आढळतात, तसेंच आपल्याजवळचीं परोपकाराचीं साधनें देशापलीकडे जाऊन सर्व जगाच्या कामीं खर्चणारे महात्मेही आढळतात. पहिल्या प्रकारच्या लोकांचीं उदाहरणें देण्याचें कारण नाहीं; तीं पहावें तिकडे थोडीं बहुत आढळतातच. पण मुंबईच्या कोणी एका टाटा वाडियाचें उदाहरण दुसऱ्या टोकाचें म्हणून असें देतां येईल कीं, त्या गृहस्थानें कोट दोन कोट रुपयांचा ट्रस्ट केला; व त्याचा हेतु हा कीं, जगाच्या पाठीवर कोठेंहि एखाद्या उत्पातानें कोणा समाजाला विशेष हानि पोंचली, सर्वनाश झाला, तर तें दुःख निवारण करण्याकरतां या द्रव्यनिधीचा विनियोग ट्रस्टींनीं करावा. हा मनुष्य, हा अलौकिक दाता, खराच विश्वकुटुंबी नव्हे काय ? जगांतील साधुसंतहि याच वर्गांत पडतात. म्हणजे ते जी पुण्याई संपादितात तिचा उपयोग सर्व जगाला व्हावा, अशीच त्यांचीं इच्छा असते. अमुक जाति, अमुक समाज, अमुक देश, अमुक राष्ट्र ही भाषाच त्यांना समजत नाहीं.

---

## आन्हिक २ रें

# अहंकार व अभिमान

असो. मग व्यवहाराच्या सोईचें म्हणून चांगल्या अभिमानाकरतां असें मधलेंच एकादें ठिकाण मनुष्य निवडून काढतो तें कां ? याचें उत्तर हेंच कीं, आपल्या साधनांचा, आपल्या संपत्तीचा, आपल्या पराक्रमाचा उपयोग परोपकारबुद्धीनें केला तरी, त्याचा चांगला परिणाम म्हणजे सदुपयोग झालेला प्रत्यक्ष आपल्या डोळ्यांना कांहींतरी दिसावा अशीच त्याची इच्छा असते. याविषयीं एक उदाहरण तुझें समजूनच देतों. समज, तुझ्या हातांत साखरेचा एक मोठासा खडा आहे, व त्याचा उपयोग आपल्या मनाप्रमाणें करण्याला तूं स्वतंत्र आहेस. अशा स्थितींत तुझ्याकडून त्या साखरेच्या खड्याचे तीन उपयोग संभवतात. एक, तो खडा स्वतः तूंच खाऊन आपलें तोंड गोड करूं शकशील. पण यांत आपण विशेष तें काय केलें असें तुझें तुलाच वाटेल ! दुसरा एक उपयोग, मात्र केवळ कल्पना करतां येण्यासारखा, असा कीं, त्या साखरेच्या खड्याचा उपयोग तुझ्या आवाक्यांतील जास्तींत जास्ती लोकांना करून देण्याची लहर तुला आली तर तूं तो खडकवासल्याच्या तळ्यांत टाकशील, व मनांशीं असा हिशेब करशील कीं, या खडयाचे परमाणू पाण्यांत मिसळून पुणें शहरांतील लोकांच्या घरोघरच्या तोट्यांचें पाणी कांहीं थोडें तरी गोड करतील. हा दुसरा उपयोग अगदीं विक्षिप्तपणाचा होय, पण तो केवळ प्रस्तुत विषयाची चर्चा समर्पक करण्याकरतांच सांगितला. अशी वेडाची लहर तुला कधींही येणार नाहीं हें मला पक्कें माहीत आहे, पण हा साखरेचा खडा स्वतः न खातां किंवा खडकवासल्याच्या तळ्यांत न टाकतां त्याचा तिसराहि एक उपयोग करतां येण्यासारखा आहे तो सांगतों. आणि वरील दोन्ही प्रकार टाकून या तिसऱ्या प्रकारचाच तूं अवलंब करशील अशी माझी खात्री आहे.

हा प्रकार असा कीं, एखादें गरीब भिकाऱ्याचें मूल तुला दिसेल तर त्याला तो साखरेचा खडा तूं देशील, व तो मटकवतांना त्या मुलाला झालेला आनंद पाहून तूं समाधान मानशील; किंवा घरच्याच मुलानें कडू औषध घेतलें आहे असें पाहून त्याचें तोंड गोड करून कडूपणा काढून टाकण्या-

करतां तो खडा तूं त्याला देशील. या शेवटच्या उदाहरणांत, खडकवासल्याच्या उदाहरणाप्रमाणेंच, स्वार्थ न साधतां किंबहुना त्याचा त्याग करून परहित साधण्याची दाखविलेली बुद्धि तीच असतां, प्रत्यक्ष कृति करतांना तूं मुख्यत: काय पाहिलेंस ? तर हेंच कीं, आपल्या हातीं साधन आहे तें कितीसें ? व त्याचा उपयोग कोणत्या रीतीनें केला असतां त्या साधनाचा प्रत्यक्ष उपयोग झालेला आपल्याच डोळ्यांनीं आपल्याला पहावयास सांपडेल ? आणि हें उदाहरण डोळ्यांपुढें ठेवलें म्हणजे, अभिमान कशाविषयीं धरला तर तो चांगला या सदराखालीं पडेल, योग्य असें नांव त्याला मिळेल, हें सहज समजून येईल. गणितांत जशी रीति सांपडली म्हणजे त्या जातीचें कोणतेंहि उदाहरण सुटतें, किंवा बीजगणितांत फॉर्म्युला ठरला म्हणजे कोणत्याहि रकमांचें उत्तर त्यांतून मिळतें, तसाच योग्य अभिमानाविषयीं मीं तुला ही रीतीच सांगितली किंवा फॉर्म्युलाच बनवून दिला असें समज.

स्वतःच्या व्यक्तींपासून सुरुवात करून देश किंवा राष्ट्र येथपर्यंत पोंचण्यालाहि वाटेंत अनेक पायऱ्या लागतात. त्या प्रत्येकीचा उपयोग ज्यांत आहे असें उदाहरण देतां येतें, व त्या प्रत्येक पायरीवर उभें राहून धरलेल्या किंवा गाजविलेल्या अभिमानाचा योग्य उपयोग होऊं शकतो. कसें तें पहा. समज तुझें नांव श्रीधर. हें नांव कानाला गोड लागतें म्हणून वाटेल तर तूं त्याचा अभिमान धर. पण ती निवळ पोरभावना. पण कोणत्याहि कायदेशीर व्यवहारांत इतरांना वगळण्याकरितां तुझें व्यक्तिनामच तुला उपयोगी पडतें. तेव्हां त्या नांवाचा अभिमान योग्यच झाला. तीच गोष्ट कुळाच्या नांवाची. आपल्या कुळांत, आपल्या घराण्यांत चांगले लोक होऊन गेले असा अभिमान धरणें योग्य. त्यांत दुसऱ्याची हानि नाहीं. किंवा दुसरा कोणी तुझ्या घराण्याची निंदा करील तर आपल्या कुळाचा अभिमान धरून तूं त्याच्याशीं भांडावें व वाद जिंकावा हेंहि योग्य. अशाच रीतीनें पुढें पुढें गेलें असतां प्रौढी मिरविण्याकरितां धरलेला अभिमान त्याज्य, पण उपयोगी करण्याकरतां धरलेला अभिमान ग्राह्य असें समजावें. ज्या स्थितींत आपण जन्मलों त्या स्थितीचा अभिमान आपण न धरला तर दुसरा कोण धरील ? प्रत्येक स्थिति नीट रक्षणानें जतन व्हावी याकरितां

ईश्वरानें मनुष्याला अहंकार दिला आहे. म्हणून त्या अहंकाराचा उपयोग, त्या स्थितीचें रक्षण, संवर्धन व सुधारणा हीं करण्याकडे झाला तर तो वावगा नाहीं. इंग्रजींत एक म्हण आहे कीं, प्रत्येक पेन्साची काळजी घेतली म्हणजे एकंदर पौंडाची काळजी घेण्याचें कारण नाहीं, ती आपोआप घेतलीच जाते. प्रत्येक पै सांभाळली म्हणजे रुपया वेगळा सांभाळावा लागत नाहीं. त्याप्रमाणें देश काय, राष्ट्र काय, घराणें काय—यांचें संरक्षण, संवर्धन व सुधारणा व्हावयाला हवी तर त्या देशांत, त्या राष्ट्रांत, त्या घराण्यांत उत्पन्न झालेल्या प्रत्येकानें त्या त्या गोष्टीचा अभिमान धरला पाहिजे. ज्या एका स्थितींत आपण जन्माला आलों तिचा अभिमान टाकून दुसऱ्याच कुठल्या तरी स्थितीचा अभिमान आपण धरूं लागलों, तर अनवस्था प्रसंग यावयाचाच. हा परधार्जिणेपणा काय कामाचा ? न्यायबुद्धीनें किंवा उपयोगाच्या बुद्धीनें या परधार्जिणेपणाचें समर्थन करितां येत नाहीं. पण हा अभिमान धरतांना आपली प्रौढी मिरवून दुसऱ्याला नांवें ठेवण्याची बुद्धि असतां कामा नये; तर केवळ उपयोगाचीच दृष्टि असली पाहिजे. शक्तिशास्त्रांत असा नियम आहे कीं, कोणतीही शक्ति किंवा जोर हा परिणामकारक व्हावयाचा तर त्याला मुळांत कांहींतरी स्थिर आधार लागतो. आणि तो आधार मिळाला म्हणजे त्या शक्तीचें कार्य होतें, एरव्ही होत नाहीं. यंत्रशास्त्रांत या आधाराला इंग्रजींत 'फल्क्रम' हा शब्द आहे तो तुला माहीत असेलच. समजा, आपणाला घराची तुळई उचलावयाला वासा उपयोगांत आणावयाचा आहे, तर तो मध्यें उंबऱ्यावर टेकून मग त्याच्या दुसऱ्या टोकावर जोर द्यावा लागतो. त्याचप्रमाणें आपल्या धार्मिक, नैतिक, शारीरिक, आर्थिक शक्तीचा परोपकाराच्या दृष्टीनें उपयोग करावयाचा असल्यास, जेथें आपली आवड चिकटेल तेथें त्या शक्तीला आधार देऊन तिचा उपयोग केला पाहिजे. हल्लीं आपण पाहातों कीं, जातवारीचा अभिमान पुष्कळच बोकाळला आहे. आपल्या जातीपलीकडे पाहाण्याइतकें ज्यांचें मन थोर झालें ते अर्थात् धन्यच होत. पण ज्यांच्या मनाची तयारी तितकी झालेली नसेल त्यांनीं निदान आपल्या जातीकरतां का होईना, पण परोपकारबुद्धीनें दानधर्म करावा, देणग्या द्याव्या, संस्था स्थापाव्या, संघटना करावी व

सार्वजनिक कार्य आरंभावें. आणि असें झाल्यास मी तरी त्या जातवारीचा अभिमान धरणाऱ्याला नांवें ठेवणार नाहीं. आपल्या प्रांतांतील पुष्कळशा शाळा, वसतिगृहें, वाचनालयें, शिष्यवृत्त्या या जातीच्या अभिमानानेंच अस्तित्वांत आलेल्या आहेत. अशा ठिकाणीं आपण हें पहावें कीं, या कामावर या दृष्टीनें कोणीं आपला पैसा व शक्ति खर्च केली ती, जर याहून मोठ्या कार्यावर खर्च करण्याची बुद्धीच त्याला ईश्वरानें दिली नसेल तर त्यानें केलें हेंच चांगलें म्हटलें पाहिजे. 'चोराच्या हातची लंगोटी' म्हणतात तोच न्याय येथें लावावा. चोर सगळेच घेऊन जाणार होता व आपणाला सर्वस्वीं नागविणार होता, तेव्हां त्याच्या हातून लंगोटी हिस-कावून घेतां आली, तिनें आपल्या शरीराची तरी लाज राखतां आली हें काय थोडें झालें ? त्याप्रमाणें हा अमुक मनुष्यजातीचा अभिमान धरतो म्हणून जातीकरतां तरी परोपकार करण्याला तयार होतो, एरव्हीं तोहि तयार झाला नसता, आणि आपला सगळा पैसा, आपली सगळी शक्ति त्यानें स्वार्थावरच खर्चिली असती. तेव्हां निदान जातीचा अभिमान धरून त्यानें केलें तें बरेंच म्हणावें ! जो आपलें धन (सर्व प्रकारचें धन) केवळ आपल्या कारणींच खर्च करतो त्याला हिंदुनीतिशास्त्रांत चोर असें म्हटलें आहे. तेव्हां त्या चोराच्या हातून जातिनिष्ठेमुळें, जातिप्रेमा-मुळें, झालेला परोपकार ही त्या चोराच्या हातून परत मिळविलेली लंगोटीच कीं नाहीं ! ही लंगोटी त्या मर्यादित बुद्धीच्या परोपकारानें एका प्रकारें माणुसकीचीच लाज राखते म्हणावयाची. नीतीची दृष्टि सोडून उपयोगाची दृष्टि घेतली, तरी मर्यादित क्षेत्र हें अमर्याद क्षेत्रापेक्षां अधिक बरें असेंहि सिद्ध करतां येईल. शेतकऱ्याजवळ सलग अशी पुष्कळ जमीन असली तरी त्या सर्वाला कुंपण घालणें त्याला शक्य नसतें; म्हणून एखादी सोईची लहानशी जागा पाहून पसंत करून तो तिच्यापुरतें कुंपन घालतो, व तींत भाजीपाला फळफळावळ पिकवितो. कुंपण लहान जागेला घातलें हा बाकीच्या जागेला अन्याय झाला असें तात्त्विक दृष्टीनें हवें तर म्हणावें. पण कुंपण लहान घातलें म्हणून तें चांगलें घालतां आलें; आणि तें चांगलें घालतां आलें म्हणूनच आंतील पिकाचें, भाज्यांचें, फळांचें संरक्षण त्याला करतां आलें, तेव्हां तें योग्यच झालें असें म्हटलें पाहिजे.

कार्याला मर्यादा आखून घेणें ही सगळ्या कामांत पहिली महत्त्वाची गोष्ट असते. याच दृष्टीनें खोलींत कुलूप लावून आपण कपाटांत, पेटींत कागदपत्र व मौल्यवान जिनसा ठेवतों, घरांत खोल्या काढतों, घराबाहेर कंपाउंडाची भिंत घालतों. याच दृष्टीनें पूर्वी गांवांना गांवकुसवें व तटबंदीच्या भिंती असत. घरांतील कामेंहि वाटून दिल्यानें म्हणजे मर्यादा ठरल्यानें कोणाचें काम नक्की कोणतें हें समजते. व तें नीट संभाळलें-केलें जातें. स्थावर मिळकतीला तर चतुःसीमा ही पहिली महत्त्वाची गोष्ट होय. म्हणून रजिस्टर कचेरींत स्थावर मिळकतीसंबंधाचा कागद नोंदवावयाला नेला असतां चतुःसीमा घातल्या नसतील तर कागद नोंदविला जात नाहीं. एखादी कचेरी घेतली तर तींत दर कारकुनागणिक, दर अधिकाऱ्यागणिक कामें मर्यादा ठरवून नेमून द्यावीं लागतात. अशा मर्यादित खातेवारीशिवाय सरकारी कारभाराचें काम चालणारच नाहीं. धर्मामध्यें अशा मर्यादा असण्याचें कारण नाहीं असें कोणाला वाटेल. पण तेथेंहि उपयोगाच्या दृष्टीनें मर्यादा पडल्या-घातल्या तर त्यांत वावगें कांहीं नाहीं. निरनिराळ्या धर्मांना नांवें मिळालीं आहेत, त्यांतील कांहीं नांवें त्यांचे संस्थापक वेगवेगळे होते म्हणून. हिंदु-धर्मासारख्या एखाद्या धर्माला असुक एकच संस्थापक नाहीं हें खरें; तरी कांहीं कांहीं मर्यादांनीं व स्थूल लक्षणांनीं त्या धर्माचा इतर धर्मांपासून वेगळेपणा दाखवितां येतो. जातीच्या अभिमानाइतकाच धर्माचाहि अभिमान ताठर व जोरदार असतो. आणि एखादा धर्म घेऊन पाहिलें तरी त्यांत पुन्हां विषयमर्यादा व खातेवारी हीं आढळतातच. हिंदु धर्मांतील वर्णांच्या मर्यादा व आश्रमांच्या मर्यादा यांचा उपयोग अगदीं उघड आहे. या मर्यादा ओलांडून कोणी जाणार नाहीं किंवा कोणी जाऊंच नये असें मात्र नाहीं. कारण धर्माच्या खऱ्या व अंतिम कार्यांत वर्ण व आश्रम यांचें बंधन न पाळलें तरी तें कार्य सफळ होऊं शकतें. आपल्या संतमालिकेकडे पाहिलें तर वर्णांचा फाजील अभिमान राहूं शकत नाहीं. आश्रमव्यवस्थेंतील चारहि आश्रमांतून मनुष्यानें गेलेंच पाहिजे किंवा त्या आश्रमांचा क्रम संभाळलाच पाहिजे असें नाहीं. मी ब्रह्मचर्याश्रमांतच म्हणजे लग्न न करतां जन्म घालवीन असें कोणी म्हटलें तर त्यांत पाप नाहीं. किंवा

गृहस्थाश्रमांतून न जातां ब्रह्मचाऱ्यानें त्याच आश्रमांत संन्यास घेतला तरी बिघडत नाहीं. तथापि एकंदरीनें वर्णव्यवस्था व आश्रमव्यवस्था हीं सामान्य हिंदुजनांना मार्गदर्शक म्हणून उपयोगी आहेत. आणि शेतांतील कुंपण किंवा सरकारी कारभारांतील खातेवारी यांच्याप्रमाणें धर्मव्यवहारांतहि कार्यक्षेत्र मर्यादित करणें हें उपयुक्ततेच्या दृष्टीनें योग्यच ठरेल.

वरील सर्व विवेचनावरून हें तुझ्या लक्षांत येईल कीं, प्रत्येक मनुष्यानें विशेषतः तुझ्यासारख्या तरुणानें 'मी कोण?' हा प्रश्न स्वतःला विचारून त्याचें अशा रीतीनें उत्तर देण्याचा प्रयत्न अवश्य करावा. आणि ज्या स्थितींत आपणाला ईश्वरानें जन्माला घातलें त्या स्थितीचा म्हणजे कुटुंब, घराणें, जाति, धर्म व प्रदेश यांच्याविषयीं वर दर्शविल्याप्रमाणें ( आत्मस्तुति व परनिंदा यांच्या दृष्टीनें नव्हे, तर अधिकांत अधिक आपली उपयुक्तता सिद्ध करण्याच्या दृष्टीनें ) अभिमान अवश्य धरावा, व सात्त्विक किंवा राजसहि अहंकार अवश्य बाळगावा. त्यांत मनुष्याचें व जगाचेंहि कल्याणच आहे. अलीकडे असें पाहातों कीं, कांहीं लोकांना आपली जात व आपला धर्म हीं कबूल करण्याला जशी कांहीं लाज वाटते! उदाहरणार्थ, नोकरींत हल्लीं ब्राह्मणांना जागा देऊं नयेत असें धोरण अमलांत आहे, हें जाणून कित्येक अर्जदार आपली जात ब्राह्मण असूनहि ब्राह्मण हा शब्द न घालतां दुसरा कांहींतरी पर्याय शब्द घालतात. म्हणजे नुसते कोंकणस्थ, देशस्थ, किंवा नुसतें देवरुखे किंवा नुसतें सारस्वत असें लिहितात. हेतु हा कीं, अर्ज वाचणाराच्या मनांत हा अर्जदार 'ब्राह्मण' आहे अशी कल्पना न येतां ब्राह्मणेतर अशा शेंकडों जातींपैकीं एखाद्या जातीचा असावा अशी भलती समजूत व्हावी. कित्येक वेळां ही युक्ति साधते. पण अधिकाऱ्याची म्हणजे, अर्ज बहाल करणाऱ्याची नजर नुसती ओझरती नसून जर सूक्ष्म असली तर युक्ति साधत नाहीं. आणि नोकरीहि गेली आणि फुकट लबाडी पदरांत आली असें होतें. नोकरीकरतां अर्ज न करणारेहि कांहीं भित्रे लोक ब्राह्मण म्हणवून घेण्यास लाजतात. कारण यच्चयावत ब्राह्मणेतर जातींनीं ब्राह्मणांवर हल्लीं हत्यार उपसलेलें आहे, तेव्हां त्या संकटांत आपण न सांपडावें अशी त्यांची इच्छा असते. तसेंच सार्वजनिक कामांत पडणाऱ्या कांहीं लोकांना अलीकडे हिंदु म्हणवून घेण्याची

लाज वाटण्याची जशी कांहीं फॅशन पडली आहे. तिचें कारण असें कीं, "सरकार हिंदी लोकांना स्वराज्य देणार आहे, जसें कांहीं देण्याला अगदीं आतुर झालें आहे, पण हिंदी लोकांत जातिभेद फार माजला आहे आणि जातिभेद मानणारे लोक स्वराज्य चांगलें नांदवूं शकत नाहींत, म्हणून तें हिंदी लोकांना कसें द्यावें अशा विचारानें जसें कांहीं सरकार अडून बसलें आहे! तेव्हां ही जातीची अडचण काढून टाकली, धर्माची अडचण काढून टाकली, म्हणजे स्वराज्य रोकडें ठेवलेलें आहे!" अशी भोळी समजूत ते आपल्या मनाची करून घेतात. तें पाहून कोणाला हंसूं येणार नाहीं? तसेंच अलीकडे राष्ट्रीय सभेनें हिंदुमुसलमानांचा स्नेह घडवून आणण्याचा कसून प्रयत्न चालविला होता, तेव्हां मुसलमानांनीं स्वतःला मुसलमान म्हणवून घेतलें तरी हरकत नाहीं, परंतु हिंदूंनीं मात्र हिंदु म्हणवून घेतलें तर या स्नेहाच्या वाढीला व्यत्यय येतो अशी भोळी समजूत करून घेणारे हिंदु पाहाण्यांत आले. "हिंदु ही हिंदुस्थानांतील सर्वांत मोठी जात. तेव्हां इतर धाकट्या जातींना न्याय मिळावयाचा तर हिंदूंना संख्याबळानें आलेलें वर्चस्व काढून घेतलें पाहिजे, याकरतां हिंदूंनीं हिंदुत्व मिरवूं नये, किंवा त्याचा अभिमान धरूं नये" अशीहि एक विचारसरणी दिसून येते. पण वरील सर्व गोष्टींत असमंजसपणाच आहे. हिंदु समाज हा संख्येनें मोठा असला म्हणून आपलेपणाचा अभिमान बाळगण्याला त्याला हरकत असूं नये. कारण आत्मप्रीति म्हणजे इतर सर्वांचा द्वेष असें नाहीं. किंवा आत्मप्रीतीची सफलता इतरांना अन्याय करूनच होते असें नाहीं. संख्या व गुण या दोन्ही दृष्टींनीं पाहतां सगळे समाज बरोबरीचे असणें, हें कोठें व केव्हांहि शक्यच नाहीं. पण असें असतांहि एकामुळें दुसऱ्याला अन्याय न व्हावा अशाविषयीं, स्वतः हे समाजच आपल्या समंजसपणानें, किंवा ज्या त्या राष्ट्रांतील सरकार आपल्या अधिकारानें, शक्य तितक्या योग्य तजविजी करीतच असतात. म्हणून त्याकरितां ज्या त्या जातीनें किंवा समाजानें आपलेपणाची योग्य भावना किंवा अभिमान टाकून देण्याचें कारण नाहीं.

जगांतील इतर समाजांत आपल्या इकडल्यासारखे जातिभेद नाहींत तरी ते इतर दृष्टींनीं आपापला वेगळेपणा मानतात, आणि आपापल्या

समाजाचा अभिमान बाळगतात. कारण सार्वजनिक व्यवहारांत व्यत्यय न येईल अशा रीतीनें आपलेपणाचा अभिमान बाळगतां येतो हें त्यांना ठाऊक आहे. एका इंग्लंडांत इंग्रज, स्कॉच, आयरिश व वेल्स इतक्या जातींचें मिश्रण तर झालेलेंच आहे. पण याशिवाय युरोपांतील इतर जातींचें मिश्रण ज्याच्या जुन्या पिढींत केव्हांतरी झालेलें आहे अशींहि घराणीं इंग्लंडांत आहेत, तथापि बाप, आजा, पणजा या क्रमानें ठरणारा आपला पितृवंश हाच जातिनामासंबंधानें निर्णयात्मक असें लोक समजतात. आणि या दृष्टीनें इंग्रज स्वतःला इंग्रज, स्कॉच स्वतःला स्कॉच, आयरिश स्वतःला आयरिश, व वेल्श स्वतःला वेल्श असेंच अभिमानानें म्हणून घेतो. एवढेंच नव्हे तर त्याच्या जातीच्या अभिमानाच्या मूळांत अनेक गोष्टी पाहावयास सांपडतात. त्या म्हणजे भाषेची लकब, पोशाख पेहेरावांतील एखादी लहानशी सूचक गोष्ट, घरांतील चालीरीति सार्वजनिक सण व उत्सव इ.

असो. या अभिमानासंबंधानें शेवटीं एकच गोष्ट सांगावयाची ती ही कीं, अभिमान बाळगावयाचा तो मात्र दोषांना अनुलक्षून नव्हे तर फक्त गुणांना अनुलक्षून. दोष पक्के दृढमूल करण्याकरतां नव्हे; तर ते घालवून सुधारणा करण्याकरतां. सुधारणा करणें, अधिक सुस्थितीला येणें हें मनुष्यमात्राचें ध्येय असलेंच पाहिजे. पण अभिमानाला माफी इतकीच कीं "या माझ्या ध्येयवादित्वाचा फायदा जर मी आधीं कुणाला करून देईन तर तो आपल्या जातीला" . इंग्रजींत 'चॅरिटी बिगिन्स ॲट होम' अशी एक म्हण आहे तिचा अर्थ हाच कीं, "आपणांत जी काय धर्मबुद्धि, जें काय दाक्षिण्य असेल त्याचा फायदा प्रथम आपल्या घराला व नंतर क्रमानें आपल्या घराण्याला, देशाला व जगाला व्हावा. " दोन घरें झाडून साफ करून त्यांतील घाण काढण्याची शक्ति आपल्या अंगीं असेल तर आपल्या घराशिवाय दुसऱ्या एखाद्याचेंहि घर साफ करावें. पण आधीं आपलें न करतां जो दुसऱ्याचें करील तो मूर्ख ठरेल. त्यानें परोपकार केला असें म्हणण्यापेक्षां परोपकार मिरविला असेंच म्हणणें अधिक योग्य होईल. कारण आपला समाज घेतला तरी त्यांतील उणीवा, दोष इतके असतील कीं, ते काढून टाकण्याला एकाच वेळच्या अनेक व्यक्ती पुरणार नाहींत तर कदाचित् अनेक पिढ्यांहि लागतील. शिवाय एका बाजूनें सुधारणा

होत असतां दुसऱ्या बाजूनें नवे दोष येऊन चिकटत असतात. म्हणून आपल्या समाजाची सुधारणा प्रथम करण्याचें काम कोणत्याहि पिढीला शिल्लक उरणारच.

प्रिय वाचका, वरील सर्व चर्चेनें तुला आतां " मी कोण ? " या प्रश्नाचें उत्तर चांगलें देतां येईल. म्हणजे कुणाबद्दल आपलेपणा बाळगावा व तो कां हें तुला कळेल व तो आपलेपणा स्पष्ट बोलून दाखविण्यास तुला धीरहि येईल. पण आपलेपणा हा एखाद्या मोठ्या जाळ्याप्रमाणें आहे. अनेक धागे गांठविल्यानें खंबिरी येते, तसेंच पाय अडकून पडण्यालाहि जाळ्यांत तितक्या अनेक जागा निर्माण होतात. सर्वांत धाकटें जाळें म्हणजे कुटुंब. यांत अनेक माणसांचा समावेश निरनिराळ्या नात्यांनीं झालेला असतो. हीं अनेक नातीं म्हणजे एक प्रकारचे प्रेमपाश होत. पण त्यामुळें एकमेकांना जशी खंबिरी येते, तसा दुसऱ्या दृष्टीनें कमकुवतपणाहि येतो. घरांतील नात्याचीं माणसें कर्तीं, सद्गुणी, अब्रूदार निघालीं तर तें केवढें बळ ! पण उलट त्यांतील जितकीं जितक्या मानानें कर्तृत्वहीन, दुर्गुणी किंवा बेअब्रूकारक निघतील तितका त्यांतील चांगल्या माणसाला कमीपणा म्हणजे कमकुवतपणाच येतो. नात्यांतील माणसासंबंधानें एका बाजूनें आपणाला हक्क प्राप्त होतात, पण दुसऱ्या बाजूनें त्याच्यासंबंधीं तितकींच कर्तव्यें चिकटतात किंवा लादलीं जातात. आणि यामुळें हक्कांचा मोबदला द्यावा लागतो म्हणजे त्यांचा वचपा निघतो.

पण अशी ही गुंतागुंत आहे म्हणून कोणाही माणसाला अगदीं एकटें असें जगांत राहवणार नाहीं व राहून त्याचें भागणारही नाहीं. जगांतील अगदीं रानटीहि लोक घरें कुटुंबें बाळगून राहतात. उलट अलौकिक किंवा आध्यात्मिक दृष्टीनें अत्यंत परिणाम पावलेला हिमालयांतील तपस्वी याचें देखील जीवन सर्वस्वी एकाकी असूं शकत नाहीं. त्याला स्वतःचें कुटुंब नसलें तरी शिष्य, भक्त, भजक हे कोणी असतातच. त्यांचा संपर्क त्याला टाळतां येत नाहीं. उलट, अशा लोकांना उपदेश करावा, त्यांना सन्मार्गाला लावावें या सात्त्विक आकांक्षेनें साधु लोक अशांच्या संपर्काला उत्तेजनहि देतात. पण आपणाला हिमालयांतील तपस्व्याविषयीं विचार करावयाचा नाहीं. तूं लौकिक संसाराच्या समुद्रांत

पोहण्याला शिकूं पहाणारा तरुण; तुला हिमालयांतील तपस्व्यांची माहिती कशाला देऊं ! तुझ्यापुरतें सांगावयाचें तर हेंच कीं, तूं जन्माला आल्यानें तुला जशीं कांहीं नातीं जडलीं, तशीं या संसारक्रमांत तुला आपल्या हातानें कांहीं नवीं नातीं जडवून घ्यावीं लागतील. आणि तीं केवळ तुझ्या घरांत किंवा घराण्यांतच नव्हे तर बाहेर मोठ्या समाजांतहि. या दृष्टीनें, या जुन्यानव्या अनेक नात्यांचा तूं मध्यबिंदू या दृष्टीनेंच, तुला नागरिक ही संज्ञा स्वीकारली पाहिजे. आणि प्रस्तुत तुला जें कांहीं उपयुक्त म्हणून मी सांगणार आहें तें कौटुंबिक नात्याप्रमाणेंच सामाजिक नात्यागोत्यासंबंधानेंहि सांगणार आहे. नागरिकाचें हें मध्यवर्ती स्थान असें कांहीं आहे कीं, त्या स्थानावरून एकीकडे घर घराणें, अशा संकुचित कार्यक्षेत्रांतील कर्तव्यांचा विचार व दुसरीकडे समाजासंबंधीं कर्तव्यांचा विचार करावा लागतो व करतां येतो. म्हणून या चर्चेत ( १ ) घराण्यांतील पूर्वज, ( २ ) तुझ्या घरच्या एकदोन पिढींतील पूर्वज, ( ३ ) तुझे आईबाप, ( ४ ) तुझी भावंडें, ( ५ ) तुझ्या घराण्यांतील समकालीन लोक, ( ६ ) तुझी बायको, ( ७ ) तुझीं मुलें, ( ८ ) तुझे चाकर नोकर, ( ९ ) तुझे मित्र, ( १० ) तुझे सहव्यवसायी, ( ११ ) तुझे व्यवहारांतील ऋणानुबंधी ( १२ ) तुझ्या बरोबरीचे नागरिक, ( १३ ) तुझ्या राष्ट्रांतील सामाजिक व राजकीय बंधुगण, ( १४ ) तुझें राष्ट्रीय सरकार, ( १५ ) परदेशांतील तुझे राजकीय ऋणानुबंधी लोक व शेवटीं ( १६ ) केवळ मनुष्यजातीच्या दृष्टीनें सर्व जग, या क्रमानें मी थोडथोडी चर्चा करणार आहे. आणि तिचा हेतु हाच कीं, यथाशक्ति आदर्श नागरिक तूं कसा होऊं शकशील हें तुला कळावें.

---

## आन्हिक ३ रें

# आपले पूर्वज

आपले पूर्वज कोण होते याचा शोध करीत करीत मागें जा. म्हणजे तुला बरीच मौज वाटेल. पूर्वीच्या सुमारें तीनचार पिढ्यांपर्यंत आपणाला आपल्या पूर्वजांची कांहींशीं माहिती असते. इतिहासप्रसिद्ध घराणींच असतील तर गोष्ट वेगळी. मग त्यांच्या घरीं जुनें कागदपत्र, सनदा असतात. त्यांवरून घराण्याच्या पीठिकेचें सूत्र अखंड हातीं लागतें. पण या कागदांत पुष्कळसे कागद इनाम, वतन, घरठाणाचे कज्जे, फारकती, पंचायतींनीं केलेले निकाल, करीणें किंवा हिशेब अशा स्वरूपाचे असतात. त्यावरून माणुसकीच्या दृष्टीनें आपल्या पूर्वजांचा वृत्तांत कळत नाहीं. म्हणजे त्यांचें चरित्र, त्यांचीं सुखदु:खें, त्यांच्या चालीरीति यांविषयीं माहिती हवी ती मिळत नाहीं, आणि इतर माहिती मिळकतीच्या हक्कासंबंधानें उपयोगी असली, तरी मनुष्यसमाज व मनुष्यस्वभाव यांच्या दृष्टीनें तिजवरून फारसा प्रकाश पडत नाहीं. आपल्या इकडील कांहीं संस्थानिकांनींच काय ते आपल्या घराण्यांचे इतिहास लिहिलेले आढळतात. हल्लीं संस्थानिक नाहींत अशाहि घराण्यांचे कांहीं इतिहास त्या त्या आडनांवाच्या लेखकांनीं प्रयत्न करून छापले आहेत. तथापि या इतिहासांत मुख्यतः वंशावळी असतात. म्हणजे त्या नांवांच्या केवळ जंत्र्या. घराण्यांत ज्यांनीं कोणत्याहि रीतीनें नांव केलें अशा पुरुषांची त्रोटक माहिती असते. आणि इतर माहिती असते ती बहुधा दंतकथांच्या रूपाची असते.

तात्पर्य, संस्थानिकांच्या व बिनसंस्थानिकांच्या घराण्यांच्या प्रयत्नानें व खर्चानें तयार करून छापलेल्या इतिहासांची ही कथा, तर खासगी घराण्यांची काय स्थिति असेल हें सांगावयालाच नको. पुष्कळांना आपल्या वडील मातोश्रींचीच काय ती माहिती असते. घराण्याचें मूळ गांव पुष्कळांना ऐकून माहीत असतें. पण तें गांव फार थोड्या लोकांनीं प्रत्यक्ष पाहिलेलें असतें. घराण्याच्या कुलस्वामिनीचें नांव मात्र विशिष्ट प्रसंगीं उच्चारण्यांत येतें. कारण पुण्याहवाचनादि समारंभ निघाले म्हणजे पहिला

नारळ किंवा सुपारी, तसेंच पहिला नैवेद्य कुलस्वामिनीच्या नांवानें ठेवावा लागतो. अशा रीतीनें, कांहीं धार्मिक आचार आणि कांहीं लौकिक इतिहासाचें प्रेम यांच्यामुळें आपण पूर्वजांची माहिती मिळवूं संभाळूं शकतों. परंतु तिची मजल वर सांगितल्याप्रमाणें फार थोड्या पिढ्यांतच संपते. एखाद्या नदीचें मूळ शोधण्याला म्हणून निघावें, पण फारतर दहापांच कोसपर्यंत प्रवाहाच्या काठाकाठानें उगमाकडे गेलों असतां अशी एखादी चढाची पण सपाट जागा लागते कीं, तेथें प्रवाह असा दिसतच नाहीं; आणि असें दिसून येतें कीं, नदीला दाखविण्यासारखा उगम नाहीं. खालीं खालीं प्रवाह वाहताहि आहे, पण तो जागजागीं उमगलेल्या निघालेल्या वाहत्या झऱ्यांच्या किंवा इतर प्रवाहांच्या पाण्यामुळेंच आहे.

मग आतां पहा कीं, ' पूर्वज ' हा शब्द फुकट किती मोठा व प्राचीन वाटतो जसें कांहीं एखाद्या न संपणाऱ्या बोगद्यांतूनच आपण चाललेले आहों. आणि तेंहि खरेंच आहे. कारण अज्ञानाचा अंधकार या बोगद्यांत भरपूर आहे. आणि अंधारांतून कितीहि चाललों तरी वाट संपतच नाहीं. पूर्वजांचा अभिमान धरावयाचा तर घराण्याच्या भाषेनें बोलणें लवकरच खुंटतें. मग जगांतील मनुष्यवंशाच्या भाषेनें बोलणें सुरू करावें लागतें. उदाहरणार्थ, स्वतः माझ्या घराण्याची माहिती दोन अडीचशें वर्षांपलीकडे लागत नाहीं. पण त्या पलीकडे मला पूर्वज होतेच ! तेव्हां मी केळकर हें नांव निराशेनें सोडून देऊन माझे पूर्वज कोकणस्थ ब्राह्मण समाजांत होते असें म्हणतों. पण कोकणस्थ या वर्णनालाहि दक्षिणी ब्राह्मणांच्या इतिहासांतच पुढें केव्हांतरी प्रारंभ झाला असला पाहिजे, म्हणून त्या प्रारंभापूर्वींचे माझे पूर्वज दक्षिणी ब्राह्मण समाजांत होते असें मानतों. मग हे ब्राह्मण तरी कोठून आले ? कोणी म्हणतात आम्ही कोकणस्थ लोक इजिप्तमधून अरबी समुद्राच्या किनाऱ्यावर लागलों, कोकणांत कांहीं शतकें राहिलों, व अलिकडे तीनचार शतकांत घाटावर पसरलों. ही इजिप्तची कल्पना सोडून दिली तर आम्ही उत्तरेकडून कोठून तरी आलों असूं. पण ब्राह्मण झालों, तरी कोठें तरी वर्णव्यवस्थेला उगम असालाच पाहिजे. सनातन हिंदु धर्माच्या कल्पनेप्रमाणें ब्राह्मणाचा उगम प्रत्यक्ष ईश्वराच्या तोंडांतून झाला हें आपण सोडून देऊं, पण लौकिकदृष्टया ब्राह्मण हे आर्य-

वंशाची एक शाखा होय हें निश्चित आहे. मग ही आर्यवंशाची शाखा तरी मुळांत कोठें फुटली ? ती काय काश्मिरांत, कां हिंदुकुश पर्वतांत, कीं, पामीरच्या मुलखांत कीं काकेशस पर्वतांत कीं टिळकांनीं आपल्या एका पुस्तकांत सुचविल्याप्रमाणें उत्तर ध्रुवाच्या मुलखांत ? पण उत्तर ध्रुवाच्या मुलखांत तरी आमचे पूर्वज कोठून आले हा प्रश्न उरतोच कीं नाहीं ? त्याचें उत्तर देतांना दोन मार्ग दिसतात व ते शेवटीं परमेश्वर म्हणा, किंवा ब्रह्म म्हणा, किंवा विश्वाची मूल प्रकृति म्हणा—कोठेंतरी एका ठिकाणीं जाऊन मिळतात.

मनुष्याची उत्पत्ति शास्त्रज्ञ लोक वेगळ्या दोन प्रकारांनीं सांगतात. आमच्या पुराणातल्याप्रमाणें मूळ मनू, किंवा ख्रिस्ती पुराणांतल्याप्रमाणें मूळ आदम, ईश्वरानें प्रत्यक्ष आपल्या हातानें उत्पन्न केला; आणि मग एकाचे दोन, दोहोंचे चार, चारांचे आठ या क्रमानें जगांतील मनुष्य संख्या अवतरली. हा एक प्रकार. दुसरा प्रकार असा कीं, मूळ प्रकृतीपासून प्रथम महाभूतें व त्यांपासून औषधी, वनस्पती त्यांपासून हीन दर्जाचे प्राणी, त्यांपासून श्रेष्ठ प्राणी असें होतां होतां सर्वोत्तम असा मनुष्यप्राणी जन्मला. म्हणजे एकेच ठिकाणीं एकाच माणसापासून मानववंश निघाला असें नसून, अमानव अशा मूलबीजापासून उत्क्रांतीच्या तत्त्वानुसार तो सर्व जगभर ठिकठिकाणीं वेगवेगळा आगेमागें स्वयंभू उत्पन्न झाला. अशा रीतीनें आपण कोणताहि प्रकार घेतला तरी, आमचा मूळ पूर्वज कोण असें विचारलें असतां, वेदांती भाषेनें ब्रह्म व सांख्य शास्त्राप्रमाणें मूळ प्रकृति असेंच उत्तर द्यावें लागेल. तत्त्ववेत्याप्रमाणें कवीहि असेंच वर्णन करितात. पण तें काव्य असल्यामुळें तोंडांत चांगलें राहातें. ख्रिस्ती मिशनरी ईश्वराला 'हे आकाशांतील बापा' असें म्हणतो तेव्हां तो मधल्या अगणित पिढ्यांचा संक्षेप करतो. असें असलें तरी मूळचा पूर्वज बरोबर सांगतो. आम्ही हिंदु लोकसुद्धां ईश्वरप्रार्थनेंत 'त्वमेव माता च पिता त्वमेव' असें म्हणतोंच कीं नाहीं ?

आपल्या पूर्वजांचें वर्णन अशा रीतीनें केलें म्हणजे आपण अर्थातच भांबावून जातों. जसें एखाद्या गोड्या प्रवाहांतून खाऱ्या खाडींत प्रवेश करावा, आणि ओहोटीच्या ओढींत सांपडून समुद्रांत आपली नाव जावी

आणि फिरून समुद्रांतील गुप्त प्रवाहांच्या जोरानें ती महासागरांत जावी, असें हें मी पूर्वजांचें वर्णन केलें असें तूं म्हणशील. आणि तें खरेंहि आहे. पण या पुढचा प्रश्न व्यावहारिक म्हणजे पूर्वजांचा अभिमान बाळगण्या–गाजविण्यासंबंधाचा आहे. त्यासंबंधानें पाहातां प्रथम आपण आद्य पूर्वज जो ईश्वर त्याचा अभिमान धरलाच पाहिजे. पण आपण त्याचा अभिमान धरून त्याचें नांव मोठें कितीसें करणार ! उलट त्याच्या कृपेची आपणालाच गरज आहे. तेव्हां व्यावहारिक अभिमानाच्या दृष्टीनें हा आद्य, दिव्य, परात्पर पूर्वज बाजूला ठेवून थोडें खालीं उतरूं.

पंचभूतें, औषधी, वनस्पती, अन्न–ग्राम वगैरे सर्व पूर्वज सोडून देऊन उत्क्रांतीच्या पायऱ्यांवरून चढत म्हणा उतरत म्हणा, आपण येऊं लागलों म्हणजे त्यापुढें आपणाला असे प्राणी आढळतील कीं, त्यांना पूर्वज म्हणण्याची खंती वाटेल. पण खंती वाटून तरी उपयोग काय ? चौऱ्यांशीं लक्ष जीवयोनींतून पुनर्जन्म घेत घेत यावें लागतें खरें. येतां येतां आपला पूर्वज वानर हा भेटतो. आणि नेहमीं त्याचें दर्शन घडावें म्हणूनच कीं काय, आपण त्याला पिंजऱ्यांत घालून कोंडून ठेवतों, व त्याला अन्नपाणी देऊन त्याची शुश्रूषा करतों. आणि तोहि, ही शुश्रूषा फुकट न घेतां, घरच्या म्हाताऱ्यांनीं सदुपदेश करावा त्याप्रमाणें, मनुष्य जातीला बोध करीत असतो. तो म्हणतो "बाबांनो 'बापसे बेटा सवाई' या न्यायानें तुम्ही माझ्या पुढच्या पिढीचे लोक किती सुधारलां आहां ! किती सुसंस्कृत झालां आहां ! किती वैभवसंपन्न झालां अहां ! हें पाहून आपलेपणामुळें मला धन्यता वाटते. पण मी या पिंजऱ्याच्या गजांना धरून उभा आहे तसेंच तुम्हीहि पण आहांत असें समजा ! मला पिंजऱ्यांच्या त्या टोकाचा अंधार आवडत नाहीं म्हणून मी या टोकाशीं येऊन उभा राहिलों. इथें लाभणारा प्रकाश मला आवडला, तो आणखी अधिक मिळावा, किंबहुना तो जिकडून येतो तिकडे बाहेर पडून जाऊन प्रकाशाचें मूळ गांठावें असेंहि वाटतें. पण काय ? पिंजऱ्याचे हे गज मला बाहेर पडूं देत नाहींत. त्यांना मी ओरबाडतों, चावतों, हलवू पाहातों तरी मला बाहेर पडतां येत नाहीं. पण अशा निराशेंतहि पिंजऱ्याबाहेर मला जेव्हां पांची बोटांसकट हात बाहेर काढतां येतो तेव्हां तेवढ्या यशावर मी संतुष्ट होऊन आनंदतोंहि

आणि म्हणतों कीं " मी पिंजऱ्याबाहेर जाऊं नये असें बंधन घालणाऱ्या माझ्या पिंजरेवाल्यावर मीं हा जयच मिळविला कीं नाहीं ? " हजारों पिढ्यांच्या पूर्वींच्या या आमच्या पूर्वजानें केलेला हा बोध आम्हां मनुष्यांना तंतोतंत पटतोहि. कारण आम्ही तरी एवढें ज्ञान मिळविलें, शोध केले, शास्त्रें रचलीं, अज्ञानाच्या अंधारांतून निघून ज्ञानाच्या प्रकाशांत जाण्याची खटपट केली व करीतच आहों. तरी पण आमची शक्ति, आमचें ज्ञान हीं परिमित, समर्याद आहेत; आणि मूळ ज्ञानाच्या प्रकाशाचा उगम किती तरी दूर आहे ! असें वाटून गजाच्या पिंजऱ्यांत पडल्याप्रमाणें आम्हांलाहि वाईट वाटतें. पण पूर्वजानें पिंजऱ्यांतून बाहेर काढलेल्या हाताप्रमाणें आमचेहि शोध मधून मधून या मर्यादेच्या पलीकडे थोडेसे जातात. तेव्हां आम्हांलाही आमच्या जेलरवर थोडासा सूड उगवल्याचा आनंद होतोच.

पण हें विषयांतर सोडून देऊं. हा वानर–सृष्टीचा मुक्काम सोडून अलीकडे येत येत आलो म्हणजे खास मनुष्यसृष्टीचा प्रदेश लागतो. तेथून मात्र आपल्या खऱ्या अभिमानाला सुरवात होते. मनुष्यदेहाचें मनुष्य जन्माचें उज्ज्वल वर्णन कवी साधुसंत व धर्मोपदेशक यांनीं करण्याचें कांहीं बाकी ठेवलें नाहीं. सगळे अर्थ साधण्याची हीच जागा असें आपण समजतों. इतर जीव-सृष्टीकडे नजर फेकली म्हणजे त्यांतील कांही आमच्याहून प्रबळ असतांहि आपण त्यांची शिकारपारध करूं शकतो, किंवा त्यांना पकडून आपल्या ताब्यांत ठेवून वागवितों हें पाहिलें म्हणजे सहजच आपणाला आपला अभिमान वाटतो. तसेंच पंच महाभूतें आपणा मनुष्याला तडाके देतात. पण उलट त्यांनाहि तडाके देऊन त्यांच्या पाठीवर आपण खोगीर चढवून त्यांना राबवून सेवा घेतो, हें पाहूनहि मनुष्यजातीचा आपणाला अभिमान सहज वाटतो.

या मनुष्यजातीपैकीं आर्यवंशाचा अभिमान आपण विशेष धरतों. कारण अनार्य म्हणजे असंस्कृत. आणि संस्कृतीची चाड आपणांमध्यें उत्क्रांतीनें उत्पन्न झालेली आहे. मग आर्य लोकांत झालें तरी एका बाजूला पारशी इराणी, व दुसऱ्या बाजूला जर्मन हेहि आर्यच असतां त्यांच्यापेक्षां उत्तर हिंदुस्थानांत प्रवेश केलेल्या आर्यवंशशाखेचाच आपण अभिमान धरतो. मग

त्यानंतर सूर्यवंश, चंद्रवंश अशा शाखा फुटतात. त्यांपैकीं सूर्यवंशाचा अभिमान धरावासा आपणाला वाटतो. मग त्या सूर्यवंशातून रजपूत, रजपूतांतून मराठे इत्यादि उपशाखा फुटतात. आपण ब्राह्मण मात्र या सूर्यवंशापैकीं असें स्वतःला मानीत नाहीं, तर निरनिराळ्या ब्राह्मण ऋषींचे वंशज असें म्हणवितों. पण मराठा हा शब्द शेवटीं असा आढळतो कीं, त्यांत मानववंश आणि कृष्णा गोदाकांठचें आपलें वसतिस्थान या दोहोंचा अभिमान एकवटून ब्राह्मण काय, रजपूत काय, सर्वजण मराठे म्हणवून घेण्याला आनंदानें तयार होतों. स्थान व वंश या दृष्टीनें शहाण्णव कुळींचे मराठे हे महाराष्ट्रीय, तसेंच आम्ही ब्राह्मणही महाराष्ट्रीय ब्राह्मण, मराठे ब्राह्मण, असेच स्वतःला अभिमानानें म्हणवतों. आणि राजकीय दृष्टि स्वीकारली म्हणजे तें एकट्या मराठ्यांचें राज्य म्हणजे तें एकट्या मराठ्यांचे किंवा एकट्या ब्राह्मणांचें राज्य नसून मराठ्यांचें व ब्राह्मणांचें मिळून संयुक्त स्वराज्य असें ठरतें आणि त्यामुळें अभिमानाच्या पाण्यांत सर्वांना सारखेंच स्नान व जलक्रीडा करण्याकरतां ' मराठे ' या नांवाचें एक बंदिस्त असें तळें निर्माण होतें. येथेंच आपला पूर्वजांचा अभिमान खरा व्यवहार क्षम होतो ! आणि ज्या दृष्टीनें रामदेवराव जाधव व शिवाजी महाराज हे ब्राह्मणांनीं आपले पूर्वज म्हणावे, त्या अर्थानें शहाण्णव कुळींच्या मराठ्यांनींहि ज्ञानेश्वर, एकनाथ, रामदास यांना आपले पूर्वज म्हणण्यास हरकत नाहीं. ऐतिहासिक माहिती, कीर्ति, यांनींच अभिमानक्षेत्राच्या मर्यादा ठरविल्या जातात म्हणून त्या मर्यादेंतच पूर्वजांचा जागता अभिमान वावरूं शकतो. एखादे वेळीं मित्रमंडळींत ऐतिहासिक चर्चा निघाली असतां त्यांना चकविण्याच्या हेतूनें मी सहज गमतीनें म्हणतों कीं," श्रीरामचंद्राच्या वेळीं माझा एक पुर्वज होता ! " पण इतरांचेंहि पूर्वज रामाचेवेळीं नव्हते कोठें ! म्हणून हें बोलणें शब्दशः खरें असलें तरी, व क्षणभर तें फसवणुकीची गंमत करूं शकेल तरी, त्या काल्पनिक पूर्वजाच्या उल्लेखांतून खरा अभिमान असा निघूं शकत नाहीं.

---

# आन्हिक ४ थें

## कुटुंबव्यवस्था—स्त्री

मनुष्यजीविताच्या सोपानपरंपरेंत आपल्या पूर्वजानंतर दुसरी पायरी कुटुंबव्यवस्था ही होय. कुटुंब ही अशी एक घटना आहे कीं, तेथें सर्व राष्ट्रीय जीवनाचा उगम असतो. आणि मौज ही कीं, कुटुंब हें जसें संघटितांत संघटित तसें तुटकांत तुटकहि आहे. कुटुंबव्यवस्था नाहीं, म्हणजे मनुष्यव्यक्ति अविवाहित आहे, अशी कल्पना केली तर त्याच्यापुरता तेथें वंशक्षयच होतो. पण ही व्यक्ति स्वत: उत्पन्न होण्यापूर्वी तिला आईबाप होते. यामुळें आपल्या हातानें आपला पुढें निर्वंश करणाऱ्या व कुटुंबसंघटना न करणाऱ्या या व्यक्तीच्याहि पूर्वी कुटुंबसंघटना होती हें उघडच आहे. आणि वर दर्शविल्याप्रमाणें एखादा मनुष्य केवळ ब्रह्मचारी राहण्याचा निश्चय करून कुटुंबसंघटनेला पराङ्मुख झाला तरी, असलीं उदाहरणें एकंदरीनें जगांत इतकीं थोडीं असतात कीं, एकंदर समाजाच्या दृष्टीनें विचार करतां तीं लक्षांत घेण्याचें कारण नाहीं. कुटुंबसंघटना ही जशी समाज जीवनाच्या प्रारंभीं अवश्य, तशीच ती राष्ट्रीय जीवनाच्या वाढीलाहि अवश्य असते. शरीरामध्यें जशा स्नायूंच्या गांठी मधूनमधून असतात तशाच समाजाच्या शरीरांत कुटुंबसंघटना या होत. वेगवेगळ्या सुक्ष्म रक्तवाहिन्यांतून या गांठींत रक्त येऊन एक्य होतें, व तेथून पुढें निरनिराळ्या स्नायूंना तें प्रवाहांनीं पुरविलें जातें.

राष्ट्राच्या सामाजिक किंवा आर्थिक जीवनाचा विचार किंवा हिशेब करितांना एकाच्या आंकड्याप्रमाणें कुटुंबसंघटनेचा उपयोग होतो. म्हणजे उदाहरणार्थ, सामाजिक चालीरीतींत दोष उत्पन्न झाले किंवा त्यांत सुधारणा करावयाच्या असल्या तर त्या विचारांत सुटी व्यक्ति लक्षांत येत नाहीं किंवा हिशेबांत धरली जात नाहीं. एकंदर कुटुंबाचा विचार करितात. तसेंच समाजाच्या आर्थिक स्थितीचा विचार करावयाचा असतां एका कुटुंबाची मिळकत किती असेल, एका कुटुंबांतील माणसांना जगण्याला व साधारण सुखांत राहाण्याला किती खर्च लागेल, व शिल्लक पडावयाची तर एक

कुटुंब किती शिल्लक टाकूं शकेल, असाच हिशेब करण्यांत येतो. सामाजिक व राष्ट्रीय कार्याकरितां दान, भोग, त्याग हीं सर्व दर घरटीं किती म्हणजे दर कुटुंबागणिक किती असा विचार होतो. धर्मादाय केला जातो तो एका कुटुंबाच्या पोषणाच्या दृष्टीनें. अग्रहार दिले जातात ते याच दृष्टीनें. महाभारतांत बकासुराची गोष्ट आहे. तींत दर दिवशीं कुठल्यातरी एका कुटुंबांतला एक मनुष्य असा बळी द्यावा लागे. ही बळी पुरविण्याची जबाबदारी एकचक्रा नगरींतील प्रत्येक व्यक्तीवर नव्हती तर प्रत्येक कुटुंबावर सामुदायिक रीतीनें होती. राष्ट्राकरितां राष्ट्राभिमानाच्या भावनेनें ( प्रत्यक्ष कायद्याच्या आधारानें नव्हे ) सैन्य उभारावयाचें असतें तेव्हां दर घरचा एक मनुष्य अशा दृष्टीनेंच मागणी करण्यांत येते.

कुटुंब म्हटलें म्हणजे त्यांत कमींतकमी दोन माणसें तरी येतातच. म्हणजे नवरा व बायको. सामान्यतः संतति होणें हा दांपत्यधर्माचा स्वाभाविक परिणाम असतोच; आणि कोणत्याहि दांपत्याला संतति व्हावी अशी इच्छाहि असते. यामुळें फक्त नवरा व बायको एवढ्या दोनच व्यक्तींनीं जरी कुटुंब हें नांव सार्थ होऊं शकलें तरी नवरा, बायको व मुलें मिळूनच मानवी कुटुंब असें समजलें जातें. संतति निर्माण करणें हें जसें आनंददायक सुख त्याचप्रमाणें तें व्यापक दृष्टीनें कर्तव्यहि ठरतें. कारण संतति परंपरा राहिल्याशिवाय–राखल्याशिवाय समाजाचें संवर्धन कसें होईल ? अविवाहित स्त्री किंवा पुरुष ही एकटी व्यक्ति जशी समाजपरंपरा राखण्याला निरुपयोगी, तशीच निरपत्य असलेली नवराबायको समजावी. ' दारान् अपत्याय ' म्हणजे अपत्याकरितां लग्न करावें किंवा केलें जातें हें शास्त्रवचन म्हणून ठीक. परंतु प्रत्येक विवाह अशा दूरदृष्टीनेंच होतो असें नाहीं. एकांतून दुसरी गोष्ट साधावी त्याप्रमाणें संतति निर्माण होणें ही गोष्ट आपाततः परिणामतःच घडते.

असो. कुटुंबसंघटनेची ही किमान मर्यादा सांगितली. पण त्याची दुसऱ्या बाजूला कमाल मर्यादा सांगतां येत नाहीं. तिला कांहीं तात्त्विक नियम नाहीं, व मर्यादा पडते ती केवळ व्यवहाराच्या सोईनेंच पडते. कुटुंबसंघटनेला प्रथम एक दांपत्य लागतें. पण त्याचा अर्थ एक पुरुष असा असला तरी त्याच्या जोडीला एकच स्त्री असा मात्र नाहीं. फारच थोड्या

धर्मांत एक पत्नीकत्व, म्हणजे एका पुरुषाला एकच विवाहित स्त्री असावी असा निर्बंध आढळतो. इतर अनेक धर्मांत एका पुरुषानें अनेक स्त्रियांशीं विवाह करणें हें धर्म्य, सशास्त्र असतेंच; पण ती अनीतीहि मानली जात नाहीं. मुसलमानी धर्मांत एकाच वेळीं चारपर्यंत विवाहित स्त्रिया पुरुषाला करतां येतात. हिंदु किंवा आर्य धर्मांप्रमाणें विवाहित स्त्रियांना मर्यादा नाहीं. ऐतरेय ब्राह्मणांत हरिश्चंद्र राजाला शंभर बायका असल्याचें सांगितलें आहे. श्रीकृष्णाला 'सोळा सहस्र' स्त्रिया होत्या असें वर्णन ही अर्थांतच मोठी अतिशयोक्ति होय. तथापि त्याच्या प्रत्यक्ष विवाहाच्या अशा सातआठ स्त्रिया प्रसिद्ध आहेत. पांडवांपैकीं अर्जुन व भीम यांना एकीहून अधिक स्त्रिया होत्या. क्षत्रिय राजेलोकांचा अखंड वृत्तांत पाहिला तर राजाला एकच विवाहित स्त्री असणें हा नियम नसून उलट अपवादच ठरेल.

आणि ही गोष्ट फक्त विवाहित स्त्रियांपुरती. यांत अंतःपुरांतील किंवा राणीवशांतील अविवाहित स्त्रियांची गणना नाहीं. आणि असेंहि होत असतें कीं, अविवाहित स्त्रीला संतति झाली, आणि ती पुरुषसंतति असून बापाच्या विशेष प्रेमानें किंवा इतर परिस्थितीमुळें तो मुलगा पुढें गादीवर बसण्यासारखा असला, तर त्या मुलाची आई प्रथम अविवाहित असली तरी मागाहून तिच्याशीं विवाह लावण्यांत येतो; व विवाहित स्त्रीचा मुलगा म्हणून त्याचा वारसा सशास्त्र ठरविण्यांत येतो. हिंदुसमाजांत विवाहविधि हा अगदींच चुटकीसरशी होण्यासारखा नसतो. त्याला कांहीं बंधनें असतात. पण मुसलमान समाजांत विवाह हा चुटकीसरशी होऊं शकतो. यामुळें वरील प्रकारचीं उदाहरणें मुसलमान राजवंशांत अधिक आढळतात. पौराणिक व्यक्ति व राजे लोक सोडून खालीं जसजसें आपण येत जातों, तसतशीं पुरुषाच्या विवाहित स्त्रियांची संख्या घटत जाते. बंगाल्यांतील जुन्या कुलीन ब्राम्हण घराण्यांत लग्नाविषयीं फार निर्बंध असल्यामुळें, राजे लोकांप्रमाणेंच कुलीन ब्राम्हणांचें अंतःपुर विवाहित स्त्रियांनीं गजबजलेलें असे. कालांतरानें ही चाल मोडत जात आहे. कारण कुलीन ब्राम्हण आपल्या मुली कुलीन या सदराखालीं न पडणाऱ्या घराण्यांतहि देऊं लागले आहेत.

जातिबंधन नसतां, इतर दृष्टीनेंही एकाहून अधिक विवाहित स्त्रिया

करण्याचा प्रघात दृष्टीस पडतो तो धंद्याच्या दृष्टीनें. म्हणजे स्त्री हा घरचाच एक बिनपगारी व सत्तेचा चाकर होऊं शकतो. म्हणून विणकर, कुंभार, शेतकरी अशा धंदेवाईक लोकांना धंद्याच्या दृष्टीनें एकीहून अधिक बायका करणें मोठें उपयुक्त असतें, म्हणून ते करतात. वरील सर्व प्रकार सोडल्यानंतर, दुसरी किंवा तिसरीहि विवाहित स्त्री करणें, याला सामान्य कारण म्हणजे संततीची आवश्यकता. आणि हें कारण जेथें खरोखरच असेल तेथें केवळ पुरुषाच्याच इच्छेनें नव्हे तर पहिल्या विवाहित पण निपुत्रिक स्त्रीच्याहि केवळ इच्छेनेंच नव्हे तर आग्रहानेंही पतीचा दुसरा किंरा तिसरा विवाह होणें हें असंभवनीय नाहीं. व्यवहारांत अशीं उदाहरणें अनेक आढळतात. वडील पत्नीनें पतीला संतति व्हावी व त्यांचें घर उभें राहावें या हेतूनें, पतीचें दुसरें लग्न करूत देतांना आपल्या पसंतीनें वधू निवडावी, व लग्नानंतर एखाद्या आपल्या धाकट्या बहिणी-प्रमाणें तिचें लालनपालन हौसेनें व प्रेमानें करावें अशीं उदाहरणें वाचकांना क्वचित् आढळलींहि असतील; व तेथें तो पतिप्रेमाचा व स्त्रीसौजन्याचा विजय असेंच म्हणतां येईल !

उलट खिस्ति देशांतील वाङ्मयांतून स्त्री किंवा पुरुष यांचा पति किंवा पत्नी जिवंत असतां दुसरा विवाह होणें ही कल्पना अत्यंत पापमय व भयंकर अशी मानलेली आढळते. तसेंच त्या देशांतील ललित वाङ्मयांतून सवतीमत्सर हा इतका तीव्र दाखविलेला आढळतो कीं, त्या द्वेषाची बरोबरी इतर कोणताहि द्वेष करूं शकत नाहीं.

असो वरील निरनिराळ्या प्रकारांनंतर पुरुषानें एक पत्नी जिवंत असतां दुसरी पत्नी करण्याचा संभवनीय असा एकच प्रकार सांगण्याचा उरतो. तो म्हणजे पुरुषानें पहिल्या बायकोशीं पटत नाहीं म्हणून, किंवा ती कुरूप म्हणून, किंवा पहिली असून तिच्याशीं पटत नाहीं असें नसतांहि केवळ सौंदर्य मोहानें किंवा उच्छृंखळ विषयवासनेनें दुसरी स्त्री करणें हा प्रकार होय. पण या प्रकारचीं उदाहरणें प्रायः दुर्मिळ म्हणून त्यांचा विचार करण्याचें कारण नाहीं.

कुटुंब संघटनेंतील नवऱ्यानें अनेक बायका करण्याविषयीं हा विचार झाला. पण याच्या उलट विचार संभवतच नाहीं म्हटलें तरी चालेल.

म्हणजे एका स्त्रीला अनेक पति असण्याची ही चाल जगांत कोठेंही नाहीं. फक्त महाभारतासारख्या पुराणांत ती आढळते पण तेंही एकच उदाहरण. आणि त्याचीं कारणें व खुलासे पुराण चिकित्सकांनीं दिलेले आहेत. पण ती गोष्ट जमेस धरण्याची नाहीं. मात्र हिमालयाच्या पहाडांतील रानटी जातींत ही चाल एक वेळ असावी; आणि जगांतील इतर कित्येक देशांत अगदीं अस्सल रानटी समाजांत ही चाल असल्याचें सांगतात. पण तीही गोष्ट जमेस धरण्याचें कारण नाहीं. अनेक विवाहित स्त्रिया करण्याची चाल अनेक समाजांत सर्रास अमलांत असावी आणि उलट अनेक पति करण्याची चाल मात्र जगांत मुळींच नसावी याचें खरें निर्णायक कारण असें दिसतें कीं, प्रत्येक कुटुंब हें सुव्यवस्थित नांदायचें तर पुरुष हाच त्यांतील मुख्य आधार, मुख्य कर्ता, व मुख्य पराक्रमी, म्हणून तो अनेक स्त्रिया करून आपली हौस भागवूं शकतो किंवा सोय करूं शकतो. पण हें महत्त्व स्त्रीला कोणत्याही समाजांत आजवर मिळालेलें आढळत नाही. पुरुषाचें हें स्थान स्त्रीला मिळालें तर अनेक पति करण्याची चाल पडली असती अशी कल्पना करतां येते. फक्त मलबार प्रांतांत आजपर्यंत मातृवंशाला प्राधान्य व महत्त्व होतें व मिळकतीचा वारसा पुरुषशाखेकडे न जातां स्त्रीशाखेकडे जात होता, तरी मलबारांतही ही एका स्त्रीनें एकच पति करावा अशी चाल होती, अनेक पति करण्याची चाल नव्हती. कदाचित् निसर्गानेंच स्त्रीपुरुषांत जो भेद केला आहे, त्यामुळें कुटुंबसंघटनेंत पुरुषाला मुख्य स्थान प्राप्त होतें व स्त्रीला गौण स्थान मिळतें, यामुळें यापूर्वी अनेक पति करण्याची चाल नव्हती, व यापुढें तर ती केव्हां अमलांत येईल असा संभव वाटत नाहीं.

कुटुंबांत पुरुष मुख्य, स्त्री गौण असें निसर्गानें, संकेतानें, वहिवाटीनें, आणि एकप्रकारच्या सामाजिक नीतीनेंहि ठरवून गेल्यासारखें झाल्यामुळें, एका नवऱ्याला अनेक बायका असाव्या हें जसें मान्य झालें, तसेंच नवऱ्याची वर्तणुक बायकोसंबंधानें कशी असावी हेंही ठरून जाऊन मान्य झाल्यासारखें झालें. या वर्तणुकीचें तात्पर्य थोडक्यांत असें. नवरा हा राजा, बायको ही प्रजा, नवरा हा धनी, बायको ही नोकर, नवरा हा मालक,

बायको ही मिळकत अर्थात् बायकोला हुकूम करणें, तिला शिस्त लावणें, तिजकडून सेवा घेणें, तिला शिक्षा करणें व वाटल्यास तिला देऊन-विकून्नही टाकणें हे हक्क व अधिकार नवऱ्याचे ! आणि या प्रत्येक अधिकाराशीं संबंध येणारें कर्तव्य हें बायकोचें; अशी हजारों वर्षें समजूत होती.

अर्थात् याच्या उलट कांहीं कर्तव्यें नवऱ्याचींही ठरतात. कारण हक्क व कर्तव्यें यांची एकप्रकारची सांगडच आहे. एका टोकाला कर्तव्य असलें तर त्याच्या दुसऱ्या टोकाला तें बजावून घेणारा कोणी हक्कदार असतो. आलटून पालटून स्त्री व पुरुष या दोघांनाही हे हक्क व हीं कर्तव्यें चिकटलेलीं राहावीं हें स्वाभाविक आहे. आणि प्रत्यक्ष व्यवहार पाहिला तरी राजा, मालक व धनी या तिन्ही नात्यांचीं कर्तव्यें उत्तम रीतीनें आपल्या स्त्रीसंबंधानें पार पाडणारे, एवढेंच नव्हे तर उलट आपल्या स्त्रियांवर आपल्या प्रजासारखें प्रेम करणारे नवरे आढळणार नाहींतच असें तरी कां म्हणावें ? परंतु जो कायदा असतो त्याप्रमाणेंच पुष्कळसा व्यवहार असतो. यामुळें स्त्रियांवर प्रेम करून त्यांना आपणासारख्या वागविणाऱ्या नवऱ्यांचें कौतुक व त्यांची वाहवा जरी झाली, किंवा त्यांना काव्यें व गीतें यांतून स्थान मिळालें तरी मुद्दा आहे तो असा कीं, नवऱ्यानें आपलीं कर्तव्यें न केलीं, तो पतिधर्म सोडून वागूं लागला, तर त्याला शिस्त लावणें, शिक्षा करणें या गोष्टी करणारा कोणी वरिष्ठ नव्हता. यामुळें स्त्रियांना आपली दाद लावून घेण्याला मार्ग नव्हता.

प्रियवाचका, स्त्रिया पतीकरितां स्वतःला त्याच्या चितेवर जाळून घेत ही गोष्ट इतकी प्रसिद्ध आहे कीं, तिचा उल्लेख करण्याचेंच कारण नाहीं; किंबहुना सती जाण्याचीं उदाहरणें अजूनही या सुधारलेल्या काळांत, आणि त्याविरुद्ध कायदा झाला असतांहि, घडून येतात हें तूं ऐकलेंच असशील; उलट पतीनें स्वतःला स्त्रीच्या चितेवर जाळून घेतल्याचें उदाहरण किंवा प्रायोपवेशन करून प्राण सोडल्याचें उदाहरण कोणीं ऐकलें आहे काय ? मग या फरकाचें कारण काय ? तें हीच समजूत कीं, एका पतीशीं कोणाही स्त्रीचा एकदां लग्नविधि झाला म्हणजे ती त्या पतीचीच स्त्री जन्मजन्मांतरीं राहावयाची अशी कल्पना. मग पति व पत्नी यांनीं कोणत्याही जिवयोनींत पुनर्जन्म घेतला तरी तोच संबंध पुन्हा चिकटावयाचा ! तो जन्म पशु, पक्षी,

कीड, मुंगी, हिंस्रश्वापद यांपैकीं कोणाचाही येवो ! किंवा स्त्रीपुरुषाचा कर्मविपाक कोणत्याही जन्मीं कसाही होवो ! पण या कल्पनेंत भावनेची आणि ध्येयवादित्वाची इतकी अतिशयोक्ति आहे कीं, तिची लौकिक-दृष्ट्या चर्चा करण्याचेंच कारण नाहीं. मृच्छकटिक नाटकांतील सूत्रधारानें विनोदानें रागावून नटीला विचारलें कीं, " या जन्मीं माझा भात खर्चून परजन्मीं दुसरा पति मिळण्याकरतां व्रत करतेस कीं काय ? " पण बिचारी नटी पडली स्त्री. एरव्ही तिलाहि नवऱ्याची थट्टा योग्य शब्दांनीं करतां आली असती. नवऱ्यानें स्त्रीला मिळकत म्हणून विकून टाकणें हा शेवटचा अधिकार घेतला असतां, त्याच्या पोटांत इतर सर्व गौण अधिकार येतातच. हा अधिकार गाजविण्याची परंपरा जुन्याकाळीं कांहीं समाजांत होती, व तशी गोष्ट कोठें कोठें घडल्याचीं उदाहरणें या नवीन युगांतहि ऐकूं येतात. ही परंपरा लक्षांत घेतां, एखादा मनुष्य कदाचित् असाहि कूट प्रश्न उपस्थित करूं शकेल कीं, हिंदुस्थानांत आजच्या सुधारलेल्या काळांत बायकोला विकण्याचा किंवा गहाण ठेवण्याचा अधिकार नवऱ्याला नाहीं कशावरून ? फार तर असला करार न्यायकोर्टें बजावून देणार नाहींत. परंतु असली अमानुष गोष्ट करणें हा कांहीं गुन्हा ठरलेला नाहीं. याचा अर्थ करार-बजावणीचें काम कोर्टांतच न केलें तर, म्हणजे एरव्ही उभय पक्षांच्या संमतीनें, हा व्यवहार अमलांत येणें हा गुन्हा ठरलेला नाहीं.

स्त्री विकणें किंवा पणाला लावणें काय, दोन्ही गोष्टी जवळ जवळ सारख्याच. महाभारतांत धर्मराजानें द्रौपदी पणाला लावली, ती दुर्योधनानें जिंकली, दुःशासनानें तिला दासी म्हणून एकवस्त्रानिशीं भरसभेंत ओढून आणलें, तिनें तेथील वृद्ध संभावित आप्तांना नवऱ्याविरुद्ध न्याय मागितला तो मिळाला नाहीं व शेवटीं तिला जेव्हां नग्न करण्याचें पापकर्म दुःशासनानें आरंभिलें, तेव्हां या धर्मपत्नीला जें संरक्षण सभेंत असणाऱ्या तिच्या पांच वीरपतींना देतां आलें नाहीं, तें तिला तिच्या ईश्वराचा धांवा करून त्याच्याकडून मिळवावें लागलें ! ही गोष्ट अपवादात्मक असली तरी स्त्री-पुरुषांच्या हक्कासंबंधीं आर्यांच्या पुरातन कल्पनांवर स्वच्छ प्रकाश पाडणारी आहे.

आणि जी गोष्ट धर्मासारख्यानें केली ती याज्ञवल्क्यासारखा ज्ञानी मनुष्यहिं कां न करता ? उपनिषदांतील याज्ञवल्क्य मुनींना दोन बायका होत्या. एक मैत्रेयी व दुसरी कात्यायनी. पैकीं मैत्रेयी ही आपल्या पतीशीं बरोबरीच्या नात्यानें वेदांतचर्चा करणारी, आणि कात्यायनी ही सामान्य स्त्री-बुद्धीची होती. कदाचित् कात्यायनी ही विद्वान् नव्हती या कारणास्तव याज्ञवल्क्यानें मैत्रेयी ही विदुषी म्हणून दुसरी बायको केली असण्याचा संभव आहे. आणि ती केल्यावर उगीच घरीं अडगळ कशाला म्हणून त्यानें कात्यायनी विकून टाकली असेंहि एखाद्या उपनिषदांत वाचावयास मिळतें तर त्याचें आपणांस आश्चर्य वाटलें नसतें ! असो.

अशी स्थिति असल्यावर स्त्रियांना छळणें,मारणें इत्यादि गोष्टींचें कायदेशीर अधिकार पुरुषांना पूर्वीं होते यांत काय नवल ? स्त्री हा एक प्रकारचा पुरुषाच्या मालकीचा गुलाम असें म्हटलें म्हणजे त्यांत सर्व कांहीं आलें. कालिदासानें ' आदर्श गृहिणी'चें वर्णन शाकुंतलांत केलें आहे. त्यांत दोन गोष्टी लक्षांत घेण्यासारख्या आहेत. ( १ ) ' कुरु प्रियसखीवृत्तिं सपत्नीजने ' म्हणजे ' सवतीवर सखीप्रमाणें प्रेम करावें, ' आणि ( २ ) ' भर्तुः विप्रकृतापि रोषणतया मा स्म प्रतीपं गमः ' म्हणजे ' नवरा रागावला तरी उलट जाऊं नको, बोलूं नको; ' स्त्रीदाक्षिण्याची ही कल्पना सनातन आहे ! आतां संशयकल्लोळासारख्या स्वदेशी पेहेराव दिलेल्या परदेशी सामाजिक नाटकांत नवऱ्याला चिमटे घेणारी स्त्री आढळेल. कारण कृत्तिका फाल्गुनरावाला म्हणते कीं, " माझे पाय एखादे वेळीं उघडे पडले तर, बिछान्यांतील शालजोडी तुम्हीं माझ्या पायावर घातली नाहीं, आणि या वेश्येला घेरी आली म्हणून भर रस्त्यावर तिचा घाम पुशीत बसला आहांत." पण आजच्या प्रत्यक्ष सामाजिक व्यवहारांत असें म्हणणाऱ्या स्त्रिया कमी; न म्हणणाऱ्याच पुष्कळ आढळतील. परदेशीय विचारांची जिल्हई लागलेल्या नाटकी स्त्रीपात्राचें वर उदाहरण दिलें, तर त्याच्या उलट ललित वाङ्मयातलें दुसरेंहि एक गमतीचें म्हणून उदाहरण त्याबरोबरच द्यावेंसें वाटतें. बंकिमचंद्र चतर्जी हा अत्यंत सुप्रसिद्ध बंगाली कादंबरीकार आहे. त्यानें आपल्या कादंबऱ्यांतून सुमारें पन्नास वर्षांपूर्वीचें बंगाली समाजाचें सामाजिक चित्र उत्कृष्ट रंगविलें आहे. पैकीं 'रजनी'

नांवाच्या कादंबरींत शचिंद्र नांवाचा प्रेमळ तरुण आपल्याला स्त्री कशी हवी याचें वर्णन गमतीनें करतो तें खालीं देतों:—

"मी जिच्याशीं लग्न करीन ती स्त्री रूपवान् हवीच; पण विद्युत्कटाक्षांचा वर्षाव करणारीहि पाहिजे. कुलीनतेंत शहाअलम किंवा मल्हारराव होळकर यांच्यासारख्यांची वंशज पाहिजे. विद्येत लीलावती किंवा शापभ्रष्ट सरस्वती, पतिभक्तींत सावित्री, चारित्र्यांत लक्ष्मी, रांधनकौशल्यांत द्रौपदी, आदराचे कामीं सत्यभामा आणि गृहकृत्यांत गध्याच्या आईसारखी काबाडकष्ट करणारी पाहिजे. विडा खाण्याचे वेळीं तिनें माझ्या विड्याची लवंग काढून दिली पाहिजे. हुक्का पिण्याचे वेळीं हुक्क्यावर चिलीम आहे कीं नाहीं तें सांगितलें पाहिजे. जेवण्याच्या वेळीं घांसांतला गुंतवळ तिनें काढला पाहिजे, आणि स्नानाच्या वेळीं माझें अंग कोरडें आहे कीं नाहीं हेंहि तिनें पाहिलें पाहिजे. चहा पितांना दौतींत चमचा घालून चहाचा शोध मी करीत नाहीं, व लिहिण्याचे वेळीं शाई शोधतांना चहाच्या कपांत मी टाक बुडविणार नाहीं, याविषयीं तिनें सावधगिरी ठेविली पाहिजे. मी पिकदाणींत रुपये आणि पेटींत पिंक टाकणार नाहीं याविषयीं तिनें खबरदार रहावें. भावाला लिहिलेल्या पत्राच्या पाकिटावर मीं आपलाच पत्ता लिहिला तर ती चूक तिनें दुरुस्त केली पाहिजे. पैसा देण्याच्या ऐवजीं मी चुकून रुपया देत नाहींना तें तिनें पाहिलें पाहिजे. नोटेच्या पाठीवर मी दुकानदाराला चिठी लिहीत नाहीं याविषयीं तिनें काळजी घ्यावी, आणि थट्टा करतांना बायकोचें नांव घेण्याच्या ऐवजीं मीं जर एखाद्या प्रेमळ शेजारणीचें नांव चुकून घेतलें तर, तिनें माझी चूक सुधारली पाहिजे. मी औषध म्हणून वासाचें तेल पिणार नाहीं व मोलकरणीला बोलवतांना तिच्या नांवाऐवजीं ऑफिसच्या साहेबांच्या मडमेचें नांव उच्चारणार नाहीं, या सगळ्या गोष्टींविषयीं तिनें सावधगिरी ठेविली पाहिजे."

कदाचित् कोणी म्हणेल कीं, नवरा तरुण पण भोळसर, शुद्धिसांड, म्हणून त्याच्या स्त्रीनें त्याची अशी काळजी घ्यावी अशी अपेक्षा केल्यास ती वावगी नाहीं. आणि आपल्या तरुण पतीची अशी काळजी घेण्यांत एखाद्या स्त्रीला हौसेच वाटेल. पण याच कादंबरींत एका वृद्ध नवऱ्याची

तरुण बायको कसें वागत होती याचें चित्र म्हणून त्यानें वर्णिलें आहे. त्यांत शचिंद्राचा विनोद किंवा काल्पनिक अपेक्षा असें कांहीं नसून, कादंबरींतलेंच का होईना पण प्रत्यक्षाचें वर्णन दिलें आहे तें असें—"लवंगलतेच्या अंगच्या असंख्य गुणांत हाहि एक गुण होता कीं, पितामहतुल्य अशा आपल्या पतीवर ती मनापासून प्रेम करीत असे, कोणतीहि तरुणी आपल्या तरुण पतीवर सुद्धां इतकें प्रेम करीत नसेल. ती आपल्या पतीला शृंगारून तरुण बनवीत असे. त्या शृंगाराची मजा काय सांगू ? ती रोज आपल्या हातानें त्याच्या पांढऱ्या शुभ्र केसांना कलप लावी. जर एखादे वेळीं लोकलज्जेमुळें म्हातारे रामसदयबाबू साधें मलमलीचें धोतर नेसलें तर ती आपल्या हातानें तें सोडून चांगलें रुईफुलीकांठीं किंवा करवतीकांठीं रेशमी धोतर नेसवून मलमलीचें धोतर एखाद्या गरीब विधवा बाईला देऊन टाकी. रामसदयबाबू म्हातारपणीं अत्तराची शिशी पाहातांच भिऊन पळून जात, पण ते झोपी गेले म्हणजे लवंगलता त्यांच्या सगळ्या अंगाला अत्तर चोपडी. रामसदयबाबूंची चाळिशी ती बहुधा चोरून नेई आणि मोडून तोडून फेकून देई. आणि तिच्या चौकटींतलें सोनें काढून ज्याच्या मुलीचें लग्न व्हावयाचें असेल अशा एखाद्या गरीब माणसाला देऊन टाकी. झोपेंत ते घोरूं लागले म्हणजे लवंगलता आपल्या कानकोरण्यानें त्यांच्या कानांतला मळ काढी आणि घरभर छूंछूं असा नाद करून निद्रेचा भंग करीत असे. रामबाबूंनीं 'ललित लवंगलता परिशीलन' असें म्हणतांच ती पुढें येऊन म्हणे 'आज्ञा आजोबा, दासी सेवेला हजर आहे.' रामबाबू म्हणे 'मी मेल्यावर तुझें कसें होईल !' लवंग म्हणे 'काय व्हावयाचें ! आपल्या इस्टेटीचा मी खास उपभोग घेईन,' पण याच वेळीं ती मनांत म्हणे कीं मी विष खाईन आणि रामबाबूहि ही गोष्ट जाणून होता."

स्त्रियांना पुरुषांकडून होणाऱ्या अन्यायाचा निषेध वाङ्मयांत फारसा आढळत नाहीं. उलट चारित्र्य व नीति यांच्यासंबंधानें स्त्रियांची निंदा केलेली बरीच आढळेल. श्रीरामचंद्राचें उदाहरण घेतलें तरी सीतेच्या बाबतींत रामानें चौकशी केली नाहीं. केवळ पुरुषी लोकमताला मान वाकवून सीतेचा त्याग केला. रामाचा गुप्त दूत जनवार्ता ऐकण्याकरितां अयोध्येंत रात्रीं हिंडला. तेव्हां एकाहि स्त्रीनें सीतेच्या चारित्र्याबद्दल संशय

घेतलेला त्याच्या कानावर आला नसेल. यःकश्चित् एक परीट बोलला, तेवढ्यावर लोकमत तसेंच आहे असें समजून रामानें सीतेचा त्याग केला. तिला वनांत सोडून लक्ष्मण परत निघाला; तेव्हां सीतेच्या स्वभावाची खरी परीक्षा होती. पण तेव्हांहि रामाला उपमर्दकारक असे शब्द तिनें न वापरतां "तुम्हीं केलें हें तुमच्या विद्वत्तेला व कुलाला शोभेल असें केलें काय ? असें मीं विचारलें म्हणून रामाला सांगा" इतकाच निरोप तिनें रामाला पाठविला. पण लगेच आपण बोललों हेंहि फार झालें असें वाटून तिनें सर्व दोष आपणाकडेच घेतला, व अन्य जन्मीं केलेल्या माझ्या पापाचें फळ मला मिळालें, एरव्हीं रामाला अशी बुद्धि कां व्हावी ?" असा निर्णय तिनें दिला !

पण पुराणेतिहास सोडून दिले तरी लौकिक चरित्रांत सगळें झुकतें पारडें पुरुषांकडेच दिलेलें आढळेल. म्हणजे स्त्रियांना होणाऱ्या अन्याया-संबंधानें जाणीव आढळणार नाहीं. तर चारित्र्याच्या दृष्टीनें स्त्रियांविषयीं नेहमीं साशंक वृत्ति ठेवलेलीच आढळेल. अरेबियन् नाईट्स् या कथासंग्रहाचा उपोद्घात पाहिला तर तो स्त्रियांच्या दुश्चरितांतच कल्पिलेला आढळतो; व तीच कल्पना सर्व अरेबिअन नाईटभर मधूनमधून डोकावते. शेक्सपिअरच्या सिंबेलाईन नाटकांत नायक ईश्वराला अर्ज करून उघड म्हणतो कीं, " देवा स्त्रियांना जन्माला कां घातलेंस ? प्रजोत्पत्तीला स्त्रियांहून दुसरा कांहीं मार्ग तूं ठेवतास तर या स्त्रियांची भानगडच जगांतून मिटली असती. " अशा प्रकाराचे उलट, म्हणजे स्त्रियानीं पुरुषाला नांवें ठेवलेले, उल्लेख कांहीं थोडे आढळतील. " पुरुष सदाच बेइमानी व फसवे असतात " असा एखादा उद्गार एखाद्या स्त्रीच्या तोंडीं आढळतो. पुरुषांच्या वरचढपणासारखा स्त्रियांचा वरचढपणा वाङ्मयांत कोठें फारसा आढळत नाहीं. स्त्री-पुरुषांच्या जोडींत क्वचित् पुरुष मनाचा भोळा, कच्चा, बाईलबुद्ध्या असा असून त्याची स्त्री पक्की वस्ताद, जहांबाज असें घडूं शकेल; व नवऱ्याला मुठींत ठेवणाऱ्या स्त्रीची व्याजस्तुति व पुरुषाची निंदा भाषाव्यवहारांत प्रचलित आहेहि. तथापि तो प्रकार फार थोडा याचें कारण वाङ्मय लिहिलें जातें तें मुख्यतः पुरुषांकडूनच. यामुळें स्त्रियांच्या अंतःकरणांतील खरे उद्गार कोणत्या शब्दांनीं लिहिले

असतां बरोबर ठरतील हें लेखकांना कळत नसेल. आतां अलीकडे स्त्रिया लेखक होऊं लागल्या आहेत. तथापि त्यांच्या लिहिण्यांतहि, इकडेच नव्हे तर तिकडे युरोप-अमेरिकेंतहि, पुरुषाचा अधिक्षेप, त्यांची निंदा, त्यांच्या अन्यायी व अनीतिमूलक वर्तनावर टीका इत्यादि गोष्टी कमीच आढळतात. फारच झालें तर त्या समसमानतेच्या हक्काची जाणीव आपल्या लेखांतून प्रकट करतात. आणि खरोखर पाहिलें तर समानता हेंच ध्येय सर्वोत्कृष्ट आहे. पूर्वी पुरुषांचा वरचढपणा दिसून आला म्हणून त्याचे उट्टें काढण्याकरतां आतां स्त्रियांचा वरचढपणा व्हावा असें कोणीहि म्हणणार नाहीं. आणि फिरून, उत्कृष्ट ध्येय प्रकट करण्याकरतां कवीच्याच गोड भाषेचा उपयोग करून घ्यावयाचा तर कालिदास व भवभूति यांचे उतारे मी देईन. पैकीं रघुवंशांतील अजविलापांत अज हा इंदुमतीसंबंधानें काय म्हणतो पहा.

" गृहिणी सचिवः सखी मिथः प्रियशिष्या ललिते कलाविधौ
करुणाविमुखेन मृत्युना हरता त्वां वद किं न मे हृतम् ! "

पण ही प्रेमाची भाषा झाली. उपदेशाची भाषा पाहिजे तर ती मालती-माधवांतील कामंदकीच्या तोंडीं घातलेल्या खालील उद्गारांत सांपडेल.

" प्रेयोमित्रं बंधुता वा समग्रा । सर्वे कामाः शेवधिः जीवितं वा
स्त्रीणां भर्ता धर्मदाराश्च पुंसां । इत्यन्योन्यं वत्सयोः ज्ञातमस्तु ॥ "

मला वाटतें कुटुंबांतील स्त्रीपुरुषसंबंधाचें ध्येयवादित्वाच्या दृष्टीचें वर्णन याहून अधिक सुंदर किंवा उदात्त सांपडणार नाहीं. आणि हा शेवटचा गोड घास घेऊन कुटुंबांतील स्त्रीपुरुषसंबंधाचा जुन्या वृत्तांताचा समारोप मी थांबवितों.

---

## आन्हिक ५ वें

# कुटुंब-व्यवस्था ( २ ) स्त्रियांचे हक्क

पण झालें तें थोडें व व्हावयाचें तें पुष्कळ आहे. शिवाय झालें तें यापुढें नुसतें आठवणींतच राहावयाचें. कारण यापुढें येणारा काल हा स्त्रीपुरुषांच्या समानतेचा येणार आहे, असें समजूनच तरुण हिंदु नागरिकाला यापुढें चाललें पाहिजे. ही गोष्ट कालक्रमानें घडणारी असून, शिवाय जगांत व्यक्तिस्वातंत्र्याचें जें नवें युग अवतरत आहे त्या दृष्टीनें तें अपरिहार्य असून, त्यांत वावगें असेंहि कांहीं नाहीं. कायदा हेंच नव्या युगांत हक्कांचें खरें अधिष्ठान राहील. मग व्यवहारांत प्रेम किंवा सोय इत्यादि दृष्टींनीं काय मुरड घातली जाईल ती जावो. कांहीं शास्त्रज्ञांनीं असे प्रयत्न सुरू केले आहेत कीं, आपणाला संतति व्हावयाची ती पुरुषसंतति असावी कीं स्त्रीसंतति असावी याविषयीं मनुष्याला आपली इच्छा वेळच्या वेळीं सिद्धीस नेतां यावी. तसें झालें तरी आईबाप नुसती पुरुषसंततिच किंवा नुसती स्त्रीसंततिच निर्माण करूं इच्छितील असें नाहीं. फार तर समानतेच्या हक्काला अनुसरून जितके मुलगे तितक्या मुली अशी प्रजा उत्पन्न होईल. पण आजहि शास्त्राच्या मदतीशिवाय लोकसंख्येचें प्रमाण असें निम्मेंनिम्मेंच जवळ जवळ पडतें. या दृष्टीनें म्हणजे संख्याबलाच्या दृष्टीनें समानता आधींच सिद्ध आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. पण खरी समानता प्रस्थापित व्हावयाची ती इतर गोष्टींत आहे. त्या दृष्टीनें एकदमच असें सांगून टाकतां येईल कीं, माणुसकीचे मूलभूत हक्क हेंच स्त्री व पुरुष यांचें प्राथमिक स्वराज्य होय; व तें कोणत्याहि सुधारलेल्या देशांत आज स्त्रियांना मिळून चुकलें आहे. स्त्रियांची कायदेशीर गुलामगिरी नष्ट होऊन त्या जागीं कायदेशीर समानता प्रस्थापित झाली आहे. म्हणजे स्त्रीला दासी म्हणून विकणें, देऊन टाकणें किंवा तिचा प्राण घेणें या गोष्टी तर राहोतच पण इतर कोणाहि मनुष्याप्रमाणें बायकोला कसलीही शारीरिक इजा नवऱ्याला कायदेशीर रीतीनें हल्लीं करतां येत नाहीं. म्हणजे नवऱ्यानें तशी इजा केली, आणि बायको फिर्याद करण्याला तयार झाली, तर तिची फिर्याद चालेल व त्या गुन्ह्याबद्दल नवऱ्याला शिक्षा होईल.

घटस्फोटाचें—काडीमोडीचे—कायदे सर्व देशांत सारखे नाहींत. हिंदु समाजांत तर घटस्फोटाची कल्पना विशिष्ट वरच्या जातींत उदितहि झालेली नाहीं. मात्र जोंपर्यंत काडीमोड झालेली नाहीं तोंपर्यंत नवऱ्यानें बायकोला अन्नवस्त्र देऊन पोसलें पाहिजे, अशी कायद्याची सक्ती आहे. हिंदु समाजांपैकीं ज्या वर्गांत काडीमोडीचा हक्क नाहीं, त्याहि वर्गांत स्मृतीच्या आधारानेंच विशेष परिस्थितींत घटस्फोट कां होऊं नये अशी चिकित्सा अलीकडे निघाली आहे. आणि अदमास असा दिसतो कीं, पुढील कांहीं वर्षांत घटस्फोट करण्यास योग्य अशा परिस्थितीचीं कांहीं लक्षणें किंवा कलमें कायद्यांत घातलीं जातील. अर्थात् कायदा होईल तो या बाबतींत एकतर्फी होणार नाहीं. दुतर्फी म्हणजे हक्कांची समानता संभाळूनच होईल. नव्या पिढीच्या तरुणांना ही सुधारणा मान्य होईल असें मला वाटतें. ‘ विवाह हें जन्माचें बंधन ’ ही कल्पना जरी अत्यंत रम्य व अत्यंत उपयुक्तहि आहे, तरी पण विशेष परिस्थितींत विवाहबंधन तुटूं नये, आणि कशाही स्त्रीनें कशाहि पतीला किंवा कशाहि पतीनें कशाहि स्त्रीला आमरण बाळगलें, नांदविलें पाहिजे, हा नियम केव्हांहि कठोर वाटतो यांत शंका नाहीं. त्यांतल्या त्यांत हल्लीं बायकोला टाकून देणें हें नवऱ्याला जितकें सोपें आहे तितकें बायकोनें नवऱ्याला टाकून देणें सोपें नाहीं; पण सोपें नाहीं इतकेंच काय तर शक्यहि नाहीं. म्हणून या बाबतींत पुरुषांपेक्षां स्त्रियांच्या दृष्टीनें अधिक विचार होऊन कायद्यांत तशी दुरुस्ती करावी लागेल.

मिळकत धारण करण्यासंबंधानेंहि इतर समाजांच्या मानानें हिंदु स्त्रियांचे हक्क आज कमी दर्जाचे ठरतात. एका स्त्रीधनाशिवाय कोणत्याच मिळकतींवर स्त्रियांना हक्क नाहीं. वारसा चालून येईल तोच काय तो तिचा मिळकतीचा हक्क. मुसलमानी व्यवहारशास्त्रांत स्त्रीला मुलांबरोबर नवऱ्याच्या मिळकतीचा कांहीं हिस्सा हक्कानें मिळतो. हिंदु स्त्रीला तसा मिळत नाहीं. समाईक कुटुंबांतील विधवा स्त्रीला स्वतंत्र मिळकतीचा हक्क नाहीं. विधवेला वारसाहक्कानें मिळालेली मिळकतहि उपभोगाच्या दृष्टीनें मर्यादित ठरते. अविभक्त कुटुंबांत विधवेला अन्नवस्त्राशिवाय मिळकतीचा इतर हक्क नाहीं; व अलीकडील कांहीं निर्णयाप्रमाणें दत्तक घेण्याच्या तिच्या हक्काच्या मर्यादा वाढल्या असल्या तरी, दत्तक घेऊन ती इतर नातेवाईक वारसांना

अपशकून करू शकली तरी, तो अपशकून तिला स्वतःलाहि होतोच; कारण दत्तक घेतल्यानें स्वतः तिला मिळकतींत वेगळा हिस्सा मिळत नाहीं. जो मिळतो तो तिच्या नवऱ्याच्या जागीं उभ्या राहिलेल्या दत्तक मुलाला. म्हणजे ती स्वतः फिरून परतंत्रच. पण भावी कायदेकौन्सिलांतून या गोष्टींचा विचार झाल्याशिवाय राहाणार नाहीं, व या सुधारणा योग्यायोग्य पाहून योग्य त्या घडवून आणण्यासंबंधानें तरुण पिढीनें उत्साह दाखविला पाहिजे.

दिवसानुदिवस जुनी अविभक्त कुटुंबपद्धति हिंदु समाजांतून नाहींशी होत चालली आहे. त्याविषयीं वाईट वाटून उपयोग नाहीं. कल्पनेनेंच चित्र रंगवावयाचें तर जुन्या काळांत क्वचित् आढळूं शकलीं असतीं अशीं, म्हणजे शेंकडो माणसें एकाच वेळीं एकाच घरांत सुखानें नांदणारीं, अविभक्त कुटुंबें मनश्चक्षूंपुढें उभीं करून आनंद मानितां येईल. परंतु प्रत्यक्ष व्यवहार पाहिला तर अविभक्त कुटुंबाची पद्धति कायद्यानें, वहिवाटीनें व विशेषत: आवडीनेंच इतकी ढासळत चालली आहे कीं, ती यापुढें टिकणें शक्य नाहीं. मानवी कुटुंबाची सर्वांत लहान व्याख्या, म्हणजे आईबाप व मुलें एवढ्यांचाच समुदाय, ही व्याख्या अमलांत येऊं लागली आहे. आणि जगाची स्थितीच सर्व बाजूंनीं अशी कांहीं बदलत चालली आहे कीं, हें मर्यादित कुटुंबच समाजाचा तुटक, पण खरा सुसंघटित, पक्का व स्वावलंबी घटक बनण्यास योग्य आहे. हीच विचारसरणी थोडी पुढें नेली असतां, नवरा व बायको हीं दोन्ही मिळूनच जरी केव्हांहि कुटुंब म्हणून होणार, तरी त्यांतल्या त्यांतहि उभयतांचे मूलभूत व्यक्तिविषयक हक्क ठरणें हें न्यायाचें व सोईचें होईल. मात्र समानता या शब्दाला एकच व तोहि संख्यावाचक असा अर्थ नाहीं. गुणवाचक असाहि अर्थ आहे. इंग्रजी न्यायशास्त्रांत एक वाक्य असें आहे कीं 'Equality is not Equity' म्हणजे सरसकट ढोबळ मानानें मोजलेली मापलेली समानता ही कांहीं खरी समानता नव्हे, तर समानता खरी पण तिचीं मापें वेगवेगळीं असूं शकतात. इक्विटी म्हणजे सात्त्विक न्यायदान, निर्विकारी न्यायदान, पण न्याय याचा अर्थ इतकाच असतो कीं, ज्याला जें देणें योग्य तें द्यावयाचें, व ही योग्यता ठरविणारानें ती निर्विकार मनानें ठरविली पाहिजे. आणि परंपरा व रूढी

यांच्या जोरामुळें जर निर्विकारता मनुष्याला न्यायदानाच्या कामीं लाभली नाहीं, तर अखेरीस स्वभाव, प्रकृति व परिस्थिति हीं त्याला अवश्य ती न्यायबुद्धि शिकविल्याशिवाय राहाणार नाहींत. प्रत्येक पिढींतील प्रौढ मनुष्याला आपल्या लहानपणच्या व आपल्याच प्रौढ दशेंतल्या समाजस्थितींतील अंतर उघड दिसून येतें. त्याला असेंहि कळून येतें कीं, लहानपणीं अमुक एक गोष्ट सामाजिक न्यायबुद्धीची अशी मी समजत होतों व त्याप्रमाणें आचरण करीत होतों; परंतु आतां परिस्थितीनें माझा न्यायदृष्टीचा कोन बदलला. यामुळें माझ्याच हातून पूर्वी जें घडत नव्हतें तें आतां सहजपणें घडूं लागलें आहे. आणि मौज ही कीं, तें नवें त्या जुन्याइतकेंच मला न्यायबुद्धीचें वाटतें व म्हणूनच मी तें करतों ! तात्पर्य, विवेकबुद्धी ही त्रिकालाबाधित असूंच शकत नाहीं. म्हणून समाजाच्या परिस्थितीचा त्या बुद्धीवर पुष्कळच परिणाम होतो व त्यांत वाईट वाटण्यासारखेंहि कांहीं नाहीं. कारण मनुष्याला सुधारणा व प्रगति ही इष्टच असते. आणि सुधारणा किंवा प्रगति याचा अर्थ हाच कीं आपल्या आवडी, वासना व न्यायबुद्धि या परिस्थितीशीं मिळवून घेणें.

स्त्री ही पुरुषाची अर्धांगी ही कल्पना आपल्या आधिदैविक वाङ्मयांत रूढ असून अर्धनारीनटेश्वर हें त्या कल्पनेचें चित्र किंवा प्रतीक होय. आणि उपपत्ति किंवा कल्पनाच मांडावयाची तर 'स्त्री ही पुरुषाची अर्धांगी होय' या शब्दाहून इतर कोणत्या शब्दांनीं ती अधिक चांगली मांडता येईल ? मुळींच नाहीं.

गेल्या चाळीस वर्षांत महाराष्ट्रांतच काय पण इतर प्रांतांतहि स्त्रियांचे कायदेशीर हक्क व सामाजिक दृष्ट्या वागणूक-वागवणूक या दृष्टींनीं बराच फरक पडलेला आहे व आणखीहि पडणार आहे. स्त्रीशिक्षणाचेंच उदाहरण घेतलें तर त्या बाबतींत पूर्वग्रह सर्व नाहीसे होऊन हल्लीं थेट सहशिक्षणापर्यंत मजल गेली आहे. याचा अर्थ स्त्रियांचें स्वैर वर्तन समाजाला मान्य झालें आहे असा नाहीं. तर तो असा आहे कीं, स्त्रियांना शिक्षण दिलें तरी त्यामुळें त्या हटकून स्वैराचारी होतील असें नाहीं. त्यांनाहि स्वाभाविक भीड, मर्यादा, लाज हीं असतातच. तथापि, नव्या परिस्थितींत प्रवेश करूनहि वरील गुण संभाळण्याइतकें, त्यांना परिस्थिति व आपलें वर्तन यांचें

इष्ट असें अभिमीलन करितां येतें, आणि तें त्याना करितां येतें असें पाहून समाजहि त्यांच्या हालचालींना व वागणुकीला तितका अधिक वाव देतो. चाळीस वर्षांपूर्वी प्रौढ मुलगी हातांत पुस्तकांची पिशवी व छत्री घेऊन चाललेली पाहिल्यानें, तें पाहाणाऱ्या प्रत्येक पुरुषाच्या तोंडावर आश्चर्याचें किंवा नापसंतीचेंहि हसूं आलेंच असेल. पण आतां तें येत नाहीं. चाळीस वर्षांपूर्वी स्त्रीशिक्षणाविषयीं जें मत होतें तेंच गेल्या तीन चार वर्षांपर्यंत प्रौढ मुलींनीं सायकलवर बसून हिंडणें किंवा पुरुषांसारखे शारीरिक व्यायाम करणें याविषयीं असे. पण आतां तेंहि मत बदलूं लागलें आहे. स्त्रीशिक्षण व स्त्रीदाक्षिण्य हे कांहीं कायदेशीर हक्काचे प्रश्न नव्हत. पण विवाहाच्या वयाची एका अंगची मर्यादा, विवाहबंधन तोडण्याच्या योग्य सवलती आणि वारसा, यांना कायदेशीर हक्कांचें स्वरूप आहे. त्या बाबतींत अलिकडे, म्हणजे खालसांतील किंवा संस्थानांतीलहि कायदेकौन्सिलांची म्हणजे विधिमंडळांची प्रगति होऊं लागल्यापासून,हे हक्क विस्तृत करण्याच्या तजविजी होऊं लागल्या आहेत व त्यांतील कांहीं अंमलांतहि आल्या आहेत. आणि यापुढें या मंडळांतून लोकसत्ता जितकी वाढेल तितक्या आणखीहि तजविजी कांहीं सुचविल्या जातील व त्यांतील कांहीं अमलांतहि येतील. आजवर कायदेमंडळें हीं लोकमताचा अंमल होण्याला अपुरी पडत पण यापुढें ही उणीव भरून निघेल. आणि विद्यमान लोकमत व स्त्रियांच्या हक्कांचा विद्यमान कायदा यांचा मेळ सर्वस्वीं नसला तरी जवळजवळ पडूं लागेल.

आणि ही गोष्ट सनातनवादी अशा आमच्या हिंदी समाजाचीच नाहीं, तर ज्याला आपण सुधारलेला असें समजतों त्या युरोपिअन समाजांतहि क्रमानेंच घडत आली आहे. सुमारें शंभर वर्षांपूर्वी इंग्लंडांतील स्त्रियांची स्थिति आमच्याकडील स्त्रियांसारखीच होती. सुरवातीचीच गोष्ट म्हणजे तिचा आपल्या मुलांवरहि ताबा नव्हता. घरांत कुटुंब सुखानें नांदत असतां मुलांना अर्थात् आईचाच लळा अधिक, व घरांत तीच काय ती मुख्य अधिकारी असें त्यांना वाटणें स्वाभाविक आहे. आणि एकानें खरेंच असें वर्णन केलें आहे कीं, एका लहान इंग्रज मुलीला कोणी गमतीनें विचारलें कीं, " तुझा बाप कोणता ? " यावर तिनें उत्तर दिलें. " आमच्या घरीं

येऊन आईचा पाहुणा म्हणून नेहमीं राहातो तो ! " पण 'बाप म्हणजे आईचा पाहुणा ' अशी कल्पना सर्वस्वीं अद्भुत नसून कांहीं रानटी समाजामध्यें ती प्रत्यक्ष अमलांतही आहे. ट्रोबी अँडर नांवाचा एक समाज आहे. त्यांत अशी चाल अजून आहे कीं, घराचा मालक स्त्री म्हणजे आई. मिळकतीचा वारसा आईकडून जावयाचा. मुलांवर बापाला कांहीं हक्क नाहीं. स्त्री लग्न करून नवऱ्याच्या घरीं राहावयास गेली म्हणजे तिच्या भावांनीं कुटुंबपोषणाला लागणारें अन्न तिजकडे पाठवावयाचें, व तिच्या मुलांचे पुरुष पालनकर्ते म्हटलें म्हणजे त्यांचे मामा, बाप नव्हे. अगदीं याच्या उलट शंभर वर्षांपूर्वी इंग्रज स्त्रियांची स्थिति होती. म्हणजे स्त्री-पुरुषांचा बेबनाव झाल्यास पुरुषानें स्त्रीला दूर करावें पण मुलें तिजकडून काढून आपल्या हातीं सक्तीनें घ्यावीं. १८३९ त प्रथम कायदा होऊन असें ठरलें कीं, बापानें ताब्यांत घेतलेल्या मुलांना भेटण्याची इच्छा आईला झाली तर ती भेट घेऊं देण्याची परवानगी कोर्टाकडे अर्ज करून तिला मिळवितां येईल. पण आपल्या मुलांचा पालक होण्याचा हक्क इंग्लंडांत स्त्रीला १८८६ पर्यंत मिळाला नव्हता. पण तेव्हां मिळाला तो-सुद्धां कोणा तरी दुसऱ्या पुरुषाच्या जोडीदारीनें ! अगदीं थेट बापाप्रमाणें आईला मुलाच्या पालकत्वाचे हक्क १९२६ सालीं मिळाले ! म्हणजे या गोष्टीला अवघीं सात वर्षें झालीं. दुसरी गोष्ट, पूर्वी कोणीहि निपुत्रिक मनुष्य मृत्युपत्र केल्याशिवाय मरेल तर त्याची मिळकत एकट्या त्याच्या बापाला मिळे. आईला कांहींच मिळत नसे. हल्लीं पार्लमेंटचा कायदा होऊन बापाप्रमाणें आईलाही समभाग मिळतो. याहि गोष्टीला सातच वर्षें झालीं. पूर्वी अविवाहित इंग्रज स्त्रीला जे हक्क होते ते विवाहानें नष्ट होत. विवाह केल्यानें ती पतीची अर्धांगी होई. पण, त्याबरोबरच हक्कांच्या दृष्टीनें तिचें अस्तित्व नष्ट होई. अविवाहित स्त्रीला आपल्या नांवानें मिळकत धारण करतां येत असे व ती तशी अजूनहि येते. पण स्त्रीचा विवाह झाला म्हणजे ती आपल्याबरोबर घेऊन गेलेली मिळकत नवऱ्याची होई. आणि ती कोणा नवऱ्याची बायको असेपर्यंत तिला कोणी नवीन मिळकत उचलून दिली तरी तीहि नवऱ्याच्याच मालकीची होई. पण ही स्थिति सुमारें पन्नास वर्षांपूर्वी कायद्यानें बदलली

व विवाहित स्त्रीला स्त्रीधन म्हणून स्वतःची मिळकत वेगळी धारण करतां येऊं लागली. अवध्या चाळीस वर्षांपूर्वीपर्यंत इंग्रज नवऱ्याला आपल्या स्त्रीला विशेष कारणाकरितां घरांत कोंडून बंदिवानाप्रमाणें ठेवण्याचा अधिकार होता. तो तेव्हांपासून अलीकडे नाहींसा झाला. विलायतेंत घटस्फोट १८५७ पर्यंत कायद्यानें होऊं शकत नव्हता ही गोष्ट ऐकून पुष्कळांना आश्चर्य वाटेल. तात्पर्य, हल्लीं अविवाहित इंग्रज स्त्रीला पुरुषाचे सर्व अधिकार आहेतच, पण विवाहित स्त्रीला देखील ते हक्क प्राप्त झाले आहेत. म्हणजे पूर्वीं तिचें जीवन व व्यक्तित्व पुरुषाच्या जीवनांत मिळूनमिसळून किंवा निदान गुंतून गेलें होतें तें आतां सुटें, रेखीव, कातीव होऊन तिचा संबंध नागरिक या नात्यानें राष्ट्र व राष्ट्रीय सरकार यांच्याशीं जोडला गेला आहे. सन १९३२ सालीं लंडन हायकोर्टानें एका दाव्यांत विवाहित स्त्रीच्या हक्कांचें वर्णन केलें तें असें; "विवाहाचें निमित्त करून, म्हणजे त्याचा फायदा घेऊन, पुरुषाला स्त्रीवर मालकी पूर्वीं मिळवितां येत होती ती आतां नष्ट झाली. तिला स्वतंत्र व्यक्तित्व लाभलें, ती नागरिक बनली. ती आपल्या नवऱ्याची नोकरचाकर नाहीं. तिला आपल्या बुद्धीप्रमाणें कोणतीही गोष्ट करितां येईल, व आपलें हितसंरक्षण करण्याचे सर्व कायदेशीर मार्ग नवऱ्याइतकेच तिलाहि मोकळे राहातील."

हिंदी समाजांतील स्त्रियांच्या स्थितीविषयीं थोडें पाहूं. असें पाहतां अविभक्त कुटुंबांत स्त्रिया असतात त्या फक्त जगतात इतकेंच म्हणतां येईल. त्या केवळ आश्रित होत. अन्नवस्त्राच्या मर्यादित हक्कापलीकडे त्यांना कांहीं नाहीं. हिंदुधर्मशास्त्रांत अशी नीति सांगितली आहे कीं, बालपणीं स्त्रीचें रक्षण बापानें करावें, तरुणपणीं नवऱ्यानें करावें, वृद्धपणीं पुत्रानें करावें. पण हें म्हणण्यांत पुरुषकर्तव्य सांगण्याच्या हेतूबरोबर स्त्रीला स्वातंत्र्य नाहीं हें सांगण्याचाहि हेतु आहे. फक्त स्त्रीधन म्हणून एक विशिष्ट प्रकारची मिळकत हिंदुधर्मशास्त्रानें मान्य केली आहे; व त्या धनावरील हक्क मात्र तिचा इतका पक्का आहे कीं तिला स्वतंत्रपणें त्याची व्यवस्था व दानहि करतां येतें. या हक्कालाहि मर्यादा घालण्याची दृष्टि धर्मशास्त्रांतील प्रबंधकारांनीं बरीच चालविली आहे. मुंबई इलाख्यापेक्षां बंगाल इलाख्यांत हिंदुधर्मशास्त्र स्त्रीधनाच्या बाबतींत अधिक कृपण आहे! या स्त्रीधनाचा

वारस इतर वारसाप्रमाणें नाहीं. स्त्रीधनांत समाविष्ट होणारी मिळकत म्हणजे लग्नाचे वेळीं केवळ वधूकरतां म्हणून दिलेल्या देणग्या, किंवा आई बाप, भाऊ, यांनीं किंवा इतर आप्तांनीं प्रीतिपूर्वक खास तिला म्हणून दिलेल्या देणग्या. एखाद्या उपस्मृतींत याच्याहि पलीकडे थोडी मजल जाते. म्हणजे नवऱ्यानें दुसरें लग्न करण्याचे वेळीं पहिल्या बायकोला दिलेल्या देणग्या, लग्नांत वधूदक्षिणा म्हणून वराकडून वधूच्या पित्याला दिलेली देणगी, वाटणींत मिळालेली मिळकत; अन्नवस्त्राकरतां मिळालेली मिळकत, स्त्रीधनाचा मोबदला होऊन मिळालेली मिळकत, परिग्रहानें म्हणजे बारा वर्षांवर स्त्रीच्या ताब्यांत बिनतक्रार राहिलेली मिळकत इत्यादि. (रिक्त, क्रय, संविभाग, परिग्रह, अभिभव इ०) स्त्रियांना वारसाहक्कानें मिळालेल्या-पैकीं कांहीं प्रकारची मिळकत अनिर्बंध पण कांहीं सनिर्बंध असते. पण स्त्रीधनासंबंधानें कलमवार कायदा झालेला नाहीं. आणि हिंदुधर्मशास्त्राचे प्रांतवार निरनिराळे पंथ, स्वतंत्र अधिकाराचीं निरनिराळीं हायकोर्टें, आणि हिंदुधर्मशास्त्राचें रहस्य न समजणारें आणि त्यामुळें त्या शास्त्रांत गोंधळ माजवून ठेवणारें प्रीव्ही कौन्सिल, या सर्वांच्या योगानें स्त्रीधन शब्दाचा अर्थ अनिश्चित राहिला आहे. तसेंच वारसा व वाटणी यांनीं मिळालेली स्त्रियांची मिळकत यांच्यावर स्त्रीधनापेक्षां जीं अधिक बंधनें असतात त्यांचा परिणाम असा होतो कीं, त्या मिळकतीचा उपयोग त्यांना आपल्या आयुष्यांत करतां आला तरी मृत्युपत्रानें किंवा गहाणविक्रीच्या व्यवहारानें तिची व्यवस्था स्वतंत्रपणें स्त्रियांना करतां येत नाहीं. या व अशाच अनेक बाबतींत कायद्यानें सुधारणा झाली पाहिजे.

## विवाहाचीं व्यावहारिक बंधनें

हल्लीं हिंदुधर्मशास्त्राप्रमाणें विवाहावर बंधनें फार आहेत व तीं सारासार विचारानें कमी करण्याची आकांक्षा व उमेद भावी तरुण पिढीनें धरावी. या बंधनांची एक लांबलचक यादच होऊं शकेल. ज्योतिषशास्त्रदृष्ट्या बंधनें आहेत तीं सर्व धर्मशास्त्रानें घातलेलीं म्हणतां येत नाहींत. कारण मुलां-मुलींच्या पत्रिका किंवा अनुकूल ग्रहबल ताराबल कोणीं न पाहातां विवाह केले, तर ते कोणत्याहि दृष्टीनें धर्मशास्त्राविरुद्ध ठरत नाहींत. म्हणजे

बेकायदेशीर ठरत नाहींत. पण प्रत्यक्ष व्यवहारांत पत्रिका पाहणें व विवाहनिर्णय ज्योतिषांच्या सल्ल्यावर अवलंबून ठेवणें या गोष्टी अजून पुष्कळ प्रचारांत आहेत. त्या कमी झाल्या पाहिजेत. अनेक विद्या खऱ्या आहेत त्यांतलीच ज्योतिषविद्याहि तात्त्विक दृष्ट्या खरी असेल. परंतु प्रत्यक्ष व्यवहारांत ती उतरणें हें अनेक कारणांनीं दुर्घट ठरतें. त्या साऱ्या विषयाचा वाद येथें करण्याचें कारण नाहीं. पण भावी तरुण पिढीला निश्चयानें अशी शिफारस करावीशी वाटते कीं, त्यांनीं यापुढें त्यांच्या हातीं असेल तर तेथवर विवाह-संबंध व ज्योतिषशास्त्र यांचा संबंध सोडवून टाकावा म्हणजे तोडावा. जगांत नियति, अदृष्ट, नशीब वगैरे गोष्टी आहेत यांत शंका नाहीं. म्हणून ज्योतिषी म्हणविणाराच्या सल्लामसलतीइतकेंच नव्हे, तर त्याहून अधिक प्रामाण्य आत्मस्फूर्तीला आहे असें मनुष्यमात्रानें समजणें हें त्याला खचित भूषणावह आहे. त्याच्या सुखदुःखावर ग्रह व तारे यांचें जितकें नियंत्रण असेल त्यापेक्षां ईश्वराचें नियंत्रण खचित अधिक असणार. म्हणून ग्रह व तारे यांच्या गति व फलें याविषयींच्या संशयग्रस्त नियमांवर अवलंबून राहाण्यापेक्षां ईश्वरानें आपणाला दिलेल्या सात्त्विक स्फूर्तीवर अवलंबून राहावें, व तिला आधारच हवा तर प्रार्थनेच्या द्वारें प्रत्यक्ष ईश्वराचा घ्यावा हें अधिक बरें नाहीं काय ? ज्योतिषशास्त्रांत दानादिकांनीं ग्रहांची अनुकूलता संपादण्याचें प्रकरण नसतें तर ज्योतिषावर कदाचित् अधिक विश्वास ठेवितां आला असता. कारण निःस्वार्थीपणा हें जर सर्व नीतीचें मूल बीज मानलें तर ग्रहांना तरी तो नियम कां लागू नये ? दानें देऊन त्यांची कृपा संपादितां येतें असें म्हणण्यानें ग्रह हे स्वार्थी आहेत असें होईल. कदाचित् ग्रहस्थिति ही नियति ओळखण्याची एक खूण आहे इतकेंच म्हटलें तर कदाचित् तें अधिक पटेल. पण एका बाजूनें नियति म्हणावयाची, व दुसऱ्या बाजूनें लगेच ती मनुष्यप्रयत्नानें बदलण्याचा आत्मविश्वास प्रगट करावयाचा, अशा विसंगत वर्तनापेक्षां आत्मस्फूर्ति व ईश्वरप्रार्थना एवढ्या साध्या गोष्टीवरच आधार घेतलेला बरा नव्हे काय ? विवाह जेव्हां आपला आपणच करतों तेव्हां कदाचित आत्मस्फूर्ति निर्दोष व विकाररहित नसण्याचा संभव मानितां येईल. पण ज्यावर आपण प्रेम करतों अशा मुलां-

मुलींचीं किंवा इतरांचीं लग्नें आपण करण्याला उभे राहातों तेव्हां प्रायः ही आत्मस्फूर्ति निःस्वार्थी म्हणून शुद्ध असते. तेव्हां तिला अनुसरून योग्य स्थळें पाहून विवाह करून द्यावेत, आणि वधुवरांचें पुढें कल्याण व्हावें याविषयीं त्याच्या जोडीला ईश्वराची खऱ्या मनानें प्रार्थना करावी. तात्पर्य, तरूण पिढीनें लग्नकार्यांतील ज्योतिषशास्त्राची लुडबूड मानूं नये.

यानंतर दुसरीं बंधनें म्हटलीं म्हणजे गोत्र, प्रवर व जाति यांचीं. याविषयीं बोलतांना मात्र अधिक सारासार विचार ठेविला पाहिजे. गोत्रें पटणें न पटणें या विषयाची छाननी हल्लींहून अधिक झाली पाहिजे. अमुक गोत्र अमक्या गोत्राला पटत नाहीं याचा अर्थ अमुक ऋषीचें अमुक ऋषीशीं वाकडें होतें असा नाहीं. हा ऋषींऋषींमधला बहिष्कार नव्हे; तर जसें गोत्र हें मूळ केव्हां तरी रक्तसंबंधानें एक असलेलें कुल असें कदाचित् म्हणतां येईल; तसेंच न पटणाऱ्या गोत्रांतील लोकांचाहि मूळ रक्तसंबंध असावा अशी कल्पना होते. पण मूळ गोत्रांच्या उत्पत्तीला किंवा, गोत्रांमधून आडनांवांची व कुलांची वाटणी होण्याला किती दिवस झाले असतील ते असो; त्याचा अंदाज कांहींच कोणी सांगत नाहीं. गोत्रांची वर्ज्यावर्ज्यता पूर्वापार चालत आली आहे म्हणूनच ती अंधपरंपरेनें लोक मानतात. याहून दुसरें कांहीं नाहीं. गोत्राचा ऋषी हा कदाचित् गुरु इतकाच अर्थ असावा. क्षत्रिय लोकांत गोत्रें हीं गुरुंचीं नांवें आहेत असें म्हणतात. तसेंच ब्राह्मणांतहि असेल. बरें, गोत्राच्या नांवाचा ऋषीच असून तो तीं गोत्रें असणाऱ्या कुलांचा मूळ पूर्वज होता असें मानलें तरच रक्तसंबंध संभवतो. पण विवाहांत रक्तसंबंध मानावयाचा असें म्हटलें तरी तो किती पूर्वींच्या पिढ्यांपर्यंत मानावयाचा याला कांहीं शास्त्रीय प्रमाण आढळत नाहीं.

ख्रिस्ती व मुसलमान लोकांत चुलत भावंडांचीं लग्नें होतात ही गोष्ट अगदींच गौण असें मानलें तरी, भाची किंवा मामेबहीण हिच्याशीं लग्न करण्याचा परिपाठ कित्येक देशस्थ घराण्यांतून आढळून येतो. आणि अशा विवाहापासून अनिष्ट प्रजा निर्माण झाली किंवा वंशक्षय झाला असें कोणी आंकड्यांनीं सप्रमाण दाखवून दिलेलें नाहीं. वनस्पतिशास्त्र, किंवा मनुष्येतर प्राणिजीवनांचें शास्त्र, हें घेतलें तर त्यावरून रक्तसंबंध अशा कामीं किती मानावा हें कदाचित् कळून येईल. शिवाय या शास्त्रांत त्यांतल्या

त्यांत निदान वनस्पतिशास्त्रांत, दिसण्यांत विजातीय अशा वनस्पतीपासून संतति उत्पन्न करण्याचे प्रयोग करून पाहातां येण्यासारखे तरी आहेत. असें असून त्या शास्त्रांत मिश्रविवाहाचे नियम निश्चित असे सांगितलेले नाहींत. कांहीं वनस्पतींचीं एकमेकांवर कलमें होत नाहींत हें जसें सिद्ध मानितात, तसेंच कित्येक विजातीय वनस्पतींचीं कलमें एकमेकांवर होतात हेंहि सिद्ध मानितात. त्यांतून कोणतें उदाहरण परिणामांच्या दृष्टीनें ग्राह्य मानावें, कोणतें त्याज्य मानावें, हें जाणण्याला साधन नाहीं. तथापि केवळ सारासार विचारानें व तारतम्यानें असें म्हणतां येईल कीं, वरच्या सात पिढ्या वर्ज्य केल्या असतां त्या पलिकडील एकगोत्री, एकप्रवरी, एक आडनांवाच्या लोकांत लग्नें होण्यास हरकत नसावी. भावी तरुण पिढीनें या गोष्टींत लक्ष घालण्यासारखें आहे. कारण वधूवरपसंतीचें क्षेत्र जाती-बाहेर न जातां आधीं खुद्द जातींत जेवढें विस्तृत होईल तेवढें चांगलें.

मिश्रविवाहासंबंधानें असें म्हणतां येईल कीं, हा प्रश्न फार नाजूक आहे. पण पूर्वी अनुलोम विवाह हिंदूंमध्यें घडत होते. यावरून वर्ण किंवा जाति यांचें विवाहाला बंधन हल्लींसारखें कडक नव्हतें. हल्लीं तें इतकें कडक झालें आहे कीं, सशास्त्र असलेला अनुलोम विवाह करण्यासहि लोक धजत नाहींत. आणि खुद्द जातींच्या पोटजातींतील विवाहहि सामान्य लोक अनिष्ट मानतात. " स्वकुलाच्या बाहेर पण जातीच्या आंत " अशी दुहेरी मर्यादा धर्मशास्त्रानें मानली आहे; व ही पाळून देखील वर सांगि-तल्याप्रमाणें कुल याचा अर्थ वरच्या सात पिढ्या असा केला म्हणजे, एकाच गोत्रांत आणि जातींतील निरनिराळ्या पोटजातींत अगदीं सशास्त्र रीतीनें विवाह करतां यावा. अशा प्रकारचा सारासार विचार न केल्या-मुळें कडक बंधनांना कंटाळलेले तरुण लोक दुसऱ्या टोकाला जातात, आणि परजातींतहि लग्न करितात. पण ही प्रतिक्रिया तितकीच सदोष होय. एक कृपण आचार तर दुसरा अत्याचार ठरतो !

सगोत्रांत लग्न करणें याला रक्तसंबंधाची जशी हरकत वाटते तशीच एकदम परजातींत लग्न करण्याला दुसऱ्या एका दिशेची हरकत येते. ती म्हणजे वधूवरांच्या घरांतील चालीरीती, आचार, धर्मसंस्कार व विधि इत्यादिकांमधील वैचित्र्य, विरोध व बेबनाव. या सर्व गोष्टी मिळूनच

संस्कृति बनते. आणि फार वेगळ्या प्रकारच्या संस्कृतीच्या वधूवरांना संसार सुखाचा न होणें हें अगदीं स्वाभाविक आहे. म्हणून हिंदू तरुणांनीं पोटजातींचा निर्बंध विवाहांत न मानला तर तो तूर्त तरी इष्ट असा मध्यबिंदु ठरेल. अपवादात्मक एखाद दुसरें उदाहरण कोणत्याहि नियमा-विरुद्ध सहज दाखवितां येईल. म्हणजे गोत्रप्रवरापर्यंत निर्बंध पाळून, वरती पत्रिकेंतील ३६ गुण जमण्याचें ज्योतिषशास्त्राचें बंधन भरीला घालून झालेले विवाह अपेशी ठरले हें जसें दाखवितां येईल, तसें दुसऱ्या टोंकाला जाऊन मानववंशाच्या एका शाखेच्या मनुष्यानें मानव वंशाच्या दुसऱ्या शाखेंतील मुलीशीं लग्न केलें असतांहि तें सुखाचें व यशस्वी झालें असेंहि दाखवितां येईल. पण मनुष्याला जेव्हां अमुक एक गोष्ट कर अशी शिफारस करावयाची असते तेव्हां, अपवादांत बसेल तें कर असें न सांगतां कांहीं सर्वसामान्य नियमांत बसेल असें करण्याचीच शिफारस योग्य ठरेल. स्वभावाच्या लहरीनें, योगायोगानें, यदृच्छेनें जगांत कांहींहि घडूं शकतें. पण तें जमेस धरतां येत नाहीं. म्हणून मिश्र विवा-हाच्या बाबतींत तरुण पिढीला अशी शिफारस करतां येईल कीं, वर्ण-व्यवस्थेच्या पलीकडे एकदम उडी मारून, आपल्या एकट्याच्या विवाहानें आपण सर्व जातपात मोडून टाकली असें श्रेय मिळविण्याची आकांक्षा धरूं नये. तर आधीं शेंकडों पोटजाती झालेल्या आहेत त्या विवाहानें हटवीत हटवीत चार मुख्य जातींपर्यंत मजल आणून ठेवावी. त्याही-पलीकडे जाऊन पण जुन्या शास्त्राचा आधार देऊन फार तर अनुलोम विवाह करावा. पण यापलीकडे उडी मारूं नये.

---

## आन्हिक ६ वें

# कुटुंब–व्यवस्था ( ३ ) मुलगा–मुलगी

कुटुंबव्यवस्थेंत मुलगा हा बायकोनंतर क्रमानें येतो ही गोष्ट खरी. तथापि त्याचें स्थान बायकोपेक्षां श्रेष्ठ आहे हें उघड होय. कारण मुलगा हा बापाचा खास प्रतिनिधि म्हणून बापाला जे अधिकार ते मुलाला प्राप्त होतात. ते मध्यंतरीं कोणीही हिरावून घेऊं शकत नाहीं. आपल्याइकडील हिंदु समाजांत वडिलार्जित मिळकतीसंबंधानें मुलाचे हक्क बापालाहि नष्ट करतां येत नाहींत. फक्त स्वतः मिळविलेली मिळकत त्यानें आपल्या मुलाला द्यावी अगर देऊं नये; मुलाला नसेल तरच व ती दत्तक न घेईल तरच, बायको ही नवऱ्याचे जागीं येऊं शकते.

पुत्राचें महत्त्व हें अनादि कालापासून सर्वत्र मान्य झालेलें आहे. ऐतरेय ब्राह्मणांत म्हणजे अगदीं जुन्या वैदिक वाङ्मयांत पुत्राचें महत्त्व वर्णन केलेलें आढळतें तें जसें:–" इक्ष्वाकु कुळांत हरिश्चंद्र नांवाचा राजा होऊन गेला. त्याला शंभर बायका होत्या. पण एकहि मुलगा नव्हता. तेव्हां एक दिवस त्यानें नारद ऋषीला विचारलें कीं, ऋषिवर्य, मुलाला एवढें महत्त्व देतात व सगळें जग त्याची इच्छा करतें असें त्याचें महत्त्व काय! " त्यावर नारद म्हणाला, " पुत्र झाला म्हणजे मनुष्य आपलें सर्व प्रकारचें ऋण त्याजकडे देऊन स्वतः अमर होतो. पुत्रमुख पाहिल्याबरोबर ही गोष्ट घडते. पृथ्वी, अग्निलोक व वरुणलोक यांमध्यें जेवढे भोग आहेत ते किंवा त्याहून अधिक भोग मिळाल्याचें श्रेय बापाला मुलगा झाल्यानें येतें. जो म्हणून पारलौकिक अंधकार म्हणतात त्यांतून पुत्राच्या योगानें बाप पार निघून जाऊं शकतो. परलोकच्या मार्गातील नदी तरून जाण्याला, चांगलें अन्न भरून ठेवलेली अशी नौका मुलगा हीच होय. अंगाला राख फासून, हरिणाजिनें पांघरून, दाढी वाढवून तप करण्यांत काय अर्थ ? त्याऐवजीं पुत्राची इच्छा मनुष्यानें करावी. म्हणजे तोच पित्याला निरपवाद अशा परलोकाला पोंचवितो. अन्नानें जीव जगेल, घर व वस्त्र यांनीं देहाचें संरक्षण होईल, सुवर्णानें घरांत शोभा निर्माण होईल, पशूंच्या वाहनांतून सुखानें प्रवास करतां येईल, स्त्री ही सहचरी होऊं शकेल, पण पुत्र हाच

परलोकांतील दिव्य प्रकाश होय. म्हणूनच पति हा स्वतः पत्नीच्या ठिकाणीं पुत्राच्या रूपानें जन्म घेतो. ज्याला पुत्र नाहीं त्याला स्वर्ग नाहीं. ''

याच्या उलट कन्येचें महत्त्व समजावें. म्हणजे तिला महत्त्व तर नाहींच, पण उलट तें दुःखमूल असें मानलें जात असे. ज्या ऐतरेय ब्राह्मणांत पुत्राचें असें उज्ज्वल वर्णन केलेलें आहे, त्यांतच ' कृपणं हि दुहिता ' म्हणजे मुलगी हें दुःख किंवा संकट असें म्हटलें आहे. पुत्रप्राप्ति हें एक मोठें काम्य कर्म असेंहि सांगितलें असून त्याची प्राप्ति होण्याकरितां एक विशेष प्रकारचा यज्ञहि सांगितला आहे; तसा कन्यांच्या प्राप्तीकरितां नाहीं. त्या झाल्या काय न झाल्या काय सारख्याच. किंवा कांहीं समाजांत राजांना कन्या झाली तर तिचा त्याग करावा किंवा मारून टाकावी अशाहि चाली होत्या म्हणतात.

पण ज्या पुत्राचें वरील वर्णन वैदिक वाङ्मयांत वाचावयास मिळतें त्यांतच असें आढळतें कीं, पुत्र ही देखील पित्याची एकप्रकारची मिळकतच होय. म्हणजे तिचें त्याला काय वाटेल तें करतां येत असे. आणि मौज ही कीं, ज्या एतरेय ब्राह्मणांत हरिश्चंद्राला नारदानें पुत्राचें वरील प्रकारचें वर्णन करून सांगितलें त्यांत त्याच प्रसंगाची हरिश्चंद्राची एक चमत्कारिक कथा आहे ती अशी :—

" नारदानें पुत्राचें असें वर्णन करून हरिश्चंद्राला म्हटलें कीं, राजा, तूं वरुणाची उपासना कर, म्हणजे तुला पुत्र होईल. पण असा नवस करावा लागेल कीं, जो पुत्र होईल तोच मी वरुणाला बळी देईन." त्याप्रमाणें राजानें उपासना केली. तेव्हां रोहित नांवाचा मुलगा झाला. नंतर वरुणानें नवसफेडीचा तगादा राजाकडे सुरू केला. तेव्हां राजानें वायदे सुरू केले. तो म्हणे, पहिले दहा दिवस जाऊं द्या मग बळी देईन. मग म्हणाला, आतां त्याला दांत येऊं देत मग बळी देईन. मग म्हणाला, आलेले ( दुधाचे दांत ) पडूं द्या मग बळी देईन. मग म्हणाला, चिलखत व शस्त्रास्त्रें धारण करण्याएवढा चांगला मोठा होऊं द्या, मग बळी देईन. पुढें रोहित त्याहि वयाचा झाल्यावर कांहींच सबब उरली नाहीं असें पाहून राजा त्याला म्हणाला, " मुला, तुझ्या प्राप्तीकरितां मीं वरुणाची उपासना करून नवस केला कीं, मला मुलगा होऊं दे म्हणजे तोच तुला

बळी देईन. तर आतां मला नवस फेडला पाहिजे. तेव्हां बळी जाण्याला तूं तयार हो. " पण मुलानें 'मी बळी जाणार नाहीं' असें साफ उत्तर दिलें व धनुष्यबाण घेऊन तो अरण्यांत गेला. अशा रीतीनें नवसफेड होत नाहीं असें पाहून वरुणानें राजाच्या पोटांत उदराचा रोग उत्पन्न केला. तें ऐकून रोहित बापाला वांचविण्याकरितां परत येण्याला निघाला; पण इंद्रानें त्याला असा उपदेश केला कीं, तूं परत जाऊं नकोस, असाच अरण्यांत फिरत राहा. कारण, त्यायोगानें तुझें पाप नष्ट होऊन तुला वैभव मिळणार आहे. अशा रीतीनें अनेक वर्षें अरण्यवास झाल्यावर रोहिताला अजीगर्त नांवाचा ब्राह्मण भेटला. त्याला तो म्हणाला 'तुला अनेक पुत्र आहेत. त्यांपैकीं माझ्याऐवजीं बळी जाण्याकरितां एकादा विकत देतोस का ?' अजीगर्तानें होय म्हटलें व शंभर गायींच्या किंमतीला आपला मधला मुलगा शुनःश्येप हा विकण्याचें ठरविलें. त्याला घेऊन रोहित बापाकडे आला व म्हणाला, 'बाबा, माझ्याऐवजीं बळी देण्याकरितां हा पाहा मीं एक माझ्याएवढा मुलगा आणला आहे.' तेव्हां हरिश्चंद्रानें वरुणदेवाला विचारिलें, 'रोहिताऐवजीं हा शुनःश्येप बळी म्हणून तुम्ही स्वीकाराल काय ?' वरुणानें होय म्हटलें. मग यज्ञ सुरू झाला. तो चालविण्याला विश्वामित्र, जमदग्नि, वसिष्ठ असे मोठमोठाले ऋषी आले. पण बळी द्यावयाचा तो यज्ञस्तंभाला दोरीनें बांधण्याची वेळ आली तेव्हां तें काम करण्याला कोणीहि पुढें होईना. तेव्हां आश्चर्य हें कीं, फिरून शुनःश्येपाचा बाप अजीगर्त हाच म्हणाला कीं, 'यज्ञस्तंभाला बळी दोरीनें बांधणें व त्याचा वध करणें या दोन्ही गोष्टी स्वतः मी करण्याला तयार आहे. मात्र या प्रत्येक कामाकरितां फिरून मला शंभर गायी दिल्या पाहिजेत.' हरिश्चंद्रानें अजीगर्ताचें हें म्हणणें मान्य केलें. तेव्हां अजीगर्तानें शुनःश्येपाला खांबाशीं दोरीनें बांधलें व हातांत सुरी घेऊन तो तिला धार पाजूं लागला. तेव्हां आतां आपण खचित मरणार असें पाहून शुनःश्येपानें एकामागून एक देवता आठवून त्यांची प्रार्थना सुरू केली. त्याप्रमाणें प्रजापति, अग्नि, सविता, वरुण, विश्वेदेव, इंद्र आणि अश्विन इत्यादींची प्रार्थना केली. शेवटीं उषेची प्रार्थना करून झाली तेव्हां ती सफल होऊन, शुनःश्येपाच्या अंगाला बांधलेल्या दोऱ्या आपोआप तुटून

पडल्या व त्याबरोबर हरिश्चंद्राची उदराची व्यथाहि नाहींशी झाली ! मग ऋषींनीं शुनःश्येपाला यज्ञांतील काम सांगितलें. तें त्यानें उपाध्याय होऊन केलें. तेव्हां विश्वामित्रानें शुनःश्येपाचा स्वीकार आपला दत्तक मुलगा म्हणून तेथल्या तेथेंच केला. तेव्हां अजीगर्त म्हणाला, 'आतां माझा मुलगा मला परत द्या.' पण विश्वामित्र म्हणाला, 'तूं तर आपला मुलगा विकूनच टाकला होतास. देवांनीं तो मला दिला. तेव्हां आतां तुझा त्याच्यावर कोणताहि हक्क राहिला नाहीं.' असें म्हणून विश्वामित्रानें शुनःश्येपाचें नांव बदलून देवव्रत असें त्यांचें नवें नांव ठेविलें. मग अजीगर्त शुनःश्येपाची आर्जव करून म्हणाला, 'मुला, देवांनीं तुला सोडविलें तर तूं परत आपल्या घरीं चल.' शुनःश्येप म्हणाला, 'मला विकून बांधून वध करण्याला तयार होऊन, एकंदर तीनशें गायी तुम्हीं मिळविल्या त्या पुऱ्या झाल्या नाहीं वाटतें ? म्हणून आणखी फिरून कोणाला तरी मला विकून गायी मिळविण्याकरितां मला घरीं चला म्हणतां ?' अजीगर्त म्हणाला, 'तसें कांहीं नाहीं. मी या तीनशें गायीहि परत देतों. मी माणुसकी सोडून वागलों याबद्दल मला फार दुःख होतें.' पण शुनःश्येप म्हणाला, 'तें कांहीं नाहीं. मला तुमचें घर मुकलें. तुमच्या शब्दावर यापुढें विश्वास कोणीं ठेवावा ?' असें म्हणून तो विश्वामित्राबरोबर त्याचे घरीं गेला व विश्वामित्रानेंहि त्याला आपल्या शंभर मुलांतील वडील मुलगा केले.

वरील कथा थोडी लांबट खरी. पण ती चालू विषयाला मोठी मुद्देसूद व लागू म्हणून दिली आहे. या कथेंतून यज्ञांत नरबलि देण्याची चाल दिसून येते पण येथें तो मुद्दा नाहीं तर, मुद्दा असा आहे कीं, वैदिक काळीं एकीकडे पुत्राचें महत्त्व इतकें मानिलें जात असें तरी, पुत्रावर बापाची सत्ता अबाधित होती. म्हणजे पुत्राला विकणें, देऊन टाकणें, प्राण घेणें येथपर्यंत बापाला कायदेशीर अधिकार होता. हा अधिकार पुढें केव्हां नष्ट झाला हें नक्की सांगणें कठीण, परंतु मध्ययुगीन इतिहासांत हा अधिकार सर्वस्वीं नष्ट झाला होता असें वाटत नाहीं. अलीकडील काळांत मात्र पुत्रवध हा वधाचाच गुन्हा मानिला जातो. पण गुलामगिरीची चाल सर्वस्वीं बंद होईपर्यंत पुत्रावरील इतर म्हणजे मिळकतीच्या स्वरूपाचे हक्क नष्ट झालेच होते असें म्हणवत नाहीं.

याचें प्रत्यंतर रोमन इतिहासांतहि आढळतें. गिबन आपल्या इतिहासांत रोमन लॉ संबंधाच्या विभागांत म्हणतो, " आपल्या संततीचा सांभाळ करावा ही बुद्धि देवानें पशुपक्ष्यादिकांनाहि दिली आहे. मनुष्यांना संततिप्रेम हें स्वाभाविक तर खरेंच परंतु विवेकबुद्धीनेंहि तें त्यांना पटतें. परंतु रोमन लोकांच्या कायद्याच्या शास्त्रांत मुलावर बापाचे अधिकार पूर्ण अबाधित असत, असा उल्लेख आहे. राजसभेंत, लष्करांत किंवा सार्वजनिक जागेंत कोणाहि रोमन नागरिकाला मनुष्य या दृष्टीचे अधिकार मूलभूत होते. पण घरीं बापासमोर त्याला निर्जीव मिळकतीहून अधिक किंमत नव्हती. घरचा धनी या नात्यानें जसा गोठ्यांतलीं गुरें, दावणीचे गुलाम व इतर कोणतीहि जंगम मिळकत आपल्या लहरीप्रमाणें देऊन टाकण्याला, विकण्याला, किंवा नष्ट करण्याला त्याला अधिकार असे, तसाच बाप या नात्यानें त्याचा मुलावरहि अधिकार असे. आणि तसें केल्यानें गुन्हा घडत नसे व राज्याधिकाऱ्यांकडून त्याला शिक्षा होत नसे. असे असल्यावर मग मुलानें आपल्या श्रमानें मिळविलेली मिळकत तर बापाचीच मत्ता होत असल्यास काय नवल ? दारिद्र्यानें पीडलेला किंवा लोभानें पछाडलेला बाप कुटुंबाचा मालक या नात्यानें मुलांचीही वाटेल ती वासलात करण्यास मोकळा असे. आणि मौज ही कीं, अशा रीतीनें बापानें दुसऱ्या कोणाला आपला गुलाम विकला, आणि त्या नव्या धन्यानें त्या गुलामाला सोडचिठी देऊन मुक्त केला, तर गुलामाला स्वातंत्र्य मिळे तें कायमचेंच; म्हणजे त्याला फिरून कोणी गुलाम करणें शक्य नव्हतें. पण समजा बापानें आपला मुलगा दुसऱ्या कोणाला विकला. आणि त्या नव्या मालकानें त्या मुलाला गुलामगिरींतून मुक्त केलें, तर तो मुलगा मात्र इतर गुलामांप्रमाणें कायमचा स्वतंत्र होत नसे. तर फिरून त्याच्या बापाची सत्ता त्याच्यावर प्रस्थापित होई. म्हणजे फिरून बापाला मुलगा गुलाम म्हणून विकतां येई. मात्र अशी तीन वेळ विक्री होऊन तिसऱ्या वेळीं जर मुलाची गुलामगिरींतून सुटका झाली, तरच बापाचा मुलावरील अधिकार नष्ट होई. ही चाल ऑगस्टस बादशहाच्या काळापर्यंत चालू होती. मुलाचा जीव घेण्यापर्यंत बापाला अधिकार असे व पुत्रवधाचे दाखले रोमन इतिहासांत पुष्कळ आढळतात. या वधासंबंधानें शिक्षा दिल्याचे दाखले

नाहींत. पण उलट स्तुति केल्याचेहि दाखले आढळतील. मौज ही कीं, मुलगा वयानें कितीहि मोठा होवो, त्याला राज्यकारभारांत केवढाहि मोठा मान व अधिकार मिळो, खुद्द रोम शहराच्या नगराध्यक्षाचाहि मान त्याला मिळो, किंवा परदेशीं दिग्विजय करून आल्यामुळें 'राज्यकार्य-धुरंधर' म्हणून त्याची मिरवणूक निघून शहरांत त्याचा सन्मान होवो–अशाहि मुलाची, बापाच्या गुलामगिरींतून सुटका नसे. जो अधिकार मुलावर तोच त्या मुलाच्या पुढच्या पिढीवरहि ! दत्तक मुलावरीहि औरस मुलाप्रमाणेंच बापाचे अधिकार चालत. पुढें पुढें या अधिकारला थोड-थोडा आळा पडला. तथापि मुलें सोडून देणें, म्हणजे त्यांच्यावरील संरक्षण काढून घेणें, या गोष्टी चालत. अखेर, पहिल्यानें सेव्हरस अलेक्झांडर व नंतर व्हेलेंटिनिअन यांच्या कारकीर्दीत अपत्यवध हा गुन्हा म्हणून कायद्याच्या कलमांत घालण्यांत आला. खिस्ती धर्मातील भूतदयेच्या शिकवणीनेंही जी अमानुष चाल हटली नाहीं, ती पुढें प्रत्यक्ष कायद्यानें बंद केली.

पुत्राच्या गुलामगिरीची ही स्थिती सोडून दिली असतां, एरव्हीं मुलगा हा सर्व बाजूंनीं बापाच्याच ठिकाणीं येतो. त्यांत कांहीं अंतर पडत नाहीं. बापाला एकापेक्षां अधिक मुलगे असतील तर मुलाला मिळणारी मिळकत सर्वांना सारखी वाटली जाते. वतनें, जहागिरी, देवस्थानें इत्यादि वगळलीं असतां बाकी कोणत्याहि मिळकतीसंबंधीं प्रत्येक मुलाला सारखाच हक्क व हिस्सा मिळतो. पण वतनें, जहागिरी व देवस्थानें इत्यादीसंबंधानें वडिलकीच्या मानाला विशेष महत्त्व आहे. म्हणजे वरील प्रकारच्या कोणत्याही मिळकतीसंबंधानें डोईबदल झाला, आणि हक्काची नवी नोंद करण्याचा प्रसंग आला, तर सर्वांत वडील भावाचें नांव बापाच्या ठिकाणीं नोंदलें जातें. याचें कारण या प्रकारच्या मिळकती एका हातीं न राहातील तर त्यांचा मूळ हेतु साधणार नाहीं. उदाहरणार्थ, वतनाची मिळकत वंशपरंपरा पण कांहीं ठराविक नोकरीकरितां दिलेली असते. ही नोकरी केव्हांहि एकाकडूनच घेणें सोईचें असतें. ती अनेक भाऊ, आपण एकाच बापाचे मुलगे म्हणून सांगून, मागतील तर ती कशी देतां येईल व बजावून घेतां येईल ? "एकाऐवजीं अनायासानें अनेक नोकर मिळतील मग त्यांत वाईट काय ?" असें दिसण्यांत दिसेल. पण सरकारी वतनी

नोकरी म्हणजे घरीं राबावयाला कोणतेहि चार गडी ठेवावयाचें असें नव्हे. तर त्यांत अधिकाराचें काम व हुद्दा हीं दोन्हीहि असतात. पैकीं काम घेतलें तर एकच काम अनेकांचें म्हणजे कोणाचेंच नव्हे ! शिवाय काम म्हणजे तें योजना करून, बुद्धि चालवून, निश्चय करून करावें लागतें. मग या गोष्टी अनेक माणसें कशीं करूं शकतील ? एकानें होणारें काम एकानेंच केलें पाहिजे. बरें, एकाऐवजीं असे अनेक चाकर फुकट मिळाले तर एक गोष्ट वेगळी. पण ते कसे मिळतील ? उलट, एका नोकरीचा पगार अनेकांमध्यें वाटून देऊन तरी कसें चालेल ? समजा, नोकरी वंशपरंपरा मामलतीची आहे, व जागेचा पगार ठराविक महिना शंभर रुपये आहे. कोणीतरी एकानें ही नोकरी केली व त्यानें एकट्यानेंच हा पगार घेतला तर त्याला आपल्या ऐपतीप्रमाणें राहतां येईल. कारण अधिकाऱ्यानें कांहींतरी प्रतिष्ठित पद्धतीनें राहावें लागतें. पण त्या एकाऐवजीं चौघांना, ते मुलगे म्हणून, मामलत दिली तर कसें होईल ? अगदीं हलकीं कामें कदाचित् आळीपाळीनें करतां येतात. पण महत्त्वाचीं जोखमीचीं कामें वाटून किंवा आळीपाळीनेंहि करतां येत नाहींत. शिवाय शंभर रुपये चार मुलांत वाटून दिले तर प्रत्येकाला पंचवीस मिळतील. त्यांत मामलेदार संसार कसा करील व अब्रू कशी सांभाळील ? आणि वाटणीची मिळकत म्हणून ती पिढीगणिक वाटीत गेली म्हणजे शेवटीं आणे पै व्हावयाच्या ! ही कल्पना तर अगदींच हंसूं येण्यासारखी. म्हणून सरकारी वतनाचा असा नियमच असतो कीं, तें एकाच माणसाकडे राहावयाचें; म्हणून वडील मुलाकडेच जावयाचें. तीच गोष्ट सरंजामाची म्हणजे लष्करी हुद्याच्या नोकरीची व उत्पन्नाची. देवस्थानाची सुद्धां व्यवस्था एकाच हातीं असणें इष्ट म्हणून ती वडील मुलाकडेच हक्कानें जाते. बापाच्या ठिकाणीं मुलगा येण्याचा क्रम इतका अबाधित असतो कीं, जेथें वडिलकीला मान व महत्त्व असतें तेथें मिळकतीचा व अधिकाराचा वारसा वडील मुलाचा हात धरीत धरीत पिढ्यांच्या पायऱ्या उतरत खालीं जातो. म्हणजे एखादा राजा किंवा जहागिरदार मरण्याचे वेळीं त्याचा धाकटा भाऊ प्रौढ वयाचा व कर्ता असेल, पण राजाला मुलगा असून तो अवघा दहा वर्षांचा असेल, तर राजपद राजाच्या धाकट्या भावाकडे

म्हणजे चुलत्याकडे न जातां राजाच्या मुलाकडे म्हणजे पुतण्याकडे जाईल. जी गोष्ट हुद्याची, मानाची, नोकरीची किंवा मिळकतीची, तीच बापानें केलेल्या कर्जवामासंबंधानेंहि समजावी. म्हणजे बापानें केलेलें जें कर्ज मिळकतीबरोबरच घेऊन फेडावें लागतें. ही गोष्ट न्यायाची असून शिवाय मुलगा हा बापाचें प्रतिबिंब किंवा प्रतिनिधि हीच गोष्ट यामुळें सिद्ध होतें.

---

## मुलगी

मुलग्यानंतर कुटुंबांतील मुलींचा विचार प्राप्त होतो. पण मुलीला बापाच्या कुटुंबांत कायद्याच्या दृष्टीनें फारसें स्थानच नाहीं म्हटलें तरी चालेल. जें आहे तें इतक्यापुरतेंच कीं, तिच्या पालनपोषणाचा बोजा बापावर, व त्याची मिळकत मुलाकडे जाईल तर त्याच्यावर पडतो. तसेंच तिच्या लग्नाच्या खर्चाचा बोजाहि त्यावर तडतो. अद्यापि कायद्यानें मुलीच्या शिक्षणाचा बोजा वडिलार्जित मिळकतीवर उत्पन्न झालेला नाहीं. पण, पुढील दिवस स्त्रीशिक्षणाचे, आणि सक्तीच्या प्राथमिक शिक्षणाचेहि येणार असल्यामुळें हा बोजा त्या मिळकतीवर पडावा अशी कायद्यांत सुधारणा होण्याचा संभव आहे. आणि तसें घडलें तर तें न्यायानेंच होईल. कारण एकंदरीनें शिक्षणाची प्रगति होत असल्यानें, शिक्षणाचे इतर गुण बाजूला ठेवले तरी, भावी नवऱ्यानें मुलगी वधू म्हणून पसंत करण्याचें तें एक अनुकूल कारण ठरतें. हा गुण तरी नाकबूल करितां येत नाहीं. म्हणून जसें कुटुंबाच्या चालीप्रमाणें व ऐपतीप्रमाणें अन्नवस्त्र, त्याचप्रमाणें कुटुंबाच्या चालीप्रमाणें मुलीला शिक्षणाचा बोजा वडिलार्जित मिळकतीवर पडावा यांत गैर काय ? पण हें शिक्षण म्हणजे मुलीच्या हौसेप्रमाणें हक्कानें वाटेल तितकें उच्च शिक्षण असा अर्थ नाहीं. मग मुलगी मुलग्यापेक्षां अधिक बुद्धिवान् असली तरी त्यामुळें तिच्या हक्काचा विस्तार होऊं शकणार नाहीं. तसेंच मुलगी सज्ञान होईपर्यंत अविवाहित राहील तर गोष्ट वेगळी. तिच्या लग्नाची ती मर्यादा योग्य समजली जाईल. पण एकादी मुलगी मी आजन्म कुमारीच राहीन असें म्हणेल, लग्न करणारच

नाहीं व बापाच्या घरचेंच खाऊन राहीन असें म्हणेल, तर सज्ञान झाल्या-नंतर तसा हक्क तिला राहील कीं नाहीं हा प्रश्नच आहे. तात्पर्य, कुटुंबा-मध्यें मुलीचे स्थानाचा विचार, ती जणूं कांहीं एखादी मुक्कामाला आलेली चार दिवसांची प्रतिष्ठित पाहुणी, अशा दृष्टीनें करावा लागतो. मुलगी ही स्त्री म्हणून तिचा विवाह झालाच पाहिजे ही सर्वांच्या मुळांतली समजूत, म्हणून तें लग्न होईपर्यंत व त्या लग्नापुरतीच तिची तजवीज अशी काय-द्याची विचारसरणी आहे. वर सांगितल्याप्रमाणें मुळींच लग्न न करणारी मुलगी व लग्न झाल्यावर विधवा होऊन घरीं परत आलेली मुलगी यांना प्रायः कांहींच हक्क नाहींत असें म्हणतां येईल. त्यांतल्या त्यांत अविवा-हित मुलीला ती सज्ञान झाली तरी लग्नाच्या खर्चापुरता केव्हांहि हक्क आहे असें कदाचित् म्हणतां येईल. पण परत आलेल्या विधवा मुलीसंबं-धानें तसेंहि म्हणतां यावयाचें हाहीं. अन्नवस्त्र देऊन तिचा माहेरीं कोणी सांभाळ केला तर ती दयाधर्माची किंवा ममतेची गोष्ट होय, हक्काची नाहीं. बुद्धिबळांतल्या राजाला शह लागला म्हणजे त्याला जागा सोडणेंच प्राप्त. त्याप्रमाणें परक्या घरीं केव्हां तरी जाऊन तें घर उभें करावयाचें, नांदवावयाचें हा शह माहेरच्या मुलीला जन्मापासूनच लागलेला असतो. फक्त बुद्धिबळें खेळणारा एरव्हींच्या गप्पा मारण्याकरतां किंवा पानतंबाखू खाण्याकरतां व त्याजबरोबर शह कसा कोठें काढावा याचा विचार करण्याकरतां जेवढा वेळ घेईल तितकीच मुलीला दुसऱ्या घरीं जाण्याला मुदत. मुलीनें लग्न करणें किंवा न करणें हें एक वेळ तिच्या मर्जीवर राहील; व स्त्रीनें अवि-वाहित राहाणें हें आश्रमधर्माला सोडून असलें तरी पाप ठरत नाहीं. पण मुलीचें लग्न करून देणें व त्याकरतां मेहनत व खर्च करणें हें बापाचें व त्याची मिळकत हातीं आलेल्या मुलाचें कर्तव्यच ठरतें. शाकुंतलांत कण्वानें ' मुलगी ही परक्याचें धन ' असें म्हटलें आहे, तेंच खरें आहे. ती ठेव आहे; तें ऋण आहे. म्हणून तें ज्याचें त्यास देऊन टाकलेंच पाहिजे अशी विचारसरणी सहजच उत्पन्न होते.

## दत्तकाची चाल

मनुष्याला औरस संतति नसेल तर दत्तक मुलगा घेऊन कृत्रिम संतति

व परंपरा निर्माण करतां येते. ही चाल जगभर आहे. हिंदुस्थानांत तर ती अतिशय प्रचारांत आहे हें सांगावयास नकोच. पाश्चात्य देशांत दत्तकाला धर्मविधि लागत नाहीं. नांव बदलण्याला कायद्यानें सोय केलेली असते तिनें काम होतें. इकडे दत्तविधान झालें म्हणजे मुलगा पहिल्या घराण्यांतून नष्ट होतो व घरचें नांव टाकून देऊन त्याला दत्तक बापाचेंच नांव घ्यावें लागतें. तिकडे दत्तक मुलगा दोन्ही घरचा राहातो. मात्र तो दोन्ही घरचें मिळून संयुक्त आडनांव घेतो. तिकडील वारसापद्धति इकडच्याहून वेगळी आहे. आणि वडिलार्जित मिळकतीची व अविभक्त कुटुंबाची भानगड फारशी नाहीं. इकडे ती बरीच आहे. दत्तकाला बापाचे सर्व अधिकार प्राप्त होतात. परंतु मुलगा दत्तक द्यावयाचा तो दुसऱ्यानें द्यावा लागतो, म्हणून तो देणाराला तो देतांना किंवा देण्याकरितां, मुलाच्या किंवा देणाऱ्याच्या हिताच्या दृष्टीनें, उभयतांवर बंधनकारक असा करार वाटल्यास करतां येतो. बाप नसला तर दोन्ही घरीं आईला हा करार करण्याचा अधिकार असतो. पण कराराशिवाय आईनें दत्तक घेतला तर तिचे सर्व स्वतंत्र हक्क नष्ट होतात. म्हणून दत्तक मुलगा घेणें हा दत्तक आईचा एकप्रकारें स्वार्थत्यागच होय. ती हौसेनें दत्तक घेत असेल तर लहान मुलगा घेऊन मुलासारखा प्रेमानें वागवून, लहानाचा मोठा करील व झाडावर कलम होतें त्याचप्रमाणें हा कृत्रिम अपत्यसंबंध सुखाचा ठरेल. पण पुष्कळ वेळां दत्तक देण्याघेण्यांत उभयपक्षीं स्वार्थ मनांत असतो. किंवा मुलगा प्रौढ असून आयती त्याच्या हातांत मिळकत फुकट आली म्हणजे मांडीवर घेतलेला मुलगा उलट लाथेनें आईला दूर झुगारून देतो.

या नव्या युगांत दत्तकाची चाल पूर्वींहून कमी कमी होत चालली आहे. याचें कारण आपण आपल्या हयातींत जसे मिळकतीचे मालक होतों, तशीच आपल्यामागें आपली बायकोहि रहावी, तिनें आपल्या मिळकतीचा उपयोग हवा तसा करावा, ही गोष्ट पुरुषांना अधिकाधिक पटूं लागली आहे. दत्तक न घेतल्यानें तैनाती वतनी यांसारख्या मिळकतीची हानीच होणार असेल तर तो घेण्याची इच्छा होते. तसेंच मृत्युपत्र करून ज्या मिळकतीची व्यवस्था करितां येईल ती आपल्या हातानें करावी अशी इच्छाहि दिवसेंदिवस प्रबळ होऊं लागल्यानें दत्तक घेण्याची चाल कमी होऊं लागली आहे. आपलें

आडनांव विशेषतः कुळांतील आपल्या शाखेची परंपरा चालावी, अशी कोणालाही सहजच इच्छा असते. परंतु वर दर्शविल्याप्रमाणें इतर अनेक गोष्टी अधिक महत्त्वाच्या वाटूं लागल्या आहेत. याशिवाय एक मोठें कारण असें कीं, सार्वजनिक कार्याला देणग्या देण्याची चाल आतां अधिकाधिक पडूं लागली आहे. यामुळें आपल्या जागीं कोणी तरी एक व्यक्ती येऊन तिनें पितृस्थानीं आपलें नांव लावावें या हौसेपेक्षां, लोकसमाज हा आपलाच आहे म्हणून आपल्या पैशाचा त्याला कांहीं उपयोग होऊं देतां आला तर द्यावा अशी उदार कल्पना, असा सुसंस्कृत विचार, मनुष्याला सुचूं लागला आहे. आणि हें खरोखर फार चांगलें आहे. या बुद्धीमुळेंच हल्लीं अनेक लोकोपयोगी संस्था निघत आहेत व चालत आहेत. म्हणून आपल्या समाजाच्या नांवांत आपलें व्यक्तिनाम व कुलनामहि बुडविण्याची तयारी हा सात्त्विक स्वार्थत्यागच समजावा. आणि भावी तरुण हिंदु नागरिकांनीं पुढच्या आयुष्यांत ही कल्पना मनांत बाळगावी.

दत्तकासंबंधानें शेवटीं एकच गोष्ट सांगावयाची ती ही कीं, मुलग्याप्रमाणें मुलगीहि दत्तक घेतां येते. पण ती गोष्ट अगदींच क्वचित् घडते. मुलगी दत्तक घेतली तर तिला हिंदुधर्मशास्त्राप्रमाणें वारसा हटकून मिळेल असें नाहीं. जो मुलगी दत्तक घेईल तो तिची व्यवस्था आपल्या मिळकतींतून करीलच. पण द्रव्याच्या आशेनें मुलग्यांचीं दत्तविधानें होतात तशीं मुलींचीं होत नाहींत. बहुधा मुली दत्तक घेतल्या जातात त्या अनाथ असलेल्याच घेतल्या जातात. म्हणजे मुलगा दत्तक घेणें तो बापाच्या दृष्टीनें, व मुलगी दत्तक घेणें ती आईच्या दृष्टीनें असें म्हणतां येईल. अलीकडे दुसऱ्या एका कारणाकरतां मुली दत्तक घेतात. तें असें कीं, हिंदुधर्मशास्त्रानें विवाहावर रक्तसंबंधाचीं व गोत्राचीं जीं बंधनें घातलेलीं आहेत तीं जाचक वाटतात; इष्ट अशा विवाहांना त्यांपासून प्रतिबंध होतो. यामुळें गोत्र पालटण्याकरितां जुळत्या गोत्राच्या घरीं मुलगी दत्तक देऊन मग तिचें लग्न करतात. कित्येकांच्या मतें असें करण्यानें बेकायदेशीरपणाचा धोका कमी न होतां उलट वाढतो. पण विवाह नोंदणें हा एक त्यावर उपाय म्हणून तोहि अधिक प्रचारांत येत आहे. अशा रीतीनें युक्त्याप्रयुक्त्या सुरू आहेत. प्रण येथें मुद्याची गोष्ट इतकीच कीं, परोपका-

राच्या दृष्टीनें मुली दत्तक घेण्याची चाल आहे याहूनहि वाढली तरी त्यांत गैर कांहीं नाहीं. पण मुलगा व मुलगी यांतील भेद सर्वस्वीं निघून जाणें शक्य नाहीं. कारण मुलगा हा घरींच राहावयाचा असतो व मुलगी ही दुसऱ्या घरींच पडावयाची असते; व तिच्या सुखदुःखपरंपरेच्या वृक्षाचें बीज त्या नवीन भूमींतच रुजावयाचें असतें. यामुळें जनक बापाच्या घरीं देखील अगदीं मुलग्याच्या बरोबरीनें मुलीला लेखितां येणार नाहीं. तरी, आज मुलगा व मुलगी यांच्यामध्यें जें महदंतर दिसून येतें तें कांहींसें तोडण्याची बुद्धि तरुण नागरिकानें धरावी. आणि या गोष्टीला मुली दत्तक घेण्याचा प्रघात उपयोगी पडेल. एखाद्या अनाथालयामध्यें मुलगा व मुलगी अशीं भावंडें येऊन पडलेलीं असलीं, आणि एखाद्या धनिकाची मायेची नजर त्यांच्यावर पडण्यासारखी असली, तर त्यानें तो मुलगा दत्तक न घेतां ती मुलगी घ्यावी हें अधिक बरें नव्हें काय ?

---

## आन्हिक ७ वें

# कुटुंब–व्यवस्था ( ४ ) विवाहासंबंधीं कांहीं प्रश्न

हल्लीं आपल्या तरुण पिढीपुढें विवाहासंबंधीं एक मोठा प्रश्न असतो तो हा कीं, विवाह करावा कीं करूं नये ! परंतु खानेसुमारीचे आंकडे पहातां असें दिसतें कीं अविवाहित पुरुषांचे आंकडे इतके थोडे आहेत कीं, अविवाहित राहाणें हा एक किरकोळ अपवाद असून तो बहुधा लक्षांत घेण्यासारखा नाहीं. असें असतांहि विवाह करावा कीं न करावा असा प्रश्न तरुण पिढीपुढें आहे असा वाटतो याचें कारण इतकेंच कीं, पुरुषांच्या विवाहाचें वय पूर्वींपेक्षां पुढें पुढें ढकलूं लागलें आहे. यावरून ब्रह्मचर्यव्रतानें जन्म घालवावा अशी अनेक तरुणांची पहिली वृत्ति असेल असा भास होतो. पण पुढें अनेक कारणांनीं ते विवाह करण्याला कबूल होतात किंवा स्वतःचें मन वळवितात. विवाहाचें वय पुढें ढकललें जाण्याचें खरें कारण

ब्रह्मचर्यव्रतानें राहाण्याची खरी इच्छा नसून हल्लींच्या आर्थिक परिस्थितीमुळें, जेथें एक जीव जगविणें अवघड वाटूं लागलें आहे, तेथें दोन जीव जगविण्याची जबाबदारी, आणि त्यानंतर स्वाभाविकपणें संतति झाल्यास आणखी कित्येक जीव जगविण्याची जबाबदारी घेणें, त्यांना नुसतें अवघडच नव्हे तर एक प्रकारचें संकट वाटतें. कुटुंबाला लागणारें उपजीविकेचें साधन मुख्यतः पुरुषावर ज्या समाजांत पडतें, त्या समाजांत लग्न करून घेणें म्हणजे संसारप्रवाहांत पोहावयास प्रारंभ करितांना गळ्यांत एक दगड बांधून पोहावयास पडण्यासारखें चिंताजनक वाटावें हें स्वाभाविक आहे. परंतु अशा समाजांतीलहि स्त्रिया गृहव्यवस्थेचें काम करितात. त्या कामाची किंमत पैशानें कोणी करीत नाहीं म्हणून लक्षांत येत नाहीं. एरव्हीं तशी किंमत केली असतां मध्यम प्रतीचा पगार मिळविणारा पुरुष आणि त्याच्या सर्व संसाराची सुव्यवस्था ठेवणारी स्त्री, दोघांचाहि श्रमविभाग सारखाच व त्याचें मूल्यहि सारखें असेंच प्रायः आढळून येईल. ज्याला पुष्कळच पगार मिळतो व त्यामुळें ज्याला नोकर-चाकर ठेवण्याची ऐपत असते, अशा पुरुषाला लग्न करणें हें जोखीम वाटत नाहीं हें सांगावयास नकोच; पण मध्यम प्रतीच्या स्थितींतील पुरुषालाहि तसें वाटण्याचें खरोखर कारण नाहीं. एकलकोंडे-पणानें जन्म घालवीत असतांहि, त्याच्या वेळेला पुरून उरतील इतके, आणि अवश्य तो आनंद प्राप्त करून देण्याइतके, उद्योग ज्याला असतील अशांनींच ब्रह्मचारी राहाण्यापासून समाजाला झाला तर थोडा उपयोग होईल. पण, असें ध्येयवादीपणामुळें ब्रह्मचारी राहाणारे लोक थोडे; उलट लग्न करूनहि ज्यांना आपलें ध्येय सिद्ध करण्याला अडचण पडली नाहीं असे लोक समाजांत किती तरी आढळतात ! याचें कारण हेंच कीं, स्वतः तर करितां येत नाहींत, पण झाल्याशिवाय तर निर्वाह नाहीं, अशीं संसारकृत्यें अनेक असतात व स्त्रियाच तीं उचलतात. इतकेंहि करून प्रत्यक्ष द्रव्यार्जन करण्यासारखी परिस्थिति व साधनें असतील तर त्या द्रव्यार्जनहि करण्यास नाखुष नसतात. पण द्रव्यार्जनांत गुंतल्यामुळें ज्याप्रमाणें पुरुषाला इतर संसारकृत्यें करतां येत नाहींत, तीच गोष्ट

स्त्रियांचीहि समजावी. म्हणजे नवरा व बायको दोघेंहि द्रव्यार्जन करूं लागलीं तर संसारकृत्यें करण्याला तिसरें आणखी कोणी मनुष्य पहावेंच लागणार. संसारकृत्यें करीत असतां त्यांतूनच अर्थोत्पादक अशीं जीं कामें करतां येतील तीं स्त्रिया प्रेमानें व हौसेनें करतीलच यांत शंका नाहीं.

पांढरपेशे किंवा पांढरपेशांसारखे ज्यांचे पेशे आहेत अशा कुटुंबांतील स्त्रिया सोडल्या तर इतर, म्हणजे कामकरी धंदेवाल्या कुटुंबांतील स्त्रिया तर संसारकृत्यें करून शिवाय वर असलीं कामेंहि करितात. शेतकऱ्याची स्त्री हा निम्मा गडीच असतो. तीच गोष्ट कुंभार, विणकर, रंगारी, परीट अशा कितीएक धंद्यांची आहे. पांढरपेशांच्या स्त्रियाहि क्वचित् कपडे शिवणें जीग, कलाबतू यांचीं कुसरीचीं कामें करणें, क्वचित् नर्सचीं कामें इ० करितात. तात्पर्य, लग्नाची बायको हा पुरुषाच्या गळ्यांत केवळ जड धोंडा ही गोष्ट खरी नाहीं. लग्न केल्यामुळें संसाराच्या जिकिरीला आले असे लोक नसतील असें नाहीं. पण, अशीं माणसें फार थोडीं. संतति पुष्कळ झाली, आणि कुटुंब अजमासाबाहेर वाढलें आणि त्यामुळें संसार जिकिरीचा झाला, तर त्याचा दोष एकट्या विवाहित स्त्रीकडेच देतां येणार नाहीं हें उघड आहे. म्हणून एकंदरीनें पाहातां विवाह करून संसार स्वीकारल्याचें ध्येय किंवा तत्त्व नसलें तरी, धोरण म्हणून तरुण पिढीनें अवश्य ठेवलें पाहिजे.

हल्लीं हिंदुस्थानची आर्थिक स्थिति फार वाईट असल्यानें प्रजेची वाढती संख्या हें राष्ट्रीय संकट असें पुष्कळांना वाटतें. आणि हें ज्यांना ज्यांना खरोखर वाटतें ते, संततिनियमनाचा मतप्रसार करण्याला जे लोक पुढें आले आहेत त्यांच्या उपदेशांतील, चांगला ग्राह्यांश घेण्यासारखा असेल तो घेतीलच. परंतु, संततिनियम या शब्दांतच विवाह ही गोष्ट गृहीत घेतली जाते हें उघड नाहीं काय ! शिवाय युरोपियन राष्ट्रांमधून लोकसंख्या कमी होत जाणें हें संकट ओढवत असल्याचा पुरावा, तिकडील वर्तमानपत्रांतून व लोकोपयोगी वाङ्मयांतून आढळतो, तो उलट्या दिशेची सूचना आपल्या परीनें देतच आहे. एतावता अविवाहित स्थिति हें तत्त्व किंवा ध्येय तर होऊं शकत नाहींच. पण धोरणी म्हणणाऱ्यांना ती गोष्ट लोकांना पटवून देणें फार कठिण जाईल. एखादा मनुष्य एकलकोंडा

राहाण्याच्याच लायक असेल, किंवा तितका ध्येयवादी असेल, किंवा स्वभावानें स्त्रीद्वेष्टाच असेल तर गोष्ट वेगळी! तरुण पिढीला विवाहाचा असा उपदेश करणें, किंवा अविवाहित स्थितीपासून परावृत्त करणें, हें कोंकणांत मीठाच्या उपयोगावर व्याख्यान देण्यासारखें, किंवा देशावरून कोंकणांत मीठ वाहून नेण्यासारखें कित्येकांना वाटेल; पण वास्तविक तें तसें नाहीं. तरुण पिढीपुढील हा काळ डळमळीचा आहे म्हणून एरव्ही उघड दिसणाऱ्या गोष्टीबद्दलहि एखादा शद्ब कोणी बोललें तर तो व्यर्थ समजूं नये.

यानंतर विवाहाच्या वयाचा प्रश्न सहजच येतो. हा प्रश्न देखील शिक्षणाची हौस व आर्थिक परिस्थिति यांमुळें थोडासा भानगडीचा झाला आहे. शारदा बिलाचा कायदा नुकताच पास झाला त्यावेळीं हिंदुस्थानांतील कोणत्या वर्गांत मुलामुलींच्या विवाहाच्या किमान मर्यादा काय आहेत याची छाननी झाली होती हें वाचकांच्या लक्षांत असेलच. त्या कायद्यानें आतां लग्नाच्या वेळीं मुलीचें वय निदान १४ व मुलाचें वय निदान १८ असलें पाहिजे. एरव्हीं तो गुन्हा होतो. या कायद्यानें सांगितलेली शिक्षा भोगण्यास तयार होऊन, किंवा कायद्याला फसवून, झुकांडी देऊन या वयोमर्यादेच्या आंतहि कांहीं लग्नें होतात. पण, तीं लक्षांत घेण्याचें कारण नाहीं. या कायद्याचें उल्लंघन करून होणारे विवाह आतां पांढरपेशा वर्गांत होत नाहींत; झाले तर, अशिक्षित मागसलेल्या वर्गांत होतात. पण, प्रस्तुतचें पुस्तक अशा वर्गांतील तरुण पिढीकरितां लिहिलेलें नाहीं. पुढारलेल्या व सुशिक्षित वर्गाकरितां लिहिलेलें आहे. आणि ते जें करतील तें पाहून इतर वर्ग यांचें अनुकरण करतील. पण, चौदा व अठरा हीं तर वयें झालींच, तथापि याच्या पुढें आणखी किती जाणें योग्य हा प्रश्न उरतोच. म्हणून त्याचा थोडासा विचार केला पाहिजे. माझ्या मतें मुलींचीं लग्नें १४ पुढें चार वर्षें जाऊन १८ पर्यंत झाल्यास हरकत नाहीं. पण अगदीं विशेष कारणाकरितां त्यापलीकडे राहूं नयेत. विशेष कारण म्हणजे परदेशाला जाऊन उच्च शिक्षण घेण्याची संधि, किंवा विशेष अशक्त प्रकृति—सुधारण्याच्या मार्गांत असलेली. हिंदुस्थानांतल्या हिंदुस्थानांत मिळणारें उच्च शिक्षण मुलीनें संपवावयाचें म्हटलें तरी अठरा वर्षें पुरीं होणार नाहींत, पण उलट अठरा वर्षेंपर्यंत

मुलगी एकसारखी शिकत आली आहे, होतकरू आहे व आणखी कांहीं वर्षे ती शिकली तर आपला अभ्यासक्रम तिला मनासारखा पुरा करतां येईल, असें दिसल्यास नवरा व सासरचीं माणसें तिला ती गोष्ट आनंदानें करूं देतील. म्हणून अभ्यासक्रम अशा रीतीनें पुरा होण्यापूर्वींहि अठरा वर्षांचे सुमारास मुलीचें लग्न करण्यास हरकत नाहीं. वधूवरांच्या वया-मध्यें सुमारें ६–७ वर्षें अंतर असणें इष्ट आहे. यामुळें मुलग्याचें वय विवाहाचे वेळीं कोठपर्यंत वाढलें तरी चालेल याचें उत्तर यांत आपो-आपच मिळतें. आणि उच्च शिक्षणांतील वरची पदवी घेण्यास ही मर्यादा पुरे होण्यासारखी असते. याहीपुढें शिक्षण व्हावयाचें तरी पुरुषासंबंधानें अडचण नाहीं. लग्न झालें म्हणून शिक्षण थांबलें ही अडचण पुरुषाच्या मार्गांत येत नाहीं.

किमान मर्यादा अशी सांगितल्यावर कमाल मर्यादेसंबंधानें इतकेंच सांगावयाचें कीं, ती मर्यादा कोठें पडेल याचा कांहींच नेम सांगतां येत नाहीं. पण वधूवरांच्या वयांमध्यें कांहीं ठराविक अंतर असणें योग्य, म्हणून आपण जसे विशेष कारणामुळें अविवाहित राहिलों, तशाच विशेष कारणानें अविवाहित राहिलेली वधू मिळाल्यास पुरुषानें पुढेंहि लग्न करण्यास हरकत नाहीं. पुरुषाचें मध्यम वय म्हणजे वृद्धपणांत प्रवेश करण्याचें वय पसतीसापुढें बरेंच असतें. तथापि पसतीसापर्यंत अविवाहित राहिलेल्या पुरुषानें पुढें सामान्यतः विवाहाच्या भानगडींत न पडणें बरें. वधूवरांच्या वयाचा प्रश्न हा आजकालचा व इकडेच उत्पन्न झालेला नाहीं. मौज ही वाटते कीं, ग्रीक तत्त्ववेत्ता ॲरिस्टॉटल यानें आपलें मत असें लिहून ठेविलें आहे कीं, " मुलींनीं १८ व्या वर्षी म्हणजे त्या सुमारास लग्न करावें. " पण पुरुषाचें वय मात्र तो सुमारें सदतीसपर्यंत असावें असें लिहितो. पण हीं दोन वयें घेतलीं तर त्यांतील अंतर सुमारें आठरा वर्षें येतें. त्याचा विचार दोन हजार वर्षांपूर्वी ग्रीसच्या वैद्यकशास्त्रांत कसा केला असेल हें समजत नाहीं. इंग्लंडांतील लग्नवयासंबंधानें मात्र अगदीं ताजी म्हणजे गतवर्षींची जी माहिती मिळते तिजवरून असें दिसतें कीं, पुरुषवयाची सरासरी २७ वर्षें व चार महिने अशी पडते, आणि मुलींच्या लग्नवयाची सरासरी २५ वर्षें आणि ६

महिने अशी पडते. याचा अर्थ असा कीं, या सरासरींतील अंतर दोन वर्षांहूनहि कमी आहे. आतां कांहीं लग्नांत हें अंतर प्रत्यक्षांत ४।५ वर्षांचें असेल तर कांहीं लग्नांत तें मुळींच नसेल, म्हणजे जवळजवळ एकाच वयाला मुलामुलींचीं लग्नें होत असलीं पाहिजेत. ॲरिस्टॉटलच्या शिफारशींत जें अठरा वर्षांचें अंतर तें सगळेंच्या सगळें विलायतेंत तुटलेलें आहे. फक्त हिंदुस्थानांतच तें अंतर ५।६ वर्षें इतकें पाळतात. अशा रीतीनें विलायतेंतील लग्नाचीं वयें सांगण्याचा हेतु इतकाच कीं, त्या थंड हवेच्या देशांतहि पुरुषाचें लग्नवय तिशीच्याहि आंत असतें.

पुष्कळ लोकांच्या यासंबंधानें कल्पना कांहीं तरीच असतात. जन्मभर अविवाहित राहणाऱ्या पुरुषांची संख्या हिंदुस्थानपेक्षां विलायतेंत अधिक आहे. पण अविवाहित राहाण्याचा ज्याचा विचार नाहीं, तो सामान्यतः कोणत्या वयाला लग्न करतो ही मुद्याची गोष्ट आहे. विलायतेंत पुनर्विवाह इकडच्यापेक्षां पुष्कळ अधिक होतात. पुनर्विवाह करणाऱ्या वधूवरांचीं वयें काय असावीं हें सांगण्याचा प्रयत्न करण्यांत शहाणपणा नाहीं. कारण अशा विवाहाची परिस्थिती सरासरीच्या अंदाजाच्या कक्षेबाहेर पडते. किंबहुना विलायतेंत कित्येक पुनर्विवाह अगदीं इतक्या उतार वयांतहि होतात कीं, ती तिकडच्याहि अतिशयोक्तीचींच उदाहरणें गणलीं जातात असेंहि ऐकिवात आहे. विवाहाच्या वयाच्या नियमांना दुसरे अपवाद उत्पन्न होऊं शकतात; ते विशेष प्रकारचे धंदे किंवा आर्थिक परिस्थिति. यांनींहि लग्न करणें ही दोन माणसांचा संसार चालविण्याची पात्रता अंगीं येण्यानंतरची गोष्ट आहे; व अशी स्वाभिमानी दृष्टि इकडच्यापेक्षांहि तिकडे अधिक असते. याचें कारण आईबापांचें अपत्यप्रेम हें लग्नाचें निर्णायक कारण तिकडे नाहीं, तर स्वावलंबी जीवन हेंच आहे. इकडे मुलगा मिळवितां नसला तरी त्याचें लग्न करणें ही गोष्ट आईबाप अवश्य समजतात. तथापि ज्या धंद्यांत विशेष कौशल्याचें शिक्षण लागत नाहीं, त्या धंद्यांतील मुलांचें शिक्षण कोणत्याहि देशांत लवकर संपतें. यामुळें त्या मुलांचीं लग्नें लवकर झालेलीं आढळतात. उलट ज्या धंद्यांत विशेष कौशल्याचें शिक्षण लागतें, त्यांतील मुलांचीं लग्नें उशीरा होतात. उदाहरणार्थ, केवळ शरीरमेहनतीनें काम करून पोटाला मिळविणारे मुलगे लवकर लग्न

करितात, तर कलाविषयांत विद्यासंपन्न होऊन पोटाला मिळवूं लागणारीं मुलें उशिरा लग्न करितात.

कायमची आर्थिक स्थितीच काय पण एकाच वर्षात येणाऱ्या निरनिराळ्या ठराविक आर्थिक स्थितीप्रमाणेंहि, कोणत्याहि समाजांतील लग्नाची संख्या कमीजास्त आढळते. उदाहरणार्थः––हंगामाच्या व सुगीच्या दिवसांत लग्नें अधिक होतात. इतर दिवसांत तीं कमी होतात. हिंदुधर्मशास्त्राप्रमाणें ज्या ऋतूंत लग्नाचे मुहूर्त निघतात, ते मूळ कशावरून ठरविले असतील हें कोणी सांगावें ? पण साधारणतः पाऊसकाळ लग्नाला वर्ज्य असतो. आणि मार्गशीर्षापासून पुढें सुगीचे व हंगामाचे दिवस येतात. मिळून पूर्वेकडील व पश्चिमेकडील देशांत विवाहाचे महिने आणि सुगी व हंगाम यांचाच मेळ पडतो. त्यांतूनहि फिरून एक भेद असा आढळतो कीं, ज्या प्रदेशांत शेतकीचा धंदा हा मुख्य असतो त्यांतच सुगीचे दिवस अमुक व बिनसुगीचे अमुक असा भेद पडूं शकतो. पण ज्या प्रदेशांत सतत बारा महिने कारखाने, उदा० गिरण्या वगैरे चालू असतात तेथें सदा सुगी व सदा हंगाम यांमुळें लग्नें अमुकच वेळीं होतात असें नाहीं. हिंदुस्थानांत अजून शेतकी हाच धंदा मुख्य आहे. म्हणून सुगीचे व हंगामाचे महिने ठरीव आहेत. तथापि लग्नें ठराविक चार पांच महिन्यांतच होतात. तशी स्थिति न राहातां, बाराहि महिने कोणत्याहि प्रदेशांत वधूवरांच्या घरच्या सोईप्रमाणें व्हावीं, अशी सुधारणा झाली पाहिजे असें वाटतें. प्रत्यक्ष लग्नविधींत ऋतुमानाचा अवश्य संबंध नाहीं. ज्योतिषशास्त्राच्या प्रभावामुळें मुहूर्ताची भानगड उत्पन्न झाली आहे. पण पवित्रकांची तोंडमिळवणी आणि मुहूर्त या दोन्ही बाबतींतले ज्योतिषशास्त्राचे निर्बंध न मानलेले बरे.

आतां वधूवरांच्या पसंतीसंबंधाचा विचार थोडासा करूं. मीं लिहिलेल्या " शारदेची आकाशवाणी" या लेखांतील शारदा म्हणते:––

"वधूवरपसंतीच्या कामीं समाजाचें पाऊल कालांतरानें कसें पुढें पुढें पडत चाललें आहे हें थोडक्यांत मी तुम्हांला सांगतें. फार जुन्या काळीं एक समाज दुसऱ्या समाजाशीं लग्नें करी. तीं मुलामुलींचीं नसत; तर समाजासमाजांचींच असत. पुरुषार्थाचे अनेक प्रकार आहेत. त्यांत जुन्या

काळीं असा एक होता कीं, एका समाजानें दुसऱ्यावर स्वारी करून त्याच्या मुली पळवून आणावयाच्या. या बलात्कारविवाहाची खूण अजूनही कित्येक जातींत उरली आहे. हल्लीं प्रत्यक्ष बलात्कार होत नाहीं, पण बलात्काराचें नाटक होतें तें असें कीं, नवऱ्यानें मुलीला उचलून आणावें व तिच्या आप्तांनीं नवऱ्याला हंसत खेळत विरोध करावा. म्हणजे बलात्काराचें अत्याचाराचें स्वरूप जाऊन त्याला समारंभाचें स्वरूप आलें आहे.

श्रीकृष्णानें रुक्मिणी पळवून आणली, अर्जुनानें सुभद्रा पळवून आणली या उदाहरणांत वधूची संमति असली तरीं व्याह्याव्याह्यांच्या दृष्टीनें तो बलात्कारच होय. रोमन इतिहासांत साबियन टोळीच्या मुली रोमन लोकांनीं पळवून आणल्या व लग्नें केलीं अशा दंतकथा आहेत. अशा विवाहांत ज्याच्या हाताला लागेल ती त्याची नवरी. याच्या पुढची पायरी अशी कीं, एका राजानें दुसऱ्या राजाला जिंकलें असतां जित राजाची बहीण किंवा मुलगी जेत्या राजाला बायको म्हणून अर्पण करण्याची अट तहांत घालावयाची व ती पुरी झाली म्हणजे दोन्ही राजांचें सख्य व्हावयाचें. हा राजकारणी विवाह होय. यानंतर शांततेच्या काळांतहि दोन गांवांनीं स्नेह-संबंध जोडण्याकरितां एका गांवाची मुलगी दुसऱ्या गांवाला द्यावयाची असा प्रकार आढळतो. याची खूण कांहीं ठिकाणीं अजून अशी उरली आहे कीं, लग्न झाल्यावर मुलीचा बाप जसा जांवयाच्या घरीं जेवीत नाहीं, त्याप्रमाणें ज्या गांवानें मुलगी दिली त्या गांवच्या कोणाहि मनुष्यानें ज्या गांवांत मुलगी दिली त्या गांवचें अन्न खावयाचें नाहीं किंवा पाणी प्यावयाचें नाहीं. अशी चाल अजूनहि जुन्या चालीच्या कांहीं गांवांतून दिसून येते. याचें कारण द्वेष नव्हे. तर 'मुलीचें दान' केलें म्हणजे तिचें सर्वस्व दान झालें म्हणून तिच्या घराचें पाणीहि प्यावयाचें नाहीं ही स्वत्वनिवृत्तीची अत्यंत उदात्त सात्त्विक कल्पना. एक गांव दुसऱ्या गांवचा व्याही झाला म्हणजे एका गांवानें दुसऱ्या गांवचें पाणी प्यावयाचें नाहीं हा त्याच कल्पनेचा विस्तार होय.

''यानंतर गांव सुटून घराणें हा सामाजिक मूळ 'घटक' झाला तेव्हां एका घराण्यानें दुसऱ्या घराण्याला मुलगी दिली असा विवाहाचा अर्थ झाला. या कल्पनेच्या स्थितींत व्यक्तिशः मुलगा पाहाणें किंवा मुलगी प्रत्यक्ष पाहाणें

याला अवकाशच उरत नव्हता. दोन घराण्यांचा स्नेहसंबंध किंवा सोयरीक जमविणें संपादणें हें ध्येय व वधूवर हीं त्या ध्येयाची फक्त साधनें ! जुन्या खानदानीच्या घराण्यांतून अजूनहि असले विवाह झालेले पाहण्यांत येतात. ही स्थिति जाऊन वधूवरांची पसंति समक्ष पाहून पारखून करावयाची अशी चाल पडली. पण यांतहि वराला वधूचें दर्शन नाहींच. यानंतर वराकरितां आईबापांनींच वधू पसंत करावयाची, पण ती त्याला सहज नजरेला घालावयाची अशी चाल पडली. यांत वराला फार तर नकार दर्शविण्याचा ( veto ) अधिकार मिळाला. पण अमुक नवरी नको म्हणण्याप्रमाणें अमुक हवी असें म्हणण्याचा ( Initiative ) अधिकार त्याला मिळाला नाहीं. त्यानंतरची अलीकडची पायरी म्हणजे वराला अनेक वधू दाखवावयाच्या व त्यांतील वाटेल ती त्यानें पसंत करावयाची; व मग त्या मुलीशीं त्याचा विवाह करावयाचा ही होय. पण त्यांतहि वधूला वराचें दर्शन घडावयाचें तें वरानें वधू पाहाण्याच्या व्यवहारांत ओझरतें घडावयाचें. पण अलीकडे कांहीं सूज्ञ आईबाप वधूलाहि वर ' हवा नको ' म्हणण्याचा अधिकार आहे असें न्यायदृष्टीनें मान्य करून वधूवरदर्शनाचा व्यवहार दुतर्फी हेतूनें करतात. म्हणजे आज मुलीला फार झालें तर नकाराचा म्हणजे veto चा अधिकार मिळाला आहे इतकाच त्याचा अर्थ होय. पण हा अधिकार बजावणारी मुलगी आमच्या पुराणप्रिय शास्त्रांच्या मताप्रमाणें ' अष्टवर्षा गौरी ' खास नव्हे. ती तेराचौदा वर्षांची निदान असली पाहिजे व असतेहि."

हा सर्व सामाजिक इतिहास पायरीपायरींनीं सांगण्याचा हेतु इतकाच कीं, विवाहकल्पनेच्या दृष्टीनें आपल्या ' सनातनी ' हिंदु समाजाच्या पायाखालील वाळू कितीतरी निघून गेली आहे हें दाखवावयाचें. समाज हा पोहावयाला पडलेल्या गड्याप्रमाणें आहे. तो प्रवाहाबरोबर वाहावत असतो, पण स्वतःहि हात टाकीत राहिल्यानें त्याला वाटतें कीं, मी कांहीं प्रवाहामुळें स्थानभ्रष्ट झालों नाहीं; एका टोळीनें दुसऱ्या टोळीवर स्वारी करून मुली पळवून आणून विवाह करणें हें जितकें एक वेळ ' सनातन ' म्हणजे शुद्ध मानलें जात होतें, तितकेंच आज वधूवरांना परस्परदर्शन घडवून व त्यांना निदान नकाराचा अधिकार देऊन त्यांच्या मौनरूपी पसंतीनें त्यांचे विवाह करणें हें तितकेंच शुद्ध व ' सनातन ' मानलें जाऊं लागलें आहे. या दोन

सनातन चालींतील अंतर जमीनअस्मानाचें नाहीं काय ? पण या भेदांतहि एक चमत्कारिक साधर्म्य आहे. तें असें कीं, या दोन्ही चालींत विवाहाची मुलगी अज्ञान असत नाहीं तर खरी उपवर असते !

---

## आन्हिक ८ वें

# कुटुंब--व्यवस्था (५) गोतावळा

कुटुंबव्यवस्थेचा विचार करितांना, नवरा, बायको व मुलें यांचा विचार केला म्हणजे तो विषय संपला असें घेऊन चालण्यास हरकत नाहीं. कारण यापलीकडे कोणासच कुटुंबांतले म्हणून कायदेशीर हक्क नाहींत. आणि एकाच नांवाच्या किंबहुना घराण्यांतल्या आप्तांचा गोतावळा पुष्कळ असला व दिसला तरी, त्या गोतावळ्याची घटना नवरा, बायको, मुलें अशा स्वरूपाच्या मर्यादित पिंडांनींच बनलेली आहे. गारेचा किंवा मिठाचा चिमटींत मावण्याइतका मोठा खडा घेतला तर त्यांत फिरून ठराविक बांधीव व एकसारख्या आकाराचे शेंकडो तुकडे असतात. इंग्रजींत यांना 'क्रिस्टल' असें म्हणतात. त्याचप्रमाणें समाजाचीहि घटना आहे. यामुळें या मोठ्या गोतावळ्यांतील कोणताहि पुरुष किंवा स्त्री घेतली तरी ती व्यक्ति कोणातरी आईबापाचा मुलगा किंवा मुलगी अशी असणारच. अर्थात् त्याच्या हक्काची व्यवस्था वर सांगितल्याप्रमाणें नवरा, बायको व मुलें या चतुःसीमेंत कोठेंतरी बसणारच. मुलीचें लग्न झालें म्हणजे तिची व्यवस्था वेगळी लागलीच. तसेंच भावाभावांनींहि सज्ञान होऊन लग्नें केलीं वा न केलीं तरी, तीं स्वतंत्र कुटुंबेंच बनलीं. ते समाजाचे स्वतंत्र घटकच बनले.

अशा रीतीनें एका टोंकाला टोळीच्या स्वरूपाचें कुटुंब व दुसऱ्या टोकाला अविवाहित सडा एकटा मनुष्य, यांच्या दरम्यान विवाहित स्त्री पुरुष व मुलें मिळून होणारें कुटुंब हा सुवर्णमध्यबिंदु ठरतो.

टोळीच्या स्वरूपाची कुटुंबव्यवस्था प्राचीन काळांत होती याविषयीं शंका नाहीं, व ती व्यवस्था हजारों वर्षें अमलांत असली पाहिजे. या कुटुंब-व्यवस्थेचें प्रतिबिंब किंवा चित्र आपल्याला अरण्यांतील पशूंच्या टोळ्यां-मध्यें अजून सर्रा दिसून येतें. या टोळ्यांना आपण कळप म्हणतों. या कळपांतला मुख्य पशु हा प्रायः नर असतो व त्याच्याभोंवतीं बऱ्याचशा माद्या असून तो, या माद्या व त्यांचीं लहान मुलें हीं एका जागीं न राहतां, अरण्यांत ज्या काळांत जेथें खाणेंपिणें मिळेल तेथें राहतात. कित्येक पशूंच्या कळपांतून नर हा मुख्य नसून मादी देखील मुख्य असते. पण नर किंवा मादी मुख्य असली तरी कळपाचा इतर प्रकार सारखाच असतो. कळपरूपी पशूंचीं हीं कुटुंबें पूर्वीं होतीं व आज आहेत, अशींच माणसांच्याहि टोळीचीं किंवा कळपाचीं कुटुंबें अद्यापि जगाच्या कांहीं भागांत आढळतात, असें प्रवासी सांगतात.

या मोठ्या कुटुंबांचा अवशेष म्हणजेच जुन्या काळचीं मानवी कुटुंबें—ज्यांत, आपण पूर्वीं वैदिक वाङ्मयावरून किंवा रोमन–राज्यांतील वृत्तांता-वरून पाहिलें त्याप्रमाणें, कुटुंबांतील मुख्य पुरुषाला सर्व प्रकारचे अधि-कार असावयाचेच व इतरांना कांहींच अधिकार नसावयाचे. पण ही स्थिती जाऊन आतां सगळीं कुटुंबें मिळून एक व्यक्ति कायद्याच्या दृष्टीनें मानली जात नाहीं; तर तिच्यांतील प्रत्येक व्यक्ति त्या देशांतील किंवा प्रांतांतील जें सरकार म्हणून असेल त्याच्याशीं, व कुटुंबांतल्याच इतर माणसांशीं, कायदेशीर संबंधानें निगडीत झालेली आहे म्हणजे बांधली गेलेली आहे. पण असे सुटे संबंध असतांहि आईबाप व मुलें हें एक कुटुंब बनतें व नांदतें ही गोष्ट खरी. मात्र ती ऐच्छिक व खाजगी स्वरू-पाची असते. आपले कायदेशीर अधिकार हे अंतिम स्वरूपांतच, ( म्हणजे पटेनासें झालें, विरोध आला, भांडण जुंपलें तरच ) या कुटुंबांतील माणसें एकमेकांविरुद्ध बजावतात. एरव्हीं समाईक प्रेमसंबंधाच्या भांडवला-वर चालणारी ही सहकारी पतपेढीच होय, व तिच्यांतील प्रत्येक माण-साची पत ही अमर्यादित असते ! कायदेशीर हक्क व अधिकार हा अगदीं शेवटचा उपाय होय. आणि जेव्हां ही वरील प्रेमाची पतपेढी सुरळीत चालेनाशीं होते, तेव्हां आपण पाहतोंच कीं, नवरा कोर्टांत फिर्याद करून

घरीं नांदविण्याकरितां बायकोचा ताबा मिळवीतो; बायको नवऱ्याला काडीमोड देते किंवा फिर्याद करून त्याच्याकडून अन्नवस्त्र मिळवून घेते; बाप मुलावर रागावून आपल्या हयातींत किंवा मृत्यूपत्रानें आपली स्वकष्टार्जित मिळकत इतर कोणाला देऊन टाकून मुलाच्या पायाखालचा पैशाचा आधार काढून घेतो किंवा वडिलार्जित मिळकतींतला आपला हिस्सा तोडून मिळावा म्हणून मुलगा बापावर किंवा भावावर वाटणीचा दावा करतो. मिळून माणसांनीं वाटेल तर कुटुंबव्यवस्था मानून प्रेमाखातर किंवा सोईकरितां एकत्र राहावें आणि नांदावें; किंवा तसे न पटलें तर तुटक स्वतंत्र रीतीनें आपल्यापुरती आपण व्यवस्था करून राहावें, अशा दोन्ही प्रकारच्या सोयी हल्लींच्या सुधारलेल्या काळांत प्रत्येक देशांत दिसून येतात.

आतां यापुढें रशियांतील कम्युनिझमचीं तत्त्वें अमलांत येऊन, प्राचीन काळीं ज्याप्रमाणें टोळीच्या किंवा कळपाच्या स्वरूपाचें कुटुंब होतें त्याप्रमाणें, राज्यांतील सगळ्या प्रजाजनांचें किंवा नागरिकांचें एक कुटुंब ठरून नव्या प्रकारची नांदणूक सुरू होते कीं काय, हें पहावयाचें आहे. तसें झालें तर स्त्रीपुरुष-विवाह व कायमची एकत्र नांदणूक ही गोष्टच एकदम बंद होईल; विवाहाऐवजीं यदृच्छा किंवा तात्पुरतें प्रेम या गोष्टीमुळें स्त्रीपुरुष संबंध घडतील व बिघडतील; आणि अशा संबंधापासून किंवा एरव्हींहि झालेलीं मुलें हीं देशांतील भावी नागरिकांची पिढी म्हणून, खुद्द सरकारच ती अज्ञान असेपर्यंत त्यांच्या राहण्याची, जेवणखाण्याची व शिक्षणाची व्यवस्था करील. अशा रीतीनें पुढें काय होईल हें कोणी सांगावें ! पण आज तरुण हिंदु नागरिकानें असें घेऊन चालावें कीं, तूर्त तरी हिंदुस्थानांत जुन्या टोळीच्या किंवा कळपाच्या स्वरूपाची कुटुंबव्यवस्था संपली. राजाचे अधिकार बापाला होते ते संपले. रशियांतील नवी कुटुंबव्यवस्थाहि फारच दूर आहे. गेल्या पन्नास वर्षांपूर्वींच सनातन व खानदानीची अविभक्त कुटुंबाची व्यवस्था संपली. आणि आतां सरकाराशीं स्वतंत्र रीतीनें आपापले संबंध असणाऱ्या आणि ज्याला त्याला स्वतंत्र कायदेशीर हक्क असणाऱ्या अशा, फार तर चारदोन व्यक्तींचेंच मिळून एकेरी कुटुंब यापुढें राहील. आपल्या इकडील जुनीं अविभक्त कुटुंबें आतां

मोडत चालली असून नव्या प्रकारचीं लहान सुटसुटींत कुटुंबें अस्तित्वांत येऊं लागलीं आहेत. एका दृष्टीनें हा कुटुंबपद्धतीचा ऱ्हास असा वाटतो. आणि जुनें तें सोनें अशी मनुष्याची नेहमींचीच भावना असल्यामुळें, ती जुनी पद्धत मोडली याबद्दल त्याला वाईट वाटतें. पण अविभक्त कुटुंबाची खानदानी पद्धतच चांगली, तर याहून प्राचीन अशी वैदिक काळांतली शंभर स्त्रिया शंभर पुत्र असण्याची किंवा टोळीच्या कळपाच्या कुटुंबाची व्यवस्था तितकीच चांगली नव्हती काय ! मग ती नष्ट झाल्याबद्दलहि तसेंच वाईट वाटावें ! पण जुनें तें सोनें असें जरी माणसाला वाटतें, तरी त्यांतहि फिरून एक मौज अशी आहे कीं, अतीप्राचीन जुनें तें त्याला सोनेंसें वाटत नाहीं; तर आपल्याला लागून असलेल्या चारदोन पिढ्यां-पूर्वीचें जुनें तेवढेंच सोनें असें त्याला वाटतें. पण त्यांत फारसें स्वारस्य नाहीं. वर्तमान काळाला नेहमीं वाईट म्हणावें, त्याला नापसंत ठरवावें, व जुन्या काळाला चांगलें म्हणावें असा, इतर अनेक गोष्टींतल्याप्रमाणें, या कुटुंबव्यवस्थेच्या बाबतींतहि मनुष्याचा लहरी स्वभावाचा एक मासला होय, इतकेंच म्हणावें. कारण कुटुंबव्यवस्था हें सुखाचें साधन होय. तें स्वतः साध्य नव्हे. आणि हें सुखाचें साधन, जगाची समाजाची परिस्थिति बदलत जातें तसें बदलत जातें, याहून दुसरा अर्थ नाहीं.

कुटुंबव्यवस्थेंतील ही घडामोड मनुष्य स्वतःच करतो. ती त्याच्यावर बाहेरून कोणी लादीत नाहीं. आजकालच्या बापालाहि जुन्या काळच्या रोमन किंवा वैदिक बापाप्रमाणें कुटुंबांतील माणसांवर राजाचे अधिकार गाजवावेसे वाटतील. पण पूर्वीच्या काळांत झालें तरी ती गोष्ट मुलांना आवडत होती असें थोडेंच आहे ! व आजही त्यांना ती आवडणार नाहीं हेंच खचित. पण जुन्या काळीं मुलांचे हे हक्क उगवून देणारी राजसत्ता नव्हती ती आज आहे. यामुळें राजा होण्याची बापाची हौस फुकट जाणार व मुलाचें बरोबरीचें नातें सिद्ध होणार.

चारदोन पिढ्यांपूर्वीची कुटुंबव्यवस्था अद्‌भुतरम्य वाटते खरी. ती कोकणासारख्या मर्यादित प्रदेशांत कदाचित् अमलांत आली नसेल. पण देशावर, वऱ्हाड, खानदेश अशा भागांत लोकांनीं अनुभवली असेल ती अशी कीं,—

" पाटलाच्या घरचीं शेंपाऊणशें माणसें आहेत. स्वतः त्याला बायका दोनतीन, मुलगे दहापंधरा, नातवंडें इतकीं पुष्कळ कीं त्याला त्या सगळ्यांचीं नांवेंहि पाठ नाहींत आणि तो भलत्या नातवंडाला भलत्या नांवानें हांक मारतो. आपल्या कोण्या बायकोशीं कधींकाळीं बोलण्याचा प्रसंग त्याला येईल तो येईल. घरीं गुरांनीं दुभत्या जनावरांनीं गोठे भरलेले. दहापांच घोडींहि उनाडत आहेत. घरकाम व शेती करणारे गडीच काय पण गड्यांचीं कुटुंबेंहि दहापांच आहेत. त्यांना रोजमुरा नाहीं, महिनेमहाल पगार नाहीं, तर वर्षांतून त्यांचा हिशोब कधींकाळीं एकदां व्हावयाचा. कित्येकांना सालाचाहि पगार नाहीं, तर त्यांनीं घरच्या माणसासारखें जेवावें, राबावें, आणि वर्षांतल्या एखाद्या सणाच्या दिवशीं त्यांना नवें कांबळें किंवा पागोटें किंवा एखादें खादीचें जाड धोतर द्यावें म्हणजे झालें. आणि या घरच्या कुटुंबाची परंपरा जशी पिढ्यानुपिढ्या तशीच त्याच्या घरीं राबणाऱ्या कुटुं-बांच्या पिढ्यांची ! या सर्वांना आधारभूत अशी शेती हवी तेवढी. रानांत जाऊन उभें राहिलें तर चोहों बाजूंना नजर पोंचणार नाहीं इतकी शेतजमीन एकत्र. मध्यें बांध नाहीं, उरोळी नाहीं, हद्दीचा दगड नाहीं. घरचा कोणीहि येतो, कोणताही कोपरा नांगरतो, पेरतो आणि तेवढ्याचेंच पीक इतकें येतें कीं, या मालक व नोकरांच्या संयुक्त कुटुंबांना दोन्ही वेळ हवी तितकी भाजीभाकरी ! मुलांनीं उनाडक्या कराव्या, तालीम करावी, हातीं लागेल त्या गाईम्हशींची धार काढून हवें तेवढें दूध प्यावें. मधल्या पिढीनें कोणी हौसेनें घरकाम पहावें, तर कोणी चिलीम ओढीत चकाट्या पिटाव्या. घरच्या बायकांनीं ओटीवर ऐकूं न जाईल असें हळू बोलत घरचा कामधंदा करावा. व पोरेंबाळें रडतीं टाकून नदीवर धुण्यापाण्याला जावें. नवऱ्याची व तिची दिवसा भेटहि नाहीं मग प्रेमळपणाच्या गोष्टी तर पारख्याच. आणि या सगळ्या कुटुंबाचा धनी सकाळसंध्याकाळ वाटेल तेव्हां पाहावा तों, डोक्यावर भलें मोठें पागोटें घालून बाहेरच्या ओटी-वर कांबळें हंतरून हाताशीं मोठी काठी ठेवून चिलीम ओढीत बसला आहे. शेजारीं गांवचे चारदोन रिकामे लोक येऊन गप्पा मारीत आहेत. आणि म्हातारबुवा, हें राजाचें ऐश्वर्य गाजविण्याकरितां, उगीच मधून मधून एखाद्याला कांहीं तरी हुकूम सोडीत आहेत, कोणाला दरडावीत

आहेत, कधीं अमलांत न येणारी उगीच एखादी प्रपंचांतली कांहीं व्यवस्था कुणालातरी सांगताहेत, आणि एखादें आवडतें नातवंड जवळ बसवून त्यांचें नाक पुशीत आहेत किंवा मांडीवर खेळवीत आहेत. ''

असलें हें कुटुंबव्यवस्थेचें चित्र कोणाला रम्य वाटलें तर त्यांत हरकत घेण्यासारखें तरी काय आहे ? पण हल्लींच्या काळांत कोणी मुद्दाम असें चित्र प्रत्यक्ष आचरणांत रंगवावयाचें म्हटलें तर तें शक्यच नाहीं त्याला काय करणार ? आपल्यालाहि वाटतें खरें कीं, वैदिक काळांतील आर्य लोकांसारखें आज आपण असावें; किंवा पौराणिक काळांतील ऐश्वर्य भोगावें; किंवा ऐतिहासिक काळांतील समाजस्वातंत्र्याचा अनुभव घ्यावा. पण अखंड वहाणाऱ्या आणि रोज डोंगरावरील मूठभर तरी मातीची वाळू करून समुद्रांत नेऊन टाकणाऱ्या नदीप्रमाणें काळाचा ओघ सुरू आहे. त्यामुळें कालची स्थिति आज नाहीं, आजची उद्यां नाहीं, असें एका नाहीं तर शेंकडों कारणांनीं घडत आहे त्याला काय करणार ? शिवाय वर जुन्या अविभक्त कुटुंबाचें जसें चित्र रेखाटण्याचा आम्हीं प्रयत्न केला, तसें आजच्या काळांतलि, किंवा यापुढील येणाऱ्या पण जवळच्या काळांतील, कुटुंबव्यवस्थेचें चित्र असेंच रेखाटलें तर तें हटकून टाकाऊच वाटेल काय ! पण तें चित्र प्रत्यक्ष न रंगवितां तें आपल्या मनापुढें उभें करण्याचें काम मी वाचकांवरच सोंपवितों.

कुटुंबांतील व्यक्तींचे कायदेशीर संबंध हा मनुष्यजीविताच्या वस्त्राचा अखंड उभा ताणा आहे असें आपण समजूं. पण त्याबरोबरच कौटुंबिक प्रेमाचा बाणा म्हणजे आडवा दोरा हा भरला जातच असतो; व अशा रीतीनें हा माग वस्त्रें विणीत असतो. मग कुटुंबांतील बुद्धिमत्ता, व्यवहारकुशलता, प्रेम, आदर इत्यादि असतील त्याप्रमाणें कोठें तें वस्त्र ठाशीव व घन निघेल; तर कोठें तें विरळ झिरझिरीत निघेल. तसेंच त्यांतहि कोणी कल्पक भेटेल तर त्या वस्त्रावर सुंदर किनार किंवा फुलें किंवा चित्रेंहि निघतील. आजकाल कंपनीच्या कायद्याप्रमाणें बनणारी समाईक भांडवलाची कंपनी असते तसें कुटुंब आहे. पण ही कुटुंबाची कंपनी नोंदलेली नसते. तिच्यांतील पैशाचा व्यवहार क्वचित् वहींत लिहिला जाईल किंवा लिहिला जाणारहि नाहीं. त्यांत परस्परांविषयींचें प्रेम, आदर-

बुद्धि, लौकिकाची किंवा अब्रूची चाड यांचें भांडवल कोणी किती घालावें याला नियम नाहीं. आणि कदाचित् कोणाचें भांडवल थोडें असलें तरी त्याला इतरांच्या बरोबरीनेंहि नफा मिळूं शकेल, पण इतरांना त्याबद्दल वाईट वाटेलच असें नाहीं. कुटुंबव्यवस्थेचा पाया आर्थिक व स्वार्थी असा तर खराच. पण संस्कृति, प्रेम, सद्भावना, माणुसकी इत्यादि आधार कुटुंबाच्या डोलाऱ्याला असतात ते डोळ्याला दिसत नसले तरी असतात हें मात्र खरें आहे. आणि हे दुसरे म्हणजे अदृश्य आधारच खरे महत्वाचे असून ते जेव्हां मोडतात किंवा दबतात, तेव्हां आर्थिक व्यवहाराचा आधारहि कुटुंबाचा डोलारा उचलून धरूं शकत नाहीं; तर तो खालीं पडतो, मोडतो, व त्याचे सुटे भाग निरनिराळ्या मार्गांनीं जातात !

---

## आन्हिक ९ वें

# कुटुंब--व्यवस्था ( ६ ) नोकर--चाकर

कुटुंबाचीं माणसें सोडलीं म्हणजे मग ज्यांचा संबंध येतो अशापैकीं पहिला म्हटला म्हणजे नोकर वर्ग. अर्थात् नोकर ठेवण्याची ऐपत ज्याला असेल तोच तो ठेवील. पण नोकराचे व धन्याचे संबंध कसे होते व असावेत याचाहि विचार तरुण नागरिकाला थोडासा करणें प्राप्त आहे.

जुन्या काळीं नोकर व गुलाम यामध्यें मुळींच फरक नव्हता, यामुळें नोकराला पगार किती द्यावा, त्याला अन्नवस्त्र काय द्यावें, त्याच्याकडून काय काम घ्यावें, काय घेऊं नये, किंवा त्यानें चूक किंवा अपराध केला असतां त्याला शिक्षा काय करावी यासंबंधानें नियम नव्हते. नोकरी हा करार मानिला जात नसे. कारण करार म्हटला म्हणजे त्यांतून दुतर्फी हक्क व जबाबदारी उत्पन्न होते. गुलामगिरीची पद्धति गेल्या शेपन्नास वर्षेपर्यंत जगांत चालू होती. गुलामाची अदलाबदल होत असे त्याप्रमाणें गुलाम हा स्वतःला व स्वतःच्या कुटुंबालाहि पैसे घेऊन विकूं शकत असे. ते घेतलेले पैसे फिटले म्हणजे त्याची मुक्तता होई. पण घेतलेले पैसे बहुधा

फिटतच नसत. तसेंच घेतलेल्या पैशाला कर्जाचें स्वरूप न राहतां, खरेदी-विक्रीच्या किंमतीचें स्वरूप असलें म्हणजे मग, पैसे परत देण्याचा व मुक्तता करण्याचा प्रश्नच नाहीं. कारण व्यवहार पुरा होऊन चुकला ! निर्जीव वस्तु आपली किंमत देऊन स्वतःला कधीं सोडवून घेते काय ? तसाच गुलाम किंवा नोकर !

सुमारें पाऊणशें वर्षांपूर्वीं अमेरिकेंत उत्तरेकडील व दक्षिणेकडील संस्थानामध्यें मोठें युद्ध झालें. गुलामगिरी नष्ट व्हावी म्हणणारा एक पक्ष, व ती नष्ट होऊं देणार नाहीं असें म्हणणारा दुसरा पक्ष, यांच्यामध्यें तें झालें. त्यांत गुलामगिरी नष्ट व्हावी म्हणणाऱ्या राष्ट्रांचा जय होऊन गुलामगिरी यापुढें राहिली नाहीं. ज्या कोणाजवळ गुलाम असतील त्यांनीं ते सगळे सोडून दिले पाहिजेत असे जाहिरनामे निघाले. इंग्लंडमध्येंहि गुलामगिरी नष्ट करण्याची चळवळ कांहीं परोपकारी गृहस्थांना मुद्दाम करावी लागली; व त्यांच्या खटपटीमुळें मनुष्यें पकडणें व गुलाम करून विकणें हा कायद्यानें गुन्हा ठरविला गेला. सुप्रसिद्ध ग्लॅडस्टन साहेब याला लोक धर्मात्मा मानीत. पण खुद्द त्याच्या बापाचा संबंध बरेच दिवस गुलामगिरीच्या व्यापारांत होता. आपल्याइकडे दासी विकण्याची, विकत घेण्याची व गुलाम म्हणून वागविण्याची चाल पेशवाईपर्यंत होती असा दाखला आढळतो. म्हणजे हिशेबांच्या वहींत इतर मिळकतीप्रमाणें त्यांचा जमाखर्च लिहिल्याचें आढळतें. पुरुष गुलाम विकल्याचा उल्लेख सांपडत नाहीं, पण जेव्हां प्रत्यक्ष गुलामगिरी नव्हती तेव्हांहि नोकराला इजा अपकार केल्याबद्दल मालकाविरुद्ध केलेली फिर्याद न्यायाधिकारी हातांत धरीत नसत. यामुळें कायद्याच्या शब्दांत गुलामगिरी असली काय नसली काय सारखीच.

रूढी व चाल यांनीं जशा इतर अनेक गोष्टी समाजाच्या अंगवळणीं पडतात तशीच नोकरीच्या गुलामगिरीचीही गोष्ट होती. आज आपण अस्पृश्यांच्या बाबतींत पहातोंच कीं, एका बाजूला सनातनी लोक अस्पृश्यांना जवळ करण्याला तयार होत नाहींत त्याप्रमाणें, दुसऱ्याहि बाजूला, सनातनी अस्पृश्य हे स्वतः जुनी चाल मोडावयाला तयार होत नाहींत ! म्हणजे त्यांना कोणी उदार भावनेनें स्पृश्य करूं लागले, जवळ घेऊं लागले, तरी ते स्वतः तसें करणें हें पाप समजतात. आपणाला जवळ करणारा वरच्या जातीचा मनुष्य

करतो तें कदाचित् त्याचें पाप नसेल पण तें आपलें पाप आहे, आपण आपली पायरी सोडतां नये, असें त्यांना वाटतें. त्याप्रमाणेंच हजारों वर्षें ज्यांनीं गुलामगिरीची रूढि पाहिली व पाळिली, त्यांना ती रूढी बंद करणाऱ्या कायद्याचें नवलच वाटलें. अमेरिकेंतील युद्धानंतर गुलामांना मुक्त करण्याकरितां जेव्हां सरकारी अधिकारी व शिपाई फिरूं लागले तेव्हां असें आढळलें कीं, कायद्यानें बंधमुक्त केलेले हे गुलाम, स्वतःच्या मनानें बंधमुक्त झालेले नसल्यामुळें, गोंधळून गेले. आणि माणसानें स्वतंत्रपणें कसें वागावें, आज्ञेशिवाय पाऊल कसें टाकावें, श्रमाचा मोबदला म्हणून पैसा किंवा अन्नवस्त्र हक्काचें म्हणून कसें घ्यावें, या गोष्टींचा त्यांना उमजच पडेना !

हीच गोष्ट, केवळ गुलाम नव्हेत,पण परंपरागत चालीनें वंशपरंपरा नोकर म्हणून धन्याच्या कुटुंबाला चिकटून राहिलेल्या लोकांचीहि झाली असेल यांत शंका नाहीं. स्वेच्छेनें आचरलेली चाल किंवा रूढि,आणि कायदेशीर बंधन यांतला भेद त्यांना कळणें कठिण गेलें असलें पाहिजे. आपल्याकडे गुलामगिरी नव्हती तेव्हांही नोकर–कुटुंबांना, धन्याच्या कुटुंबाशीं आपण कायद्याच्या बंधनानें बांधले गेलों असेंच वाटत असावें. मग एखादेंच कुटुंब हें बंधन तोडण्याला तयार झालें तर झालें. पण या वस्तुस्थितीला दुसरी व चांगली अशीहि एक बाजू आहे व होती हें लक्षांत ठेविलें पाहिजे. ती अशी कीं, त्या काळाचे धनी व त्या काळाचे नोकर यांचे संबंध अलीकडील काळापेक्षां अधिक जिव्हाळ्याचे असावेत असेंहि दिसतें.

हल्लींच्या करारांनीं जोडलेल्या धनी व नोकर या संबंधांत तो जिव्हाळा तितका असणें शक्य नाहीं. पूर्वी धन्याची नोकरी सोडून जाणें हें नोकराला जसें पाप वाटत असे तसेंच नोकराला सोडणें, काढून टाकणें, हें धन्यालाहि पाप वाटत असावें. आणि पाप हा शब्द या कामीं जरा अधिक होतो म्हटलें तरी त्याचे जागीं ‘ माणुसकीला कमीपणा आणणारें वर्तन’ असे शब्द घालावयाला कांहींच हरकत नाहीं. नोकर ठेवून सुखांत राहण्याला अर्थातच एक प्रकारची ऐपत लागते. ती असेल तोपर्यंत ठीकच; पण ती नष्ट झाल्यावर नोकर कसे सांभाळावे असा प्रश्न सहजच

उत्पन्न व्हावयाचा. पण तो तसा झाला तरी, गरिबीमुळें कुटुंबांतलें माणूस जसें आपण टाकून देत नाहीं, तसाच नोकरहि सोडून देणें योग्य नाहीं अशी भावना जुन्या काळच्या धन्याची असावी. त्यामुळें जें काय असेल तें मिळून खाऊं व नोकरासकट कुटुंब नांदवूं, कोणाला अंतर देणार नाहीं, अशा सात्त्विक ईर्षेनें धनी वागत असतील तर, आपल्या पोटाला न मिळालें तरी चालेल पण धन्याची नोकरी सोडूं नये, असें नोकरालाहि कां वाटूं नये !

पण केव्हांहि नोकराचा नंबर अर्थात् कुटुंबीयांनंतरच लागणार. आणि आजकाल कुटुंबाचीच व्याप्ति जर नवरा बायको व मुलें एवढ्यावर येऊन ठेपली, आणि खुद्द रक्तमांस पिंडाचे बुरूज पडून त्याचे सुटे दगड झाले, तर धनी व नोकर यांचाहि जिव्हाळा कमीच व्हावा यांत काय अश्चर्य ! वंशपरंपरा नोकर असल्याची नोकराची भावना नष्ट झाली, तरी नोकरीची मुदत वर्षावर्षांनीं तरी मोजली जाई. म्हणजे नोकरीच्या वेतनाचा हिशेब वर्षाची मुदत धरून होई. या चालीमुळेंच खानदेश वऱ्हाडांत अगदीं अलीकडच्या काळापर्यंत नोकराला 'सालियानदार' असा प्रतिशद्व होता. अविभक्त कुटुंबपद्धतीबरोबर ही 'सालियानदारी' नाहींशी झाली, व त्याचे जागीं नोकरीचा हिशेब व नोकरीच्या वेतनाचा हिशेब करण्याचें माप महिना हें झालें. आणि सरकारी काय किंवा खाजगी काय नोकरी ही महिनेमहाल अशी मानली जाते. पण यापुढें पगाराचा हिशेब महिन्यानें करण्याऐवजीं आठवड्याच्या मानानें करण्याची चाल येणार आहे असें दिसतें ! विलायत ही अशा बाबतींत आमच्यापुढें पुष्कळच असल्यामुळें, आठवड्याची नोकरी व आठवड्याचा पगार ही चाल तिकडे आज कैक वर्षें अंमलांत आहे. आणि कामकरी व मजूरवर्ग यांच्या हिताकरितां म्हणून जी नवी चळवळ या देशांत आतां सुरू झाली आहे, तिच्यांतील एक तत्त्वच असें आहे कीं, नोकराचा पगार दर आठवड्यास धन्यानें चुकतां करावा अशी त्याच्यावर सक्ति करणारा कायदा सरकारनें करावा; तरच त्यांचें वात्सल्य गरीब वर्गाविषयीं खरें समजलें जाईल !

समाजाची आर्थिक परिस्थिति इतर बाजूंनीं या नव्या कल्पनेला शोभेशीच आहे. कसें तें पहा ! पूर्वी संसारपयोगी जिनसांची बेगमी करावयाची

ती कित्येक वर्षांचीहि करीत असत. धान्याचें कोठार भरलें म्हणजे तें एक वर्षांत न सपलें तरी उपसणें सुरूच असें. धान्याला वास आला तरी चालें. तें कुजून काळें पडलें तरच गोष्ट वेगळी. पेंवांतल्या धन्याची भाकरी खाणें ही गोष्ट गेल्या पिढींतील गरिबांना माहित होती. पण आतां सबंध वर्षांची बेगमी करून ठेवणारीं कुटुंबें पुष्कळ आढळणार नाहींत. एक तर वर्षावर्षांची सुगी करून ठेवण्याला रक्कम बरीच लागते. कारण जिन-सांची महागाई झाली. शिवाय संसाराला लागणारे जिन्नस वाढले. त्या सगळ्यांचें साठवण करून ठेवण्याला घराघराऊ व सुरक्षित जागा लागते ती कमी झाली. आणि बाजारहाट व दुकाने यांची संख्या वाढून तीं आपल्या हाताशीं आल्यासारखीं झाल्यामुळें, घरीं साठविलेला जिन्नस कण-गीतून काढणें काय व दुकानांतून ताजा आणणें काय हें जवळ जवळ सारखेंच वाटूं लागलें.

तात्पर्य, अशा रीतीनें जुनी संघटना नव्या सोईनीं व गरजांनीं खिळ-खिळी झाल्यामुळें कुटुंबव्यवस्थेचे धागेदोरे तुटत चालले, तसेच नोकरी-संबंधाचेंहि. अर्थात् धन्याची नोकरावरील सत्ता व अधिकार हीं पूर्वींपेक्षां कमी झाली. नोकराचा न्याय करण्याचा अधिकार व त्याला शिक्षा कर-ण्याचा अधिकार धन्याला पूर्वीं होता तितका हल्लीं राहिला नाहीं; व नोकरांना इजा अपकार करणें ही गोष्ट इतर कोणाहि स्वतंत्र प्रतिष्ठित नागरिकाला इजा अपकार करण्यासारखीच गुन्ह्याची ठरली आहे.

याशिवाय दुसरीहि एक गोष्ट दिसून येत आहे ती अशी कीं, पूर्वीं नोकर हा हरकामी आहे अशी उभयपक्षीं सारखीच समजूत होती. परंतु आतां ती राहिलेली नाहीं. पूर्वीच्या कल्पनेला आधार असा कीं, समा-जांत फक्त दोनच वर्ग. एक सेवा घेणारांचा व दुसरा सेवा करणारांचा. आणि सेवा या शब्दाची फोड झाली नव्हती किंवा करण्याचें कारण नव्हतें. कारण सेवा याचा अर्थ नोकराला जें म्हणून करतां येणें शक्य आहे किंवा करतां येईल तें करणें असा होता. म्हणजे नोकराच्या सामाजिक दर्जाचा प्रश्नच नव्हता. पण हल्लीं नोकरी हा करार मानला गेल्यामुळें, करार कर-णारे हे दोन्ही जवळजवळ समान सामाजिक दर्जाचे अशी भावना होऊं लागल्यास नवल नाहीं. या भावनेमुळें अमुक काम करणें हें कमीपणाचें

असें नोकरवर्गांतील जाती ठरवूं लागल्या आहेत; व त्याप्रमाणें त्या जातींतील व्यक्तींना वागावें असें सहजच वाटूं लागलें आहे. कारण नोकर-व्यक्तीला मोठेपणा मिळावयाचा तो धन्यापेक्षां त्याच्या जातीकडूनच अधिक मिळणार ही गोष्ट खरीच आहे !

तात्पर्य, हल्लीं नोकरी याचा अर्थ विशिष्ट प्रकारचीच नोकरी, सर्व-सामान्य नव्हे, असें समजण्यांत येऊं लागलें आहे; व जातीनें ठरविल्या-प्रमाणें आपल्याला अपमानकारक असें काम करण्यास धन्यानें सांगितलें तर नोकरी सोडून देऊं, पण तें काम करणार नाहीं, असा स्वाभिमानी करारीपणा नोकरवर्गहि दाखवूं लागला आहे. माणुसकीच्या भावनेच्या दृष्टीनें ही प्रगतीच होय. आपल्या इच्छेनें हवें तें काम, हवा तो धंदा करण्यास मनुष्यानें खुशाल तयार व्हावें. पण सक्तीनें तें काम किंवा तो धंदा करूं नये, हें रास्तच आहे. जन्म कोठें, कोणत्या जातींत व्हावा, हें मनुष्याच्या हातीं नाहीं. परंतु जन्म कोठेंहि झाला तरी आपण काय करावें, काय न करावें, याविषयींचें स्वातंत्र्य मनुष्याला असणें हा धर्म व न्याय असून तें स्वातंत्र्य भोगण्याची इर्षा बाळगणें हा पुरुषार्थ कां नव्हे ?

नोकरीच्या कामांतील या बारकाव्याला इतर गोष्टींचीही मदत होत आहे. नव्या पिढींतील माणसें अधिकाधिक स्वावलंबी होण्याची इच्छा बाळगीत आहेत व हें सुचिन्हच होय. आपलें जें कोणतेंहि काम स्वतः करण्यांत कमीपणा वाटतो तें दुसऱ्याला करावयास सांगणें हा अन्याय किंवा अधर्म वाटला पाहिजे. तसेंच काम या दृष्टीनें कोणतेंहि काम आपलें आपण करण्यांत मान वाटावा, त्याचप्रमाणें तें करतां येण्याची पात्रता किंवा कौशल्य अंगीं नसेल तर तो आपला कमीपणा वाटला पाहिजे ! नोकर ठेवणें हें केवळ श्रमविभागाकरितां. आपले श्रम कमी करून तें काम दुसऱ्याकडून करून घेण्याचा मोबदला देण्याची ऐपत, सुदैवानें आपणाला लाभली आहे म्हणूनच नोकर ठेवावयाचे, अशी भावना उत्पन्न होणें हें सुलक्षण होय.

दुसरें असें कीं, ज्या कांहीं गोष्टी एकाच्या दुसऱ्यानें करण्यास कमी-पणा वाटतो त्या सामुदायिक रीतीनें, व विशेषतः यंत्रसहाय्यानें, करण्याच्या कला समाजाला अवगत होऊं लागल्या आहेत. उदाहरणार्थ, शहराचा

केर निघून तो सर्व बाहेर कोठें तरी जाऊन त्याची व्यवस्था झाली पाहिजे. तर त्या कामाची वाटणी अशी होते कीं, घरचा केर घरचीं माणसें आपल्या हातानें काढतात व तो सार्वजनिक कुंडींत नेऊनहि टाकतात; त्यांत कोणाला कमीपणा वाटत नाहीं. यानंतर तो तेथून हलविणें हें काम सार्वजनिक झालें; व हलक्या कामाची नोकरी खासगी माणसाकडे करण्यांत जो कमीपणा वाटतो तो एखाद्या संस्थेसंबंधानें करण्यांत वाटत नाहीं. यामुळें तो केर उचलून भरून नेणारे नोकर चांगला पगार दिला म्हणजे मिळतात. तसलें काम मोठ्या प्रमाणावर व्हावयाचें झालें तर त्याला यंत्रसाहाय्य मिळूं शकतें. आणि कोणतेंहि काम म्हणजे हलकें किंवा गलिच्छहि,त्याला यंत्राचा संपर्क झाला म्हणजे तें करण्याचा कमीपणा आपोआप जातो. हल्लीं मोठमोठ्या शहरांतून मैलमोऱ्या झाल्यामुळें मैला वगैरे वाहून नेण्याची व्यवस्था हात न लागतां होऊं शकते. यामुळें उलट भंगी लोक बेकार होण्याची वेळ आली आहे! आणि त्याला मदत म्हणूनच कीं काय, आपली घाण आपण काढून टाकणें हें मनुष्याचें कर्तव्यच आहे अशी एक नवी शिकवण मनुष्याला नीतिदृष्ट्या पटूं लागली आहे. तसेंच घाणीचें खत करून शेतांतच काय पण घरालगतच्या वाडग्यांतून घातलें तर भाजीपाला वगैरे घरोपयोगी पदार्थ तयार होऊं शकतात ही स्वार्थाची शिकवणहि त्याला पटूं लागली आहे.

अशा रीतीनें सर्वांत कमीपणाच्या वाटणाऱ्या नोकरीची व्यवस्था लागल्यामुळें, एका बाजूला नोकरांचा स्वाभिमान राखला जातो, व दुसऱ्या बाजूला मनुष्याचें कामहि अडून राहात नाहीं. एरव्हीं कमीपणा वाटणारीं कामें मोठ्या प्रमाणावर व कारखानदारीच्या थाटावर करितां येऊं लागल्यामुळें, कोणत्या जातीनें कोणता धंदा करावा याचा निर्बंध न मानतां, वरच्या प्रतीचे लोक खालच्या प्रतीचीं कामें कारखानदारीनें करून पैसा व प्रतिष्ठा दोन्ही मिळवूं शकतात. पाश्चात्य देशांत जाती व धंदा यांचा संबंध जोडलेला नसतो. आतां घराण्यांतलें काम घराण्यांतच राहिल्या कारणानें अनुभव अधिक येतो, कामांतील प्राविण्य वाढतें, जुना मांडाव चालू राहिल्यानें सोई सिद्ध असतात. या दृष्टीनें घराण्यांत तेंच काम पिढ्यानुपिढ्या ठेवण्यांत येतें. पण तें काम दुसऱ्या कोणीं करूं नये किंवा या घराण्यांतील पुढच्या

पिढीनें पहिलें सोडून दुसरें करावें यासंबंधीं समाजानें पूर्ण मोकळीक दिली आहे.

## कायदा व व्यवहार

नव्या युगांत कायदेशीर नातीं व संबंध यांना पूर्वी नव्हतें इतकें महत्त्व आलें आहे व येणार आहे यांत शंका नाहीं. तथापि कुटुंबांतील मनुष्यांचा बहुतेक व्यवहार खासगी स्वरूपाचा असतो. तसेंच कुटुंबांतील नातें सोडलें तरी घराबाहेर पडून इतर नात्यांचा व्यवहार सुरू होण्यापूर्वी, नागरिक व्यक्तीसंबंधानें विचार करण्यासारख्या कांहीं किरकोळ गोष्टी उरतात. आणि त्यांनाहि त्यांच्या परीनें महत्त्व असतें. अगदीं शेवटीं कायदा हा आधार खरा. परंतु उठल्याबसल्या कायद्याचा आधार देऊन किंवा घेऊन व्यवहार चालत नसतो. कायदा हा दुरून बोट दाखवून धाक उत्पन्न करण्याकरतां किंवा अखेर निर्णय देण्याकरितां असतो. आणि शेंकडा नव्वदपंचाण्णव इतका व्यवहार कायदा न वापरतां किंबहुना कायदा काय हें माहीत नसतांहि होत असतो. जुन्या काळीं जेव्हां औषधोपचाराची सोय कमी होती तेव्हां अगदीं प्राणसंकट आलें तरच डॉक्टर किंवा वैद्य यांच्याकडे मनुष्य जाई. एरव्हीं आहे तसें निभावून घेण्याचीच प्रवृत्ति पुष्कळ असे; आणि तसें निभतहि असे ही गोष्ट कांहीं खोटी नाहीं. आगगाडी व मोटार दाराशीं झाल्यामुळें निष्कारण प्रवास वाढला; तसेंच वैद्य डॉक्टर यांची समृद्धि झाल्यामुळें जरा कांहीं दुखलें खुपलें कीं औषधी इलाज करण्याची प्रवृत्ति वाढली आहे. त्याच रीतीनें न्याय हा पैशानें महाग असला तरी इतर रीतीनें सुलभ आहे आणि कायद्याच्या सल्लागारांचीहि समृद्धि झाली आहे; यामुळें कज्जेदलाली व कायद्याचा उपयोगहि वाढला. पण या नव्या युगांत देखील कधीं न्यायकोर्टांत किंवा वकिलाकडे न जातां ज्यांचा सर्व जन्म गेला असे लोक पुष्कळ आढळतील. मग जुन्या काळांत तसें कितीतरी मोठ्या प्रमाणांत घडत असेल याची कल्पना करतां येईल. कायदा म्हणजे " लोकमतानें मान्य केलेला विवेक, तारतम्य व सारासार विचार " अशी व्याख्या मान्य केली तर कायद्याच्या प्रत्यक्ष उपयोगाशिवाय कुटुंबांतल्या नागरिकांचें कसें निभत असेल अशी

शंका येण्याचें कारण नाहीं. कारण कायद्याची भाषा काय किंवा त्याचा उपयोग करण्याचें तंत्रमंत्र काय, हें ज्यांना मुळींच माहीत नाहीं अशाहि लोकांना, पुरुषाप्रमाणें स्त्रियांनाहि, अमुक एका गोष्टीवरील लोकमत साधारणतः काय आहे हें माहीत असते. मोठा दवाखाना राहिला डॉक्टर वैद्याच्या घरीं, पण बहुधा असें घर नसतें कीं ज्यांत आजीबाईचा औषधी बटवा म्हणून नसतो. त्यांतील औषधें लहान मुलांचें तर कार्य करतातच. पण मोठ्या माणसांनाहि तीं मधून मधून उपयोगी पडण्यासारखीं असतात. त्याचप्रमाणें ज्या त्या घरीं, किंवा शेजारी, किंवा जातींत, किंवा गांवांत, लोकमतानुरूप सल्ला देणारा, सारासार विचारी व निःपक्षपाती मनुष्य मिळणें शक्य असतें. आणि समजुतीनें तुटणारे असे भानगडीचेहि व्यवहार कायद्याशिवायच निपटतात. इतर रीतीनें वस्तुस्थितीहि तशीच आहे. विधिमंडळ कायदा मंजूर करते तो छापला जातो सरकारी गॅझेटांत ! त्याची भाषा बहुधा इतकी अवघड असते, व कलमांची इतकी गुंतागुंत असते, कीं ती सुशिक्षित माणसालाहि सहसा उकलत नाहीं. कायदा झाला म्हणजे तो गॅझेटांत प्रसिद्ध करतात तसाच क्वचित् गांवोगांव चावडीवर लावतात. पण गॅझेट कोणी विकत घेत नाहीं, आणि चावडीवरहि कोणी जाऊन वाचीत नाहीं. मग कायद्याच्या ज्ञानाचें लोण खालपर्यंत कसें पोंचतें ? तर तें असें कीं, प्रथम तें ज्ञान वकील लोक, न्यायकोर्टांतील सरकारी कचेऱ्यांतील खातेवार लोक यांना होतें. त्यांच्यापासून तें गांवगुंडांना होतें. आणि गांवगुंडांपासून तें कुटुंबांतील व्यक्तींना मिळतें.

हा मुद्दा सांगण्याचा हेतु हाच कीं, या नव्या युगांत झालें तरी कुटुंबांतील नातेवाईकांचा किंवा नागरिकांचा बहुतेक व्यवहार खाजगी स्वरूपाचा असतो; व तो खाजगी समजुतीनेंच उलगडतो.

---

## आन्हिक १० वें

# कुटुंब-व्यवस्था (७) जातिबंधन

विवाहापुरतें जातिबंधनाचें तारतम्य संभाळलें म्हणजे जातिभेदांची मुख्य अडचण निस्तारली गेली. नंतर उरली अडचण अन्नोदक व्यवहाराची. पण या बाबतींतील बंधनें आपोआपच शिथिल होत चालली आहेत. ती येथपर्यंत कीं, भक्ष्य काय अभक्ष्य काय हें स्वतःची आवड व संस्कृति म्हणून ज्याचें त्यानें ठरवावें. एरव्ही अन्नोदकाच्या व्यवहाराला, म्हणजे एका पंक्तींत बसून अन्नोदकसेवनाला, जातिनिर्बंध पाळण्याचें फारसें कारण नाहीं. अस्पृश्य या शब्दानें जे आज गणले जातात, त्यांच्यापेक्षां दुतर्फी अस्पृश्य मानले गेलेले लोक हिंदु समाजांत बरेच आहेत आणि बंधनें शिथिल होत चालली आहेत असें जें वर सांगितलें तें पहिल्या प्रकारच्या अस्पृश्यांपुरतेंच नाहीं, तर दुसऱ्या प्रकारच्या अस्पृश्यांसंबंधानेंहि समजावें. या दुसऱ्या प्रकारच्या अस्पृश्यता निवारणाचें क्षेत्र पहिल्यापेक्षां फार विस्तृत आहे. मात्र धर्मदृष्टि वगळली असतांहि जीं स्वाभाविक बंधनें म्हणून कांहीं आहेत तीं दोन्ही प्रकारच्या अस्पृश्यतानिवारणांत सारखींच आहेत. यांतील मुख्य बंधन म्हटलें म्हणजे स्वच्छतेचें, आरोग्यकारितेचें. हीं बंधनें मूळ लक्षांत घेऊनच धर्मबंधनेंहि घातलीं गेलीं हें उघड आहे. आणि तीं ज्यानें त्यानें नीट संभाळलीं म्हणजे धर्मबंधनें पाळल्यासारखींच झालीं. कायदा हें जसें जनतेच्या सारासार विचाराचें, तारतम्याचें, मूर्त स्वरूप होय तसाच आचारधर्म हाहि होय. म्हणूनच प्रत्येक युगांत शिष्ट म्हटला जाणारा आचार वेगवेगळ्या प्रकारचा होता. प्राचीन शिष्ट आचारांत स्वच्छतेचा विचार हा केव्हांहि होताच. पण अमुक अमक्या जातीचा म्हणून त्याच्या पंक्तीला बसून अन्नोदक व्यवहार करूं नये हें जें बंधन अगदीं अलीकडे पडलें आहे तें पूर्वीच्या कालांतहि इतकें कडक नव्हतें. आचाराचा संकोच वाढत जाऊन त्यामुळें विचाराचा कृपणपणा उत्पन्न झाला. पण नव्या युगांत नवी परिस्थिति निर्माण झाली असल्यामुळें हा संकोच हटत चालला आहे, आणि हा कृपणपणा कमी होत चालला आहे. भक्ष्य काय, अभक्ष्य काय, हें जो तो आपल्या मनानें ठरवितो. ती त्याच्या व्यक्तिगत संस्कृ-

तीची खूण आहे व ती खूण तो होईल तितकी राखतो खुद्द युरोपियन राष्ट्रांतहि शाकाहारी लोक अनेक आढळतात. मग हिंदुस्थानांतून तिकडे गेलेले लोक, त्यांची इच्छा असल्यास, तिकडेहि शाकाहार संभाळूं शकतील यांत काय आश्चर्य !

पण हल्लीं हिंदु समाजांत अभक्ष्य भक्षण करणारा मनुष्य पंक्तीला बसल्यास त्या संसर्गाकरितां जसें कोणी प्रायश्चित्त देत घेत नाहींत, तसेंच अस्पृश्य मानलेल्या वरिष्ठांतल्या किंवा कनिष्ठांतल्याहि लोकांशीं पंक्तिव्यवहार झाल्यास ग्रामण्यें होत नाहींत व प्रायश्चित्तें सांगत नाहींत. नव्या पिढीला दिवसेंदिवस समाजानें घातलेलें कोणतेंहि बंधन फारसें जाचक होण्याचा संभव नाहीं. म्हणून जें काय बंधन मानावयाचें तें मनानें कोणी मानील तेवढेंच. आणि मन घालील तेंच खरें बंधन ! म्हणून जातिभेदासंबंधानें लग्नव्यवहार व पंक्तिव्यवहार हेच जे काय दोन भानगडीचे प्रश्न त्यासंबंधानें तारतम्य वर सांगितलें आहे.

आतां कोणी जातिभेद पाळला म्हणून तें पाप ठरत नाहीं किंवा न पाळला तरी मोठा सामाजिक पराक्रम ठरतो असेंहि नाहीं. विश्वबंधुत्वाच्या भावनेचा उदय हेंच जर तरुण पिढीच्या डोळ्यांपुढें ध्येय म्हणून ठेवावयाचें असेल, तर तें साधण्याच्या मार्गांत जातिभेदाशिवाय इतरहि विघ्नें कांहीं थोडीं नाहींत. कारण खोट्या फाजील व घातक अहंकाराचा जातिभेद हा जसा एक प्रकार, तसाच मानववंशभेद हा दुसराहि एक प्रकार तसाच आहे, व तो पहिल्याहूनहि अधिक सूक्ष्म म्हणून अधिक भयंकर आहे. पण सगळ्या गोष्टी मनुष्याच्या हातून एकदमच होऊं शकत नाहींत. किंवा क्रमानें पण सर्व होतील असेंहि म्हणतां येणार नाहीं. आम्ही इकडे सर्व जीव एकाच ब्रह्माचे खंड किंवा परमाणु असें म्हणत असतां, जातिभेद मानण्यांत कृपणपणाची पराकाष्ठा करतों. तर तिकडे पाश्चात्य देशांत जातिभेद मानीत नसले तरी पौर्वात्य–पाश्चात्य असला दिग्भेदच इतका तीव्रतेनें मानतात कीं, त्यापुढें जातिभेद कांहींच नाहीं. लग्नव्यवहार व अन्नोदक व्यवहार येवढा वगळला असतां, परदेशच्या म्हणजे इतर मानववंशांतील लोकांसंबंधानें हिंदु लोक जें दाक्षिण्य व जो प्रेमभाव ठेवतात तो प्रेमभाव, जातिभेद न मानणाऱ्या पाश्चात्यांच्या मनांत आम्हां हिंदु लोकां-

बद्दल असत नाहीं. वर्णभेद इकडे आम्ही मानतों तो विशिष्ट धार्मिक आचार व अधिकार यापुरता. पण वर्ण या शब्दाचा अर्थ रंग असा केला असतां सिद्ध होणारा जो वर्णभेद, व त्या भेदापासून उत्पन्न होणारे तुच्छता द्वेष इत्यादि विकार, हे पाश्चात्य लोकांत अधिक प्रबळ असतात. आणि राजकीय अहंकाराचीहि भर त्यांतच पडते.

तात्पर्य, विश्वबंधुत्वाची मजल फार दूरची आहे. मनुष्य ती केव्हां गाठील ती गाठो. आणि ती गाठील तेव्हां तरी तो हटकून सुखी होईल कीं नाहीं हें तरी कोणी सांगावें ? सुखाची जात ही कांहीं वेगळीच आहे. तें मनुष्याच्या किंवा समाजाच्या कोणत्या स्थितींत हटकून मिळेल हें सांगणें कठिण आहे. प्राचीन काळच्या रानटी स्थितींतल्या गुलामगिरीच्या कुटुंबांत मनुष्य सुखी नव्हताच असें तरी कोणाला हटकून म्हणतां येईल ? उलट, उद्यां सगळ्या जगाचा मिळून एक समाज बनला तरी त्यांतील प्रत्येक व्यक्ति, केवळ तो समाज एक बनल्याच्या कारणानें, सुखी होईलच असें म्हणतां येत नाहीं. म्हणून समाजरचना ही जरी सुखदुःखाचें एक सामान्य कारण असलें तरी, समाजाच्या निरनिराळ्या घटना या शरीराच्या स्थितींतील फेरबदलासारख्या मानाव्या लागतात. मनुष्याच्या आयुष्यांतच त्याच्या देहरचनेमध्यें किती फरक पडतात ! पण आजार रोग वगैरे विशेष कारण सोडून दिलें असतां, प्रत्येक स्थितींत विशिष्ट प्रकारचें सुख असतेंच कीं नाहीं ? अर्थात् मनुष्यव्यक्तीच्या आयुष्यांत जसे शरीरसंघटनेंतील फेरबदल त्याच्या इच्छेनें होत नाहींत, आपोआप होतात, व त्या प्रत्येक घटनेंत कांहीं विशेष सुख व कांहीं विशेष दुःख असतें, तसेंच समाजाचेंहि समजावें.

असो. एकंदर मनुष्यवंशासंबंधानें पुढें सर्वसाधारणरीत्या चार शब्द लिहावयाचे आहेत; तेव्हां या विषयाचा आणखी विचार होईलच. तूर्त या ठिकाणीं त्यांतील इतकाच मुद्दा घेतला आहे कीं, जाति ही मानवजीवितांत एक प्रकारें आवश्यक, किंवा निदान स्वाभाविक, अशी तरी घटना आहे असें म्हणावें लागतें. आणि त्या घटनेचा तारतम्यानें उपयोग केल्यास, तिला हल्लीं जशीं नांवें ठेवण्याची एक ‘ फॅशन ’ आहे तशीं नांवें ठेवण्याचें कारण नाहीं. चार वर्ण म्हणजेच वर्णव्यवस्था असें घेतलें

तर या चार वर्णांतील पोटभेद निघून जाऊन मुख्य ते चारच उरण्याला किती तरी काळ लागेल. दरम्यान वर्णव्यवस्थेचें मूळ तत्त्व लक्षांत घेऊन, आपले हक्क व आपलीं कर्तव्यें यांचा जम मनुष्य मनानें बसवील तर त्याला त्या स्थितींतहि सुख मिळणार नाहीं असें नाहीं. मात्र जन्मानें अनादि कालापासून किंबहुना प्रत्यक्ष ईश्वरापासून जाति कायमच्याच बनलेल्या आहेत, व त्यांतील एकांतून दुसऱ्यांत जावयाला कधींच केव्हां वाव नाहीं, ही कल्पना अस्वाभाविक, इतिहासदृष्ट्या निराधार, अन्यायाची व निराशाजनक आहे.

धंद्याच्या परंपरेमुळें जाति बनणें हें अलीकडे थांबलें आहे. कारण वाटेल तो मनुष्य आतां वाटेल तो धंदा करूं शकतो, त्यामुळें त्याच्यावर बहिष्कार पडत नाहीं. तसेंच केवळ स्थलविशेषांतील वास्तव्यामुळें जाति बनण्याची जी गोष्ट पूर्वी घडे ती आतां घडणें शक्य नाहीं. पूर्वी मध्यें मोठी नदी असली, आणि ती तरून जाणें दुर्घट असलें, म्हणजे नदीच्या दोहीं अंगांना असणाऱ्या लोकांच्या जातीच इतक्या दाबून बनत कीं, नदीच्या अलीकडील जातीनें आपणाला श्रेष्ठ म्हणावें व तसेंच पलीकडच्या जातीनें ! दोन्हीहि आपापल्या मतानें श्रेष्ठच ! पण या श्रेष्ठाश्रेष्ठांत अन्नव्यवहार निदान विवाह तरी, खास होत नसत. पण पुढें नावेची कल्पना निघून व ती सिद्ध होऊन, नदी उतरून अलीकडे पलीकडे जातां येऊं लागलें. तेव्हां तुटकपणा जाऊन मोहोरबंद जातीची कल्पनाहि नष्ट होणारच. आणि जी गोष्ट नदी तरून जाणाऱ्यांची तीच या नावेनें या दोन काठच्या लोकांची केली ( म्हणजे त्यांचा मोहोरबंद एकलकोंडेपणा काढून टाकला ); तीच गोष्ट क्रमाक्रमानें बैलगाड्यांनीं, घोड्यांच्या गाड्यांनीं, आगगाड्यांनीं आणि आगबोटींनीं इतर ठिकाणीं घडवून आणली आणि तीच यापुढें विमानें घडवून आणणार.

साधें कोंकणस्थ–देशस्थ ब्राह्मणांचें उदाहरण घेतलें तर, या नांवाच्या शब्दांतच त्या जातीचें किंवा पोटजातीचें मूळ आहे. कोंकणांत निरंतर राहणारे ते कोंकणस्थ व देशावर निरंतर रहाणारे ते देशस्थ. या दोन प्रदेशांमध्यें पर्वतांची मोठी रांग असून पूर्वी त्यांतून कोठें उताराच्या जागीं पायवाट मिळाली तर एका प्रदेशांतून दुसऱ्या प्रदेशांत मनुष्य जावयाचा. पण गेला

तरी फार तर सडा मनुष्य जावयाचा. पुढें राज्यांच्या सोईकरितां पाउलवाटा थोडया अधिक सोईच्या व रुंद करण्यांत आल्यानंतर आतां बैलगाड्याच काय पण मोटारी जाण्यासारखे घाट या पर्वताच्या रांगेंतून मधून मधून अनेक काढण्यांत आले आहेत. आणि कांहीं ठिकाणीं तर घाटांतून आगगाडयाहि झाल्या आहेत. तेव्हां रहदारी वाढणारच; व ती आतां इतकी वाढली आहे कीं, देशस्थ आणि कोंकणस्थ या शब्दांत कांहींच स्वारस्य राहिलें नाहीं. जिन्नसपान्नस, आहार व राहाणी या बाबतींत कोंकणस्थांचीं व देशस्थांचीं जीं ठराविक लक्षणें पूर्वी होतीं त्यांतला ठराविकपणा आतां निघून गेला. अजूनहि कोंकणांत मुख्यतः भातच पिकतें आणि देशावर मुख्यतः ज्वारी, गहूं हींच धान्यें पिकतात. पण कालांतरानें दोन्ही ठिकाणीं इकडचीं तिकडचीं नवीं पिकें पिकण्याचा संभव आहे व तसे प्रयोग सुरू आहेत. कोंकणांत कापूस कसा पिकेल असें पूर्वी वाटे. पण तो हवा तसा पिकूं शकेल, निदान कांहीं जातींचा कापूस तरी डोंगरकठडीवर पिकेल, हें सिद्ध झालें आहे. तसेंच कोंकणांतलीं कडधान्यें देशावर पिकवितां येतील. पण जमिनीचा गुण माणसाला बदलतां येत नसेल किंवा देशावर व कोंकणावर पावसाचें मान अगदीं वेगवेगळें असल्यामुळें कांहीं पिकें कोठें व कांहीं कोठें असा भेद कायमचाच राहील; पण तसा भेद एकाच प्रांतांत तरी कोठें नसतो ! तथापि कोठें काय पिकेल तें पिको, न पिकेल तें न पिको; पण मनुष्यप्रयत्नानें आणि वाहतुकीच्या साधनानें पूर्वीची स्थिति इतकी बदलली आहे कीं, जगांतील वाटेल त्या ठिकाणचा माल देशावर काय किंवा कोंकणांत काय सारखाच मिळूं शकतो. चहा व साखर या गोष्टी आतां सर्वत्र सारख्या झाल्या आहेत. देशावर कोंकणांतले तांदूळ व कोंकणांत देशावरच्या गव्हाची भाकर हीं सहज मिळूं शकतात. आणि ब्रह्मदेशचा तांदूळ कोंकणांत बाहेरून इतका येतो कीं, खुद्द कोंकणच्या तांदळावर चार महिने तर रंगूनच्या गोणावर आठ महिने निर्वाह कोंकणच्या लोकांचा होतो.

तात्पर्य दूरदूर व तुटक राहाणी हें जें जाति बनण्याचें मूळचें कारण तें आतां सर्वस्वीं घटत चाललें आहे. आणि आज आहे त्यापेक्षांहि यापुढें पुष्कळच अधिक एकरूपता सर्व हिंदुस्थानभर नांदूं लागेल. आपल्या राष्ट्रीयत्वाचीं विशेष लक्षणें कोणी मुद्दाम होऊन सोडून देईल असें नाहीं.

पण अनुकरणप्रियतेमुळें व सोईमुळें एकाचें दुसरा इतक्या तत्परतेनें उचलतो कीं, अनिच्छेनें काय घडतें व इच्छेनें काय घडतें हें पहात बसण्याला अवकाशच फारसा राहात नाहीं. पुढील पिढींत हिंदुस्थानांतील चार वर्णांच्या पोटविभागांत विवाह अधिकाधिक होऊं लागतील. ब्राह्मण म्हटला म्हणजे येथून तेथून तो एकच. तसाच वैश्य, तसाच क्षत्रिय. कुटुंबांतील आहार कोणता आहे, म्हणजे तो शाकाहार आहे कीं मांसाहार आहे, यामुळेंच विवाहसंबंधाला मन काय मागें घेईल तेवढेंच. त्याचबरोबर भाषा व प्रादेशिक विशेष चालीरीति यामुळें कोण काय माघार घेईल ती घेईल. पण धर्म व जाति यांचें बंधन कमी होऊन हिंदुस्थानांतील आज वेगवेगळ्या मानलेल्या प्रादेशिक ब्राह्मणांतून लग्नव्यवहार अधिक सुरू झालेले आढळतील, व ते तसे झाले तर तें इष्टच होय.

## जात व धंदा

धंदे व जाति यांचा नित्य संबंध पूर्वी पडत असल्यामुळें जातीचें नियंत्रण जातींतील व्यक्तीवर पडे. पण अलीकडे जाति व धंदे यांचे संबंध सुटत चालले असले तरी, विशिष्ट धंद्यांत जे कोणीहि लोक पडतात त्यांतील लोकांना त्या धंद्यापुरतें निर्माण झालेलें लोकमत व व्यवहारपद्धति मान्य करावी लागते. जुन्या काळीं व्यापारी संघ हे फार प्रबळ असत. या संघांनीं केलेले नियम कसोशीनें अंमलांत आणले जात. म्हणजे जो कोणी ते नियम मोडील, त्याचा न्याय करून शिक्षा करण्याचा अधिकार संघाला असे. शिक्षा सामान्यतः दंडाची असे; व बहिष्कार ही शिक्षा असली तरी संघाची आज्ञा गुन्हेगाराकडून पाळली जाण्यापुरतीच बहिष्काराची शिक्षा अंमलांत असे. पण हा बहिष्कार धंदेवाल्याला इतका जाणवे कीं, सरकारी शिक्षा एक वेळ पुरवली पण संघाची शिक्षा नको. मनुष्य जोंपर्यंत समुदायांत राहातो तोंपर्यंत समुदायिक जीवनाचे फायदे त्याच्या लक्षांत सहसा येत नाहींत पण बहिष्कार पडला म्हणजे भर समाजांत राहाणाऱ्या मनुष्याला तो अरण्यवासच वाटतो. आणि संघाची आज्ञा मान्य करून त्याची कृपा संपादून तो फिरून संघांत प्रवेश मिळवून घेतो. हे संघ पूर्वी सर्व जगभर होते. आणि राज्यकारभाराचे जसे कायदेकानू तसे संघाचे असत. हे संघ

आपल्या संघशक्तीनें इतके प्रबळ होत कीं, कित्येक वेळां राजसत्तेलाही त्यांना नमावे लागे.

हल्लींच्या काळांतहि किंचित् रूपांतर होऊन, किंवा नव्या पद्धतीनें का होईना, या संघांची संस्था अस्तित्वांत आहे. इतकेंच नव्हे तर, ती कमी होण्याऐवजीं उलट फैलावण्याचाच संभव दिसतो. जुन्या काळीं हे संघ व्यापारधंद्यापुरते असत; व तेहि त्यांतील मालक व धनिक यांच्यापुरतेच असत. पण आजकाल शेतकरी, मजूर वगैरे धंद्यांतील उपघटक यांचेहि संघ बनूं लागले आहेत. या संघांच्या कार्यांतील योग्यायोग्य काय आहे, काय नाहीं, याची चिकित्सा करणें येथें शक्य नाहीं. येथें फक्त इतकाच मुद्दा आहे कीं, कुटुंबव्यवस्थेचीं बंधनें एकीकडे सुटत चाललीं आहेत व जातीचीं जुनीं बंधनेंहि शिथिल होत चाललीं आहेत, तर दुसरीकडे केवळ आर्थिक संबंधाना अनुसरून नवे गट, नवे वर्ग, नवे संघ बनूं लागले आहेत आणि जुन्या नियंत्रणांच्या जागीं नवीं नियंत्रणें येऊं लागलीं आहेत.

मात्र या दोहोंत जो महत्त्वाचा फरक आहे तो लक्षांत ठेवला पाहिजे. कुटुंब व जाति यांतील बंधनें जन्मसिद्ध म्हणून दुस्तर व आजन्म टिकणारीं होतीं. नवीं नियंत्रणें जन्मावर अवलंबून नाहींत. मनुष्य आपल्या इच्छेनें व रीतसर करार करून आपल्याच फायद्याच्या दृष्टीनें संघांत शिरतो, व त्याचे नियम पाळतो, त्याची वर्गणी देतो व त्याचीं नियंत्रणें सोसतो. पण तीं नियंत्रणें जशीं तो इच्छेनें स्वीकारतो तशींच तो तीं आपल्या इच्छेनें सोडून देऊं शकतो. नदीच्या प्रवाहांत जसे ठिकठिकाणीं भोवरे उत्पन्न होतात. भोवऱ्याला अधार मिळून तो कोठें बनेल याचा नियम नाहीं. तो एखाद्या दगडाभोंवतीं फिरेल किंवा तळांत खालीं एखादा खळगा असेल तर तेथें फिरूं लागेल; व तो फिरूं लागला म्हणजे त्यांतील पाणी ठराविक वक्र गतीनें व प्रवाहाच्या दिशेला सोडून उलटया दिशेनेंहि फिरतेंसें दिसेल. हा भोंवरा दुरून दिसत असल्यामुळें तो टाळणें पोहणाराला शक्य आहे. पण तो आपल्या इच्छेनें किंवा बेसावधपणानें त्या भोंवऱ्यांत असेपर्यंत त्याला त्याच्या नियंत्रणाचीं चक्करें खावींच लागतात. समाजांतील आर्थिक व्यवहाराच्या प्रवाहांत कोठें विशेष उंच जागीं किंवा विशेष सखल जागीं

( म्हणजे विशेष फायदा होतो म्हणून तो संभाळण्याकरितां किंवा आपली विशेष हानी होते ती वाचविण्याकरितां ) हे संघरूपी भोंवरे बनतात.त्यांशीं मनुष्याचा संबंध येतो तो व्यवहाराच्या एखाद्या विशिष्ट अंगापुरताच येतो. आणि तो त्यांत इच्छेनें जसा सांपडतो तसा आपल्या इच्छेनें बाहेरहि निघूं शकतो. संघ हा एकप्रकारचा गोतावळाच आहे. तो गोतावळा रक्तसंबंधाचा नाहीं पण रक्त चंचल करविणाऱ्या, रक्त वाढविणाऱ्या, व रक्त घटविणाऱ्या आर्थिक व्यवहाराचा तो संबंध असतो.

---

## आन्हिक ११ वें

# कुटुंब-व्यवस्था ( ८ ) शिक्षण व संस्कृति

शिक्षण—व्यक्ति, कुटुंब व गोतावळा यांची घटना, कायदेशीर संबंध आणि खाजगी संबंध यांच्यासंबंधानें येथवर विवेचन झालें. येथून पुढें व्यक्ति व राष्ट्र यांच्यासंबंधाचा विचार करावयाचा परंतु तो करण्यापूर्वी खास व्यक्तीसंबंधाच्या अशा कांहीं गोष्टी आहेत त्यांचाहि थोडा विचार केला पाहिजे. राष्ट्र, राज्य, किंवा देश हीं निरनिराळ्या दृष्टींनीं व्यक्तींचींच मिळून झालीं आहेत ही गोष्ट खरी. तथापि, शिक्षण, संस्कृति व धर्म हीं ज्या त्या व्यक्तीपुरतीं ज्याचीं त्याचीं स्वतंत्र असतात; व व्यक्तींनीं कांहीं विशेष कारणाकरतां म्हणजे हितसंबंधाकरितां राज्य किंवा राष्ट्र बनविलें व त्याचा एखाद्या प्रदेशाशीं संबंध जोडून दिला, तरी राष्ट्र किंवा राज्य या नात्यानें राष्ट्राला किंवा राज्याला शिक्षण, संस्कृति किंवा धर्म असत नाहीं. आपण राष्ट्रीय शिक्षण हा शब्द वापरतों, त्याचा अर्थ राष्ट्राचें शिक्षण असा नाहीं तर ( १ ) राष्ट्रीय भावनेला उपयुक्त असें मानण्यांत आलेलें शिक्षण किंवा ( २ ) राष्ट्रांतील मुख्य राजकीय सत्तेनें राष्ट्रांतील नागरिकसमूहाकरितां आपल्या खर्चानें चालू केलेलें किंवा खाजगी लोकांचें चालू दिलेलें शिक्षण, शिक्षणप्रकार व शिक्षणसंस्था.

शिक्षणाचा राष्ट्राशीं इतका तरी संबंध येतो व त्याला कायद्याचें अधिष्ठानहि असतें. परंतु राष्ट्रीय (सरकारी) म्हणून संस्कृति अशी कांहीं नसते.

राष्ट्रांतील राज्यकारभारांत ज्यांचा हात चालतो, अशा लोकांच्या संस्कृतीच्या कल्पना काय होत्या किंवा आहेत हें ज्यावरून कळेल असे कांहीं कायदे किंवा सरकारी खातीं किंवा राज्यकारभारांतील कामें असूं शकतील व त्यांवरून अनुमान करून या राष्ट्रांची संस्कृति अमुक आहे असें वाटेल तर म्हणावें. परंतु प्रत्यक्ष राज्यकारभाराचा आत्मा हा अलिप्त असतो. त्याला तत्त्वतः अमुक एका संस्कृतीची आवश्यकता असते असें नाहीं. समजा, आज हिंदुस्थानच्या राज्यांत जें पिनल कोड आहे त्यावरून राज्याच्या नैतिक कल्पना काय आहेत याचें अनुमान करतां येईल. पण पिनल कोड हें आहे असें नसतां दुसरें कांहीं असतें, तरी तात्त्विक दृष्ट्या राज्यसत्ता ती राज्यसत्ताच. हिंदुस्थानांत आज बीभत्स चित्रें व वाङ्मय प्रसिद्ध करणें म्हणजे दाखविणें किंवा विकणें हा गुन्हा आहे, पण दारू पिणें हा गुन्हा नाहीं. दारूच्या बाबतींत गुन्हा असेल तर परवान्याशिवाय दारू गाळणें किंवा दारूचें दुकान चालविणें हा मात्र गुन्हा आहे. सरकारानें जुन्यापुराण्या महत्त्वाच्या ऐतिहासिक वस्तू रक्षण करण्याची योजना केली आहे. म्हणून ती व्यवस्था बिघडेल असें कोणतेंहि कृत्य करणें हा एका वेगळ्या कायद्यानें गुन्हा ठरविला आहे. अशा निरनिराळ्या गोष्टींवरून त्या राज्यांतील लोकांच्या नैतिक, सामाजिक इत्यादि विचारांविषयीं कल्पना करतां येईल. परंतु या गोष्टी अशा असल्या किंवा नसल्या तरी प्रत्यक्ष राज्यसत्तेच्या आत्म्याशीं त्यांचा संबंध नाहीं. म्हणजे या गोष्टी आहेत त्यांहून वेगळ्या असल्या तरी राजसत्ता व प्रजा यांचा संबंध आहे तोच राहिला असता.

तीच गोष्ट धर्माची. राज्याला आत्मा असेल तरी तो पारलौकिक मुक्तीची अपेक्षा करणारा नाहीं, त्याच्या मुक्तीची कल्पना वेगळी आहे. आणि ती याच देहीं याच डोळां मिळालेली पाहण्याची त्या आत्म्याला अपेक्षा असते. ती मुक्ति म्हणजे राज्यसत्ता अखंड व अबाधित राहाणें व त्या सत्तेच्या आधारावर राज्यव्यवस्था शक्य तितकी चांगली चालून प्रजेला शक्य तितकें सुराज्याचें सुख मिळणें. आतां बहुधा प्रत्येक राज्याच्या अनेक खात्यांपैकीं धर्मखातें म्हणून एक असतेंच. पण त्या खात्याच्या कारभाराचा हेतु पार-

लौकिक नसून इहलौकिकच असतो. हीं धर्मखातीं जुन्या राज्यांतूनच आढळतात. रशियामधील नव्या सोव्हिएट सरकारच्या राज्यव्यवस्थेंत धर्म-खातें मुळींच नाहीं व हीच गोष्ट बहुधा यापुढें बहुतेक राज्यांतून होईल. जुन्या राज्यांतून अशा प्रकारचें धर्मखातें शिल्लक उरण्याचें कारण असें आहे कीं, मानवी समाजाच्या बाल्यावस्थेंत राजा हाच मुख्य धर्माधिकारी होता. आपल्या प्रजेनें आपल्याशीं कसें वागावें, त्याप्रमाणेंच आपल्या प्रजेनें धर्म कोणता पाळावा हें पाहणें आपलें कर्तव्य आहे, असें राजा मानीत असे. उलट देशांतील लोकांच्या धर्माचें संरक्षण करणें हें राजाचें कर्तव्य असें आपोआप ठरें. यामुळें 'सद्धर्मपालक' हें विशेषण राजाच्या बिरुदावलींत असावयाचेंच. प्रथम प्रथम धर्माचरणासंबंधानें राजाकडून प्रजेवर अनेक प्रकारचा जुलूम होई. उदाहरणार्थ इंग्लंडच्या गादीवर आठव्या हेन्रीची मुलगी मेरी ही राणी होऊन बसली, ती कॅथॉलिक धर्माची पुरस्कर्ती होती. तिनें प्रॉटेस्टंट लोकांचा छळ केला व ती सद्धर्मपालक ही पदवी स्वतःला लावी. तिच्यामागून तिची बहीण एलिझाबेथ ही गादीवर बसली. तिनें प्रॉटेस्टंट धर्मपंथाचा पुरस्कार केला; तरीहि ती सद्धर्मपालक ही पदवी लावून घेतच असे. अशा स्थितींत सद्धर्म हा कोणता व सद्धर्माचा प्रतिपाल करणारा राजा या म्हणण्यांत अर्थ काय राहिला?

पण दिवसेंदिवस धर्म ही गोष्ट व्यक्तिगत ठरूं लागली आणि त्याबरोबरच धर्माचा प्रतिपाल करण्याचें कर्तव्य राजाचें, ही कल्पना रूपांतर पावली. ती अशी कीं, राजसत्तेला धर्माधिकार असा नाहीं. प्रत्येक प्रजाजनाला आपण कोणता धर्म पाळावा याविषयीं स्वातंत्र्य आहे. आणि राजा हा धर्मपालक याच अर्थानें कीं, प्रजाजनांपैकीं एका धर्मपंथावर दुसरा धर्मपंथ जुलूम अत्याचार करूं लागेल तर राजानें तो थांबवावा. कालांतरानें जशी गुलामगिरी थांबली तसाच धर्मच्छलहि थांबला. हिंदुस्थानचा ख्रिस्ती बादशहा हाहि स्वतःला सद्धर्मप्रतिपालक म्हणवितो. तथापि खास हिंदुस्थान सरकारचा असा धर्माचार कांहीं नाहीं. हिंदुस्थानाच्या राज्यकारभारांत जें एक खातें आहे. तें धर्मप्रसाराकरितां नसून जे वरिष्ठ नोकर धर्मपुरोहिताच्या मदतीची अपेक्षा आपल्या सार्वजनिक उपासनेंत करतील त्यांची गरज भागविण्याकरितां;

तसेंच ख्रिस्ती लोकांचीं लग्नें व दफनविधि या कामीं लागणारी मदत करण्याकरितां पुरोहित व उपपुरोहित यांच्या नेमणुकी वगैरेसंबंधानें आहे. इतर धर्मांच्या लोकांकरितां पुरोहित व उपाध्ये हे सरकार आपल्या पगारानें नेमीत नाहीं हें खरें; पण इतर धर्मीय लोकांची तशी मागणीहि नाहीं किंवा सरकारी पगारी पुरोहित नेमले तर तो एक प्रकारचा जुलूमच वाटेल ! सरकार ख्रिस्ती पुरोहित खात्यावर जसा आपल्या उत्पन्नांतून खर्च करितें तसाच हिंदु व मुसलमानी देवस्थानांवरहि कांहीं खर्च करितें. या खर्चांच्या रकमा इंग्रजांपूर्वीच्या हिंदु-मुसलमान राजांनीं आपापल्या धर्मांतील देव-स्थानांना वार्षिक देणग्या म्हणून दिल्या होत्या. परंतु आपण आतां त्यांच्या जागीं आलों, आणि त्या देणग्या बुडविल्या तर देवस्थानांचें नुकसान होऊन प्रजेंत असंतोष होईल, म्हणून सरकार त्या चालवितें. अर्थात् त्या चालविण्यांत खरोखर त्या त्या धर्मांचा पुरस्कार धर्मबुद्धीनें मुळींच नाहीं. पुण्याजवळील पर्वतीच्या देवस्थानाला पेशव्यांनीं कित्येक हजारांची देणगी ठरवून दिली होती. ती सर्व नसली तरी त्यांतील कांहीं अंश सरकारनें देवस्थानाकडे अद्यापि चालू ठेविला आहे. तसेंच पुण्यांतील कित्येक देवळांना किरकोळ रकमांच्या देणग्या चालू आहेत. त्याची व्यवस्था पर्वती-संस्थानाकडून होते. तशीच कांहीं मदत कित्येक जुन्या मशिदींनाहि होते. पण यावरून सरकारचा आणि हिंदु व मुसलमान धर्मांचा संबंध आहे असें म्हणतां येत नाहीं.

अशा रीतीनें राज्यसत्ता व शिक्षण, संस्कृति व धर्म यांचा अवश्य संबंध किती आहे म्हणजे खरोखर किती नाहीं हें सांगितलें. तसेंच या तिन्ही बाबतींत प्रजाजन व्यक्तीला सरकारकडून कोणती मदत मिळण्याची अपेक्षा करतां येईल, कोणती करतां येणार नाहीं याचेंहि दिग्दर्शन वरील विवेचनावरून होण्यासारखेंच आहे. तथापि या तीनहि गोष्टी प्रत्येक नाग-रिकाला अगत्याच्या आहेत. या तिन्ही बाबतींत तो स्वतंत्र आहे. आणि तिन्ही बाबतींतलें ध्येय हवें तसें त्याचें त्याला ठरविण्याची मोकळीक आहे.

## शिक्षण

हल्लीं शिक्षणाची चोहोंकडे जी निंदा होत असते, ती तरुण पिढीच्या

कानीं येतच असेल. तथापि त्यामुळें त्यांचें मन शिक्षणापासून परावृत्त होण्याचें कारण नाहीं. शिक्षणाच्या पद्धतींत जे दोष आहेत ते काढून टाकणें हें स्वत: त्यांच्या हातांत नाहीं. त्यांची वडील पिढी त्यासंबंधानें जी खटपट करतां येईल ती करीत असते. आणि मुलांच्या शिक्षणावर पैसा घालावा कीं न घालावा हें ठरवीत असते. यामुळें शिक्षणाच्या वयांत जेवढें शिक्षण घेतां येईल तेवढें घेण्याला मुलांनीं कसूर करूं नये. या वयांत शिक्षण हें एकच ध्येय त्यांनीं आपल्या डोळ्यांपुढें ठेवावें. शिक्षण न मिळतां मोठेपणाला आलेल्या माणसांचीं उदाहरणें कोठेंहि आढळतातच. पण, तो मोठेपणा त्यांना शिक्षण मिळालें नाहीं या कारणानें आलेला नसतो. तर शिक्षण मिळालें नसतांहि त्यांच्या अंगच्या इतर गुणांमुळें आलेला असतो. शिक्षणानें मनुष्य कधींहि निरुपयोगी होत नाहीं. जें काय होतें तें इतकेंच कीं, तें शिक्षण मिळाल्यामुळें आयुष्यांत आपली अशी एक प्रकारची चढती किंवा बढती होईल असें जें पूर्वी वाटत असतें तें प्रत्यक्ष अनुभवाला येत नाहीं. पण मागणी व पुरवठा यांचा उत्कृष्ट मेळ कोणत्याहि व्यापारांत कोणालाहि हटकून घालतां येत नाहीं. आज सुधारलेल्या देशांत मालाची पैदास होते तितका माल बाजारांत उठत नाहीं; पण हाताशीं साधन आहे म्हणून बेसुमार माल तयार करण्याची चूक कारखानदारदेखील करतात. पण अशा रीतीनें अधिक उत्पन्न केलेल्या मालापेक्षां मागणीहून अधिक मिळालेलें शिक्षण ही कमी दुःख करण्याची गोष्ट आहे. कारखान्यांतील मालाला बाजारांतील किंमतीपेक्षां इतर महत्त्व नाहीं. पण, शिक्षणाला बाजारांत मिळणाऱ्या किंमतीपेक्षां अधिक महत्त्व आहे. बी. ए. मुलगा झाल्यानंतर एल्‌एल्. बी. झाला; पण वकील फार झाले म्हणून वकिलींत वाव नाहीं असें ठरलें; तर बाजारांत किंमत मिळण्याच्या दृष्टीनें आपण एल्‌एल्. बी. झालों हें विसरून फक्त बी. ए. च झालों असें मानून मिळेल तो उद्योग करावा. ज्यांना एल्‌एल्. बी. होण्याचा खर्च करवत नाहीं असे लोक नुसते बी. ए. होऊनच शिक्षण संपवितात कीं नाहीं ? शिक्षणाच्या वेळीं नको तें शिक्षण अधिक घेण्याची चूक झाली तर ती जन्मभर आठवीत उगाळीत असंतुष्ट होऊन राहण्यांत काय अर्थ ? खरी चूक असते ती शिक्षणाचें

पर्यवसान ठराविक एका प्रकारचा धंदा करावयास मिळेलच अशा समजुतीनें होतें. पण मनुष्यानें शिक्षण हें आगगाडीच्या इंजिनासारखें मानावें. इंजिनाचा गुण हा असतो कीं, तें आगगाडीला आपल्या तोंडानें किंवा पाठीनें चिकटून ती गाडी ओढूं शकतें. तसेंच आपण कोणता माल वाहून नेतों याविषयीं तें विचार करीत बसत नाहीं. डब्यांतून बरावाईट कोणताहि माल भरलेला असो तो आपल्या अंगीं शक्ति असेल तेथवर ओढून न्यावयाचा; कमींत कमी लागेल तेवढा कोळसा आणि पाणी मिळालें म्हणजे झालें. सुशिक्षित तरुण पिढीनेंहि यापुढें एकच ध्येय डोळ्यांपुढें ठेविलें पाहिजे तें हें कीं, वयांत आल्यापासून स्वावलंबी व्हावयाचें, स्वतःच्या मेहनतीनें मिळेल तेवढ्यावर जगावयाचें आणि त्याकरितां मान किंवा अपमान न पाहातां पडेल तें काम करावयाचें. काम दिसण्यांत कमी मानाचें म्हणून टाकून दिलें, पण स्वतः कांहीं न करतां लोकांचें खाऊन निरुद्योगी राहिलें, तर अशा जीवितानें होणारी मानहानी कमी प्रतीचें काम करण्यानें होणाऱ्या मानहानीपेक्षां फारच वाईट. आणि याच्या भरीला हल्लींच्या दिवसांत दिसून येणारी तरुण पिढींतील तालेवारी पाहिली म्हणजे ती स्थिति तर अधिकच वाईट. अलीकडे बापाची मिळकत हवी; पण त्याचीं मतें नकोत अशी स्थिति आढळते. बापाच्या मिळकतीकरितां भिंधेपणानें त्याचीं मतें मान्य आहेत असें दाखविणें हा अप्रामाणिकपणा होय; व स्वतःच्या मताचा अभिमान बाळगणें हें केव्हांहि भूषणास्पदच होय. पण, आर्थिकदृष्ट्या परावलंबी मनुष्याला स्वतंत्र मताचा अहंकार शोभत नाहीं. “ पितृधर्माला सर्व प्रकारें जागण्याला आपण तयार असलों तर आपल्याला कमीपण येतें ! बापाचें घेण्याला कांहीं हरकत नाहीं. पण इतर रीतीनें बापाशीं वैऱ्याप्रमाणें वागावें ! त्याला आपण कस्पटाप्रमाणें मानतों असें त्याला भासवून त्याचा अपमान करावा ! पण, प्रेमामुळें त्याचें आंतडें तळमळतें त्या गोष्टीचा फायदा घेऊन त्याच्या पैशावर पोसलें जावें ” यांत कसचा स्वाभिमान ? मुलानें हट्ट करण्यासारखी एकच गोष्ट म्हणजे आपणावर शिक्षणाप्रीत्यर्थ जो खर्च करण्याला बाप तयार असेल “ तेवढया खर्चांत होणारें शिक्षण मी आपल्या आवडीनें घेईन; तुमची आवड तुम्हीं मजवर लादूं नये असें म्हणणें; कारण पुढें जन्म काढावयाचा

तो माझा मला आणि बुद्धीला ज्या दिशेचा अंकुर फुटण्याचा संभव असेल त्या दिशेचेंच शिक्षण घेतलेलें उपयोगी पडतें. माझ्या शिक्षणाकरितां तुम्हांला काय खर्च करावयाचा तो तुम्ही करा. पण शिक्षण कोणत्या प्रकारचें घ्यावें हें माझें मी ठरवीन व त्याचे होतील ते परिणाम मी सोशीन" असें म्हणण्याची मुलाची तयारी पाहिल्यावर बाप आपला आग्रह धरणार नाहीं. तथापि, त्यानें तो धरलाच तर नाइलाज म्हणून तो म्हणेल तें शिक्षण घ्यावें व नशिबावर हवाला ठेवावा, किंवा तें शिक्षण घेऊं नये व बापाचा पैसाहि घेऊं नये. म्हणजे मुद्दा एकच कीं, वयांत आल्यावर स्वावलंबी व्हावयाचें. मग कोणत्याहि स्थितींत राहतां येवो, ती स्थिति बिनतक्रार पतकरावयाची.

## संस्कृति

संस्कृति हा शब्द फार व्यापक आहे. त्यांत काय येतें व काय येत नाहीं हें सांगणें कठीण आहे. पण सामान्यपणें असें म्हणतां येईल कीं, कोणत्याहि विषयांतील उत्तमोत्तम विचार याचें नांव संस्कृति. त्याला लोकरीच्या अंगावरील फुलाची उपमा देतां येईल. कोणत्याहि विषयांतील भौतिक ज्ञान हें लोकरीच्या कापडाच्या आडव्या उभ्या जाड धाग्यासारखें आहे. आणि कोणत्याहि लोकरीचे सारखेच जाड किंवा सारखेच पातळ धागे काढतां येतील. पण सगळ्या प्रकारच्या लोकरींवरील फूल एकाच प्रतीचें नसतें. आणि लोकरींच्या किमतींत जो फरक पडतो तो या फुलाच्या गुणामुळेंच !

कांहीं लोकरीच्या कापडांवरील फूल राठ असतें. आणि त्याच्यामध्यें उबदारपणा कमी असतो. पण उत्तमोत्तम काश्मिरी शाल घेतली तर तिच्यावरील फूल हाताला मखमलीसारखें मऊ लागतें; आणि अशा लोकरीलाच इतकी ऊब असते कीं, तिचा कपडा घातल्यानें कसल्याहि थंडीचें निवारण होतें. तसेंच कोणत्याहि वस्तूवर जें स्वाभाविक तेज किंवा तजेला असतो तसाच उत्तम विचारानीं मनुष्याच्या मनाला येत असतो.

किंवा संस्कृति म्हणजे वृक्षावरचें पिकलेलें फळ म्हणतां येईल. कारण, झाडावर पिकलेल्या फळांमध्यें त्या वृक्षाचे सगळे उत्तम गुण उतरतात.

त्याप्रमाणें संस्कृतीमध्येंहि मनुष्याच्या मनाचे उत्तम गुण उतरलेले असतात. मग तें मन पुष्कळ शिकलेलें असो, किंवा थोडें शिकलेलें असो. अशिक्षित मनुष्य झाला तरी त्याच्या ठिकाणीं उत्तम शरीरप्रकृति, सुविचार, सद्बुद्धि, सभ्यपणा हे स्वाभाविक गुण असूं शकतील. शिक्षणामुळें इतकेंच होतें कीं, मनुष्याला आपले विचार चांगल्या रीतीनें प्रकट करून दुसऱ्याशीं सुलभतेनें व्यवहार करतां येतो, विद्येचा म्हणून जो विशेष आनंद तो स्वत:ला घेतां येतो आणि दुसऱ्याला देतां येतो.

तसेंच विद्येच्या भरीला सामाजिक परंपरा आणि आनुवंशिक पूर्वसंचित या गोष्टीहि उपयोगी पडतात. रानटी लोक घेतले तरी त्यांच्यांतहि एकप्रकारचा सभ्यपणा किंवा सत्प्रवृत्ति असत नाहीं असें नाहीं, पण त्यांची रहाणी, त्यांचा आचार आणि सुधारलेल्या लोकांची राहणी व आचार, यांमध्यें पुष्कळच फरक पडतो व त्याचें कारण समाजाचें पूर्वसंचित. शिक्षणानें स्वच्छता, सौंदर्य, ठाकठीकपणा, सुखसोईची जाणीव इत्यादि गुण मनुष्याला प्राप्त होतात. यांचाहि संस्कृतींत समावेश होतो. पण संस्कृति आणि नीति हीं दोनही एकच नाहींत म्हणून तीं दोनहि एकाच ठिकाणीं आढळून येतील असें नाहीं. असंस्कृत रानटी समाजांत सभ्यपणाप्रमाणें खऱ्या नीतीच्याहि कल्पना कांहीं आढळतील. उलट अमेरिकेसारख्या अत्यंत सुशिक्षित व पुढारलेल्या देशामध्यें कित्येक नीतीच्या कल्पना मनाला न पटण्यासारख्या आढळतात. आणि स्वार्थ व दुष्ट बुद्धि यांचा तर सुशिक्षितांतहि कडेलोट दिसून येईल.

नव्या तरुण पिढीची संस्कृति पूर्वीसारखी एकजिनसी राहणें यापुढें शक्य नाहीं. हिंदी व हिंदु संस्कृतीचें जें जुनें रूप तें यापुढें बदलणार आहे. भौतिक विद्या पुष्कळच वाढणार असून नवी राहणी अधिक टापटिपीची, सुखसोईची होईल. परंतु सामाजिक चालीरीति इतक्या बदलतील कीं, त्यांच्या नमुन्याचा हिंदु समाजाच्या जुन्या परंपरेंत सहसा दाखला मिळणार नाहीं.

सामाजिक नीतीच्या कल्पनाहि पुष्कळ बदलतील. परंतु मनाच्या विकासामुळें जी संस्कृति प्रकट होते ती यापुढें पूर्वीपेक्षां अधिक खुलून दिसेल यांत शंका नाहीं. गेल्या पांचशें वर्षांत किंवा पांच हजार वर्षांत

हिंदु लोकांचा बाहेरच्या जगाशीं जो संबंध आला नव्हता तो पुढील अवघ्या पन्नास वर्षांत येण्याचा संभव आहे.यामुळें त्यांच्या संस्कृतीचें स्वरूप प्रादेशिक न राहतां जागतिक होईल; आणि तसें झाल्यास हिंदु समाजाला वाईट वाटण्याचें कारण नाहीं. जगांत जगण्याची पहिली अट अशी असते कीं, जगाच्या रीतीनें मनुष्यानें थोडेंबहुत राहावयास शिकलें पाहिजे. आणि या नव्या राहणींत जे फेरफार होतील त्यांचा स्वीकार एकाद्या आपत्ती-प्रमाणें न करतां खुषीनें व आनंदानें केलेला बरा. कोणत्याहि स्थितींत चांगलें काय हें मनुष्याला फार खोल विचारानेंच निवडून काढतां येतें. आणि प्रत्येक नव्याजुन्या स्थितींत त्या त्या कालानुसार चांगलें म्हणून कांहीं असतेंच. म्हणून नवें युग अवतरणारच, कालमान बदलणारच, स्थित्यंतर होणारच ! मग त्यांतील आपल्या दृष्टीनें जेवढें चांगलें तेवढें घेण्याचा प्रयत्न मनुष्यानें केला म्हणजे त्याचें कर्तव्य संपलें. काळाला खीळ घालणें ही गोष्ट त्याच्या हातची नाहीं. पण स्वतःच्या मनाला खीळ घालणें—म्हणजे चांगल्यावाईटाच्या विवेकाच्या दृष्टीनें येथपर्यंत जाऊं; याच्या पलीकडे जाणार नाहीं असें विवेकबुद्धीनें ठरवून इच्छाशक्तीच्या बळावर तें अमलांत आणणें—हें तरी त्याला करतां येईल.

जुन्या काळीं मजलेदार घरें कमी असत. नव्या सुधारलेल्या काळांत आतां मजल्याशिवाय बहुधा घर नाहीं. परंतु मजला वरचा झाला किंवा खालचा झाला तरी त्यांत एकेक कुटुंब स्वतंत्र राहणारें असल्यास त्या प्रत्येकावर त्या राहाणाराप्रमाणें सुखसोई असाव्याच लागतात. आतां एके ठिकाणीं एक चांगली तर एक वाईट असें असणारच. तळमजल्यावर पाण्याची सोय उत्तम असते तर वरच्या मजल्यावर हवेची सोय उत्तम असते; व वरच्या मजल्यावर निर्वेध रीतीनें संसाराचें सामान मांडतां येतें तर दुकानदारीसारखा व्यवहार करण्याला तळमजला अधिक सोईचा असतो. पण तळमजल्यांत स्वच्छता व टापटीप तितकी राहूं शकत नाहीं. अर्थात् ज्या मजल्यावर आपलें राहाणें पडणार त्यांतल्या सर्व सोई हस्तगत करून त्यांचें सुख अंगीं कसें लावतां येईल याचाच विचार करणें प्राप्त. पैशाच्या साधनानें कदाचित् एकाद्या माणसाला घरांतील सगळे मजले आपल्या हातीं व आपल्याच वापरांत ठेवतां येतील. पण युगांतरें म्हणजे काळाचे

मजले हे असे आहेत कीं, त्यांतल्या कोणत्या तरी एकाच मजल्यांत राहून समाजाला व मनुष्याला नांदावें लागतें. म्हणून संस्कृतीच्या दृष्टीनें नव्या युगांत जुनें शिल्लक राहाणार नाहीं याचा खेद न मानतां, नव्या युगांत काय चांगलें लाभण्यासारखें आहे व तें आपणाला कसें हस्तगत करतां येईल इतक्याचाच तरुण पिढीनें विचार करावा. तसें केलें असतां त्याला असें आढळेल कीं, जुनी अद्भुतरम्य, उमदी, दिलदारीची, मोठ्या अविभक्त कुटुंबाची पद्धति व तिचे फायदे नव्या युगांत आपणाला अनुभवितां येणार नाहींत; पण त्याऐवजीं जुन्या काळीं घर सोडून जाण्याला जे कुटुंबपाश अडचण करीत ते पाश नव्या युगांत निघून जातील. आणि कोठेंहि तीर फेकावा त्याप्रमाणें आपल्या चतुर्वर्ग साधनाकरितां जगाच्या पाठीवर कोठेंहि जाण्याला व राहाण्याला मनुष्याला अगदीं मोकळें वाटेल.

पूर्वीं संसार एका प्रकारें सुखाचा असला तरी त्यांतील पदार्थांत वैचित्र्य नव्हतें. तेंच आतां नव्या युगांत कितीतरी वैचित्र्य लाभणारें आहे. सुखसोईविषयीं बोलावयासच नको. आणि पुष्कळ सुखसोई निर्दोष, म्हणजे स्वतः गुणांनीं चांगल्या असून इतर कोणाला उपद्रव न करणाऱ्या, अशा खरोखरच कितीतरी निर्माण झाल्या आहेत. सांसारिक सुखसोई सोडल्या तरी व्यवहारोपयोगी अशा ज्या अनेक गुणांचा परिचय आपणाला वाचनानें व परदेशी लोकांच्या संगतीनें येतो त्याहि गोष्टीला बरेंच महत्त्व आहे. जग आपणाला जिंकण्याला व खाऊन टाकण्याला आलें तर आपणहि जग जिंकावें व खाऊन टाकावें, अशी उमेदीची भावना तरुण पिढीच्या मनांत जागतिक संसर्गानें येण्यासारखी आहे. परोपकार बुद्धीच्या कांहीं कल्पना आपल्या जुन्या होत्याच पण त्यांत नव्या ज्ञानानें भर पडली नाहीं काय? उदाहरणार्थ, पूर्वीं तप करून, जपजाप्य करून, पुरश्चरण करून, तात्पर्य पुण्याई संपादन करून ती समाजाच्या कामाला लावावी असा जो साधुसंतांचा जुना मार्ग तो आजहि शिल्लक उरला आहेच, पण शिवाय त्यांत नव्या विद्येच्या सहाय्यानें म्हणजे उदाहरणार्थ रुग्णचिकित्सा, रुग्णशुश्रूषा, औषधयोजना व विशेषतः शस्त्रक्रिया इत्यादि गोष्टींनीं, परोपकारी मनुष्याला इतरांचें दुःख निवारण करणें व त्यांना सुख प्राप्त करून देणें याविषयीं किती तरी नवे मार्ग

निर्माण झाले आहेत. मनुष्याच्या मनाचे स्थायी भाव पूर्वी काय, किंवा नव्या युगांत काय बहुधा तेच असणार. परंतु त्यांचे भाव व अनुभाव हे नवे नवे निर्माण होऊं शकत आहेत. आणि रत्नाला जितके अधिक पैलू तितकें त्याचें तेज अधिक; त्याप्रमाणें नव्या युगांत व्यवहाराची व्याप्ति जी वाढली व सृष्टिज्ञान जें वाढलें आणि सहकारितेच्या साधनानें नवीन संघ बनवून सामुदायिक किंवा व्यक्तिगत असे नवीन फायदे मिळविता येऊं लागले, हे नव्या ताळेबंदांत जमेच्या बाजूला धरावयास नकोत काय?

तात्पर्य, संस्कृतीपुरतें पहावयाचें तर भावी तरुण हिंदी पिढीच्या लोकांना उमेद व उल्हास बाळगितां येईल अशीच स्थिति नव्या युगांत येईल असें वाटतें. राजकारणाच्या दृष्टीनें जी निराशेची छाया राष्ट्रावर आली आहे, ती इतकी दाट आहे कीं, तींत कांहीं खाल्लेलें आंगाला लागत नाहीं. उजेडांत म्हणून कांहीं धरलें तरी चकाकत नाहीं. डोक्यावरचा दगड न निघाल्यानें मान ताठ व उंच होत नाहीं. पण नव्या युगाला फक्त एक राजकीय आंगच आहे, किंवा संस्कृतीला आधार सर्वस्वीं राजकीयच असतो, असें म्हणतां येत नाहीं, किंबहुना असेंहि म्हणतां येणार नाहीं काय कीं, जीं स्वतंत्र म्हणून राष्ट्रें आज आहेत तीं नव्या युगाच्या प्रवाहांत आपणाइतकींच सांपडलेलीं आहेत; आणि उद्यां समजा आपण राजकीय दृष्ट्या स्वतंत्र झालों तरी नव्या युगांतून जुन्या युगांत खाचित जात नाहीं; कदाचित् उलट नव्या युगाचा अभिमान आपणाला परतंत्र असतां जितका झोंवला त्याहून राजकीय स्वातंत्र्यांत तो अधिकच झोंबेल. याचें एक गमतीचें उदाहरण देतां येईल. भांडवलशाहीच्या दृष्टीनें आपण इतर राष्ट्रांच्या फारच मागें आहोंत. असें असतां आमच्या तरुण पिढींतील जो म्हणून मनुष्य पहावा तो कम्युनिझमशिवाय गोष्ट बोलत नाहीं. याचा अर्थ मी इतकाच करतों, राजकीय स्वातंत्र्य जेव्हां केव्हां मिळावयाचें असेल तेव्हां तें मिळेल, परंतु आज आर्थिक तत्त्वज्ञानांत परदेशांत जें नवीनांत नवीन असें एक तत्त्व निर्माण झालें त्याला हातावर घेऊन झेलण्याइतकी मनाची तयारी, म्हणजे नव्या गोष्टी स्वीकारण्याविषयीं मनाचा विकास, तरुण पिढीनें दाखविला. कित्येकांच्या मतें कम्युनिझमच्या स्वीकाराची भाषा राजकीय स्वातंत्र्य मिळण्याच्या निराशेनें उत्पन्न

झाली आहे. तो त्रागा किंवा वैताग आहे; खरा विवेक नाहीं. म्हणजे खुद्द कम्युनिझमबद्दल खरें प्रेम आहे असें नाहीं. आणि उद्यां हातांत प्रत्यक्ष राज्यसत्ता आली तर आज जो तरुण तापट मनुष्य कम्युनिझमची भाषा बोलतो तोच उद्यां, राष्ट्राला हिटलर किंवा मुसोलिनी याचा फॅसिझम राष्ट्रीय दृष्ट्या अधिक उपयोगी असें ठरवून कम्युनिस्ट लोकांवर शस्त्र धरील. तसेंच कालपर्यंत हिंदुस्थानानें राजसत्तेचाच पुरस्कार केला; आणि एकतंत्री राजसत्ता अजूनहि हिंदुस्थानांतील लोकांना किती मानवते किंवा परवडते किंवा आवडते याचीं उदाहरणें हिंदी संस्थानांतून आपणाला जागजागीं आढळत नाहींत काय? अशी स्थिती असतां राज्यकर्त्यांशीं हटातटानें भांडून भावी स्वराज्याची घटना त्यांच्या तोंडावर मारण्याकरतां तयार करावयास आम्हीं बसलों म्हणजे लोकशाही, प्रातिनिधिक सत्ता आणि मतदानाचा अधिकार यांची आवड आपणाला इतकी उत्पन्न झालेली दिसते कीं, इतर जगांत जो 'ॲडल्ट फ्रँचाईज' म्हणजे स्त्री पुरुष वयांत आल्याबरोबर केवळ वयांत येण्याच्या अधिकारानें व हक्कानें त्याला मतदार बनवावा अशी योजना, आपल्यामधील तालेवारांतले तालेवार पुढारी लेखणीनें लिहिण्यास पुढें सरसावतात. याचा अर्थ इतकाच कीं, धर्मांतर करून जो मनुष्य नवा धर्म स्वीकारतो तो जुन्या अनुयायांहून त्या नव्या धर्माचा अधिक कट्टा व माथेफिरू असा पुरस्कर्ता बनतो. कसेंहि असो, नव्या युगांतील नव्या संस्कृतीच्या प्रवाहांत हिंदु समाजाची नाव शिरली आहे यांत शंका नाहीं. अजून ती काठाकाठानेंच चाललेली आहे. पण, समुद्रांत प्रवेश करूं इच्छिणाऱ्या नावेला नदीचा कांठ सोडून थेट नस्तांत म्हणजे नदीमुखाच्या मध्यभागीं केव्हांना केव्हांतरी प्रवेश करावाच लागतो.

---

## आन्हिक १२ वें

# कुटुंब–व्यवस्था ( १ ) धर्म

१ धर्माचे दोन प्रकार आहेत. एक तात्त्विक आणि दुसरा आचारविषयक. तात्त्विक धर्म म्हटला म्हणजे ईश्वर आहे किंवा नाहीं हा वाद. तसेंच तो असेल तर त्याचें स्वरूप काय ? त्याचा आणि विश्वाचा प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष संबंध काय ? या विश्वांतील अंतर्गत घटक म्हणून स्वतंत्र रीतीनें जीवात्मा व परमात्मा यांचा संबंध काय ? मुक्ति म्हणून कांहीं पदार्थ किंवा स्थिति आहे कीं नाहीं ? ईश्वराचे गुण काय आणि तो मनुष्याला दिव्य स्फूर्तीच्या रूपानें आपला संदेश कळवीत असेल तर मनुष्यधर्म किंवा मनुष्याचीं कर्तव्यें काय आहेत ? किंवा स्वतंत्र रीतीनें मनुष्यानें आपलीं कर्तव्यें कोणतीं समजावीं ? हे विषय धर्मांत येतात. आणि धर्माच्या दुसऱ्या प्रकारांत, नैतिक कर्तव्यें हीं न विचारांत घेतां धर्माचीं बाह्य लक्षणें म्हणून, किंवा धर्माचें रहस्य तत्त्व म्हणून, किंवा धर्मानुयायी म्हणून, मनुष्यानें आचार कोणते ठेवावे पाळावे हा विषय येतो. या दोनहि दृष्टींनीं हिंदु तरुण पिढी धर्मापासून च्युत होईल किंवा धर्मभावनाविहीन बनेल असें वाटत नाहीं. पुष्कळ लोक तसा आक्षेप घेतात किंवा भीति प्रगट करितात. पण ती भीति फारशी खरी नाहीं. भूत काळाविषयीं प्रेमादर, भविष्याविषयीं भीति किंवा धाक, आणि वर्तमानकाळाविषयीं अप्रीति व असमाधान हें मनुष्याचें ठरलेलेंच आहे. युगांच्या क्रमावर मनुष्याचा विश्वास असला तरी, चालू कलियुग संपल्यावर जें सत्ययुग अवतरणार आहे त्याच्या आशेनें त्याला कधीं आनंद वाटत नाहीं. पण पूर्वीं होऊन गेलेल्या कृतत्रेतादि सुवर्णयुगांचीच त्याला कल्पनेनें आठवण होते. आणि ज्यांना हा युगांचा क्रम किंवा चक्र मान्य नाहीं, त्यांना तर काय, बोलावयालाच नको. एकदां जो जगाचा ऱ्हास झाला तो आतां फिरून सुधारणें शक्य नाहीं. जग घसरत घसरतच जाणार, म्हणजे अधिकाधिक वाईटच होत जाणार असें त्याला वाटतें. आणि जगाचा नाश कोठपर्यंत जाऊन पोंचणार याची त्याला कल्पनाहि करवत नाहीं. उत्क्रांतीपेक्षां अधोगतीवरच त्यांचा विश्वास असतो. अशा लोकांना पुढची येणारी पिढी ही अधार्मिक निपजेल अशी खात्री वाटल्यास नवल

नाहीं. पण सुदैवानें तत्त्वज्ञान हें या एकाच प्रकारचें नाहीं. इतर कांहीं लोक आशावादी आहेत. त्यांच्या मतें जगाचा भावी इतिहास हा त्याच्या पूर्वसंचिताचा अनिष्ट परिपाक नसून कांहींतरी दिव्य ध्येयाकडे जगाचें आकर्षण व त्यामुळें त्याची विकासात्मक उत्क्रांतीच होत आहे. जग निर्माण करण्यांत ईश्वराचा जर कांहीं हेतु असेल तर तो वाईट कां असेल ? जें त्याच्या दृष्टीनें वाईट तसें तो कां करील ? पण या दोन सिद्धांतापैकीं वाचकांना सत्सिद्धांत पटतो कीं असत्सिद्धांत पटतो हें त्यांनीं आपल्या मनाला विचारून पहावें.

आचारात्मक धर्माविषयीं विचार करतां असें दिसतें कीं आचार हे त्रिकालाबाधित असूं शकत नाहींत. ज्ञानानें होणारा मनाचा विकास आणि बदलत जाणारी परिस्थिति, या दोहोंचा मेळ घालून समाज हा आपले आचार ठरवीत असतो. हें ठरवितांना समाजाला न आवडणारे आचार प्रथम चित्ताकर्षक वाटून पुढें आले तरी, कालांतरानें ते शिष्टसंमत व टिकाऊ न ठरतां नष्ट होतात आणि जे शिष्टसंमत असे ठरतात तेच कायमचे स्वीकारले जातात. यावर कोणी म्हणेल कीं, समाजाला जें शिष्टसंमत वाटेल तेंच चुकीचें असेल; व समाजाची झाली तरी ती चूक कां म्हणूं नये ? पण याला उत्तर इतकेंच कीं, सामाजिक बाबतींत समाजाला शिस्त लावण्याचा श्रेष्ठ अधिकार खुद्द समाजालाच असतो. समाज हाच समाजाचा धनी. आणि धन्याचा धनी कोणीहि नाहीं ! जागतिक मत म्हणून कांहीं असलें तरी तें समाजांतील लोकमताला पटलें तरच तो तें स्वीकारील. नाहीं तर मी तुझें मानीत नाहीं असें तो जगाला सांगेल. आणि राजकीय संबंध कांहीं येत नसेल तर समाजाचें हें म्हणणें टिकेल व चालेलहि. सामाजिक व राजकीय कर्तव्याची सरहद्द बहुधा थोड्याबहुत फरकानें ठरलेलीच असते. यामुळें समाजसत्ता राजसत्तेवर अतिक्रमण करीत नाहीं. आणि राजसत्ताहि समाजसत्तेवर अतिक्रमण करीत नाहीं.

नियतीच्या म्हणजे ईश्वरेच्छेच्या पोटांत स्वातंत्र्याचा म्हणून लहानसा एक कप्पा असतो. त्यांत तेवढ्यापुरतें स्वतंत्रपणें इच्छास्वातंत्र्यानें वागण्याचा अधिकार मनुष्याला असतो. तोच अधिकार समाजहि बजावतो. आणि जें काय बरें असें वाटेल तें तो आपल्या हातानें ठीकसें करून घेतो.

गतकाळाकडे दृष्टी दिली तर असें आढळेल कीं दर पांचचारशें वर्षांनीं त्याच समाजांतले धार्मिक आचार पुष्कळसे बदलतात. तथापि आपल्या लगतचे जे जुने आचार तेच सनातन चालू आहेत असें तो मानतो. ऐतिहासिक काळाचीं अशीं पांचशें वर्षांचीं दालनें केलीं आणि प्रदर्शन मांडावें त्याप्रमाणें चार हजार वर्षांपूर्वीचे आचार, त्याच्या शेजारीं पसतीसशें वर्षांपूर्वीचे आचार, असें करीत करीत गेल्या पांचशें वर्षांतील आचारांपर्यंत वर्णनात्मक चित्रें करून बसविलीं, तर या प्रदर्शनांत एकासारखें दुसरें दुकान नाहीं, एकासारखें दुसरें चित्र नाही, असें आढळून येईल. तथापि मनुष्याच्या सनातनत्वाच्या प्रेमामुळें या सर्व दुकानांच्या किंवा चित्रांच्या डोक्यांवर 'सनातन' अशा एकाच ठराविक अक्षरांनीं लिहिलेल्या पाट्या आढळतील !

स्वदेशी उद्योगधंद्याच्या मालाचें प्रदर्शन भरविलें आहे असें समजा. यांत पहिल्या दुकानांत उजेडाचें साधन म्हणून किंवा विस्तव पेटविण्याचें साधन म्हणून चकमक ठेविली; आणि शेवटल्या दुकानांत पाहावें तों देशी भांडवलानें काढलेल्या विजेच्या कारखान्यांत देशी कारागिरांनीं देशी कच्च्या मालानें तयार केलेले विजेच्या दिव्याचे चंद्रसूर्य ठेविले; आणि या दोन टोंकांच्या दरम्यान कोठें पणती, कोठें पितळेची समई, कोठें मशाल, कोठें मेणबत्ती, कोठें प्रभाकर कंदिल, कोठें किटसनसारखें झगझगीत दिवे, असे पदार्थ मांडले; तरी या सर्व दुकानांवर स्वदेशी माल हें नांव जसें व जितकें यथार्थ होईल, तसें व तितकेंच वर सांगितलेलें ' सनातन ' हें नांव यथार्थ होईल. धर्माचार बदलतात ही गोष्ट कबूल करण्याला मनुष्याचें मन सहसा घेत नाहीं. पण ते बदलतात ही गोष्टहि कांहीं खोटी नाहीं. या दृष्टीनें पहातां पुढील पिढींत हिंदू धर्माचे आचार कांहीं बदलतील यांत शंका नाहीं. पण ते जे बदलतील ते तरुण पिढीच्या बेजबाबदार स्वैराचाराच्या प्रवृत्तीनेंच बदलतील असें म्हणतां येणार नाहीं. कोणताहि नवा आचार दिसला कीं, त्याची कल्पना मूळ कशामुळें निघाली हें जो सूक्ष्म दृष्टीनें पाहील त्याला बहुधा असेंच आढळेल कीं, समाजाला कोठें कांहीं तरी त्या बाबतींत दुखूं खुपूं लागलें होतें, तें त्याला सोसत नव्हतें, परवडत नव्हतें. यामुळें ते बदलणें प्राप्त होतें. पुष्कळ वेळां हा

फेरबदल अर्थशास्त्राच्या नियमांनुसार होत असतो. तो तसा डोळ्यांना दिसत नाहीं इतकेंच. इतर कित्येक बाबतींत फेरबदल आर्थिक गरजेमुळें न होतां, संस्कृतीची कल्पना बदलल्यामुळें होतात. किंवा असेंहि समजूं कीं, ते केवळ मनुष्याच्या अनुकरणप्रियतेमुळें होतात. या तीन कारणांपैकीं पहिलें कारण दुस्तरच असतें. आर्थिक स्थिति ही व्यक्तिगत असो, किंवा सामाजिक असो, किंवा जागतिक असो; ती मनुष्याला बदलतां येणें कठिण असतें. म्हणून तिला नांवें ठेवितां येत नाहींत. संस्कृति हा तर बोलूनचालून उच्च भावनेचा परिणाम. म्हणून त्यालाहि नांवें ठेवितां येत नाहींत. नांव ठेवण्याला जागा म्हटली म्हणजे एकटी अनुकरणप्रवृत्ति.

पण अनुकरणप्रवृत्ति ही झाली तरी घातक किंवा उपद्रवकारक असेल तरच तिला वाईट म्हणतां येईल. फक्त जुन्या आचारांत फरक होतो एवढ्याकरितां त्या अनुकरणाला नांवें ठेवतां येत नाहींत. हें अनुकरण जसें कांहीं राजसत्तेमुळें घडून येतें तसेंच कांहीं भक्तीमुळेंहि घडून येणें शक्य आहे. महाराष्ट्रांतील तीनशें वर्षांपूर्वीचा पोशाख मुसलमानी राजांच्या अनुकरणानें बनला. तसाच तो आजच्या मोगलाईंतील मराठ्यांचाहि आहे. तसेंच ब्रिटिश मुलुखांतील बूटपाटलोण व विशेषतः गळेबंद व साहेबी टोपी या गोष्टी राजसत्तेला मन वश झाल्यामुळेंच आलेल्या आहेत. उलट, नखशिखांत खादीचा पोषाख करणें हें जुन्या पद्धतीच्या पोषाखाला धरून नसतां, देशभक्तीच्या भावनेनें तो आचार शिष्टसंमत मानला जातो.एकाच काळीं वावरत असलेले हे दोन्ही पोषाख अनुकरणप्रियतेचेंच फळ होय. मात्र त्यांतील एक अनुकरण स्वार्थीपणा व स्वाभिमानशून्यता याचें दर्शक ठरतें, तर दुसरें निःस्वार्थी उज्ज्वल भावनेचें दर्शक ठरतें. पण या दोन्ही प्रकारच्या पोषाखांना कोणीहि सनातनीच काय पण विद्यमानहि महाराष्ट्रीय पोषाख म्हणणार नाहीं. ही सामाजिक आचारांची गोष्ट झाली. धार्मिक आचारांतहि तेंच आढळेल. एक काळ वैदिक यज्ञयागांचा होता; एक काळ विद्याध्ययन व ज्ञानविषयक विचार व मनन करण्याचा होता; एक काळ संन्यस्त वृत्तीचा होता; एक काळ जपजाप्याचा होता; एक काळ उपासना भक्तीचा होता. तसेंच मांसाशनासंबंधानें निरनिराळ्या वेळीं निरनिराळीं मतें व आचार होते. आजचा वेदप्रामाण्य मानणारा

सनातनी ब्राह्मण वेदकालीन ब्राह्मणांसारखा मांसाशन करणार नाहीं. शाक्त पंथादि नष्ट होऊन भोजनांत मांसाशन आणि व्यवहारांत भूत-दया अशी हिंसा व अहिंसा यांची जोडी हातांत हात घालून लंगडत चालली आहे! आश्रमधर्म फारसा पाळला जात नाहीं. वर्णधर्माचाराच्या बाबतींत तो विवाहापुरताच टिकून आहे; उद्योगधंद्याच्या बाबतींत तो सर्वस्वीं सुटला आहे. स्वच्छता ही सनातन असली तरी तिचे प्रकार पूर्वींचे वेगळे, आजचे वेगळे स्पृश्यास्पृश्यविचार, सोंवळेंओंवळें, यांविषयीं आचार केव्हांहि एक स्वरूपाचे नव्हतेच. अर्थात् पूर्वी नव्हते असे नवीन आचार निर्माण होणें शक्य आहे. परंतु मुळांतील देवपूजा पितृपूजा हीं तत्त्वें शिल्लकच राहतील. देवाविषयीं भावना आणि पितरांविषयीं भावना यामध्यें केव्हां अमुलाग्र फरक पडेल तेव्हांच ती खरी कां नाहीं तें म्हणतां येईल. मनुष्य चालत असतां जसें एकदां त्याचें एक आंग व दुसऱ्या वेळीं दुसरें आंग पुढें झालेंसें वाटतें; किंवा सुखासमाधानाकरितां विश्रांतीकरितां निजणारा मनुष्यहि कांहीं वेळ उजव्या कुशीवर निजतो व कांहीं वेळ डाव्या कुशीवर निजतो आणि या दोनही स्थिति शरीरस्वास्थ्याच्याच मानल्या जातात. किंवा कांहीं वेळ श्वास एका नाकपुडींतून तर कांहीं वेळ दुसऱ्या नाक-पुडींतून केवळ देहधर्मानें चालतो. तसेंच आचाराचें समजावें. येऊन जाऊन भीति स्वैरपणाची. पण स्वैरपणा हा जसा नवीनानुकरणाच्या प्रेमानें होऊं शकेल व मनुष्याला पुढें ओढील तशीच त्याची सनातन-प्रियता, लोकमताची कदर, आणि लोकसमाजांत समरस राहाण्याची इच्छा, ही त्या स्वैर वृत्तीला पायबंद घालतीलच कीं नाहीं? अर्थात् या दोन शक्तींच्या एकमेकांवरील आघातांतून जो तिरकस मार्ग निघेल तोच प्रग-तीचा खरा मार्ग असें समजणें प्राप्त आहे. तात्पर्य, दिवसेंदिवस धार्मिक-पणा हा विशिष्ट आचारांत राहील असें वाटत नाहीं. पण याचा अर्थ धार्मिकपणाच नष्ट होईल असा नाहीं.

असो. तात्त्विक धर्माच्या दृष्टीनें तर भावी तरुण पिढी नास्तिक किंवा निरीश्वर बनण्याचें कांहींच कारण दिसत नाहीं. ईश्वर हाच प्रत्यक्ष जग निर्माण करणारा असें म्हटलें, किंवा तो स्वतंत्र राहून सृष्टिकार्य, प्रकृति व जीवात्मे यांच्या संयोगानें परस्पर चाललेलें पाहातो असें म्हटलें, तरी

आधुनिक शास्त्रांनीं इतक्या नव्या अतर्क्य गोष्टी अनुभवाला आणल्या आहेत कीं, यापुढें ईश्वराचें अस्तित्व नाकबूल करणारा सुशिक्षित मनुष्य क्वचितच आढळेल असें वाटतें. खरोखर नास्तिक या शब्दाचा अर्थ ठरीव असा केव्हांच नव्हता. ईश्वराचें अस्तित्व नाकारणारा तो नास्तिक; त्याचें अस्तित्व कबूल करणारा पण त्याच्या ठिकाणीं दया, न्यायबुद्धि वगैरे सर्व नैतिक गुण पूर्णत्वानें वास करितात असें न मानणारा तो नास्तिक; वेदांतच सर्व त्रिकालाबाधित धर्मांचीं मुळें आहेत म्हणून वेद सांगेल तोच जगाचा खरा धर्म हें जो न मानील तो नास्तिक; किंवा विद्यमान काळचे धर्माचार्य किंवा सनातनत्वाचे अभिमानी असें स्वतःला समजणारे पुराणमतवादी जो आचारधर्म म्हणून सांगतील तो कबूल न करील तो नास्तिक ! असे अनेक प्रकारचे नास्तिक असतात. त्यांपैकीं तिसऱ्या व चौथ्या प्रकारचे नास्तिक यांची संख्या दिवसेंदिवस पुष्कळच वाढणार आहे. यांत शंका नाहीं. कारण, हिंदु समाजाचें सर्वांत जुनें वाङ्मय म्हणजे वेद असें जरी पुढील पिढी आनंदानें मानील, व त्या वाङ्मयाविषयीं योग्य प्रकारचा अभिमान धरील, तरी आपण वेदांविषयीं जो अभिमान धरूं तितकेंच त्याचें प्रामाण्य. याहून वेगळें प्रामाण्य त्यांना नाहीं, असें मानणारीच यापुढची सगळी पिढी होईल !

वेदांचा अभिमान म्हणून त्यांचें कौतुकपूर्ण भाषांतर होईल. त्यांतील उत्कृष्ट उपमा, दृष्टांत, काव्यवर्णनें वाचून मनाला आनंद होईल. त्यांतील गाथा, इतिहास, समजास्थितीचीं वर्णनें व धर्माचाराचीं मधूनमधून आढळणारीं सूक्ष्म मुळें यांच्याविषयीं कौतुकपूर्ण अभ्यास होईल; ज्याची संस्कृति अधिक जुनी त्याला स्वतंत्र होण्याचा अधिक हक्क या दृष्टीनेंहि राजकारणांत वैदिक वाङ्मयाचा अभिमान गाजविण्यांत येईल ! हें सर्व कांहीं होईल. पण सकाळपासून संध्याकाळपर्यंत मनुष्यानें वागावें कसें, त्यानें काय व कसें खावें, काय व कसें वस्त्र ल्यावें, काय व कशीं दानें द्यावीं, मनुष्यामनुष्यांतील संबंध कसा ठेवावा, इत्यादि गोष्टींचा साधार व अधिकारयुक्त वाणीचा खुलासा खुद्द वेदांत सांपडेल किंवा स्मृतिग्रंथांतून सांपडेल तोच घ्यावा. ही बुद्धि यापुढें टिकेल असें वाटत नाहीं. खरेंखोटें, बरेंवाईट हें ठरविण्याची विवेकबुद्धि किंवा व्यवसायात्मक बुद्धि

मनुष्य स्वतःची अधिकाधिक चालवूं लागेल. ग्रंथप्रमाणें मनुष्यव्यक्तीचेंहि प्रामाण्य कमी होईल. कर्तव्याच्या कल्पना व समाजाचे संबंध हीं पूर्वी नसलेलीं अशीं कांहीं नवींहि पटूं लागतील, व मनुष्य एकंदरीनें अधिक स्वावलंबी होईल.

तथापि मनुष्य हा केव्हांहि अपूर्ण आहे. पूर्णत्व हें फक्त ईश्वराच्याच ठिकाणीं आहे. आणि त्याचा व आपला म्हणजे जीवात्म्याचा असा अवश्य संबंध आहे कीं, आपलें जें उणें पडेल तें ईश्वरावर निष्ठा ठेविल्यानें आपल्याला मिळण्याचा संभव आहे. ही जी भावना मनुष्याच्या मनांत असेल ती पूर्वीपेक्षां केव्हांहि या नवीन युगांत अधिक दृढ झालेली आढळेल. जुन्या काळीं दिसून येणारी पंडितगिरी पुष्कळशी वेदांसंबंधानें व तदनुषंगानें फैलावलेल्या शास्त्रासंबंधानें होती. पण आतां तशा प्रकारची आस्तिक बुद्धि न राहिल्यामुळें विद्वत्तेला नवीन वळण लागलें आहे. आणि तें व्यापक असल्यामुळें, जगांत ठिकठिकाणीं निर्माण झालेल्या ज्ञानाचा उपयोग भावी तरुण पिढी अतिशय हौसेनें करून घेईल व यामुळें समाजाचा फायदाच होईल. इंग्रजी शिक्षण सुरू झाल्यानंतर प्रथम कांहीं काळ असा गेला खरा कीं, जुन्या संस्कृतीविरुद्ध एकदम जोराची प्रतिक्रिया झाली. आणि या सुमारास जे इंग्रज शास्त्रज्ञ व तत्त्ववेत्ते गाठीं पडले ते स्वतःच जवळजवळ नास्तिक असे होते. पण आतां खुद्द इंग्लंड वगैरे देशांतहि या विद्वानांचें मत मान्य समजलें जात नाहीं. शिवाय शास्त्रज्ञानाची प्रगतीहि अनेक अंगांनीं झाली आहे व पुढेंहि होत जाईल. यामुळें विज्ञानावर अधिष्ठित तथापि आस्तिक्य बुद्धीनें प्रकाशमान झालेलें असेंच ज्ञान भावी पिढीला उपलब्ध होईल. वेदप्रामाण्य मानून चालणारांना जी गति मिळाली तिचें प्रत्यक्ष ज्ञान किंवा अनुमानहि आज कोणास करतां येत नाहीं. त्याचप्रमाणें यापुढें झालें तरी आत्म्याच्या मुक्तीचें स्वरूप अमुक एक असेल असें कोणी सांगण्याचें धाडस करणार नाहीं आणि कोणी हटवादानें तें सांगूं लागेल तर त्याचें कोणी मानणार नाहीं. आत्म्याला पुनर्जन्म नसेल व मुक्ति म्हणून कांहीं पदार्थ नसेल असा आग्रह धरला किंवा न धरला, तरी दोन्हींची फल-

श्रुति एकच. तेव्हां विज्ञान आणि ज्ञान यांना जोडणारा जो नीतीचा पूल तो वेळोवेळीं जेथें बांधणें योग्य दिसेल तेथें बांधून आणि, ज्ञानांतून विज्ञानांत आणि विज्ञानांतून ज्ञानांत, संचार करून मनाला मिळणारें समाधान मिळवूं अशी आकांक्षा भावी पिढी धरील याविषयीं कोणीहि निराश होऊं नये.

---

## आन्हिक १३ वें

# उपसंहार

कुटुंब म्हटलें म्हणजे त्याची कमींत कमी व जास्तींत जास्त व्याप्ति पूर्वीं सांगितली इतकीच. म्हणजे बाप, आई, मुली व मुलगे यांचेच काय ते परस्परांवर कांहीं कायदेशीर हक्क असतात. पण अर्थात् ही स्वतंत्र तुटक कुटुंबाची गोष्ट होय. कुटुंब अविभक्त असलें तर त्याची व्याप्ति व मिळकतींतील हक्क किती दूरवर जातील हें सांगणें कठीण आहे. आणि केवळ तात्त्विक दृष्टीनेंच एखाद्या अविभक्त हिंदु कुटुंबाची व्यापक कल्पना करावयाची, तर त्याच्या चुलत भावांच्या खालवरच्या अनेक पिढ्या, त्यानंतर सपिंड, त्यानंतर समानोदक व त्यानंतर बंधुगण अशा वाढत्या क्रमानें शेंकडों मनुष्यांचा समावेश होऊं शकेल आणि अच्या मिळकतीचा वारस ब हा वारसांच्या यादींत सात चुली टाकून, वरच्याखालच्या कुठल्या तरी पिढींत क्रमांक दीडशें दोनशें येथेंहि उमटेल ! पण हा केवळ तात्त्विक विचार झाला. कारण आधीं मिळकत बहुधा वाटून वाटून तुकडे होत होत नाहींशी झालेली असते. किंवा तिचा लोभ सुटेल इतकी मोठी ती कोठें उरली असली असें मानलें, तरी हा अ व हा ब यांच्यामधले १४९ वारस नसतील तेव्हां ब ची पाळी यायची. अर्थात् ही केवळ आकडेमोड होय. तींत स्वारस्य कांहींच नाहीं. जुन्या काळीं सुहेरसुतक पाळीत तेव्हांहि जास्तींत जास्त तीन चुली व पिढ्या मानीत. पण सुहेर सुतकाच्या आधींच मिळकतीला पाय फुटतात.

प्रत्यक्ष व्यवहारांत तर सख्खे चुलत भाऊदेखील अविभक्त म्हणून एकत्र नांदलेले फार थोडे आढळतील. मग पलीकडच्यांची गोष्ट कशाला? बहुधा दुसऱ्याच पिढींत मिळकतीच्या वाटण्या होतात. आणि स्वतः बाप, आई व त्यांचीं मुलें एवढेंच कुटुंब सुटें, वेगळें निघतें. वाटण्या होत गेल्यावरहि अगदीं क्वचित् एखादा मिळकतीचा तुकडा समाईक राहातो! उदाहरणार्थ, एकाद्या लांबच्या डोंगरावरचें गवती कुरण, किंवा एखादा पाण्याचा पाट किंवा वाटणी होत नाहीं अशा इनामी उत्पन्नांतील आणे पैचा अंश. पण बाप, आई व मुलें यांपलीकडील समाईक मिळकतीचा हक्क व्यवहारदृष्ट्या नाहीं असें घेऊन चालतां येईल. कायदेशीर संबंध एकदां सोडून दिला म्हणजे मग मनुष्यानें आपला म्हणून गोतवळा केवढा मानावा याला अर्थात् कांहींच नियम नाहीं. तो प्रेमानें मानील तो दूरचाहि असला तरी जवळचा होतो. व परकीय भावनेनें देखील तर जवळचाहि दुरावेल! प्रत्यक्ष नवरा व बायको यांचें न पटल्यामुळें उभयतांनीं वेगळा जन्म घालविल्याचीं उदाहरणें जशीं सांपडतील, तशींच उलट परजातींतील एखादा मनुष्य केवळ अकारण प्रेमानें जवळचा वाटून त्यांनीं एकत्र जन्म घालवावा, व अखेर एकाची मिळकत सर्व दुसऱ्याला मिळावी, अशींहि उदाहरणें आढळणार नाहींत असें नाहीं. याचा अर्थ माणसाचा गोतवळा केवढा मोठा? तर त्याचें मन किंवा सात्त्विक अहंकार जेवढा मोठा तितका!

मन ही इतकी लवचिक वस्तु आहे कीं, तिच्या संकोचाला व विस्ताराला मर्यादाच नाहीं. रबर वगैरे कांहीं लवचिक वस्तु आपण पहातों तरी त्यांच्या लवचिकपणाला मर्यादा असते. पण मन हवें तितकें लहान व हवें तितकें मोठें होऊं शकतें. कारण बायकोचीहि उपाधि वाटते म्हणून आजन्म ब्रह्मचारी राहणारा एखादा मनुष्य, पण तोच आपल्या सबंध राष्ट्रावर किंवा देशावर आत्मीय भावनेनें प्रेम करणारा व त्याला प्राणासकट सर्वस्व दान करणारा भेटावा असाहि चमत्कार जगांत दिसून येतो! आणि एका अर्थानें मनुष्य व त्याचा देश किंवा राष्ट्र हीं जितकीं एकमेकांना जवळ आहेत (इतकेंच नव्हें तर, जितकीं उपयोगीं व उपकारी आहेत) तितका कुटुंबापलीकडचा गोतवळाहि असत नाहीं. यासंबंधानें एक प्राचीन तत्त्ववेत्ता साक्रेटिस याचे विचार एके ठिकाणीं आढळले ते चांगले वाटतात म्हणून

तेच देतों. तो म्हणतो, " आपले आईबाप, आपले पूर्वज, यांच्यापेक्षां आपल्या देशाचें महत्त्व अधिक आहे असें मनुष्याला वाटलें पाहिजे. सूज्ञ माणसें ही गोष्ट मानतीलच. पण ईश्वराघरींहि ती रुजू होईल यांत शंका नाहीं. आपण देशावर प्रेम केलें तर देशहि आपणावर प्रेम करील. देश आपणावर रागावला तर आपण त्याचें सांत्वन समाधान केलें पाहिजे. विनयभावानें आदरानें त्याची प्रार्थना केली पाहिजे. आणि जर आपणाला त्याचें मन वळवितां आलें नाहीं तर त्याची आज्ञा बिनतक्रार मानली पाहिजे. त्यानें आपणाला शिक्षा केली तर ती निमूटपणें सोसली पाहिजे. त्याच्याकरतां रणांगणावर जाऊन जखमी झालें पाहिजे व मृत्यूचाहि स्वीकार केला पाहिजे. तसेंच न्यायकोर्ट किंवा राज्यकारभाराचें इतर कोणतेंहि स्थान या ठिकाणीं देशाची आज्ञा मानली पाहिजे. आईबापांना अपकार करणें हें जर वाईट तर आपल्या देशाला, राष्ट्राला अपकार करणें हें त्याहून वाईट." ( प्लेटोकृत सॉक्रेटिसाचे संवाद.)

वरील उद्गारांसंबंधानेंहि एक गोष्ट विशेष लक्षांत ठेवली पाहिजे ती ही कीं, ज्या अथेन्समधील नगरराष्ट्राचा नागरिक व प्रजाजन सॉक्रेटिस हा होता तें वास्तविक अनेक दोषमय असें राष्ट्र होतें. राष्ट्रबंधनाचा तो पहिलाच प्रयोग होता, असें म्हणतां येईल. पण आतांचीं राष्ट्रें तर त्याहून अधिक गुणसंपन्न परस्परोपकारी झालीं आहेत. तेव्हां सॉक्रेटिसापेक्षांहि हल्लींच्या नागरिकांनीं आपल्या राष्ट्राविषयीं अधिक प्रेम दाखविलें तर तें सकारण व समर्थनीय होईल. यावर कोणी विचारील कीं, " राष्ट्र हें मनुष्य व्यक्तीला म्हणजे आपल्या प्रजाजनाला काय देतें ? " तर या प्रश्नाचें उत्तर म्हणून उलटहि प्रश्नच विचारतां येईल कीं, " राष्ट्र हें आपल्या प्रजाजनाला देत नाहीं असें तरी काय आहे ?" मनुष्यानें स्वतः-विषयीं अभिमान बाळगावा अशी जी कोणतीहि गोष्ट म्हणून दाखवितां येईल, ती वास्तविक त्याच्या राष्ट्रानेंच त्याला दिलेली आहे. नागरिकाचा प्रत्येक गुण व त्याच्या संपत्तींतील प्रत्येक कण हा राष्ट्रसमाजाच्या जीविता-पासूनच त्याला मिळालेला आहे. एक साधेंच उदाहरण घेऊं. मनुष्याची पहिली गरज व सर्वांत मौल्यवान मिळकत त्याची भाषा होय. भाषेवर सर्व व्यवहार अवलंबून असतो. मनुष्याला वाचाशक्ति ही ईश्वर देतो पण

भाषा ही त्याला राष्ट्रीय समाजापासूनच मिळते. स्वतः मनुष्य हा एकहि नवा शब्द असा उत्पन्न करीत नाहीं. त्याच्या भाषाव्यवहारांतील सर्व शब्द समाजानेंच, तो बोलूं लागण्यापूर्वी, निर्माण केलेले असतात. भाषा काढून घेतली तर त्याचे विचार इतरांना व इतरांचे विचार त्याला कळणार नाहींत. आणि हें न झालें तर त्याची बुद्धि कितीशी परिपक्व होईल ? लहानपणीं पाळण्यांत असतां जीं गाणीं ऐकून त्यांच्या नादांत आपण झोंपी जातों ती आपल्या राष्ट्राचीच देणगी नव्हे काय ? त्याहून आपण थोडे मोठे झालों म्हणजे ज्या अद्भुत गोष्टी कथा ऐकून आपली करमणूक होते ती तरी कोणाची देणगी ? 'अडगुलमडगुलं' या निरर्थक शब्दापासून 'अहं ब्रह्मास्मि' या तत्त्वज्ञानाच्या शिखरापर्यंत मध्यंतरीं जितकें ज्ञान व ज्ञानाची अनुभूति मनुष्याला लाभते, ती त्याच्या राष्ट्रसमाजाचीच देणगी होय. मनुष्य आपली उपजीविका करतो, त्या धंद्यांतील सर्व विद्या, साधनें, उपकरणें, रीती, कौशल्य ही त्याच्या समाजांतूनच त्याला मिळतात. त्याच्या श्रमाचा व बुद्धिकौशल्याचा मोबदला त्याला मुख्यतः त्याच्या समाजांतूनच मिळतो. घरीं भूक लागली असतां सुग्रास भोजन करावें, सुखसोयींचा आनंद घेतघेत घरीं बसावें, सोयीच्या रस्त्यांनीं बाहेर हिंडूनफिरून व्यवहार करावा, मिळविलेल्या संपत्तीचें रक्षण व्हावें, एखाद्या किल्ल्याप्रमाणें आपलें घर हें अभेद्य वाटावें, त्यांत कुटुंब-जीवनाचा आनंद व सुख भोगीत जन्म काढावा, आणि सुशिक्षित सद्‌गुणी संततीच्या रूपानें मरणोत्तरहि पुनर्जन्म लाभावा; या गोष्टी मनुष्याला समाजाबाहेर कशा मिळतील ? त्याच्या स्वतःच्या श्रमाचा, कौशल्याचा, व सच्चरित्राचा किंवा पुण्याचा फायदा हा तर त्याला मिळतोच. पण त्याच्या राष्ट्रांतील इतर लोकांच्या या गोष्टींचाहि फायदा त्याला मिळतो. जग सुधारलें तें कोणा एकट्या माणसानें सुधारलें नाहीं. त्याला इतर राष्ट्रांतील समाजाचीहि मदत झालीच असेल, पण मुख्यतः त्याच्यापुरतें बोलावयाचें तर, त्याच्या समाजाचीच झालेली आहे. उलट त्याग व हानी यांच्या दृष्टीनेंहि पहातां व्यक्तीच्या त्यागापेक्षां व हानीपेक्षां समाजाचा त्याग व समाजाची हानी हीं इतकीं मोठीं भरतात कीं, व्यक्तीचीं त्यापुढें कांहींच नव्हत. समाजाच्या देणगीची किंमत ती नष्ट झाल्याशिवाय मनुष्याला कळत नाहीं. आपण हद्दपार झालों, किंवा कोणा परकी मनुष्यानें आपल्या समाजाची

निंदा केली म्हणजे मात्र आपल्या समाजाची किंमत आपल्या लक्षांत येते. एरवीं समाजाकडून जें सुख आपणाला मिळतें तें आपलें आहेच आहे, त्यांत नवें काय मिळालें, असें सकृद्दर्शनीं वाटतें. पण त्याचा उगम आपल्या समाजाच्या अनेक पिढ्यांच्या मागें दडलेला असतो. झाडाला जें ताजें फळ आज येतें त्यांतील सत्त्व, रुचि, किंवा गुणकारितां ही एकट्या यंदाच्या वसंत पालवीनें त्याला आलेली नाहीं तर त्या झाडाच्या आयुष्यांत आजवर ज्या अनेक पालव्या आल्या व झडून गेल्या त्या सर्वांचा तो सामुदायिक परिणाम आहे.

राष्ट्र व प्रजा यांचें हें नातें व्यक्त करणारा सर्वांत उत्तम शब्द म्हटला म्हणजे नागरिक हा होय. नागरिक या सुट्या शब्दानें एकेरी व्यक्तीची कल्पना तर येतेच. पण नगराचीहि कल्पना तो शब्द उच्चारल्याबरोबर येते ही गोष्ट महत्त्वाची आहे. राष्ट्रांतील सर्व मनुष्यव्यक्तींचें मिळूनच राष्ट्र बनतें हें खरें असलें तरी, यापैकीं कोणतेंहि एक मनुष्य घेतलें असतां उभयतांच्या व्यवहाराची सोय चांगलीशी निघत नाहीं. याला दाखला असा कीं, मनुष्य ज्याच्या योगानें आपली क्षुधा भागवितो तें जेवण घेतलें, तर तें अन्नाचा एकेक सुटा कण असें हजारों कण एकत्र होऊनच बनलेलें असतें. पण मनुष्य अन्नव्यवहार करतांना सगळें जेवण एकदम जेवूं शकत नाहीं, किंवा अगदीं एकेक शीत सुटें करूनहि खात नाहीं. पण अनेक शितें मिळून एक घास होतो.आणि अनेक घास मिळून जेवण होतें. अर्थात् मनुष्याच्या अन्नव्यवहारांत घास हा जसा मध्यवर्ती व सोईचा, तसेंच नगर हें एकेरी प्रजाजन, व्यक्ति व सामुदायिक राष्ट्र यांच्या दरम्यान असून, व्यवहार-क्षमतेला अतिशय सोईचा असा घटक आहे. पिंड–ब्रह्मांड या भाषेनें बोलावयाचें तर राष्ट्ररूपी ब्रह्मांडाचा पिंड सुटा एकेरी प्रजाजन हा नसून नगर हाच ठरतो. कारण पिंड म्हटला म्हणजे त्यांत ब्रह्मांडाचे सगळे गुणधर्म व रूपें संक्षिप्त का होईनात पण सिद्ध असावीं लागतात. तीं नगरांत प्रतीत होतात; सुट्या व्यक्तींत होत नाहींत. नागर म्हणजे सुशिक्षित सुसंस्कृत असा अर्थ आहे. त्याचेंहि कारण हेंच कीं, राष्ट्रांतील सर्वोत्तम शिक्षण किंवा सर्वोत्तम संस्कृति ही नगरांतच पहावयास सांपडते. आतां नगर या शब्दाची व्याप्ति केवढी धरावी हें ठरविणें मोठें कठीण

आहे. कारण गांव, शहर, नगर इत्यादि शब्द समानार्थक असतांहि त्यांत बऱ्याच लहान व पुष्कळच मोठ्या अशा समाजांचा समावेश होतो. म्हणून तारतम्यानें, राष्ट्राचा सर्वांगीण प्रतिनिधि होऊं शकेल अशा बेताचाच समाज नगर या शब्दानें घेतला पाहिजे.

